केसरी-सुवर्ण-महोत्सव-दिनानिमित्त तयार करून केसरी-मराठा
संस्थेच्या ट्रस्टींस अर्पण केलेला

# केसरी-प्रबोध

केसरी-महोत्सव-मंडळ

शके १८५३ ] [ सन १९३१

किंमत दोन रुपये

प्रकाशकः—लक्ष्मण बळवंत भोपटकर
अध्यक्ष—केसरी-महोत्सव-मंडळ पुणें नं. २

मुद्रक

श्री. सदाशिव रामचंद्र सरदेसाई, बी. ए., एल्‌एल्. बी.,
नवीन समर्थ विद्यालयाचा समर्थ भारत छापखाना
९४७ सदाशिव पेठ, पुणें नं. २
( खंड पहिला व तिसरा )

श्री. गणेश काशिनाथ गोखले,
सेक्रेटरी, श्रीगणेश प्रिंटिंग वर्क्स, ४९५-४९६ शनिवार पेठ, पुणें नं. २
( खंड दुसरा व मुखपृष्ठापासूनचीं पहिलीं सोळा पानें )







देशभक्त नरसिंह चिंतामण केळकर, संपादक 'केसरी'

व

श्रीयुत धोंडो वासुदेव विद्वांस, व्यवस्थापक केसरी-मराठा संस्था

या उभयता ट्रस्टींस

केसरी-सुवर्ण-महोत्सव-दिनानिमित्त

हा केसरी-प्रबोध अथवा पन्नास वर्षांचा संक्षिप्त केसरी

वाचकवर्गातर्फे कृतज्ञतापूर्वक अर्पण.

केसरी-महोत्सव-मंडळ



# प्रस्तावना

केसरी-महोत्सव-मंडळातर्फें हा केसरी-प्रबोध प्रसिद्ध होत आहे. केसरीचा ज्युबिली-अंक प्रसिद्ध झाला त्याच्या पूर्वीपासूनच, केसरीच्या कांहीं मित्र-मंडळींच्या मनांत या ग्रंथाविषयींची कल्पना उत्पन्न झाली होती. मित्रमंडळींच्या साहाय्यानें ती वाढीस लागून ती अंमलांत आणण्यासाठीं म्हणून मंडळ स्थापण्यांत आलें. पहिली कल्पना अशी होती कीं, केसरीचे जुने स्नेही व ऋणानुबंधी यांस लिहून निरनिराळ्या विषयांवर लेख मागवावेत. त्याप्रमाणें विषयांची एक यादी तयार केली व आपल्या कल्पनेप्रमाणें कांहीं कांहीं माणसांना विषय वाटून दिले. पण त्यांतच विषयाच्या अभ्यासासाठीं जरूर तीं टाचणें पाठवून देऊन बऱ्याच मित्रांकडून उत्तेजनपर उत्तरें आलीं. दरम्यान हीं टिपणें आणि टांचणें करतां यावीं म्हणून केसरीच्या अडीच हजार अंकांची सूची करण्याचें काम चालू केलें होतें; तें संपतांच विषयांची संख्या व प्रत्येक पोटविषयाचा तपशील यांचा हिशेब लागला. त्यावरून परठिकाणच्या लेखकांना आणि येथीलांस सुद्धां कचेरींतून माहिती पुरविणें आणि टिपणें धाडणें हें अगदीं अशक्य आहे असें दिसून आलें. म्हणून पुणें येथें येऊन प्रत्यक्ष फायलींचा परिचय करून घेऊन लेख लिहावे असें वरील मित्रांना लिहिलें. ही गोष्ट अर्थातच अशक्य होती. यामुळें बाहेरील लेखकांचा व पुण्यास असूनसुद्धां जे कोणी कचेरींत येऊन बसण्यास असमर्थ होते त्यांचा नाद सोडावा लागला. आगाऊ तयार झालेल्या सूचींतील २०००० नोंदींचें, राजकीय, धार्मिक, ऐतिहासिक इ. असें विषयवार वर्गीकरण केल्यावर अशासारख्या ढोबळ विषयांवर लिहिलेले लेख सामान्य स्वरूपाचे व कमी बोधप्रद होतील असें दिसूं लागलें. म्हणून या विषयांचे अनेक पोटविभाग करून त्यांपैकीं एक एक विषय एक एक लेखकाकडे सोपविण्यांत आला. अर्थात् जवळ जवळ शंभर लेखक तरी या प्रचंड उद्योगांत सामील व्हावयास हवे हें स्पष्ट झालें. आनंदाची गोष्ट ही कीं, त्या तऱ्हेनें खटपट सुरू करितांच ही संख्या सहज पुरी करतां येण्यासारखी आहे असें दिसून आलें. असें केल्यामुळें लेखकांना आपापल्या कामाची निश्चित कल्पना आली व म्हणून त्यांच्या अभ्यासाचें क्षेत्र कायम झालें. पुस्तकांत येणारे लेख आनुमानिक, तांत्रिक, विहंगम दृष्टीचे, स्तुतिपर, शुभचिन्तनपर किंवा आशीर्वादपर अशा स्वरूपाचे असूं नयेत तर ते केसरीच्या अभ्यासावर रचलेले असावे, ही योजना होतां होईतों सक्तीनें अंमलांत आणावयाची हें ध्येय सर्वांनीं मोठ्या हौसेनें पतकरलें. अनुक्रमणिकेवरून लेखकांचा व विषयांचा परिचय होण्यासारखा आहे, व त्यांतील पुष्कळ लेखक ग्रंथरूप वाङ्मयांत नव्यानेंच प्रविष्ट होत आहेत असें दिसून येईल. पण दोन दोन तीन तीन पदव्या मिळवून अभ्यासाची संवय बनविलेल्या आमच्या या होतकरू मित्रांना प्रस्तुतच्या नवीन कल्पनेचें कौतुक वाटल्यामुळें व केसरी संस्थेसंबंधीं त्यांस अभिमानबुद्धि असल्यामुळें त्यांनीं हें अभ्यासाचें काम चिकाटीनें केलें.

त्यांतील कित्येकजण अजून परीक्षासत्रांतून बाहेर पडलेले नाहींत तरीसुद्धां त्यांना या कार्याचा अंगीकार करावा असेंच वाटलें. दुसरे कोणी प्रोफेसर्स, कोणी शिक्षक, कोणी वकील; ज्यांना त्यांना आपलीं नित्याचीं कामें होतींच होतीं परंतु रोजच्या रोज कचेरींत येऊन कित्येक तास मोडून, पुरविलेल्या टिपणवहीवर टिपणें करून, अभ्यासाला जो सुपूर्तपणा आणणें जरूर होतें तो आणण्याची त्यांनीं उत्तम मेहेनत केली. असें अर्थातच म्हणतां येणार नाहीं कीं प्रत्येक विषयावर जे विचार त्या त्या लेखांत दिले आहेत तेवढेच काय ते केसरींत आले आहेत. पण सामान्यपणें अशी खातरजमा करण्यास हरकत नाहीं कीं अमुक एका विषयावर केसरीनें गेल्या पन्नास वर्षांत काय प्रतिपादिलें याची तोंडओळख नव्हे तर पुरेशी चांगली ओळख या ग्रंथाच्या वाचनानें खास होईल. केसरींत आलेला बारीक सारीक एकूणएक विचार पाहावयास हवा असल्यास त्याला मूळ फायलेंच वाचावयास हवींत. पण इतकी उडी न मारतां मुख्य मुख्य विचार कोणचे याची जिज्ञासा बाळगिली तर ती, ग्रंथांत आलेल्या विषयांपुरती तरी, पुढील लेखांनीं तृप्त होईल असा भरंवसा वाटतो. कोणचाहि लेख उघडून पाहिला तर असें दिसेल कीं, हें सर्व लिहिणें साधार लिहिलेलें आहे. कांहीं थोडेसे हकीकतवजा, किंवा विवेचनवजा लेख सोडले, तर प्रत्येक लेख केसरींतील त्या त्या विषयाचा सारांश आहे असें दिसेल. केसरीच्या मतांत आपल्या मताचें मिश्रण न करण्याची सक्त खबरदारी घेण्यांत आली आहे. दिलेल्या विषयांखेरीज आणखीहि कित्येक विषयांचा अंतर्भाव करितां आला असता तर बरें झालें असतें. पण त्यांची निवड करून घेतल्यावर आणखी सुद्धां कांहीं महत्त्वाचें असें राहिलेंच आहे व त्याचाहि अंतर्भाव करावा असें वाटलेंच असतें व अशा रीतीनें पुढें जातां जातां मूळ फायलेंच पुन्हां छापून काढावींत या कल्पनेपर्यंत आपण जाऊन पोंचलों असतों. म्हणून विषयांचें लौकिक महत्त्व, उपयुक्तता, व मंडळाच्या प्रयत्नाची मर्यादा हीं जमेस धरून पुस्तक केसरीच्या विचारांचें जितकें जास्त संग्राहक बनवितां येईल तितकें बनविण्याची मेहेनत घेतली आहे. याची एक खूण वाचकांना आधींच माहीत झालेली आहे. ती ही कीं, मूळ सहाशें पानांचा ग्रंथ संकल्पिला असतां तो जवळजवळ नऊशें पानांपर्यंत गेला आहे. असो. अशा या पुस्तकाची किंमतहि अल्प राहिली तरच तो तयार केल्याचें चीज होईल हें लक्षांत घेऊन ती केवळ 'दोन रुपये' ठेविली आहे. अर्थात् बाहेरच्या ठिकाणीं विकणावळ वगैरे मिळून थोडें जास्त मोल पडेल हें खरेंच आहे. वास्तविक पाहतां हा ग्रंथ तयार होण्याच्या कामीं म्हणजे त्याची हस्तलिखित प्रत तयार होईपर्यंतच कित्येक हजार रुपये खर्च झाले आहेत. तो खर्च यावर चढविला असता तर, सध्यांप्रमाणेंच नफा कसलाच न आकारितां सुद्धां, ही किंमत चार

रुपयांपर्यंत गेली असती; परंतु ग्रंथ गरीब वाचकालासुद्धां सुलभ व्हावा या हेतूनें या जाड्या रकमेचा बोजा केसरी संस्थेच्या मित्रमंडळींनीं आपल्या अंगावर खुषीनें घेतला. लेखकलोक, संपादकमंडळ, द्रव्यसाधनमंडळ, चिटणीस हे तर केवळ हौस व औदार्य यांनींच प्रेरित होते. परंतु सूची करणें इत्यादि कामावर मात्र वरील रक्कम खर्चावी लागली. असो.

लेखकांच्या संबंधांत आणखी कांहीं लिहावयास हवें. ग्रंथाची जाहिरात पाहून कित्येकांनीं इकडे अनाहूत असाच मजकूर पाठवून दिला; कित्येकांनीं कविता रचून त्या छापाव्या असें सुचविलें; कित्येकांनीं अभिनंदनपर, आशीर्वादपर असा मजकूर त्याच हेतूनें धाडिला. ग्रंथाचा हेतु व त्याची मर्यादा यांना अनुसरतां आम्हांस या लिखाणांचा अंतर्भाव करितां आला नाहीं याबद्दल वाईट वाटतें. कित्येक चांगल्या चांगल्या लेखकांनीं जवळ फाइलें नव्हतीं म्हणून केवळ आठवणीनेंच विस्तृत लेख लिहून धाडिले. त्यांचीहि आम्हांस क्षमा मागावयास हवी. कित्येकांनीं लिहिण्याचें आश्वासन देऊनहि लिहितां आलें नाहीं म्हणून दिलगिरी व्यक्त केली आहे. पण आरंभीं त्यांनीं तयारी दाखविली होती याबद्दलहि आम्ही त्यांचे आभारीच आहों. माहिती पुरविण्याची कल्पना टाकावी लागल्यामुळें बाहेर ज्या कित्येकांनीं तयारी दाखविली त्यांना आम्हांस हिरमुष्टि करावें लागलें. या चुकीबद्दल त्यांनीं आम्हांस क्षमा करावी. क्वचित् कोठें कचेरींतून पत्रव्यवहारांत हेळसांड झाली असेल किंवा तफावत पडली असेल हें कबूल केलें पाहिजे. ज्यांनीं लेख लिहिले त्यांना उद्देशूनहि चार शब्द जरूर आहेत. आपण मेहनतीनें लिहिलेल्या लेखासंबंधानें लेखकाला केवळ अपत्यप्रेम उत्पन्न होतें; यामुळें आपल्या लिहिण्यावर कांहीं संपादकीय संस्कार झाले तर त्याला अत्यंत वाईट वाटतें; व क्वचित् रागहि येतो; परंतु हरतऱ्हेच्या मर्यादा संभाळून, बहुतांनीं मिळून एक काम उरकावयाचें म्हणजे प्रत्येकाची इच्छा व आवड थोडथोडी मर्यादित होणार हें सहज आहे. लेख संपूर्ण आला नाहीं, भलत्याच ठिकाणीं कापाकापी केली, एकच गोष्ट अनेक तऱ्हांनीं पुनः पुनः लिहावयास सांगितली, संक्षेपाचे विस्तार करावयास सांगितले आणि विस्तार झाल्यावर त्याचे पुन्हां संक्षेप करावयास सांगितले अशाप्रकारचे अनेक बारीक बारीक प्रकार संपादकीय संस्करणाच्या कामीं करावे लागले. तरी वाचकांस कळविण्यास मनापासून आनंद वाटतो कीं, कोणाहि लेखकानें अवमान मानिला नाहीं किंवा डोईजड बनून संपादकास अडचण उत्पन्न केली नाहीं.

आमच्या स्नेह्यांपैकीं व केसरीच्या ऋणानुबंधी लोकांपैकीं कित्येक जुन्या जुन्या मंडळींचीं नांवें लेखकवर्गांत सांपडणार नाहींत; पण ते केवळ याच कारणानें कीं, नवीन लेखकांना आपल्या परिचयबंधनांत व सहानुभूतिपाशांत प्रविष्ट करितां यावें.

समर्थ भारत प्रेसचे चालक, आमचे मित्र स. सदाशिव रामचंद्र सरदेसाई

बी. ए., एल्एल्. बी. व श्रीगणेश प्रिंटिंग वर्क्सचे सेक्रेटरी, रा. गणेश काशिनाथ गोखले यांनीं हा ग्रंथ आम्हांस अवघ्या दीड महिन्याच्या मुदतींत छापून दिला. यांची आम्हीं किती गैरसोय केली असेल, वांझे हेलपाटे किती घालावयास लाविले असतील, जुळलेले टाईप पुन्हा पुन्हा कितीदां विस्कटावयास लाविले असतील, उभे फर्मे उभेच किती दिवस ठेवविले असतील, छापलेल्या फर्म्यांतील मधलींच पानें कशीं कापावयास लाविलीं असतील, ठरविलेले बेत पुन्हा पुन्हा कसे चाळविले असतील, कळविलेल्याच गोष्टी पुन्हा पुन्हा कळवून आणि कळवावयाच्या गोष्टी वेळेवर न कळवून आम्हीं त्याना कसें सताविलें असेल याची हकीगत छापखानेवाल्यांना व अननुभवी संपादकांना फार बोधप्रद ठरेल. परंतु हा 'दसकी लकडी' चा रोजगार आहे आणि 'मंडळ' म्हटलें तरी ती हौशी स्वयंसेवकांची बारभाई आहे हें लक्षांत घेऊन त्यांनीं अवमान मानिला नाहीं इतकेंच काय, पण नुसती नापसंती सुद्धां दर्शविली नाहीं. पण हें कांहींच नव्हे. छापण्याची गोष्ट काढतांच पैशा-अडक्याच्या मुदतीसंबंधानें अवाक्षरहि न काढितां मंडळापैकीं आपणहि आहों असें भलेपणानें मानून, आपल्या हाताखालील लोकांना सुद्धां अहोरात्र दगदग देणारें हें काम त्यांनीं सुखसंतोषानें तडीस नेलें. या त्यांच्या अभिजात सौजन्या-बद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहों. तसेंच विजय प्रेसचे मालक रा. अप्पासाहेब गोखले यांनींहि अगदीं अडचणीच्या प्रसंगीं आमच्या हाकेस जाब देऊन फोटोग्राफ्स व अनुक्रम यांची अडून पडलेली छपाई अत्यंत जलदीनें करून दिली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों. मुंबई येथील वागळे आणि कंपनी यांनीं केलेल्या ब्लॉकच्या कामाबद्दल आणि चित्रकार एन्. व्ही. वीरकर यांनीं जरूर ते फोटो पुरविल्याबद्दल तेहि अभिनंदनास पात्र आहेत. रा. रा. महाजन केसरीचे मुख्य एजंट यांनीं आपल्या एजन्सीचा जो आम्हांस उपयोग होऊं दिला त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत. रा. पांडुरंगपंत गाडगीळ, रा. त्रिं. रा. दामले, व रा. बाळकृष्णपंत ताटे यांनीं कच्चे छाप तपासण्याच्या कामीं केलेल्या मेहनतीस मोल नाहीं. सतत तीन महिनेपर्यंत ग्रंथसंपादनाचें काम ज्यांनीं केसरीविषयक कृतज्ञताबुद्धी-नें केलें त्यांचीं नांवें दुसरीकडे दिलीं आहेत. असा हा ग्रंथ केसरीच्या पन्नास वर्षांच्या सुवर्णमहोत्सवाच्या दिवसानिमित्त तयार करून तो आम्ही केसरीसंस्थेचे ट्रस्टी दे. भ. तात्यासाहेब केळकर व श्री. धोंडोपंत विद्वांस यांस अर्पण करीत आहों. केसरीविषयींची आमची कृतज्ञता व्यक्त करण्याची आमची ही अभिनव पद्धति त्यांस पसंत पडेल असें वाटतें. आपली जवळ जवळ सर्व हयात ज्या संस्थेच्या ऊर्जिताची रचना करण्यांत आपण खर्चं केली तिचें पुढील पिढींतील तरुण लोकांनीं केलेलें हें कौतुक त्यांच्या चित्तास सदैव आनंदवीत राहील असाहि आम्हांस भरंवसा वाटतो.

चैत्र शु. प्रतिपदा शके १८५३  लक्ष्मण बलवंत भोपटकर.

## केसरी–महोत्सव–मंडळ

श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांचा

# आशीर्वाद.

केसरी म्हणजेच महाराष्ट्र आणि महाराष्ट्र म्हणजेच केसरी! गेलीं पन्नास वर्षें केसरी महाराष्ट्राचा 'जागली' म्हणून त्याचें रक्षण करीत आहे. केसरीनें महाराष्ट्राला निर्भय केलें, केसरीनें महाराष्ट्राचे डोळे उघडले, केसरीनेंच त्याला स्वधर्माची, स्वदेशाची, स्वभाषेची आणि स्वकर्तव्याची ओळख करून दिली. केसरीनेंच कर्मयोगाचे धडेहि त्याला दिले, 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' ही श्रीकृष्णाची उदात्त शिक्षाहि केसरीनेंच महाराष्ट्रास लावली, गोब्राह्मणप्रतिपालक श्रीछत्रपतींचा महिमा केसरीनेंच आम्हांस दाखविला, श्रीमंगलमूर्ति गजाननाची कृपा संपादन करण्याची श्रद्धा केसरीनेंच आमचे ठायीं आरोपित केली, आम्हांस निरंतर दास्यांत, दारिद्र्यांत आणि दुर्दशेंत ठेवणाऱ्यांशीं संग्राम करण्याचें धैर्यहि केसरीनेंच आमचे चित्तांत उभें केलें. आणि 'हतो वा प्राप्स्यासि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महिम्' हें बुद्धीला निश्चय देणारें तत्त्वज्ञान आम्हांस आचरून दाखविलें. एवंच आमचें जीवन म्हणजेच केसरी असा संबंध संस्थापित केला! आज या शुभकर्मास पन्नास वर्षें पुरीं झालीं. या अवधींत दर मंगळवारीं जो अखंड प्रबोध आम्हांस झाला त्याची वाङ्मयलघुमूर्ति आमच्या संपुटांत ठेवण्यासाठीं सिद्ध करण्याचा जो समुचित उपक्रम दीर्घ परिश्रमानें आपण सिद्धीस नेला आहे त्याला आम्ही प्रेमसंतोषपूर्वक पीठाकडून आशीर्वाद समर्पण करतों आणि श्रीचंद्रमौलि-श्रीशारदांबा यांच्या चरणीं प्रार्थना करितों कीं अग्रेसरत्वाच्या ज्या मार्गावर केसरीनें आम्हांस स्थित केलें त्या मार्गानें पुढें जाऊन स्वातंत्र्य, सुख व समाधान या त्रैगुण्यैश्वर्यांनें मंडित अशा परम श्रेष्ठ धामाप्रत पोहोचावयास आणि 'न हिंदुः प्रभुरात्मनः' हा कलंक दूर करून 'आत्मैव ह्यात्मनः प्रभुः' असें उज्ज्वल रूप मिरवावयास त्यांनीं आम्हांस समर्थ करावें. 'इति शम्'

---

# सचित्र अनुक्रमणिका

## प्रथम खंड

(१) केसरीचा नवा संप्रदाय, पृ. १ ते १६.



श्री० श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

(२) राष्ट्रीय सभा, पृ. १७ ते ६२.



श्री० केशव लक्ष्मण ओगले, बी. ए.

(३) केसरीची स्वराज्याची चतुःसूत्री, पृ. ६४ ते ७२.



श्री० श्रीपाद दामोदर सातवळेकर, सं. पुरुषार्थ.

(४) हिंदी स्वराज्य-संघाची चळवळ, पृ. ७२ ते ९७.



श्री० सदाशिव विनायक बापट.

(५) स्वराज्य-संघ, पृ. ९७ ते ११०.



श्री० माधव विठ्ठल साने, बी. ए.

(६) राजकीय विचारांची उत्क्रान्ति, पृ. ११० ते १२४.

[सन १८८० ते १९०२]

श्री० दत्तात्रेय विष्णु आपटे, बी. ए.

(७) बहिष्काराची चळवळ, १२४ ते १४१ (८) शिवाजी-उत्सव, १४२ ते १५५



श्री० सदाशिव खंडो आळतेकर, बी. ए., एलएल्. बी.



श्री० विश्वंभर उद्धवराव वैद्य.

(९) परराष्ट्रीय धोरण, १५५ ते १७६ (१०) क्रांतिकारकांचें कर्मकांड, १७६ ते १८५



श्री० श्रीपाद रामचंद्र टिकेकर.



श्री० नारायण तुकाराम ठाकूर, बी. ए.

(११) लष्करी शिक्षण, १८९ ते १९७ (१२) अँग्लो-इंडियन प्रतिस्पर्धी, १९७ ते २०५



प्रो० दत्तात्रेय गोपाळ कर्वे, एम्. ए.



श्री० श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, बी. ए.

(१३) राजबंद्यांचे हाल, पृ. २०६ ते २१५.



श्री० शंकर कृष्ण करंदीकर, बी. ए.

(१४) ग्रामपंचायत, पृ. २१५ ते २१८.

श्री० तपस्वी बाबासाहेब परांजपे

(१५) तंगभंग पृ. २१८ ते २२७.



श्री० डी. व्ही. आठल्ये, बी. ए.

(१६) केसरीवरील राजद्रोहाचे खटले, पृ. २२८ ते २३४.



श्री० चिंतामण अनंत तुळपुळे, बी. ए., एल्एल्. बी.

(१७) हिंदी राजकीय-सुधारणांचे हप्ते, पृ. २३४ ते २४०.

संपादक–श्री० शंकर कृष्ण करंदीकर, बी. ए.

(१८) स्वराज्य आणि स्वातंत्र्य, पृ. २४० ते २४४



प्रो० दत्तो वामन पोतदार, बी. ए.

(१९) निवडक उतारे, पृ. २४४ ते २५०.

शंकर कृष्ण करंदीकर, बी. ए.

(२०) हिंदुस्तानाबाहेरील हिंदी लोक, पृं. २५१ ते २६०.



चिंतामण यशवंत मराठे

(२१) नेमस्त प्रतिपक्षी, पृं. २६१ ते २६८.



दत्तात्रेय गणेश येरवडेकर, एम्. ए. एल्एल्. बी.

(२२) हिंदुस्तानचें राजकीय ध्येय, पृं. २६८ ते २७२.



डॉ० विष्णु महादेव भट, बी. ए., एम्. बी. बी. एस्.

(२३) मजूरपक्ष व हिंदुस्थान, २७३ ते २७५



डॉ० मोतीराम बाळकृष्ण वेलकर, एम्. बी. बी. एस्.

(२४) हिंदी संस्थानें, २७६ ते २८९



गणेश रघुनाथ अभ्यंकर, बी. ए., एल्एल्. बी.



लक्ष्मण बळवंत भोपटकर,
एम्. ए., एल्‌एल्. बी.





# द्वितीय खंड

(१) मराठीचें शुद्धलेखन, पृ. १ ते १०



श्री० गोविंद कृष्ण मोडक

(२) नाट्य, पृ. १० ते २३



श्री० त्र्यंबक सीताराम कारखानीस

(३) मराठीचा पुरस्कार, पृ. २४ ते ३१



श्री० केशव नारायण वाटवे, एम्. ए.

(४) साहित्य चर्चा, पृ. ३१ ते ४१



श्री० दत्तात्रेय केशव केळकर, बी. ए.

(५) मथळे, पृ. ४१ ते ५०



श्री० नरहर रामचंद्र पारसनीस, बी. ए.

(६) संपादकीय निर्देश, पृ. ५० ते ५९



श्री० गोपीनाथ गणेश तळवलकर,
सं. 'आनंद'

(७) हिंदु-संघटन, पृ. ६० ते ६४



श्री० श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य

(८) पन्नास वर्षांतील धर्मकार्य, पृ. ६४ ते ८२



श्री० गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे

(९) संस्कृत विद्येचीं स्थित्यंतरें, पृ. ८२ ते ८९



श्री० नारायण सीताराम भट, बी. ए., एल्एल्. बी.

(१०) स्त्री-शिक्षण, पृ. ९८ ते ९४



सौ० गिरिजाबाई केळकर

(११) सामाजिक सुधारणा आणि कायदा, पृ. ९४ ते १०१



डॉ० गो. वि. देशमुख, M. D. (Lond.) F. R. C. S. (Eng.)

(१२) हिंदु धर्म, पृ. १०१ ते १०८



श्री० विश्वनाथ माधव देशमुख, बी. ए., एल्एल्. बी.

**(१३) स्त्रियांच्या चळवळी,**
पृ. १०९ ते ११५



कु० बाळूताई खरे, प्रदेयागमा

**(१४) हिंदु-मुसलमान; वाद्यांचा प्रश्न,**
पृ. ११६ ते १२५



श्री० बलवंत नारायण शिंडे,
बी. ए., एल्एल्. बी.

**(१५) गोरक्षण,** पृ. १२६ ते १३०



श्री० बाळकृष्ण मार्तंड चौंडे

**(१६) चॅन्सेलरांचीं भाषणें,** पृ. १३० ते १३७



श्री० दत्तात्रेय बापू रानडे, एम्. ए.

**(१७) हिंदु-संघटन,** पृ. १३८ ते १४६



श्री० वि. गो. आपटे

**(१८) युनिव्हर्सिट्या व देशभाषा,**
पृ. १४६ ते १६१



श्री० वि. [illegible], बी. ए.

(१९) युनिव्हर्सिट्या व देशभाषा,



रा. ग. गोखले, बी. ए., बी. टी.

(२०) तत्त्वज्ञान, पृ. १६२ ते १६७



श्री० महादेव धोंडो विद्वांस,
एम्. ए., एल्एल्. बी.

(२१) राष्ट्रीय शिक्षण, १६७ ते १७४



श्री० राजाराम दामोदर देसाई, बी. ए.

(२२) संप व मजूर चळवळी, १७५ ते १७९
(२३) दुष्काळ, १७९ ते १८५



श्री० पांडुरंग वासुदेव गाडगीळ,
वाङ्मयविशारद

(२४) जातगोत मोडून विवाह,
पृ. १८६ ते १८९



श्री० श्रीधर शंकर भागवत,
बी. ए., एल्एल्. बी.

(२५) महाराष्ट्र-इतिहास विषयक
कामगिरी, पृ. १९० ते २११



श्री० दिनकर विनायक काळे, एम्. ए.

(२६) श्रीगणेशोत्सव, पृ. २११ ते २१७

श्री० शंकर रामचंद्र दाते, बी. ए.

(२७) भौतिकशास्त्रें आणि उद्योगधंदे, पृ. २१७ ते २२५



श्री० मोहिनीराज शंकर मुळ्ये, एम्. ए.

(२८) हिंदु-मुसलमान राजकीय हक्क, पृ. २२५ ते २३७



श्री० स. के. नेऊरगांवकर, बी. ई.

(२९) इनॉक्युलेशन व प्लेग-व्यवस्था, पृ. २३८ ते २४६



डॉ० रामचंद्र अनंत राईरकर, एम्. बी. बी. एस्.

(३०) विवाहवय व संमतिवय, पृ. २४६ ते २५१



श्री० लक्ष्मण दत्तात्रेय जोशी, बी. ए., एल्एल्. बी.

(३१) थिऑसफी व डॉ० बेझंट, पृ. २५१ ते २५८



प्रो० राजाराम सखाराम भागवत, एम्. ए.

## (३२) ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी, पृ. २५९ ते २६९



प्रो० शंकर वामन दांडेकर, एम्. ए.

## (३३) कीर्तनें व कीर्तनकार, पृ. २६९ ते २७२



श्री० विष्णु सखाराम घाटे

## (३४) प्राच्यविद्या, पृ. २७२ ते २७६



श्री० सिद्धेश्वर लक्ष्मण चित्रावशास्त्री

## (३५) शेतकी–इरिगेशन, पृ. २७६ ते २८१



सरदार राजाराम जनार्दन पोतनीस, बी. एजी.

## (३६) पद्यवाङ्मय, पृ. २८१ ते २८६



श्री० चिंतामण गणेश कर्वे,
सं० महाराष्ट्र शब्दकोश

## (३७) देशी लांब धाग्याचा कापूस, पृ. २८६ ते २९०



श्री० सदाशिव मोरेश्वर फडके, बी. ए.

(३८) आयुर्वेद, पृ. २९० ते २९५



श्री० पुरुषोत्तम गणेश नानल, आयुर्वेदाचार्य.

(३९) अवतरणरूप सुभाषितें, पृ. २९५ ते ३०१



श्री० मुकुंद गणेश मिरजकरशास्त्री.

(४०) प्रचलित शिक्षणपद्धति, पृ. ३०१ ते ३०७



श्री० माधव तुकाराम ठाकूर, बी. ए.

(४१) सामाजिक भूमिका, पृ. ३०८ ते ३२२



श्री० प्रभाकर वासुदेव बापट, एम्. ए., बी.टी.

(४२) केसरीनें प्रसृत केलेली परिभाषा, पृ. ३२३ ते ३३७



श्री० आबा चांदोरकर.

(४३) शेती—लागवड, चारा, पिकांचे रोग, पृ. ३३७ ते ३४१



श्री० नरहर गंगाधर आपटे, बी. एजी.

(४४) प्राथमिक शिक्षण, पृ. ३४१ ते ३७७



श्री० यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एलएल्. बी., मुख्य संपादक शब्दकोश.

## तृतीय खंड

(१) ट्रस्टी वि. टिळकबंधु, पृ. १ ते ३२

श्री० लक्ष्मण बळवंत भोपटकर, एम्. ए., एलएल्. बी.

(२) केसरीचें आंतरराष्ट्रीयदृष्ट्या महत्त्व, पृ. ३२ ते ३३



प्रो० एन्. एन्. गोडबोले, एम्. ए., बी. एस्‌सी., पीएच्. डी.

(३) गोमांतकांतील केसरीचें कार्य, पृ. ३३ ते ३७

श्री० यशवंत सूर्यराव सरदेसाई

(४) देशी वृत्तपत्रांवरील राजद्रोहाचे खटले, पृ. ३७ ते ४७



श्री० द. गो. फडके, बी. ए., एलएल्. बी.

(५) केसरीची शिकवणूक व यवत-माळ जिल्ह्याची राजकीय प्रगति, पृ. ४७ ते ५३

श्री० एस्. एच्. बल्लाळ.

(६) संस्मरणीय दिवंगत व्यक्ति, पृ. ५३ ते ५८



श्री० सीताराम बाबाजी गुर्जर.

(७) केसरीच्या स्फूर्तीनें निघालेल्या संस्था, पृ. ८५ ते ९०



श्री० चिं. ग. काशीकर, वाङ्मयविशारद.

(८) ग्रंथालयांचें महत्त्व व त्यांचा प्रसार, पृ. ९० ते ९३



श्री० रघुनाथ शतानंद पारखी.

(९) जमीन-महसूल व तद्विषयक प्रश्न, पृ. ९३ ते ९९



श्री० धनंजय रामचंद्र गाडगीळ, एम्. ए., एम्. लिट् (केंब्र)

(१०) कायदा व न्याय, पृ. १०० ते १०९



प्रो० श्रीनिवास माधव दातार, एम्. ए., एल्एल्. एम्.

(११) आमचें दारिद्य व महागाई, पृ. १०९ ते ११६



श्री० श्रीपाद रामचंद्र पाळंदे, एम्. ए., एल्‌एल्. बी.

(१२) हिंदी पेढ्या (बँका), पृ. ११७ ते १२१



श्री० दत्तात्रेय बळवंत गोडबोले, एम्. ए., एल्‌एल्. बी.

(१३) पोटजाती व स्पर्शास्पर्श, पृ. १२१ ते १२९



संग्राहक—श्री० स. दि. वाकनीस, बी. एस्‌सी.

(१४) सरकारची उधळेगिरी, पृ. १२९ ते १३९

श्री० दत्तात्रेय बळवंत गोडबोले, एम्. ए., एल्‌एल्. बी.

(१५) चलन व हुंडणावळ, पृ. १४०ते१४६



प्रो० रा. वि. ओतुरकर. एम्. ए.

(१६) मद्यपाननिषेध, पृ. १४७ते१६१



श्री० शिवराम लक्ष्मण करंदीकर, एम्. ए., एल्‌एल्. बी.

**(१७) हिंदु-मुसलमान दंगे,** पृ. १६१ते१६८

श्री० ब. ना. भिडे, बी. ए., एलएल. बी.

**(१८) पंचांग-संशोधन,** पृ. १६८ते१८८



प्रो० विश्वनाथ बळवंत नाईक, एम्. ए.

**(१९) केसरीचे पांच संपादक,**
पृ. १८८ ते २०३

श्री० श्रीपाद महादेव माटे,
एम्. ए.

**(२०) ऐतिहासिक पत्रें आणि चर्चा,**
पृ. २०४ ते २१२



इतिहाससंशोधक श्री० शंकर नारायण
जोशी

**(२१) ऋणानुबंध व ऋणविमोचन,** पृ. २१३ ते २१४



श्री० विनायक रामचंद्र पटवर्धन, बी. ए., एलएल. बी.

# केसरीचा नवा संप्रदाय

[ श्री. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए. ]

केसरीनें दोन गोष्टी केल्या. मोठ्या आग्रहाचें प्रतिपादन करून एक नवा मतपंथ प्रस्थापित केला; व सर्व तऱ्हांच्या आपत्ति सोसून या पंथाचीं मतें समाजांत पसरवून देऊन देशांत कडक असंतोष उत्पन्न केला. या दोहोंपैकीं पहिल्या बाबी-संबंधानें अगदीं थोड्यांत विचार करावयाचें येथें योजिलें आहे.

खर्ड्यांच्या लढाईनंतर महाराष्ट्र देशाचें वैभव हळू हळू खचत चाललें. आधीं-पासूनच मोठ्या माणसांना ओहोटी लागली होती, ती जोरानें चालू झाली; बुद्धि व पराक्रम नाना व महादजी यांजबरोबर गेले; मसनदीवर विनवकूबाचा धनी येऊन बसला; व्यसनी व नादान लोक समर्थांच्या दारीं उभे राहूं लागले; चाणाक्षपणें या ऱ्हासाकडे पाहणाऱ्या इंग्रजांचे दूत आंत शिरूं लागले; पेशवा हा बंडखोर आहे, असें जाहीरनाम्यानें प्रसिद्ध झालें; सातारचे राजे आपण मुक्त झालोंसें मानूं लागले; हळू हळू त्यांच्या गळ्यालाहि तात लागूं लागली; लढाऊ राष्ट्रें व जाती, मसलतबाज व खानदानीचे लोक तेज गमावून बसले; अभिमानी घराणीं मागें पडलीं; बाजारांत देशी वस्तु हिणकस दिसूं लागल्या; लौकिक सुखसोयी इंग्रजाला जास्त माहीत आहेत व तो त्या निरपेक्षपणें आपणांस देत आहे असें वाटूं लागलें; मिशनरी लोक जेथें तेथें शाळा घालून बसूं लागले; तुमचा धर्म, तुमचीं पुराणें हीं सर्व खोटीं आणि ओंगळ आहेत असें ते सांगूं लागले; ज्यांना थोडें 'र ट फ' करण्याइतकेंच इंग्रजी येई त्यांची सुद्धां संसारांत बढती होऊं लागली, हें पाहून पांडित्याजोगें इंग्रजी लोक पढूं लागले; दरम्यान सर्व मराठी राज्य ढांसळलेंच होतें; या शिकणारांना आपल्या लोकांच्या नादानपणाच्या या खुणा आहेत असें वाटूं लागलें. खिस्ती मिशनऱ्यांनीं व अधि-काऱ्यांनीं दाखविलेल्या सामाजिक व धार्मिक उणीवांमुळें हें असें होत आहे असें मत चालू झालें. या मताचे सुशिक्षित लोकांतील पहिले जोराचे पुरस्कर्ते गृहस्थ म्हणजे गोपाळ हरि देशमूख हे होत. हे गृहस्थ चांगले कुलीन होते. त्यांच्या भावना शुद्ध असत. पडत असलेल्या फरकाकडे ते फार बारकाईनें पाहत असत. राजदरबारींहि त्यांना प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. पण त्यांच्या स्वतःच्या लेखनावरून आपल्या स्वतःची महानुभाविता त्यांना प्रतीत झाली होती असें दिसतें. त्यांचें मत हें, मोठी होऊं घातलेल्या तेव्हांच्या सर्व पिढीचें मत झालें. म्हणून तत्कालीन स्थित्यं-तराचें त्यांचें निदान काय होतें व त्यावर त्यांचा तोडगा काय होता हा पाहाण्या-सारखा आहे. १. 'मुख्य आमचे बोलण्याचा येथून आरंभ आहे कीं, ज्या गोष्टी ईश्वर

चढवून आणितो, त्या वाइटाकरितां नसतात. जरी त्या वाईट असा प्रथम, मनुष्याचें ज्ञान थोडें म्हणून, भास होतो, तरी त्यांजपासून मोठा उपयोग होत असतो ही गोष्ट खचित आहे. तेव्हां हिंदुस्थानचे लोक हे मूर्ख व धर्मकर्म सोडून अनाचारास प्रवर्तले, तें असें कीं, सती जाण्याची चाल, मुलें मारावयाची चाल, तीन वर्णांची नीच स्थिति, ब्राह्मणांचें माहात्म्य, विद्या क्षणिक, अतिशय गर्व, संपूर्ण देशाचे लोक आम्हां-पुढें तुच्छ व आम्ही श्रेष्ठ, तेव्हां हा भाव हिंदु लोकांचा मोडण्यास व त्यांस ताळ्यावर आणण्यास परदेशांतील सुधारलेले लोक यांची व त्यांची गांठ घालून देण्यापेक्षां उत्तम उपाय दुसरा कांहीं आहे असें वाटत नाहीं. यास्तव **ईश्वरानें या देशांत इंग्रजांची प्रेरणा केली आहे.** आतां हिंदु लोकांनीं पहावें कीं, आम्ही श्रेष्ठ कीं दुसरे देशाचे लोक श्रेष्ठ. ग्रंथावरून पहावें व लोकांचे तोंडून ऐकावें त्यापेक्षां समक्ष अशी भेट झाली तर फार चांगलें कीं नाहीं याचा विचार पहावा.' [ १-४-४९, लोकहितवादी, नं. ५४ ]. २. 'इंग्रज लोकांनीं इकडे राज्य संपादन केलें याचें कारण काय ? याचा विचार करितां दिसतें कीं, हिंदु लोकांमध्यें मूर्खपणा वाढला तो दूर होण्याकरितांच **हे गुरु दूर देशांतून इकडे परमेश्वरानें पाठविले आहेत.** पहा; **हिंदु लोकांस हा फार मोठा लाभ आहे कीं,** इंग्रज लोकांचे राज्यामुळें हिंदु लोकांत जागृति जाहली व पृथ्वीवर काय चालूं आहे हें कळूं लागले. ज्यास कोंकणापासून पुण्या-पर्यंतचा प्रदेश ठाऊक त्यास पूर्वीचे लोक मोठा माहितगार असें म्हणत. परंतु आतां बहुतांस इंग्रजांचा देश इंग्लंड व अमेरिका माहीत झाली. हें सर्व इंग्रजांमुळें झालें. **ईश्वरानें ही शहाणपणानेंच योजना केली आहे.** लोकांची झोंप जाण्यास दुसरा इलाज नव्हता.......अशा सारख्या लज्जास्पद ( सामाजिक ) चालींमुळें ईश्वराचा क्षोभ अत्यंत जाहला तेव्हां दुष्ट लोकांस ताळ्यावर आणण्यास **ईश्वरानें इंग्रज सरकारची योजना केली.**' [ ४-२-४९ लोकहितवादी ]. ३. 'इंग्रज सरकाराचा या देशांत **मोठा धर्म हाच आहे कीं,** त्यांनीं वाढवून या लोकांस शहाणें करावें आणि जेव्हां स्वदेशाचें राज्य करण्याचें व्यावहारिक ज्ञान यांस येईल आणि पृथ्वीवरची हकीगत सर्व जाणतील आणि दुर्गुण सोडतील तेव्हां हें राज्य त्यांनीं त्यांचे हवालीं करावें.' ( कित्ता ).

इंग्रजी राज्य झाल्याबरोबर दिपून गेलेल्या एका चांगल्या कुळांतील माणसाचे हे विचार आहेत. रा. देशमूख हे सरकारदरबारीं प्रसिद्धी पावलेले, मान्यतेस चढलेले, आणि म्हणून लोकांतहि कदाचित् आदरास पात्र झालेले, असे गृहस्थ होते. तरी त्यांच्या मताला त्या काळीं, किती लोकांत किती मान होता हें निश्चयानें सांगवत नाहीं. पण त्यांच्या दर्जावरून असें वाटतें कीं, त्या काळच्या समाजाच्या ज्या थराचें देशमूख हे प्रतिनिधि म्हणून मानतां येण्यासारखें आहेत त्याचें मत या प्रकारचेंच होतें. यांतूनच भावी अहितकारक मतें बाहेर पडलीं. सामान्य जनसमूहाला काय वाटत होतें हें कळणें कठीण आहे. पण पंचवीस तीस वर्षांपूर्वींच समरांगणावर दंड ठोकून

इंग्रजांच्या फौजांशीं ज्यांनीं खडा सामना केलेला होता, ज्यांनीं इंग्रजी मुत्सद्द्यांचें कसब दर वेळेस ओळखून डावाला उलट डाव करून त्यांस कित्येक वर्षे खेळत ठेविलें होतें, त्या जातींना, राष्ट्रांना, मुत्सद्द्यांना आणि राजघराण्यांना वरील देशमुखांचें मत संमत असेल अशी कल्पनाहि करवत नाहीं. स्वत्वाचें वारें एवढ्या जलदीनें लटकें पडलें असेल हें खरें वाटत नाहीं. निराशा, हतबलता आणि निष्प्रभ झाल्यानें मनाला येणारा दुश्चितपणा यांचा अंमल इतका माजला असेल कीं, झालेल्या फरकाचा तत्त्वज्ञानपर अर्थ लावून, परमेश्वरी योजनाच ही आहे असें संभावित मत त्यांनीं गळीं उतरवून घेतलें असेल हें खरें नाहीं. मग कै. देशमूख यांचें मत हें कोणाचें प्रतिनिधीरूप मत म्हणून मानितां येईल ? याचें उत्तर अगदीं सोपें आहे. जे जुन्या राजवटींत खांद्यावर जबाबदारी घेऊन वागले नव्हते, पराभूत अभिनिवेशाची कोरडीच कां होईना पण चडफड ज्यांच्या ठायीं शिल्लक राहिली नव्हती, ज्यांना इंग्रजांनीं हळू हळू मिशनऱ्यांच्या द्वारां सुरू केलेल्या ज्ञानाची झळ लागूं लागली होती किंवा परकीयांच्या अंमलाची घडी चापूनचोपून बसविण्याच्या उद्योगांत जे सामील झाले होते त्यांचें हें मत असलें पाहिजे.

यापुढें झालें तें असें कीं, नवीन विद्येच्या कामांत, सरकारदरबारच्या मानांत आणि म्हणून सार्वत्रिक प्रतिष्ठेंत हेच लोक पुढें राहिल्यामुळें त्यांचीं मतें पुढील शिक्षितांचीं मतें बनलीं. अशा रीतीनें हें परमेश्वरी योजनेचें ज्ञान चलती पावून, तें प्रतिपादन करणारांच्या उंच उंच पदवीबरोबर उत्तरोत्तर तत्त्वज्ञानाची प्रतिष्ठा पावत गेलें. वास्तविक पाहतां कै. देशमूख यांनीं ज्या भटाभिक्षुकांना, ब्राह्मणांना आणि अखिल हिंदूंना एक लक्ष शिव्या मोजल्या आहेत, ज्यांच्या दैववादास्तव त्यांना कुत्र्यानिपट केलें आहे, त्यांच्याहून कांहीं जास्त शहाणपण किंवा जास्त तर्क त्यांनीं दाखविला होता असें मुळींच नव्हे. ते जसे दैववादी तसेच देशमूखहि दैववादीच. ते दैवाचें नांव घेत व यांनीं देवाचें घेतलें, इतकाच फरक. आतां पुढील काळाची रचाई पराभूत लोकांच्या हातीं अर्थातच नव्हती. विषण्ण होऊन आपल्या जुन्या अभिमानासह ते मरून जाण्यास तयार होते; आणि ज्यांच्या हातीं ही रचाई आली, त्यांच्या मतांचीं बीजें वर सांगितल्याप्रमाणें रोविलीं गेलीं. चमत्कार असा आहे कीं, लोभी जेत्यांनीं आपल्या हिंदुस्थानविषयक कर्तव्याविषयीं जीं मतें बनविलीं व जीं ते अजूनहि उराशीं बाळगून आहेत, तींच मतें तेव्हांच्या भोळ्या जितांनीं पत्करलेलीं होतीं हिंदुस्थानच्या! लोकांचें बरेंवाईट पाहणें, त्यांना नवीन संस्कृति देणें. ते कसे काय चालतात, बोलतात हें पहाणें, कोट्यावधि लोकांची जिम्मेदारी संभाळणें हीं कामें परमेश्वरानें आम्हांस सांगितलीं आहेत, हें जें तत्त्वज्ञानाचें उंच ढोंग, आपल्या संसाराच्या सुखासाठीं पण परमेश्वरास खर्चीं घालून, साहेब लोक पुनःपुनः सांगत असतात, त्याहून निराळें असें तेव्हांचे शिक्षित तरी काय बोलत होते ? वरील उताऱ्यावरून वाचकांस दिसून येईल कीं,

देशमुखांचें सुद्धां हेंच मत होतें. एकदां आरंभींच्या सर्व शिक्षितांचें हें मत झाल्या-नंतर पुढील गंभीर शिक्षितांनीं देशमुखांच्या मतांतील पूर्वकालीन भाबडेपणा व प्रांजलपणा काढून लाविला आणि त्याला तत्त्वज्ञानाचें उंच रूप दिलें. भटाभिक्षु-कांचें दैववादाचें मत एकीकडे निंद्य बनवीत असतां, देशमुखांनीं दैववादाचें नवें मत सांगितलें व मग एकीकडे Fatalism ( प्रारब्धवाद )नें आमच्या राष्ट्राचें आत्यंतिक नुकसान केलें आहे, असा शिंतोडा पूर्वींच्या आचार्यांवर उडवीत उडवीत पुढें येणाऱ्या तत्त्ववेत्त्यांनीं हाच दैववाद गंभीर रूपानें नवीन पिढीपुढें प्रतिपादिला.

इतक्यानेंच हें थांबलें नाहीं. ‘ ही इंग्रजसंयोगाची गोष्ट सहजासहजीं घडून आलेली नाहीं, त्यांत कांहीं परमेश्वरी योजना आहे ’ या बोलण्यावर जर कोणी म्हणेल कीं देवानें ही योजना कां केली ? तर या तत्त्वज्ञानप्रतिपादकांपाशीं त्यास उत्तरहि आहे. ‘ आपणा हिंदु लोकांना कांहीं शिकवावें म्हणून देवानें इंग्रजांना येथें धाडिलें, ’ असें तें उत्तर आहे. ते गुरु व आपण शिष्य आहों ही भूमिका यांनीं पतकरली व प्रतिपादिली. हीच नेमकी भूमिका कै. रानडे यांनीं पतकरली आहे. कै. रानडे हे देशमुखांनंतरच्या थोर पुरुषांपैकीं एक होत. त्यांचींहि या बाबतींतील मतें विचारांत घेतलींच पाहिजेत. इंग्रज व आपण यांचा गुरुशिष्यभाव त्यांनींहि मानिलाच. ‘ Providential guidance ’ हा त्यांचा मोठा आवडता शब्दप्रयोग होता. तसेंच, ही दैवी योजना आहे, हेंहि मत त्यांना मान्य होतें, इतकेंच नव्हे तर, तें त्यांना आंतूनच स्फुरे. शांतिसुखाचा लाभ यांच्या अंमलांत झाला आहे ह्याचा आपण फायदा करून घेतला पाहिजे असेंहि त्यांस प्रामाणिकपणें वाटे.

गोपाळ हरि देशमूख काय किंवा न्यायमूर्ती रानडे काय, सर्वांची प्रवृत्ति ही कीं, घडत असलेली प्रत्येक गोष्ट एकदम परमेश्वराच्या इच्छेशीं नेऊन भिडवावयाची. आपल्यांतील अगदीं साधीं माणसें, अगदीं क्षुद्र गोष्टसुद्धां, परमे-श्वराला नेऊन चिकटवितात. कोणाच्या बोटाला गळू झालें, घर पडून कोणाचें वासरूं मेलें, पावसाच्या चार धारा जास्त आल्या किंवा हरबऱ्यांवर हींव थोडें जास्त पडलें, तर सृष्टिव्यापाराच्या विचारानें या गोष्टींचा उलगडा खास करितां येण्या-सारखा आहे, हें लक्षांत न घेतां आपण जे उठतों ते तक्रार-अर्जांचीं सर्व बिंडोळीं काखोटीस घेऊन तडक परमेश्वराच्या बंगल्यावर जाऊन धडकतों. वरील थोर गृहस्थांची बाब याहून थोडी भिन्न होती इतकेंच काय तें. त्यांनीं अगदीं साध्या गोष्टीचे अर्थ दैवी उद्देशास अनुसरून लाविले नाहींत हें खरें आहे; पण साध्या लौकिक गोष्टींचें पटल संपतांच त्यांच्याहून जास्त महत्त्वाच्या बाबी मात्र परमेश्वरासच नेऊन चिकटविल्या. वर उल्लेखिलेल्या भोळसर लोकांच्या प्रवृत्तींत आणि या व्यवहार-चतुर व मसलती लोकांच्या प्रवृत्तींत मूलतः फरक नाहीं, वस्तूंचें महत्त्वमापन करण्यांत आहे. फरक अंशांचा व तारतम्याचा आहे. न्या. रानडे यांनीं आपल्या

एका गाजलेल्या व्याख्यानांत आधिभौतिक शास्त्रांची महति वर्णन केली आहे. आधिभौतिक शास्त्रांच्या अभ्यासानें जेथें तेथें परमेश्वरी योजना हें एकच कारण असें म्हणण्याची माणसांची प्रवृत्ति मोडली, व त्यांस वस्तूंतील कार्यकारणभाव पहावयास शिकविलें असें गंभीर प्रतिपादन त्यांनीं केलें आहे. हीच विचारसरणी आपल्या राजकारण-स्थित्यंतराच्या अभ्यासास जर त्यांनीं लाविली असती तर बरें झालें असतें. पण त्यांनीं या बाबतींत एकदम परमेश्वरी योजनेचें गूढ अस्तित्व आपणांस भासत असल्याचें बोलून दाखविलें. हें चमत्कारिक आहे. या प्रतिपादनांतील मर्म आपल्या राजकीय स्थित्यंतरास जर त्यांनीं लाविलें असतें तर बरें झालें असतें. वास्तविक पाहतां अमूक एक गोष्ट परमेश्वरानें केली एवढेंच नुसतें विधान कोणी केलें तर त्यांत कोणाचें कांहीं गमावत नाहीं. पण नेहमीं जें होतें तें हें कीं, अशीं विधानें करणारांचा अभिप्रायतंतु त्या त्या वाक्याच्या पूर्णविरामापाशींच तुटत नाहीं. वाक्य संपलें तरी गर्भस्थ अभिप्राय पुढें चालूच असतो. तो हा कीं, ज्याअर्थीं ही गोष्ट परमेश्वरानें केली आहे, त्याअर्थीं ती बरोबरच असली पाहिजे आणि म्हणून आपण ती निमूटपणें पतकरिली पाहिजे. आपलें जें मरण आहे तें येथें आहे. या उत्तरोक्त विधानांत अनेक दुर्दैवें, आपत्ति, हानि, आळस इत्यादींचीं बीजें सांठविलेलीं आहेत. पुन्हा हीं विधानें करणारांची पदवी जों जों उंच तों तों त्यांचे दुष्परिणाम जास्त जास्त घातक ठरतात; कारण व्यवहारांत गुंतलेलीं साधीं माणसें या मोठ्या लोकांचें एका बाबतींतील शहाणपण सर्वच बाबतींत प्रमाण मानितात. मुत्सद्दी या शब्दाचा, धोरणी या शब्दाचा खराखरा अर्थ, आपण त्या त्या लोकांची स्तुति करीत असतांना सुद्धां नीट ध्यानांत घेत नाहीं. मुत्सद्दी किंवा राजकारणी पुरुष काय करितो ? परमेश्वरी योजना ही त्यालासुद्धां माहीत असते, पण चालू घडामोडीच्या अवलोकनानें त्याच्या मनावर हेंहि ठसलेलें असतें कीं, ज्या निरनिराळ्या कारणांचा परस्परांशीं संयोग होऊन कार्यें घडून येतात त्यांत भर घालण्याचा किंवा त्यांतील कांहीं कमी करण्याचा किंवा असतील त्यांना निराळें वळण लावण्याचा थोडासा मगदूर आपल्या अंगीं आहे आणि म्हणून तो कार्यास प्रवृत्त होतो व आपल्याला हवें आहे तसें घडवून आणितो; किंवा कारणांची गुंतागुंत न्याहाळून, अमूक कालगतीनंतर असें असें घडून येईल असें निश्चित सांगतो. या लोकांचा परमेश्वरावर विश्वास नसतो असें मुळींच नाहीं. इतकेंच कीं, घडलेल्या गोष्टींची उपपत्ति त्यांस लागत असल्यामुळें किंवा चालू कारणपरंपरा कसलें फळ धरील हें त्यांस अनुमानितां येत असल्यामुळें ते परमेश्वराला मध्यें आणीत नाहींत. जर कां झालेली अमुक एक गोष्ट परमेश्वरी योजनेनें झाली व म्हणून ती बरोबर आहे अशीं ज्ञानें मुत्सद्दी व मसलती लोक सांगूं लागले तर त्यांना मुत्सद्दीपणा साधणार नाहीं आणि मसलत निभावून नेतां यावयाची नाहीं. देशमूख व रानडे यांच्या मुत्सद्दीपणांत व मसलतींत जी कमतरता उरली ती, हें परमेश्वरी योजनेचें तत्त्वज्ञान यांनीं पतकारिलें त्यामुळें उरली. मुत्सद्दी

कां तत्त्वज्ञानी याचा निकाल होईनासा झाला, आणि दोन भूमिकांचा संकर झाला. देशमुखांचें कसेंहि असो, पण रानडे हे तर मोठे खोल मुत्सद्दी आणि दोषास्पदता येईल कीं काय म्हणून जागरूकतेनें वागणारेच पण मोठे मसलतबाज गृहस्थ होते. त्यांनीं तरी हें ज्ञान पतकरावयास नको होतें. इंग्लंडांतील मेथॉडिस्ट पंथाचा संस्थापक हा परमेश्वराचें सान्निध्य इतकें नाजिक पाही कीं, अगदीं क्षुल्लक गोष्टीवर सुद्धां तो परमेश्वरी योजनेचेंच अनुमान बसवी. मतप्रसारासाठीं तो कोठें परगांवास निघाला व वाटेनें जर सुंदर असें कोंवळें ऊन पडलें तर परमेश्वरानें माझ्या ऱ्याकरितांच ही गोष्ट केली असें तो समजत असे. कोठें पावसाची सर आली तर, मी विश्रांति घ्यावी अशीच परमेश्वराची योजना असली पाहिजे, असा तो त्या पावसाचा अर्थ बसवी. हें त्याचें करणें उपहास्य मानणें आपल्याला अवघड वाटेल हें खरें आहे; पण असलीं अनुमानें काढण्याची एकदां संवय झाली म्हणजे त्यांतून फ़ार आपत्ति उत्पन्न होण्याचा संभव असतो. पण तो धर्मप्रसाराची कल्पना घेऊन उठला असल्यामुळें, सर्व गोष्टींचे अर्थ धर्मपर लावण्याची बुद्धीच त्याला होई. खुद्द रानडे यांच्या बाबतींतहि असेंच झालें असावें. ते धर्मासंबंधीं सश्रद्ध असत. अर्थात् त्या त्या दृष्टीनें वस्तूकडे पाहण्याची बुद्धीहि त्यांना होई. यासहि हरकत नाहीं. पण ही बुद्धि इतकी होई कीं, ऐतिहासिक स्थित्यंतरांच्या कारणपरंपरा, माणसांचे हेतु इत्यादींची मीमांसा करण्याचें सामर्थ्य असूनसुद्धां, त्या सामर्थ्याचा व्यापार त्यांनीं पुरेसा होऊं दिला नाहीं. त्यांच्या धर्मप्रवण बुद्धीची इतकी बळकट झांपड त्यांच्या मनावर बसून गेलेली होती.

मुत्सद्दी लोक परमेश्वराचें आवाहन करतातच; पण तें अगदीं निराळ्या कारणासाठीं. ते आपल्या बुद्धीप्रमाणें, हातीं असलेल्या माहितीची आणि ज्ञानाची चिकित्सा करून कांहीं अजमास बसवितात, धोरणें आंखतात आणि ठाम योजना करितात; आणि हें झालें, म्हणजे मानवी ज्ञानानें जें ठरवितां येण्यासारखें आहे तें ठरवून, मग ते परमेश्वराचा धांवा करितात ! आजपर्यंत जीं मोठमोठालीं युद्धें झालीं, साम्राज्यें विस्तारलीं किंवा बंडें झालीं, तीं सर्व घडवून आंणणारे लोक आपले व दुसऱ्याचे हेतु तपासून पाहून, कोणाच्या वासना किती प्रखर आहेत हें ओळखून, कांहीं एक योजना निश्चित केल्यानंतर मग लोकांस सांगत सुटले कीं, परमेश्वरी अभिप्रायहि असाच आहे. जें इतर लोभी लोकांनीं केलें असेल, व्यवहारचतुरांनीं किंवा विजिगीषु लोकांनीं जें घडविलें असेल आणि ज्याच्या पासून आपल्याच वैभवास उतरती कळा लागली असेल, त्याचा अर्थ परमेश्वरी योजनारूप लावण्याचें काम करणें, म्हणजे नसतें घोंगट गळ्यांत घेऊन मग त्याला अनुसरून आपले हेतु थापटूनथोपटून वळवावयाचे आणि आपलीं सामर्थ्यें त्याच प्रमाणांत वेंचावयाचीं असें करणें भाग पडतें. लोकांचीं कृत्यें जर 'परमेश्वरी योजना' या गौरवास पात्र, तर आपलींहि कृत्यें

त्याच्च गौरवास पात्र कां समजावयाचीं नाहींत, हें, बलिष्ठ हेतु घेऊन काम करावयास उठलेले सर्व लोक, उमगूनच चालतात. असो. तर मुत्सद्द्यांनीं व कार्यकर्त्यांनीं परमेश्वरी योजना अमूक एक तऱ्हेची असेल असें मत, केवळ श्रद्धेच्या बळावर पतकरून, त्यास अनुसरून आपलीं भावी धोरणें आंखण्याचें कांहींच कारण नाहीं. परमेश्वर सगळयाच गोष्टी करितो, सर्व चराचर वस्तुजाताची मालकी त्याच्याकडेच आहे आणि म्हणून जें जें कांहीं होत राहील त्याची, अगदीं अंतिम जबाबदारी त्याच्यावर असेलहि. पण असें आहे म्हणून अमुक गोष्ट त्याच्या इच्छेची स्पष्ट निदर्शक आहे असें आपण मनचेंच समजून आपल्या प्रयत्नांची दिशा बदलण्यास प्रवृत्त व्हावें हें बरोबर नाहीं. कारण कीं, आपल्याला ज्या इच्छा उत्पन्न होताहेत त्या त्यानेंच उत्पन्न केल्या आहेत. तें कसेंहि असो; आपली ही प्रवृत्ति जेथें तेथें डोकाविते. भौतिक कारणें जेथें दिसतील व त्यांचे परस्परसंबंध आपले ध्यानांत येतील तेथपर्यंत आपला टापू आहे व त्याच्या पलीकडे एकदम परमेश्वरी इच्छेची सरहद्द लागूं लागते असें मानण्याची आपली प्रवृत्ति कमी होईल तितकी चांगली. जें आपल्याला अनावर झालें किंवा अतर्क्य ठरलें, तें सुद्धां भौतिक कारणांनींच घडविलें आहे आणि जर तें मानवी संसारांतील असेल तर तें मानवी हेतूंनींच उत्पन्न झालें असलें पाहिजे आणि म्हणून तीं कारणें व ते हेतु कोणचे हें शोधून काढण्याची हिंमत माणसाच्या मनानें धरली पाहिजे. पण नाहीं तेथें परमेश्वरी योजना कल्पून शिवाय तिला अनुसरून आमचीं धोरणें आम्ही ठरवितों. अजून सुद्धां हें स्पष्ट दिसून येतें कीं, कार्यकारणांची मीमांसा जितकी प्रिय बनावी तितकी ती चांगल्या चांगल्या बुद्धिमंतांची सुद्धां बनलेली नाहीं. कारण आपल्या बुद्धीचें वळण श्रद्धेचें आहे. चिकित्सक बुद्धि ज्यांच्या मनांत उदितच झाली नव्हती, जे केवळ सहजश्रद्ध होते, त्यांना हें परमेश्वरी योजनेचें ज्ञान अगदीं जलद सुचावें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. पण रानडे यांनासुद्धां तेंच सुचावें याचा विस्मय वाटतो. कारण त्यांनीं जें लिहिलें आहे, तें अक्कलहुशारीनें लिहिलें आहे व राजवटींत पडलेला फरक त्यांनीं राजिखुषीनें पतकरिला आहे.

पण देशमुख व रानडे यांच्या मनःस्थितींत थोडा फरक दिसतो. ही देवाची योजना खरी, पण देशमुखांना यामुळें दुःख होत आहे असें दिसतें. इंग्रजांचें शहाणपण आपणांस यावयास दोनचारशें वर्षे लागतील असें त्यांस वाटे व तोंपर्यंत परकी अंमलाचें ‘ दुःख या लोकांना आहे, ’ असें नाइलाजानें त्यांनीं सांगितलें आहे. रानडे यांना मात्र ही अमूल्य संधि आहे, असें वाटत आहे. या संधीचा जितका फायदा करून घेतां येईल तितका घ्यावयास पाहिजे, अशी त्यांची इच्छा आहे. सुदैवानें हा अम्मल पुष्कळ वर्षे टिकणार असा रंग दिसतो आणि म्हणून आपलीं शेंकडों वैगुण्यें दुरुस्त व्हावयास चांगली पर्वणी आहे असे संतोषवजा उद्गार रानडे यांनीं काढिले आहेत. कायद्याच्या व परिस्थितीच्या चापांत सारखें राहवें लागल्यामुळें व रोजच्या धब्बड-

ग्यांत सामावून जावें म्हणून कोणीं वर्तमानपत्रकर्त्यांनें असे उद्गार प्रसंगोपात्त काढले तर त्याकडे कोणी लक्षहि देणार नाहीं. पण रानडे यांच्या शिरावर अशी कोणतीच जबाबदारी नव्हती व शिवाय ते तुरुतातुरुत महत्त्वाचें किंवा वेळ मारून नेण्यासाठीं म्हणून कांहीं तरी ठोकून देतील असेंहि त्यांजसंबंधीं कोणी समजत नसत. म्हणून हे त्यांचे राजकीय परिस्थितीसंबंधाचे विचार सहजच कित्येक वर्षेपर्यंत कायमचें महत्त्व बळकावून बसले. इंग्रज हे आपले गुरु आहेत, त्यांच्या चरणीं बसून आपण ज्ञान प्राप्त करून घेतलें पाहिजे, फार प्राचीन काळीं आपलें आर्यत्व जिवंत होतें, तेव्हां त्या आपल्या उदार चालीरीति मध्यंतरीं रानटांच्याशीं गांठ पडल्यामुळें आपण विसरून गेलों, पण त्या चाली कशा होत्या याचें खासें उदाहरण आपल्या इंग्रज राज्यकर्त्यांच्या द्वारां आपणांस मिळण्याची आतां संधि सांपडली आहे, पृथ्वीवरील अत्यंत बुद्धिमान् व स्वतंत्र अशा एका राष्ट्राचें उदाहरण आपणांसमोर आहे व त्याच्या शिकवणीचाहि लाभ आपणांस होत आहे, ही अनुकूल परिस्थिति बहुत काळपर्यंत टिकून राहील असें त्यांच्या राज्यपद्धतीवरूनहि दिसत आहे, आपल्याबद्दल त्यांना वाटत असलेली सहानुबुद्धि आणि त्यांच्या अंगची सर्व चतुराई, आपल्या अंगांतील वैगुण्यें दूर व्हावीं म्हणून खर्चीं पडत आहेत; हें पाहिलें म्हणजे हा कांहीं केवळ आकस्मिक प्रकार आहे, असें आपल्याच्यानें म्हणवत नाहीं. आपणांस जे शिक्षण मिळावयास हवें तें आपल्या जुन्या हिंदु किंवा मुसलमान संस्कृतीपासून आपणांस प्राप्त झालें असतें असें वाटत नाहीं. त्यांच्या द्वारां हिंदुस्थानचे लोक पश्चिम युरोपांतील लोकांच्या तोडीचे झाले असते असें वाटत नाहीं. पण हें शिक्षण मिळणें मात्र जरूरच होतें, आणि तें गेल्या शतकभर पॅक्स-ब्रिटानिका हिच्या अंमलाखालीं आपणांस मिळत आहे. त्या शिक्षणाचे परिणाम काय आहेत हें आपलें आपल्या प्रचीतीस उत्तमच येत आहे. अशा अर्थाचे उद्गार रानड्यांच्या व्याख्यानांत सर्वत्र पसरलेले आहेत. त्यांतील तात्पर्य व मागें दिलेल्या कै. देशमुखांच्या उद्गाराचें तात्पर्य जवळजवळ सारखेंच आहे. दोघांनाहि इंग्रजांचें येथें येणें देवाच्या योजनेप्रमाणें वाटलें. आपल्या अंगीं फार मोठालीं वैगुण्यें आहेत, तीं दुरुस्त करावयासच ते येथें आले आहेत, म्हणून त्यांच्या पासून मिळणारें शहाणपण आपण संथपणें मिळवून घेतलें पाहिजे, असेंच दोघांनाहि वाटत होतें. फरक इतकाच आहे कीं, देशमुखांचें लिहिणें अगदीं उघड आहे, रानडे यांचें खोल व सूचक आहे. या तत्त्ववादांतूनच निघालेल्या शहाणपणाचा अंमल जवळजवळ पन्नासपाऊणशें वर्षे महाराष्ट्रावर चालला व यांतूनच नेमस्त पक्षाचा व आधीं राजकीय कीं आधीं सामाजिक या वादाचाहि जन्म झाला. हें डिव्हाइन डिस्पेन्सेशन्चें तत्त्वज्ञान रानडे यांनीं सहज उल्लेखिलेलें असावें असें कोणीं मानण्याचें कारण नाहीं. तें त्यांना पटलेलें होतें, त्यांच्या सश्रद्ध मनाला भावतहि होतें आणि म्हणून रानडे यांच्या सर्व प्रयत्नांची इमारत या पायावर उभारलेली असे.

हें दैवी योजनेचें ज्ञान पतकरिलें म्हणून देशमूख किंवा रानडे प्रयत्नविन्मुख झाले होते असें मुळींच नाहीं. फार काय सागावें ? प्रयत्न करावयास हवा, हा विचार महाराष्ट्र देशांत रानडे यांनींच रुजत घातला. मग हें ज्ञान पतकरिल्यानें काय नुकसान झालें ? असा जो प्रश्न मनांत येतो त्याला उत्तर हें कीं, त्या प्रयत्नाची दिशा व त्या प्रयत्नाची गति यांवर प्रस्तुत मताचा विलक्षण परिणाम घडला. आपली दानतच (Character) सुधारली पाहिजे व ती इंग्रजांच्या शिकवणीबरहुकूम सुधारिली पाहिजे असें द्विविध ध्येय उत्पन्न झालें आहे. याचा स्पष्ट अर्थ असा कीं, आपण जे बेवकूब लोक आहों ते समर्थ बनलों पाहिजे व बनण्याच्या कामीं आपल्या परकी राज्यकर्त्यांना आपण आपले गुरु केलें पाहिजे. एवढें सुदीर्घ सूत्र कार्यक्रमाच्या रुपानें, वरील तत्त्वज्ञानाच्या बळावर, रानडे यांनीं सुशिक्षित महाराष्ट्रासमोर ठेविलें. देशमूख यांनीं काय काय व्हावयास हवें त्याचा पुष्कळ गमतीदार तपशील दिला आहे. आणि तें सगळें घडून यावयास दोनचारशें वर्षें हवींत असें म्हटलें आहे. रानडे यांनीं तोच तपशील इंग्रजी वाङ्मयांतील अत्यंत समर्पक शब्दांनीं आणि महत्त्वाच्या भूमिकेवरुन सांगितला आहे. व हें सगळें तप व्हावयास कालाची फारच अनुकूलता आहे, कारण इंग्रज सरकारानें आपणांस शांतिसुख दिलें आहे, असें म्हटलें आहे. पण सावधगिरी इतकीच घेतली आहे कीं, देशमुखांप्रमाणें दोनचारशें वर्षांचें भाकीत न करितां हें शांतिसुख बहुत काल टिकून राहील अशी इंग्रजी राज्यामुळें आम्हांस हमीच मिळाली असें म्हटलें आहे. हें ज्ञान सहजगत्या प्रस्फुट झालें असें नाहीं, असें जें वर म्हटलेलें आहे त्याला आणखी एक पुरावा आहे. कै. नामदार गोखले यांनीं सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीच्या मेंबर लोकांनीं लिहून द्यावयाच्या प्रतिज्ञापत्रकाचा जो प्रस्ताव लिहिला, त्यांत त्यांनीं आपल्या गुरुंच्या परमेश्वरी योजनेचा उल्लेख स्पष्ट केलेला आहे. म्हणून असें मानावयास कांहींच हरकत नाहीं कीं, रानड्यांनीं पुरस्कृत केलेल्या सर्व संस्थांचे प्रयत्न या ज्ञानाच्या छापेंतच वागावयाचे होते.

सुधार्य वस्तु कोणत्या याची याद फार लांब व विविध प्रकारांनीं भरलेली अशी झाली. त्या सर्वांना मिळून जर एकच नांव द्यावयाचें झालें तर तें हें कीं, आमच्या सर्व सामाजिक जीवनाचीच सुधारणा व्हावयास हवी. आठ दहा निरनिराळ्या बाबी त्यांनीं सुचविल्या आहेत व From status to contract इत्यादि पांचसहा भिन्न भिन्न सूत्रें दिलीं आहेत. हें सर्व व्हावयाचें म्हणजेच सामाजिक सुधारणा होय व ही झाल्याशिवाय गुरुकडून मिळावयाचें ज्ञान पूर्ण झालें असें व्हावयाचें नाहीं. याचाच अर्थ सामाजिक सुधारणा आधीं व्हावयास हवी व ती घडावयाची म्हणजे रानड्यांच्याच मताप्रमाणें मजबुती करींत करीत उत्क्रांति-गतीनें घडावयास हवी. तसेंच ज्यांस गुरु मानिलें त्यांच्याशीं शिष्यसंबंधच ठेविला पाहिजे, दावा मांडितां उपयोगाचा नाहीं, कां कीं, त्यांचें येथें असणें

जरूरच आहे. या विचारप्रणालीचा अर्थ असा कीं, राज्यकर्त्यांशीं आपण नम्रपणेंच वागलें पाहिजे. हीं दोन प्रमेयें एकत्र केलीं म्हणजे **नेमस्त पक्ष कां उत्पन्न झाला असेल व तो पक्ष सामाजिक सुधारणेवर इतका कां भर देत असेल यांतील इंगित चांगलें ध्यानांत येतें.**

नामदार गोखले हे विरागी नव्हे तर काय होते ? सर्व प्रापंचिक सुखें तुच्छ मानून अहोरात्र स्वदेशहित-चिंतनाशिवाय दुसरा कसलाहि विचार त्यांनीं केला नाहीं हें आपणांस माहीत आहे. त्यांनीं स्थापिलेल्या सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसा-यटींतील लोकसेवकांना दारिद्र्याची जवळजवळ शपथच घ्यावी लागते. दारिद्र्यांत वागतांना आणि सुखें व वैभवें हीं प्राप्य असून सुद्धां सोडून देतांना त्यांना जी हुरहूर लागत असेल तिची शांति ते कशाच्या बळावर करितात ? एवढ्या स्वार्थ-त्यागाला कांहीं तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान नको का ? असा कोण आहे कीं, जो अशा अधिष्ठानाची वांच्छा करीत नाहीं, आणि स्वार्थत्याग मात्र निपटून करितो ? असें वाटतें कीं, हें तात्त्विक अधिष्ठान रानडे यांच्या विचारश्रेणीनें त्यांस दिलें. महा-राष्ट्राच्या बाहेरचें माहीत नाहीं, पण महाराष्ट्रांतील नेमस्त पक्षाला तात्त्विक पाठपुरावा या ज्ञानानेंच दिलेला आहे. तें ज्ञान बरोबर कीं चूक हा विवादाचा विषय होऊं शकतो; पण तें तेथें आहे याविषयीं मात्र शंका राहतां कामा नये. असो. रानडे यांची सुधारणाविषयक कल्पना किती विस्तृत आहे पहा.

नवें व्हावें व्हावें म्हणून आपण जें म्हणतों, तें हें कीं, आपले पाश तुटावे व वागण्यास मुखत्यारी मिळावी, श्रद्धाळूपणा जाऊन तेथें निष्ठा यावी, परंपरेची अधिकारकल्पना जाऊन येथें परस्परावलंबी जाणीव यावी, बाबा-वाक्याचा अधिकार जाऊन स्वतःच्या तारतम्याची प्रतिष्ठा वाढावी, जीवितांतील फुटीरपणा जाऊन तेथें संघटना उत्पन्न व्हावी, हट्वाद जाऊन तेथें परमतसहिष्णुता यावी, प्रारब्ध-गतिवाद जाऊन मनुष्याच्या सामर्थ्याची प्रतिष्ठा वाढावी. तसेंच आपल्या पूर्वीच्या पदवीस आपणांस पोहोंचावयाचें असेल तर आपल्या कोणत्या सामाजिक चाली बदलल्या पाहिजेत याचीहि त्यांनीं दिलेली याद पाहण्यासारखी आहे.

सध्यांच्या ज्या आपल्या चालीरीति आहेत, त्या स्मृतिकालांतील चाली-रीतींशीं अगदीं जमत नाहींत. स्त्रियांचें पुरुषाधीन जिणें, लग्नाचें वयोमान ठर-विण्याच्या पद्धति, उंच जातींतील विधवांस असलेला पुनर्विवाहप्रतिबंध, मोठ्या जातीच्या पोटांतील धाकट्या-धाकट्या पोटजातींतच विवाह करण्याची पद्धति, स्त्रियांचें अज्ञान व पडद्याची पद्धति, अमुक जातीनें अमुकच धंदा केला पाहिजे अशी कामाची वांटणी, परदेशगमनास हरकत, पुरुषांची स्वैर प्रवृत्ति, आणि स्त्रियांवर लादलेले यमनियम यांमुळें उत्पन्न होणारी त्यांच्यांतील विषमता, अन्न-व्यवहार आणि स्पर्शसुद्धां अशासारख्या सामाजिक व्यवहारांत आलेला सवतेपणा कांहीं जातींनाच डोळे मिटून धर्म करण्याची प्रवृत्ति, हें सर्व जावयास हवें. आपलें

सर्व जीवितच साफ बदललें पाहिजे व ज्यांस हें घडून यावयास हवें आहे असें वाटतें त्यांनीं केवळ पाण्यांत बुचकळी मारून चालावयाचें नाहीं, तर प्रत्यक्ष अग्नि-दिव्यच केलें पाहिजे.

हा एवढा विशाल कार्यक्रम अंमलांत यावयाचा म्हणजे मोठें कठीण काम होतें. गोपाळराव देशमूख यांनीं असाच कार्यक्रम आंखलेला होता. पण त्यांचा भोळा भाव असा होता कीं, आपल्या उणीवा नाहींशा झाल्या व आपल्या अंगीं चांगले गुण आले म्हणजे इंग्रजांचें राज्य नाहींसें होईल, म्हणजे ते आपण होऊनच हें राज्य आपल्या हवालीं करतील व व्यापारटापाराच्या कांहीं गोष्टी हातीं ठेवतील. राजकारणाच्या वाढीसाठीं म्हणून कांहीं स्वतंत्र अशी उपाययोजना त्यांच्या मनापुढें होती असें वाटत नाहीं. अगदीं दिपून गेल्यामुळें आपल्या नैसर्गिक गुणाभावाची अतिशय प्रखर जाणीव तेवढी त्यांना झालेली दिसते. पण देशमुखांच्या काळापासून तों त्यांच्या स्वतःच्या कर्तृत्वाच्या काळापर्यंत जो कांहीं राजकीय अनुभव त्यांना आला, त्यामुळें केवळ Character म्हणजे दानत ही बदलण्याचे उपाय करीत राहिल्यानें आणि सामाजिक सुधारणा घडवून आणल्यानें परकीय अंमलांतून आपण सुटूं असें त्यांस वाटेनासें झालें असावें म्हणून **सर्व तऱ्हेचे प्रयत्न एकाच वेळीं** चालू असले पाहिजेत असें म्हणण्याकडे त्यांचा रोंख चालू झाला. पुढें दिलेल्या उताऱ्यावरून या त्यांच्या मताचें दिग्दर्शन होईल.

आपल्याला जर राजकीय हक्क अगदीं कमी प्रतीचेच असतील, तर आपली समाजव्यवस्था कांहीं विशेष चांगली बनेल असें वाटत नाहीं; समाजव्यवस्था ही न्याय आणि विवेक यांवर जर रचली नसेल तर राजकीय हक्क उपभोगण्यासहि आपण अपात्रच राहूं. तसेंच समाजव्यवस्था जर अपक्व असेल तर आपल्या आर्थिक व्यवहाराचे नियमहि नीट बसावयाचे नाहींत; व जर आपलीं धार्मिक ध्येयें हीन व दीन असतील तर सामाजिक, राजकीय, आणि आर्थिक या कोणच्याहि व्यवहारांत आपणांस यश मिळावयाचें नाहीं. हें परस्परावलंबन म्हणजे कांहीं प्राप्त झालेला आकस्मिक न्याय नव्हे तर सृष्टीचा शाश्वत न्याय होय............जे कोणी राजकीय विचार, सामाजिक आणि आर्थिक विचार वगळून निराळे काढितात ते चुकीचें बोलतात आणि जो कोणी इतर अंगांतील आपलीं कर्तव्यें करीत नाहींत त्यांस त्यांचें इतर बाबतींतील कर्तव्य समजलेंच आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. यावरून धार्मिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय अशा सर्व चळवळी बरोबरच चालू राहिल्या पाहिजेत हें त्यांचें प्रतिपादन स्पष्ट झालेलें दिसतें.

पण वर सांगितल्याप्रमाणें इंग्रजी अंमलाचें धोरण सुशिक्षितांच्या चांगलें ध्यानांत येऊं लागलें व त्यांस त्यामुळें आपल्या राजकारणाची हानि होत आहे हें उमगूं लागलें. पण जुनें तत्त्वज्ञान मनांत तसेंच असल्यामुळें समाजसुधारणेच्या जोडीला राजकीय सुधारणाहि हवी हा विचार आणून बसविण्यांत

आला. असें झालें तरी राजकीय चळवळीची आवश्यकता उत्तरोत्तर जास्तच वाढूं लागली. ह्यूम आणि डफरिन यांसारख्या तिऱ्हाइतांना सुद्धां हे हिंदी लोक सामाजिक सुधारणेंतच गुंतून पडले आहेत याचा मोठा विस्मय वाटूं लागला आणि म्हणून त्यांनीं आपण होऊन आमच्यांतील बुद्धिवानांचीं मनें सामाजिक चळवळींतून काढून राजकारणाकडे लाविलीं. परकी राज्यामुळें या देशाचें काय नुकसान होत आहे याची जाणीव या आमच्या सुशिक्षितांपेक्षां त्यांना लवकर आली. आपला इंग्लंड देश दिवसेंदिवस कसा गबर होत चालला आहे हें त्यांना सारखें दिसत होतें व जर तो गबर होत आहे तर हिंदुस्थान त्या त्या मानानें खंगत चाललेला आहे हें त्यांनीं ओळखलें, व त्यांची न्यायबुद्धि प्रखर असल्यामुळें स्वकीयांचा रोष सहन करून त्यांनीं हा इंग्रजांचा मतलब व हिंदी लोकांचा भोळा भाव निर्भीडपणें बोलून दाखविला; इतकेंच नव्हे तर इकडील पुढचीं पुढचीं दहापांच माणसें हाताशीं घेऊन खुद्द कॉंग्रेसची चळवळ त्यांनीं जन्मास घातली. या त्यांच्या शिकवणीनें आमच्यांतील बुद्धिमानांचा सुद्धां भ्रमनिरास झाला असावा. अमुक एक तऱ्हेच्या चाली समाजांत असल्या किंवा नसल्या म्हणजे ते ते लोक गुलामगिरींतच नांदले पाहिजेत हें आमच्यांतील सुशिक्षितांनीं गंभीरपणानें पतकरलेलें मत वरील परकीय निरीक्षकांना कसेंसेंच वाटूं लागलें. कारण कीं, राजकारणांची घटना त्यांच्या डोळ्यांखालून प्रत्यहीं चालली होती.

दरम्यान इतिहास व संस्कृति यांवर आपला देशाभिमान स्थापून विष्णुशास्त्र्यांनीं नवें मत उत्पन्न केलें होतें. गुरुचरणांजवळ शिकलें पाहिजे ही विद्यार्थ्यांची भूमिका आपल्या राष्ट्रानें पतकरावी हा विचार त्यांस दुःसह होता. इंग्रजांचें राज्य हा अनुग्रह नसून आपत्ति आहे असें त्यांस वाटे. येथें उगाच काल्पित तत्त्वज्ञानाचें कारण नसून एका राष्ट्रानें आपणांस जिंकलें आहे, त्यानें राष्ट्रीय मंद हत्या चालविली आहे, तर आपण मुख्य गोष्टीकडे म्हणजे राजकारणाकडे लक्ष दिलें पाहिजे असें त्यांच्या विचाराचें तात्पर्य होतें. लोकांच्या विचाराला चिपळूणकरांनीं स्पष्ट निराळें वळण लाविलें. त्यास अनुसरून राजकारणाचा धडाका चालू करणें अपमृत्यूनें त्यांस साधलें नाहीं. जें त्यांना करितां आलें नाहीं तें टिळकांनीं करून दाखविलें. तत्त्वज्ञानांत फरक पडल्यामुळें चळवळींत फरक पडला. इंग्रजांनीं जें राज्य जिंकलें तें स्वतः भोगण्यासाठीं व पुत्रपौत्रांना राखून ठेवण्यासाठीं. स्वतः भोगतांना ते आपल्याला चांगल्या ठिकाणीं कधींहि शिरकाव करूं देणार नाहींत व सत्ता कायमची अशी स्वखुषीनें कधींहि गमावणार नाहींत. जगांतल्या इतर लोकांप्रमाणें तेहि स्वार्थप्रवृत्तच आहेत, म्हणून राजकारणावरचें आपलें लक्ष उडविण्यासाठीं ते सामाजिक बाबी आपल्यापुढें महत्त्वाच्या म्हणून मांडितात; आपण त्यास फसतां उपयोगाचें नाहीं. आपल्या काय कीं लोकांच्या काय, सामाजिक बाबी या समाज जितके दिवस टिकावयाचा तितके दिवस टिकावयाच्या आहेत. कारण एक सामाजिक प्रश्न निकालांत काढावा

तर दुसरा लगोलग हजर आहेच! हें जसें स्वतंत्र युरोपीय देशांत चालतें तसें येथेंहि चालावयाचेंच. अमुक मर्यादा पोहोंचली म्हणजे मात्र समाज परदास्यविमोचनास पात्र झाला असें केव्हांहि म्हणतां यावयाचें नाहीं. म्हणजेच स्वराज्य हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे. **म्हणून आपल्या देशाचें गेलेलें स्वातंत्र्य परत मिळविणें हें अत्यंत महत्त्वाचें आहे.** आपलीं सामाजिक वैगुण्यें म्हणजे राज्यकर्ते जितकीं म्हणून म्हणतील तितकीं सर्व काढून मग स्वातंत्र्याची गोष्ट बोलावयाची म्हणजे तें कधीं न होण्यापैकींच आहे. अशा प्रकारची ही नवीन विचाराची पद्धति होती. हेंच **नवें मत केसरीनें हट्टानें प्रतिपादिलें व स्थापित केलें.** यावर त्या वेळीं पुष्कळ मारामारी झाली. पण शेवटीं हें मत ग्राह्य ठरलें. सामाजिक सुधारणा **झाल्यावर मग** राजकीय सुधारणा हें मत तर चूकच, पण सर्व सुधारणांची गति सारखी चालावयास हवी **हेंहि मत मागें पडून राजकीय चळवळ जोरानें केली पाहिजे** हें मत प्रभावी ठरलें. हें केसरीनें केलें. असें झालें आहे कीं नाहीं हें प्रत्यक्षानेंच पहावयास सांपडतें.

नामदार गोखले, सर फिरोजशहा मेथा, सुरेंद्रनाथ बानर्जी अशांसारखे लोक टिळकविरोधकांच्या रोषास पात्र झाले नाहींत, याचें कारण त्यांनीं सामाजिक सुधारणेची धुरा एका खांद्यावर व राजकारणाची धुरा दुसऱ्या खांद्यावर वाहिली होती म्हणून नव्हे, तर त्यांनीं सुधारणेपुढें हंसून मान लवविली होती इतकेंच काय तें. ही सुधारणा व्हावी असें जर त्यांचें मत होतें असें म्हणावें तर त्यांनीं आपलें सर्व बुद्धिवैभव राजकारणांतच कां खर्च केलें असावें बरें ? त्यांचा तसा कल होता असा निसर्गदोष मानला तरी, तो तसा तरी कां असावा, म्हणजे देशांतील सर्व थोरथोर बुद्धिमतांचा कल असाच कां व्हावा असा प्रश्न त्या निसर्गासमुद्धां विचारतां येण्यासारखा आहे. पण ही शुद्ध वितंडा आहे. देशाच्या राजकीय स्थितीचें ज्ञान ज्यांना झालें, सामाजिक सुधारणा ज्या ज्या कांहीं व्हावयास हव्या त्या झाल्यावरच आपण स्वराज्यास पात्र होऊं असें जें सामाजिक-ऋषि बोलले त्या सुधारणा खरोखर घडून येण्यास किती काळ लोटावयास हवा याची जेव्हां त्यांस मनानें कल्पना आली, कांहीं झालें तरी थोड्याशा मनुष्यबळाग्र हें परकी राज्य येथें चालू आहे व तेवढ्यास गांगरवून टाकणारें सामर्थ्य आपणांस पैदा करितां आलें, तर तें प्रथम केलें पाहिजे, नाहीं तर राष्ट्राला भुकेनेंच मृत्यु येईल, ही गोष्ट जेव्हां त्यांच्या मनांत बिंबली तेव्हांच ' आधीं समाजिक कीं आधीं राजकीय ?' याचा कायमचा निकाल त्यांच्या मनाशीं लागला असला पाहिजे. म्हणून तर तोंडानें सर्व सुधारणा सारख्याच चालाव्या हें भोळें तत्त्व उच्चारीत त्यांनीं आचार मात्र सर्वथा राजकारणाचाच ठेविला. यामुळें राजकारणाची दुर्निवार्यता आणि त्याची जरूरी हीं मात्र चांगलीं प्रत्ययास येतात. आधीं सामाजिक सुधारणा होऊं द्या किंवा निदान राजकारणाच्या बरोबरीनें चालूं द्या असें म्हणणारांच्या तर्कांत अशी एक चूक आहे कीं, समाजसुधारणेची आवश्यकता बहुजनसमाजाला जितकी आहे, तितकी राजकीय

सुधारणांची नाहीं असें त्यांस वाटतें. लोक मागासलेले आहेत, जाती फार आहेत या सगळ्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, या बाबी निकालांत निघण्याची आवश्यकता, राजकरण यशस्वी झालें तर त्यापासून मिळणाऱ्या फलापेक्षां, जास्त आहे. पण तें तसें नाहीं. अगदीं जातिविचारग्रस्त माणसाला सुद्धां, ज्याला कोणीं शिवत नाहीं अशा माणसाला सुद्धां, भाकरीची आवश्यकता आहेच आणि राजकारण भाकरी मिळविण्यासाठीं लढावयाचें होतें. लग्नें करावयास जास्त वाव मिळण्याच्या आधीं किंवा लोकांकडून शिवलें जाणाऱ्या आधीं खावयास भाकरी हवी हा विचार साध्या तर्काला सुद्धां पटेल. हे जें एवढें पाऊणशें वर्षांचें वादाचें अवडंबर तें मुळींच तर्कशुद्ध नाहीं. ‘ हा **आमच्या पोटापाण्याचा प्रश्न आहे.** ’ हें जें टिळकांचें प्रसिद्ध वाक्य तें या अवडंबराचा एकदम निरास करण्यास पुरेसें समर्थ आहे. पण हें केसरीचें मत शेवटीं केव्हां खरें ठरलें याचा दाखला अगदीं चमत्कारिक तऱ्हेनें मिळत आला आहे. नेमस्त पक्षाचे अध्वर्यू राजकारणच करीत याचा उल्लेख वर केलाच आहे. पण अलीकडे अलीकडे त्यांच्या कर्तबगारीचा सगळा रोंख राष्ट्रीय पक्षानें पतकरलेल्या राजकारणांतील गतीशीं जुळताच होत चालला आहे हेंहि पाहण्यासारखें आहे. वास्तविक त्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें ही गति फार आहे. पण राजकारणाच्या महत्त्वाची दुर्निवार्यता त्यांनाहि पटूं लागली हेंच खरें. ज्या सामाजिक सुधारणेवर ही सुधारणा त्यांच्या मतें अवलंबून किंवा निदान जिच्या बरोबर पावलें टाकीत जावयास हवी ती कोठल्या कोठें मागें रेंगाळत आहे हें पाहणारास दिसेल. पुनर्विवाह, जातिभेद, अज्ञान, अस्पृश्यता यांपैकीं कोणचीहि बाब पहा व तींत झालेल्या प्रगतीमुळें आपण राजकीय हक्कांस पात्र झालों आहों असें सचोटीनें म्हणतां येतें कां पहा. **जर प्रगति झालेली नाहीं तर आपण राजकीय हक्क नकोत असेंच म्हटलें पाहिजे!** दि. ब. लट्टे यांनीं नेमस्त पक्षानें आपली भूमि सोडिली असा जो टपका त्यांस दिला आहे तो अगदीं समर्पक आहे. पण हें जें नेमस्त पक्षानें केलें तें चूक आहे असें मात्र नव्हे. राजकारणाचें महत्त्व त्यास अधिक पटलें एवढेंच खरें. तसेंच महात्मा गांधी हे समाजसुधारणेचे भारी भोक्ते व तदनुसार राजकीय मतांत नेमस्तच असत. पण अनुभवानें त्यांस दिसून आलें कीं, राजकारणा पुढें हाणिलें पाहिजे. अमूक झाल्याशिवाय स्वराज्य नाहीं, तमूक झाल्याशिवाय स्वराज्य नाहीं असें सांगतांना त्यांनीं ज्या कांहीं अटी घातल्या होत्या त्यांत अस्पृश्यतानिवारण झाल्याशिवाय स्वराज्य नाहीं अशीहि एक अट घातली होती. पण इच्छेविरुद्धच कां होईना तिकडे दुर्लक्ष करून त्यांनीं राजकारणाची तड लावावयाचें ठरविलें. त्यांस कोणीं कोणीं हिणविलेंहि व आपण ज्या अटी उच्चारलां होतां त्यांचें काय झालें? म्हणून विचारिलें. पण त्यावर त्यांनीं इतकेंच सांगितलें कीं, हे अस्पृश्य लोक हो ! मी जें कांहीं राजकारणासाठीं करीत आहें त्यांत तुमचा अंतर्भाव होतच आहे. हें त्यांचें उत्तर हो.

टिळकांच्या एतत्प्रकरणींच्या अभिप्रायाशीं सर्वथा जुळणारें आहे. अस्पृश्यतानिवारणाचें महत्त्व त्यांना वाटत नाहीं असें कोणी म्हणेल काय ? पण तुलनेनें पहातां त्यांना राजकारणाची ओढ आपण जास्त घ्यावी हें जास्त जास्त पटूं लागलें. पण म. गांधीच कशाला ? खुद्द डिप्रेस्ड पुढारीच ' जातीविती राष्ट्र बनण्याच्या कांहीं आड येत नाहींत, धर्मभेदहि व पंथहि आड येत नाहींत, इंग्रजांचा लोभ तेवढा आड येत आहे. आम्ही स्वराज्यास पात्र आहोंच. ' अशा अर्थाचे उद्गार काढतांना पाहिलें म्हणजे **केसरीनें पाडलेल्या या नव्या संप्रदायाची यथार्थता पूर्ण सिद्ध होते.**

राजकारण हें यशस्वी होण्यास व राहण्यास समाजसुधारणा ही अवश्य आहे, ती लंगडी पडली तर राजकारण साधणार नाहीं, हा रानड्यांचा प्रतिपाद्य अभिप्राय स्थलकालांनीं अनवलिप्त असा घेतला तरच बरोबर आहे. म्हणजे अमूक ठिकाणचें आणि अमूक काळचें राजकारण असें नव्हे तर यांनीं अनवलिप्त असें राजकारण समाजकारणाच्या प्रगतीशिवाय यशस्वी होत राहील काय ? असा कोणीं प्रश्न केला तर तें होणार नाहीं असें उत्तर देतां येईल. पण आपल्या येथचें राजकारण म्हणजे कांहीं दैशिक किंवा आपल्या बरोबरच वाढत आलेलें आपलें राजकारण असें नव्हतें, तर ' परकी अंमल ' या नांवाचें तें राजकारण होतें. युरोपांतील सर्व स्वतंत्र देशांना राजकारण आहेच. पण आपलें राजकारण म्हणजे तेथल्याप्रमाणें ' शासनतत्त्वांची परिणति, ' अशा रूपाचें नसून गंडांतर-रूपाचें होतें. **अर्थात् त्याच्या दमनासाठीं समाजसुधारणेची वाट पहावयाची कीं काय हा मुद्दा होता.**

सामाजिक प्रश्नांचें सनातनत्व व शाश्वत रूप, परसत्तेशीं करावयाच्या राजकारणाच्या आगंतुक पेच्याहून अतीत आहे, हें ध्यानांत बाळगलें नाहीं म्हणून असले प्रश्न उपस्थित झाले. तसेंच सध्यां सामाजिक प्रश्नांची जी लगबग दिसत आहे, ती त्या त्या प्रश्नांना राजकारणाच्या दृष्टीनें चढलेल्या महत्त्वामुळें आहे हें केवळ स्पष्ट आहे. सामाजिक प्रश्नांची सोडवणूक कित्येक शतकांवर मुद्धां पसरून होत जाणारी असते मग तितके दिवस राजकारण लांबवावयाचें का ? बारीक सारीक प्रश्नांत हुल्लडीनें कदाचित् भागेल, पण जातिभेदासारखे जे खंगरी विषय ते झटाझट सोडवून घेऊं व मग राजकारणाच्या नादीं लागूं असें जर कोणीं म्हटलें तर या सामाजिक प्रश्नांच्या शाखोपशाखा व मुळें यांची गति कोठवर झाली आहे हें त्यांनीं पाहिलें नाहीं असा त्याचा अर्थ होईल.

तसेंच मॉंटेग्यूनें दिलेल्या व मॅक्डोनल्डनें देऊं केलेल्या ज्या सुधारणा त्या काय पाहून दिल्या किंवा देऊं केल्या ? म्हणजे हिंदुस्थानांतील समाजकारणाला, त्यांना हवें होतें तितकें व आधीं सामाजिक म्हणणारांसहि घडवून आणितां येत होतें तितकें, यश मिळालें होतें म्हणून सरकारनें हे राजकीय हक्क दिले काय ?

पुनर्विवाह रेंगाळतच आहे, जातिभेद तर इतका आहे कीं, मतदानाच्या कामीं त्यांनींहि त्यास मान दिला, अस्पृश्य बापडे बाकींच्यापासून दहा मैलांवरच आहेत, बालविवाह जारीच आहे, शिक्षणाच्या बाबतींतला देखावा सर्वांस दिसतच आहे. मग सामाजिकांत काय असें विलक्षण स्थित्यंतर घडून आलें होतें कीं, ज्यावर खुष होऊन सरकारनें सुधारणा दिल्या ? याचें उत्तर स्पष्ट आहे. सरकारनें राजकीय हेतूनें व राजकारणाच्या चापानें सुधारणा दिल्या; सामाजिक वाढीकडे पाहून दिल्या असें मुळींच नाहीं. यावरून सरकारसुद्धां राजकीय हक्कांचा संबंध सामाजिक सुधारणेशीं मानीत नाहीं हेंच सिद्ध झालें.

पण सुधारकांनीं यावरून शिकस्त केली नाहीं असें म्हणावयाचें ? मुळींच नाहीं. सुधारकांच्या यशाचें माप लहान राहणारच; कारण समाजसुधारणाही स्वकीयांशीं झगडत करावयाची असल्यामुळें हळू हळू होणार. पण आपलें राजकारण मात्र परकीयांशीं असल्यामुळें जलद चालणार, हें ओघानेंच येतें. म्हणून या दोन कारणांचा संबंध इतका निगडित आहेसें न मानितां, इतर कारणांची अपेक्षा न ठेवतां, शुद्ध सामाजिक तत्त्वांचा पुरस्कार समाजसुधारकानें करावा, म्हणजे जसा ईश्वरचंद्रांनीं, दयानंदांनीं केला, कीं जेव्हां राजकारणाची अपेक्षाच नव्हती. आमच्या इतक्या सुधारणा म्हणजे ज्ञात, अज्ञात, उपस्थित, अनुपस्थित सर्व सुधारणा झाल्याशिवाय तुमचें राजकारण जयास जावयाचें नाहीं, असें त्यांनीं राजकारण्यास सांगू नये. प्रत्यक्ष सुधारकांइतकीच समाजाची काळजी जे करतात असे लोकहि त्यांच्याकडे आहेत. लांबून पाठपुरावा होणाऱ्या, घरच्या घरीं सोशॅलिस्टिक तत्त्वज्ञानानें पोखरत चाललेल्या परकीय राज्यसत्तेस हुंदाडावयास निदानपक्ष जितकें सामर्थ्य हवें तितकें हातीं येतांच लोकनायक उचल करून यशस्वी होतीलच; तरी तेव्हांहि समाजसुधारकांच्या हेंच दृष्टीस पडेल कीं, अजून पुष्कळ सुधारणा व्हावयाच्या उरल्याच आहेत ! म्हणून केसरी म्हणाला, ‘ राजकीय आधीं ! ’

---

# राष्ट्रीय सभा

## [ श्री. केशव लक्ष्मण ओगले, बी. ए. ]

१. प्रास्ताविक :—प्रस्तुत लेखाचा विषय राष्ट्रीय सभा आणि केसरी असा असला, तरी कालानुक्रमानें केसरीचा जन्म आधीं ( सन १८८१ त ) झाला असून, राष्ट्रीय सभेचा त्याच्या मागून सुमारें पांच वर्षांनीं ( सन १८८५ त ) झाला हें प्रसिद्धच आहे. राष्ट्रीय सभा स्थापण्याची कल्पना ह्यूमसाहेबांच्या मनांत सविकल्प अशी प्रथम आली असली, तरी तिचें कार्य सुकर होण्याला तिच्या पूर्वी अस्तित्वांत असलेल्या संस्थांचा उपयोग झाला असला पाहिजे हें उघड आहे. राष्ट्रीय सभेचेंच कार्य पण थोडें कमी व्यापक प्रमाणावर करण्यासाठीं, मुंबईस ' मुंबई प्रेसिडेन्सी असोसिएशन, ' पुण्यास ' सार्वजनिक सभा, ' मद्रास येथें ' महाजन सभा ' व तिच्या पूर्वी ' मद्रास नेटिव्ह असोसिएशन, ' कलकत्ता येथें ' ब्रिटिश इंडियन असोसिएशन ' व ' नॅशनल लीग,' अशा संस्था स्थापन झालेल्या होत्या व त्यांच्या द्वारां परिषदाहि मधून मधून भरत असत. केसरीच्या पूर्वी वर्तमानपत्रांचा प्रचार होऊं लागला होता व तींहि लोकजागृतीचें कार्य करीत होतीं. पण ' अद्याप वर्तमान- ' पत्रकर्त्यांस आपणांवरची जबाबदारी पुरतेपणीं कळूं लागली आहे किंवा लोक- ' सुधारणेस आपल्या परिश्रमांनीं केवढें साहाय्य होणारें आहे, याविषयीं त्यांचा पक्का ' समज झाला आहे असें सामान्यतः पाहतां आढळणार नाहीं, ' ( ४-१-८१ ), असा त्यांचा प्रकार केसरीनें वर्णिला असून आपल्या प्रसिद्धिपत्रकांत, ' अलीकडे ' बादशाही अंमलाच्या सुरुवातीपासून तोंडपुजेपणाचा प्रकार बराच वाढत चालला ' आहे यांत संशय नाहीं. हा प्रकार अत्यंत अश्लाघ्य असून देशाच्या हितास अपाय- ' कारक होय, ' ( कित्ता ), असा इशाराहि दिला आहे. ' वर्तमानपत्रकर्ते हे रयतेचे ' कोतवाल व वकील आहेत, तर हे दोन्ही अधिकार होईल तितक्या दक्षतेनें ' बजावण्याचा आम्ही संकल्प केला आहे, ' ( कित्ता ), असें सांगून पुढील वर्षाच्या प्रथमांकांत ' प्रस्तुत पत्राच्या प्रसिद्धिपत्रकावरून सर्वांस जाहीर होऊन चुकलेंच आहे ' कीं, त्याचे प्रकाशक सर्व प्रकारें स्वतंत्र आहेत; म्हणजे कोणत्याहि प्रकारें सरकारच्या ' मिंधेपणानें वागणारी वरील मंडळी नव्हे, ' ( ३-१-८२ ), असें त्यानें पुनः खडखडून बजाविलें.

' सरकारी अधिकारी आपलीं कामें कोणकोणत्या तऱ्हांनीं बजावतात, याविषयीं ' केवळ निःपक्षपातबुद्धीनें व कोणाची भीड न बाळगतां मजकूर लिहिण्याचा ' आमचा इरादा आहे, ' ( ४-१-८१ ), असें सांगून समरांगणांत उतरलेल्या केसरीनें देशोन्नतीचें विवेचन करितांना ' देशाच्या उत्तम स्थितीचें लक्षण देशाभिमान

'हें होय,' असें सांगितलें व देशाभिमानाच्या वृत्तीस हा देश पारखा आहे,' असा खेद प्रदर्शित करून 'ज्या पाश्चात्य लोकांनीं हा देश इतका काळपावेतों 'पादाक्रांत करून टाकिला आहे, त्यांच्या पासूनच ही गुरुकिल्ली आपण 'घेतली पाहिजे. त्यांचे इतिहास वाचून, त्यांचा सहवास करून व त्यांच्या उला-'ढालींकडे सतत लक्ष पुरवून, आम्ही किती गचाळ लोक झालों आहों, याची 'प्रतीति आपल्या ठिकाणीं बाणली पाहिजे; ती बाणली असतां 'लोह-परिस' 'या न्यायानें आमचे नादान लोकहि कालेंकरून बाणेदार होतील,' अशी त्या खेदकारक परिस्थितीवर तोड सुचविली. ( २८-२-८२ ते १४-३-८२ ).

लोकजागृति करण्यासाठीं सार्वजनिक सभेसारख्या संस्था व केसरीसारखीं बाणेदार पत्रें अशा रीतीनें प्रवृत्त झालीं असतां हिंदी लोकांचे अत्यंत जिव्हाळ्याचे कैवारी जे ह्यूम त्यांना सर्व राष्ट्राचा व्यापक दृष्टीनें विचार करणारी सार्वराष्ट्रीय संस्था असावी असें वाटलें व १८८२ सालीं त्यांनीं सरकारी नोकरी सोडली आणि पुढील वर्षी कलकत्ता विद्यापीठाच्या पदवीधरांना उद्देशून एक सार्वजनिक पत्र प्रसिद्ध केलें. त्यांत हिंदी सुशिक्षितांवर देशाचे पुढारी म्हणून असलेल्या जबाबदारीचें यथार्थ वर्णन केलें असून स्वार्थत्यागपूर्वक स्वातंत्र्यासाठीं झटण्याचा कळकळीचा उपदेश केलेला आहे. 'बाहेरील लोकांनीं कितीहि कळकळ दाखविली व हिंदुस्थानावर 'आणि हिंदी लोकांवर कितीहि प्रेम केलें, तनमनधन खर्चून त्यांच्या हितासाठीं 'कितीहि धडपड केली, तरी हिंदी लोकांचें खरें कार्य हिंदी लोकांना आपणच केलें 'पाहिजे: तसें न होतां देशासाठीं काम करणारीं स्वार्थत्यागी माणसें सुशिक्षितांमधून 'जर पुढें येणार नाहींत तर, परकी राज्यकर्त्यांच्या ताटाखालचें मांजर होऊन राहणेंच 'हिंदुस्थानला नित्य भाग पडेल. ज्यांना स्वतंत्र व्हावयाचें आहे, त्यांनीं आपल्या 'दास्यशृंखलेवर घणाचा घाव आपणच घातला पाहिजे. हिंदी लोकांना स्वातंत्र्य 'पाहिजे असेल तर त्यांनीं निश्चयपूर्वक त्यासाठीं झगडलें पाहिजे. तसें न होईल तर 'नुसत्या कुरकुरीचा किंवा तक्रारींचा काय उपयोग? राष्ट्राला काय किंवा व्यक्तीला 'काय, स्वातंत्र्याचें सुख पाहिजे असेल तर स्वार्थत्याग व निःस्वार्थीपणा यांचीच कास धरणें भाग आहे.' हे ह्यूमसाहेबांचे विचार व केसरीनें लोकांच्या मागें लाविलेली देशाभिमानाची निकड यांचें तादात्म्य असल्यामुळें केसरीनें पुढें ह्यूमसाहेबांचा नित्य पाठराखेपणा केलेला दिसून येतो. त्यांचे उल्लेख पुढें यथोचित स्थलीं येतीलच.

**२. काँग्रेसची स्थापना** :—ह्यूमसाहेबांच्या या कळकळीच्या हांकेला ओ द्यावयास तत्कालीन सुशिक्षितांतील बरीच मंडळी सर्व प्रांतांतून पुढें सरसावली व 'इंडियन नॅशनल यूनियन' या नांवानें एक अखिल भारतीय संस्था स्थापन होऊन तिची पहिली बैठक पुणें येथें भरवावी असें ठरलें. या बैठकीची व तिच्यासाठीं येणाऱ्या प्रतिनिधींची सारी व्यवस्था करण्याचें सार्वजनिक सभेनें अंगावर घेतलें. संस्थेचें नांव कायम करितांना यूनियनच्या ऐवजीं काँग्रेस हाच शब्द अधिक संमत झाला व

तदनुसार त्या बैठकींत नामाभिधान करण्याचेंहि ठरलें. अशा रीतीनें स्वार्थत्यागपूर्वक देशाभिमानानें प्रेरित होऊन कार्यप्रवृत्त झालेल्या केसरीच्या पुण्यालाच ही अखिल भारतीय राष्ट्रीय सभा प्रथम भरविण्याचा मान मिळावयाचा होता. १८८५ सालीं मार्च महिन्यांत राष्ट्रीय सभेच्या भावी प्रथमाधिवेशनाची माहिती देण्यासाठीं जें पत्रक प्रसिद्ध करण्यांत आलें त्यांत या संबंधानें उल्लेख आहे, तो असाः—'यंदांच्या 'परिषदेची बैठक पुणें येथें भरावयाची असल्यामुळें तेथील सार्वजनिक सभेच्या 'चिपळूणकरादि चालकांनीं स्वागत मंडळ बनविण्याचें मान्य केलें आहे व परि-'षदेची सर्व स्थानिक व्यवस्था त्यांच्याच हातीं राहील.'

पण शेवटीं हा मान पुण्यास मिळाला नाहीं. सर्व सिद्धता झाली असतां बैठकीच्या पूर्वी थोडे दिवस पुण्यास पटकीचा वाखा चालू झाल्यामुळें राष्ट्रीय सभेचें पहिलें अधिवेशन मुंबईस डब्ल्यू. सी. बानर्जी या बंगाली धुरीणाच्या नेतृत्वाखालीं यशस्वीपणें पार पडलें. या प्रथमाधिवेशनाला उद्देशून केसरी म्हणतो, 'बहुशः १८८५ 'हें वर्ष हिंदुस्थानच्या भावी इतिहासांत अत्यंत संस्मरणीय होऊन राहील. या वर्षाच्या 'डिसेंबर महिन्याच्या शेवटीं सुमारें १०० शिकलेले लोक कांहीं सामान्य निमित्त 'उद्देशून एकत्र जमा झाले होते. त्यांनीं मनांत धरलेला हेतु ज्यांना पसंत नव्हता, 'त्यांनाहि त्यांचा हिंदुस्थानांत अश्रुतपूर्व असा समाज पाहून मोठें कौतुक वाटलें. 'या पहिल्या समाजावरून त्याच्या पुरस्कर्त्यांस असें दिसून आलें कीं, सामान्य राष्ट्र-'कार्य म्हणून कांहीं एक विचार उत्तम सुशिक्षितांच्या मनांत जागृत झाला आहे 'व त्यासाठीं हिंदुस्थानांत प्रतिवर्षी कोठेंहि एकवार कांहींनीं जमावें असें ठरल्यास 'तसें करण्यास लागणारा खर्च, कालहानि व दगदग करण्यास तयार असलेले बरेच 'लोक आहेत.' ( २४-७-८८ ).

३. **सामाजिक नव्हे, राजकीयच** :—राष्ट्राला उन्नतावस्था येण्यास त्याची सर्व अंगांनीं प्रगति झाली पाहिजे असें राष्ट्रीय सभेचे जनक ॲलन ऑक्टेव्हियन ह्यूम यांचें मत होतें. इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय सभेनें मुख्यतः सामाजिक सुधारणेपासून कार्याला आरंभ करावा असा त्यांचा मानस होता. पण त्या वेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड डफरिन यांच्या सूचनेवरून राष्ट्रोन्नतीच्या प्रयत्नांची सुरुवात राजकीय घटने-पासून करण्याचें त्यांनीं शेवटीं ठरविलें. ( वेडरबर्नकृत, 'ह्यूमचें चरित्र', पा. ५९-६०; अंबिकाचरण मुजुमदारकृत 'हिंदी राष्ट्राचा विकास,' इंग्रजी, पा. ५५-५८ ). केवळ सामाजिक प्रश्नांचा विचार साऱ्या हिंदुस्थानासाठीं एखाद्या संस्थेनें करण्यांत कशा अडचणी आहेत, प्रांतिक आचारभेदांमुळें तशा संस्थेंतील वादांतून एकीच्या ऐवजीं बेकीच अधिक होण्याचा संभव कसा आहे, त्यामुळें सर्व राष्ट्राला समान अशा ज्या राजकीय सुधारणा त्यांकडे लक्ष देऊन राष्ट्रीय सभेनें काम चालू केल्यास विलायतेंत सरकारपक्षाच्या विरोधी पक्षाचें स्थान तिला प्राप्त होऊन लोकमताची खरी कल्पना वरिष्ठ अधिकाऱ्यांना येण्यास तिचा उपयोग कसा होईल इत्यादि गोष्टी लॉर्ड डफरिन

यांनीं दाखवून राष्ट्रीय सभेचें तोंड राजकीय बाजूकडे वळविलें असें म्हणतात. या विषयासंबंधानें केसरीचाहि अभिप्राय प्रथमपासून असाच आहे. केसरीच्या सामाजिक मतांसंबंधानें विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे; पण सामान्यतः एवढें सांगितलें पाहिजे कीं, सामाजिक सुधारणेची आवश्यकता मान्य करूनहि उघड उघड दिसणाऱ्या अडचणींमुळें राजकीय कार्य करणारांनीं शुद्ध सामाजिक सुधारणावादापासून अलिप्त असावें असाच केसरीच्या प्रतिपादनाचा कटाक्ष सर्वत्र आढळून येतो. ता. ४-१-८७ च्या अंकांत केसरी लिहितो, 'नॅशनल कॉंग्रेसनें सामाजिक 'सुधारणेचें कामहि आपल्याकडे घ्यावें, ही अजागळपणाची सूचना करणारा समाज- 'सुधारक असल्याच वाक्पटु भागूबाई वर्गांतला असला पाहिजे.' मुंबईस स्टूडंट्स् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीपुढें कै. न्या. तेलंग यांनीं 'आधीं कोण, राजकीय कीं सामाजिक ?' या विषयावर दिलेल्या सुंदर व्याख्यानाचा १८८६ सालच्या ९ व १० या दोन अंकांत केसरीनें अनुवादपूर्वक परामर्श घेतला असून, 'सामाजिक 'सुधारणेसाठीं अगदीं जीव सोडण्याची गरज नाहीं; राजकीय सुधारणा होत चालली 'म्हणजे तिच्या कधीं बरोबर, कधीं किंचित् पाठीमागून सामाजिक सुधारणा होत 'जाते. हाच सिद्धांत काशिनाथपंतांनीं आपल्या व्याख्यानांत विशेष खुलाशानें सिद्ध 'करून दाखविला आहे,' असें म्हटलें आहे. पण समाजसुधारणावादी पक्षाला इतका धीर नसल्यामुळें राष्ट्रीय सभेनेंच समाजसुधारणेचें काम अंगावर घ्यावें असा त्यांचा आग्रह पडे. या संबंधानें ता. ४-१-८७ च्या अंकांत केसरी म्हणतो, 'नॅशनल कॉंग्रेस 'होऊन अजून एक पुरें वर्षहि लोटलें नाहीं, तों सामाजिक सुधारणाप्रियांनीं तिच्याकडून आपल्या कामास साह्य होण्यासाठीं मागणी घातली आहे व त्यांच्या 'या कृत्यास कित्येक अँग्लो-इंडियन पत्रांनीं चांगलें म्हटलें आहे. या पत्रांना काय ? 'नेटिव्ह लोकांनीं राजकीय हक्कसंपादण्याकरितां मांडलेला प्रयत्न जेणेंकरून रोडा- 'वेल किंवा लयास जाईल तें मनापासून पाहिजेच आहे.' राष्ट्रीय सभेचें मूळ उद्दिष्ट राजकीय असल्यामुळें त्यांत इतर गोष्टी घुसडून नसत्या अडचणी उत्पन्न करण्यांत कार्यहानि मात्र आहे, ही गोष्ट केसरीनें 'राष्ट्रीय परिषद' या विषयावर ता. १७-७-८८ पासून ७-८-८८ पर्यंतच्या चार अंकांत लेखमाला लिहून स्पष्ट केली आहे. या विषयाचा उपसंहार करितांना त्यांत म्हटलें आहेः—

'राष्ट्रपरिषद ही मुख्यतः राजकीय प्रकरणांचा ऊहापोह करणारी राजकीय सभा 'आहे. या परिषदेसाठीं जमलेल्या मंडळीनें हिचें काम आटपल्यावर दुसऱ्या सभा 'भरवून त्यांत सामाजिक, धार्मिक किंवा नैतिक विषयांची चर्चा करण्यास 'कांहीं हरकत नाहीं. पण राष्ट्रपरिषदेंत यांपैकीं कोणत्याहि विषयाची प्रत्यक्ष बाटाघाट 'होत नाहीं व होऊं नये. राजकीय विषयांहून इतर विषयांत बराच मतभेद अस- 'ण्याचा संभव असतो. तो या सभेंत घुसूं देतां कामा नये. त्यामुळें पुढें मागें फार 'घोटाळा होण्याचा संभव आहे. राज्यविषयक विचारावर तरी मतभेद असणार नाहीं

' किंवा असूं नये असें आमचें म्हणणें नाहीं. पण जोंपर्यंत कोणत्याहि मंडळींत ' मतभिन्नत्वाचें फक्त एकच कारण वसत आहे, तोंपर्यंत तिला फारसा धक्का ' पोहोंचण्याचा संभव नाहीं. पण एकाच्या जागीं पांच चार कारणें झालीं म्हणजे ' ती किती स्वल्पायुषी होईल हें कोणासहि सांगतां येणार नाहीं. तात्पर्य ' काय कीं, राष्ट्रपरिषदेच्या हातून आज जरी म्हणण्यासारखें राजकीय काम होत ' नाहीं, तरी हिचें राजकीय स्वरूपच निरंतर कायम ठेविलें पाहिजे. तींत अन्य ' विषयांचा प्रवेश होऊं देण्यांत फार मोठा प्रमाद होणार आहे, असें आम्हांस ' वाटतें. '

४. **अधिकाऱ्यांच्या कृपाछत्राखालीं** :—राष्ट्रीय सभेची स्थापना वड्या सरकारी अधिकाऱ्यांच्या अनुमतीनें झाली असल्यामुळें कांहीं वर्षें तिचें काम सरकारी कृपाछत्राखालीं चाललें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या वेळीं इंग्रजांच्या औदार्यावर सर्वांचीच मोठी भिस्त असून हिंदुस्थानला राजकीय हक्क मिळवून देण्यास इंग्रजांना हिंदी लोकांच्या आकांक्षांचें सम्यग् ज्ञान करून दिलें म्हणजे पुरे अशी कल्पना होती. तेव्हां राष्ट्रीय सभा स्थापन होऊन सर्व प्रांतांतील प्रतिनिधींच्या एकमतानें आपलीं गाऱ्हाणीं सरकारपुढें मांडण्यांत येणार व अर्थात् तीं तत्काळ दूरहि होणार अशा भावनेनें कीं काय, लोकांमध्यें राष्ट्रीय सभेविषयीं उत्साह वाटूं लागला. मुंबईच्या बैठकींतील मुख्य ठराव कायदेकौन्सिलें वाढवून त्यांत लोकनियुक्त सभासदांचा भरपूर भरणा करावा, जमाखर्चाचीं अंदाजपत्रकें त्यांच्या पुढें मांडावीं व कार्यकारी कौन्सिलांविरुद्ध कायदेकौन्सिलांचीं कांहीं गाऱ्हाणीं असल्यास त्यांचा विचार करण्यासाठीं कॉमन्स सभेंतील सभासदांचें मंडळ नेमण्यांत यावें, असा आशयाचा होता. या सभेला वडे हिंदी व इंग्रज सरकारी नोकरहि उपस्थित होते व स्मॉल कॉज कोर्टाच्या जज्जाचें काम करीत असलेल्या रा. व. म. गो. रानड्यांनीं तर भारतमंत्र्याचें कौन्सिल काढून टाकण्याच्या ठरावावर भाषणहि केलें. रानडे पुढेंहि बरींच वर्षें राष्ट्रीय सभेंत प्रेक्षक म्हणून उपस्थित असत. सभेच्या बैठकींत बरींच वर्षें राजनिष्ठेचा ठरावहि करण्यांत येई. राजनिष्ठा हें राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांतील एक महत्त्वाचें अंग म्हणून ठरविलेलें होतें. असो.

पहिल्या वर्षीं प्रयोगावस्थेंत मुंबईचें अधिवेशन झाल्यावर राष्ट्रीय सभेची दुसरी बैठक कलकत्ता येथें दादाभाई नौरोजी या महर्षितुल्य नेत्याच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली. या बैठकींत मागील वर्षींच्या ठरावांशिवाय न्यायखातें व अंमलबजावणीखातें यांची फारकत करण्याचा ठराव झाला आणि सभेचें काम व्यवस्थित होण्यासाठीं प्रांतिक मंडळ्यांची स्थापना करण्यांत आली. त्या प्रसंगीं झालेले वादविवाद पाहून अँग्लो-इंडियनांपैकीं कित्येकांना कसेंसेंच वाटूं लागलें, पण आपल्या मनाच्या समाधानार्थ ' हा नुसता बाहेरचा फेस आहे, ' असें ते हिणवूं लागले. पण लॉर्ड डफरिन यांनीं मात्र सभेच्या निवडक प्रतिनिधींची भेट घेऊन

सभेविषयीं सहानुभूति व्यक्त केली. या बैठकीच्या यशस्वीपणासंबंधानें केसरी लिहितो, ' पूर्वीच्या चक्रवर्ति राजांनीं मांडलिक राजांच्या मोठमोठ्या सभा भरविल्याचें ' सांगतात. पण केवळ राजकीय कामाकरितां लोक एकत्र झाल्याचें कोठेंहि ऐकिवांत ' नाहीं. नेटिव्हद्वेष्टे पत्रकार किंवा कामगार कांहींहि म्हणोत, ही सभा आमच्या भावी ' उत्कर्षाचा पायाच आहे. निरनिराळ्या ठिकाणच्या व जातींच्या २५० लोकांनीं ' एका ठिकाणीं मिळून १०-१५ महत्त्वाच्या मुद्यांवर त्यांचें एकमत व्हावें यापेक्षां ' हिंदुस्थानास आतां राष्ट्रत्व येऊं लागलें आहे याचा आणखी पुरावा तो कोणता ? ' (४-१-८७). ' १८८५ सालीं जिचें जन्म झालें, त्या राष्ट्रीय सभेचा द्वितीय वाढ- ' दिवस मोठ्या आनंदानें व निर्विघ्नपणें पार पाडला. यंदांचा समारंभ मागल्यापेक्षां ' विशेष थाटाचा झाला. ' ( ११-१-८७ ).

राष्ट्रीय सभेचें तिसरें अधिवेशन मद्रास येथें न्या. बद्रुद्दिन तैय्यब्जी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें व कलकत्याच्या बैठकीवर त्यानें सर्व प्रकारें ताण केली. या बैठकीला पूर्वीपेक्षां प्रतिनिधि-संख्या बरीच मोठी होती व सभेला व्यवस्थित घटना देण्याचाहि प्रयत्न करण्यांत आला. त्यासाठीं नेमलेल्या मंडळानें कांहीं नियमांचा मसुदा तयार केला, पण १९०८ पर्यंत त्यांचा निर्णय मात्र सभेंत कधींहि झाला नाहीं. सभेला कांहीं व्यवस्थित घटना असावी अशी केसरीची सूचना वारंवार येत असे. तरी पण तें कार्य बरींच वर्षे तसेंच पडून राहिलें होतें एवढें खरें. सभेला नियम-बद्ध घटना असती तर नियमांच्या नांवाखालीं सुरत येथें नेमस्त पक्षाकडून राष्ट्रीय पक्षाचा जो उपमर्द होऊन त्यामुळें सभाच बंद होण्याची पाळी आली, तो प्रसंग टळला असता, असें आपापल्या दृष्टीनें दोन्ही पक्षांचें म्हणणें होतें तें यथार्थ दिसतें. या बैठकीचें काम पाहून केसरीनें ' दसरा, दिवाळी, मोहरम यांप्रमाणेंच राष्ट्रीय ' सभेचा दिवस आमच्या सुशिक्षित लोकांस वाटूं लागला आहे,' ( ३-१-८८ ), असे उद्गार काढिले. मद्रास येथील बैठकीचे आणखीहि विशेष केसरीनें दिले आहेत. अध्यक्ष मुसलमान असून शिवाय दुसरे १०० मुसलमान सभेला हजर होते. तसेंच कित्येक गोरे व युरेशिनहि ( आतां हा शब्द रद्द होऊन त्याच्या जागीं अँग्लो-इंडियन असा शब्द योजण्यांत येतो ), होते, असें सांगून राष्ट्रीय सभा एक-देशीय म्हणजे एकट्या हिंदूंचीच नव्हे असें केसरीनें दाखविलें. या बैठकीला शेतकऱ्यांचे मुखत्यार आले होते. ' राष्ट्रीय सभा म्हणजे काय, तिचे हेतु कोणते, ' तिच्यापासून हित काय, तिच्या संबंधानें आमच्या लोकांचें कर्तव्य काय इत्यादि ' मुद्दयांचा विचार करून एक छोटेखानी पुस्तक काढण्यांत आलें व त्याच्या ' हजारों प्रति अल्प किंमतींत विकण्यांत आल्या. ' ' आणखीहि एक अभिनंदनीय ' प्रकार यंदांच्या सभेंत दिसून आला. तो असा कीं, राष्ट्रीय सभेला येणाऱ्या ' मुखत्यारांचें आदरातिथ्य ठेवण्याचा व पाहुणचाराचा जबरदस्त खर्च भागविण्यास ' जो फंड जमा केला तो लक्षाधीशांपासून तों तहत दहापांच रुपयांत संसाराचा

'गाडा ओढूं पहाणाऱ्या गरिबांपर्यंत साऱ्यांनीं आपआपल्या शक्त्यनुसार हातभार 'लावून उभारला,' व अशा रीतीनें 'यंदां सभेचें पाऊल पुष्कळ पुढें ढकललें,' (१७-१-८८), याबद्दल केसरीनें आनंद व्यक्त केला.

५. **मुसलमानांची कॉंग्रेसविषयींची वृत्ति** :—राष्ट्रीय सभा ही कोणत्याहि एका जातीची नसून सर्व हिंदी लोकांची आहे व तिच्या योगानें हित झालें तर सर्वांचेंच होणार ही गोष्ट उघड असतांहि मुसलमानी बहुजन समाजाचा तिला मिळावा तितका पाठिंबा तर कधीं मिळाला नाहींच, पण उलट त्या समाजाचा विरोध मात्र तिला वारंवार जाणवला आहे. बद्रुद्दिन तैय्यबजींसारखे सन्मान्य अपवाद वगळले तर राष्ट्रीय सभेच्या कामांत मुसलमान समाजानें लक्ष घातलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर तसें केल्यानें आपल्या राजनिष्ठेस बाध येईल असा आपला समाज करून घेतला. बद्रुद्दिन तैय्यबजींसारख्या थोर मुसलमानांनीं या समाजाच्या वृत्ती-बद्दल त्यांना दोष देऊन योग्य मार्गावर आणण्याचा उपदेशद्वारां प्रयत्न केला, पण तो फारसा सफल झाला नाहीं. तरी पण जेव्हां जेव्हां मुसलमानांकडून राष्ट्रीय सभेला अनुकूल अशी वृत्ति दाखविण्यांत आली तेव्हां केसरीनें त्यांचे अभिनंदन केलें आहे. १८८८ सालीं मुंबईच्या अंजुमान-इ-इस्लाम संस्थेनें राष्ट्रीय सभेचे उद्देश आपल्याला मान्य असल्याचा ठराव केला व तदनुसार मुसलमान समाजानें राष्ट्रीय सभेला मदत करावी अशी शिफारसहि केली. हें पहातांच ता. २-९-८८ च्या अंकांत केसरीनें समाधान प्रदर्शित केलें व बद्रुद्दिन तैय्यबजींचें त्या सदुपदेशाबद्दल अभिनंदन केलें. 'कलकत्त्याच्या एक दोन मुसलमानांनीं राष्ट्रीय सभेस जाण्याचें नाकारलें, 'एवढ्यावरून सर्व मुसलमान या सभेच्या विरुद्ध आहेत अशी द्वाही नेटिव्हद्वेष्ट्या 'पत्रकारांनीं फिरविली.' पण सालेमसारख्या गृहस्थांचीं पत्रें पुढें करून केसरीनें तो आक्षेप खोडून काढिला आणि मद्रास येथें 'पुष्कळ मुसलमान मंडळी कॉंग्रेसला 'गेली आहे,' ही गोष्ट मुद्दाम नमूदहि केली. (२७-१२-८७). पण सर सय्यद अहमद यांनीं अलाहाबाद येथील अधिवेशनाला मुसलमानांनीं हजर राहूं नये अशी चिथावणी दिली. तेव्हां त्याबद्दल सावधपणाची सूचनाहि केसरीनें दिली. (३-४-८८). सर सय्यद यांनीं कॉंग्रेसला राजद्रोही म्हटलें, (२-१०-८८), व 'मुंबईच्या मुसलमानांनीं सभा भरवून राष्ट्रीय सभेच्या विरुद्ध निकाल सांगितला; 'त्यामुळें राष्ट्रीय सभेचें एक अंग लंगडें पडूं पहात आहे, ही गोष्ट नाकारणें म्हणजे 'सत्याचा अपलाप करणें होय,' (१४-८-८८), असें आपलें स्पष्ट मत सांगून या दुहीसंबंधानें पुढें केसरी म्हणतो, 'हा मुसलमानांचा निश्चय आम्हांला कितीहि 'घातुक असला तरी त्याकरितां त्यांच्यावर तुटून पडणें रास्त होणार नाहीं. या 'प्रसंगीं एकमेकांनीं एकमेकांचीं मनें दुखविण्यासारखें वागूं नये, हेंच या भान-'गडीचा सुखकर व सुलभ निकाल लावण्यास साधन होईल.' (कित्ता). पुढें १८९३ सालीं लाहोर कॉंग्रेसचे अध्यक्ष दादाभाई नौरोजी यांना मुसलमानांनीं

स्वतंत्र मानपत्र दिलें, त्याबद्दल केसरीनें त्यांचें अभिनंदन केलें. ( ३-१-९४ ). त्यानंतर १८९४ मध्यें अलीगड कॉलेजचे प्रिन्सिपाल बेक यांनीं अलीगड विद्यापरिषदेपुढें भाषण करून सर सय्यद अहमदांच्या शब्दांचा अनुवाद केला व ' इंग्रजांस हिंदुस्थानांतून हाकलून देण्याकरितां राष्ट्रीय सभा स्थापन झाली आहे, ' असें सांगितलें. त्या वेळीं बेकसाहेबाचा समाचार घेतांना त्याला ' मुसलमानांच्या उद्धारार्थ नवा अवतार ' अशी उपरोधक पदवी देऊन याच मथळ्याखालीं लिहिलेल्या अग्रलेखांत शेवटीं ' असल्या उपदेशाचें खरें स्वरूप आमचे मुसलमान ' बंधूहि लवकरच ओळखल्याशिवाय राहणार नाहींत, ' ( ६-२-९४ ), अशी आशा प्रदर्शित केली.

६. **सरकारी विरोधाचा आरंभ :**—ह्यूमसाहेबांनीं ज्या धडाडीनें काम चालू केलें ती धडाडी पाहून सामान्यतः सरकारी अधिकाऱ्यांना वैषम्य वाटणें साहजिकच होतें. पण आरंभींच्या तीन सभा मुंबई, कलकत्ता व मद्रास या तीन विशेष महत्त्वाच्या शहरीं भरल्या व व्हाइसरॉयांसारख्या मोठ्यांत मोठ्या अधिकाऱ्याचें त्यांना आनुकूल्य होतें, यामुळें सामान्य अधिकाऱ्यांना आपलें वैषम्य प्रकट करण्यास नीटशी संधि मिळाली नाहीं. मद्रासचे गव्हर्नर कॉनीम्यारा यांनीं तेथील राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींना सरकारवाड्यांत निमंत्रण करून उपाहार दिला व सर्वांशीं मोकळेपणें बोलून कॉंग्रेसकार्याविषयीं सहानुभूति व्यक्त केली होती. पण पुढच्या वर्षापासून सरकारी कृपेचें हें पारडें फिरलें. तीन वर्षांच्या राष्ट्रीय सभेच्या कार्यानें व अधिकाऱ्यांच्या सहानुभूतीनें हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षा पुऱ्या होण्याच्या आशेला अंकुर फुटण्यासारखें सरकारकडून कांहींच वर्तन झालें नाहीं. ही स्थिति पाहून कॉंग्रेसचा उद्योग निरर्थक आहे अशा निराशेनें लोक त्रस्त होण्याचा संभव उत्पन्न झाला. त्या वेळीं ' राष्ट्रीय परिषद ' या मथळ्याखालीं चार लेख लिहून महाराष्ट्रांतील लोकांच्या मनावरील निराशेचें पटल दूर करण्याचा केसरीनें प्रयत्न केला. या लेखांत शेवटीं असा निष्कर्ष काढिला आहे कीं, ' ब्रिटिश राज्यांत एकंदरीनें आमचें पाऊल ' पुढें पडत आहे, तें याहूनहि झपाट्यानें पडावें असें असल्यास ब्रिटिश सत्तेस निरंतर ' राजनिष्ठ राहून ब्रिटिश लोकांच्या व ब्रिटिश साधुपुरुषांच्या मदतीनें व सल्ल्यानें ' आम्ही वागत गेलों असतां आम्हांस चांगले दिवस येण्यास फार वर्षे लागणार ' नाहींत. ' ( ७-८-८८ ). यांत उल्लेखिलेले ब्रिटिश साधुपुरुष म्हणजे ह्यूमसाहेब होत, हें सांगावयास नकोच. ह्यूमसाहेबांनासुद्धां हिंदी लोकांची ही निराशेची मनःस्थिति समजून आली व हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांपुढें कितीहि सयुक्तिक कोटिक्रम मांडला तरी, त्यांच्याकडून काडीइतकाहि फायदा होण्याचा संभव नाहीं हें कळून चुकलें. म्हणून त्यांनीं हिंदुस्थानांत व इंग्लंडांत अशा दोन्ही ठिकाणीं जोराची चळवळ करण्याची व्यवस्था केली. त्यांनीं स्वतः ' म्हाताऱ्या माणसांची आशा ' ( *The Old Man's Hope* ), नांवाचें पुस्तक लिहून ब्रिटिश लोकां-

पुढें हिंदी लोकांच्या अत्यंत असहाय अशा दुःस्थितीचें वर्णन केलें व ती दूर करण्याची त्यांना विनंति केली. हिंदी लोकांनाहि अतिदुःखामुळें आलेल्या घोर निद्रेंतून जागें करण्यासाठीं त्यांनीं कमर बांधली व सर्व प्रकारच्या लोकांकडून वर्गण्या गोळा करून पत्रकें, पुस्तकें व चोपडीं यांचा सर्वत्र वर्षाव केला, प्रचारक पाठवून व्याख्यानद्वारां जागृति केली आणि शहरांतून, तशाच खेड्यापाड्यांतून सभा भरवून राष्ट्रीय सभेच्या मागण्यांच्या सत्यत्वाविषयीं लोकांची खात्री केली. सुमारें १००० सभा त्यांनीं भरविल्या व कित्येक ठिकाणीं ५००० लोक जमवून त्यांना वस्तुस्थिति समजावून दिली. मद्रासच्या वीरराघवाचार्यांकडून कॉंग्रेसविषयीं एक संवाद लिहवून त्याच्या व तशाच दुसऱ्या एका तत्सदृश संवादाच्या चार पांच लक्ष प्रति त्यांनीं खेडयापाडयांतून वांटण्याची व्यवस्था केली. हा धडाडीचा कार्यक्रम अर्थातच नोकरशाहीला भयंकर वाटला.

सन १८८८ सालची चवथी कॉंग्रेस अलाहाबाद येथें भरविण्यांत आली. त्या वेळीं संयुक्त प्रांताचे गव्हर्नर सर ऑकलंड कॉलव्हिन हे होते. त्यांनीं ह्यूमसाहेबांच्या या धडाडीच्या चळवळीवर व ती जिच्या नांवावर करण्यांत येत होती त्या राष्ट्रीय सभेवरहि आक्षेप घेऊन त्या संबंधानें ह्यूमसाहेबांस जाब विचारण्यासाठीं पत्र लिहिलें. कित्येक हिंदी लोकहि अधिकाऱ्यांचा हा भ्रुकुटिभंग पाहून घाबरून गेले आणि राष्ट्रीय सभेला नांवें ठेवूं लागले. पण ह्यूमसाहेबांनीं सर्वांच्या आक्षेपांस चोख उत्तर देऊन आपलें कार्य पुढें चालविलें व इकडे केसरीनेंहि तोच क्रम स्वीकारिला. ता. २०-११-८८ च्या लेखांत केसरीनें कॉलव्हिनच्या आक्षेपांस समर्पक उत्तर दिलें. भलतींच पत्रकें व पुस्तकें लोकांत वांटून त्यांच्या मनांत इंग्रजी अंमलास प्रतिकूल असे विचार भरविण्याचा राष्ट्रीय सभेचा क्रम दिसतो, असा कॉलव्हिनसाहेबांचा आक्षेप होता. त्याला 'हा दोष 'अनुभावानें दुरुस्त होईल,' असें उत्तर देऊन, 'देशहितैषी मंडळींनें हिंमत सोडतां 'कामा नये व आपल्या कृत्यांनीं या उपयुक्त संस्थेस धक्का बसवितां कामा नये,' असा लोकांनाहि इशारा दिला. राष्ट्रीय सभेच्या स्थापनेच्या वेळीं लॉर्ड डफरिन यांनींच तिनें सामाजिक कार्यापेक्षां राजकीय बाजूच घ्यावी असें सुचविलें होतें. पण १८८८ चा धडाका पाहून त्यांनींहि पगडी फिरविली व कलकत्ता येथें 'ट्रेडस् डिनर' प्रसंगीं भाषण करतांना 'राष्ट्रीय सभेनें सामाजिक सुधारणा सोडून राजकीय प्रश्नांचा विचार करण्याचें धाडस केलें, हें वाईट' असे उद्गार काढिले! या आक्षेपांचा विचार करून त्यांनाहि केसरीनें ता. ४-१२-८८ पासून १८-१२-८८ च्या अंकांतील लेखांत उत्तर दिलें. पण लॉर्ड डफरिन यांच्या 'या उद्गारांमुळें 'कॉंग्रेसचें पुष्कळ नुकसान होण्याचा संभव आहे,' असें नमूद करून ठेविलें.

**७. इंग्लंडांतील चळवळीची आवश्यकता :—** हिंदुस्थानांत चळवळ करून राष्ट्राच्या मागण्यांना निश्चित स्वरूप देण्याच्या प्रयत्नाबरोबर विलायतेंतहि तशीच चळवळ करून त्या मागण्यांना तेथील लोकमत अनुकूल करून घेणें अवश्य आहे,

असें केसरीनें नित्य प्रतिपादन केलें आहे. ह्यूमसाहेबांनाहि या गोष्टी मान्य असल्या-मुळें इकडे राष्ट्रीय सभेची रीतसर स्थापना होण्यापूर्वींच तिकडे जाऊन तिकडील लोकमत अनुकूल करून घेण्याची खटपट त्यांनीं केली. त्यानंतर ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी, इंडियन पार्लमेंटरी कमिटी व 'इंडिया' पत्र या संस्था स्थापून तें कार्य पद्धतशीर व्हावें अशी योजनाहि त्यांनीं केली. पण विलायतेंतील या सर्व संस्थांना हिंदुस्थानांतून व्हावें तसें साह्य वेळेवर मिळण्याची अडचण पडे. ही स्थिति अनिष्ट असून विलायतेंतील कार्य नीटपणें चालण्याची व्यवस्था झाली पाहिजे असा इशारा केसरीनें अनेकवार दिला. ता. २७-१२-८७ च्या अंकांत केसरी म्हणतो, 'राष्ट्रीय सभेचे उद्देश व ठराव हिंदुस्थानांतील व इंग्लंडांतील लोकांस 'कळवून त्यांची मदत या कामीं घेण्याची कांहीं तजवीज जर आम्ही लवकर केली 'नाहीं, तर नुसतें दरसाल एके ठिकाणीं जमल्यानें आपला कार्यभाग कधींच 'सिद्धीस जाणार नाहीं. अशी खटपट करण्याकरितां प्रथम एक कायमची सभा 'करून ठिकठिकाणच्या सार्वजनिक सभांच्या व फिरत्या वक्त्यांच्या मदतीनें 'आमच्या लोकांचीं मनें या कृत्याकडे ओढलीं पाहिजेत. यासाठीं एक फंड 'काढिला पाहिजे व त्याच्या खर्चांतून पोलिटिकल मिशनरी तयार करून त्यांची 'देशावर रवानगी केली म्हणजे, आपण यंदां एक पायरी पुढें गेल्याप्रममाणें होईल.' या सूचनेंतील कार्यक्रम अंमलांत येतांच १८८८ सालीं सरकारी अधिकाऱ्यांचा कॉंग्रेसवर रोष कसा झाला हें पूर्वीं पाहिलेंच आहे. १९२१ सालीं असहकारितेच्या प्रचाराकरितां राष्ट्रीयसभेनें जो क्रम स्वीकारला, त्याचा हा ओनामा होता. विलायतेंतील चळवळींचा उपयोग कसा झाला असता हें ता. २६-६-९४ व १०-७-९४ च्या स्फुट सूचनांत सांगून 'अशा वेळीं जर आम्हांस खरोखर कळकळ असती तर विलाय-'तेंत पांचपंचवीस गृहस्थांनीं जाऊन तेथील लोकांस भंडावून सोडलें असतें,' असे उद्गार केसरीनें काढिले आहेत. त्याचप्रमाणें ता. २७-११-९४ च्या अंकांत 'राष्ट्रीय सभेचे उद्देश तडीस नेण्यास जर कांहीं साधन असेल तर तें विलायतची 'कमिटी हें होय. या प्रश्नासंबंधानें दर वर्षास कांहीं तरी चालढकल करून त्या-'बद्दलचा ठराव तहकूब करण्यांत येत असतो. पण ही टाळाटाळी मद्रासचे लोक 'आतां चालूं देणार नाहींत,' अशी आशा प्रकट केली.

**८. चळवळीच्या प्रसारार्थ इतर सूचना :**—राष्ट्रीय सभा कोणत्या तरी ठिकाणीं वर्षांतून एकदां भरविण्यापासून विशेष कार्यसिद्धि होणार नाहीं हें जाणून, प्रांतिक-सभा, जिल्हा-सभा, तालुका-सभा व गांव-सभा स्थापन होऊन सर्वत्र सारखी चळवळ चालू राहिल्यासच इष्ट सिद्धि त्वरित होईल असें केसरीचें मत असून तत्प्रीत्यर्थ त्यानें शक्य ती खटपटहि केली. सार्वजनिक सभेसारख्या सभांना प्रातिनिधिक स्वरूप द्यावें म्हणजे लोकजागृतीचें कार्य अधिक होईल; प्राति-निधिक स्वरूपाच्या संस्थांत जातवारीचें तत्त्व केव्हांहि समाविष्ट न करितां प्रतिनिधि

घ्यावयाचे ते अमुक जातीचे म्हणून घेऊं नयेत, अमुक ठिकाणचे म्हणून घ्यावे; दुसऱ्याच्या तोंडाकडे न पहात बसतां होईल तितकें करून स्वावलंबनानें कार्यसिद्धि करून घ्यावी; दुसऱ्यांकडून मनोभावें साह्य होत असेल तर त्याचा खोट्या अभिमानानें अव्हेर करूं नये; अव्यवहार्य सूचना किंवा अर्ज केल्यानें संस्थेला हास्यास्पदता प्राप्त होते, अशा अनेक प्रकारच्या इष्ट व उपयुक्त सूचना राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यांस केसरीनें वेळोवेळीं केल्या असून, त्यांची यथार्थता प्रसंगीं दिसून आली आहे. लॉर्ड डफरिननंतर लॉर्ड लॅन्सडाउनची नेमणूक झाली असतां ती रद्द करावी म्हणून काँग्रेस कमिटीपुढें सूचना येणार होती. पण तसें करणें काँग्रेस कमिटीस हास्यास्पद होईल, असें केसरीनें निक्षून सांगितलें. ( ३-४-८७ ). प्रांतिक परिषदा भरविण्याची मुंबई गॅझेटनें सूचना केली असतां, केसरीनें ती उचलून धरिली. ( ३१-७-८८ ). अलाहाबादच्या १८८८ मधील राष्ट्रीय सभेच्या बैठकीस पार्लमेंटचे सभासद हजर राहणार आहेत, असें समजलें असतां ' त्यांचा ' नीट आदरसत्कार करून त्यांना सर्व प्रकारची माहिती द्यावी, ' असें केसरीनें प्रतिपादिलें. ( ३१-७-८८ ). राष्ट्रीय सभेसाठीं प्रतिनिधि निवडून देण्याची अंजुमान-इ-इस्लामसारख्या संस्थेस सूचना केली असतां, ' जातीजातींचे मुखत्यार ' मागविण्यापेक्षां निरनिराळ्या ठिकाणचे मुखत्यार मागविणें चांगलें. स्थानिक ' मुखत्यार असावे, जातवारीचे नसावे, ' असा इषारा केसरीनें दिला. (२८-८-८८). तसेंच ता. ८-१-९५ च्या अग्रलेखांत राष्ट्रीय सभेला व्यवस्थित स्वरूप देण्यासाठीं काय करावें या प्रश्नाचा ऊहापोह केला असून ता. २९-११-९८ च्या अंकांत तेरा वर्षांत विशेष फलप्राप्ति झाली नाहीं याचीं कारणें सांगितल्यावर, ' पण ' राष्ट्रीय सभेपासून खरा फायदा करून घ्यावयाचा असल्यास अधिक जोरानें, अधिक ' नेटानें व ठरीव पद्धतीहून जरा निराळ्या दिशेनें काम करण्यास प्रारंभ केला ' पाहिजे, ' अशी सूचना केसरीनें दिली.

९. **स्वावलंबन** :—राष्ट्रीय सभेच्या ठरीव पद्धतींत स्वावलंबनापेक्षां परावलंबनाचा भाग अधिक असल्यामुळें तीहून निराळी पद्धत म्हणजे स्वावलंबनाची होय हें उघड आहे. या दृष्टीनें केसरीच्या विचारांत व तदनुसार कृतींतहि फरक पडत जाऊन उत्तरोत्तर स्वावलंबनाकडे त्याचा कल जोरानें जाऊं लागलेला दिसून येतो. ह्यूमसाहेबांच्या वृत्तींतहि असाच फरक पडला होता. कलकत्त्याच्या बैठकीपूर्वी १८-११-९० च्या केसरींत असा फरक आढळतो. ' ह्या राष्ट्रीय सभेनें जें काम ' हातीं घेतलें आहे, तें अवाढव्य जबाबदारीचें आहे व अशा कामांत आपण ' परकीयांची मदत न घेतां आपणच आपल्या हातून जितकें तडीस नेववेल तितकें ' नेलें पाहिजे. परकीय लोकांचे मदतीशिवाय आम्हांस एखादें कृत्य करण्याची शक्ति ' आहे हेंहि आपण दाखविलें पाहिजे, ' असें केसरीनें स्पष्टपणें प्रतिपादिलें, त्यांतील हेतु उघडच आहे.

असाच इशारा ह्यूमसाहेबांनीं १६-२-९२ रोजीं कॉंग्रेस कमिट्यांना उद्देशून काढिलेल्या पत्रकांत दिला आहे व त्यांत सरकार कांहीं करील अशी आशा नष्ट झाल्यामुळें लोकांनीं स्वावलंबी व्हावें असें म्हटलें आहे. हें ह्यूमसाहेबांचें पत्रक खासगी असतांहि बऱ्याच जणांना मोठें जालीम वाटलें व त्याबद्दल त्यांच्यावर मोठें काहूर उठविण्यांत आलें. या पत्रकानंतर थोड्याच दिवसांनीं ह्यूमसाहेबांनीं पुण्यास भेट दिली. त्या वेळची हकीकत ता. २२-३-९२ च्या अंकांत दिली असून, त्यांना लोकांनीं पैसे देण्याबद्दलहि सूचना केली व ह्यूमसाहेबांच्या पत्रकाचा उतारा देऊन ५-४-९२ च्या अंकांत त्याचें समर्थन केलें. हिंदुस्थानांतील कॉंग्रेस कमिट्यांनीं त्या पत्रकावर हल्ला चढविलाच आणि ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीनेंहि तसेंच केल्यावरून केसरीनें त्या सर्वांस दोष दिला. ' कॉंग्रेस कमिट्यांनीं असें करावयास नको ' होतें. विशेषतः विलायतेंतील कमिटीनें नको होतें. असें करणें कॉंग्रेसच्या कामास ' धक्का लावण्यासारखें आहे. असें करण्यापूर्वी अंमळ वाट पहावयाची होती. ' ( २६-४-९२ ). विलायतेंतील व हिंदुस्थानांत दोन्ही ठिकाणीं काहूर माजलें असतां व ह्यूमसाहेबांना मूर्ख, वेडे पीर अशीं विशेषणें त्यांचेच जातभाई देत असतां त्यांची बाजू धरून केसरीनें त्यांचा उत्तम पाठीराखेपणा केला. आणि कॉंग्रेस कमिट्यांच्या अशा वर्तनामुळें ' कॉंग्रेस ह्यूमसाहेबांच्या मागें कशी चालेल ' याची आम्हांलाहि मोठी काळजीच वाटते, ' असे उद्गार काढिले. ( ५-४-९२ ).

**१०. राष्ट्रीय सभेचीं स्थित्यंतरें :**—राष्ट्रीय सभेच्या हा वेळपर्यंतच्या आयुष्यांत जीं स्थित्यंतरें झालीं त्यांचा विचार करतां १८८५ पासून १९०५ पर्यंतचा वीस वर्षांचा बाल्याचा काळ, १९०६-१९०७ चीं धामधुमीचीं वर्षें, १९०८-१९१५ चें शैथिल्य, १९१६-१९१९ पर्यंतचें सहकारी युग, तेथून म्हणजे १९२० पासून १९२८ पर्यंतचें असहकार युग आणि आतां १९२९ पासूनचें स्वातंत्र्य युग, असे त्याचे खंड पडतात. पहिल्या म्हणजे बाल्याच्या काळांत इंग्रज सरकार कांहीं तरी करील अशी सार्वत्रिक श्रद्धा दिसून येते. पण या श्रद्धेंतहि स्थित्यन्तरें झालेलीं आढळतात. म्हणजे आरंभीं व्हाइसरॉय-गव्हर्नरादि बड्या अधिकाऱ्यांची शाब्दिक सहानुभूति दिसल्यामुळें त्यांच्यावरहि लोकांची श्रद्धा होती. पण हळू हळू ती उडत जाऊन विलायतेंतील लोकांवर मात्र राहिली. पण बंगालच्या फाळणीनें तिलाहि धक्का दिल्यामुळें इंग्रज लोकांवरील हिंदी राष्ट्राच्या श्रद्धेचें स्थान स्वावलंबनवादानें पटकाविलें व त्याचें पर्यवसान प्रस्तुत काळीं, ( इ. स. १९३० ), निःशस्त्र प्रतिकाराच्या प्रचंड चळवळींत झालें आहे.

राष्ट्रीय सभेच्या या सर्व स्थित्यंतरांच्या काळांत केसरीवर तिच्या मंद कार्यक्रमाला नांवें ठेवण्याचा, ती अधिक कार्यक्षम व्हावी म्हणून सूचना करण्याचा, तसाच कित्येक वेळां तिनें अविचारानें भलताच मार्ग स्वीकारून खड्ड्यांत पडूं नये म्हणून सावधपणाचा इशारा देण्याचा प्रसंग वारंवार आला व कर्तव्यबुद्धीनें या

सर्व गोष्टी केसरीनं अप्रियपणा पतकरूनहि अवश्य म्हणून केल्या, त्यांत टाळाटाळ केली नाहीं. प्रोत्साहन देणें, दोष काढणें, प्रसंगीं विरोधी चळवळ करणें इत्यादि बाह्यतः परस्परविरुद्ध दिसणारीं कर्तव्यें राष्ट्रीय सभेसंबंधानें केसरीला करावीं लागलीं. पण तीं सर्व करीत असतां राष्ट्रीय सभेच्या द्वारांच राष्ट्राचा उद्धार होणार हें सूत्र त्यानें सतत डोळ्यांपुढें ठेविलेलें दिसतें.

इ. स. १९०५ पर्यंतच्या काळांत सामान्यतः केसरीचें धोरण राष्ट्रीय सभेच्या चालकांना प्रोत्साहन देण्याचेंच होतें. पण त्यांतहि ती अधिक कार्यक्षम व्हावी म्हणून तिच्या मागें टोंचणी लावण्याचें काम मधून मधून केसरी करीत असे. या काळांत कॉंग्रेसच्या मागण्यांपैकीं कौन्सिलवाढीची मागणी अगदीं अल्प प्रमाणांत हिंदुस्थानच्या पदरांत पडली. सिव्हिल सर्व्हिसच्या समकालीन परीक्षांसंबंधाचा ठराव पार्लमेंटांत मान्य झाला असतांहि हिंदुस्थानांतील नोकरशाहीच्या कारवाईमुळें अंमलांत आला नाहीं. न्याय व अंमलबजावणी खात्यांच्या फारकतीच्या प्रश्नाला हातहि लागला नाहीं. विलायतेंत ह्यूम, वेडरबर्न, दादाभाई, ब्रॅडलॉ इत्यादिकांनीं बरीच खटपट केली, परंतु हिंदुस्थानांतून त्या खटपटीच्या सुराला सूर मिळवून देण्याचें काम व्हावें तसें बहुतेक प्रसंगीं झालें नाहीं व त्याचें कारण स्वार्थत्यागपूर्वक कळकळीनें काम करणारे कॉंग्रेसभक्त इकडे निघत नाहींत अशी केसरीची तक्रार होती. ता. २४-७-९४ च्या अंकांत केसरी म्हणतो, ' या बाबतींत आम्हांस ' एवढेंच वाईट वाटतें कीं, मि. दादाभाई व सर वुइलियम वेडरबर्न यांच्या ' धोरणानें जसें विलायतेंत काम चालू आहे, तसें हिंदुस्थानांत मात्र नाहीं. या ' वेळीं हिंदुस्थानांत हें राष्ट्रीय हिताचें काम नेटानें चालू होईल, तरच पार्लमेंटांतील ' ह्या पक्षाच्या कामास यश येईल; नाहीं तर कांहीं एक उपयोग होणार नाहीं. राष्ट्रीय ' सभेसारखी चळवळ या देशांत दहा वर्षे चालू असून देशी कार्यासाठीं आपलें ' तनमनधन अर्पण करणारा असा एकहि लायक मनुष्य अजून पुढें सरसावत ' नाहीं, ही गोष्ट फारच शोचनीय आहे. राष्ट्रीय सभेच्या वार्षिक बैठका चालू ठेवणें ' जितकें महत्त्वाचें काम आहे, तितकेंच महत्त्वाचें हें काम आहे. ही गोष्ट सर्वांनीं ' लक्षांत आणून येत्या कॉंग्रेसचे वेळीं राष्ट्रीय पुढारीपणाची माळ योग्य अशा ' एकाद्या गृहस्थाच्या गळ्यांत घालण्यास विसरूं नये. '

राष्ट्रीय सभेच्या स्थापनेपासूनच्या वीस एकवीस वर्षांच्या अवधींत तिचा काय उपयोग झाला व पुढें अधिक उपयोग व्हावा म्हणून काय करावें, तसेंच या गोष्टीसंबंधानें आशा किंवा निराशा किती बाळगावी यांविषयीं केसरीचें मत पाहिल्यानंतर पुढील म्हणजे वंगभंगापासून मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांपर्यंतच्या काळाकडे वळूं.

' गेल्या दोनतीन सालीं अलाहाबाद, मुंबई, कलकत्ता वगैरे ठिकाणीं राष्ट्रीय ' सभेच्या ज्या मोठ्या बैठकी झाल्या, त्यांत जे ठराव झाले त्यांमुळें आणि ते ठराव

‘ घेऊन पार्लमेंट सभेंत त्यांची चर्चा करण्याचें ब्रॅडलॉसारख्यांनीं अभिवचन देऊन ‘ पतकरल्यामुळें हिंदुस्थानांतील कायदे कौन्सिलें सुधारण्याचे कायद्याचा मसुदा ‘ सेक्रेटरी ऑफ स्टेट यांस अखेरीस पार्लमेंट सभेपुढें आणावा लागला...... ‘ ज्या कामाकरितां आज कित्येक वर्षें आपण श्रम करीत आहोंत, ज्याकरितां आज ‘ राष्ट्रीय सभेनें इतका उद्योग व पैसा खर्चिला तें काम जावें तसें सिद्धीस गेलें ‘ नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे. पार्लमेंटसभेकडून आमच्या तक्रारी व दुःखें ‘ कशीं व किती निवारण होतील याचाहि या बिलाच्या हकीकतीवरून थोडा-‘ बहुत अदमास करतां येईल. सध्यां मिळाला तेवढाच लाभ समजून पुढील ‘ उद्योगास लागलें पाहिजे. ’ ( ५-४-९२ ).

विलायतेंतील सेन्ट्रल फिन्सबरीच्या मतदारांनीं दादाभाईना पार्लमेंटचे सभासद निवडून दिलें, त्यासंबंधानें आनंद प्रदर्शित करून लिहितांना केसरी म्हणतो:--‘राष्ट्रीय ‘ सभेची विलायतेंत एजन्सी स्थापन होऊन आज दोन तीन वर्षें झालीं व खुद्द ‘ राष्ट्रीय सभेची बैठकहि लवकरच विलायतेस होण्याचा रंग आहे. तेव्हां हा जो ‘ आपण उद्योग करणार यास कितपत यश येईल याचा अदमास करण्यास दादा-‘ भाईचा जय हें एक चांगलें मोठें साधन झालें आहे......कोणताहि हक्क ‘ आम्ही मागितल्याबरोबर अगर केवळ आमच्या इच्छामात्रेंकरून आपणांस ‘ मिळेल असें मात्र कोणीं समजूं नये......ज्या कांहीं गोष्टी इंग्रजी राज्याचीं ‘ कायमचीं अंगें म्हणून समजल्या जातात, त्यांत कोणताहि फेरफार करण्याची ‘ विनंति केल्यास ती सिद्धीस जाण्याची कांहीं आशा नाहीं......राजकीय ‘ हक्क आयतेच तुमच्या तोंडांत येऊन पडणार नाहींत, हें उघड आहे. ’ ( १२-४-९२ ).

‘ राष्ट्रीय सभेच्या बैठकींत वर्गणीचे भराभर आंकडे पडतात; पण पैसे देण्याची ‘ वेळ आली कीं, हातांतून पैहि सुटण्याची मारामार पडते......त्याला कारण ‘ राष्ट्रीय सभेसारख्या चळवळीपासून देशांतील व्यक्तिमात्राचें कसें हित होणार ‘ या विषयीं त्यांचें अज्ञानच होय......वर्षांतून एकदां जमणाऱ्या हजार पांचशें ‘ लोकांच्या राष्ट्र-सभेनें एखादें मागणें केलें म्हणजे सरकार लागलेंच कबूल होईल ‘ असें नाहीं, तर प्रत्येक प्रांतांतून, जिल्ह्यांतून, शहरांतून, इतकेंच काय पण प्रत्येक ‘ खेड्यांतूनहि तशा प्रकारचे अर्ज गेले पाहिजेत...राष्ट्रीय सभेच्या प्रयत्नाला यश ‘ यावें असें जर लोकांना खरोखर वाटत असेल, तर तिच्याच नमुन्यावर गांवोगांव ‘ व खेड्यांतूनहि प्रयत्न सुरू झाले पाहिजेत. राष्ट्रीय सभेनंतर प्रांतिक सभा उत्पन्न ‘ करणारांचा हाच हेतु होता व म्हणूनच आम्ही कांहीं अंशांनीं राष्ट्रीय सभेपेक्षांहि ‘ प्रांतिक सभेला जास्ती महत्त्व देतों, इतकेंच नाहीं, तर प्रांतिक सभेप्रमाणें प्रत्येक ‘ जिल्ह्यांतूनहि व गांवांतूनहि पोट-सभा स्थापन करण्याचा लवकर काळ येईल ‘ अशी आम्ही उमेद बाळगतों. राष्ट्रीय सभेंत ऐकमत्य होण्यापूर्वी प्रत्येक

' प्रांतांत, त्यापूर्वी प्रत्येक जिल्ह्यांत व त्यापूर्वी प्रत्येक खेड्यांत तें झालें
' पाहिजे. ह्या नैसर्गिक क्रमानें ज्या दिवशीं आमचे प्रयत्न चालू लागतील,
' तेव्हांच आम्ही राजकीय हक्क भोगण्यास खरोखर पात्र होऊं व सरकार
' आमचें म्हणणें ऐकेल हें प्रत्येक देशहितचिंतकानें लक्षांत वाळगलें पाहिजे. '
( १८-१०-९२ ). ' मे. ह्यूमसाहेब यांची शेवटची भेट, ' ( २८-११-९३ ),
व ' राजधर्माचें नवे उपदेशक यांतील बीज काय ? ' ( १९-१२-९३ ), हे अग्र-
लेखहि या दृष्टीनें वाचनीय आहेत. पहिल्यांत ह्यूमसाहेबांच्या कॉंग्रेसविषयक कळ-
कळीचें व थोर कामगिरीचें यथार्थ वर्णन करून ' ह्यूमसाहेबांप्रमाणें योग्यतेनें, अधि-
' कारानें, बुद्धीनें आणि खऱ्या आस्थेनें काम करणारा ' गृहस्थ कॉंग्रेससाठीं
मिळावा म्हणून लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें कांहीं तोड निघावी अशी सूचना केली
असून दादाभाईच्या दीर्घोद्योगाची दिशा सांगून, ' हिंदुस्थानांतील इंग्रज राज्यकर्ते
' यांच्या जवळ ओरड करून कांहीं एक मिळावयाचें नाहीं, यांच्या जवळ भांडत
' बसणें म्हणजे दगडावर डोकें आपटून घेण्यासारखें आहे, हें तत्त्व अनुभवानें
' आम्हांस कळून चुकलें आहे व त्यावरोबरच आमची कांहीं दाद लागली तर
' विलायतेस लागेल अशी इतिहासावरून आम्हांस थोडी आशा लागली
' आहे, ' असें दादाभाईना पार्लमेंटच्या निवडणुकींत मिळालेल्या यशावरून प्रति-
पादिलें आहे.

पार्लमेंटचे सभासद मि. वेब यांच्या अध्यक्षतेखालीं १८९४ ची मद्रासची दहावी
राष्ट्रीय सभा भरली; तिच्या पूर्वीची कलकत्त्याची नववी सभा पार्लमेंटचे हिंदी सभा-
सद दादाभाई यांच्या अध्यक्षतेखालीं झाली, त्यांच्या संबंधानें ' प्रांतिक व राष्ट्रीय
सभा ' या २७-१२-९४ च्या अग्रलेखांत केसरीनें अत्यंत प्रोत्साहनपर उद्गार
काढिले. याच लेखांत राष्ट्रीय सभेच्या ठरावांशीं व्यक्तिशः एखाद्या सभासदाचें
तादात्म्य कितपत असलें पाहिजे व राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानीं कोणाला
निवडावें या प्रश्नांचा ऊहापोह करतांना केसरीनें लिहिलें:—' ही सभा म्हणजे कांहीं
' एका व्यक्तीचें मत नव्हे. राष्ट्रांतील समजदार लोकांचा जो सिद्धांत ठरेल, तो
' सभेचा सिद्धांत होय. प्रत्येक व्यक्तिमात्रानें या सभेचे सर्व सिद्धांत कबूल केले
' पाहिजेत, असें म्हणणें म्हणजे राष्ट्रांतील एकंदर मनुष्यांची सरासरीनें जी उंची
' आहे तीच प्रत्येकाची उंची असली पाहिजे, निदान सेन्सस कमिशनर तरी तेवढ्या
' उंचीचा असला पाहिजे असें म्हणण्याइतकेंच वेडगळ होय. करितां राष्ट्रीय
' सभेच्या अध्यक्षस्थानीं ज्याची निवडणूक करावयाची त्याचीं सर्व मतें सभेच्या
' ठरावांशीं मिळतीं असलीं पाहिजेत हें म्हणणेंच आधीं चुकीचें आहे. ' ही दहावी
सभा आल्फ्रेड वेब यांच्या नेतृत्वाखालीं यशस्वी रीतीनें पार पडली व १८९५ ची
बैठक पुण्यास व्हावी असें ठरलें. त्या वेळीं पूर्वीच्या दहा वर्षांच्या सभेच्या कामाचा
आढावा घेऊन पुणेंकरांना पुण्याचें अधिवेशन अधिक कार्यक्षम करण्यासाठीं

केसरीनें पुढील सूचना केल्या:—'मुखत्यारांची संख्या नियमित करणें, त्यांच्या 'निवडणुकीची एक पद्धति ठरविणें, सभेचें काम चालविण्याला कायम कमिटी व 'प्रत्येक प्रांतांतून आणि जिल्ह्यांतून तिच्या शाखा व पोटशाखा स्थापणें, विषय 'अगोदर दोनचार महिने ठरतील अशी व्यवस्था करणें वगैरे अनेक मुद्द्यांचा 'विचार करावा लागेल व त्यांचा आतांपासून खल सुरू झाला तरच पुढील डिसें-'बरांत थोडें बहुत ऐकमत्य होऊन कोणती तरी व्यवस्था ठरण्याचा संभव आहे.' (ता. ८-१-९५). याच विषयासंबंधानें पुनः ता. ६-८-९५ च्या अंकांत विवेचन करून केसरीनें अकरावी राष्ट्रीय सभा यशस्वी करण्यासाठीं महा-राष्ट्रास विनंति केली आहे. 'राष्ट्रीय सभेच्या विस्तीर्ण मंडपांत बंगाली, 'मद्रासी, सिंधी, पार्शी, मुसलमान आदिकरून सर्व जातींचे लोक एक दिलानें व एक 'चित्तानें राजकीय व राष्ट्रीय प्रश्नांचा विचार करितांना ज्यांनीं पाहिले असतील 'त्यांची, हिंदुस्थानच्या भावी उदयाचा व ऐक्यतेचा राष्ट्रीय सभा हा एक मजबूत 'पायाच होय अशी खात्री होऊन त्यांचीं मनें आनंदानें भरून गेलीं असतील, यांत 'बिलकुल शंका नाहीं,' अशा उत्साहमय शब्दांनीं काँग्रेसवर्णन केलें आहे. 'ज्या 'सार्वभौम राजसत्तेखालीं आपण शांततेचा अनुभव घेऊन हिंदुस्थानास एकराष्ट्रीयत्व 'आणण्यास तयार होत आहोंत, त्या सार्वभौम सत्तेस काडीइतकाहि धोका न 'आणतां लोकांचें हित कोणत्या गोष्टींनीं होईल, त्या गोष्टी आज दहा वर्षांच्या 'सभांतून झालेल्या वादविवादांनीं आतां अगदीं निश्चित झाल्या आहेत,' असें सरकार व लोक यांना आश्वासन देऊन, 'राष्ट्रीय सभेचें काम म्हणजे आपलें 'घरचें काम असें प्रत्येकानें समजून त्यास मदत केली पाहिजे व त्याप्रमाणें या 'इलाख्यांतील सर्व लोकांकडून मदत होईल,' असा भरंवसा प्रदर्शित केला आहे. राजकीय व सामाजिक वाद, इतर कारणें यांमुळें ही पुण्यांतील बैठक कशी निभावते, अशी भीति वाटत होती. पण सामाजिक सुधारणा करण्याच्या पद्धतींतील भेद हेंच तंट्याचें कारण होय, मूलभूत तत्त्वासंबंधानें तंटा नाहीं, असा निकाल झाल्यामुळें ती उत्साहानें पार पडली याबद्दल केसरीनें आनंद प्रदर्शित केला. (ता. ७-१-९६).

११. **राष्ट्रीय सभेंतील शैथिल्य**:—यापुढील राष्ट्रीय सभेच्या बैठकी रेंगाळत चालू लागल्या. हिंदुस्थानांत त्या सुमारास प्लेग सुरू झाल्यामुळें कदाचित् तिकडे लोकांचें लक्ष लागल्यामुळें व कांहीं अंशीं नैराश्यामुळें हें शैथिल्य उत्पन्न झालें होतें. पुण्याच्या बैठकींत मुखत्यारांची संख्या १५८४ म्हणजे मुंबईच्या १८८९ सालच्या १८८९ या मुखत्यारसंख्येहून कमी असली तरी १९०५ पर्यंत एकंदर बैठकींत तिचाच नंबर दुसरा होता. पण कलकत्त्यास १८९६ सालीं ती एकदम ७८४ इतकी उतरली. १९०२ सालीं लाहोर येथें तर ती ४७१ वर आली. हें शैथिल्य घालवून राष्ट्रीय सभेला पुनः जोमदार कसें करावें असा प्रश्न होता. राष्ट्रीय

सभेचे चालक एका ठरीव कार्यापलीकडे चळवळीची मर्यादा नेण्यास तयार नव्हते. सरकारकडून लोकांच्या आकांक्षा पुऱ्या करण्याचेंच काम मान्य करण्याचेंहि धोरण स्वीकारलें जाण्याचें लक्षण दिसेना. दुष्काळ व प्लेग अशा आपत्तींनीं लोक अधिकाधिक ग्रस्त होऊं लागले. अशा प्रसंगीं राष्ट्रीय सभेला औद्योगिक चळवळीची जोड देण्यांत आली व औद्योगिक प्रदर्शनें भरविण्यांत येऊं लागलीं. अंशतः या प्रदर्शनांमुळें, पण विशेषतः लॉर्ड कर्झन या व्हाइसरॉयांच्या अरेरावी कारभारामुळें लोकांमधील शैथिल्य झडावयास लागून राष्ट्रीय सभेला अधिक जोर येऊं लागला. सर हेन्री कॉटन यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या १९०४ सालच्या मुंबईच्या बैठकीला उपस्थित असलेल्या प्रतिनिधींची संख्या १०१० इतकी चढली व कर्झनसाहेबांनीं एका बंगालचे दोन बंगाल केल्यानें उद्भवलेल्या क्षोभामुळें राष्ट्रीय सभा त्या संबंधानें काय करते हें पाहण्याकडे सर्वांचें लक्ष लागलें. हें शैथिल्य व तें झाडावें कसें या संबंधानें केसरीनें २४-११-०३ व २९-१२-०३ या अंकांतील ‘ मलबारी आणि काँग्रेस ’ व ‘ ह्यूमसाहेबांचा काँग्रेसभक्तांस अखेरचा निरोप ’ या लेखांत विवेचन केलें आहे. ‘ पहिल्या पहिल्यानें आम्हांला मोठी उमेद होती कीं, ही जी कामधेनू- ‘ सारखी काँग्रेसची संस्था निघालेली आहे, तिच्यापासून आमचें व आमच्या ‘ मुलांबाळांचें कोटकल्याण होईल आणि खरें पाहिलें तर सरकारासहि या काम- ‘ धेनूच्या सामर्थ्याबद्दल कांहीं वर्षे बरीच शंका होती. पण आम्ही व सरकार या ‘ दोघांचाहि तो भ्रम नाहींसा होऊन काँग्रेसचें महत्त्व कमी होऊं नये म्हणून तिला ‘ औद्योगिक प्रदर्शनाची पुरवणी जोडण्यांत येऊं लागली आहे. ’ ( २९-१२-०३ ). मुंबईच्या बैठकीपूर्वी थोडेच दिवस म्हणजे ता. २०-१२-०४ च्या अंकांत पुनः केसरीनें या विषयावर ‘ वेळ तर हीच आहे ’ या मथळ्याखालीं लेख लिहिला. काँग्रेस सभेनें केलें काय, तिच्या विरुद्ध कांहीं निराधार तक्रारी कोणत्या उपस्थित झाल्या, आणि तिनें आतां पुढें काय केलें पाहिजे, या विषयावर मेसर्स ह्यूम, स्मिटन, थॉबर्न, स्विनी आणि जार्डिन यांच्या ‘ इंडियां ’तील लेखांचा उल्लेख आहे. हा लेख अत्यंत महत्त्वाचा असून त्यांत ‘ काँग्रेसचा जन्म, ’ ‘ राष्ट्रीय सभेचें काम, ’ ‘ नाउमेदीचीं कारणें, ’ ‘ हिंदुस्थानांतील चळवळीचें वैय्यर्थ्य, ’ व ‘ काँग्रेसचें पुढील धोरण, ’ अशा विषयांचा विचार आला असून बंगालच्या फाळणीमुळें राष्ट्रीय चळवळीला जें रूप आलें त्याचें बीज पेरलेलें आढळून येतं. हें नवें धोरण म्हणजे हिंदुस्थान सरकारचा नाद सोडून विलायतेंत सतत व जोराची चळवळ करण्याचें होय. ‘ भाषणें, ठराव आणि अर्ज यांपलीकडे कायदेशीर ‘ चळवळ जाऊं शकत नाहीं, असें जर कोणाचें मत असेल तर तें चुकीचें होय, ’ हें पुढील चळवळीचें बीज-वाक्य समजण्यास हरकत नाहीं. विलायतेस चळवळीसाठीं शिष्टमंडळ पाठवावयाचें राष्ट्रीय सभेनें मुंबईच्या बैठकींत ठरविलें, परंतु तेवढ्यानें काम भागणार नाहीं, तर त्या मंडळानें सांगावयाचें काय व मागावयाचें काय हें

निश्चितपणें ठरवून व त्याला हिंदुस्थानांत सर्व लोकांचा पाठिंबा मिळवून त्याच्या जोरावर विलायतेंतील चळवळ चालविली पाहिजे असें केसरीचें मत होतें व तदनुसार ' कानडा किंवा ऑस्ट्रेलियाप्रमाणें हिंदुस्थानाला प्रांतिक स्वराज्य पाहिजे ' आणि तें जेणेंकरून प्राप्त होईल, अशा प्रकारची राज्यपद्धति हिंदुस्थानांत सुरू ' करा हा मुख्य मुद्दा आहे, ' असें ता. ८-८-०५च्या अंकांतील ' हिंदुस्थानची वाट काय ? ' या लेखांत प्रतिपादिलें आहे.

**१२. वंगभंगाची चळवळ व नवयुगाचा अवतार :**—संकटें हीं पुष्कळ वेळां आपल्या हितासाठींच येत असतात अशी म्हण आहे व तदनुसार कर्तबगार पुरुष त्या संकटांचाहि स्वोद्धारार्थंच उपयोग करून घेतात. वंगभंग हें बंगाली लोकांवर प्रत्यक्ष आणि त्याच्या द्वारां साऱ्या हिंदुस्थानावर आलेलें संकट होतें. त्यामुळें बंगाली लोक खवळून गेले व राष्ट्रीय सभेनें वीस वर्षें केलेल्या राष्ट्रीयत्वाच्या परिपोषाचा दृश्य परिणाम म्हणून इतर प्रांतांनीं त्यांना पूर्ण सहानुभूति दाखविली. ही दैवयोगानें उत्पन्न झालेली परिस्थिति पाहून राजकारणपटु केसरीनें तिचा हिंदी राष्ट्राच्या उद्धारार्थ उपयोग करून घेण्याचा निश्चय केला आणि प्रथम बंगालच्या साह्याला सर्व महाराष्ट्राची व नंतर साऱ्याच प्रांतांची जोड मिळवून देऊन राष्ट्रांत उद्भवूं लागलेल्या नवचैतन्याचा पुरेपूर फायदा घेतला. पण कांहीं झालें तरी संकट तें संकटच. त्यामुळें या भगीरथ प्रयत्नाला १९०६ सालीं पूर्ण यश लाभण्याचा रंग येऊं लागला असतांहि पुढील सालीं कर्मधर्मसंयोगानें राष्ट्रीय सभेचें पाऊल एकदम मागें हटलें व १९१६ पर्यंत तिला कसेबसे दिवस कंठीत बसण्याचा प्रसंग आला. राष्ट्रीय सभेच्या या हीन स्थितीचें कारण म्हणजे केसरीवरील वैयक्तिक संकट होय. हें संकट १९१४ सालीं दूर होतांच थोड्याच काळानें राष्ट्रीय सभेला पुनः जोर येऊं लागला व १९१६ लालीं लखनौ येथें तिला चांगलेंच कार्यक्षम स्वरूप आलें. हा इतिहास आतां थोडक्यांत निवेदन करूं.

लॉर्ड कर्झनच्या पूर्वींच्या पंधरा वर्षांतील कॅांग्रेसच्या मागण्यापैकीं फक्त एकच म्हणजे कौन्सिलांच्या वाढीची मागणी शेंकडा चार पांच टक्क्यांनींच पुरविण्यांत आलेली पाहून निराशा झाली होती हें पूर्वीं सांगितलेंच आहे. शिवाय अरेरावी कर्झनशाही चालू होऊन गौप्यगोपनाचा कायदा, हिंदी युनिव्हर्सिट्यांच्या नियंत्रणाचा कायदा, इत्यादि दुष्ट कायदे पसार झाले व जखमेवर मीठ चोळावें त्याप्रमाणें कलकत्ता विद्यापीठाच्या उच्च स्थानावरून कर्झनशहानें, हिंदी लोक खोटें बोलणारे आहेत, असा सरसकट सिद्धांत प्रतिपादिला आणि सर्वांवर कळस म्हणून लोकांच्या आरडाओरडीकडे लक्ष न देतां एका बंगालचे दोन बंगाल करून टाकिले. हिंदुस्थानची स्थिति आर्थिक दृष्ट्या कोणत्या थराला गेली आहे, याचें यथादर्शन चित्रलेखन डिग्बींनीं आपल्या ' भरभराटलेलें हिंदुस्थान ' या पुस्तकांत व दादाभाई नौरोजींनीं ' पॉव्हर्टी अँड अन्-ब्रिटिश रूल इन् इंडिया ' या

ग्रंथांत केलें होतें. अशा स्थितींत असंतोषाचा धुसमणारा अग्नि भडकून देशभर पसरल्यास नवल काय? उपरोक्त दोन्ही पुस्तकांचा परामर्ष केसरीनें १०-१२-०१, १७-१२-०१ व १४-१-०२ या अंकांत घेतला आहे, यांवरुन देशाच्या स्थितीविषयींची योग्य कल्पना कोणालाहि येईल. ' खोटें कोण ? ' या २१-२-०५च्या लेखांत कर्झनसाहेबांच्या हिंदी लोकांविषयींच्या असत्य भाषणाच्या आरोपाचा समाचार घेतला आहे. या कारणांनीं उत्पन्न केलेल्या क्षोभामुळें लोकांचें लक्ष स्वावलंबनाच्या उपायांकडे जाऊं लागलें व त्यांतून स्वदेशी व बहिष्कार या वृत्तींची निष्पत्ति झाली. या वृत्तींना विरोध करणाऱ्या जुन्या पुढाऱ्यांसंबंधानें लोकांच्या मनांत असंतोष दिसूं लागला व त्यामुळें राजकीय चळवळ करणाऱ्यांत दोन पक्ष होऊन जुन्याला नेमस्त किंवा मवाळ आणि नव्याला राष्ट्रीय किंवा जहाल अशीं नांवें मिळालीं. १९०५च्या बनारसच्या बैठकीपर्यंत हा वाद इतक्या जोराला आला नाहीं. पण १९०६ सालीं जुन्यानव्यांचा वाद नेटास लागला. यापुढें जुन्या पक्षाचीं मतें लोकांना ग्राह्य होणार नाहींत व जुन्या अर्जविनंत्यांच्या कार्यक्रमानें कार्यभाग होणार नाहीं, अशी केसरीची समजूत दृढ होत आलेली होती व तिचा प्रचार करून राष्ट्रीय सभेचें स्वरूप अधिक कार्यक्षम करण्याची ही वेळ होय असें ठरवून त्यासाठीं केसरीनें जोराचा प्रयत्न सुरू केला. राष्ट्रीय सभेला स्वार्थत्यागी व कळकळीचा अध्यक्ष असल्याशिवाय तिचें कार्य नीट चालणार नाहीं, म्हणून असा अध्यक्ष शोधून काढण्याची सूचना पूर्वीहि केसरीनें केली होती. तेव्हां १९०६ सालीं कलकत्त्यास होऊं घातलेल्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीच्या प्रसंगानें हा प्रश्न पुढें आला असतां लोकांकडून होणाऱ्या सूचना पाहून आपल्या हातचा डाव निघून जाणार कीं काय अशी जुन्या पक्षाला धास्ती वाटूं लागली. टिळकांना अध्यक्ष करावें अशी सूचना पुढें येतांच तर त्यांचें धाबें दणाणलें व ' सुरेन्द्र-भूपेन्द्र ' या जोडीनें ' लुच्चेगिरीची घाई ' करून दादाभाईंना विलायतेंत तार धाडून त्यांना अध्यक्ष होण्याची विनंति केली. दादाभाईंना येथील सर्व प्रकार सविस्तर माहीत असणें शक्य नव्हतें. त्यांनीं एकदम ' होय ' म्हटलें. दादाभाईसारखा मोहरा जुन्या पक्षानें इरेस घातला तेव्हां त्या पक्षाला किती भीति वाटली होती याची सहज कल्पना येईल. पण एवढें करूनहि शेवटीं जुन्या पक्षाच्या अंगावरच डाव आला. ' केलें तुका, पण झालें मका ' असा प्रकार होऊन दादाभाईंनीं अध्यक्षपदावरून नव्या पक्षाच्या कार्यक्रमाचें समर्थनच केलें व हिंदुस्थानला जडलेल्या रोगाला किरकोळ मलमपट्ट्यांचा उपाय पुरेसा नसून मूलभूत असा स्वराज्याचाच उपाय अवलंबिला पाहिजे अशी घोषणा केली. ' लोकांचे हातीं असलेल्या स्वराज्याची सर सुराज्यास केव्हांहि येणार नाहीं ' हें सर हेन्री कॅम्बेल-बॅनरमनचें वाक्य आधारभूत घेऊन ' हिंदुस्थानाविषयींचें प्रेम ' व निष्ठा यांनीं प्रेरित होऊन आपल्या देशबांधवांस माझें शेवटीं सांगणें एवढेंच ' आहे कीं, एकजुटीनें व चिकाटीनें उद्योग करून स्वराज्य मिळवा म्हणजे दारिद्र्य,

' दुष्काळ व प्लेग यांनीं मरणारे व उपाशी दिवस कंठणारे कोट्यावधि देशबांधवांचें ' प्रत्यक्ष रक्षण व दुःखनिवारण होऊन जगांतील अत्यंत वैभवशाली व सुधारलेल्या ' राष्ट्रमालिकेंत हिंदुस्थान देशास पूर्वीचें श्रेष्ठपण प्राप्त होईल, ' असा संदेश दादाभाईंनीं हिंदी बांधवांस दिला. ( १-१-०७ ). दादाभाईंची ही चिकित्सा व केसरीचें म्हणणें हीं बहुतांशीं जुळतीं असल्यामुळें १९०६ च्या बैठकीचा आढावा घेतांना ' यंदांच्या राष्ट्रीय सभेवर आमच्या मतें केसरीच्या ' मताची पूर्ण छाप बसली असून राष्ट्रीय सभा यंदां केसरीच्या मताकडे पूर्ण ' झुकली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ' असे आत्मविश्वासपूर्ण उद्गार ता. १-१-०७ च्या अग्रलेखांत केसरीनें काढले. या बैठकींत स्वदेशी वस्तु झीज सोसूनहि लोकांनीं वापराव्या, परदेशी व विशेषतः विलायती मालावर बहिष्कार घालावा व राष्ट्रीय वृत्तीचे तरुण निर्माण करण्यासाठीं राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्था सुरू कराव्या असे ठराव झाले व त्यामुळें सबंध वर्षभर देशांत चळवळ चालू ठेवण्यास साधन झालें. हे ठराव सर्व प्रांतांतील तरुण पिढीला मान्य आहेत असें ठिकठिकाणच्या जाहीर सभांच्या हकीकती देऊन केसरीनें सिद्ध केलें व तद्विषयक आक्षेपांचें खंडन करण्याचा क्रम चालविला. या कामीं लोकांच्या विचाराला इष्ट वळण लावण्याचें कार्य केसरीनें पूर्वींपासूनच चालविलें होतें. ' आणीबाणीची वेळ ' ( १५-८-०५ ), 'राष्ट्रीय बहिष्कार' ( २२-८-०५ ), 'बहिष्कारयोग' (५-९-०५), ' हातघाईवर आले ' ( २८-११-०५ ), ' स्वदेशीवरील आक्षेप ' (१२-१२-०५), इत्यादि लेखांनीं लोकमत या कार्यक्रमाला अनुकूल झालें होतें. दादाभाईंची कामगिरी व त्यांचे अनेक प्रसंगीं इंग्रज राज्यकर्त्यांस उद्देशून बोललेले निर्वाणीचे शब्द यांची आठवण देऊन ' दादाभाई सांगणार तरी काय ? ' या लेखांत ' दादाभाई ' नौरोजी यांचे हे निर्वाणीचे उद्गार ऐकून कॉंग्रेसमधील स्वराज्य मागणाऱ्या जहाल ' पक्षाच्या मतांत आणि यांच्या मतांत भेद आहे असें कोणी म्हणेल असें आम्हांस ' वाटत नाहीं, ' असें केसरीनें ठासून सांगितलें व दादाभाईंच्या भाषणावरून त्याचा सर्वांस प्रत्ययहि आला. राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीनें १९०५, १९०६, १९०७, १९०८ या वर्षांतील केसरीची कामगिरी अपूर्व झाली असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. सविस्तर उतारे देऊन या कामगिरीचें वर्णन करणें लहानशा लेखांत अशक्य आहे व तसें करण्याची तादृश गरजहि नाहीं. तथापि कांहीं उतारे देण्याचा मोह आवरणेंहि शक्य नाहीं. ता. १-१-०७ च्या अंकांत कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेवर विरोधी पक्षाकडून येणारे आक्षेप कसे आहेत हें सांगतांना केसरी लिहितो, ' स्वराज्य, ' स्वदेशी व बहिष्कार या त्रयीमुळें अधिकाऱ्यांची व लोकांची एकी न होण्याचा मार्ग ' कॉंग्रेसनें स्वीकारला आहे, तेव्हां या राजद्रोही राष्ट्रीय सभेचें बोलणें हाणून पाड- ' ण्यास सरकारनें मागेंपुढें पाहूं नये असा आशयाचा कलकत्त्याच्या ' इंग्लिशमन् 'चा ' अभिप्राय आहे. मुंबईचा टाइम्स दादाभाईंच्या भाषणाला नाकें मुरडत असून

' बहिष्कार व स्वदेशीचे ठराव राष्ट्रीय सभेंत पास झाल्याबद्दल टाइम्सच्या जिवाची
' तडफड चालली आहे. रा. रा. टिळक यांनीं गेले शनिवारीं व रविवारीं कल-
' कत्त्यास सायंकाळच्या सभांत हजारों लोकांच्या पुढें यंदांच्या राष्ट्रीय सभेनें स्वराज्य,
' स्वदेशी व बहिष्कार या त्रयीची स्थापना करून स्वराज्य संपादन करणें हा
' आमचा अंतिम हेतु आहे असा सिद्धांत ठरविला असून हें लोकांच्या हातीं
' राष्ट्रीय सभेनें शस्त्र दिलें आहे. स्वराज्याच्या मागणीच्या जोराच्या प्रमाणानें या
' शस्त्राचा उपयोग करावयाचा असल्यामुळें स्वदेशी चळवळ ही या शस्त्राची पहिली
' फेंक आहे. रा. टिळक यांनीं कलकत्त्यास दर्शविलेल्या या आपल्या मता-
' प्रमाणेंच सर्व विचारी लोकांचें मत राष्ट्रीय सभेची वरील हकीकत वाचल्यानंतर
' झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी आम्हांस आशा आहे. ' स्वराज्याचा भरमसाट
अर्थ केसरीच्या माथीं मारून त्याला चिरडून टाकण्याचा प्रयत्न करणारांसाठीं
' स्वतंत्र ( Self-governing ) वसाहतींना जो स्वराज्याचा अधिकार आहे,
' तेवढाच आम्हीं दादाभाई यांनीं वापरलेल्या स्वराज्य शब्दाचा अर्थ केला तरी बस्स
' आहे, ' ( २२-१-०७ ), असें स्पष्ट म्हणून केसरीनें त्यांना गप्प बसविलें.

स्वराज्य हें ध्येय व स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण हीं त्याचीं साधनें असा निर्णय कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेनें दिला. पण बहिष्कार हा बंगालपुरताच होय असा नेमस्त पक्ष त्यांतून अर्थ काढूं लागला असतां ' बहिष्काराचा ठराव बंगाली लोकां-
' पुरता मानणें म्हणजे आजपर्यंत जोपासना करून काढविलेली राष्ट्रीयत्वाची कल्पना
' व्यर्थ दडवणें होय, ' असें बजावून केसरीनें बहिष्काराचा ठराव अंमलांत आण-ण्याची सर्वांना विनंति केली. ( २-४-०७ ). हें पाहून आपल्या पायाखालची जमीन जात चालली असें जुन्या नेमस्त पक्षाला वाटून त्यानें उलट क्रिया सुरू केली व तिची छाया सुरतेच्या व मध्यप्रांतांतील रायपूरच्या प्रांतिक परिषदांतून पडलेली पाहून केसरीनें खेद प्रकट केला. या दोन्ही ठिकाणीं खऱ्या लोकमताचें प्रदर्शन न होईल असाच मिरासदार जुन्या पक्षानें शिकस्तीचा प्रयत्न केला होता. पण एकं-दरींत देशांतील लोकमत कलकत्त्याच्या ठरावांनीं भारून गेलें होतें. ही वस्तुस्थिति ' तरीहि पण मी मवाळच ' या २०-८-०७ च्या लेखांत स्पष्ट करून केसरी लिहितो, ' मवाळांचें पूर्वीचें साध्य गेलें आणि साधनहि ठार झालें. अशा वेळीं
' तरीहि पण मी मवाळच म्हणून जर कोणास मागें रहावयाचें असेल तर त्यानें
' खुशाल रहावें. परंतु राष्ट्र किंवा राष्ट्रीय सभा त्यांच्या करितां थांबूं शकत नाहीं व
' थांबणार नाहीं, हें त्यानें पक्कें लक्षांत ठेवावें. '

**१३. सुरतेची राष्ट्रीय सभा :—** १९०७ सालची राष्ट्रीय सभा नागपूर येथें भरावी असें कलकत्त्यास ठरलें होतें. परंतु नव्या राष्ट्रीय पक्षाचा जोर जुन्या पक्षापेक्षां अधिक असल्यामुळें कलकत्त्याच्या पुढेंच एखादें पाऊल टाकण्याचा प्रयत्न होईल, अशा भीतीनें नेमस्त पक्षानें राष्ट्रीय सभेचीं सूत्रें आपल्याच हातीं आहेत

अशा विश्वासानें राष्ट्रीय सभेची बैठक नागपुराहून सुरतेस नेण्याचें ठरविलें. नेमस्तांचें प्रतिगामी धोरण पाहून नव्या पक्षाला चीड आली व नेमस्तांची काँग्रेस सोडून आपण स्वतंत्र चळवळ करावी असेंहि कित्येकांना रागाच्या भरांत वाटूं लागलें. विरोधी पक्ष तर ' तुम्ही आपली निराळी काँग्रेस कां काढाना ? ' असें वैतागानें विचारूं लागला. त्यासंबंधानें २७-८०७ च्या अंकांत केसरीनें उत्तर दिलें तें असें:—' इंडियन नॅशनल काँग्रेस अथवा हिंदी राष्ट्रीय सभा ही संस्था हिंदु-
' स्थानांतील सर्व जातींच्या व पंथांच्या लोकांची असून विलायतेंतील लोकनियुक्त
' संस्थांच्या नमुन्यावर तिची रचना झालेली आहे. म्हणून एखाद्या पक्षाला
' काँग्रेसची हल्लींची दिशा मान्य नसल्यास त्यांनें दुसरी ' काँग्रेस काढावी असें
' म्हणणें अगदींच पोरकटपणाचें होय. ' त्याप्रमाणें कांहीं झालें तरी काँग्रेसला चिकटून रहावयाचें व नागपुरास नाहीं तर सुरतेस किंवा कोठेंहि ती भरविण्यांत आली तरी तिला हजर राहून आपलें म्हणणें मांडावयाचें असा राष्ट्रीय पक्षानें निर्धार केला. पण राष्ट्रीय सभेचें स्थान बदलणें ही गोष्ट एकंदरींत वाईटच झाली. केरहार्डीनीं सुद्धां ' हिंदूच्या बातमीदाराशीं बोलतांना, ' यंदांची राष्ट्रीय सभा
' नागपुरासच झाली पाहिजे, तेथून ती दुसरीकडे हालविल्यास त्याचा वाईट परिणाम
' होईल, ' असे उद्गार काढिले. ' ( १२-११-०७ ). या वर्षी राष्ट्रीय पक्षाचा क्षोभ वाढण्यास आणखीहि कारणें झालीं. पंजाबचे पुढारी लाला लजपतराय यांना सरकारनें हद्दपार करून आणखीहि कित्येकांवर तोच प्रसंग आणिला. लालाजींची सुटका झाल्यावर त्यांनाच अध्यक्ष निवडावें अशी राष्ट्रीय पक्षाकडून सहजच सूचना आली. पण असें केल्यानें सरकार रागावेल म्हणून नेमस्त पुढाऱ्यांनीं घाईघाईनें डॉ. राश बिहारी घोष यांस स्वागत मंडळाकडून अध्यक्ष निवडविलें. या संबंधानें लिहितांना केसरीनें विचारिलें, ' काँग्रेसचें काम अशा रीतीनें जर चालावयाचें असेल तर ती खऱ्या लोकमताची निदर्शक कशी होईल ? ' आणि स्पष्ट सुचविलें कीं, ' लाला लजपतराय यांची जर आतां सुटका झाली आहे, तर
' त्यांचा सन्मान करण्याकरितां त्यांसच यंदां अध्यक्षस्थान द्यावें. ' ( १९-११-०७ ).
' मवाळांच्या किंवा सर फेरोजशहांच्या आग्रहामुळें चिडून नव्या पक्षानें कोणतेंहि
' गैरवर्तन करूं नये, ' असा इशाराहि त्याच वेळीं स्वपक्षाला दिला. नेमस्त पक्षाकडून कोणत्याहि तऱ्हेनें राष्ट्रीय पक्षाचें म्हणणें ऐकून घेतलें जाईल अशी अशा न दिसल्यामुळें पुनः नागपुरासच स्वतंत्र काँग्रेस भरविण्याची कल्पना डोकवूं लागली. परंतु अशी फूट होणें शक्य तों टाळावें अशा बुद्धीनें केसरीनें स्वपक्षाला थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. ता. ३-१२-०७ च्या अंकांत स्वपक्षाला उद्देशून केसरी लिहितो:— ' तथापि जरा शांतपणें विचार केला तर असें आढळून येईल कीं,
' यंदा नाहीं तर पुढील सालीं, पुढील सालीं नाहीं तर आणखी एक दोन वर्षांत
' हल्लींच्याच राष्ट्रीय सभेंत नव्या पक्षाचें वर्चस्व होणें पूर्णपणें संभवनीय व शक्य

' आहे. हें जर खरें आहे तर राष्ट्रीय सभा नव्या पक्षानें सोडून देण्यापेक्षां तींतच राहून
' लवकरच तेथें आपलें वर्चस्व स्थापित करणें इष्ट होय, असें आम्हांस वाटतें.
' राष्ट्रीय सभा तुम्हीच भरवावी असा कांहीं मवाळांस कोणीं ताम्रपट दिलेला
' नाहीं. नव्या पक्षास जें काम करावयाचें आहे तें हल्लींच्या कॉंग्रेसमध्यें होत नाहीं
' ही गोष्ट खरी; पण तेवढ्यामुळें हल्लीं आहे ती राष्ट्रीय सभा यंदांच मोडावी असें
' आमच्यानें म्हणवत नाहीं. यंदांच्या सभेपुढें हद्दपारीचा कायदा, मोर्ले साहेबांच्या
' टोणग्याचे आचळ, स्वदेशी व बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, सभाबंदीचा कायदा,
' राष्ट्रीय सभेची रचना वगैरे महत्त्वाचे विषय वादविवादाकरितां येणार आहेत.
' यासंबंधाचा निकाल कसा काय होतो तें पाहून मग नव्या पक्षानें आपलें पुढील
' धोरण ठरवावें हें सध्यांच्या स्थितींत आम्हांस अधिक सयुक्तिक दिसतें. तथापि,
' नव्या पक्षाची एखादी स्वतंत्र परिषद भरविणें इष्ट असल्यास ती यंदां सुरतेसच
' राष्ट्रीय सभेच्या बैठकीचे पूर्वीं एकदोन दिवस भरवावी. सुरतेस मवाळ प्रति-
' निधींचें मताधिक्य होईल हें खरें; पण त्याची पर्वा न करितां नव्या राष्ट्रीय पक्षानें
' आपलें म्हणणें जोरानें व नेटानें जर यंदां सभेपुढें मांडलें, तर त्याचा उपयोग
' झाल्याखेरीज राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. वर दिलेल्या विषयांच्या
' यादीपैकीं पुष्कळ विषयांवर नव्या पक्षाचींच मतें बहुजनसमाजास ग्राह्य झालेलीं
' आहेत आणि त्यांबद्दल सुरतच्या सभेंतहि जे ठराव होणार ते नव्या पक्षास
' अनुकूल असेच झाले पाहिजेत. मग त्यांचा समुदा ना. गोखले करोत वा खुद्द
' मेथाजी करोत. तरी अशा प्रसंगीं नव्या पक्षानें सुरतेस हजर राहून हल्लींच्याच
' राष्ट्रीय सभेंत शक्य तेवढी सुधारणा करण्यास झटावें हें चांगलें. '

शेवटीं नव्याजुन्या पक्षांच्या वादाला सामोपचाराचें स्वरूप न येतां सुरतेची कॉंग्रेस मोडली, तेव्हां झाला हा प्रकार केवळ टिळकांच्या आग्रही वर्तनामुळें झाला असा कांगावा विरोधी पक्षानें केला. पण कॉंग्रेस मोडण्यापूर्वीचें या बाबतींतील केसरीचें म्हणणें लक्षांत घेतल्यास हा कांगावा व्यर्थ होता असें दिसून येतें. सुरतेस, खरा वाद कशांत आहे ? असा प्रश्न करून तो व्यक्तिशः अध्यक्षांच्या नेमणुकींत नाहीं, तर कोणत्याहि एका पक्षाची पुंडाई चालूं द्यावयाची कीं काय यांत आहे, असें केसरीनें स्पष्ट दाखवून दिलें आहे. ' नवीन पक्षांतील लोकांसहि राष्ट्रीय सभा
' पाहिजे आहे, ती मोडण्याचा किंवा सदर सभेंत बेकायदेशीर बेबंदशाही माज-
' विण्याचा त्यांचा हेतु नाहीं, हें आम्ही उघड जाहीर करतों. परंतु राष्ट्रीय पक्षाचा
' जरी असा हेतु असला तरी तो पक्ष मेथावाच्छाआदिकरून राष्ट्रीय सभेच्या
' वतनदारांची पुंडाई चालूं देण्यास तयार नाहीं. अशा तऱ्हेची पुंडाई चाल-
' विण्याचे दिवस आतां राहिले नाहींत आणि उत्तरोत्तर राहणारहि नाहींत. '
( १७-१२-०७ ). ' वादविवादाची गाडी भलत्याच रुळावर नेण्यांत कांहीं अर्थ
' नाहीं. लालाजींस अध्यक्ष नेमिल्यानें सरकार चिडेल हें वाक्य गोखले यांच्या

' तोंडून निघालेलें आहे, खास खास निघालेलें आहे,* आणि राष्ट्रांतील लोकांस
' आतां एवढेंच पहावयाचें आहे कीं, या वाक्यांत ध्वनित केलेल्या धोरणानें
' राष्ट्रीय सभेचें काम चालावयाचें किंवा दुसऱ्या कांहीं धोरणानें चालावयाचें?'
( २४-१२-०७ ). तात्पर्य, ' अध्यक्षासंबंधाचा वाद निघाला याचें मूळ कारण
' व्यक्तींत नाहीं, तत्त्वांत आहे. ' ( २४-१२-०७ ). अध्यक्षांच्या नेमणुकीच्या
प्रश्नाप्रमाणेंच कलकत्त्याचे ठराव तसेच ठेवावे कीं त्यांची खच्ची करून टाकावी,
असा प्रश्नहि या वादांत होता. कलकत्त्याच्या बैठकीला सर्व पक्षांना खाकेंत मारूं
शकणारा वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध असा दादाभाईसारखा अध्यक्ष आल्यामुळें
तात्पुरता वाद बाजूला झाला. पण सभेनें पास केलेल्या ठरावांनीं नेमस्त पक्षाच्या
अध्वर्यूंना अस्वस्थ करून सोडिलें होतें. अर्थात् दादाभाई परत विलायतेस गेल्यावर
ठराव मऊ करण्याच्या संधीची ती मंडळी वाट पहात होती व हा त्यांचा डाव
शक्य तर हाणून पाडून कॉंग्रेसला मागें परतवूं द्यावयाची नाहीं असा राष्ट्रीय पक्षाचा
हेतु होता. ही गोष्ट केसरीनें अनेकवार उघड करून दाखविली. अनेक वर्षांच्या
निराशेनें आलेली उदासीनता जाऊन राष्ट्रीय सभेंत नवचैतन्य खेळूं लागण्याच्या
सुमारास तिच्याच प्रवर्तकांकडून तिला खच्ची करण्याचा प्रयत्न होत असतां,
तो उघड्या डोळ्यांनीं पहात राहणें केसरीला शक्य नव्हतें. निराशा जाऊन आशेचे
किरण फाकूं लागण्याच्या कार्यकारणभावाचें वर्णन करितांना ता. ३१-१२-०७
च्या अंकांत केसरी लिहितो, ' बंगालच्या फाळणीमुळें स्वदेशी व बहिष्कार या चळ-
' वळींस प्रारंभ होण्याच्या पूर्वीं राष्ट्रीय सभेच्या संबंधानें लोकांत उदासीनता उत्पन्न
' झाली होती. राष्ट्रीय सभेनें अंगिकारलेले जुने मार्ग निरर्थक आहेत; सभे-
' करितां दरसाल करावी लागणारी मेहनत फुकट जात आहे व खर्च करावे लाग-
' णारे लाखों रुपये अनाठायीं खर्च होत आहेत, अशी विचारी व समंजस लोकां-
' चीहि समजूत होऊं लागली होती. पण स्वदेशी व बहिष्कार या चळवळींस
' सुरुवात झाल्यापासून निराश झालेल्या लोकांच्या मनाला नवीन उमेद आली.
' अंधःकारांतून चांचपडत आपण कोणीकडे तरी चाललों आहोंत, असें मानणाऱ्या
' पुढाऱ्यांच्या दृष्टीला बंगाल्यांनीं सुरू केलेल्या चळवळींमुळें अदृष्टपूर्व उजेड
' दिसला. ही नवीन आशा, हा नवीन मार्ग, ही नवीन चळवळ, राष्ट्रीय सभे-
' संबंधाची उदासीनता नाहींशी करण्यास पुरेशी झाली. वीसबावीस वर्षांच्या
' खटपटीनें, दीर्घोद्योगानें व लाखों रुपयांच्या खर्चानें सर्व हिंदुस्थानास व्यापून

* लालाजींस अध्यक्ष करावें या सूचनेवर गोखले यांचें म्हणणें असें होतें, Can we snap our fingers at Government ? Surely we cannot flout the Government at this stage...The authorities will throttle our movement in no time.' अनंततनयांचें सुरतचें बातमीपत्र, ( केसरी, १०-१२-०७ ).

'राहणारी अशी एकत्र राजकीय संस्था—राष्ट्रीय सभा—उत्पन्न झालेली होती व
'या संस्थेच्या अंतःस्थ व बाह्य व्यवस्थेचा उपयोग—तिच्या निरनिराळ्या शाखांचा
'उपयोग—तिच्याकरितां मेहनत करणाऱ्या निरनिराळ्या पुढाऱ्यांचा व अनुयायांचा
'उपयोग, लांब दूरवर दिसणाऱ्या नवीन उजेडाकडे सर्व राष्ट्रास नेण्याचे कामीं
'कां करण्यांत येऊं नये, अशी चोहोंकडे चर्चा सुरू झाली. कार्यहीन, निस्तेज
'व नाउमेद झालेल्या राष्ट्रीय सभेस जिवंत करण्याची जादू नवीन चळवळींत
'आहे अशी सर्व विचारी लोकांच्या मनाची खात्री झाली.'

**१४. समेटाची मार्गप्रतीक्षा:**—राष्ट्रीय सभा भंगल्यावर झालेल्या उभयपक्षीय वादविवादांत मुख्य मुद्दा बाजूला सारून उपसूचना केव्हां आणतां येते व केव्हां येत नाहीं असल्या मुद्द्यावर मतलबी पक्षाकडून भर देण्यांत आला. त्या संबंधानें 'हा दुराग्रह कोणाचा?' ( ७-१-०८ ), 'अध्यक्षांचे अधिकार,' ( २१ व २८-१-०८ ), इत्यादि लेखांत केसरीनें उत्तर पक्ष करून राष्ट्रीय पक्षाची बाजू सप्रमाण मांडिली. पण एवढेंच कांहीं केसरीपुढें कर्तव्य नव्हतें. राष्ट्रीय सभा भंगल्यामुळें सगळेंच गाडें जाग्यावर बसण्याची भीति केसरीपुढें उभी राहिली व अवांतर गोष्टी दूर सारून समेट होणें शक्य कस होईल ह्याचा विचार तो करूं लागला. ( १८-२-०८ ). 'राष्ट्रीय सभेंत स्वराज्यवादी आणि स्वातंत्र्यवादी
'किंवा विनंतिवादी आणि स्वावलंबनवादी या सर्वांनीं एकमतानेंच काम केलें
'पाहिजे. सुरतेस जो तंटा झाला तो केवळ दोन पक्षांचे अतिम हेतु निरनिराळे
'होतें एवढ्यामुळेंच झाला नाहीं, तर सभेंत अमकें एक विशिष्ट मत ( Creed )
'स्वीकारणारेच पाहिजे, दुसऱ्यांनीं तेथें येण्याचें कारण नाहीं, हा आग्रह त्या तंट्याचें
'खरें कारण होय.' केसरीचें हें म्हणणें कसें यथार्थ होतें व तदनुसार समेट घडणें शक्य आहे ही गोष्ट पुढें पवना येथील बंगाल प्रांतिक परिषद्, धुळ्याची मुंबई प्रांतिक परिषद्, खटाव-तालुका-सभा येथें उभय पक्षांनीं काम करून सिद्ध केली व त्याबद्दल केसरीनें त्यांचें अभिनंदन केलें, ( २५-२-०८, ३-३-०८, २४-३-०८ ), व त्याच धर्तीवर मुख्य सभेंतहि समेट व्हावा असें सुचविलें. हीच गोष्ट आणखी 'खरी अडचण कोठें आहे?' 'अडचणीचा निर्वाह' इत्यादि लेखांत अत्यंत कळकळीनें केसरीनें स्पष्ट केली आहे. पण या वाटाघाटीचा तात्कालिक कांहींच परिणाम न होतां सरकारनें केसरीवर राजद्रोहाचा खटला भरून व टिळकांस सहा वर्षें काळ्या पाण्याची शिक्षा देववून सर्वच वादावर दडपण घातलें व समेटाला १९१६ पर्यंत थांबणें भाग पडलें.

मध्यंतरीं नेमस्त पक्षानें अलाहाबाद येथें आपली कॉन्व्हेन्शन ऊर्फ परिषद भरवून राष्ट्रीय सभेचीं सूत्रें आपल्याच हातीं राहतील अशी तिची घटना ठरविली व तदनुसार १९१५ पर्यंत मिळतील तितक्याच प्रतिनिधींवर संतुष्ट राहून कॉन्व्हेन्शन कॉंग्रेसच्या बैठकी भरविल्या व राष्ट्रीय पक्षाशीं फटकून वागण्याचें धोरण ठेविलें.

१९०९ सालीं मोर्लेमिंटो सुधारणा येऊन नेमस्त खुष झाले व त्यामुळें त्यांच्या त्या धोरणाला अधिक जोरहि आला. पण देशांतील लोकमताचा ओघ नेमस्तांच्या बाजूनें वहात नसून तो संथपणें पण निश्चयानें केसरीच्या धोरणाकडे चालला. नेमस्तांच्या कॉन्व्हेन्शनप्रमाणें राष्ट्रीय पक्षानें कॉंग्रेस कंटिन्युएशन कमिटी नेमिली होती व तिनें तडजोडीचे सर्व प्रयत्न फसल्यावर नागपुरास राष्ट्रीय सभा भरविण्याची सर्व सिद्धता केली असतां, तेथील डि. मॅजिस्ट्रेटनें मनाई हुकूम काढून ती बंद केली. ही सभा भरूं दिली असती तर मद्रास येथें भरणाऱ्या व राष्ट्रीय पक्ष देशाचा शत्रु आहे असें ध्वनित करणाऱ्या कॉन्व्हेन्शन कॉंग्रेसच्या तुलनेनें दोन्ही पक्षांच्या बलाबलांचा निर्णय सहज झाला असता. पण नेमस्तांच्या वजनाला सरकारानें दडपशाहीची जोड देऊन तो तुलनेचा प्रसंग कांहीं काळ पुढें ढकलला. राष्ट्रीय पक्षाच्या अभावीं कॉंग्रेसचें बळ किती याचा प्रतिनिधिसंख्येवरून बोध होण्यासारखा असेल तर एवढें सांगणें पुरे कीं, १९०६ सालीं प्रतिनिधिसंख्या १६६३ होती, ती १९०८, १९०९, १९१०, १९११ या सालीं ६१७, २४३, ६३७, ४४६ अशी अनुक्रमें होती ! नेमस्तांना झालें तरी ही स्थिति इष्ट वाटणें शक्य नव्हतें व मुंबई-खेरीज इतर ठिकाणच्या नेमस्तांना समेटच पाहिजे होता. परंतु मुंबईकरांचें घोडें प्रत्येक वेळीं पेंड खाऊं लागल्यामुळें नेमस्त पक्षांतील पुढाऱ्यांनाहि त्या गोष्टीची हळू हळू चीड येऊं लागली व याचें प्रत्यंतर ‘ लीडर ’सारख्या नेमस्त पत्रांतूनहि दिसूं लागलें. ‘ १९०८ सालीं कॉंग्रेसची घटना म्हणून बरेच नियम कॉन्व्हेन्शन-‘ वाल्यांनीं नमूद केले आणि सबंध देशभर कॉंग्रेस कमिट्यांचें जाळें पसरविण्याची ‘ हांव धरिली. पण १९१२ पर्यंत कांहीं झालें नाहीं, याबद्दल ‘ लीडर ’नें त्यांना ‘ दोष दिला आहे. ’ ( ३१-१२-१२ ).

या ठिकाणीं असा प्रश्न येईल कीं, राष्ट्रीय सभेची घटना कशीहि असली तरी तात्पुरती ती मान्य करून आंत जावयाचें व मग आपलें बहुमत करून ती घटना बदलावयाची हा मार्ग राष्ट्रीय पक्षाला मोकळा होता तर त्यानें तसें न करितां बाहेर राहूनच कां वाट पाहिली ? हा प्रश्न दिसण्यांत सोपा असला, तरी व्यवहारांत तितका सोपा नाहीं. उभय पक्षांचीं मनें एकमेकांविषयीं विनसलीं असतां, अशा सरळ प्रयत्नांनाहि अडथळे उत्पन्न करण्याची बुद्धि होते व ‘ ज्याच्या हातांत ससा तो पारधी ’ या व्यावहारिक न्यायामुळें अधिकारसूत्रें हालविणाऱ्या पक्षाशीं विरोधी पक्षाला झगडणें कठीण जातें. असहकार युग चालू होऊन कांहीं काळानें फेर-नाफेर असे दोन पक्ष कॉंग्रेसमध्यें झाल्यावर पक्षाभिमानामुळें दुसऱ्या पक्षाच्या सरळ मार्गांतहि काटे कसे पसरले जातात, याचा अनुभव नुकताच येऊन गेलेला आहे. अशा कारणानें दांडगाईचा प्रसंग आणण्यापेक्षां जरा थांबणेंच बरें. पूर्वीं केसरीनें भविष्य केल्याप्रमाणें आज नाहीं उद्यां राष्ट्रीय सभेचीं सूत्रें राष्ट्रीय पक्षाच्या हातीं येणें अपरिहार्यच होतें, हें राष्ट्रीय पक्षानें जाणिलें होतें. १९०८ पासून १९१४ पर्यंतच्या कार्यक्रमानें नेमस्तां-

पैकींच पुष्कळांना लाज वाटूं लागली व समेटाला अनुकूल असें वातावरण उत्पन्न होऊं लागलें. इतक्यांत १९१४ सालीं जुलैमध्यें युरोपांतील महायुद्ध सुरू झालें व त्यानें सर्वत्रच नवी परिस्थिति निर्माण केली. लोकमान्य टिळकांच्या शिक्षेची मुदतहि याच सुमारास संपून ते सुटून आले. त्यांच्या आगमनानें राष्ट्रीय पक्षास नवा हुरूप आला. कॉन्व्हेन्शनवाल्यांनीं ठरविलेलें राष्ट्रीय सभेचें क्रीड ( Creed ) ऊर्फ ब्रीद तात्त्विक दृष्ट्या राष्ट्रीय पक्षाला मान्य नसलें तरी व्यवहारतः होतें. पण कॉंग्रेस कमिट्यांनीं निवडलेल्या प्रतिनिधींचाच सभेंत प्रवेश व्हावा, या घटनेंतील नियमाची त्याला विशेष अडचण वाटत होती व तो नियम बदलून पूर्वीप्रमाणें सर्व प्रकारच्या जाहीर सभांना प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार असावा असा फरक घटनेंत व्हावयाला पाहिजे होता. केसरीनें ही गोष्ट अनेकवार स्पष्ट करून तडजोडीचा मार्ग सुचविला होता. तरी १९१४ पर्यंत तसें कांहीं झालें नाहीं. पण त्या सालीं युद्धामुळें उत्पन्न झालेल्या नव्या परिस्थितीमुळें तडजोडीला अनुकूल असें वातावरण उत्पन्न झालें आणि जरी १९१४ त झालेले तडजोडीचे प्रयत्न या वर्षापुरते व्यर्थ गेले, तरी तिचें बीज पेरलें गेलें व मद्रासच्या सभेपूर्वीं स्वागत कमिटीनें असा ठराव केला कीं, ' ज्या सार्वजनिक संस्थांना ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वराज्य हें ध्येय ' मान्य असेल, त्यांच्या विद्यमानें भरलेल्या जाहीर सभांना राष्ट्रीय सभेस प्रतिनिधि ' निवडण्याचा हक्क असावा, अशी कॉंग्रेस घटनेंत दुरुस्ती करण्याची शिफारस सब्जेक्ट्स् कमिटीस करण्यांत यावी. ' ( २९-१२-१४ ). पण या शिफारशीचा उपयोग त्या वर्षी न होतां पुढील वर्षाच्या सभेंत झाला व राष्ट्रीय सभेचा दरवाजा केसरीच्या म्हणण्याप्रमाणें राष्ट्रीय पक्षाला सताड उघडण्यांत आला नाहीं तरी, त्याचा प्रवेश होईल इतकी फट त्याला पाडण्यांत आली व तदनुसार केसरीच्या उपदेशानें त्यानें राष्ट्रीय सभेंत १९१६ सालीं प्रवेश करून समेट घडवून आणिला. इतकेंच नव्हे, तर फार दिवसांचें भिजत पडलेलें हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचें घोंगडें साफ झाडून स्वराज्याच्या मागणीला राष्ट्रीय सभेकडून निश्चित स्वरूप आणविलें. तें कसें तें आतां पाहूं.

१९. **समेटाची सिद्धता :**—मद्रासच्या सभेपूर्वीं समेटासाठीं झालेल्या प्रयत्नांना ज्या कारणांमुळें यश आलें नाहीं, तीं कारणें तशींच आहेत तोंपर्यंत समेटाची आशा कठीण आहे असें त्या सभेनंतर ५-१-१५ च्या अंकांत ' राष्ट्रीय सभा कीं मवाळांचा क्लबोत्सव ? ' या लेखांत केसरीनें दर्शविलें. लाला लजपतरायांना अध्यक्ष करण्याची सूचनाहि ' मुंबईचे मवाळ ज्यांच्या तंत्रानें चालत आहेत ' त्यांच्या उद्योगानें व चुरशीमुळें ' फेंटाळून लावण्यांत आली तरी त्या सभेनें समेटाची कमिटी नेमिली. पण या साऱ्या प्रकारांत कॉंग्रेसचीं सूत्रें एकाच व्यक्तीनें आपल्याला वाटतील तशीं हालवावीं ही गोष्ट मोठी अनिष्ट असल्यामुळें ' चोराच्या उलट्या बोंबा ' या ९-२-१५ च्या लेखांत, केसरीनें समेट मोडण्याच्या कारणांचा

आक्षेप निरसनपूर्वक पुनः खोडून काढला व ' काँग्रेस राष्ट्रीय आहे, काँग्रेसचें धोरण ' काय तें काँग्रेसनें ठरवावयाचें आहे, अमुक एका व्यक्तीनें नाहीं, म्हणून काँग्रेस- ' मधल्या प्रत्येक मनुष्यास आपलीं मतें काँग्रेसमध्यें ठेवण्याचा व त्यांचा बहुमतानें ' निर्णय करून घेण्याचा हक्क आहे, ' असें बजाविलें. पुढें मे महिन्यांत पुणें येथें प्रांतिक सभा भरण्याच्या वेळीं तिचें स्वरूप प्रातिनिधिक नाहीं, असा आक्षेप तिच्यावर आला असतां इलाख्यांतील सर्व ठिकाणच्या प्रतिनिधींचे आंकडे देऊन तिचें प्रातिनिधिक स्वरूप स्पष्ट केलें. ( १८-५-१५ ). देशांतील वातावरण दिवसानुदिवस समेटाला अनुकूल होत असतांहि कांहीं विशिष्ट व्यक्तींमुळें समेट होत नाहीं ही गोष्ट अधिक प्रत्ययास येऊं लागली. ' नागपूरच्या प्रांतिक परिषदेंत ' जसा उभय पक्षांनीं भाग घेऊन कार्यक्रम पार पाडिला, तसा मुंबई-पुणेंकरांनीं ' कां पाडूं नये ? ' ( ७-११-१५ ), असा प्रश्न सहजच उत्पन्न झाला. या नाहीं त्या रूपानें हिंदी लोकांच्या आकांक्षांना विरोध करून त्यांचा तेजोभंग करण्याचें काम हिंदुस्थानांतल्या नोकरशाहीप्रमाणेंच विलायतेंतहि कसें होतें हें संयुक्त प्रांताला कार्यकारी मंत्रिमंडळ देण्याचा ठराव लॉर्डांच्या सभेंत फेंटाळून लावला, या उदाहरणावरून दाखवून केसरीनें लिहिलें, ' या गोष्टीवरून एक गोष्ट जुनीच पण ' नव्या रूपानें लोकांच्या नजरेस आल्याशिवाय राहणार नाहीं. इंग्लंडची हिंदु- ' स्थानावर राज्य करण्याची हल्लींची पद्धति अत्यंत विलक्षण व असमाधान- ' कारक आहे. ती अशी कीं, अमुक एका दिशेनें प्रजेनें खटपट केली असतां ' तिला एखादी इष्ट सुधारणा मिळवितां येईल अशी खात्री बाळगितां येत ' नाहीं.' ( ८-६-१५ ). जुन्या कार्यक्रमाचा उपयोग नाहींसा झाल्यामुळें काँग्रेसनें पूर्ण स्वराज्य मागण्याचाच नव्या जोमाचा कार्यक्रम आंखला पाहिजे असें लोकमत केसरीनेंच सर्वत्र उत्पन्न केलें. या वर्षीं गोखले व फेरोजशहा या उभयतां काँग्रेस- सूत्रधारांस काळानें हिरावून नेलें व त्या उद्वेगानें नेमस्त पक्षहि समेटास अनुकूल होऊन मुंबईच्या १९१५ च्या राष्ट्रीय सभेंत समेटाचें पाऊल थोडें पुढें ढकलण्यांत आलें. या काँग्रेसविषयीं केसरी लिहितो, ' स्वतः अध्यक्ष ( सर सत्येन्द्रप्रसन्न सिंह ) ' जरी निमसरकारी व फाजील सावध होते तरी सभेचें यंदांचें वातावरण ' उत्साहजनक असल्यामुळें नाहीं होय म्हणतां म्हणतां अध्यक्षांच्या इच्छेपलीकडे ' सभेच्या ठरावांची मजल गेली. तरी पण प्रत्यक्ष स्वराज्याच्या ऐवजीं क्रमशः ' स्वराज्यांत पर्यवसान होणाऱ्या सुधारणा मागण्याचाच काय तो ठराव अखेर पास ' झाला व त्या सुधारणांचेंहि स्वरूप निश्चित करण्यासाठीं कमिटी नेमून वेळ मारून ' नेण्यांत आली. ' ( ४-१-१६ ). ' पण या सभेपुढें दुसरा महत्त्वाचा विषय ' म्हणजे समेटासंबंधाचा होता व तो यंदांच्या सभेस अर्धवट रीतीनें कां होईना ' पण सोडवितां आला, ही समाधानाची गोष्ट होय. बॅप्टिस्टा, टिळक व बेळवी ' यांच्या समेट-कमिटीनें आपला अभिप्राय स्पष्ट व निर्धारानें मांडिला. त्यामुळें

' मुंबईकर मवाळच सभेटाच्या विरुद्ध आहेत ही गोष्ट सर्वांच्या स्पष्ट नजरेला आली
' व त्यायोगें मुंबईकरांचा आग्रह बाजूला सारूनहि काँग्रेस घटनेंत दुरुस्ती होऊन
' काँग्रेसनें नोंदलेल्या सभांशिवाय दोन वर्षें अस्तित्वांत असलेल्या सभांना पंधरा-
' पर्यंत प्रतिनिधि निवडून देण्याची सवड मिळाली. केवळ समेट अशक्य करण्याच्या
' बुद्धीनें बोलावलेल्या मुंबईच्या राष्ट्रीय सभेंत मुंबईविरुद्ध विसाव्या कलमाची
' इतकी तरी सुधारणा झाली ही गोष्ट कांहीं थोडी नव्हे. तीवरून पर प्रांतांतील
' लोकांची राष्ट्रीय पक्षाविषयीं खरी भावना काय आहे हें सहज कळून येण्यासारखें
' आहे. ' ( ४-१-१६ ).

राष्ट्रीय सभेच्या घटनेचें विसावें कलम सुधारून राष्ट्रीय सभेंत शिरण्यापुरता मार्ग राष्ट्रीय पक्षास मिळाला. तरी तसें प्रत्यक्ष करावयास राष्ट्रीय पक्षाची संमति घेणें अवश्य होतें. हें कार्य बेळगांव येथें श्री. दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या प्रांतिक सभेंत घडून आलें. ' तें करून तिनें १९१५ च्या राष्ट्रीय सभेनें ' दिलेल्या सवलतींचा फायदा घेऊन राष्ट्रीय सभेंत जावें व पुढील कामास लागावें,' असें ठरविल्याबद्दल केसरीनें ९-५-१६ च्या अंकांत आनंद प्रदर्शित केला. यानंतर केसरीनें या ठरावानुसार ' राष्ट्रीय सभेस राष्ट्रीय पक्षानें जाण्याची आवश्यकता ' वारंवार प्रतिपादून पुणें सार्वजनिक सभेमार्फत जाहीर सभा भरवून प्रतिनिधि निवण्याची व्यवस्था केली. या प्रसंगीं सार्वजनिक सभा व काँग्रेस यांचा संबंध दाखवितांना ' पुण्याची सार्वजनिक सभा ही राष्ट्रीय सभेपूर्वी पंधरा वर्षें स्थापन ' झाली आहे. ती राष्ट्रीय सभेच्या कधींहि विरुद्ध नव्हती, इतकेंच नव्हे, तर पहिली ' राष्ट्रीय सभा पुण्यास भरविण्यासंबंधानें सार्वजनिक सभेनेंच खटपट केली होती, ' असें लो. टिळकांनीं सांगितलें. ( १९-१२-१६, जाहीर सभेचें वृत्त ). १९१६ च्या राष्ट्रीय सभेचें काम अभूतपूर्व झालें. या सभेपूर्वी ध्येयनिश्चिति तर झाली होतीच, पण त्यासाठीं व्यावहारिक साधनसामग्रीहि सिद्ध करण्याचा प्रयत्न झाला होता. येथल्या चळवळीबरोबर विलायतेंतहि जोराची चळवळ करणें अवश्य होतें. त्यासंबंधानें ' ध्येय ठरलें पण पुढें काय ? ' या २६-१२-१६ च्या लेखांत विलायतेंत चळवळ करण्याकडे लक्ष देण्याची इशारत केसरीनें देऊन ' विलायतेस पाठ-
' विण्याच्या डेप्युटेशनचा व तिकडील इतर चळवळींचा खर्च आम्हांस निमूटपणें
' करणें प्राप्त आहे. तो करण्यास राष्ट्रास तयार करून विलायतेंतील चळवळीस तोंड
' लावणें हेंच आतां राष्ट्रीय सभेचें मुख्य कर्तव्य आहे व त्याची योग्य तरतूद
' लखनौ येथील यंदांच्या सभेंत होईल, ' अशी आशा प्रकट केली. हें जें ध्येय ठरलें व त्याचें तात्कालिक व्यावहारिक स्वरूपहि निश्चित झालें, त्याच्यामागें असलेला इतिहास असाः—

१६. ' खटाऱ्याला इंजिन जोडलें ' :—( स्वराज्य-संघाची स्थापना ) प्रांतिक व मध्यवर्ती सरकारचे संबंध, तसेंच कायदे-कौन्सिलांत लोकशाही तत्त्वावर

रचना करून कार्यकारी मंत्र्यांनीं त्या कौन्सिलांना जबाबदार राहणें अशा तऱ्हेची योजना करून स्वराज्याच्या घटनेचा मसुदा तयार करावा आणि तो कोणा सभासदाकडून पार्लमेंटपुढें मांडावा अशी कल्पना १९२५ सालच्या प्रांतिक परिषदेच्या वेळीं निघाली होती. त्यानंतर डिसेंबर महिन्यांत त्या कल्पनेला व्यक्त रूप देण्याच्या हेतूनें राष्ट्रीय पक्षानें कमिटी नेमून तिचा अभिप्राय मागितला. तो अभिप्राय ता. ४-४-१६ च्या केसरींत दिला आहे. त्यांत स्वराज्यसंघाची स्थापना करण्याची शिफारस केली होती. तिला अनुसरून बेळगांव येथें प्रांतिक परिषदेच्या वेळीं स्वराज्य-संघाची रीतसर स्थापना बॅ. बॅप्टिस्टा यांच्या अध्यक्षतेखालीं झाली व पुरेसें लोक-मत जमविल्यावर ' होमरूल बिल ' तयार करून तें पार्लमेंटपुढें मांडावयाची खटपट करण्याचें ठरलें. बेळगांवच्या परिषदेपुढें समेटाबरोबर स्वराज्य-संघ-स्थापनेचा प्रश्नहि असल्यामुळें, ' या दोन्ही विषयांची चर्चा भरपूर होणार असल्यामुळें यंदांची परिषद ' अपूर्व होणार, ' (७-३-१६), असें भविष्य केसरीनें केलें होतें व तें घडूनहि आलें. महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें केसरीच्या द्वारां स्वराज्यसंघस्थापना झाली, तशी खटपट मद्रास-कडेहि झाली. डॉ. ॲनी बेझंटबाईंनीं मुंबई कॉंग्रेसच्या प्रसंगीं कॉंग्रेसच जर स्वराज्या-संबंधानें लोकमत तयार करून होमरूल बिल घडविणार असेल तर ठीकच आहे; पण तिच्या हातून तसें न झाल्यास सप्टेंबर १९१६ पर्यंत वाट पाहून आपण स्वराज्यसंघ म्हणजे होमरूल लीग स्थापून तसा प्रयत्न करूं असें म्हटलें होतें. ( १२-९-१६ ). त्याप्रमाणें वचनाला जागून कॉंग्रेसच्या हातून कांहीं होत नाहीं असें ठरल्यावर बाईंनीं आपल्या स्वराज्यसंघाची स्थापना मद्रास येथें गोखले हॉलमध्यें भरविलेल्या सभेंत केली. त्या वेळीं ' लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनीं पुण्यास काढिलेल्या ' स्वराज्यसंघाचे उद्देश व आपले उद्देश एकच आहेत, म्हणून पुण्याच्या संघाचें व ' आपल्या संघाचें सहकारित्व असावें, असा ठराव करण्यांत आला. ' स्वराज्यसंघ अथवा होमरूल लीग या संस्थेचे हेतु व उद्देश काय याचें स्पष्टीकरण केसरीनें या विषयावर ३०-११-१५ पासून २१-१२-१५ पर्यंतच्या चार अंकांतील अग्रलेखांत सविस्तर केलें आहे. होमरूलची चळवळ सुरू करण्याच्या कामीं बेझंटबाईंनीं ठिकठिकाणीं व पुण्यासहि दोन व्याख्यानें दिलीं व त्यांचा उल्लेख केसरीनें गौरवयुक्त केला. ( ३०-५-१६ ). स्वतः लो. टिळक व त्यांचे इतर सहकारी यांचींहि अनेक ठिकाणीं या विषयावर भाषणें झालीं. त्यांतील बेळगांव व अहमदनगर येथील व्याख्यानांबद्दल टिळकांवर खटला होऊन जामीन मागण्यांत आला. पण हायकोर्टांत अखेरचा निकाल होऊन टिळक पूर्ण निर्दोषी म्हणून सुटले. त्यामुळें होमरूलच्या चळवळीला विशेषच जोर आला. (१४-११-१६). याच वेळीं होमरूलची चळवळ विशेष नेटानें करण्याचें कारण, ' ब्रिटिश राज्याच्या अंतर्घटनेंत ' जे लवकरच फेरफार व्हावयाचे आहेत, अशा वेळीं तुमचें म्हणणें जर नेटानें व निश्चयानें ' ब्रिटिश पार्लमेंटपुढें मांडलें जाईल तरच तुम्हांस यशःप्राप्ति होण्याचा संभव आहे.

' परिस्थिति सुप्रसन्न आहे; काळ अनुकूल आहे, ' असें केसरीनें दिलें असून, 'यासाठीं ' महाराष्ट्रांतील लोकांस आमची अशी आग्रहाची विनंति आहे कीं, त्यांनीं बेळगांव ' येथें स्थापलेल्या हिंदी स्वराज्य-संघास शक्य तितकी मदत केल्याशिवाय राहूं नये,' ( २७-६-१६ ), अशी कळकळीची विनंति केली. त्या विनंतीचा परिणाम होऊन स्वराज्य-संघाच्या शाखा अनेक ठिकाणीं स्थापन झाल्या व हजारों सभासद होऊन द्रव्यनिधीहि जमला. बॅ. बॅप्टिस्टा यांनीं एक होमरूल बिलाचा मसुदा तयार केला व त्याचीहि चर्चा केसरीनें करून त्यांत दुरुस्त्या सुचविल्या. (१७-१०-१६, २४-१०-१६ ). अशा रीतीनं वस्तुतः कॉंग्रेसनें जें काम स्वतः करावयास पाहिजे होतें तें न केल्यामुळें स्वराज्य-संघाला पुढें यावें लागलें. स्वराज्य-संघ ही संस्था अर्थात् कॉंग्रेसची विरोधी नसून तिचें कार्य जोरानें पुढें ढकलणारीच होती, ही गोष्ट केसरीनें स्पष्ट करून सांगितली. ' राष्ट्रीय सभा एक प्रचंड खटारा आहे ' व आजपर्यंत तो हळू हळू चालत आला आहे. त्याला वहाण्याला नेहमींचेंच साधें ' साधन अद्यापिहि कायम आहे हें खरें. पण कालांतरानें जर एखाद्या गाड्याला ' ओढून नेण्याला रेड्यांबैलांऐवजीं एखाद्या मोटारीसारखें लहानसें शक्तियंत्र ' जोडण्यांत आलें, तर तें जोडण्यास हरकत कां असावी? आज मद्रासेस निघालेली ' लीग राष्ट्रीय सभेस जोडून घेण्यांत आली, म्हणजे उद्यां इतर लीगहि जोडून ' घेण्यांत येतील. या लीगकडून राष्ट्रीय सभेस प्रतिनिधि जातील व राष्ट्रीय ' सभेचे घटक या नात्यानें ते स्वराज्याच्या कल्पनेचा प्रसार करूं लागतील. ' ( १२-९-१६ ).

**१७. स्वराज्याची संयुक्त मागणी** :—अशा रीतीनें राष्ट्रीय सभा, होमरूल लीग इत्यादि संस्थांकडून स्वराज्याच्या निश्चित, व्यावहारिक स्वरूपाची घडण होत असतां, मॉस्लेम लीगहि स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. तिनेंहि स्वराज्यासंबंधानें आपली योजना तयार केली. देशांतील ही खळबळ पाहून हिंदुस्थान सरकारलाहि कांहीं तरी केलें पाहिजें असें वाटलें व त्यानें त्यासंबंधानें भारतमंत्र्यांकडे एक खलिता पाठविण्याचें ठरविलें. ही वार्ता ऐकून ही संधि साधण्याच्या इच्छेनें वरिष्ठ कायदे-कौन्सिलांतील हिंदी सभासदांपैकीं एकोणीसजणांनीं स्वराज्यविषयक असा आपला खलिता तयार करून तो व्हाइसरॉयांमार्फत भारतमंत्र्यांकडे पाठविला. या खलित्याला केसरीनें **जबाबदार मागणी** असें म्हटलें असून ता. २७-१०-१६ च्या अंकांत त्याचा परामर्श घेतला आहे. याप्रमाणें स्वराज्याच्या चळवळीला जोर चोहोंकडून चढला असतां ' आतां होमरूलचा प्रश्न यंदांच्या कॉंग्रेसपुढें कोणत्या स्वरूपांत ' येणार इकडे सर्वांचे डोळे लागणें साहजिक आहे. कॉंग्रेसच्या होमरूलच्या माग-' णीचा पल्ला व्हाइसरॉयांकडे गेलेल्या खलित्यांतलि मागण्यांइतकाच थबकून राहातो ' कीं, त्याच्यापुढें जाऊन आपली नैसर्गिक हद्द गांठतो हें पहाणें आहे,' (२४-११-१६ ), असा प्रश्न केसरीनें टाकिला. पुढें अहमदाबादची प्रांतिक सभा

भरून तींत प्रमुख ठराव कौन्सिलसभासदांच्या तेरा मागण्यांच्या मसुद्याचा स्वीकार करून राष्ट्रीय सभेच्या मार्फत त्यासंबंधाची चळवळ व खटपट करण्याविषयीं झाला. अशी तयारी झाल्यावर 'आतां सगळे नॅशनॅलिस्टच' झाले, असे जे उद्गार प्रांतिक सभेचे अध्यक्ष जिना यांनीं काढिले, ते खरे आहेत असें म्हणून आणि काँग्रेस कमिटी व मुस्लीम लीग यांनींहि आपसांत तडजोड करून त्या मागण्यांच्या आधारावर स्वराज्याची संयुक्त योजना करून सरकारपुढें व लोकांपुढें टाकल्याबद्दल केसरीनें आनंद व्यक्त केला. ( २१-११-१६; २८-११-१६ ). शेवटीं लखनौच्या राष्ट्रीय सभेंत नेमस्त, राष्ट्रीय व मुसलमान या सर्वांची एकवाक्यता होऊन पूर्वी केव्हांहि दिसलें नव्हतें असें एकमत तेथें प्रकट झाल्यामुळें व युरोपांतील युद्धानें लावलेल्या आंचीमुळें सरकारालाहि हालचाल करणें भाग पडलें. परंतु ही हालचाल करण्यापूर्वी बेझंटबाईंना व त्यांच्या सहकाऱ्यांना अटक करून स्वराज्यमागणीला दडपण्याचा आणखी एक प्रयत्न सरकारकडून करण्यांत आला. परंतु 'कीं फोडिला तरु फुटे आणखी भरानें' असा प्रकार होऊन आरामखुर्चीवर हुश्श करीतच राजकारणाचा गाडा हांकला पाहिजे असें वाटणारे गृहस्थहि खडबडून उठले आणि होमरूल-संघाला मिळाले. हा प्रकार 'करायला गेला एक, झालें भलतेंच' या मथळ्याच्या लेखांत, ( २६-६-१७ ), केसरीनें सविस्तर देऊन जोराची चळवळ करण्यास लोकांस प्रोत्साहन दिलें. 'धैर्य धरून नेटानें व एकजुटीनें आम्ही आपला 'उद्योग मात्र केला पाहिजे आणि असा उद्योग झाला म्हणजे आम्हांस हाणून 'पाडण्याकरितां केलेले प्रयत्न आमच्या फायद्याचे कसे होतात,' याचें एक उदाहरण म्हणून बेझंटबाईंच्या अटकेचें प्रकरण केसरीनें लोकांच्या डोळ्यांपुढें मांडिलें. बेझंटबाईंच्या अटकेमुळें उडालेल्या खळबळीचा व इतर जागतिक कारणांचा परिणाम होऊन सरकाराला ता. २०-८-१७ रोजीं जाहीर घोषणा करून हिंदुस्थानला **जबाबदारीचें स्वराज्य** देणें हेंच ब्रिटिश सरकारच्या तेथील कारभाराचें ध्येय असून त्याचा एक मोठा हप्ता लगेच देण्याची व्यवस्था करण्यांत येईल असें सांगावें लागलें व अशा रीतीनें राष्ट्रीय सभेच्या आजवरच्या खटपटीला ऐकमत्यामुळें राजमान्यता मिळाली. पण हीच वेळ आणीबाणीची असल्यामुळें 'निकरानें एकमुखी 'मागणी करा,' अशी टोंचणी सर्व पक्षांच्या मागें केसरीनें लाविली. (९-१०-१७). या जाहीरनाम्यामुळें बेझंटबाईंच्या अटकेचें पुढें कारण राहिलं नाहीं म्हणून सरकारनें त्यांना सोडून दिलें व त्यांचा बहुमान करण्यासाठीं काँग्रेसचें अध्यक्षस्थान त्यांनाच द्यावें अशी कल्पना निघाली. पण १९०७ सालीं किंवा पुनः १९१४ सालीं नेमस्तांच्या घाबरटपणामुळें लालाजींस ज्याप्रमाणें अध्यक्षस्थान लाभलें नाहीं, तसा प्रकार न होतां १९१७ची कलकत्त्याची राष्ट्रीय सभा डॉ. ॲनी बेझंटबाईंच्या अध्यक्षतेखालींच पार पडली व स्वराज्याची मागणी एकमतानें पुढें करण्यांत आली. केसरीनें या वेळीं बेझंटबाईंना मतभेद आड येऊं न देतां बिनमोल साह्य केलें.

१८. मॉडफर्ड सुधारणा :—ता. २० ऑगष्टच्या जाहीर घोषणेप्रमाणें मॉंटेग्यु-चेम्सफर्ड या जोडीनें हिंदुस्थानभर फिरून सुधारणाविषयक जो अभिप्राय प्रकट केला, तो राष्ट्रीय सभेच्या एकमुखी मागणीहून अगदींच निराळा झाला व सरकारच्या भेदनीतीला यश येऊन झालेलें एकमत पुनः विघडूं लागलें. 'उजाडलें, पण सूर्य कोठें आहे ?' (९-७-१८), या अर्थपूर्ण मथळ्याखालीं लिहिलेल्या लेखांत मॉंटेग्यु-चेम्सफर्ड योजना कशी पोकळ आहे, हें दाखवून पुढील लेखांत वरिष्ठ सरकारांत तर लोकप्रतिनिधींना मुळींच अधिकार न ठेवल्यामुळें नुसत्या 'जबाबदारी'च्या नांवावर राष्ट्राला कशी चकवूं पहात आहे, याचें स्पष्टीकरण केलें. 'जनाब, देहली तो बहोत दूर है,' हा तद्विषयक लेखहि स्पष्टोक्तीचा असून त्यांत नेमस्ती स्वभावाचें मार्मिक वर्णन केलें आहे. मॉंटेग्यु-चेम्सफर्ड अभिप्रायांत प्रांतांसाठीं जी द्विदल पद्धति पसंत केलेली होती, तिचें मूळ कर्टिससाहेबाच्या कल्पनेंतून घेतलेलें आहे. पण कर्टिसची कल्पना प्रथम धुडकावून लावणाऱ्या नेमस्तांनीं तीच योजना पुढें मॉंटेग्यु-चेम्सफर्ड या गायमुखांतून उतरतांच पवित्र मानिली. हा प्रकार 'समर्थाघरचें श्वान। त्यास सर्वहि देती मान॥' असा झाला आहे असें म्हटलें. अशा रीतीनें सरकारचा कावा साधून राष्ट्रीय सभावाल्यांत एकजूट होत आहे, तोंच फुटीचें बीज पुनः पडलें व मॉंटेग्यु-चेम्सफर्ड योजनेचा विचार करण्यासाठीं भरलेल्या मुंबईच्या जादा राष्ट्रीय सभेवर जरी सगळ्याच नेमस्तांनीं बहिष्कार घातला नाहीं, तरी तेथपासून तसा उपक्रम होऊन १९१९ च्या अमृतसरच्या राष्ट्रीय सभेंत तो कार्यक्रम पुरा झाला. तेथपासून आतांपावेतों नेमस्त पक्ष कॉंग्रेसच्या बाहेर राहून आपल्या परिषदा स्वतंत्रपणें भरवीत आला आहे. पण नेमस्तांनीं शिंगें मोडून वासरांत शिरण्याचा प्रयत्न केला तरी लोकमतावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं व अमृतसरच्या कॉंग्रेसनें मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक आहेत, तरी त्यांचा शक्य तितका उपयोग करून पुढील कार्याला जोरानें लागावें असा विधायक ठराव केला. मॉंटेग्यु सुधारणा कृतज्ञतापूर्वक घ्याव्या असें म्हणणाऱ्या गांधीबेझंटप्रभृतींविरुद्ध केसरीला फारच जोरानें झगडावें लागलें. सुधारणांचा कायदा पार्लमेंटमध्यें पास होऊन बादशहांची त्यावर सही झाल्यावर बादशहांनीं, त्याची अंमलबजावणी सहकारित्वानें व्हावी अशा आशयाचा जाहीरनामा काढिला. त्याला उत्तर म्हणून 'बादशहांस मेहेरबानीनें असें कळवा कीं, 'जाहीरनामा आणि माफी यांबद्दल इंडियन होमरूल लीग आणि हिंदुस्थानचे लोक 'त्यांचे कृतज्ञपणें आणि राजनिष्ठपणें आभारी आहेत; आणि या बाबतींत प्रतियोगी 'सहकारिता लोकांकडून मिळेल, असेंहि बादशहांस आश्वासन द्या,' अशी तार अमृतसरला जातांना टिळकांनीं वाटेंतून व्हाइसरॉयांना केली. (१३-१-२०). [या तारेंतील माफीचा संबंध जालियनवाला बागप्रकरण व रौलेट ॲक्टाविरुद्ध झालेल्या सत्याग्रहाच्या चळवळीच्या प्रकरणांत पंजाबच्या लाला हरकिसनलालप्रभृति

पुढाऱ्यांना दिलेल्या जन्मठेपीच्या शिक्षा माफ केल्याशीं होता, हें थोडक्यांत सांगितलें म्हणजे पुरे. ] राष्ट्रीय सभेंत पुढें जो असहकारितेचा प्रश्न निघाला व त्यांतून जे फेर-नाफेर आणि नंतर स्वराज्य पक्ष व प्रतिसहकार पक्ष इत्यादि पक्षोपपक्ष निघून कांहीं काळ हिंदी राजकारणाचे धिंडवडे निघाले, त्याची परंपरा रौलेट ॲक्ट, गांधींचा सत्याग्रह, जालियनवाला बागेंतील कत्तल व इतर सरकारी अत्याचार, प्रतिसहकाराची टिळकांची तार, अमृतसर कॉंग्रेसचे ठराव, जालियनवालाबागादि पंजाबप्रकरणांसंबंधानें नेमलेल्या सरकारी व कॉंग्रेसच्या कमिट्यांचे अभिप्राय, अपराधी सरकारी अधिकाऱ्यांना शिक्षा करण्याची सरकारची नाखुषी, तन्मुळें गांधींनीं केलेली असहकारितेची सूचना, तीसंबंधानें झालेला मतभेद, असहकारितेला यावें तसें यश न येणें, त्यामुळें उत्पन्न झालेली प्रतिक्रिया अशी लावितां येईल. या सर्व परंपरेंत केसरीनें प्रत्येक वेळीं परिस्थितीचें योग्य पृथक्करण करून या परिस्थितीमुळें उत्पन्न झालेल्या लोकक्षोभाला योग्य असा पाट काढून त्यांतून वाहावयास लावण्याचा प्रयत्न केला. कित्येक वेळीं त्याला यश आलें, कित्येक वेळीं तें आलें नाहीं. पण केसरीनें आपलें ब्रीद न सोडतां आपला अखंड कार्यक्रम चालविला यांत शंका नाहीं. एकदां या टोंकाला तर थोड्या वेळानें त्या टोंकाला असे इतस्ततः हेलकावे खाणाऱ्या राजकारणाला शक्य तों मधल्या बिंदूवर स्थिर करून राष्ट्रीय प्रगतीची घडी सुव्यवस्थित बसावी व संकट आलेंच तर त्याला न डरतां, पण तें निष्कारण अंगावर ओढून घेण्याचा साहसी प्रयत्न न करितां राजकारणाचें तारूं हाकावें असें केसरीचें धोरण या सर्व काळांत एकसूत्रीपणानें दिसून येतें. अमृतसरच्या राष्ट्रीय सभेंतून नेमस्त पक्ष बहुतांशीं फुटून बाहेर राहिला पण पक्षभेद नाहींसा झाला नाहीं. राष्ट्रीय पक्षांतच फाजील कृतज्ञ व लौकिक कृतज्ञ असे दोन भाग झाले व त्यांच्यांत वादाची घणाघाई उडूनच शेवटीं मॉंटेग्युसुधारणा स्वीकारून त्या चालविण्यासंबंधाचा तडजोडीचा ठराव मान्य झाला. त्या संबंधानें केसरी म्हणतो :—'सत्याग्रहाच्या प्रकरणापासून पंजाब-'प्रकरण उद्भवलें. त्या सत्याग्रहाच्या चळवळीचा सन्मान राष्ट्रीय सभेकडून व्हावयास 'पाहिजे होता तो झाला, ही संतोषाची गोष्ट होय. या राष्ट्रीय सभेनें बॅ. दास, 'लो. टिळक, बाबू विपिनचंद्र पाल, म. गांधी, पं. मदनमोहन मालवीय या 'पंचायतनाचा तडजोडीचा ठराव मान्य करून मोहिनीच्या जोरावर तपश्चर्येपासून 'पराङ्मुख व्हावयास सांगणारा बेझंटबाईचा ठराव मान्य केला नाहीं. पांच-'पंचवीस मतें वगळून म्हणजे जवळ जवळ सर्वानुमतेंच पंचायतनाचा ठराव अमृत-'सरच्या राष्ट्रीय सभेनें मंजूर केला, ही गोष्ट हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीच्या 'इतिहासांत ठळक अक्षरांनीं नमूद करण्यासारखी झाली यांत शंका नाहीं.' ( ६-१-२० ). या ठरावाला अनुसरून निराशाजनक असलेल्याहि सुधारणांचा स्वीकार करून 'जबाबदार राज्यपद्धति होईल तितक्या लवकर अंमलांत आणण्या-'करितां लोकांनीं या कायद्यान्वयें शक्य तें काम करावें,' असाहि उपदेश केसरीनें

कला व कलकत्त्यास भरलेल्या प्रागतिकांच्या फेडरेशनशीं अमृतसर कॉंग्रेसची तुलना करून, ' इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका किंवा जपान या पराराष्ट्रांनीं हिंदुस्थानचें लोक-' मत कोठें आहे हें समजून घेण्यासाठीं जर कोणत्या संस्थेकडे पहावयाचें असेल तर ' तें राष्ट्रीय सभेकडेच पाहिलें पाहिजे, ' असें दाखवून दिलें.

**१९. निवडणुकीची जंगी तयारी :**—अमृतसरच्या ठरावाची अंमलबजावणी करावयाची म्हणजे कॉंग्रेसच्या बाजूचे उमेदवार निवडणुकीला उभे करून कायदेकौन्सिलांत त्यांचें बहुमत होईल, अशी खटपट करणें अवश्य होतें; तेव्हां तो कार्यक्रम १९२० सालींच सुरु करणें अवश्य झालें. केसरीनें तो कार्यक्रम हातीं घेतला व प्रत्येक जिल्ह्यांत राष्ट्रीय पक्षाचे जोरदार उमेदवार उभे करण्याचें ठरविलें आणि मुंबई प्रांतिक सभा सोलापूर येथें भरली असतां नेमस्तांच्या भयंकर खटाटोपाला न जुमानतां राष्ट्रीय पक्षाच्या कॉंग्रेसवाल्या उमेदवारांस मतदारांनीं मतें द्यावीं अशा आशयाचा ठराव पास करून घेतला. या प्रांतिक सभेचें वर्णन करितांना ' सोलापुरांत कॉंग्रेस, ' ( ६-४-२० ), अशी अगदीं अन्वर्थक शब्दयोजना केसरीनें केली व ' नवी विटी नवें राज्य, ' या २०-४-२०च्या लेखांत नव्या सुधारणांच्या कायद्यान्वयें कौन्सिलें काबीज केल्यास राष्ट्रीय पक्षाला काय काय करितां येण्यासारखें आहे याचें दिग्दर्शन केलें व त्याची तपशीलवार स्वतंत्र योजनाहि ' कॉंग्रेसमधील लोकशाही पक्षाचें धोरण, ' या नांवानें दुसऱ्या पुढाऱ्यांच्या संमतीनें तयार करून प्रसिद्ध केली. परंतु योगायोग निराळा होता. पंजाबांतील सरकारी अत्याचाराची चौकशी करण्यासाठीं नेमलेल्या सरकारी कमिटीचा अभिप्राय लोकांचें समाधान होईल असा आला नाहीं व सरकारनेंहि डायरप्रभृति अपराध्यांना पुरेसें शासन करण्याचें नाकारिलें. त्यामुळें चिडून जाऊन म. गांधींच्या पक्षानें कौन्सिलांवर बहिष्कार घालून सरकारशीं असहकारिता करण्याचें ठरविलें. बहिष्काराची ही पद्धति आपल्याच पायावर धोंडा पाडून घेण्यासारखी होईल असें या प्रसंगीं बजावून केसरीनें सरकारशीं असहकारिता करावयाची म्हणजे खरोखर काय करावयाचें याचें उत्तम विवेचन करून भलत्याच मार्गापासून लोकांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. 'साहचर्य म्हणजे सहकारिता नव्हे, ' ( १४-७-२० ), ' असहकारितेचा व्यापक अर्थ, ' ( २७-७-२० ), या लेखांतील विवेचन विचारवंतांना पटण्यासारखें आहे. पण असा वर्तमानपत्री वाद करण्यापेक्षां जादा कॉंग्रेस भरवून तींत या प्रश्नाचा, म्हणजे विशेषेंकरून कौन्सिलबहिष्काराचा निर्णय करून घ्यावा असें ठरलें. ( ३०-५-२० ). ही जादा बैठक कलकत्ता येथें लाला लजपतराय यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. पण यापूर्वीं एकच महिना लो. टिळक दिवंगत झाल्यामुळें राष्ट्रीय पक्षांतील बऱ्याच जणांची त्या आवेगांत दिशाभूल होऊन, केसरीच्या गर्जनेला बाजूला सारून असहकारितेचा लांबलचक ठराव पास करण्यांत आला व त्यांत कौन्सिलांवर बहिष्कार घालण्याचें कलमहि घुसडण्यांत

आलें. वस्तुतः कौन्सिलांसंबंधाचें धोरण अमृतसरच्या सभेंत निश्चित झालें होतें व त्यापूर्वी जालियनवाला बागप्रकरणांतील चूक सरकारला पटून लष्करी कायद्यानें शिक्षा दिलेल्या पुढाऱ्यांना सोडूनहि देण्यांत आलें होतें. तेव्हां आतां त्या रागावर कौन्सिलबहिष्काराचा अवलंब करण्यांत कांहीं विशेष होतें असें नाहीं. शिवाय १९२० च्या जूनमध्यें ऑ. इं. कॉं. कमिटीनें इंग्लंडांत ना. पटेल यांना तार करून कळविलें होतें कीं, ' रिफार्म ॲक्टासंबंधानें आपलें धोरण अमृतसरच्या ' ठरावांत कॉंग्रेसनें स्पष्ट केलें असल्यानें त्याचा पुनः विचार करण्याचें कारण नाहीं. ' ( ८-६-२०; १५-६-२० ). परंतु हें भान न राहून कलकत्त्यास कौन्सिल-बहिष्काराचा समावेश असहकारितेंत करण्यांत आला व त्यावर पुनः नागपूरच्या बैठकींत शिक्कामोर्तबहि झालें. असा ठराव राष्ट्रीय सभेनें केल्यामुळें कॉंग्रेस लोकशाही पक्षाचा सर्व खटाटोप व्यर्थ गेला. ' कौन्सिलांत शिरल्यावर मग असह-' कारितेचें काय करावयाचें तें वाटेल तर पाहतां येईल. पण आज निवडणुकीच्या ' उद्योगाला ढिलाई करणें हें आत्मघातकीपणाचेंच होईल, ' ( २९-६-२० ), असें केसरीनें बजाविलें होतें. पण सर्व पालथ्या घागरीवर पाण्यासारखें झालें. सरकारनें प्रतिज्ञाभंग केल्यामुळें कौन्सिलांवर बहिष्कार घालणेंच योग्य होय, या कोटिक्रमावर ' राष्ट्रीय सभेनें आजवर सहकारिताच केली होती काय ? ' असा प्रश्न करून ' दिलेलीं वचनें मोडण्याचा इतिहास म्हणजेच ब्रिटिश राज्याचा इतिहास ' हा दोषारोप जींत सरकारावर उघडपणें करण्यांत आला नाहीं, अशी राष्ट्रीय ' सभेची एक तरी बैठक कोणास दाखवून देतां येईल काय ? प्रतिज्ञाभंगाची ' संवय सरकारला यंदां लागली असें म्हणणें म्हणजे त्याचा फाजील गौरव करणें होय, ' ( २७-७-२० ), असेंहि केसरीनें स्पष्ट म्हटलें. पण केसरीच्या या सूचनांचा अव्हेर होऊन दुसऱ्या रीतीनें जोमदार दिसणारा असा कौन्सिलबहिष्काराचा ठराव कॉंग्रेसनें मान्य केल्यावर, ' या बैठकीला अपूर्व म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं... १९०६ ' सालीं राष्ट्रीय पक्षास वाचा फुटली होती, तथापि नवीन वाचा फुटलेल्या मुला-' प्रमाणें त्याचे बोलहि अस्पष्ट व बोबडे होते. पण यंदां कलकत्त्यास राष्ट्रीय सभेंत ' झालेलीं भाषणें ज्यांनीं ऐकिलीं त्यांना राष्ट्रीय पक्ष आतां खरोखर वयांत आला ' हा सिद्धांत पटला असेल, ' असेंच गौरवपर उद्गार काढून ठरावास आपला विरोध असतांहि कॉंग्रेससाठीं ' राष्ट्रीय सभेचा या बाबतींतला ठराव मान्य करणें हाच ' सरळ मार्ग होय, ' ( १४-९-२० ), असेंच केसरीनें जाहीर केलें व तदनुसार निवडणुकीसाठीं उभे राहिलेल्या राष्ट्रीय पक्षाच्या उमेदवारांनीं राजीनामे देऊन निवडणुकींतून अंग काढून घेतलें. ( २१-९-२० ).

२०. असहकारिता :—निवडणुकींत राष्ट्रीय पक्षानें कॉंग्रेसच्या ठरावाला अनुसरून भाग घेतला नाहीं, तरी निवडणुकी व्हावयाच्या राहिल्या नाहींत. पण विद्वान् व सरकारशीं दोन हात करण्यास समर्थ असे बरेच लोक साहजिकपणेंच

बाहेर राहून होयबांनींच बहुतेक कौन्सिलें भरून गेलीं व असहकारितेच्या कार्यक्रमांत सरकारकडून झालेल्या दडपशाहीला त्यांच्या कडून 'फूल नाहीं फुलाची पाकळी' या न्यायानें मदतच झाली! राष्ट्रीय सभेच्या ठरावामुळें राष्ट्रीय पक्ष देशांतील लोकांत फिरून चळवळ करण्यास मोकळा राहील व नेमस्त मंडळी आपलें पुस्तकी ज्ञान व वावदूकता घेऊन कौन्सिलांत एकमतानें कांहीं घटनात्मक कार्य करील अशी असहकारितेच्या द्रष्ट्यांची कल्पना होती; पण ती सफल झाली नाहीं. नेमस्तांच्या हातून कोणताहि नेटाचा कार्यक्रम कौन्सिलांत स्वीकारला गेला नाहीं. असहकारितेच्या कार्यक्रमाला पुष्कळ तोंड लागलें, पण त्याला जितका प्रतिवाद मिळावयास पाहिजे होता तितका मिळाला नाहीं, त्यामुळें तो कार्यक्रम तसाच चालवावा कीं त्यांत अवश्य तो फेरफार करावा असे प्रश्न पुढारी एकमेकांस विचारूं लागले.

कलकत्त्याच्या जादा सभेंत पास झालेला असहकारितेचा ठराव १९२० सालच्या वार्षिक बैठकींत नागपूर येथें पुनः झाला, हें पूर्वी सांगितलेंच आहे. पण या बैठकींत दुसरीहि महत्त्वाची गोष्ट घडून आली, ती म्हणजे राष्ट्रीय सभेची घटना होय. १९०७ च्या मोडलेल्या बैठकीनंतर नेमस्तांनीं एक घटना तयार केली होती. पण काँग्रेसचा त्यांचा कार्यक्रमच अगदीं संकुचित असल्यामुळें ती घटनाहि संकुचित स्वरूपाची होती. पण असहकारितेचा धडाडीचा कार्यक्रम देशापुढें आल्यामुळें काँग्रेसच्या घटक संस्थांचें जाळें सर्व देशभर पसरेल असें करणें अवश्य होतें व तशा प्रकारची घटना करावी अशी सूचना केसरीनें करून तसा एक मसुदाहि करून १९-१०-२०च्या अंकांत प्रसिद्ध केला. नागपूर काँग्रेसनें जी घटना केली ती या मसुद्याला अगदीं धरून आहे. या काँग्रेसच्या स्वरूपासंबंधानें केसरी लिहितो:— 'नागपूरच्या लोकोत्तर व यशस्वी राष्ट्रीय सभेचें अगदीं थोडक्यांत वर्णन करावयाचें 'तर तें ऐक्य व प्रगति यांचा विजय अशा शब्दांनीं करितां येईल...ती आज- 'पर्यंतच्या सर्व सभांहून अधिक दणदणीत झाली व तिनें राष्ट्रीय ऐक्य व प्रगति 'या दोहोंचाहि एक नवाच भरभक्कम पाया घातला.' (४-१-२१). घटनेसंबंधानें केसरी म्हणतो:—'नवीन घटना कोणत्या तत्त्वांवर व्हावी याचें दिग्दर्शन आम्हीं '१९ ऑक्टोबर, १९२०, च्या अंकांत केलें होतें हें वाचकांस स्मरत असेलच. 'व नागपुरास प्रत्यक्ष मंजूर झालेली घटनाहि जवळ जवळ त्याच धोरणावर आहे, 'ही गोष्ट वाचकांना आढळून येईल.' या घटनेंत पूर्वीपेक्षां 'संस्थानांतील 'प्रजेचे प्रतिनिधि घेण्याची व्यवस्था, भाषावार प्रांतरचना, वर्षभर काम चालविण्या- 'साठीं कमिट्यांची योजना, लोकसंख्येच्या मानानें प्रतिनिधींची संख्या, प्रांतिक 'व जिल्हा परिषदा भरविण्याची योजना,' या विशेष गोष्टींचा समावेश करण्यांत आला. 'हिंदुस्थानची राज्यघटना कशी असावी याचाच ही काँग्रेसघटना 'म्हणजे नमुना होय असें म्हणावयास हरकत नाहीं.' या योजनेप्रमाणें पहिली महाराष्ट्र प्रांतिक परिषद वसई येथें डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत

आली व ' तत्कालीन परिस्थिति व विचारसरणी यांना अनुसरून ती यशस्वी झाली, ' ( १०-५-२१ ), याबद्दल केसरीनें अग्रलेखांत आनंद प्रकट केला.

असहकारितेच्या ठरावाच्या अंमलबजावणींत जशा कित्येक नवीन जोरदार गोष्टी घडल्या, तशा कित्येक उपयुक्त गोष्टी बंद पडल्या व कित्येक अवश्य गोष्टींकडे दुर्लक्षहि झालें. त्यासंबंधानें लिहितांना, ' परराष्ट्रीय राजकारणाचें जुनें स्वरूप नष्ट ' होऊन त्या ठिकाणीं येथें बसून स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आम्ही तुमच्याशीं सलोख्यानें व ' प्रेमानें वागूं , असें अभिवचन देण्यावर काम भागविण्यांत आलें. पण असें ' कांहीं अभिवचन येथील संस्थानिकांस देण्यांत आलें नाहीं, ' ( १५-११-२० ), असें म्हणून केसरीनें खेद दाखविला. कॉंग्रेसचें शिष्टमंडळ व चिरोल खटला यांच्या संबंधांत लो. टिळक, श्री. न. चिं. केळकर इत्यादि मंडळी विलायतेस गेली असतां तेथें ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी, ' इंडिया ' पत्र इत्यादिकांची नवी व्यवस्था लावण्यांत येऊन महत्त्वाचें प्रसिद्धिकार्य होऊं लागलें होतें. त्या सर्वांवर असहकारितेच्या कार्यक्रमानें पाणी पाडिलें व तशा प्रकारचें कार्य करण्याचीं दुसरीं कांहीं साधनेंहि निर्माण केलीं नाहींत. पण हें कार्य अवश्य असल्यामुळें केसरीचा खेद सकारण होता हें सांगावयास नकोच.

२१. **प्रतिक्रिया :**—असहकारितेच्या कार्यक्रमानें स्वराज्य एका वर्षांत मिळेल असें तिच्या पुरस्कर्त्यांनीं जाहीर केलें होतें. परंतु तो कार्यक्रम व्हावा तितका पुरा झाला नाहीं म्हणून म्हणा कीं, त्यांत असलेल्या नैसर्गिक दोषांमुळें म्हणा, स्वराज्य मिळण्याचा संभव उत्पन्न होईना व वर्ष तर संपत आलें त्या वेळीं कांहीं ठिकाणीं त्याची दिशा पालटण्याचा प्रश्न येऊं लागला. या प्रश्नाला महाराष्ट्रांतील कित्येक पत्रांनीं चांगलेंच तोंड लाविलें व त्यामुळें त्याचा विचार करण्यासाठीं अकोला येथें महाराष्ट्र, वऱ्हाड, मध्यप्रांत, कर्नाटक इत्यादि प्रांतांतील कॉंग्रेस कमिट्यांच्या सभासदांची संयुक्त बैठक भरविण्यांत आली. तीपूर्वीं तसा थोडा विचार शहापूर [ ठाणें ] येथील जिल्हा-सभेंत झाला होता. अकोल्याच्या परिषदेंत या विषयावर दोन स्पष्ट मतें, म्हणजे असहकारितेचा कार्यक्रम झाला तितका यशस्वी झाला, म्हणून संपूर्ण यशःप्राप्तीपर्यंत तो तसाच चालवावा असें एक व असहकारितेचा ठरलेला कार्यक्रम पूर्णपणें अंमलांत येणें अशक्य असल्याकारणानें इष्टसिद्धीसाठीं त्यांत फेरफार केला पाहिजे असें दुसरें, अशीं पृथक् दिसून आलीं व त्यांतील वाद बरींच वर्षें राष्ट्रीय सभेंत दुमदुमत राहिला. असहकारितेच्या कार्यक्रमांत फेरफार कोणत्या स्वरूपाचा करावा याचें विवेचन केसरीनें 'असहकारितेचें नवें स्वरूप,' या ६-१२-२१ च्या अंकांतील लेखांत केलें आहे.

याप्रमाणें प्रतिक्रियेला कोठें कोठें आरंभ झाला, पण सरकारच्या उत्कट दडपशाहीला तोंड देण्याचा प्रश्न सर्वांपुढें सारखाच असल्यामुळें तिला जोर न येतां अहमदाबाद येथें राष्ट्रीय सभा भरली. या सभेनें असहकारितेच्या कांहीं अंगांवर

विशेष जोर देऊन सविनय कायदेभंगाची तयारी करण्याचा ठराव केला. या सभेच्या कार्यासंबंधानें केसरी म्हणतो :—‘ एका वर्षांत स्वराज्य मिळण्याची आशा निष्फळ ‘ झाल्यामुळें असहकारितेच्या तत्त्वाच्या विरोधकांचा जोर होऊन असहकारितेच्या ‘ तत्त्वान्वेंच पाऊल मागें पडेल अशी भीति वाटत होती. पण नागपूरच्या राष्ट्रीय ‘ सभेच्या ठरावांचें पुनः प्रस्थापन होऊन ती भीति टळली. ’ ( ३-१-२२ ). या सभेनें असहकारितेचा कार्यक्रम आपआपल्या विशिष्ट परिस्थितीप्रमाणें प्रत्येकाला जोरानें चालवितां यावा म्हणून जो प्रांतिक स्वातंत्र्याचा ठराव केला, त्याची भूमिका पूर्वीं केसरीनें तयार केली होती. ‘ असहकारितेच्या ‘ कार्यक्रमांत प्रांतिक स्वातंत्र्याचें तत्त्व ओळखण्याचें व कांहीं विशिष्ट बाबींवर सर्व ‘ जोराचें केंद्रीकरण करावयाचें ही गोष्ट राष्ट्रीय सभेनें मान्य केली. राज्यकारभारांत ‘ ज्याप्रमाणें प्रांतिक अधिकारविभागणी होऊं शकते, त्याप्रमाणें ती राष्ट्रीय ‘ सभेच्या कारभारांतहि असणें इष्ट आहे, हें तत्त्व स्पष्ट शब्दांनीं आम्ही पूर्वींच ‘ लोकांपुढें मांडलें असल्याचें वाचकांस माहीत आहे व प्रत्येकास योग्य वाटेल त्या ‘ मार्गानें असहकारितेचें कार्य पुढें ढकलावयाचें अशा स्पष्ट शब्दांनीं राष्ट्रीय सभेनें ‘ हें तत्त्व मान्य केलें याबद्दल आम्हांला आनंद वाटतो. ’ ( ३-१-२२ ). या ठरावाप्रमाणें बार्डोलीवर जमीनसारा न देण्याचें व सविनय कायदेभंगाचें धोरण एकवटून इतर सर्वत्र तो प्रयोग शांतपणें पहावयाचें धोरण निश्चित होऊन काँग्रेसचे सर्वाधिकारी म. गांधी व सरकार यांच्यांत अंतिम सूचनाहि देऊन झाल्या. पण शेवटीं कुप्रसिद्ध अशा चौरीचौऱ्याच्या दंग्यामुळें तो ठराव रद्द होऊन राष्ट्रीय सभेच्या चालकांनीं केवळ विधायक कार्यक्रम करीत काल कंठीत बसण्याचें ठरविलें. या पिछेहाटीमुळें देशांत सर्वत्र निराशेचें वातावरण उत्पन्न झालें आणि सरकारनें म. गांधींवर खटला करून त्यांना सहा वर्षांची शिक्षा देवविली. असहकारितेचा कार्यक्रम अक्षरशः पाळण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करूनहि त्याचें पाऊल पुढें पडेना, याचें कारण सामान्यतः तो लोकांच्या आहाराबाहेर होता ही गोष्ट केसरी वारंवार प्रतिपादित असतां, ती बराच काळ पुष्कळांना पटली नाहीं. पण बार्डोलीचा बार व्यर्थ जाऊन म. गांधींनाहि अटक झाल्यामुळें ती आतां पुष्कळांच्या गळीं उतरली व सविनय कायदेभंगाला देश तयार आहे काय ? या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं अखिल भारतीय काँग्रेस कमिटीनें एक पोटकमिटी नेमिली. या कमिटीच्या अभिप्रायांत दोन समसमान पक्ष झाले. तथापि एकंदरींत ‘ राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांत ‘ फरक करणें अवश्य आहे असें म्हणणारा जो पक्ष आज अस्तित्वांत असून वाढता ‘ आहे, त्याचेंच समर्थन एकंदरीनें या रिपोर्टांत केलेलें आहे. ’ ( ७-११-२२ ). हा ‘ रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यापासून देशांतील विचाराला एक नवीन वळण मिळालें... ‘ जनतेला मनांतून जें वाटत होतें तें उघडपणें बोलण्यास जागा झाली. ’ ( १४-११-२२ ). या रिपोर्टाचा निर्णय अर्थातच राष्ट्रीय सभेच्या भर बैठकींत

झाला पाहिजे होता, तसा तो झाला. पण तो फेरफाराला अनुकूल नसल्यामुळें गयेची राष्ट्रीय सभा संपतांच दुसऱ्या दिवशीं अध्यक्ष दे. बं. दास यांनींच स्वतः कौन्सिल-प्रवेशवादी अशा स्वराज्य पक्षाच्या स्थापनेच्या आवश्यकतेची घोषणा केली. पुढें अलाहाबाद येथें पं. मोतिलाल नेहरूंच्या घरीं सर्व देशांतील कौन्सिलप्रवेशवादी पुढाऱ्यांची जाहीर सभा होऊन तींत स्वराज्य पक्षाची रीतसर स्थापना झाली व अशा रीतीनें केसरीच्या मताची छाप सर्व काँग्रेसवर नाहीं तरी तींतील एका अत्यंत महत्त्वाच्या भागावर चांगली पडली. या पक्षाच्या योजनेप्रमाणें महाराष्ट्रीय प्रांतिक परिषदेच्या रत्नागिरीच्या बैठकींत ठराव होऊन कौन्सिलप्रवेशाला तिची संमति मिळाली. ( ८-५-२३ ). अशा रीतीनें वादाला तोंड लागलें असतां दोन्ही पक्षांत तडजोड करावी म्हणून ऑ. इं. काँ. कमिटीच्या बैठकींत प्रयत्न झाले; पण शेवटीं तो प्रश्न दिल्ली येथें जादा राष्ट्रीय सभा भरवून तींत समेटाच्या रूपानें निकालांत काढण्यांत आला. म्हणजे कौन्सिलबहिष्काराला प्रत्यक्ष अनुमति न मिळतां त्यावरील बहिष्कार मात्र काढून घेण्यांत आला. त्याप्रमाणें स्वराज्य पक्षानें १९२३ च्या निवडणुकी लढविण्याची सिद्धता केली. या प्रयत्नांस पुरेसा वेळ मिळाला नाहीं व तीन वर्षांच्या कौन्सिलबहिष्कारामुळें पूर्वी नसलेल्या ज्या भानगडी व जे हितसंबंध उत्पन्न झाले त्यांमुळें स्वराज्य पक्षाला यावें तितकें यश आलें नाहीं! तथापि सरकारला आंच लागेल अशी राष्ट्रीय पक्षाच्या सभासदांची संख्या बहुतेक कौन्सिलांत निर्माण झाली व पुढील दोनअडीच वर्षांच्या अवधींत सरकारला त्यांनीं पुष्कळच भंडावून सोडिलें. राष्ट्रीय सभेनें स्वतः कौन्सिलप्रवेश मान्य करून तो हातीं घेतला असता म्हणजे कौन्सिलांचा कार्यक्रम अत्यंत जोरदार झाला असता. पण फेर व नाफेर या पक्षांच्या चुरशीमुळें समेटाच्या अटी बाजूला राहून नाफेर-वाल्यांनीं स्वराज्य पक्षाला साहाय्य करण्याऐवजीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष अडथळा केला व एवढ्यापुरतें तरी सरकारशीं सहकार्यच केलें. सन १९२३ च्या कोकोनाडाच्या राष्ट्रीय सभेनें कौन्सिलप्रवेशाच्या प्रश्नावर तडजोड केली. पण ती वरातीमागून घोड्याप्रमाणेंच होती. कारण निवडणुकी होऊन गेल्यावर तिचा कांहीं उपयोग नव्हता.

कौन्सिलप्रवेशाच्या वादांत केसरीनें प्रतिपक्षाच्या निंदेचा भडका सहन करून चिकाटीनें जी कामगिरी केली, ती निःसंशय अभिनंदनीय होती. कौन्सिलवाद राजकीय दृष्ट्या हितकर कीं अहितकर हा प्रश्न स्वतंत्र असून त्याचें उद्घाटन करण्याचें येथें कारण नाहीं. पण चळवळ करण्याची जी केसरीची धडाडी पहिल्यापासून दिसून येते तिचें प्रत्यंतर याहि वेळीं आलें आणि राष्ट्रीय सभेंतील एक पक्ष जर खोट्या अभिमानास बळी न पडता तर धडाडीची केसरीची गर्जना व निरुत्तर कोटिक्रम यांच्या जोरावर राष्ट्रीय सभेचें तारूं योग्य मार्गाला लावण्याचें कार्य केसरीला पूर्ण करतां आलें असतें. परंतु राष्ट्रीय सभेच्या गेल्या दहा वर्षांच्या इतिहासांत तत्त्वपूजेपेक्षां व्यक्तिपूजा आणि पक्षाभिमान यांचेंच प्राबल्य अनेक प्रसंगीं झाल्यामुळें

कॉंग्रेसचें राजकारण सरळ न जातां हेलकावे खात जाऊं लागलें. बुद्धिवादापेक्षां भावनेचा जोर अधिक झाला आणि टाकलेलें पाऊल आणखी पुढें तर जात नाहीं आणि मागें घेणें अपमानाचें, असें झाल्यामुळें राजकारणाचा डाव कुजत पडण्याचे अनेक प्रसंग आले. शाब्दिक वादानें सारें लक्ष वस्तुस्थितीवरुन ओढून आपल्याकडे घेतलें आणि अमुक म्हणजे असहकारिता आणि तेवढें नसेल तर सहकारिता अशा क्षुद्र वादांत व्यर्थ कालक्षेप झाला. असहकारिता ही एखाद्या बाह्य गोष्टींत नसून ती एक मनःस्थिति आहे, हें तत्त्व ओळखून राजकारणाचा गाडा हांकावा म्हणून केसरीनें आपली शिकस्त केली. परंतु असहकारितेच्या विशिष्ट कार्यक्रमाला धार्मिक आचाराचें स्वरूप देऊन तो आचार न पाळणारा म्हणजे पाखंडी अशी कित्येकांनीं आपली समजूत करून घेतल्यामुळें कित्येक वेळां केसरीला 'बाटग्या पत्राची टारगट टीका,' असे जरा त्वेषाचेहि लेख लिहावे लागले. या बाबतींत केसरीच्या कामगिरीचें महत्त्व 'कौन्सिलांतील अडवणूक हाहि एक बहिष्काराचा 'प्रकार आहे, हें तत्त्व कोकोनाडा कॉंग्रेसनें मान्य करून पुष्कळच कालापव्यय 'थांबविला,' (८-१-२४), या गोष्टीवरून कळून येईल. 'कौन्सिल-अडवणुकी- 'मुळें जो खटला उडेल त्या योगानें देशांत तीव्र असंतोष पसरून कायदेभंगाची 'आवश्यकता व शक्यता दिसूं लागेल. असंतोषाविना कायदेभंगाची कल्पनाच 'येऊं शकत नाहीं,' (८-१-१४), हें केसरीचें म्हणणें प्रस्तुत कायदेभंगाच्या चळवळीनें प्रत्यंतराला आलें आहे. सरकारनें ब्रिटिश साम्राज्याला सवलतीचे दर ठेवून जें टॅरिफ बिल म्हणजे आयात मालावरील जकातीच्या कायद्याचा मसुदा असेंब्लीपुढें १९२९ सालीं मांडला त्यावर साम्राज्याच्या सवलती काढून टाकण्याच्या प्रश्नावर लोकप्रतिनिधींचें एकमत झालें असतांहि सरकारनें तें न ऐकतां तो मसुदाच परत घ्यावयाचा धाक घातला. त्यामुळें व्यापारी समाजाचा विलायती मालावरील बहिष्काराला चांगलाच पाठिंबा मिळाला यांत शंका नाहीं.

**२२. प्रतिसहकार** :—कौन्सिलप्रवेशाचा प्रश्न कॉंग्रेसच्या गळीं उतरविल्यावर आणखी पुढें जाऊन असहकारितेच्या वृत्तीनेंच अधिकाराच्या जागाहि स्वीकारण्याचें तत्त्व तिच्याकडून मान्य करावयाचें उरलें. कौन्सिलच्या बाहेर राहून स्वस्थ बसल्यानें कांहींच फलप्राप्ति नाहीं, त्यापेक्षां कौन्सिलांत जाऊन जोराचा विरोध केल्यास कांहीं तरी होतें, निदान लोकांमध्यें आधिक असंतोष उत्पन्न होतो हें दाखविल्यावर अधिकाराच्या जागा हक्कानें घेऊन लोकमताप्रमाणें कार्य करणें याचा अधिकच फायदा होईल, ही गोष्ट ओघानेंच आली. प्रतियोगी सहकारिता म्हणून ज्याला लोकमान्यांनीं म्हटलें, त्या कार्यक्रमाचें हें एक अंग होय व योग्य संघटनेच्या साह्यानें या अंगाचा उपयोग केल्यास आपलें पाऊल झपाट्यानें पुढें पडेल असें केसरीचें मूलभूत तत्त्व असल्यामुळें स्वराज्य पक्षाच्या स्थापनेनंतर योग्य काळानें प्रतियोगी सहकारितेच्या स्थापनेकडे त्याचें लक्ष सहजच लागलें व त्यासंबंधानेंहि पूर्वीसारखेच केसरीचे

प्रतिपक्षाशीं खटके उडाल्यावर अकोला येथें १९१६ सालीं प्रतिसहकार पक्षाची रीतसर स्थापना झाली. त्यापूर्वी बेळगांव व कानपूर येथें झालेल्या राष्ट्रीय सभांतून कॉंग्रेसकमिटीचे सभासद होणारास सुताची वर्गणी दिली पाहिजे, असा ठराव होऊन बराच खेळखंडोबा झाला होता व त्यामुळें राष्ट्रीय सभेला गळती लागून अनेक ठिकाणच्या कमिट्या नामशेष झाल्या व कांहीं उगाच जीव धरून राहिल्या. १९२६ च्या गौहत्तीच्या सभेंतहि ही गळती थांबविण्याचा प्रयत्न झाला नाहीं. 'राष्ट्रीय सभेंत 'जी दुफळी किंवा तिफळी झाली आहे ती मोडून ऐक्य प्रस्थापित करण्यासारखी 'कोणतीहि कामगिरी गौहत्तीला घडून आली नाहीं. किंबहुना ही फाटाफूट अधिक 'विकोपास जाईल असेंच तेथील बहुमतवाल्या पक्षाचें धोरण होतें.' (४-१-२७). पण प्रतिसहकार पक्षाचा कार्यक्रम सुरू होऊन १९२६ च्या निवडणुकी त्या तत्त्वावर लढविण्यांत आल्या व त्या यशस्वीहि झाल्या. यावरून कॉंग्रेसला तो पक्ष स्वीकारणें थोड्या काळानें भागच झालें असतें. परंतु सायमन कमिशनची १९२७ सालीं नेमणूक होऊन त्यावर कोणी विश्वासू हिंदी सभासद व नेमिल्यामुळें हिंदी राजकारणाला निराळाच रंग चढला व सुधारणांवरून राष्ट्राची दृष्टि स्वातंत्र्याकडे वळविण्यांत आली.

**२३. हिंदी स्वातंत्र्याचा संग्राम :**—राष्ट्रीय सभेचें ध्येय पूर्ण स्वातंत्र्य हें असावें अशा सूचना तिच्या पुढें १९२१ पासून सारख्या येऊं लागल्या. अहमदाबादच्या बैठकींत त्या अर्थाचा हजरत मोहानींच ठराव नापास झाला. 'राष्ट्रीय 'सभा फिरून यंदांचें क्रीड बदलून स्वातंत्र्य पुकारील व तसें झाल्यास जुन्यानव्या 'पक्षांत कायमचीच फूट पडेल अशी जी भीति अहमदाबाद येथें कित्येकांना 'वाटत होती ती निराधार नव्हती. कारण भर राष्ट्रीय सभेंत मौ. हजरत मोहानी 'यांनीं स्वातंत्र्यस्थापनेचे स्पष्ट शब्द घालून क्रीड बदलावें असा ठराव आणिला 'होता. पण तो नामंजूर झाला ही गोष्ट वेगळी.' ( ३-१-२२ ). त्यानंतर वर्षानुवर्ष ध्येयाचा हा वाद चालू राहिला. कोकोनाडाच्या बैठकींत 'स्वातंत्र्याच्या 'ठरावास वल्लभभाईनीं अव्यवहार्य म्हणून लाथाडलें.' ( ८-१-२४ ). पण ही गांधीपक्षाची मनःस्थिति सायमन कमिशनच्या नेमणुकीनें बदलून गेली. या कमिशनवर सर्व पक्षांनीं बहिष्कार घातला. पण तो तसा एकदम न पुकारतां, आम्हांला अमुक अमुक पाहिजे, असें न झाल्यास तो पुकारणें अवश्य होईल असें सांगून थोडी वाट पाहण्याचा सल्ला केसरीनें प्रथम दिला. परंतु राष्ट्राला तितका दम न निघाल्यामुळें तो बहिष्कार एकजुटीनें म्हणजे पूर्वीच्या कौन्सिलबहिष्काराच्या पद्धतीप्रमाणेंच पुकारण्यांत आला. तेव्हां 'बहिष्कार घालाल तो सक्रिय घाला,' ( १५-११-२७ ), व आपली स्वतःची सर्वपक्षसंमत अशी स्वराज्ययोजना करून 'कमिशनच्या तोडीस तोड द्या,' ( २२-११-२७ ), अशी केसरीनें गर्जना केली. पण कॉंग्रेसमध्यें मतदानाच्या चमत्कारिक अटीमुळें सर्व पक्ष जाणें अशक्य होतें. तरी

पण मद्रासच्या १९२७ सालच्या राष्ट्रीय सभेनें इतर पक्षांशीं सहकार्य करून सर्व-पक्षीय परिषद भरवावी व तिच्या द्वारां स्वराज्ययोजना करावी यासाठीं एक कमिटी नेमिली. प्रागतिकांच्या परिषदेंतहि असाच ठराव झाला, पण या ठरावाबरोबर मद्रासच्या राष्ट्रीय सभेनें संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर केलें. या संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावासंबंधानें लिहितांना केसरीनें सायमन कमिशनला उद्देशून 'अपकृतापि उप-कृतमनेन' म्हणजे 'अपकारासाठीं आलें पण उपकारच करून गेलें,' असें म्हटलें आहे. तसेंच '१९०७-०८ पासून संपूर्ण स्वातंत्र्याचें मत डोकें वर काढीत आहे, पण 'त्याला यंदां कॉंग्रेसमध्यें राजरोस मानाचें स्थान मिळालें,' (३-१-२८), असें म्हणून हा ठराव कॉंग्रेसकडून पास करून घेतल्याबद्दल पं. जवाहरलाल नेहरूंचें अभिनंदनहि केसरीनें केलें. 'कॉंग्रेसच्या राजकारणांत मद्रासच्या कॉंग्रेसनें एका नव्या युगास 'प्रारंभ केला. १९०७ पर्यंत मागण्या मागण्याचें युग होतें. त्यानंतर त्यांत 'स्वावलंबनाचा उदय झाला. १९१६ सालीं लखनौ येथें एकीचा प्रयत्न झाला व 'नवीन चळवळीस जोम चढला. हें युग १९२० पर्यंत कायम होतें. त्यानंतर महात्मा गांधींचें असहकार युग सुरू झालें. गौहत्ती कॉंग्रेसमध्यें या युगाला पूर्ण ओहोटी 'लागली व मद्रास कॉंग्रेसमध्यें या युगाचा शेवट होऊन एक नवें युग सुरू झालें.' (श्री. ज. स. करंदीकर यांचें भाषण, १७-१-२८).

स्वातंत्र्याच्या ध्येयाचा ठराव मद्रासला झाला तरी व्यवहाराला धरून ब्रिटन जर खुषीनें वसाहतीचें पूर्ण स्वराज्य देईल तर त्याचा स्वीकार करण्याची राष्ट्रीय सभेची तयारी होती, तिला अनुसरून कॉंग्रेस कमिटी स्वराज्यघटनेच्या उद्योगाला लागली. या गोष्टींत सहज दिसणारा जो विरोध आहे, त्याचें निराकरण केसरीनें पुढीलप्रमाणें केलें आहे. 'स्वराज्याच्या कायद्याचा मसुदा कायम करण्यासाठीं 'सर्वपक्षीय सभासदांची सभा भरवावी, हा कॉंग्रेसचा ठराव पूर्ण स्वातंत्र्याच्या 'ठरावाला विरोधी आहे, असा त्यावर कित्येकांचा आक्षेप आहे. पण स्वातंत्र्याच्या 'ठरावाचा हा विपरीत अर्थ कॉंग्रेसला मान्य झाला नाहीं. स्वातंत्र्याचा ठराव 'करूनहि कॉंग्रेसनें स्वराज्ययोजना करण्याची व्यवस्था केली. सरकारच्या 'योजना हाणून पाडण्याकरितां कौन्सिलांत जाण्यास सांगितलें व सर-'कारच्या निषेधपरहि ठराव मंजूर केले. सारांश, कॉंग्रेसच्या मतें आजच्या व्यव-'हाराच्या मर्यादा ओळखून त्याप्रमाणें वागत असतांहि परमोच्च ध्येयाची जाणीव 'ठेवतां येते.' (१७-१-२८). वर सांगितलेल्या ठरावांनुसार सर्वपक्षीय परिषद भरून तिनें आपली योजना तयार केली. ती 'नेहरू रिपोर्ट' या नांवानें प्रसिद्ध आहे. वसाहतींचा दर्जा किंवा पूर्ण स्वातंत्र्य यांतील कोणत्याहि पायावर स्वराज्याची इमारत उभारावी अशी ती योजना असून तिचा लोकांत प्रचार करण्यासाठीं केसरीनें त्याचें मराठी विस्तृत रूपांतर 'असलें स्वराज्य आम्हांला हवें' या नांवानें छापून काढून त्याच्या हजारों प्रति 'महाराष्ट्र प्रांतिक कमिटी' मार्फत वाटविल्या.

२४. कॉंग्रेस व नेहरू रिपोर्ट :—सन १९२८ च्या कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत नेहरू रिपोर्टाला मान्यता मिळवून देण्याचें काम होतें. स्वत: पंडित मोतीलालच सभेचे अध्यक्ष, त्यामुळें त्यांच्या नांवावर रचलेला प्रबंध फेटाळणें इष्ट नसल्यामुळें त्याला सभेनें अट घालून संमति दिली. सन १९२९ च्या डिसेंबरपूर्वी सरकारानें हिंदुस्थानचा वसाहतीचा दर्जा मान्य केल्यास स्वराज्ययोजना नेहरू रिपोर्टाची घ्यावी, पण त्या मुदतीपूर्वी सरकारानें न केल्यास राष्ट्रीय सभेनें पूर्ण स्वातंत्र्य पुकारावें, अशा आशयाचा कलकत्त्यास ठराव झाला व सरकारनें १९२९ च्या डिसेंबर पूर्वी तसें कांहीं न केल्यामुळें १९२९ च्या लाहोरच्या राष्ट्रीय सभेनें कलकत्त्यास केलेल्या प्रतिज्ञेला अनुसरून पूर्ण स्वातंत्र्य पुकारलें असा सामान्यतः समज झालेला आहे. पण खरा प्रकार सांगतांना ता.४-१-३० च्या अग्रलेखांत केसरी लिहितो :—'कल- 'कत्त्याच्या राष्ट्रीय सभेचा साद्यंत रिपोर्ट कॉंग्रेसमार्फत नुकताच प्रसिद्ध झाला आहे. 'त्या रिपोर्टावरून पाहतां गतवर्षी म. गांधी यांनीं जो ठराव मांडला व जो अखे- 'रीस तेथें बहुमतानें मंजूर झाला, त्या ठरावांत सरकारानें एका वर्षात डोमिनियन 'स्टेटस द्यावें, नाहीं तर आम्ही 'इंडिपेण्डन्स' जाहीर करूं, असे शब्द नाहींत. 'शब्द असे आहेत कीं, 'सरकारनें नेहरू रिपोर्ट एक वर्षाच्या आंत मान्य न 'केला, तत्पूर्वीच अग्राह्य ठरविला, तर आम्ही करबंदीची चळवळ करून अन- 'त्याचारी असहकारिता संघटित स्वरूपांत सुरू करूं.'

२५. उपसंहार :—हा १९२९ सालचा स्वातंत्र्याचा ठराव व तदनुसार १९३० सालीं झालेली चळवळ यांविषयीं केसरीचें व राष्ट्रीय सभेचें ऐकमत्य नाहीं. १९२० पासून आतांपर्यंत तसें उभयतांचें ऐकमत्य कधींच झालेलें नाहीं. तथापि राष्ट्रीय सभा ही राष्ट्राची सभा आहे, हें जाणून केसरीनें मतभेद दाखवीत असतांहि कॉंग्रेसच्या राष्ट्रजागृतिविषयक कार्याला शक्य तितका पाठिंबाच दिला आहे. पण त्या गोष्टींचा सविस्तर इतिहास दिल्यानें आधींच आहाराबाहेर वाढलेला हा लेख आणखी बराच वाढेल आणि त्या गोष्टी सर्वांच्या स्मरणांत ताज्या असल्यामुळें तशा येथें देण्याची आवश्यकताहि नाहीं म्हणून हें प्रकरण येथेंच आटपतें घेतों.

१९२९ सालीं सरकारानें हिंदुस्थानला 'डोमिनियन स्टेटस्' देणें हेंच ब्रिटिश राज्यकारभाराचें धोरण आहे, असें जाहीर करून ताबडतोब त्यांतील केवढा भाग बिनभानगडीनें व सर्वांच्या संमतीनें वेगळा करितां येईल हें ठरविण्यासाठीं 'राउण्ड टेबल कॉन्फरन्स' बोलण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें गेल्या नवंबरच्या १२ तारखेस ती सुरू होऊन जानेवारीअखेर तिचें कामहि संपलें. तिचे निर्णय अंमलांत येण्याची वेळ येईल, तेव्हां पुनः केसरीला आपल्यांतीलच प्रतिपक्षाशीं पुनः जोराचा वाद करण्याची वेळ येईल. तो वादहि केसरी आजपर्यंतच्या धोरणाला अनुसरून करील असा प्रस्तुत लेखकाचा विश्वास आहे.

---

**परिशिष्ट**

## राष्ट्रीय सभेचीं अधिवेशनें

| क्रमांक | इ. स. | स्थल | अध्यक्ष |
|---|---|---|---|
| १ | १८८५ | मुंबई | डब्ल्यू. सी. बानर्जी. |
| २ | १८८६ | कलकत्ता | दादाभाई नौरोजी. |
| ३ | १८८७ | मद्रास | बद्रुद्दिन तय्यबजी. |
| ४ | १८८८ | अलाहाबाद | अ. मि. यूल. |
| ५ | १८८९ | मुंबई | सर वुइल्यम वेडरबर्न. |
| ६ | १८९० | कलकत्ता | फेराजशहा मेथा. |
| ७ | १८९१ | नागपूर | पी. आनंदाचार्लू. |
| ८ | १८९२ | अलाहाबाद | डब्ल्यू. सी. बानर्जी. |
| ९ | १८९३ | लाहोर | दादाभाई नौरोजी. |
| १० | १८९४ | मद्रास | आलफ्रेड वेब. |
| ११ | १८९५ | पुणें | सुरेंद्रनाथ बानर्जी. |
| १२ | १८९६ | कलकत्ता | सयानी. |
| १३ | १८९७ | उमरावती | सर शंकरन् नायर. |
| १४ | १८९८ | मद्रास | आनंदमोहन बोस. |
| १५ | १८९९ | लखनौ | रमेशचंद्र दत्त. |
| १६ | १९०० | लाहोर | सर नारायण चंदावरकर. |
| १७ | १९०१ | कलकत्ता | डी. ई. वाच्छा. |
| १८ | १९०२ | अहमदाबाद | सुरेंद्रनाथ बानर्जी. |
| १९ | १९०३ | मद्रास | लालमोहन घोस. |
| २० | १९०४ | मुंबई | सर हेन्री कॉटन. |
| २१ | १९०५ | काशी | गो. कृ. गोखले. |
| २२ | १९०६ | कलकत्ता | दादाभाई नौरोजी. |
| २३ | १९०७ | सुरत | राश बिहारी घोस. |
| २४ | १९०८ | मद्रास | राश बिहारी घोस. |
| २५ | १९०९ | लाहोर | मदन मोहन मालवीय. |
| २६ | १९१० | अलाहाबाद | सर वुइल्यम वेडरबर्न. |
| २७ | १९११ | कलकत्ता | बिशप नारायन धार. |
| २८ | १९१२ | बांकीपूर | रं. न. मुधोळकर. |
| २९ | १९१३ | कराची | न. सय्यद अहमद. |
| ३० | १९१४ | मद्रास | भूपेंद्रनाथ बसु. |

| क्रमांक | इ. स. | स्थल | अध्यक्ष |
|---|---|---|---|
| ३१ | १९१५ | मुंबई | सर सत्येंद्रप्रसन्न सिंह. |
| ३२ | १९१६ | लखनौ | अंबिकाचरण मुजुमदार. |
| ३३ | १९१७ | कलकत्ता | ॲनी बेझंट. |
| ३४ | १९१८ | दिल्ली | मदन मोहन मालवीय. |
| ३५ | १९१९ | अमृतसर | मोतीलाल नेहरू. |
| ३६ | १९२० | नागपूर | विजयराघवाचार्य. |
| ३७ | १९२१ | अहमदाबाद | हकीम अजमलखान. |
| ३८ | १९२२ | गया | बॅ. सी. आर. दास. |
| ३९ | १९२३ | कोकोनाडा | मौ. महंमद अल्ली. |
| ४० | १९२४ | बेळगांव | महात्मा गांधी. |
| ४१ | १९२५ | कानपूर | सरोजिनी नायडू. |
| ४२ | १९२६ | गौहत्ती | श्रीनिवास अयंगार. |
| ४३ | १९२७ | मद्रास | डॉ. अनसारी. |
| ४४ | १९२८ | कलकत्ता | मोतीलाल नेहरू. |
| ४५ | १९२९ | लाहोर | जवाहरलाल नेहरू. |
| ४६ | १९३१ मार्च | कराची | वल्लभभाई पटेल |

# केसरीची स्वराज्याची चतुःसूत्री

[ पं. श्री. दा. सातवळेकर, संपादक, 'पुरुषार्थ' ]

राजकीय कार्यक्षेत्रामध्यें केसरीनें गेल्या पन्नास वर्षांत जी कामगिरी केलेली आहे, ती हिंदुस्थानच्या सध्यांच्या राजकीय घडामोडींच्या इतिहासांत विशेष रीतीनें प्रशंसा करण्यास योग्य आहे, असें म्हटल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. पहिलीं तीन-चार वर्षे सोडून दिलीं, तर त्यापुढें मी सतत केसरीचा वाचक आहें व तेव्हांपासून केसरीचें धोरण राजकीय कार्यक्षेत्रांत इतर वृत्तपत्रांपेक्षां कांकणभर पुढें राहिलेलें आहे. म्हणजे राजकीय कार्यक्षेत्रांत हिंद राष्ट्राला—निदान महाराष्ट्राला तरी खास—पुढें नेण्याचें काम केसरीनें जसें केलें तसें तें दुसऱ्या कोणत्याहि वृत्तपत्रानें केलेलें नाहीं. कित्येक वर्षे तर केसरीची इतरांशीं अशी झुंज चालत असे कीं, इतरांनीं विरोध करावा व केसरीनें त्या विरोधाची पर्वा न करितां जनतेस झपाट्यानें पुढें न्यावें. केसरीचीं जुनीं फाइलें पाहिलीं, म्हणजे नेतृत्वाला योग्य अशा या केसरीच्या वीर-वृत्तीची अजूनहि मौजच वाटते व केसरीच्या कामगिरीचें कौतुक करावेंसें वाटतें.

जेव्हांपासून मला स्मरण आहे, तेव्हांपासून मला माहीत आहे कीं, महाराष्ट्रीय लोक केसरीला या वीरवृत्तीमुळेंच सन्मान देत आले आहेत. कित्येक वेळां तर अशी

गंमत होई कीं, केसरीनें ज्यांच्यावर खरमरीत टीका करावी, त्यांनीं सुद्धां केसरीच्या लेखनाच्या उग्रतेबद्दल व स्पष्ट टीकेबद्दल प्रशंसाच करावी !! केसरीचा लेख म्हणजे महाराष्ट्राच्या वीरवृत्तीस उचंबळून सोडणारा असावयाचाच व यामुळें याची जशी छाप महाराष्ट्रावर बसली, तशी दुसऱ्या कोणत्याहि वृत्तपत्राची बसूं शकली नाहीं. लेख भारदस्त व अगदीं सडेतोड असे असल्यामुळें ते नेहमींच वाचकांचें चित्त आकर्षून घेत व हेंच मत खरें आहे अशी वाचकांची खात्री पटवीत असत. त्यामुळें केसरीला जें महाराष्ट्रांत प्रमुख स्थान मिळालें तें अजून कायम आहे.

महाराष्ट्रीय लोकांत कमजास्त मानानें उपजतच ' राष्ट्रीय वीरवृत्ति ' असते, यामुळें महाराष्ट्रीयांना जसें राष्ट्रीय वीरवृत्तीचें पत्र आवडतें, तसें तें निर्भेळ नेमस्त विचारांचें आवडत नाहीं. केसरी पत्राच्या लेखणींत प्रारंभापासून ही राष्ट्रीय वीरवृत्ति अगदीं जागृत असल्यामुळें व लोकमान्यांच्या केसरींत तर तिचा अधिकच उत्कर्ष झाल्यामुळें, महाराष्ट्र वाचकांनीं केसरीला आपलें मित्र मानिलें यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

केसरीनें प्रारंभापासून तों लोकमान्यांची लेखणी स्तब्ध होईपर्यंत राजकीय कार्यक्षेत्रांत इतर प्रांतांपेक्षां महाराष्ट्राला चार हात पुढें ठेविलें होतें. त्यामुळें बहुतेक सर्व राष्ट्रीय चळवळींचा उगम केसरीच्या स्फूर्तिदायक लेखांच्या द्वारेंच येथें झालेला आहे, असें सूक्ष्म दृष्टीनें पाहणाराला दिसेल. राजकीय कार्यक्षेत्रांतील अनेक कार्यें कशीं सुरू करावीं व तीं कशीं चालवावीं याची शिकवण सर्वांच्या पूर्वीं केसरीनें जनतेस दिली ही गोष्ट कोणीहि नाकबूल करणार नाहीं. ज्या अनेक विधायक कामगिऱ्या केसरीच्या लिखाणांतून प्रकट झाल्या, त्यांत **' स्वराज्याची चतुःसूत्री '** ही विशेष व्यापक असल्यामुळें प्रामुख्यानें गणण्यास योग्य आहे.

' स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, स्वराज्य ' हीं हिंदी राजकारणाचीं चार सूत्रें केसरीनें अशा वेळीं उद्घोषित केलीं होतीं कीं, ज्या वेळीं 'बहिष्कार' व 'स्वराज्य' हे शब्द उच्चारणें राजद्रोहाचें चिन्ह समजलें जात होतें. स्वराज्य शब्द उच्चारिल्या-बद्दल वक्त्यास व लिहिल्याबद्दल लेखकास, सरकार कोर्टांत खेचीत असे व ना. गोखल्यांसारख्या तेजस्वी नेमस्तास सुद्धां बहिष्कार शब्द राजकीय उद्देशानें उच्चारूं नये असें मनापासून व प्रामाणिकपणानें वाटत असे ! अशा विपरीत समयीं या केसरीनें हीं चार सूत्रें दणदणीत आवाजानें हिंदी लोकांस सांगितलीं, यामध्येंच केसरीचें महत्त्व आहे.

या चार सूत्रांत, नव्हे केवळ चार शब्दांत, अखिल भारतीय राजकारणाचें सारसर्वस्व सांठविलेलें आहे. या चतुःसूत्रीबद्दल जर कोणास खरें श्रेय मिळावयाचें असेल तर तें केसरीलाच देणें योग्य आहे. मला पक्कें आठवत आहे कीं, ज्या वेळीं केसरीनें ही चतुःसूत्री सांगितली, त्या वेळीं पिढीजात नेमस्त पत्रांमधून व नेमस्तांच्या भाषणांतून राष्ट्रीय शिक्षणाची थट्टा केली जात असे. स्वदेशीला अव्यवहार्य मानलें जात असे व बहिष्कार हें शस्त्र फार सावध रीतीनें अत्यंत आणीबाणीच्या

वेळींच वापरावयाचें असतें, असा पोक्तपणाचा आव आणून सांगितलें जात असे. राष्ट्रीय शिक्षण म्हणजे काय तें मला समजत नाहीं, असें आनंदानें म्हणण्यास मवाळ नेते कचरत नसत. सरकारी शाळांत दोन आणि दोन चारच होतात, पांच होत नाहींत व राष्ट्रीय शाळेंतहि ते चारच होतात, असें म्हणून राष्ट्रीय शिक्षणाचा उपहास केला जात असे. अशा वेळीं राष्ट्रीय शिक्षणाशिवाय आमचा तरणोपाय नाहीं, असें स्पष्ट शब्दांनीं सांगण्यास जितकी दूरची दृष्टि लागते तितकी ती केसरीच्या लेखामध्यें होती. म्हणजे इतर पत्रकारांना जितक्या दूरचें दिसत होतें त्यापेक्षां पुष्कळच पुढचें केसरीला स्पष्ट दिसत होतें यांत शंकाच नाहीं.

१. बहिष्कार :—बहिष्कार हा कायदेशीर असला तरी अगदीं निर्वाणीच्या वेळीं वापरावयाचा असतो. तशी निर्वाणीची वेळ सध्यां आलेली नाहीं, असें देशांतील एकजात नरम नेते म्हणत होते. त्या वेळीं केसरीनें अनेक देशांचीं उदाहरणें देऊन बहिष्कार घातल्याशिवाय आमचा तरणोपाय नाहीं व बहिष्कार घालण्याची वेळ आलेली आहे, असें सांगितलें होतें. याविषयीं केसरीचे कांहीं उतारे आजहि मनन करण्यासारखे आहेत.

' ना. गोखल्यांना बहिष्कार नको आहे...... औद्योगिक कारणांकरितां जर ' औद्योगिक बहिष्कार पाहिजे, तर आणखी राजकीय कारणांची त्यांत भर पडून ' औद्योगिक बहिष्काराचा त्यांत उठाव झाला तर त्यांत वावगें कोणतें ? ज्या ना. ' गोखल्यांना देशाची अत्यंत दुःस्थिति झाल्याबद्दल हळहळ वाटत आहे, ज्या ना. ' गोखल्यांना औद्योगिक उन्नतीसाठीं बहिष्कार पाहिजे आहे, ज्या ना. गोखल्यांनीं ' हिंदुस्थानच्या राजकीय उन्नतीकरितां ' सर्व्हंटस् ऑफ इंडिया ' नामक संस्था ' स्थापन केली आहे, त्याच ना. गोखल्यांनीं राजकीय कारणासाठीं औद्योगिक ' बहिष्काराचें कायदेशीर शस्त्र हातीं घेण्यास लोकांस सांगतांना कचरावें हें ' आश्चर्य नव्हे काय ? ' ( १२-२-०७ ). या उताऱ्यावरून त्या वेळचे नेते बहिष्काराला कसे भीत असत व केसरी तीच गोष्ट कशी निधड्या छातीनें लोकांपुढें मांडीत होता हें पहा. बहिष्कार घातला तर राज्यकर्ते आम्हांस चिरडून टाकतील असें नेमस्त म्हणत. त्यावर केसरीचें पुढील वाक्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

' आम्ही चिरडून जाऊं ही भीति व्यर्थ आहे. चिरडून न जाणें तुमच्या ' आधीनची गोष्ट आहे. तुमच्या आंगीं निश्चय असेल तर तुम्ही चिरडले ' जाणार नाहीं; नसेल तर तुम्ही चिरडले गेले काय आणि न गेले काय ' सारखेच. ' ( १९-२-०७ ).

यापेक्षां आणखी दणदणीतपणानें सांगावयाचें कांहीं राहिलेलें नाहीं. हें वाक्य आज सुद्धां अगदीं ताजें आहे व हें आजहि लोकांस त्याच वीरवृत्तीनें योग्य बोध करीत आहे. आजची चळवळ दबली जाईल कीं नाहीं, या प्रश्नाचें उत्तर केसरीनें २४ वर्षांपूर्वीच देऊन टाकिलें आहे ! केसरीनें बहिष्कार म्हणजे केवळ परदेशी माला-

वरच घालावा असें म्हटलेलें नाहीं. सरकारी नोकऱ्यांवर व सरकारी शिक्षणालयांवर बहिष्कार घालण्याचा उपदेश किती तरी वर्षांपूर्वी केसरीनें केलेला आजहि पाहण्यासारखा आहे.

'सर्व बहिष्कार शक्य नसल्यास शक्य असेल तेवढा तरी करा, उगीच 'वाक्छल करण्यांत काय फायदा ? ......चांगलीं माणसें त्यांच्या ( गोखल्यांच्या ) 'स. ऑफ इं. सोसायटीं 'त शिरावीं अशी त्यांची इच्छा आहे; 'पण नव्या पक्षानें सुचविलेला सरकारी नोकरीचा बहिष्कार त्यांस मान्य नाहीं. '...सरकारी नोकरी हलक्या प्रतीची आहे, अशी बुद्धि जागृत करून चांगलीं 'माणसें या कनिष्ठ धंद्यापासून नवीन पक्षास निवृत्त करावयाचीं आहेत. आणि 'तसें करण्यास 'नोकरी सोडून द्या ' असा सरोह उपदेश केल्याखेरीज मार्ग 'नाहीं. ' ( किता ).

याप्रमाणें सरकारी नोकऱ्यांवर बहिष्कार घालण्याचा कार्यक्रम केसरीनें आंखलेला आजहि लोकांस पुष्कळ बोध करूं शकेल. या बहिष्काराच्या बाबतींत पुढील उतारे वाचकांसमोर आणल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं:—

'या सर्वांचे ( इंग्लंडांतील मुत्सद्द्यांचे ) डोळे उघडतील असा कांहीं तरी इलाज 'करणें अवश्य आहे. शस्त्रास्त्रांनीं या अरेरावीचा प्रतिकार करणें अशक्य होय. 'शस्त्रास्त्रें गेलीं म्हणजे फक्त संघशक्ति कायम राहते आणि या संघशक्तीचा उपयोग 'कायदेशीर रीतीनें राज्यकर्त्यांची धुंदी उतरविण्याचे कामीं जर करतां येईल, 'तर धैर्यानें व हिंमतीनें अशा प्रकारचा उद्योग करणें हें हिंदुस्थानची कळकळ 'बाळगणाऱ्या प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य होय. ' ( २२-८-०५ ).

कडकडीत बहिष्कार घातल्याशिवाय इंग्लंडांतील मुत्सद्द्यांचें लक्ष आपणांकडे वेधणार नाहीं, हें केसरीनें सन १९०५ सालीं म्हटलेलें लोकांच्या आज लक्षांत ठसूं लागलें आहे. याविषयीं केसरीचें लिखाण पुष्कळच आहे. पण त्यापैकीं पुढील उतारा अवश्य पाहण्यासारखा आहे. 'अरेरावी किंवा शिरजोर अधिकाऱ्यांचे डोळे उघडण्यास 'त्यांची किंवा विलायतेंतील लोकांची विनवणी करण्यापेक्षां अधिक तीव्र उपाय 'योजला पाहिजे...ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला तर 'राष्ट्रीय बहिष्कार ' हा 'यांपैकींच एक उपाय आहे असें आढळून येतें...इटाली देश जेव्हां ऑस्ट्रियाच्या 'ताब्यांत होता, तेव्हां इटालियन लोकांनीं परकीय ऑस्ट्रियन अधिकाऱ्यांस बहिष्कार 'घालून राज्यव्यवस्थेचें काम दुष्कर करून टाकलें होतें...हिंदुस्थानांतील लोकांनीं 'हीच गत स्वाकारली तर हिंदुस्थानांत राज्यकारभार चालवणें राज्यकर्त्यांस कठीण 'जाईल...राज्यकर्त्यांविरुद्ध शस्त्र चालवण्याची ताकद नाहीं व इच्छाहि नाहीं. पण 'विलायतेंतील व्यापाऱ्यांस व मजुरांस आम्ही विलायती माल घेऊन जे कोट्यावधि रुपये 'दरसाल देतों, तेवढे तरी आमच्यानें बंद होऊं नयेत काय ? ' ( किता ). तसेंच, 'जे लोक आमचें ऐकत नाहींत व आमच्या विनवणीकडे लक्ष देत नाहींत,

' त्यांचें राज्य आमच्यावर असलें तरी निदान व्यापाराच्या कामीं त्यांस साहाय्य
' करण्याचें आम्हीं साफ नाकारलें पाहिजे......अमेरिकन लोक आम्हांस नीट
' वागवीत नाहींत, तर अमेरिकन माल चिनांत खपूं द्यावयाचा नाहीं, असा चिनी
' लोकांनीं निर्धार केल्याबरोबर अमेरिकन लोकांचे डोळे उघडले......अमेरिकेंतील
' स्वतंत्र संस्थानें जेव्हां स्वतंत्र झालीं, तेव्हां विलायती मालावर असाच बहि-
' ष्कार टाकला होता...आम्हीं ( हिंदी लोकांनीं ) जर या ( बहिष्कारा )चा उपयोग
' करून घेतला नाहीं तर आमच्या सारखे नादान कोणींच नाहीं, असें म्हणावें
' लागेल. प्रजा कितीहि दुर्बळ असली तरी धैर्यानें, जुटीनें व निश्चयानें अरेरावी राज्य-
' कर्त्यांस शस्त्रावीणहि ती भारी होते ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. ' ( कित्ता ).

यांत निःशस्त्र स्थितींत दुर्बळ प्रजेनें सबळ राज्यकर्त्यांना आपलें म्हणणें मानावयास कसें भाग पाडावें, तें स्पष्ट शब्दांनीं प्रतिपादिलें आहे. निःशस्त्र प्रतिकार करण्याचें हें तत्त्व याप्रमाणें केसरीनें पंचवीस वर्षांपूर्वी प्रतिपादिलें. महात्मा गांधींनीं हें तत्त्व चोख रीतीनें व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न चालविला आहे. व्यापारावर, नोकऱ्यांवर, शिक्षणालयांवर बहिष्कार घालावा व राज्यशकट अडवून आपलें म्हणणें ऐकण्यास सरकारास भाग पाडावें, ही गोष्ट आज लहान पोरास समजूं लागली आहे. पण पंचवीस वर्षांपूर्वी या बाणेदार शब्दांमुळें लेखकांस तुरुंग पाहण्याचा प्रसंग येई. अशा वेळीं व्यापक बहिष्कारापासूनच हिंदभूमीचें कल्याण होईल असें निर्भयपणानें जाहीर करण्याचें धैर्य केसरीनेंच दाखविलें.

**२. स्वदेशी व्रत :**—बहिष्काराचें विधायक अंग 'स्वदेशीव्रत' आहे. स्वदेशीव्रत नसेल तर नुसत्या बहिष्कारानें कार्यभाग होणार नाहीं किंवा स्वदेशीवांचून बहिष्कार पुष्कळ वेळपर्यंत टिकणार नाहीं व टिकला तर आपण एका देशाच्या औद्योगिक पारतंत्र्याचा नाश करितां करितां दुसऱ्या देशाच्या औद्योगिक पारतंत्र्याच्या शृंखलांनीं बांधले जाऊं. यासाठीं केसरीनें बहिष्काराबरोबरच 'स्वदेशीव्रत' हें या चतुःसूत्रीमध्यें गोंविलें, यांतच त्याची दूर दृष्टीहि व्यक्त होते.

स्वदेशीव्रताचा उगम पुण्यांत पुष्कळ वर्षांपूर्वीच झालेला असला, तरी स्वराज्याच्या चतुःसूत्रीमध्यें स्वदेशीव्रताला प्रमुख स्थान देऊन, त्याचा संबंध स्वराज्यप्राप्तीशीं कसा आहे, हें जनतेच्या मनावर बिंबविण्याचें काम केसरीनें फारच उत्कृष्ट रीतीनें केलें. या गोष्टीवरून विधायक कामाबद्दल केसरीचा किती कटाक्ष होता हें व्यक्त होईल. सध्यां स्वदेशीव्रत हा शब्द आबालवृद्धांच्या तोंडीं झालेला आहे. पण ज्या वेळीं केसरीनें ही चतुःसूत्री सांगितली, त्या वेळीं पुढाऱ्यांची विचारसरणी कांहीं निराळीच होती. त्या वेळीं असें प्रतिपादन केलें जात असे कीं, स्वदेशीव्रत ही औद्योगिक बाब आहे, हिचा राजकारणाशीं संबंध नाहीं, बहिष्काराची बाब फक्त व्यापारविषयक आहे, तिचा राजकारणाशीं संबंध नाहीं, राष्ट्रीय शिक्षण ही केवळ शैक्षणिक बाब आहे, हिचा राजकारणाशीं संबंध नाहीं. पुष्कळ पुढारी अशीं

दिशाभुलीची भाषा बोलत असतां केसरीनेंच या सर्वांचा स्वराज्यप्राप्तीच्या राज-कारणाशीं अगदीं जवळचा संबंध आहे व जर स्वदेशी बहिष्काराच्या जोडगोळीनें आपण प्रतिपक्षावर हल्ला केला नाहीं, तर स्वराज्याचा किल्ला कधींहि सर व्हावयाचा नाहीं असें गर्जना करून सांगितलें.

ज्या वेळीं स्वदेशी कापड वापरणें अशक्य आहे असें वाटत होतें, निरनिराळे आंकडेशास्त्री स्वदेशी वस्त्र निर्माण करणें अशक्य आहे असें म्हणत होते, ज्या वेळीं मोठमोठे राष्ट्रीय नेते विदेशी कापड वापरण्यांत भूषण मानीत असत, ज्या वेळीं सध्यांप्रमाणें परदेशी कापडाचा लोकांस तिरस्कार वाटत नव्हता व ना. शास्त्र्यां-सारखे पुढारीसुद्धां, सर्व राष्ट्रीय मतांचा समेट करण्यासारख्या महत्त्वाच्या कार्यासाठीं सुद्धां 'शुद्ध स्वदेशी कापड वापराल काय?' असा प्रश्न केला असतां (No, no.) 'नाहीं, नाहीं.' असें म्हणण्यास संकोच करीत नसत, त्या वेळीं केसरीनें 'स्वदेशीव्रत' हाच आपला तरणोपाय आहे, असें निर्भीडपणानें प्रतिपादन केलें होतें. इतकेंच नव्हे तर विदेशी वस्त्रबहिष्कार कसा शक्य आहे व त्यासाठीं आपण आपले हातमाग कसे सुधारावे व त्यांची संख्या कशी वाढवावी ही गोष्ट केसरीनें अनेक लेख लिहून वाचकांच्या मनावर ठसवली होती.

'राष्ट्रीय सभेच्या नांगरानें हिंदुस्थानची जमीन जर पूर्वीं नांगरून तयार केली 'नसती तर बहिष्काराचें किंवा स्वदेशी चळवळीचें बीज इतक्या लवकर व इतक्या 'जोरानें तिच्यांत उद्भवलें नसतें,' असें केसरीनें १४-११-०५ च्या अंकांत म्हटलें होतें. खरें म्हटलें तर त्या वेळीं स्वदेशीची व बहिष्काराची चळवळ, तसेंच स्वदेशी वस्त्रनिर्माणाची चळवळ आजच्या मानानें अगदीं अल्प प्रमाणांत होती, तरी त्या वेळीं वणवा पेटला असें वाटत होतें. आजचें प्रमाण पुष्कळच मोठें आहे. आज महात्मा गांधींनीं चरखा, सूत कातणें, खादी निर्माण करणें, विदेशी वस्त्रबहिष्कार करणें या गोष्टी चालवून स्वदेशी व बहिष्कार यांना अत्यंत व्यावहारिक स्वरूप दिलें आहे. खरें म्हटलें असतां केसरीनें पंचवीस वर्षांपूर्वी प्रतिपादन केलेल्या चतुःसूत्रीपैकीं पहिल्या दोन सूत्रांचेंच हें 'अनुष्ठान' आहे. हें पहावयाचें असल्यास पुढील उतारे पहाः—

'सूत काढण्याची व विणण्याची कला ही फार पुरातन कालापासून आमच्या 'देशांत प्रचलित आहे. किंबहुना पट आणि वट हे दोन धंदे वेदकालापासून 'चालत आले असल्यामुळें आमच्या लोकांत या दोनहि कला अनादि किंवा 'वेदोक्त आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणाचें यज्ञोपवीत किंवा जानवें 'हें हल्लीं जरी सूत झालें आहे, तरी फार प्राचीन काळीं हें उपवीत म्हणजे विणलेलें 'वस्त्र होतें व तें ज्याचें तो विणीत असे, अशाबद्दल वैदिक ग्रंथांत आधार 'सांपडतात.' (क्रित्ता). ज्याचें त्यानें सूत कांतावें, याबद्दल केसरीनें अशा रीतीनें प्रति-पादन केलें आहे व याला 'वेदोक्त' कर्म म्हणून तें प्रत्येक द्विजाला—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्याला—करणें आवश्यक आहे, असें ध्वनित केलें आहे. वेदाला जे आपला धर्मग्रंथ

मानितात, त्यांना हें वेदोक्त कर्म आहे इतकें सांगितलें म्हणजे तें केलेंच पाहिजे असें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. तसेंच, ' विणकरीचा धंदा व घटाचा धंदा ( पॉटरी ) ' आमच्या देशांत इतका सार्वत्रिक होता कीं, यज्ञासंबंधानें बोलावयाचें असो, ' वेदांताचीं प्रमेयें लोकांपुढें मांडावयाचीं असोत किंवा व्याकरण व न्याय- ' शास्त्रांतील सिद्धांतांचा उलगडा करावयाचा असो, कवींच्या, तत्त्वज्ञान्यांच्या किंवा ' ऋषींच्या तोंडीं घटपटाचें उदाहरण सहजगत्या यावयाचेंच...इंग्रजींतील ' वीव्ह ' ' ( Weave ) हा शब्द ' व्ये, वी, वय् ( विणणें ) ' याचाच अपभ्रंश आहे. ' सर्व आर्य भाषांत विणणें यास हाच शब्द लावला जातो. यावरून...आर्य ' लोकांचा संघ फुटण्यापूर्वी विणण्याची कला त्यांस अवगत होती ही गोष्ट निर्विवाद ' सिद्ध होते. ' ( कित्ता ). इतकें प्राचीन वैभवाचें स्मरण करून देण्याचें कारण हेंच कीं, सूत काढणें, विणणें या कलांमध्यें एतद्देशीय लोक पूर्वीप्रमाणें प्रवीण व्हावेत व या बाबतींत त्यांनीं पूर्ण स्वावलंबन करावें. ही स्वदेशीची चळवळ झीज सोसूनहि लोकांनीं केली पाहिजे, असें केसरीनें अनेक वेळां प्रतिपादन केलें आहे. त्यांतील पुढील वाक्य पहाण्यासारखें आहेः—' स्वदेशी चळवळ म्हणजे सुखाचा मार्ग नव्हे, त्यांत थोडी ' गैरसोय आहे व ती लोकांनीं सोसली पाहिजे...दरसाल एका कुटुंबास वीस ' रुपयांचा कपडा लागतो. ह्याच वीस रुपयांत जितका देशी कपडा येईल तितका ' घेऊन कांहीं वर्षे त्यास जास्त खर्च न करतां निर्वाह करितां येणार नाहीं असें ' नाहीं. कारण देशी कपडा विलायतीपेक्षां थोडा जास्त टिकाऊ असतो, हें प्रसिद्ध ' आहे. अशा दृष्टीनें विचार केला म्हणजे विशेष खर्च न होतां पण थोडा झीज सोसून ' स्वदेशी चळवळीस सर्वांना मदत करितां येणार आहे. यांत कोणाचेंहि नुकसान नाहीं ' व कांहीं अशक्य नाहीं....यापासून हितच होणार आहे.' (१२-१२-०५ ). याप्रमाणें स्वदेशीव्रत हें सर्व हिंदी लोकांच्या हितास कारणीभूत होणार असल्यामुळें त्या स्वदेशी व्रताचें पालन सर्वांनीं केलेंच पाहिजे, असें केसरीचें प्रतिपादन आहे. 'परदेशी माल ' स्वस्त व स्वदेशी फार महाग ' असतो. तेव्हां स्वस्त सोडून महाग कां घ्यावा ? या शंकेचें उत्तर केसरीनें फार मजेदार दिलें आहे, तें पाहण्यासारखें आहे :—' अर्थशास्त्र- ' दृष्ट्या स्वस्त परदेशी मालापेक्षां महाग स्वदेशी माल घेणें हितकर असतें.' ( कित्ता). हितकर होतो म्हणूनच महाग असला तरी स्वदेशीच माल घ्यावा. स्वदेशी उद्योगधंद्यांची उन्नति करण्याचें आणखीहि एक प्रबल कारण आहे तें पहा:— ' आज आमच्या देशांतील व्यापार बुडालेला आहे व तो इंग्रजांनीं जाणूनबुजून ' बुडविला आहे हें जगप्रसिद्ध आहे. आपल्या देशांतील बुडालेला हा व्यापार किंवा ' उद्योगधंदे पुनः या देशांत सुरू करणें ई आपलें कर्तव्यच आहे. ' ( ५-८-०५ ).

केसरीनें स्वदेशीचा उपदेश इतक्या जोरानें केला व बहिष्काराचें त्याला पाठबळ दिलें; म्हणूनच केसरी वारंवार यास ' जोडगोळी ' म्हणत असे. वाचकांनीं विचार केला तर त्यांसहि जोडगोळी आहे असें वाटल्यावांचून राहणार नाहीं.

३. राष्ट्रीय शिक्षण :—स्वदेशी व बहिष्कारानंतर चतुःसूत्रीपैकीं 'राष्ट्रीय शिक्षण' हें येतें. राष्ट्रीय शिक्षण म्हणजे काय तें मला मुळींच समजत नाहीं असें म्हणणारे लोक पूर्वीच्या पिढींत पुष्कळ होते. गणित, भूगोल, इतिहास, भौतिक शास्त्रें यांच्या शिक्षणांत राष्ट्रीय शाळेंत कांहीं नवीन शिकविलें जाणें शक्य आहे व जें सरकारी शाळांतील भाडोत्री शिक्षकांकडून होणें शक्य नाहीं असें आपणांस कांहीं तरी करून दाखवितां येईल अशी धमक या लोकांमध्यें नव्हती. इतकेंच नव्हे तर सरकारी शाळांतून शिक्षण या नांवानें जें कांहीं मिळत आहे तेंच आपणांस पुष्कळ आहे व त्या शिक्षणानें साहेबांच्या नमुन्यासारखे आपल्या लोकांचे नमुने बनले म्हणजे पुष्कळ झालें, अशी प्रामाणिक समजूत या लोकांची होती. यामुळें या वेळचे लोक राष्ट्रीय शिक्षणाचा उपहास करीत व राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार करणारांची थट्टा करीत. अशा लोकांवर केसरीनें जी टीका केली आहे व ती करितांना राष्ट्रीय शिक्षण म्हणजे काय याची जी व्याख्या केली आहे ती फारच पाहण्यासारखी आहे. त्यांपैकीं कांहीं उतारे पहाः—'पंचतंत्रांत एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, 'कोणाहि शत्रूस जिंकावयाचें असल्यास त्याच्या जवळचीं हत्यारें हिसकावून घेण्यापेक्षां 'साधल्यास त्याची बुद्धि भ्रष्ट करणें अधिक फायदेशीर असतें. इंग्रज सरकार '(शिक्षणाच्या बाबतींत) आपलें वर्तन अलीकडे याच तत्त्वावर ठेवूं लागलें आहे.' (२९-१-०७). आमचीं हत्यारें हिरावून घेतल्यामुळें आम्ही जितके नेभळे झालों नाहीं तितके नेभळे आम्ही या नेभळट शिक्षणामुळें झालों आहों. ज्या कोणाच्या मनांत हा केसरीचा दृष्टिकोन उभा राहील त्यास राष्ट्रीय शिक्षण म्हणजे काय व त्यापासून काय साधावयाचें आहे हें सहज कळून येईल. सरकारी शिक्षणामध्यें कोणते दोष आहेत याचें विवेचन करीत असतां केसरी म्हणतोः—'सरकारी शिक्षणाचे 'दोन दोष—(१) शिळपटपणा, आणि (२) उपयुक्त शिक्षणाचा अभाव. हे 'दोन्ही दोष काढून टाकून सरकारावर अवलंबून न राहतां स्वतंत्र शाळा व स्वतंत्र 'परीक्षा......सुरू केल्या पाहिजेत....राष्ट्रामधें एक प्रकारची जागृति झालेली 'आहे. आणि या जागृतीला खाजगी शाळा व कॉलेजें यांनीं मदत केली पाहिजे.' (२९-१-०७). सरकारी शिक्षणामध्यें असलेले दोष काढून टाकून आपण राष्ट्रीय शाळा त्यांच्या पेक्षां उत्तम केल्या पाहिजेत अशी महत्त्वाकांक्षा केसरीची होती. सरकारानें शिक्षण कशासाठीं सुरू केलें हें केसरीनें पुढील उताऱ्यांत दाखविलें आहे. हा उतारा वाचला म्हणजे आपण सरकारी शाळांवर कां बहिष्कार घालावा हें वाचकांच्या लक्षांत येईलः—'कोणत्याहि विषयांत, विद्येंत, शास्त्रांत, उद्योगधंद्यांत, 'व्यापारांत किंवा कलेंत निष्णात आणि पारंगत होऊन आपल्या पराक्रमानें आणि 'बुद्धिवैभवानें पुढें येणारीं माणसें ज्या शिक्षणक्रमानें तयार होतील, तसा शिक्षण-'क्रम या देशांत सुरू करण्यास सरकार चाहत नाहीं. त्यांना विलायतेंतून मोठे 'कामगार इकडे आले असतां त्यांच्या हाताखालीं काम करणारे नोकर पाहिजे आहेत

' आणि तेवढ्यापुरतें ज्या शाळांतून शिक्षण मिळेल अशा शाळा इकडे काढल्या ' आहेत.' (२७-११-०६). 'तसेंच सरकारी शिक्षण जर सदोष आहे तर निर्दोष शिक्षण ' कोणतें हें एक तरी स्वतंत्र कॉलेज किंवा युनिव्हर्सिटी काढून सिद्ध करूं. ' (१९-२-०७ ). आणखी पहाः—'सरकारी शाळांत मिळालेलें शिक्षण भावी पिढीचा तेजोभंग व ' निरुत्साह करण्याकरितां मुद्दाम वेड्यावांकड्या रीतीनें दिलें जात आहे, एवढी गोष्ट ' जर निर्विवाद आहे तर लोकांनीं या गोष्टीकडे आणखी किती दिवस दुर्लक्ष्य ' करावयाचें हा एक आपल्या पुढें मोठा प्रश्न आहे. ' ( २९-१-०७ ). याच बरोबर हाहि उतारा पहाः——' आमच्या राष्ट्रांतील लोक नेभळे व निरुद्योगी रहावे असें ' सरकारी विद्याखात्याकडून चालत आलेल्या शिक्षणक्रमाचें धोरण आहे; आणि हें ' धोरण जर असेंच कायम राहिलें तर राष्ट्राचा समूळ नाश होण्याचा समय जवळ येणार ' हेंहि निश्चित आहे. अशा वेळीं देशांतील उद्योगी व विचारी पुरुषांनीं लोकांपुढें ' खरी स्थिति मांडून तिच्या प्रतिकारार्थ झटावें हें त्यांचें कर्तव्य होय...हल्लींची ' शिक्षणपद्धति सदोष आहे, इतकेंच नव्हे तर खासगी शाळांच्या द्वारें हा दोष ' काढून टाकण्याची वीस वर्षांपूर्वी जी उमेद होती ती आतां राहिली नाहीं ! ' ( २७-११-०६ ). या उताऱ्यांवरून वाचकांच्या ही गोष्ट लक्षांत येईल कीं, सध्यांच्या शिक्षणांतील मुख्य दोषांची उत्तम जाणीव केसरीनें वाचकांना करून दिलेली होती व लोकांनीं आपलीं राष्ट्रीय विद्यापीठें या धोरणानें काढावीं व तीं सरकारी विद्यापीठांपेक्षां अधिक कार्यक्षम व्हावीं अशी केसरीची अपेक्षा होती. महात्मा गांधींनींहि याच उद्देशानें सरकारी विद्यालयांवर बहिष्कार घाला असें सांगितलें होतें. पण केसरीनें दाखविलेला व महात्मा गांधींनीं दुजोरा दिलेला हा मार्ग जरी अजूनपर्यंत फारसा लोकप्रिय झाला नाहीं व अजूनहि सरकारी विद्यालयांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या खासगी विद्यालयांतील विद्यार्थ्यांच्या संख्येपेक्षां फार मोठी आहे, तथापि आज ना उद्यां हा केसरीचा मार्ग लोकांना आक्रमावा लागणारच लागणार यांत शंका नाहीं. कारण हेच विचार दिवसानुदिवस लोकांना अधिकाधिक प्रिय होऊं लागले आहेत. जे विचार हे लेख लोकांस पटवूं शकले नाहींत तेच विचार चालू परिस्थिति लोकांच्या मनांत बिंबवूं लागली आहे. केसरीचा मोठेपणा यांतच आहे कीं, त्यानें आजची परिस्थिति पाव शतकापूर्वी पाहिली व लोकांना सावध केलें. जनतेला आधीं सावध करणारांचीच योग्यता फार मोठी असते हें कोणीहि नाकबूल करणार नाहीं.

४. स्वराज्य :——' स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ' यांचा याप्रमाणें केसरीनें उपदेश केला, तो स्वराज्यप्राप्तीचें साधन म्हणून केला, हें केसरीच्या वरील उताऱ्यांवरून वाचकांच्या ध्यानीं आलेंच असेल. ' स्वराज्य ' हें आपलें साध्य आहे व त्याचीं हीं तीन साधनें आहेत. या तीन साधनांचें अनुष्ठान जितक्या तीव्रतेनें आपणांकडून होईल, तितकें स्वराज्य जवळ येईल. या स्वराज्याची व्याख्या केसरीनें

अशी केली आहेः—" ' स्व ' म्हणजे प्रजा, यांच्या मताप्रमाणें चालणारें राज्य, तें ' स्वराज्य. ' (९-४-०७). प्रजेच्या अनुमतीप्रमाणें चालणारें जें राज्य असतें त्यास स्वराज्य असें म्हणतात व जें राज्य चालवण्यांत प्रजेची अनुमति नसते, तें स्वराज्य नव्हे, तें परराज्य होय. मग तें स्वदेशी राजाच्या ताब्यांत असो किंवा परदेशी राजाच्या ताब्यांत असो. याविषयीं केसरीचें प्रतिपादन पहाः—' राज्य लोकांस सुखकर ' होण्यास त्याचा कारभार प्रजेच्या किंवा प्रजापक्षीय गृहस्थांच्या तंत्रानें चालला ' पाहिजे....( राज्य ) लोकांच्या तंत्रानें चाललें म्हणजे तें त्यांच्या हिताकरितां ' असतेंच असें म्हणावयास हरकत नाहीं.'(कित्ता). तसेंच केसरीनें आणखी लिहिलें:— ' प्रजेच्या तंत्रानें व सल्लामसलतीनें राज्यकारभार चालत असतां राजा किंवा कांहीं ' अधिकारी परदेशस्थ असले तरी ' स्वराज्य ' आणि ' सुराज्य ' या दोहोंचेंहि सुख ' लोकांस प्राप्त होण्यास अडचण पडणार नाहीं. पूर्ण स्वराज्य होण्यास परकी किंवा ' परकी अधिकारी जितके कमी असतील तितके चांगले व मुळींच नसले तर फारच ' उत्तम. .....अशा प्रकारच्या स्वराज्यासाठीं केवळ खालसा मुलखांतच खटपट ' झाली पाहिजे, इतकेंच नव्हे तर नेटिव्ह संस्थानांतूनहि ही चळवळ होणें जरूर ' आहे. राजा परदेशस्थ आहे किंवा स्वदेशस्थ आहे या प्रश्नापेक्षां प्रजेच्या हातांत ' सत्ता किती हा प्रश्न हल्लीं अधिक महत्त्वाचा होऊन बसला आहे.' (९-४-०७). स्वराज्य म्हणजे काय व आपलीं संस्थानें हीं स्वराज्यें आहेत कीं काय याचा खुलासा या उताऱ्यांत झाला आहे. देशी संस्थानांत राजा स्वदेशी असतो म्हणून तें स्वराज्य नव्हे व खालसा मुलुखांतील राजा परदेशी आहे म्हणून तेथें स्वराज्य नाहीं, असेंहि नव्हे. दोन्ही ठिकाणीं प्रजेच्या हातांत सत्ता नाहीं म्हणून दोन्ही ठिकाणचीं राज्यें हीं स्वराज्यें नव्हेत.

दोन्ही ठिकाणीं स्वराज्य होण्यास राज्य चालवण्याची सत्ता प्रजेच्या हातांत आली पाहिजे. यासाठीं स्वराज्याची चळवळ जशी खालसा मुलुखांत चालू झाली पाहिजे त्याचप्रमाणें ती संस्थानांतहि सुरू करावयास हवी. याप्रमाणें देशी संस्थानें हीं स्वराज्यें आहेत, असा जर कोणास भ्रम असेल तर तो केसरीनें याप्रमाणें दूर केला आहे व स्वराज्य म्हणजे काय तें वाचकांस अगदीं थोडक्या शब्दांत त्यानें समजावून दिलें तें असें:—' इंग्रज सरकारचें राज्यव्यवस्थेच्या आणि शिस्तीच्या ' दृष्टीनें जरी ' सुराज्य ' असलें, तरी तें केवळ राज्यकर्त्या गोऱ्या अधिकारी वर्गाच्या ' तंत्रानें चालत असल्यामुळें, आणि या अधिकारी वर्गास हिंदुस्थानच्या हितापेक्षां ' इंग्लंडचें किंवा गोऱ्या लोकांचें हित अधिक प्रिय असल्यामुळें इंग्रजी राज्य ' आम्हांस सुखकर किंवा फायदेशीर झालेलें नाहीं. आणि हल्लींचीच पद्धति कायम ' राहील तर होणें शक्यहि नाहीं. '(कित्ता). याप्रमाणें परकीय राज्यापासून होणाऱ्या तोट्याचें वर्णन केसरीनें केलें आहे. हे तोटे दूर होण्यासाठीं स्वराज्य प्राप्त करून घेणें हा एकच उपाय आहे व जर स्वराज्य लवकर मिळावें अशी इच्छा असेल, तर

' स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ' या तीन सूत्रांनीं दर्शविलेल्या मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे.

या चतुःसूत्रीचा जितका विचार करावा, तितकी खात्री होते कीं, या बाबतींतील केसरीची विचारसरणी अगदीं परिपूर्ण आहे व त्यांत न्यूनाधिक करण्याची आवश्यकता नाहीं.

गेल्या पन्नास वर्षांत केसरीनें जी कामागिरी केली ती अनेक कार्यक्षेत्रांत फारच मोठी आहे. पण त्या सर्वांत ही ' स्वराज्याची चतुःसूत्री ' जी केसरीनें हिंदी लोकांच्या पुढें ठेवली ती तर अगदीं पूर्ण अशीच आहे. स्वराज्यासाठीं झटणारे लोक याच चतुःसूत्रीचें यथाशक्ति आचरण करीत आहेत व स्वराज्यप्राप्तीपर्यंत, स्वराज्यप्राप्तीसाठीं व पुढें स्वराज्याच्या रक्षणासाठीं लोक या चतुःसूत्रीचें आचरण करतील ही गोष्ट निर्विवाद आहे. या चतुःसूत्रीमुळें राजकीय कार्यक्षेत्रांत केसरीचें नांव अजरामर झालेलें आहे. माझी अशी इच्छा आहे कीं, भूतकाळीं केसरीनें हें मिळालेलें नांव व यश भावी काळांत सुद्धां त्यानें कायम ठेवावें व वाढवावें.

---

## हिंदी स्वराज्यसंघाची चळवळ.

[ श्री. सदाशिव विनायक बापट ]

स्वराज्यसंघाच्या कल्पनेची वाढ केसरींतून कसकशी होत गेली याचें स्वरूप श्री. साने यांचा लेख पुढें आला आहे त्यावरून समजून येईल. परंतु लो. टिळक यांनीं होमरूलच्या चळवळीचा प्रचार करण्याकरितां ज्या अनेक साधनांचा उपयोग केला त्यांपैकीं केसरी हें एक महत्त्वाचें व प्रमुख साधन असलें तरी, त्यानें बजावलेल्या कामगिरीची माहिती दिल्यानें समग्र चळवळीचें आकलन पूर्णपणें होणें अशक्य आहे. यासाठीं लो. टिळक, केसरीकार व त्यांचे सहकारी यांनीं शहरापासून खेड्यापर्यंत व्याख्यानें देऊन व विलायतेस शिष्टमंडळ नेऊन होमरूलची चळवळ कशी रंगारूपास आणिली व यास केसरीचें कसें साहाय्य झालें याचें सिंहावलोकन प्रस्तुत लेखांत साधार केलें आहे.

लोकमान्य टिळक १९१४ सालीं मंडालेच्या तुरुंगांतून सुटून परत हिंदुस्थानांत आले त्या वेळीं महाराष्ट्रांतील किंवा साऱ्या हिंदुस्थानांतील हवा अगदीं स्तब्ध होती. १९०८ सालापासून सुरू झालेला दडपशाहीचा अंमल अद्यापि कायम असल्यामुळें देशांतील राजकीय चळवळ बाह्यतः थंडावल्याप्रमाणेंच दिसत होती. नेमस्त पक्षाचे पुढारी वर्षांतून एकदां कोठें तरी राष्ट्रीय सभा भरवीत; पण तिच्यांतून राष्ट्रीय पक्षानें आपलें अंग काढून घेतलें असल्यामुळें राष्ट्रीय सभेंतील चैतन्य नष्ट होऊन तिलाहि

प्रेतकळाच आली होती. ही स्थिति अत्यंत निरुत्साहजनक व शोचनीय असून ती दृष्टीस पडल्यानंतर लो. टिळकांसारख्या राजकारणांत जन्मभर पोहलेल्या पुढाऱ्यांसहि पुढील धोरण आंखतांना विचार पडावा हें स्वाभाविक होय. तशांत सरकारानेंहि त्यांच्या मार्गांत आडकाठ्या घालून ठेविल्या होत्या. ते मंडालेहून सुटले तरी त्यांच्या भोंवतालचा तुरुंग सुटला नव्हता. तो तुरुंग मंडालेहून त्यांच्या बरोबरच बोटींत बसून पुण्यास आला व त्याच्या भिंती त्यांच्या वाड्याभोंवतीं उभ्या राहिल्या. त्यांच्या वाड्यावर तुरुंगाप्रमाणेंच पोलिसांचे पहारे बसले व त्यांना भेटावयास जाणाऱ्या लोकांवर पाळत ठेवण्यांत येऊन सरकारी नोकर, पेन्शनर फार काय पण सरकारचा यत्किंचितहि आश्रय असलेले गृहस्थ यांना लोकमान्यांच्या वाऱ्यासहि उभें राहणें सरकारनें धोक्याचें करून सोडलें.

परंतु असा कडेकोट बंदोबस्त ठेवला असला तरी सरकारचें सामर्थ्यहि सृष्टिक्रमापुढें अखेर दुर्बलच ठरलें. लो. टिळक ह्याच वारा होता, हीच वीज होती व हीच पर्जन्यवृष्टीहि होती. लो. टिळकांच्या अंगांतील या त्रिविध शक्ति अनुकूल कालाची वाट पहात उभ्या होत्या. सन १९१४ च्या जून महिन्याच्या अखेरीस लोकमान्यांची मंडालेहून सुटका झाली व त्यानंतर अवघ्या दोनच महिन्यांनीं म्हणजे ऑगस्टमध्यें युरोपांत महायुद्धास प्रारंभ होऊन त्यांत इंग्लंडहि अडकलें. लो. टिळकांना तुरुंगांतील सहा वर्षांत देशांतील राजकारणाची विस्कटलेली घडी आतां बसवावयाची होती. अखिल जनतेचीं मनें त्यांच्या मुठींत होतींच; परंतु त्यांचा पुढाकार घेऊन त्यांस कार्याला जुंपण्यास योग्य संधीचीच काय ती वाण होती. ही सुसंधि त्यांस महायुद्धानें मिळवून दिली. सरकारनें लो. टिळक व बहुजनसमाज यांची गांठ पडूं न देण्यासाठीं जरी अनेक निर्बंध घातले होते तरी ते तोडून बहुजनसमाजास येऊन मिळण्यांतच खरी चतुराई होती.

सरकारास झाली तरी या महायुद्धाच्या नवीन संकटांत लोकमान्यांकडून मदत मिळाली तर ती हवीच होती. तेव्हां सरकारची ही अडचण ओळखून लो. टिळकांनीं आपल्या राजनिष्ठेचा जाहीरनामा प्रसिद्ध केला व त्याचा गुण एकाद्या रामबाण औषधाप्रमाणें तत्काल दिसूनहि आला. त्यांच्या वरील बंधनें उडालीं व राष्ट्राच्या राजकीय रथाचें सारथ्य आपल्या हातीं घेण्यास लोकमान्यांनीं चारी बाजूंनीं जोराची खटपट सुरू केली. अनेक प्रकारच्या राजकीय गाऱ्हाण्यांवर केसरींतून लेखणी चालवितां चालवितां टिळक आतां तरण्याचे म्हातारे झाले होते. गेल्या तीसपसतीस वर्षांच्या अनुभवावरून त्यांनीं आपल्या मनाशीं जी खूणगांठ बांधून ठेविली होती ती ही कीं, हिंदुस्थानांतील ब्रिटिश अधिकारी वर्गापासून किरकोळ तक्रारींची दाद लावून घेण्याचा शीण एकंदरींनें व्यर्थ असून सर्व तक्रारींचें मूळ जी राजसत्ता तीच शक्य तितकी लवकर जनतेस प्राप्त करून देणें इष्ट होय व त्याच दिशेनें आपले प्रयत्न चालविण्याचें त्यांनीं आतां ठरविलें. सरकार या वेळीं संकटांत होतें, त्याची

' कोणतेहि स्वराज्याचे हक्क मॉंटेग्युसाहेब देऊं इच्छित नाहींत हें उघड आहे आणि
' मॉंटेग्युसाहेबांनींहि ती गोष्ट लपवून न ठेवितां स्पष्टपणें आपल्या रिपोर्टांत दाखल
' केलेली आहे. वरिष्ठ सरकाराच्या कारभारांत स्वराज्याचे हक्क बिलकुल दिलेले नाहींत,
' प्रांतिक सरकारचे कारभारांत एक दोन खर्चाचीं खातीं आमचेकडे देणार आणि
' स्थानिक स्वराज्याचे हक्क मात्र शक्य तितक्या पूर्णतेनें आमच्याकडे सोंपविले जाणार,
' हें मॉंटेग्युसाहेबांच्या सर्व सुधारणांचें संक्षिप्त स्वरूप होय.' केसरीनें हें जें सार काढलें
तेंच अखेर प्रत्ययास येऊन सदर रिपोर्टाच्या आधारानें जो कायदा पार्लमेंटांत पुढें
पास झाला, त्यावर अमृतसर येथील राष्ट्रीय सभेंत लोकमान्य टिळकांच्या प्रयत्नानें
' अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक ' असा शिक्का १९१९ सालीं पडलेला
सर्वांनीं पाहिलाच आहे.

मुंबईची जादा राष्ट्रीय सभा आटोपल्यावर ता. १९ सप्टेंबर रोजीं लो. टिळक विलायतेस निघून गेले. विलायतेस लोकमान्यांना दोन कामें साधावयाचीं होतीं. एक काम चिरोल केसचें व दुसरें मॉंटेग्यु-चेम्सफर्ड खर्ड्यांत दाखल केलेल्या सुधारणां-पेक्षां अधिक हक्क मिळविण्यासाठीं प्रयत्न चालू ठेवण्याचें. लोकमान्य ता. ३० ऑक्टोबर, १९१८, रोजीं विलायतेस पोहोंचले व तेथून ता. ६ नोव्हेंबर, १९१९, रोजीं परत हिंदुस्थानांत येण्यास निघाले. विलायतेस असतांना लो. टिळक व रा. करंदीकर यांनीं बॅप्टिस्टांच्या मदतीनें पार्लमेंटाच्या निवडणुकीचे वेळीं स्वराज्य-संघाची इंग्रज लोकांस माहिती देण्याकरितां लक्षावधि हस्तपत्रकें काढून ग्रेटब्रिटन व आयर्लंड यांत वाटलीं. त्यांचा ब्रिटिश लोकांवर, विशेषतः मजूर पक्षावर फार चांगला परिणाम झाला. संघाचे अध्यक्ष बॅप्टिस्टा यांनीं ' हिंदुस्थानासाठीं स्वयं-निर्णय ' या नांवाचें एक सुंदर छोटेखानी पुस्तक लिहून त्याच्या व संघाचे मुख्य चिटणीस श्री. तात्यासाहेब केळकरकृत ' केस फॉर इंडियन होमरूल ' या ग्रंथाच्या प्रति शांततापरिषदेचे सभासद, पार्लमेंटचे सभासद, इंग्लंडचे मुख्य मंत्री व शांतता-परिषदेचे अध्यक्ष यांजकडे पाठविल्या. संघाची एक शाखा लंडन येथें व दुसरी दे. भ. लाला लजपतराय यांचे मार्फत अमेरिकेंत न्यू यॉर्क शहरीं स्थापन केली. संघातर्फे विलायतेस जाणाऱ्या शिष्ट-मंडळांत संघाचे उपाध्यक्ष लो. टिळक, श्री. खापर्डे, करंदी-कर, संघाचे मुख्य चिटणीस केळकर व बंगालचे पाल एवढ्यांचा समावेश होता. केळकर व खापर्डे यांच्या खेरीज बाकीचे सभासद आधींच रवाना झाले होते. उरलेले हे दोघे १९१९ च्या मे महिन्यांत विलायतेस गेले. गु. तात्यासाहेब केळकर यांचा त्यांच्या विनयशील स्वभावास अनुसरून, विलायतेस जाण्याचा मुळींच विचार नव्हता. आपल्या जाण्यावांचून विलायतेंतील काम खरोखर नडून पडणार असेल तरच ते जाणार होते. लोकमान्यांचीं त्यांस निघून येण्याविषयीं वारंवार पत्रें येत. त्यांस त्यांनीं विलायतेस जाण्याची आपली महत्त्वाकांक्षा नाहीं व इच्छाहि नाहीं असें निक्षून लिहून कळविलें होतें. परंतु ' आतां माझा अंत तुम्ही किती पाहणार ! ' असें निकडीचें

पत्र लोकमान्यांकडून आल्यावर मात्र त्यांनीं जाण्याचा बेत तावडतोब कायम केला. विलायतेस गेल्यानंतर त्यांनीं तेथील ब्रिटिश काँग्रेस कमिटीमार्फत चाललेल्या ' इंडिया पत्रा'चें संपादकत्व पतकरलें व परत येईपर्यंत तें उत्तम प्रकारें चालविलें हें सर्वश्रुतच आहे.

स्वराज्य-संघानें पार्लमेंटरी कमिटीपुढें ज्या मागण्या मांडल्या, त्यांतील मुख्य मागण्या पुढीलप्रमाणें होत. ' हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य देण्याचें ध्येय मान्य करावें, ' इंडिया कौन्सिल काढून टाकून भारतमंत्र्याच्या मदतीला दोन अंडर-सेक्रेटरी द्यावेत, ' अखिल हिंदुस्थानच्या कारभारांत परराष्ट्रीय संबंध, लष्कर, आरमार, हिंदी संस्था-' निकांचे संबंध, शांतता व संरक्षण इत्यादि बाबी वगळून बाकीच्या बाबींवर लोकसत्ता ' असावी, वसाहतीइतकें आर्थिक स्वातंत्र्य मिळावें, अंदाजपत्रकावर कायदे-' कौन्सिलचा पूर्ण ताबा रहावा व पंधरा वर्षांत पूर्ण स्वराज्य मिळावें. '

विलायतेंतील कामगिरी आटोपून लो. टिळक व तात्यासाहेब केळकर ता. १ डिसेंबर रोजीं सकाळीं पुण्यास आले. त्या वेळीं पुणेंकरांनीं उभयतांचें टोलेजंग स्वागत केलें. मिरवणुकीबरोबर हत्तीघोडे होते. त्या उभयतांना पुणें म्युनिसिपॅलिटी-तर्फे मानपत्रें देण्यांत आलीं. नंतर ते अमृतसरच्या राष्ट्रीय सभेस गेले. वाटेंत त्यांना बादशहांनीं काढलेला जाहीरनामा वाचावयास मिळाला. तो वाचून त्यांनीं स्वराज्य-संघातर्फे बादशहांस जी तार केली, तिच्यांत ' प्रतिसहकारिता ' ( रिस्पॉन्सिव्ह को-ऑपरेशन ) हा नवीन शब्द वापरला व तो शब्द राजकीय वाङ्मयांत आपल्या विशिष्ट अर्थानें कायम होऊन बसला आहे. अमृतसरची राष्ट्रीय सभा पंडित मोती-लाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं भरली व तिच्यांत मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांवर मागें लिहिल्याप्रमाणें ' अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक ' असा शिक्का मारण्यांत आला. त्याच वेळीं होमरूल लीगचें कार्य वास्तविक संपलें. अशा रीतीनें लो. टिळकांच्या पक्षानें राष्ट्रीय सभा हस्तगत केल्यानंतर स्वराज्याचें कार्य तिजमार्फत पुढें चालणार याविषयीं शंका न राहिल्यामुळें स्वराज्य-संघाचें कार्य वास्तविक येथेंच संपलें. पुढें लवकरच पुणें येथें संघाच्या विनंतीवरून कौन्सिलें काबीज करण्याकरितां काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाची स्थापना लोकमान्यांनीं केली. वरील सर्व कार्य इतकें रंगारूपास आणण्याचें श्रेय लोकमान्यांनाच असलें तरी त्यांच्या मताचा प्रचंड प्रसार करण्यास 'केसरी'सारखें साधन त्यांच्या हातीं नसतें तर एकंदर कार्यास पुष्कळच उणेपणा आला असता यांत शंका नाहीं. ज्या केसरीच्या साह्यानें आपले मनोरथ टिळकांना साध्य करितां आले तें त्यांचें केसरी पत्र १९०८ ते १९१४ पर्यंतच्या आणीबाणीच्या काळांत तात्यासाहेबांनीं कसें जतन केलें हें विसरून चालणार नाहीं. या त्यांच्या कामगिरीबद्दल लोकमान्यांनीं श्री. दिनकरशास्त्री कानडे यांजपाशीं काढलेले उद्गार लो. टिळक यांच्या ' आठवणी व आख्यायिका ' या खंडाच्या दुसऱ्या भागांत नमूद आहेत. कानडेशास्त्री आपली आठवण लिहितात ती अशी :– ' लोकमान्य १९१४ सालीं सुटून आल्यावर दहा-

'बारा दिवसांनीं एकदां वर्तमानपत्राचे खोलींत ते उभे असतां सातारचे एकदोन
'गृहस्थ त्यांच्यापाशीं बोलत होते. बोलतां बोलतां पूर्वीच्या पांच सहा वर्षांतील
'सरकारच्या दडपशाहीचा विषय निघाला, तेव्हां लोकमान्य म्हणाले, 'नरसोपंतांनीं
'म्हणूनच केसरी जिवंत राखला. मी बाहेर असतों तरी स्वतः मलाहि 'केसरी'
'टिकविणें अशक्य झालें असतें. नरसोपंतांचा गोडवा स्वभाव अशा वेळीं राष्ट्राचे व
'केसरीचे उपयोगीं पडला व म्हणूनच आज आपणांस येथें उभें रहावयास जागा
'राहिली आहे.' या वेळीं लोकमान्य गहिंवरून आलेले दिसले. तात्यासाहेब केळकर
'तेथें हजर नव्हते. लवकरच तात्यासाहेबांचा कांहीं तरी रूपानें जाहीर गौरव
'करण्याचा आपला उद्देश असल्याचें लोकमान्य म्हणाले.'

सन १९१६ त लोकमान्यांनीं दिलेल्या स्वराज्यावरील व्याख्यानांच्या खटल्याचा हायकोर्टानें निकाल दिल्यावर केसरीनें 'टिळक सुटले, पुढें काय ?' म्हणून अग्रलेख लिहिला. त्यांत शेवटीं म्हटलें आहे :—'......न्यायमूर्तींच्या ठरावाची अगर
'मनोधैर्याची नुसती तारीफ करून अगर तो ठराव होण्यास टिळक निमित्त झाले
'म्हणून त्यांस अभिनंदनपर तारा पाठवून, पानसुपारी किंवा चहापार्टी करून अगर
'पेढे खाऊन काम भागावयाचें नाहीं. सर्वांनींच आतां स्वराज्य संघाचे सभासद झालें
'पाहिजे, एवढेंच केसरीचें तुम्हांस आग्रहपूर्वक सांगणें आहे. आणि तुम्हीं 'तथास्तु'
'केव्हां म्हणतां याची तो मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात आहे.' केसरीच्या या आव्हानास लोकांनींहि पण तसाच जाब दिला. संघाच्या तीन वर्षांच्या आयुष्यांत त्यानें केवढी तरी उलाढाल केली. संघाचे चाळीस हजार सभासद होऊन प्रत्येकीं शंभर रुपये देऊन एक हजारावर तहाहयात सभासद झाले. संघाच्या मुख्य १८० शाखा स्थापन करण्यांत आल्या. वर्गणी, देणगी वगैरे रूपानें सुमारें ३,५४,००० रुपये जमा झाले. विलायतेस गेलेल्या डेप्युटेशनकरितां १,६०,००० रुपये खर्च आला. इंग्लंडच्या भावी राज्यकारभाराची सूत्रें मजूरपक्षाचे हातीं येणार हें लोकमान्यांनीं ओळखून सदर पक्षाशीं संधान बांधण्याकरितां त्यांच्या पक्षाच्या फंडास त्यांनीं ३००० पौंड म्हणजे सुमारें ४५,००० रुपये वर्गणीदाखल दिले. खुद्द हिंदुस्थानांत स्वराज्याच्या कल्पनेचा व्याख्यानांच्या रूपानें प्रसार व प्रचार करण्याकरितां सुमारें ३३,००० रुपये खर्ची पडले. स्वराज्यविषयक विविध प्रकारच्या माहितीचीं मराठी ३१ पुस्तकें व इंग्रजींत १७ पुस्तकें काढून त्यांच्या सुमारें चारसाडेचार लाख प्रति छापून प्रसिद्ध करण्यांत आल्या. नुसत्या छपाईखात्यावर इतका खर्च झाला कीं, तेवढ्यांत अनेक मोठ्या यंत्रांचा एक मोठा छापखानाच निघाला असतां ! असो.

लो. टिळक १९२० च्या ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या तारखेस दिवंगत झाले. यांच्या मृत्यूनंतर 'हिंदी स्वराज्य-संघ' हें नांव बदलून 'टिळक-स्वराज्य-संघ' असें नांव त्याल ८ मे, १९२१, रोजीं वसई येथें भरलेल्या संघाच्या पांचव्या

परिषदेंत ठेवण्यांत आलें. पुढील सालीं यवतमाळ येथें भरलेल्या षष्ठम परिषदेंत संघानें आपल्या जवळच्या शिलकेंतून एक लाख रुपये खर्चून संघाचे अध्यक्ष लो. टिळक यांच्या नांवानें मंदिर बांधून त्यांचें स्मारक करावें असें ठरविलें. त्याप्रमाणें त्या संस्थेचा ट्रस्ट करून पुणें येथें 'लोकमान्य टिळक मंदिर' ही प्रेक्षणीय इमारत बांधण्यांत आली व तिच्यांत लोकमान्यांचा पुतळा ठेवण्यांत आला. सर्व हिंदुस्थानभर संचार करणारे टिळक एका मंदिरांत उभे राहिले. त्यांच्या चळवळ करणाऱ्या जिवंत देहानें दगडी देहाचा आश्रय केला तरी त्यांचा अमर आत्मा सध्यांच्या स्वातंत्र्याच्या संग्रामाकडे त्या दगडी देहांतून पहात असेल व अपुरें राहिलेलें कार्य पुरें होण्याबद्दल आपल्या देशबांधवांना आशीर्वादहि देत असेल !

---

# स्वराज्य-संघ

[ श्री. माधव विठ्ठल साने, बी. ए. ]

'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे, आणि तो मी मिळविणारच.'

—केसरीचे संस्थापक, कै. लो. टिळक.

राष्ट्रनायक लो. बाळ गंगाधर टिळक ह्यांना मंडाले येथील सहा वर्षांच्या कारावासांतून परत येऊन एक वर्ष उलटून गेलें होतें. मध्यंतरीं राष्ट्राला देण्यांत आलेल्या मोर्ले-मिंटो सुधारणांचा अनुभव लोकांना येऊं लागला होता व लोकांचा राजकीय हक्क परत मिळविण्याचा निश्चयहि वाढीला लागला होता. अशा वेळीं मद्रासच्या प्रसिद्ध पुढारी डॉ. ॲनी बेझंट यांनीं कांहीं सद्गृहस्थांच्या अनुमतीनें स्वराज्य-प्राप्तीसाठीं एक स्वतंत्र संस्था काढण्याचा निश्चय केला व त्या विषयासंबंधानें आपल्या 'न्यू इंडिया' पत्रांत एक लेख प्रसिद्धहि केला. त्याच वेळीं इकडे महाराष्ट्रांत 'स्वराज्याच्या निसर्गसिद्ध हक्का'ची लोकमान्यांचा 'केसरी' गर्जना करीत होताच, त्याला ही कल्पना कळली व तत्काळ महाराष्ट्रांतील जनतेच्या माहितीसाठीं त्या लेखाचा मराठींत गोषवारा देण्यांत आला. त्यानंतर पुढील अंकांतील एका स्फुट सूचनेंत केसरीनें या संघाविषयीं आपलें मत मांडलें आहे. केसरी म्हणतो, 'होमरूल लीगच्या कल्पनेंत विशेष जहाल असें कांहींच नाहीं. पांच सालीं ना. 'गोखल्यांनीं व सहा सालीं दादाभाई नौरोजी यांनीं हिंदी स्वराज्य ( वसाहतींच्या 'बरोबरीचें ) हेंच राष्ट्रीय सभेचें ध्येय म्हणून प्रतिपादिलें. सात सालीं नेमस्त पक्षानें 'बनविलेल्या शुद्ध क्रीडमध्येंहि वसाहतींच्या तोलाचें स्वराज्य हेंच हिंदी राष्ट्राचें 'ध्येय असें स्पष्ट नमूद करून ठेवलें आहे.' (५-१०-१५). केसरीनें या विषयावर जो लेखमाला लिहिली तिचा प्रारंभ करतांनाहि हेंच मत प्रदर्शित केलें आहे.

' होमरूल लीग अथवा ' हिंदी-स्वराज्य-संघ ' यासंबंधीं विशेषतः ॲनी बिझांट ' यांच्या पुरस्कर्तृत्वानें हल्लीं जी चळवळ चालू आहे ती कांहीं नवी आहे असें ' नाहीं. हिंदुस्थानच्या राज्यपद्धतींत सुधारणा होऊन शक्य तेवढा राज्यकारभार ' प्रजाजनांच्या मताप्रमाणें चालला पाहिजे, हें मत हिंदुस्थानांत प्रचलित होऊन ' पुष्कळ वर्षें झालीं आहेत; किंबहुना १८५८ सालीं जो जाहीरनामा प्रसिद्ध ' झाला त्यांत आणि त्यानंतर वेळोवेळीं कांहीं उदात्त विचारांच्या व्हाइसरॉयांनीं ' किंवा गव्हर्नरांनीं जीं भाषणें केलीं त्यांत याच तत्त्वाचा उल्लेख केलेला आहे. ' ( ३०-११-१५ ). पण सुरू होऊं पाहणारी ही चळवळ कांहीं नवीन भानगड नाहीं असें सरकारला भासविण्याचा हेतु असावा, असें या दोन्हीहि उताऱ्यांवरून दिसतें. कारण केसरीनें राणीचा जाहीरनामा व व्हाइसरॉय आणि गव्हर्नर यांनीं प्रकट केलेले उदात्त विचार यांचा मुद्दामच आधार घेतला आहे. केवळ स्वराज्याच्या चळवळीसाठींच स्वतंत्र संस्था निर्माण करण्याची ही कल्पना कांहींशी अभिनव होती हें कबूल केलें पाहिजे.

अशा रीतीनें चळवळीचा ' श्रीमन्महा ' केल्यानंतर, आम्ही मागत असलेलें स्वराज्य आम्हांस कां पाहिजे, हें केसरीनें प्रतिपादन केलें. यासंबंधांतील केसरीची भूमिका फारच उदात्त आहे. हें स्वराज्य ' राजनिष्ठेचें बक्षिस ' म्हणून आम्ही मागत नाहीं, तर तें उपभोगणें हा आमचा ' नैसर्गिक हक्क ' आहे म्हणून मागतों. अज्ञान मुलाच्या विश्वस्त्या( ट्रस्टी )प्रमाणें इंग्रजांनीं आमचा राज्यकारभार बघितला. पण आतां हिंदी लोक वयांत आल्यावर तरी इंग्रजांनीं तो त्यांच्या हवालीं करावयाला नको काय ? आतां आम्ही हिंदु लोक राज्य चालवायला लायक झालों आहोंत. म्हैसूरसारख्या जवळच्या संस्थानांत जर हिंदी लोक नमुनेदार राज्य-व्यवस्था ठेवूं शकतात, तर त्यांना ती इतर प्रांतांत लीलया ठेवतां येईल. जगांतील लहान लहान राष्ट्रें स्वराज्य मिळवूं लागलेलीं पाहून केसरी म्हणतो, ' अधिकाराची ' हांव व शहाणपणाची घमेंड या दोन अपारदर्शक पडद्यांची झांपड त्यांच्या ( सर-' कारी अधिकाऱ्यांच्या ) डोळ्यांच्या बाजूस पडल्यानें गाडीच्या घोड्यांप्रमाणें ' त्यांना आपल्या पायांपुरता व नाकासमोरचा सरळ मार्ग तेवढा दिसतो. आजूबाजूस ' म्हणून कांहीं जग असेल असें त्यांना वाटतच नाहीं. पण हिंदी लोक शरिरानें ' घोड्यांसारखे राज्यशकटाला जोडलेले असले तरी त्यांच्या डोळ्यांला अशी झांपड ' पडलेली नाहीं. राष्ट्रीय सत्तासुखाचें हिरवें गार गवत उगवलेली स्वातंत्र्यभूमि ' त्यांना आपल्या भोंवतीं दिसत आहे व आपल्या जातीचे इतर प्राणी त्या भमींत ' स्वच्छंदानें चरत फिरत असलेलेहि दिसत आहेत. तेव्हां तोंडांतील कायद्याचा लगाम ' न निघाला तरी ते त्या भूमीकडे जाण्याचा प्रयत्न करणारच. त्यांच्या प्रयत्नास ' यश देणें न देणें हें ईश्वराच्या हातीं आहे. ' (२९-५-१७). महायुद्धाच्या अंतिम हेतूविषयीं ऐकूं येणारे उद्गार लक्षांत घेऊन केसरीनें सरळच सवाल टाकला कीं,

' युरोपांतील महायुद्धांत जर्मनीविरुद्ध एकवटलेलीं सर्व राष्ट्रें, आपण सर्व देशांस
' स्वतंत्रता व स्वराज्य प्राप्त करून देण्यास झटत आहोंत, असें कंठरवानें जगास
' सांगत आहेत, मग हिंदुस्थाननेंच काय म्हणून मागें रहावें ? ' ( २३-६-१७ ).

स्वराज्याच्या चळवळीला निरनिराळ्या रीतींनीं पाठिंबा दिल्यानंतर ती चळवळ स्वतः सुरू करण्याची कल्पना सहजच प्रादुर्भूत होऊं लागली. राष्ट्रीय कार्याला मदत करणें हें महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाचें कर्तव्यच होऊन राहिलें होतें. यासंबंधीं श्री. न. चिं. केळकर म्हणतात, ' महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाच्या तत्त्वांत व धोरणांत ' अशा ( राष्ट्रीय जागृतीला मदत करणाऱ्या ) चळवळीचा अंतर्भाव होतो. ' ( ८-४-३० ). स्वराज्यसंघाची स्थापना करण्याच्या विचाराला हळू हळू मूर्त स्वरूप येऊं लागलें व ता. २३ व २४ डिसेंबर, १९१५, रोजीं पुणें येथें मुंबई, मध्यप्रांत, व वऱ्हाड या प्रांतांतील राष्ट्रीय पक्षांतील प्रमुखांची सभा होऊन स्वराज्य-संघाची घटना ठरविण्यासाठीं एक उपमंडळ नेमण्यांत आलें. या उपमंडळानें संमत केलेल्या घटनेंत संघाचा खालील उद्देश सांगितला आहे. ' होमरूल अथवा स्वराज्य शक्य ' त्या सनदशीर व कायदेशीर मार्गांनीं मिळविण्याचा या संघाचा उद्देश असावा व ' त्या हेतूनें लोकमत जागृत करून तें संघटित करणें अशी या संघाची कर्तव्यव्याप्ति ' असावी. ' ( ४-४-१६ ). बेळगांवच्या प्रांतिक परिषदेनंतर तेथें स्वराज्य-संघाची सभा ना. दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली व संघाची प्राणप्रतिष्ठा करण्यांत येऊन कार्यकारी मंडळहि निवडण्यांत आलें व पुढें योगायोग असा कीं, बेझंटबाईच्या संघाच्या मागून निघालेला हा स्वराज्य-संघ कार्यक्षेत्रांत त्याच्या पुढें जाऊन बसला. वेदान्त वाङ्मयांत बादरायणाच्या मूळ ब्रह्मसूत्रापेक्षां त्यावरील श्रीशंकराचार्यांच्या भाष्याचें महत्त्व जास्त वाढलें, त्याप्रमाणें मूळ बेझंटबाईच्या संघापेक्षां या संघाचाच बोलबाला जास्त झाला. स्वराज्य-संघाची ही चळवळ सुरू झाल्यानंतर तिजवर निरनिराळ्या तऱ्हांचे आक्षेपहि पण येऊं लागले. कोणी म्हणाले, ' काय, होमरूल ? किती हें भयंकर नांव ? आणि तें स्वीकारून आपल्यासारख्या ' दुबळ्या लोकांचें कसें जमणार ? ' दुसरे म्हणाले, ' अहो, आपली राष्ट्रीय सभा ' आहेचना ? मग हें नवें खूळ कशाला ?' आणि राजनिष्ठ लोक म्हणूं लागले, ' हा ' काय राजद्रोह ? साम्राज्यावर लढाईसारखा घोर प्रसंग आलेला आणि हे आपलें ' स्वतःचेंच गाऱ्हाणें गात आहेत.' कांहीं कुत्सित होते ते हिणवूं लागले कीं, ' अहो, ' याच केसरीनें अवतारकृत्यापायीं त्या बेझंटबाईची खरडपट्टी काढलीन्, पण आतां ' पहा तिच्यावरच कसा स्तुतीचा वर्षाव चालू आहे तो ! '

या चारी प्रकारच्या आक्षेपकांतील शेवटच्या प्रकारचे लोक सोडून दिले तरी बाकीचे चळवळीच्या नवखेपणानेंच बुजलेले होते. अर्थातच त्यांचें समाधान करणें हें चळवळीच्या हिताच्या दृष्टीनेंहि आवश्यक असल्याकारणानें त्यांच्या आक्षेपकांना उत्तरेंहि देण्यांत आलीं. ' होमरूल ' या नांवाला पाहूनच घाबरलेल्या

लोकांना उद्देशून स्वराज्य-संघाच्या नाशीक येथील पाहिल्या वार्षिक संमेलनांत बॅ. बॅप्टिस्टा म्हणाले, ' होमरूल या शब्दासंबंधानें नांवें ठेवणारा मला एकहि इंग्रज ' भेटला नाहीं. पण आमच्यांतीलच कांहीं लोक त्याला नांवें ठेवतात व त्याला ' कांहीं अनिष्ट आठवणी चिकटून राहिल्या आहेत असें म्हणतात, हें आश्चर्य होय. ' फ्रेंच राज्यक्रांतीची आठवण होते म्हणून नैसर्गिक हक्क, स्वतंत्रता, समानता या ' गोष्टी कोणीं टाकून दिल्या आहेत काय ? होमरूल हा शब्द वापरतों तो केवळ ' स्वराज्यघटनेची जुनी एक कल्पना सुचविण्याकरितां, रक्तपाताची आठवण व्हावी ' म्हणून नव्हे. स्वराज्य म्हटलें कीं, स्वातंत्र्याची आठवण होते म्हणून नको ! ' होमरूल म्हटला कीं, बहिष्काराची आठवण होते म्हणून नको ! मग आम्ही ' म्हणावें तरी काय ? आमची चळवळ कायदेशीर सनदशीर ठरली आहे. एवढें पुरे ' नाहीं काय ? ' ( २२-५-१७ ).

याच आक्षेपाला स्वराज्यसंघाचे चिटणीस श्री. न. चिं. केळकर यांनींहि आपल्या एका व्याख्यानांत समर्पक उत्तर दिलें. होमरूल हा शब्द भीतिप्रद तर नाहींच पण उलट, ' ब्युरॉक्रसीचा पर्वत व वंडलोरीचा खड्डा हीं दोनहि चुकवून जाऊन ' नेमक्या चालचलाऊ स्वराज्याच्या कल्पनेशीं नेऊन सोडणारा असा होमरूल हा ' शब्द आहे. यूनियन व सेपरेशन या दोहोंच्या हटवादापायीं आयर्लंडचें दोहोंकडून ' मनस्वी नुकसान झालें व कांहींच साधेना. अखेर आयझॅक बट या बुद्धिमान् ' वकील देशभक्तानें होमरूलचें हें धोरण व होमरूल हा शब्द कायम केला. ' ( २६-९-१६ ). यानंतर चळवळीवरचा दुसरा आक्षेप राष्ट्रीय सभेसंबंधानें. पण हाहि आक्षेप अगदींच फोल होता. कोणाहि स्वराज्यवाद्यानें राष्ट्रीय सभेचें महत्त्व कमी करण्याचा प्रयत्न केला नाहीं. चळवळीला प्रारंभ करतांनाच या बाब-तींतील आपली भूमिका बेझंटबाईनीं स्पष्ट केली. ' स्वराज्या 'वरील आपल्या ' न्यू इंडियां 'तील लेखांत बाई लिहितात, ' अशा रीतीनें होमरूल लीग ही संस्था ' कॉंग्रेसपासून अलगच राहील व कॉंग्रेसला तिच्या योगें कोणत्याहि प्रकारें बाध ' येणार नाहीं. वर्षांतून एकच सभा केव्हां तरी होते, यामुळें जीं कामें कॉंग्रेस ' करीत नाहीं अगर जीं कामें कॉंग्रेसला करतां येत नांहींत, अशीं सर्व कामें ही ' होमरूल लीग करील. एका स्वराज्याच्या मागणीशिवाय कॉंग्रेस ज्या ज्या ' किरकोळ सुधारणा मागत आहे त्या सुधारणांशीं ह्या होमरूल लीगला कांहीं ' कर्तव्य नाहीं व सतत वर्तमानपत्रांतून व सभांतून ही लीग फक्त एका स्वराज्या-' चीच चळवळ करीत राहील. ' ( २८-९-१५ ).

बेझंटबाईनीं असें लिहिलें एवढेंच नव्हे, पण इतर मोठ्या लोकांचेंहि मत तसेंच होतें. या चळवळीवरील आपला अभिप्राय व्यक्त करितांना ' अमृतबझार पत्रिका ' म्हणते, ' होमरूलच्या चळवळीचे पुरस्कर्ते कॉंग्रेसच्या मदतीनें ही चळवळ चालू ठेवणार ' आहेत, हें पाहून आम्ही या मंडळींचें अभिनंदन करितों. ' (५-१०-१५ ). स्वतः

केसरीनेंहि वेळोवेळीं आपलें मत पुढें मांडलें आहे. वर्षांतून कांहीं दिवस एकत्र जमून कंठाळी ठराव पसार करून परत फिरण्याच्या राष्ट्रीय सभेच्या कार्यावर केसरीनें बरीच टीका केली आहे. कॉंग्रेसच्या तात्पुरत्या उत्साहाला मोहरमांतील हैदोसाची व कार्याभावात् त्यांत होणाऱ्या ठरावांना इंजिन न जोडलेल्या आगगाडीच्या काळ्या पांढऱ्या डब्यांची उपमा केसरीनें दिली आहे. ( २६-१२-१६ ). राष्ट्रीय सभा व स्वराज्य-संघ या दोन्ही संस्थांनीं एकमेकींना पूरक म्हणून काम करावें असाच केसरीचा हेतु होता. तो स्पष्ट करितांना केसरी लिहितो, ' स्वराज्य-संघ ही एखादी स्वतंत्र संस्था ' नसून ती राष्ट्रीय सभांतर्गत अशी संस्था आहे......स्वराज्य-संघाचा उद्योग ' राष्ट्रीय सभेची चळवळ खेड्यापाड्यांत नेऊन पोहोंचविण्यासाठीं आहे. कित्येक राष्ट्र-' सभावाले स्वराज्य-संघाशीं अनुदारपणाचें धोरण ठेवण्यास लाजत नसले तरी स्वराज्य-' संघानें आपखुषीची मोफत शिलेदारी करून राष्ट्रीय सभेवर उलट उपकारच करावा.' ( २२-५-१७ ). उताऱ्यांतील शेवटच्या वाक्याला आलेला कडवटपणा हा राष्ट्रीय सभा ज्यांनीं 'भरलेली व भारलेली' होती अशा लोकांच्या स्वराज्य-संघाच्या चळवळीविषयींच्या उदासीनतेमुळेंच असावा. ना. शास्त्री यांच्या भाषणाचा अनुवाद करून केसरीनें राष्ट्रीय सभेनें काय केलें पाहिजे हें फिरून एकदां स्पष्ट केलें व तूर्त तशी कांहींच व्यवस्था नसल्यानें स्वराज्य-संघासारख्या संस्थांची जरूरी आहे असेंहि बजाविलें. केसरी म्हणतो, ' राष्ट्रीय सभा ही जोंपर्यंत स्वतः अंगिकारलेल्या अजगरी ' वृत्तीचा त्याग करणार नाहीं व स्वराज्याच्या मागणीचें शिक्षण राष्ट्रांत पसर-' विण्याचा जोराचा प्रयत्न करणार नाहीं, तोंपर्यंत तिनें प्रतिवर्षीं एक दोन तास खर्ची ' घालून केलेला स्वराज्यविषयक ठराव व त्यावरील चर्चा याला लोकसुद्धां विशेष ' किंमत देणार नाहींत. मग सरकार कोठून देईल, हें दिसतच आहे. राष्ट्रीय सभेच्या ' घटनेंत स्वराज्यविषयक चळवळ बारमास अखंड चालू ठेवण्यास वाव आहे किंवा ' नाहीं यांपैकीं कोणतें तरी एक कबूल करणें प्राप्त आहे. तसा वाव असेल तर ' सभेच्या अधिकाऱ्यांनीं ती सर्व चळवळ राष्ट्रीय सभेच्या जबाबदारीवर व आपल्या ' उद्योगानें सुरू केली पाहिजे व तशी चळवळ न होण्यास सदर अधिकाऱ्यांचे ' व्यक्तिगुणच नडत असतील तर त्यांच्या जागीं कार्यक्षम व दक्ष असे दुसरे अधिकारी ' नेमले पाहिजेत. पण दुसरे पक्षीं, ही चळवळ अशी चालू ठेवण्यास जर राष्ट्रीय ' सभेच्या घटनेंत वावच नाहीं असें घेऊन चाललें, तर ही चळवळ सभेच्या बाहेर ' दुसऱ्या कोणी चालू ठेवल्यास तिच्याविषयीं अप्रीति तरी दर्शविली जाऊं ' नये. स्वराज्याची चळवळ ही गोष्ट जर इष्ट असेल तर ती कोठेंहि होवो व ' कोणीहि करो, तितका तो लाभच झाला असेंच खरोखरीं मानलें पाहिजे. ' ( २०-६-१६ ).

महायुद्धामुळें ह्याच वेळीं ही चळवळ करणें अप्रासंगिक आहे, असें म्हणणारे कांहीं लोक होते. केसरीचें म्हणणें असें कीं, युद्धसमाप्तीनंतर कोणीं काय मागावयाचें हें

आधीं ठरवायला नको का ? ' महायुद्धांत यश यावें म्हणूनच हिंदुस्थानास स्वराज्याचे ' हक्क दिले पाहिजेत, असें विलायतचे मुत्सद्दी बोलत आहेत. ' ( ११-६-१८ ). हा कालच स्वराज्याची मागणी करण्यासाठीं कसा योग्य आहे हें दाखवितांना केसरी लिहितो, ' महायुद्धप्रसंगामुळें इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यांतील प्रेमभाव पूर्वीं कधीं ' नव्हता इतका आज उत्कट झाला आहे व कोणत्या तरी रीतीनें हिंदुस्थानचे ' उतराई होणें जरूर आहे अशी इंग्लंडची भावना दृढ झाली आहे. याहून अनुकूल ' अशी संधि स्वराज्याची मागणी करण्यास दुसरी कोणती येणार ?'(२६-१२-१६). चालू युद्धाचा फायदा घेऊन कांहीं लोकांनीं ही चळवळ साम्राज्याला विघातक आहे असा गिल्ला सुरू केला, त्याला केसरीनें पुढीलप्रमाणें समर्पक उत्तर दिलें आहे :—' स्वराज्यासाठीं, साम्राज्यांतर्गत स्वराज्यासाठीं, केलेली चळवळ कितीहि ' उत्कट असली तरी तीपासून साम्राज्याला कधीं तरी धोका येण्याचा संभव आहे ' काय ? फुटाणे करतांना खापरांत भाजत ठेवलेले हरबरे कितीहि उंच उडाले ' तरी त्यांच्या धक्क्यानें ज्याप्रमाणें कधींहि खापर फुटण्याचा संभव नसतो, तद्वतच ' साम्राज्यांतर्गत चळवळीची गोष्ट आहे. ' ( १९-६-१७ ). हल्लींच्या चळवळीचें ध्येय काय, ती या वेळीं करणें अप्रासंगिक कां नाहीं व तीमुळें साम्राज्यालाहि कसा धोका पोहोंचणार नाहीं हें खालील उताऱ्यांत केसरीनें एकत्रच स्पष्टपणें सांगितलें आहे :—' आमच्या देशांतील अंतर्व्यवस्थेचें काम आम्ही पाहाणार किंवा ' तें पाहाण्याचा अधिकार आमचा असून तें आम्हांला मिळालें पाहिजे, अथवा वर ' सांगितल्याप्रमाणें आम्ही आमच्या हातानें जेवणार अशी जी राजकीय आकांक्षेची ' लाट सध्यां उसळली आहे, ती अगदीं नैसर्गिक, यथाकालोद्भव आणि न्याय्य असून ' ब्रिटिश साम्राज्यरूपी महासागराच्या मर्यादेचें त्यामुळें उल्लंघन होईल अशी भीति ' बाळगण्याचें कारण नाहीं. स्वराज्याची ही मागणी जितकी लोकांच्या हिताची ' तितकीच साम्राज्याच्या हिताची असून कालतः प्राप्त झालेली आहे. आणि अशा ' वेळीं हिंदुस्थानच्या भावी राज्यपद्धतीबद्दल आमचे विचार आम्ही जर ब्रिटिश ' मुत्सद्द्यांपुढें किंवा पार्लमेंटपुढें मांडले नाहींत, तर बैल गेल्यावर झोंपा करणाऱ्या ' मूर्ख माणसाच्या पंक्तीस आम्हांस बसावें लागेल हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तात्पर्य, ' होमरूल लीगची किंवा स्वराज्य-संघाची हल्लीं जी स्थापना झाली आहे ती साम्रा-' ज्याला बळकटी आणण्याकरितांच झालेली आहे. यांत स्थानिक सरकारांस ' किंवा स्थानिक सरकारी अधिकारी वर्गास त्रास देण्याचा बिलकुल हेतु नाहीं. ' इतकेंच नव्हे तर या अधिकाऱ्यांजवळहि ही मागणी करावयाची नाहीं. आम्ही ' जें काय मागणार तें बादशहांजवळ किंवा पार्लमेंटजवळ आणि तेंहि पूर्ण कायदे-' शीर रीतीनेंच, म्हणजे पार्लमेंटमध्यें एखादें कायद्याचें बिल आणूनच मागणार ' आणि जें मागणार तेंहि इतक्या वर्षांच्या शिक्षणानें जें स्वभावतः प्राप्त झालें ' आहे आणि जें ब्रिटिश राज्यपद्धतीच्या उद्देशास अनुकूल आहे, किंबहुना हल्लींच्या

' ब्रिटिश राज्यपद्धतीचें एक प्रकारचें ध्येयच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं,
' तेंच मागणार. ' ( २७-६-१६ ).

पूर्वी सांगितल्याप्रमाणें शेवटचा आक्षेप वैयक्तिक संबंधाचा. हा आक्षेप, त्या ठिकाणींच म्हटल्याप्रमाणें कुत्सित लोकच पुढें आणीत असत. असल्या आक्षेपांना उत्तर देण्यापासून तादृश फायदा कांहींच नसला तरी याहि आक्षेपाला केसरीनें मार्मिक उत्तर दिलें आहे. राजकारणांत भाग घेणाऱ्या व्यक्तींचे परस्पर संबंध कशा प्रकारचे असावेत हें केसरीनें उत्तम रीतीनें विशद केलें असून राजकीय चळवळींत पडणाऱ्या प्रत्येक गृहस्थानें त्यापासून सर्व प्रसंगीं बोध घेण्यासारखा आहे. केसरी लिहितो, ' ज्या विषयांतलें भांडण त्या विषयापुरतें ठेवावयाचें हा सार्वजनिक काम
' करणाऱ्या मनुष्याच्या अंगीं एक मोठाच गुण असावा लागतो....सार्वजनिक
' काम हें अखंड, एकसंधी धूत वस्त्राप्रमाणें नसतें. हें वस्त्र जसें दशीच्या
' एका टोकास विटाळ झाल्याबरोबर सर्व विटाळलें जातें तसें सार्वजनिक
' काम विटाळलें जात नाहीं. हल्लींच्या काळीं सुचणारी उपमाच द्यावयाची झाली
' तर सार्वजनिक काम बुडाशीं लढाऊ गलबताप्रमाणें आहे. म्हणजे त्याच्या
' बुडाशीं स्वतंत्र व एकमेकांशीं संबंध नसलेलीं अशीं अनेक दालनें ( वॉटर-टाइट
' कंपार्टमेंट्स् ) असतात. एक दालन फुटून त्यांत पाणी शिरलें तरी गलबताचा
' सर्व तळ जलमय न झाल्यानें तें बुडत नाहीं. सार्वजनिक कामांतलें खरें मर्म ज्यांना
' माहीत आहे, ते एका कामांतील मतभेदाचा विटाळ दुसऱ्या कामास सहसा
' होऊं देत नाहींत. ............कोणत्याहि दोषापासून अलिप्त असा मनुष्य
' हुडकूं जाणें म्हणजे नदीचें पाणी ओसरल्यावर मग कोरड्या पावलांनीं परतीराला
' जाण्याची आशा करण्यासारखें आहे. म्हणून सदोष मनुष्याकडूनहि राष्ट्रीय कार्यांत
' जितका उपयोग करून घेतां येण्यासारखा असेल तितका आदरपूर्वक व आस्थेनें
' करून घेणें हाच शहाणपणा होय. ' ( १२-१०-१५ ).

स्वराज्याच्या मागणीची चळवळ सुरू झाली खरी, पण मागण्यांत येणाऱ्या तीन अक्षरी **स्व-रा-ज्य** शब्दांत कोणत्या गोष्टी सामावलेल्या आहेत, हें जनतेला किंबहुना सरकारलाहि माहीत करून देणें जरूरीचें होतें. शिवाय साध्य वस्तूची सुस्पष्ट कल्पना आल्याशिवाय साधनांचीहि निवड करणें अशक्य होतें. हाच विचार लक्षांत आणून केसरीनें या विषयावर एक लेखमाला लिहिली व बजाविलें कीं, ' हें पहा, असलें
' स्वराज्य आम्हांला हवें. ' दुसऱ्या लेखांत सद्यःस्थितीचें वर्णन करितांना केसरी लिहितो,
' सरकार करील तें प्रमाण अशी चोहोंकडे व्यवस्था होऊन लोकांची अवस्था
' एखाद्या धनिक जमीनदाराच्या कोंडवाड्यांतील गुराढोरांप्रमाणें झाली. '
(७-१२-१५). या लेखांतून भारतमंत्र्याच्या कौन्सिलची अनवश्यकता, हिंदुस्थान सरकारचें कार्यकारी मंडळ विधिमंडळाला जबाबदार असण्याची जरूरी प्रतिपादली असून पूर्ण प्रांतिक स्वायत्ततेची मागणी केली आहे. या चर्चेवरून केसरीचें राज्य-

घटनेविषयींचें सूक्ष्म ज्ञान दृष्टोत्पत्तीस येतें. राज्यसुधारणेची मागणी करीत असतांना आमच्या पैशांची व्यवस्था पाहण्याचा अधिकार आम्हांला पाहिजे, हें केसरीनें स्पष्ट करून सांगितलें आहे. पुढें जबाबदारीची राज्यव्यवस्था देण्याचें बोलणें सुरू झाल्यावर केसरी म्हणतो, ' जबाबदारीचें कन्यादान करण्यास सरकार तयार असेल ' तर तें सालंकृत केलें पाहिजे. तिच्या गळ्यांत नुसतें मणि-मंगळसूत्र बांधून ' चालावयाचें नाहीं. ही सरकारी जबाबदारीची राजकन्या आमच्या घरीं नांदा- ' वयाची, तर तिच्या अंगावर भरपूर दागदागिने पाहिजेत व दिमतीला नोकरचाकर ' पाहिजेत. आणि या दागिन्यांचा पैसाहि इतर कारणानें आम्ही सरकारपाशीं ' ठेवलेल्या पैकींच आहे.......मात्र जबाबदारी आमच्या हातीं आणि पैशाच्या ' पिशवीचें तोंड सरकारच्या हातीं ही गोष्ट मान्य होणें शक्य नाहीं. ' ( १२-२-१८ ). १९१५ सालीं लिहिलेल्या लेखमालेंतहि हीच गोष्ट केसरीनें स्पष्ट केली आहे. ' आम्हांस जें स्वराज्य पाहिजे आहे तें असल्या प्रकारचें नव्हे. लोकांच्या पुढा- ' ऱ्यांच्या हातीं स्वतंत्र अधिकार पडून त्यांत अधिकाऱ्यांच्या नव्हे तर लोकांच्या ' देखरेखीखालीं, लोकांच्या सोयीकरितां, लोकांच्या पैशाची व्यवस्था ज्या रीतीनें ' लावतां येईल अशा प्रकारचें स्वराज्य आम्ही मागत आहों. हें स्वराज्य जर आम्हांस ' द्यावयाचें असेल तर निदान सर्व प्रांतिक व्यवस्था तरी लोकनियुक्त पुढाऱ्यांच्या ' तंत्रानेंच व्हावयास पाहिजे. गांवांतील व्यवस्था गांवच्या लोकांच्या तंत्रानें, ' तालुक्यांतील व्यवस्था तालुक्यांच्या लोकांच्या तंत्रानें, जिल्ह्यांची व्यवस्था जिल्ह्यां- ' च्या लोकांच्या तंत्रानें आणि प्रांतांतील किंवा इलाख्यांतील व्यवस्था इलाख्यांतील ' लोकांच्या तंत्रानें होणें हें यांतील बीज होय आणि कित्येकांच्या मतें स्वराज्यास ' जी सुरुवात करावयाची ती ग्रामसंस्थेपासून झाली पाहिजे, हें म्हणणें एकांशीं ' खरें आहे. ' ( १४-१२-१५ ). हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळाच्या रचनेची चर्चा करतांना केसरीनें लिहिलें कीं, ' या बाबी ( लष्कर, आरमार वगैरे ) ' कधींच लोकनियुक्त कौंसिलच्या हातांत येऊं नयेत असें आमचें म्हणणें नाहीं. ' कालान्तरानें, म्हणजे स्वराज्याची व्यवस्था जसजशी अधिकाधिक अंमलांत येईल ' त्या मानानें यांपैकीं बऱ्याच गोष्टी लोकांच्या तंत्रानें व्हावयास पाहिजेत. ' ( २१-१२-१५ ). यावरून केसरीची दूरदृष्टि आणि तत्त्व व व्यवहार यांची सांगड घालण्याची हातोटी, ह्या दोन्हीहि गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून दिसून येतात. जबाबदारीची राज्यपद्धति मागूं लागतांच हल्लींचे अधिकारी गुरकावूं लागले व चळवळीवर वृथारोप करूं लागले. त्याला उत्तर देतांना बेळगांवच्या व्याख्यानांत लो. टिळकांनीं म्हटलें, ' हिंदुस्थानचा राज्यकारभार करण्यास अधिकारी नकोत असें आम्ही ' म्हणत नाहीं, तर ते अधिकारी लोकमताला जबाबदार असे असावे, एवढेंच आमचें ' म्हणणें आहे. ही व्यवस्था बदलून त्या ठिकाणीं लोकमताला जबाबदार अशी ' चांगली व्यवस्था करावी अशी मागणी करणें म्हणजेच स्वराज्य मागणें होय.

' आम्हांला इंग्रजी राज्य नको असें नाहीं, तर आम्हांला ही बेजबाबदारीची राज्य-
' पद्धति नको आहे.' ( ९-५-१६ ). मागणीचें स्वरूप स्पष्ट करितांना केसरीनें हेंहि बजावून ठेविलें कीं, ' स्वराज्याच्या हक्काची मागणी म्हणजे अधिकारी वर्गाची सत्ता
' कमी करण्याचीच मागणी होय. ' ( ७-१२-१५ ). महायुद्धाच्या समुद्रमंथनांतून स्वयंनिर्णयाचें तत्त्व बाहेर पडल्यानंतर हिंदुस्थानच्या मागणीच्या बाबतींत केसरीनें त्याचाहि तात्काल पुरस्कार केला. ' पहिली पायरी किती भरीव असावी व पुढच्या
' पायऱ्यांच्या कालमर्यादा कोणत्या असाव्यात हें ठरविण्याचें काम नोकरशाहीकडे,
' हिंदुस्थान सरकाराकडे किंवा स्टेट सेक्रेटरीकडे पार्लमेंटानें न ठेवतां तें स्वसंमतीच्या
' तत्त्वाप्रमाणें हिंदुस्थानच्या लोकांवरच सोंपविलें पाहिजे.' (१-४-१९ ). लहानसहान मागणी न करितां एकदम एवढी मोठी मागणी करणें अप्रयोजकपणाचें आहे असें म्हणणाऱ्यांनाहि लो. टिळक यांनीं आपल्या व्याख्यानांत उत्तर दिलें. ते म्हणाले,
' लहान मागण्या पुऱ्या होत नाहींत, म्हणूनच त्या सर्वांची स्वराज्य ही गुरुकिल्ली
' हातांत घेण्याच्या उद्देशानें आम्ही ही मागणी मागत आहों.' ( २३-५-१६ ).

साध्यरूप मानलेली ही स्वराज्याची कल्पना सत्यसृष्टींत आणावयाला सर्व देशांत केवढी प्रचंड चळवळ करावी लागेल याची जाणीव केसरीला पूर्णपणें होती. आखाड्यांत उतरलेल्या पहिलवानाला जोडीदाराचा दम उखडायला किती वेळ लागेल व त्यासाठीं नेमके कोणते डाव करावे हें माहीत असलें तरच तो कुस्ती जिंकू शकतो. राजकीय हक्क देण्याच्या बाबतींतील सरकारी धोरण केसरीच्या पुरेपूर ओळखीचें होतें. ' लोकांनीं आरडून ओरडून, तोंडपिटी करून, एखादा हक्क मागावा,
' सरकारनें प्रथम मागणीचा उपहास करावा, मग बुद्धिभेद करून, फूट पाडून,
' नकार जाहीर करावा आणि आतां शेवटीं लोक ऐकतच नाहींत, कांहींच न
' दिलें तर देशांत असंतोष व अस्वस्थता माजणार, लोक बेदिल होणार, दंगे-
' धोपेहि कदाचित् होणार, अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं म्हणजे,
' मग कांहींसें देऊं करावें ! ...... लोकांची मागणी पुढें धांवत जात असते
' व सरकारची देणगी मागून रेंगाळत येत असते, अशी जी मामुली पद्धत
' पडून गेली आहे, तिला अनुसरूनच हल्लींच्या स्वराज्याधिकाराच्या मागणीची व
' देणगीचीहि गोष्ट झाली आहे. ' ( २१-८-१७ ). चळवळ धडाक्यानें सुरू झाली. दौरे, सभा, व्याख्यानें यांची सरबत्ती झडूं लागली. स्वराज्यविषयक वाङ्मयहि निर्माण करण्याचे प्रयत्न सुरू झाले. बेझंटबाईसारख्या पुढाऱ्यांना परप्रांतांत जावयाची बंदी व शेवटीं अटकहि झाली. लोकमान्यांवरहि राजद्रोहाचा तिसरा खटला होऊन गेला. धार्मिक त्रिस्थळी यात्रेप्रमाणें कायदा, कचेरी, कारावास ही राजकीय त्रिस्थळीहि कांहीं जणांना करावी लागली. सारांश, चळवळीच्या वेळीं उभय पक्षीं करावयाचे व करवावयाचे ते सर्व प्रकार थोड्या फार प्रमाणांत झाले. नाटक मंडळींच्या नेहमींच्या नाटकांप्रमाणें, दडपशाहीचे सरकारी प्रकारहि

कायमचेच असतात. क्वचित् रंगभूमीवर येणाऱ्या नव्या नाटकांप्रमाणें राजकारणाच्या रणभूमीवरहि ' लाठीबाजो 'चा नवा प्रयोग होतो इतकेंच ! दडपशाही करितांना सरकारला चळवळीच्या भीषणतेचीं म्हणून कांहीं तरी ' निमित्तें ' पुढें करावीं लागतातच. भारतमंत्री चेंबर्लेन म्हणूं लागले, ' या चळवळींत चालू राज्यपद्धतीची ' नाचक्की फार होते. ' पण केसरीनें स्पष्ट सांगितलें कीं, तें सर्वस्वीं अपरिहार्य आहे आणि शिवाय हा कांहीं राजद्रोह नव्हे. मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड पेण्टलंड यांनीं ही चळवळ ' एकतर्फी ' आहे असा शेरा मारला. केसरीचें म्हणणें असें कीं, तर मग ती दुतर्फी करण्याची जबाबदारी सरकारवरच आहे. या लाटसाहेबांना वाटे कीं, ' होमरूल 'ची नुसती आशा दाखवून लोकांची निराशा कां करावी ? पण केसरीचा युक्तिवाद कांहीं खुंटला नाहीं. निराशा होणें ही मानसिक अवस्था असल्या-कारणानें उघड चर्चा बंद पडली तरीहि ती होणारच. मग तिच्या निवारणासाठीं ' विलायतेहून एकादें स्वातंत्र्यज्वरांकुशाचें रसायन आणून तें हिंदुस्थानांतील ' पिण्याच्या पाण्यांत टाकण्यांत येणार असल्यास कोणास ठाऊक ! ' असें केसरीनें लिहिलें. असें होतां होतां शेवटीं राष्ट्रीय सभेची वेळ येऊन ठेपली. त्या सालचें अधिवेशन लखनौ येथें भरणार होतें व त्यांत राष्ट्रीय पक्षहि सामील होणार होता. ठरल्याप्रमाणें राष्ट्रीय सभा भरली व तिनें स्वराज्याचा ठराव एकमतानें संमत करून ' स्वराज्याचें निशाण रोवलें ! ' बंगालचे अनभिषिक्त सम्राट् बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं स्वराज्याचा ठराव मांडला व त्याला महाराष्ट्राचे ' सिंह ' लो. टिळक यांनीं अधिकारवाणीनें अनुमोदन दिलें. त्या सर्व प्रसंगाचें वर्णन केसरीनें असें केलें आहे. ' लखनौ येथें जमलेल्या राष्ट्रीयसभावाल्यांचा आवेश, उत्साह व ' निश्चय हीं लक्षांत घेतलीं असतां या समारंभास स्वराज्याची मुहूर्तमेढ रोंधण्याच्या ' समारंभापेक्षां स्वराज्याचें निशाण रोंवण्याच्या समारंभाचीच उपमा अधिक ' शोभेल, ह्यांत शंका नाहीं....... ' ( २-१-१७ ).

इकडे सरकारची दडपशाही जास्त जोरानें सुरू झालेली पाहून तिला प्रत्युत्तर म्हणून ' स्वराज्यवादाचा सत्याग्रह ' करण्याचें ठरलें व त्याप्रमाणें ' स्वराज्याची ' मागणी सरकारनें बेकायदेशीर ठरविली. तरी आम्ही त्यापासून पराङ्मुख होणार ' नाहीं व त्या कृत्याचे परिणाम भोगूं, ' अशा प्रतिज्ञेवर सह्या करणाऱ्या हजारों लोकांचीं नांवें केसरींत प्रसिद्ध करण्यांत आलीं. या निषेधानें सरकार ' शरमणार किंवा वरमणार ' नाहीं हें दाखवितांना केसरी लिहितो, ' निषेधप्रदर्शक ठरावांचे ' शब्द आम्ही हिंदी लोकांनीं पुनःपुनः उच्चारून इतके घोटले आहेत कीं, मनाला ' बोचणारें व लागणारें असें एकहि टोंक किंवा कुसळ त्यांच्यावर आतां शिल्लक उरलें नाहीं. ' ( ३-७-१७ ). या निषेधासाठीं जूट झाली असली तरी पण ' पक्ष-' भेदाचा नायनाट किंवा एकी हीं साधनरूप आहेत व साध्य म्हटलें म्हणजे लोक-' मताच्या टांचेखालीं दडपशाहीला तुडवून राष्ट्राला स्वराज्य मिळविणें हें आहे. '

(किता). 'एका गृहिणीला 'होमरूल' न मिळाल्यानें ती भग्नहृदय होत्साती अशक्त-
'वधास कशी पात्र झाली, व तें 'होमरूल' ( स्वराज्य-गृहराज्य ) मिळविण्यासाठीं
'तिला किती अपूर्व स्वार्थत्याग करावा लागला याचें करुणरसपूर्ण बहारीचें व उदात्त
'चित्र ह्या हृदयंगम कादंबरींत रेखाटलें आहे. प्रत्येक 'होमरूलर' पतिपत्नींनें ही
'कादंबरी अवश्य वाचावीच. ' ( ७-८-१७ ) . हें वर्तमानसार नसून 'प्रेमळ
सवत ' ह्या कादंबरीची जाहिरात आहे हें लक्षांत घेतलें असतां होमरूलचे चळवळीचें
वारें जनतेंत किती पसरलें होतें तें समजेल. परदेशांत व विशेषत: विलायतेंत चळवळ
करण्याची जरूरी केसरीनें प्रतिपादिली आहे. ही चळवळ करणें म्हणजे भारतमंत्र्याच्या
गांठी घेणें नसून लोकांत आपल्या मागणीचा प्रचार करणें हें होय. विलायतेंतच
अखेर सर्व गोष्टींचा निकाल लागणार असल्यानें व आपले हितशत्रु तेथें आपणां-
विरुद्ध विष पेरीत असल्यानें ह्या चळवळीची आवश्यकता विशेषच आहे. केसरीनें
प्रतिपादिलें कीं,' हिंदुस्थानांतील चळवळ हें रांधणें व विलायतेंतील चळवळ हें वाढणें,
' अशींहि नांवें त्यांना देतां येतील. हिंदी लोकांनीं राजकीय हक्क मिळविण्याची
' चळवळ कशी काय केली याची परीक्षा, विलायतेंतील लोकमताचे भोक्ते पार्ल-
' मेंटमध्यें किंवा पार्लमेंटच्या बाहेर ती चळवळ चोखतांना मिटक्या मारतात किंवा
' तोंडें अंबुस करतात किंवा तिखट लागल्यामुळें पाणी मागतात यावरून व्हावयाची
' असते. ' ( ५-२-१८ ). हें सर्व ओळखूनच सरकारनें लो. टिळकांना विलायतेंत
जावयाची परवानगी देतांना नसतीं कुलंगडीं उपस्थित केलीं. याच सुमारास स्वराज्य-
संघाची एक शाखा अमेरिकेंतहि स्थापन करून डॉ. संडरलंड यांना अध्यक्ष व डॉ.
हर्डीकर यांना सेक्रेटरी नेमण्यांत आलें होतें.

चळवळीची भरती अशा तऱ्हेनें भरूं लागली असतां, ती अडविण्याचा प्रयत्न
जुन्या इंग्लंडांतील कॅन्यूट राजाप्रमाणें कांहीं निमसरकारी किंवा सरकारजमा
लोकांनीं करून पाहिला. यांपैकीं पहिले विरोधक येथील युरोपियन व अँग्लो-इंडियन
हे होत. स्वराज्य मिळण्यापासून हल्लीं चालू असलेल्या त्यांच्या फाजील बडे-
जावालाच काट मिळणार होता. त्यांचा समाचार केसरीनें पुढील रीतीनें घेतला
आहे ! ' युरोपियन अधिकाऱ्यांचा हिंदुस्थानशीं संबंध व उडत्या पांखरांचा
' झाडाशीं संबंध सारखाच आहे......अँग्लो-इंडियन लोकांना ओरडण्याला युरो-
' पियन लोकांइतकीहि सबब नाहीं. कारण एक तर ते इकडील स्थायिक
' रहिवाशी आहेत व हाडामांसानें निम्मेशिम्मे हिंदीच आहेत व त्यांचा धर्म
' ख्रिस्ती व भाषा इंग्रजी असली तरी हिंदुस्थानांत विविध धर्मांचे व विविध भाषा
' बोलणारे जे इतर पुष्कळ वर्ग आहेत, त्यांच्या हितसंरक्षणाची स्वराज्य देतांना जशी
' खबरदारी घेतली जाईल, तशीच अँग्लो-इंडियन लोकांची घेतली जाईल.....
' कलकत्ता येथील टाऊन हॉलच्या सभेंत पंचमेळ पंचरंगी गोऱ्या लोकांनीं मिळून
' हिंदी स्वराज्याविरुद्ध जी ओरड केली तिला उद्देशून आम्हांस यथार्थतेनें असा

' प्रश्न करतां येईल कीं, हिंदुस्थानांत येऊन केवळ पैशाच्या मागें लागलेल्या
' आगंतुक अशा ग्रीक, आर्मिनियन, ज्यू, फ्रेंच, रशियन अशा परकीयांना हिंदी
' स्वराज्याच्या गाड्यास खीळ घालण्याचा काय अधिकार आहे?' (२-१०-१७).
चळवळीला विरोध करणारा दुसरा वर्ग सरकारजमा आशाळभुतांचा. लांचलुच-
पतीचीं चार शितें टाकलीं कीं भोंवतालीं नाचावयाला भुतावळ मिळूं शकते, हा
तर या दुर्दैवी भूमीला एक शापच आहे. या लोकांची बोळवण केसरीनें खालील
निंदागर्भ शब्दांत उपहास करून केली आहे. ' मुंबईच्या ॲंटी-होमरूल लीगचें
' बाळंतपण कोठवर आलें आहे समजत नाहीं. पण मद्रासेकडे ब्राह्मणेतर वर्गानें
' होमरूलच्या चळवळीविरुद्ध जणूं काय एक संघच निर्माण करून एक दैनिक
' वर्तमानपत्रहि काढलें आहे. इतकेंच नव्हे तर मद्रास इलाख्यांतील कांहीं राजे
' लोकांनाहि कधीं नव्हे ती राजकारणाच्या वादांत पडण्याची स्फूर्ति झालेली असून
' ते आतां लेख लिहूं लागले आहेत व भाषणें करूं लागले आहेत ! कुरूपम व
' कोलिंगड येथील राजांनीं आपल्या प्रांतांतील आपल्या प्रमुख राष्ट्रीय पुढाऱ्यांवर
' शरसंधान करून लोकपक्षाचा पाडाव करण्यास कंबर बांधलेली आहे. सोन्याच्या
' पिंजऱ्यांतील या मुक्या पोपटांना एकदम वाचा फुटलेली पाहून कोणासहि सकृ-
' द्दर्शनीं आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. पण ' मूकं करोति वाचालं पंगुं
' लंघयते गिरीन् ' अशा प्रकारचें सामर्थ्य ' प्रभु 'कृपेंत नाहीं असें कोण
' म्हणेल ? असमर्थांना समर्थ व अपात्रांना सत्पात्र ठरवून त्यांनाच जर खरें लोकमत
' व्यक्त करण्याचा मान सरकार देऊं लागलें तर राजे लोक हेच लोकाग्रणी म्हणून
' मिरविणार यांत काय नवल ? पण ज्यांना स्वतःची प्रजा नाहीं असे राजे, ज्यांना
' शिक्षण नाहीं असें विद्वान्, ज्यांना संपत्ति नाहीं असे श्रीमान्, ज्यांना वरदार
' नाहीं असे घरंदाज, ज्यांना मनाचा मोठेपणा माहीत नाहीं असे सरदार, चार-
' चौघांत ज्यांना कधीं जीभ हलविणें माहीत नाहीं असे वक्ते, ज्यांना स्वतःला
' चार ओळीहि लिहितां येत नाहींत असे कलमबहाद्दर, ज्यांनीं मागसलेपणामुळें
' समाजाची पिछाडी कधींहि सोडली नाहीं असे पुढारी, असलें जय्यत सैन्य
' घेऊन सरकार स्वराज्याच्या चळवळीवर स्वारी करण्यास निघाल्यांवर त्याला
' कितपत जय मिळणार हें दिसतेंच आहे. ' ( ३-४-१७ ).

केसरीनें पूर्वींच सांगितलेल्या स्वराज्य-संघाच्या सर्व पायऱ्या ओलांडल्या. नंतर शेवटीं सरकारी योजनाहि पण डोकावूं लागली. पण जें कांहीं द्यावयाचें तें स्पष्ट-पणानें सांगून टाकण्याऐवजीं अप्रत्यक्ष रीतीनें दुसऱ्याकडून तें सांगावयाचें, अशी सरकारची नेहमींचीच पद्धत आहे. तिच्यावर केसरीनें केलेली टीका वाचून कसल्याहि गंभीर वाचकाला हंसें आल्याशिवाय राहणार नाहीं. केसरी म्हणतो, ' एखाद्या
' गोषांतील स्त्रीनें थोडें पडद्याआडून, थोडें तोंडास पदर लावून, थोडें मुलाच्या
' तोंडून व उरलेलें उपाध्याकडून बोलावें व इतकें होऊनहि बोलणाराचें खरें मनोगत

' काय हें कळूंच नये अशा फाजील मर्यादखोरपणाची—मर्यादा कसली, पण फाजील ' लपंडावखोरपणाची—रीति सरकार नेहमीं अनुसरीत असतें. ' ( २१-८-१७ ). अशा निरानिराळ्या योजना पुढें येऊं लागल्यावर साहजिक प्रश्न असा आला कीं, ह्या योजना पुष्कळ झाल्या, पण शेवटीं हातांत काय पडणार ? केसरीनें निक्षून बजाविलें कीं, ' राजकीय वातावरणांत योजनांचे ढग पुष्कळ आले तरी कार्यक्षेत्रावर ' प्रत्यक्ष जलसिंचन होऊन कृतीला जोंपर्यंत एकहि अंकुर फुटलेला दिसत नाहीं ' तोंपर्यंत या घनांच्या छायेचा कोणास आनंद न वाटतां ते त्यास दुर्दिनच म्हणणार ! ' कागदी योजनांचे सतरा वळसे घातले तरी कृतीची जोंपर्यंत एकहि गांठ पडली ' नाहीं तोंपर्यंत ते सगळे वळसे फुकटच जाणार. ' ( २१-८-१७ ). ' स्वराज्या 'चे ऐवजीं शेवटीं ' मॉंटेग्यु-चेम्सफर्ड ' सुधारणा बाहेर पडल्या. तेव्हां केसरीनें वेचक मथळे देऊन जे दोन अग्रलेख लिहिले, त्यांत त्यांचें परीक्षण केलें आहे. ' उजाडलें पण सूर्य कोठें आहे ? ' आणि ' जनाब, देहली तो बहोत दूर है, ' ( ९ व १६-७-१८ ), ह्यांत तो भाग आला असला तरी त्यांचा विचार या लेखांत करावयाचा नाहीं.

लो. टिळक यांच्या मृत्यूनंतर स्वराज्य-संघाप्रीत्यर्थ त्यांनीं केलेल्या अव्याहत प्रयत्नांचे आदरार्थ वसई येथें ता. ८-५-२१ रोजीं भरलेल्या सभेंत ' या संघाचें नांव ' ता. ९-५-२१ पासून ' टिळक-स्वराज्य-संघ ' असें असावें. ' हा ठराव मंजूर करण्यांत आला व लोकमान्यांच्या शिकवणुकीप्रमाणें राजकीय चळवळ करावयाचें ठरून कॉंग्रेसचा कार्यक्रम, परदेशची चळवळ आणि स्वराज्यविषयक वाङ्मयनिर्मिति या गोष्टींकडे विशेष लक्ष देण्याचें ठरलें. ( १७-५-२१ ).

स्वराज्य-संघाची चळवळ ही केसरीच्या भारतांतील एक पर्व आहे. या चळवळीचें वैशिष्ट्य दाखवितांना वंगभंगाच्या चळवळीशीं तिची तुलना करून केसरी म्हणतो, ' कर्झनशाहीच्या अखेर झालेल्या चळवळींत व आज स्वराज्याकरितां जी ' चळवळ करावयाची आहे तिच्यांत बराच महत्त्वाचा फरक आहे. तो हा कीं, ' पूर्वींची चळवळ अपमान धुवून काढण्याची होती, आजची चळवळ नवीन ' सनदशीर हक्क मिळविण्याची आहे. अर्थात् पूर्वींच्या चळवळींत रागद्वेषादि मनो- ' विकारांचें मिश्रण झालेलें होतें, पण आजच्या चळवळींतले मनोविकार उभयपक्षीं ' अद्यापि शुद्ध आहेत. ' ( २६-१२-१६ ). या चळवळीची फलश्रुति सांगावयाची तर ती स्वातंत्र्यवादाचे आद्य पुरस्कर्ते व महाराष्ट्रांतील सव्यसाची पुढारी ' काळ '-कर्ते कै. शिवरामपंत परांजपे यांच्या ' स्वराज्या 'वरीलच व्याख्यानाच्या कांहीं वाक्यांत सांगतां येईल. ' संघाच्या प्रवर्तकांच्या चळवळीमुळें देशाच्या सर्वसामान्य ' जनतेंत स्वराज्याची भावना उत्पन्न झाली. ......सर्व देशभर अशा प्रकारची ' भावना उत्पन्न झाल्यास लोकांचें सर्वस्व हीच स्वराज्य-संघाची वर्गणी आणि ' स्वयंस्फूर्तीनें हक्क प्राप्त करून घेण्याकरितां लोक जो मार्ग पत्करतील तीच ' संघाच्या कार्याची दिशा असें म्हणावें लागेल. ' ( ६-५-१९ ). केसरीच्याच

' शब्दांत केसरीची या चळवळीविषयींची कामगिरी दाखवावयाची झाली तर
' हें कालमाहात्म्य तीनचार वर्षांपूर्वींच पुरें ओळखून, आपसांतील दुही मिटवून
' होमरूलची चळवळ सुरू करून काळाचे ओघाला हिंदुस्थानचे कार्याला जुंपण्याची
' कर्तबगारी, ' ( २६-३-१८ ), केसरीनें केली असें म्हणतां येईल. किंवा राज-
कारणांत ' भर दोनप्रहरीं पडद्याचे सावलींत वाटणारा बागुलबोवा ' नाहींसा करून
' पहांटेच्या शीतल समयीं उदयास येत चाललेल्या स्वराज्याचा उत्साहजनक
' उजेड दृष्टीस ' पाडला, ( २-४-१८ ), असें म्हणावें. असो. महाराष्ट्राच्या मागील
परंपरेला धरून अशाच तऱ्हेची उज्ज्वल कामगिरी यापुढेंहि करण्याला लोक-
मान्यांच्या ' केसरी'ला परमेश्वरानें चिरायुष्य व सामर्थ्य द्यावें एवढीच त्याजपाशीं
प्रार्थना करून हातीं घेतलेला हा विषय पुरा करितों.

---

# राजकीय विचारांची उत्क्रांति

( इ. स. १८८० ते १९०२ )

[ श्री. दत्तात्रेय विष्णु आपटे, बी. ए. ]

**१. विषयाचें स्वरूप :—** गेल्या पन्नास वर्षांतील केसरीचे अंक चाळून पाहिले असतां त्यांत राजकीय विचारांची मांडणी अनेक प्रसंगांनीं व अनेक रीतींनीं केलेली आढळते. कधीं संपादकांनीं यासंबंधींचीं आपलीं मतें स्वतंत्रपणें प्रतिपादन केलीं आहेत, कधीं विरुद्ध पक्षाचें म्हणणें खोडण्यासाठीं कांहीं तत्त्वें सांगितलीं आहेत आणि कधीं कधीं तर परदेशांतील एखाद्या नामांकित लेखकाचे प्रसंगोचित विचार सारांशरूपानें मांडून राजकीय विचारास चालना दिली आहे. आणि हे विचार प्रासंगिक स्वरूपाचे असोत किंवा तात्त्विक स्वरूपाचे असोत, ते निरनिराळ्या अवस्थांचे घटक असून देखील त्यांच्यांत कालदृष्ट्या एक प्रकारचा धागा अखंडपणें ओंवलेला आहे, म्हणजे हे राजकीय विचार निरनिराळ्या अनुभवानें उत्क्रांत होत आले आहेत. ही उत्क्रांति कोणत्या क्रमानें झाली ? दोन पिढ्यांपूर्वींची आणि आजची राजकीय विचारसरणी यांत जें अंतर पडलें आहे तें अंतर लक्षांत घेतांना कोणते टप्पे किंवा पायऱ्या ओलांडल्या गेल्या ? इत्यादि प्रश्नांचा विचार या लेखांत स्थूल मानानें १८८० ते १९०२ पर्यंतच्या अवधीपुरता करावयाचा आहे व कालानुक्रमानें केसरींत मांडलेल्या मुख्य विचाराचे खंड कोठें व कसे पडतात याचें दिग्दर्शन करणें हाहि या लेखाचा एक हेतु आहे. या कामीं राज्यकर्त्यांनीं कोणतें धोरण योजिलें, त्यांस लोकमत व्यक्त करणाऱ्या पुढाऱ्यांनीं कोणतें उत्तर दिलें, व राज्यकर्त्यांच्या मतांत

बदल होतांच लोकमतानें आपली बाजू अधिकाधिक जोरदार रीतीनें मांडण्यासाठीं कोणता फेरफार केला इत्यादि गोष्टी लक्षांत घ्यावयाच्या असून त्यांचें स्वरूप स्पष्ट करण्यासाठीं हिंदी व इंग्रजी इतिहासांतील समकालीन घडामोडींचें क्वचित् स्मरण करावें लागेल. कारण या ऐतिहासिक पार्श्वभूमीवरच केसरीकारांनीं राजकीय विचारांचा चलच्चित्रपट काढण्याचें काम केलें आहे.

२. पूर्वेतिहास :—केसरी १८८१ सालीं जन्मला. तथापि त्यापूर्वीची ५०-७५ वर्षांतील राजकीय विचारसरणी ठोकळ मानानें केसरींत प्रसंगाप्रसंगानें येऊन गेलेली आहे. तिचें स्वरूप थोडक्यांत असें आहे. पेशवाईअखेरीस एल्फिन्स्टन्च्या अमदानींत पेशव्यांची जागा इंग्रजांनीं घ्यावयाची हें मुख्य ध्येय असल्यामुळें व संस्थानिक, जहागिरदार, इनामदार वगैरे प्रबळ वर्ग आणि सामान्य लोक यांच्याविषयीं अत्यंत उदारपणा ठेवण्यांत व शांतता प्रस्थापित करण्यांत इंग्रजांचा स्वार्थ असल्यामुळें त्यांनीं तें धोरण पत्करलें. अर्थात् लोकांच्या धार्मिक समजुतींना धक्का लागू न देण्याची, वतनदारांची शाश्वती जाहीर करण्याची, रयतेच्या आबादानीसाठीं खटपट करण्याची आणि एकंदर लोकमत अव्यक्त असलें तरी तें लक्षांत घेऊन त्यास मान देण्याची शक्य ती खटपट या वेळचे अधिकारी करीत असत. भविष्य कालासंबंधीं तर त्यांच्या औदार्याची सीमा फारच पराकाष्ठेस गेली होती. एल्फिन्स्टन्नें कोलब्रुकला असें कळविलें होतें कीं, ' एतद्देशियांचीं मनें सुशिक्षित झाल्यामुळें ' इंग्लंडास आपला गाशा गुंडाळावा लागला, तर ज्यांचा देश त्यास परत झाल्यास ' इंग्लंडाची कीर्तीच होणार आहे. ' यामुळें ' एतद्देशियांस मोठमोठ्या जागा ' मिळणें इष्ट आहे हें तत्त्व जणूं काय एल्फिन्स्टन्चें गीतावाक्यच होऊन बसलें ' होतें. ' ( १२-३-९५ ). तथापि दहावीस वर्षांत ही परिस्थिति बदलली व इंग्रजी राज्य कायम झालें. नंतर संस्थानें खालसा करण्याचें धोरण सुचलें आणि खालसा मुलखांत इंग्रजी पद्धतीची राज्यव्यवस्था करण्याचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें आला, तसतसें नोकरीनिमित्त सुशिक्षितांची संख्या वाढविणें जरूरीचें भासलें. पुढें खालच्या जागांवर या सुशिक्षितांची व राजेरजवाड्यांच्या जागीं आणि वरिष्ठ हुद्द्यांवर इंग्रजी अधिकाऱ्यांची नेमणूक होऊं लागल्यामुळें राज्यकारभार खर्चाचा झाला व त्यांतला बराच भाग थिनमोबदला परदेशांत जाऊं लागला, डलहौसीपर्यंत लोकमत न जुमानतां संस्थानिकांवर चढाई करण्याचें हें राजकारण चालू होतें. सत्तावन सालच्या बंडानें त्यांत किंचित् फरक झाला तो असा कीं, संस्थानिकांना दत्तकाची परवानगी देणें, लोकांच्या धर्मभावनांना राज्यकर्त्यांनीं योग्य मान देणें आणि काळागोरा हा भेद न पाहतां लायकीप्रमाणें अधिकाराच्या जागा देणें इत्यादि महत्त्वाचीं सूत्रें राणीच्या जाहीरनाम्यांत ग्रथित झालीं. या जाहीरनाम्यांतील आश्वासनें पाळण्याचे कामीं पुढें अनेक कारणांनीं टाळाटाळीचें धोरण स्वीकारण्यांत आलें. पण त्यांत दिसून येणारें औदार्य हेंच मूळ राणीसरकारचें मनोगत होतें व तें अंमलांत आलेंच

पाहिजे असें केसरीकारांनीं वेळोवेळीं प्रतिपादन केलें आहे. त्याचें रहस्य लक्षांत येण्यास या जाहीरनाम्यासंबंधींचा पुढील खुलासा प्रथम ध्यानांत घेतला पाहिजे. ‘ जाहीरनाम्याचा पहिला मसुदा अगदीं गचाळ होता. राणीसरकारास अर्थातच तो ‘ पसंत पडला नाहीं व हल्लींच्या जाहीरनाम्यांत जो कांहीं भारदस्तपणा व प्रजेच्या ‘ कल्याणाबद्दल कळकळ दिसून येते, ती सर्व राणीसाहेबांच्या सांगण्यावरून पूर्वींचा ‘ मसुदा फिरविल्यामुळें दृष्टीस येत आहे. ’ तथापि या शब्दांपेक्षां कंपनीच्या जागीं राणीसरकारचें राज्य सुरू झाल्यापासून ‘ राज्यपद्धतींत ज्या कांहीं सुधारणा झाल्या, ‘ त्यांचें धोरण अधिकारी वर्गाचे हातांत अधिकाधिक सत्ता देऊन, लोकांस अगदीं ‘ निःशस्त्र व निःसत्त्व करून टाकण्याकडे होतें, ’ (२२-६-९७), असा शेवटीं अनुभव आला. हा पुढचा अनुभव सोडला असतां त्या वेळीं भासलेला महत्त्वाचा फरक म्हटला म्हणजे ५८सालीं राणीचा साक्षात् अंमल सुरू झाल्यापासून इंग्लंडांतील प्रधानमंडळाच्या उलथापालथी येथील राजकीय धोरणास हेलकावे देऊं लागल्या हा होय. इ. स. १८७४ पासून १८८० पर्यंत सहा वर्षे डिझ्राएलीच्या अमदानींत हिंदुस्थानांतहि राज्यविस्ताराचें व दरबारादि प्रदर्शनांचें, वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचें धोरण स्वीकारण्यांत आल्यामुळें व १८७४ सालच्या दुष्काळानें व द्रव्यशोषानें लोकांची हलाखी झाल्यामुळें कांहीं ठिकाणीं दंगे व बंडेंहि झालीं. या वेळचें चित्र, इंग्लंडांतील स्टेट्स्मन् पत्रांतल्या ( गुरुगोविंद या सहीनें प्रसिद्ध झालेल्या ) लेखाचा सारांश देऊन केसरीनें असें काढलें आहे. गुरुगोविंद लिहितो, ‘ मी सत्य स्मरून सांगतों कीं, ‘ हिंदु लोकांच्या मनांत जबरदस्त विचारक्रांति चालली आहे. प्रस्तुतची स्वस्थता ‘ ही दक्षिणेंतील दंगे व रंपा येथील बंड यांनीं सूचित केलेल्या प्रचंड तुफानाची ‘ पुरोगामिनी आहे. वासुदेव बळवंत फडके नांवाचा दक्षिणेंतील दरवडेखोर सर्वत्र ‘ प्रसिद्ध आहे. त्यावर सरकारनें राजद्रोहाचा आरोप ठेविल्यामुळें देशाच्या कल्याणा‘ साठीं प्राणत्याग करण्यास सिद्ध झाल्याचा याचा जिकडे तिकडे लौकिक झाला. ‘ हा वासुदेव पुण्याच्या रस्त्यांतून तुरुंगाकडे जात असतां लोकांनीं **‘वासुदेव बळवंत की ‘ जय ’** असा गजर केला. ही गोष्ट फार महत्त्वाची नाहीं, पण एवढ्यावरून सर‘ कारनें लोकांचें अंतरंग ताडावें आणि संभाळून असावें. ’ (१३ व २०-६-८२). तथापि १८८० सालीं इंग्लंडांतील निवडणुकींत मिड्लोथियन येथील वक्तृत्वपूर्ण भाषणानें ग्लॅडस्टन्नें जय मिळवितांच परिस्थितींत एकदम बदल झाला. इंग्लंडांत ग्लॅडस्टन, कलकत्त्यास रिपन आणि मुंबईस फर्ग्युसन यांच्या कारकीर्दी सुरू होऊन वर्तमानपत्रांवरील नियंत्रण नाहींसें झालें, उदार धोरणाचा जाहीर उच्चार व आचार सुरू झाला आणि लोकमत व्यक्त होण्यास अनुकूल काल आला. अशा रीतीनें पूर्वकालीं राज्यक्रांति, मोठीं बंडें व किरकोळ दंगेधोपे या स्वरूपानें व्यक्त होणारें लोकमत अघोलेपणाचें स्वरूप टाकून वर्तमानपत्रांतील लेखांच्या रूपानें व्यक्त होण्यास आवश्यक असें वातावरण केसरीच्या जन्मकालीं अस्तित्वांत आलें होतें.

**३. गोडीगुलाबी** :—अशा शांत वातावरणांत लिहिलेले पहिल्या सहासात वर्षांतले केसरींतले राजकीय विचार आत्मगत भाषणाच्या स्वरूपाचे भासतात. रिपन व फर्ग्युसन यांच्या भाषणांचे सारांश व पत्रकर्त्यांचे राजकीय विचार हे दोन्हीहि अत्यंत मनमोकळेपणानें व्यक्त केलेल्या कल्पनांनीं एकसारखेच भरलेले असून दोहींत अत्यंत संवाद व गोडीगुलाबी असल्याचें आढळतें. या अवधींत इंग्लंडांत ग्लॅडस्टनचा सूर्य मध्यान्हीं तळपत होता आणि त्याच्या ध्येयवादानें तेथीलच नव्हे, तर हिंदुस्थानांतीलहि लोकांना भारून टाकिलें होतें; त्यांतून कोठें कमीपणा दिसून आल्यास रॅडिकल पंथाचे लोक गर्जना करण्यास कमी करीत नसत. हिंदुस्थानांतहि ' राणीच्या ' जाहीरनाम्यांतलीं अभिवचनें हींच राज्यकर्त्यांचीं मार्गदर्शक सूत्रें आहेत,' शिक्षणाचा फैलाव करून लोक राजकीय जबाबदारी उचलण्यास तयार होतांच ती त्यांजकडे सोंपविण्यांत येईल व इंग्रज कांहीं झालें तरी ' परकी ' आहेत वगैर विचार मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या तोंडून वारंवार निघूं लागल्यामुळें लोक आत्मनिरीक्षण करूं लागले; तेव्हां ' आमचेंच नाणें खोटें आहे ' अशी कबुली त्यांना पदोपदीं द्यावी लागली. ' आमच्यापैकींच कांहीं लोकांनीं बंडफितूर केले म्हणून परवशता आली; ' आमचा देश भिकार होण्याचें कारण आमचें औदासीन्य आणि स्वदेशकल्याणा- ' विषयीं अनास्था. स्वदेशी कापड वापरण्याविषयीं तनमनधन अर्पण करून गणेश ' वासुदेव जोशी सांगत असतां त्याचा उपयोग झाला नाहीं. तर मनुष्यानें आपल्या ' दुःखाकरितां दुसऱ्यास दोष देण्यापूर्वी अगोदरच आपलीं कर्मे धड आहेत काय ' हें पहावें आणि मग दुसऱ्यास दोष द्यावा.' ( १८-४-८१ ).

संस्थानिकांचें कर्तव्यकर्म सांगतांना सर जेम्स फर्ग्युसन यानें श्री. सयाजीराव महाराज यांना उद्देशून उच्चारलेले शब्द किती प्रोत्साहक होते, त्याचा नमुना असा आहेः—' आमचे ( इंग्रजांचे ) हेतु केवढेहि मोठे असले किंवा आमच्यापैकीं ' कित्येक केवढेहि बुद्धिमान् असले तरी आमच्याकडून हिंदुस्थानचें राज्य चालण्यांत ' कित्येक अडचणी येत असतात; त्या आम्ही कांहीं केलें तरी आमच्या हातून कधीं ' दूर होण्याजोग्या नाहींत. आमच्या **परकेपणामुळें** आम्हांमध्यें एक प्रकारचा उणे- ' पणा आहे. त्यामुळें हिंदु लोकांचा आमचा एकजीव होणें नाहीं. नेटिव्ह राजांनीं ' मनावर मात्र घेतलें पाहिजे, म्हणजे त्यांचा प्रजेशीं मिलाफ होणें कठीण नाहीं. ' ( ३-१-८२ ).

रिपननें स्थानिक स्वराज्य देण्याची वाटाघाट सुरू केली तेव्हां केसरी म्हणतो, ' परमेश्वरकृपेनें लॉर्ड रिपनसाहेबांचीं येथें पूर्ण पांच वर्षें गेल्यास आम्हां हतभाग्य ' लोकांस बरेच अधिकार मिळतील, व आणखी पांचपंचवीस वर्षे सरकाराविरुद्ध ' कुरकुर करण्यास कांहीं एक कारण राहणार नाहीं. ' ( २९-८-८२ ).

रिपनविषयींचा हा अनुकूल अभिप्राय त्याची कारकीर्द संपेपर्यंत कायम राहिला. त्यानें निजामाच्या राज्याभिषेकप्रसंगीं केलेल्या उपदेशासंबंधींचें लोकमत असें होतें:—

‘ रिपन यांचें मूळ भाषण इतकें मोहक, इतकें गंभीर, इतकें—आतां पुढें
‘ कोणता शब्द घालावा हेंच समजत नाहीं—आहे, कीं, तें वाचून नेत्रांतून प्रेमाश्रु
‘ आल्यावांचून राहणार नाहींत. आम्हांस तर क्षणभर असें वाटलें कीं, लॉर्ड रिपन
‘ यांनीं हा निजामास उपदेश केला नाहीं तर आपल्या कोमल, न्यायी व दयार्द्र
‘ मनाचें चित्र काढलें ! ज्यांच्या वचनांत व वर्तनांत ऐक्य असतें त्यांच्या सप्रेम
‘ उद्गारांहून मधुरतर अशी गोष्ट जगांत खाचित नाहीं. आंग्लभूमीच्या पोटीं कांहीं
‘ असे पुत्र निपजतात म्हणूनच तिच्या राज्यावर सूर्य कधीं मावळत नाहीं. ज्या
‘ शाळेंतून रिपनसारखे शिष्य निघाले आहेत त्या शाळेचा अधिगुरु अत्यंत पूज्य
‘ ग्लॅडस्टन कसा असावा याची, वाचकहो, तुम्हींच कल्पना करा आणि देशोन्न-
‘ तीचें इंगित तत्काल उमजा. ’ ( १२-२-८४ ).

रॅडिकल पक्षांतील लोकांच्या सद्धेतूविषयीं त्या कालीं किती आदरभाव वसत होता याचा एक मासला येथें नमूद करूं:—

‘ हे रॅडिकल लोक न्याय व शांतता यांचे परम भक्त आहेत व स्वातंत्र्य आणि
‘ लोकसत्ता वाढविण्यासाठीं त्यांचे सदोदित प्रयत्न चाललेले असतात. त्यांचे पुढारी
‘ मि. ब्राइट यांनीं हिंदुस्थानचा पक्ष धरून गेल्या २०-२५ वर्षांत पार्लमेंटांत व
‘ बाहेर आमच्या तर्फेनें बोलण्याची कधींहि संधि गमावली नाहीं. पतित लोकांच्या
‘ उद्धारार्थ आपलें अनुपम वक्तृत्व खर्ची घालण्याचा त्यांनीं निश्चयच केलेला
‘ दिसंतो ’. ( ५-१-८६ ).

तथापि आपल्या सभोंवतीं असलेलें कुंपण कांटेरी कायद्यांचें आहे व दांडगाईनें त्याबाहेर पडण्याची आशा धरण्यांत अर्थ नाहीं, ही गोष्ट त्या वेळींहि मान्य झाली होती. ‘ वासुदेव बळवंताचें बंड मुद्रणस्वातंत्र्यास कारण झालें, ’ अशा अर्थाचा केसरीचा ओझरता उल्लेख चांगलासा समजत नाहीं; पण राजकीय चळवळ करणाऱ्यांनीं खुनाशीं संबंध ठेवूं नये व राजनिष्ठ असावें हा निर्बंध स्पष्टपणें या वेळीं नमूद झाला होता. आयर्लंडचा अंडर-सेक्रेटरी बर्क याचा फिनिक्स पार्कमध्यें खून झाला, ( ६-५-८२ ), ही बातमी ऐकून केसरी म्हणतो, ‘ इंग्लिश लोक आणि
‘ सध्यांची मिनिस्ट्री यांनीं ऐरिश लोकांचें म्हणणें ऐकून घेऊन त्यांची नीट व्यवस्था
‘ लावण्याची खटपट मनापासून चालविली असतां त्यांनीं नेमलेल्या अधिकाऱ्यांवर
‘ शस्त्र धरणें म्हणजे आपल्या हातानें आपलें नुकसान करून घेण्यासारखें आहे. मि. पार्नेल
‘ यांचा असल्या फंदाशीं कांहीं एक संबंध नाहीं हें ऐकून आम्हांस फार समाधान
‘ वाटलें. आम्हीं आयरिश लोकांचें अनुकरण करावयाचें तें असले खून करण्यांत
‘ नव्हे, तर त्यांच्याप्रमाणें उघडपणीं सरकाराची आपल्या कर्तबगारीविषयीं खात्री
‘ करून राजनिष्ठा-भ्रष्ट न होतां कायद्यानें त्यांच्यापासून हक्क काढून घ्यावयाचे. ’

त्याचप्रमाणें हिंदुस्थान आपणहून हातचा सोडावा असें जें प्रतिपादन कित्येक इंग्रजी लेखकांनीं चालविलें होतें तें ‘ दांभिकपणा ’चें असलें पाहिजे; इंग्रजी

कंपन्यांचे व भांडवलवाल्यांचे व्यवहार इंग्रजी आधिपत्यामुळें बिनबूड व निर्धास्त चालतात; परवशतेमुळें हिंदी लोकांतील शौर्य नाहींसें होऊन तोंडपुजेपणा व भित्रेपणा हे दुर्गुण वाढूं लागले; या राज्यामुळें इंग्लंडचें वजन वाढलें, त्याअर्थी ' हिंदुस्थान ' आपल्या हातून कधींहि सुटूं द्यावयाचें नाहीं असें बहुतेक इंग्रजांस वाटत असेल; ' एकंदरींत हिंदुस्थानचें राज्य इंग्रजांच्या बुद्धीला स्फूर्ति व तैक्ष्ण्य येण्याला उपयोगी पडतें, व त्यांच्या शौर्याला उत्तेजन देतें; आणि ' युरोपांतील एखाद्या देशाशीं तुंबळ युद्ध ' सुरू झाल्यास प्रसंगीं हिंदुस्थानचा सगळा खजिना आणि हिंदुस्थानांतले (खालसांतले) ' व मांडलीक राजांचे सारे शिपाई आणि घोडेस्वार हीं आपलींच आहेत अशी ' खात्री असल्यानें इंग्रज लोकांस रात्रंदिवस समाधान वाटत असेल.' (१२-७-८१). सारांश, या वेळच्या राजकीय विचारांना तात्त्विक स्वरूप असून व्हाइसरॉय अगर गव्हर्नर यांच्यासंबंधीं कडू शब्द उच्चारण्याचा प्रसंग आलेला नाहीं. अँग्लो-इंडियन लोकमत मात्र रिपनच्या कृत्यानें बरेंच प्रक्षुब्ध झालें होतें. इलबर्ट बिलांत काळ्या-गोऱ्यांना समतेनें वागविण्याचा प्रश्न निघतांच त्यांनीं आकाशपाताळ एक करून टाकलें. ' या इलबर्ट बिलाच्या चळवळींत अधिकाऱ्यांनीं रिपनला कसें गांजलें, ' गव्हर्नमेंट हाउसवर कसा बहिष्कार घातला व उघडउघड त्याचा अपमान केला, ' रिपनचीं पिठाचीं बाहुलीं करून कशीं जाळलीं व अंधाऱ्या रात्रीं गव्हर्नमेंट हाउस-' मध्यें शिरून लॉर्ड रिपन यास कैद करून हुगळी नदींत तयार ठेवलेल्या बोटीवर ' चढवून त्यास थेट विलायत दाखवावी व अपूर्व क्रांति घडवून आणावी असा ' कित्येक धाडशी गोऱ्या लोकांनीं कट केल्याच्या बातम्याहि या वेळीं कशा ' पसरल्या होत्या वगैरे गोष्टींचे वर्णन सर हेन्री कॉटन यांच्या आत्मचरित्रांत आहे. ' ( २३-१-१२ ). रिपनच्या मागून डफरिन व्हाइसरॉय झाला. त्याच्या संमतीनें व ह्यूम वगैरे मंडळींच्या खटपटीनें राष्ट्रीय सभा अस्तित्वांत आली आणि सुशिक्षित वर्गाचें लोकमत व देशभक्तांच्या राजकीय आकांक्षा व्यक्त होण्यास सोईची संस्था निर्माण झाली. अर्थात् तिच्या कामाबद्दल बड्या लाटांची व गव्हर्नरांची सहानुभूति असे. मुंबई इलाख्यांत देखील रेच्या कारकीर्दींत राणीच्या जाहीरनाम्यांतलीं अभिवचनें पूर्ण करण्यासाठीं वरिष्ठ अधिकारी वर्गाकडून खटपट सुरू राहिल्यामुळें नेटिव्हद्वेष्ट्या खालच्या गोऱ्या अधिकारीवर्गाला डोकें वर काढतां आलें नाहीं. ' ज्या लोकांवर ' राज्य करण्याकरितां आपणांस दहा हजार रुपये देऊन पाठविलें आहे, त्यांचें काय ' म्हणणें आहे तें ऐकून घेऊन राणीसरकारांनीं आपल्या प्रजेस जीं अभिवचनें दिलीं ' आहेत तीं पाळण्याचा किंवा त्याप्रमाणें सुधारणा करण्याचा प्रयत्न करावा हें लॉर्ड ' रे यांचें ब्रीद होतें,' आणि यापेक्षां गुप्त गोष्ट स्वतः लॉर्ड रे यांच्याच तोंडून बाहेर पडली ती फारच महत्त्वाची आहे. ते स्वदेशास जावयास निघाले तेव्हां त्यांस मुंबईच्या प्रेसिडेन्सी असोसिएशननें जें मानपत्र दिलें त्याचें उत्तर देतांना ते असें बोलले कीं, ' राणीसरकारच्या जाहीरनाम्यांत सांगितल्याप्रमाणें राज्यकारभार

' चालविण्याचा मी प्रयत्न करीत होतों, व एका प्रसंगीं या जाहीरनाम्याविरुद्ध कांहीं ' गोष्टी घडून येतात असें जेव्हां मला कळलें तेव्हां मी आपल्या जागेचा राजी-' नामाहि देण्यास तयार झालों. सनदी नोकरांनीं एवढें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ' राज्यकारभारांत ज्या सुधारणा करणें जरूर आहे त्यांस अडथळा करून उपयोगी ' नाहीं. ' ( १९-२-९५ ), असेंहि त्यांनीं बजावून ठेवण्यास कमी केलें नाहीं. सारांश, गव्हर्नर किंवा व्हाइसरॉय यांनीं लोकांच्या आकांक्षा तृप्त करण्यासाठीं कशी खटपट करावी याचा उत्तम नमुना या अवधींत मुंबई इलाख्यांतील सुशिक्षितवर्गाच्या दृष्टीपुढें होता. तथापि याच अवधींत क्रॉफर्ड प्रकरणांतील सरकारी धोरणामुळें काळ्या गोऱ्यांमधील पंक्तिप्रपंच उघड झाला. तेव्हांपासून ( १८८९ ) केसरीच्या स्पष्टोक्तीस सुरुवात झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. ' लॉर्ड रे यांच्या अंगचे अलौकिक ' गुण, स्वकीयांच्या निंदेला न जुमानतां हातीं धरलेलें काम शेवटास नेण्याचा त्यांचा ' दृढ निश्चय व यांच्या पुढें सत्य सांगणारास कशाचेंहि भय नाहीं असा आमचा ' दृढ भाव आणि सरकारचें आश्वासन, ' इत्यादि कारणांमुळें आपली फसगत झाली, व ' क्राफर्ड गोरा, सरकार गोरें, येथें नाहीं विलायतेंत, कोठें तरी, कोणी ' तरी त्याचा पाठिंबा उभा राहून त्यास सोडवून घेईल. मग या तुमच्या साक्षीदार ' मंडळीवर क्राफर्डसाहेबांचे सजातीय स्नेही ताव उगवून घेण्यास कधींहि संकोच-' णार नाहींत. ' असें जुने लोक सांगत होते; पण, ' आम्हांस ही विचारसरणी ' बिलकुल पसंत पडली नाहीं. आम्ही तरण्या दमाचे, आमचीं मतें या जगांतील ' घाणेरड्या व विपरीत परिणामी अनुभवानें गढूळ झालीं नाहींत. **आमची ' ' सत्यमेव जयते ' या तत्त्वावर फार भिस्त.** अखेरीस न्यायाचीच सरशी व्हाव-' याची असा आमच्या मनाचा पक्का दृढ निश्चय,' ( २१-५-८९ ), इत्यादि कबुली देऊन, सरकार वचनभंगाचें पाप करीत आहे, याचे वाईट परिणाम होतील असें असंदिग्ध भाषेंत बजाविलें आहे. ' स्वराज्यांत एखाद वेळेस असा प्रकार खपून ' जाईल; पण परकीय राज्यकर्त्यांस असल्या भयंकर गुन्ह्याच्या आरोपाचा देखील ' स्पर्श उपयोगी नाहीं, ' हें सामान्य तत्त्व सांगून, ' हिंदुस्थान सरकार जर वचन-' भंगाचें घोर पातक करण्यास तयार होईल व इंग्रजी राष्ट्र त्यास तसें करूं देईल तर ' **या राज्याचा उतरता काळ लवकर आला** असें म्हणावें लागेल, ' ( २४-९-८९ ), हें सांगून ठेविलें आहे. सारांश, राणीच्या जाहीरनाम्यांतलीं व हिंदुस्थान सरकारचीं अभिवचनें विश्वसनीय असतात, या लोकांच्या सार्वत्रिक समजुतीवर इंग्रजी राज्याची उभारणी आहे, हें जर इंग्रजी मुत्सद्द्यांच्या लक्षांत येईनासें झालें असेल तर त्यांच्या अन्यायी प्रवृत्तीला आळा घालण्यासाठीं आपण खटपट केली पाहिजे याची जाणीव केसरीच्या या पुढील लेखांतून दृष्टोत्पत्तीस येऊं लागली.

**४. लिबरल मुत्सद्द्यांची परीक्षा** :—राज्यास उतरती कळा लागली असली तरी इंग्लंडांत कांहीं सत्यास जागणारे पुरुष आहेत व त्यांच्या खटपटीनें हिंदुस्थानास

राजकीय हक्क मिळूं शकतील, या कल्पनेवर या पुढील कांहीं वर्षें गेलीं. अशा वेळीं ब्रॅडलॉचा मृत्यु झालेला पाहून केसरी म्हणतो, ' आमच्या हिंदुस्थानांत कर्ते पुरुष ' दिवसानुदिवस नाहींसे होत चालले आहेत. अशा स्थितींत ज्या अलौकिक धैर्याच्या ' उदार पुरुषानें देशाचा अगर जातीचा भेद मनांत न आणितां आमच्या भर-' भराटीसाठीं आपला देह झिजविण्याचा संकल्प केला व थोड्याच दिवसांत तो ' फलद्रूप होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं, त्या पुरुषावर मृत्यूनें घाला घातला, ' ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होय. सोनपतपानपत येथील एकच लढाई गमावल्या-' मुळें सर्व राष्ट्राचें जसें नुकसान झालें, त्याहूनहि जास्त ब्रॅडलॉच्या मृत्यूनें आमच्या ' देशाची स्थिति झाली आहे. ' ( १२-१-९२ ). यानंतर ग्लॅडस्टनची सत्यप्रियता कसोटीस लागण्याची वेळ आली ती अशी. पार्लमेंटपुढें इंडियाकौन्सिल बिल मंजुरी-साठीं आलें होतें, त्या बिलांत कौन्सिलांतील नेमणुका करण्यासंबंधींचा अधिकार हिंदुस्थान सरकारास दिला होता. या मोघम अधिकाराऐवजीं सभासद लोकनियुक्त पाहिजेत अशा अर्थाचे स्पष्ट शब्द बिलांत असावेत अशी प्रतिसूचना मि. स्वॉन यांनीं आणली होती. ग्लॅडस्टनचीहि हीच इच्छा असून त्यानें स्वमताचा आग्रह धरला नाहीं व स्वॉन यांस प्रतिसूचना परत घेण्यास लावली. तेव्हां केसरी उद्वे-गानें म्हणतो, ' लोकांनीं निवडलेले सभासद कौन्सिलांत यावेत, अशी ' ग्लॅडस्टनची इच्छा आहे, परंतु आयर्लंडचें काम ज्याप्रमाणें त्यांनीं हातीं ' धरलें आहे, त्याप्रमाणें हिंदुस्थानचें काम पत्करणें त्यांस तूर्त सोयीचें वाटलें नाहीं. ' इंग्लंडांतील एवढ्या मोठ्या मुत्सद्यानें **सत्यापेक्षां स्वपक्षाच्या सोईकडे विशेष ' लक्ष द्यावें** हें आमचें दुर्दैवच समजलें पाहिजे ! ब्रॅडलॉ जिवंत असते तर त्यांनीं ' अशी लटपट होऊं दिली नसती.......पार्लमेंट सभेकडून आमच्या तक्रारी व ' दुःखें कशीं व किती निवारण होतील याचाहि थोडाबहुत अदमास या बिलाच्या ' हकीकतीवरून करतां येईल. **सध्यां मिळाला तेवढाच लाभ समजून पुढील ' उद्योगास लागलें पाहिजे.** ' ( २६-४-९२ ).

' मिळेल तेवढा लाभ ' समजून पुढील उद्योगास लागण्याची उमेद वाटण्याचें कारण इंग्लंडांत या सुमारास निवडणूक व्हावयाची होती. त्यांत लिबरल पक्ष यशस्वी झाल्यास रिपन हे स्टेट सेक्रेटरी व रे हे गव्हर्नर जनरल होणार अशी बोलवा होती. (२६-४-९२). पुढें ती खरी ठरली नाहीं; तरी दादाभाई नौरोजी हे पार्लमेंटमध्यें सभासद म्हणून निवडून आले. तेव्हां ' अशा रीतीनें मनाचा ' मोठेपणा दाखविणारे लोक ज्या राज्यांत असतात, तेंच चिरस्थायी होऊं शकतें,' या निवडणुकीनें इंग्रजी राज्याच्या इमारतीचा पाया अधिक भक्कम केला, इत्यादि विचार प्रदर्शित करून हिंदुस्थानांतील इंग्रजी कामगारांच्या मनांतून जो दुराग्रह भरलेला असतो, तो विलायतेंतील लोकांत आढळून येत नाहीं व आपणांस हक्क मिळविण्या-साठीं इंग्लंडांतील मतदारांचीच प्रथम समजूत घातली पाहिजे हें लक्षांत घेतलें

असतां, ' हिंदुस्थानांत नाहीं तरी इंग्लंडांत खटपट करून आमची इच्छा पूर्ण ' होण्यास मार्ग आहे, ' (१२-७-९२), असा निष्कर्ष दादाभाईच्या निवडणुकीवरून काढण्यांत आला.

पुढें विलायतेंतील मागणीला जोर पोंचण्यासाठीं राष्ट्रीय सभेनें आपलें काम नेटानें करावें व लोकांनीं गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठीं अर्ज करण्यास शिकावें हा आग्रह १८९२ पासून सुरू झाला. सरकार करील ती पूर्वदिशा असें म्हणून स्वस्थ बसण्याचा हा काल नव्हे; इतकेंच नाहीं तर प्रत्येकानें आपण होऊन आपलीं गाऱ्हाणीं सरकारच्या व लोकांच्या नजरेस आणल्याशिवाय त्यांची कधींहि दाद लागावयाची नाहीं. त्याचप्रमाणें विलायतेंत गुलामांच्या मुक्ततेसाठीं जसा सततोद्योग झाला तशी राष्ट्रीय सभेची चळवळ सर्व देशभर अगदीं खेड्यापाड्यां-पर्यंत अहोरात्र खटपट करून पोहोंचविली पाहिजे असें स्पष्ट दिसूं लागलें. (१८-१०-९२).

पार्लमेंट व येथील लोकांचे अर्ज यांचा संबंध जोडण्याची संधि पुढच्या वर्षी पुनः एकदां आली. ' आम्हीं योग्य झालों कीं, आम्हांस गव्हर्नर जनरलहि नेमण्यास ' हरकत नाहीं अशी आमच्या दयाळू राणीसरकारची समजूत आहे; व ती ' त्यांनीं वारंवार आपल्या आज्ञापत्रांत नमूद केली आहे. तथापि आम्हांस मोठ्या ' जागा मिळाल्या नाहींत, याचें कारण शोधूं गेलें तर सर्व दोष अँग्लो-इंडियन ' कामगारांकडे येतो असें साफ म्हणावें लागतें. ' अशा स्थितींत सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा विलायतेंत व हिंदुस्थानांत अशा दोनहि ठिकाणीं व्हावी अशा अर्थाचा ठराव पार्लमेंटनें बहुमतानें पास केला. याबद्दल ' आभारप्रदर्शक अर्ज निरनिराळ्या ठिकाणांहून विलायतेस गेले पाहिजेत, ' अशी केसरीनें शिफारस केली. पण त्याबरोबर असेंहि सांगितलें कीं, ' इंग्रजांनीं हिंदुस्थान देश जिंकला आहे तो हिंदूंच्या फायद्या-' करितां नाहीं; तर राज्यकर्त्यांचा व्यापार वाढावा व त्यांच्या पोराबाळांची तरतूद ' व्हावी एवढ्याकरितांच होय असें एका मोठ्या इंग्रजी अधिकाऱ्यानें बोलून ' दाखविलें. हें बोलणें न्यायाचें नाहीं पण त्यांत स्पष्टपणा तरी विशेष आहे. ' पार्लमेंट सभेची जर याप्रमाणें इच्छा असती तर आम्हांस बोलण्यास जागाच राहिली ' नव्हती. **जो जिंकील तो मिळवील. आम्ही जिंकूं तेव्हां आम्ही मिळवूं** एवढेंच ' त्याचें उत्तर आहे. परंतु असें उत्तर देण्याचा प्रसंग आमच्यावर येऊं नये व तसें ' उत्तर देण्यास आम्ही सहसा प्रवृत्त होऊं नये अशी पार्लमेंट सभेची इच्छा आहे; ' व ही इच्छा केवळ वरपांगी आहे असें परवांच्या ठरावावरून तरी कोणास म्हणतां ' येणार नाहीं. ' ( २७-६-९३ ). सारांश पार्लमेंटची दृष्टि दयार्द्र असून बडे अंमलदार, केवळ पोटासाठीं, तिच्या आड येतात. तेव्हां हे ढग बाजूस सारण्या-करितां हिंदुस्थानांतील लोकांनीं पार्लमेंटकडे शक्य तितक्या सह्यांचे अर्ज करावेत असा आग्रह करण्यांत आला. ( ११-७-९३ ).

येथून एकदोन वर्षे तरी मोठ्या उमेदीचीं गेलीं. या वेळीं 'इंडियन पार्लमेंटरी कमिटी' अस्तित्वांत येऊन खुद्द हाउस ऑफ कॉमन्समध्यें हिंदुस्थानविषयक प्रश्नांचा अभ्यास बारकाईनें होऊं लागला. राष्ट्रीय सभेचे जनक ह्यूम व दादाभाई, एम्. पी., हे हिंदुस्थानांत येऊन लोकांना जोरानें चळवळ करण्याविषयीं सांगूं लागले. या चळवळीनें ब्रिटिश साम्राज्य चिरस्थायी होईल व हिंदी लोकांचाहि फायदा होईल, एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानांतील गोऱ्या अधिकाऱ्यांनीं तिला अडविण्याचें कारण नाहीं, अशीहि या पुढाऱ्यांची समजूत होती. या वेळच्या पुढाऱ्यांच्या मतांत थोडें बहुत अंतर असलें तरी पार्लमेंटकडे दाद मागण्यासाठीं जोराची चळवळ व्हावी एवढ्यापुरती त्यांची एकवाक्यता होती. राजकारणांतील या वेळचा हा एकवाक्यतेचा योग कसा जमून आला हें या ठिकाणीं लक्षांत घेणें आवश्यक आहे. कारण त्या वेळची विशेष परिस्थिति नाहींशी होतांच राजकारणाची दिशा एकदम बदलली.

ह्यूम हा वस्तुतः इंग्रजी राज्यावर ५७ सालासारखा भयंकर प्रसंग पुनः येऊं नये, यासाठीं धडपडणारा 'आग्या वेताळ' होता. अन्नान्नगत, दारिद्र्य, असंतोष आणि दुष्काळ यांनीं हिंदुस्थानांतील लोक इतके गांजून गेले आहेत कीं, त्यांचा योग्य विचार झाला नाहीं तर हे भुकेलेले लोक खवळतील आणि त्यांच्या पुढें इंग्रज सरकारचा मुळींच निभाव लागणार नाहीं; आणि त्याबरोबरच सुशिक्षित वर्गाचीहि दामटी वळेल; हें ओळखून सुशिक्षितांनीं हिंदुस्थानांत दाद लागत नाहीं म्हणून निराश न होतां विलायतेस जाऊन जोराची खटपट करणें हें यांचें कर्तव्य आहे, असें ह्यूमच्या सांगण्याचें तात्पर्य होतें. अशा रीतीनें हिंदी लोक दारिद्र्यानें गांजले आहेत, असें म्हणणें म्हणजे इंग्रजी राज्यपद्धतीची निंदा करण्यासारखेंच होतें व असाच अर्थ करून ह्यूमचें सर्क्युलर राजद्रोही आहे, अशी अँग्लो-इंडियनांनीं ओरड केली व पार्लमेंटमध्यें एका सभासदानें तर असें म्हणून दाखविलें कीं, 'इंग्रजांखेरीज दुसरें ' राज्य असतें तर ह्यूमला गोळी घालून मारलें असतें किंवा फांशी दिलें असतें.' ( २४-५-९२ ). परंतु ह्यूमनें त्याचा राग न मानितां एवढेंच उत्तर दिलें कीं, ' हिंदुस्थानच्या खऱ्या स्थितीचें ज्ञान माझ्याप्रमाणें कोणासहि असण्याचा संभव ' नाहीं. अशा स्थितींत माझे विचार लोकांस कळविणें हें माझें कर्तव्य आहे; आणि ' मी तें करीत असतां मला विनाकारण शिव्या देण्यांत हंशील नाहीं.' सारांश, ह्यूम इंग्रज असल्यामुळें त्याचे कडक शब्द राजद्रोही ठरले नाहींत.

दादाभाईचें ध्येय यापेक्षां कांहींसें निराळें होतें. आमच्या भोंवतीं इंग्रजी राज्याची जी मिठी पडली आहे ती अभेद्य आहे, इतकेंच नव्हे तर तिनेंच आपणांस एकत्र केलें आहे, व तिचें बंधन कायम असलें तरच आमचा सांधा बेमालूम जडेल अशी दादाभाईची दृढ खातरी होती व त्यामुळेंच त्यांच्या म्हणण्यास इंग्लंडांत मान मिळत होता. ( १९-१२-९३ ). म्हणजे इंग्रजी साम्राज्यांत राहिल्यानेंच हिंदी लोकांना एकराष्ट्रीयत्व साधतां येईल. अशी दादाभाईची पूर्ण श्रद्धा असल्यामुळें त्यांच्या

कडक भाषणांतहि इंग्रजांना राजद्रोह दिसला नाहीं व हिंदुस्थानास द्रव्यशोषाचा रोग जडल्यामुळें त्याची हलाखी झाली आहे असें त्यांनीं अनेक वर्षेपर्यंत प्रतिपादन केलें तरी ती गोष्ट खपून गेली.

याखेरीज हिंदुस्थानचे अंडर-सेक्रेटरी रसेल यांनीं देखील १८९३ सालीं पार्लमेंटमध्यें असे उद्गार काढले कीं, ‘ निरनिराळ्या जाती जिंकल्यानें इंग्रज सरकारचें ‘ काम झालें असें नाहीं. या सर्व जाती एकवटून त्यांस **एकराष्ट्रीयत्व यावें** असा ‘ इंग्रजी राज्यकर्त्यांचा अखेर हेतु आहे; व ती गोष्ट हल्लींच्या राज्यांतच घडून येणें ‘ शक्य आहे. ’ ( २८-११-९३ ).

या सर्व वाटाघाटीवरून ‘ हिंदुस्थानांत ठिकाठिकाणीं लहानलहान **राजाचा जो** ‘ **अंमल होता**, तो सर्व काढून टाकून त्या ठिकाणीं हल्लीं **सनदी लोकांचा एक**-‘ **छत्री** अंमल सुरू झाला आहे. परंतु हाहि अंमल नाहींसा होऊन ह्याऐवजीं ‘ कालांतरानें कां होईना, पण **लोकांचा अंमल** चालू होण्याचा पूर्ण संभव आज ‘ आमच्या डोळ्यांपुढें आम्हांस दिसत आहे, ’ असा निष्कर्ष केसरीनें काढला. हेंच ध्येय पुढें स्पष्ट होऊं लागलें. तेव्हां नोकरशाहीच्या जागीं लोकशाही स्थापन करावयाची आहे हे शब्द प्रचारांत आले. पण या ध्येयाची स्थूल कल्पना १८९३ सालींच केसरीकारांना येऊन चुकली होती. मात्र दादाभाईंच्या अंतःकरणांतली इंग्रजी साम्राज्याच्या इष्टतेविषयींची श्रद्धा केसरीकारांना पूर्णांशानें मान्य होती असें दिसत नाहीं. मोंगल किंवा पेशवे यांना जी गोष्ट साधली नाहीं, ‘ त्या एकराष्ट्रीयत्वाचें बीज आर्यमनोभूमीवर परक्यांचे श्रमानें रुजविलें जात आहे, ’ हें जरी त्यांना मान्य असलें, तरी ‘ राज्यकर्त्यांना आमच्या लोकांची व आमच्या देशाची काळजी ‘ येथील समंजस विद्वानांपेक्षां जास्त आहे असें म्हणणें निवळ धाष्टर्य होय. तेव्हां ‘ असला आग्रह सोडून ते प्रेमभावानें येथील लोकांची सल्लामसलत घेऊं लागतील ‘ तर राज्यकर्ते व प्रजा यांच्यामधील वैरभावाचीं बीजें निघून जाऊन उभयतांचें कल्याण होईल, ’ ( ११-९-९४), असें त्याचें सांगणें होतें. १८९५ सालीं हॅरिससाहेबांची आरती कटू आवाजांत मोठमोठ्यानें म्हणावी लागली, तरी विलायतेंतील चळवळीनं हक्क मिळतील ही विचारसरणी तेव्हांपर्यंत जोरांत होती. त्या वर्षी पुण्यास भरणाऱ्या कॉंग्रेसचें महत्त्व सांगतांना केसरी म्हणतो, ‘ येथें हिंदुस्थानांत जरी आपली ‘ विशेष दाद लागली नाहीं तरी विलायतेंतील लोक निःपक्षपातानें व समबुद्धीनें ‘ हिंदुस्थानांतील लोकांच्या म्हणण्याचा विचार करतील अशीं राष्ट्रीय सभेची खात्री ‘ आहे. ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी व पार्लमेंटरी कमिटी यांची खटपट जोरांत चालली ‘ असून कायदेकौन्सिलांतहि बानर्जी, मेथा वगैरे राष्ट्रीय सभेंतील प्रमुख मंडळी ‘ निवडून आली आहेत, तेव्हां विलायतेंत आणि हिंदुस्थानांत राष्ट्रीय सभेचें म्हणणें ‘ सरकारापुढें मांडण्यास सन १८९५ सालीं जितकी चांगली सोय आहे, तितकी ‘ यापूर्वी कधींच नव्हती. ’ (६-८-९५ ).

परंतु ही स्थिति १८९६ सालापासून बदलूं लागली. त्या वेळीं मँचेस्टरच्या हितासाठीं हिंदी गिरण्यांतील कापडावर जकात बसली. तेव्हां असल्या अन्यायाच्या कायद्या-विरुद्ध चळवळ चालविली पाहिजे, हें सांगतांना, ' आतांच्या लोकांच्या राजनिष्ठ-' पणाच्या जुन्या समजुती आतां कांहीं एक उपयोगी नाहींत; खरी राजनिष्ठा ' आणि अन्याय सहन करण्याची बुद्धि हीं कधींच एकत्र होऊं शकत नाहींत. राजा 'करतो तो न्याय अशी पूर्वींची समजूत असे; पण न्याय करील तो राजा अशी आतां ' समजूत झालेली आहे. ' ( ११-२-९६ ). या सिद्धांताचा उच्चार केसरीनें केला आणि याच विचारसरणीनें त्याला पार्लमेंट सभेकडून न्याय मिळण्याची आशा संपल्याचें जाहीर करण्यास भाग पाडलें. त्यासंबंधींची हकीकत थोडक्यांत अशी आहे.

इजिप्तच्या लढाईचा खर्च हिंदुस्थानवर लादावा अशा अर्थाचा ठराव पार्लमेंट-पुढें आणतांना सर मायकेल हिक्स्बीच यांनीं सांगितलें कीं, ' हिंदुस्थानाकरितां ' सुएजचा कालवा इंग्लंडला आपल्या हातीं ठेवावा लागत आहे, तेव्हां इजिप्तच्या ' लढाईचा खर्च हिंदुस्थाननें सोसला पाहिजे. ' या अन्यायाच्या ठरावास वेडरबर्न, मोर्ले, मॅक्लीन, स्कोबल वगैरे दाक्षिणोत्तर तोंडें असणाऱ्या मंडळींनीं एकमतानें विरोध केला. पण त्याचा उपयोग न होतां बहुमतानें तो खर्च हिंदुस्थानावर बस-विण्याचें ठरलें. तेव्हां या प्रकरणाचा निष्कर्ष सांगतांना ' न्यायाची दृष्टि पार्लमेंट ' सभेंत उरली नाहीं, ' हें कबूल करून केसरी म्हणतो, ' आमची खात्री आहे कीं, ' आमच्या ठिकाणीं इंग्रजांसारखे दुसरे कोणी असते तर त्यांनीं असले अन्याय ' कधींहि सोसून घेतले नसते. सेक्रेटरी ऑफ स्टेट घ्या किंवा इंग्लंडचे मुख्य प्रधान ' घ्या, त्यांची अशी छाती नाहीं कीं, असल्या लढायांचा खर्च ते इंग्लंडवर बस-' वितील. पण आमची स्थिति फार भिन्न आहे. आम्हांस वाटेल त्यानें पाळी-' पाळीनें लाथा माराव्या असे दिवस आले आहेत. **पार्लमेंट सभेकडून आम्हांस ' न्याय मिळेल अशी आशा बाळगणें म्हणजे बहुतेक दगडावर पाझर फुट-' ण्याची आशा करण्यासारखेंच आहे.** '

तथापि, पार्लमेंट सभेनें मंजुरी दिली म्हणून इजिप्तच्या लढाईचा खर्च हिंदु-स्थानावर बसविणें हें कायदेशीर अगर न्यायाचें ठरण्याजोगें नव्हतें; त्याअर्थी व्हाइसरॉयसारख्या अधिकाऱ्यांनीं या वेळीं न्यायाचा पक्ष धरून ' एक तर आम्हांस जाग्यावरून काढा नाहीं पेक्षां आम्हांस कांहीं तरी कायमचे अधिकार द्या, ' असें म्हणण्यास तयार झालें पाहिजे; स्टेट सेक्रेटरीच्या म्हणण्यास ' होस हो ' म्हणण्या-खेरीज जर दुसरें कांहीं करावयाचें नसेल तर २० हजार दरमहाच्या ऐवजीं शें दोनशेंचा क्लार्क नेमून काम घेतल्यास काय वाईट ? सारांश, ' केवळ मोठ्या पगाराची ' जागा मिळते म्हणून जर लॉर्ड एल्गिन इकडे आले नसतील, तर जात्याच उपमर्द ' न सोसून घेण्याचा जो इंग्रज लोकांचा स्वभाव तो त्यांच्यांतून नष्ट झाला नसावा ' व त्यांचे मताचीं पायमल्ली झाल्याबद्दल त्यांस स्वभावतः वाईटहि वाटलें पाहिजे.

'करितां त्यांनीं धैर्य करून पार्लमेंटच्या नजरेस हा अन्याय आणण्याकरितां आपल्या 'जागेचा राजिनामा द्यावा व आपल्या देशाच्या धवल कीर्तीस लागणारा डाग 'पुसून टाकण्याचा प्रयत्न करावा. कोणी तरी कळकळीच्या माणसानें असें वर्तन 'केल्याशिवाय हें अरिष्ट टळावयाचें नाहीं व तसें जर टळणार नाहीं तर **इंग्रजी 'राज्यास एक प्रकारची उतरती कळा लागली आहे,** असेंच म्हणावें लागेल,' (१४-७-९६), असें बजाविण्यांत आलें. याचाच अर्थ इंग्लंडांत ग्लॅडस्टन व रोजबरी हे अधिकारभ्रष्ट होऊन सॅलिस्बरीप्रभृति कॉन्झर्वेटिव्ह प्रधानमंडळ अधिकारारूढ होतांच 'पार्लमेंटमध्यें न्याय मिळेल,' ही हिंदी लोकांची आशा नाहींशी झाली आणि तेव्हांपासून हिंदुस्थानांतच लोकमत प्रबळ करून त्याच्या जोरावर राजकीय हक्क मिळविण्याच्या कार्यक्रमास जोर आला.

**५. लोकजागृति व महाराष्ट्रीयत्व :**—१८९६ सालीं सुरू झालेल्या नव्या राजकीय कार्यक्रमांत पार्लमेंट अगर राष्ट्रीय सभा यांवर विसंबून राहण्याच्या विचारास गौणत्व येऊन लोकजागृति व महाराष्ट्रीयत्व यांना प्राधान्य आलें. 'एका गालांत 'मारली असतां दुसरा गाल पुढें करण्याचे दिवस आतां उरले नाहींत. ज्यानें 'त्यानें आपल्या हक्कांस जपलें पाहिजे; मग तो राजा असो वा रंक असो. मँचेस्टरवाले 'जर आमचे हिताकडे लक्ष देत नाहींत तर आम्ही तरी त्यांच्या हिताकडे कां 'लक्ष द्यावें ? याकरितां आमची सर्व लोकांस अशी विनंति आहे कीं, तुमच्या 'अंगांत जर माणुसकी असेल, सरकारनें केलेला अन्याय खपत नसेल तर तुम्ही 'देशी कपडा वापरण्याचा निश्चय करून मँचेस्टरवाल्यांचा त्यांनीं केलेल्या अन्याया-'बद्दल सूड घेतल्याशिवाय राहूं नका. वेस्टलंडसारखे मुत्सद्दी आमच्या आक्षेपास 'हवीं तशीं बेपर्वाईनें उत्तरें देत आहेत. इंग्लंडांत जर असा प्रकार झाला असता 'तर सर्व देशांत जिकडेतिकडे एकच कल्होळ झाला असता व सरकारास 'लोकांचें म्हणणें मान्य करावें लागलें असतें. आमच्यानें ही गोष्ट होत नसेल तर 'निदान हातांत आहे तेवढा इलाज करून पहाणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे व त्या-'प्रमाणें **महाराष्ट्रांतील लोक** करतील,' (१८-२-९६), अशी केसरीकारांना उमेद वाटूं लागली.

शिवजयंतीच्या उत्सवांत देखील महाराष्ट्रीयांची ऐतिहासिक अभिमानबुद्धि जागृत करून तिला राष्ट्रीय स्वरूप येण्यासाठीं महाराष्ट्रांतील जनतेनें झटावें हें सांगण्यावरच केसरीकरांचा कटाक्ष होता. 'राष्ट्र बनण्यास सर्व लोकांस पूज्य अशा कांहीं 'वस्तु असाव्या लागतात व देशकालानुसार अशा कांहीं गोष्टी लोकांपुढें 'मांडणें हेंच प्रत्येक देशाभिमान्याचें कर्तव्य आहे.' 'असल्या उत्सावापासून 'लोकांमधील एकराष्ट्रीयत्वाची कल्पना दृढ होण्यास जें कांहीं सहाय्य होतें तें कांहीं लहानसहान नव्हे,' वगैरे विचार व्यक्त करून 'शिवजयंतीचा उत्सव आज 'राष्ट्रीय नसला तर तो लौकरच **महाराष्ट्रीय** होईल व तो महाराष्ट्रीय झाला

' म्हणजे त्यास राष्ट्रीयत्वाचें स्वरूप देण्यास फारशी अडचण पडणार नाहीं. पण यदा-
' कदाचित्, तो राष्ट्रीय झाला नाहीं, तरी महाराष्ट्रीय झाल्यास कांहीं लहानसहान
' कार्य झालें असें नाहीं, ' ( २६-५-९६ ), इत्यादि केसरीची विचारसरणी येथें
विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. या काळीं गणपत्युत्सवाचें महत्त्व देखील
अशाच कारणाकरितां लोकांना समजून देण्यांत आलें. ' गुलामाहून अधिक वाईट
' अशा नीच स्थितींत आम्ही नाहीं, असें दाखवावयाचें असल्यास उत्सवभक्तीस
' जरा तरी उचंबळूं दिलें पाहिजे, ' ' आमची धर्मबुद्धि जागृत रहावी, आमच्या
' नैतिक व राजकीय मनोवृत्ति जोमाच्या रहाव्यात, आमची राष्ट्रीयत्वाची ज्योत नेहमीं
' प्रकाश देणारी असावी, म्हणून आमच्या वाडवडिलांनीं या उत्सवाची योजना केली
' आहे, ' इत्यादि उपदेश सुरु झाला तेव्हांपासून महाराष्ट्रांत नवचैतन्याची ज्योत संचरली
आणि सुशिक्षित लोक राजकारणाकडे आस्थेच्या, स्वाभिमानाच्या व जबाबदारीच्या
दृष्टीनें पाहूं लागले. स्वार्थत्याग करून धडाडीनें सार्वजनिक कामासाठीं तरुण मंडळींनीं
पुढें येण्याची पद्धति तेव्हां सुरु झाली. महाराष्ट्राचें निसर्गसिद्ध दारिद्र्य त्याच्या उत्सा-
हास तेव्हांपासून अडवणूक करण्यास असमर्थ ठरलें. प्लेग व दुष्काळ यांसारख्या
दैवी व भयंकर आपत्ति देखील लोकांतील वाढता जोम व्यक्त होण्यासच त्या प्रसंगीं
कारणीभूत झाल्या. फॅमिन रिलीफ कोडमध्यें काय आहे, साऱ्याची तहकुबी केव्हां
मिळाली पाहिजे, वगैरे विवेचन करून ' ऐपत नसेल तर सारा देऊं नका ' असें
पुढारी स्पष्टपणें शेतकऱ्यांना सांगूं लागले व शेतकऱ्यांनाहि हक्काची जाणीव
उत्पन्न होऊन ' पोलिसांच्या पेटलेल्या बंदुकींच्या टप्प्यांत भरलेली रयतेची जंगी सभा, '
केसरीच्या मथळ्यांस उपयोगी पडूं लागली. ( १५-१२-९६ ). एका बाजूनें
रॉयल कमिशनपुढें दादाभाई, वाच्छा व गोखले हे इंग्रजी राज्यपद्धति म्हणजे आम्हांस
निःसत्त्व करून सोडण्याचा एक चरक आहे, ( २०-४-९७ ), प्रजा जर पैसे देणार
तर खर्चावर तिचा दाब असलाच पाहिजे, ( ४-५-९७ ), इंग्रजी राज्याचा परिणाम
असा दिसून येत आहे कीं, आमच्या सर्व तऱ्हेच्या महत्त्वाकांक्षा विरून जाऊन
उंबरांतल्या किड्यांप्रमाणें आमची स्थिति होणार, ( ११-५-९७ ), असें सांगण्यांत
गुंतले होते, त्याच वेळीं केसरीपुरस्कृत राजकारणांत शेतकऱ्यांपासून सुशिक्षितां-
पर्यंत सर्वांनीं आपापल्या हक्कांसाठीं झगडण्यास तयार झालें पाहिजे हें तत्त्व
प्रामुख्यानें झळकूं लागलें. यामुळें अधिकारी वर्ग गोंधळून गेला. त्याला प्लेगच्या
व्यवस्थेंत सोजिरांची मदत अवश्यक भासूं लागली. घरतपासणी व घरसफाई होतांना
लोकांच्या मनोवृत्ति खळबळून जाण्याजोगे प्रकार घडले. यामुळें लोकजागृतीला
लोकक्षोभाचें स्वरूप आलें. पुढें रँडच्या खुनानंतर अधिकारी लोक दरडावूं लागले.
तेव्हां ' सरकारचें डोकें ठिकाणावर आहे काय ? ' असा प्रश्न करून ' अधिकारी
वर्गास पहिल्याप्रमाणें शिरजोरपणा करितां येणार नाहीं, ' ( २०-७-९७ ), असें केसरीनें
बजाविलें. शेवटीं लोकमान्यांची रवानगी राजद्रोहाच्या आरोपाखालीं येरवड्यास

करण्यांत आली; तरीहि या सर्व धामधुमीच्या काळांत लोकजागृतीच्या कामांत म्हणण्यासारखा व्यत्यय येऊं शकला नाहीं, किंवा लोकांच्या अंगावर चळवळ चालविण्याचें ओझें आवांक्याबाहेर असें पडलें नाहीं. थोडीबहुत ग्लानी येते न येते तोंच लोकमान्य सुटून आले व त्यांनीं ' पुनश्च हरिः ओम् ' या मंत्रोच्चारानें आपला उपदेश अधिकच गंभीर पण प्रोत्साहक शब्दांत चालू ठेविला. पुढें डिग्बीकृत ' भरभराटलेलें इंग्रजी हिंदुस्थान ' आणि दादाभाईकृत ' हिंदुस्थानचें दारिद्र्य ' या ग्रंथांनीं राजकीय कल्पनांची आंकडेशास्त्राच्या दृष्टीनें पायाशुद्ध मांडणी झाली व ती सयुक्तिक रीतीनें खोडून काढण्याचें काम अधिकारी वर्गालाहि अशक्य झालें. हें पाहून ज्या लोकजागृतीचा संकल्प १८९६ सालीं करावा लागला तो बराच फळास येऊन ' लोकमतास भीक न घालण्याचा जरी हल्लींच्या बहुतेक अधिकाऱ्यांचा संकल्प ' दिसतो, तथापि पूर्वींपेक्षां दिवसेंदिवस **लोकमत अधिकाधिक प्रबळ होत चाललें आहे,** ' (२-१२-०२), असे समाधानाचे उद्गार केसरीनें काढले आहेत.

यानंतर दोनतीन वर्षांत, स्वराज्य हें आमचें ध्येय असावें, याविषयीं सर्वांची एकवाक्यता झाली. परंतु त्याचें स्वरूप काय व तें कोणत्या उपायांनीं मिळवायाचें या मुद्द्यांवर वाद माजून ठोकळ मानानें तीन पक्ष निर्माण झाले ते असेः—

१. साम्राज्यांतर्गत स्वराज्य हें ध्येय व कॉन्स्टिटयूशनल मार्गानें पण राज्यकर्त्यांना न चिडवितां तें गांठण्याचा प्रयत्न करावा.

२. लोकशाही स्वरूपाचें स्वराज्य हें ध्येय असावें व लोकमत प्रभावशाली बनवून तें गांठण्यासाठीं खटपट करावी. आणि

३. स्वातंत्र्य हें ध्येय असावें.

यांपैकीं दुसऱ्या म्हणजे लोकशाही स्वराज्याचा पुरस्कार केसरीनें केला. त्यासंबंधींची हकीकत या ग्रंथांत इतर लेखांतून आली असल्यामुळें तिची द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं.

---

# बहिष्काराची चळवळ

[ श्री. सदाशिव खंडो आळतेकर, बी. ए., एल्एल्. बी. ]

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ॥
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥
——श्रीमद्भगवद्गीता.

—बहिष्कार-योग, केसरी, ५-९-१९०५.

१. उपोद्घात :—केसरीचा जन्म सन १८८१ मध्यें झाला. त्या वेळपासून सतत पन्नास वर्षे केसरी लोकांमध्यें चैतन्य उत्पन्न करून लोकजागृतीचें काम करीत आहे. निद्रित महाराष्ट्र केसरीनें जागा केला. कर्तव्यमूढ महाराष्ट्रजनतेस केसरींतील निर्भीड, मुद्देसूद व तेजस्वी लेखांनीं कर्तव्यदक्ष केलें. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क 'आहे व तें मी मिळवीनच,' ही केसरीकार कै. लोकमान्य टिळक यांची सुप्रसिद्ध उक्ति केसरींतील लेखांनीं महाराष्ट्रजनतेच्या हृत्पटलावर कोरली गेली आहे. नानाविध महत्त्वाच्या विषयांवर हृदयस्पर्शी लेख लिहून केसरीनें महाराष्ट्रांतील जनतेचींच नव्हे तर सर्व हिंदुस्थानांतील जनतेचीं मनें प्रक्षुब्ध करून त्यांना स्वराज्यप्राप्तीच्या चळवळींत धडाडीनें व प्रसंगविशेषीं कारागृहवास पत्करूनहि पडण्यास प्रवृत्त केलें आहे. म्हणूनच चिरोलनें केसरीकार लोकमान्य टिळक यांना The Father of Indian Unrest हिंदुस्थानांतील प्रक्षुब्धतेचे जनक—ही अन्वर्थक पदवी दिली. केसरीनें ज्या महत्त्वाच्या विषयांवर तेजस्वी लेख लिहून लोकजागृति केली, त्या विषयांत 'बहिष्काराची चळवळ' या विषयाची प्रामुख्यानें गणना करितां येईल.

२. बहिष्काराची उत्पत्ति :—'बहिष्कार' हें इंग्रजी Boycott शब्दाचें भाषांतर आहे. 'एका इंग्लिश बड्या जमीनदाराची जमीन आयर्लंडांत होती, तिची 'व्यवस्था कॅप्टन बॉयकॉट नांवाच्या इंग्रजाकडे होती. त्याच्या त्रासामुळें आयर्लंडांतील 'लोकांनीं त्याच्याशीं सर्व व्यवहार बंद ठेविले. अखेर त्यास मारहाण करून ठार 'मारिलें. तेव्हांपासून कोणत्याहि मनुष्याबद्दल तिरस्कार उत्पन्न होऊन त्याच्याशीं 'कोणत्याहि प्रकारचा संबंध न ठेवणें अगर कोणत्याहि वस्तूबद्दल तिरस्कार उत्पन्न 'होऊन ती न घेणें, या गोष्टीस (Boycott) 'बहिष्कार' म्हणण्याचा प्रघात 'पडला आहे.' (१३-१-३१).

३. बहिष्कारासंबंधीं पहिला लेखः— केसरींत बहिष्कारावर पहिला लेख केसरीच्या पहिल्याच वर्षी (१५-२-८१) आला आहे. केसरीकार ता. ५-९-०५ च्या केसरींत 'बहिष्कारयोग' या विषयावर लिहितांना म्हण-

तातः— " बहिष्कार ' हा शब्द मूळ जरी धार्मिक शिक्षेचा वाचक असला, तरी ' 'काळें पाणी' या रूपानें त्याचा राजकीय शिक्षाग्रंथांत म्हणजे पिनल-कोडांत ' समावेश झालेला आहे. त्या राजकीय रूपांतराप्रमाणेंच त्याचें व्यावहारिक रूपांतर ' व्हावयास पाहिजे असें केसरींत पहिल्या वर्षी म्हणजे सन १८८१ सालीं आय- ' र्लंडांतील लँडलीग'संबंधानें लिहितांना आम्ही लिहिलें होतें. 'एकदां बहिष्कारास ' व्यावहारिक शिक्षेचें स्वरूप मिळाल्यास त्यापासून आपणांस पुष्कळ उपयोग ' करून घेतां येईल व ज्या हजारों गोष्टी आपल्या नुकसानीस कारण होतात त्यांचा ' चांगला बंदोबस्ता करितां येईल,' असें त्या वेळीं आम्हीं म्हटलें होतें. पंधरा ' दिवसांपूर्वी लिहिलेल्या ' राष्ट्रीय बहिष्कार ' या लेखांत, ( २२-८-०५ ), ' हेंच मत प्रतिपादन केलें आहे; आणि तेंच बरोबर आहे, अशी आमची खात्री ' आहे. हिंदुस्थानासारख्या सर्वतोपरी पंगू झालेल्या देशास आपलें म्हणणें तडीस ' नेण्यास जर कांहीं साधन किंवा योग शिल्लक राहिला असेल तर तो राष्ट्रीय बहि- ' ष्कार हाच होय. '

**४. बहिष्कारापूर्वी स्वदेशी चळवळ :**—बेजबाबदार नोकरशाहीस ताळ्यावर आणण्याकरितां एक परिणामकारक साधन म्हणून बहिष्काराच्या चळवळीस बंगालच्या फाळणीनंतर सन १९०५ सालीं प्रारंभ झाला. स्वदेशी चळवळीस प्रारंभ सन १८९६ सालीं झाला. हिंदुस्थान सरकारनें लँकेशायरला संतुष्ट करण्याकरितां त्या वर्षी मँचेस्टरच्या कापडाबरोबर हिंदुस्थानांतील गिरण्यांच्या सुतावर व कापडावर पांच टक्के जकात अन्यायानें बसविली. तेव्हां 'यापेक्षां ज्यास्त अन्याय तो कोणता ?' ह्या लेखांत केसरी म्हणतोः—' हिंदुस्थान सरकारनें आपल्या कायदे कौन्सिलांत मँचेस्टर- ' वाल्यांच्या हिताकरितां हिंदुस्थानांतील लोकांच्या मताची पूर्ण अवहेलना करून ' जो उद्दामपणाचा अन्याय केला त्याची सर आजपर्यंत पसार झालेल्या कोणत्याहि ' कायद्यास क्वचितच येऊं शकेल......हा जकातीचा प्रश्न इतका चिरड येण्या- ' जोगा आहे कीं, १०० वर्षांपूर्वी अमेरिकेंतील लोकांच्या संमतीखेरीज त्यांच्या ' चहावर जेव्हां इंग्लंडच्या लोकांनीं जकात बसविली तेव्हां परदेशांतील चहाचे ' गठ्ठे त्यांनीं समुद्रांत फेंकून दिले, पण जकात भरली नाहीं. व याच कारणामुळें ' पुढें अमेरिका स्वतंत्र झाली......सरकारनें जरी अन्याय केला तरी त्याचा ' प्रतिकार करणें कांहीं अंशीं तरी तुमच्या स्वाधीन आहे. तो प्रतिकार कोणता ' म्हणाल तर सर्वांनीं देशी कपडा वापरावयास लागावें हा होय....तुमच्या अंगांत ' जर कांहीं माणुसकी असेल, सरकारानें किंवा इतरांनीं केलेला अन्याय तुम्हांला ' खपत नसेल अथवा त्यामुळें तुमच्या अंतःकरणास जर चटका बसला असेल तर ' तुम्ही देशी कापड वापरण्याचा निश्चय करून मँचेस्टरवाल्यांचा त्यांनीं केलेल्या ' अन्यायाबद्दल सूड घेतल्याखेरीज राहूं नका.........जोंपर्यंत तुमच्या अंगांत ' अशा रीतीनें प्रतिकार करण्याची शक्ति आली नाहीं, तोंपर्यंत तुमच्या अर्जास,

"'अथवा कायदे-कौन्सिलांतील तुमच्या प्रतिनिधींच्या भाषणांस अगर युक्तिवादास
' कोणीहि भीक घालणार नाहीं. '(११-२-९६).

**५. राष्ट्रीय बहिष्कारापूर्वीचे प्रयत्न:**—पुण्यांत खादीचा अंगरखा व कंदी पागोटें घालणाऱ्या कै. गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका यांनीं सुरू केलेली १८७५ सालची हिंदुस्थानांतील पहिली चळवळ जशी फार वेळ टिकली नाहीं, त्याप्रमाणेंच सन १८९६ सालची चळवळ कांहीं प्रांतांतील पुष्कळ शहरीं जरी सुरू झाली तरी तीहि फार वेळ टिकली नाहीं. मिल्ल-फॉसेटच्या अर्थशास्त्रांतील कांहीं सामान्य तत्त्वांच्या जोरावर, कांहीं इंग्रजी शिकलेल्या मंडळींनींच देशी चळवळीस मदत करण्याऐवजीं तिची थट्टा केली. कै. ना. न्या. रानडे यांनीं अर्थशास्त्राचीं तत्त्वें गणितशास्त्राप्रमाणें त्रिकालाबाधित नाहींत असें म्हटलें तरी सर दि. ए. वाच्छा-सारखे देशभक्तसुद्धां 'लांब धाग्याचा कापूस हिंदुस्थानांत उत्पन्न केल्याशिवाय ' देशी कापड स्वस्त पडणार नाहीं, व तो जोंपर्यंत उत्पन्न होऊं लागला नाहीं तोंपर्यंत ' देशी कापड वापरण्याची चळवळ करणें व्यर्थ आहे, '(१७-३-९६), असें बोलूं लागले. ह्याच लेखांत सर वाच्छांचें म्हणणें केसरीकारांनीं मुद्देसूद रीतीनें खोडून टाकिलें आहे. केसरीकार म्हणतात :—' विलायती मालाचें गिऱ्हाइक कमी करणें हीच तो माल ' आमच्या देशांत न येण्याच्या तजविजीची पहिली पायरी होय. होईल तितकें ' करून देशी माल वापरावयाचा असा पुष्कळ लोकांनीं संकल्प केला म्हणजे देशी ' मालाचा खप वाढून तो जास्त जास्त उत्पन्न करण्यास उमेद येईल; व सावकार ' लोकहि आपले पैसे चांगल्या कापसाची लागवड करण्यांत अथवा नवीन गिरण्या ' उभारण्यांत घालण्याचे कामीं तयार होतील. ' ( कित्ता ).

**६. बहिष्काराचा प्रारंभ :**—बंगाली बोलणारे आणि बंगाली आचारविचारांचे लोक एकत्र राहिल्यानें त्यांच्यामधील संघशक्ति वाढत चालली ही गोष्ट धूर्त लॉर्ड कर्झन यांच्या लक्षांत आली व त्यांनीं बंगाल प्रांतांतल्या लोकमतास न जुमानतां बंगालची फाळणी केली. तेव्हां कलकत्ता येथें प्रचंड जाहीर सभा भरून विलायती मालावर बहिष्कार घालण्याचा ठराव मंजूर झाला. बंगाली लोकांनीं त्वेषाच्या भरांत वरील ठराव केला म्हणून कित्येकांनीं टीका केली. त्या टीकेस उत्तर म्हणून केसरी-कारांनीं २२-८-०५ च्या अंकांत ' राष्ट्रीय बहिष्कार ' हा अग्रलेख लिहून बहिष्काराचें मुद्देसूद समर्थन केलें आहे. ' आमच्या मतें बंगाली लोकांनीं सध्यांच्या ' स्थितींत योजलेला उपाय अगदीं योग्य आणि जरूरीचा आहे. आज वीस वर्षे ' राष्ट्रीय सभेची ओरड एकसारखी चालू आहे आणि त्यावरून नुसत्या ओरडीनें ' राजकीय बाबतींत तरी सत्ताधारी लोकांचीं मनें वळत नाहींत एवढें सिद्ध झालें ' आहे......स्वार्थामुळें किंवा विकारवशतेमुळें आमच्या म्हणण्याचा प्रकाश ' ज्यांच्या डोक्यांत पडत नाहीं, त्यांस ताळ्यावर आणण्यास कोणता उपाय योजावा ? ' विलायतेंतील लोकांपुढें आमची रड गायली तर कांहीं उपयोग होईल असें

' वाटत होतें, पण ही समजूत खोटी आहे असें मि. हिंडमन् यांनीं पंडित शामजी ' यांनीं स्थापिलेलें ' इंडिया हाउस ' उघडते वेळीं जें भाषण केलें, त्यांत स्पष्ट ' सांगितलें आहे. अधिकार आणि स्वार्थ यांनीं डोळ्यांवर आलेलें पटल तोंडाच्या ' वाऱ्यानें फुंकून कधींहि नाहींसें होत नाहीं. त्यास यापेक्षां जालीम उपायांची ' योजना केली पाहिजे...... मि. हिंडमन् म्हणतात कीं, हिंदुस्थानचें जर कल्याण ' व्हावयाचें असेल किंवा राज्यकर्त्यांकडून तुम्हांस अधिकाधिक हक्क प्राप्त करून ' घ्यावयाचे असतील तर ते विलायतेंतील लोकांची नेमस्तपणें विनंति ' करून प्राप्त व्हावयाचे नाहींत. याकरितां जो उद्योग करावयाचा तो ' तुमचा तुम्हींच करारीपणानें, निश्चयानें, किंबहुना माथेफिरूपणानेंहि केला ' पाहिजे, एरव्हीं गत्यंतर नाहीं...... अरेरावी किंवा शिरजोर अधिकाऱ्यांचे डोळे ' उघडण्यास त्यांची किंवा विलायतेंतील लोकांची विनवणी करण्यापेक्षां अधिक ' तीव्र उपाय योजला पाहिजे, एवढें सिद्ध झाल्यावर असा उपाय कोणता हा प्रश्न ' सहज उद्भवतो. ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला तर ' राष्ट्रीय बहिष्कार ' हा ' यांपैकींच एक उपाय आहे, असें आढळून येतें. सर डब्ल्यू वेडरबर्न यांनीं विला- ' यतेंत 'राष्ट्रीय सभे'वर जें नुकतेंच एक व्याख्यान दिलें, त्यांत त्यांनीं असें सांगितलें ' कीं, इटली देश जेव्हां आस्ट्रियाच्या ताब्यांत होता, तेव्हां इटलियन लोकांनीं ' परकी आस्ट्रियन अधिकाऱ्यांस बहिष्कार घालून राज्यव्यवस्थेचें काम दुष्कर करून ' टाकलें होतें. हिंदुस्थानांतील लोकांनीं हीच रीत स्वीकारली तर हिंदुस्थानांत राज्य- ' कारभार चालविणें राज्यकर्त्यांस कठीण जाईल...राज्यकर्त्यांविरुद्ध शस्त्र उचलण्याची ' आमची ताकद नाहीं व इच्छाहि नाहीं. पण विलायतेंतील व्यापाऱ्यांस व मजुरांस ' आम्ही विलायती माल घेऊन जे कोट्यावधी रुपये दरसाल देतों तेवढे तरी आमच्यानें ' बंद होऊं नयेत काय ? विलायती मालावांचून कांहीं ठिकाणीं अडेल इतकी आमच्या ' धंद्यांची स्थिति निकृष्ट झालेली आहे हें खरें आहे. पण जेव्हां देशी माल मिळ- ' णार नाहीं, तेव्हां निदान विलायती तरी न घेतां दुसऱ्या कोणत्या तरी देशांतला ' घेऊन विलायतेंतील आमच्या मागण्यांकडे दुर्लक्ष्य करणाऱ्या लोकांबद्दल आमच्या ' मनांत उत्पन्न झालेला त्वेष आम्ही व्यक्त कां करूं नये ?...थोड्या दिवसांपूर्वी ' चीननें अशाच प्रकारचा निर्धार दाखविला आहे. अमेरिकन लोक आपणांस ' नीट वागवीत नाहींत तर, अमेरिकन माल चिनांत खपूं द्यावयाचा नाहीं असा ' लोकांनीं निर्धार केल्याबरोबर अमेरिकन लोकांचे डोळे उघडले. अमेरिकेंतील ' संयुक्त संस्थानें जेव्हां स्वतंत्र झालीं, तेव्हां विलायती मालावर असाच बहिष्कार ' टाकला होता. इटली, चीन व अमेरिका हीं तीन उदाहरणें आमच्या डोळ्यां- ' समोर असतां आम्ही जर त्यांचा उपयोग करून घेतला नाहीं तर आमच्यासारखे ' हतभागी व नादान कोणीच नाहींत असें म्हणावें लागेल. ' केसरींतील वरील उताऱ्यावरून हिंदुस्थानांत राजकीय बहिष्कार प्रथम १९०५ मध्यें सुरू झाला व

तो लोकमताला पायाखालीं तुडवून लॉर्ड कर्झननें बंगालची फाळणी केल्यामुळें झाला हें दिसून देईल.

**७. बहिष्काराची सर्व देशांत आवश्यकता :**—बंगालच्या फाळणीनंतर कलकत्ता येथें १९०६ सालीं राष्ट्रीय सभेचें अधिवेशन महर्षि दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षते-खालीं झालें व बहिष्कारास राष्ट्रीय सभेच्या ठरावाचा शिक्का मिळाला. सर फेरोज-शहा मेथासारखे रथीमहारथी असतांना बहिष्काराचा ठराव राष्ट्रीय सभेंत पास झाला, याचें कारण दादाभाई नौरोजी यांनीं अध्यक्ष या नात्यानें केलेलें तेजस्वी भाषण व लाल, बाल व पाल यांनीं दाखविलेली चिकाटी होय हें त्या सभेस हजर असलेल्यां-शिवाय इतरांना समजणें कठीण आहे. तरी ८-१-०७ च्या केसरींतील 'गेल्या राष्ट्रीय सभेंत काय झालें?' हा लेख वाचल्यास थोडीशी कल्पना येईल. 'या 'उद्योगांत ( अर्ज, विनवण्या इ. ) **आपली तीव्र निराशा झाली आहे. इतकी 'कीं, आपल्या जागीं दुसरा कोणी पुरुष असता तर तो बंड करण्यास खचित** 'प्रवृत्त झाला असता. दादाभाईंचे हे निराशेचे उद्गार ऐकून सहजविश्वासनिष्ठ 'तरुणांखेरीज इतर लोकांचीं अंतःकरणें या मार्गाच्या निरुपयोगीपणाबद्दल संश-'यित राहतील असें आम्हांस वाटत नाहीं.' (८-१-०७). गोड बोलण्यानें नोकर-शाही कांहीं देणार नाहीं, बहिकाराच्या तीव्र अस्त्राचाच उपयोग करणें आवश्यक आहे हें सिद्ध करण्याकरतां महाभारतांतील उदाहरण देऊन केसरी म्हणतो :— '**न हि दुर्योधनो राज्यं मधुरेण प्रदास्यति** असें जें युधिष्ठिरास तत्त्व सांगितलें आहे, 'तेंच सध्यांच्या राज्यकर्त्यांसंबंधानें हिंदुस्थानांतील लोकांस किंवा त्यांच्या करितां 'झटणाऱ्या राष्ट्रीय सभेस सांगणें जरूर आहे.' ( १०-७-०६ ). कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत बंगालमध्यें प्रथमतः बंगभंगानिमित्त सुरू झालेला बहिष्कारयोग कायदेशीर होता व आहे असें कॉंग्रेसचें मत आहे, असा ठराव पास झाला. हा ठराव बंगाल-पुरता आहे असें कांहीं नेमस्त पुढारी बोलूं लागले, तेव्हां त्यांना केसरीनें उत्तर दिलें :— 'ज्या प्रकारच्या स्थितींत बहिष्कारयोग कायदेशीर आहे, असें कॉंग्रेसनें 'आपलें मत दिलें, ती परिस्थिति ( म्हणजे लोकांचें म्हणणें सरकारनें न ऐकणें व 'त्यांच्या अर्जांचा विचार न होणें ) बंगाल्यासच नव्हे तर सर्व हिंदुस्थानास लागू 'आहे. अर्थात् बहिष्कारयोग कोणत्याहि प्रांतांत स्वीकारला तरी तो कॉंग्रेसच्या 'मताप्रमाणें कायदेशीरच होय.' ( ८-१-०७ ). बहिष्काराची चळवळ सर्व देशांत जोरानें सुरू होण्याविषयीं केसरीनें सतत कांहीं वर्षें अग्रलेख व स्फुटें लिहून मोठी कामगिरी बजाविली. त्या सर्व लेखांतील थोडे थोडे उतारे दिले तरी एक मोठा ग्रंथ होईल. तथापि 'स्वदेशी आणि बहिष्कार यांचा वाढदिवस,' ( ६-८-०७ ), हा अग्रलेख फार महत्त्वाचा आहे. त्यांतील कांहीं थोडा भाग खालीं देत आहें :— 'मि. फेल्प्स् या अमेरिकन गृहस्थाचें 'स्वदेशी'वरील पत्र सर्वांनीं वाचण्या-'सारखें आहे. नव्या पक्षानें सुरू केलेला बहिष्कारयोग औद्योगिक दृष्ट्या खरा

‘ असला तरी राजकीय बाबतींत त्याचा उपयोग करूं नये....बहिष्कारानें राज्य-
‘ कर्त्यांशीं द्वेष उत्पन्न होतो, हे शब्द गरीब हिंदुस्थानवासी प्रजेनें वापरण्यासारखे
‘ नाहींत, इत्यादि जुन्या प्रकारच्या कल्पना लढवून नेमस्तांनीं या राजकीय योगाची
‘ महती कमी करण्याचा प्रयत्न चालविला होता. त्यास मि. फेल्प्स् यांनीं दिलेलें
‘ उत्तर फार समर्पक आहे. स्वदेशी आणि बहिष्कार हीं दोन्ही आवळीं जावळीं शस्त्रें
‘ आयरिश लोकांच्या हातांत पडण्यापूर्वी अमेरिकेंत गेलेल्या इंग्रज वसाहतवाल्यांनीं
‘ त्यांची मातृभूमि जो इंग्लड देश त्याच्या विरुद्ध अंमलांत आणली होती; आणि
‘ मि. फेल्प्स् म्हणतात कीं, विलायती जुलुमी कायद्याचा प्रतिकार करण्याचें
‘ सामर्थ्य पुढें अमेरिकन लोकांस प्राप्त झालें. वसाहतवाले जातीचे इंग्रजच होते.
‘ तथापि त्यांनीं इंग्लंडचें नाक धरीपर्यंत त्यांस स्वराज्याचे हक्क देण्यास इंग्लंड
‘ तयार झालें नाहीं....अमेरिकेंत ज्या वेळीं बहिष्कारयोग सुरू झाला, तेव्हां त्याची
‘ थट्टा करणारे किंवा दुराग्रहानें परदेशी माल वापरणारे अमेरिकेंतहि कांहीं मूर्ख
‘ नव्हते असें नाहीं; पण अशा लोकांस समाजांतून बहिष्कृत करून अमेरिकन
‘ लोकांनीं त्यांची पोराबाळांकडून फटफजिती उडविली, असें मि. फेल्प्स् यांनीं
‘ आपल्या पत्रांत लिहिलें आहे. बहिष्कारयोग पूर्णपणें फलद्रूप व्हावा अशी जर
‘ आमची इच्छा असेल तर आम्हीहि हाच क्रम अंगिकारला पाहिजे. अमुक
‘ जिनसा परदेशी घेऊं नयेत असें एकदां ठरल्यावर फाजील शहाणपणानें किंवा
‘ डौलानें त्यांच्या विरुद्ध जो जाईल त्यास बहिष्कार टाकून त्याच्याशीं सर्व व्यवहार
‘ लोकांनीं बंद केला पाहिजे. इतकेंच नव्हे तर, तो कोठेंहि गेला तरी आणि विशेष-
‘ करून तो सुशिक्षित असल्यास अधिकच त्याची जाहीर रीतीनें फटफजिती
‘ केली पाहिजे. व तपासनीस कमिट्या नेमून त्यांनीं मोठ्या दक्षतेनें आपलें काम
‘ चालू ठेविलें पाहिजे......ऐतिहासिक ठेंचा खाऊन शहाणे झालेले इंग्रज लोक
‘ आम्हांस स्वराज्याचे हक्क देण्यास आम्ही बंड करण्याची वाट पहातील असें
‘ आम्हांस वाटत नाहीं; पण त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सदर हक्क
‘ केवळ भिक्षांदेहीनें आम्हांस कधींहि मिळणार नाहींत. इंग्रज लोक चिडतील
‘ ही भीति व्यर्थ आहे. कोणाचाहि स्वार्थ कमी झाला तर तो थोडाबहुत तरी
‘ रागावणारच; आणि इंग्रज लोक इतके कांहीं दुधखुळे नाहींत कीं, हिंदुस्थानांत
‘ स्वदेशी आणि बहिष्कार झाल्यानें त्यांचें नुकसान होईल हें त्यांस कळत नाहीं.
‘ ते आपल्या स्वार्थाकरितां आमच्यावर धुसफुसणार अथवा छल करणार हें उघड
‘ आहे. पण त्यास न जुमानतां आम्ही जर स्वावलंबनाचे सर्व कायदेशीर उपाय
‘ अंमलांत आणले तर बंड न करतांहि आमची कार्यसिद्धि होणार नाहीं असें
‘ नाहीं. अमेरिकन गृहस्थाच्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें लोकांत **स्वदेशाभिमान**
‘ **जागृत करणें** आणि त्यांस **एकजुटीनें वागण्यास शिकविणें** हेहि स्वदेशी आणि
‘ बहिष्कार यांचे दुसरे मोठे फायदे आहेत. व बहिष्कारयोगाच्या या गुणाची सध्यां

' आपणांस फार जरूर आहे. किंबहुना अमेरिकेंत ज्याप्रमाणें बहिष्कारयोगाच्या
' विरुद्ध बोलणाऱ्या किंवा वागणाऱ्या इसमास स्वदेशाचा शत्रु समजत असत
' तशा प्रकारचें लोकमत तयार करण्यास आम्ही लागलें पाहिजे.' (६-८-०७).

८. **अँग्लो-इंडियन पत्रांची कपटनीति**:—लोकजागृति होऊन राजकीय चळवळ जोरानें सुरू झाली असतां, ती मंदावत चालली आहे असें भासविण्याचा नोकरशाही व अँग्लो-इंडियन पत्रें प्रयत्न करीत असतात. याचा अनुभव हल्लींच्या अनत्याचारी स्वातंत्र्य-युद्धांत आलाच आहे. दर महिन्यास खुद्द हिंदुस्थान सरकार सत्याग्रह चळवळीबद्दल एक पत्रक प्रसिद्ध करीत असतें. त्याचा उद्देश राष्ट्रीय सभेची सत्याग्रहाची चळवळ मंदावत चालली आहे असें दाखविण्याचा ( विशेषतः इंग्लंडांतील लोकांस ) आहे. परंतु केसरीसारखीं लोकमतदर्शक पत्रें दडपशाहीचीं उदाहरणें देऊन व तुरुंगांत गेलेल्या देशभक्तांची यादी प्रसिद्ध करून राजकीय चळवळी मंदावत नसून उलट जोरानें फैलावत आहेत हें लोकनिदर्शनास आणून देतात. बंगाल फाळणीनंतरच्या बहिष्काराच्या वेळीं अशीच उत्तम कामगिरी केसरीनें केली, हें १३-८-०७ च्या केसरींतील स्फुट लेखांवरून दिसून येईल. 'कलकत्त्यांतील बहि-
' ष्काराच्या वाढदिवसाचा समारंभ मिळमिळीत व आळणी झाला असें अँग्लो-
' इंडियन पत्रांचें म्हणणें आहे. नावडतीचें मीठ आळणी अशांतला हा प्रकार आहे.
' आळणी झाला म्हणजे काय ? लोकांत उत्साह नव्हता असेंहि नाहीं, बहिष्काराचे
' चळवळीपासून लोक परावृत्त होत चालले आहेत काय ? तर तसेंहि नाहीं.
' कारण तशी वस्तुस्थिति असती तर सरकारच्या पिछेहाटीच्या जुलमाचें काय
' प्रयोजन होतें ?... **बहिष्काराच्या चळवळीचा फैलाव कसा व कितपत होत**
' **चालला आहे हें सरकारी कोपाच्या थरमॉमीटरवरून चांगलें समजतें.** पिछे-
' हाटीच्या धोरणाचा पारा झपाट्यानें वर चढत चालला असतांना बहिष्काराचा
' फैलाव होत नाहीं असें म्हणण्यास कोणी तरी तज्ज्ञ तयार होईल काय ? बहिष्काराचे
' सभेस हजारों लोक जमले होते. पुढाऱ्यांचीं उत्साहजनक भाषणें झालीं. रात्रौ
' दीपोत्सव करण्यांत आला. सर्व दिवसभर घरींदारीं, रस्त्यावर, मोठे लोकांत,
' विद्वानांत, व्यापाऱ्यांत, अशिक्षितांत, हमालांत, बायकामुलांत बहिष्काराच्या
' उपायानें राष्ट्रोन्नति कशी करून घेतां येणें शक्य आहे, या एकाच विषयाची एक-
' सारखी चर्चा चालली होती. मग समारंभ आळणी झाला म्हणजे काय ? अँग्लो-
' इंडियनांच्या लेखांपासून 'आळणी' याचा अर्थ असा दिसतो कीं, त्या दिवशीं
' बंगाल्यांनीं युरोपियन बायकांवर दगड फेंकले नाहींत, जाणाऱ्यायेणाऱ्या युरोपियन
' पुरुषांना चोप दिला नाहीं, किंवा आपसांत तंटेबखेडे करून एकमेकांचीं डोकीं
' फोडून युरोपियन पोलिसला पकडापकडी करण्याची संधि दिली नाहीं. वरील
' गोष्टी झाल्या तरच बहिष्कार सजीव अशी स्वतःची गैरसमज बुद्ध्या करून घेऊन
' 'लोक आमच्यावर हात टाकण्यास अद्याप तयार कोठें झाले आहेत ?' असले

' अवगुण बहिष्काराच्या वाढदिवसाचे समारंभांत काढण्यास अँग्लो-इंडियन पत्रकार ' तयार झाले आहेत. यावरून कायद्याच्या सीमेच्या आंत बहिष्काराची चांगली ' वाढ होत चालली आहे, असें सिद्ध होत नाहीं काय ? ' हा उतारा विस्तारानें देण्याचें कारण इतकेंच कीं, अँग्लो-इंडियन पत्रकारांची कपटनीति केसरीनें २०-२५ वर्षांपूर्वींच पूर्णपणें ओळखली होती व त्याप्रमाणें केसरी वेळोवेळीं लोकांस त्यांची कपटनीति ओळखून आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावण्याची सूचना देत आला आहे.

९. **निर्जीव वस्तूंवर तरी बहिष्कार घाला** :—हिंदुस्थानानें परकी मालावर बहिष्कार कां घालावा याचें मार्मिक विवेचन केसरीनें १७-९-०७ च्या अंकांत केलें आहे. त्या वर्षी कानडांतील इंग्रज व तेथें मोलमजूरीकरितां जाणारे चीन, जपान व हिंदुस्थान देशांतील लोक यांमध्यें तंटा उपस्थित झाला होता. ' कानडांतील ' इंग्रजांचें म्हणणें हिंदूंनीं, चिनी लोकांनीं किंवा जपानी लोकांनीं कानडांत राहून ' मोलमजूरी करून किंवा उद्योगधंदे करून पोट भरूं नये. आपल्या देशांत अशा ' रीतीनें पोट भरूं दिलें असतां आपली उपासमार होते. या कारणाकरितां अमे- ' रिकेंतील अमेरिकन व कानडांतील इंग्रज आपापल्या देशांत परकी लोकांवर ' बहिष्कार घालीत आहेत......हिंदुस्थानांत सांप्रत परकी माणसांवर बहिष्कार ' घालण्यांत आला नसून कांहीं परकी मालावर बहिष्कार घालण्यांत आला ' आहे. या बहिष्काराला हिंदुस्थानांतील इंग्रज नांवें ठेवीत आहेत. पण ' त्यांच्याच जातभाईंनीं जपानी माणसांवर घातलेला बहिष्कार त्यांना पसंत पडतो. ' अमेरिकेंत किंवा कानडांत जर असला बहिष्कार पोटापाण्याच्या प्रश्नामुळें ' घालण्यांत येतो, ट्रॅन्सवालांतील हिंदी लोकांना जर पोटापाण्याच्या प्रश्नाकरितां ' आपला उद्योगधंदा सोडून ट्रॅन्सवालांतून विलायत सरकार पर्यायानें हांकलून ' देतें, तर हिंदुस्थानांतील लोकांनीं आपली सांपत्तिक स्थिति सुधारण्याकरितां ' कांहीं निवडक परकी मालावर बहिष्कार घालण्याचें व्रत पत्करलें तर त्यांत वावगें ' काय झालें ?......जपानी लोक आपल्या हक्काची वांटणी मिळविण्याकरितां ' शस्त्रास्त्रांचा पूर्ण उपयोग केल्यावांचून राहणार नाहींत. हिंदूंच्या मृतप्राय स्थितीला ' अनुसरून हिंदूंचा उपाय जपानाप्रमाणें जिवंत असणें शक्य नाहीं. अशा स्थितींत ' परकी जिवंत प्राण्यांवर जरी नाहीं, तरी परकी निर्जीव वस्तूंवर हिंदूंनीं बहिष्कार ' घालणें जरूर आहे. ' चोवीस वर्षांपूर्वी केसरीकारांनीं फक्त निर्जीव वस्तूंवरच बहिष्कार घालण्याची आवश्यकता प्रतिपादन केली होती. परंतु २४ वर्षांत हिंदुस्थानांत राजकीय जागृति इतकी प्रखर झाली आहे कीं, नोकरशाहीच्या दडपशाहीला त्रासून कित्येक ठिकाणीं हल्लींच्या अनत्याचारी युद्धांत सजीव प्राण्यांवर—नोकरशाहीच्या हस्तकांवरहि—बहिष्कार घातला होता. हल्लीं सर्व देशांत बहिष्काराची चळवळ जोरानें सुरू असून ब्रिटिश मालावर बहिष्कार घालणें म्हणजे आपलें एक

मातृभूमीच्या उद्धाराचें पवित्र कर्तव्य आहे, असें प्रत्येक हिंदी मनुष्य समजत आहे. नोकरशाही वेळेवर सावध होऊन राष्ट्रीय सभेच्या मागण्यांप्रमाणें हिंदी लोकांचे न्याय्य हक्क कबूल न करील तर १९०७ सालीं केसरीनें निर्जीव वस्तूंवर बहिष्कार घालण्याची आवश्यकता जशी प्रतिपादन केली, तशी १९३१ सालीं सजीव प्राण्यांवर बहिष्कार घालण्याची आवश्यकता सर्व राष्ट्रीय वृत्तीच्या हिंदी वृत्तपत्रांना प्रतिपादन करावी लागेल !

**१०. महाडकरांचा सजीव प्राण्यांवर बहिष्कार** :—तरी सजीव प्राण्यांवर बहिष्कार घालावा ही कल्पना त्या वेळींहि रूढ झालीच होती. सजीव माणसांवर बहिष्कार घालून आपले हक्क मिळविल्याचें महाडचें एक उदाहरण ता. २८-१-०८ च्या केसरींत देऊन महाडकरांचें केसरीनें अभिनंदन केलें आहे. ‘ जंगलखात्याच्या एका ‘ जुलमी नियमाच्या आधारें महाड गांवांतील लांकडाचें तासकाम व चिरकाम ‘ यांस जंगलखात्याचे अधिकाऱ्यांनीं हरकत करून लोकांवर खटले केले. या नियमा- ‘ संबंधानें अर्ज, विनंत्या, आर्जवें, डेप्युटेशनें वगैरे सर्व प्रकार होऊन त्यांची विफलता ‘ सिद्ध झाल्यावर महाडच्या दरोबस्त लोकांनीं जंगलखात्याच्या सर्व लोकांवर ‘ कडकडीत बहिष्कार घातला ! त्यांस महाड गांवांतत राहण्यास जागा, पिण्यास ‘ पाणी व खाण्यास शिधासामग्री मिळेना; न्हावी, परीट, सोनार त्यांचीं कामें ‘ करीनात. कोणी त्यांचीं बोलेना कीं त्यांचे वाऱ्यास राहीना ! अशा प्रकारें ‘ बहिष्कारमंत्राचा कडक अंमल सुरू होतांच, त्याचा एकाच आठवड्यांत असा ‘ परिणाम झाला कीं, महाड गांव व गांवची हद्द यांस वरील जुलमी नियम यापुढें ‘ लागू नाहींत असे जाहीरनामे लागले व लोकांचा छळ संपला ! राजकीय बहि- ‘ ष्काराचा पहिला धडा सगळ्या देशास घालून देऊन व तो यशस्वी करून दाख- ‘ वून ‘ निश्चयाचें बळ । तुका म्हणे होंचि फळ ’ हा सिद्धांत राजकीय बाबतींत ‘ खरा करून दाखविला याबद्दल महाडकरांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे.’

**११. ‘ देशद्रोही ’ कापडवाले**: —बहिष्काराची चळवळ बंगाल्यांत १९०८ सालीं इतक्या जोरानें चालली होती कीं, बारिसाल जिल्ह्यांतील बाबू नवीनचंद्र दास या वकिलांनीं प्रबल लोकमतास न जुमानितां परदेशी माल विकणाऱ्या दुर्गाचरण नांवाच्या व्यापाऱ्याचें एका दाव्यांत, तो ‘ देशद्रोही ’ आहे म्हणून वकीलपत्र घेतलें नाहीं. सदरहू गोष्ट वाचकांच्या नजरेस आणतांना केसरी म्हणतो :—‘ वरीलप्रमाणें ‘ वकिलांचा जबाब येतांच डि. जजांचें पित्त खवळलें. बारिसालमधील या बहि- ‘ ष्काराच्या चळवळीचीं हाडें मोडण्याचा त्यांनीं संकल्प केला. आणि केवळ ‘ राजकीय मतभेदास्तव एकाद्याचें वकीलपत्र घेण्याचें वकिलानें नाकारिलें म्हणजे ‘ ते वकिलीच्या धंद्यास न शोभण्यासारखें त्याचें वर्तन झालें असें ठरवून त्याजवर ‘ डि. जज्जसाहेबांनीं काम चालविलें. अखेर हें प्रकरण हायकोर्टापुढें आलें व त्याचा ‘ निकाल ची. ज. कॉक्स यांनीं सांगितला. आपल्या वकिलीचे कामांत लबाडीचें

‘ अगर अत्यंत गैरशिस्त वर्तन कोणी वकील अगर मुखत्यार करील तर किंवा दुसऱ्या
‘ योग्य कारणासाठीं त्याची सनद रद्द करण्याचा हायकोर्टास अधिकार आहे, अशा
‘ अर्थाचें लीगल प्रॅक्टिशनर्स ॲक्टाचें तेरावें कलम आहे; परंतु सदरहू वकिलाचें
‘ वर्तन लबाडीचें नव्हतें, अत्यंत गैरशिस्तहि नव्हतें किंवा अन्य तऱ्हेनेंहि या कलमा-
‘ खालीं येण्यासारखें नाहीं. आपल्याकडे येतील त्या पक्षकारांचें वकीलपत्र घेतलेंच
‘ पाहिजे असा कायद्याचा नियम नाहीं. तेव्हां एखाद्याचें वकीलपत्र घेणें न घेणें
‘ ही गोष्ट-मग तिचें कारण राजकीय असो अगर दुसरें कांहीं असो—वकिलाचे
‘ मर्जीवर आहे. अशा स्थितींत डि. जज्जानें वकिलांचे जबाब मागणें बेकायदेशीर
‘ असून आपलीं कारणें सांगण्यास वकीलहि बांधलेले नाहींत, असा स्पष्ट निकाल
‘ कलकत्ता हायकोर्टानें केला आहे. हिंदुस्थानांतील बहिष्काराची व अडवणुकीची
‘ चळवळ अधिक विस्तृत व जास्त तीव्र करण्याचे कामीं हा निकाल फार उपयो-
‘ गाचा आहे हें सांगावयास नकोच.’ ( २५-२-०८ ). शिवरायाच्या व लोक-
मान्यांच्या महाराष्ट्रांतील सर्व वकील कायदेभंग न करितां व वकिली न सोडितां
परदेशी कापड विकणाऱ्या ‘ देशद्रोही ’ व्यापाऱ्यांचें वकीलपत्र घेण्याचेंच नाका-
रतील तर केसरीनें म्हटल्याप्रमाणें बहिष्काराची व अडवणुकीची चळवळ अधिक
विस्तृत व जास्त तीव्र करण्याचे कामीं हायकोर्टाच्या ठरावाप्रमाणें कायदेशीर कक्षेंत
राहूनहि त्यांच्या हातून पुष्कळ देशसेवा होण्यासारखी आहे.

**१२. बहिष्कार द्वेषमूलक नाहीं** :—वरील लेख लिहिल्यानंतर पांच महिन्यांनींच
लोकमान्यांना राजद्रोहाच्या खटल्यांत वृद्धपणीं सहा वर्षांची शिक्षा झाली. तरी
बहिष्कारयोगावर तीव्र लेख लिहून लोकजागृति करण्याचा केसरीचा क्रम अव्याहत
सुरू होता. ४-५ महिन्यांच्या आंत ‘ स्वदेशी आणि बहिष्कार, ’ ‘ स्वदेशी बहि-
ष्काराचा प्रभाव ’ व ‘ बहिष्काराचा प्रसार ’ हे मुख्य तीन लेख लिहून बहिष्काराची
चळवळ केसरीनें महाराष्ट्रीय वाचकांपुढें कायम ठेविली. बहिष्काराची चळवळ द्वेष-
मूलक आहे, यास समर्पक उत्तर ११-८-०८ च्या केसरींत दिलें आहे. ‘ बहिष्कारांत
‘ प्रेमोद्भव द्वेष आहे ही गोष्ट खरी. पण त्यामुळें ती चळवळ द्वेषमूलक अगर
‘ द्वेषाला उत्तेजन देणारी आहे, असें म्हणणें चुकीचें होय. स्वदेशावरील प्रेमामुळें
‘ स्वदेशी माल झीज सोसूनहि आम्ही खरेदी करितों. या प्रसंगीं तशाच प्रकारच्या
‘ परदेशी स्वस्त मालाला आम्ही दूर सारतों ही गोष्ट खरी; पण हें दूर सारणें, हें वर्जन
‘ किंवा हा बहिष्कार द्वेषमूलक नव्हे. तर आमच्या प्रेमाच्या आड ती वस्तु येते
‘ म्हणून तिला दूर करावी लागते. हा प्रत्यक्ष द्वेष नव्हे, हा प्रेमोद्भव द्वेष आहे.
‘ प्रेमाचा अनुभव येण्यास किंवा प्रेमाला भरती येण्यास असल्या द्वेषाची जरूरी
‘ असते......हा असला द्वेष जगांतील सर्व शिष्टांना संमत असून सर्व कायद्यांनीं
‘ याकडे आदरानेंच पाहिलें आहे. इतकेंच नव्हे तर जगांतील सर्व तत्त्ववेत्त्यांनीं व
‘ कवींनीं प्रेमाइतकेंच या प्रेमोद्भव द्वेषाचें किंवा क्रोधाचें कौतुक केलें आहे. यालाच

' सात्विक क्रोध---**Rightenous indignation**—म्हणतात. स्वदेशी व बहिष्कार
' या चळवळींनीं ही स्वदेशप्रीतीची दुसरी बाजू जर आमच्यामध्यें जोरावली तर
' हिंदुस्थानचें राष्ट्र बनण्याच्या कामीं या वृत्तीचा फार उपयोग झाल्यावांचून
' राहणार नाहीं. '

१३. **बहिष्काराचा वाढता जोर**:—' लो. टिळक तुरुंगाबाहेर असतांना मुंबई
' शहरांत स्वदेशीचा प्रसार करण्याची खटपट करीत असत व या खटपटीस
' बरेंच यशहि आलें होतें. पण तुरुंगाबाहेर असतांना मुंबईस त्यांच्या हातून
' स्वदेशीचा जितका फैलाव झाला नाहीं त्याहून किती तरी अधिक फैलाव तुरुंगांत
' जाऊन दोन चार आठवड्यांत त्यांनीं केला आहे ! ' हा फरक ध्यानांत घेतला म्हणजे
खटल्याचे अखेरीस लो. टिळक यांनीं काढलेल्या उद्गारांची सत्यता तेव्हांच मनास
पटते. याचा अनुभव हल्लींच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या चळवळींत केसरीच्या २४ वर्षांपूर्वींच्या
म्हणण्याप्रमाणें कसा आला आहे हें केसरीनें गेल्या वर्षांतील दडपशाहीच्या
धोरणानंतर म. गांधी, पितापुत्र नेहरू, पं. मदन मोहन मालवीय, सरदार वल्लभभाई,
डॉ. अनसारीप्रभृति पुढारी यांना अटक व शिक्षा झाल्यानंतर बहिष्काराची
चळवळ अधिक जोरानें कशी सुरू झाली याचें वरचेवर वर्णन देऊन लोकांच्या
नजरेस आणलें आहेच.

१४. **जागृति म्हणजेच बहिष्कार**:—सन १९०९ सालीं केसरींत बहिष्कारावर
बारा लेख आले आहेत. त्यांत १०-८-०९ च्या अंकांतील बहिष्काराच्या वाढदिवसा-
वरील अग्रलेख व १७-८-०९ च्या अंकांतील ' जागृति म्हणजेच बहिष्कार ' हे
लेख मुद्देसूद व मार्मिक आहेत. पहिल्या अग्रलेखांत बहिष्काराचा जन्मदिवस ८-८-०५
पासून चार वर्षांची बहिष्काराच्या चळवळीची सविस्तर हकीकत देऊन नंतर अध्यक्ष
ना. भूपेंद्र वसू यांनीं बहिष्कार द्वेषमूलक आहे, या अँग्लो-इंडियन पत्रांच्या आक्षेपास
दिलेलें समर्पक उत्तर दिलें आहे तें वाचनीय आहे. दुसरा अग्रलेख ' जागृति म्हणजेच
बहिष्कार ' हा हल्लींच्या स्वातंत्र्युद्धांत सर्वांनीं मननपूर्वक वाचण्यासारखा आहे,
हें पुढील लहानशा उताऱ्यावरून दिसून येईलः—' जेथें दुःख आहे जेथें असंतोष
' आहे—तेथें जागृति आहेच म्हणून समजा. जेथें जागृति आहे तेथें बहिष्कार असलाच
' पाहिजे....ज्यांच्या पाशीं द्रव्याचा किंवा राजसभेचा अधिकार नसतो, त्यांना
' या जगांत बहिष्काराशिवाय आपलें दुःख निर्मूलन करण्यास दुसरें हत्यार नाहीं.
' जागृतीचें पहिलें हत्यार बहिष्कार होय.' ( १७-८-०९ ). ता. ५-१०-०८ च्या
अंकांत केसरीकारांनीं ना. न्या. चंदावरकर व हॉर्टन् यांचा साखरेच्या
बहिष्कारावरील एक महत्त्वाचा ठराव वाचकांच्या नजरेस आणून बहिष्कार-
योगाचा कायदेशीरपणा वाचकांच्या नजरेस आणून अधिकाऱ्यांच्या दरडावण्यास
न भितां बहिष्काराचा प्रसार करण्यास लोकांना विनंति केली आहे. मालवणांतील
व्यापारी, दुकानदार व इतर लोक यांनीं परदेशी साखरेवर बहिष्कार घालण्याचा

ठराव पास केला व ठराव मोडणाऱ्यांवर ५ ते १० रु. दंड बसविला. तेव्हां थोड्याच काळांत परदेशी साखरेचें बाजारांतून उच्चाटण झालें. शांततेचा भंग होण्यासारखें कृत्य केल्याबद्दल पोलिसांनीं पांच पुढाऱ्यांवर खटले भरले व डि. मॅ. साहेबांनीं प्रत्येकानें हजार रुपयांचा जातमुचलका व दोन लायक जामीन एक वर्षाचे मुदतीनें द्यावे, असा हुकूम केला ! पुढें हें प्रकरण हायकोर्टांत गेलें व वरील न्यायमूर्तिद्वयांनीं 'शांततेच्या व सामोपचाराच्या बहिष्काराच्या चळवळीचा कायदेशीरपणा स्थापित केला.'

**१५. म. गांधी व बहिष्काराची चळवळ** :—सन १९०९ नंतर सुमारें दहा वर्षेपर्यंत बहिष्काराच्या चळवळीचा जोर अनेक कारणांनीं किंचित् कमी झाला होता. पण १९२१ सालीं महात्मा गांधींनीं त्या चळवळीचें नेतृत्व घेतल्यापासून पुन्हां ती पूर्वीपेक्षांहि अधिक जोरानें सुरू झाली. ता. ३०-८-२१ च्या केसरींत 'बहिष्कार यशस्वी कसा होईल ?' ह्या लेखांत केसरीनें म्हटलें आहे कीं :—' वंगभंगाच्या
' चळवळीनंतर पुन्हा पंधरा वर्षांनीं स्वदेशी बहिष्काराचा पुकारा हिंदुस्थानानें केला
' आहे. स्वदेशी बहिष्काराच्या ठरावांतील त्या वेळची शब्दयोजना आज कदाचित्
' जशीच्या तशीच म. गांधींच्या मुखांतून बाहेर पडत नसेल; पण शब्द जरी भिन्न
' असले तरी त्या वेळच्या चळवळीचें व हल्लींच्या चळवळीचें साध्य एकच आहे.
' स्वदेशी बहिष्कार हा त्या वेळींहि स्वराज्याचा एक भाग गणला गेला होता व आज
' तर महात्माजी असें म्हणत आहेत कीं, परकीय मालावर सप्टेंबरअखेर बहिष्कार
' घालून दाखवा कीं ऑक्टोबरमध्यें स्वराज्य तुमच्या पदरांत पडेल. लोकमान्यांनीं
' त्या वेळीं घालून दिलेला कित्ता म. गांधींसारखे सत्त्वशील महात्मे पंधरा वर्षांच्या
' अनुभवानंतर जनतेस गिरविण्यास सांगतांना पाहून लोकमान्यांच्या दूरदृष्टीबद्दल
' व अचूक मार्गदर्शनाबद्दल कौतुक करावें तितकें थोडेंच आहे......वंगभंगानंतर
' उसळलेली लाट शांत होऊन आज़ बरेच दिवस झाले. ती लाट पूर्ण शमली असें
' बऱ्याच जणांस वाटलें. पण पूर्वींहूनहि प्रचंड अशी लाट आज उत्पन्न झाली
' आहे. पूर्वींची चळवळ बऱ्याच अंशीं पांढरपेशे वर्गांत होती, पण तीच चळवळ
' आज विस्तृत व खोल गेलेली दिसून येईल. खालीं जमीन व वर आकाश व्याप्त
' करणाऱ्या एखाद्या वटवृक्षाप्रमाणें खालीं मजूरवर्ग व वर धनाढ्य असा व्यापारी
' वर्ग या दोहोंतहि हल्लींच्या चळवळीचा फैलाव झालेला दिसेल. '

' परदेशी कापडावर बहिष्कार घाला ' ह्या मथळ्याखालीं केसरीनें म. गांधींच्या इंग्रजी लेखाचें भाषांतर देऊन तो विषय वाचकांच्या नजरेस आणिला आहे. केसरीचें म्हणणें असें कीं:—' स्वराज्यविरोधी नोकरशाहीचा गड हस्तगत करावयाचा
' तर त्या गडाच्या अनेक बुरुजांवर चळवळीच्या तोफांचा भडिमार करण्याकरितां
' अनेक ' बातेऱ्या ' बांधाव्या लागतात. टि. स्व. फंड ही जशी एक बातेरी
' तशीच परदेशी कापडावरील बहिष्कार हीहि एक निराळीच ' बातेरी ' होय ! '
( १२-७-२१ ).

केसरींत त्यानंतर ‘ दोन महिन्यांत बहिष्कार घाला ’ हा लेख आला आहे. ‘ गेल्या ‘ आठवड्यांत मुंबई येथें ऑ. इं. कॉं. कमिटीनें सर्वानुमतें परदेशी कापडावरील ‘ बहिष्कार मंजूर केला. या मंजुरीच्या सरनाम्यांत बहिष्कार हें स्वराज्य मिळविण्याचें ‘ एक साधन म्हणून नमूद केलें आहे....व बहिष्कार पूर्णपणें अंमलांत आणण्यास ‘ अवघ्या दोन महिन्यांची मुदत दिली आहे. दोन महिन्यांत नुसता बहिष्काराचा ‘ अंमलहि पूर्ण होणार नाहीं, मग स्वराज्यप्राप्ति दूरच राहिली असा टराविक ‘ आक्षेप म. गांधींचे प्रतिपक्षी आणतील हें आम्हांस माहीत आहे. पण हे आक्षेप ‘ वितंडवादाचे आहेत....राष्ट्रीय सभेच्या आकांक्षेचें पाऊल मवाळांच्या अंमदा- ‘ नींतल्या गोगलगाईच्या पावलांप्रमाणें सरपटत नसून हरणाच्या पावलांप्रमाणें धावूं ‘ लागलें आहे हें गेल्या पांचचार वर्षांच्या अनुभवावरून कोणीहि कबूल करील... ‘ म. गांधींच्या उमेदीची धडाडी व तिला शोभण्यासारखा त्यांचा अखंड उद्योग ‘ लक्षांत घेतला म्हणजे त्यांच्या अदमासाप्रमाणें बहिष्काराचा अंमल दोन महिन्यांत ‘ बसला नाहीं तरी त्याचा दोष पुढारी या नात्यानें त्यांच्याकडे येणार नाहीं. ’ ( २-८-२१ ).

१६. दोन महिन्यांत बहिष्कार घाला :—म. गांधींच्या नेतृत्वाखालीं ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीनें दोन महिन्यांत बहिष्कार पूर्ण केला पाहिजे असा ठराव केला. त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील जनतेपुढें सदरहू ठरावाची जबाबदारी बरचेवर आणण्याचें काम केसरीनें अग्रलेख व स्फुटें लिहून बहिष्काराचा व प्रचाराचा कार्यक्रम प्रसिद्ध करून सन १९२१ सालीं फार उत्तम रीतीनें केलें. ‘ राष्ट्रीयसभेच्या आज्ञेस अनुसरून ‘ म. गांधींनीं बहिष्कार पुकारल्यास दोन महिने होऊन गेले आणि चालू महिना ‘ अखेरपासून या बहिष्कारव्रताची सर्व हिंदुस्थानभर पूर्ण बजावणी होऊं लागेल ‘ अशी आशा आहे. हिंदुस्थानांतील परकी सरकार व त्यांचीं ऑफिसें, परदेशचे ‘ या देशांत येऊन राहिलेले रहिवाशी आणि करनकऱ्याचा वसा चालविणारे ‘ आपल्यांतील कांहीं दुराग्रही इसम, एवढ्यांखेरीज इतर सर्वत्र बहिष्काराचा प्रभाव ‘ दिसूं लागून परदेशी कापडाला अतःपर मागणी फारच अल्प प्रमाणांत केली ‘ जाईल अशी खात्री वाटते.......हा बहिष्कार पूर्णपणें अंमलांत आला असें जाहीर ‘ करण्याचा दिवस जवळ येत चालला आहे. तरी ज्या प्रांतांतून, जिल्ह्यांतून किंवा ‘ खेड्यापाड्यांतून अद्यापि या चळवळीचा प्रवेश झाला नसेल तेथें तिचा प्रवेश करवून ‘ हा बहिकार निरपवादक रीतीनें यशस्वी करून दाखविणें हें राष्ट्रसभाभक्तांचें ‘ आद्य कर्तव्य आहे व ते तें निरलसपणें पार पाडतील अशी उमेद आहे. ’ ( १३-९-२१ ). केसरीच्या उपदेशाप्रमाणें सन १९२१ सालीं महाराष्ट्रांत बहिष्काराची चळवळ जोरांत होती. परंतु सन १९२२ सालीं म. गांधींना अमदाबाद येथें राजद्रोहाच्या खटल्यांत सहा वर्षे शिक्षा झाल्यावर कांहीं काळ ती चळवळ मंदावली होती. तरी केसरीनें बहुजनसमाजापुढें बहिष्काराची चळवळ सतत ठेवण्याचें आपलें

व्रत एकसारखें चालविलेंच होतें. १९२३ सालीं तीन महत्त्वाचे लेख केसरींत आले आहेत. ' उक्ति झाली, कृति झाली नाहीं ' व ' मवाळांना बहिष्कार मान्य झाला ' हे दोन महत्त्वाचे लेख ता. ४-९-२३ च्या अंकांत आले आहेत. ' ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याच्या कल्पनेचा ना. कामत यांनीं पुरस्कार ' करावा, यांत जहाल पक्षाच्या तत्त्वाचा अभिमानास्पद विजय आहे. बंगालच्या ' फाळणीच्या वेळीं प्रथमच राष्ट्रीय पक्षाकडून जेव्हां हें ब्रिटिश मालावर बहिष्कार ' घालण्याचें तत्त्व पुढें आलें, त्या वेळीं ' बहिष्कार ' हा शब्द ऐकतांच ज्यांच्या ' अंगावर शहारे येत, त्याच मवाळांना ' बहिष्कार ' हेंच निर्वाणीचें शस्त्र होय ' असें वाटूं लागावें, हें दृश्य खरोखरीच उत्तेजक आहे. राष्ट्रीय पक्षानें १९०५ ' सालापासून बहिष्कारशस्त्राची शक्ति ओळखली आहे, तेव्हांपासून तें व्रत स्वतः ' पाळून राष्ट्रालाहि त्याची शिकवण देण्याची त्यानें शिकस्त केली आहे. ' सन १९२३ पासून १९३० पर्यंत ' स्वदेशी व बहिष्कार, ' परदेशी कापडावर ' बहिष्कार, ' ' ब्रिटिश मालावर बहिष्कार, ' वगैरे मथळ्यांखालीं बरेच लेख लिहून त्या योगानें बहिष्कार हा विषय नेहमीं जनतेपुढें ठेवण्याचें काम केसरीनें केलें आहे. परंतु सन १९०५ सालीं बंगालच्या फाळणीनंतर बहिष्काराची चळवळ सुरू झाल्यापासून सन १९३० सालाइतके बहिष्कारावर लेख कोणत्याहि सालीं केसरींत आले नाहींत. याचें कारण ता. १२ मार्च, १९३०, रोजीं म. गांधींनीं साबरमती आश्रमांतून स्वराज्यप्राप्तीकरितां जें ' महाप्रयाण ' सुरू केलें त्यानंतर अखिल हिंदुस्थानांत ' न भूतो न भविष्यति ' अशी जी अनत्याचारी स्वातंत्र्य-युद्धाची प्रचंड चळवळ सुरू झाली हें होय. म. गांधींनीं व राष्ट्रीय सभेनें स्वराज्यप्राप्त्यर्थ सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू केली, व त्या योगानें बहिष्काराचे चळवळीस फार जोर आला. राष्ट्रांत नवीन चैतन्य उत्पन्न झालें. तें चैतन्य सतत जागृत ठेवण्याकरितां केसरीच्या प्रत्येक अंकांत बहिष्काराविषयीं लेख लिहिलेले आढळून येतील.

**१७. बहिष्काराचा मारा** :—' बहिष्काराचा मारा अधिक परिणामकारक कसा होईल ? ' ( २९-७-३० ), हा लेख फार महत्त्वाचा आहे. ' हातचें गेलेलें स्वराज्य ' किंवा अपेक्षित स्वातंत्र्य परत मिळविण्याचे साम, दाम, दंड व भेद हे चार उपाय ' शास्त्रकारांनीं सांगितलेले आहेत. बहिष्कारयोग या साधनचतुष्टयांपैकीं शेवटच्या ' म्हणजे 'दंड' साधनांतलाच एक विशिष्ट प्रकार आहे. आणि म्हणूनच तो पहिल्या ' तीन साधनांच्या कोणत्याहि प्रकारापेक्षां अधिक परिणामकारक होतो. सैन्य ' जमवून प्रतिपक्षावर हल्ला केला तरच तो दंड आणि प्रतिपक्षाची रसद बंद केली ' तर तो दंड नव्हे असें कोणी राजनीतिज्ञ मानीत नाहीं. आणि हिंदुस्थानसारख्या ' निःशस्त्र व लष्करी विद्येला पारखा झालेल्या राष्ट्राला प्रतिपक्षाची रसद तोडणें ' हाच एक मार्ग शक्य व साध्य असल्यानें विलायती मालावर कडकडीत बहिष्कार ' घालून प्रतिपक्षाची रसद तोडणें हाच ' दंडा'चा मार्ग हिंदुस्थानानें स्वीकारावा

' असा लोकमान्यांच्या उपदेशाचा मथितार्थ होता. पण त्या वेळची बहिष्काराची
' चळवळ वंगभंगांतून उद्भवली असल्यामुळें वंगभंग रद्द होतांच बहिष्काराची
' चळवळ संपुष्टांत आली. त्यानंतर १९२१ सालीं असहकारितेची लाट देशभर
' उसळूं लागली. देशभक्तीचा आविष्कार व स्वार्थत्याग या दृष्टीनें ही चळवळ
' अत्यंत श्रेयस्कर व परिणामकारक होती व त्यामुळें जनतेंत अद्भूतपूर्व जागृति
' झाली. तीमुळें मूठभर सुशिक्षितांची चळवळ खेड्यापाड्यांतील असंख्य अशि-
' क्षितांच्या मनोभूमिकेपर्यंत जाऊन भिनली आणि तेथें तिनें कायमचें मूळ धरलें
' ...... आठ दहा वर्षांनंतर असहकारितेपेक्षां अधिक प्रखर असें कायदेभंगाचें
' हत्यार उपसण्यांत आलें आणि सध्यां त्याचा प्रयोग मोठ्या प्रमाणांत सुरू आहे.
' ...परंतु कायदेभंगाचें हत्यार दुधारी आहे. प्रतिपक्षावर वार करण्याकरितां तें
' हातांत घेतलें असतां आपल्या हाताला त्याची धार लागून प्रतिपक्षाबरोबर आपण
' स्वतःहि त्यानें घायाळ होतों.........बहिष्कारयोगाचें हत्यार मात्र अशा
' स्वरूपाचें आहे कीं, त्यांत थोडीशी झीज सोसल्यास तेवढ्यानें प्रतिपक्षाचें त्या
' मानानें मोठ्या प्रमाणांत नुकसान करितां येतें. आणि इंग्लंड हें व्यापारी राष्ट्र
' असल्यामुळें त्याचें खरें मर्मस्थान म्हणजे त्याचा व्यापारच असल्यानें व्यापाराला
' धोका आला कीं, इंग्लंड वठणीवर येण्यास विलंब लागत नाहीं; याकरितांच
' लोकमान्यांनीं या बहिष्कारयोगाचें '**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्।**'
' असें यथार्थ वर्णन केलें आहे....... बहिष्काराची व्याप्ति जितकी अधिक
' वाढवावी तितका तो अधिक परिणामकारक होणार हें उघड आहे......ब्रिटिश
' साम्राज्याचें दुसरें एक मर्मस्थान आहे व त्या मर्मस्थानावर बहिष्काराचा मारा केला
' तर ब्रिटिश सरकार अल्पावधींतच टेंकीस येईल. हत्तीचें कातडें इतरत्र कितीहि
' जाड असलें तरी सोंडेचें टोंक इतकें नाजूक असतें कीं, त्यास थोडा देखील धक्का
' सहन होत नाहीं. हिंदुस्थान सरकार ही ब्रिटिश साम्राज्यरूपी हत्तीची सोंड
' असून हिंदुस्थान सरकारचा खजिना हें त्या सोंडेचें नाजूक टोंक होय. या नाजूक
' स्थळीं हल्ला केला कीं, हत्ती जेरीस आलाच पाहिजे. यास्तव बहिष्काराचा मोर्चा
' जमाबंदीकडे वळविला कीं, ब्रिटिश सरकारला तो ताबडतोब जाणवूं लागेल. करबंदीची
' चळवळ कै. ना. गोखल्यांच्याहि मताप्रमाणें सनदशीर असली तरी आजच सगळ्या
' राष्ट्रांत तिची संघटना झालेली दिसत नाहीं. म्हणून तूर्त या बहिष्काराची मात्रा,
' कर्जउभारणीपुरती अंमलांत आणली तरी देखील मोठाच कार्यभाग होणार
' आहे. सध्यांच सरकारानें नवें कर्ज काढण्याचें योजिलें आहे...अशा वेळीं
' बहिष्कारयोगाची व्याप्ति वाढवून सरकारच्या जुन्या बॉंड्सची फेड रोकड देऊनच
' करा असा नेट लावला व दुसरीकडून नवीन बॉंडस् घेण्याचें नाकारलें तर
' सरकारची स्थिति अगदींच केंविलवाणी होईल. हिंदुस्थान सरकारची गंगाजळी
' बहिष्कारयोगाच्या जोरावर कोरडी ठणठणीत पाडण्याच्या मार्गास लागल्यास

' सरकार गोगलगाय बनून म. गांधींच्या अटींवर तडजोड करण्यास तयार होईल.'
' तूर्त विलायती मालावर कडक बहिष्कार आणि सरकारला नवें कर्ज देण्याचें
' नाकारणें या दोन उपायांचा जरी अवलंब केला तरी तेवढ्यानें देखील मोठेंच
' राष्ट्रकार्य घडून येणार आहे.'

१८. **बहिष्कार-सप्ताह** :— सन १९३० सालांतील बहिष्कारयोगावरील अत्यंत महत्त्वाचा लेख ता. १२-८-३० चा ' बहिष्कारसप्ताहाचें फल पदरांत कशानें पडेल ? ' हा होय. ' बहिष्काराला विरोध करणाऱ्या नाजूक कातडीच्या लोकांनीं या
' ' बहिष्कारशस्त्रा 'चें पाणी फार तिखट आहे असा बोभाटा केला. परंतु त्यामुळें
' त्या हत्याराचा तिखटपणा कमी न होतां उलट वाढतच गेला. परिस्थिति अशी
' येत चालली कीं, बहिष्कारशस्त्राचें पाणी जितकें जितकें अधिक तिखट होत गेलें
' तितकें तें शस्त्र अधिकाधिक लोकप्रिय होऊं लागलें. आणि आजमितीला अशी
' स्थिति येऊन ठेपली आहे कीं, ज्यांच्या विरुद्ध बहिष्कार पुकारावयाचा त्यांच्या
' व्यतिरिक्त दुसरें कोणीहि त्याला विरोध करीनासें झालें आहे. ब्रिटिश मालावर
' बहिष्कार घालणें हें अत्यंत अमोघ असें परिणामकारक शस्त्र आहे, अशी देशांतील
' सर्व पुढाऱ्यांची बालंबाल खात्री झाली आहे....बहिष्कारयोगाची ही सर्व-
' सुलभता व अमोघ शक्तिमत्ता पाहून लो. टिळकांनंतर म. गांधींनीं तोच योग
' हिंदुस्थानाला पढविला...मोठमोठ्या शहरीं बहिष्काराचे प्रचंड सप्ताह साजरे होत
' आहेत.... मात्र हिंदुस्थानानें आपला इष्ट हेतु साध्य करून घेण्यासाठीं नुसते
' ' सप्ताह ' साजरे करून भागणार नाहीं. सप्ताह हें नैमित्तिक कार्य आहे. सप्ताहांत
' बहिष्काराचें केंद्रीकरण होत असतें. तें प्रसाराच्या व प्रसिद्धीच्या दृष्टीनें इष्टच आहे.
' परंतु बहिष्काराचें यश पूर्ण पदरांत पडून इष्ट कामना सिद्ध होण्यासाठीं बहिष्काराचें
' व्रत सात दिवसांपुरतेंच नव्हे तर नित्य पाळलें पाहिजे आणि तें नुसत्या कापडा-
' पुरतेंच नव्हे, तर सर्व ब्रिटिश मालाला लागू केलें पाहिजे. असा बहिष्कार घातल्या-
' शिवाय दुसरें व्यवहार्य साधनच हिंदी लोकांना उपलब्ध नाहीं. हें एकमेव अमोघ
' शस्त्र सर्व हिंदी लोक जुटीनें, नेटानें व चिकाटीनें पाळणार नाहींत तर इतक्या
' नांवारूपास आलेली चळवळ पूर्वीच्या दोन्ही चळवळींप्रमाणें अपूर्णावस्थेंतच विराम
' पावेल. १९०८ व १९२० च्या चळवळींनीं देशाची तयारी केली असून तिचा
' संपूर्ण उपयोग प्रस्तुत चळवळींत व्हावयाचा आहे. तो उपयोग करून घेतला
' तरच ही चळवळ शेवटची व यशस्वी ठरेल.... प्रस्तुतच्या चळवळीचें एक
' वैशिष्ट्य असें आहे कीं, तिनें सर्व पक्षभेद खाऊन टाकले आहेत.......
' कॉंग्रेसविरुद्ध मोहीम करणें सरकारला अवश्य वाटूं लागलें आहे. हें
' चळवळीच्या यशाचें निःसंदेह गमक नव्हे काय ?...मजुरांनीं, व्यापाऱ्यांनीं,
' दलालांनीं व गिऱ्हाइकांनीं सर्वांनीं मिळून ब्रिटिश मालावर चौफेर बहिष्कार
' घातला तर, जॉन बुल अल्यावधींतच गोगलगाय बनल्यावांचून राहणार नाहीं.

' .........या चळवळीचें कार्यहि त्रिविध स्वरूपाचें आहे. त्यांपैकीं महत्त्वाचे
' अंग हें कीं, हिंदी जनतेची जूट व शिस्त वाढत आहे. आणि त्यांचे ठायीं
' आत्मविश्वास व राष्ट्रप्रेम जागृत होत आहेत. सरकारचे अत्याचार झाल्यामुळें दोन
' गोष्टी उघड झाल्या. एक म्हणजे अत्याचार सोसण्याइतकी देशभक्ति, धाडस व
' शक्ति हिंदी लोकांचे अंगीं आहे हें सिद्ध झालें. त्याबरोबरच सरकारच्या न्याया-
' वरील, नीतीवरील व सद्धेतूवरील जनतेचा उरलासुरला विश्वास पार उडाला.
' सरकारचें नैतिक अधिष्ठान ढासळण्याचे कामीं या चळवळीनें आतांच किती तरी
' यश कमाविलें आहे ! याशिवाय तिसरें एक कार्य जें घडून येत आहे, तें म्हणजे
' साऱ्या जगाची सहानुभूति हिंदुस्थानाकडे वळत आहे....सांप्रत जनतेंत जी
' जागृति झाली आहे, जी एकी नांदत आहे, आणि जी शिस्त खेळत आहे
' तिचा अंतिम परिणाम राष्ट्राची आकांक्षा आज नाहीं उद्यां पूर्ण करण्यांत खचित
' दिसून येणार आहे. म. गांधींच्या अनत्याचारी चळवळीस सरकारानें बऱ्यावुऱ्या
' साधनांनीं दाबून टाकिलें तर त्यांत सरकारचाच घात आहे. आजकाल देशाच्या
' पोटांत संचरणारे सामर्थ्यप्रवाह म. गांधींनीं अडवून धरले आहेत, म्हणून सर-
' कारानें गांधीजींचे आभार मानावयास हवेत व त्यांच्या अटी पूर्ण करून सलोखा
' जोडावयास हवा. पण फाजील स्वार्थामुळें, दृष्टीच्या कोतेपणामुळें किंवा सत्तेच्या
' बेगुमानपणामुळें जर ही चळवळ लाठीमारानें अगर गोळीबारानें चेपून धरली
' तर सरकारला या दुष्कृत्याचें प्रायश्चित्त भोगावें लागेल. '

१९. उपसंहार :— ' बहिष्काराची चळवळ ' हा लेख आतां संपत आला आहे. बहिष्कार हें निःशस्त्र जित राष्ट्रांचें स्वराज्यप्राप्तीचें एक तेजस्वी साधन आहे. बहिष्कारयोगाची साध्यप्राप्तीचे बाबतींत सत्यता पटविण्याकरितां केसरीनें १८८१ मध्यें पहिला लेख लिहून आरंभ केला व तें काम सतत पन्नास वर्षें सुरू ठेविलें आहे. या अवधींत जे अनेक स्फूर्तिदायक लेख बहिष्कारयोगावर लिहून महाराष्ट्रांत स्वदेशीव्रताची ज्योत कायम प्रदीप्त ठेविली, त्याची खरी कल्पना येण्यास ते सर्व लेख मननपूर्वक वाचले पाहिजेत. त्यांतील कांहीं लेखांचा फक्त सारांशच आम्ही विस्तारभयास्तव दिला आहे. हेतु हा कीं, बहिष्कारयोगावर चैतन्ययुक्त लेख लिहून केसरीनें महाराष्ट्र-जनतेंत जी स्वदेशीव्रतपालनाची प्रखर व उत्कट भावना उत्पन्न केली, तिची तादृश कल्पना वाचकांना यावी व त्यांनीं केसरींतील बहिष्कारावरील सर्व लेख मननपूर्वक वाचून महाराष्ट्रांतील सर्व खेड्यापाड्यांतसुद्धां बहिष्कारयोगाचें महत्त्व पटवून देऊन आबालवृद्ध सर्व लोकांस बहिष्कारयोगद्वारें हल्लींच्या अनत्याचारी स्वातंत्र्य-युद्धांत अल्पस्वल्प कां होईना भाग घेण्यास लावावें.

---

# शिवाजी-उत्सव

## [ श्री. विश्वंभर उद्धवराव वैद्य ]

' विभूतिपूजेची भावना मानवी अंतःकरणांत नैसर्गिक आहे. आपल्या राजकीय आकांक्षांचें दृढीकरण होण्याला आपणांस स्वदेशीच विभूति पाहिजे आणि सबंध हिंदुस्थानच्या इतिहासांत असली विभूति शिवाजीमहाराजांशिवाय दुसरी कोणती सांपडणार ? '
—लो. टिळक.

' A great man is the living light-fountain, the light which enlightens and which has enlightened the darkness of the world; and this not as a kindled lamp only, but rather as a *natural luminary shining by the gift of Heaven.*' —T. Carlyle.

१. उत्सवांची आवश्यकता :—केसरीनें ' विंदूचा सिंधू ' करून सोडलेल्या अशा कितीतरी चळवळी आहेत. शिवाजी-उत्सवहि अशाच चळवळींपैकीं एक आहे. राष्ट्रोन्नतीचें ह्रद्गत कानांशीं सांगणारे उत्सव मृत राष्ट्रांनीं करावयास पाहिजेत. कारण ' राष्ट्राचें राष्ट्रीयत्व किंवा जीवित्व कायम राहण्यास स्वभाषेची अभिवृद्धि, ' स्वराष्ट्राच्या इतिहासाचा स्वकीय दृष्टीनें अभ्यास व मनन, स्वधर्म, श्रद्धा इत्यादि ' जीं अनेक साधनें आहेत, त्यांतच राष्ट्रीय उत्सवांचा समावेश होतो व राष्ट्रीय ' उत्सवांतच थोर पुरुषांचें जयंत्युत्सव गणले जातात. सारांश, आपल्या थोर पूर्वजांस ' विसरून जाऊन कोणतेंहि राष्ट्र उदयास आलें नाहीं व येणेंहि शक्य नाहीं, ' ( ९-४-०१ ), असा जो सर्वमान्य ऐतिहासिक सिद्धांत आहे, तो केसरीस पूर्णपणें अवगत होता. म्हणूनच ' आमची धर्मबुद्धि जागृत रहावी, आमच्या नैतिक व ' राजकीय मनोवृत्ति जोमाच्या रहाव्यात, आमची राष्ट्रीयत्वाची ज्योत नेहमीं ' प्रकाश देणारी असावी, म्हणूनच आमच्या वाडवडिलांनीं या उत्सवांची योजना ' केलेली आहे, ' ( १-९-९६ ), असें केसरी म्हणतो.

' लोकशिक्षणाच्या कामीं ' वर्तमानपत्रा 'सारख्या संस्थांच्या हातून जें कार्य ' नीटसें रेटत नाहीं, तें कार्य राष्ट्रीय महोत्सव नीट तडीस नेऊं शकतात. राष्ट्रीय ' महोत्सवापासून अमर्याद फायदे करून घेतां येतात, ' (कित्ता), हें केसरीनें ग्रीस वगैरे परदेशचे दाखले देऊन सिद्ध केलेलें आहे. व पुढें आपल्या इकडील एकनाथ, तुकोबा वगैरे संतांनीं जत्रांचा स्वधर्मरक्षणासाठीं कसा उपयोग करून घेतला आहे हेंहि दाखविलें आहे. श्रीरामदासस्वामींनीं रामनवमीचा उत्सव महाराष्ट्रांत शेंकडों ठिकाणीं मठ स्थापून सर्वत्र सुरू करविला व ' शिवरायाचें आठवावें रूप,' ' मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा, ' अशा गर्जनांनीं महाराष्ट्रीयांत

स्वराष्ट्र व स्वधर्मप्रेम जिवंत ठेविलें. यासंबंधींचें विवेचनहि केसरीच्या वरील लेखांतच सांपडतें. ' पूर्वीच्या जत्रा म्हणजे राष्ट्रांतील धार्मिक, औद्योगिक व ' सामाजिक चळवळींचीं जंगी प्रदर्शनेंच होत. '

' वडिलांचें स्मरण कायम ठेवून आपली परंपरा व आपला पूर्वापार लौकिक ' आपण राखतों त्याचप्रमाणें राष्ट्रांतील महापुरुषांचें स्मरण हें राष्ट्रीयत्व कायम ' राहण्यास एक चांगलें साधन आहे. एकराष्ट्रीयत्व म्हणजे कांहीं दृश्य पदार्थ नव्हे. ' ही एक प्रकारची कल्पना असून ती सतत जागृत ठेविली तरच ती टिकण्यासारखी ' आहे व ज्या ज्या राष्ट्रांनीं ती कायम राखिली आहे, त्यांनीं आपल्या ऐतिहासिक ' थोर पुरुषांच्या इतिहासाची या कामीं योग्य मदत घेतली आहे. ....... सर्व ' लोकांच्या आदरास पात्र झालेल्या जितक्या अधिकाधिक वस्तु असतात त्या त्या ' मानानें एकराष्ट्रीयत्वाची कल्पना अधिकाधिक दृढ होत जाते हें तत्त्व निर्विवाद ' आहे व राष्ट्राचे जे खरे हितकर्ते आहेत, ते अशाच कांहीं रचना करितात कीं, ' त्यामुळें सर्वांचीं अंतःकरणें एका गोष्टीकडे लागून लोकांस आपण एका राष्ट्रांतील ' व्यक्ति आहों असें वाटूं लागावें. कोणत्याहि लोकांचें राष्ट्र बनण्यास त्या सर्व ' लोकांस पूज्य अशा कांहीं वस्तु असाव्या लागतात व देशकालानुसारें अशा ' कांहीं गोष्टी लोकांपुढें मांडणें हेंच प्रत्येक देशाभिमान्याचें कर्तव्य होय. ' ( २८-४-९६ ). श्रीशिवाजीमहाराजांचें चरित्र अशाच प्रकारचें आहे.

२. उत्सव श्रीशिवछत्रपतींचाच कां? :—' ज्या लोकांनीं आपलें नांव इति- ' हासांत कधींहि गाजविलें नाहीं, त्यांचें पृथ्वीच्या पाठीवरील अस्तित्व एक प्रकारें ' लाजिरवाणें असतें; ही आमची अपकीर्ति कोणीं दूर केली, हें आमच्या हृदयांत ' नेहमीं वागावयास नको का ? ' ( १४-४-९६ ). दुसरें असें कीं, ' महाराष्ट्राचा ' अभ्युदय, महाराष्ट्राची भरभराट या सर्वांचा पाया शिवाजीमहाराजांनीं घातला. ' सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील व अठराव्या शतकांतील महाराष्ट्राच्या कर्तब- ' गारीचा उगम शिवछत्रपतींपासून आहे. किंबहुना दीडशें वर्षांतील महाराष्ट्राच्या ' इतिहासांत चमकणारे उच्च विचार व उदात्त मनोविकार महाराजांत एकवटलेले ' होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. नांव करून गेलेल्या **सर्व महाराष्ट्रीयांचा ' श्रीशिवबांच्या पोटांत समावेश होत असल्यामुळें** महाराजांची आठवण ठेवणें ' म्हणजे महाराष्ट्रांतील पूर्वींच्या सर्व दरोबस्त थोर पुरुषांचा सन्मान करण्यासारखें ' आहे.' ( १२-४-९८ ). त्याचप्रमाणें हेंहि लक्षांत बाळगावयास पाहिजे कीं, 'महा- ' राष्ट्रांतील **निरनिराळ्या जातींचें प्रेम एकाच ठिकाणीं वसण्यासारखें** जर ' कोणतेंहि स्थळ असेल तर तें **शिवछत्रपतींचें चरित्र** हेंच होय. आणि यासाठींच ' या उत्सवांत मराठे आणि ब्राह्मण इत्यादि भेद ठेवणें अगदीं गैरशिस्त आहे. ' ( २८-४-९६ ). अशा श्रीशिवरायांची योग्यता भूषणकवीच्या शब्दांत केसरीनें सांगितली ती :—

'रावण के राम कार्तवीज के परशुराम ।
दिल्लीपती दिग्गज के सेर शिवराज हौ ॥' ( १०-५-२७ ).

जपानांत १९०५ सालीं टोकिओ येथें श्रीशिवाजी-उत्सव झाला. त्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें बॅरन् नायब खांदा यांनीं खालील भाषण केलें. 'शिवाजीमहा-
'राजांसारखे सत्पुरुष, मग ते कोणत्याहि धर्माचे असोत अगर कोणत्याहि देशांत
'निपजले असोत, त्यांच्या सन्मानासाठीं देशभेद, वर्णभेद टाकून देऊन आम्ही
'पुढें धांवतों. श्रीशिवाजीसारखे पुरुष आपल्याच राष्ट्राच्या उद्धारासाठीं निपजतात
'असें नाहीं, पण सर्व जगांतील मनुष्यांचे उन्नतीसाठीं व हितासाठीं त्यांचा जन्म
'असतो.' ( १३-६-०५ ). यावर केसरी म्हणतो, 'शिवाजीमहाराज हे केवळ
'हिंदुस्थानचेच राष्ट्रीय महापुरुष नव्हे, तर सर्व जगांतील मनुष्यतेस पूज्य वाटणारी
'अशी विभूति होण्यास योग्य आहेत, हें कोणाच्याहि ध्यानांत येईल.' (२०-६-०५).
महाराष्ट्राला उच्च दशेला पोहोंचविण्यासाठीं ज्यांनीं आपल्या विशाल बुद्धिवैभवाचा, खोल धर्मनिष्ठेचा व थोर नीतिमत्तेचा उपयोग करून दिला त्या 'शिवाजीचें
'चरित्र प्रत्येक हिंदूनें वेदवाक्यांपेक्षांहि जास्त अगत्यानें पाठ करावें,' (१८-२-९६ ),
असें वंगपंडित सत्यचरणशास्त्री हे म्हणतात. श्री. पारसनीस म्हणतात कीं, 'त्या
'नरशार्दूलासारखा अपार शौर्याचा, अलोट धैर्याचा, अगणित बुद्धियुक्तींचा आणि
'अद्वितीय देशाभिमानाचा पुतळा दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांतील लोकोत्तर पुरुषांत
दिसत नाहीं.' ( कित्ता ).

स्वकीय व परकीय चिकित्सक विद्वानांना अभिमानाची उसळी येण्यासारखें व प्रत्येकाचा माथा आपोआप लवावा असें छत्रपति शिवबांनीं केलें तरी काय ? या प्रश्नाला उत्तरच कीं काय ता. १०-५-२७ च्या केसरींत एका कवीच्या शब्दांत दिलेलें आढळतें. 'शिवाजीनें वेदांचें रक्षण केलें, पुराणांचें रक्षण केलें,
'हिंदूंच्या जिव्हेवर रामनाम कायम राखलें, डोक्यावरील शेंडी राखली, खांद्यावर
'जानवें राखलें, गळ्यांतील तुळशीची माळ कायम राखली, देवळांत देवाची मूर्ति
'राखिली आणि घरांत कुलधर्म-कुलाचार राखला. अशी ही बहाद्दरी श्रीशिवबांनीं
'केली.'

**३. हा ईश्वरी अवतार कसा ?** :—दुष्टांचा संहारकर्ता आणि सुष्टांचा पालन-कर्ता, धाडशी योद्धा, कल्पक सेनापति, चतुरस्र मुत्सद्दी, प्रजाहितैकदक्ष राजा, निःपक्षपाती न्यायाधिश आणि अत्यंत नीतिमान् पुरुष, अशा सर्व अंगांनीं परिपूर्ण अशा शिवछत्रपतींना जगाच्या इतिहासांत तोड नाहीं. रा. ब. वैद्य यांनीं ता. २१-६-१० च्या केसरींत 'शिवाजीमहाराजांची थोरवी' या लेखांत लिहिलें:—
'शिवाजीचें मातृप्रेम, त्यांची पितृसेवा, त्यांची गुरुभक्ति, त्यांचें बंधुप्रेम, त्यांची
'सद्बुद्धि व न्यायदृष्टि, त्यांचा सज्जनांविषयींचा आदर, त्यांचा अद्वितीय पराक्रम,
'त्यांची अविश्रांत मेहनत, त्यांच्या दीर्घ कल्पना, त्यांचें धैर्य, त्यांचें साहस आणि

' त्यांची आजन्म निवृत्तिपरता या गोष्टी मनांत आणल्या म्हणजे शिवाजीमहाराज
' परमेश्वराचे अंशभूत अवतार होते अशी जी आपल्यांत कल्पना आहे, ती किती
' योग्य आहे हें आपल्या लक्षांत येईल. अशा प्रकारचें उदात्त चरित्र हिंदुस्थानच्या
' इतिहासांत दुर्मिळ आहे, किंबहुना सबंध हिंदुस्थानचा इतिहास डोळ्यांपुढें
' ठेविला तर अलौकिक नीतिमत्ता व अद्वितीय पराक्रम यांची सांगड रामचंद्राच्या
' खालोखाल शिवाजीमहाराजांतच दिसते. त्यांचें चरित्र फार उदात्त आहे, यास्तव
' तें रामचंद्रचरित्राप्रमाणेंच पूज्य, रम्य व पवित्र आहे. '

केसरीच्या २८-४-९६ च्या अग्रलेखांत ' श्रीशिवाजीमहाराज हे अवतारी पुरुष
' नव्हते असें आम्ही म्हणत नाहीं. ज्या थोर पुरुषांनीं इतिहासांत आपलीं नांवें
' अजरामर करून ठेविलीं आहेत त्यांस ईश्वराचें साहाय्य नव्हतें असें कोण म्हणेल ?'
असें लिहिल्याबरोबर सुधारकांनीं गलबला सुरू केला कीं, ' केसरीकारांनीं आजपर्यंत
' घेतलेलें सर्व शिक्षण निष्फळ झालें व इतर भावड्या, भोळ्या व अज्ञानी लोकां-
' प्रमाणेंच तेहि आतां बकूं लागले आहेत. ' सुधारकांच्या या आक्षेपाला केसरीकारांनीं
रोखठोक जाब दिला आहे व श्रीशिववा हे

' यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ॥
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ '

या गीतेंत सांगितलेल्या लक्षणाप्रमाणें अवतारी पुरुषच होत असें पुनः म्हटलें आहे.
( १९-५-९६ ). ' असले विशाल बुद्धीचे, धैर्याचे, कल्पनेचे किंवा बलाचे पुरुष देशांत
' निर्माण होणें ही गोष्ट मनुष्याच्या स्वाधीनची नाहीं, हें कोणासहि कबूल करावें
' लागेल. त्याचप्रमाणें त्यांचीं सर्वच कृत्यें केवळ त्यांच्याच हिंमतीनें व कर्तबगारीनें
' झालीं आहेत असें नाहीं. अफझुलखानासारख्या राक्षसाशीं झगडा करण्यांत शिव-
' छत्रपतींना जो जय मिळाला अथवा औरंगजेबाच्या तडाक्यांतून सुटून ते दिल्ली-
' हून दक्षिणेंत पुनः सुरक्षित माघारे आले या गोष्टी केवळ त्यांच्या शौर्यानेंच व
' समयसूचकतेनेंच झाल्या असें आपणांस निश्चितपणें म्हणतां येईल का ? पण याहि
' गोष्टी एकीकडे राहूं द्या. ज्या वेळेस समरांगणांत एकसारखा गोळ्यांचा पाऊस
' पडत असतो व कोणास गोळी लागेल व कोणास न लागेल याचा कांहींच नेम
' नसतो, तेव्हां त्यांतूनहि जो असल्या थोर पुरुषांचा बचाव होतो तो कशामुळें ? '
अशा तऱ्हेनें शिवाजीमहाराजांना ईश्वरी साहाय्य होतें व ते अवतारी पुरुष होते हें
जरी केसरी सांगत होता, तरी नराच्या करणीलाच महत्त्व आहे हें पुनःपुनः बजा-
विण्यास तो चुकला नाहीं. ' कोणत्याहि कर्त्या पुरुषांस अशा प्रकारचें ईश्वराचें साहाय्य
' असल्याशिवाय त्यांच्या हातून देशहिताचीं मोठमोठीं कामें होऊं शकत नाहींत.
' जरी अशा रीतीनें ईश्वरी कृपा या पुरुषांवर असली तरी त्यांचा उत्सव जो आम्ही
' करतों तो ते मार्गदर्शक थोर पुरुष होते म्हणून करतों. केवळ अवतारी पुरुष होते
' अशा दृष्टीनें नव्हे. ही गोष्ट सर्वांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. रामजयंतींत व शिव-

' जयंतींत जो भेद आहे तो हाच होय. श्रीशिवाजीमहाराज हे आपणांपैकींच एक ' थोर पुरुष होऊन गेले व त्यांस जें ईश्वरी साहाय्य मिळालें तें त्यांच्याचप्रमाणें ' मोठमोठीं कामें करणाऱ्या गृहस्थास नेहमीं मिळत जाईल असा आमचा पूर्ण ' भरंवसा आहे. जे लोक आपल्या उन्नतीचा उद्योग करितात, त्यांस ईश्वर नेहमीं ' साहाय्य असतो, अशी एक इंग्रजींत म्हण आहे व आमच्यांतहि ' प्रयत्नान्तीं ' परमेश्वर ' असें म्हणण्याचा परिपाठ आहे. यावरून उघड असें कीं, आपण ' आपल्या कल्याणाची इच्छा धरल्यास त्यास ईश्वराचें साहाय्य मिळाल्यावांचून ' कधींहि रहात नाहीं. श्रीशिवछत्रपतींच्या चरित्रापासून जो पहिला बोध घेण्या- ' सारखा आहे तो हाच होय. ' ( २८-४-९६ ).

**४. उत्सवाचा प्रारंभ :**—हिंदुपदपादशाहीचे संस्थापक छत्रपति श्रीशिवाजी-महाराज़ यांनीं रायगड ही आपली राजधानी केली होती. त्या वेळेस रायगडची काय स्थिति असेल हें कल्पनेनें फारच थोड्यांना जाणतां येईल. पण आपल्यासारख्या साध्या माणसांच्या कल्पनेपेक्षां कविकल्पना तें वैभव अधिक जाणूं शकेल व त्याचें चित्रहि चित्तवेधक असें कवींनाच रंगवितां येईल. कवि गोविंद म्हणतात, ' वैकुंठ रायगड केला । लोक तो देवगण बनला । शिवराजा विष्णु झाला । ' आणि म्हणून ' वंदन त्याला । ' अशा एके काळीं वैभवशिखरीं असणाऱ्या रायगडची स्थिति इंग्रजबहादरांच्या कारकीर्दीत कशी होती व त्याचप्रमाणें ' विष्णु ' झालेले जे शिवराज त्यांच्या समाधीची दैन्यावस्था कशी झाली हें पहा !

' वैकुंठ ' झालेला रायगड आतां ( १८८५ त ) इंग्रजांच्या ' फारेस्टां 'त जमा आहे व शिवछत्रपतींची ' समाधि पलीकडच्या टेंकडीवर आहे. त्याचा ' अंतर्भाग झाडाझुडुपांनीं व्याप्त केला आहे आणि त्याच्या धर्मशाळेच्या फरस- ' बंदींतून मोठमोठे वृक्ष वाढले आहेत व त्याजवळील देवालयाची घाण झाली ' आहे व त्यांतील मूर्ति जमिनीवर फेंकून दिलेली आहे ! ! ' ( डग्लस यांचा उतारा, २३-४-९५ ). डग्लस पुढें लिहितात कीं, ' शिवाजीविषयीं आतां ' कोणासहि काळजी नाहीं. इतका रक्तपात आणि द्रव्याचा व्यय करून संपादन ' केलेल्या अवाढव्य राज्याचे प्रभू, व ज्यांनीं मोठ्या काळजीनें कोल्हापूरचे राजे, ' साताराचे भोसले आणि पुण्याचे पेशवे यांजकरितां राज्यपद संपादन करून ' ठेविलें, त्यांपैकीं एकजणहि मराठ्यांच्या गादीचे स्थापक जे शिवाजीमहाराज ' त्यांच्या समाधीची सालोसाल दुरुस्ती करण्याकडे एक रुपयाहि खर्च करीत नाहीं !' खरोखर मराठ्यांच्या राज्यसंस्थापकांच्या राजधानीची व खुद्द त्यांच्याच समाधीची ही दुःस्थिति ऐकून प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या हृदयाचें पाणी होऊन गेलें ! आणि ही स्थिति नजरेस आणिली ती सुद्धां एका साहेबानेंच. हें पाहूनहि त्याला एक प्रकारची लज्जा वाटूं लागली ! जेथें एके काळीं मोत्यें गुंफिलीं, तेथेंच आतां शेणी वेंचण्याचें नशिबीं यावें हें पाहून कोणाचें हृदय तिळतिळ तुटणार नाहीं ?

केसरीनें लिहिलें, ' ' शिवाजीचें नांव तुम्हीं आज गाजवा ' हें पद्य आमच्या कानीं
' पडल्यास बरेच दिवस झाले, परंतु त्यांतील अर्थाप्रमाणें उपदेश घेऊन काम
' करितांना कोणीहि आढळत नाहीं. ' नेटिव्ह ओपिनियन 'मध्यें महाराजांच्या
' समाधीची दैना प्रत्यक्ष पाहिलेल्या गृहस्थाचें पत्र प्रसिद्ध झालें आहे. तें वाचून
' आम्हांस वाटतें कीं, महाराष्ट्रीयांचें व विशेषत: त्या थोर पुरुषांच्या कुळांतील
' सरदारांचें जिणें व्यर्थ होय ! ' ( २३-४-९५ ).

५. थोडासा पूर्ववृत्तांत :— इ. स. १८१८ च्या पुढें रायगडावरील वस्ती मोडली. त्यानंतर त्याकडे फारसें लक्ष कोणाचें गेलें नाहीं असें दिसतें. सन १८८५ मध्यें सिंक्लेअरसाहेबांमुळें रायगडचा उल्लेख वर्तमानपत्रांत कांहीं कारणानें आला. पुढें डग्लससाहेबांच्या लेखामुळें तिकडे लोकांचें अधिक लक्ष वेधलें गेलें. याच सालीं रा. ब. पु. बा. जोशी यांच्या या विषयासंबंधीं कविता प्रसिद्ध झाल्या. श्री. गो. बा. जोशी, वसईकर, स्वतः रायगडास गेले व १८८७ सालीं त्यांनीं तेथील हकीकतीचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. या कार्यांत कांहीं पुरस्कार घ्यावा या हेतूनें के. जनार्दन नांवाच्या एका इंजिनियरच्या सल्ल्यानें छत्रीवगैरेंच्या जीर्णोद्धाराला एकूण खर्च रु. ४५०४६ येईल असें त्यांनीं जाहीर केलें. याच सालीं (१८८५त) पुण्यांत हिराबागेंत न्या. रानडे व सरदार पुरंदरे वगैरेंच्या साहाय्यानें एक सभा झाली व तींत समाधीसाठीं जरूर तो फंड जमविणें व सरकारास अर्ज करणें या गोष्टी ठरल्या. याच सुमाराला सिंक्लेअरसाहेबांच्या शिफारशीवरून लॉर्ड रे यांनीं समाधीचा जीर्णोद्धार करण्याचा हुकूम दिला व त्याप्रमाणें थोडीशी दुरुस्ती झाली व सालीना पांच रुपयांच्या 'अगडबंब' रकमेची नेमणूक करून देण्यांत आली. याबद्दल केसरीनें लॉर्ड रे यांना धन्यवाद दिले. ( १५-१२-८५ ). यापुढें दहा वर्षेपावेतों ही चळवळ थंडावलेली दिसते व तिला कोणत्याहि स्वरूपाचें मूर्त स्वरूप आलेलें दिसत नाहीं.

६. लो. टिळकांनीं चळवळ हातीं घेतली :—केसरींत या विषयावर लेख येण्यास सुरुवात २३ एप्रिल, १८९५, पासून झाली. शिवरायांच्या वंशजांचें जिणें व्यर्थ आहे, त्यांच्या पराक्रमाचें वर्णन, १८८५ सालीं लॉर्ड रे यांनीं समाधीची केलेली दुरुस्ती व नेमणूक करून दिलेले पांच रुपये इत्यादींविषयीं आरंभीं लिहून पुढें केसरी त्याच अंकांत म्हणतो, ' या कामीं एवढी अगडबंब रक्कम खर्ची
' पडते............... याबद्दल सरकारास दोष लावण्यांत कांहीं अर्थ
' नाहीं. श्रीशिवाजींचे करामतीनें ज्या लोकांचे या महाराष्ट्रभूमीला पाय
' लागले व जे आजतागायत त्यांचेंच अन्न खातात, त्यांचें हें काम आहे. तें
' जर त्यांनीं न केलें तर त्यांस परकीयांनीं निमकहराम म्हटलेलें सार्थ होईल...
' महाराजांच्या वंशजांनीं यःकश्चित् लॉर्ड हॅरिसच्या आठवणीचीं द्योतकें करण्या-
' करितां आपली थैली मोकळी केली...अशांचे मि. डग्लससारख्या सोनारानें

'कान टोंचले तर ही संस्थानिक व सरदार मंडळी हें काम त्वरित करतीलच; परंतु 'शिवछत्रपतींच्या पराक्रमांची व उपकारांची ज्या सामान्य महाराष्ट्र लोकांस आदर- 'बुद्धि आहे, त्यांनीं ढिलाई सोडून जागोजाग सभा भरवून फंड जमा करण्याची 'तजवीज करून जगास आपली कृतज्ञता दाखविली पाहिजे.' एवढी सूचना करूनच केसरीकार स्वस्थ बसले नाहींत, तर त्यांनीं पुण्यास एक अपूर्व व टोलेजंग सभा हिरा-बागेंत भरविली. ती सभा १८८५ सालची पुरवणीच होय असाहि खुलासा त्या सभेंत करण्यांत आला. या सभेला सर्व तऱ्हांची लहानथोर मंडळी हजर होतीच. विशेषतः संस्थानिक, सरदार वगैरे मंडळीहि आलेली असल्यामुळें ही सभा म्हणजे एक दरबारच भरला होता. शिवाजीमहाराजांनीं केलेल्या उपकारांचें स्मरण सर्व काळ राहील अशी व्यवस्था करण्यासाठीं फंड जमवावा असा मुख्य विषय होता व अशा अर्थाचा ठरावहि करण्यांत आला. या सभेच्या कामाला सर्व बाजूंनीं अनुकूलता लाभली. रा. ब. न्यायमूर्ति रानडे यांची सभेस सहानुभूतीची तार आलेली वाचून दाखविली व सभेच्या कामास प्रारंभ झाला तेथल्या तेथें कांहीं पैसे जमा झाले. कोल्हापूरकर छत्रपतींची सम्मतिदर्शक तारहि त्याच वेळीं आली. टिळकांनीं सभेंत खुलासा केला कीं, 'सर्व जातींच्या व सर्व ठिकाणच्या लोकांची मदत एक पैपासून 'पुढें स्वीकारण्यांत येईल. गरीबश्रीमंत या सर्वांचा हातभार या कृत्याला लागला 'पाहिजे. एकटा एकादा संस्थानिकहि हें कार्य करूं शकेल, पण आम्हांला तें पसंत 'पडणार नाहीं.' ( ४-६-९५ ).

वरील सभेंत पन्नास गृहस्थांची कमिटी नेमली व हें वृत्त केसरींत आल्या दिवसापासून वर्गणीचा पाऊस पडूं लागला. दोन वर्षांत १५,००० रुपये जमले व शिवाय १७५ रुपयांचें कायम उत्पन्न मिळालें. महाराष्ट्रांत प्रमुख प्रमुख अशा सर्व ठिकाणीं सभा होऊन फंड जमूं लागला. या फंडाला विद्यार्थी, खानावळवाले, मजूर, विधवा, आंधळे यांपासून तों थेट थोरांपर्यंत सर्वांनीं आणा दोन आण्यां-पासून शेंकडों रुपयांपर्यंत मदत पाठविली. श्रीशंकराचार्य, मठ करवीर व संकेश्वर, यांचें आज्ञापत्र व आशीर्वादपत्र, दरसाल १० रुपयांच्या कायमच्या नेमणुकीसह आलें. पत्रांत ते म्हणतात, 'अशा त्या शिवाजीची रायगडावर असलेली समाधि दुर- 'वस्थेंत पाहून ती दुःस्थितीत नष्ट करण्यासाठीं तुम्ही पुरस्कर्तृत्व स्वीकारून जनसमूहाला 'चलन दिलें. त्यामुळें प्रत्येकाच्या मनांत आत्मबोध होऊन त्यांच्या ठायीं 'कृतज्ञता जागृत झाली. तात्पर्यार्थ, शिवाजी पुनरुपि अमूर्तिमान् जीवितवान् 'झाल्याचा भास होत आहे.' ( १३-८-९५ ). याशिवाय इतरांकडूनहि आशीर्वादात्मक व सहानुभूतिदर्शक पत्रें थोड्याफार वर्गणीसह येत असत. केसरीनें फंडाची पोंच वारंवार—एकाद्या वेळीं जादा पुरवणी काढून सुद्धां—आपल्या अंकांत सविस्तर दिली आहे. ( २५-६-९५ ). सारांश, शिवाजीस्मारकाची योग्य ती प्रसिद्धी करण्यांत कोणतीहि कमतरता केसरीनें होऊं दिली नाहीं.

फंड जसजसा फुगत चालला, तसतशा स्मारकाविषयींच्या सूचनाहि वाढत चालल्या. शिवनेरी, रायगड, तोरणा, प्रतापगड वगैरे किल्ल्यांवर उत्सव करावेत; पुतळे, प्रचारकार्य, शाळा, कथा इत्यादि रुपांनीं श्रीशिवबांचें दरसाल पुण्यस्मरण होत जाईल अशी व्यवस्था व्हावी, असा सूचनांचा आशय होता. ता. १८-२-९६ च्या अंकांत श्री. द. ब. पारसनीस यांची सूचना विशेष महत्त्वाची होती. ती अशीः— ' सर्व जुने कागदपत्र मिळवून ते प्रसिद्ध करणें व त्यांवरुन शिवाजीमहाराजांचें ' चरित्र व एकंदर मराठ्यांचा इतिहास लिहून प्रकाशित करणें, ' म्हणजेच खरें स्मारक होय. परंतु निरनिराळ्या सूचना तूर्त बाजूला सारुन केसरीनें मुख्य बाबच उचलून धरली. ' समाधीची दुरुस्ती करुन छत्री बांधणें आणि महाराष्ट्रांत ठिक- ' ठिकाणीं शिवरायाचे उत्सव करणें हे दोन मुख्य उद्देश आहेत. ' ( ३०-७-९५ ). यानंतर पुढच्याच अंकांत ' पूर्वीचें वैभव व हल्लींची दैना यांचें हुबेहुब चित्र लोकां- ' पुढें काढण्याचे प्रसंग साधावेत व अशा साठींच वै. शु. २ ला शिवरायजयंति पाळावी,' अशी सूचना आली. '

**७. उत्सवांची लाट उसळली** :— पुढील वर्षापासून उत्सवाची जी लाट उसळली तिनें नुसता महाराष्ट्रच काय पण अखिल भारत व्याप्त करुन टाकिला व भारताबाहेरील पूर्व आफ्रिका, जपान वगैरे देशहि सोडले नाहींत. केसरीकारांना उत्सवासाठीं लांबलांबचीं आग्रहाचीं आमंत्रणें येऊं लागलीं व त्यांना कलकत्ता, उमरावती या ठिकाणीं जावें लागलें. त्यांचा कलकत्यास तर अपूर्व सन्मान झाला; व महाराष्ट्रांत एका गांवीं तर त्यांच्यावर ओंजळभर मोतींपोवळीं वगैरे उधळण्यांत आलीं ! शिवरायांचें गुणगान सर्वत्र सुरु झालें ! त्याची पुढें दिलेल्या निवडक गांवांच्या यादीवरुन कल्पना येईल. त्यांत सुरेंद्रनाथ, पं. मालवीय वगैरेसारखे स्वकीय, व वॅरन खांदासारखे परकीय विद्वान् मोठ्या अभिमानानें भाग घेऊं लागले. केसरीकडे पत्रद्वारां धन्यवाद येऊं लागले. ' श्रीशिवाजींच्या समाधीचा जीर्णोद्धार ' व सार्वजनिक गणपति-उत्सव या दोन गोष्टींनीं आम्हां महाराष्ट्रीयांमध्यें स्वदेशा- ' भिमान व स्वधर्माभिमान जागृत करण्याचें सर्व श्रेय आपणांस आहे, हें आपल्या ' शत्रूंसहि कबूल करावें लागेल. ' ( १०-९-९५ ).

**महाराष्ट्र व वऱ्हाड-मध्यप्रांत** :—येवलें, मलकापूर, रत्नागिरी, गगनबावडा, बेळगांव, उमरावती, कोल्हापूर, सांगली, विजयदुर्ग, अकोलें, मंगळवेढें, मुधोळ, न्हावरें, नागपूर, बागलकोट, त्र्यंबक, इचलकरंजी, आपटे ( पनवेल ), हुबळी, बार्शी, यवतमाळ, सिद्धपूर, डहाणू, हरिपूर, खांडवा, एलिचपूर, जिंतूर, कोप्पळ, म्हैसाळ, डिग्रज, शहापूर, वैजनाथ भिवपुरी, कऱ्हाड, पेण, वांई, धुळें, कऱ्हाडें, ओझर-तांबट ( जि. नाशिक ), ओंबळी ( ता. चिपळूण ), लासोप ( रत्ना- गिरी ), आवास ( अलिबाग ), खालापूर, रावेर ( जि. खानदेश ), निफाड, राजापूर, विरार, अहमदनगर, अकोट ( ता. अकोला ), पट्टणकडी (गडहिंग्लज),

सावंतवाडी, त्रिळूर, फत्तेखेडा, तळेगांव, दशसहस्र (उमरावती), कोठुरें, फिरदावण ( राजापूर ), अक्कलकोट, पन्हळी ( रत्नागिरी ), कोपरगांव, पंढरपूर, तारळें (कोल्हापूर), लाडखेड (यवतमाळ), चांदूर (वऱ्हाड), शिवनेरी, वर्धा, इ. इ. इ.

**हिंदुस्थान** :—खड्गपूर ( बंगाल ), काशी, रंगून, देवास, गिरनार, सक्कर, शिकारपूर ( सिंध ), तंजावर, रतलाम, झांशी, इंदूर, मद्रास, जयपूर, मह्, कलोल ( गुजराथ ), कलकत्ता, कानपूर, हरद्वार, बंगळूर, दिल्ली, ग्वाल्हेर, अमृतसर, उज्ज-यिनी, लाहोर, लखनौ.

**मोंगलाई** :—हैदराबाद, जालना, गुलबर्गा, शिकंदराबाद, शेडम.

**गोमांतक** :—पोरोडें, रिवण, कुंभारजुवें, कुंडई.

**परप्रदेश** :—टोकियो (जपान), मुंबासा, एल्डोरेट, दारेसलाम (पूर्व आफ्रिका).

रायगडीं झालेल्या प्रथम जन्मोत्सवाची हकीकत २१-४-९६ च्या अंकांत सविस्तर आलेली आहे. या उत्सवाच्या मार्गांत प्रथम कुलाब्याच्या लँब कलेक्टरनें आडकाठी आणिली; पण ना. टिळक यांनीं ग. लॉर्ड सँडहर्स्ट यांची मुलाखत घेऊन परवानगी मिळविली. अशा रीतीनें ' केसरी ' व ' लँब ' यांच्या झगड्याचा निकाल लागल्यावर रायगडींच्या उत्सवकर्त्यांना दुप्पट जोर आला.

फंड वाढूं लागला. उत्सवांनीं सर्व दिशा दुमदुमून गेल्या व केसरीकारांचा सर्वत्र गौरव होऊं लागला. हा उत्कर्ष अर्थातच स्वकीय व परकीय शत्रूंना सहन झाला नाहीं. त्यांनीं नाना तऱ्हांचे कुजके आक्षेप आणिले व उत्सव वगैरे सर्व चळवळी हाणून पाडण्यासाठीं कंबर बांधली. आक्षेप खालीलप्रमाणें होतेः—( १ ) हें सर्व 'बामणां'च्या पोटासाठीं आहे, ( २ ) यानें मुसलमानांना राग येईल, ( ३ ) यानें राजद्रोह होतो, ( ४ ) ब्राह्मणांनीं राज्य बुडविलें व त्यांनींच उत्सव सुरु करावा म्हणजे हें शुद्ध ढोंग आहे व यांत त्यांना स्वार्थ साधावयाचा आहे.

यांपैकीं पहिल्याला केसरी उत्तर देतो कीं, ' शिवबांचा उत्सव एक दिवस ' उपास करून साजरा करण्यास ब्राह्मणांची कांहीं हरकत नाहीं. बामणभोजन हा ' हेतु नाहीं. ' ( १६-७-९५ ). शिवाय ' रायगडास प्रसाद वांटला तो तीन ' हजार मराठे लोकांसच वांटण्यांत आला व ब्राह्मणांस देण्यास कांहीं शिल्लक राहिलें ' नाहीं ही गोष्ट आमच्या ( आक्षेपक ) बंधूंस माहीत असावयास पाहिजे होती. ' ( २८-४ व २६-५-९६ ). दुसऱ्यासंबंधीं केसरीचें म्हणणें असें:—' महाराजांनीं ' महाराष्ट्रासाठीं काय केलें हें मुख्य पहाणें आहे. त्यांनीं परिस्थितीप्रमाणें मुसल-' मानांशीं स्नेह केला, द्वेष केला, तरी पण मुसलमानांचें कुराण, त्यांच्या मशिदी, ' किंवा त्यांच्या स्त्रिया यांचा त्यांनीं कधींहि अपमान केला नाहीं. दुसरें असें कीं, ' नेल्सन व वेलिंग्टन यांचे पुतळे उभारण्यानें फ्रेंचांचा इंग्रजांनीं अपमान केल्या-' सारखें जर होत नाहीं तर त्याप्रमाणेंच मुसलमानांना दुखविल्याचा दोषहि महा-' राष्ट्रीयांस लागत नाहीं. ' ( १२-४-९८ ). ' राजद्रोह होतो म्हणण्यांत आपले

' लोकांचाच भित्रेपणा दिसून येतो. कारण ज्या उत्सवाला खुद्द गव्हर्नरानें ' परवानगी दिली व खटल्याच्या वेळीं जज्जांनीं किंवा सरकारी वकिलानेंहि या ' ऐतिहासिक उत्सवांना हरकत घेतली नाहीं, तो उत्सव करणें म्हणजे राजद्रोह ' कसा होतो ? ' ( कित्ता ). चवथा आक्षेप टाइम्सच्या ' हिस्टीरिकस् 'नें त्याच्या नेहमींच्या ब्रीदाला अनुसरून पुढें आणिला, त्याला केसरीनें, ' शिवाजी व ' ब्राह्मण ' असा अग्रलेख लिहून सणसणीत उत्तर दिलें आहे व मि. करकेरीया यांचें पत्रहि छापलें आहे. केसरीनें सरळ प्रश्न टाकला आहे कीं, ' महाराष्ट्रांतील ' ब्राह्मण व त्यांतूनहि कोंकणस्थ ब्राह्मण लुच्चे, गळेकापू आणि ' विश्वासघातकी असतील. पण इंग्रज लोक तरी आगींत धुतल्याप्रमाणें अगदीं ' पवित्र आहेत ना ? मग या इंग्रजांनीं पेशवाई बुडवून ज्या सातारच्या राज्याची ' स्थापना केली होती, तेंच सातारचें राज्य पुनः स्थापन केल्यापासून चाळीस ' वर्षांतच कां घशांत टाकलें ? ' यानंतर इंग्रजांचा दिल्लीच्या बादशहाशीं मुतालीक म्हणून आलेला संबंध व त्याचा शेवट नेटिव्ह संस्थानिकांना दास करण्यांत त्यांचें दिसून येणारें बेइमानी वर्तन, याचा उलगडा करून केसरी पुढें म्हणतो, ' पेशव्यांनीं सातारच्या राजांचा नायनाट करण्याची बुद्धि शेवटपर्यंत कधींहि ' बाळगिली नाहीं. उलट त्यांस योग्य तो मान देऊन त्यांच्या हातूनच प्रधानकीचीं ' वस्त्रें प्रत्येक नवा पेशवा घेत असे. पण तेंच इंग्रजांकडे पहा. त्यांनीं नंतर पेशवाई ' बुडविण्यास सोपें जावें म्हणून, ज्या सातारच्या गादीची पुनः स्थापना केली, त्या ' गादीवरील पुरुषांचे दत्तक पुढें लवकरच नामंजूर करून अखेरीस त्यांच्या वंश- ' जास ' फर्स्ट क्लास ' सरदारांच्या लिस्टांत ढकलून दिलें आणि त्यांस कोणी ' सन्मानानेंहि महाराज म्हणूं नये असा वटहुकूम सोडला....... परंतु गादीवरील ' पुरुषांचे अंगीं शौर्याचा अगर बुद्धीचा अभाव असल्यानें जें राष्ट्राचें नुकसान ' व्हावयाचें, तेवढें मात्र पेशव्यांनीं करूं दिलें नाहीं. ' ( २२-८-९९ ).

परकीय इतिहासकारांनीं शिवछत्रपतींना चोर, लुटारू, ( Intelligent robber ) असें म्हटलेलें आहे, मग अशा लुटारूचा उत्सव कसा करितां ? असेंहि विचारण्यांस येत असे. त्याला ता. २३-५-९९ चा केसरी उत्तर देतो, कीं, ' ज्या ' क्रॉम्वेलला ' राजाचा वध करणारा ' अधम पुरुष समजत, त्याचाच उत्सव ' इंग्लंडनें तीनशें वर्षांनंतर ५००-६०० ठिकाणीं कां केला ? 'त्यानें केलेल्या उप- ' काराचे उतराई होण्याकरितां केला, ' असें तिकडील वर्तमानपत्रें म्हणतात. तर ' मग हें जर खरें तर हाच क्रॉम्वेलचा उत्सव शिवाजीचा उत्सव कां करतां, असें ' विचारणाराला समर्पक उत्तर होय. '

याशिवाय प्लेग व सरकारी अवकृपा यांच्याशींहि उत्सवाच्या पुरस्कर्त्यांना झगडावें लागलें. १८९७ सालीं केसरीवर झालेल्या खटल्यापासून सरकारनें शिवाजीचें नांव घेणें व तसबिरी बाळगणें म्हणजे राजद्रोह करणें होय असें ठरविलें होतें. तरी

मुद्धां ' वेळवखत कसाहि येवो, एकदां आरंभिलेलें कार्य कांहीं केल्या मध्येंच सोडा-
' वयाचें नाहीं, ' अशा निश्चयानें तें कार्य पुढें चालू ठेवण्यांत आलें. ' सरकारच्या
' कृपेची शितळाई होती त्या वेळीं शिवस्मारकाच्या खटपटींत मोठमोठे लोक कसे
' काम करीत होते व तोच त्यांच्या अवकृपेचा उन्हाळा झाल्याबरोबर शिवाजींचें नुसतें
' नांव घेणेंहि चोरी होऊन खावंदकृपाभिलाषी लोक आपापलीं धोतरें झाडून बाजूस
' कसे झालें हें सर्वांस माहीत आहेच.' ( २४-४-०० ). ' आजच्या तारखेस सर-
' कारनें शिवाजीमहाराजांच्या संबंधानें सर्व तऱ्हांच्या संस्थांवर अवकृपा केली असली
' तरी भविष्यकाळींहि असा एकदां दिवस उगवेल, नाहीं कोणीं म्हणावें, कीं,
' ज्या वेळीं यक्षिणीचे कांडीप्रमाणें कालगति एकदम फिरून, शिवस्मारक-संस्थेस
' लागलेलें ग्रहण सुटून ती सर्वांना प्रिय होईल. सर्व प्रकारचे व सर्व जातींचे लोक
' मोठया प्रेमानें एकत्र मिळून शिवनामाचा गजर करतील!...... नोकर लोकहि
' मोकळ्या मनानें व उघडपणें शिवोत्सवांत घुसतील व क्वचित् प्रसंगीं साहेबलोकहि
' उत्सवांत येऊन व्याख्यानें देऊन, पानसुपारी घेऊन जातील.' ( २६-४-९८ ).
हें भविष्य पुढें खरें ठरल्याचें सर्वांना माहीत आहेच !

८. **खग्रास ग्रहण सुटूं लागलें :**—इ. स. १८९७ सालांतील प्रकारामुळें शिवस्मारक कमेटीला आपलीं कामें, कांहीं दिवसांनीं अनुकूल वारा वाहूं लागेल या आशेवर बंद ठेवावीं लागलीं. कर्झनच्या काळांत १९०४ मध्यें वारा अनुकूल वाहूं लागला आहे असें दिसतांच शिवस्मारक फंडाच्या चालकांनीं आपल्या जहाजाचीं शिडें उभारून सज्ज राहण्याचें ठरविलें. पुढें रायगडीं झालेल्या तिसऱ्या उत्सवाच्या वेळीं ( १९०६ त ) सरकारकडे छत्री बांधण्यास व देऊळ दुरुस्त करण्यास लागणारी परवानगी व मदतहि मागण्याचा एक विनंति-अर्ज पाठवावा असें ठरलें व त्याप्रमाणें तो पाठविला गेला. इ. स. १९०७ सालीं गंगासागर तलाव-दुरुस्ती व छत्री उभारण्याचे कामीं ५००० रुपये सरकारनें देण्याचें कबूल केलें. पण पुढें हा ठराव दोनतीन वर्षांतील चळवळीमुळें तसाच पडून राहिला. पुढें ज्या वेळेस फंडाची रक्कम व्याजासुद्धां २५००० वर गेली त्या वेळेस सरकारा-कडून मिळणारी मदत पदरीं पडल्यास पहावें व कामास लागावें, म्हणून स्मा. क. चे अध्यक्ष श्री. दाजी आबाजी खरे यांनीं सरकारला लिहिलें, तेव्हां त्यांना खालील उत्तर मिळालें. ' लॅमिंग्टनच्या वेळची परिस्थिति बदलली आहे, तरी त्यांनीं दिलेल्या
' सवलती देऊन स्मा. क. वर जीर्णोद्धाराचें काम सोंपवितां येत नाहीं; स्मा. क. नें
' वाटलें तर आपण जमाविलेले पैसे सरकारचे स्वाधीन करावे. ' ( ६-६-११ ).
समाधीची पूर्ण दुरुस्ती सरकारनें करण्याचें ठरविलें आहे, असेंहि त्यांस म्हटलें आहे. परंतु लो. टिळक तुरुंगांत होते त्यामुळें या बाबतींत पुढें बरींच वर्षें कांहींच झालेलें दिसलें नाहीं. लोकमान्य सुटून आल्यानंतर झालेल्या शिवराज्यारोहणोत्सव-प्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं उत्सव सतत वीस वर्षें टिकविल्याबद्दल धन्यवाद दिले

व आनंद प्रदर्शित केला. पुण्यांतील 'श्रीशिवाजी मंदिर'संबंधीं ' जाहीर विनंति ' ५-६-१७ च्या अंकांत केली असून नागपूरचे वकील श्री. ग. ना गोखले यांनीं १५००० रुपये सदरहू संस्था स्थापण्यासाठीं दिल्याचा उल्लेख करून इतरांनाहि यथाशक्ति मदत करण्याबद्दल त्यांत विनंति होती. या संस्थेसंबंधींचा संकलित वृत्तांत २५१५८ रुपयांच्या हिशेबासुद्धां २४-४-२३ च्या अंकांत आला आहे.

याच सुमारास दुसरी एक महत्त्वाची संस्था उदयास आली. ती ' अखिल भारतीय शिवस्मारक संस्था ' ही होय. या संस्थेतर्फे १९२२ सालीं युवराजांच्या हस्तें शिवस्मारकाच्या पायाचा दगड बसविण्यांत आला व वर्गणी जमविण्याचें काम नेटानें सुरू झालें. श्री. शिंदेसरकार व कोल्हापूरकर छत्रपति यांचा जोराचा प्रयत्न चालू होऊन याला लवकरच मूर्तस्वरूप आलेलें आपल्यास पहावयास मिळालें. ( १९-६-२८ ).

इकडे, रायगडच्या छत्रीसंबंधींची योजना तयार होऊन ती पुराणवस्तुसंरक्षक खात्याकडे अभिप्रायार्थ आली असल्याचें श्री. चंद्र यांनें स्मारक कमिटीला पत्र आलें. श्री. केळकर हे श्री. चंद्र यांसह रायगडीं जाऊन आले. योजना निश्चित झाली. पावसाळ्यानंतर कामास सुरुवात होईल वगैरे हकीकत ता. २०-५-२४ च्या अंकांत आली आहे. पुढें कामास सुरुवात झाल्याची बातमी २८-४-२५ च्या केसरीनें महाराष्ट्राला दिली व त्याचप्रमाणें खर्चाचा आंकडा १९००० रु. ठरला असून त्याची वांटणी स्मा. क. १२०००, प. वर्क्स खातें ५००० व पुराण व. सं. खातें २००० याप्रमाणें ठरल्याचेंहि त्याच अंकांत आलेलें आहे. शेवटीं ३०-३-२६ च्या अंकांत सदरहू काम पुरें झाल्याचें आनंददायक वृत्त महाराष्ट्राला कळवितांना केसरी म्हणतो:—'श्रीशिवाजींच्या समाधीच्या जीर्णोद्धाराच्या कामाचा ' तीस वर्षांपूर्वीं केलेला संकल्प या आठवड्यांत सांगता पावत आहे. याचा अखिल ' महाराष्ट्रीयांबरोबर आम्हांसहि साभिमान आनंद वाटत आहे. ' सत्यसंकल्पाचा ' दाता भगवान् ' ही उक्ति खरी ठरत आहे. ' याच सालीं रायगडावर चौथा महोत्सव धर्मवीर लक्ष्मणराव राजे भोसले यांच्या अध्यक्षतेखालीं झाला व जुन्या स्मारक कमिटीचे आभार मानणें व नवी प्रातिनिधिक कमिटीची नेमणूक वगैरे कामें झालीं. ( ६ व १३-४-२६ ).

१९२७ सालीं श्रीशिवाजीमहाराजांच्या जन्माला तीनशें वर्षे पुरीं झालीं असें मानणाऱ्या लोकांनीं त्रिशतसांवत्सरिक शिवजन्मोत्सव अत्यंत उत्साहानें सर्वत्र साजरा केला. शेंकडों ठिकाणीं हा उत्सव अपूर्व आनंदानें पाळला गेला. ह्या वेळची चिरस्मरणीय गोष्ट म्हणजे या शुभ प्रसंगीं रियासतकार श्री. गोविंद सखाराम सरदेसाई यांनीं ' शिवस्मृति ग्रंथ' आणि 'शिवसंस्मृति ' हे दोन महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध केले. नागपुरांत तर या उत्सवाचें नवल विशेष होतें. कारण तेथील म्युनिसिपल शाळामास्तरांनीं शाळांतील सर्व मुलांना बरोबर घेऊन हा शुभ दिन साजरा केला ! परंतु यावरहि ताण म्हणजे मुंबई सरकारनें त्या दिवशीं सार्वत्रिक सुट्टी जाहीर केली होती !

अखिल-भारतीय शिवस्मारक-कमिटीचें कामहि वाढीस लागलें, व त्या कमिटी-तर्फे स्थापन झालेल्या शिवरायांच्या पुतळ्याचा अनावरण समारंभ मुंबईच्या गव्हर्नरांचे हस्तें ता. १६ जून, १९२८, रोजीं मोठ्या दरबारी थाटानें झाला. युवराज, लॉर्ड आयर्विन, रेडिंग, फील्ड मार्शल बर्डवुड यांचे अभिनंदनपर संदेश आले होते. गव्ह-र्नरांनीं आपल्या भाषणांत सांगितलें कीं, ' विशिष्ट पक्षानें व जातीनें आपल्या चळ-' वळीला जोर येण्याचें साधन म्हणून शिवाजींच्या स्मृतीचा उपयोग करण्याचे दिवस ' आतां गेले असून, शिवाजी हा भारतीय वीर मानला जात आहे, अशी माझी ' समजूत आहे. " स्मारक हिंदी ऐक्यभावाचें द्योतक समजलें जाईल, आणि केवळ ' एका मराठी महात्म्याचेंच नव्हे, तर एका हिंदी विभूतीचें हें स्मारक मानण्यांत ' येईल, अशी मला आशा आहे. ' यावर केसरी म्हणतो, ' असले अभिनंदनपर ' संदेश यावेत ही गोष्ट आनंददायक व अभिमानास्पद कोणाला वाटणार नाहीं ? या ' आनंदाबरोबरच उलटसुलट घटना घडवून आणणाऱ्या कालाच्या सामर्थ्यवान् ' खेळाचीहि स्मृति हा पुतळा खास करून देत राहील. ' त्याच अंकांत पुतळा तयार करणाऱ्या श्री. विनायकराव करमरकरांना केसरीनें मनःपूर्वक धन्यवाद दिले आहेत. ( १९-६-२८ ).

याप्रमाणें या चळवळीची निरनिराळ्या अंगांनीं वाढ होत असतां, संशोधन-कार्यहि एकसारखें चालूच होतें. शिवजन्मतिथि फा. कृ. ३ ही निश्चितपणें ठरली. भारत-इतिहास-संशोधक-मंडळानें ( १९३० मध्यें ) रायगड शिवस्मारक-कमिटीच्या साहाय्यानें वाङ्मयस्मारकाचीहि खटपट चालू केली व त्रिशतसांवत्सरिक जन्मोत्सवाचे वेळीं (१) शिवकालीन पत्रसारसंग्रह, ( २ ) शिवाजी निबंधावली, ( ३ ) शिव-चरित्रसाहित्य याप्रमाणें ग्रंथ प्रसिद्ध केले.

' शिवछत्रपतींच्या त्रिशतसांवत्सरिक जयंतीच्या ( केसरीनें मान्य केलेल्या ' फाल्गुन व. ३, श. १८५१ )च्या पर्वणीनिमित्त जागोजागीं जे उत्सव-' समारंभ झाले, विशेषतः शिवनेरी ही शिवरायाची जन्मभूमि, पुणें शहर ' ही स्वराज्यसंपादनार्थ त्यांनीं आरंभिलेल्या रणयज्ञाची दीक्षाभूमि आणि तापी-' पासून, तुंगभद्रेपर्यंतचा टापू ही शिवाजीच्या पराक्रमाची रंगभूमि असल्यानें ' एवढ्या टापूंत, उत्तरेस काशीसारख्या धर्मक्षेत्रांत, दक्षिणेस मद्रास शहरीं असा ' सर्वत्र जो कडाक्याचा महोत्सव साजरा झाला, त्यावरून स्थल, काल व भाषाभेद ' ह्यांनीं ह्या उत्सवास गौणत्व न येतां शिवाजीमहाराजांविषयीं आदर सर्वत्र ' सारखाच भरलेला दिसून आला. ह्या उत्सवांतील सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे ' भारत-इतिहास-संशोधक-मंडळ व रायगड-स्मारक या संस्थांच्या सहकार्यानें ' चालणाऱ्या शिवचरित्रकार्यालयामार्फत ऐतिहासिक सहा ग्रंथांची प्रसिद्धि व ' निरनिराळ्या युनिव्हार्सिट्यांमार्फत व संस्थानांच्या विद्यालयांमार्फत आलेल्या ' प्रतिनिधींचें इतिहासमंडळांत झालेलें शिवाजीसंशोधनसंमेलन होय. वरील सहाहि

'ग्रंथ म्हणजे 'नामूलं लिख्यते किंचित्' ही प्रतिज्ञा पाळणाऱ्यांचे अस्सल आधार-
'ग्रंथ होत.' ( २२-३-३० ).

शेवटीं एवढेंच म्हणावेंसें वाटतें कीं, ज्याप्रमाणें आपलें सत्य स्वरूप सिद्ध करण्यास सुवर्णाला अग्नींत शिरून दिव्य करावें लागतें, व हिऱ्याला घणाचे घाव सोसावे लागतात, त्याचप्रमाणें सदर उत्सवास सरकारच्या रोषाच्या कडक भट्टींतून तावून सुलाखून निघावें लागलें, व निंदकांच्या अपशब्दांचे प्रचंड आघात सोसावे लागले. पण एकूण त्याचें सत्य स्वरूपच अखेर प्रगट झालें.

असो. अशा तऱ्हेचें वैभव व चिरस्थायित्व या चळवळीला आणण्यासाठीं केसरी कसा लढला हें आतांपर्यंतच्या लिहिण्यावरून समजण्यासारखें आहे. अशा प्रकारची अलौकिक कामगिरी करून दाखविणाऱ्या केसरीला नम्रतापूर्वक वंदन करून हा लेख संपवितों.

---

## परराष्ट्रीय धोरण

[ श्री. श्रीपाद रामचंद्र टिकेकर ]

" इंग्लंड, राशिया, फ्रान्स, जर्मनी, स्पेन, इटली, अमेरिका, तुर्कस्थान,
" जपान, चीन, इराण या अनेक राष्ट्रांचे आज परस्परांत जे डाव चालले
" आहेत, त्या सर्वांची किल्ली या आशियाखंडाचे मध्यभागीं असलेल्या
" त्रिकोणाकृति प्रदेशांत आहे म्हटलें तरी चालेल." –(केसरी, २६-५-१९०३)

**१. परराष्ट्रांशीं संबंध कसा पोहोंचतो ?:**—हिंदुस्थान स्वतः परतंत्र असतां, त्या देशाचा अंतस्थ कारभार देखील परकीयांकडून चालविला जात असतां, तेथील वृत्त-पत्रांना परराष्ट्रीय धोरणाविषयीं चर्चा करण्याचें प्रयोजनच उरत नाहीं, असा समज वरपांगीं पहाणारांचा सहजच होतो. परंतु प्रत्यक्ष राजकारण खेळण्याचा प्रसंग प्रस्तुतच्या विपरीत परिस्थितीमुळें येत नसला तरी तत्संबंधीं इष्टानिष्ट विचार प्रदर्शित करण्यास प्रत्यवाय असण्याचें कारण नाहीं. शिवाय हिंदुस्थानमुळें आंतर-राष्ट्रीय घडामोडींवर परिणाम घडून येत असेल तर हिंदुस्थानला राष्ट्राराष्ट्रांत चाललेल्या भानगडींविषयीं उदासीन राहून चालणार नाहीं. आणखीहि असें कीं, आज राज्यसूत्रें हिंदी जनांच्या हातीं नसलीं, तरी तीं कायमचींच गेलीं आहेत असें कां मानावें ? पुढें लवकरच आपण आपल्या घरचे धनी होऊं आणि कांहीं वर्षांपूर्वीं मराठशाहींत सर्व राज्याचीं सूत्रें हालविलीं तशींच हालविण्याचा समय येईल त्यास तयार असावें ह्या हेतूनें मराठी पत्रांतील अग्रेसर अशा केसरीनें परराष्ट्रीय धोरणासंबंधीं चर्चा केली तर त्यांत वावगें कांहींच नव्हे. उलट अशा

महत्त्वाच्या प्रश्नावर मत न देतां तिकडे कानाडोळा केला असता तर तें वर्तमान-पत्रकर्त्यांस शोभलें नसतें. असो.

केसरीनें कोणत्या परराष्ट्रीय घडामोडींत किती लक्ष घातलें याचें मोजमाप ठरविणें कठीण जाईल. परंतु ढोबळ मानानें असें म्हणतां येईल कीं, कोणत्याहि महत्त्वाच्या प्रसंगांवर व आंतरराष्ट्रीय प्रश्नांवर केसरी लिहिण्यास चुकला असें सहसा आढळत नाहीं. साम्राज्यशाहीचे दुष्ट प्रताप स्पष्टपणें जगाच्या नजरेस आणण्याचें काम तर केसरीनें केलेंच आहे, पण प्रत्यक्ष हिंदुस्थानशीं संबंध नसलेल्या घडामोडींवर देखील प्रसंगोपात्त चर्चा केलेली आढळते. वर्तमानपत्रांचा जन्मसिद्ध हक्क योग्य प्रकारें बजावून हिंदुस्थानास लागून असलेल्या किंवा हिंदी राजकारणाशीं संबद्ध अशा देशांविषयीं व तेथील घडामोडींविषयीं लिहिलें तर त्यांत विशेष असें कांहींच नाहीं. परंतु ' क्यूबा बेटांतील लोकांचें स्वातंत्र्य, ' ( २०-१२-९८ ), ' क्रीटचा लढा, ' ( २९-६-०९ ), ' बल्गेरिया गळून पडला, ' ( ८-१०-१८ ), ' इटलींतील बोल्शेव्हिझम्, ' ( २-१२-१९ ), ' पोलंडचें पारडें कमी झालें, ' ( २४-८-२० ), ' डेन्मार्कचें निःशस्त्रीकरण, ' (१९-१०-२९), असे किती तरी विषय दाखवून देतां येतील कीं, ज्यांचा हिंदी राजकारणाशीं प्रत्यक्ष संबंध नसतां, त्यावर केसरीनें चर्चा केली आहे. आणि त्याचें कारणहि उघड आहे. बाह्य जगांत काय चाललें आहे हें समजून घेण्याची चटक वर्तमानपत्रांनीं लावली हें खरें; पण त्याबरोबरच ती घडामोड कशासाठीं, कोणीं, कोणत्या हेतूनें प्रेरित होऊन केली, तिचे दूरवरचे परिणाम कोणाकोणांस कसकसे भोंवणार इत्यादिकांची चर्चा करणें वृत्तपत्रकारांचें क्रमप्राप्त कर्तव्यच होऊन बसलें आहे.

दुसऱ्याहि एका दृष्टीनें परराष्ट्रीय धोरणाकडे हिंदी जनतेस पहावयाचें आहे. ' हिंदुस्थान हा ( इंग्रजी ) साम्राज्याचा एशियाखंडांतील मेरु असून युरोपियन ' राष्ट्रांचीं एशिया खंडांतील सर्व कारस्थानें या मेरूभोंवतीं फिरावयास लावावीं ' ही महत्त्वाकांक्षा इंग्रजी मुत्सद्द्यांत पूर्णपणें वास करीत आहे.' ( २५-२-०२ ). इतकेंच काय पण, ' इंग्लंड देशास युरोपांतील राष्ट्रांमध्यें पहिल्या दर्जाचा जो मान ' आज मिळत आहे त्याचें कारण त्याचें हिंदुस्थानांतील अफाट राज्य हेंच होय. ' ......जगांत कोठेंहि कांहीं चळवळ झाली तर हिंदुस्थानचें सैन्य हिंदुस्थानच्या ' खर्चानें तिकडे पाठवून विलायत सरकारास त्याचा बंदोबस्त करितां येतो.... ' विलायतेंतील व्यापारी व मध्यम प्रतीचे लोक यांस किफायतीचा व्यापार, धंदा ' किंवा नोकरी मिळण्यासहि आज हिंदुस्थानसारखें दुसरें साधन नाहीं. हिंदुस्थान ' ताब्यांत आहे, म्हणूनच इजिप्त, अबिसीनिया, माल्टा, चीन किंवा आफ्रिका या ' ठिकाणीं हवें तेवढें विनखर्ची सैन्य इंग्लंडास गेल्या वीस वर्षांत पाठवितां आलें.' ( कित्ता ). ह्यावरून हिंदी जनतेस परराष्ट्रीय राजकारणांत लक्ष कां घातलें पाहिजे याची कल्पना येईल. बाह्य जगांतील परतंत्र राष्ट्रांचे, स्वातंत्र्यसंपादन करण्या-

करितां चाललेले प्रयत्न व साम्राज्यवादी देशांची दुर्बलांवर कुरघोडी करण्याची कसून खटपट ह्यांकडे बारकाईनें लक्ष दिलें पाहिजे. ' माणसाळलेल्या हत्तींकडून ' रानटी हत्ती फसवून आणून खड्डयांत पाडतात......त्याप्रमाणें......पारतंत्र्यांत ' माणसाळलेल्या आमच्याच शिपायांकडून ' इतरेजनांस ' पारतंत्र्याचे खड्डयांत पाडण्याचें काम,' (७-६-०४), इंग्रजांनीं करवून घेतलें. आमची त्यास संमति नव्हती, हें म्हणणें इतरेजनांस सांगणें हें हिंदी राष्ट्राचें कर्तव्य होतें. आणि त्यासाठीं केसरीस परराष्ट्रीय घडामोडींत—त्या परकीयांनीं केलेल्या असल्या तरी—लक्ष घालावें लागलें.

अफगाणिस्थान, सूदान, तिबेट, इराण, चीन वगैरे प्रदेशांत हिंदी सैन्य गेल्यानें हिंदी तिजोरीवर खर्चाचा बोजा मनस्वी पडला आणि म्हणूनच केसरीस परराष्ट्रीय धोरणाविषयीं लिहावें लागलें असें मात्र नव्हे. एका लबाड व लुटारू राष्ट्रानें दुसऱ्या दुबळ्या व लहान राष्ट्रास लुबाडावें—मग तें कोणाच्या खर्चानें कां असेना—हें तत्त्वच ( ? ) मुळीं केसरीस मान्य नव्हतें. एकाचा दाखला घेऊन दुसरा उपट-सुंभ अशा लुटालुटीच्या प्रकारास वहिवाटीच्या हक्काचें स्वरूप देईल. तें देण्यास त्यास अवसर मिळूं नये म्हणून अगदीं प्रथमपासून त्याबद्दल ओरड करावयाची हें काम केसरीनें चोख रीतीनें बजावलेलें दिसतें. केसरीला परराष्ट्रीय घडामोडींचें विवेचन करण्याचे प्रसंग गेल्या पन्नास वर्षांत अनेकदां आले आहेत. आणि त्या त्या वेळीं केसरीनें कोणत्या विशिष्ट तत्त्वानुसार आपलें मत प्रतिपादन केलें हें पहाणें मनोरंजक व उद्बोधक ठरेल. प्रत्येक देशदेशच्या बाबतींत वेगवेगळें धोरण असण्याचें कारण नाहीं. आंतरराष्ट्रीय बाबतींत जे मोठे महत्त्वाचे असे पांच सहाच प्रश्न आहेत व त्यांच्या बुडाशीं जीं वादग्रस्त तत्त्वें आहेत त्यांविषयीं केसरीनें काय म्हटलें हें पाहिलें म्हणजे आपलें काम भागेल.

२. **राज्यकर्त्यांशीं नातें** :—मुख्य प्रश्नांचा विचार करण्यापूर्वी स्थूल मानानें केसरीचें धोरण पहाण्यासाठीं राज्यकर्त्यांशीं कोणत्या नात्यानें तो वागत आला हें अवलोकिलें पाहिजे. इंग्रज आमचे प्रभु, त्यांच्या कृपाछत्राखालीं आम्ही आलों ही परमेशाची कृपा, अशा प्रकारची भ्रामक समजूत केसरीची कधींच नव्हती. उलट ' इंग्रजांचा शत्रु तो आमचा मित्र, ' इंग्रजांचें व आमचें हित एक नव्हे, हीच विचारसरणी केसरीनें एकसारखी प्रतिपादिली आहे. म्हणूनच जेथें जेथें इंग्रजांचें नाक ठेचलें गेलें तेथील वर्णन केसरींत मोठ्या विस्तारानें देण्यांत आलेलें आढळतें. युरोपियन महायुद्धाचे वेळीं तर विशेष कठीण परिस्थिति होती. लढाईस जेणें-करून साहाय्य होईल अशाच प्रयत्नांत सर्व प्रजाजनांनीं गर्क रहावें ही राज्यकर्त्यांची इच्छा. तिला मान न डोलावणें म्हणजे राजद्रोहांतच त्या गुन्ह्याची गणना व्हाव-याची. परंतु युद्ध सुरू होतांच केसरीनें ' युद्धाची गुणदोष-मीमांसा ' करण्यासाठीं चार अग्रलेख लिहिले. त्यांत केसरीनें इंग्रजांच्या शत्रूची बाजूहि मोठ्या कौश-ल्यानें मांडलेली दिसून येईल. अमुक एका युद्धाबाबतच मत प्रकट न करितां सर्व-

साधारण-रीत्या युद्धामुळें काय काय हानि पोहोंचते याचेंच विवेचन केल्यानें जन-मनावर कोणता परिणाम घडून येईल हें सांगण्याची जरूरी आहे असें नव्हे. युद्धांत कोणते गुन्हे घडतात तें सांगतांना केसरीनें लिहिलें:—

' एक युद्ध म्हटलें म्हणजे अमुक एक प्रकारचा गुन्हा किंवा अत्याचार त्यांत
' घडत नाहीं असें होत नाहीं. मनुष्यमात्राचें शरीर, त्याची मालमत्ता आणि त्याची
' अब्रू यांविषयींचे सर्व गुन्हे युद्धांत होतात. फार काय पण कोणी चौकस मनुष्यानें
' हातांत पीनल कोड घेतलें, आणि त्यांतील गुन्ह्यांची यादी तो तपासून पाहूं
' लागला तर अमुक एक गुन्हा युद्धांत घडून येत नाहीं, असें त्यास सहसा आढळून
' येणारच नाहीं. कदाचित् खोटीं नाणीं पाडण्यासारखा एखादा गुन्हा, प्रसंग
' नसल्यानें, घडत नसल्यास कोणास ठाऊक !

' मालमिळकतीसंबंधानें तर बोलावयासच नको. युद्ध सुरू होतांच पहिलें कृत्य
' म्हटलें म्हणजे, जर्मनीनें बेल्जममध्यें घातलें, त्याप्रमाणें दुसऱ्यांच्या घरांत पाऊल
' घालणें, आणि युद्धांत यश आल्यावर मग तर काय, दुसऱ्याच्या घरांत घातलेलें
' हें पाऊल कायम करावयाची मागणी, डोक्यांत मारलेल्या मेखेप्रमाणें, तहांत
' घुसावयाची हें ठरलेलेंच. युद्ध सुरू झालें म्हणजे शत्रुपक्ष हें नांव दिलेल्या
' लोकांची मिळेल ती जंगम मिळकत लांबविणें, लांबवितां नच आली तर निदान
' तिचा नाश करणें हा तर सरळ नित्यक्रमच होऊन बसतो. शांततेच्या काळांत
' एखाद्याच्या घराला आग लागली तर त्याच्याशीं अर्थाअर्थी संबंध नसलेले परके
' लोकहि ती विझवायला धावून येतात. युद्धांत ही स्थिति इतकी विपरीत होते
' कीं, शत्रुपक्षाचीं घरेंदारें जाळण्याकरितां तिसऱ्याचीं घरें जाळावीं लागलीं तरी
' यौद्धिकांची तयारी असते ! शत्रुपक्षाच्या स्त्रियांची अब्रू घ्यावी अशा प्रकारची
' आज्ञा कोणत्याहि देशाच्या युद्धनीतिग्रंथांत सांपडणार नाहीं हें खरें, पण युद्ध-
' मदानें सैनिक लोक एकदां उन्मत्त झाल्यावर, त्यांचा सेनापति हा सहस्राक्ष किंवा
' सहस्रपाद असला तरी विस्तृत युद्धक्षेत्रावर पसरलेल्या त्याच्या सैनिकांच्या हातून
' होणारे अशा प्रकारचे गुन्हे त्याला थांबवितां येणें अशक्य आहे. किंबहुना
' हें जाणूनच, असले गुन्हे घडल्याची मनांतून गुप्त जाणीव असतां, वरकांति ते
' घडलेच नाहींत असें जोरानें प्रतिपादन करीत सुटणें हेंच धोरण कोणत्याहि
' सेनापतीला नाइलाजानें अंगिकारावें लागतें. ' ( १-१२-१४ ).

तसेंच इंग्रजांची व दोस्तांची बाजूच तेवढी न्याय्य, ' शत्रूं 'ची अन्याय्य असें भासवून हिंदी प्रजेची सहानुभूति मिळविण्याचा हिंदुस्थान सरकार प्रयत्न करीत असतां केसरीनें सूचक उत्तर दिलें. केसरीनें त्या वेळीं लंडनच्या बिशपांचे उद्गार वाचकांपुढें मांडले व त्यावर टीका केली. लष्करभरतीच्या वेळीं बिशप इंग्लंड-मधील युवकांना उद्देशून म्हणाले कीं, ' आज जगांत जिवंत असणें ही कोणाहि ' मनुष्यास स्वतःस भूषण मानून घेण्यासारखी गोष्ट आहे. ईश्वराच्या वैभवाची ती

' महापर्वणी आहे. चार्लस् मार्टेल यानें ज्या दिवशीं सारासन ( मूर–मुसलमान )
' लोकांचा पराभव केला, तो दिवसहि असाच महापर्वणीचा होता. वॉटर्लूच्या
' लढाईचा दिवसहि असाच महापर्वणीचा होता. ' केसरीचें यावर म्हणणें असें
कीं, ' जर्मन युद्धवादी असें म्हणूं शकतील कीं, कोणत्याहि युद्धप्रसंगाला वाईट
' किंवा अनिष्ट म्हणणें हें वेगळें आणि आपल्या फायद्याच्या युद्धांना तेवढें
' चांगलें आणि आपल्या तोट्याच्या युद्धांना वाईट म्हणणें हें वेगळें. चार्लस्
' मार्टेलनें मुसलमान लोकांचा पराभव केला तें युद्ध जर चांगलें, तर जर्मनीनें
' फ्रान्सचा पूर्वी पराभव केला तें युद्ध कां वाईट ? किंवा मुसलमानांनीं पूर्वी
' युरोपियनांचा ज्या युद्धांत पराभव करून युरोपमध्यें प्रवेश केला त्याला त्यांनीं
' ईश्वरी वैभवाचा दिवस कां म्हणूं नये ? वॉटर्लूच्या युद्धाचा दिवस जर ईश्वराच्या
' वैभवाचा तर पूर्वी जोन ऑफ आर्क हिनें इंग्रज सैन्याचा पराभव केला
' तो दिवसहि ईश्वराच्या वैभवाचा कां मानूं नये ? असले नाजूक प्रश्न उपस्थित
' होतात....पण युद्धवादी जर्मन लेखकांनीं आपली भिस्त असल्या आधारांवर
' ठेवलीच नाहीं. ते मुळीं होतां होईतों ईश्वराचा संबंधच युद्धांत न आणतां सर्व
' जबाबदारी मनुष्यांवरच टाकतात. ' ( १५-१२-१४ ). जर्मनीशीं झालेल्या
लढायांचीं वर्णनें वाचतांना हा अनुभव अधिक स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येईल. शिवाय
' जर्मन गरुडाचे तोडलेले पंख पुनः फुटले, ' ( ५-५-२५ ), ह्या एका लेखावरून–
त्याच्या मथळ्यावरूनहि–केसरीचे विचार व धोरण लक्षांत येण्यासारखें आहे.
' अध्यक्ष पदासाठीं हिंडेन्बुर्गसारखा राजसत्तावादी आणि कायसरचा पक्का अभिमानी
' असा महारथी पुढें करून जर्मन गरुडानें आपले नवे पंख हालवितांच युरोप
' खंडांतील राजकीय वातावरणांत मोठीच खळबळ उडून गेली. ब्रिटिश सिंह
' डोळे उघडून आश्चर्यानें वर पाहूं लागला. फ्रेंच चित्ता रागानें आपली शेपटी
' आपटूं लागला. या व्याघ्रसिंहांच्या बळावर पूर्वी जर्मन गरुडाला सतावणारीं पोलंड-
' प्रभृति क्षुद्र जनावरें भीतीनें हंबरडा फोडून मदतीची याचना करूं लागलीं आणि
' इतर सर्व प्राणी...आश्चर्यचकित होऊन राहिले. अशा या स्तंभित वृत्तींतून
' इंग्लंडच प्रथम भानावर आलें आणि इंग्लंडांतील ' मेघनाद ' पत्रानें......
' हिंडेन्बुर्गची निवडणूक कराल तर याद राखून असा, अशी धमकी दिली. फ्रेंच
' पत्रांनींहि पुनः तलवार म्यानांतून बाहेर काढावी लागेल असें म्हणून धाकदपटशा
' दिला. पण जर्मनीनें कोणाच्याहि रागालोभांची पर्वा न करितां हिंडेन्बुर्गचीच
' निवडणूक करून आपला निश्चय तडीस नेला. ' ( कित्ता ).

तसेंच राष्ट्रीय चळवळ, मग ती कोणत्याहि देशांतली असो, तिला केसरीनें पाठिंबा दिला आहे. इराणचें पार्लमेंट, इजिप्तमधील वफ्द पक्षाची चळवळ, चिनी प्रजेचा स्वातंत्र्यार्थ झगडा, आयरिश होमरूलचा वाद, या व इतर अनेक प्रसंगीं केसरीचें लिखाण पाहिलें तर तें नेहमीं राष्ट्रीय वृत्तीस पोषक असेंच आढळतें.

३. **साम्राज्यवादाचा प्रश्न** :—त्यानंतर इतर वादग्रस्त बाबींचा विचार केला पाहिजे. त्यांतील पहिला प्रश्न साम्राज्यवादासंबंधींचा उपस्थित होतो. त्यावरच बहुतेक राष्ट्रांचें बाह्य धोरण अवलंबून असतें. साम्राज्यवर्धनाची अनिर्बंध हांव भरल्यानें त्या साम्राज्यसत्तेवर नेहमीं संकटें कशीं येतात याचें विवेचन करितांना केसरी म्हणतो, ‘ इंग्लंडसारख्या व्यापारी व महत्त्वाकांक्षी राष्ट्राचें जगावरील साम्राज्य ‘ रशियन साम्राज्याप्रमाणें एके ठिकाणीं नसून सर्व जगभर त्याचा फापट- ‘ पसारा झाला आहे. त्यामुळें साम्राज्याच्या इमारतीस कोठें ना कोठें तरी नेहमीं ‘ मुंगे लागलेले आढळून येतात. ’ ( १६-१२-०२ ). ब्रिटिश साम्राज्यशाहीचे चटके हिंदी प्रजाजनांस बरचेवर बसत होते, म्हणून केसरींत त्यांच्या विरुद्धच विशेष टीका आल्यास आश्चर्य नाहीं. साम्राज्यवाद्यांचे शत्रु कसे वाढतात हें दाखवितांना केसरी म्हणतो, ‘प्रजेस संतुष्ट ठेवून स्वस्थपणें राज्य करण्याची आमच्या ‘ राज्यकर्त्यांची इच्छा नाहीं. त्यांची हांव यापेक्षांहि जास्त आहे. आणि त्या ‘ हांवेमुळें इतर युरोपियन राष्ट्रांच्या चळवळींचें आगाऊ निराकरण कसें करावें या ‘ खटपटींत ते नेहमीं चूर झालेले असतात. ’ ( २५-२-०२ ). ब्रिटिश साम्राज्यांतील हिंदुस्थान एक घटक म्हणून साम्राज्यवाढीनें केसरीस कधीं आनंद झाला नाहीं. ब्रम्हदेश हिंदुस्थानला जोडला, चित्रळ खालसा केलें किंवा तिबेट हिंदुस्थानी सरकारच्या हुकमतीखालीं आणलें याबद्दल केसरीनें तीव्र नापसंती व निषेधच व्यक्त केला आहे; त्या त्या स्वतंत्र–रानटी पण स्वतंत्र–लोकांचें ‘ जिवापेक्षां प्यार असलेलें स्वातंत्र्य ’ नष्ट झालें म्हणून केसरीनें सहानुभूतीचेच अश्रू ढाळले आहेत. एवढेंच नव्हे, तर ही समुद्रवर्चस्वी सासू सोकावत सोकावत जमिनीवर देखील मालकी गाजवूं लागली हें कांहीं चांगलें लक्षण नाहीं, अशानें जागतिक शांततेला धोका आहे, अशी सूचना वेळोवेळीं केसरीनें दिलेली आढळते. ब्रिटिश सामाज्यशाहीचें हिडिस स्वरूप जनतेपुढें मांडून त्यांच्या मनांत ह्या जुलमी अरेरावीविरुद्ध विचार उद्‌भूत करण्यास केसरीनें बरेंच सहाय्य केलें. साम्राज्यवादी समंधाचें खरें आविष्करण अन्यत्र कोठेंच झालें नसावें. दक्षिण आफ्रिकेंतील बोअर लोकांच्या स्वातंत्र्यलढ्याचे वेळीं केसरीनें लिहिलें :—

‘ दुसऱ्याचें लुबाडून घेण्याची इच्छा, सुधारणेच्या नांवावर दुसऱ्याचे उरावर ‘ आपल्या राजसत्तेचा झेंडा नाचविण्याची हांव, सर्व जगांत वरी व सुखी काय ते ‘ आम्ही अशी प्रतिष्टा मिरविण्याची महत्त्वाकांक्षा आणि सर्व साध्य करण्याकरितां ‘ न्यायान्यायांकडे न पाहतां दुसऱ्याच्या तोंडांतील घास बळजोरीनें बाहेर ओढून काढ- ‘ ण्याची सतत खटपट, हीं बोअर व इंग्रज ह्यांमधील निरनिराळ्या प्रसंगांच्या तंट्याच्या ‘ बुडाशीं जशीं दिसतात तशीं दुसऱ्या कोणत्याहि प्रसंगीं दिसत नाहींत....४०- ‘ ४५ कोटि लोकसंख्येच्या साम्राज्यानें चाळीस हजार शेतकऱ्यांचा चिमुकला प्रांत ‘ घशांत टाकण्याचा बेत केला असतां, सर्वस्वनाशापासून मुक्त करून घेण्याकरितां

' निराशेच्या बळावर या शेतकऱ्यांनीं हातपाय हालविले एवढ्यावरून आपला अपमान
' झाला, आपल्या इभ्रतीस बट्टा लागला, अशा प्रकारच्या अहंपणाच्या कल्पना
' सर्व राष्ट्राचे रक्तांत एकदम खेळूं लागल्या हें कशाचें लक्षण बरें ? ह्यावरून आपली
' राज्यसत्ता चोहोंकडे पसरविण्याची आसुरी इच्छा व आपल्या इच्छेविरुद्ध न्यायानें
' कोणीहि वागलें असतां अपमान झाला म्हणून दुसऱ्याचें न्यायी वर्तनहि न
' सोसण्याइतकी असहिष्णुता हीं इंग्लंडच्या हाडामासांत खिळून राहिलीं आहेत,
' असें दिसून येत नाहीं काय?' ( ५-१२-९९ ). ह्या आसुरी मदांधतेचें वर्णन
आणखीहि द्यावें असें वाटतें. केसरी म्हणतो:—' ग्लॅडस्टनसाहेबांचे पक्के अनुयायी
' देखील...सामाज्यमदाच्या धुंदीनें...न्यायान्यायांकडे डोळेझांक करितात व
' सतरा वर्षांपूर्वी मजूबा टेकडीवर झालेल्या पराभवाचा सूड उगविण्याची वेळ
' जवळ आली म्हणून सुडांच्या आनंदांत सर्व इंग्लंड दंग झालेलें ज्या वेळीं दिसतें,
' दक्षिण आफ्रिकेंत दुसरें हिंदुस्थान उत्पन्न करून राज्यवैभव उपभोगण्याच्या हौसेनें
' ज्या वेळीं सर्व राष्ट्र हुराळलेलें भासतें, त्या वेळीं क्रूगरसाहेब इंग्लंडच्या न्यायी
' स्वभावावर अवलंबून राहते तर बरें झालें असतें, असें म्हणणें म्हणजे इंग्लंडला
' साम्राज्यसत्ता मिरविण्याची किती चटक लागली आहे व सर्व राष्ट्रानें त्या
' सामाज्यमदिरेचे पेले फार झोंकल्यामुळें त्याची राजकीय नीति किती बिघडली
' आहे हें विसरण्यासारखेंच होय. ' (कित्ता).

इंग्लंडचा साम्राज्यवाद एकाद्या बुभुक्षितप्रमाणें इतर प्रदेशांस ग्रासण्यास कसा सदैव तयार असे याविषयीं केसरीनें थोडक्यांतच पण मार्मिकपणें लिहिलें :—
' इजिप्त पोटांत घातल्यानें उत्तर आफ्रिकेंतील ब्रिटिश साम्राज्याची भूक बहुतेक
' भागली हें खरें; तथापि मोरोक्को देशांतील थोडी बहुत मीठमिरची अगर गरम
' मसाला मिळाला तर तो निक्षून नको म्हणण्याइतकें अग्निमांद्य इंग्लंडला खास
' झालेलें नाहीं. ' ( १-८-११ ).

इतक्यावरच केसरी थांबला नाहीं. ' सामाज्यरथा 'च्या चाकांसाठीं लोखंड, घावांकरितां रबर आणि ज्वलनाप्रीत्यर्थ तेल यांचेवरच सर्व लढा कसा चालतो हें केसरीनें मेसापोटेमियाचा दाखला देऊन नीट पटविलें. चंचुप्रवेशाचें तें उत्तम उदाहरण आहे. केसरी म्हणतो:—

' इंग्रजांची सत्ता एखाद्या देशांत स्थापित झाली म्हणजे मग आपला अवतार
' परोपकाराकरितां आहे असें इंग्रज सांगूं लागतात. पण ही सत्ता स्थापली जात
' असतां तिचा इतिहास ज्यांस डोळ्यांना दिसतो, त्यांना हा अवतारकृत्याचा
' पोरखेळ मूळ निवळ स्वार्थाकरितां असतो हें माहीत असतें. व्यापाराचा व संपत्ति
' उत्पन्न करण्याचा माल जेथें नव्यानें व पुष्कळसा सांपडेल तेथें हे परोपकारी गृहस्थ
' ठेवलेलेच असावयाचे. खाणींतील हिऱ्यांकरितां हे जसे दक्षिण आफ्रिकेंत गेले
' तसेंच खनिज तेलाच्या खाणींकरितां हे मेसापोटेमियांत शिरले आहेत. व जर कां

'यांचा पाय तेथें रुजला गेला तर अरब लोकांच्या भावी पिढ्यांना प्राथमिक 'शिक्षणाच्या पुस्तकांतून इंग्रजांच्या परोपकारित्वाचे धडे घोकावे लागतील. आज 'तेल पाहिजे म्हणून मुलूख हातीं ठेवा, मुलूख पाहिजे म्हणून सैन्य ठेवा, सैन्य 'पोसलें पाहिजे म्हणून पैसा द्या, पैसा पाहिजे म्हणून आरब लोकांकडून वसूल 'मिळवा, वसूल पाहिजे म्हणून कालवे खोदा, कालवे पाहिजेत म्हणून विलायतें-'तील भांडवल आणा, भांडवल जमावें म्हणून व्याज कबूल करा, व्याज सुटावें 'म्हणून कालव्याच्या पाण्याला भारी दर ठेवा आणि हें सर्व चक्र पोटांत गुप्त 'ठेवून तोंडानें मेसापोटेमियाच्या लोकांना सुधारून शहाणे करण्याकरितां आम्ही 'स्वदेश सोडून हजारों मैल दूर आलों, अशा गोष्टी तोंडानें बोलत रहा! जें 'हिंदुस्थानांत झालें तेंच फिरून मेसापोटेमियांत होणार! 'धाता यथा पूर्वमकल्पयत्' 'ही श्रुति जगाच्या इतिहासाप्रमाणेंच साम्राज्याच्या इतिहासालाहि लागू पडते!' (६-७-२०).

साम्राज्यवादावर केसरीचा कटाक्ष किती आहे हें पाहिल्यानंतर साम्राज्यवाद्यांच्या मोहजालास केसरी कधीं तरी भुलला आहे कीं काय हें पहाणें उद्बोधक होईल. आज अर्थशास्त्राची प्रगति झाल्यामुळें ब्रिटिशांच्या भुलथापांस किंवा दिखाऊ देणग्यांस बळी पडण्याचे प्रसंग येणार नाहींत हें खरें; परंतु पंचवीसतीस वर्षांपूर्वी केसरी एकाकीच सर्वज्ञतेचें काम करीत असतां त्याला देखील साम्राज्यवाद्यांचे कावे ओळखतां आले हें पाहून कौतुकच वाटतें. 'साम्राज्याचीं बंधनें,' (९ व १६-६-०३), घट्ट करण्यासाठीं चेंबर्लेनी तत्त्व अवतरलें असतां, केसरीनें त्याचा धुव्वा अत्यंत दूर दृष्टीनें, शास्त्रीय अंतर्दृष्टि प्रकटवून, विद्वत्तापूर्ण दोन लेखांतच उडविला. हिंदुस्थान व आयर्लंड हे दोन देश वगळून बाकींच्या सर्व वसाहती व मायदेश यांच्यामधील संबंध दृढ करण्यासाठीं 'इंपीरियल प्रेफरन्स'चें—साम्राज्यांतील सवलतीच्या जकातीचें—तत्त्व निर्माण केलें गेलें, तेव्हां केसरीनें त्याविषयीं लिहिलें, 'वसाहती आणि मायदेश यांच्या-'मध्यें व्यापारी ऐक्य करून साम्राज्याची घडी किंवा बंधनें दृढ करण्याची जी 'मि. चेंबर्लेन यांची कल्पना आहे...तींत जात्याभिमानाचेंच वारें अधिक आहे... 'हें तत्त्व प्रथमतः मनोरम दिसलें तरी अखेरीस इंग्रजी साम्राज्यास अहितकारक आहे. 'मायदेश आणि वसाहती या जरी आज मायलेकरांप्रमाणें एकत्र करून त्यांचें 'एक कुटुंब बनविलें तरी त्यांचे हिताहितसंबंध पुढें केव्हां तरी भिन्न भिन्न झाल्याखेरीज 'रहाणार नाहींत हें अमेरिकेच्या उदाहरणावरून सहज कळून येण्यासारखें आहे,' (९-६-०३), इतकें बजावून इंग्लंडनें काय केलें पाहिजे याचा उपदेशहि केसरीनें केला. 'साम्राज्याचे हे सर्व भाग एकत्र राहण्यास जर कांहीं युक्ति असेल तर 'त्यांच्यामधील हिताहिताचा विरोध काढून टाकणें हीच होय,' (१६-६-०३), असें सांगून, 'व्यापारी हिताहिताच्या संबंधावर साम्राज्याचीं बंधनें दृढ करण्याचा 'प्रयत्न करणें अगदींच कमी समजाचें काम होय,' (कित्ता), म्हणून केसरीनें

त्यावर आपलें स्पष्ट मत दिलें. धोक्याची सूचना म्हणून त्याच लेखांत केसरीनें म्हटलें कीं, 'असली कल्पना साम्राज्याचीं बंधनें दृढ करण्यापेक्षां तीं भग्न करण्यासच अधिक ' कारणीभूत होईल असा आमचा समज आहे. ' आणि आज दक्षिण आफ्रिकेचा इंग्लंडशीं चालू असलेला बखेडा, कॅनडाची कुरबूर आणि ऑस्ट्रेलियाचा हट्ट हे सर्व प्रकार केसरीचें १९०३ मधील भविष्य खरें ठरल्याची साक्ष देत नाहींत काय ?

**४. स्वयंनिर्णयाचा पुरस्कार** :— म्हणजे केसरीनें ब्रिटिश साम्राज्यवादाला कसून विरोध केला आणि त्यापासून सावध कसें रहावें हें अनेक गोष्टी सांगून लोकांच्या नजरेस आणिलें. परंतु स्वतः केसरी साम्राज्यवादी नाहीं, तो स्वयंनिर्णयाचा कट्टा पुरस्कर्ता आहे हें दर्शविलें पाहिजे. कारण बहुतेक वेळां असें होतें कीं, स्वतःवर घेतली असतां, ज्या तत्त्वाचें आपण जोरानें प्रतिपादन केलें तें गुंडाळून ठेवण्याची बुद्धि होते. अफगाणिस्थान व वायव्य सरहद्द किंवा तिबेट यांच्याविषयीं केसरीचें धोरण पाहिलें असतां तें स्पष्ट होईल.

'...एका निरपराधी राष्ट्राचें स्वातंत्र्य निष्कारण हिरावून घेण्यानें राजकीय पाप ' करण्यास ही मंडळी (यंगहजबंड मिशन) तयार झाली आहे. आणि तें पापहि उघड ' राजरोस नव्हे, तर पहिल्यानें व्यापारी मिशन पाठविण्याचा आव घालून व त्या ' मिषानें तिबेटियन लोकांस फसवून करण्यास हिंदुस्थान सरकार जगाची लाज सोडून ' तयार झालें आहे, ' (२४-११-०३), असें केसरीनें तिबेट मिशन तिकडे गेलें त्या प्रसंगास अनुलक्षून म्हटलें आहे. आणि जेव्हां तिबेटी लोकांनीं विरोध केला म्हणून साम्राज्यवादी पत्रांनीं उलट गिल्ला केला, तेव्हां केसरी म्हणतोः— ' राजकीय ट्रेस्पस व राजकीय अनलॉफुल असेंब्लीचे गुन्हे प्रबळ राष्ट्रें दुर्बल राष्ट्रांचे ' संबंधानें हल्लीं राजरोस करीत आहेत. आपल्या देशांत विनाकारण घुसणारांशीं ' तिबेटी लोक स्वातंत्र्याकरितां लढूं लागले तर त्यांस अडाणीपणा व धर्मांधत्व ' म्हणणें राज्यलोभ व राज्यमद यांवर निर्लज्जपणाचा कळस चढविण्यासारखें आहे. ' (२-२-०४).

अफगाणिस्थान हिंदुस्थानचाच एक भाग म्हणून हिंदी साम्राज्यांत समाविष्ट व्हावयास पाहिजे अशी कित्येकांची समजूत आहे; पण केसरीची दृष्टि तशी कोती नाहीं. ' अफगाण लोकांनीं आपल्या देशांत स्वराज्य भोगावें, ' अशी आपली इच्छा असल्याचें केसरी उघड जाहीर करतो. (३०-४-२९). शिवाय काफिरिस्तान नामक डोंगराळ व रानटी प्रांत अफगाण अमिरानें आपल्या राज्यास जोडला, तेव्हां त्या ' गरीब राष्ट्राला जिवापेक्षां प्यार असलेल्या स्वातंत्र्याचा भंग झाल्याबद्दल, ' (१२-५-९६), रडत बसलेलें पाहून ' सहानुभूतीचीं दोन टिपें ' केसरीनें ढाळलीं आहेत ! अफगाणिस्थानाविषयक विचार स्वतंत्र केला असल्यानें त्यासंबंधीं उल्लेख आणखी नको. पण केसरीची स्वयंनिर्णयावरील भक्ति आणि साम्राज्यशाहीचा तिटकारा वरील उताऱ्यांवरून यथार्थतेनें दिसून येईल.

ब्रिटिशांच्या साम्राज्यवादाचा नंगा नाच दुर्बल राष्ट्रांना कसा भोंवतो हें कळल्या-मुळें त्याविरुद्ध एकसारखी ओरड झाली खरी. पण इतर राष्ट्रेंहि साम्राज्यवादी असूं शकतात आणि त्यांची साम्राज्यवर्धनाची हौस इतर लहान देशांच्या स्वातंत्र्यावर घाला घालते हेंहि केसरीनें प्रसंगानुसार स्पष्ट केलें आहे. चीन व जपान यांचा लढा व ते वेळीं जपानचें चीनसंबंधीं वर्तन अनुदार व गर्हणीय असें दिसून आलें, तेव्हां केसरीनें म्हटलें, ' जपान व चीन दोन्ही देश समान संस्कृतीचे व धर्माचे असतां ' चीनच्या उद्धाराचे कामीं जपानाकडून साहाय्य होण्याचें बाजूस राहून जपान ' भलीबुरी संधि साधून व चीनचे लचके तोडून आपली साम्राज्यविस्ताराची ' हांव भागवीत आहे, हें आश्चर्य होय. यावरून साम्राज्यवाद हा गोऱ्या युरोपियनांचा ' असो वा पिंवळ्या आशियाटिकांचा असो, तो जगाच्या स्वातंत्र्यास व स्वास्थ्यास ' सारखाच घातक ठरतो हेंच सिद्ध होतें. ' ( १५-५-२८ ).

**५. आशियाटिकांविषयीं अभिमान :**—जपानसंबंधीं केसरीची पूर्वभावना उच्च असल्यामुळेंच अशी फसवणूक झाल्यासारखें वाटतें. परंतु रुसो-जपानी युद्धाचे वेळीं केसरीनें कैवार घेतलेला जपान व नंतर कोरिया, चीन इत्यादिकांना दडपणारा जपान यांत महदंतर पडलें. रुसो-जपानी युद्धप्रसंगीं दुसऱ्याच एका महत्त्वाच्या आंतरराष्ट्रीय प्रश्नाचा निकाल लागला. 'आशिया हें गोऱ्या राष्ट्रांकरितां ईश्वरानें एक सुपीक ' कुरण निर्माण केलें आहे, ही समजूत आतां बुडाली; व आशियाखंडाचीं ' कारस्थानें आशियांतील कोणत्याहि राष्ट्रास न विचारतां करण्याचे दिवसहि आतां ' गेले. जपाननें ही जी मोठी क्रांति घडवून आणिली त्याबद्दल आशियांतील सर्व ' देशांच्या लोकांनीं जपानचे आभार मानिले पाहिजेत आणि त्याचें अभिनंदन ' केलें पाहिजे. ' ( २१-३-०५ ).

केसरीनें त्या वेळीं जपानचा पाठिराखेपणा किती केला याची कल्पना येण्यास इतर गोष्टींचा ओझरता उल्लेख केला पाहिजे. रुसो-जपानी युद्ध सुरू होतांच 'जपानी-फंडा'च्या वर्गणीचा उपक्रम केसरीनेंच काढला आणि ' हिंदुस्थानांतील लोकांनींहि या वेळीं आपलें कर्तव्य केलें पाहिजे, ' ( १६-२-०४ ), असें बजावून वेळोवेळीं केसरींतून त्याची पोहोंचहि दिली. जपानी युद्धांतील रणशूरांचीं चरित्रें सचित्र देऊन त्यांचा गौरवपर उल्लेख आपलेपणानें केलेला आढळतो. ' जपानचें नेपोलियन, ' ' जपानचे नेल्सन, ' ' जपानचे बिस्मार्क, ' ( १६ व २३-८ व १३-९-०४ ), इत्यादि विशेषणें युरोपियन इतिहासाशीं साम्य दर्शवितात, तर 'रूसचें सोनपत-पानपत, ' ( ६-९-०४ ), किंवा ' अर्वाचीन कुरुक्षेत्र, ' ( ३०-४, १४-५, ४-६ वगैरे १९०७ मधील लेख ), असे निर्देश केसरीचें जपानच्या हिताहितांशीं तादात्म्य दाखवितात. जपाननें त्या वेळीं हिंदुस्थानचीच काय, पण सर्वच आशियाटिकांची सहानुभूति कां व कशी मिळविली हें कळण्या-साठीं तत्कालीन परिस्थितीचें नीट आकलन झालें पाहिजे. केसरीनें हें सर्व

थोडक्यांत सांगून लिहिलें :—'एशियांतील लोक शरिरानें कितीहि बळकट असले,
'अथवा ऊन, तहान सोसण्याची त्यांचे अंगांत कितीहि शक्ति असली किंवा
'व्यक्तिशः ते कितीहि शूर असले, तथापि त्यांच्यामध्यें राष्ट्रीयत्वाची कल्पना नसल्यामुळें
'युरोपियन लोकांच्या साहाय्याखेरीज त्यांस कोणत्याहि युरोपियन राष्ट्राबरोबर टक्कर
'देतां यावयाची नाहीं, असा युरोपियन लोकांचा आजपर्यंत समज होता.
'किंबहुना एशिया, आफ्रिका आणि अमेरिका हीं तिन्ही खंडें युरोपियन लोकांना
'चरण्याकरितांच ईश्वरानें निर्माण केलीं आहेत व जेथें वसाहत करणें शक्य नाहीं
'तेथें जे काळे लोक असतील त्यांस जिंकून त्यांच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या पिकां-
'पैकीं जेमतेम पोटापुरता भाग त्यांजला ठेवून बाकीचा सर्व युरोपियन लोकांनीं
'आपआपल्या राष्ट्रांच्या अभिवृद्ध्यर्थ घ्यावा, हेंच त्यांचें कर्तव्य आहे. इतकेंच नव्हे
'तर, युरोपियन लोक असें न करतील तर देवाच्या घरीं ते अपराधी ठरतील, अशी
'चांगल्या चांगल्या युरोपियन ग्रंथकारांची समजूत होती....हा गुणावगुणांचा भेद जरी
'वास्तविक असला तथापि एशियांतील राष्ट्रांनीं सदैव युरोपियन राष्ट्रांच्या कह्यांत
'राहिलें पाहिजे असा कांहीं देवदत्त अवगुण एशियांतील लोकांच्या अंगीं नाहीं हें
'वाचेनें नव्हे तर कृतीनें जपानी लोकांनीं सर्व जगाच्या प्रत्ययास आणून दिलें
'आहे.' ( ६-१२-०४ ).

६. राष्ट्रसंघाची शक्यता :—ह्या कारणानेंच जपानला इतकें उच्च स्थान मिळालें. आशियाविरुद्ध युरोप असा लढा रंगला असतां, युधिष्ठिराच्या शिकवणीनुसार केसरीनें जपानची बाजू घेतली यांत आश्चर्य कांहीं नव्हे. युरोपियन राष्ट्रांचा संघ युरोपांत होईल, आशियांत मात्र मुस्लीम राष्ट्रांचा एक व बौद्ध राष्ट्रांचा दुसरा असे वेगळे संघ होतील, अशी अपेक्षा केसरीची झाली त्याला कारणहि तसेंच होतें. आज देखील 'ख्रिस्ती धर्माचें जगावर वर्चस्व,' अशा धार्मिक दृष्टीनेंच युरोपियन राष्ट्रें जागतिक इतिहासाकडे पहात आहेत. मग विसाव्या शतकाचे प्रारंभीं अशा धार्मिक धाग्यानें राष्ट्रें एकत्र येतील ही अपेक्षा अगदींच अशक्य कोटींतील नव्हती. इतकेंच काय परंतु आजमितीस देखील 'पॅन-इस्लामिझम्'चें भूत कित्येक सुधारलेल्या राष्ट्रांना भीति दाखवीत आहे. असो. धर्मप्रधान अशा संघाची शक्यता विचारवंतांना पटो अथवा न पटो, प्रत्येक खंडांत ही एकीकरणाची चळवळ जोरानें सुरू आहे हें अगदीं खरें. मात्र ती धर्मावर अवलंबून नाहीं. परंतु पॅन-अमेरिकन किंवा पॅन-एशियाटिक परिषदा भरतात, त्यांचा हेतु खंडाखंडांची संघटना करण्या-चाच आहे. फ्रेंच मुत्सद्दी मॉं. ब्रियॉं यांची संयुक्त युरोपियन राष्ट्रांची योजना आज इतक्या जोरानें प्रतिपादिली जात आहे तींतहि हेंच बीज आहे. राष्ट्रसंघाची कल्पना अमेरिकन प्रे. विल्सन यांनीं युरोपियन युद्धामुळें वैतागून काढली, असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं 'कलहांतून राष्ट्रसंघाची उत्पत्ति' हा केसरींतील ( ३०-८-०४ ), लेख वाचावा. युरोपियन राष्ट्रांच्या झगड्यामुळेंच जिनेव्हा येथील

राष्ट्रसंघ अस्तित्वांत आला असला, तरी ती कल्पना फार जुनी आहे. मानवी उत्क्रांतींतील ती एक क्रमप्राप्त पायरीच आहे, असें केसरीनें १९०४ सालीं प्रतिपादिलें. हें पाहून वर्तमानपत्रकर्त्यांच्या दूर दृष्टीची दुर्बिण किती पल्लेदार असावी लागते आणि प्रचलित घडामोडींची बातमी देतांना इतिहासाचा, तत्त्वज्ञानाचा आधार घेऊन विवेचन कसें परिपूर्ण करावें लागतें याची कल्पना येईल. राष्ट्रसंघाविषयीं केसरीनें लिहिलें:—'मानवी समाजरचनेच्या ह्या पायऱ्यांचें व्यापक दृष्टीनें अवलोकन केलें असतां, 'आपणांस असें आढळून येईल कीं, विलग व स्वतंत्र व्यक्तींचें कुटुंब, ग्राम, प्रांत, 'देश, राष्ट्र, साम्राज्य, याप्रमाणें जसजसे मोठमोठे समूह बनत चालले तसतशी कलहाची 'मर्यादा त्याच क्रमानें कमी कमी होत आली आहे. व्यक्तीचा कलह बंद पडून 'तो कुटुंबांत सुरू झाला, आणि याप्रमाणें प्रांताप्रांतांतील कलह ऊर्फ युद्ध बंद 'होऊन तें आतां राष्ट्राराष्ट्रांत सुरू झालेलें आहे. आजपर्यंत मनुष्यप्राण्याच्या समूह-'प्रवृत्तीची मजल येथपर्यंत पुरती येऊन पोहोंचली आहे. याच्या पुढील मजल 'म्हटली म्हणजे राष्ट्राराष्ट्रांतील हा कलह अजिबात बंद करून राष्ट्रसंघ बनविणें, 'निदान हा कलह होतां होईल तितका सौम्य व न्यायाचा करणें ही होय. या 'प्रवृत्तीस राष्ट्रांमधून अल्पारंभहि झालेला आहे. युरोपांतील राष्ट्रांमध्यें अलीकडे ही 'प्रवृत्ति विशेष दिसावयास लागली आहे. क्षुल्लक कारणासाठीं लढाई न करतां 'लढे आपसांत मिटविण्याची पद्धति, हेग येथील शांतता परिषद, इंटरनॅशनल लॉ 'ऊर्फ राष्ट्रनीतीचे नियम इ. इ. मध्यें जरी अजून विशेष 'सामर्थ्य आलें नसलें, 'तरी त्यांचा एकंदर रोख पाश्चात्य, ख्रिस्ती व युरोपियन राष्ट्रांचा संघ बनविण्या-'कडे व आपसांतील कलह मर्यादित करण्याकडे उघड आहे.' (३०-८-०४).

तसेंच युरोपियन युद्धोत्तर कालांत स्थापन झालेल्या राष्ट्रसंघाविषयीं लिहितांना केसरीनें त्या संघस्थापनेचा सुमारें दोनशें वर्षांचा सोपपत्तिक इतिहास देऊन राष्ट्र-संघाचें तात्त्विक विवेचन करितांना पुराणांचे दाखलेहि घेतले आहेत. केसरी म्हणतो, 'मनुष्यामनुष्यांमधील व लोकालोकांमधील द्वेषबुद्धि कशी कमी करावयाची याचा 'खल मानवी प्राण्याच्या उत्पत्तीपासून आजपर्यंत एकसारखा सुरू आहे. आजपर्यंत 'पृथ्वीला क्षत्रियांचा ऊर्फ कलहवृत्तीचा भार अनेक वेळां असह्य झाला आहे, 'आणि मोठें रण माजून हा भार हलका झाल्यावर त्या रणांतील महात्म्यांनीं 'पृथ्वीवर कायमची शांतता स्थापिली असें जाहीर केलें आहे.' (२५-२-१९).

या लहानशा उताऱ्यांत राष्ट्रसंघावर विश्वास कितपत ठेवावा आणि कलहांतून राष्ट्रसंघ व पुनः राष्ट्रसंघांतूनच कलह कसे उद्भवत आले आहेत, हे मार्मिकतेनें सुच-विलें आहे. प्रे. विल्सन यांच्या राष्ट्रसंघावरहि पुढें कोणाचा विश्वास राहिला नाहीं, हें दर्शविण्यास 'उंदरामांजरांचा संघ,' (२८-१२-२०), 'स्वयंनिर्णयाचे धिंडवडे,' (२-८-२१), 'राष्ट्रसंघाचें काय होणार?' (१६-३-२६), इत्यादि केसरींत मधूनमधून प्रसिद्ध झालेल्या स्फुट सूचना पुरेशा आहेत. परंतु सर्वांत अधिक

महत्त्वाचा उल्लेख ' आशियांतील राष्ट्रांचा संघ पाहिजे,' (४-१०-३०), या लेखांत आढळतो. युरोपियन राष्ट्रांचा संघ झाल्यानें युरोपांतील तुंबळ रणसंग्राम कदाचित् कमी होतील. पण त्यामुळें ते भुकेलेले लांडगे इतर दुर्बल राष्ट्रांवर तुटून पडतील, अशी भीति त्यांत प्रकट केली असून ती साधार असल्याचें दर्शविलें आहे. एकंदरींत हीं युरोपियन राष्ट्रें आपसांत भांडत राहिलीं तरच जगांत शांतता नांदूं शकेल, नाहीं पेक्षां त्यांचा संघ यशस्वी झाल्यास जगांतील शांतीस व स्वास्थ्यास धोका आहे असें त्या लेखांत स्पष्ट म्हटलेलें आहे.

**७. लोकशाही कीं राजसत्ता ?** :—इतक्या प्रश्नांचा विचार झाल्यानंतर आणखी दोनतीनच बाबींची चर्चा करावयाची रहाते. लोकशाहीच्या प्रसारास केसरी अनुकूल आहे, हें दर्शविण्यासाठीं केसरीनें आतांपर्यंत केलेली कामगिरी पहावी लागेल. आणि सरकारशीं भांडतांना केसरीनें सदैव लोकपक्षीयांचीच तरफदारी करून अरेरावी जुलमी पद्धतीचा निषेध केला असल्यानें केसरीला लोकशाहीचा अवतार पाहिजेच होता हें स्पष्ट दिसतें. परंतु जुन्या कल्पनांचा अस्त व नव्यांचा उदय अशा संधि-कालांतच केसरीची कामगिरी असल्यानें प्राचीन राजवटीविषयींचा आदर मधून-मधून दृष्टोत्पत्तीस येतो. उदाहरणार्थ, ' व्हावयाचें असेल तें होऊन जाईलच... ' तथापि थोड्याच काळांत, चिनांतील स्वराज्य नष्ट होऊन पूर्वेकडील सर्वांत जुन्या ' व सर्वांत मोठ्या बादशाहीचा अंत होणार हा विचार क्षणभर तरी अंतःकरणास ' पीळ पाडल्यावांचून राहात नाहीं,' (२६-६-००), असें ' चिनांतील कृष्णकार-' स्थाना'विषयीं केसरीनें लिहिलें. त्यानंतर सुमारें दहा वर्षांनीं तेथीलच लोकशाहीच्या प्रारंभीं केसरी म्हणतो :—' पार्लमेंटरी राजसंस्थेची ही लाट तुर्कस्थान व इराण ' या पश्चिम देशांतून जशी हिंदुस्थानच्या पश्चिम सरहद्दीस येऊन भिडली, तशीच ' ती चीनच्या महत्त्वाकांक्षेमुळें हल्लीं हिंदुस्थानच्या पूर्व सरहद्दीस येऊन भिडली ' आहे. दोन बाजूंनीं येऊन भिडणाऱ्या या प्रगतिसमुद्रांच्या लाटा अखेर हिंदु-' स्थानावरून जाऊन एकजीव होणार किंवा हे पूर्वपश्चिम समुद्र निरंतर अलग ' ठेवून हिंदुस्थान स्वतः कोरडा ठणठणीत पाषाणमय असा मेरुपर्वत ठरणार हें ' भविष्य अद्यापि अगाध कालाच्या प्रचंड उदरकंदरांतील एक अदृश्य रत्न आहे. ' याहून जास्त कांहीं म्हणण्याची आज सोय नाहीं !' (११-१०-१०).

असे हे किंचित् निराशामय उद्गार काढल्यानंतर पुनः लगेच दोन वर्षांनीं चीन-संबंधींच लिहिण्याचे वेळीं केसरीचें म्हणणें बरेंच आशावादी दिसतें. ' अखेर चिनांत ' प्रजासत्ताक राज्य स्थापित झालें ! मँचू राजघराण्यानें सिंहासनावरून उतरून राजमुकुट ' जनतेच्या पायांवर घातला व प्रजेची इच्छा हीच ईश्वराची इच्छा असें म्हणून ' तिला शिरसावंदन केलें. युरोपियन इतिहासांत क्वचितच दाखला सांपडेल अशा संथ ' रीतीनें ही चिरस्मरणीय राज्यक्रांति घडून आली ! पौर्वात्य राष्ट्रांना प्रजासत्ताक ' पद्धति माहीत नाहीं व आवडत नाहीं या स्वार्थसाधु युरोपियनांच्या मंत्रावर मात्र

' खासा हरताळ फांसला गेला ! राज्यक्रांतीचा प्रजापक्षीय अध्वर्यु सुन्यत्सेन व ' राजपक्षीय पण देशभक्तिपूर्ण मुत्सद्दी युआन-शिकाई यांचीं नांवें आशिया ' खंडाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखीं आहेत यांत शंका नाहीं.' ( २७-२-१२ ). असो. या एकाच राष्ट्रासंबंधीं लिहितांना निरानिराळ्या वेळीं केसरीनें प्रकट केलेल्या विचारांवरून काय अनुमान निघेल तें ज्याचें त्यानेंच ठरवावें.

८. **बोल्शेव्हिझम् :**—हा सर्वांत शेवटीं घेतलेला प्रश्न कित्येकांच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचा ठरेल. आज ज्याच्या त्याच्या तोंडीं तो विषय झालेला आहे. आणि मुख्यत्वेंकरून ब्रिटिश साम्राज्याचा विध्वंसक म्हणून जगांत अवतरलेल्यांशीं तें नवीन तत्त्व निगडित असल्यानें त्याला प्राधान्य मिळणें स्वाभाविक होय. विश्वकुटुंबवाद, समाजसत्तावाद किंवा केसरीनें उपयोजिलेल्या शब्दांत बोलावयाचें तर ' समुदाय-स्वामित्व, ' ( १७-८-२० ), याच प्रश्नाविषयीं आतां केसरीचें धोरण पाहिलें पाहिजे. केसरींत यासंबंधीं १९२७ सालीं ' बोल्शेव्हिकांचे राज्यक्रांतीचे मार्ग ' म्हणून एका फ्रेंच नियतकालिकाचे आधारें लिहिलेले तीन लेख आले. ते संपादकीय लिखाणापैकीं नव्हते म्हणून तत्संबंधीं विशेष चर्चा करण्याचें कारण नाहीं. परंतु १९२८ मध्यें ' रशियांतील बोल्शेव्हिक राज्य ' या नांवानें सहा लेखांक प्रसिद्ध झाले, ते संपादकीय असल्यानें त्यांवरून केसरीचें या महत्त्वाच्या प्रचलित प्रश्नासंबंधींचें मत त्यांत प्रतिबिंबित झालें आहे असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं.

' लेनिनचा नैतिक विजय, ' ( १७-८-२० ), झाला, तेव्हां केसरीनें प्रतिपादिलेलीं मतें आणि नंतर सातआठ वर्षांनीं प्रसिद्ध झालेले हे लेख हीं दोन्ही भिन्न भिन्न स्थानांपासून निघालीं आहेत हें स्पष्ट दिसतें. ' लेनिनची भिस्त स्वतःच्या 'शहाणपणावर . . .किंवा रशियाच्या सामर्थ्यावर नव्हती; फक्त एका नव्या कल्पनेच्या जोरावर होती,' ( कित्ता ), असें सांगून केसरीनें त्याच अग्रलेखांत त्या कल्पनेची फोड अशी केली :—'. . .देशांतील हरएक प्रकारची संपत्ति व शक्ति हीं सर्व समा-' जाचीं मिळून समजावयाचीं, व्यक्तीनें सवता सुभा स्थापावयाचा नाहीं व स्वार्थी ' बनावयाचें नाहीं आणि व्यक्तिस्वार्थ गेला म्हणजे त्याच्या पाठोपाठ दुसऱ्यावर ' वर्चस्व ठेवण्याची बुद्धि, तें वर्चस्व ठेवण्याकरितां लागणारीं सैन्यें, तीं सैन्यें पोसायला ' लागणारा पैसा, तो पैसा मिळविण्याला करावा लागणारा जुलूम व अन्याय, ते जुलूम ' व अन्याय पचवायला लागणारें मित्रसाहाय्य, तें मित्रसाहाय्य मिळवायला लागणारे ' गुप्त तह व कराखदार, ते गुप्त तह करावयाला लागणारा स्वजनताद्रोह—तात्पर्य ' राजकारणांतले अर्धे अधिक दोष व्यक्तिस्वार्थाबरोबर निघून जातात. . . .ही कल्पना ' अगदीं नवीन असून रशियन जनता तिचा प्रयोग करून पाहण्याला. . .उत्सुक झाली ' होती. हेंच लेनिनचें खरें सामर्थ्य. ' ( कित्ता ).

इतक्या उदार वृत्तीनें पहाणाऱ्या केसरीची दृष्टि पुढें बदललेली दिसते. ' बोल्शेव्हिक शिकवितात हा वेदान्त जगास नवा नाहीं. तो सांगतां सांगतां

' साधुसंतांनीं दांताच्या कण्या केल्या. तथापि जग आपल्या क्रमापासून यत्-
' किंचितहि ढळलें नाहीं......बहुजनसमाज नित्याच्या चाकोरीपासून मुळींच
' ढळणार नाहीं......लेनिन, ट्रॉट्स्कीप्रभृति पुढाऱ्यांची गणना आज साधुसंतांत
' झाली तशीच पुढेंहि होईल, ' ( ३-७-२८ ), इत्यादि विचार पाहून केसरीचें याविषयीं धोरण कांहींच निश्चित झालें असेल असें दिसत नाहीं. मात्र इंग्रजांचे वैरी ते इंग्रजांच्या शत्रूंचे मित्र, हा समानशत्रुत्वामुळें घडून येणारा संबंध लक्षांत घेतां साम्राज्यविध्वंसक बोल्शेव्हिझमच्या विरुद्ध केसरी जाईल हें शक्य वाटत नाहीं. शिवाय रशिया आशियांतील म्हणून केसरीस त्याबद्दल अभिमान वाटणें साहजिकच आहे.

**९. सर्वसाधारण धोरण :**—लोकशाहीच्या ' रशियन ' स्वरूपाची केसरीस विशेष आवड नसली तरी, केसरीनें अशा निर्भेळ लोकसत्तेस विरोध केला नाहीं आणि मागें दर्शविल्याप्रमाणें राजशाही किंवा लोकशाही या वादांतील निश्चित निर्णय केसरीनें तडकाफडकीं दिला नसल्यानें केसरीस बोल्शेव्हिकांचीं सर्वच मतें सर्वस्वीं पसंत पडतील असें नाहीं. लोकशाहीचा प्रसार व्हावा असें जरी केसरीस वाटत असलें आणि तो झाल्याबद्दल केसरीनें वेळोवेळीं समाधान व्यक्त केलें आहे, तरीहि सिंहासनाधिष्ठित राजाविषयींचा केसरीचा आदर समूळ कधींहि नष्ट झालेला दिसत नाहीं. या विधानास पुष्टिदायक असें नेमकें लिखाण सांपडत नसलें तरी दुसऱ्या एका दृष्टीनं विचार केल्यास केसरीचें मत असें असलें पाहिजे असें दिसतें. देशी संस्थानिकांचा अंमल अरेरावी आणि कित्येक वेळीं परम अन्यायीसुद्धां झालेला ठाऊक असतां केसरीनें कोणाहि राजा-महाराजांवर अशा वर्तनाबद्दल लेखणी उगारली नाहीं. उलट पक्षीं हिंदुस्थान सरकारनें जेव्हां जेव्हां संस्थानिकांस गोत्यांत आणण्याचा प्रयत्न केला, तेव्हां तेव्हां केसरी त्यांचे मदतीस (अनाहूतपणेंहि) धावून गेला असल्याचें दिसून येतें. याचें कारण मात्र असें नव्हे कीं, संस्थानिकांचें कृत्य केसरीस सर्वस्वीं मान्य होतें. सरकारचें व संस्थानिकांचें तात्पुरतें तरी वैर आलें आणि तेवढ्यापुरतें कां होईना, पण संस्थानिक हे केसरीस जवळचे. मग स्वदेशबांधव वगैरे दृष्टीच्या विचारानें तर अशा तरफदारीस अधिक महत्त्व येतें. तिबेटी मोहिमेचे वेळीं नेपाळ सरकारनें ' इंग्रज सरकारच्या भिडेखातर ' अथवा ' दिल्ला-
' दरबारच्या वैभवास भुलून ' तिबेटशीं ' बेइमानपणाचें किंवा अप्रामाणिक रीतीनें
' घरसोडीचें वर्तन,' ( २४-११-०३ ), केलें, तेव्हां नेपाळची निर्भर्त्सना करून केसरीनें लिहिलें, '...तिबेट इंग्रज सरकारच्या हातीं गेलें म्हणजे ही तांबडी दोरी नेपाळच्या
' भोंवतीं सर्व म्हणजे चारी बाजूंनीं कशी चांगली बसेल याचा नेपाळ सरकारनें
' अद्याप नीट विचार केला नाहीं असें दिसतें.' ( कित्ता ).

अशाच आणखी एका प्रसंगाचें वर्णन केसरीच्या शब्दांत करून विषय आटोपता घेतला पाहिजे. अफगाण अमीर अबदुर रहमान यानें ' रावळपिंडीचे दरबारांत

'लॉर्ड डफरिनसारख्यांनाहि चकविल्या'ची हकीकत देतांना केसरी म्हणतो, '...दरबारचे वेळीं अबदुल (र) रहिमान यांनीं इंग्रजांच्या शस्त्रास्त्रांची तारीफ 'केली, यंत्रकलेची थोरवी गाइली...इंग्रजांचीं शस्त्रास्त्रें मिळाल्यास आपणांस 'पाहिजेत...पैसे दिले तर आपण घेऊं,......**पण इंग्रजी शस्त्रास्त्रांबरोबर इंग्रजी 'लष्करी अंमलदार आपले राज्यांत नको, खंडणीच्या इंग्रजी पैशाबरोबर इंग्रजी 'पांढरा वकील आपले राज्यांत नको**......असें अमीर अबदुल रहिमान यांनीं रावळपिंडीचे दरबारांत इंग्रजांना निक्षून सांगितलें.' ( ८-१-०७ ).

आंतरराष्ट्रीय दृष्ट्या महत्त्वाचे जे प्रमुख प्रश्न होते त्यांवर केसरीचें मत पाहून झाल्यानंतर केसरीनें इतर घडामोडींकडे कसें लक्ष दिलें याचा थोडक्यांत विचार केला पाहिजे. 'आयर्लंड, इजिप्त व हिंदुस्थान,' ( २५-५-२० ), 'हीं तीन्ही 'एकाच दावणींत' असलेलीं राष्ट्रें 'राष्ट्रीय स्वातंत्र्यच मागत' असल्यानें केसरी त्यांच्या चळवळींकडे सहानुभूतीनें पहात असला तर नवल नाहीं. 'ब्युरॉक्रसी येथून तेथून सारखीच,' ( ३०-७-१८ ), असल्यानें 'तींच तत्त्वें दोन्हींकडे', (२३-४-१८), लागू पडतात आणि म्हणून आयरिश स्वराज्याच्या मार्गांत 'नकटीच्या लग्नाला 'सतराशें साठ विघ्नें,' ( १४-५-१८ ), येतात तशीं आलीं; सिनफेनर्सचा पक्ष बळावून त्यांचे पुढें मग 'इंग्लंड जेरीस आलें,' ( १२-७-२१ ), आणि 'आयर्लंडच्या नशिबाचा खेळ,' (२३-८-२१), सुरू झाला. परंतु 'आयर्लंडनें तडजोड नाकारली,' ( ३०-८-२१ ), तेव्हां 'आयरिश वादाचें मूळ हेंच,' ( १२-१२-२२ ), असें ठासून सांगतांना केसरी म्हणतो :—'फ्री स्टेटच्या पार्लमेंटांतील सभासदांनीं 'साम्राज्यनिष्ठेची शपथ घेतली पाहिजे व आयर्लंडावर ब्रिटिशांचा गव्हर्नर जनरल 'यापुढेंहि अंमल गाजवीत राहिला पाहिजे याच अटींनीं डी व्हॅलेराच्या डोक्याला 'तिडीक चढत आहे.'( १२-१२-२२ ).

आयरिश चळवळीप्रमाणेंच इजिप्तमधील लढ्याकडे केसरी किती उत्सुकतेनें पहात आहे हें कळण्यास एकच उतारा पुरे आहे.

'१८८२ सालापासून जो चळवळ आजपावेतों सुरू होती ती शेवटीं सफल 'झाली याबद्दल इजिप्तचा जयजयकारच केला पाहिजे. ब्रिटिश लोक एकदां जे 'इजिप्तांत सैन्यासह ठाणें देऊन बसले ते हा काळपावेतों इजिप्शियन लोकांच्या 'तोंडून 'सुप्रतिष्ठितमस्तु' हा मंत्र म्हणवीत मजेंत बसले होते. युरोपांतील युद्धाला 'सुरुवात होईपर्यंत ब्रिटिश सत्तेचा स्क्रू एकेक दोऱ्यागणिक इजिप्शियनांच्या मानेंत 'पिळण्याचा ब्रिटिश अंमलदारांचा उद्योग आतांपर्यंत एकसारखा चालू होता. '१९१४ सालीं युद्धाच्या सुरुवातीनंतर 'प्रोटेक्टरेट'च्या अमदानींत हा स्क्रू इतका ''जाम' बसविला कीं, त्यामुळें इजिप्शियन राष्ट्राची एकदां खालीं वांकविलेली मान 'जागच्या जागीं खिळून राहील असाच निदान हिंदुस्थानांत तरी समज होता. 'असो. १८८२ सालीं गेलेलें स्वातंत्र्य अवघ्या ३८ वर्षांच्या अवधींत ब्रिटिश

' नोकरशाहीसारख्या अनियंत्रित सत्ता गाजविण्यास चटावलेल्या लोकांच्या हातून
' दृढ निश्चयानें, सतत उद्योगानें व एकमतानें बहिष्कार व असहकारिता या जालीम
' परंतु अमोघ अशा उपायांचा अवलंब करून हिरावून घेतलें, याबद्दल इजिप्शियन
' राष्ट्राचें इतिहास कौतुकच करील यांत शंका नाहीं. ब्रिटिश सिंहाच्या पंजाखालीं
' दडपलेलीं आयर्लंड, हिंदुस्थान व इजिप्त हीं तीन राष्ट्रं स्वातंत्र्य अथवा साम्राज्यांतर्गत
' स्वराज्यप्राप्तीचा उद्योग आपापल्या परीनें करीत आहेत. आयर्लंडचा निकाल अद्याप
' लागावयाचा आहे; हिंदुस्थानचें गवाळें कांहीं थोड्या हक्कांखेरीज आणखी दहा
' वर्षेपावेतों खुंटीला अटकावून दिलें आहे. इजिप्तनें मात्र या कामांत आघाडी मारली,
' हें हिंदुस्थानसारख्या देशांनीं लक्षांत ठेवण्याजोगें आहे.' (३१-८-२०). असो.

१०. **अफगाणिस्थान व वायव्य सरहद्द :**—' हिंदुस्थानची वायव्य सरहद्द
' व अफगाणिस्थान ही आशियारूपी शरिरांतील फार नाजूक जागा असल्यामुळें
' तेथें केलेली लहानशी ढवळाढवळहि कदाचित् दुष्परिणामी होण्याचा संभव
' आहे; आणि हा दुष्परिणाम हिंदुस्थानांतील शिपाई, रयत व हिंदुस्थान
' सरकारची तिजोरी यांसच भोवावयाचा असल्यामुळें कोणासहि याबद्दल काळजी
' वाटणें साहजिक आहे. ' ( २१-६-०४ ).

सरहद्दीवर भांडणें हीं नेहमीं होतातच आणि तेथेंच राष्ट्रांच्या संरक्षणाप्रीत्यर्थ जय्यत तयारी व कडेकोट बंदोबस्त ठेवावा लागतो. हिंदुस्थानची वायव्य सीमा-रक्षण करण्याचें काम विशेष बिकट होतें. त्याचीं कारणें अनेक आहेत. हिंदी हद्द संपल्यानंतर मध्यंतरींचा सीमान्तभूमीचा ( No Man's Land ) पट्टा सोडून लगेच अफगाण सरहद्दीस प्रारंभ होत नाहीं; दोन्ही राष्ट्रांमध्यें स्वतंत्र, सशस्त्र, रानटी व क्रूर टोळ्यांची वस्ती आहे, हें पहिलें. ब्रिटिशविरोधी चळवळीस हिंदुस्थानांत बळकटी आणण्याची खटपट अफगाण प्रदेशापलीकडे टपलेला रशिया करील हें दुसरें कारण. आणि तिसरें असें कीं, हिंदी प्रजेस सदैव असंतुष्ट ठेविल्यानें तिजकडून परचक्राचे वेळीं ब्रिटिशांस मनापासून मदत होईल कीं नाहीं याविषयीं हिंदुस्थान सरकारास साशंकता वाटते. केसरीनें हें अनेक वेळां स्पष्टपणें सरकारास कळविलें आणि सरहद्द-संरक्षणार्थ कोट्यावधि रुपयांचा जो विनाकारण चुराडा होतो तो थांबविण्याचे उपायहि सुचविले. ' रशियन अस्वलाशीं झुंज करण्याचा प्रसंग
' केव्हां येईल याचा नेम नाहीं, हें ओळखून व त्या वेळीं अफगाणिस्थान आपल्या
' बगलेंत मारलेलें असावें हें ध्यानीं आणून गेलीं ७५ वर्षे अफगाणिस्थानच्या
' गादीवर आपला दोस्त बसविण्याची खबरदारी हिंदुस्थान सरकारनें एकसारखी
' घेतली आहे. ' ( १३-५-१९ ).

हिंदुस्थानच्या खर्चानें पण हिंदी प्रजेच्या संमतीशिवाय सालदरसाल क्रोडो रुपये सरहद्दीवर या नाहीं त्या नांवाखालीं ओतले जातात, म्हणून सरहद्दीविषयीं व पलीकडच्या अफगाण राष्ट्राविषयीं हिंदी सरकार कोणतें धोरण बाळगतें हें केसरी-

सारख्या जबाबदार पत्रास डोळ्यांत तेल घालून पहावें लागलें आणि प्रसंगानुसार सरकारला उद्देशून कडक टीकाहि करावी लागली. सरहद्दीवर वारंवार चकमकी उडत; ब्रिटिश इभ्रत व दरारा कायम रहावा म्हणून रानटी टोळ्यांवर मोहिमा धाडल्या जात; त्यांचा जबरदस्त खर्च हिंदी तिजोरीवर पडे आणि तूट येऊन नवें कर्ज अथवा नवे कर आधींच मेटाकुटीस आलेल्या गरीब प्रजाजनांच्या बोकांडीं बसत. म्हणून केसरी वैतागून म्हणतो :—' प्रजेला संतुष्ट व राजीखुषी ठेवल्यानें ' लष्करावरहि एवढा खर्च करण्याचें कारण उरणार नाहीं. सरहद्दीवर लढायांत ' आजपर्यंत जितके रुपये खर्च झाले आहेत, तितके जर प्रजाजनांच्या ' स्वास्थ्यावर खर्च झाले असते तर अफगाणिस्थानचा सरकारास आज ' जितका बाऊ वाटत आहे तितका वाटला नसता. ' ( ९-६-०८ ). कारण ' १८७७ पासून १८९५ पर्यंत सरहद्दीवर सुमारें वीस स्वाऱ्या, ' (२६-३-९५ ), हिंदुस्थान सरकारनें केल्या; आणि त्यांनिमित्त हिंदी तिजोरीवर जबरदस्त बोजा पडला.

ह्या मोहिमा तरी सकारण असतील असें म्हणावें तर तसेंहि कांहीं कारण आढळत नाहीं. ' चित्रळची मोहीम ' म्हणून १८९५ मध्यें सरहद्दीवरील युद्ध लोकविख्यात झालेलें होतें. तत्संबंधीं केसरीनें लिहिलें, ' एका संस्थानिकानें दुसऱ्या ' संस्थानिकाचा किल्ला काबीज केला, म्हणून तिसऱ्यानें आपलें १४ हजार सैन्य ' पाठवून लढाई सुरू करणें हा सुविचार नव्हे. एका संस्थानिकाचा पाडावा ' करण्यास व एक रस्ता बांधण्यास १४ हजार सैन्याची योजना व्हावी हें आमचें ' दुर्भाग्य होय व राज्यकर्ते राज्य चालविण्यांत असावेत तितके तरबेज नाहींत ' असें म्हणावें लागतें, ' ( कित्ता ), असेंहि सुस्पष्ट शब्दांत सांगण्यास केसरी कचरला नाहीं. समर्थनीय अशा ज्या थोड्या मोहिम झाल्या, तिचें हे असें वर्णन ! मग इतरांच्या बाबतींत काल्पनिक खुसपटामुळेंच सरहद्दीवर हिंदी सरकारनें लढाया केल्या असतील हें उघड दिसतें. असें करण्यांत सरकारचा हेतु काय असावा ह्याविषयीं केसरी म्हणतो, ' सरहद्दीवरील पठाणांचे मुलखास व ' स्वातंत्र्यास हातहि लावावयाचा नाहीं, असें दहा वर्षांपूर्वी इंग्रजी मुत्सद्यांनीं ' ठरविलें आहे व ह्या धोरणास गेल्या दहा वर्षांतील दोन तीन स्टेट सेक्रेटरी- ' साहेबांनीं आपली पूर्ण संमति दिली आहे. इतकेंच नव्हे तर सभोंवारच्या परि- ' स्थितीच्या दृष्टीनेंहि सदर धोरण सोडून देणें सांप्रत फार धोक्याचें आहे, असें ' त्यांना वाटत आहे. ' ( ३-३-०८ ).

केवळ हिंदी प्रजेच्या दृष्टीनेंच अफगाणिस्थान अथवा सरहद्दीवरील रानटी वसाहती यांकडे केसरी पहात होता असें नव्हे. स्वयंनिर्णयाचें तत्त्व प्रे. विल्सन यांनीं युरोपियन महायुद्धोत्तर कालांत जरी काढलें तरी तत्पूर्वी सुमारें वीस वर्षे केसरीनें त्याची परिस्फुटता केलेली आढळते. अफगाण अमीर अब्दुर रहमाननें इ. स. १८९५मध्यें काफिरिस्तान नामक रानटी भागावर हल्ला करून तो

आपल्या राज्यास जोडला; तेव्हांचे केसरीचे उद्गार वाचून कोणासहि त्याच्या उदार मताची कल्पना येईल. ' ... हिंदुस्थान देशाजवळच असलेल्या एका रानटी पण ' गरीब राष्ट्राला जिवापेक्षां प्यार असलेल्या स्वातंत्र्याचा भंग झाल्याबद्दल रडत ' बसण्याची पाळी आली आहे, हें पाहून आमच्याहि डोळ्यांतून दोन टिपं पडणारच.' (१२-५-९६). अशी सहानुभूति दर्शविण्याचा कोणताहि प्रसंग केसरीनें वायां जाऊं दिला नसला, तरी कित्येक समजतात त्याप्रमाणें केसरीला शेजारच्या अफगाणांनीं किंवा सरहद्दीवरील पठाणांनीं हिंदुस्थानवर हुकमत चालवावी हें मुळींच पसंत नाहीं. अमानुल्लानें पंजाबवर स्वारी केली तेव्हां केसरीनें आपलें मत स्पष्टपणें प्रकट केलें. ' ज्या हिंदुस्थानच्या बुद्धीला जर्मनीची सत्ता पटली नाहीं, ती हिंदुस्थानची बुद्धी ' अफगाणांची सत्ता पत्करील हें बिलकुल संभवनीय नाहीं. ' ( १३-५-१९ ).

हिंदुस्थान अफगाण अंमलाखालीं नांदण्यास तयार नाहीं हे सांगून अमिराची आक्रमणशीलता कोठपर्यंत येणार आहे, याचेंहि दिग्दर्शन केसरीनें समर्पक दृष्टांत देऊन केलें. आणि आश्चर्य हें कीं, हिंदी प्रजाजनांची अफगाणिस्थान आपल्या ताब्यांत असावें, अशी इच्छा नसल्याचेंहि केसरीनें स्पष्ट बजाविलं. मात्र मागील इतिहास व सरहद्दीवर ओतलेला हिंदी पैसा यांचा विचार करून ' ...अफगाणिस्थानदेखील हिंदुस्थानांत ' समाविष्ट करण्याची आकांक्षा आम्ही बाळगण्यांत वावगें तें काय आहे ? ' ( १५-२-३० ), अशा प्रश्नार्थक वाक्यांत किंचित् बदललेलें मत सूचित केलें आहे. केसरीच्या ह्या सर्व धोरणाचें विवेचन केसरीच्याच शब्दांत असें करितां येईल :—

' पुण्यामुंबईच्या दरम्यान जाणाऱ्या एक्स्प्रेस गाडींत अगदीं पुढच्या डब्या- ' पासून मागच्या डब्यापर्यंत चालत जाण्याला जसा एखादा निरुंद पण सरळ ' खुला मार्ग असतो, तशा प्रकारचा सरळ मार्ग अफगाण वायव्य भागांतून निघून ' सिंधमधून कराचीपर्यंत आपणांस मिळावा अशी अफगाणिस्थानच्या राजाची ' व जनतेची आकांक्षा निरंतरची आहे. ' ( ३०-४-२९ ). असें असूनहि केसरी म्हणतो, ' अफगाण लोकांनीं आपल्या देशांत स्वराज्य भोगावें अशी ' आमची इच्छा आहे.' (कित्ता). मात्र अफगाण राज्यासनाधिष्ठित व्यक्ति कोण असावी याविषयीं वाद न घालतां तिच्या अंगीं कोणते गुण असणें इष्ट आहे, याचें दिग्दर्शन करितांना केसरीनें लिहिलें, ' अफगाणिस्थानच्या राज्यपदावर अमानुल्ला ' परत अधिष्ठित होवो किंवा गाझी हबीबुल्ला तेथें स्थिर होवो अथवा तिसरा ' कोणी गोमाजी तें राज्य परत काबीज करो, या बाबतींत व्यक्तीला आम्ही मुळींच ' महत्त्व देत नाहीं....अफगाणिस्थानवर राज्य करणारी व्यक्ति दुबळी व दुसऱ्या ' कोणाच्या हातचें बाहुलें होऊन राहणारी नसावी यांतच हिंदुस्थानचें हित आहे.' ( २९-१-२९ ). हिंदुस्थानचें हित व इंग्रजांचा हेतु भिन्न भिन्न आहेत हें पटवून देण्याची वेळ आली, तेव्हां केसरीनें दोन्हींमधील भेद दाखवितांना म्हटलें, ' अफगाणिस्थानामध्यें इंग्रजांना एकसंघटित राज्य व एकछत्री राजा नको आहे.

' एका अफगाणिस्थानाचे अनेक विभाग झाले व त्यांच्यावर अनेकांची राजकीय ' सत्ता बसली तर ती इंग्रजांना हवी आहे. ' ( ३०-४-२९ ). असें करण्यांत इंग्रजांचा काय डाव असावा हें केसरीनें ओळखलें नव्हतें असें नाहीं. ' गेलीं २० ' वर्षे... हिंदुस्थान सरकारनें अफगाणिस्थानशीं आपलें वर्तन ठेवलें तें असें कीं, ' अफगाणिस्थानच्या राजास द्रव्याची किंवा हत्यारांची मदत करुन त्यास आपल्या ' प्रान्तांत आपलें स्वामित्व पूर्णपणें स्थापण्यास साहाय्य करावयाचें. इतकेंच नव्हे तर ' प्रसंगविशेषीं परचक्र आलें असतां त्या परचक्रापासून देखील त्यास इंग्रजांचें विशेष ' साहाय्य न घेतां आपल्या राज्याचें संरक्षण करितां यावें. ' ( १५-१०-०१ ). याचा अर्थ असाहि होईल कीं, रशियन सरहद्दीशीं आपली हद्द भिडूं नये म्हणून ब्रिटिशांची सर्व खटपट होती. परंतु हा लपंडाव उपयोगी पडणार नाहीं हें दर्शवितांना केसरीनें लिहिलें, ' अमिराचा मुलूख जिंकल्यानें रशियाच्या हद्दीशीं हिंदुस्थानची सरहद्द भिडून ' जाईल.... व रुसची भीति हिंदुस्थानला रोज बाळगावी लागेल. पर्वत महंमदाकडे ' न जातां महंमद पर्वताकडे गेला तरी अखेर कार्य एकच होतें.... रशियानें आपली ' सरहद्द हिंदुस्थानापर्यंत रेटीत आणली काय किंवा हिंदुस्थानची सरहद्द रशियाचे ' मुलखाला भिडली काय, दोन्ही प्रकारांचें अखेर कार्य एकच झाल्यावांचून राहणार ' नाहीं. मोठासा मांसाचा तुकडा आपल्या पंजांत धरुन इतर गिधाडांची नजर ' चुकवून एका बाजूला जंगलांत बसून सावकाशपणानें आपल्या भक्ष्याचा आस्वाद ' घेणारें गिधाड ज्याप्रमाणें इतर गिधाडांची संगति स्वाभाविकपणें टाळीत असतें, ' त्याप्रमाणें हिंदुस्थानला दुसऱ्या कोणत्याहि बलाढ्य सत्तेचा दुरुनहि स्पर्श होऊं नये, ' असें इंग्रज सरकारचें लष्करी धोरण आहे. बलाढ्य सत्तेच्या दृष्टीची बाधा साबजाला ' होऊं नये म्हणून समुद्राच्या व हिमालयाच्या बांधांप्रमाणेंच उग्र रानटीपणाचा ' बांध हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीच्या सभोंवतीं कायमचा असावा, अशी इंग्रजांची ' राजनीति आहे,' ( १९-५-०८ ), किंवा दुसऱ्या शब्दांत हेच विचार सांगतांना केसरीनें म्हटलें कीं, ' बायकोला कोंडून ठेवणाऱ्या संशयी नवऱ्याप्रमाणें हिंदुस्थान ' इतर जगापासून अलग ठेवण्याची निष्कारण फाजील सावधगिरीची प्रवृत्ति... ' इंग्रज राज्यकर्त्यांची आहे. ' ( कित्ता ).

पण हिंदुस्थान सांभाळण्यांत राज्यकर्त्यांची भ्याड वृत्ति कशामुळें उद्भवते याचेंहि स्पष्ट कारण केसरीनें सांगितलें तें असें:—' हिंदुस्थानांतील प्रजेस असंतुष्ट ठेवण्याचा ' हेका एकसारखा चालू ठेवणारे, हिंदुस्थानची सरहद्द रुसी सरहद्दीला नेऊन भिड- ' विण्याची छाती कोठून करणार ? ' ( कित्ता ).

परंतु अशामुळें हिंदुस्थान सरकारवर अपमान निमूटपणें सहन करण्याची पाळी कशी येते तें तिसऱ्या अफगाण युद्धानंतर अमानुल्लाशीं जो तह झाला त्यावर टीका करितांना केसरीनें दाखविलें. ' अफगाणिस्थाननें हिंदुस्थानावर विनाकारण स्वारी ' केली असतां आणि सहा आठवड्यांच्या मोहिमेंत हिंदुस्थानचे २१ कोटि रुपये

' खर्ची पडून अफगाणिस्थानचा पराभव झाला असतां, अफगाणिस्थानला त्याचें
' कांहींच प्रायश्चित्त मिळूं नये आणि उलट स्वतंत्र राष्ट्रमालिकेंतला त्याचा दर्जा वाढावा
' हें अत्यंत विसंगत नव्हे काय ?' ( २९-११-२१). त्याच लेखांत केसरीनें ह्याचें
कारण पुनः स्पष्टपणें सांगितलें, 'परंतु हिंदुस्थान सरकारनें आपल्या प्रजेची सहानुभूति
' गमाविल्यानें त्यास असले अपमान निमुटपणें सहन करावे लागत आहेत.' असो.

**११. केसरीच्या कार्याचें महत्त्व** :—केसरीनें गेल्या पन्नास वर्षांच्या अमदानींत परराष्ट्रांतील घडामोडींविषयीं प्रकट केलेल्या मतांवरून केसरीचें धोरण अजमावण्याचा हा प्रयत्न सर्वांगपूर्ण असा झाला नसला—व तो होणें शक्य नसलें—तरी साधारणपणें कल्पना येण्यास तो पुरेसा आहे. परराष्ट्रांकडे पहाण्याची इच्छाच मुळीं आम्हांस प्रथमपासून नसतां, त्यांतील उलाढालींत लक्ष घालण्याची चटक लावून तेथील परिस्थितीचें यथार्थ ज्ञान करून देऊन, राष्ट्राराष्ट्रांतील कलहांचे धागेदोरे किती दूरवर पोहोंचले असतात हें केसरीनेंच महाराष्ट्रीय वाचकांच्या मनांत बिंबविलें. इतकेंच काय, परंतु शिरोभागीं उद्धृत केलेल्या उतार्‍यांत म्हटल्याप्रमाणें 'आशियांतील त्रिकोणाकृति प्रदेशाभोंवतीं' जगाचें बहुतेक राजकारण घुटमळत रहात असतां त्या प्रदेशांतील लोक मात्र बाह्य जगाविषयीं पराकाष्ठेचे बेफिकीर असावेत, ही स्थिति अत्यंत अनिष्ट समजून, आपल्या गर्जनेनें त्यांना केसरीनेंच जागृत केलें व 'जरा पलीकडे पहा' असें सांगितलें. आपण बाहेर काय पाहिलें आणि कशाचें अनुकरण केलें किंवा कोणत्या बाबी शिकलों हा प्रश्न अगदीं वेगळा मानला, तरी **सार्वराष्ट्रीय घडामोडींत लक्ष घालून स्वतंत्रपणें विचार करण्याची इच्छा व शक्ति महाराष्ट्रीयांत निर्माण झाली**, ही कांहीं लहानसहान कामगिरी नव्हे. केसरीला त्याबद्दल शतशः धन्यवाद दिले पाहिजेत.

या विषयावर केसरीचे महत्त्वाचे अग्रलेख 'स्वातंत्र्याकरितां बोअर लोकांचें इंग्रजांशीं युद्ध' ( ५-१२-९९ ), 'चिनांतील कृष्णकारस्थान' ( २६-६-०० ), 'अनावर राज्यविस्तार' ( २५-२-०२ ), 'आशिया खंडांतील कारस्थानें' ( २६-५-०३ ), 'साम्राज्याचीं बंधनें' ( ९ व १६-६-०३ ), 'आशिया व युरोप' ही ११ लेखांची माला ( ३०-६-०३ ते १५-९-०३ ), 'कलहांतून राष्ट्रसंघाची उत्पत्ति' ( ३०-८-०४ ), 'आशियाच्या डोक्यावर पाय दिला' ( ११-१०-०४ ), 'आयर्लंड व हिंदुस्थान' ही १४ लेखांची माला ( ९-२-०९ ते १५-६-०९), 'इजिप्तमधील राष्ट्रीय चळवळ' ( ७ लेखांक ) ( १-३-१० ते २४-५-१० ), 'मोरोक्को प्रकरण' ( १-८-११ ), 'युद्धाची गुणदोषमीमांसा' ले. ४, डिसें. १९१४, 'राष्ट्रसंघाची स्थापना' ( २५-२-१९), 'लेनिनचा नैतिक विजय,' ( १७-८-२० ), 'इजिप्तचा जयजयकार' (३१-८-२०), 'चिनी राष्ट्रीय पक्षाचा जयजयकार' ( १२-६-२० ), रशियांतील बोल्शेव्हिक राज्य' ही सहा लेखांची माला ( २०-३ ते ३-७-२८ ).

---

# क्रांतिकारकांचें कर्मकांड

[ श्री. नारायण तुकाराम ठाकूर, बी. ए. ]

' प्रजाजनांवरील जुलूम बंडखोरांना प्रसवत असतो. '

——केसरी, १२-१-१९०७

**१. सत्तावन सालची भीति :**—बेजबाबदार राज्यपद्धतीनें दडपलेल्या देशांना क्रांति आणि क्रांतिकारक यांची नव्यानें ओळख करून देण्याची जरूरी नाहीं. प्रत्येक देशाच्या इतिहासांत अशी एक आणीबाणीची व संक्रमणाची वेळ येते कीं, तीमुळें त्या देशांतील प्रजाजन प्रचलित राज्यपद्धतीविरुद्ध आणि समाजरचनेविरुद्ध बंड करण्यास सज्ज होतात, आणि तें बंड परिपक्व दशेंत यशस्वी झालें म्हणजे त्याला 'क्रांति' म्हणतात. अर्थात् हें बंड अत्याचारी असेल किंवा अनत्याचारीहि असूं शकेल. इंग्लंडमधील इ. स. १६८८ च्या राज्यक्रांतीप्रमाणें रक्ताचा एक बिंदूहि न सांडतां क्रांति होणें शक्य होईल, किंवा फ्रेंच राज्यक्रांतीप्रमाणें रक्ताचे पूर वाहून आणि यमसदनास लाजविणाऱ्या तुरुंगांच्या भिंती फोडूनहि होऊं शकेल; अथवा मजूर आणि शेतकरी वर्गांमध्यें ' सुशिक्षित चळवळ्यां 'नीं प्रसृत केलेल्या मतांमुळें अगदीं कामापुरत्या उपयोगांत आणलेल्या अत्याचारानें यशस्वी झालेलें रशियन राज्यक्रांतीचेंहि उदाहरण इतिहासांत सांपडूं शकेल.

अशा राज्यक्रांत्या कधीं कधीं अगदीं थोड्या काळांत आपाततः झालेल्या दिसल्या, आणि एका रात्रींत नकाशावरील रंगांमध्यें बदल आढळून आला, तरी हा ' ट्रॅन्स्फर सीन ' निर्माण करण्यामध्यें अंधारांत किती जणांचे हात खेळत असतात, आणि शेवटच्या लढ्याच्या वेळीं उपयोगांत आणलेल्या शस्त्रास्त्रांना परजण्याचें काम किती दिवस आणि कसें चाललेलें असतें हें इतिहासज्ञांस विदितच आहे. क्रांति-कारकांच्या या गुप्त हातांनीं जुलमी राजांना झोंप येऊं दिली नाहीं. आणि सर्व रोम शहराला आग लागली असतांना कवित्वाची स्फूर्ति होऊन आवाजी लागून गाणाऱ्या मदांध नीरोसारख्या कविराजांना याच गुप्त हातांनीं प्रजाजनांच्या नैसर्गिक हक्कांची जाणीव करून दिली.

हिंदुस्थान देश जात्याच दैवी संपत्तीनें विभूषित असल्यामुळें प्रायः शांतताप्रिय आहे. त्यामुळें पाश्चात्य देशांत समृद्ध येणारें क्रांतिकारकांच्या चळवळींचें पीक उत्तम येण्याला लागणारी सकस जमीन हिंदुस्थानची नाहीं. त्यांतूनहि निरनिराळे धर्म आणि पंथ यांची छाप लोकांच्या मनावर असल्यामुळें त्यांची एकी होणें फार अवघड जातें. असें असून सुद्धां इ. स. १८५७ पासून आजतागायत क्रांतिकारक

आपलें अस्तित्व सिद्ध करीत आहेत आणि कदाचित् करीत राहतीलहि. प्रस्तुत लेखामध्यें फक्त गेल्या पन्नास वर्षांत क्रांतिकारकांनीं केलेल्या चळवळींविषयीं वेळो-वेळीं केसरीनें नमूद केलेल्या मतांशीं कर्तव्य आहे. केसरीच्या मतांचें निरीक्षण करितांना गेल्या पन्नास वर्षांच्या क्रांतिकारकांच्या इतिहासाचें त्रोटक विवेचन प्रस्तुत लेखांत येणें हेंहि अपरिहार्य आहे.

हें विवेचन करितांना केसरीचा जन्मकाल आणि आजचा काल यांत किती तफावत पडली आहे आणि समाजामध्यें केवढी मोठी विचारक्रांति झाली आहे— आणि तिचेंहि बरेंचसें श्रेय केसरीलाच द्यावें लागेल— याचा विचार केला पाहिजे. ' वंदे मातरम् ' हा शब्द उच्चारण्याची चोरी, आणि बुधवार चौकांतून काचा घातलेलें धोतर नेसून जाणें म्हणजे पोलिसाच्या नजरेचा विषय होणें, अशी स्थिति होती, चष्म्यांचा उपयोग गुन्हा दडविण्याकरितां केला आहे असा पोलि-सांना संशय येई, त्या काळचा आपण विचार करीत आहों, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. त्या मानानें आज ' क्रांतीचा विजय असो, ' ' इन्किलाब झिंदाबाद ' म्हणून शाळेंत आरडाओरडा करणारीं मुलें जेव्हां दिसतात, तेव्हां काळानें आज खरोखरच किती आघाडी मारली आहे याची कल्पना येते.

सत्तावन सालच्या बंडामुळें सरकारला वाटूं लागलेली बंडाची भीति, वासुदेव बळवंत फडके याच्या पुंडाव्यामुळें वृद्धिंगत झाली. आणि ती आजहि कांहीं समूळ नाहींशी झाली नाहीं. इ. स. १८९४ सालचें ' बरेली प्रकरण ' म्हणजे कांहीं राज्यक्रांतीचा मोठा कट होता असें नाहीं. परंतु कावीळ झालेल्या सरकारच्या नजरेला तें कसें भासलें तें केसरीच्या पुढील टीकेवरून कळून येईल.

' आमच्या सरकारच्या मनांतून बंडाची भीति कधीं नाहींशी होणार कोण
' जाणे ! नानासाहेब पेशवे म्हणून किती असामी पकडले व सोडून दिले हें वाचकांस
' माहीत असेलच. आज या विषयाचें स्मरण होण्याचें कारण असें आहे कीं,
' उत्तर हिंदुस्थानांतील चंपारण्याच्या वायव्येस मार्चच्या १५ व्या तारखेस प्रत्येक
' बागेंतील आंब्याच्या वगैरे फळझाडांवर एक वर्तुळाकार मातीचा मोठा टिळा व
' त्याच्या मध्यभागीं एक केंस लावलेला दृष्टोत्पत्तीस पडला आणि दर बागेंत निदान
' एक एक झाडावर ही खूण पाहून ५७ सालच्या चपातीची आठवण झाली.
' कित्येक झाडांवर तांबडा टिळा असून मधला केंस डुकराचा किंवा गाईचा असावा
' अशीहि बातमी पसरली आहे. विलायतेंतील एका पत्रकारानें या खुणा भावी
' अनार्थांच्या सूचक आहेत, असा लेख लिहिला आहे. व बंडाचे इतिहासकार
' कर्नल मॅलिसन यांनीं सदर वर्तमानपत्रकारांचें मत खरें आहे, असा आपला
' अभिप्राय दिला आहे. ' ( १५-५-९४ ).

हिंदुस्थानांत कुठें खुट्ट झालें कीं, विलायतेंतील वर्तमानपत्रांची व मुत्सद्द्यांची ' सीदन्ति मम गात्राणि ' अशी स्थिति होत असे, याचें केसरीकार मोठें मनोरंजक

वर्णन करितात. ' विलायतेंत ही बातमी गेल्याबरोबर तेथें स्पेक्टेटर म्हणून एक पत्र ' आहे, त्यानें पहिल्यानें बोंब ठोकली कीं, हें बंडाचें चिन्ह दिसत आहे. ता. १० ' मे हा ५७ सालच्या बंडाचा ३७ वा वाढदिवस आहे. व या उन्हाळ्याचे ' दिवसांत इंग्रज लोक थकून जात असल्यामुळें हे दिवस बंड करण्यास उत्तम असा ' हिंदु लोकांचा समज आहे; व मे महिना संपण्यापूर्वीच कदाचित् आपल्या राज्यावर ' मोठा अनर्थ येऊन गुदरेल.........झाडांवरील टिळे ते काय, आणि त्यांबद्दल ' कोण हा ऊहापोह? यावरून हिंदु लोकांच्या यःकश्चितहि गुप्त कृत्यास साहेबलोक ' किती भितात व आपल्या राज्यांत सारे वाढविल्यामुळें आणि अन्य कारणांमुळें ' प्रजेंत जो असंतोष उत्पन्न झाला आहे तो आमच्या राज्यकर्त्यांना कसा खात ' असतो हें उघड दिसून येतें. आमच्या राज्यकर्त्यांच्या मनाची स्थिति विनाकारण ' अशी कलुषित व्हावी हें आम्हांस इष्ट वाटत नाहीं. करितां आम्ही त्यांस खात्री- ' पूर्वक असें कळवितों कीं, ' महाराज! बंड करण्याचे दिवस अद्याप आले नाहींत.' ' ( ५-६-९४ )

२. पुणें-प्रकरणाचा प्रारंभ :—वरील छोटेखानी मनोरंजक प्रकरणानंतर क्रांतिकारकांचें नांव किंचित् ऐकूं येईनासें होतें न होतें तोंच पुण्यांतील प्लेगप्रकरणास सुरुवात झाली. प्लेग आला आणि गेला, पण त्याचे परिणाम मात्र त्यानंतर कित्येक वर्षे पुण्यास भोगावे लागले. प्लेगप्रकरणांतूनच उत्पन्न झालेलें रँडप्रकरण व त्याचें चिघळून झालेलें ' पुणेंप्रकरण ' पुणेंकरांना पुरुन उरलें !

ता. २२-६-९७ रोजीं मध्यरात्रीं गणेशखिंड रस्त्यावर घडलेला प्रकार हृदयांत धडकी भरविण्यासारखा होता. गव्हर्नमेंट हाउस सोडून ५-६ शें पावलें पुढें आल्यावर तेथें कोणी इसमानें रँडसाहेबांच्या गाडीच्या पाठीमागें शिरून त्यांजवर छर्यांनीं भरलेलें पिस्तुल झाडलें. त्यामुळें ते तत्काळ बेशुद्ध झाले. आणखी एक वार झाला व मागच्या गाडींतील ले. आयर्स्ट यांचा जागच्या जागींच प्राण गेला.

खून झाला, तारा झाल्या, वर्तमानपत्रांत टीकाहि येऊं लागली. पुण्याच्या ब्राह्मणांवर मुंबईच्या टाइम्सचा अगोदरच डोळा ! पुण्यांतील ब्राह्मणांचाच हा कट म्हणून त्यानें ओरड केली. केसरीनें त्या टीकेला सडेतोड उत्तर दिलें. ' टाइम्स ' ऑफ इंडिया पत्रकर्त्यानें द्वेषबुद्धीनें या भयंकर कृत्यावर जी टीका केली आहे व ' काल येथील कलेक्टरसाहेबांनीं शहरच्या पुढाऱ्यांस बोलावून जें भाषण केलें ' त्यांत जे कांहीं विचार आले आहेत, त्यांमुळें दोन शब्द लिहिणें भाग आहे. ' न्यायाचा व कायद्याचा सामान्यतः असा नियम आहे कीं, असे भयंकर गुन्हे ' जेव्हां घडतात, तेव्हां कोर्टांत पुरी चौकशी होण्यापूर्वी त्याची कोणींहि चर्चा ' करून एखाद्यास दोष लावण्यास प्रवृत्त होणें अगदीं गैरशिस्त आहे. परंतु ' टाइम्ससारख्या पत्रकारांचीं डोकीं या गुन्ह्यानें अगदीं फिरून गेलीं असल्यामुळें ' त्यांस हा नियम कोठला सुचणार? त्यांनीं या भयंकर गुन्ह्याची वार्ता ऐकल्या-

' बरोबर एकदम असें अनुमान केलें कीं, हें सर्व पुण्याच्या लुच्च्या ब्राह्मणांचें कृष्ण-
' कारस्थान आहे. रँडसाहेबांसच मारावयाचें असतें तर दुसऱ्या ठिकाणीं दुसऱ्या
' दिवशीं मारतां आलें असतें. ज्युबिलीच्या दिवशीं खून करून तो सण फिका
' पाडावयाचा ही कल्पना ब्राह्मणांचीच आहे; व तीहि एकट्यादुकट्याची नव्हे तर
' पांचपन्नासांनीं जुटीनें ठरविलेली आहे असें टाइम्सपत्रकर्त्याचें म्हणणें आहे व
' त्याचाच बहुतेक अनुवाद कलेक्टरसाहेबांनीं काल आपल्या भाषणांत केला आहे.'
( २९-६-९७ ).

अशा अत्याचाराचा परिणाम सरकारी अत्याचाराकडे कसा होतो याचें केसरीनें मार्मिक विवेचन केलें व म्हटलें कीं, ' राज्य करणें म्हणजे सूड उगवणें नव्हे.... ' सरकारच्या मनःस्थितीचें वर्णन करितांना केसरी म्हणतो, ' एखादा मोठा हत्ती
' पिसाळला असतां ज्याप्रमाणें तो वाटेल तशी धुळधाण करीत सुटतो, तद्वत्
' आमच्या सरकाराची स्थिति झाली आहे; व खुन्यास जो खून चढावयाचा तो
' आमच्या सरकारास चढून सरकारची नजर अगदीं फिरून गेली आहे. '
( ६-७-९७ ).

रँडच्या खुनाचा खटला पुण्यांत बराच गाजला. केसरीनें वेळप्रसंगीं अग्रलेखांना रजा देऊन खटल्याची चटकदार माहिती संगतवार तऱ्हेनें केसरीच्या वाचकांना दिली. रँड व आयर्स्ट यांच्या खुनांसंबंधीं गुन्हेगार दाखवून देणाऱ्याला सरकारनें २०,००० रु. चें बक्षिस लाविलें. या प्रकरणांत दामोदर व बाळकृष्ण चाफेकर यांचें अंग आहे, ही बातमी बक्षिसाच्या लालचीनें द्रविडबंधूंनीं सरकारास कळविली. द्रविड हे चाफेकरांचे एका काळचे स्नेही. या मित्रद्रोहाचा परिणाम खुन्या मुरलीधराजवळ झालेल्या दोघांहि द्रविडबंधूंच्या खुनांत झाला. या एकंदर प्रकरणांत दामोदर, वासुदेव व बाळकृष्ण हे तिघे चाफेकरबंधू आणि त्यांचा जिवश्चकण्ठश्च स्नेही रानडे ह्या चौघांना फांशीच्या शिक्षा झाल्या.

चाफेकरादि गुन्हेगार आपापल्या कर्माकरितां फांशी गेले, परंतु अशा प्रसंगीं सुद्धां कुत्सितपणें टीका करण्यास टाइम्स आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें पुढें आलाच. केसरी याविषयीं सडेतोडपणानें लिहितो :—' चौघांहि आरोपींचा
' आजपर्यंतचा आयुष्यक्रम सामान्य गुन्हेगारांसारखा नाहीं, व आपल्या नवऱ्याचा
' जाणूनबुजून अत्यंत निंद्यपणानें खून करणाऱ्या जहांबाज मिसेस् लिस्टरबाईस
' तुरुंगांत असतांना पैशाची मदत व्हावी म्हणून आपल्या पत्राची शिष्टपणानें
' जागा अडविणाऱ्या मुंबईच्या टाइम्सनें, अत्यंत वाईट गुन्हेगारांमध्यें ह्या चौघांची
' गणना करावी असें त्यांच्या आयुष्यांत निदान विचारी पुरुषांस कांहीं दिसणार
' नाहीं...विलक्षण धैर्याच्या पुरुषाच्या अंगीं बुद्धिभ्रंश होण्याइतकी ( Diseased
' minds ) मेंदूची वक्रता उत्पन्न होऊं न देणें हें सरकारचें काम आहे. चाफेकरांच्या
' अंगीं असलेल्या तेजाचा सरकारनें जर उपयोग करून घेतला असता तर त्यांनीं

‘ मारलेल्या गोळीमुळें मि. रँड, ले. आयर्स्ट किंवा द्रविडबंधू हे मृत्युमुखीं न पडतां
‘ सरहद्दीवरील शत्रूंच्या कपाळाच्या करवंट्या उडाल्या असत्या. एखाद्या राष्ट्रांतील
‘ लोकांचा तेजोभंग करणें हें सरकारास हितावह आहे किंवा त्या तेजाचा आपल्या
‘ कामीं उपयोग करून घेणें अधिक श्रेयस्कर आहे, अशा प्रकारच्या राष्ट्रीय
‘ महत्त्वाचा प्रश्न वरील खटल्यापासून उत्पन्न होतो. ’ ( १४-३-९९ ).

पुणेंप्रकरणाची झळ टिळकांना लागून त्यांना दीड वर्षांची सजा झाली. तद्वत् सरदार नातूबंधूंना नजरकैदत सरकारी लहर संपेपर्यंत डांबून रहावें लागलें. पुढें इ. स. १८९९ च्या अखेरीस नातूबंधूंची सुटका झाली व त्याबरोबर ‘ पुणेंप्रकरणाची एक प्रकारें इतिश्रीच झाली. ’ ( २६-१२-९९ ).

**३. वंगभंगानें पेटलेला वणवा** :—यानंतरचीं पांचसहा वर्षे किंचित् शांततेचीं गेल्यावर कर्झनशाही हुकुमानें बंगाल इलाख्याचे दोन तुकडे पाडण्यांत आले, तेव्हां वंगभंगामुळें चिडून जाऊन आपला क्रोध प्रकट करण्याचा नवीन मार्ग वंग-वासियांनीं हुडकून काढिला. बंगाल्यांत बाँबचा प्रादुर्भाव जोरानें दिसूं लागला. याविषयीं केसरीनें ‘ काळ येत चालला, सावध रहा ’ म्हणून सरकारला जोराचा इषारा दिला. ‘ स्वातंत्र्याकरितां एकदां तंटा सुरु झाला, म्हणजे मग यशःप्राप्ति
‘ झाल्याखेरीज तो विझत नसतो. पालटलेल्या काळाचीं चिन्हें ओळखून त्याप्रमाणें
‘ सावध होऊन तरतूद करणें, हेंच खऱ्या मुत्सद्दीपणाचें लक्षण आहे.’ (७-८-०६).

देशामध्यें लोकपक्षीयांची धडपड सुरु झाली कीं, सरकार आणि अँग्लो-इंडियन पत्रें यांचीं डोकीं ठिकाणावर रहात नाहींत. वड्याचें तेल वांग्यावर याप्रमाणें कोणाला तरी पकडून कसल्या तरी गुन्ह्याचा आरोप त्याला डकविला जातो. दडप-शाही अन्यायाचे प्रकार पुष्कळच घडतात. आणि त्यांतील एक कृत्य म्हणजे चौकशीविना लाला लजपतरायांना हद्दपार केलें हें होय. केसरी क्रुद्ध झाला व ‘ बंड लोकांचें कां सरकारचें? ’ म्हणून हडसून खडसून सरकारास विचारूं लागला. ‘ इंग्रज सरकारच्या हातून हिंदुस्थानची राजसत्ता हिसकावून घेणें न घेणें ही ज्याच्या त्याच्या
‘ सामर्थ्याची व शक्तीची गोष्ट आहे. अशा पुरुषांच्या कृतीची मीमांसा तत्कालीन
‘ वर्तमानपत्रांनीं करणें योग्य नाहीं...एवढी मोठी महत्त्वाकांक्षा ज्या पुरुषानें मनांत
‘ धरली त्याचा प्रयत्न सिद्धीस गेल्यास तो राजा होईल आणि सिद्धीस न गेल्यास
‘ बंडखोर म्हणून फांसावर चढविला जाणार...राजा व बंडखोर यांच्यामधील वाद
‘ किंवा झगडा चालला असतांना त्यांत जो प्रबल होईल तो खरा राजा होय...
‘ यांपैकीं कोण चांगला आणि कोण वाईट, कोण कायदेशीर आणि कोण
‘ बेकायदेशीर, कोण देशाभिमानी आणि कोण देशद्रोही या प्रश्नांचा निकाल
‘ परस्परांच्या जयापजयांवरून इतिहासकारांनीं पुढें करावयाचा आहे. ’ (१४-५-०७).

अशा वेळीं सरकारनें शांतपणानें काय करावयास पाहिजे हें सांगतांना केसरी म्हणतो, ‘ हिंदुस्थानांतील इंग्रजी साम्राज्याचा अखेर हेतु काय हें स्पष्टपणें सांग-

' ण्याची आतां वेळ आली आहे. आजवर गोड गोड थापांवर वेळ मारून नेत.
' आली. पण आतां ते दिवस उरले नाहींत. ' हा सूर्य आणि हा जयद्रथ ' असें
' दाखविण्याची ही वेळ आहे.' (कित्ता.) एकंदरींत दिवस कठीण आलें हें पाहून केसरी
लिहितो, ' लाला लजपतराय यांना पकडल्यामुळें एक गोष्ट निर्विवाद सिद्ध झाली आहे
' कीं, सुधारलेल्या इंग्रजी साम्राज्यांतहि स्वराज्याचे हक्क मिळविण्याकरितां खटपट
' करणारा मनुष्य बंडखोर म्हणून फांसावर चढविला जाणार !...मुसलमानी बाद-
' शाही कारकीर्द यापेक्षां शतपट चांगली असें म्हणण्यास आतां मुळींच हरकत
' नाहीं. औरंगजेब, ' मी सनदशीर चळवळीचा भोक्ता आहें ' किंवा बिनचौकशीनें
' एकाद्यास तुरुंगांत टाकणें मला पसंत नाहीं ' असा डौल तरी मारीत नसे. ...
' सरकारास आमचा युक्तिवाद नको अगर इषाराहि नको असें त्यांच्या
' बेपर्वाईच्या वर्तनावरून उघड होत आहे. त्यांचा असा समज दिसतो कीं, हे प्रश्न
' शक्तींचे आहेत, युक्तींचे नव्हत; आणि असा त्यांचा समज झाल्याचें जर ढळ-
' ढळीत आपल्या निदर्शनास येत आहे, तर जुटीनें व निश्चयानें शक्य असेल
' तेवढी चालत्या गाड्यास खीळ घालण्याची व्यवस्था करूनच न भितां आपण
' आपले हक्क संपादन करून घेतले पाहिजेत. सनदशीर चळवळ आणि बंड हीं या
' राज्यांत इतउत्तर एकाच शिक्क्याच्या मापानें मापिलीं जाणार असें राज्यकर्त्यांनीं
' जगास जाहीर केलें आहे. आणि राज्यकर्त्यांनीं जर ही रशियन पद्धति अंमलांत
' आणली तर हिंदुस्थानांतील प्रजेसहि रशियाचेंच अनुकरण करणें भाग आहे.
' प्रजेची स्वराज्याची इच्छा अगर हांव-जुलमानें दडपली जात नाहीं. '(२१-५-०७).

हिंदुस्थान आणि रशिया यांचा तौलनिक दृष्ट्या विचार करितांना निरनिराळ्या वेळीं प्रकट केलेले विचार वाचनीय आहेत. ' ह्या वेळीं रशियांतील चळवळीची
' कोणासहि आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं. किंबहुना रशियांतील प्रजापक्षाच्या
' किंवा सोशियालिस्ट लोकांच्या प्रयत्नांचेंच आम्हांस थोडेंबहुत अनुकरण करावें
' लागेल. ' ( २८-५-०७ ). ' हिंदुस्थानांतील भूमि कितीहि दुर्बळ असली तरी या
' जुलमी वृक्षास रशियांत जीं फळें आलीं तींच थोड्या कालावधीनें इकडेहि आलीं
' पाहिजेत हें निश्चित आहे. ' ( १३-८-०७ ). ' कडू वृंदावनास आंब्याचीं फळें
' कधींहि येत नसतात आणि जुलमी रशियन पद्धतीनें लोक सुखी आणि संतुष्टहि
' रहात नसतात. ' ( १९-११-०७ ). ' केवळ पोटापाण्याकरितां किंवा संपत्तीच्या
' योग्य वांटणीकरितां हिंदुस्थानांत सरकारी नोकरांचे व इतरांचे संप झाल्यावांचून
' राहणार नाहींत. राजकीय प्रश्न लष्करच्या सामर्थ्यावर बाजूस ढकलतां येतात; पण
' सांपत्तिक किंवा पोटापाण्याचे प्रश्न दडपून नाहींसे करणें मानवी प्राण्याच्या ताक-
' दीच्या बाहेरचें आहे. ' ( २६-११-०७ ).

**४. क्रांतिकारकांचा वाढता संप्रदाय**:—ता. ३० एप्रिल, १९०८, रोजीं रात्रौ ८ वाजतां कलकत्त्यांत घडलेल्या भयंकर अत्याचारामुळें बॉंबचे प्रताप सर्वतोमुखीं झाले.

मुझफरपूरचे डि. जज्ज मि. किंग्जफोर्ड यांच्यावर हल्ला करण्याचा अत्याचाऱ्यांचा मूळचा बेत. पण केनेडीबाई यांची गाडी मि. किंग्जफोर्ड यांचीच समजून तींत एक बाँब जोरानें फेंकण्यांत आला. 'गाडीची मागली बाजू बाँबच्या तडाख्यानें मोडली 'गेली आणि मिसेस केनेडी त्यांचें रक्तानें भरलेलें शरीर मागें लोंबून त्यांचे मोकळे 'केस गाडीबरोबर रस्त्यांत लोळूं लागले.' ( १२-५-०८ ).

खुनी इसम—केवळ १८-१९ वर्षांचा कोंवळा पोर—खुदीराम बोस आपण होऊन पोलिसांच्या स्वाधीन झाला. ह्याच सुमारास कलकत्त्याच्या ग्रे स्ट्रीटमध्यें ट्रॅम्वेच्या रस्त्यावर बाँब गोळा सांपडला, आणि सेंट अँड्र्यूज चर्चमध्यें बाँब उडाला. वरील अत्याचारांच्या बुडाशीं मोठा कट असला पाहिजे, असा पोलिसांना वास लागण्यासहि वेळ लागला नाहीं. ह्या कटाला माणिकतोळाबागप्रकरण असें रूप पुढें मिळालें. तेथील गुप्त मंडळीचा संस्थापक व पुढारी बीरेन्द्रकुमार घोष याला पकडण्यांत आलें. नरेन्द्रनाथ गोस्वामी, बाबू अरविन्द घोष, सत्येन्द्रनाथ बोस, कन्हयालाल, नगेन्द्रनाथ सेनगुप्त, अशोक नंदी, विजयराम सेन, मोतीलाल घोष, उल्हासकर दत्त, प्रफुल्लचंद्र चक्रवर्ति आणि आणखीहि कांहीं मंडळी या भयंकर प्रकरणांत सांपडली होती. हीं सर्व मंडळी अगदीं तरुण म्हणजे पंचविशीच्या आंतबाहेरची होती.

कटाच्या खटल्याचा निकाल व्हावयाचा तोच झाला. फांशी आणि जन्मठेप काळेपाण्याच्या शिक्षांची खैरात अगदीं सढळ हातांनीं करण्यांत आली. खटला चालू असतांना सर्व आरोपी बेफिकीर दिसत होते. 'खुदीराम आपल्या पुढील स्थिती-'विषयीं बेफिकीर असून तो सदोदित आपल्या कोठडींत गाणीं गात असतो.' ( ९-६-०८ ). 'पहिल्या दिवशीं खटला संपण्याचे पूर्वी थोडा वेळ अरविन्दबाबू 'पिंजऱ्यांत डुकल्या घेत होते.' ( २६-५-०८ ). 'उल्हासकर दत्ताचा पोषाख 'संन्याशासारखा असून तो तर नांवाप्रमाणें नेहमींसारखाच उल्हसित होता!' ( १९-५-०८ ).

आरोपींना फांशीं देण्याचे प्रसंगहि 'केसरी'नें हृदयद्रावक भाषेंत वर्णिले आहेत. 'खुदीराम फांशीं जाईपर्यंत त्याची वृत्ति गंभीर, शांत, किंबहुना आनंदीच 'होती......दहनासाठीं प्रेतावरील कपडा काढला तों खुदीरामच्या चेहऱ्यावर 'अजूनहि स्मित हास्य दिसत होतें. गाढ झोंपेंत असल्याप्रमाणें त्याचे डोळे मिटलेले 'होते. त्याचे चेहऱ्यावर भीतीचा लवलेशहि नव्हता. उलट तो शांत व आनंदी 'दिसत होता.' (१८-८-०८). कन्हयालाल यांस मंगळवारीं सकाळीं सहा वाजतां 'अलिपूरच्या तुरुंगांत फांशीं देण्यांत आलें. आदले रात्रीं त्यांस इतकी गाढ 'झोंप लागली कीं, युरोपियन वॉर्डरनें त्यांस मोठ्यानें हालवून जागें केलें!' ( १७-११-०८ ).

केसरीचें निर्भीड मत व सडेतोड टीका अशा प्रसंगींहि लिखाणांत आढळून येई. अत्याचारांची मीमांसा करितांना केसरी म्हणतो :—'बंगाल्यांतील तरुण पिढीचा

' गुप्त कट हा जरी रशियांतील बंडखोर लोकांप्रमाणें अधिकाऱ्यांचा गुप्त खून
' करण्याकरितां झाला असला, तरी तो स्वार्थाकरितां नसून अनियंत्रित आणि
' बलाढ्य अशा गोऱ्या अधिकारीवर्गाच्या एकमुखी सत्तेनें उत्पन्न झालेल्या संतापामुळें
' झालेला आहे हें त्यांनीं ( क्रांतिकारकांनीं ) दिलेल्या जबान्यांवरून स्पष्ट आहे. '
( १२-५-०८ ). ' ह्या अत्याचारास किंवा पापास कोणीहि समंजस मनुष्य
' संमति देणार नाहीं. पण हा निरुपायाचा त्रागा—आणि त्रागा म्हटला म्हणजे तो
' केव्हांहि संतापाच्या आणि निराशेच्या पराकाष्ठेनेंच उत्पन्न होतो—टाळणें किंवा
' अजिबात बंद करणें प्रजेसच नव्हे तर राजासहि अशक्य आहे. ' ( कित्ता ).

' रशियांतील बॉंबची जी चिकित्सा, तीच हिंदुस्थानांतल्या बॉंबची चिकित्सा.
' बॉंब गोळा हें स्वराज्याचे हक्क संपादन करण्याचें साधन आहे, असें रशियांत
' किंवा आयर्लंडांत ठरलें नाहीं. पण प्रजासंक्षोभाचा पारा वर किती चढला आहे,
' हें बॉंबवरून मापण्यास हरकत नाहीं.' ( १९-५-०८ ). ' बंगाली तरुणांचीं डोकीं
' फिरून जाईपर्यंत अधिकारीवर्गानें बंगाल्यांचा अंत पाहिल्यामुळें बॉंब गोळा
' उडाला.' ( २६-५-०८ ).

बॉंबसंबंधीं केसरीनें केवळ तात्त्विक चर्चा केली होती व अत्याचाराविषयीं निषेध प्रगट केला होता. तथापि, ' देशाच्या दुर्दैवा'मुळें लो. टिळकांना राजद्रोहाच्या खटल्याखालीं सहा वर्षांची शिक्षा झाली !

बंगाल्यांतील दडपशाहीनें बऱ्याच जणांचे बळी घेतले. राजा सुबोधचंद्र मलिकादि नऊ पुढाऱ्यांना हद्दपार करण्यांत आलें. याच वेळीं मिदनापूरप्रकरणास आरंभ झाला. आणि ' राजापासून भिक्षेकऱ्यापर्यंत १५७ लोकांचा एक कट उबविण्यांत आला.' प्रस्तुत प्रकरणांत डोंगर पोंखरून उंदीरहि निघाला नाहीं. मात्र रयतेस गुप्त पोलिसांच्या आणि डि. मॅजिस्ट्रेट व पोलिस इन्स्पेक्टर यांच्या सैतानी लीला मनमुराद पहावयास मिळाल्या. अशा वेळीं नागरिकांना त्रास आणि गैरसोयहि मनस्वी सोसावी लागते हा अनुभव नेहमींचा आहेच.

याच सुमारास लंडनमध्यें मदनलाल धिंग्रा या हिंदी विद्यार्थ्यानें कर्झन वायली याचा खून केला. आणि हिंदुस्थानांतील क्रांतिकारकांच्या चळवळीचें लोण लंडनपर्यंत पोहोंचविलें ! केसरीनें वरील सर्व प्रकरणांची हकीकत खुलासेवार वाचकांना दिली. लंडन येथील ' जास्टिस् ' पत्राचे ह्या खुनासंबंधीं केसरीनें उध्दृत केलेले विचार वाचकांना विचारार्ह वाटतील. ' हिंदुस्थानांत इंग्लिश लोक जसें राज्य
' करीत आहेत तसें जर जर्मन लोक हिंदुस्थानावर राज्य करीत असते, तर इंग्लिश
' लोकांतहि धिंग्रासारखीं माणसें निःसंशय उत्पन्न झालीं असतीं, आणि ते इसम
' अर्धवेडे माथेफिरू आहेत, हें जरी लोकांनीं जाणिलें असतें, तरी ते फांसावर
' लटकणाऱ्या देशकार्यार्थ बळी पडणाऱ्या लोकांतच त्यांची गणना झाली असती. '
( १०-८-०९ ).

लंडनमधील खुनानंतर तीन चार महिन्यांच्या आंत नाशिक येथें तेथील कलेक्टर मि. जॅक्सन यांचा ता. २१-१२-०९ रोजीं रात्रौ नाटकगृहांत खून करण्यांत आला. अठरा वर्षांचा अनंत लक्ष्मण कान्हेरे हा पोलिसांचे अधीन झाला, आणि त्यानें कबुली दिली कीं, 'माझें कर्तव्य होतें तें मी पार पाडलें आहे, मी निसटून जाऊं इच्छित नाहीं.' (२८-१२-०९). जॅक्सनप्रकरणामध्यें नेहमींप्रमाणें केसरीनें लोकांना आणि सरकारला दुहेरी इषारा दिला, आणि आपलें कर्तव्य बजाविलें. ह्या खुनाबद्दल तिघांना फांशीं, दोघांना जन्मठेप, व एका आरोपीस दोन वर्षें सक्त मजुरी अशा कडक शिक्षा झाल्या. जॅक्सनच्या खुनाच्या खटल्यांतूनच 'नाशिकच्या कटा'च्या खटल्याची उत्पत्ति झाली. त्यांत पं. श्यामजी कृष्णवर्मा यांचे शिष्य बॅ. विनायकराव सावरकर यांनाहि आरोपी म्हणून विलायतेंतून पकडून आणण्यांत आलें. त्या वेळीं विनायकराव सावरकर आगबोटींतून उडी मारून सुटले, समुद्र तरून मार्सेल्सजवळ धक्क्याला लागून फ्रेंच हद्दींत शिरले, तेथें त्यांना गैरकायदा पकडण्यांत आलें, आणि कटाच्या खटल्यांत गोंवून त्यांना दोनदां जन्मठेपीची शिक्षा झाली, इत्यादि प्रकार सर्वांना विदित आहेच. नाशिक कटाच्या खटल्यांत एकंदर ३८ आरोपी होते. बॅ. सावरकर सोडून आणखी २९ आरोपींना कित्येक वर्षें सक्तमजुरीच्या शिक्षा मिळाल्या. इकडे मद्रास इलाख्यांत तिनेवल्लीचे कलेक्टर मि. ॲश यांच्या खुनाचा खटला हायकोर्टांत बराच गाजला. खुनी इसमानें स्वतःच आत्महत्या केली. निळकंठ अय्यर, शंकर अय्यर, व चिदंबर ह्या आरोपींना अनुक्रमें ७, ४ व २ वर्षांच्या सक्तमजुरीच्या शिक्षा झाल्या.

**५. विश्रांतीचा काल :**—इ. स. १९१२ च्या डिसेंबर महिन्यांत लॉर्ड हार्डिंज यांच्या दिल्ली येथील नगरप्रवेशाच्या वेळीं बॉंबचा भयंकर अत्याचार होऊन खुद्द व्हाइसरॉयांस उजव्या खांद्यास बरीच मोठी जखम झाली. सदर अत्याचारासंबंधीं केसरी लिहितो, 'भरत येणाऱ्या जखमेची खपली निघाल्यानें रक्तस्राव होऊन 'जखम चिघळते. असाच कांहींसा प्रकार या अत्याचारांनीं होतो.' (३१-१२-१२). पण केसरी पुढें अशीहि ग्वाही देतो कीं, 'हिंदुस्थानच्या सात्त्विक 'भूमींत अत्याचाराचें बाहेरून आलेलें बीज कायमचें रुजण्याचा संभव नाहीं.' (कित्ता).

१९१३ सालापासून सुमारें आणखी एक तप कांहीं तुरळक अत्याचार वगळले तर क्रांतिकारकांनीं एक प्रकारची विश्रांति घेतली असें म्हणावयास हरकत नाहीं. याचीं कारणें अनेक असू शकतील. राजकीय सुधारणेची लागलेली आशा, असहयोगाची अनत्याचारी छाप, यांमुळें कदाचित् क्रांतिकारकांनीं थोडी विश्रांति उपभोगिली असावी. अथवा आगामी अत्याचारांची तयारी करण्यासाठींहि ही सुट्टी असू शकेल. क्रांतिकारकांचा बीमोड करण्याकरितां इ. स. १९१८ मध्यें तयार केलेला रौलॅट कमिटीचा रिपोर्ट सरकारला फार उपयोगी वाटला. त्याचा खरा उपयोग कितपत झाला हा मुद्दा वेगळा. क्रांतिकारकांसंबंधीं महात्मा गांधींच्या

मतांची छाननी केसरीनें वेळोवेळीं मोठ्या मार्मिक तऱ्हेनें केली आहे. ' शिवाजी व ' प्रतापसिंहाच्या काळीं मी जर असतों तर त्यांनाहि मी ' वाट चुकलेला देशभक्त ' असेंच म्हटलें असतें, ' ( २१-४-२५ ), या महात्माजींच्या मतावर केसरीला उत्तर देण्याचीहि आवश्यकता वाटली नाहीं. केसरीनें अलीकडच्या चार पांच वर्षांत क्रांतिकारकांच्या चळवळीची माहिती आणि तीहि त्रोटक देण्यापलीकडे क्रांतीच्या तत्त्वज्ञानाविषयीं अधिकृत असें लिखाण फारसें लिहिलें नाहीं.

क्रांतिकारकांच्या अलीकडच्या चळवळींमध्यें काकोरीप्रकरण, लाहोरचा कटाचा खटला, असेंब्लींतील बाँबप्रकरण, आणि नुकतेच झालेले कलकत्ता व लाहोर येथील अत्याचार यांचा समावेश होतो.

काकोरीप्रकरणांत हत्यारें जमवून दरोडे घालून, राज्यसत्तेविरुद्ध बंड करण्याचा आरोप आरोपींवर ठेवण्यांत आला. काकोरी स्टेशनजवळ ता. ९ ऑगस्ट, १९२५, रोजीं आगगाडीवर दरवडा पडला, त्यानें काकोरीप्रकरणाला तोंड लागलें. काकोरी-खटल्यांत एकंदर २२ आरोपी होते. ता. ६-१२-२७ रोजीं काकोरीखटल्याचा निकाल लागला. त्यांत रामप्रसाद, राजेन्द्र लाहिरी, व रोशनसिंग यांना फांशीची शिक्षा देण्यांत आली. सचीन्द्रनाथ सन्याल याला जन्मठेपेची, मन्मथनाथ गुप्त याला १४ वर्षांची, अशा शिक्षा झाल्या. सदर खटल्यांत सर्वच आरोपींना फार कडक शिक्षा मिळाल्या म्हणून केसरी लिहितोः—'प्रस्तुतच्या बलिष्ठ राज्यसत्तेविरुद्ध बंड करणें ' हें दगडांच्या भिंतीवर आपलें डोकें फोडून घेण्यासारखें आत्मघातकी आहे; आणि ' एवढ्याचकरितां काकोरीच्या खटल्याच्या अविचारी कृत्यास कित्येक लोक नांवें ' ठेवतात, हें साहजिकच आहे. पण एखाद्या तेजस्वी माणसाचा सर्व बाजूंनीं कोंड-' मारा करून त्यास बैताग आणून मग त्यानें आततायीपणा केल्यास त्यास हंसणें हें ' निर्दयपणाचें, नव्हे काय ? ' ( १२-४-२७ ).

दिल्लीस असेंब्लीची बैठक चालू असतां ८ एप्रिल, १९२९, रोजीं बाँबचा स्फोट झाला आणि कांहीं काळ सुप्त असलेल्या ज्वालामुखीनें पेट घेतल्याप्रमाणें क्रांति-कारकांच्या चळवळीस नव्या दमानें प्रारंभ झाला. त्या सर्व प्रसंगाचें वर्णन केसरीच्या प्रतिनिधीनें सुंदर रेखाटलें आहे. ' ' आतां पब्लिक सेफ्टी बिलाचा निर्णय—' असे ' शब्द अध्यक्ष पटेल उच्चारतांना ४९९ लोकांचे ९९८ डोळे पटेल यांजकडे ' लागले होते...पण नाटकांतील ट्रॅन्सफर सीनप्रमाणें सभागृहाच्या ऐवजीं रणक्षेत्र ' निर्माण झालें. सेफ्टीबिल या शब्दाच्या उच्चाराबरोबर तोफेचा गोळा सुटल्याप्रमाणें ' मोठा आवाज निघाला, पुरुषभर उंचीची एक ज्वाला निघाली व लोकांचे डोळे ' क्षणभर दिपले गेले. आवाज होतांच एकदम धुराचा लोळ उठला, त्यानें सभागृह ' भरून गेलें. शेजाऱ्याला शेजारी दिसेना. पण आवाज व धूर यांच्यामुळें बाँबगोळा ' फेंकला असावा अशीच कल्पना सर्वांना आली. पण तो कोणीं, कुठून फेंकला ' किंवा जमिनींतूनच वर उडाला याची मात्र कल्पना येईना....पण तोच (प्रसंग)

' इतका अद्‌भुत होता कीं, माझ्याच इतरत्र लिहिलेल्या शब्दांनीं मला असें
' म्हणावेंसें वाटतें कीं, 'भविष्यानें जर वर्तमानावरच आसन मांडलें, उपमान हेंच जर
' उपमेय होऊन बसलें, किंवा स्वतः यजमानच जर बारनिशी लिहूं लागले तर, मग
' अद्‌भुत कल्पनेचा थारा कोठून ? '' ( १६-४-२९ ). क्रांतिकारकांच्या या विश्वरूप
' दर्शनावर केसरी लिहितो:—'वैष्णव धर्मगुरूनें श्रीमंत शिष्याला दिलेल्या तप्त मुद्रा स्वतः
' तप्त असल्या तरी त्या ओल्या छाटीच्या दुपदरीवरून दिल्यामुळें जशा अंग भाजीत
' नाहींत; त्याप्रमाणें कायदेमंडळांतील भाषणें नामदार सभासदांच्या या हक्कांच्या
' आडपडद्यामुळें सरकारच्या मनाला खरा चरका देऊं शकत नाहींत. पण आपले
' प्राण तळहातावर घेऊन बाहेर पडणाऱ्या लोकांच्या उद्गारांची स्थिति तशी नाहीं.
' त्यामुळें क्रांतिकारकांचीं भाषणें व हस्तपत्रकें यांचाच झाला तर सरकारच्या मनावर
' कळकळीच्या दृष्टीनें अधिक परिणाम होत असेल.' ( १६-४-२९ ).

लाहोरच्या कटाचा खटला अगदीं ताजा आहे. लाला लजपतराय यांजवर लाठीप्रहार करणारा सॉंडर्स नामक पोलिस अधिकारी होता. त्याचा पोलिस चौकींत भर दिवसा खून झाल्यानें हा कट उघडकीला आला. त्यांत एकंदर २४ आरोपी असून भगतसिंग, दत्त, जतीन्द्र, राजगुरु इत्यादि प्रमुख होते. आरोपी जतीन्द्रनाथ याच्या लोकोत्तर अन्नत्यागामुळें त्याचें नांव आज आबालवृद्धांच्या तोंडीं आहे. ' बाळ अभिमन्यु तर गेला, पण जयद्रथाची वाट काय ? ' म्हणून केसरीनें मोठ्या जिव्हाळ्यानें आणि कळकळीनें हिंदी जनतेपुढें प्रश्न टाकिला आहे. केसरी लिहितो:—' आज जतीन्द्र गेला, उद्यां शिववर्मा जाईल, परवां तिसरा कोणी जाईल!
' अशा आहुती एका मागून एक पटापट पडणार, असें धडधडीत डोळ्यांना दिसत
' असून देखील त्यांचें रक्त असेंच थंडगार रहाणार काय ? ' ( १७-९-२९ ).
ता. १३-१२-२९ रोजीं व्हाइसरॉयची गाडी उडविण्याचा प्रयत्न झाला, पण तो यशस्वी होऊं शकला नाहीं. ह्या प्रकरणांत क्रांतिकारकांनीं आपल्या चातुर्याची कमाल केलेली दिसून आली.

सॉंडर्सखुनाचा हा खटला बरेच दिवस चालला आणि त्याचा निकालहि नुक्ताच लागला. व्हाइसरॉयांनीं त्यासाठीं एक मुद्दाम वटहुकूमहि काढला. कारण खटला कायदेशीर रीतीनें चालविणें अशक्य झालें होतें. म्हणून ' गैरकायदा ' खटला चालवून भगतसिंग, सखदेव, राजगुरु या सर्वांना फांशीची शिक्षा देण्यांत आली. ता. ९ ऑक्टोबर, १९३०, रोजीं मध्यरात्रीं मुंबईंत लॅमिंग्टन रोडवर सार्जंट टेलर व मिसेस टेलर यांच्यावर गोळ्या झाडल्या गेल्या. अत्याचारांत कोणी दगावलें नाहीं. खटला चालू आहे, आणि गुप्त पोलिसांना आपलें कसब दाखविण्याला आणखी एक संधि उत्पन्न झाली आहे. यानंतर ता. २५ ऑगस्ट, १९३०, रोजीं सकाळीं ११ वाजतां कलकत्त्याचे पोलिस कमिशनर सर चार्लस टेगार्ट यांच्या मोटारीवर दोन बॉंब पडले. चंद्रनगर येथें वरील गुन्ह्याच्या आरोपावर बरेच लोक पकडले.

खटले चालू आहेत. लगेच कांहीं दिवसांनीं बंगालचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन्स मि.सिंप्सन यांचा खुद्द त्यांच्या ऑफिसांत तारीख ८-१२-३० रोजीं तिघां बंगाली तरुणांनीं खून केला. एका गुन्हेगारानें तावडतोब आत्महत्याहि केली.

केसरीच्या ५० व्या वर्षाच्या शेवटच्या अंकांतहि आणखी एका अत्याचाराची नोंद झालेली पाहून हिंदुस्थानचें नष्टचर्य अजून संपलें नाहीं याची जाणीव उत्पन्न होते. ता. २३ डिसेंबर रोजीं लाहोर युनिव्हर्सिटीच्या पदवीदानसमारंभाच्या वेळीं पंजाबच्या गव्हर्नरावर गोळ्या झाडण्यांत आल्या. त्या वेळीं गव्हर्नरास थोडी दुखापत झाली व सब-इन्स्पेक्टर चननसिंग मरण पावला.

क्रांतिकारकांचें कर्मकांड येथेंच संपेलसें दिसत नाहीं. विश्वकुटुंबवादाचें वारें सर्व जगभर जोरानें वाहूं लागलें आहे. सरकार तर घाबरलेलें दिसतें. मीरतकटाचा खटला अजून संपला नाहीं आणि हें भिजत घोंगडें असेंच किती दिवस पडून राहणार हेंहि गूढ आहे.

केसरीनें वेळोवेळीं क्रांतिकारकांसंबंधीं प्रकट केलेलीं मतें आपण पाहिलीं. खून हें स्वराज्याचें साधन नाहीं, ही केसरीची प्रामाणिक समजूत होती, आणि त्यामुळें केसरीनें उघड उघड तर नव्हेच पण मूकहि संमति खुनाला दिली नाहीं. केसरीवर क्रांतिकारकांच्या कांहीं अत्याचारांची नैतिक जबाबदारी आहे असें न्या. डार्लिंग वगैरे व्यक्तींनीं सूचित करण्यासहि कमी केलें नाहीं. तर्कबुद्धीला ताणच द्यावयाचा तर मग असेंहि म्हणतां येईल कीं, ज्या राज्यव्यवस्थेमुळें आणि समाजरचनेमुळें लोक असले गुन्हे करण्यास प्रवृत्त होतात ती राज्यव्यवस्था आणि समाजरचनाच सर्व अनर्थाला 'नैतिक जबाबदार' आहे. तात्पर्य, हें नैतिक जबाबदारीसंबंधीं कार्यकारण-भावाचें शेंपूट फार न लांबविणें हेंच सयुक्तिक होय.

केसरीचीं ह्या विषयावरील मतें कांहींजणांना दुटप्पी वाटतात. पण तीं दुटप्पी नसून दुहेरी होतीं. राज्यकर्ते आणि क्रांतिकारक यांना दुहेरी इषारा केसरीनें वेळो-वेळीं दिला आहे. सरकारला जसा दडपशाहीपासून परावृत्त होण्याचा उपदेश केसरीनें वेळोवेळीं केला, त्याप्रमाणें क्रांतिकारकांसहि क्रांतीची वेळ अजून आली नाहीं हें सूचित केलें आहे. कार्ल मार्क्स म्हणतो त्याप्रमाणें 'क्रान्तीची शक्ति ( Force) 'ही समाजाची प्रसूतिवेदना होय.' परंतु ह्या प्रसूतिवेदना अवेळीं आणण्याच्या कृत्रिम उपायांनीं कदाचित् गर्भपात होण्याचा संभव आहे हें केसरीनें निर्भीड भाषेंत जनतेला दर्शविलें. उलट सरकारासहि सावध रहाण्याचा व असंतोषाचें बीजच नाहींसें करण्याचा इषारा वेळोवेळीं दिला.

क्रांतिकारकांचीं कृत्यें केसरीला पसंत पडलीं नसलीं तरी क्रांतिकारकांच्या हृदयांत जळत असलेल्या जाज्वल्य देशाभिमानाच्या ज्योतीची केसरीनें स्तुतीच केली. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील क्रांतिकारक हे अराजक ( Anarchist ) नाहींत तर त्यांना ध्येयभूत असलेल्या स्वराज्यघटनेकरितां त्यांचे प्रयत्न चालले असतात, हें

केसरीनें पहिल्याप्रथम लोकांच्या निदर्शनाला आणिलें. क्रांतिकारकांच्या चळवळी कोणत्या, त्यांची माहिती हृदयंगम भाषेंत वर्णन करून, केसरीनें जनतेच्या हृदयाला कसा चटका लाविला, त्या त्या प्रकरणांत केसरीनें आपलीं मतें वेळप्रसंगीं सरकारचा रोषहि पत्करून किती निर्भीडपणानें मांडलीं, आणि त्या त्या मतांची योग्यता आणि जरूरी त्या त्या वेळीं किती होती, आणि तीं मतें आजच्याहि गोंधळलेल्या राजकारणाला कशीं आदर्शभूत होतील याचा विचार केल्यानंतर क्रांतिकारकांच्या चळवळीचें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या इतिहासांत खरें स्थान काय आहे, हें ठरविणें भावी इतिहासकाराचें काम आहे. आज त्याविषयीं लिहिणें एक तर शक्य नाहीं आणि दुसरें इष्ट नाहीं.

प्रस्तुत लेखकानें वरील त्रोटक टिपणें मांडलीं आहेत. तीं क्रांतिकारक चळवळीविषयीं त्याचीं स्वतःचीं मतें प्रकट करण्याकरितां मांडलेलीं नाहींत. किंबहुना केसरीचें मत म्हणून न देतां कित्येक ठिकाणीं नुसत्या घडलेल्या हकीकती दिल्या आहेत. त्याचाहि हेतु इतकाच कीं, केसरीचीं ५० वर्षांचीं फाइलें चाळीत असतां त्यांवरून क्रांतिकारक चळवळीचा ऐतिहासिक धागा किंवा माग कसकसा दिसत गेला तें नमूद करावयाचें. क्रांतिकारक चळवळी किंवा तदंगभूत झालेले अत्याचार यांचीं वर्णनें केसरीच्या शब्दांनीं मधून मधून दिलीं आहेत; पण त्यांतील पुष्कळशा हकीकती महाराष्ट्राच्या बाहेरच्या आहेत. यावरून सहजच अनुमान होतें कीं, हीं वर्णनें केसरींतील लेखकांनीं परप्रांतीय देशी किंवा परदेशी वर्तमानपत्रांतून घेतलेलीं असावीं. स्वतःचे बातमीदार पाठवून तीं केसरीकरितां म्हणून लिहून आणविलेलीं दिसत नाहींत. याचें कारण उघडच आहे. अशा चळवळी किंवा अत्याचार यांच्याविषयीं वर्तमानपत्रांची सहानुभूति नसली तरी, ' युद्धस्य कथा रम्या ' या न्यायानें अशीं वर्णनें कोणालाहि तीं अद्भुत म्हणून वाचावींशीं वाटतात आणि वर्तमानपत्रकार व वाचक यांचा संबंध लक्षांत घेतां शक्य तिकडून अशी वर्णनात्मक माहिती मिळवून वाचकांपुढें ठेवणें हें संपादकांचें कर्तव्यच ठरतें. दैनिक पत्रांत असलीं वर्णनें आलीं तर त्यांवरून त्या वर्तमानपत्रकारांना वर्णित प्रकारांविषयीं सहानुभूति वाटते असें कोणीहि समजत नाहीं व तीच दृष्टि केसरीसारख्या साप्ताहिक लोकप्रिय पत्रांना लाविली पाहिजे.

सन १८९७ च्या खटल्यांत सरकारतर्फे स्पष्ट कबूल करण्यांत आलें कीं, खुनाच्या सहानुभूतीचा कोणताहि पुरावा केसरीकारांविरुद्ध आणतां आला नाहीं. टिळकांनीं १९१४ च्या जाहीरनाम्यांत अत्याचारांविरुद्ध स्पष्ट मत प्रकट केलें. व १९१७-१८ सालीं तर खुद्द विलायतेंतील कोर्टापुढें जाऊन आपल्या शत्रूच्या मानेला हिसडा देऊन त्यांनीं कोर्टप्रमाणें जगापुढें उघड सवाल टाकला कीं, 'मला कोण अत्याचारी म्हणतो तें पाहूं दे. ' आणि या ठिकाणीं ' मी ' म्हणजे १९१७ सालापर्यंतचा अखंड केसरी. तात्पर्य, व्यापक अर्थानें व तात्त्विक अर्थानें हिंदुस्था-

नांतहि इतर देशांप्रमाणें राज्यकारभारांत क्रांति घडून येणार असें टिळकांना दिसत होतें व देशप्रीतीमुळें तें त्यांना इष्टहि वाटत होतें. परंतु अत्याचारी तर राहोच पण अनत्याचारी स्वरूपाची अमुक एक विशिष्ट प्रकारची क्रांति घडून यावी असें केसरीनें प्रतिपादलेलें आढळत नाहीं. पण जुलमी सत्ता नष्ट व्हावी, लोकांच्या हातीं कारभार यावा, दुष्ट, अरेराव अधिकाऱ्यांचें निर्दालन व्हावें, अशा इष्ट घटनेला जर क्रांति हें नांव देतां येईल, तर टिळक हे पहिल्या प्रतीचे क्रांतिकारक होते व केसरीनें ५० वर्षें क्रांतीचाच उपदेश केला, हें कोणीहि कबूल करील !

---

# लष्करी शिक्षण

## ( प्रो. दत्तात्रय गोपाळ कर्वे, एम्. ए. )

गेल्या अर्ध शतकांत केसरीमध्यें ‘ लष्करी शिक्षण ’ ह्या विषयावर जे लेख प्रसिद्ध झाले त्यांचें समालोचन प्रस्तुत स्थळीं करावयाचें आहे. सर्व महाराष्ट्रीय ग्रंथकारांच्या लिखणांचें परीक्षण करण्याचा ज्यांचा अधिकार त्यांच्या कृतीची संभावना करण्याचा इतरांनीं प्रयत्न करणें हें एरव्हीं धाष्ट्र्याचेंच ठरलें असतें. परंतु सध्यांचा महोत्सव-प्रसंग केसरीच्या बहुविध कामगिरीचें गुणग्राहकत्वानें वर्णन करण्याचा असल्यानें प्रस्तुत लेख लिहिण्याचें आम्हीं अंगावर घेतलें. त्यांत कांहीं न्यूनत आढळल्यास त्याबद्दल विद्वान् केसरीकार व त्यांचे चहाते आम्हांस क्षमा करतील अशी आशा आहे.

वर्तमानपत्रें चालविण्याचीं दोन धोरणें असूं शकतात. विवक्षित क्षणीं लोकांपुढें प्रामुख्यानें असणाऱ्या गोष्टींचीं भडक व आपल्या आश्रयदात्यांच्या वृत्तीस मानव-णारीं वर्णनें देऊन पत्राचा खप व जाहिरातींची गिऱ्हाइकी वाढविणें हें पाश्चात्य राष्ट्रांतील बहुतेक मोठमोठ्या वर्तमानपत्रांचें ब्रीद असतें. हिंदुस्थानांतील वर्तमान-पत्रांतहि अशा ‘ दुकानदारी ’चें स्वरूप हल्लीं दृष्टिगोचर होऊं लागलें आहे. असें असलें तरी विशिष्ट ध्येय अहर्निश डोळ्यांपुढें ठेवावयाचें आणि सर्व प्रचलित वृत्तांताचें वर्णन व चिकित्सा हीं त्या ध्येयपुष्टीस अनुसरून करायाचीं, अशा मतप्रसारक अगर सांप्रदायिक हेतूनेंहि कांहीं वर्तमानपत्रें चालविलीं जातात. केसरी, न्यू इंग्लिश स्कूल व आर्यभूषण छापखाना ह्या तिन्ही संस्थांचे जन्मकाल ध्यानांत घेतल्यास केसरी-पत्राची स्थापना उच्च हेतुपुरस्सर आणि राष्ट्रीयमतप्रसारार्थ झालेली आहे, हें निराळें सांगावयास नको. केसरीच्या ह्या भूमिकेस अनुसरून गेल्या पन्नास वर्षांत लष्करी शिक्षण ह्या विषयावर अनेक अग्रलेख, स्फुटें, बातमीपत्रें व विविध लेख त्या पत्रांत प्रसिद्ध झाले आहेत. मतप्रसार व ध्येयवाद हीं कार्यें प्रसंग पाहून केलीं तरच परिणाम-कारक होतात. म्हणून १९१४ च्या महायुद्धकाळीं प्रस्तुत विषयावर केसरीचा विशेष भर असणें साहजिक होतें. त्याचप्रमाणें १९२५ सालचा ‘ नागरिक व सहाय्यक फौज ( शे ) कमिटी ’चा रिपोर्ट, १९२८ चा ‘ हिंदी लष्करी कॉलज (स्कीन),

कमिटी 'चा रिपोर्ट, आठ पलटणींच्या हिंदीकरणाची योजना, नाविक शिक्षणाचा हिंदुस्थानांत उपक्रम, तरुणांत व सुशिक्षितांत लष्करी शिक्षणाचा प्रसार व्हावा ह्या उद्देशानें डॉ. परांजपे व डॉ. मुंजे ह्यांनीं केलेले प्रयत्न इत्यादिकांच्या अनुरोधानें ह्या विषयावर गेल्या पांचसहा वर्षांत केसरीमध्यें वारंवार लेख यावे, हें लोकशिक्षण व राजकारण ह्यांस साधकच आहे. हिंदी राष्ट्राच्या लष्करी आकांक्षांसंबंधाचें विशिष्ट धोरण मनांत ठसून हे सर्व लेख लिहिलेले असल्यानें त्यांमध्यें एकसूत्रीपणा दिसून येतो. ह्या धोरणानुसार अनेक मतें, योजना व कोटिक्रम वगैरेंचा केसरीकारांनीं आपल्या लेखांत ऊहापोह केला आहे. त्यांपैकीं महत्त्वाच्या मुद्द्यांचा उल्लेख करून केसरीच्या एतद्विषयक कामगिरीचें वैशिष्ट्य वाचकांपुढें मांडणें आवश्यक आहे.

मागील कोणत्याहि राजवटींत न झालेल्या ज्या कांहीं अनिष्ट गोष्टी इंग्रजांनीं आपल्या अमदानींत केल्या, त्यांमध्यें हत्यारें वापरण्याची प्रजेस बंदी आणि पिढ्यानुपिढ्या लष्करी कामगिरी केलेल्या लोकांसहि फौजेंतील वरिष्ठ अंमलदारीच्या जागा मिळण्यास मनाई ह्या दोहोंचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला पाहिजे. विशेषतः १८५७ सालच्या बंडानंतर ह्या बाबतींतील सरकारी धोरण अधिक अपायकारक व गैरविश्वासाचें ठरूं लागलें. शेती, दुकानदारी, कारकुनी इत्यादि पेशांच्या प्रजेची गोष्ट एक राहो. परंतु सरदार, जहागीरदार, राजेरजवाडे इत्यादि ज्या वर्गांचा नैसर्गिक धंदाच लष्करी हुकमतीचा होता, त्यांस ही परिस्थिति विशेष जाचक व अपमानकारक वाटली असल्यास नवल नाहीं. १८९० सालीं मुंबई इलाख्याचे मुख्य सेनापति ड्यूक ऑफ कॉनॉट यांजकडे महाराष्ट्रीय सरदारांचें व इतर कांहीं सद्गृहस्थांचें एक शिष्टमंडळ गेलें होतें. महाराष्ट्रांत ड्यूकसाहेबांचें स्मारक म्हणून लष्करी शिक्षणाच्या शाळा काढण्याच्या योजनेस त्यांचा येथें व विलायतेंत पाठिंबा मिळवावा हा शिष्टमंडळाचा उद्देश होता. केसरीकार टिळक व नामजोशी हे सदरहू शिष्टमंडळाचे चिटणीस होते. ड्यूकसाहेबांचें उत्तर एकंदरीनें सहानुभूतिपूर्ण असूनहि सरकारचें हट्टी धोरण आडवें येऊन त्या वेळीं हा प्रश्न निकालांत निघाला. केसरीची व शिष्टमंडळाची त्या वेळची मागणी किती अल्प होती, हें केसरीच्या अग्रलेखांतील पुढील उताऱ्यावरून दिसून येईल:—' सध्यां लोकांचें सरकारपाशीं जें मागणें आहे, तें अगदीं नियमित असून त्याचा वरिष्ठ जागांच्या प्रश्नाशीं कांहीं संबंध नाहीं. ज्या जागा हल्लीं नेटिव सैन्यांत नेटिवांसाच मिळतात, त्या एका अशिक्षित शिपायास न देतां लष्करी ' कॉलेजांत शिक्षण मिळून तयार झालेल्या प्रतिष्ठित घराण्यांतील लोकांस द्याव्या, ' एवढीच काय ती सरकारपाशीं आमची विनंति आहे. ' (१८-३-९०). असाच एक प्रसंग १९०७ सालीं पुन्हां उद्भवला. हिंदुस्थानचे सरसेनापति किचनेर ह्यांस कपुर्थळ्याच्या महाराजांनीं मेजवानी दिली. महाराजांनीं आपल्या भाषणांत लष्करी कॉलेज काढण्याच्या आवश्यकतेवर भर दिला व किचनेरसाहेबांनींहि औपचारिक दृष्ट्या ह्या योजनेस आपली अनुमती दिली. १८९० सालचा महाराष्ट्रांतील अनुभव

केसरीकारांच्या डोळ्यांपुढें असल्यानें त्यांनीं ह्या प्रसंगीं सरकारचें लष्करी शिक्षणाविषयीं वास्तविक धोरण कोणतें असतें ह्याबद्दल पुढीलप्रमाणें आविष्करण केलें आहे. व निदान ह्या वेळीं तरी किचनेरांची अनुमति अधिक भरीव ठरून सरदारांकरितां लष्करी कॉलेज स्थापलें जावें अशी मागणी केली आहे. ' मुसलमानांनीं लष्करी ' बाबतींत हिंदूंवर भरंवसा टाकून स्वतंत्र सैन्यें त्यांना ठेवूं दिलीं, म्हणून अखेरीस ' दिल्लीच्या बादशहांचें किंवा विजापूरच्या पाच्छाहांचें राज्य बुडालें अशी इंग्रजांची ' समजूत आहे. इतिहासाकडे सूक्ष्म दृष्टीनें जर पाहिलें तर असें आढळून येईल ' कीं, हिंदु सरदारांवर विश्वास टाकल्यामुळेंच मुसलमानी राज्य हिंदुस्थानांत अधिक ' दिवस टिकलें व ज्या वेळीं मुसलमानी राज्य लयाला जाण्याची वेळ आली, त्या ' वेळीं बाहेरच्या भामट्यांच्या हातीं सत्ता न जातां नेटिवांच्या हातीं पुन्हां गेली. ' कर्मधर्मसंयोगानें आज इंग्रजी राज्य लयाला गेलें तर तिसराच बाहेरचा लुटारू ' येथील अधिकार आपल्या हातीं घेईल. आपल्या हातीं सत्ता राखण्याचा इंग्रजांनीं ' शक्य तितका प्रयत्न करणें, हें मानवांच्या स्वाभाविक लोभास धरूनच आहे; पण ' माझा लोभ संपण्याची वेळ आल्यावरहि, बाहेरच्या कुत्र्याला जेवूं घालीन, पण ' तुला उपाशी मारीन, अशी इच्छा धरणें हें मनुष्याला अधोगतीला नेणारें आहे. ' ( १७-१२-०७ ).

लष्करी शिक्षणाचें महत्त्व लोकांप्रमाणें सरकारासहि पटावें अशा प्रकारच्या दोन गोष्टी १९११ मध्यें घडून आल्या. हिंदुस्थानांत लढवय्ये म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या जातींतहि युद्धनिपुणता व रग फार दिवस टिकत नाहींत व म्हणून लष्करभरती करतांना ती शक्य तितक्या विस्तृत क्षेत्रांतून केली जावी अशी कांहीं इंग्रज लष्करी तज्ज्ञांनीं त्या वेळीं सूचना केली होती. उलट, बंगालमध्यें दरोडे पडत असूनहि त्यांपासून आपलें संरक्षण करण्यास गांवकऱ्यांजवळ हत्यारें नसल्यानें त्यांचें नाहक नुकसान होऊं लागलें. वरील गोष्टींस अनुलक्षून सरकारचें धोरण ह्या बाबतींत ' विश्वास देऊन विश्वास घेण्याचें ' असावें आणि आपल्या पिकांचें व जीविताचें संरक्षण त्यांस करतां यावें ह्या उद्देशानें लोकांस हत्यारें वापरण्याची परवानगी द्यावी असें केसरीनें सुचविलें. ( ३१-१०-११ ). तसेंच हिंदी लोकांतून लायख व कर्तबगार इसमांची फौजेंत अविच्छिन्नपणें भरती होण्यास सरकारचीं ह्या बाबतींतील मतेंच पूर्णपणें बदललीं पाहिजेत, असें स्पष्टपणें प्रतिपादण्यास केसरीकार विसरले नाहींत. ते म्हणतात, ' हिंदुस्थानांतील हत्यारांचा कायदा, लष्करी धोरण व ' स्वयंसैनिक होण्याचा लोकांस हक्क न देणें या तीन कारणांमुळें हिंदी लोक ' लष्करी दृष्टीनें अधोगतीस जात आहेत, हें राज्यकर्त्यांस कधीं दिसावयास ' लागणार ? ' ( कित्ता ).

सन १९१४ च्या ऑगस्टमध्यें महायुद्ध सुरू झाल्यापासून लष्करी शिक्षण, किंबहुना हिंदुस्थानाच्या सर्वच लष्करी आकांक्षा, हा विषय लोक व सरकार ह्या दोहोंसहि

निराळ्या स्वरूपांत दिसूं लागला. हिंदी लोकांच्या लष्करी मागण्या सरकार मान्य करीत नसे, त्यास केसरीनें वर उल्लेखिलेला राजकीय गैरविश्वास हें तर एक प्रमुख कारण होतेंच. परंतु ब्रिटिश सरकारच्या मनांत ह्या विषयासंबंधीं दुसराहि असा ग्रह होता कीं, आपल्या नाविक सत्तेच्या व हिंदुस्थानांतील भाडोत्री सैन्याच्या बळावर आपण हिंदुस्थानचें नेहमींच परचक्रापासून निवारण करूं शकूं. अशा पूर्वग्रह-दूषित मनोरचनेमुळें लष्करी शिक्षणाचा हिंदी लोकांत सर्रहा प्रसार करणें अनावश्यक व राजकीय दृष्ट्या धोक्याचें आहे असें सरकारला वाटत राहिलें असल्यास त्यांत आश्चर्य नव्हतें. महायुद्ध नेटानें चालविण्यास सर्व हिंदी राष्ट्राची आपणांस मनोभावानें मदत झाली पाहिजे अशी इंग्लंडनें विश्वासाची व आग्रहाची मागणी केली व तिला सर्व हिंदी पुढाऱ्यांनीं आपली सक्रिय मान्यता दर्शविली, ह्या एकाच गोष्टीनें राज्यकर्ते व प्रजा यांमधील गैरविश्वासाचे तट निदान तात्पुरते तरी गडगडल्यासारखे झाले. एकंदर ब्रिटिश साम्राज्याच्या लष्करी सामर्थ्याच्या दृष्टीनेंहि साम्राज्याचें सैन्य अपुरें पडेल, अशी ब्रिटिश सेनापतींस धास्ती वाटूं लागली. हिंदुस्थानासारखा ३२ कोटी लोकसंख्येचा देश साम्राज्याचा भाग असतांना इंग्लंडला सैन्याचा तुटवडा पडावा ह्यापेक्षां सरकारच्या लष्करी धोरणाची अनिष्टता सिद्ध करणारा दुसरा पुरावा कशाला ? महायुद्धाच्या चार वर्षांत कित्येक वेळां अशा आल्या कीं, ग्रेट ब्रिटनचें समुद्रा-वरचें वर्चस्व नष्टप्राय होऊन प्रत्यक्ष इंग्लंडवर जर्मनांची स्वारी होणेंहि अशक्य नव्हतें. हिंदुस्थानांतील गोऱ्याकाळ्या तयार फौजा आधींच धुवून रणांगणावर नेल्यावर अशा विकट प्रसंगीं हिंदुस्थानचें संरक्षण करण्यास ग्रेट ब्रिटन कितपत समर्थ होणार होतें ? व हिंदुस्थान इंग्रजांच्या हातून गेल्यावर साम्राज्याचें वैभव तरी किती काळ टिकणार होतें ?

वरील विचार जसे लोकधुरिणांच्या तसेच सरकारी अधिकाऱ्यांच्या मनांतहि घोळत होते. ह्या बाबतींत केसरीवर विशेष, जवळ जवळ असामान्य, जबाबदारी होती. टिळक नुकतेच तुरुंगांतून सुटून आले होते व साम्राज्यास करावयाच्या लष्करी साहाय्याबद्दल त्यांचें व केसरीचें धोरण कोणतें रहातें ह्यावर सरकार आणि लोक ह्या दोहोंचीहि सूक्ष्म नजर होती. टिळकांचें व केसरीचें साहाय्य युद्धविषयक कामगिरीप्रीत्यर्थ मिळविण्याचें सरकारला किती महत्त्व वाटत होतें, हें मॉंटेग्यूसाहे-बांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ‘हिंदुस्थानांतील दैनंदिनीं’तील कित्येक उल्लेखांवरून दिसून येतें. * सरकारला जरूर तें लष्करी व इतर साहाय्य मनोभावानें केलें पाहिजे,

---

* उदाहरणार्थ पान ३७३ वरील पुढील उतारा पहाः—‘ जर मी व्हाइसरॉय असतों तर टिळकांस जरूर दिल्लीला बोलाविलें असतें. ह्या क्षणीं हिंदुस्थानांत त्यांच्याहून अधिक वजनदार पुढारी क्वचितच असेल; आणि त्यांनीं मनांत आणलें तर ते आपणांस युद्धविषयक साहाय्य पुष्कळच करूं शकतील. ’

असेंच इतर पुढाऱ्यांप्रमाणें टिळकांचें व केसरीचें म्हणणें होतें. परंतु ह्या नव्या अनुभवाच्या जोरावर लोकांच्या न्याय्य मागण्या सरकारपुढें मांडून त्या मान्य करून घेण्याची संधि दवडूं नये ही केसरीची विशिष्ट विचारसरणी इतर कांहींजणांस मान्य होण्यासारखी नव्हती. तरी स्वाभिमान व राजकारण ह्यांच्या दृष्टीनें तीच सर्वस्वीं समर्थनीय होती ह्यांत शंका नाहीं.

जर्मनीच्या सहा कोटी लोकसंख्येंत ५५ लक्ष शिपाई, इंग्लंडच्या चार कोटींमध्यें ७ लक्ष, तर हिंदुस्थानच्या ३२ कोटींमध्यें पुरे दोन लाखहि हिंदी शिपाई उपलब्ध होत नाहींत ह्या गोष्टीचा उल्लेख करून, प्रशियासारखें सक्तीचें लष्करी शिक्षण आम्हांस नको, तरी इंग्लंडसारखी स्वयंसेवक सैन्याची पद्धत हिंदुस्थानांत सुरू करावी, म्हणजे संकटकाळीं साम्राज्यास मदत मिळून हिंदुस्थानहि स्वसंरक्षणास समर्थ होईल असें केसरीनें युद्धकाळच्या ह्या विषयावरील आपल्या पहिल्याच लेखांत प्रतिपादिलें आहे. ( २२-९-१४ ). शंभर वर्षांवर राज्यकर्ते व प्रजा ह्यांचा निकट संबंध आल्यावर आणि अनेक लहानमोठ्या संकटप्रसंगीं हिंदी लोकांची साम्राज्यनिष्ठा कसास उतरल्यावरहि सरकारनें ह्या बाबतींत बेभरंवसा दाखवावा हें उचित नाहीं, ही गोष्ट पुढील एका लेखांत, ( २९-९-१४ ), स्पष्टपणें नमूद केली आहे. साम्राज्याचें सामर्थ्य कमकुवत राहिलें तरी बेहेत्तर, परंतु हिंदुस्थानचा स्वाभिमान व संरक्षण ह्यांस सर्वस्वीं आवश्यक असलेल्या लष्करी सुधारणा आम्ही कधींहि करणार नाहीं असें सरकारनें स्पष्टपणें म्हणणें केव्हांहि शक्य नव्हतें. परंतु साम्राज्याच्या दूरवर पसरलेल्या भागांच्या युद्धकालीन संरक्षणाची स्थानिक व खात्रीलायक व्यवस्था पुरेशी नाहीं हें पहिल्या प्रथम महायुद्धाचे वेळीं ध्यानांत आल्यानें सरकारी धोरणावर तसा आक्षेप येणें अशक्य नव्हतें. तोफखाना, बंदुका, दारूगोळा, बाकबगार अधिकारी इत्यादि आवश्यक अंगांचा पुरवठा स्थानिक सामग्रींतूनच केल्याखेरीज तो आणीबाणीच्या वेळीं पुरेसा अगर विश्वसनीय ठरणार नाहीं, असें बडे बडे ब्रिटिश अंमलदार व मुत्सद्दी म्हणूं लागले. त्याचा फायदा घेऊन केसरीनें स्वयंसेवक सैन्य, लष्करी शिक्षण व राष्ट्रीय धोरण ह्यांविषयींच्या आपल्या मागण्या पुन्हां सरकारपुढें मांडल्या. ( ६-१०-१४ ).

लंडन विश्वविद्यालयांतील इतिहासाचे एक अध्यापक प्रो. पोलार्ड ह्यांनीं हिंदी लोक शांतताप्रिय असल्यामुळें स्वसंरक्षणाचें काम परकी लष्करांवर टाकण्यास ते तयार असतात, असें एक विधान केलें होतें. तें हिंदी राष्ट्राची बदनामी करणारें आहे, अशी केसरीची त्यावर टीका होती. लढवय्या जाती आणि बिगरलढाऊ जाती असा एक निष्कारण भेद हिंदुस्थानांतहि अनेक वेळां सरकारकडून उपस्थित केला जातो. वास्तविक पहातां मनुष्य प्राणी हा जात्याच लढाऊ आहे. विशेषतः हिंदुस्थानच्या सर्व भागांत शंभरदीडशें वर्षांपूर्वींपर्यंत नेहमीं अस्वस्थता व बंडाळी उद्भवत असल्यानें सामान्य लोकहि हत्यारें बाळगून व्यक्तिशः व संघटितपणें स्वसंरक्षण

करण्यास समर्थ असत. ह्या बाबतींतील केसरीचे पुढील विचार मननीय आहेत. इंग्लंड हें व्यापारी राष्ट्र म्हणून प्रसिद्ध आहे, असें असून आपल्या व्यापाराच्या संरक्षणार्थ, अगर नवीन व्यापाराच्या आक्रमणार्थ, तेच इंग्रज लष्करी मर्दुमकी गाजवितातच कीं नाहीं ? एखादें राष्ट्र सामान्य वृत्तीनें शांतताप्रिय असलें तरी तें प्रसंगानुसार विळेकोयते टाकून धर्म, स्वातंत्र्य व मालमत्ता ह्यांच्या संरक्षणार्थ तलवार हातीं घेऊन ती गाजविण्यास असमर्थ ठरत नाहीं, हें राजारामाच्या काळच्या महाराष्ट्राच्या उदाहरणावरुनाहि सिद्ध होतें. ' क्षात्रतेज जन्मसिद्धच असतें असें नाहीं......क्षात्रपरंपरा ही इतर परंपरेप्रमाणेंच कालाधीन आहे. '

महायुद्ध सुरू असतां ज्या अनेक रणवार्ता हिंदुस्थानांत येऊन थडकत, त्यांवरून व तत्पूर्वींच्या इतिहासावरूनहि एक उद्वेगजनक विचार मनांत आल्याखेरीज रहात नसे. फौजेंत ज्यांस कनिष्ठ प्रतीचे, अगर व्हाइसरॉयसाहेबांच्या अधिकारपत्राचे हिंदी अधिकारी असें म्हणतात, त्यांची रणांगणावरील कामगिरी, साहस, कौशल्य, जबाबदारी, विश्वसनीयता इत्यादि अव्वल प्रतीच्या लष्करी गुणांत एवढ्या उत्कृष्ट दर्जाची ठरली आहे कीं, त्यांची प्रत्यक्ष ब्रिटिश व इतर लष्करी तज्ज्ञांनींहि मुक्त कंठानें स्तुति केली आहे. असें असून लष्करी शिक्षण, सैन्याचें संपूर्ण हिंदीकरण व फौजेंतील वरिष्ठ दर्जाच्या अंमलदारीच्या जागा ह्या बाबतींतील आपलें धोरण सरकारनें दीर्घकालपर्यंत दिरंगाईचें व गैरविश्वासाचें ठेविलें आहे. ह्या प्रकारास अनुलक्षून केसरीकारांनीं जे पुढील कळकळीचे उद्गार काढले आहेत ते आजहि बव्हंशीं यथार्थ ठरतील:—' काळ्या अधिकाऱ्यांची मजल पायदळांत सुभेदार-मेजर व घोड-
' दळांत रिसालदार-मेजर येथपर्यंतच जाऊं शकते, पुढें जाऊं शकत नाहीं.
' नोकरीचीं सर्व वर्षे भर बहाद्दरीचीं कामें करून मिळवलेले चांद व फिती यांनीं
' ज्यांच्या छातीवर तिळाएवढीहि रिकामी जागा ठेवली नाहीं व ज्यांच्या दाढीचे
' केस पिकून गेले आहेत, अशा अनुभवी व वयोवृद्ध काळ्या लष्करी अधिकाऱ्यांनीं
' गोऱ्या सोजिरांच्या एखाद्या लहानशा तुकडीवर हुकुमत चालविण्याचें तर
' राहोच, पण ज्याला अद्याप मिसरूडहि फुटली नाहीं व पुढें मिळणाऱ्या सर्व
' सन्मानाचिन्हांच्या अभावीं ज्याची छाती अजून कोरी करकरीतच आहे, अशा
' गोऱ्या सब-ऑल्टर्नच्या हाताखालीं, स्वतःच्या म्हणजे काळ्या पलटणींतहि दुय्यम
' तिय्यम ह्या नात्यानें त्यांस काम करावें लागतें ! सरळ शिपाईगिरी हाच ज्यांचा
' बाणा आहे, नोकरी करण्यापलीकडे ज्यांच्या महत्त्वाकांक्षेचा विस्तार पोहोंचत नाहीं
' व केवळ इमानी म्हणवून घेणें हेंच ज्यांचें ब्रीद किंवा इतिकर्तव्य अशा योद्धयां-
' वरहि स्वतंत्र हुकुमत देण्याच्या बाबतींत सरकारचा जर एवढा बेभरंवसा, तर
' खानदानीच्या किंवा मध्यम वर्गाच्या लोकांस इंग्लंडांतल्याप्रमाणें लष्करी शिक्षण
' व कमिशनें देऊन त्यांची लष्करी हौस पुरवावी हें कसें होणार ? पण ' हें कसें
' होणार ? ' एवढेंच म्हणत तक्रार केल्याशिवाय स्वस्थ बसून तरी काय होणार ?

' योग्य प्रसंग पाहून आपलें म्हणणें पुढें मांडलेंच पाहिजे. प्रस्तुतचें युद्ध हाहि एक ' अशांपैकींच प्रसंग आहे. ' ( २७-१०-१४ ).

हिंदी लोकांची लष्करी शिक्षणाबद्दलची मागणी ही केवळ व्यावहारिक राजकारणांतला एक भाग किंवा परचक्रापासून आत्मसंरक्षण करण्याचें अनुकूल साधन एवढ्याच दृष्टीनं महत्त्वाची आहे असें नसून व्यक्ति व समाज ह्यांच्या उच्चतम गुणविकासाचेंहि तें एक आवश्यक अंग आहे असें जें केसरीकारांनीं म्हटलें आहे, ( ३-११-१४ ), तें सर्वस्वीं रास्त आहे. राजकीय व आर्थिक स्वराज्याच्या मागणीचीहि ही सांस्कृतिक बाजू सहसा डोळ्यांपुढें येणारी नसली तरी प्रत्येक राष्ट्रास स्वतःच्या परिस्थितीस व परंपरेस अनुसरून गुणपरिणतीचा मार्ग चोखाळण्यास स्वातंत्र्य लाभल्याखेरीज त्या अगर इतर सर्व राष्ट्रांची मिळून वास्तविक ' प्रगति ' होणार नाहीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

केसरीकारांच्या व इतरांच्या प्रयत्नानें म्हणा अगर युद्धकालीन परिस्थितीमुळें म्हणा, सरकारनें १९१७ सालीं स्वयंस्फूर्तीच्या तत्त्वावर नागरिक फौज उभारण्याची योजना जाहीर केली. ह्याहि योजनेंत अंमलदारीच्या वरिष्ठ जागांचा प्रश्न प्रथम मुग्धांतच ठेविलेला होता. तरीहि केसरीकारांनीं आपल्या नेहमींच्या धोरणानुसार मिळालेल्या संधीचा पूर्ण फायदा करून घेण्याविषयीं जनतेस आग्रहाची विनंति केली.

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥

गीतेंतील वरील प्रसिद्ध व स्फूर्तिदायक श्लोक लेखाच्या शिरोभागीं उद्धृत करून ' ही वेळ आहे, लष्करांत शिरा, ' अशी त्यांनीं महाराष्ट्रीयांस आणि त्यांतल्या त्यांत सुशिक्षितांस आपल्या अर्थपूर्ण वाणीनें हांक दिली. ( २७-२-१७ ). वरिष्ठ अंमलदारीच्या जागांबद्दलहि पार्लमेंटमध्यें स्टेट सेक्रेटरीसाहेबांनीं पुढें लवकरच असें जाहीर केलें कीं, ज्याप्रमाणें इतर पलटणींत कर्तबगारीच्या जोरावर प्याद्याचा फर्जी होतो त्याप्रमाणें नागरिक फौजेच्या पलटणींतहि लायख इसमांस वरिष्ठ अंमलदारीच्या जागांवर बढती मिळेल. या वचनाच्या अनुरोधानें केसरीकारांनीं लोकांसहि ' विश्वासानें विश्वास वाढतो, ' ह्या तत्त्वानुसार वागण्याचा उपदेश केला. राजभक्ति व देशभक्ति, साम्राज्यनिष्ठा व राजकारण ह्या दोहोंचाहि संयुक्त आदेश म्हणून त्यांनीं लिहिलें कीं, ' ज्याला स्वराज्य पाहिजे त्यानें स्वदेशाचें संरक्षणहि केलें पाहिजे. तसेंच ज्या कालाच्या ओघानें स्वदेशाचें संरक्षण करण्यास आपल्यास सरकारचें आव्हान झालें आहे त्याच कालशक्तीनें त्याच सरकारास—आमचा त्या कामीं उद्योग कायम राहिल्यास—स्वराज्याचेहि हक्क आम्हांस द्यावे लागतील हें उघड आहे. ' ( कित्ता ).

नागरिक फौजेसंबंधानें नियम, तक्रारी इत्यादिकांच्या ओघानें पुढेंहि वारंवार ह्याच धोरणानुसार केसरींत मतप्रदर्शन होई. विशेषतः १९१८ सालीं विलायतेंतील सँढर्स्ट येथील लष्करी कॉलेजांत हिंदी तरुणांस प्रवेश मिळण्याची सोय झाली.

तेव्हांपासून केसरीनें बऱ्याच उत्साहानें व आशाजनक रीतीनें लोकांस प्रोत्साहन दिलें. तक्रारी आढळतील तेथें त्या दूर व्हाव्यात व हिंदुस्थानच्या युद्धविषयक कामगिरीचें बीज स्वराज्याच्या कांहीं तरी भरीव हक्कांनीं लोकांस प्राप्त व्हावें, हें वारंवार सांगण्यांत कोणताहि अप्रयोजकपणा आहे असें केसरीनें मानिलें नाहीं, व कसेंहि असलें तरी लोकांनीं लष्करी शिक्षणाची ही संधि वांया दवडूं नये हेंहि आपलें मत त्यांनीं असंदिग्धपणें पुढें मांडिलें. शाळाकॉलेजांतील शिक्षणक्रमास जोडून व शाळाधिकाऱ्यांच्या हुकुमतीखालीं सक्तीचें लष्करी शिक्षण सुरू व्हावें ह्याविषयीं त्या वेळीं पंजाबमध्यें एक चळवळ सुरू झाली होती; तिला केसरीनें दुजोरा दिला. परंतु शाळाकॉलेजांच्या अधिकाऱ्यांवर इतका विश्वास टाकण्यास सरकार तयार होणार नाहीं, असेंहि त्याच वेळीं भाकीत केलें. अखेरीस तेंच खरें ठरलें हें सांगावयास नकोच.

युद्धोत्तर काळांत लष्करी शिक्षणाचा प्रश्न पुष्कळच व्यवहार्यतेच्या क्षेत्रांत आला. जबाबदारीचें स्वराज्य हिंदुस्थानांत स्थापावयाचें व त्या ध्येयप्राप्तीचे मार्ग म्हणून सर्व खात्यांचें हिंदीकरण व कायदेमंडळांत लोकप्रतिनिधींचें वर्चस्व हीं अमलांत आणावयाचीं ह्या सुधारणांस सरकार वचनबद्ध झालें. डॉ. परांजपे ह्यांची सीनेटमधील व बाहेरील सुशिक्षित तरुणांच्या लष्करी शिक्षणाबद्दलची खटपट आणि ह्याच विषयासंबंधाचे डॉ. मुंजे ह्यांचे एकनिष्ठ, चिकाटीचे आणि स्पृहणीय प्रयत्न ह्यांचा केसरीनें वेळोवेळीं पाठपुरावाच केला आहे. आठ हिंदी पलटणींतील अंमलदारांच्या सर्व जागांचें क्रमशः हिंदीकरण ( १९२३ ), शी कमिटीचा रिपोर्ट ( १९२४ ), स्कीन कमिटीची चौकशी व रिपोर्ट ( १९२६-२८ ), नाविक शिक्षणाचा उपक्रम, इत्यादि अलीकडील प्रश्नांसंबंधाचें केसरीचें धोरणहि त्याच्या परंपरागत तत्त्वांस अनुसरूनच आहे. हे विषय व केसरीचीं त्या त्या बाबतींतील मतें आणि कामगिरी हीं वाचकांच्या आठवणींत ताजीं असल्यानें त्यांबद्दल येथें विस्तार करून जागा आडविणें रास्त होईल असें वाटत नाहीं.

संपादकीय मजकुराखेरीज इतरांचेंहि लष्करी शिक्षण व तदनुषंगिक विषय ह्यांवर कित्येक लेख केसरींत वेळोवेळीं प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतल्यात्यांत ‘ एक लष्करी तज्ज्ञ ’ ह्या टोपण नांवानें जे पांच सहा लेख गेल्या सहा सात वर्षांत आलेले आहेत ते माहिती, कोटिक्रम व विधायक सूचना ह्यांनीं मंडित असेच आहेत. १८९० सालीं लष्करी शिक्षणाचा जो प्रश्न रानडे अगर टिळक यांसारख्या वेंचक पुढाऱ्यांखेरीज इतरांस निव्वळ अव्यवहार्य वाटत असे, तो १९१८ सालापासून नित्य परिचयाच्या अशा सार्वजनिक विषयांच्या यादींत येऊन बसावा ह्यांत काळाचा महिमा तर खराच; परंतु केसरीकारांची कामगिरीहि त्यांनीं आपल्या २७-१०-१४ च्या लेखांत म्हटल्याप्रमाणें, ‘ ‘ पण हें कसें होणार ? ’ एवढेंच म्हणत तक्रार केल्याशिवाय स्वस्थ बसून तरी काय होणार ? प्रसंग पाहून आपलें म्हणणें पुढें मांडलेंच पाहिजे, ’ ( १८-३-९० ), ह्या व्यवहारयुक्त व

परिणामकारक तत्त्वास अनुसरून होत राहिल्यानें सदरहू परिवर्तनास पुष्कळच मदत झाली, हें सर्वांनीं कबूल केलें पाहिजे. लष्करी सुधारणांचा ह्यापुढील काळ अधिक विधायक, तपशीलवार व शास्त्रशुद्ध विवेचनास अनुकूल असा होणार हें स्पष्ट दिसत आहे. त्याहि बाबतींत केसरीकारांची कामगिरी त्यांच्या आजवरच्या कामगिरीच्या तोडीची होईल अशी आशा प्रदर्शित करून हा लेख पुरा करितों.

---

# अँग्लो-इंडियन प्रतिस्पर्धी

[ श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, बी.ए. ]

कौटिल्यानें राजकीय शत्रुत्वाच्या अनेक प्रकारांत नैसर्गिक शत्रुत्वाचा म्हणून एक प्रकार कल्पिला आहे. व या प्रकारांत त्यानें सरहद्दीला भिडलेलीं राष्ट्रें घातलेलीं आहेत. याचा अर्थ शेजारचें राष्ट्र मित्रराष्ट्र असणार नाहींच असा नव्हे. तथापि हितसंबंधाचे दृष्टीनें त्याच्याशीं विरोध येण्याचाच संभव अधिक ! असाच प्रकार कांहीं अंशीं केसरीचा व अँग्लो-इंडियन पत्रांचा झाला आहे. वस्तुतः अँग्लो-इंडियन पत्रांचा अवतारहि या हतभागी देशाचा 'उद्धार' करण्याकरितांच आहे ! व या गोष्टीचा तीं पत्रें वेळीं अवेळीं उल्लेखहि करतात. परंतु त्या पत्रांच्या म्हणा—अथवा आमच्या देशाच्या म्हणा—दुर्दैवानें त्यांचे आमचे हितसंबंधच असे येतात कीं, त्यांचे उद्धाराचे मार्ग आमच्या विश्वासाच्या पुढाऱ्यांस पटत नाहींत.

या नैसर्गिक विरोधास दोन्ही पक्षांच्या जन्मापासूनच सुरुवात आहे. अँग्लो-इंडियन पक्ष एका दृष्टीनें कोणत्याहि सुसंघटित हिंदी राष्ट्रीय पक्षाहून जुना आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. अर्थातच पहिला कांहीं काळ या मंडळींस राजकीय क्षेत्रांत 'एकमेवाद्वितीयम्' चमकावयास सांपडलें. तरी लौकरच ज्यांना आपण जुन्या पिढींतील नेमस्त पुढारी म्हणतों, अशा तेलंगमंडलिकादि मंडळींनीं त्यांच्याशीं मधून मधून दोन हात करण्यास सुरुवात केली. मेथांना तर पुढें स्वतःचें इंग्रजी दैनिकच काढावें लागलें. तथापि या काळांत अँग्लो-इंडियन पत्रांनीं हिंदी पुढाऱ्यांचें कौतुक केल्याचे व हिंदी पुढाऱ्यांनीं अँग्लो-इंडियन पत्रांस आपलींच मुखपत्रें समजल्याचे अनेक प्रसंग दाखवितां येतील. पण लौकरच त्यांचें खरें स्वरूप पूर्णपणें ओळखणारा आणि

" व्रजन्ति ते मूढधियः पराभवं भवन्ति मायाविषु ये न मायिनः "

हें तत्त्व न विसरतां त्यांच्याशीं त्यांच्याच नीतीनें वागणारा पक्ष अस्तित्वांत आला. अर्थातच या पक्षाच्या मुखपत्राचा व अँग्लो-इंडियन पत्रांचा अव्याहत विरोध दिसून आल्यास नवल नाहीं. किंबहुना, केसरी जन्मास येईपर्यंत अँग्लो-इंडियन पत्रांस तुल्यबल

प्रतिस्पर्धी भेटलाच नव्हता म्हटलें तरी चालेल. त्यांच्याशीं विरोध करणारीं व हिंदी राष्ट्राचें म्हणणें निर्भीडपणें मांडणारीं अनेक पत्रें होतीं. तथापि त्यांचें स्वयंभू 'पुढारीपण' व दिखाऊ संभावितपणा पुरतेपणीं ओळखून कोणत्याहि प्रसंगीं त्यांच्या काव्यास बळी न पडणारा केसरीच काय तो होता व म्हणूनच कोणत्याहि अंगावर घेतण्याच्या प्रसंगीं 'येनकेन प्रकारेण' केसरीला गोंवून देण्यांत अँग्लो-इंडियन मंडळींस विशेष उत्साह वाटे व उलट केसरीहि त्यांचा दांभिक उपदेश चवाठ्यावर आणून आपल्या इतर व्यवसायबंधूंसहि जागृत ठेवण्याचें व्रत अप्रतिहतपणें चालवी.

प्रसंगविशेषीं उडणाऱ्या चकमकींनीं समाधान न होऊनच कीं काय केसरीनें हिंदी राष्ट्राच्या या स्वयंभू प्रतिनिधींचें स्वरूप एकदां स्पष्टपणें वर्णिलें आहे.

'अँग्लो-इंडियन पत्रकार म्हणजे आपणांस जिंकलेल्या प्रजेचे ईश्वरनिर्मित उपदेशक 'व वाटाडे समजत असतात......जणों सर्व आशियांतील लोकांनीं एकत्र जमून 'आपलीं सुखदुःखें निरूपण करण्यास त्यांस अधिकार दिलेला आहे.'(११-९-०६). पण मुक्या जनतेचे पुढारी म्हणवून घेतां घेतां या पत्रांस याच जनतेच्या खऱ्या पुढाऱ्यांवर टीका करण्याचे प्रसंग हळू हळू येऊं लागले. तरीहि या टीकेचें स्वरूप त्यांनीं सामान्यतः पोक्त उपदेशाचेंच ठेविलेलें असे. या पोक्त सल्ल्याच्या आवडत्या विषयांपैकीं प्रमुख म्हणजे राजद्रोह आणि राजनिष्ठा ! केसरीनें प्रसंगविशेषीं व्हाइसरॉयांच्या परिवारांतील अधिकाऱ्यांच्या वर्तनावर टीका केली, तरीहि यांच्या नाजुक दृष्टीस त्यांत राजद्रोह दिसे आणि मग केसरीसहि 'असले राजद्रोह आमचे हातून व्हायचेच. वाटल्यास कायदा बदलून घ्या,' (२०-२-९६), असें सांगण्याची पाळी येई. केसरीची ही मागणी सरकारनें किती अगत्यपूर्वक पुरविली हें प्रसिद्धच आहे.

पण कधीं कधीं राजद्रोहाच्या बाबतींतील या पत्रांचा पोक्त उपदेश याहून संशयास्पद स्वरूप धारण करी व एकादा कच्च्या दिलाचा संपादक त्यांचा उपदेश ऐकून गोत्यांतहि आला असता. रँडसाहेबांच्या खुनानंतर उडालेल्या धामधुमींतहि केसरीनें आपलें डोकें शांत ठेविलें आहे हें न पाहवल्यामुळेंच कीं काय, मुंबईच्या चँपियन नामक अँग्लो-इंडियन पत्रानें त्यास वरील प्रकारचा उपदेश केला होता. चँपियनकारांच्या मनांत 'काळ' पत्रांत चाफेकरांसंबंधीं आलेल्या कांहीं मजकुराविषयीं थोडा राग होता. परंतु मौज ही कीं, 'काळा'वर लिहिण्यानें समाधान न होऊन सदर पत्रानें या वाग्युद्धांत केसरीस ओढण्याचा यत्न केला होता. काळ पत्रांतील चाफेकरांसंबंधींच्या मजकुराचा निषेध केसरीनें करावयास हवा असें या पत्राचें म्हणणें होतें व तसें करण्याविषयीं त्यानें केसरीस 'आव्हान' दिलें होतें. पण सुदैवानें यांतील कावा न ओळखण्याइतका सात्त्विकपणा केसरीच्या अंगीं कधींच नव्हता. 'काळांतील लेखांवर टीका करीत असतां आमच्या बंधूंस 'मध्येंच आमच्यासंबंधीं विधान करण्याची काय जरूर होती समजत नाहीं,' (२८-३-९९), असा उलट आहेर करून पुढें मोजक्याच परंतु तर्कशुद्ध शब्दांत

केसरीनें आपली तर्कशक्ति शाबूद असल्याची जाणीव करून दिली आहे. ' ज्या गोष्टीचा अव्हेर किंवा निषेध करावयाचा ती पहिल्यानें प्रत्यक्ष किंवा परोक्ष अंगीकृत केलेली असली पाहिजे. ' प्राप्तौ निषेधः ' अशी संस्कृतांत म्हण आहे, तिचाहि अर्थ हाच होय. ' ( २८-३-९९ ). याप्रमाणें केसरीनें या मानभावी उपदेशास उडवून लाविलें होतें.

अशा रीतीनें केसरी जाळ्यांत अडकत नाहीं हें पाहून इकडील अँग्लो-इंडियन पत्रांस हात चोळीत बसावें लागलें तरी त्यांचीं इंग्लंडमधील भावंडें यांच्याहि पुढें गेलीं. सन १८९९ च्या अखेरीस लॉर्ड नॉर्थकोट मुंबईचे गव्हर्नर म्हणून यावयास निघाले. त्यांस सांप्रदायिक बोधामृत पाजतांना विलायतेंतील ' ग्लोब ' पत्रानें टिळक व धूर्त ब्राह्मण मंडळी यांचेवर फूत्कार सोडिले होते. मुंबई इलाख्यांतील खुनाची चळवळ टिळकांच्या तंत्रानें चालली आहे, असें म्हणण्याचें धाडस या विलायती पत्रानें केलें होतें. जें स्वतःस म्हणावेंसें वाटत होतें पण म्हणण्याचें धाडस होत नव्हतें तें आपल्या विलायती भावंडानें म्हणून टाकलेलें पाहतांच मुंबईच्या 'टाइम्स'ला पुत्रजन्मोत्सव वाटल्यास काय नवल ? त्यानें तात्काल ' ग्लोब 'चें मत विलायतेंतील लोकमत म्हणून उद्धृत केलें !

या प्रकरणाची उपेक्षा न करितां या धृष्ट मंडळींस न्यायासनासमोर खेंचण्याचें टिळकांनीं ठरविलें. इंग्रजांचें माफी मागण्यांत दिसून येणारें धैर्य प्रसिद्धच आहे! या प्रसंगीं मुंबईच्या ' टाइम्स 'नें केस न लढवितांच माफी मागितली व ग्लोबनें लढण्याचा आव आणून अखेर पडतें घेतलें हें प्रासिद्धच आहे. अशा रीतीनें अत्याचारप्रवर्तनाच्या जबाबदारींत केसरीला गुंतवितां गुंतवितां हे दोघेहि वीर अखेर सपशेल माफी मागून मोकळे झाले !

राजनिष्ठेच्या उपदेशांतहि अँग्लो-इंडियन मंडळींचा हाच झोंक असे. प्रिन्स ऑफ वेल्ससारख्या राजपुरुषांच्या आगमनाच्या वेळीं तर यांच्या राजनिष्ठेस पारावारच उरत नसे. वास्तविक राजघराण्याविषयीं हिंदुस्थानांतील कोणत्याहि राजकीय पक्षानें कधींच अनादर दाखविलेला नाहीं. परंतु अँग्लो-इंडियन मंडळींस एवढ्यानें समाधान नसे. राजघराण्यांतील व्यक्तीच्या आगमनानें आपलीं पापें धुवून निघावीं व राजवैभवाच्या तेजांत लोकांनीं आपलीं दुःखें विसरावीं अशी यांची अपेक्षा असे. १९०५ सालीं राजपुत्राचे आगमनाचे प्रसंगीं केसरी लिहितो :—' सुवर्णभूमीच्या मुक्या व अज्ञान लेंकरांस नेहमीं अर्धपोटीं निजण्याची ' व दुष्काळांत उपाशी मरण्याची पाळी आली......अशा स्थितींत युवराजांचें ' नुसतें दर्शन आमचा उद्धार कसा करणार ? ' ( ७-३-०५ ). तथापि या बहुतेक चकमकींत केसरीविरुद्ध अँग्लो-इंडियन पत्रें अशी स्थिति असल्यामुळें केसरीस थोडी नेमस्त भाषा वापरावी लागली होती. परंतु लौकरच या बेफाम पत्रांनीं सुरेंद्रनाथांसारख्या सन्मान्य हिंदी पुढाऱ्यांवर अश्लाघ्य टीका करून

केसरीस आपला पंजा दाखविण्याची चांगलीच संधि दिली. हा प्रसंग सुरेंद्रनाथांच्या शांत्यभिषेकामुळें ( यालाच कित्येक मूर्ख व धूर्त राज्याभिषेक म्हणत ) आला. स्वदेशी चळवळीच्या ऐन भरांत बंगाली जनतेनें सुरेंद्रनाथांची देशसेवा व अनेक अलौकिक गुण लक्षांत घेऊन त्यांस शांत्यभिषेक करून त्यांचा सत्कार केला. परंतु हिंदु धर्मातील संस्कारांची यत्किंचित् माहिती नसतां व ती करून घेण्याची तसदी न घेतां, ' टाइम्स 'नें शांत्यभिषेकासच राज्याभिषेक ठरवून सुरेंद्रनाथांस ' विदूषक राजा ' म्हणून हिणविलें होतें. टाइम्सच्या खोट्या ओरडीमुळें विलायतेंतहि या प्रकारासंबंधीं गवगवा झाला आणि मुंबईचीं कांहीं नेमस्त पत्रेंहि या कपटी कंड्यांस बळी पडलीं. तथापि केसरीनें आपली धीर वृत्ति ढळूं न देतां प्रस्तुत प्रकाराचें वास्तविक स्वरूप जनतेपुढें मांडिलें. या वेळचा ' मुंबईच्या टाइम्सचा बेशरमपणा, ' (११-९-०६), हा अग्रलेख पाहिल्यास इतर पत्रांहून टाइम्सचा केसरीशीं विरोध कां, हें सहज लक्षांत येतें. प्रस्तुत अग्रलेख अनेक दृष्टींनीं वैशिष्ट्यपूर्ण आहे.

' विलायतेंतील प्रमुख दैनिक पत्रांच्या हापिसांत वर्तमानसाराचें प्यारे लिहिण्याचें ' कामहि ज्यांस मिळेल कीं नाहीं याची शंका, अशा प्रकारचीं अँग्लो-इंडियनांचीं ' 'सिव्हिल सर्व्हिसला नालायक ठरलेलीं' पोरें इकडे येऊन एकाद्या अँग्लो-इंडियन पत्राचीं ' एडिटरें झालीं, म्हणजे मग त्यांच्या उद्दामपणास, घमेंडखोरीस आणि अहंमन्यतेस ' सीमा नाहींशी होते....आणि हव्या त्या बाबतींत आपला पोक्त उपदेश ' देण्यास तीं नेहमीं एका पायावर तयार असतात. ' ( ११-९-०६ ). याप्रमाणें या अहंमन्य संपादकांची संभावना करून पुढें केसरीनें शांत्यभिषेक म्हणजे काय याची मीमांसा केली होती. ' डोक्यावर फुलें अथवा गजरे घालण्यास युरोपांत कांहींहि अर्थ ' असो, आमच्याकडे तर घरोघर नवरानवरीहि त्या मानास पात्र ठरतात आणि ' पुण्याहवाचनाच्या वेळीं शांत्यभिषेक तर सामान्य स्त्रीपुरुषांसहि होतो ! मग ' यांत एडवर्ड बादशहांचा मुकुट आज सुरेंद्रनाथांच्या डोक्यावर पडतो कीं ' काय, अशी शंका घेण्याचें कारण काय ? ' ( ११-९-०६ ). अशा रीतीनें अज्ञान व कपट या दोहोंचेंहि माप एकदमच टाइम्सच्या पदरांत घालून मुंबईपासून लंडनपर्यंत पसरलेली सुरेंद्रनाथांच्या राज्याभिषेकासंबंधींची आवई केसरीनें लीलेनें खोटी पाडली ! केसरी अशा काल्पनिक धामधुमीनें तर बावरून जातच नसे. परंतु प्रत्यक्ष बिकट राजकीय परिस्थितींत देखील डोकें शांत ठेवून योग्य तो सल्ला योग्य शब्दांत देत असे. पोकळ शब्दावडंबर अथवा भावनाप्रधान लेखन हा केसरीचा कधींच विशेष नव्हता. एखाद्या आणीबाणीच्या प्रसंगीं अथवा डावपेंचांच्या प्रश्नांत केसरी काय लिहितो व किती लिहितो, यापेक्षां काय लिहिण्याचें टाळतो, अथवा लिहावयाचेंच झाल्यास किती थोडक्यांत अंगुलिनिर्देश करून मोकळा होतो हें पाहण्यासारखें आहे. ( आणि म्हणूनच इतक्या गंडांतरांतून निभावून केसरीला ज्युबिली साजरी करितां आली ). जहालपणाबरोबरच सावधपणाचाहि उपयोग केसरी प्रसंग-

विशेषीं कसा करी हें १९०८ च्या कलकत्ता येथील राजकीय कटांतील माफीचा साक्षीदार नरेंद्रनाथ गोस्वामी याच्या खुनावरून उत्पन्न झालेल्या वादांत पहावयास सांपडतें. या कटांतील दोघां आरोपींनीं आणखी शोध लागूं नये म्हणून सदर माफीच्या साक्षीदाराचा खून केला होता. राजकीय खुनाच्या बाबतींत लावण्याचीं विशेषणें इतकीं ठराविक झालीं आहेत कीं, त्यांत केवळ कानामात्रांचा फरक होतांच राजद्रोह होतो हें प्रसिद्धच आहे. तथापि मौजेची गोष्ट म्हणजे पायोनियरसारख्या ॲंग्लो-इंडियन पत्राच्या सत्यनिष्ठेनें व युक्तायुक्त विचारानें अचानक याच वेळीं उचल खाल्ली व ह्या खुनास नेहमींप्रमाणें ‘ भ्याडपणाचा, पशुतुल्य ’ इत्यादि विशेषणें न लावितां खुनाखुनांतहि अंतर आहे हें प्रतिपादण्यास त्यानें सुरुवात केली. यामुळें पायोनियरचा व इतर ॲंग्लो-इंडियन पत्रांचा त्या वेळीं बराच वाद माजला होता. पायोनियरचें म्हणणें असें पडलें कीं, या खुनास जर भ्याडपणाचा म्हणावयाचें तर पैशाच्या लोभानें झोंपीं गेलेल्या म्हातारीस ठार करणाऱ्यास तुम्ही काय म्हणणार ? आणि कामांध होऊन कामविषय झालेल्या बालिकेचा जीव घेणाऱ्यास कोणते शब्द लावणार ? हा खून तर केवळ इतर आरोपींचा जीव बचावण्याकरितां स्वतःच्या जिवावर उदार होऊन केलेला आहे. अर्थात् हिंदी वर्तमानपत्रांनीं केल्यास जो अत्याचारप्रवर्तक ठरतो तो हाच युक्तिवाद होय, हें सहज कळण्यासारखें आहे.

या बाबतींत स्वतःचें कोणतेंच मत न देतां केसरीनें या वादाचा उल्लेख करून पायोनियरचें म्हणणें तेवढें व्यवस्थितपणें दिलें होतें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. (८-९-०८). परंतु केसरी तेवढा पुरून उरला म्हणून ॲंग्लो-इंडियन पत्रांस कोठेंच यश येत नव्हतें असें मात्र नव्हे व त्यांचा रोखहि विशेषेंकरून नेमस्त मंडळी व विलायतेंतील लोकमत यांकडेच असे. प्रथमपासून कॉंग्रेसच्या नेमस्त पुढाऱ्यांसहि मूर्ख ठरविण्याचा क्रम त्यांनीं चालविला असून मधून मधून याच ‘ मूर्खांची ’ ( १३-११-०६ ), मुंबईच्या टाइम्सला मोठी करुणा येई. मवाळांनीं वाढविलेली कॉंग्रेस टिळकांचा ‘आडदांड’ पक्ष मोडून टाकील असा इषारा देण्यास यानें सुरुवात केली होती. अर्थात् या नेपथ्यपाठाचा उपयोग नेमस्तांपुरताच आहे, हें तो जाणून होता. केसरीनें या काव्यास योग्य वेळीं चोख उत्तरें देऊन पार्लमेंटमध्येंहि पक्षभेद असतात, तर ते कॉंग्रेसमध्येंच घातुक कां ठरावेत असा सवाल केला होता. परंतु राष्ट्राच्या दुर्दैवानें या प्रश्नाला सुरत कॉंग्रेसच्या वेळीं ॲंग्लो-इंडियनांना अनुकूल असेंच उत्तर मिळालें, आणि युक्तिवादांत नसली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत टिळक-पक्षावर ॲंग्लो-इंडियन पत्रांची मात झाली. मवाळ-जहालांत फूट पडली, केसरीचे लोकमान्य संपादक कारागृहांत धाडले गेले व ॲंग्लो-इंडियनांचा देशहिताचा उपदेश पूर्वींप्रमाणेंच चालू राहिला ! इतकेंच नव्हे तर या विजयांत भर घालण्याकरितां त्यांनीं आपल्या आजोळहून जादा कुमक मागविली होती. साम्राज्यांत कोठेंहि गडबड असल्यास आपले प्रतिनिधि पाठवून तेथील वृत्तांताचें आपल्या दृष्टीचें म्हणून एक वर्णन जगजाहीर

करण्याचा ज्यानें विडाच उचलला आहे असा लंडन टाइम्स हिंदुस्थानांतील या अस्वस्थतेच्या काळांत स्वस्थ कसा बसणार? हिंदुस्थानांतील अँग्लो-इंडियन बांधवांना नवा कित्ताच घालून देण्याकरितां लंडन टाइम्सनें या वेळीं चिरोलसारख्या मुरलेल्या राजकीय प्रतिनिधीस हिंदुस्थानांत धाडून दिलेलें होतें. हिंदुस्थानांत येतांच चिरोलांनीं या प्राचीन देशाच्या प्राचीन रोगाचें निदान अल्प काळांतच केलें व आपले शोध इंग्रजी जनतेस सुमारें सदतीस लेखांत निवेदन केले. ज्यांच्या उत्तराची अँग्लो-इंडियन मंडळींस सदैव धास्ती वाटावी ते तर आधींच तुरुंगात डांबले गेले होते. यावरून या वाग्युद्धाच्या धर्म्याधर्म्यतेची मीमांसा सुज्ञ करतीलच. तथापि मागें उरलेल्यांनीं उत्तर द्यावें म्हटल्यास याच सुमारास 'प्रेस ॲक्ट' अवतीर्ण झाला होता. अर्थात् हिंदी राष्ट्रीय चळवळीवर आणि विशेषेंकरून टिळकपक्षावर झालेल्या या प्रचंड हल्ल्यास केसरीला त्या वेळीं कांहींच उत्तर देणें शक्य नव्हतें. त्या वेळचा केसरी म्हणतो, 'या सदतीस तोफांस उत्तर देणें तूर्त सुरक्षित नाहीं.' ( २०-९-१० ).

अपेक्षेप्रमाणें ही लेखमाला लवकरच पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली. इतकेंच नव्हे तर या राजकीय ज्ञानामृताचा लाभ मराठी वाचकांस कदाचित् मिळणार नाहीं या भीतीनेंच कीं काय कोल्हापूरदरबारच्या खास आश्रयाखालीं याला मराठी पेहेरावहि चढविण्यांत आला. चिरोलसारखा लेखक, सर आल्फ्रेड लायलसारखा प्रस्तावना-लेखक, छत्रपती आश्रयदाते, आणि डोंगरे भाषांतरकार! मूळ ग्रंथ खुद्द लॉर्ड मोर्ले यांस अर्पण केलेला! केसरी लिहितो 'कोण ही महत्त्वपरंपरा!' ( ३-१०-११ ).

या अप्रिय विपयासाठीं केसरीला एक स्वतंत्र अग्रलेख खर्चीं घालावा लागला. प्रेस ॲक्टच्या पेटलेल्या कढ्यांतून केसरीनें प्रस्तुत विषारी लिखाणावर किती चवताळून उडी घातली हें त्या वेळच्या वाचकांसच विशेष ठाऊक! प्रस्तुत अग्रलेख—'चिरोल-भाष्य भाषांतर'—त्या काळीं कित्येक महिने लोकचर्चेचा विषय होऊन राहिला होता. प्रस्तुत ग्रंथांतील राजकीय तत्त्वज्ञानाचें व 'पोक्त विचाराच्या कलहा'चें विशेष विवेचन करण्याचें कारणच नव्हतें. कारण हिंदुस्थानच्या परिस्थितीसंबंधीं अँग्लो-इंडियनी दृष्टिकोनानें लिहिलेल्या पोक्त विचारांचें त्या वेळीं पेंवच फुटलें होतें. केसरी म्हणतो, 'हिंदुस्थानांतील अस्वस्थता अलीकडे कांहीं दिवस वानराच्या जखमेप्रमाणें होऊन बसली आहे.' (३-१०-११). पण मुख्य प्रश्न गोऱ्या हाताला हात लावणाऱ्या काळ्या आदमींचा होता. केवळ भाषांतर करून अथवा चिरोलसाहेबांस माहिती पुरवूनच या व्यक्ति थांबल्या नव्हत्या. त्यांना सत्याबरोबरच व्यक्तिशः टिळकांचाहि अपमान करावयाचा होता व म्हणूनच हा सर्व लाजिरवाणा सोहळा ते इतक्या उजळ माथ्यानें करीत होते. या नीचपणाकडे कानाडोळा करणें त्या वेळच्या उदास वातावरणांतील गांभीर्यांतहि केसरीला शक्य नव्हतें. लोकमान्य टिळकांचा महाराष्ट्रीयांकरितां लिहि-लेल्या ग्रंथांत अरे-तुरेनें उल्लेख! राष्ट्रीय दृष्ट्याच काय पण केवळ वाङ्मयिक दृष्ट्याहि

यांत सदभिरुचीचा व शिष्टाचाराचा खून झाला होता हें उघड आहे. मोठ्यांचा एकेरी उल्लेख कांहीं विशिष्ट प्रसंगींच युक्त गणला आहे, अशा अर्थाचा भोज-प्रबंधांतील उल्लेख देऊन केसरी म्हणतो, ' राजश्री डोंगरे हे कांहीं नेणतेपणानें शेण ' खाणारे...पोर नाहींत. मग त्यांच्या या अश्लाघ्य सलगीचा अर्थ काय घ्यावयाचा?' केसरी केवळ नेमस्त शब्दांत उत्तर देतो, ' अर्थात् हें (डोंगऱ्यांच्या) उथळ व ' हलकट मनाचें प्रदर्शनच वाटतें. ' ( ३-१०-११ ).

प्रस्तुत गर्जनेचे पडसाद विलायतच्या किनाऱ्यापर्यंत पोहोंचले होते हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. विलायतेंत आणि अँग्लो-इंडियन मंडळींत प्रस्तुत ग्रंथास बायबलासारखा मान मिळूं लागला हें सांगणें नकोच. व सदर ग्रंथाचा लेखक तर हिंदुस्थानच्या राजकीय रोगावर धन्वंतरीच ठरला, त्यामुळेंच कीं काय कोण जाणे, हिंदी प्रश्नांवर मरेपर्यंत खरेंखोटें लिहिण्याचा त्यानें जणूं संकल्पच केला होता ! परंतु १९१० सालचें ' निर्वीर ' असें ' उर्वीतल ' त्यास फार काळ लाभलें नाहीं. प्रस्तुत पुस्तकांतील विधानांच्या बाबतींत टिळकांस अखेर ब्रिटिश कोर्टांत न्याय मिळाला नसला तरी टिळकांच्या वाढत्या राजकीय व्यापानें चिरोलसाहेबांच्या पुस्तकांतील आरोपास बिनतोड उत्तर दिलें होतें.

सन १९१४ सालीं युद्धाच्या वेळची परिस्थिति पाहून टिळकांनीं राजनिष्ठेचा पुनरुच्चार केला आणि हिंदुस्थानांतील सर्वच वजनदार पक्ष इंग्लंडच्या या संकटाच्या वेळीं पूर्ण राजनिष्ठ होते. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, हिंदुस्थानांतील सर्व पक्षांची राजनिष्ठा पाहून जर्मनीला वाटलें नसेल इतकें आश्चर्य चिरोलादि मंडळींस वाटूं लागलें ! अशा राजनिष्ठेचें कौतुक करावयाचें सोडून त्यांनीं यांतहि हिंदुस्थानचा स्वार्थ आहे असें प्रतिपादण्यास सुरुवात केली. याबद्दल केसरी लिहितो, ' आम्ही ' राजनिष्ठ कां, किंवा आमचे पोटांत दुखतें किती हें चिरोलला जास्त कळतें ' कीं आम्हांला ? ' ( ३-११-१४ ). इकडे मुंबईचा टाइम्सहि टिळकांच्या राजनिष्ठेमुळें गांगरून गेला होता. राजद्रोहाहूनहि त्यास टिळकांच्या राजनिष्ठेचीच अधिक भीति वाटत होती कीं काय कोणास ठाऊक ! टिळकांची राजनिष्ठा देखील राजद्रोहात्मकच असणार असें त्यास राहून राहून वाटे, परंतु तें सिद्ध कसें करावयाचें ? बरें, नेहमींच्या पद्धतीनें भरमसाट लिहावें तर टिळकांनीं या राजश्रींना एकदां कोर्टांतहि खेंचलेलें ! पण अखेर टिळकांवरील १९१६ सालांतील जामिनाच्या खटल्यामुळें ही संधि त्यास आयतीच मिळाली व टाइम्सनें आपल्या शीलास शोभेसाच तर्क या खटल्यावरून काढला. ज्या अर्थी हा कावेबाज ब्राह्मण चवदा सालीं राजनिष्ठ आणि सोळा सालीं राजद्रोही बनतो, त्या अर्थी त्याचें सोळा सालचें वर्तन तेवढें खरें ! पण अखेर हायकोर्टानें टिळकांस दोषमुक्त ठरविलें ! फिरून बिचाऱ्या ' टाइम्स 'ची स्थिति केंविलवाणी झाली. त्यास ' ग्लोब ' प्रकरणांत मागाव्या लागलेल्या माफीची आठवण होऊन, ' मॅजिस्ट्रेटचा निकाल होतांच

आम्ही याईनें जी टीका केली ती आतां आम्ही सर्वस्वीं परत घेतों, ' असें जाहीर करावें लागलें !

पण अँग्लो-इंडियनी सद्दीचा काळ संपत आला होता. ' आठ सालच्या दुहीचा ' हर्ष मावळून ' सतरा सालच्या एकीचा दुःखद प्रसंग पहाण्याचें त्यांच्या नशिबीं आलें होतें. अर्थातच ही एकी खरी नव्हे असें म्हणणेंच काय तें त्यांच्या हातीं होतें. लखनौ कॉंग्रेसच्या अध्यक्षांच्या भाषणावर मुंबईचा टाइम्स लिहितो, ' राष्ट्रीय ' पक्षांतील दोन पक्षांपैकीं कोणता पक्ष खरोखर नामशेष झाला व राष्ट्रीय सभा ' आपल्या मूळ तत्त्वांस धरून चालत आहे कीं नाहीं हें कालांतरानेंच कळणार ' आहे. ' यावर केसरीनें एकच मार्मिक वाक्य लिहिलें आहे, ' आमचीहि भिस्त ' टाइम्सकारांप्रमाणें काळावरच आहे ! ' ( २-१-१७ ).

टिळकांच्या मृत्यूमुळें तरी टिळकांच्या राजद्रोहाविषयींची अँग्लो-इंडियनांची भीति कमी होईल असें वाटलें होतें. टिळक वारल्यानंतर तीनचार वर्षांनीं श्री. स. वि. बापट यांनीं प्रसिद्ध केलेल्या आठवणी वाचून टिळकांच्या भयंकर राजद्रोहाच्या आठवणी टाइम्सला फिरून येऊं लागल्या. अशा सत्कार्यांत मदत करणाऱ्या हिंदी लोकांची टाइम्सला कधींच उणीव पडलेली नव्हती. १८९७ सालीं केसरींतील लेखांचें रहस्य सांगण्याचें काम ' जस्टिस ' नामक कोणी बुरखेवाला लेखक करीत होता, तर १९२४ सालीं तें काम 'हिस्टेरिकस ' नामक कोणा लेखकाकडे आलें होतें. टिळकांच्या कांहीं प्रसंगींच्या उद्गारांवरुन प्रस्तुत लेखकानें त्यांस बंडाला प्रोत्साहन देणारे ठरविलें होतें. ' हिस्टेरिकस् 'च्या या अपस्मारोद्गारांस केसरीनें एका विस्तृत अग्रलेखांत उत्तर दिलें असून ( १६-१२-२४ ), निराशेच्या वेळीं बंडाचा केवळ उल्लेख करणें अथवा बंडाची केवळ तात्त्विक चर्चा करणें म्हणजे बंडाला प्रोत्साहन देणें नव्हे व यांत जर बंडाला प्रोत्साहन देण्याचा गुन्हा होत असेल तर तो गुन्हा दादाभाई, ह्यूम वगैरेनींहि केला आहे असें त्यांत सप्रमाण सिद्ध केलें होतें. पण अँग्लो-इंडियन पत्रकारांचा अथवा विलायतेंतील त्यांच्या सिडेनहॅम-कंपूसारख्या अथवा चिरोलसाहेबांसारख्या मदतनिसांचा किंवा त्यांच्या हाताला हात लावणाऱ्या बुरखेवाल्यांचा हा भेदनीतीचा डाव अमुक एका वेळीं थांबेल अशी अपेक्षा करणें व्यर्थ होय. अँग्लो-इंडियन पत्रांचा व केसरीचा पूर्वापार संबंध पाहिल्यास विरोधाचे विषय तेवढे बदलले, विरोध मात्र पूर्वीइतकाच तीव्र आहे असें दिसून येईल. कधीं जहालांची नालस्ती, तर कधीं जहालमवाळांत फूट पाडण्याचा यत्न, कधीं हिंदु-मुसलमानांत कलागती लावण्याचा नेहमींचा खटाटोप, तर क्वचित् ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचाच उपद्व्याप, येणेंप्रमाणें यांच्या विरोधाच्या अप्रतिहत प्रवाहांतहि विषयवैचित्र्य आढळून येतें. असत्य देखील चातुर्यानें व नवीन नवीन तऱ्हांनीं प्रतिपादिल्यामुळें कित्येकांस अजूनहि यांचा कावेबाज संभावितपणा समजत नाहीं. कित्येक तर यांच्या चुरचुरीत इंग्रजीवर व सुबक छपाईवरच बेसुमार खूष असतात व

म्हणूनच केसरीस वर्षानुवर्षे ' समाजांतील कित्येक नंदीबैलांस ' ( २१-४-२५ ), सावध ठेवण्याचा उद्योग करावा लागला आहे.

दोन्ही पक्षांचें लिखाण वाचल्यास सावधपणांत केसरी कांकणभर चढच असून भाषेंत मात्र अँग्लो-इंडियनी फूत्कारांपुढें केसरीचें लिखाण नेमस्तच वाटतें. प्रत्युत्तर म्हणून केसरीनें कित्येक वेळां थोडी जहाल भाषा वापरली आहे हें नाकबूल करितां येत नाहीं. तरी सुरेंद्रनाथांसारख्यांस विदूषक म्हणणाऱ्यांस, पालबाबूंसारख्यांस ' कोब्रा ब्रीड ' ( नागसापाची जात ) म्हणणाऱ्यांस, आणि हिंदी प्राणांची किंमत चार आणे ठरविणाऱ्यांस ' टारगे एडिटर ' म्हटल्यास केसरीवर तीव्र भाषा वापरल्याचा आरोप कोण करील ? नेमस्तांसहि अलीकडे यांचें खरें स्वरूप कळून हीच किंबहुना याहूनहि तीव्र भाषा वापरावी लागत आहे.

" The Anglo-Indian Press is an anomaly, the counterpart of which cannot be seen in any free country. The people of India have been accustomed to the existence of this hybrid institution for long and have tolerated its condescending patronage and its scurrilous attitude in political 'controversies.'

—*The Indian Daily Mail*, ( *2–11–30* )

असे उद्गार इंडियन डेलीमेलसारख्या नेमस्त पत्रासहि आज काढावे लागत आहेत. केसरीनें यांचे गुण आरंभींच ओळखले हा तर केसरीचा दोष नव्हे ?

तथापि सौजन्यानें नव्हे तरी परिस्थितीमुळें टोपी फिरविण्याचा प्रसंग अँग्लो-इंडियनांवर येणार नाहींच असें मात्र नव्हे. विपत्तींतील निंदक ऊर्जितावस्थेंत विनवोभाट भाट बनतात. पण भविष्यकथन कशाला ? १९१७ सालच्या बादशाही जाहीरनाम्यानंतर 'आतां तरी तुम्ही हिंदी लोकांशीं मिळतें घेणार कां नाहीं ?' या चंदावरकरांच्या प्रश्नास अनिर्वाह म्हणून कां होईना होकारार्थी उत्तरच टाइम्सला द्यावें लागलें होतें व केसरीनेंहि पूर्वेतिहास विसरून त्याच्या औदार्याची वाखाणणी केली होती. आणि अगदीं ताजें उदाहरण घ्यावयाचें झाल्यास मॅकडोनाल्डसाहेबांनीं राउंड टेबल परिषदेच्या पहिल्या अंकाच्या समाप्तीची घंटा वाजवितांच ' Swaraj At Last ! ' असा लेख लिहून टाइम्स मोकळा झाला नाहीं काय ? जणूं काय स्वराज्य शब्द उच्चारणारा देखील एके काळीं यास राजद्रोही वाटत असे हें आम्ही विसरलोंच आहों ! जसें कांहीं स्वराज्यासाठीं या राजमान्य राजश्रींनीं नवसच केले होते ! सारांश, परिस्थितीमुळें बनलेले निंदक, परिस्थितीमुळेंच स्तुतिपाठक होतील यांत शंका नाहीं. अवकाश काय तो आपल्या भाग्योदयाचा आहे.

---

# राजबंद्यांचे हाल

"'कोण्या राज्यकर्त्यांच्या मनाची कसोटी पहावयाची असेल-म्हणजे क्षमा, दया, सौजन्य, नीतिशीलता, हेतूंचा उदात्तपणा वगैरे गुण त्यांच्यामध्यें कितपत वास करतात, हें पहावयाचें असेल तर—त्या राज्यांतील तुरुंग कसे काय राखिले जातात व आंतील कैद्यांना कसें काय वागविलें जातें हें पाहिलें म्हणजे पुरे,' असे उद्गार कित्येक राजकीय तत्त्ववेत्त्यांनीं काढिले आहेत व ते खरोखर मार्मिकपणाचेहि आहेत."

—केसरी, ११-४-२२.

तुरुंगखात्याची पहाणी ओघानेंच महत्त्वाची ठरते. तुरुंगांतील व्यवस्था आज पूर्ण असमाधानकारक असल्याचें दिसून येतें. त्याची यथार्थ कल्पना येण्याकरितां पेशवाईत या खात्याची मांडणी कशी होती हें पाहिलें असतां ती बरीच बोधकारक व उपयुक्त वाटेल. सांप्रत ह्या खात्यांत किती विलक्षण अनवस्था नजरेस पडते हेंहि तुलनेनें विशेषच स्पष्ट होईल.

* * *

**१. पेशवाईंतील राजकीय कैद्यांची बरदास्त :—** सरकारनें राजकीय कैद्यांस कसें वागवावें यासंबंधीं सांप्रत सर्वत्र चर्चा चालूआहे. अशा वेळीं, पेशवाईत दौलतराव शिंदे यांनीं नाना फडनवीस व त्यांचे पक्षाची मंडळी कैद करून नगरच्या किल्ल्यांत ठेविली, त्यांची त्या किल्ल्यांत बरदास्त कशी ठेविली जात असे, ती माहिती वाचकांस मनोरंजक वाटेल. म्हणून ती भालेराव यांचेकडून भा. इ. सं. मंडळाकडे आलेल्या अस्सल कागदपत्रांच्या आधारें पुढें दिली आहे.

यादी, नाना फडनवीस आणि बाळाजी अनंत व त्याची स्त्री, नारायण रावजी, बाळजी राम, बाजी कृष्ण, कृष्णाजी बाजी, धोंडो रामचंद्र व देवजी गौळी एकूण असामी ९ यांस किल्ले अहमदनगर येथें ठेविलें, त्याची नेमणूक येणेंप्रमाणें. सूरसन-मान तिसेन मया व अलफ ( इ. स. १७९९ ) नक्त नेमणुका व पगार दरमहा ठरला होता त्याचा तपशील—रु. १६३॥; खुद्द नाना फडनविसाकडे तपशील—देवपूजेचा ब्राह्मण रु. ३०, वैद्य रु. ३०, आचारी रु. १२, पाणक्या रु. ८, शागीर्द रु. ८, खिजमतगार चार असामी रु. २४, फुलें, तुळशी देण्यास माळी रु. ८, मशालजी रु. ६, कामाठी रु. ५, धर्मादाय २६॥ ( व्यतिपात, मोहरनाणें १५ व रोख १, एकादशीस ६॥, प्रदोष २, संकष्टचतुर्थी १, नित्य दक्षणा अर्धा आणाप्रमाणें १। ).

रु. ३११ इतर असामी ८ यांच्या दिमतीस दिलेल्या नोकरांचा पगार, तपशील—सहा आचारी ७२ रु. सात पाणक्ये ५४ रु. सहा शागीर्द ४८ रु. नऊ

खिजमतगार ५४ रु. २ मशालजी १२ रु. १ वैदिक ब्राह्मण३० रु. ७ कामाठी ३५ रु. १ मुदपाक्या ६ रु. रु. ९१-१२ बरदास्तीकरितां कारकून असामी ३. रु. १४४ बंदोबस्ताकरितां जमादार १२. रु. २१०० बंदोबस्ताकरितां प्यादे २८८. एकूण दरमहा नक्त नेमणूक दोन हजार आठशें साडेदहा रुपये.

याशिवाय भोजनखर्चाकरितां कोठींतून सामान देणें तें—भोजनास असामी ३८; पैकीं खासे ९, देवपूजेचे ब्राह्मण २, वैद्य १, आचारी ८, पाणक्ये ८, शागीर्द ८, कुणबीण १, मुदपाक्या १, यांस शिधा रोजीं देणें तोः— तांदूळ ११। शेर, कणिक २० शेर, डाळ ४।।। शेर, तूप ४ शेर, साखर २ शेर, मीठ ३ शेर, हरभऱ्याचें पीठ २ शेर, अमसोल १ शेर, तेल ५ शेर, (मशाली खर्चासुद्धां) याशिवाय हिंग, जिरें, शहाजिरें, हळद वगैरे कार्याकारणें लागेल तें द्यावें. खेरीज पानसुपारी, पानपत्रावळ, शाकभाजी, किरकोळ औषधें वगैरे कार्याकारणें लागेल तें व धर्मादाय सदर असामींस किरकोळ कार्याकारण लागेल तो व कापड, शेले, पागोटीं, धोतरजोडे, ब्रायकोस लुगडीं व चोळ्या, कुणबिणीस लुगडीं वगैरे सरकारांतून कापड पावलें. त्यांखेरीज कापड किरकोळ लागेल तर चौकशी करून देत जावें. दुभत्याकरितां जनावरें:——पूजेस गाय, निसबत नाना; दुभत्याकरितां गाई ४ व म्हैस १ एकूण ६. सदर गुरांस राखणावळ असामी एक दरमहा रु. ४; गुरास वैरण व दाणा दास्तनपैकीं रुजू; खेरीज पेंड लागेल तर द्यावी १ रु. सदरहू अन्वयें येणेंप्रमाणें करार. (केसरी—२२-११-२१).

* * *

प्रायोपवेशन हा बंदिवानांचा एक जन्मसिद्ध हक्कच दिसतो! व त्रागा करण्याची ही रीत सर्वच देशांत आढळून येते. कर्मधर्मसंयोगानें याच आठवड्यांत हातीं पडलेल्या 'ऐतिहासिक लेखसंग्रहां'त पेशवाईतील 'बंदिखाना व बंदिवान' या सदराखालीं दिलेल्या कागदपत्रांत कांहीं मनोरंजक उतारे याच विषयावर आढळले. त्यांत मिरजकर थोरले बाळासाहेब पटवर्धन यांनीं बंदिखान्याच्या अंमलदारानें पाठविलेल्या लेखी प्रकरणांवरील शेरे दिले आहेत. त्यांतील दोन तीन असेः—

'हमणाजी शिवराम वाकनीस आज दोन रोज उपाशी आहेत. जेवीत नाहींत. आज्ञेप्रमाणें सांगों.' यावर हुकूमः—'कां नाहीं जेवीत? समाचार घ्यावा. उपोषणें केलियानें कैदेंतून कोणी सोडीत नाहीं. समजून सांगावें.'

'भीमा अण्णा नाईक हावेरीकर व त्याचा गुमास्ता दोन असामी ब्राह्मण अटकेंत आहेत. त्यांस आजचा चवथा दिवस. दोन दिवस स्नान देखील नाहीं. आज जेवण्याची आज्ञा.' यावर हुकूमः—"जेवण करावें. न केल्यास जबरदस्तीनें घोटे लावून अन्न घालावें लागेल.'

'चिकटंभट प्रातःकाळापासून स्नान भोजनाचे फराळाचे देखील नाहीं. बोलावून आणून बहुताप्रकारें सांगितलें. आग्रह भारी दिसतो. ब्राह्मण आहे. केवळ

आततांईपणा करावयास चुकावयाचा नाहीं. वाटेवर येण्याचें दिसत नाहीं. विदित व्हावें. आज्ञेप्रमाणें करूं. ' यावर हुकूमः– ' जीव देण्याच्या गोष्टी लांब आहेत ! वांकडें बोलण्यानें परिणाम लागणार नाहीं. म्हणून सांगावें. फराळास डाळ, गूळ आणून देणें. बंदोबस्तीनें ठेवणें. '

श्री. बाळासाहेबांनीं वर दिलेल्या धमकीवरुन दिसून येईल कीं, त्यांचेंच अखेर चाललें असें कोणास वाटेल. पण तें मात्र खरें नाहीं. कारण होमसेक्रेटरींना पॅंखर्स्ट-बाईपुढें जशी हार खावी लागली, तशीच चिकटंभटापुढेंहि बाळासाहेब यांस हार खावी लागली, हें पुढील उताऱ्यावरुन दिसून येईल.

' चिकटंभट आज दोन रोज स्नानसंध्या, आचमन देखील नाहीं. हजामत करीत होता तसाच स्नान केल्याखेरीज आणिल्यापासून अटकेंत आहे. ब्राह्मण आततांई. बहुतांप्रकारें सांगून पाहिलें. सांगावयाची रीत राहिली नाहीं. भिऊन विनंति लिहितों असा अर्थ नाहीं. झाला मजकूर कळण्यास्तव विनंति लिहिली आहे. आज्ञेप्रमाणें करूं. '

बंदिखान्याच्या अधिकाऱ्याचा हा लेख वाचून, भीतीनें–दयेनें, कसेंहि म्हणा, श्रीमंतांनीं खालील शेरा लिहून पाठविला.

' आज घरास लाऊन देणें ! ' अर्थात् चिकटंभटाच्या चिकटपणाचा विजय झाला ! न जाणों, पॅंखर्स्टबाई या सन १७८३ सालीं मिरज येथील बंदिखान्यांत असणाऱ्या चिकटंभटाच्या आत्म्याचा पुनरवतार नसतील कशावरुन ? ( २-७-१२ ).

* * *

न्यायकोर्टांतून रीतसर चौकशी होऊन शिक्षा मिळाल्यावर तुरुंगांत त्या शिक्षेचा काळ कंठतांना विनाकारण छळ सोसावा लागतो तो मुद्दां वास्तविक अन्यायमूलक व सरकारच्या इभ्रतीस न शोभणारा आहे. परंतु कोर्टाची शिक्षा होण्यापूर्वी कच्च्या कैदेंत जे हाल होतात त्यांस तर कांहींच आधार नसतो. अशा कच्च्या कैदेंत कशा प्रकारचा छळ सोसावा लागतो, याची खात्री खालील उतारा वाचल्यानें स्पष्ट पटेल. आणि या जुलुमाला पायबंद घालणें किती अत्यावश्यक आहे याचीहि कल्पना येईल.

२. पंजाबी पुढाऱ्यांचे हाल :—'रावळपिंडीचे पुढारी लाला हंसराज, अमोलक राम, गुरुदास राम व इतर तीस चाळीस अब्रूदार व संभावित लोकांचा न्यायाचे नांवाखालीं जो अनन्वित छळ चालला आहे, त्याची हकीकत वाचणारा मनुष्य कितीहि कठोर अंतःकरणाचा असला तरी त्याचें हृदय फाटून गेल्यावांचून राहणार नाहीं. वरील चाळीस पंचेचाळीस मुलकस्त गृहस्थ आज तीन साडेतीन महिने जामीन न घेतां कडी चवकशी चालवून कैदखान्याचे कोठड्यांत सरकारनें अडकविले आहेत आणि या अवधींत बहुतेकांचीं वजनें कमी झालीं आणि

हंसराजासारखे वृद्ध गृहस्थ हिंवतापादि रोगांनीं फणफणत आहेत. अशा स्थितींत या पुढारी लोकांस तुरुंगांतून कोर्टांत व कोर्टांतून तुरुंगांत अशा सुमारें ६० दिवस खेपा घालावयास सरकारनें लाविलें आहे ! हिंव येवो, ताप फणफणो, प्लीहा सुजो किंवा वांत्या होवोत, त्या सर्वांनीं कोर्टांत आलेंच पाहिजे असा स्पेशल मॅजिस्ट्रेटनें धुमधडाका चालविला आहे ! अशा स्थितींत या यमयातनांपेक्षां हद्दपारी किंबहुना मरण बरें असें कित्येक आरोपींस वाटल्यास त्यांत नवल तें कोणतें ? ' ( कच्च्या तुरुंगांतल्या हालांचें हें वर्णन ! ) ( २७-८-०७ ).

* * *

राजकीय गुन्हेगारांचा तुरुंगांत किती भयंकर छळ होतो याची पुरी कल्पना येण्यास खालील उतारा पुरेसा आहे. त्यावरून ' राजबंदी ' म्हटला कीं, सरकारच्या वागणुकींत कशी कठोरता येते याचाहि प्रत्यय येतो.

**बादशाही पाहुणचाराचा नमुना :**—राजद्रोहासारखे राजकीय स्वरूपाचे गुन्हे व खूनदरोड्यांसारखे गुन्हे यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे, असें सर्व सुधारलेल्या देशांत व राज्यांत मानण्यांत येतें. पहिले अपराध केवळ बऱ्यावाईट मतभेदांच्या स्वरूपाचे असून दुसरे जसे कायद्यानें तसे नीतीनें व धर्मानेंहि निंद्य मानलेले आहेत. पहिल्या तऱ्हेचा अपराधी शासनार्ह असला तरी नैतिक दृष्टीनें त्यास मुळींच कलंक लागत नाहीं, असें सर्व सुधारलेल्या जगाचें ठाम मत आहे. सुधारलेल्या देशांतील कायद्यांनींहि हें मत मान्य करून राजद्रोहासारख्या राजकीय गुन्हेगारास ' पहिल्या वर्गाचा अपराधी ' मानिलें आहे. या वर्गाचे अपराध्यांस तुरुंगांत सक्तमजुरी नसते; कैद्याचा पोषाख घालावा लागत नाहीं; आणि त्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्थाहि चांगल्या प्रकारची असते. सारांश, इंग्लंडांतील व युरोपांतील ही कैद म्हणजे एक प्रकारची तुरुंगांतील केवळ ' नजर कैद ' होय. पण ह्या सुधारलेल्या जनमताची पर्वा सुधारलेलें हिंदुस्थान सरकार काडीचीहि करीत नाहीं, एवढेंच नव्हे तर, इंग्रजी राज्यामुळें हिंदुस्थान दरिद्री झाला असें लिहिणाऱ्या अगर बोलणाऱ्या संभावित व अक्रूदार देशभक्तांस व खुनी, लुटारू दरोडेखोरांस हिंदुस्थान सरकार एकाच तऱ्हेची शिक्षा देत असतें ! असल्या अमानुष पद्धतीचा हिंदी देशभक्तांचे शरिरांवर किती भयंकर परिणाम होतो याचा प्रत्यय ' देशसेवक 'कार दे. भ. अच्युतराव कोल्हटकर यांचे स्थितीवरून कोणासहि येणार आहे. दे. कोल्हटकर यांस अंजनी जेलमधून सुमारें एक महिन्यापूर्वीं खांडव्याचे तुरुंगांत पायांत जड शृंखला व लोहदंड अडकवून नेण्यांत आलें. त्या वेळीं त्यांची ती करुणास्पद व संतापजनक स्थिति पाहून नागपूरच्या चारपांच प्रसिद्ध डॉक्टरांनीं चीफ कमिशनरसाहेबांकडे एक पत्र पाठविलें व त्यांच्या प्रकृतीची चांगली तपासणी करावी अशी विनंति केली. यावर चीफ कमिशनरसाहेबांकडून उत्तर आलें कीं, कैद्याची प्रकृति वाईट झाली आहे, असें तुम्ही समजतां ती चूक आहे. चीफ कमिशनर-

साहेबांच्या ह्या सूत्ररूप उत्तरानें सदरहू डॉक्टरांचें अगर लोकांचें अर्थात् समाधान झालें नाहीं. डॉ चोळकर यांनीं दे. कोल्हटकर यांस प्रत्यक्ष पाहिलें, त्या वेळीं त्यांचे डोळे खोल गेले होते, गाल बसले होते, चेहरा अगदीं फिकट झाला होता, शरीर अत्यंत कृश झालें होतें व पाय सुजले होते. या एकंदर लक्षणांवरून दे. कोल्हटकर यांस तुरुंगांतील कैदेमुळें कोणता तरी काळजाचा भयंकर विकार झाला असला पाहिजे असा आम्हांस संशय येतो, याकरितां दे. अच्युतराव कोल्हटकरांचें वजन तुरुंगांत आल्या वेळीं व खांडव्यास नेते वेळीं काय होतें तें आम्हांस कळवावें, तसेंच त्यांचा एक फोटो घेऊन तोहि आम्हांस द्यावा अगर फोटो घेण्याची आम्हांस परवानगी तरी द्यावी, असें विनंतिपत्र डॉ. मुंजे, डॉ. गद्रे, डॉ. चोळकर व डॉ. लिमये यांनीं पुनः चीफ कमिशनरकडे पाठविलें आहे. सुधारलेल्या देशांप्रमाणें हिंदी राजकीय कैद्यांस चांगल्या रीतीनें वागविणें दूरच राहो, पण या पत्रामुळें ईश्वराचा मनुष्य प्राणी या नात्यानें तरी त्यांस यापुढें वागविण्यांत येतें कीं नाहीं, निदान त्यांच्या शरीरप्रकृतीची बातमी तरी सविस्तर देण्याची चीफ कमिशनरांस बुद्धि होते कीं नाहीं हें पाहणें आहे. ( १०-८-०९ ).

* * *

प्रो. शिवरामपंतांचा अनुभवहि राजबंद्यांच्या छळाची कल्पना आणून देतो. 'दर-
'रोज अदमासें दोन पौंड सुताचे गोळे मजजवळ आणून ठेवण्यांत येत असत. त्याला
'पीळ घालून त्याचे तुकडे बनवून मी ठेवीत असें. परंतु पहिले पांचसहा महिने या
'कामानें मला बराच थकवा येत असे व पहिल्यानें तर खाण्यालाहि बरोबर मिळत
'नसे. इतर कैद्यांप्रमाणें बाजरी-जोंधळ्याची फारशी चांगली नाहीं अशी भाकरी
'मिळत असे. परंतु दोन्ही वेळां मिळून एक किंवा दीड भाकरीपेक्षां जास्त खपत नसे.
'त्यामुळें मला ठाण्याच्याप्रमाणें येथेंहि निदान गव्हाची भाकरी मिळावी म्हणून
'मी पुष्कळ वेळां अर्ज केले व माझें वजन दहाअकरा पौंड कमी झालें आहे हेंहि
'अधिकाऱ्यांच्या नजरेस आणिलें. परंतु या वजनाच्या प्रश्नावर त्यांचेकडून एक
'नवीनच कोटिक्रम करण्यांत आला. 'तुमचें वजन या अहमदाबादच्या तुरुंगांत
'कोठें कमती झालें आहे, कीं ज्यासाठीं तुम्हांला येथें कांहीं 'एक्स्ट्रॉ रेशन'
'आम्ही द्यावें?' असें एकदां मला विचारण्यांत आलें.' ( १२-१०-०९ ).

* * *

तुरुंगांत जाण्याचा प्रसंग प्रत्यक्ष येण्यापूर्वी, तेथील हवा खाण्याची इच्छा करणाऱ्यांनीं पूर्वतयारी म्हणून किती हालअपेष्टांच्या संवयी जडवून घेतल्या पाहिजेत याची मनोरंजक पण वास्तविक माहिती खालील पत्रांत आढळते. त्यावरून तुरुंगांतील राहणीची वाचकांस यथार्थ कल्पना येईल.

१. राजकीय कैदी होणाराची प्रकृति शक्य तितकी बळकट व निरोगी असावी. ल्हानपणापासून अशा लोकांनीं शरीरसामर्थ्य कमाविण्याचा उद्योग केला पाहिजे.

२. त्यांना जाडीभरडी भाकर, चटणी, तुरीचें वरण अथवा तिखट आणि तेलकट पालेभाज्या यांबरोबर खाण्याची संवय असावी. भात व तूप हे दोन पदार्थ खाण्याची संवय त्यांना नसली पाहिजे. दूध खाण्याची संवय ठेवावी. वजन फार कमी झाल्यास कदाचित् तें मिळण्याचा संभव असतो. क्वचित् प्रसंगीं भातहि मिळूं शकतो, पण तो चांगला नसतो. तांदूळ मोठे व बेचव असतात. शिवाय वरचेवर त्याला पाण्याचा हात लावून त्याच्या मुदी वळण्यांत येत असल्यामुळें तो गार व अस्वच्छ होतो. भाताला सामान्यतः मीठ लागतें पण तें निराळें मिळत नाहीं. तो नुसताच भाजी व वरण यांबरोबर खावा लागतो. भाजीबरोबर तो फारच पचपचीत लागतो. त्यापेक्षां भाकरी बरी. सबब भाताची संवय अजिबात नसेल तर फार चांगलें.

३. मिठाचें पाणी शिंपडलेली कोरडी भाकर खाण्याचे प्रसंग वारंवार येतात. तेव्हां त्याचाहि सराव असावा.

४. दीर्घकाल एकांतवासांत राहण्याची संवय असावी. कारण राजकीय कैद्याला १०′×१०′ च्या खोलींत कांहीं वेळ खेरीज करून अहोरात्र कोंडून ठेवण्यांत येतें. राजकीय कैदी फारसा बोलका नसावा. दुसऱ्यांबरोबर भाषण करणें हा त्याचे बाबतींत मोठा गुन्हा मानला जातो, सबब त्यानें सतत मौनव्रत धारण करणें जरूर असतें. तेव्हां अशा प्रकारचीहि संवय पाहिजे.

५. सक्तमजुरीच्या राजकीय कैद्यांस प्रथमारंभीं मुख्यतः दळण्याचें काम मिळतें. दळण ३५ पासून ४० पौंडांपर्यंत उभ्यानें दळावें लागतें. ह्याकरतां अंगांत सडकून सामर्थ्य व रग पाहिजे. नाहीं तर काम न वठल्यामुळें रोजच्या रोज निरनिराळ्या शिक्षा होऊन फार हाल होतात. करतां अशा प्रकारें दळण्याचा प्रयोगहि बाहेर असतांना कधीं कधीं करून पाहिल्यास चांगलें. याशिवाय त्यांना इतर काबाडकष्ट करण्याची संवय असली पाहिजे.

६. शीत व उष्ण हीं सहन करण्याची व त्यांत कष्टाचीं कामें करण्याची संवय असावी.

७. गांभीर्य, शांतपणा, सहनशीलता, प्रसंगावधान व व्यवहारचातुर्य हे गुण प्रामुख्यानें असले पाहिजेत.

८. सामुद्रिक व फलज्योतिष–विशेषेंकरून सामुद्रिकज्ञान चांगलें असावें.

९. मनुष्यस्वभावाचें–माणूस ओळखण्याचें–पूर्ण ज्ञान असावें.

१०. क्षुद्र गोष्टींकडे दुर्लक्ष करण्यास शिकलें पाहिजे. तक्रार फारशी कधीं करूं नये. तक्रार न करतां आपत्ति धिमेपणानें व मर्दानी बाण्यानें सहन केल्यानेंच अधिकाऱ्यांवर अधिक छाप बसते. लहानसहान गोष्टींबद्दल तक्रार केल्यास उपहास मात्र होतो. फायदा कांहींएक होत नाहीं.

११. विडी, चिरूट, पानतंबाखू, सुपारीचें खांड यांचें व्यसन नसावें.

१२. थंड पाण्यानें स्नान करण्याची संवय असावी.

१३. तुरुंगांत पाय ठेवल्यावर मानवी प्राण्याच्या दयेची अपेक्षा करण्यापेक्षां परमेश्वराचें चिंतन करून चित्ताचें समाधान करण्याची प्रवृत्ति जितकी ठेवितां येईल तितकी चांगली.

१४. उदासीन व बेफिकीरपणाची वृत्ति जितकी ठेवितां येईल तितकी चांगली.

१५. तत्त्वज्ञानाच्या उच्च वातावरणांत मनाला रमविण्याची संवय असावी.

इतक्या गोष्टी संपादन केल्या म्हणजे कारागृहाच्या आपत्तींचा भार पुष्कळसा हलका होईल, यांत शंका नाहीं. पण जातां जातां येथें अशीहि सूचना करावीशी वाटते कीं, कारागृहांत एकदां मनुष्य गेला म्हणजे तो बहुतेक जायबंद होतो! त्याच्या हातून पुढें फारसें कांहीं कार्य घडूं शकत नाहीं. तेव्हां होतां होईल तोंपर्यंत बारीक-सारीक गोष्टीच्या इरेस पडून कारागृहांत जाण्याचा प्रसंग येऊं देऊं नये. कारागृहांत जाणें म्हणजे पुढें निकामी होणें आहे अशी जाणीव बाळगून कारागृहामुळें होणाऱ्या हानीच्या तोलाची कांहीं तरी मोठी व सात्त्विक कामगिरी अगोदर झाली पाहिजे. या गोष्टीकडे विशेष लक्ष असावें. कारागृहाचें भय बाळगण्याचें कारण नाहीं. पण फुसकीवारी वृथा जायबंद होण्याचें मात्र सावधपणानें टाळणें आवश्यक आहे. क. हे वि. आपला यक्ष. ( ३०-१-१२ ).

* * *

सहा वर्षांच्या ' काळ्या पाण्यानंतर ' पुण्यास आल्यावर लोकमान्यांनीं स्वतः सांगितलेली हकीकत :—

' मुंबईचे पोलीस अधिकारी तेथें हजर होतेच. त्यांनीं आम्हांस गाडींतून उतरून घेऊन तेथें तयार असलेल्या स्टीम-लॉंचमध्यें बसविलें आणि लागलींच हार्डिंज नांवाच्या सरकारी मिलिटरी ट्रॅन्सपोर्टच्या मोठ्या बोटीवर चढविलें. बोट कोठें जाते हें बोटीवरील कप्तानाखेरीज दुसरें कोणास माहीत नव्हतें. बोट मोठी होती खरी, पण अपराध केलेल्या खलाशांस कोंडून ठेवण्याच्या अशा ज्या लहान खोल्या तळमजल्यांत असतात, त्यांपैकीं एका खोलींत मला व दुसऱ्या खोलींत स्वयंपाक करण्याकरितां बरोबर आलेल्या दुसऱ्या कैद्यास कोंडून ठेविलें होतें. दिवसांतून सकाळीं किंवा संध्याकाळीं एक तास गोरा इन्स्पेक्टर मला डेकवर फिरावयास नेई. बाकीचा काल खोलींतच काढावा लागे! खोलींत वारा आणि वारा चोवीस तास एक-सारखें उकडत असे.

'...मंडाले जेल, मंडालेच्या किल्ल्याच्या एका बाजूला नैर्ऋत्य कोपऱ्यांत बांधलेला आहे. मी तेथें असेंपर्यंत मला या जेलाबाहेर केव्हांहि काढलें नाहीं! एकदां मंडाले जेलांत जेव्हां कॉलरा बराच वाढला तेव्हां मात्र दोन अडीच महिने मंडाले जेलांतून काढून मिकाहिला येथील जेलांत तेवढ्यापुरतें मला नेऊन ठेविलें होतें.' ( २३-६-१४ ).

* * *

तुरुंगांत ' राजकीय कैदी ' असा वेगळा गट पाडून विनाकारण पक्षपात करण्याचें कारण नाहीं, असा अभिप्राय तुरुंग-कमेटीनें दिला. त्यावर केसरी लिहितो, ' तुरुंगांत माणसासारखें माणूस म्हणून सर्वांना सारखें वागविलें जावें, असा जर तुरुंग-कमिटीच्या अभिप्रायाचा अर्थ असेल तर हा नियम इतर अनेक रीतींनीं अपवादग्रस्त करण्यांत कां येतो ? गुन्हेगारीच्या छापानें जर सर्वांना सारखेपणा येत असेल तर काळे व गोरे यांचे तुरुंग वेगवेगळे कां ? आणि गोऱ्यांना निराळ्या तुरुंगांत अधिक सवलती आणि काळ्यांना कमी सवलती असा फरक करण्यांत कां यावा ? पण हा फरक लॉर्ड मेकॉलेच्या वेळेपासून पद्धतशीर रीतीनें करण्यांत येत आहे.' (१८-४-२२).

पीनल कोडाला ' लॉ कमिशन 'नें म्हणजे मेकॉले, मेक्लीऑड, अँडरसन वगैरेंनीं १८३७ सालीं जी प्रस्तावना लिहिली, तींत हे कमिशनर लिहितात, ' युरोपियन व नेटिव्ह यांच्यामध्यें शारीरिक भेद इतका आहे कीं, दोघांनाहि तुरुंगांतील एकच कडक शिक्षा पाळण्यास लावणें हें निर्दयपणाचें व राजकीय धोरणाच्या दृष्टीनहि अयोग्य आहे. ' राज्यकर्त्यांच्या जातीच्या इभ्रतीचा मुद्दा क्षणभर बाजूस ठेवला तरी राजकीय कैद्यांची वागणूक असमर्थनीयच ठरते.

' हिंदुस्थानांत इंग्रज हे जर राज्यकर्ते रहावयाचे तर ते स्वतः अधिकारी नसले तरी अधिकाऱ्यांसारखाच त्यांच्याविषयीं हिंदी लोकांच्या मनांत आदर व दरारा राहिला पाहिजे. मनुष्यासारखा मनुष्य असतां काळ्यागोऱ्यांत जर असा फरक करणें योग्य आहे तर, काळ्या लोकांतहि राजकीय गुन्हेगार व इतर गुन्हेगार असा फरक करणें न्यायाचें कां होणार नाहीं ? ' ( कित्ता ).

' राज्यकर्ते म्हणून काळ्यांपासून गोरे वेगळे राखणें जर जरुर आहे तर, हिंदी राजकीय जनतेच्या इभ्रतीच्या दृष्टीनेंहि स्वार्थी जन व दरोडेखोर यांच्यापासून जनतेचे वाली व निःस्वार्थी समाजसेवक यांनाहि वेगळे ठेवणें योग्यच ठरेल.' (कित्ता).

' राजकीय कैद्यांना मिष्टान्न द्या असें कोणी म्हणत नाहीं, पण त्यांना मनुष्य प्राण्यास योग्य असें तरी अन्न दिलें पाहिजे. त्यांना वर्तमानपत्रें व पुस्तकें वाचावयास मिळालीं पाहिजेत. शारीरिक मेहनतीचें कामहि त्यांच्या दर्जाला व रहाणीला अनुरूप असें दिलें पाहिजे. कैद्यांना वेगवेगळ्या कोठड्यांत ठेवून त्यांची ताटातूट करूं नये. भगतसिंग व दत्त यांनीं असेंब्लींत बाँब टाकून देशस्थिति सर्वांना ऐकूं येईल इतक्या मोठ्या आवाजांत जाहीर केली. त्याच रीतीनें या उपासानें तेरा राजकीय कैद्यांच्या तक्रारी वेशीवर टांगत आहेत यांत संशय नाहीं.' ( १०-८-२९ ).

* * *

' ८० दिवसांच्या अन्नत्यागानंतर निर्घृण नोकरशाहीच्या फत्तरास घाम फोडून आपल्या मागण्या अंशतः तरी त्यांनीं पुरवावयास तिला भाग पाडलें, हा विजय लहानसहान नव्हे. ' ( ७-९-२९ ).

* * *

‘ राजकीय कैद्यांना दरवडेखोरांप्रमाणें न वागवितां सवलतीनें वागविण्यांत यावें हेंच त्यांचें मागणें आहे. त्यांच्या अन्नत्यागानें पंजाब सरकार व हिंदुस्थान सरकार हदरलें असून सवलतींचा विचार करण्यासाठीं सरकारनें जेल-कमेटीहि नेमली आहे.’ (२१-९-२९).

* * *

‘ तुरुंगांतील कैद्यांच्या वागणुकीसंबंधानें बरीच वाटाघाट होऊन अखेरीस सरकारनें आपले नवीन नियम प्रसिद्ध केले आहेत. पण ज्या तत्त्वाच्या दृष्टीनें हा झगडा सुरू झाला त्या तत्त्वाचा यांत कोठें मागमूसहि सांपडत नाहीं. कैद्यांमध्यें काळे-गोरे किंवा हिंदी-हिंदीतर असला वर्णभेदमूलक अनिष्ट फरक असूं नये ही पहिली तात्त्विक मागणी आणि राजकीय गुन्हेगार आणि एरव्हींचे अनीतिमूलक गुन्हेगार यांना सरसकट एकाच दावणींत न बांधतां वेगवेगळे ठेवावे व त्यांच्या वागवणुकींत फरक असावा ही दुसरी तात्त्विक मागणी. ’ ‘ राजकीय गुन्हेगार हा वर्गच आम्ही जाणीत नाहीं हा हेका कायमच आहे !’ ( २५-२-३० ).

* * *

‘ पण जेथें सर्वस्वीं नियमबाह्य, पण नियमांप्रमाणें सकृद्दर्शनीं आचरण होत असतांहि तारतम्य सोडून एक प्रकारच्या आकसानें कैद्याला कठोरतेनें वागविण्यांत येतें, तेथेंहि छळ हा शब्द यथार्थतेनें लावितां येईल.’ ( १६-८-३० ).

* * *

‘ प्रत्येक तुरुंगांत मुसलमान व ख्रिस्ती कैदी यांना हिंदूंच्यापेक्षां वेगळी वागणूक देण्यांत येते. मुसलमानांना आपले सर्व धार्मिक सण व उपास नीटपणें पाळूं दिले जातात. त्यांचा मौलावी त्यांना धर्मोपदेश करण्यास येतो. ख्रिस्ती पाद्री सरकारी खर्चानें ख्रिस्ती कैद्यांना उपदेश करण्यास जातो. परंतु या बाबतींत हिंदु कैद्यांना कसलीहि सवलत मिळत नाहीं. हिंदूंना एकादशी, शिवरात्र, गोकुळअष्टमी, यांसारखे उपवास करण्यास सवड देण्यांत येत नाहीं. मग धर्मोपदेशक बाजूलाच राहिला !’ ( ३०-९-३० ).

* * *

‘ सत्याग्रहीं’ना किती अपमानकारक व छळदायक तऱ्हांनीं वागवितात याविषयीं केसरी सोदाहरण लिहितो, ‘ पण मांजरीनें आपलीं पिलें खावीं त्याप्रमाणें सरकार आपलेच कायदे आपणच भक्षण करून सत्याग्रह्यांना निर्दयपणानें व खुनशीपणानें छळतें याचा निषेध किती करावा ? श्री. राऊत नांवाच्या राजबंद्यांना, एखाद्या आततायी बदमाषाप्रमाणें, पंधरा शेराची बेडी घालून तुरुंगांत आणलें. आणि त्यांनीं खादीचे कपडे मागितले असतां ते न पुरवितां नग्नावस्थेंत कोठडींत अहो-रात्र कोंडून ठेवलें, एवढेंच नव्हे तर त्यांना पिण्यास पाणी देण्याचेंहि बंद केलें. ’ ( १३-१२-३० ).

* * *

'पण तुरुंगाच्या बाबतींत होणाऱ्या या विशिष्ट प्रकारच्या सरकारी कायदेभंगा-संबंधानें–झोटिंगशाहीसंबंधानें–आम्ही इतकेंच म्हणतों कीं, स्वातंत्र्य मिळविलेल्या युरोपियन राष्ट्रांच्या चळवळींत लोकपक्षाचा हात सर्वांत आधीं तुरुंगावर पडत असे व तेथून पुढें सर्व गोष्टी होत. याचें कारण हेंच कीं, कोणत्याहि नोकरशाहीचा दुष्टपणा, क्रूरपणा, सैतानीपणा हा तुरुंगांतून जितका एकीकृत झालेला व नमुनेदार पहावयास सांपडतो, तितका तो इतरत्र पहावयास सांपडत नाहीं.' (१६-८-३०).

---

# ग्रामपंचायत

[ श्री. तपस्वी बाबासाहेब परांजपे ]

ग्रामसंस्था हें महाराष्ट्रांतील प्राचीन लोकसत्तेचें बीज होय. खेड्यांतील ही लोकशाही पेशवाईअखेर चांगल्या प्रकारें अस्तित्वांत होती. तें खेड्यांपुरतें स्वराज्यच होतें. कारण स्वराज्यांत झालें तरी जनतेनें स्वतः किंवा स्वतःच्या मुखत्यारांमार्फत जीं कामें करावयाचीं असतात तीं, संरक्षण, पोषण व शिक्षण अशीं थोडक्यांत सांगतां येतील. हीं सर्व कामें खेड्यांतील ग्रामसंस्था करीत असत. याकारणानें खेडेगांवांमधील सर्व जातींना एकमेकांच्या साहाय्यानें गांवचा गाडा चालवावा लागत असे व त्या सर्व जातींत कर्तबगारीच्या योगानें उत्पन्न होणारा उत्साह, तेजस्वीपणा व हिंमत गांवकऱ्यांच्या अंगीं वसत असे. परंतु पेशवाई संपून ब्रिटिश अंमलाला सुरुवात झाल्यावर ब्रिटिश सरकारनें खेड्यांतील जनतेचें एक एक काम काढून घेऊन तिची कर्तृत्वशक्ति संपवून टाकली व आगगाडीसारख्या वाहतुकीच्या साधनांनीं खेड्यांतील वेशींच्या आंत परदेशी जिनसा आणून सोडल्यानें तेथील लोकांचे उद्योगधंदेहि अस्तास जाऊन सर्व लोक दरिद्री व हताश बनले.

ही गोष्ट केसरीकरांनीं १८९३ सालीं ह्यूमच्या मताचें तात्पर्य सांगतांना दाखविली आहे. त्याचा इत्यर्थ असा :—' इंग्रजी राज्यकर्त्यांनीं या ग्रामसंस्था मोडून टाकून
' सर्व कारभार आपल्या अधिकाऱ्यांच्या हातांत दिले हीच मोठी चूक केली व
' त्यापासून लोकांवर मोठा जुलूम होत आहे. हल्लींच्या सुधारलेल्या सरकारास
' पाहिजे तशी व्यवस्था ग्रामसंस्थांकडून पहिल्यानेंच झाली नसती, पण सरकारचे
' मनांत असतें तर सदर संस्था सुधारून त्यांचेच हातून हें काम सरकारास घेतां
' आलें असतें. तसें न करतां सरकारी खात्यांच्या हातीं अधिकार दिले ही गोष्ट राज्य-
' कर्त्यांस व रयतेस अत्यंत अहितकारक आहे. ' ( २४-१-९३ ).

ही स्थिति मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांचा उदय होईपर्यंत एकसारखी बिघडतच गेली. मॉंटेग्यु चेम्सफर्ड सुधारणांच्या कायद्याचा हेतु राज्यकारभाराची जबाबदारी हळू हळू जनतेवर टाकण्याचा असल्यामुळें खेड्यांतील जनतेची सरकारास आठवण झाली. लोकलबोर्डांचा कायदाहि सुधारण्यांत येऊन लोकलबोर्डांचा कारभार प्राथमिक शिक्षणासुद्धां खेड्यांतील जनतेवरच सोंपविला गेला. लोकलबोर्डांच्या पोटांतच गांवगन्नांच्या ग्रामपंचायती येतात.

शहरांना जशा म्युनिसिपॅलिट्या तशीं शहराबाहेरील ग्राम्य प्रदेशास लोकलबोर्डें. त्यांचें काम शिक्षण, आरोग्य, रस्त्यांची दुरुस्ती, पाणीपुरवठा इत्यादि. हीं कामें जशा म्युनिसिपॅलिट्या व लोकलबोर्डें थोड्याबहुत प्रमाणांत करतात तितक्या किंवा त्याहूनहि कमी प्रमाणांत खेड्यांतील लोकांकडून करून घ्यावीं अशी इच्छा हिंदुस्थान सरकारास १९१८ सालींच झाली व त्या आशयाचा सरकारी ठरावहि त्या वेळीं बाहेर पडला. परंतु त्याचा अंमल १९२० सालीं मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांचा कायदा लागू होईपर्यंत करण्यांत आला नाहीं. त्यानंतर सर्व हिंदुस्थानभर त्या दिशेनें चक्र फिरून बहुतेक सर्व प्रांतिक सरकारांनीं ग्रामपंचायतीचा कायदा आपआपल्या कायदे-कौन्सिलांमार्फत पास करून घेतला. मुंबई, मध्यप्रांत, मद्रास हे प्रांत रयतवारी पद्धतीचे असल्यानें त्या प्रांतांत या कायद्याचा उपयोग अधिक होणें साहजिक समजलें पाहिजे. प्रांतिक सरकारांनींच ही गोष्ट मनावर घेतल्यामुळें त्यांच्या अधिकाऱ्यांनीं जिल्ह्यांतील ठळक गांवें निवडून काढून त्यांत ग्रामपंचायतींची स्थापना केली. खेड्यांत दारिद्र्य व अज्ञान हीं दोन्ही इतकीं भरपूर आहेत कीं, त्यांपैकीं अधिक कोणतें हें सांगणेंच कठीण आहे. अशा गांवांना ग्रामपंचायतीचें महत्त्व व उपयुक्तता काय कळणार ? मामलेदारांसारख्या अधिकाऱ्यांनीं त्या त्यांजवर लादल्या त्या केवळ जुलुमानें, म्हणून अधिकाऱ्यांनीं गांवांकडे पाठ फिरविण्याचा अवकाश कीं, बहुतेक पंचायती सुकून व जळून गेल्या. कारण ग्रामपंचायत हा म्युनिसिपॅलिटीचा लहानसा नमुना असल्यामुळें त्याबरोबर घरपट्टी वगैरेंचा जाच गांवकऱ्यांच्या मागें लागलाच. बरें, हा कांहीं त्यांचाच दोष नव्हे. जेथील लोकांस तांबडा पैसा सहजासहजीं दृष्टीस पडणें मुष्कील, तेथील लोकांना वर्षाच्या कांठीं घरपट्टीच्या रूपानें चारदोन रुपये जड वाटावे यांत आश्चर्य काय ?

अशा रीतीनें बहुतेक खेड्यांतील ग्रामपंचायती नष्ट झाल्या. परंतु इंग्रज सरकारनें स्थापन केलेल्या या ग्रामपंचायती व इंग्रजी राज्यापूर्वीच्या ग्रामपंचायती सारख्या नव्हेत. त्या ग्रामपंचायती एकंदर ग्रामसंस्थांच्या पोटांत असून त्यांमार्फत गांवांतील दिवाणी व फौजदारी तंट्याची चौकशी होई. म्हणजे तीं एक प्रकारें लहान स्वरूपाचीं कोर्टेंच होतीं. ते अधिकार सध्यांच्या मुंबई इलाख्यांतील ग्रामपंचायतींस नसल्यानें त्या लोक-प्रिय होत नाहींत, इतकेंच नव्हे तर त्यांच्या हातून खेडेगांवांची खरी लोकसेवाहि घडण्याची आशा नाहीं. याच दृष्टीनें केसरीनें स्वतः लेख लिहिले, श्री. ग. वि. केतकर,

श्री. वा. कृ. भावे प्रभृतींचे लेख प्रसिद्ध केले. पुणें जिल्हा राष्ट्रीय लोकलबोर्ड मंडळाच्या विद्यमानें पुणें जिल्ह्यांतील लोकलबोर्डात राष्ट्रीय वृत्तीचीं माणसें निवडून आणण्याचा सहा वर्षांपूर्वी सुसंघटित प्रयत्न करण्यांत आला. त्यांतहि लोकलबोर्डा-मार्फत ग्रामपंचायतींची गांवोंगांव स्थापना करण्याचा व ग्रामपंचायतींचा कायदा सुधारून घेण्याचाहि प्रयत्न व्हावा हा हेतु होता आणि तो थोडयाबहुत प्रमाणांत सिद्धीस गेलाहि. त्या बाबतींत श्री. भावे, श्री. भालचंद महेश्वर गुप्ते वकील व मंडळाचे अध्यक्ष श्री. नारायणराव गुंजाळ यांनीं पुणें जिल्ह्यांतील बऱ्याच गांवीं व्याख्यानें देऊन ग्रामपंचायतींकडे लोकांचें लक्ष वेधलें. पुढें पुणें जिल्हा लोकलबोर्डात राष्ट्रीय पक्षाचे सभासद निवडून आल्यावर त्यांच्या प्रयत्नानें पुणें जिल्ह्यांतील ग्रामपंचायतीं-वर देखरेख ठेवून त्यांस उत्तेजन देण्याकरितां एक कमिटीहि नेमण्यांत आली.

वरील सर्व प्रयत्नांपेक्षां अधिक महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे मुंबई कायदे-कौंसिला-कडून ग्रामपंचायतींचा कायदा खेडयांतील लोकांस हवा तसा सुधारून घेण्याचा. स्थानिक स्वराज्यसंस्थांचे तत्कालीन दिवाण ना. हिदायतुल्ला यांनीं मुंबई इलाख्यां-तील स्थानिक स्वराज्यसंस्थांची परिषद दरसाल पुण्यास भरविण्याची नवी वहिवाट सुरू केली व सदर परिषदेंत ठरल्याप्रमाणें तिची पुण्यांतील कायमची संस्था जी लोकल सेल्फ-गव्हर्नमेंट इन्स्टिटयूट, तिजकडे कायदे-कौंसिलापुढें ठेवण्याकरितां ग्राम-पंचायतींचें बिल तयार करण्याचें काम सोंपविलें असतां श्री. भालचंद्रपंत गुप्ते यांनीं तें तयार करूनहि दिलें. तरी पण सरकारची बेपर्वाई व कायदे कौंसिलच्या सभासदांचें औदासिन्य यांमुळें मुंबई इलाख्यांतील ग्रामपंचायतींचा कायदा अद्यापपर्यंत सुधारला गेला नाहीं. आतां यासंबंधीं केसरीनें विशेष पुरस्कृत केलेले कांहीं प्रसंग नमूद करतों.

ग्रामपंचायतींसंबंधीं १९०८-०९ सालच्या अधिकार-विभागणी कमिशननें पुष्कळ साक्षीपुरावा नमूद केला व पुढील धोरण कलमवारीनें सरकारापुढें मांडलें. यापुढें सरकारचें धोरण या दृष्टीनें १९११, १९१५ व १९१८ या वर्षी हिंदुस्थान सरकारानें कागदोपत्रीं बरीच चर्चा केली, सूचना केल्या व आग्रह धरला. तेव्हां त्या वेळीं केसरीकारांनीं आपली बाजू पुढें मांडलेली आढळते.

यानंतर १९२० सालीं प्रत्यक्ष सुधारणा अंमलांत आणतांना ग्रामपंचायत हा विषय डेमोक्रॅटिक पार्टीनें आपल्या कार्यक्रमांत समाविष्ट केला. तेव्हांपासून केसरीनें ग्रामपंचायत हा एक आपला विषय मानून तो आजपर्यंत लोकांपुढें मांडण्याचें काम चालविलें आहे.

१९२५ सालीं भरलेल्या महाराष्ट्र ग्रामपंचायत परिषदेच्या निमित्तानें या विषयाचा पुरस्कार करून चालू कायद्यांत कोणत्या दिशेनें दुरुस्ती झाली पाहिजे हें केसरीनें सांगितलें; आणि श्री. ल. ब. भोपटकर यांनीं मुंबई कौन्सिलांत या संबंधींचें बिल आणलें होतें, त्याचा पुरस्कार केला. त्यानंतर मुंबई सरकारची कमिटी ग्रामपंचायतींची

सुधारणा सुचविण्यासाठीं बसली. तेव्हां 'पंचायतींचे वरिष्ठ व कनिष्ठ असे दोन वर्ग पाडावें,' 'कनिष्ठ वर्गावर कराचा बोजा न ठेवतां त्यास प्रारंभीं सरकारनेंच द्रव्यसाहाय्य करावें,' 'न्यायमनसुब्याची सत्ता देऊन त्यांची प्रतिष्ठा व उपयुक्तता वाढवावी' इत्यादि विधायक सूचनाहि केसरीनें केल्या. (१४-७-२५) त्याच सुमारास उंबरगांव तालुका ग्रामपंचायत परिषदेचा अहवाल देऊन त्या विषयाच्या माहितीस प्रसिद्धीचें साहाय्य केलें. त्याच वेळीं मध्यप्रांत सरकारानेंहि एक कमिटी नेमली होती, त्यासंबंधीं स्फुटें लिहून वरील धोरणानें विधायक सूचना केल्या.

यानंतर मदुरा जिल्ह्यांतील ग्रामपंचायत परिषदेचा अहवाल देऊन तिकडील माहितीचा प्रसार केला. पुढील वर्षी (१९२६ मध्यें) दोन अग्रलेख लिहून ग्रामपंचायतींसंबंधीं सक्तीच्या धोरणाची आवश्यकता सिद्ध केली आणि वेळोवेळीं यानंतर यासंबंधाचें आपलें धोरण प्रगट केलें व १९३० सालीं तर ग्रामसंघटनेच्या कार्याची दिशा चार अग्रलेखांत दाखवून या विषयाचा वाटणारा जिव्हाळा केसरीनें व्यक्त केला.

---

# वंगभंग

[ श्री. डी. व्ही. आठल्ये, बी. ए. ]

अभिनवमदलेखाश्यामगण्डस्थलानाम् ।
न भवति विसतंतुर्वारणं वारणानाम् ॥

—भर्तृहरि

केसरीनें आपल्या पन्नास वर्षांच्या पराक्रमी जीवनक्रमामध्यें ज्या यशस्वी व परिणामकारक चळवळी केल्या, त्यांमध्यें वंगभंगाविषयक चळवळीला बरेंच प्रमुख स्थान द्यावें लागेल. सन १९०५ चे अगोदर बरींच वर्षे बंगाल हा प्रांत राज्यकारभाराचे दृष्टीनें फार अवाढव्य असल्याची जाणीव बहुतेक सर्व लेफ्टेनंट गव्हर्नर यांना झालेली होती. आजचा बंगाल, बिहार व आसाम या तीन्ही प्रांतांचा अंतर्भाव त्या वेळीं 'बंगाल' या एका प्रांतांत होत असून या प्रांताची लोकसंख्या सुमारें आठ कोटी होती. लोकसंख्येच्या दृष्टीनें मुंबई इलाख्याचे चौपट असलेल्या या प्रचंड प्रांताचें आधिपत्य एक्झिक्युटिव्ह कौन्सिल नसलेल्या लेफ्टेनंट गव्हर्नरकडे असे. याबद्दल बंगाली लोकांस सहजच एक प्रकारचें वैषम्य वाटत असे. आपण हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांमध्यें विद्या, संस्कृति, कला वगैरेमध्यें अग्रेसर असतांहि मुंबई-मद्रास-सारखा गव्हर्नर आपले वांट्यास न येतां दुय्यम प्रतीचे गव्हर्नरवरच आपणांस संतुष्ट

टीप—या लेखांतील अवतरणें शब्दशः नसून सारांशरूपानें आहेत.

रहावें लागतें, याबद्दल बंगाली लोकांस वाईट वाटत असे. सरकारकडून या विषमतेचा असा उलगडा करण्यांत येत असे कीं, ज्याअर्थी कलकत्ता येथें हिंदुस्थानचे व्हाइसरॉय ऊर्फ गव्हर्नर जनरल यांची गादी आहे, त्याअर्थी त्याच शहरामध्यें किंवा प्रांतामध्यें गव्हर्नर नेमणें संप्रदायास व औचित्यास सोडून आहे. गव्हर्नर नाहीं म्हणजे एक्झिक्युटिव्ह कौन्सिल नाहीं, लेफ्टेनंट गव्हर्नरला तर आठ कोटी प्रजेचा राज्यशकट हांकणें अतिशय श्रमाचें झालेलें, अर्थात् बंगालचीं दोन शकलें करून त्यांचेवर दोन लेफ्टेनंट गव्हर्नर नेमणें क्रमप्राप्तच झालें होतें व या व्यवस्थेला खुद्द बंगाली लोकांनींहि हरकत घेतली नसती. पण हल्लींसारखी बंगाली भाषा बोलणाऱ्या पांच कोटी लोकांचा एक प्रांत व हिंदी भाषा बोलणाऱ्या तीन कोटी लोकांचा दुसरा प्रांत अशी शहाणपणाची वांटणी न करितां लोकमताला, विशेषेंकरुन बंगाली लोकमताला कस्पटासमान लेखण्यांत भूषण मानणाऱ्या लॉर्ड कर्झननीं भाषा, विद्या, संस्कृति वगैरेंचा कसलाहि विचार न करितां बंगालच्या नकाशावर एक कृत्रिम रेघ ओढून त्याचे पूर्व बंगाल व पश्चिम बंगाल असे दोन भाग केले व ही योजना इतक्या गुप्त रीतीनें ठरविली कीं, सरकारी जाहीरनामा छापून प्रसिद्ध होईपर्यंत बंगाली लोकांस तिचा सुगावाहि नव्हता! लॉर्ड कर्झन पक्कें ओळखून होते कीं, हिंदुस्थानांत एखादा जुलमी कायदा पास होईपर्यंतच साऱ्या चळवळी चालतात. पण एकदां कां तो कायदा वज्रलेप झाला म्हणजे मग लोक आपल्या चळवळी थांबवून दैवाला दोष देत आपापले उद्योगास लागतात! म्हणून हा गुप्तपणा व ही घिसाडघाई! पण चळवळ होऊं न देण्यासाठीं जें कारस्थान करण्यांत आलें, त्यामुळें चळवळीस अधिकच जोर चढला व या सहा वर्षांच्या ( १९०५ ते १९११ ) चळवळीनें त्रिवारच नव्हे तर शतवार 'वज्रलेप' ठरलेल्या वंगभंगामध्यें दुरुस्ती करण्यास सरकारास भाग पाडलें व सन १९११ चे दिल्लीदरबारमध्यें बंगाली जनतेला टोंचणाऱ्या या अन्यायाचें शल्य काढून टाकण्यांत आलें! आमच्या प्रभावी लोकमताच्या व कर्तबगार चळवळीच्या तेजानें खुद्द सरकारसुद्धां जेरीस आलें! व हिंदुस्थानचे वयोवृद्ध पितामह दादाभाई नवरोजी यांस या लोकविजयाबद्दल इतकें कौतुक वाटलें कीं, त्यांनीं बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांस लंडनहून एक जाहीर पत्र लिहून त्यांत त्यांचें या विजयाबद्दल अभिनंदन केलें व याच चळवळीच्या धोरणावर स्वराज्याची चळवळ करा अशी विनंति केली!

गेल्या बीस वर्षांतील हिंदुस्थानांतील राष्ट्रीय चळवळींस कमीजास्त मानानें स्फूर्ति वंगभंगाचे चळवळीपासून मिळाली आहे. स्वराज्याची ऊर्फ होमरूलची महायुद्धकालीन चळवळ ( १९१५–१९१८ ), असहकारयोगाची चळवळ ( १९२०-२१ ) व गुदस्ताची कायदेभंगाची चळवळ या सर्वांची उभारणी कमीजास्त मानानें वंगभंगाच्या चळवळीवर करण्यांत आलेली आहे. वंगभंगाचें खरें दुःख फक्त बंगाललाच व या चळवळीचें क्षेत्रहि बंगालपुरतेंच संकुचित रहावें, अशी

तत्कालीन नेमस्त पक्षाची फार इच्छा ! पण हिंदुस्थान जर एक राष्ट्र आहे, तर राष्ट्राचे एका अवयवास दुःख होतांच त्याची कळ इतर सर्व अवयवांस लागली पाहिजे अशी विचारसरणी केसरीप्रभृति पत्रांनीं सुरू केली. बंगाली लोकांनींच फक्त चळवळ केली तर तेवढ्या प्रांतास चिरडून टाकणें सरकारास फार सोपें पडेल, म्हणून आपणां सर्वांस बंगालविषयीं खरी सहानुभूति वाटत असेल तर आपण सर्वांनींच या पेटलेल्या यज्ञकुंडांत आहुति टाकीत राहिलें पाहिजे असा केसरीचा अभिप्राय होता. (१२-८-०५). यावर नेमस्त पक्षाकडून अशी कोटि करण्यांत येत असे कीं, स्वदेशी व बहिष्कार या चळवळी बंगाली लोकांनीं सुरू केल्या आहेत व बंगालमध्यें लोकमताचा जोर असल्यामुळें तेथें त्या चळवळी यशस्वी रीतीनें व मोठ्या प्रमाणावर चालतात. पण जेथें लोकमत प्रक्षुब्ध नाहीं त्या ठिकाणीं त्या चळवळी सुरू केल्यास यशस्वी होणार नाहींत, व चळवळ सुरू करणाऱ्यांची फाजिती मात्र होईल ! यापेक्षां बंगालविषयींचे सहानुभूतीचे ठराव पास करून बंगालमध्यें सरकार व लोकमत यांमध्यें जें तुंबळ युद्ध चालू आहे तें आपण इतर प्रांतांनीं नुसतें पाहूं या ! केसरी म्हणे, लोकमत तयार आहे पण जुने पुढारी मात्र तयार नाहींत; बंगालमध्यें तरी जी विलक्षण चळवळ चालू आहे ती केवळ वंगभंगामुळेंच उत्पन्न झाली आहे काय ? नाहीं. शंभर वर्षे इंग्रज सरकारनें आम्हांस पिळून काढून राज्य चालविलें आहे; गेलीं वीस वर्षें कॉंग्रेसची चळवळ हाणून पाडण्याचे आटोकाट प्रयत्न केले आहेत; व लॉर्ड कर्झनचे कारकीर्दीत दडपशाहीचा वरवंटा अखिल हिंदुस्थानावर फिरविण्यांत आला आहे. या तीन कारणांनीं लोकमत हिंदुस्थानच्या सर्वच प्रांतांमधून अगदीं क्षुब्ध होऊन गेलें आहे. वंगभंग हा चळवळीस निमित्तमात्र झाला आहे. वास्तव चळवळीस सर्व प्रांतांमध्यें प्रारंभ होणार ही गोष्ट अपरिहार्यच आहे. ( १५-८-०५ ). बंगालचे खालोखाल चळवळ महाराष्ट्रांत झाली, महाराष्ट्राचे खालोखाल पंजाबांत व पंजाबचे खालोखाल मद्रासेंत. महाराष्ट्रीय चळवळीचें प्रवर्तकत्व व धुरीणत्व अर्थातच केसरीकडे होतें.

कोणत्याहि जोरदार चळवळीबरोबरच राष्ट्रामध्यें विचारक्रांतीहि होत असते. केसरीनें सन १८९१ पासून नेमस्त पक्षाचा विरोध संपादून महाराष्ट्रामध्यें जी तेजस्वी राजकीय विचारपद्धति प्रसृत केली तिचा स्वीकार वंगभंगविषयक चळवळीबरोबर सर्व राष्ट्राकडून झाला, ही गोष्ट केसरीला व केसरीचे अभिमानी वाचकवर्गास अत्यंत धन्यता वाटणारी आहे! कोणतीहि विचारसरणी कालाचे ओघास धरून आहे कीं नाहीं हें ठरविणार कोण ? तर कालच; व कालाचें शिक्कामोर्तब सन १८९१ पासूनच्या केसरीच्या विचारसरणीवर बसलें याचा जितका केसरीपक्षाला आनंद तितकेंच केसरी-प्रतिपक्षास दुःख! नेमस्त पक्षाचा वंगभंग चळवळीस जो प्रच्छन्न विरोध, विशेषतः बंगालचे बाहेरचे प्रांतांत होता, तो कां याचाहि यावरून उलगडा होईल. बंगालचें दुःख इतर प्रांतांनीं वेशीवर बांधावें कीं बांधूं नये, तीव्र चळवळ सुरू करण्याइतका

बंगेतर प्रांतांत जोर आहे कीं नाहीं, या मुद्यावर जरी त्या वेळीं नेमस्त पक्ष लढत होता तरी त्याची खरी खटपट, वंगभंगाच्या चळवळीनें केसरीच्या ज्या विचारसरणीला सर्वत्र मान्यता मिळूं लागली होती, त्या विचारसरणीचा पाडाव कसा होईल यासाठीं होती ! महाराष्ट्रांतील नेमस्त पक्ष व केसरी पक्ष यांमधील ही लढाई म्हणजे नेमस्त पक्षावरील एक प्राणांतिक संकटच होय. हें संकट प्राणांतिक आहे हें ओळखूनच नेमस्त पक्षानें सुरतकांग्रेसचे पूर्वी, वेळीं व नंतर केसरी पक्षास चिरडून टाकण्यासाठीं निरनिराळे डावपेंच योजलें !

इ. स. १८७० ते १९०५ पर्यंत नेमस्त पक्षानें हिंदुस्थानच्या राज्ययंत्राची फार सूक्ष्म व परिश्रमपूर्वक पहाणी करून आमच्या स्थितीविषयीं जे साधार सिद्धांत काढले त्याबद्दल हिंदुस्थान त्याचा सदैवऋणी राहील. परंतु व्यवहारांत आपण पुष्कळदां पहातों कीं, जो डॉक्टर निदानामध्यें कुशल असतो त्याला चिकित्सेमध्यें मान असतोच असा नियम नाहीं. हिंदुस्थानच्या राज्ययंत्राची सूक्ष्म तपासणी, पाश्चात्य राजकारणांतील व इतिहासांतील विचारसरणीचा प्रसार व लोकसत्ताक संस्था व चळवळी यांची सुरुवात या तीनहि गोष्टी करण्याचें श्रेय नेमस्त पक्षास आहे व त्याबद्दल केसरीनें त्याचा वेळोवेळीं गौरव केलाच आहे. पण नेमस्त पक्षाची जी मूलभूत विचारसरणी तो सदोष होती व तिचें खंडन केसरीनें १८९१ पासून केलें. त्या विचारसरणींतील कांहीं प्रमेयें काय होतीं तीं पहाः--

( १ ) इंग्रज लोक चांगले, न्यायी, स्वातंत्र्यप्रिय आहेत.

( २ ) हिंदुस्थानांतील राज्यपद्धतीचे सूक्ष्म व दूरवरचे परिणाम त्यांस पटवून दिले तर येथील अन्याय कमी होतील. ( १०-७-०६ ).

( ३ ) कदाचित् येथील अधिकारी वर्ग जरी सत्तानुभवानें उन्मत्त झाला असला तरी विलायतेंतील लोकमताचे प्रणेते आमचा कैवार घेतील.

( ४ ) त्यांतले त्यांत ग्लॅडस्टन, मोर्ले, मिल्ल वगैरे स्वातंत्र्यप्रिय व उदारधी पुरुषांनीं अलंकारलेला लिबरल पक्ष तर हिंदुस्थानचा कैवार घेऊन त्याचा उत्कर्ष करण्यास फारच उत्सुक आहे. ( १८-१२-०६ ).

( ५ ) हिंदुस्थानचें कल्याण करणें हें इंग्रजी राज्याचें ध्येय आहे.

( ६ ) आपण मात्र सामाजिक व धार्मिक सुधारणा करून ते करणार असलेल्या कल्याणास पात्र झालें पाहिजे.

या विचारसरणीवर केसरीनें १८९१ पासून आघात केले. पण नेमस्त पक्षाचीं प्रमेयें अत्यंत चुकीचीं व विघातक आहेत हें ढळढळीत रीतीनें दाखविण्यासारख्या गोष्टी १९०५ पर्यंत घडून आल्या नव्हत्या. १८९७ नंतरच्या महाराष्ट्रांतील दडपशाहीनें व लॉर्ड कर्झन यांच्या औरंगजेबी सप्तवर्षात्मक कारकीर्दीनें नेमस्त पक्षांतील विचारसरणीचा पाया हळू हळू खणून काढण्याचें काम केलें. आणि ज्या वेळीं १९०५ मध्यें लॉर्ड कर्झननें बंगालची अरेरावीनें फाळणी केली त्या वेळीं त्याच्या या कृतीनें

नेमस्त पक्षास एवढा जबर धक्का बसला कीं तेथपासून त्या पक्षाचा ऱ्हास सुरू झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

बंगाली लोकांनीं लाखों सह्यांचे अर्ज केले, सभा भरवल्या, डेप्युटेशनें पाठविलीं, उदारधी लिबरल पक्षाचे उदारतर मुकुटमणि जॉन मोर्ले यांची सत्य व न्यायप्रीति जागृत करण्याचा प्रयत्न केला आणि या सर्व प्रयत्नांस जेव्हां अपयश आलें, तेव्हां नेमस्त पक्षाची विचारसरणी विघातक आहे अशी सर्व राष्ट्राची खात्री झाली. खवळलेल्या संयुक्त बंगालनें बहिष्काराचें तीव्र शस्त्र काढलें व औद्योगिक बहिष्काराचे पाठोपाठ राजकीय बहिष्कार डोकावूं लागला इंग्रज लोकांचें लक्ष वेधण्यासाठीं जर ब्रिटिश मालावर बहिष्कार घालावयाचा व इंग्रजी कारखान्याच्या चालू गाड्याला खीळ घालावयाची, तर राजकीय बहिष्कार पुकारून येथील नोकरशाहीच्या राज्य-शकटासच कां खीळ घालूं नये? अशी चर्चा बंगालमध्यें सुरू झाली. लोकमताला दडपण्यासाठीं सरकारनें जे प्रयत्न केले त्यांनीं इंग्रजी राज्याच्या न्यायीपणाचें उरलेलें पांघरूण निघून गेलें व त्यामुळें नेमस्त पक्षाची गाळण उडाली. ( ८-५-०६ ).

लोकमताचें स्वरूप दिवसेंदिवस भीषण होत चाललें ! इंग्रज लोक पक्के वस्ताद, त्यांचा राज्यकारभार स्वार्थमूलक, त्यांचेपासून हिंदुस्थानचें कल्याण खुषीनें होण्याची आशाच नको, येथील अधिकारीवर्गावरच पार्लमेंटांतील अधिकारारूढ पक्षाला अवलंबून रहावें लागणार, आमच्या गाऱ्हाण्यांची दाद पार्लमेंट घेणार नाहीं, तेथील अधिकारारूढ पक्षाला हाणून पाडण्यासाठीं जरी हिंदुस्थानचे कारभाराचा उपयोग विरोधी पक्षांनीं केला तरी, ते जेव्हां अधिकारारूढ होतील तेव्हां तसेच वागतील, ' न हि दुर्योधनो राज्यं मधुरेण प्रदास्यति, ' हा सिद्धांत दुर्योधनाचे काळापासून मोर्लेसाहेबांच्या काळापर्यंत अबाधित आहे, आमचा उत्कर्ष आमच्चेवरच अवलंबून आहे, हा सर्व राज्यशकट, त्याचें नियंत्रण ' आमचेंच (आहे )—पण कळेल तेव्हां, ' आम्ही इंग्रज सरकारचे खिशाला चाट बसविला पाहिजे, येथील राज्यशकटाला खीळ घातली पाहिजे, आमचे कारखाने, व्यापार, शेती, शिक्षण यांची वाढ आमची आम्हीच केली पाहिजे व त्यासाठीं स्वराज्य संपादलें पाहिजे, इंग्रजी साम्राज्यांतर्गत स्वराज्य संभवेल तरी कसें? एक तर साम्राज्य तरी खोटें ठरेल किंवा आमचें स्वराज्य तरी खोटें ठरेल, आरंभीं आमचे राज्यकर्त्यांस, आमचे इंग्रज हित-चिंतकांस स्पष्ट सांगितलें पाहिजे, बाबांनों, इतके दिवस आम्ही तुमचेवर वेडेपणानें भरंवसा ठेवला व फशीं पडलों, पण आतां तुम्हांला स्पष्ट सांगण्याची वेळ आली आहे कीं, तुमचे व आमचे हितसंबंध इतके परस्परविरोधी आहेत कीं, तुमचेकडून स्वराज्यविषयक मदत होणें कालत्रयीं शक्य नाहीं, आतां आमचे आम्ही उद्योगास लागलों आहोंत व पार्लमेंटच्या अधिकारक्षेत्राबाहेर हिंदुस्थानला काढून पूर्ण स्वतंत्र केल्याशिवाय राहणार नाहीं, तुम्हाला काय वाटेल तें करा, अशी विचारसरणी (१५-२-०८ ) प्रतिपादणारा नवा पक्ष जोरानें पुढें आला.

बिचाऱ्या नेमस्तांची व त्यांच्या पुढाऱ्यांची स्थिति फार चमत्कारिक झाली. भीषण लोकमत व भीषणतर दडपशाही यांचे कात्रींत सांपडलेलीं त्यांच्या पक्षाचीं मूलभूत तत्त्वें एकामागून एक खोटीं ठरत चाललीं. सरकारच्या न्यायबुद्धीला आळवणें निरुपयोगी आहे, अशी त्यांची पण पुरी खात्री झाली व ज्या ज्या वेळीं सरकारला 'हात आटोपा,' म्हणून म्हणण्याचा त्यांचेवर प्रसंग येई, त्या त्या वेळीं वाढत्या लोकमताचे जोराकडे ते बोट दाखवीत व सरकारला म्हणत, ' थांबा, थांबा, नाहीं तर लोक अधिकच बिथरतील,' ( १९-२-०७ ). इकडे चवताळलेल्या लोकमतां-बरोबर धांवण्याची धमक नसल्यामुळें लोकपक्षाशीं जेव्हां त्यांची चकमक घडे, त्या वेळीं ते लोकपक्षाच्या पुढाऱ्यांसहि तेंच सांगत, " थांबा, थांबा, नाहीं तर सरकार अधिकच बिथरेल. ' ( कित्ता ). याप्रमाणें लोकपक्षाची सरकारला भीति दाखवून व सरकारची लोकपक्षाला भीति दाखवून वेळ मारून नेण्यापलीकडे नेमस्त पक्षाला कांहीं कार्य उरलें नाहीं! नाहीं म्हणावयास मोर्लेसाहेबांशीं खासगी खलबतें करून त्यांचे झारींतून जें कांहीं स्वराज्योदक बाहेर पडेल त्यांत आणखी एक दोन थेंब अधिक घाला एवढें म्हणण्याचें काम त्यांनीं सुरू ठेविलें !

एवंच, कौन्सिलें सरकारच्या हुकमतींत, देश लोकपक्षाचे हुकमतींत अशा विपरीत स्थितींतहि नेमस्तांस काँग्रेसचा आधार होता. कारण काँग्रेस सर्वांशीं नाहीं तरी बहुतांशीं त्यांच्या हुकमतींत व या काँग्रेसच्या बाबतींतच केसरीनें त्यांचेवर १९०५ पासून विशेष चढाईनें हल्ला केला. ही चढाई करतांना केसरीनें जी धडाडी, जी समयज्ञता, जें योजनाकौशल्य दाखविलें, त्यांबद्दल त्याचें कौतुक करावें तेवढें थोडेंच ! नेमस्त पक्षास हाणून पाडावयाचें तर राष्ट्रीय पक्ष स्थापिला पाहिजे व त्या साठीं केसरीनें बंगाल, पंजाब, मद्रास व इतर प्रांतांमधील पुरोगामी पक्षाचें सहकार्य संपादलें पाहिजे. हें सहकार्य करितांना केसरीनें आपली भूमिका शक्य तितकी कायम ठेविली. प्रत्येक प्रांताचे परिस्थितीप्रमाणें त्या प्रांताची विचारसरणी कमीअधिक मानानें विभिन्न असणारच, हें ओळखून महाराष्ट्राला स्वतःची भूमिका संभाळून इतर प्रांतांशीं सहकार्य करण्यास केसरीनें प्रेरित केलें. पूर्ण स्वातंत्र्य हें ध्येय बंगाली लोकांस जसें भावना-ग्राह्य व बुद्धिग्राह्य झालें होत तसें महाराष्ट्रांत झालें नव्हतें. महाराष्ट्रांत तें फक्त बुद्धिग्राह्यच झालें होतें. म्हणून केसरीनें पूर्ण स्वातंत्राचे ध्येयाला मान्यता देऊन महा-राष्ट्रांत 'काळ्यागोऱ्यांचे' स्वराज्याचाच पुरस्कार केला. तसेंच बंगालमध्यें औद्योगिक बहिष्काराबरोबरच राजकीय बहिष्काराचा उपक्रम करण्यांत आला होता. पण महाराष्ट्राचे परिस्थितीस अनुलक्षून केसरीनें फक्त औद्योगिक बहिष्कारावरच जोर धरला व जशजशी लोकमताची तीव्रता वाढेल तसतसें त्यास बंगालच्या राष्ट्रीय पक्षाशीं समरस करावयाचा उद्योग आरंभिला !

नेमस्तांचें राजकरण नुसतें बुद्धिगामी, केसरीचें राजकारण बुद्धिगामी आणि भावनात्मक. आजचें गांधीजींचें राजकारण नुसतें भावनात्मक असें म्हणतां येईल.

केसरीनें सन १८९१ पासून नेमस्तांचे राजकारणास जी भावनेची व ध्येयवादाची जोड देण्याचा उपक्रम चालविला होता, त्या उपक्रमास वंगभंगापासून अपरिमित असा जोर चढला. दादाभाई नौरोजी यांनीं १९०६ सालच्या राष्ट्रीय सभेमध्यें स्वराज्याची घोषणा केली, पण महाराष्ट्रास स्वराज्याची कल्पना केसरीनें यापूर्वीच परिचित केली होती. केसरीनें इंग्रज लोकांशीं बुद्धिवाद करून स्वराज्य मिळेल असें कधींहि म्हटलें नाहीं. त्यासाठीं राष्ट्रानें स्वार्थत्याग केला पाहिजे, हालअपेष्टा भोगल्य पाहिजेत, तुरुंगांत गेलें पाहिजे, सरकार जे जे छळ करील ते ते सोसले पाहिजेत. हाच १८९१ पासूनचे केसरीचें उपदेशाचा निष्कर्ष आहे. ध्येयवाद, स्वावलंबन, स्वार्थत्याग व आत्मयज्ञ यांचे पायांवर केसरीनें आपले उपदेशाची इमारत १८९१ पासून जी उभारली तो पाया १९०५ नंतरचे वंगभंगीय चलवळीनें दृढच झाला, याबद्दल केसरी कौतुकार्ह नाहीं असें कोण म्हणेल ?

आत्मयज्ञाबरोबरच केसरीनें महाराष्ट्रीय जनतेला प्रतिकाराचीहि दीक्षा दिली. सरकारशीं झुंज खेळण्याचे प्रसंग वाढवावयाचे, झुंज खेळतांना आपली वीरवृत्ति प्रकट करावयाची, आपल्या तेजानें सरकारला हतप्रभ करावयाचें, आपल्या उपाययोजनेनें सरकारला गांगरून टाकावयाचें व अशा रीतीनें प्रतिकार करीत असतां आपलें राष्ट्रीय बल वाढवावयाचें, असा केसरीचा १८९१ पासून प्रयत्न आहे व तो प्रयत्न १९०५ नंतर विशेष उत्कटपणें सुरू झाला. प्रतिकारविरहित आत्मयज्ञ केसरीनें कधीं पुकारला नाहीं. बंगाली लोक महाराष्ट्रीयांपेक्षां अधिक भावनावश असल्यामुळें त्यांनीं कित्येक वेळां प्रतिकारविरहित आत्मयज्ञ करावयास सुरवात करितांच केसरीनें खाजगी रीतीनें त्या लोकांस राष्ट्रीय शक्तीची ही बिनहिशेबी उधळपट्टी थांबवण्याची सूचना दिली आहे.

केसरी स्वावलंबनाचा भोक्ता १८८१ पासूनच आहे. किंबहुना स्वावलंबनाचे तत्त्वांतूनच केसरीचा जन्म झाला आहे. लोकांस सुविद्य करून व लोकमत अधिकाधिक सुशिक्षित व प्रभावी करून त्या प्रभावी लोकमताचे जोरावर सरकारशीं झगडून हक्क मिळवावयाचें हेंच केसरीचें पहिल्यापासून धोरण आहे. या धोरणास १९०५ नंतर अत्यंत अनुकूल काळ आला. इंग्रज सरकारशीं बुद्धिवाद खेळून त्याची खात्री पटवून त्याच्या मर्जीनें व संतोषानें स्वराज्याचे हक्क मिळविण्याचें राजकारण राष्ट्रीय सभेच्या आरंभापासून वंगभंगापर्यंत निर्वेधपणें चाललें. पण ज्या वेळीं वंगभंगाची चळवळ सुरू झाली व इंग्रज सरकारविषयींचा विश्वास पार उडाला, त्या वेळीं साहजिकच राष्ट्रीय पुढाऱ्यांचें लक्ष राज्यकर्त्यांवरून उडून लोकांकडे फिरलें. हक्क मागण्याचा काळ गेला, हक्क मिळविण्याचा काळ आला. सरकारची खात्री करण्यास वेळ फुकट दवडण्यापेक्षां लोकांमध्यें आत्मविश्वास व जागृति उत्पन्न करणें अधिक श्रेयस्कर असल्याची खात्री झाली. पार्लमेंटच्या मेंबरांच्या घरांचे उंबरठे झिजविण्यापेक्षां गरीब शेतकऱ्यांचे उंबरठे झिजवून त्यांस कार्योन्मुख करणें हें तत्त्व केसरीनें

प्रचारांत आणिलें. इंग्रजी न्यायबुद्धीला आळवण्यापेक्षां आमच्या राष्ट्रप्रेमाला आळवणें अधिक फायद्याचें ठरलें. लोकमताची नजर ब्रिटिश राष्ट्रदेवतेवरून उडून आर्य-मातेकडे वळली !

या स्वावलंबनाच्या लाटेचा केसरीनें योग्य तो फायदा करून घेतला. हिंदुस्थानची औद्योगिक जागृति होण्यास पुष्कळ तऱ्हांच्या साधनसंपत्तीची जरूर आहे, ही गोष्ट केसरी जाणून होता. परंतु औद्योगिक उन्नति होण्यास आवश्यक ती लोकांचे मनाची भूमिका तयार करण्याचें काम केसरीनें केलें. परकीय माल, मग तो इंग्लंडचे बाहेरचा कां असेना, त्यावर जकात बसवून आमच्या चिमुकल्या उद्योगधंद्यांचें रक्षण करण्यास सरकार तयार नाहीं, तेव्हां त्या मालावर राष्ट्रीय जकात बसविली पाहिजे हें तत्त्व ओळखून केसरीनें तदनुसार लोकजागृति केली. परकीय माल, विशेषेंकरून ब्रिटिश माल, याजवर बहिष्कार घालून आपले उद्योगधंद्यांची वाढ करण्याच्या कामीं ज्यांनीं पुढाकार घेतला त्यांमध्यें केसरीचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला पाहिजे. 'स्वार्थ-त्याग करूनसुद्धां' स्वदेशी माल घ्या, हें तत्त्व कलकत्ता कॉंग्रेसनें, ( १९०६ ), सालीं मोठ्या मिनतवारीनें मान्य केलें. कारण कॉंग्रेसचे कर्णधार नेमस्त पुढारी ! यांच्या राहणीला तें तत्त्व फारसें सोयीचें नव्हतें व १९०७ च्या राष्ट्रीय सभेच्या कच्च्या ठरावांच्या खर्ड्यांत 'स्वार्थत्यागा'चा उल्लेख 'अहेतुपूर्वक' गाळण्यांत आलेला होता ! स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, मद्यपाननिषेध या स्वराज्याच्या चतुःसूत्रीवर केसरीचा फार जोर असे व या सर्वच चळवळी स्वावलंबनाचे पायावर रचलेल्या होत्या. धुळ्याच्या प्रांतिक-परिषदे( १९०८ )मधील राष्ट्रीय कार्यक्रमाची आंखणी केसरीच्या तत्त्वानुसार झाली होती. कारण त्या परिषदेच्या गळ्यांत नेमस्त पक्षाचें लोढणें नव्हतें.

ज्याप्रमाणें स्वावलंबनाच्या तत्त्वाचा परिपोष औद्योगिक उन्नतीला अनुकूल असें लोकमत बनविण्याकडे केसरीनें करून घेतला, त्याप्रमाणें स्वदेशीच्या तत्त्वाचा उपयोग सर्वांगीण राष्ट्रीय वृत्तीकडे करण्यांत केसरीनें पुढाकार घेतला होता. राष्ट्रीय मनोवृत्तीचे आंदोलनांत कित्येक वेळां साध्या शब्दांतूनहि नवीं नवीं तत्त्वें निघतात, याचें प्रत्यंतर 'स्वदेशी' या शब्दाचे इतिहासांत सांपडेल. स्वदेशीचा मूळ उपयोग स्वदेशी वस्तुप्रसाराचे कामीं करण्यांत आला. पण लौकरच त्या शब्दार्थाचा विकास होऊन स्वदेशी वस्तूंवरील प्रेमाबरोबर स्वभाषा, स्वधर्म, स्वसंस्कृति इत्यादि प्रत्येक 'स्वदेशी' गोष्टीवरील प्रेमाचा पुरस्कार वाढला! ज्याप्रमाणें सरकारविषयक लोकांच्या 'अप्रीति'चा शेवट युरोपियन संस्कृतीविषयींचे अप्रीतींत झाला, त्याप्रमाणेंच स्वदेशी वस्तूंवरील प्रेमाबरोबरच लोक स्वभाषा, स्वधर्म, स्वसंस्कृति इत्यादिकांवर त्या 'स्वदेशी वस्तु' निराळ्या अर्थानें आहेत म्हणून प्रेम करूं लागले व या राजकीय जागृतीचें पर्यवसान सांस्कृतिक जागृतीमध्यें झालें. या दृष्टीनें वंगभंगविषयक चळवळीचें निरीक्षण करितांना केसरीविषयींची कौतुकबुद्धि द्विगुणित होते. कारण या सांस्कृतिक जागृतीचें

बीजारोपणहि करण्याचा उपक्रम केसरीनें १८९१ सालापासून केला आहे. आमचा समाज, आमचा धर्म यांवरचें केसरीचें प्रेम सर्वश्रुतच आहे व केसरीनें प्रसृत केलेल्या या विचारसरणीचें स्वतंत्रपणें अवलंबन विपिनचंद्र पाल व अरविंद घोष या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं बंगालमध्यें केलेलें ज्यांनीं पाहिलें, त्यांस केसरीची दूर दृष्टि व अचूक अंदाज यांचें नवल वाटलें असल्यास नवल तें कोणतें ?

केसरीचें राजकारण भावनात्मक होतें तरी त्याचा पाया मानवस्वभावज्ञान हा असल्यामुळें वेगवेगळ्या राजकीय आंदोलनांत केसरीला आपला सुवर्णमध्य सोडण्याचा प्रसंग आला नाहीं. जसजसा लोकमताचा जोर वाढत चालला तसतसें सरकारनें अधिकाधिक उग्र स्वरूप धारण करण्यास सुरुवात केली. स्वदेशी बहिष्काराचा प्रसार करण्यामध्यें तेव्हांहि आजच्याप्रमाणेंच तरुण अग्रभागीं होते. तरुण लोक शांततेन पिकेटिंग करून परकीय मालाची विक्री थांबवीत हें पाहून अधिकारीवर्गानें त्या तरुण लोकांस शाळाकॉलेजांमधून हांकलून दिलें. लगेच सरकारी व निमसरकारी शाळांपासून अलिप्त राहून नवीन पद्धतीचें राष्ट्रीय शिक्षण देण्यास राष्ट्रपुढाऱ्यांनीं सुरुवात केली. वर्तमान-पत्रांमार्फत जागृति होते म्हणून वर्तमानपत्रांचे संपादकांवर राजद्रोहाच्या खटल्यांचें सत्र सरकारनें सुरू केलें व अखेर प्रेस ॲक्टहि काढून मुद्रणस्वातंत्र्यावर घाला घातला. सभा बंद पाडण्यासाठीं ना. गोखल्यांसारख्या नेमस्त पुढाऱ्यांचे विरोधास मान न देऊन सभाबंदीचा कायदा करण्यांत आला ( १९०७ ). मिरवणुकी व परिषदा यांचेवर पोलिसांचे हल्ले सुरू करून पुढाऱ्यांच्या देखत त्यांचे अनुयायांस लाठीमार देण्यांत आला. १९०८ मधील बाँब प्रकरणाचा सरकारास उपयोग होऊन अत्या-चारीबरोबर अनत्याचारीहि चळवळ दडपून टाकण्याचा प्रयत्न कसून करण्यांत आला. बारीसाल म्हणजे तर त्या काळची बारडोली ! बारीसाल शहरांतील एकाहि दुकानांत एक वारभरहि परकीय देशांत तयार झालेलें कापड विकण्यांत येत नसे ! एकदां एका युरोपियन मिशनरीला कापड लागलें, तेव्हां तो बाजारांत गेला व मँचे-स्टर येथें तयार झालेलें कापड मागूं लागला. पण त्याला तें कापड कोणी विकीना, तेव्हां त्यानें कलेक्टरकडे तक्रार केली. कलेक्टरसाहेबांनीं आपला चपराशी पाठविला, पण त्यालाहि तोच जबाब मिळाला. अखेर कलेक्टरसाहेबांनीं बाबू अश्विनीकुमार दत्त यांस पत्र पाठवून त्यांची चिठ्ठी देववून त्या मिशनऱ्यास पुनः बाजारांत पाठविलें व अखेर त्याला विलायती कापड मिळालें ! या व अशा अनेक गोष्टींचा परिणाम सरकारचे मनावर होऊन सरकारनें अश्विनीकुमार व इतर आठ लोकप्रिय पुढाऱ्यांस चौकशीशिवाय अटकेंत ठेविलें ( १९०९ ). तरी चळवळ जोरांत चालूच होती !

महाराष्ट्रांतहि स्वदेशी चळवळ व बहिष्काराची चळवळ यांचा जोर वाढता होता. केसरी हें चळवळीचें केंद्र व त्या चळवळीच्या शाखा-उपशाखा खेडेगांवांपर्यंत नेऊन भिडवण्यांत आल्या होत्या. राष्ट्रीय शिक्षण व राष्ट्रीय कांचकारखाना यांचा उपक्रम तळेगांवला करण्यांत आला. साखर, कागद, पेन्सिली, बांगड्या, आगपेट्या,

छत्र्या वगैरेंचे कारखाने लहानमोठ्या प्रमाणांवर सुरू झाले. हातमागांची मागणी वाढली. कोष्टी लोकांस अन्न मिळूं लागलें. गिरण्यांची स्थिति १८९३ पासून जी हलाखीची होती ती सुधारली व १९०५ ते १९०९ पर्यंत गिरणीवाल्यांनीं आपली पोळी यथेच्छ पिकवून घेतली. मद्यपाननिषेधाची चळवळ १९०८ चे आरंभीं पुणें शहरांत इतकी यशस्वी झाली कीं, तिचा प्रतिकार कसा करावा असा विकट प्रश्न दारूबाजीच्या कैवाऱ्यांपुढें येऊन पडला. जिकडेतिकडे नवजीवन दिसूं लागलें. राष्ट्रीय सभेंत नवीन प्रकारचें चैतन्य उत्पन्न झालें. राष्ट्रहिताचा विचार व प्रयत्न करणाऱ्या लोकांची संख्या वाढली. या सर्व प्रगतीचें अर्धे अधिक श्रेय केसरीला द्यावें लागेल यांत संशय नाहीं.

वंगभंगाच्या या सप्तकामध्यें, विशेषतः त्यांतील पहिल्या तीन वर्षांमध्यें केसरीनें जें उत्साही वाङ्मय निर्माण केलें त्याच्या पुनःपुनः वाचनानें पंचवीस वर्षांनंतरहि केवढें स्फुरण येतें ? हें सप्तक, विशेषतः त्यांतील जोमाचीं पहिलीं तीन वर्षें हीं केसरीच्या आयुष्यांतील अत्यंत वैभवाचीं व पराक्रमाचीं आहेत. याच काळांत केसरीचें राजकीय तत्त्वज्ञान परिणतावस्थेस पोहोंचलें. १९०५ पूर्वीच्या शांतिकाळाला १९१५ नंतरच्या तुमुल शांतियुद्धकालाशीं जोडण्याचें काम या सप्तकांतील केसरीनें केलें आहे. १९२०-२१ मधील गांधींचे लेख, व १९०५-०८ मधील केसरींतले लेख तुलनात्मक दृष्टीनें वाचणाऱ्या मनुष्यास असहकारयोगाचें तत्त्वज्ञान वैयक्तिक मनोरचनेंतील व परिस्थितींतील फरक वजा करितां केसरीच्या पंचवीस वर्षांपूर्वीच्या तत्त्वज्ञानाशीं किती जुळतें तें पाहून साश्चर्य आनंद वाटतो; व स्वातंत्र्यप्राप्त्यर्थ झगडणाऱ्या दोन वीर पुरुषांमध्यें मनोरचना, देश-काल-परिस्थिति, यांत कितीहि भेद असला तरी त्यांची प्रभावशाली विचारसरणी कशी एकाच रुळावरून जाणारी आहे तें समजतें. केसरी स्वभावतःच वादकुशल असल्यामुळें या काळांतील वाद-पाटव व्यक्त करणारे व शत्रूवर निर्दयपणें प्रहार करणारे लेख वाचकांस स्तिमित करतील. त्याचप्रमाणें शांत विचारसरणीनें उद्बोधक झालेले, विधायक प्रवृत्तीचें राजकीय तत्त्वज्ञान प्रतिपादन करणारे ' राजकीय पक्षोपन्यास ', (११-२-०८), यां-सारखे लेख वाचकांस संतोष देतील ! परंतु केसरींत नुसता वाद, नुसतें तत्त्वज्ञान, नुसती चर्चा, नुसती टीका कधींहि सांपडणार नाहीं. हे वाद, हें तत्त्वज्ञान, ही चर्चा, ही टीका, हीं सर्व उच्चध्येयानुगामी आहेत. त्या ध्येयाचें प्रतिपादन करीत असतां केसरींत वंगभंगाविषयक चळवळीच्या या वर्षांमध्यें जे स्फूर्तिदायक लेख प्रसिद्ध झाले ते आज पंचवीस वर्षांनंतरहि वाचले असतां केसरीचें केसरित्व सिद्ध करण्यास समर्थ आहेत !

---

# केसरीवरील राजद्रोहाचे खटले

[ श्री. चिंतामण अनंत तुळपुळे, बी. ए., एल्एल्. बी. ]

केसरीच्या कामगिरीचा विचार करतांना तो दोन बाजूंनीं करावा लागतो. एकतंत्र व परकी सरकार आणि शून्यतंत्र झालेली हिंदी प्रजा यांच्या झगड्यांत केसरीकारांना दोन प्रकारची कामगिरी करून दोन्ही पक्षांवर परिणाम घडवून आणावयाचा होता. एकीकडून प्रजापक्षाचें संघटण करून, लोकांमध्यें आपलेपणा उत्पन्न करून, त्यांच्या दुर्बल परिस्थितीचें व तिच्या कारणांचें ज्ञान त्यांच्यांत जागें करून, त्यांस संघशक्तीचें महत्त्व पटवून देऊन त्यांचें सामर्थ्य एकत्रित करावयाचें होतें व उलटपक्षीं राजसत्तेचा कैदवारपणा खिळखिळा करून, तिच्या शक्तीचे तट पोंखरून, तिच्या वैभवाचें भय घालवून, लोकमताचा परिणाम राजकारणावर सुलभतेनें होईल अशी स्थिति निर्माण करावयाची होती. लोकमत आणि राजदंड यांच्यामधील विषमता नाहींशी करून त्यांस तुल्यबल बनवावयाचेंच होतें आणि त्या दृष्टीनें त्यांनीं केलेल्या कामगिरीचा विचार करतांना त्यांचेवरील इतर खटल्यांचेपेक्षां त्यांचेवर झालेल्या राजद्रोहाच्या खटल्यांचें महत्त्व विशेष प्रकारचें आहे.

लो. टिळकांवर आणि केसरीवर एकंदर पांच खटले झाले. त्यांपैकीं लोकमान्यांच्या हयातींत चार झाले. पहिला म्हणजे कोल्हापूरप्रकरणीं श्री. बर्वे यांनीं अब्रुनुकसानीबद्दल केलेला होय. ह्या खटल्याशीं राजकारणाचा संबंध असला तरी तो प्रत्यक्ष इंग्रज सरकारनें लोकमान्यांवर किंवा केसरी संस्थेवर केलेला आघात नसल्यामुळें त्याचा विचार येथें करण्याचें कांहीं कारण नाहीं. चवथा म्हणजे नगर व बेळगांव येथील भाषणांबद्दल, होमरूलच्या चळवळींच्या काळांत झालेला खटला होय. या खटल्यांत लोकमान्यांचा व्यक्तिशः संबंध होता व त्याचा निकालहि लोकमान्यांस अनुकूल असाच झाला. एका दृष्टीनें पाहतां हा जमानतीचा खटला म्हणजे बदललेल्या काळाचें एक गमकच होतें. 'हिंदुस्थानांतील असंतोषाचे जनक' अशा तऱ्हेची पुरुषार्थबोधक पदवी सरकारचे चारचक्षु असलेल्यांनीं ज्यांना दिली व ज्यांना सन १९०८ सालीं हिंदुस्थानांतून सहा वर्षें उचलून बाजूला ठेवणें सर जॉर्ज क्लार्क यांस अवश्य वाटलें, त्याच लोकमान्यांस भाषणबंदीच्या निर्जीव बंधनानें आवरूं पाहण्याच्या नेभळ्या परिस्थितीला महायुद्धानें, स्वयंनिर्णयाच्या घोषणेनें, आणि अधिकाधिक प्रभावी होणाऱ्या लोकपक्षाच्या तेजानें, आणून ठेवलें होतें.

वर लिहिलेले दोन खटले सोडून दिले असतां, लोकमान्यांचे हयातींत केसरीवर झालेले दोन खटले शिल्लक राहतात. त्यांपैकीं पहिला म्हणजे सन १८९७ सालचा. हा खटला ज्या लेखांवरून झाला ते लेख टिळकांनीं स्वतः लिहिलेले नव्हते. त्यांचेपैकीं एक लेख म्हणजे शिवाजी उत्सवाचे वेळीं झालेल्या भाषणाचा उतारा होता.

व दुसरा लेख म्हणजे एक कविता होती. त्यामुळें या लेखांसंबंधीं टिळकांवर झालेला खटला म्हणजे केसरीनें काय लिहिलें याबद्दल झालेला खटला नसून ' टिळकां 'च्या केसरीमुळें काय गोष्टी व विचार लोकांत प्रसृत झाले व ते नोकरशाहीला कसे अप्रिय वाटले याचा न्यायकोर्टात निघालेला कीसच होता असें म्हटलें पाहिजे. या दृष्टीनें पाहतां प्रत्यक्ष आक्षिप्त लेखांपेक्षां ज्या काळीं ते लेख लिहिले गेले त्या काळांतील चालू असलेल्या चळवळी व टिळकांनीं केलेली उपाययोजना ह्यांचा विचार अधिक महत्त्वाचा आहे.

सन १८९७ सालीं पुणें शहरांत व सर्व महाराष्ट्रांत प्लेगचा कहर, तपासणीचा जुलूम, नुकताच पडलेला भयंकर दुष्काळ, त्या वेळीं केसरीनें सुरू केलेली सारा-तह-कुबीची चळवळ या गोष्टी लोकांचे नजरेपुढें प्रामुख्यानें होत्या. सुधारकांचे प्रतिस्पर्धी व जुन्या संस्कृतीचे पुरस्कर्ते एवढेंच रूप केसरीचें शिल्लक नसून **सरकारचे निर्भीड टीकाकार व लोकपक्षाचें बल वाढविणारे कुशल धन्वंतरी** असें नवीन रूप लोकांपुढें वावरूं लागलें होतें. मुंबई युनिव्हर्सिटीचे सदस्य विद्वान् टिळक, प्लेगच्या दिवसांत सरकारवर टीका करणारे, पण स्वतःच्या जिवाची पर्वा न करतां प्लेगचें इस्पितळ चालविणारे लोकहितकर्ते केसरीकार, दुष्काळाच्या आपत्तींत प्रजेच्या न्याय्य हक्कांची आठवण लोकांस आणि सरकारास उत्कटतेनें करून देणारे नामदार टिळक, यांना या सर्व खटाटोपाबद्दल जरी सरकार प्रायश्चित्त देऊं इच्छित नसलें तरी, भेदनीतिनिपुण मुत्सद्यांना शिवाजी-उत्सव व अफझलखानाच्या वधाची मीमांसा ही गोष्ट कधींहि रुचण्यासारखी नव्हती. त्यांतच योग्य प्रसंगीं योग्य त्या—जरूर तर हिंसात्मक—उपायांचा अवलंब करणें हे राजनीतिशास्त्राच्या दृष्टीनें योग्य व अदूषणीय आहे हें प्रतापगडच्या कारस्थानांवरून सिद्ध होणारें प्रमेय, ज्यांच्या कानांत त्रास देतच शिरलें, त्यांना त्यानंतर थोड्या दिवसानीं झालेला रँडसाहेबाचा खून भयंकर रीतीनें भेवडावूं लागला व त्यांस चित्पावन ब्राह्मणांच्या बंडाचीं स्वप्नें पडूं लागलीं यांत कांहीं आश्चर्य नव्हतें व अशा तऱ्हेची विचारांची मालिका देशांत प्रसृत करणारे म्हणून टिळक व त्यांचे चळवळीचें साधन केसरी यांचेवर सरकारचा झालेला रोष राजद्रोहाचे खटल्याचे रूपानें प्रगट झाला.

केसरीवरील राजद्रोहाचा हा पहिला खटला अखिल हिंदुस्थानांत या गुन्ह्या-बद्दलचा दुसरा खटला होता व टिळकांच्या इतक्या योग्यतेचा राजमान्य व लोकप्रिय विद्वान् अशा आरोपांत यापूर्वीं सांपडला नव्हता, त्यामुळें या खटल्याला सर्व देशांत फार महत्त्व प्राप्त झालें होतें. टिळकांच्या बचावाकरितां सर्व देशांत फंड जमविण्यांत आला. मुंबई शहरानें दहाअकरा हजार रुपये दिले. महाराष्ट्रानें व बाकीच्या देशानें सुमारें बत्तीस हजार रुपये जमविले आणि टिळकांच्या राज-कारणांत शिष्य-वृत्तीनं राहणाऱ्या बंगाली लोकांच्या कलकत्ता शहरानें दहा हजार रुपयांचा वांटा उचलला. कलकत्त्याहून प्यू व गार्थ या बॅरिस्टरांची जोडी पाठविण्यांत

आली. स्वयंसेवक वॅ. चौधरी आले. मुंबईच्या वकील मंडळींनींहि प्रयत्नांची शिकस्त केली. पण केसरीच्या मराठी भाषेला अपरिचित असलेल्या मुंबई हायकोर्टांत युरोपियनांचें बहुमत असलेल्या जूरीच्या कोंडींत जें आरोपींस एकदां टाकण्यांत आलें तेथून त्यांस सोडविण्यास यांपैकीं कोणतीहि तयारी उपयोगी पडली नाहीं. शब्दार्थाचा कीस, व्याकरणाची खटपट, वकीलबॅरिस्टरांचें वक्तृत्व, कायद्याच्या शब्दांची ओढाताण या सर्व गोष्टी व्हावयाच्या तशा झाल्या आणि अखेरीस न्यायाधीश व ज्यूरींतील माणसें हीं माणसेंच असतात हें शाबीत झालें. लोकसेवक व म्हणून लोकनायक टिळक यांस १८ महिने सक्त मजुरीची शिक्षा मिळाली व सरकारी मुत्सद्द्यांच्या दृष्टीनें अनिष्ट चळवळींचा गड्डा छिन्नविच्छिन्न करण्यांत आला.

या खटल्याच्या निमित्तानें इं. पि. को. कलम १२४ अ यामधील Disaffection ( अप्रीति ) या शब्दाचा अर्थ Absence of affection ( प्रीतीचा अभाव ) असा हायकोर्टाचे तरतरीत तरुण न्यायाधीश मि. स्ट्रॅची यांनीं केला होता, तो पुढें सरकारास अयोग्य वाटून कायद्यांतील शब्द बदलण्यांत आले व त्यास हल्लींचें सर्वव्यापी स्वरुप देण्यांत आलें.

या खटल्याचे वेळचें केसरीचें धोरण व शिकवण म्हणजे निर्भयता, स्पष्टवक्तेपणा, स्वतःचे विषयीं व पूर्वजांचे कृत्यांविषयीं योग्य अभिमान व एकंदरींत यशाचा मार्गच असणारें स्वावलंबन हीं होत व राजकीय मोक्षाचा लाभ करुन घेणारास देहदंडाची तपश्चर्या करावी लागते, हा देशाचे, यशाचे इतिहासांतील नवा भाग लिहिल्याचा मानहि या खटल्याचे प्रसंगासच मिळाला पाहिजे.

या खटल्याचे योगानें आणि त्यांत झालेल्या शिक्षेनें टिळकांचें आणि केसरीचें बल शंभर पट वाढलें. समाजांतील सर्व वर्गांची सहानुभूति आणि आदर हीं त्यांस मिळालीं व स्वराज्याची झुंज खऱ्या निकरानें सुरु झाली. ज्या प्रमाणांत टिळकांचें व केसरीचें तेज वाढलें त्याच प्रमाणांत नोकरशाहीचा पक्ष हतप्रभ झाला.

केसरीवरील दुसरा व अत्यंत महत्त्वाचा राजद्रोहाचा खटला म्हणजे सन १९०८ मधील होय. या वेळीं टिळकांच्या पराक्रमाचा सूर्य नभोमध्यावर तळपत असून त्याचेकडे पहाण्याची सामान्य जनांची सोय नव्हती. मग अँग्लो-इंडियन वर्तमानपत्रांतील घुबडांची गोष्टच नको !

कर्झनशाहीच्या दुर्दमनीय अहंकारानें सर्व एशिआटिकांना खोटें बोलणारे ठरवून, बंगदेशाचीं दोन शकलें करुन, मेकॉलेनें नेभळे ठरविलेल्या बंगाल्यांच्या पारतंत्र्यांत निर्जीव बनलेल्या अंतःकरणांस फुल्लरसाहेबांच्या लाडक्या मुसलमानी बेगमेच्या पाठिराख्या गुंडांच्या अत्याचाररूपी विजेचे झटके बसवून बंगदेशाचें डोकें भणाणून सोडलें होतें. राजकीय पूर्वचरित्र न विसरलेल्या व विसरण्यास तयार नसलेल्या महाराष्ट्राचे अद्वितीय पुढारी या कालाचें अनुसंधान संभाळून देशांतील तरुणांच्या हृदयांत उत्पन्न झालेल्या चैतन्याच्या स्फुल्लिंगावर सावधानतेचे फुंकर घालून त्यांची

जागती ज्योत वनविण्याच्या प्रयत्नांत होते. स्वराज्य-चतुःसूत्राचा चतुर्मुख ब्रह्मा देशामध्यें नित्य नवी घटना घडवून आणीत होता. देशांत नव्या जीवनाचें आंदोलन सुरू झालें होतें. पंजाबचा सिंह आपल्या गंभीर गर्जनेनें भेकडांचीं हृदयें कांपवीत होता. बंगाली पाल शुद्ध स्वातंत्र्याची हांक फोडीत होता. अशा वेळीं सिंहगडाच्या पायथ्यापासून सह्याद्रीच्या पहाडासारख्या ओबडधोबड पण कठीण अशा महाराष्ट्रीय अंतःकरणांतून केसरीची स्वराज्याची नौबद जुन्या स्वराज्याचे बोल वाजवून येणाऱ्या स्वराज्याचा पडसाद उठवीत होती.

भारताच्या स्वराज्यसंग्रामाच्या या नव्या प्रारंभीं मुझफरपूर येथील बॉंबच्या धडाक्यानें आपपर पक्षांतील लोकांचीं अंतःकरणें भीतीनें कांपविलीं. खुदीराम बोस यानें मुझफरपूर येथें टाकलेल्या बॉंबनें दोन युरोपियन बाया मरण पावल्या. सर्व बंगाल प्रांत हादरून जाऊन झडती, पकडापकड, कट, खून, यांखेरीज शब्द ऐकूं येईनासा झाला. अधिकारी लोकांचीं डोकीं फिरून जाऊन दडपशाहीचा वेताळ देशांत पिंगा घालूं लागला. अँग्लो-इंडियन वर्तमानपत्रें सरकारला सल्ला देण्याच्या मिषानें नेटिव्हांना गोळ्या घालून ठार करण्याची भाषा वरळूं लागलीं. अशा वेळीं टिळक आपल्या पत्रांतून सरकारच्या डोळ्यांत उपदेशाचें अंजन घालण्याचें व आत्मीय बंगाली लोकांच्या मनोभूमिकेचें स्पष्टीकरण करण्याचें अशीं दोन्ही कामें मोठ्या स्थितप्रज्ञत्वानें करीत होते. अशाच स्थितींत त्यांनीं दुसऱ्या राजद्रोहाच्या खटल्याचा विषय झालेलें ' देशाचें दुर्दैव ' हें आर्टिकल लिहिलें. त्यानंतर अनुक्रमानें ' दुहेरी इषारा, ' ' बॉंब गोळ्याच्या खरा अर्थ ' व ' हे उपाय टिकाऊ नाहींत ' हे लेख केसरींत प्रसिद्ध झाले व त्यांपैकींच पहिल्या व चवथ्या लेखांवरून टिळकांवर मुंबई हायकोर्टांत राजद्रोहाचा दुसरा खटला भरण्यांत आला.

यांपैकीं ' देशाचें दुर्दैव ' या लेखांतील भाषेवरून व विचारसरणीवरून, तसेंच वारंवार उपयोगांत आणलेल्या गीतेंतील व मनुस्मृतींतील शब्दांवरून हा लेख टिळकांचे हातचा ही गोष्ट स्पष्ट होते. त्यानंतर सरकारनें स्फोटक पदार्थांचा कायदा करूं घातल्यानंतर प्रसिद्ध झालेल्या चवथ्या लेखांतील उपमा, स्वगत भाषणांसारखी वाक्यरचना, एकच कल्पना निरनिराळ्या तऱ्हांनीं आळविण्याची अलंकारिक भाषासरणी यांचे वरून सदर लेखाचें जनकत्व कोणाकडे असलें पाहिजे याचें बिनचूक अनुमान वाचकांस करतां येईल. पहिल्या लेखांत टिळकांनीं सरकारचें चुकतें कोठें हें दाखवून बंगाल्यांतील खुनी इसम हे श्रेष्ठ देशभक्त कसे होते व त्यांनीं केलेले खून हे स्वार्थाकरितां नसून गोऱ्या अधिकारी वर्गाच्या एकमुखी सत्तेबद्दल वाटणाऱ्या संतापानें कसे झाले होते हें दाखविलें असून सर्व प्रकारच्या लोकांचा मनःक्षोभ फक्त शांततेच्याच मार्गांनीं बाहेर पडावा असा आग्रह धरणें कसें चुकीचें आहे, हें प्रतिपादिलें आहे. तसेंच राज्यकर्त्यांनाहि त्यांचा विवेकी स्वार्थ लोकक्षोभाचे मर्यादेपलीकडे जाऊं शकणार नाहीं असा इषारा देऊन या प्रसंगामुळें

कांहीं तोंडपुजांप्रमाणें सरकारला प्रिय तेंच बोलून आपलें कर्तव्य कां संपत नाहीं, व सरकार राज्यपद्धतींत सुधारणा करण्याचा खरा उपाय अमलांत न आणील तर ' देशाचें दुर्दैव ' कसें ओढवेल हें स्पष्ट केलें आहे.

दुसऱ्या आक्षिप्त लेखांत देशांत बॉंब उडावयास नको असतील तर स्फोटक द्रव्यांचा कायदा करून भागणार नाहीं, राज्यपद्धतीची सुधारणा करून बॉंबची आवश्यकता नष्ट केली पाहिजे, असें केसरीकारांनीं प्रतिपादन केलें आहे व ज्ञानरूप असणारा बॉंब, मंत्रासारखा प्रभावी, जादूसारखी नजरबंदी करणारा, चुटकीबरोबर बनणारा, असल्यामुळें कायद्याच्या बंधनांपलीकडे कसा आहे हें स्पष्ट केलें आहे.

वर लिहिलेल्या दोन अग्रलेखांच्या जोडीला बाकीचे दोन अग्रलेख घालून या खटल्यांतील पुरावा करण्यांत आला. दोन्ही खटले एकत्र चालविले, जामीन घेण्याच्या अर्जापासून तों शेवटच्या निकालापर्यंत न्या. दावर यांनीं आरोपीच्या हिताची जपमाळ हातांत घेतली व अखेर सात युरोपियन असलेल्या स्पेशल ज्यूरीनें सात विरुद्ध दोन मतांनीं आरोपीस दोषी ठरविलें.

या खटल्यांतील बचावाचे कामीं लोकमान्यांनीं दाखविलेली असामान्य बुद्धिमत्ता व अलोट धैर्य हीं दुसरीकडे पहावयास मिळण्यासारखीं नाहींत. स्वतः खटला चालवीत असल्याचा फायदा घेऊन त्यांनीं लेख लिहितांनाचे आपले हेतु व भोंवतालची परिस्थिति स्पष्ट करून विस्तारानें सांगितली, राज्यपद्धति, राजपुरुष आणि प्रत्यक्ष राजा यांचेपैकीं फक्त राजाचा द्रोह एवढाच गुन्हा आहे हें उघड केलें, आणि न्यायमूर्ति दावर यांनीं काढलेल्या अधिक्षेपाच्या उद्गारांना आपल्या सूत्ररूप अशा तेजस्वी शब्दांनीं उत्तर देऊन ऐहिक न्यायासनापेक्षां पारलौकिक न्यायसत्तेवर आपण अधिक विश्वास ठेवतों हें सर्व जगाच्या निदर्शनाला आणलें.

या खटल्याचे कामीं गांभीर्य तर प्रथमपासूनच होतें, वीररस टिळकांच्या रूपानें मूर्तिमंत वावरत होता, हास्यरस भाषांतरकार जोशी यांच्या साक्षीनें निर्माण झाला, रौद्ररसाचा परिपोष दंग्यांतील मजुरांच्या संकटानें केला, देशांतील आबालवृद्धांच्या दुःखोद्गारांत करुणरस प्रतीत झाला, शिक्षेच्या प्रमाणानें व क्रूरतेनें भयानक अवतरला, दावरसाहेबांनीं आपल्या अखेरच्या शब्दांनीं बीभत्स रस दाखविला, प्रसंगाच्या लोकोत्तरपणांत अद्‌भुत दिसून आला आणि लोकमान्यांच्या स्थितप्रज्ञत्वांत शांतरस अनुभवाला आला. अशा तऱ्हेनें हें दुसऱ्या राजद्रोहाच्या खटल्याचें महाकाव्य संपलें व लोकमान्य टिळक गीतारहस्याला परिस्फुट करण्यासाटीं सहा वर्षांच्या मुदतीनें मंडालेस गेले.

हिंदुस्थानांतील लोकमत टिळकांच्या बाजूनें होतें यांत कांहीं नवल नाहींच, पण विलायतेमध्येंहि कॉटन, हिंडमन, केरहार्डी, या तत्कालीन उदारबुद्धीच्या पुढाऱ्यांनीं व ' मॉर्निंग लीडर ', ' स्टार ', ' न्यू एज ' या पत्रांनीं टिळकांचें गुणग्रहण केलें. ' लंडन टाइम्स 'नें टिळकांच्या शब्दांत राजद्रोह नव्हता पण अर्थांत होता; त्यांचें

लेखनचातुर्य हीच त्यांच्या मनांतील पापविचारांची साक्ष अशी मल्लीनाथी करून टिळक जहाल पक्षाचे मूर्धाभिषिक्त पुढारी म्हणून त्यांचेवर सरकारनें खटला केला ही अंतर्यामींची गोष्ट उघड केली.

सन १९०८ च्या शिक्षेंतून सुटून परत आलेले टिळक हिंदी राजकारणांत भीष्माचार्यांसारखे शोभूं लागले व त्यांच्या केसराची दरारा सर्व देशभरच नव्हे तर विलायतेंतहि झाला.

सन १९१६ सालीं झालेल्या जमानतीच्या खटल्यांत झालेला सरकारपक्षाचा पाडाव आणि त्याच सालच्या राष्ट्रीय सभेपासून सन १९२० सालीं लोकमान्यांच्या मृत्यूपर्यंत एकसारखा झालेला टिळकांचा व केसरी पक्षाचा उत्कर्ष ह्या दोन्ही गोष्टी टिळकांच्या या पूर्वींच्या तपश्चर्येचें फलच होत.

सन १९२० नंतर केसरी संस्थेवर खटला असा एकच सन १९२४ सालीं झाला. त्यांत राजद्रोहाचा भाग नसून हायकोर्टाचे बेअदबीसंबंधीं तो झाला होता. पुण्या-जवळील लोहोगांव येथील अर्जुना नांवाचा शेतकरी वॉकर या सोजराच्या बंदुकीं-तील गोळीस बळी पडला असतां त्यास गोऱ्या बहुमताच्या ज्यूरीनें एकमतानें सोडून दिलें. सेशन जज्जांस तें न पटून त्यांनीं खटला हायकोर्टाकडे पाठविला असतां, तेथील न्यायाधिशांनीं ज्यूरीचें म्हणणें अधिक ग्राह्य धरून आरोपीस सोडलें. या प्रसंगावरून काळ्यागोऱ्यांचे वादाच्या सर्वसाधारण विषयावर लिहिलेल्या स्फुटांवरून केसरीपत्र हायकोर्टाचे आक्षेपांत सांपडून या खटल्यांत संपादक श्री. केळकर यांस ५००० रु. च्या दंडाची शिक्षा झाली.

काळ्यागोऱ्यांतील न्यायदानाची पद्धति हा विषय निःसंशय फार महत्त्वाचा आहे व लॉर्ड रीडिंग यांच्या कारकीर्दींत या कामीं झालेली हातचलाखी व ईजिप्त आणि चीन या देशांत या प्रश्नास आलेलें महत्त्व यांचा विचार केला म्हणजे जित राष्ट्रांचे पायांतील ही एक जबरदस्त बेडी आहे ही गोष्ट स्पष्ट होते. केसरीच्या खटल्यानें ही गोष्ट लोकांपुढें आणली, पण तिचा घ्यावा तसा पिच्छा घेतला न गेल्यामुळें सरकारचा कायदा अजून या प्रकरणीं आहे तसाच योगनिद्रेंत आहे.

यापूर्वीं केसरीवरील संकटें हीं देशाचे उद्धाराचीं कारणें झालीं आहेत, तशींच तीं देऊं केलेल्या अर्धवट ( ! ) स्वराज्यांत होवोत, आणि पूर्ण स्वराज्याचे काळीं लोकमान्यांचा केसरी महाराष्ट्राच्या गिरिगव्हरांतून आपल्या घनगर्जनेचा पडसाद उठवो अशी परमेश्वराची प्रार्थना करून हा लेख पुरा करतों.

---

# हिंदी राजकीय सुधारणांचे हप्ते

[ संग्राहक—श्री. शंकर कृष्ण करंदीकर, बी. ए. ]

हिंदुस्थानला ' स्वराज्य ' हप्त्या हप्त्यानें देऊं असें ब्रिटिश सरकारनें केव्हांच जाहीर वचन दिलें आहे. सुमारें दर दहा वर्षांनीं हिंदुस्थानच्या सर्वांगीण प्रगतीची पहाणी करून, त्यावरून कोणत्या अधिक सुधारणा हिंदुस्थानच्या पदरांत टाकाव-याच्या हें निश्चित करण्यांत येतें. असे हप्ते आतांपर्यंत तीन झाले. मोर्ले-मिंटो, मॉंटेग्यु-चेम्सफर्ड आणि सांप्रतची सायमन-योजना अशा ह्या तीन प्रसंगीं हक्कांचें माप देण्याचें कारण पडलें. प्रत्येक प्रसंगीं सरकारनें देऊं केलेल्या ' सुधारणा ' किती अत्यल्प व छायामात्र आहेत, यासंबंधीं केसरीनें मोठ्या मार्मिकतेनें परीक्षण केलें आहे. त्यांतून थोडथोडा भाग येथें उतरून घेतला आहे. हे सरकारकडून चालना मिळालेले तीन प्रसंग झाले. परंतु त्याचप्रमाणें लोकपक्षाची उडी कोठवर पडली होती याचेंहि दिग्दर्शन दोन प्रसंगीं झालें आहे. एक डेमॉक्रेटिक पक्षाचा जाहीर-नामा व दुसरा नेहरू रिपोर्ट. यांचीहि थोडक्यांत कल्पना आणून देणारे उतारे खालीं उद्धृत केले आहेत. ' सुधारणां 'चा फोलपणा प्रत्ययाला येण्यास हे नमुने पुरे होतील.

* * *

**मोर्ले-मिंटो सुधारणा (१९०७) :**—पण हल्लींच्या सुधारणेंत सरकारी सभा-सदांचें अविच्छिन्न बहुमत सदैव कायम राहील, अशी दक्षतेची व्यवस्था जाणूनबुजून केलेली आहे; आणि बजेटांतील खर्चात कांहीं कमजास्त करण्याची सूचना कौन्सिल-पुढें आणण्याचाहि लोकनियुक्त सभासदांना अधिकार दिलेला नाहीं. मग राहिलें काय ? पांचांच्या ठिकाणीं दहा नामदार झाल्यानें नामदारांचा सुळसुळाट वाढेल, आणि लेव्हीला गर्दी होईल एवढेंच. प्रांतिक बड्या सल्लागार मंडळींतील सभा-सदांचीहि त्यांतच भर ! अशा रीतीनें इलाखा नामदारमय झाल्यावर अजूनहि लोकांचें समाधान न झाल्यास त्याचा दोष कोणाकडे ? हातचा अधिकार सोडावयाचा नाहीं हा सरकारचा कृतसंकल्प आहे. हा संकल्प कायम ठेवून तुमच्यापैकीं बड्या बड्या लोकांचा गौरव करण्यास सरकार तयार झालें आहे.

बारा आठवड्यांपूर्वी ' भरंवशाच्या म्हशीस टोणगा ' झाल्याचें सांगून या टोणग्यास आंचळ फुटून त्याची कालांतरानें एक मोठी दुभती म्हैस बनेल अशा मनोराज्याच्या संकल्पांत जर आम्ही गढून गेलों, तर आमच्यासारखे महामूर्ख या जगांत कोणी नाहींत असें म्हणावें लागेल, असें आम्हीं लिहिलें होत. आमच्या लिहिण्याची पुरी प्रतीति, हिंदुस्थान सरकारानें बड्या नालायकांचें कौन्सिल, या

संबंधानें प्रांतिक सरकारांस पाठविलेलें व विलायत सरकारानें मंजूर केलेलें जें पत्र प्रसिद्ध झालें आहे (व ज्याचा सारांश दुसरीकडे दिला आहे), त्यावरून वाचकांच्या लक्षांत येईल. तत्त्ववेत्ते आणि पंडित म्हणून नांवाजलेले उदार पक्षांतील मुत्सद्दी मि. मोर्ले हे आम्हांस जें कांहीं काढून देणार होते त्याचा सर्व गड्डा आतां बाहेर पडला आहे; किंवा हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत होणाऱ्या सुधारणारूपी टोणग्याचे आंचळ आतां दिसूं लागले आहेत असें म्हटलें तरी चालेल. बोलूनचालून टोणग्याचेच आंचळ, तेव्हां त्यांत दूध सांपडणें अशक्य हें सांगावयास नकोच ! पण आश्चर्याची आणि दुःखाची गोष्ट ही कीं, त्यांपैकीं कित्येकांतून रक्त निघालें असून त्यानें हिंदुस्थानांतील सुशिक्षित वर्गास साम्राज्याचे शत्रू बनवून टाकिलें आहे. इंग्रज सरकारनें पाश्चिमात्य शिक्षणाच्या शाळा या देशांत स्थापून तयार केलेला सुशिक्षित वर्ग, पूर्वीच्या अमदानींतील सरदार, जहागिरदार वगैरे या पिढीजाद पुढारी लोकांची योग्यता व महत्त्व कमी करण्याकरितां हातीं धरिला होता. व तेवढ्यापुरतें त्यांस 'सुशिक्षित पुढारी' असें मोठ्या गौरवानें सरकार म्हणत असे. ( ३-९-०७ ).

**मोर्लेसाहेबांची चतुःसूत्री** :—ही अद्याप बऱ्याच अंशानें आहे तशीच कायम आहे. चतुःसूत्री जून महिन्यांतील आपल्या भाषणांत लॉर्ड मोर्ले यांनीं आंखली व त्यानंतर ऑगस्टअखेर या चतुःसूत्रीला धरून देणग्यांचा पहिला खर्डा लॉर्ड मिंटो यांनीं प्रसिद्ध केला. लॉर्ड मोर्ले यांची चतुःसूत्री त्या वेळीं येणेंप्रमाणें होती. (१) गोऱ्या अधिकाऱ्यांची सत्ता कायम ठेवली पाहिजे. ( २ ) राज्यकारभार हांकण्यास हिंदुस्थानचे लोक नालायक आहेत व एक आठवडाभरहि हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें त्यांना चालवितां येणार नाहींत. ( ३ ) जिल्ह्यांतील गोरे अधिकारी यंत्रासारखे न राहतां सजीव दिसावेत म्हणून त्यांची सत्ता व्यक्तिशः अधिक वाढविली पाहिजे. ( ४ ) भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य वगैरे नैसर्गिक समजल्या गेलेल्या हक्कांसहि आळा घालण्यास हरकत नाहीं; कारण चांदोबा मागणारे मध्यम स्थितींतील सुशिक्षित लोक इंग्रजी राज्याचे 'शत्रु' आहेत. हीं चार तत्त्वें कायम ठेवून हिंदुस्थान सरकारनें आपल्या देणग्यांचा पहिला खर्डा तयार केला. लॉर्ड मोर्ले यांनीं आज ज्या नवीन देणग्या दिल्या आहेत त्यांमुळें त्यांनीं चतुःसूत्रीचें बिलकुल उल्लंघन केलेलें नाहीं. ( २२-१२-०८ ).

**मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा** :—आम्ही ज्या घराचा कबजा मागत आहों तें घर सर्वस्वीं आपल्या ताब्यांत ठेवून केवळ आजूबाजूंच्या दोनचार ओऱ्या आमचे ताब्यांत दिल्यानें ज्याप्रमाणें घराचा कबजा आमचे ताब्यांत दिल्यासारखें होत नाहीं, तद्वतच मॉंटेग्यूंच्या सुधारणांची स्थिति झालेली आहे. स्वराज्य म्हणजे दिल्लीचा कारभार आमच्या ताब्यांत देणें होय. पण मॉंटेग्युसाहेब आपल्या रिपोर्टांतच असें म्हणत आहेत कीं, पहिल्यानें म्युनिसिपॅलिट्या आपल्या ताब्यांत घ्या, किंवा प्रांतिक कारभारांत हमाली करण्यास शिका, उतावीळपणानें जास्त मागण्याची

आशा ठेवूं नका. कारण ' हनोझ देहली दूर आस्त ' ' अजून दिल्ली दूरच आहे ! ' ( रिपोर्टाचें २८९ कलम पहा ). मॉंटेग्युसाहेबांच्या असल्या कोटिक्रमास भुलून जाणारे जर कांहीं लोक आमच्यांत अद्याप असतील तर आमच्या मातृभूमीचें दुर्भाग्य समजलें पाहिजे. ' चांदोबा मी तुम्हांस देऊं शकत नाहीं, ' असें जें मोर्ले-साहेबांनीं म्हटलें होतें त्यांत आणि मॉंटेग्यूंच्या वरील उत्तरांत फरक कोणता ? यापेक्षां हे हक्क आम्हांला नसलेले चालतील. आज मिळत नसले तर उद्यां भांडून घेऊं. पण वरील प्रकारची पोंचट व्यवस्था स्वीकारून आपला दुबळेपणा व मूर्खपणा जगाचे निदर्शनास आणून देणें व आपलें हंसें करून घेणें योग्य नाहीं. असो. मॉंटेग्युसाहेबांनीं हिंदुस्थान व विलायत ह्या दोन वरिष्ठ सरकारांत म्हणजे राज्य-कारभाराचे केंद्रस्थानच्या योजनेंत कोणतेच हक्क आम्हांस देण्यास काढले नाहींत. घोंटाळा व खर्च मात्र अधिक वाढविला आहे, असें वरील विवेचनावरून स्पष्ट दिसून येईल. हें स्वराज्य नव्हे आणि त्याचा पायाहि नव्हे. आतां प्रांतिक सर-कारचे कारभारांत मॉंटेग्युसाहेब आम्हांस काय देणार त्याचा विचार पुढील खेपेस करूं. ( १६-७-१८ ).

**कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा जाहीरनामा** :—कॉंग्रेसच्या डेमोक्रॅटिक पक्षाचें धोरण त्याच्या नांवावरूनच व्यक्त होत असून कॉंग्रेसविषयीं अढळ निष्ठा आणि डेमॉक्रसी( लोकशाही )वर दृढ विश्वास हें त्यांतील बीज होय. हिंदी राष्ट्रापुढील प्रश्नांचा निकाल लावण्याचें सामर्थ्य लोकशाहीच्या तत्त्वांत आहे व तें कार्य साध-ण्याला शिक्षणप्रसार आणि मतदारांच्या संख्येची वाढ हीं दोन अमोघ शस्त्रें आहेत, असे या पक्षाचें मत आहे. जातिभेद अथवा रूढी यांमुळें नागरिक, व्यावहारिक वा सामाजिक बाबतींत जी कोणाची नालायकी समजली जात असेल, ती नालायकी दूर करण्यांत यावी, असें हा पक्ष प्रतिपादन करील. धार्मिक बाबतींत सहिष्णुता असावी आणि स्वतःपुरता ज्याचा त्याचा धर्म ज्याला त्याला पवित्र असून इतरांनीं त्यांत बिघाड करण्याचा प्रयत्न केल्यास त्यापासून त्या धर्माचें रक्षण करणें हें सरकारचें न्याय्य कर्तव्य आहे असें या पक्षाचें मत आहे. तसेंच मुसलमानांच्या धार्मिक भावना व कुराणांतील वचनें यांस अनुसरून खिलाफतीचा प्रश्न सोडविला जावा, अशी जी मुसलमानांची मागणी आहे, तिला या पक्षाचा पाठिंबा आहे.

सर्व मानवजातींत बंधुभाव वाढून एकंदर मनुष्यमात्राची उन्नति होण्यासाठीं ब्रिटिश साम्राज्यमंडळांत हिंदुस्थान सामील असावा आणि तो त्याचा एक घटक असावा हें या पक्षास मान्य आहे. परंतु खुद्द ग्रेट ब्रिटन धरून या साम्राज्याचे जे भागीदार आहेत, त्यांच्या बरोबरीनें हिंदुस्थानचा दर्जा रहावा व त्याचा कारभार पूर्णपणें त्याच्या ताब्यांत असावा अशी या पक्षाची मागणी आहे. ब्रिटिश साम्रा-ज्यांतील कोठल्याहि भागांत हिंदी लोकांस इतर नागरिकांच्या बरोबरीनें हक्क मिळाले पाहिजेत व जेथें तसे हक्क न मिळतील तेथें जशास तसें या न्यायानें प्रतिकार कर-

ण्याचा हिंदुस्थानास अधिकार पाहिजे. जगांत शांतता प्रस्थापित करणें, आज अस्तित्वांत असलेल्या व येणाऱ्या राष्ट्रांचा कोणालाहि लचका तोडूं न देतां तीं अभंग राखणें, राष्ट्राचें स्वातंत्र्य व अब्रू रक्षण करणें आणि एका देशाकडून दुसऱ्या देशाची होणारी व्यापारी लुबाडणूक बंद पाडणें या गोष्टी घडवून आणण्यासाठीं निर्माण झालेल्या राष्ट्रसंघ संस्थेचें हा पक्ष आनंदानें अभिनंदन करीत आहे.

जबाबदार प्रातिनिधिक राज्यशासनपद्धतीनें राज्य चालविण्यास या देशांतील लोक पूर्णपणें लायक आहेत, असें या पक्षाचें ठाम मत असून येथील राज्यपद्धति कशी असावी आणि कायदेकानू कसे असावेत, हें ठरविण्याचा हक्क स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानें केवळ हिंदी लोकांसच असला पाहिजे, अशी या पक्षाची मागणी आहे. मॉँटेग्युसाहेबांचा ' रिफॉर्म ' ॲक्ट हा अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक आहे असें या पक्षाचें मत असून इंग्लंडांतील मजूर पक्ष व पार्लमेंटांतले सहानुभूती बाळगणारे इतर सभासद यांच्या साहाय्यानें या ' रिफॉर्म ॲक्टां 'तील दोष काढून टाकण्याचें दुरुस्ती बिल शक्य तितकें लवकर पार्लमेंटांत आणण्याचा या पक्षाकडून प्रयत्न करण्यांत येणार आहे. या दुरुस्ती बिलांत हिंदुस्थानच्या लोकांस संपूर्ण स्वराज्याचे हक्क मिळावे. अर्थातच हिंदी लष्करावर त्यांचा पूर्ण ताबा चालावा, आर्थिक स्वातंत्र्य मिळावें आणि प्रजेच्या संपूर्ण नैसर्गिक हक्कांची प्रजेस कायदेशीर हमी देण्यांत यावी, अशी योजना करण्यांत येणार आहे. हा हेतु साध्य करण्याकरितां हिंदुस्थानांत व राष्ट्रसंघांतील बाहेरच्या इतर देशांत नेटानें व निश्चयानें चळवळ करण्याचा या पक्षाचा उद्देश असून त्या पक्षाची इतरांसहि तशी शिफारस आहे. थोडक्यांत म्हटलें म्हणजे या बाबतींत ' शिक्षण, चळवळ व संघटना ' हेंच या पक्षाचें मंत्रवाक्य राहील. ( २०-४-२० ).

**नेहरू रिपोर्ट** :—हिंदुस्थानास स्वराज्य देण्याचें काम केवळ सर्वसंमत अशी स्वराज्याची योजना हिंदी लोकांपाशीं तयार नाहीं म्हणूनच नडलें होतें असें लॉर्ड बर्कनहेडप्रभृतींचें म्हणणें असेल तर ही पहा स्वराज्याची एकमुखी योजना तयार आहे, आणि हिंदुस्थानास स्वराज्य मिळण्यास हिंदुमुसलमानांतील दुही आड येत असेल तर ही पहा हिंदुमुसलमानांची एकविचारानें ठरविलेली संयुक्त योजना तयार आहे, असें रोखठोक उत्तर देण्याला प्रस्तुत योजना हा प्रमाणभूत आधार उत्पन्न झाला यांत शंका नाहीं. स्वराज्याची ही योजना हिंदुमुसलमानांच्या संमतीनें सिद्ध झाल्यानंतर तिचें बल व प्रभाव सायमन-कमिशनपुढें यावयाच्या साक्षींपेक्षां व सायमन कमिशनपुढें सादर करावयाच्या लेखी पुराव्यांपेक्षां सहस्रपटीनें अधिक परिणामकारक आहे हें आशाळभूत प्रांतिक कमिट्यांच्या व जातवार शिष्टमंडळांच्या लक्षांत आपोआपच येईल. नेहरू कमिटीच्या योजनेस पं. मालवीय यांनीं मोडकी तोडकी नौका म्हणून विनयानें संबोधिलें खरें, पण एकीचें चिलखत चढविलेली हीच नौका अनुकूल वारा व कुशल कर्णधार लाभल्यास स्वराज्याच्या पैलतीरावर

हिंदी राष्ट्रास सुरक्षितपणें नेऊन सोडण्यास समर्थ होणार आहे हें विसरतां कामा नये. ( ४-९-२८ ).

नेहरू-कमेटीची योजना ज्यांना नापसंत वाटत असेल आणि सायमन-सत्तकार्शी सहकार्य करण्यास जे उत्सुक झाले असतील त्यांना आमचा असा उघड सवाल आहे कीं, तुम्हांला असलेंच भातुकलीचें स्वराज्य हवें कां खरेंखुरें अस्सल स्वराज्य हवें ? नेहरू-कमिटीच्या योजनेला विरोध केल्यानें आणि सायमन-कमिशनशीं सहकार्य केल्यानें खरें स्वराज्य मिळविण्याची संधि हातची जाऊन लुटुपुटाचें स्वराज्याचें खेळणें हातीं पडून तेवढ्यांत समाधान मानावें लागेल. ( ११-९-२८ ).

**सायमन कमिशन** :—' दोन महिन्यांपूर्वीचा हिंदुस्थान हाच काय ? ' अशी शंका आजच्या हिंदुस्थानचें अवलोकन करणाऱ्यांच्या मनांत आल्यावांचून रहात नाहीं. दोन महिन्यांपूर्वीं हिंदुस्थान देश दुहीनें भंगला होता, भांडणानें पोखरला होता, व निराशेनें व्यापला होता. उत्तरेंत व दक्षिणेंत हिंदुमुसलमानांचे दंगे होत होते आणि हिंदूंचे खुनावर खून पडत होते. हिंदुस्थानच्या या विस्कटलेल्या सामर्थ्याचा व व्यग्र झालेल्या मनःस्थितीचा फायदा घेण्याचें इंग्लंडच्या हुजूर मंत्रिमंडळानें ठरविलें आणि आपल्या राजवटींत मुदतीपूर्वीं घाईघाईनें कमिशन नेमून हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीचा मार्ग खुंटवण्याचा व्यूह रचला............ सर्व हिंदी लोकांस अस्पृश्य मानून सायमन-कमिशनपासून दूर लोटल्यामुळें आपल्यांतील अस्पृश्यता घालविण्यासाठीं भगीरथ प्रयत्न करणाऱ्या भारतीयांच्या स्वाभिमानास ब्रिटिश मंत्रिमंडळानें उद्दामपणें दंश केला. त्याचा परिणाम व्हावयाचा तोच होऊन आपण सर्व एकाच विराट शरिराचे अवयव आहोंत असा सर्व पक्षांस एकदम साक्षात्कार घडून ऐक्याची वीज सर्वांमधून एकदम चमकली व ' तप्तेन तप्तमयसा घटनाय योग्यम् ' या न्यायानें आजच्या घटकेला तरी सर्व पक्ष एका कमिशन-विरोधी पक्षांत विलीन झाले.

काशीच्या सर्वपक्षीय परिषदेंत ठरल्याप्रमाणें ता. ३ फेब्रुवारी रोजीं जनतेनें दिवसा सर्व व्यवहार बंद ठेवून सायंकाळीं जाहीर सभा भरवाव्या व सरकारच्या हिंदी लोकमतास पायाखालीं तुडवून नेमलेल्या या सायमन-कमिशनचा ठरावरूपानें धिक्कार करावा. राष्ट्रीय अपमानाविषयीं संताप दर्शविण्याचा हाच एक सोपा व सोयीचा मार्ग असून त्याचा अवलंब गांवोगांवच्या पुढाऱ्यांनीं करावा अशी त्यांस आमची आग्रहाची विनंति आहे. ( ३१-१-२८ ).

**सामयन रिपोर्ट** :—' सायमन सप्तग्रहीचा अपशकून फळला ! ' अशा निंदागर्भ मथळ्याखालीं केसरी लिहितो—

' बरेच दिवस प्रसिद्ध होणार होणार म्हणून गाजलेला सायमन रिपोर्टाचा पहिला खंड गेल्या १० जूनला प्रसिद्ध झाला. रिपोर्टाला कित्येक आशावादी नेमस्तांनींहि निराशाजनक म्हटलें, तेव्हां तो कसा असेल हें निराळें सांगण्याची जरूर नाहीं.........

सायमन रिपोर्टाचा हल्लींचा प्रास्ताविक भाग म्हणजे हिंदुस्थानावर राज्य करण्याच्या ब्रिटिशांच्या नालायकीची सायमनसाहेबानें अप्रत्यक्षपणें दिलेली कबुलीच आहे. हिंदुस्थानांत अनेक जाती, अनेक धर्म, अनेक वंश आहेत. हिंदुस्थानांतील बहुतेक जनता निरक्षर आहे. सुशिक्षित लोक आपली प्राच्य परंपरा अजून सोडीत नाहींत. हिंदुमुसलमानांत रोटीबेटी व्यवहार होत नाहीं. स्त्रियांना शिक्षण नसल्यामुळें त्या सुधारलेल्या नाहींत. हिंदुस्थानला जुन्या सामाजिक चालीरीतींचा रोग जडला आहे. अशा तऱ्हेचें रडगाणें गाण्याकरतांच सायमन कमिशन नेमलें होतें काय ? ' ( १४-६-३० ).

'आढीला लावलेला आंबा कुजका निघाला ! ' अशा आणखी एका मार्मिक व अर्थसंपन्न अग्रलेखांत केसरी म्हणतोः—

' ...सायमन रिपोर्टाच्या शिफारशी या गांवठी हपूसांप्रमाणें कुजक्या निघाल्या, म्हणून या देशांतील कोणीहि मनुष्य त्यांना तांब्याच्या पैशाइतकीहि किंमत देणार नाहीं. पण मौज ही कीं, असल्या आंब्यांची आढी लावून ठेवून आज दोन वर्षे तिच्याकडे बोट दाखवून सरकार या देशांतील लोकांना झुलवूं पहात होतें.' (२८-६-३०).

' हंसाशीं स्पर्धा करूं पाहणारा कावळा ! ! ' म्हणून तिसऱ्या एका अग्रलेखांत नेहरू रिपोर्ट व सायमन रिपोर्ट यांच्यांतील फरक दर्शवून केसरीनें लिहिलें :—

' सायमनसप्तकाच्या योजनेंत नेहरू रिपोर्टांतल्याप्रमाणें आजचें तर स्वराज्य नाहींच, पण उद्यांचें, परवांचें, कालांतराचें देखील स्वराज्य नाहीं. कारण स्वराज्य देण्याच्या उद्देशानें तो रिपोर्ट लिहिलेला नसून, स्वराज्य देण्याचें टाळावें कसें या कल्पनेनेंच तो रिपोर्ट लिहिलेला आहे. हिंदुस्थानाला स्वतःचें सैन्य नाहीं, म्हणून स्वसंरक्षण करतां येणार नाहीं, यास्तव त्यास स्वराज्य देतां येत नाहीं हा महामंत्र तर ठिकठिकाणीं जपलेला आहे. पण त्या रिपोर्टांतील नुसती असेंब्लीची रचना आणि व्हाइसरॉय व त्यांचें कार्यकारी कौन्सिल यांच्याशीं असेंब्लीचा येणारा संबंध एवढ्या मर्यादित भागाचें परीक्षण केलें तरी त्यांतूनहि हाच निष्कर्ष निघतो....

'मतदारांनीं आपले प्रतिनिधि स्वतः निवडून कायदेमंडळांत पाठवावयाचे, आणि कार्यकारी मंडळ त्या कायदेमंडळाला जबाबदार रहावयाचें, हा तर लोकशाहीचा मूळ पाया. मॅंटेग्यूसाहेबांनीं असेंब्लींत लोकनियुक्त सभासदांचें निर्विवाद बहुमत होईल अशी रचना करून या पायाला प्रारंभ केला. त्यापुढें कार्यकारी मंडळ कायदेमंडळाला जबाबदार करून तो पाया पक्का कार्यक्षम करावयाचा. नेहरू रिपोर्टानें हें कार्य कसें करावें हें दर्शविलें होतें. पण सायमनसाहेबांनीं प्रत्यक्ष निवडणुकीच्या ऐवजीं अप्रत्यक्ष निवडणुकी व्हाव्या असें ठरवून असेंब्लींतल्या लोकशाहीचा आतांपर्यंत भरलेला पायाच उखडून टाकण्याचा घाट घातला आहे !......

'...... ही टूम अंमलांत आल्यावर एखादा ठोंब्या पण पुंड टग्याहि आपल्या कारवाईनें असेंब्लीची जागा अडवून बसूं शकेल आणि चांगल्या नाणावलेल्या पुढाऱ्यासहि त्याला अडविण्याचा मार्ग रहाणार नाहीं.

' पण याच्यापेक्षांहि मोठी पटाडी गोम पुढेंच आहे. समजा, एकदां असेंब्लीची निवड झाल्यानंतर कांहीं कारणानें एखादी जागा रिकामी पडली तर तिची निवड कशी करावयाची? प्रमाणशीर मतदानपद्धतीचा उपयोग अनेक उमेदवारांची निवड करितांना चांगला होतो. पण एकच जागा रिकामी झाल्यानें एकच उमेदवार निवडतांना प्रमाणशीर मतदानपद्धति फोल ठरते. त्यावर उपाय म्हणून हे शहाणे रिपोर्टकार असें सांगून टाकतात कीं, ती जागा गव्हर्नरनें नॉमिनेशननें भरावी! असेंब्लीच्या पांच वर्षांच्या मुदतींत दोन अडीचशें सभासदांत पोट निवडणुकीचे प्रसंग पांचपन्नास तरी येतील; आणि हे इतके सभासद निवडून देण्याचा मतदारांचा हक्क हिरावून घेऊन तो गव्हर्नरला दिला जाणार! ही खाशी लोकशाही!!

' व्हाइसरॉयांच्या कार्यकारी मंडळाची निवडणूक आजपर्यंत बादशहांच्या नांवानें भारतमंत्र्याकडून होत असे. सायमन योजनेप्रमाणें ती निवडणूक स्वतः व्हाइसरॉय करणार! म्हणजे भारतमंत्र्याचा सासुरवास चुकविणार. पण इकडे हें कौन्सिल असेंब्लीला जबाबदार रहाणार नाहीं. अर्थातच या कार्यकारी मंडळाला खालून-वरून कोणीच दडपता नाहींसा होऊन तें केवळ सर्व बाजूंनीं स्वतंत्र होणार! त्यांतून असेंब्लीच्या सभासदाला कार्यकारी मंडळांत नेमण्याचा अधिकार व्हाइस-रॉयाला असल्यामुळें त्या आमिषाला भुलून अनेक लोभाविष्ट मासे सरकारची री ओढण्याला तयार होतील. असली ही अप्रत्यक्ष निवडणुकीनें निवडलेली असेंब्ली आणि व्हाइसरॉयांच्या बोटावर नाचणारें कार्यकारी मंडळ, यांच्या भरभक्कम पाया-वर सायमनसाहेब भावी स्वराज्याचा डोलारा उभा करून दाखविण्याची जादुगारी या रिपोर्टांत करून दाखवीत आहेत!'

या सर्व विषयांवर केसरीचे अर्थसूचक अग्रलेखः—'भरवंशाच्या म्हशीला टोणगा!' (११-६-०७), ' टोणग्याचे आंचळ! ' (३-९-०७), ' उजाडलें पण सूर्य कोठें आहे? ' (९-७-१८), 'जनाब देहली तो बहुत दूर है' (१६-७-१८), 'आढीला लावलेला आंबा कुजका निघाला ' (२८-६-३०), ' हंसाशीं स्पर्धा करूं पहाणारा कावळा! ' (१-७-३०).

---

# स्वराज्य आणि स्वातंत्र्य

[ प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए. ]

अलीकडे स्वातंत्र्याची घोषणा राष्ट्रीय महासभेनें लाहोरास केल्यापासून स्वराज्य कां स्वातंत्र्य वगैरे वाद पुनः उसळूं लागला आहे. नेहरू रिपोर्टाचे वेळीं त्याची बरीच वाटाघाट पुनः झाली आणि राउंड टेबल् कॉन्फरन्स्ची कच्ची सभा झाल्यावर राष्ट्रीय महासभेनें काय धोरण स्वीकारावें म्हणून विचार चालू असतांनाहि हा प्रश्न सर्वांच्या मनासमोर सारखा उभा राहणारच.

हा प्रश्न कांहीं नवा नाहीं आणि हिंदुस्थानांतच तो नव्यानें निघाला असेंहि नाहीं. केसरीकारांनीं जेव्हां नव्या पक्षाचा पुरस्कार १९०७-०८ च्या आंदोलनप्रसंगीं केला, तेव्हां याचा मार्मिक व मुद्देसूद विचार करून जी मीमांसा केसरीकार लो. टिळक यांनीं केली, ती निरंतर डोळ्यांपुढें ठेवण्यासारखी आहे. 'राजकीय पक्षोपन्यास, ( ११-२-०८ ); या अग्रलेखांत ते लिहितात :–' स्वातंत्र्याची इच्छा ' मनांत धरणें हा मनुष्यस्वभावाचाच एक धर्म आहे. आपले व्यवहार आपल्या ' संमतीखेरीज नेहमीं परक्यांनीं चालवावे ही स्थिति कोणासहि इष्ट वाटणार नाहीं. ' मनुष्य जात्याच स्वातंत्र्यप्रिय असतो. ' आमच्यांतील कांहीं मंडळी ' राज्यकर्ते जें ' कांहीं देतील तेवढ्यानेंच आम्ही संतुष्ट होऊन सदैव त्यांचे आभारी व्हावें, ' असें प्रतिपादन करीत असतात. ' खराखरा राजनिष्ठ वर्ग म्हटला म्हणजे एवढाच. ' या पहिल्या वर्गास ( १ ) **इंग्रजी राज्याचे पुरस्कर्ते** म्हटलें तर दुसऱ्या वर्गास ( २ ) **इंग्रजी राज्याचे टीकाकार** म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. हा वर्ग ' राज्यकर्त्यांच्या ' उणीवा निस्पृहतेनें बोलणारांचा होय. या वर्गास स्वराज्य पाहिजेच असतें असें नाहीं.' ' परंतु रावणाच्या मुखाची मर्यादा दहांवरच न राहतां शतमुखी रावण, सहस्रमुखी ' रावण अशी ज्याप्रमाणें परंपरा आहे, तद्वतच देशाभिमानाची मर्यादा या दुसऱ्या ' वर्गाच्या बरोबरच खुंटून रहात नाहीं. हल्लींच्या राज्यपद्धतींत दोष कोणते याचें ' निस्पृहपणें विवेचन करून ते दोष समूळ नाहींसे होण्यास स्वराज्याखेरीज दुसरा ' मार्ग नाहीं असें प्रतिपादन करणारा **तिसरा** एक वर्ग आहे. '

' पहिला वर्ग गुणबोधकांचा, दुसरा दोषदर्शकांचा तर हा **तिसरा स्वराज्य-** ' **वाद्यांचा** असें म्हणण्यास हरकत नाहीं. वादक म्हणजे बोलणारा. संदिग्ध वाटल्यास ' स्वराज्यप्रार्थक असेंहि यास विशेषण देतां येईल. कारण प्रार्थना हें या वर्गास ' अभिप्रेत असलेल्या साधनांपैकीं मुख्य साधन आहे. याच्या पलीकडची पायरी ' म्हणजे स्वराज्य हें स्वातंत्र्याचें पहिलें रूप आहे, असें सांगून तें मिळविणें असल्यास ' आपल्या उद्योगानें आणि मेहनतीनें राज्यकर्त्यांस अडवूनच मिळविलें पाहिजे ' असें म्हणणारांची होय. वरील विवेचनांत स्वराज्य याचा अर्थ कलकत्ता हाय- ' कोर्टानें केल्याप्रमाणें इंग्रजी साम्राज्यामधील स्वराज्य [ म्हणजेच डोमिनियन् ' स्टेटस्–लेखक ] असा धरलेला आहे. हें स्वराज्य पूर्ण स्वातंत्र्यापेक्षां कमी दर्जाचें ' आहे हें सांगावयास नकोच. अशा प्रकारच्या स्वराज्याचे हक्क हाच कांहीं आपला ' अंतिमांतला अंतिम हेतु नाहीं. तथापि हे हक्क प्राप्त झाल्यानें राजकीय प्रगतीची ' मजल अंतिमांतल्या अंतिम हेतूच्या पुष्कळच जवळ जाईल. पुढचा विचार कर- ' ण्याची सध्यांच जरूर नाहीं किंवा केला असतां तो निव्वळ तात्त्विक दृष्ट्या करा- ' वयाचा आहे, व्यावहारिक दृष्ट्या नाहीं. या **चौथ्या** वर्गास **स्वातंत्र्यवादी** पक्ष असें ' म्हणतां येईल. याहि पलीकडचा वर्ग म्हटला म्हणजे लवकरच आपल्या देशास खरें ' स्वातंत्र्य प्राप्त व्हावें असें म्हणणारांचा होय. या वर्गातील लोकांची संख्या सध्यांच्या

' स्थितींत फारशी सांपडणें कठीण आहे; तथापि विवेचनाच्या परिपूर्तीसाठीं त्यांची आम्ही शेवटीं परिगणना केली आहे. '

आतां, (१८-२-०८), ' स्वराज्य काय आणि स्वातंत्र्य काय दोन्हीहि
' आमच्या पासून इतकीं दूर आहेत कीं, त्या दोहोंमधील अंतर सध्यां विचारांत
' घेण्यासारखें नाहीं. दोन तारे एकमेकांपासून लक्षावधि योजनांचे अंतरांवर असतांहि
' पृथ्वीवरील मनुष्यास ज्याप्रमाणें ते सारख्याच आकाशांत सारख्याच अंतरावर आहेत
' असें वाटतें, तद्वत् स्वराज्य आणि स्वातंत्र्य या दोन्ही अंतिम हेतूंसंबंधानें आकंठ
' परवशतेंत निमग्न झालेल्या आम्हां लोकांची स्थिति आहे. यावरून असें समजूं
' नये कीं, स्वराज्य आणि स्वातंत्र्य या दोन अंतिम हेतूंमध्यें कांहीं अंतर नाहीं...
' राष्ट्राच्या **अभ्युदयाची परमावधि स्वातंत्र्य, पूर्ण स्वातंत्र्य, अनियंत्रित स्वातंत्र्य**
' होय, हें कोणता देशाभिमानी पुरुष कबूल करणार नाहीं ?...आत्म्याला सायुज्य
' मुक्ति आणि राष्ट्राला स्वातंत्र्य, हीं दोन्ही आत्मा व राष्ट्र यांचीं अंतिम साध्यें आहेत.
' पण मुक्ति मिळविण्यास ज्याप्रमाणें कामक्रोधादि शत्रूंचा संयम करून समबुद्धित्व
' संपादन करण्याचें कार्य करावें लागतें, तद्वतच राष्ट्रास आपला अंतिम हेतु साधण्या-
' करितां **राष्ट्रीय कर्माची अपेक्षा** आहे हें विसरतां कामा नये. अंतिम हेतु अमुक
' असावा असा नियम करणें व्यर्थ होय. अंतिम तो अंतिम, तो उपांतिम होऊं
' शकत नाहीं...आपण **आंब्याचें** झाड लावितों तें मोहोराकरितां नव्हे, आम्रफला-
' करितां आहे, ही गोष्ट कोणास सांगायला लागत नाहीं. पण आंब्याचें झाड लाव-
' ण्याचा उद्योग करतांना दोन गृहस्थ आपआपसांत एकजण ' माझें अंतिम साध्य
' मोहोर आहे' आणि दुसरा 'माझें अंतिम साध्य आम्रफल आहे,' असा तंटा करून
' आंब्याची कोय जमिनींत लावण्याचें काम जर सोडून देऊं लागले तर त्यांस आपण
' काय म्हणूं ? स्वातंत्र्यवादी व स्वराज्यवादी यांच्यामधील तंटा अशाच प्रकारचा आहे.'

' **स्वराज्य ही स्वातंत्र्याची पायरी आहे** व स्वातंत्र्यांत स्वराज्याचा अंतर्भाव
' आहे......' स्वातंत्र्य ' म्हटलें असतां इंग्रजी राज्यकर्ते अधिक बिचकतील
' किंवा बिथरतील आणि ' स्वराज्य ' म्हटलें असतां कमी बिथरतील किंवा बिचक-
' तील असा एक कोटिक्रम करण्यांत येत असतो. पण यांत कांहीं अर्थ नाहीं. ज्या
' राज्यकर्त्यांनीं **स्वातंत्र्याचें बीं पाश्चिमात्य शिक्षणरूपानें** या देशांत प्रथम रोंविलें
' त्यांस त्या बीजाचीं फलें काय येतील किंवा त्या बीजाचा वृक्ष किती मोठा होईल
' हें कळत नाहीं असें मानणें म्हणजे त्यांच्या पदरीं असमंजसपणाचा आणि आपल्या
' ठायीं विशेष चाणाक्षपणाचा आरोप करणें होय....स्वर्गप्राप्ति व मोक्ष, मोहोर व
' फल, स्वराज्य आणि स्वातंत्र्य या तीन जोड्या अशा दृष्टीनें विचार केला असतां
' एकसारख्याच आहेत ! ' (ता. १८ फेब्रुवारी १९०८). ' हिंदु धर्मांत ज्याप्रमाणें
' शैव, वीरशैव, आदिकरून अनेक पंथांचा समावेश होतो, तद्वतच राजकीय बाबतींतहि
' कांहीं **साधे स्वराज्यवादी** तर कांहीं **वीर स्वराज्यवादी** असे पक्ष असावयाचे.

'पण हिंदु धर्माच्या रक्षणाकरितां सर्व धर्मपंथांतील लोकांनीं जसें एक व्हावयास 'पाहिजे त्याचप्रमाणें राजकीय हक्कांच्या प्राप्तीकरितां **सर्व राजकीय पंथांनीं एक 'झालें पाहिजे**.........हिंदुस्थानच्या भाळीं अभ्युदयाची अमुकच मर्यादा 'पाहिजे असें ठरविण्याचा व तो ठराव सर्वांनीं कबूल केला पाहिजे असा आग्रह धर- 'ण्याचा, कोणीहि पुढारी कितीहि शहाणा असला तरी त्यास अधिकार नाहीं.... '...हिंदी राष्ट्राची बुद्धि पाश्चिमात्य शिक्षणानें, जपानसारख्या देशाच्या उदाहरणानें 'आणि पूर्वेतिहासाच्या अभ्यासानें प्रज्वलित होऊन अधिकाधिक स्फुरण पावत 'चालली आहे.'

'या स्फूर्तीची ज्वाला अमुकच ईयत्तेपर्यंत काढली पाहिजे, अशी मर्यादा घालणें, 'म्हणजे प्रातःकाळीं उगवणाऱ्या **सूर्यनारायणास तूं क्षितिजावरच नेहमीं रहा,** 'अशी प्रार्थना करण्यासारखें आहे. **एकदां वाढीस लागलेली राष्ट्राची महत्त्वा- 'कांक्षा कोणत्याहि उपायानें खुंटून टाकणें अशक्य आहे.**' (ता. ३ मार्च '१९०८). 'देशासंबंधीं विचार करितांना मनुष्यांच्या विचारांची धांव कुंपण घालून 'अडविणें हें देशास कधींहि हितकारक होत नाहीं. इतकेंच नव्हे तर कायद्याच्या 'मर्यादेंत होईल तितकें अत्युच्च अंतिम साध्य लोकांपुढें ठेवणें हेंच खऱ्या देशभक्ताचें 'कर्तव्य होय.......**अत्युच्च अंतिम साध्य हेतु पिनल कोडाच्या टप्प्यांत येत 'नाहीं.** पिनल कोड अंतिम हेतूकरितां नसून तो हेतु सिद्धीस नेण्यास ज्या साधनांचा 'उपयोग करावा लागतो त्याकरितां आहे. अर्थात् कायद्याप्रमाणें स्वराज्य अंतिम हेतु 'ठेवला काय आणि स्वातंत्र्य ठेविलें काय सारखेंच!' म्हणून केसरीकारांनीं नव्या पक्षाचें धोरण येणेंप्रमाणें वर्णिलें आहे:-(ता. ३ मार्च १९०८), भीक मागून राजकीय 'हक्क मिळत नसतात. कोणतेंहि सरकार झालें तरी तें स्वार्थसाधूच असतें, एक राष्ट्र 'दुसऱ्यावर राज्य करतें तें आपल्या फायद्याकरतां राज्य करतें; जिंकलेल्या लोकांच्या 'फायद्याकरतां नव्हे. राज्यकर्ते स्वजातीय असले तरी देखील ते आपल्या हातांतील 'अधिकार गोडीगुलाबीनें सोडीत नाहींत. त्यांच्या हासून तसें घडून येण्यास त्यांचें कोठें 'तरी अडावें लागतें. **'न हि दुर्योधनो राज्यं मधुरेण प्रदास्यति,'** प्रजेस हक्क पाहिजे 'असल्यास तिनें ते स्वपराक्रमानें व स्वावलंबनानें मिळविले पाहिजेत. 'तुम्ही योग्य 'झाल्यावर आम्हीं तुम्हांस सुखानें राज्य देऊन स्वदेशीं परत जाऊं, असें कोणी म्हणत 'असल्यास तो अर्थवाद आहे, 'भूतार्थव्याहृति' नाहीं: भुलथाप आहे, खरें नव्हे; 'यास फसून जाऊं नये. उद्योग करावा, नेटानें करावा, होईल तितकें अडवावें. नाक 'धरल्याशिवाय तोंड उघडत नाहीं; हा स्वार्थाचा प्रश्न आहे, धर्माचा किंवा औदा- 'र्याचा नाहीं, राजनीति आहे, धर्मनीति नव्हे; जिंकलेल्या लोकांस जेत्यांनीं आपखुषीनें 'स्वातंत्र्य दिल्याचें उदाहरण इतिहासांत नाहीं. जपानास जय मिळाल्याबरोबर रानटी 'होते ते सुधारलेले झाले. शहाणपण सत्तेंत आहे, दैन्यांत नाहीं. **स्वातंत्र्य हेंच प्रत्येक 'राष्ट्राचें अंतिम साध्य आहे.** ताकाकरितां भीक मागण्यास जावयाचें तर भांडें

' लपविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुम्हांस काय पाहिजे तें उघड सांगा. त्याकरितां
' इतर राष्ट्रांनीं प्रयत्न केले तसे उघड करा, भिऊं नका. भित्यापाठीं ब्रह्मराक्षस, हें
' ध्यानांत ठेवा. संकटें आलीं तरी डगमगूं नका. संकटांखेरीज स्वातंत्र्य नाहीं; आणि
' रात्रीखेरीज सकाळ नाहीं. तुम्हांस जर स्वातंत्र्य मिळवावयाचें असेल तर तें तुमच्या
' निश्चयानें, उद्योगानें आणि धैर्यानें मिळेल; सरकार बलिष्ठ असेल, तर तें तुमच्या
' मदतीनें बलिष्ठ झालें आहे. तुमच्यांतील भेद हेंच सरकारचें कवच; तुमची
' दुर्बलता तें त्याचें बल, तुमचें स्वतःबद्दलचें अज्ञान हें त्याचें सामर्थ्य. तुम्ही
' ओळखाल तर सर्व तुमचेंच आहे असें या नव्या म्हणजे राष्ट्रीय पक्षाचें धोरण व
' कृति असून शरीरद्वारां किंवा द्रव्यद्वारां झीज सोसण्यास हा पक्ष तयार आहे.'
( २५ फेब्रुवारी १९०८ ).

असा हा स्वातंत्र्याचा उपदेश आणि एकजुटीनें, मिलाफानें, उद्योग करण्याचा आक्रोश केसरीनें सतत पन्नास वर्षें केला आणि आपल्या गर्जनेनें सारा देश खडबडून जागा केला. ' एष पन्था एतत्कर्म ' म्हणून तिकडेच त्यांच्याच शब्दांत बोट दाखवीत येथें थांबूं !

---

# निवडक उतारे

[ संग्राहक—श्री. शंकर कृष्ण करंदीकर, बी. ए. ]

पन्नास वर्षांच्या अमदानींत केसरींतून अनेकविध विषयांवर लेख आले. त्यांतील प्रमुखांचा परामर्ष लेखकांनीं घेतला आहेच. पण कोठल्याहि एका विवक्षित चौकटींत न बसणारे कांहीं विषय व लिखाणांतील निर्देश राहतातच. त्यांची उपेक्षा करून चालत नाहीं. त्या काळची स्थिति, लोकांची तळमळ आणि विशेषतः केसरीची सर्वसंग्राहक बुद्धि यांचें प्रतिबिंब अशा किरकोळ लिखाणांतच सांपडतें. म्हणून कांहीं शेलकेच उतारे खालीं देत आहें. विशेषतः स्वदेशीविषयींची, जनतेची तळमळ स्वदेशी पत्रांतील सारांशांत उत्कृष्टपणें दिसून येते. केसरीकर्त्यांस वाचकांकडून जीं पत्रें आलीं, त्यांचा थोडक्यांत सारांश देऊन पुढें संपादकीय सूचनाहि मधून मधून दिलेल्या आढळतात. केसरीच्या संपादकांच्या पत्रव्यवहाराचा व्याप किती असला पाहिजे आणि वाचक किती विविध प्रकारची माहिती संपादकांस सर्वज्ञ समजून विचारीत असले पाहिजेत याची कल्पना स्वदेशी मेणबत्त्यांसंबंधींच्या चौकशीवरून येईल. तसेंच पोस्ट ऑफिसांतील बँकांवर बहिष्कार घालण्याची कल्पना हीं दोन तपांपूर्वींची आहे आणि ती एका ग्रामस्थानें स्वतंत्र

विचारानें सुचविली ह्या बाबी उताऱ्यांतील पत्रावरूनच कळून येतात. अशा दृष्टीनें ह्यांचा उपयोग बराच आहे.

*        *        *

## द्रविडबंधूंच्या खुनाचा खटला : मि. ब्रुइन यांची साक्ष

मि. ब्रुइन—ता. ११ रोजीं साठ्याला फरासखान्यांत पाहिलें. त्याला फरासखान्यांत केव्हां आणलें होतें मला माहीत नाहीं. त्यानें मजपुढें कांहीं जाब दिला. मी मॅजिस्ट्रेटसाहेबांचे कोर्टांत ३-१५ वाजतां एक शिपाई पाठविला. शिरस्तेदारानें करव्हॅलो यांचे बंगल्यावर ५-३० वाजतां हजर रहावें, असा हा निरोप होता. मी मॅजिस्ट्रेटसाहेबांना कांहीं कळविलें नाहीं किंवा दुसरें कोणीं कळविलें असावेंसें वाटत नाहीं. नंतर मी साठे याला घेऊन खुनाच्या जागेपासून सुमारें ४५० यार्डांवर असलेल्या एका बोळांत गेलों. या चौकशीपासून कांहीं फलप्राप्ति झाली नाहीं. नंतर मी एकटाच द्रविडांच्या घरीं गेलों. नीलकंठ दारांत उभा होता, त्यापाशीं बोललों. नीलकंठानें साठ्याविषयीं मला माहिती सांगितली. त्यावेळेपर्यंत नीळकंठानें मला कांहीं सांगितलें नव्हतें. लोंढे याच्या सुरक्षितपणाविषयीं विशेष काळजी घेण्यास कारणें होतीं. त्याला धमकीचीं निनांवीं पत्रें आलीं होतीं. तीं त्यानें पोलिसला दिलीं. हे खून होण्यापूर्वी मी वासुदेवाचे बापास पुण्यास भेटलों होतों. वासुदेवानें आपली वाईट संगत सोडावी व सरळ मार्गानें चालावें, असा वासुदेवास उपदेश करण्यास त्याचे बापास सांगितलें. शारीरिक श्रम करीत असतांना काचा घालतात पण इतर वेळीं काचा घालणें विलक्षण आहे. काचा घातलेला ब्राह्मण मला रात्रीं दिसला तर मला संशय येईल. रात्रीं काचा घालणें संशयास्पद आहे. मी काचा घातलेल्या ब्राह्मणावर रात्रीं नजर ठेवीन आणि त्याच्या वागणुकीबद्दल खुलासा करण्यास त्यास सांगेन. साठ्याला ५-३० वाजतां सोडल्यावर मी मॅजिस्ट्रेटचे बंगल्यावर गेलों. साठे याचा कबुलीजबाब लिहून घेण्याविषयीं विनंति केली व आजारी होतों म्हणून लागलाच घरीं गेलों. रानडे, वासुदेव यांना मी फरासखान्यांत पाहिलें आहे. रामजी पांडू याजवर फरासखान्यांत गोळी झाडली, यासंबंधानें प्रसिद्ध झालेल्या मजकुरांत कांहीं खोटें नाहीं. रानडे यानें मला असें सांगितलें कीं, ज्या पिस्तुलानें मी द्रविडांना मारलें तें पिस्तुल घरीं आहे; मजबरोबर चला, काढून देतों. त्याच्या घरीं फळ्यांवरून पुस्तकें ठेवलेलीं होतीं. त्यानें कांहीं पुस्तकें दाखविलीं व त्यांच्या मागें पिशवींत पिस्तुल सांपडेल असें सांगितलें. त्याप्रमाणें पिशवींत पिस्तुल, दारू, छरे, सांपडले. ( ७-३-१९ ).

*        *        *

## राज्य करणें म्हणजे सूड उगविणें नव्हे

सर्व लोकांस जिंकून किंवा सर्व लोकांस पादाक्रांत करून जो राज्य कमावतो त्याचें सामर्थ्य लोकोत्तर असलेंच पाहिजे. पण एकदां राज्य कमावल्यानंतर राज्यांतील

सर्व व्यवस्था तेथें आपल्या सामर्थ्याचा डौल मारून करणें म्हणजे रावणराज्याचेंच अनुकरण करणें होय. ही राज्य करण्याची पद्धत आमच्या मतें अत्यंत गैरशिस्त आहे, व त्यापासून आमचें जर नुकसान होण्याचा संभव नसता तर हा वेडेपणा पाहून आम्हांस खरोखरच हंसूं आलें असतें. राज्य करणें म्हणजे जेथें तेथें आपली तरवार काढून ' मानवा, तूं काय समजलास? तुला सुपारीच्या खांडासारखा खाऊन टाकीन, मारीन, जाळीन, पोळीन, ' अशा तऱ्हेनें लोकांस एकसारखें भिववीत सुटणें नव्हे. राजानें आपल्या शक्तीचा उपयोग दुष्टांचें शासन व निरपराधी लोकांचें रक्षण करण्याकडे केला पाहिजे. राज्य कितीहि चांगलें असलें तरी कांहीं तरी खून, चोऱ्या, दरवडे हीं व्हावयाचींच, व त्यांत सरकारचे अधिकारीहि एखादे वेळेस सांपडावयाचे. परंतु या सर्व गुन्ह्यांचा निकाल राज्यांतील नेहमींच्या व्यवस्थेनेंच झाला पाहिजे व ज्या राजास तसा बंदोबस्त ठेवतां येत नाहीं तो राज्य करण्यास नालायख समजला पाहिजे. खून झाला, आण पलटण आणि जाळ सगळा गांव, हा न्याय नव्हे, राजनीति नव्हे आणि मुत्सद्दीपणाहि नव्हे. ( १३-७-९७ ).

* * *

## मि. जॅक्सन यांचा खून

या खुनामुळें अधिकारी वर्गाचीं डोकीं इतकीं भणाणलीं आहेत कीं, सर जॉर्ज क्लार्कसारखे शांत, धिमे व समंजस गव्हर्नरहि खुनाची कोर्टात चौकशी होण्यापूर्वीच त्याचें स्वरूप अमुकच आहे, त्याचेमागें उत्तेजक लोक असलेच पाहिजेत, इत्यादि विधानें आपल्या पदवीच्या जबाबदारीचें भान न राहिल्यामुळें करीत आहेत.

' टाइम्स ' मधील ' फॅक्ट्स् ' नामक लेखकानें तर तर्कशास्त्राचा मोठा आव घालून आणि इतिहास धुंडाळून काढून सबंध चित्पावन जात बदमाष व बंडखोर आहे, असा अपूर्व सिद्धांत काढला आहे !

' फॅक्ट्स् 'चें असें म्हणणें आहे कीं, सांप्रतच्या नाशिक प्रकरणांतले बहुतेक तरुण, रॅन्डसाहेबांच्या खुनांत सामील असलेले सर्व लोक, वासुदेव बळवंत आणि ' ५७ च्या बंडाचे पुढारी हे सर्व चित्पावन होते; म्हणून ही जात सर्पतुल्य आहे, असें या लेखकानें ध्वनित केलें आहे ! परंतु अँग्लो-इंडियन लेखकाचे हे सिद्धांत तर्कशास्त्राच्या अन्वयव्यतिरेकाचे कसोटीस बिलकुल टिकणारे नाहींत. पहिलें असें कीं, नाशिकास आणलेल्या इसमांत दोन चार देशस्थ, दोन सोनार व दोन गुजराथी आहेत; तर तेवढ्यावरून त्या त्या सबंध जातीहि निंद्य मानावयास हा लेखक तयार आहे काय ? शिवाय बंडाचे पुढाऱ्यांपैकीं झांशीची राणी व तात्या टोपे हे चित्पावन नाहींत हें ह्या फड्या इतिहासज्ञास माहीत नाहीं काय ? उलट पक्षीं, अगदीं सरकारी चष्मा लावून पाहिलें व वरील तर्कशास्त्र लागू केलें तर रघुनाथराव, सर दिनकरराव, बाळाजीपंत नातू, गोपाळराव देशमूख, न्या. रानडे, ना. गोखले, रा. ब. नारायण त्रिंबक वैद्य, विनायक कोंडदेव ओक, असल्या इंग्रजांच्या अस्सल

हितकर्त्या व राजनिष्ठ चित्पावनांमुळें सर्वच चित्पावन जात अँग्लो-इंडियनांचे दृष्टीनें पावन कां समजूं नये ? सगळे चित्पावन खुनी व बंडखोर नाहींत किंवा सगळे खुनी व बंडखोरहि चित्पावन नाहींत. सरकारच्या दृष्टीनें राजद्रोही ठरलेले पंजाबी ब्राह्मण तर नाहींतच, पण आर्यसमाजिस्टच आहेत. बंगाल्यांतील बहुतेक बाँबवालेहि ब्राह्मणेतर व कांहीं ब्राह्मो होते ! व्यक्तीच्या अत्याचाराच्या कृत्यावरून किंवा इतिहासांतील एका उदाहरणावरून सबंध जातीस नांवें ठेवण्याचें हें तर्कशास्त्र आणखी जरा लांबविलें तर वीरनवालीच्या पातिव्रत्याचा भंग करणाऱ्या मूरची सगळी जात व्यभिचारी, टायटस, ओट्स, व गायफॉक्स यांचे सगळे जातभाई अत्याचारी, आणि चार्लस् राजास फांशीं देऊन त्याचे अनुयायांशीं युद्ध करणाऱ्या इंग्रजांचें सबंध राष्ट्रच राजद्रोही व बंडखोर आहे, असें म्हणण्याची पाळी येईल. (४-१-१०).

*　　*　　*

## सावरकर प्रकरण

'इंग्लिशमन 'ची हकीगत :—

रा. विनायक दामोदर सावरकर यांच्या निसटून जाण्याच्या प्रयत्नासंबंधानें अद्याप निरनिराळ्या बातम्या प्रसिद्ध होत आहेत. खुद्द 'मोरिया' बोटीवर या प्रसंगीं हजर असलेल्या इसमानें दिलेल्या बातमींत म्हटलें आहे कीं, उतारू बोटीवर चढत व उतरत होते, माल वर चढविण्यांत येत होता, बोटींत कोळसा भरण्यांत येत होता. आणि बोटीवर माल खपविण्याकरितां आलेल्या व्यापाऱ्यांची, हमालांची, दलालांची वगैरे गर्दी झाली होती; अशी गडबडीची वेळ साधून सावकरांनीं निसटण्याचा प्रयत्न केला. स्नानगृहांत जाऊन कांहीं विसरल्याचें मिष करून बरोबरच्या पहारेकऱ्यास आपल्या खोलीकडे पाठवून स्नानगृहाचें दार लावून घेतल्यावर त्यांनीं आपले कपडे काढले व अंगास खूब साबण माखून खिडकींतून आपलें अंग चोरून बाहेर पडण्याचे कामीं त्यांनीं यश मिळविलें. येथपर्यंत याचा पत्ता कोणास लागला नाहीं. पण परत आल्यावर दरवाजा लागलेला व आंतून जबाब येत नाहीं, असें पाहून पहारेकऱ्यानें पुकारा केला. बोटीपासून धक्क्यापर्यंत पोहत जाऊन मोठ्या चपळाईनें धक्क्यावर चढल्यावर उघड्या अंगानें धांवत सुटलेल्या सावरकरांस पाहून धक्क्यावरील लोकांस मोठें आश्चर्य वाटलें, व कोणी तर त्यांस वेडा समजले. इकडे बोटीवर जिकडेतिकडे 'अरे निसटला' 'अरे हिंदी इसम फरारी झाला,' असा पुकारा झाला. तेव्हां दोन कामदारांनीं सावरकरांचा पाठलाग केला; आणि फ्रेंच पोलीस, धक्क्यावरील कांहीं इसम व बोटीवरील दोघेजण त्यांना पकडण्यास धांवले. सावरकर 'कॅब कॅब' ( भाड्याची गाडी) असें ओरडत होते व तेथें उत्सुकतेनें पहात उभ्या असलेल्या दोन हिंदी इसमांनीं कॅब जवळ आणण्याचा व सावरकरांस मदत करण्याचा प्रयत्न केला; पण मागून बरींच माणसें येत आहेत असें पाहून सावरकर दिशा बदलून पळूं लागले असतां फ्रेंच पोलिसानें त्यांस पकडलें. बोटीवरील दोन इसमांनीं त्यांचे दोन्ही हात पाठीकडे

वळवून धरून ठेविले आणि त्यांस परत नेलें. नंतर त्यांस एका खोलींत बंद करून ठेवण्यांत आलें, असें इंग्लिशमनचा वातमीदार म्हणतो. ( २-८-१० ).

* * *

## स्वदेशी पत्रांचा सारांश

**साखरेबद्दल :—**

**रसण्यांतील भिक्षुक :—** संस्थान भोर आणि फलटण येथें रामनवमीचे उत्साह टोलेजंग होतात. या उत्साहांत साखरेच्यीं पोतींच्या पोतीं पार होतात. ही साखर परदेशी असून अपवित्र आहे हें आतां शहाजोग ठरलें आहे. याकरितां श्रींचे उत्साहांत गाईबैलांचे रक्तानें तयार होणारी साखर न वापरतां स्वदेशी साखर वापरावी अथवा आपला कुलाचार पुरणपोळीचा आहे तोच शुद्ध साखर पुरेशी मिळेपर्यंत अंमलांत आणावा. तसेंच या जंगी समारंभांतील रोषनाईस विन चर्वीच्या स्वदेशी मेणबत्यांचा उपयोग व्हावा म्हणून भोरकर आणि फलटणकर यांची प्रार्थना करतात.

**क्ष, अष्टी :—** शिमग्याचा सण आला आहे. या सणांत साखरेच्या गाठ्यांचा खप फार होतो. या 'साखऱ्याच्या' करितात. यांस पुरे इतकी स्वदेशी साखर चालू वर्षी मिळणें शक्य नसलें तर गाठ्या न घेणें अशक्य नाहीं. त्या घेण्यानें धर्महानि होण्याचें भय आहे. न घेतल्यास धर्महानि व्हावयाची नाहीं. याकरितां सर्वांनीं खटपट करावी. संक्रांतीचे दिवशीं हलव्याची चूक झाली तशी शिमग्यांत गाठ्यांची चूक करूं नका.

**बालादपि सुभाषितं ग्राह्यम् :—** याप्रमाणें एका मुलानें शहाणपण शिकविलें तें असें. नगर येथें केशरीभात व जिलब्या झोडण्यास बरीच मंडळी बसली होती. सर्वांनीं ' अगस्तिं कुंभकर्णं च ' करून पोटावरून हात फिरवीत फिरवीत यथास्थित ताव मारला. त्याच पंक्तींत एक १०-१२ वर्षांचा मुलगा होता. तो या पंक्तींत दोन्ही पदार्थांस स्पर्श न करितां स्वस्थ बसला होता. हें एका गृहस्थाचे लक्षांत येतांच त्यांनीं प्रश्न केला व या प्रश्नाचें उत्तर मुलापूर्वीं एकानें दिलें कीं, ' यांत विलायती साखर आहे, म्हणून खात नसेल. ' हें ऐकतांच मुलास रडूं कोसळलें. तेव्हां त्याच्या करितां बनारसी साखर आणावी लागली. ती आली तेव्हां तो जेवला. याच्या या कृतीची बरेच लोकांस लाज वाटली, असें मनोलीकर जोशी कळवितात.

**दारूबद्दल :—**

**आनंदा परदेशी, नाशिक :—** परीट लोकांची सभा भरून दारू प्यावयाची असा ठराव झाला व न पिणारास वाळींत टाकलें आहे ! याकरितां नासिकचे लोकांनीं अशा दारूबाजांकडे कपडे धुवावयास द्यावयाचे नाहींत, असा ठराव करावा म्हणून सूचना करितात.

**' क्ष, ' पेठ :—** शिमग्यांतील पांच दिवसांत दारूचीं पिपेंच्या पिपें फडशा उडविणारे महार, भंगी वगैरे लोकांस दुसरे नादीं लावून ही वेळ टाळण्याचा उद्योग श्रीमंत लोकांनीं केल्यास त्या गरीब लोकांचे बरेच पैसे वांचतील, असें म्हणतात.

**खेळाडू** :— खेड्यापाड्यांतील लोकांस दारूचें व्यसन कोण लावतें ? या प्रश्नाचें अनुभविक उत्तर 'मुंबई' असें देतां येतें. दारू प्याल्याखेरीज मुंबईत हुषारी रहात नाहीं, असा समज तेथील लोक करितात आणि इकडून पोट भरण्याकरितां मुंबईस जाणारे लोक दारूचें व्यसन घेऊन परत येतात. हा समज मुंबईच्या उद्योगी मंडळीनें डॉक्टर सर भालचंद्र यांच्या साहाय्यानें तेथें नाहींसा केल्यास खेड्यापाड्यांतील दारू कमी होईल, असें म्हणतात.

इतर :—

**जोशी ( सातारा )** :—'वंदे मातरम्'चा प्रसार कागदोपत्रींहि होऊं लागला आहे हें ठीक आहे. पण विलायती कागदावर याचा उपयोग करणें अप्रशस्त आहे. स्वदेशी कागदावरच ह्याचा उपयोग करावा. परदेशी कागदावर 'श्री' सुद्धां लिहूं नये. सुतक्याप्रमाणें त्याची वहिवाट करावी. **दत्त ( मडगांव )** :— रा. देव यांच्या व्याख्यानामुळें मित्रसमाजाची स्थापना होऊन स्वदेशी मालाचें दुकान निघालें म्हणतात. **बा. श्री. जोशी, सावदें ( खानदेश )** :— स्वदेशी चळवळीचा चोहोंकडे गज गाजला आहे पण येथें आराम ! एखादा उपदेशक इकडे वळेल तर बरें म्हणतात. **विनायक** :— यंदांचे होळीकरितां खेळगड्यांनीं गोवऱ्या न मागतां विलायती कपडे मागून घेऊन त्यांची होळी करावी म्हणतात. **पटवर्धन** :— स्वदेशबांधवांस स्वभाषेंत पत्र लिहिणें योग्य असतां मोडक्यातोडक्या इंग्रजी भाषेंत तें लिहिण्याची खोड आमच्या लोकांत आहे. समग्र पत्र स्वभाषेंत असलें तरी खालीं सही इंग्रजींतच करणें ही स्वाभिमानशून्यतेची निशाणी, आणखी किती वर्षें रहाणार ? म्हणून प्रश्न करतात. **रामचंद्र केशव गोडबोले** :— यांनीं सहा हजार रुपयांचे भांडवलावर हळद चोळण्याचा कारखाना तासगांवास काढला आहे. यास पुरें इतकें काम नाहीं, म्हणून त्यास कापड विणण्याचे पावरलूम जोडण्याचा त्यांचा विचार आहे. त्यास १० हजारांचे शेअर पाहिजेत, म्हणून मागणी ते करीत आहेत. **विश्वनाथ सीताराम संभूस, (संगमनेरकर)** :— सोलापुरास धांवते धोटे आहेत. पण त्यांत सुधारणा नसोन हातमाग यापेक्षां काम अधिक होत नाहीं. सबब दुसरी कोठें सोय आहे काय ? म्हणून माहिती विचारीत आहेत. **शा. रवचंद तुळजाराम, ( निपाणी )** :— स्वदेशी मालाचे असतील तितके क्याटलाग मागत आहेत. **एस्. जी. घोडेकर,** शाईचे कारखानदार, **( कारंजा )** :—सहा डझन मेणबत्या निघणारे मशीनला किंमत काय पडेल, म्हणून विचारतात. केसरीस विचारण्यापेक्षां मुंबईचे कारखानदारास विचारलें असतें तर व्यर्थ वेळ जाताना. **जोशी ( मनोली )** :— शिमग्यांत मुलांनीं बीभत्स शब्द उच्चारण्यापेक्षां स्वदेशी माल वापरण्याबद्दल उपदेश करावा असें सुचवितात. **व्यं. ग. जावडेकर ( अमळनेर )** :— स्वदेशी वस्तूंवर स्वदेशी भाषेंत नांव घालण्यास सुरुवात केल्याखेरीज विलायती मालासंबंधाची फसवणूक बंद होणार नाहीं म्हणतात. **( वाचक ) सावर्डें** :— ब्यांकेंत पैसे ठेवणें

व विलायती नोटा वापरणें हें परदेशी वस्तूंप्रमाणेंच त्याज्य असल्यामुळें व्याख्यात्यांनीं या गोष्टीहि व्याख्यानांत आणाव्यात असें म्हणतात. ( ६-३-०६ ).

**बंगाल्यांतील स्वदेशी चळवळीचा जोर :—**

**स्वदेशी हेर :—** स्वदेशीची शपथ घेतल्यावर ती मोडतात कोण ? यावर लक्ष ठेवण्याकरितां बंगाल्यांत स्वयंसेवक हेर तयार झाले आहेत. शपथ मोडणाऱ्यांच्या कृतीचा गवगवा समाजांत हे हेर तात्वडतोब करतात, व शपथ मोडणारास समाजाची मर्जी खप्पा होऊं नये म्हणून महत्त्वाचें प्रायश्चित्त घ्यावें लागतें. बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या सहीच्या खालोखाल स्वदेशी जाहीर-नाम्यावर सही करणारे कलकत्त्यास एक बॅरिस्टर आहेत. बोलतांना स्वदेशीच्या रगड गप्पा मारून चोरून परदेशी कपडा विकत घेण्याचा ह्यांचा क्रम होता. कलकत्याच्या एका इंग्रजी दुकानांतून ह्यांनीं अर्धा डझन शर्ट विकत घेतले. हें पापकर्म करितांना मुद्देमालासकट स्वदेशी हेरांनीं त्यांना पकडलें व नॅशनल फंडाच्या चाल-कांच्या नजरेस ही गोष्ट आणली. सदर बॅरिस्टर यांना ते शर्ट जाळून टाकण्या-करितां द्यावे लागले. शिवाय शर्टांच्या किंमतीइतका म्हणजे ४५ रु. दंड नॅशनल फंडांत भरावा लागला. **लग्नकार्यांत स्वदेशी :—**बंगाल्यांत लग्नकार्यांत स्वदेशी नवरा मुलगा व परदेशी नवरा मुलगा असा भेद दिसूं लागला आहे. एका स्वदेशी नवऱ्या मुलानें बिछायत स्वदेशी असल्याशिवाय त्यावर बसावयाचें नाकरलें ! तेव्हां वधूपक्षाकडील मंडळींना स्वदेशी बिछायत आणावी लागली. होमविधीच्या सुमारास दुसऱ्या एका लग्नाचे वेळीं स्वदेशी नवऱ्या मुलानें परदेशी चिरूट मंडपांत ओढला जात आहे, असें पाहिलें. परदेशी चिरूटाची मंडपांत बंदी करण्याविषयीं विनंति करण्यांत आली. पण तिकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. तेव्हां नवरदेवांनीं होमविधि मध्येंच बंद ठेवला. लग्नविधि अर्धाच बंद पडलेला पाहून परदेशी चिरूटांना मंडपांतून हांकून द्यावें लागलें ! लोकांनीं वरील उदाहरणें ध्यानांत ठेवावीं व आपल्या मुली-करितां नेमस्त केलेला नवरा स्वदेशी आहे किंवा परदेशी आहे त्याची अगोदर चौकशी करून त्याप्रमाणें वधूपक्षाचे मंडपांत व्यवस्था ठेवावी. रशियाच्या झारला रशियांत जे अधिकार आहेत, तशाच प्रकारचे अधिकार लग्नमंडपांतील वस्त्रपात्रां-संबंधानें व खाद्यपेयांसंबंधानें नवरदेवाच्या हातीं वधूपक्षाकडील मंडपांत निदान अस-तांत हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. नाहीं तर नवरा मुलगा स्वदेशी व व्याही परदेशी, अशी स्थिति होऊन लग्नासोहाळ्याचा विरस व्हावयाचा. ( २०-३-०६ ).

---

# हिंदुस्थानाबाहेरील हिंदी लोक

[ श्री. चिंतामणी यशवंत मराठे ]

१. हिंदुस्थानाबाहेर कशासाठीं ? :— 'आम्हांला जर पुढें यावयाचें असेल तर 'पाश्चात्य लोकांनीं जे अनुभवानें व शास्त्राच्या पद्धतीनें सिद्धांत ठरविले आहेत व 'शोध केले आहेत, त्यांचेंच अनन्यभावानें आम्ही अध्ययन व ग्रहण केलें पाहिजे.' ( स्फुट सूचना, २७-५-९० ). अथवा, 'पाश्चात्य राष्ट्रांतील राजकीय स्वातंत्र्य 'त्यांच्या सुसंघटित व जागरूक समाजावर बरेंचसें अवलंबून असतें. तेव्हां शुद्ध 'हिंदु संस्कृतीचा पाया कायम ठेवून ही उलथापालथ घडवून आणण्याचें काम 'तरुणपिढीस करावें लागेल. सबब बाहेरील जगाची हवा सुसंस्कृत हिंदी तरुणांना 'जितकी लागेल तितकी हवीच आहे.' ( २१-१२-२६ ). हिंदी लोकांनीं हिंदुस्थानाबाहेर कशासाठीं जावें याचें हें थोडक्यांत आविष्करण आहे, आणि यावरून उद्देश व विधेय यांचाहि उमज पडण्याजोगा आहे.

२. इंग्लंडांतील विद्यार्जन :— 'शुक्राचार्यांपासून विद्या संपादन करण्याकरितां 'कचानें किती हाल सोसिले, हें मनांत आणलें असतां, हल्लीं परदेशांतून नूतन 'विद्या व कला शिकून येणें अगदींच सोपें आहे, व आमची तरुण मंडळी 'अगदींच निर्बुद्ध व निःसत्त्व झाली नसेल तर त्यांना तें अशक्य असेल असेंहि 'नाहीं.' ( अग्रलेख, ९-१-०० ).

'परदेशांतून नूतन विद्या व कला शिकून येणें' यास लक्षणेनें 'शुक्राचार्यांची संजीवनी' अथवा 'माशानें गिळलेलें माणिक' हस्तगत करणें असें म्हटल्यास परदेशांतून जाऊन आलेल्या मंडळींकडे पाहतां वरीलपैकीं कोणतीच वस्तू अद्यापि आमच्या हस्तगत झाली नाहीं, असें म्हणणें प्राप्त आहे. परंतु त्यासाठीं आजवर जे प्रयत्न झाले अथवा होत आहेत ते आपणांस जमेस धरलेच पाहिजेत. कोलंबसाच्या हातास किनाऱ्याची माती चिकटल्यापासून तों आतांपर्यंतचा काळ जमेस धरावा, तेव्हांच आजचें वैभवशाली अमेरिकन राष्ट्र दृष्टीस भुलवितें ! असो. जेते या दृष्टीनें इंग्रज लोक हिंदुस्थानच्या दृष्टीनें श्रेष्ठ ठरलेच होते; परंतु १८५८ सालच्या जाहीरनाम्यानें 'काळ्यागोऱ्यांस अभेदभावानें वागविलें जाईल' या सुवर्णवाक्यानें तर त्यांचें औदार्यहि हिंदी लोकांस महनीय वाटलें. प्रथमपासूनच जे सरकार दरबारीं वागत होते त्यांस सरकारनें गरजेप्रमाणें व योजकाच्या चातुर्यानें हुद्यांच्या जागांवर नेमिले होते. १८७० सालीं 'सिव्हिल सर्व्हिस'ची परीक्षा निर्मून त्यांपैकीं एक पायरी निश्चित केली. या परीक्षेस काळ्या-गोऱ्यांस सारख्याच हक्कानें बसतां येईल, अशी ग्वाहीहि सरकारनें दिली; पण परीक्षा मात्र इंग्लंडांत ठेविली. परदेशीं जाण्यास

हिंदी लोकांस एवढी लालूच पुरे होती. आणि तिचा फायदा तडफेच्या तरुणांनीं घेतलाहि. सत्येंद्रनाथ टागोर, सुरेंद्रनाथ बानर्जी वगैरे पहिल्या पिढीचे 'सिव्हिल सर्व्हंट' पुढारी होत. सिव्हिल सर्व्हिसची ही व्यवस्था १८९२ पर्यंत अशीच चालली. आणि हिंदी सिव्हिल सर्व्हंटांच्या नेमणुकाहि होत होत्या. परंतु त्याच सालीं श्री. दादाभाई नौरोजी यांनीं पार्लमेंटपुढें ' सदर परीक्षा हिंदुस्थान व इंग्लंड येथें एकाच वेळीं घेतली जावी ' अशा आशयाचें बिल आणलें व तें तेथें पासहि झालें. परंतु त्याची अंमलबजावणी करण्याचें हिंदुस्थान सरकारनें नाकारलें. सदर कार्यास नियमांचें जाळें लॉर्ड लिटन यांनीं कसें गुंफलें, हें श्री. धनुर्धारी त्यांच्याच शब्दांत दिलें आहेः—
' हिंदुस्थानच्या लोकांस मज्जाव व्हावा किंवा फसवणूक वाटावी यांपैकीं एक मार्ग
' आम्हांस पसंत करावयाचा होता, आणि होतां होईल तितका कमी सरळपणाचा
' मार्ग आम्ही पसंत केला. ' आणि अशा तऱ्हेचे कायदे करूनहि, ' कायदा पास
' होतांच व्यावहारिक दृष्ट्या त्याची अंमलबजावणी न होई अशी युक्ति योजण्यांत
' सबंध आठ वर्षें गेलीं. दरसाल साडेसात (७·५६) या प्रमाणानें वशिल्याचे सिव्हिल
' सर्व्हंट तयार करण्याचें ठरलें. तो कायदा अंमलांत झाल्यास आजमितीला चौदा
' वर्षें (१८७८-१८९२) झालीं. म्हणून खऱ्या हिशोबानें एकशेंसहा तरी 'भिडे'चे
' सिव्हिल सर्व्हंट असावयाला पाहिजेत. पण ती संख्या साठांहून कांहीं जास्त नाहीं. '
( वाग्बाण, ३१-५-९२ ). याचें आविष्करण अधिक स्पष्ट शब्दांत केसरीनें केलें आहे. ... ' सिव्हिल सर्व्हिस सारख्या परीक्षा ज्या विलायतेंत होतात त्या नेटिव्हांना
' जागा मिळूं नयेत एवढ्याचकरितां होत. जरी विलायतेस जाऊन आम्ही त्या परीक्षा
' देण्यास तयार झालों, तरीहि आमच्या मार्गांत विघ्न आणण्यास आमचें सरकार
' डोळ्यांत तेल घालून तयार आहे. यावरून राणीसरकारचा जाहिरनामा कसाहि
' असला तरी राजसत्ता ज्यांच्या हातांत आहे, त्यांचे हेतु काय आहेत हें लोकांनीं
' ओळखून घ्यावें. ' (स्फुट सूचना, २५-९-००).

सन १९०० सालीं ' कूपर्स हिल एंजिनिअरिंग कॉलेज 'च्या परीक्षेंत दोघा हिंदी विद्यार्थ्यांनीं कित्येक बक्षिसें आणि स्कॉलरशिपाहि पटकाविल्या. परंतु याचा परिणाम उत्तेजनांत न होतां प्रतिबंधांत झाला आणि ' दोहोंपेक्षां जास्त जागा ' (सदर कॉलेजांत) नेटिव्हांस मिळावयाच्या नाहींत, असा सेक्रेटरी ऑफ स्टेट यांनीं ' ठराव काढला आणि नेटिव्ह विद्यार्थ्यांचे पायच मोडून टाकले!' ( केसरी, २५-९-०० ). शिवाय नेटिव्ह फार झाले म्हणून बभ्राहि केला.

इंग्लंडांत शिक्षणाकरितां जाणाऱ्यांच्या वाढत्या अडचणींचीं कारणें ना. गोखले यांनीं लंडन येथील ' इंडियन असोसिएशन ' पुढील आपल्या व्याख्यानांत ( ता. २-८-१३ ) रोजीं दिलीं. ' याचें मुख्य कारण विलायतेंत वाढत चाललेला
' जात्यभिमान व वर्णद्वेष होय. इंग्लंडांतील मुत्सद्दी जें साम्राज्यविषयक धोरण
' ठरवितात तें बनविण्याच्या कामीं ब्रिटिश वसाहतींचा हात दिवसेंदिवस अधिक

'शिरत आहे, हेंहि एक कारण आहेच. हिंदुस्थानांतून पेन्शन घेऊन परत गेलेले
'गोरे अधिकारी विपरीत मतें तिकडे पसरवितात, व त्यांना एक प्रकारचें वजन
'असतें हें तिसरें कारण. चवथेंहि एक कारण आहे. तें असें कीं, विलायतेस
'येणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांची संख्या वाढत असल्यामुळें चांगल्या बरोबर वाईट
'विद्यार्थीहि विलायतेस जातात. त्यांचा प्रवेश होत नाहीं आणि वाईटाबरोबर या
'चांगल्यांनाहि वाईट रीतीनें वागविलें जातें.'

इंग्रजांच्या या धोरणाचें सर्वसामान्य उत्तर दहाव्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष मि. वेबसाहेब यांनीं प्रो. शंकर आबाजी भिसे यांचे शास्त्रीय प्रयोग पाहून व विलायतेंत त्यांची धंदा उभारण्याची कल्पना ऐकून दिलें आहे. 'तुमच्या अंगच्या गुणांचें 'कांहीं चीज झालेंच तर अमेरिकेंत होईल. हे इंग्रज लोक तुम्हांला उत्तेजन 'देतील असें मला तर वाटत नाहीं.' (१७-१-०५).

एतावता बौद्धिक क्षेत्रांत काय आणि औद्योगिक क्षेत्रांत काय इंग्रजांची वरील प्रवृत्तीच दिसून येते. वरिष्ठ प्रतीचें शिक्षण येथें नाहीं म्हणून तें मिळविण्यासाठीं हिंदी लोकांनीं विलायतेस जावें तर 'हे नेटिव्ह लोक येथें कां?' या प्रस्ताव-प्रश्नापासून तों शक्य तितकी त्यांची नाकेबंदी करण्याच्या भरत-वाक्यापर्यंत विघ्नांचें कुंपण उभारण्याचा तेथील लोकांनीं विडाच उचललेला दिसतो. त्यामुळें 'विलाय-'तेस जाणारे हिंदी विद्यार्थी पुष्कळ म्हणून अप्रिय मानणाऱ्या आंग्ल जनतेनें सर्व 'प्रकारच्या वरिष्ठ शिक्षणाची सोय सरकारनें हिंदुस्थानांत कितीशी केली आहे, 'याची कधीं चौकशी केली आहे काय?' (१२-८-१३). असल्या प्रश्नांचीं सयुक्तिक उत्तरें अपेक्षणें व्यर्थ होय. अर्थात् 'हिंदी लोकांसारख्या भाववश 'लोकांची व इंग्रजांसारख्या भावशून्य लोकांची गांठ एकत्र पडावी, हा एक 'दैवदुर्विलास होय.' असें जें एका युरोपीय निरीक्षकानें म्हटलें आहे तेंच खरें.

**३. अमेरिकेंतील विद्यार्जन** :—'हिंदुस्थानांत सरकारी नोकर निपजतो. इंग्लंडांत 'शास्त्रीय शिक्षणापेक्षां भाषाविषय अधिक चांगले शिकविले जातात. उत्तम 'शास्त्रीय शिक्षण देण्याचा जर्मनीचा हातखंडा आहे व व्यावहारिक धंदेशिक्षण 'पाहिजे असेल तर कोणासहि अमेरिकेंतच गेलें पाहिजे.' (२१-१०-१३).

आपल्याइकडील अभ्यासक्रमाचा प्रभावच असा कीं, प्रो. खानखोजे यांजसारखा विक्रमशाली विद्यार्थी येथें मॅट्रिकला नालायक ठरतो. मात्र तोच अमेरिकेंत जाऊन खनिजशास्त्राचा व कृषिशास्त्राचा व्यासंगी अध्यापक म्हणून मान्यता पावतो. सारांश, स्वदेशांत अनुदात्त शिक्षण आणि त्याच वेतानें कर्तबगारीस क्षेत्रहि कनिष्ठ! कसेंबसें शिक्षण मिळवावयाचें आणि चाकरीस लागावयाचें, हा राजमार्ग होऊन बसला आहे. यांत आक्रमहि नाहीं आणि पराक्रमहि नाहीं.

'देशांतल्या देशांत मार्ग इतके ठराविक व मळलेले असतात कीं, सर्व 'जन्म अशा आयत्या मार्गांवरून फिरण्यांत गेल्यामुळें एक टीचभरहि नवा मार्ग

'शोधून काढण्याची पात्रता मनुष्याच्या अंगांतून नाहींशी होते.' (२१-१०-१३). याचाच अर्थ असा कीं, अधिकाधिक पदरांत पाडून घेण्याऐवजीं मुदलांतच खोट आली असें म्हणण्याची वेळ येते. म्हणून 'स्वतःच्या कर्तबगारीस पूर्ण वाव 'पाहिजे असल्यास परदेशीं गेलें पाहिजे, एकाच ठिकाणीं सर्वांनीं गर्दी करून 'भागणार नाहीं, हें आतां स्पष्ट दिसत आहे.' (२६-३-२९, के. प्र. प्र. चें पत्र). पण तें कोणास दिसत आहे ? एवढाच काय तो प्रश्न आहे. आणि ज्यांस दिसत आहे, ते प्रफुल्ल चंद्र रॉय तर मोठ्या उद्वेगानें म्हणतात कीं, 'सर डेव्हिड यूल, 'लॉर्ड इंचकेप, हेन्री फोर्ड यांनीं जीवितारंभ अगदीं सामान्य स्थितींत केला व केवळ 'आपल्या धडाडीवर ते महत्पदास पोचले. हिंदी तरुणांत अशी महत्त्वाकांक्षा उरली 'नाहीं, त्यांच्यांत उत्साह नाहीं, जोम नाहीं.' ( केसरी, प्रा. बोल, १७-९-२९ ) म्हणजे नाचतां येत नाहीं हें खरें आणि अंगण वांकडें हेंहि खरेंच !

कित्येक वेळीं असें म्हणण्यांत येतें कीं, निखालस निरक्षरता पुरवली पण आपली सध्यांची साक्षरता नको. उदाहरणच द्यावयाचें तर अमेरिकेंतील नीग्रो व त्यांचे प्रसिद्ध पुढारी बुकर टी. वॉशिंग्टन यांचें देतां येईल. कायद्यानें गुलामगिरी रद्द झाली तरी स्वतंत्रता अंगीं कशी लावून घ्यावी याचीच नीग्रो लोकांस पंचाईत पडली. अशा निराशामय प्रसंगीं बुकर टी. वॉशिंग्टन यांनीं मोठ्या उत्साहानें व दीर्घ परिश्रमानें शिक्षण संपादन करून आपला स्वतःचा मार्ग शोधून काढला व 'टस्केजी नॉर्मल अँड इंडस्ट्रिअल इंस्टिट्यूट 'ची स्थापना करून नीग्रो मुलांचा बिकट प्रश्नहि सोडविला. '......एकाच कार्याकडे आपल्या सर्व शक्तींचें केंद्रीभवन केलें असतां दृढनिश्चया- 'च्या व सतत परिश्रमाच्या जोरावर एका व्यक्तीच्या हातून देखील केवढी कामगिरी 'होऊं शकते याची प्रतीति बुकर टी. वॉशिंग्टनाच्या चरित्रावरून सर्वांस सहज येईल. '........स्वार्थत्याग, कर्तव्यदक्षता, दीर्घोद्योग, आशावादित्व इत्यादि गुणांचा 'कित्ता म्हणून बुकर टी. वॉशिंग्टनचें चरित्र प्रत्येक तरुणानें आपल्या डोळ्यांपुढें 'ठेवण्याजोगें आहे.' ( स्फुट सूचना, २३-११-१५ ). बुकर टी. वॉशिंग्टन म्हणजे आत्मोद्धाराचा पुतळा. हिंदी तरुणानें त्याचें चरित्र डोळ्यांपुढें ठेवावयाचें म्हणजे 'उद्धरेदात्मनात्मानम्' या तत्त्वाचें प्रत्यक्ष आचरणांत रूपांतर करावयाचें आहे, आणि या आत्मोद्धाराचा मार्ग अमेरिकेसारख्या संपन्न राष्ट्रांतील शेंकडा ४६ विद्यार्थ्यांनीं अवलंबिला आहे. 'एरवींच्या वेळीं पोटाला मिळ- 'विण्याचा धंदा करावा व कॉलेजच्या वेळीं कॉलेजांत जाऊन शिकावें ही जोड 'शक्य आहे. या द्वंद्वांत कित्येक चिरडूनहि जातात पण जे विजयी होतात त्यांचा 'आनंद त्यांनाच विचारावा.' (अग्रलेख, २१-१०-१३). 'स्वावलंबी विद्यार्थ्यांनीं 'आपलें मन दगडाप्रमाणें घट्ट करून हाल सोसण्यास तयार होऊन इकडे (अमेरिकेंत) 'आलें पाहिजे. पैसेवाल्यांस कोठेंहि सुख होईल, पण स्वावलंबनाचें तसें नाहीं.' (प्रो. खानखोजे, ३०-१-१२.) हिंदुस्थानांत स्वावलंबन हा शब्द मधुकरी मागणें,

वार लावून जेवणें, फार तर मंडई, देवपूजा करणें, एवढ्यापुरताच विद्यार्थ्यास माहीत आहे. परंतु स्वावलंबनाचें महत्त्व पाहूं गेल्यास—

' केवळ शिक्षण मिळविण्यापेक्षांहि दुसऱ्या अनेक गोष्टी आज हिंदुस्थानांतील ' विद्यार्थ्यांना परदेशीं जाऊन शिकावयाच्या आहेत, व इकडील शिक्षणाची जाति ' व पद्धति हीं उद्यां बदललीं तरीहि त्या अनिर्वाह्यच ठरतील. स्वावलंबन ही अशा- ' पैकीं एक गोष्ट होय. शिक्षण हें साध्य असून स्वावलंबन हें एक निव्वळ साधन ' आहे. तथापि स्वावलंबन हेंच स्वतः साध्य होऊन बसण्याइतकें महत्त्वाचें असल्यामुळें ' तें शिकण्याकरितां देखील परदेशीं जाणें जरूर पडेल तर जावें.' (अग्रलेख, १४-११-११). स्वावलंबन हें कष्टाचें आहे; पण त्यायोगें माणूस जिवंत राहतो, नुसता जगत नाहीं. शिवाय, ' कुतो विद्यार्थिनः सुखम्?' विद्यार्थ्यानें सुख शोधूं नये. कारण तें श्री. खानखोजे म्हणतात त्याप्रमाणें ' स्वावलंबी विद्यार्थ्याचें सुख तर ' त्याच्या कर्तबगारींतच आहे.' (६-२-१२). म्हणून त्यांनीं मासल्याकरितां एका स्वावलंबनानें ग्रॅज्युएट झालेल्या विद्यार्थ्याचें वेळापत्रक दिलें आहे, तें असें:—'पहांटे ' ४-४॥ प्रातर्विधि; ४॥-७ लोहार कारखान्यांत काम; ७-८ एका घरीं भांडीं ' घासणें; ८-१२ महाविद्यालयांतील वर्गांत जाणें; १२-१ कवायत (ड्रिल); १-२ ' पुनः भांडीं घासण्याचें काम; २ ते ६ विद्यालय (केव्हां केव्हां एकदोन ' घंटे विश्रांति मिळे; पण त्याचा तो वेळ अभ्यासांत जाई); ६-८ घरगुती कामें, झाड- ' लोट करावयास जाणें; ८—१२ दुसऱ्या दिवसाचा अभ्यास व पुढें निद्रा; शनिवारीं ' महाविद्यालयाच्या रसायनशाळेंत तो असिस्टंट केमिस्टचें काम करी व रविवारीं ' चिठ्ठी-पत्र, अभ्यास, करमणूक वगैरे.'

यावरुन ' कणशः क्षणशः चैव विद्यामर्थंच साधयेत ' हें तत्त्व किती काटे-कोरपणानें आणि तत्परतेनें पाळावें लागतें याचें हें उत्कृष्ट उदाहरण नाहीं काय ?

अकिंचनत्वांतच धुमसत असणाऱ्या महत्त्वाकांक्षेला वाव फोडण्यासाठीं मन पराकाष्ठा करीत असतें. याचें प्रत्यंतर म्हणून आणि हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांचा शारीरिक दुबळेपणा परदेशीं जातांच हिंवाळ्यांतील वृक्षाप्रमाणें वठून त्याऐवजीं त्याच्या उत्साहाचा वसंत कसा पालवतो, याविषयीं पुढील उल्लेख वाचनीय आहे. 'सन १९०५ ' सालापूर्वी अमेरिकत शिक्षण घेणारे ४—२ हिंदी विद्यार्थीच होते; पण २४ सालांत ' ही संख्या ६०० पर्यंत गेली. त्यांनीं आपला जीवनक्रम व शिक्षणक्रम केवळ ' स्वावलंबनावरच उरकला.' ' आपल्या इकडील शिक्षित तरुणांची राहणी, मनः- ' प्रवृत्ति यांच्यावर नित्य टीका करणाऱ्या लोकांस, यांतीलच तरुण विद्यार्थी अमेरि- ' केंत गेल्यावर तेथें कसा निर्वाह करूं शकतो याचें अद्भुत आश्चर्य वाटेल. ज्या ' लोकांस येथें मंडईतून भाजी आणणें, आंगणांतील गवत स्वतः खुरप्यानें खुरपणें, ' किंवा स्वतःची ट्रंक रस्त्यानें उचलून नेणें कमीपणाचें वाटतें आणि उन्हांत व ' थंडींतहि घटकाभर शारीरिक श्रम करवत नाहींत, तेच तरुण अमेरिकेंत जाऊन

'खाणावळींतून वाढण्याचें आणि भांडीं घासण्याचें, झाडसारवीचें किंवा हमालीचें,
'रेल्वे रस्त्यावरील खडी उकरण्याचें किंवा एंजिनें घासण्याचें, शेतावर खणण्याचें
'अगर वेंणण्याचें, दोनदोनशें, चारचारशें जिन्यांची चढउतार करीत वर्तमानपत्रें
'विकण्याचें किंवा फॅक्टरींतील घण मारण्याचें, अशीं कामें भर उन्हांत आणि थंडीच्या
'कहरांत रोज ८, १० व १२ तास कशीं करीत असतात, आणि या रीतीनें निर्वाह
'करून शक्य त्या विषयांचें अध्ययन करीत असतात, ही गोष्ट कौतुकास्पद नाहीं
'असें कोण म्हणेल ?' ( केसरी, २२-४-२४ ).

अशा तऱ्हेचा सत्वपरीक्षा पहाणारा व चिकाटी कसोटीस लावणारा आयुष्यक्रम कंठून हिंदी विद्यार्थ्यांनीं अमेरिकेंत आपलें जीवन यशस्वी केलें आहे. व कित्येक कुशाग्र बुद्धीचे पदवीधर तेथील लोकांकडून वाहवा मिळवून स्वदेशीं परत आले आहेत.

**४. आंतरराष्ट्रीय चळवळीचें महत्त्व :—** लालाजी म्हणतात कीं, 'परराष्ट्रीय 'चळवळीचें महत्त्व व आवश्यकता एकटे लोकमान्यच काय ते जाणतात.' सकृद्दर्शनीं अशा प्रकारची चळवळ म्हणजे ढोपरास जखम झाली असतां, कोपरास दवा लावण्यासारखी दिसते. परंतु व्यक्तिशः चारचौघांचें बरें मत असल्याखेरीज जसा व्यवहार निभत नाहीं, त्याचप्रमाणें राष्ट्राराष्ट्रांच्या भल्या मताखेरीज जगाचा व्यवहार निभत नाहीं. केसरीकारांनीं अशा आंतरराष्ट्रीय चळवळीचें महत्त्व १८८७ सालापासून प्रसंगोपप्रसंगीं पटविण्याचा उपक्रम केला आहे. आणि त्याअन्वयें ही चळवळ प्रथम कशी सुरू झाली व तिला केसरींतूनच प्रोत्साहन कसकसें मिळालें हें येथें पहावयाचें आहे.

१८९३ सालीं अमेरिकेंत शिकागो शहरीं भरलेल्या विश्वधर्मपरिषदेपुढें स्वामी विवेकानंदांनीं हिंदु धर्माची उच्च भूमिका प्रथम अमेरिकनांच्या निदर्शनास आणली, आणि आपल्या ओजस्वी वाणीनें साऱ्या श्रोत्यांचीं मनें वेधून घेतलीं. अमेरिकेंतील हिंदुस्थानाविषयक चळवळीचा हाच 'श्रीमन्महा' म्हटला पाहिजे. यद्यपि ही सुरुवात धार्मिक स्वरूपांत सुरू झालेली असली तरी त्या योगानें हिंदुस्थानची माहिती व स्वरूप लोकनिदर्शनास प्रथम आलें. त्यापूर्वी मॅक्लीनसाहेबांप्रमाणें 'हिंदुस्थानचे लोक हे लोकच नव्हेत' ही समजूत प्रचलित होती. 'हिंदुस्थानांतील लोक मूल जन्मतांच गंगेंत टाकतात, बायका जाळून घेतात, पुरुष रथाखालीं स्वतःचा बळी देतात.' वगैरे वगैरे आरोप हिंद जनतेवर केले जात. हे आरोप प्रथम ख्रिस्ती धर्मप्रसारकांनीं चालतेबोलते केले आणि त्यांचा उपयोग राजकीय, सामाजिक, आर्थिक क्षेत्रांत वावरणाऱ्या विरोधकांनीं मनमुराद करून घेतला.

हिंदुस्थानचें राज्य चालविणारे गोरे कामदार व त्यांचे स्तुतिपाठक अँग्लो-इंडियन पत्रकार हिंदी लोकांसंबंधानें युरोपांत व अमेरिकेंत कसा गैरसमज उत्पन्न करतात याचें एक मासलेवाईक उदाहरण असें आहे.

'फ्रान्स देशामध्यें पॅरिस शहरीं इंग्रजी राज्य उलथून पाडण्याचा एक फार 'मोठा कट झाला असून तिची मुख्य प्रवर्तक एका हिंदी गृहस्थाची जर्मन स्त्री आहे.' अशी हूल कांहीं अँग्लो-इंडियन पत्रांनीं उठविली. यासंबंधीं पंडित श्यामजी कृष्णवर्मा यांनीं एक खुलाशाचें पत्र लिहून कळविलें कीं, 'पॅरिसमधील हिंदी कटाची अफवा 'निवळ दंतकथा असून हिंदी राजकारणी पुरुष परकी देशांत राहून सांपडेल त्या 'इंग्रजावर बॉंब टाकण्याइतके बेअकली आणि निर्दय खात्रीनें नाहींत.' ( केसरी, स्फूट, २६-१-०९ ). या कारणास्तव परकीयांनीं चढविलेल्या हल्ल्याचा प्रतिकार करणारीं केंद्रें निर्माण झालीं पाहिजेत. अशीं केंद्रें आज अमेरिकेंत, जर्मनींत झालीं आहेत, आणि यापुढें जेथें म्हणून हिंदी लोक एकत्र होण्याचा योग येईल, तेथें तेथें तीं होणें अगत्याचें आहे. या, दृष्टीनें अमेरिकेंत Hindustan Association of America ही संस्था काम करीत असून तिचे उद्देश (१) हिंदी विद्यार्थ्यांचे अमेरिकेंत हितसंबंध पाहणें, ( २ ) अमेरिकेंत हिंदुस्थानाबद्दल अधिक अगत्य वाढविणें, ( ३ ) अमेरिकन विद्वानांचा हिंदु विद्वानांशीं अधिकाधिक संबंध जोडणें हे आहेत. संस्थेच्या पंधरांपेक्षांहि अधिक शाखा अमेरिकेंतील प्रमुख शहरीं आहेत आणि संस्थेतर्फे 'Hindustanee Student' नांवाचें एक मासिकहि प्रसिद्ध होत असतें.

'योगोऽसत्यसंघ' नांवाची दुसरी एक धार्मिक संस्था कॅलिफोर्नियांत स्थापन झाली असून, तिचे अध्वर्यु स्वामी योगानंद हे आहेत. यांनीं आपल्या संस्थेचीं केंद्रें प्रमुख शहरीं स्थापून अभ्यासेच्छूंस योगाचें आणि हिंदु तत्त्वज्ञानाचें शिक्षण देण्याचें मोठें काम चालविलें आहे. अशा तऱ्हेची तिसरी संस्था 'हिंदी-स्वातंत्र्य-संघ' ही अमेरिकेंत डेट्राइट ( मिचिगान ) येथें हिंदुस्थानविषयक गैरसमज पसरविण्याच्या उपक्रमास आळा घालण्यासाठीं श्री. एन्. सी. मुकर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं 'हिंदी स्वातंत्र्य संघ' या नांवानें नुक्तीच स्थापन झाली आहे. संघानें पाश्चात्य राष्ट्रांत हिंदुस्थानविषयक माहिती कशी पुरवावी याची योजना आंखली आहे. तिचें स्वरूप संक्षेपतः असें:—(१) हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या लढ्याची हकिकत अमेरिका, जपान व जर्मनीमध्यें प्रसृत करणें, (२) 'हिंदी स्वातंत्र्याची चळवळ' नामक पुस्तक व तत्सदृश इतर पत्रकें राष्ट्रीय सभेनें काढावीं व त्यांचा प्रसार अमेरिकेंत मोठ्या प्रमाणांत करावा, ( ३ ) हिंदुस्थान व अमेरिका यांमध्यें 'फ्री प्रेस'द्वारां दळणवळण वाढवावें, ( ४ ) अमेरिकन वृत्तपत्रांत हिंदी लेखकांकडून लेख लिहवावे, ( ६ ) हिंदी ग्रंथकार व प्रकाशक यांस माहितीपूर्ण पुस्तकें अमेरिकेंत प्रसिद्ध करण्याबद्दल उत्तेजन द्यावें, ( ६ ) अमेरिकन व युरोपियन प्रवाशांस 'हिंदुस्थानचा मार्गदर्शक' यासारख्या पुस्तकांचा लाभ करून द्यावा, त्यांस समुच्चयानें माहिती देणारी ( ऐतिहासिक, सांस्कृतिक, सामाजिक ) एक संस्था स्थापावी, ( ७ ) हिंदुस्थानची सुधारणा उत्तरोत्तर होत असल्याबद्दलच्या विषयांचीं नाटकें वा चित्रपट परदेशांत दाखविण्याची योजना

करावी. मॅजिक लँटर्न स्लाइड्स्चाहि उपयोग करावा, (८) हिंदी राष्ट्राच्या आकांक्षा व त्याची स्वातंत्र्येच्छा यांची माहिती देणारें एक प्रसिद्धिपत्रक सर्व पक्षोपपक्षांतील पुढाऱ्यांच्या सह्यांनिशीं राष्ट्रीय सभेमार्फत प्रसिद्ध करून त्याच्या प्रती राष्ट्रसंघाच्या सभासदांकडे पाठवाव्या. ( २१-१२-२९ वरून संक्षेपानें ).

लालाजींसारख्या देशभक्तांस आगंतुक कारणामुळें अमेरिका हीच आपली कर्मभूमि करावी लागली, तेव्हां कार्य करण्यास अमेरिकेंत मुबलक क्षेत्र असून जगांतील एका बलवान् राष्ट्राचा आपणांस पाठिंबा मिळविणें किती श्रेयस्कर आहे हें त्यांच्या लक्षांत आलें. आणि त्याच वेळीं हिंदुस्थानास अज्ञात अशा किती एक नाठाळ प्रलापांचा संचार परदेशांत स्वैरपणें होत असल्याचें त्यांस आढळून आलें.

हिंदुस्थाननें स्वतःविषयीं पसरलेल्या व पसरविण्यांत येणाऱ्या गैरसमजांची पर्वा बाळगावी, अशीच त्याची सध्यांची स्थिति आहे. त्यासाठीं जंगलच्या प्रवाशास जसें मार्ग धुंडणें व त्यासाठीं आजूबाजूंचीं झाडेंझुडपें छाटणें आवश्यक असतें, तसेंच हिंदुस्थानचेंहि आहे. हें काम बऱ्याच मोठ्या प्रमाणांत लाला लजपतरायांनीं आपल्या हद्दपारीच्या मुदतींत चालू केलें. पण श्रीमन्महा म्हणतांच तंडुलाची गरज दत्त म्हणून उभी रहावयाचीच ! पैशाविना लालाजी मोठ्या पेंचांत सांपडले असतां त्यांची ती असहाय स्थिति डॉ. हर्डीकरांच्या बंधूंकडून लो. टिळकांस कळली. त्या प्रसंगीं लोकमान्यांनीं त्यांस तावडतोब १७००० रु. पाठवून दिले. ही ऐन वेळीं झालेली मदत पाहून लालाजी श्री. हर्डीकरांस म्हणतात, ' हें ' पहा हर्डीकर, परराष्ट्रांतील हिंदुस्थानविषयक प्रचाराचें महत्त्व व आवश्य- ' कता एकटे लोकमान्यच कायते जाणतात. या गोष्टीची तुला आतां खात्री ' पटली असेलच. हिंदुस्थानचे खरे पुढारी अथवा धुरीण तेच आहेत. ' ( अमेरिकेंतील लालाजींचा जीवनक्रम, केसरी ता. १-१-२९ ).

एका थोर माणसानें दुसऱ्या थोर माणसाचें लोकमान्यत्व आणखी कोणत्या शब्दांनीं व्यक्त करणें शक्य आहे ? असो. अशा तऱ्हेनें परदेशी चळवळ चालवून हिंदी आकांक्षांस लोकमत अनुकूल करुन घेणें म्हणजे वर उल्लेखिल्याप्रमाणें जंगलचा मार्ग चोखाळण्यासारखें आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल.

वरील ' हिंदुस्थान असोसिएशन ऑफ अमेरिका ' या संस्थेतर्फे श्रीमती सरोजिनी नायडूंस पाचारण करून हिंदी स्त्रियांचें देखील चालू राजकारणांत किती लक्ष आहे, हें सदरहू संस्थेनें अमेरिकनांस पटवून दिलें. बाईंनीं आपल्या रसाळ वाणीनें ' हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज जगाला शांतता लाभणार नाहीं. ' या सूत्रवाक्यानें हिंदुस्थानचें मनोगत जगजाहीर केलें. तसेंच ' जगत् शिक्षण संघाच्या ' सान फ्रान्सिस्को येथील बैठकींत श्री. एल्. व्ही. गोगटे, श्री. एच्. के. रखित व मिस हंसा मेहता यांनीं हिंदुस्थानच्या वतीनें उत्कृष्ट कामगिरी बजाविली. हंसा मेहता यांचा पेहराव व वक्तृत्व पाहून तर कित्येक अमेरिकन चकित झाले व

' मदर इंडिया 'सारखीं नाठाळ पुस्तकें रचण्यास विषय होणाऱ्या देशांत मिस् हंसासारखी तेजस्विनी निर्माण व्हावी, हें त्यांस विरोधाभासाचें मूर्तिमंत चित्र वाटलें. याचें कारण इतकेंच कीं, हिंदुस्थानसारख्या 'नामशेष' देशाची पूसतपास करण्या-इतकी जगास आवश्यकता वाटत नाहीं. जगाच्या बाजारांत हिंदुस्थानास इतकें गौण स्वरूप आहे.

या गैरसमजाची परमावधि श्री. ताम्हनकर ह्यांनीं अमेरिकन प्रवाशांची बॅलार्ड पियरवर मुद्दाम घेतलेल्या मुलाखतींत ऊर्फ चौकशींत पाहण्यास मिळते. हिंदी राजकारणाचे एक अभ्यासू कॅनेडियन म्हणतात, ' टागोर व गांधी मुसलमान आहेत. त्यांतून ' टागोरांनीं तर मूळचा हिंदु धर्म टाकून मुसलमानी धर्म अंगिकारिला आहे. ' चित्रविक्याच्या पेशानें गेलेल्या ताम्हनकरांस जसें या अपूर्व माहितीचें अपूर्वत्व वाटलें तसेंच ' हिंदी लोक शिक्षणच नको म्हणतात, ' या दुसऱ्या एका अमेरिकनाच्या प्रमेयाचेंहि कौतुक वाटलें असेल. जाणूनबुजून बदनामी करण्याच्या प्रयत्नांचें हें फळ आहे. यासाठीं परदेशांत अनुकूल मतप्रसाराची आवश्यकता आहे. हिंदी लोक स्वातंत्र्य चाहतात तें 'आकाशांतला चांदोबा ' मागणारें मूल म्हणून नव्हे तर तो त्यांचा हक्क आहे, त्यांची लायकी आहे म्हणून. अमेरिकेनें—जगांतील एका वैभवशाली राष्ट्रानें—हिंदी राष्ट्राची बाजू उचलून धरावी, असें जें हिंदी लोकांस वाटतें, तें याचसाठीं. कारण, 'आयर्लंडची कड अमेरिकेनेंच उचलून धरली होती व आयरिश ' स्वराज्याचा प्रश्न सोडविण्याचा सध्या ब्रिटिश सरकार जो यत्न करीत आहे, ' त्यालाहि अमेरिकेची तरफदारी पुष्कळ अंशीं कारणीभूत झाली यांत शंका नाहीं. ' हिंदुस्थानचा प्रश्न तत्त्वतः पुष्कळ अंशीं आयर्लंडप्रमाणेंच असल्यानें हिंदुस्थानाकडेहि ' अमेरिकेनें लक्ष पुरवावें व त्याचीहि बाजू आयर्लंडप्रमाणेंच उचलून धरून ब्रिटिश ' सरकारचें मन वळवावें म्हणून लजपतरायांची खटपट आहे. सर सुब्रह्मण्यम् यांनींहि ' एतदर्थंच प्रे. विल्सन यांस पत्रें पाठविलीं होतीं आणि तोच प्रयत्न खंड न पडतां ' लजपतरायांनीं सुरू ठेविला आहे, ही फार आनंदाची गोष्ट आहे. हिंदुस्थानच्या ' स्वराज्यास ( स्वराज्य-प्रयत्नास ) अमेरिकेच्या बजनाची जोड लाभली तर दुधांत ' साखर पडल्याप्रमाणें होईल. ' ( १९-३-१८ ). सर सुब्रह्मण्यम् यांनीं सदर पत्र कसें पाठविलें आणि त्या पत्रानें कोणती कामगिरी केली त्याची हकीकत अशी आहे:—

' मि. हाचनर यांजबरोबर हें पत्र अमेरिकेंत पाठविण्यांत आलें होतें. मि. ' हाचनर यांनीं सदर पत्र प्रो. विल्सन यांच्या हातीं दिलें, त्यांनीं तें वाचून पाहिलें; ' बाब नाजूक पण विचारांत घेतली पाहिजे, असा शेरा मारला. अमेरिकेचे पर-' राष्ट्रीय मंत्रि मि. लान्सिंग यांजकडे पत्र निकालाकरितां आलें. सीनेट व काँग्रेस ' यांच्या सभासदांकडे सदर पत्राच्या प्रती पाठविण्यांत आल्या. मि. हाचनर यांनीं ' पुढाऱ्यांच्या गांठी घेतल्या, अमेरिका व कानडा येथील वर्तमानपत्रांत हिंदी ' स्वराज्याला अनुकूल असे लेख येऊं लागले. मि. रूझवेल्ट व मि. ब्रायन या प्रमुख

‘ मुत्सद्यांनीं सर सुब्रह्मण्यम् यांच्या पत्राला उचलून धरिलें. अमेरिकेंतून इंग्लंडांत येऊन
‘ क. हाउस यांनीं इंग्रजी मुत्सद्यांपुढें हा प्रश्न टाकला व अखेरीस वेझंटवाई सुटून
‘ स्वराज्याचें अभिवचन देण्यांत आलें. या हकिकतींत एकच गालबोट दृष्टीस पडलें.
‘ द्रव्यबलाच्या अभावीं मि. हाचनर यांना याहूनहि अधिक जोरानें हिंदी स्वरा-
‘ ज्याची चळवळ अमेरिकेंत चालवितां आली नाहीं. अभिवचनें लांबणीवर ढकलण्या-
‘ कडे नोकरशाहीची प्रवृत्ति होईल व पुढें वचनभंगहि करण्यांत येईल, ही भीति
‘ अमेरिकेंतील हिंदी स्वराज्यवाद्यांपुढें उभी आहे. लाला लजपतराय हे या कामीं एक
‘ मंडळ स्थापून योग्य ती खटपट करीत आहेत. पण हिंदुस्थानांतून अमेरिकेंतील
‘ पुढाऱ्यांना मदत होणें जरूर आहे. ’ ( ता. ७।५।१९१८ ).

सर सुब्रह्मण्यम् अय्यर यांनीं अमेरिकेचे प्रेसिडेंट विल्सन यांस एक पत्र व ‘ ह्या पत्रांत लिहिलेल्या गोष्टींच्या समर्थनार्थ बरेचसे विश्वसनीय कागदपत्र ’ मि. व मिसेस हाचनर यांजबरोबर दिले. त्या पत्रांत सन १९१७ च्या लखनौ कॉंग्रेसचें जाहीर धोरण उद्धृत केलें होतें व त्याबरोबरच प्रे. विल्सन यांच्या युद्ध-संदेशांतील ‘ राष्ट्रांना पारतंत्र्यांतून मुक्त करणें, लहानथोर राष्ट्रांचे हक्क संरक्षण करणें, आणि ‘ आपली राहणी व राज्यपद्धति ठरविण्याची प्रत्येक राष्ट्रास मुभा असणें, अर्थातच ‘ लोकनियुक्त राज्यपद्धति जगांत विनधोक नांदावी असें करणें हेंच या महायुद्धाचें ‘ उद्दिष्ट आहे. आणि या युद्धसमाप्तीनंतर राजकीय स्वातंत्र्याच्या भरभक्कम पाया- ‘ वरच तहाची इमारत उभारली पाहिजे. ’ हें अवतरण गोंवून हिंदी सैनिकांची महायुद्धांतील हुषारी, सोशिकपणा, धैर्य व चिकाटी चेंबर्लेनांच्याच शब्दांत वर्णिली. ‘ आणि उलटपक्षीं ‘ वस्तुस्थिति अशी आहे कीं, आमचे सैनिक एका परकीय ‘ राष्ट्राचा उच्च दर्जा कायम राहण्यासाठीं स्वजीविताचा होम करीत आहेत आणि ‘ उलटपक्षीं तेंच राष्ट्र आपल्या त्या दर्जाच्या जोरावर आमच्या इच्छेविरुद्ध अरेरावी ‘ गाजवून अंमल करीत आहे. ’ या प्रकारचें विपरीत माप त्याच्या पदरांत पडत असल्याचें दर्शविलें. शिवाय ‘ होमरूल ’च्या अभिवचनानें तीन महिन्यांत ‘ ५० लक्ष ‘ लोक लढाईवर जाण्यास तयार होतील व पुढील तीन महिन्यांत आणखी ५० लाख ‘ तरुण मिळतील, ’ असेंहि नमूद केलें.

---

# नेमस्त प्रतिपक्षी

[ श्री. दत्तात्रेय गणेश येरवडेकर, एम् ए., एल्एल्. बी. ]

सुधारकांचा मनु संपून नेमस्तांच्या मनूला सुरुवात झाली व १९०७ साल उजाडलें. पूर्वाश्रमींचे सुधारक हे नेमस्त राजकारणी म्हणून पुढें आले व पूर्वाश्रमींचे सनातनी हे जहाल राजकारणी म्हणून पुढें आले व त्यांच्या चकमकी सुरू झाल्या. सन १९०७ च्या कॉंग्रेसची हकीकत प्रसिद्ध असल्यानें तिच्या बद्दलच्या टीका-प्रतिटीकांचा परामर्श येथें घेत नाहीं. पण या काळांतील केसरीचें शरसंधान करण्याचें ठिकाण म्हणजे ना. गोखले. इ. स. १९०७ च्या प्लेगमध्यें पुणेंकरांना मदत करण्यासाठीं ना. गोखले यांनीं प्लेग-कमिटी स्थापिली. या कमिटीला सरकारनें गांवाबाहेर झोंपड्या बांधण्यासाठीं ३० हजार रुपये मदत दिली. ही मदत म्हणजे सरकारी लालूच होय व तिला ना. गोखले हे बळी पडले, ही गोष्ट वाईट झाली अशी केसरीनें टीका केली. त्या वेळचे ॲक्टिंग गव्हर्नर म्यूर मॅकेंझी यांनीं असें भाषण केलें होतें कीं, सरकारास प्रिय असलेल्या प्लेग टोंचून घेण्याच्या उपायास जो सार्वजनिक पुढारी उत्तेजन देईल, त्यासच स्थानत्यागाकरितां ही मदत मिळावी अशी मी हिंदुस्थान सरकारला शिफारस केली होती. ना. गोखले हे प्लेग टोंचून घेण्याला अनुकूल आहेत व इनॉक्युलेशनच्या प्रसाराची खटपट त्यांची कमिटी करीत आहे, ही खात्री करून घेऊनच ना. गोखल्यांना सरकारनें ही लालूच-वजा बडी देणगी दिली व पूर्वी एक वेळ गोखले हे इनॉक्युलेशनला तितकेसे अनुकूल नसतां याच वेळीं एकदम सर्वस्वीं अनुकूल झाले हा योगायोग महत्त्वाचा आहे असा केसरीच्या टीकेचा आशय होता. या टीकेवर गोखल्यांनीं ज्ञानप्रकाशांत मुलाखत देऊन उत्तर दिलें व श्री. वासुकाका जोशी यांच्या सांगण्यावरून आपण ही मदत मागितली असें सांगितलें. पण त्यावरहि केसरीनें टीका करून असें दाखविलें कीं, ना. गोखले यांनींच या बाबतींत सर्व कारवाई करून पुणें म्युनिसिपॉलटीकडून पुढाकार घेवबून सरकारी मदत कर्जरूपानें मिळविली. जनतेच्या पुढाऱ्यांनीं सरकारचे मिंधे होऊं नये असा केसरीचा भावार्थ. सुरतेच्या कॉंग्रेसच्या वेळच्या गोखल्यांच्या वर्तनाची मीमांसा करतांना केसरी लिहितो, ' मुंबईच्या राजास ' ( फेरोजशहास ) दादाभाईंचें स्वराज्य नको, बहिष्कार नको आणि स्वदेशी पाहिजेच ' असल्यास लॉर्ड मिंटोची प्रामाणिक स्वदेशी पाहिजे. गोखल्यांस फेरोजशहांची कास ' सोडावयाची नव्हती आणि फेरोजशहांचीं मतें चुकीचीं आहेत, असें उघड ' म्हणण्याचेंहि त्यांस धैर्य नव्हतें, तेव्हां मला हे फेरफार शाब्दिक वाटतात अशी कांहीं ' तरी सबब लावून ते फेरोजशहांच्या गोटांत आपलीं शिंगें मोडून शिरले आहेत. '

( ४-२-०८ ). याच वेळीं ‘ नेमस्तांच्या खोट्यांचा बाजार ’ म्हणून सुरत कॉंग्रेस-संबंधीं जहाल पक्षाबद्दल नेमस्त पुढाऱ्यांनीं व वृत्तपत्रांनीं जे जे आरोप केले होते त्यांची विस्तृत यादी नांवनिशीवार व तारीखवार देणारे असे दोनतीन लेख केसरींत प्रसिद्ध झाले आहेत. ‘ रा. ब. मुधोळकर व संभावित खोडसाळपणा ’ असाहि वऱ्हाडच्या कांहीं प्रतिनिधींनीं लिहिलेला लेख प्रसिद्ध झाला आहे.

सन १९०९ सालीं केसरीनें अशी टीका केली कीं, १९०५ मध्यें जहालपणानें ब्युरॉक्रसीवर तुटून पडणारे गोखले सध्या अराजक चळवळीला भिऊन मवाळ झाले व ‘ अदबशीर अर्जी ’ची स्तुति करूं लागले. या वेळीं हिंदुस्थानांत अराजक चळवळ डोकावूं लागली व त्यामुळें नेमस्त पुढारी गडबडून गेले. दरम्यान टिळक वगैरे राष्ट्रीय पक्षाचे कांहीं पुढारी तुरुंगांत गेले होते. अशा वेळीं मवाळ पक्षानें दुष्ट-बुद्धीनें नव्हे पण भोळेपणानें व स्वतःला वांचविण्याच्या हेतूनें सरकारची अशी समजूत करून दिली कीं, मवाळांच्या क्रीडवर सही न करणारे सगळे लोक राजद्रोही आहेत. ना. गोखले या वेळीं असें बोलले कीं, ‘ अराजकतेंतून हिंदुस्थानाला मोर्ले व मिंटो यांनीं वांचविलें. ’ हिंदुस्थानांत या वेळीं जी असमर्थनीय अशी दडपशाही झाली तिचें समर्थन करतांना मोर्ले यांना गोखल्यांची ही कबुली आयतीच उपयोगी पडली. या सर्व प्रकारांवर ता. २२-६-०९ चे अंकांत केसरीनें ‘ नामदारांचा भाबडेपणा ’ हा अग्रलेख लिहिला. त्यांत केसरी म्हणतो, ‘ अशा रीतीनें मवाळांचा ‘ भाबडेपणा किंवा अप्रबुद्धपणा राष्ट्रीय पक्षाचे छळास अंशतः तरी कारणीभूत झाला ‘ आहे. ’ याच लेखांत केसरीनें ‘ वक्ते पण विचार न करतां पाहिजे तें बरळणारे, ‘ विद्वान् पण अधिकाऱ्यांचें धोरण ओळखतां न येण्याइतके भाबडे, स्वार्थत्यागी ‘ पण स्वपक्षाच्या फायद्याकरतां अधिकाऱ्यांची फाजील स्तुति करून इतर देशबांध-‘ वांना खड्ड्यांत स्वतःलाहि न कळत परंतु अचानक पाडणारे, ’असें गोखल्यांचें वर्णन केलें आहे. गोखले व मोर्ले यांच्या संभाषणांत, बंगाल्यांतील बहिष्काराची चळवळ थांबली तर वंगभंग आपण रद्द करूं, असें मोर्ले यांनीं कबूल केल्याचें गोखल्यांनीं सुरेंद्रनाथांस सांगितल्यावरून सुरेंद्रनाथ बानर्जी चळवळ सोडून स्वस्थ बसले असें ‘ मॉडर्न रिव्ह्यू ’ नें प्रसिद्ध केलें होतें, त्याचाहि उल्लेख केसरीनें केला आहे. १९०९ सालीं डॉ. राश बिहारी घोष यांना सी. एस्. आय्. ही पदवी मिळाली. त्यावर केसरीनें लिहिलें कीं, राष्ट्रीय पक्षाला ठार करणारें कन्व्हेन्शन काढल्याबद्दलची ही बक्षिसी आहे. याच वर्षी ना. गोखले यांनीं ‘सद्यःस्थिति’ या विषयावर एक व्याख्यान दिलें होतें, हें व्याख्यान इतकें प्रतिगामी होतें कीं, त्याबद्दल सर्व वृत्तपत्रांनीं व पुढाऱ्यांनीं गोखल्यांवर टीकेची झोड उठवून दिली. केसरीनेंहि पुष्कळच टीका केली. तिच्यांतला मुख्य भाग हा कीं, जे विचार सरकारी अधिकाऱ्यांच्या तोंडांतून बाहेर पडण्यास योग्य, ते गोखल्यांच्या तोंडून बाहेर पडले ही अत्यंत अनुचित गोष्ट झाली. देशांतील लोकमत नेमस्त पक्षाला फारसें अनुकूल केव्हांच नव्हतें व याचें

प्रत्यंतर निरनिराळ्या प्रांतिक व जिल्हा परिषदांच्या ठरावांवरून येत असे. अशाच एका परिषदेच्या ठरावावर लिहितांना केसरी म्हणतो, ‘एकंदरींत मवाळांची क्रीडची ‘ रास क्रीडा’ संपत आलीसें दिसतें. ’ ( २४-८-०९ ).

सन १९११ सालीं केसरीनं ‘ जगद्वृत्त ’ व ‘ ॲडव्होकेट ’ या निमसरकारी वर्तमानपत्रांवर हत्यार धरलें होतें. त्या सालीं श्री. मोडकांवर कोल्हापूर येथें खटला झाला होता, त्याला अनुलक्षून जगद्वृत्तानें म्हणजे सरकारच्या ‘ आश्रित व जग्या ’ पत्रानें सबंध ब्राह्मण जात हरामखोर व बंडखोर आहे अशी बेशरमपणाची टीका केली; या टीकेवर जेव्हां प्रतिटीका येऊं लागल्या तेव्हां ॲडव्होकेटच्या औरस पण परान्नपुष्ट पुत्रानें ब्रह्मद्वेषाचें हें अँग्लो-मराठा रसायन जरासें सौम्य करण्याच्या हेतूनें त्यांत अशी दुरुस्ती केली आहे कीं, सर्व ब्राह्मण पाजी नाहींत, ‘ फक्त चित्पावन हे अनार्य असल्यामुळें ते तेवढे पाजी व हरामखोर आहेत’. जगद्वृत्तानें असेंहि लिहिलें कीं, ‘ १८५७ ची धामधूम चित्पावनांनीं घडवून आणली.’ केसरीनें या टीकेला रोखठोक उत्तरें दिलीं आहेत. याच वर्षी याच सुमाराला श्री. हरि नारायण आपटे यांच्या सूत्रचालकत्वाखालीं पुनः सुरू झालेल्या ‘ सुधारक ’ पत्रांत १९०८ च्या पुण्यांतील पिकेटिंगच्या चळवळीवर टीका आली. तींत त्या चळवळीला ‘ फेंपरें ’ व ‘पोरांचा पेंढारी दंगा ’ असें म्हटलें होत. योगायोगानें १९०८ सालीं या चळवळीच्या अभिनंदनार्थ त्या वेळीं भरलेल्या जाहीर सभेंत चळवळीची स्तुति करणारें भाषण हरिभाऊंनीं केलें होतें. त्यांतील उतारे देऊन केसरीनें हरिभाऊ आपटे यांचें मतांतर कसें झालें हें लोकांना दाखवून दिलें. १९१२ सालीं वेझंट-बाईवर केसरीनें केलेल्या टीकेचा विपर्यास करून राष्ट्रीय पक्ष अराजक आहे असें केसरीच कबूल करतो असें भासविण्याचा जगद्वृत्तानें प्रयत्न केला होता. हा केवळ नीचपणा होय, अशी केसरीनें यावर टीका केली आहे.

मुंबई युनिव्हर्सिटीपुढें १९१३ सालीं जुन्या शास्त्रीपंडितांच्या शिक्षणासाठीं विद्यालय काढून नवीन पदव्या निर्माण करण्याचा प्रश्न निघाला होता. त्यावर डॉ. भांडारकारांनीं अनुकूल भाषण केलें व रँग्लर परांजपे यांनीं प्रतिकूल भाषण केलें. रँग्लर परांजपे यांचें म्हणणें असें कीं, युनिव्हर्सिटीनें ‘उदार शिक्षण’ तेवढें द्यावें. जुनें ज्ञान एकांगी असतें व शास्त्रीपंडितांची तें ज्ञान संपादन करण्याची रीत म्हणजे घोकंपट्टी. त्या ज्ञानाचा जगाला फारसा उपयोगहि नाहीं. यावर केसरीनें संपादकीय उत्तर दिलें असून श्री. बाळाचार्य खुपेरकर यांनीं मोठा लेख लिहून परांजपे यांचे मतांचें सविस्तर खंडन केलें आहे. त्यांत दशग्रंथी विद्वान् ब्राह्मणाचे चिरंजीव असूनहि डॉ. परांजपे यांनीं अशीं मतें प्रतिपादावींत याबद्दल लेखकानें खेदपूर्ण आश्चर्य व्यक्त केलें आहे. श्री. विष्णुशास्त्री बापट यांचेंहि एक पत्र या विषयावर आलें आहे.

यानंतर १९१५ चा कॉंग्रेसच्या समेटाचा प्रश्न पुढें येतो. पण त्या वेळीं काय प्रकार झाले, ‘ चोराच्या उलट्या बोंबा ’ हा अग्रलेख काय सांगतो, वगैरे गोष्टी

आतां सर्वप्रसिद्ध असल्यामुळें त्याबद्दलचा विचार येथें करीत नाहीं. पुढें नेमस्त व जहाल यांचा समेट झाला व तो १९१८ च्या जादा काँग्रेसपर्यंत जेमतेम टिकला. त्यानंतर नेमस्त पक्षानें काँग्रेस कायमची सोडली. दरम्यानच्या या तीन वर्षांच्या ऐक्याच्या काळांत १९१७ सालीं मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटींत सत्याग्रहाचा ठराव गांधी यांनीं मांडला. सत्याग्रहाच्या बाबतींत गांधी ज्वलज्जहाल, टिळक जहाल, तर चंदावरकर अगदींच नेमस्त अशी सहजच स्थिति होती. पण तिघांनींहि प्रसंग ओळखून सामोपचारबुद्धि दाखविली व सर्वांना पसंत पडेल असा सत्याग्रहाचा ठराव पास झाला. केसरीनें यावर तिघांच्याहि सामोपचारबुद्धीला याचें श्रेय आहे असें लिहिलें. पण टिळकांना 'आग्रही हें विशेषण, लावून त्यांची निंदा करणाऱ्या 'ज्ञानप्रकाश'च्या तोंडचा या प्रसंगीं आवडता गोड घांस निघून गेला, म्हणून केसरीच्या या लिहिण्यानें ज्ञानप्रकाशच्या नाकास मिरच्या झोंबल्या, असें केसरीनें ज्ञानप्रकाशच्या टीकेला उत्तर देतांना लिहिलें आहे.

या नंतर माँटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा व त्याच्या बाबतींत काय धोरण ठेवावयाचें याबद्दल मवाळ व जहाल यांच्यांतील मतभेद हा विषय पुढें येतो. स्वतःच बनवलेली काँग्रेस-लीग स्कीम सोडून देऊन केवळ पार्लमेंट पास करणार म्हणून माँटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा खुषीनें स्वीकारणारे व स्वीकारा म्हणून लोकांना सांगणारे ना. शास्त्री हे, केवळ सरकारी टांकसाळींतून बाहेर पडला एवढ्याच कारणाकरितां खोट्या रुपयाचाहि स्वीकार करणाऱ्या इसमाइतकेच व्यवहारचतुर आहेत, असें केसरीनें लिहिलें. नव्या सुधारणांसंबंधीं काँग्रेसचें मत ठरवून जाहीर करण्याकरितां मुंबईस जादा काँग्रेस भरणार होती. पण एक एक मवाळ पुढारी आधींपासूनच त्या काँग्रेसमधून आपलें अंग काढून घेऊं लागले व आपण असें कां करीत आहों याचें समर्थन करूं लागले. ना. शास्त्री यांचें समर्थन हें ' अशास्त्रीय ' आहे. श्री. समर्थ हे बमेंडखोर आहेत व श्री. चंदावरकर हे दुतोंडी आहेत, अशी केसरीनें या वेळीं टीका केली. हरिभाऊ आपटे हे मुंबईच्या जादा काँग्रेसला जावें अशा मताचे होते व काँग्रेसला जावें कीं न जावें या बाबतींत खुद्द मवाळांमवाळांतच मतभेद झाला असून काँग्रेसला न जाणारे मवाळ हे सबंध देशांत शेंकडा १० सुद्धां नाहींत असें केसरीनें प्रांतवार व नांवनिशीवार मोजदाद करून दाखविलें. मध्यप्रांत कौन्सिलांत राखीव व सोंपीव खात्यांवर चर्चा चालू असतां कायदा व पोलिस वगैरे राखीव खातीं आमच्या हातांत लौकर देऊं नका, हळू हळू द्या अशी भाषा सर विपिन बोस यांनीं वापरली. हा त्यांचा फाजील नेमस्तपणा झाला व ते मध्यप्रांताचे ' चिंतामणि ' आहेत, असें केसरीनें लिहिलें. मध्यप्रांताचे ' चिंतामणि ' या टोमण्याला थोडासा इतिहास आहे. श्री. सी. वाय्. चिंतामणी हे मुंबईच्या जादा काँग्रेसला न जाणारे होते. पण त्यांचें जें मत तें अलाहाबादेचें व संयुक्त प्रांताचें नाहीं. कारण चिंतामणि हे मूळ मद्रासचे असून त्रिवेणीसंगमावर आगांतूक म्हणून आले आहेत, अशी

केसरीनें प्रांतवार मोजदाद करतांना टीका केली होती. तेव्हां, मद्रासचे चिंतामणी अलाहाबादेला जाऊन बसले, तशाच प्रकारानें कलकत्त्याचे बिपिन कृष्ण घोस नागपूरला राहिले असा भावार्थ. १९१८ च्या शेवटीं विलिंग्डन स्मारकाची इतिश्री झाली. नंतर टिळक हे विलायतेला गेले होते ते परत आले व पुण्यांत १९१९ च्या शेवटीं टिळकांच्या मानपत्राला विरोध करण्याचा नेमस्तांचा डाव सपशेल फसला. या वेळीं केसरीनें ' कावळ्यांचा जळफळाट ' अशीं स्फुटें व ' ना. परांजप्यांचा जळफळाट ' असा अग्रलेख लिहिला. हें सर्व प्रकरण कोणाच्या स्मरणांतून जाणें शक्य नसल्यानें येथें विस्तार नको.

मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा कायद्याच्या रूपानें हिंदुस्थानांत नांदूं लागल्या व अमृतसर कॉंग्रेसनें त्या अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक आहेत, असें ठरवूनहि त्यांचा फायदा घेण्याचें ठरविलें. त्या वेळेपासून ते टिळकांच्या मृत्यूपर्यंत आठ नऊ महिने नेमस्त व जहाल यांचे पवित्रे मोठे पहाण्याजोगे होते. नेमस्तांना सुधारणांचा सर्वच्या सर्व फायदा आपल्या पक्षास मिळावा अशी महत्त्वाकांक्षा होती व आम्ही या सुधारणांना नांवें ठेवीत नाहीं म्हणून आमचा त्यांच्यावर विशेषच हक्क आहे असाहि त्यांचा भावार्थ होता. पण लोकमत त्यांच्या बाजूचें नव्हतें. उलट जहाल पक्ष सुधारणा अपुऱ्या व असमाधानकारक असल्या तरी त्याहि पचवून आणखी भांडत राहण्याची उमेद धरून होता. दोघांनींहि नव्या निवडणुकींची जय्यत तयारी चालविली होती व दोन्ही पक्ष लोकांच्या मनांत आपल्याविषयीं प्रेम व विरुद्ध पक्षाविषयीं द्वेष उत्पन्न करण्याची खटपट करीत होते. महाराष्ट्रांत या आठनऊ महिन्यांत जुन्नर व सोलापूर येथें जहाल व नेमस्त यांच्या चकमकी उडाल्या व त्यांत नेमस्तांची नाचक्की झाली. ना. शास्त्री यांनीं आपमतलबीपणानें जहालांना उद्देशून असें भाषण केलें कीं, तुम्हांला जर सुधारणा नाकबूल आहेत तर त्यांचा उपयोग कां करितां ? पण केसरीनें हा भोळा डाव शास्त्रीबोवांच्याच गळीं उतरविला. १९१६ पासून १९१८ पर्यंत टिळकांच्या बरोबर कार्य करणाऱ्या बेझंटबाई सरकारजमा होऊन टिळकांना शिव्या देऊं लागल्या व मवाळांना साह्य करूं लागल्या. याबद्दल राष्ट्रीय पक्षाच्या लोकांनीं बेझंटबाईंना नांवें ठेवतांच थिऑसॉफिस्ट चेले त्यांच्या समर्थनार्थ पुढें आले व त्यांना उत्तर म्हणून केसरीनें ता. २-३-२०च्या अंकांत ' टिळक व बेझंट ' हा अग्रलेख लिहिला. यानंतर ' उतरती कळा लागली ' हा दुसरा अग्रलेख बेझंटबाईंवरच केसरीनें लिहिला. त्यांत केसरी म्हणतो, ' हिंदुस्थानवर धार्मिक अवतार लादण्याचा उपद्व्याप अंगाशीं आल्यानंतर ' धर्मगुरूची पदवी नाहीं तर नाहीं, राजकीय पुढारीपणावर संतुष्ट राहून धार्मिक ' पराभव झांकण्यास बाईंनीं साहजिकपणें प्रारंभ केला. थिऑसॉफिकल सोसायटीचा ' पुनः जम बसावा म्हणून बाई राजकीय पुढारी झाल्या. सरकारी जें धोरण तें ' बाईचें धोरण, नोकरशाहीचा जो मार्ग तो बाईचा मार्ग. कोल्हापूरचे महाराज

' व बेझंटबाई एका गोतवळ्यांत येऊन पडल्या आहेत ' ( ११-५-२० ). सोलापूर परिषदेसंबंधीं ' प्रिन्सिपाल, पशुपाल, कीं शिशुपाल ' हा लेख केसरीनें लिहिला, तो प्रसिद्धच आहे. कारवार जिल्हा परिषदेचे अध्यक्ष १९२० सालीं सर नारायण चंदावरकर होते. तेथील लोकांना इंग्रजी समजेना म्हणून सरसाहेबांना मराठी बोलावें लागलें. त्यांत त्यांनीं आपला तृतीय पंथ असा सांगितला कीं, मी टिळक पक्षाचा नाहीं, बेझंट पक्षाचा नाहीं व मवाळ पक्षाचाहि नाहीं. कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टीच्या जाहीरनाम्यासंबंधीं त्यांतील कायमधाऱ्याच्या पद्धतीच्या पुरस्काराला उद्देशून ज्ञानप्रकाशकारांनीं कांहीं टीका केली होती व पाल बाबूंच्या मतभेदाचा फायदा घेऊनहि टीका केली होती, त्याबद्दल केसरीनें ज्ञानप्रकाशचा समाचार घेतला आहे.

यानंतर असहकारिता युग सुरू झालें. ' कांहीं आक्षेपांना थोडेंसें उत्तर ' या लेखांत केसरीनें आक्षेपकांना उत्तरें दिलीं व खुद्द गांधी यांचेवरहि टीका केली. चंदावरकरांनीं असहकारितेच्या विरुद्ध एक चोपडें छापून प्रसिद्ध केलें होतें, त्याला केसरीनें चर्पटपंजरी म्हटलें आहे. मवाळ हे कौन्सिलांत गेले व इतरांनाहि या असें म्हणूं लागले, हें त्यांचें वर्तन लांड्या कोल्ह्याप्रमाणें आहे, असें केसरीनें लिहिलें. १९२० सालच्या मवाळांच्या मजलशींत अध्यक्ष चिंतामणी म्हणाले कीं, लिबरल फेडरेशन हीच खरी राष्ट्रीय सभा आहे. त्याला केसरीनें ' मंडूकवल्गना ' म्हटलें आहे. ता. १२-४-२१ रोजीं केसरीनें ' बेझंटबाईचा थोडासा समाचार ' पुनः घेतला आहे. मुंबई कौन्सिलचे अध्यक्ष सर चंदावरकर यांनीं रा. ब. चितळे यांच्या न्याय व अंमलबजावणीच्या फारकतीच्या ठरावावर कास्टिंग व्होट सरकारच्या बाजूनें दिलें. यावर केसरीनें टीका केली आहे. साम्राज्यपरिषदेला शास्त्री हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून जाणार होते. आपण युरोपियनांच्या बरोबरीनें हिंदी लोकांचा दर्जा असावा व वसाहतींत हिंदी लोकांना चांगल्या रीतीनें न वागविल्यास हिंदुस्थानांत वसाहतींना कोणत्याहि सवलती देण्यांत येऊं नयेत हें आग्रहानें साम्राज्यपरिषदेपुढें मांडणार आहोंत, म्हणून शास्त्री यांनीं भाषण केलें होतें. केसरी म्हणतो, ' हीं मतें चांगलीं आहेत. पण त्यांचा उपयोग शास्त्री टिकाव ' धरतील तरच होईल. पण ज्यांना होममेंबरची भीड मोडवत नाहीं, ते शास्त्री ' साम्राज्यपरिषदेंत कोठला धीर धरणार ? ' ( ३१-५-२१ ).

याच वेळीं बेझंटबाई विलायतेहून जाऊन आल्या व त्यांनीं परत आल्यावर एक रिफॉर्म्स् कॉन्फरन्स भरविली. यावर केसरीनें, आजीबाईंना घराची काळजी आहे व आजीबाई यात्रेहून परत आल्या व त्याच्या मामलाबद्दल ही परिषद त्यांनीं बोलावून असहकारितावाद्यांना शिव्या दिल्या, अशी टीका केली. या वेळीं बेझंटबाईनीं अशी एक अपूर्व शक्कल सुचविली कीं, पार्लमेंट जर सुधारणांचा कायदा बदलण्याला तयार नाहीं तर मध्यवर्ति सरकारानें आम्ही यापुढें आपखुषीनें कायदेकौन्सिलला जबाबदार राहूं असें जाहीर करून त्याप्रमाणें वर्तन करावें, म्हणजे

हिंदुस्थानला आपोआपच स्वराज्य मिळाल्यासारखें होईल. या सूचनेला केसरीनें ' मांजराच्या गळ्यांत घाट बांधण्याची युक्ति, ' ( ६-९-२१ ), असें नांव दिलें. घमेंडखोर समर्थांनीं राष्ट्रीय पक्षांत कौन्सिलांत काम करण्याची पात्रताच नाहीं असें म्हटलें, त्यावरहि केसरीनें टीका केली आहे.

सन १९२२ सालीं सप्रू लॉ-मेंबर असतांना सरकारनें गांधींना तुरुंगांत टाकलें. केसरी म्हणतो, ' सप्रू लॉ-मेंबर झाल्यापासून हिंदुस्थानांत जितकी कायदेबाज दडपशाही झाली आहे, तितकी राष्ट्रीय चळवळीच्या सबंध इतिहासांत कधींच झाली नाहीं. (४-७-२२). या गोष्टीचा व सर शंकरन् नायर यांच्या ' गांधी व अराजकता ' या पुस्तकाचा उल्लेख करून केसरीनें स्पष्टपणें प्रतिपादिलें कीं, ' महात्मा गांधींना पकडण्यास मवाळांची संमति होतीच. ' याच वर्षीं ना. शास्त्री यांची सरकारी खर्चानें वसाहतींतून सफर झाली. यावर केसरीनें वेळोवेळीं स्फुटें लिहून ' शास्त्रीबोवांचें देशाटन, ' ' शास्त्रीबोवांची दीन याचना, ' ' शास्त्रीबोवांचें पुराणवाचन, ' वगैरे मथळे देऊन त्या सफरीची विफलता दाखविली. असहकारितेबद्दल महाराष्ट्राचें जें विशिष्ट मत होतें, त्याबद्दल ' क्रॉनिकल 'नें वेडीवांकडी टीका केली. त्याला केसरीनें ' वाटग्या पत्राची टारगी टीका ' हा अग्रलेख लिहून उत्तर दिलें.

ज्ञानप्रकाशनें केळकरांवर दोन वेळां फारच वाईट व हलकटपणाची व्यक्तिविषयक टीका केली, तिला केसरीनें रोखठोक उत्तर दिलें. १९२२ सालीं एका यज्ञांत पशुहिंसा झाली असतां त्या यज्ञांत भाग घेणारे श्री. विरूपाक्षशास्त्री यांचा केळकरांनीं सत्कार केला यावर ज्ञानप्रकाशनें टीका केली. त्याला केसरीनें उत्तर दिलें कीं, ' मांसाशनाचीं अवदानें झोडणाऱ्या लोकांचा सत्कार करण्याचा प्रसंग प्रकाशकार व त्यांचे सगोत्रीय यांना नित्य येतो त्याची वाट काय ? ' १९२३ सालीं केळकर हे कन्याशाळेच्या वार्षिक समारंभाचे अध्यक्ष होते त्या वेळीं त्यांच्या भाषणावर ज्ञानप्रकाशनें टीका करण्याचा आव आणून असं म्हटलें कीं, वरातीला जसा कोतवाली घोडा हटकून असावयाचा तसे केळकर हे जेथें तेथें अध्यक्ष असावयाचेच. याला केसरीनें उत्तर दिलें कीं, ज्ञानप्रकाशकारांना रिकामपणामुळें अलोट फुरसद आहे, तरीहि लोक त्यांना अध्यक्ष करीत नाहींत त्याला कोणीं काय करावें ?

मॉंटेग्युसाहेबांना १९२२ सालीं स्टेट सेक्रेटरींची जागा सोडावी लागली व लॉर्ड पील स्टेट सेक्रेटरी झाले. त्यावर १९२२-२३ सालीं केसरीनें मवाळांची आई गेली, आधार तुटला व सावत्र आई येऊन तिनें मवाळांना खाऊच्या पुड्याच्या ऐवजीं थप्पड दिली अशी टीका केली. सप्रूंनीं लॉ-मेंबरच्या जागेचा राजीनामा दिला व सप्रू-बेझंट-शास्त्री यांनीं एक परिषद भरविली. याबद्दल केसरीनें लिहिलें कीं, गाजावाजा व लोचटपणा करूनहि ही परिषद ' बडा घर पोकळ वांसा ' अशी झाली. कारण सुधारणा कुचकामाच्या हें या शहाण्यांना कळावयाला तीन वर्षे जावीं लागलीं. मवाळांचें १९२३ चें फेडरेशन पुण्यांत सप्रूंचे अध्यक्षतेखालीं झालें, तें

गचाळ झालें व साम्राज्यप्रदर्शनावरच्या बहिष्काराचा शास्त्री यांचा ठराव विषय-नियामक कमिटींत पास होऊनहि उघड्या परिषदेंत येऊंहि शकला नाहीं असें केसरीनें दाखवून दिलें.

राष्ट्रीय पक्षानें कौन्सिलांवर बहिष्कार घातला, तोंपर्यंत मवाळांची चैन होती. पण स्वराज्य पक्ष स्थापन होऊन कौन्सिलांत शिरावयाचें ठरल्यानंतर ज्या निवडणुकी झाल्या त्यांत स्वराज्य पक्ष यशस्वी होऊन नेमस्तांनीं सपशेल मार खाल्ला. खुद्द शास्त्री यांनींहि अशी कबुली दिली कीं, प्रचंड संघटना, स्वार्थत्याग व दीर्घोद्योग या बाबतींत मवाळांनीं जहालांचें अनुकरण करावें. यानंतर मवाळांच्या ज्या परिषदा झाल्या त्यांवर टीका करितांना केसरी म्हणतो, ' मवाळ पक्षाच्या टीकेचा रोंख पूर्वी कौन्सिल-बहिष्कारवाद्यांवर असे, पण आतां तो स्वराज्य पक्षावर असतो.' ( २७-५-२४ ).

सन १९२८ सालीं टिळकमहाविद्यालयाविषयीं ज्ञानप्रकाशनें लिहितांना असें लिहिलें कीं, राष्ट्रीय शिक्षणसंस्थांचा कांहीं उपयोग नाहीं व त्या बंद करणेंच चांगलें. त्यावर केसरीनें योग्य उत्तर देऊन लिहिलें कीं, राष्ट्रीय शिक्षणसंस्थांमध्यें आज विद्यार्थी कमी आहेत म्हणून जर त्या बंद करावयाच्या तर त्याच न्यायानें ज्ञानप्रकाशला वर्गणीदार कमी आहेत म्हणून तें पत्र व त्या पत्रासारखीं इतर पत्रें त्यांच्या चालकांनीं कां बंद करूं नयेत ?

---

# हिंदुस्थानचें राजकीय ध्येय

[ डॉ. विष्णु महादेव भट, बी. ए., एम्. बी., बी. एस्. ]

राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या ध्येयरूपी रत्नाला केसरीनें आपल्या लेखांच्या साधनानें जे पैलू पाडले आहेत त्यांमुळें आज पन्नास वर्षांनीं त्यांची दीप्ति अधिकच खुलून दिसत आहे. केसरीच्या जन्मापूर्वी ह्या भरतखंडाची जी राजकीय दृष्ट्या स्थिति होती तिच्यापेक्षां आजच्या स्थितींत किती तरी अंतर पडलेलें आहे. त्या वेळचा हिंदु-स्थानच काय पण जवळ जवळ मवाळ पक्ष नामशेष होईपर्यंतचा हिंदुस्थान इंग्रजी राज्यपद्धतीचे गोडवे गात होता. आजचा हिंदुस्थान ह्या राज्यपद्धतीचा शेवट केव्हां होईल व हिंदी स्वराज्य कधीं स्थापन होईल यासाठीं जपमाळ घेऊन बसला आहे ! त्या वेळचा हिंदुस्थान आज लाहोरच्या राष्ट्रीय सभेंत स्वातंत्र्याची गर्जना करून स्वातंत्र्याचा झेंडा फडकवीत आहे ! आणि हिंदुस्थानांतील पुरुषवर्गच कांय पण स्त्रियाहि ' झेंडा उँचा रहे हमारा, ' ह्या गीतानें हिंदुस्थानांतलीं अनेक अझाद ( स्वतंत्र ) मैदानें दुमदुमवून अहमहमिकेनें तुरुंगाची वाट आनंदानें चालत आहेत ! हें स्थित्यंतर होण्याला ज्या अनेक राष्ट्रवीरांनीं आपले देह झिजवले, शिण-

वले आणि शेवटपर्यंत झगडून धारातीर्थींहि ठेवले त्यांत लो. टिळकांची प्रामुख्यानें आजचा इतिहास गणना करीत आहे. मित्रांनींच नव्हे तर प्रतिपक्षानेंहि हीच कबुली, रौलट कमिटीच्या मुखानें 'राजद्रोह कमिटी'च्या रिपोर्टांत ( Sedition Committee's Report मध्यें ) दिली आहे.

लो. टिळकांनीं ही जी क्रान्ति घडवून आणली, त्या क्रान्तीचें अनुपम साधन म्हणजे त्यांचा केसरीच होय. धुमसत असलेला ज्वालामुखी हा नेहमीं जसा लगतच्या प्रांतांलाच मधून मधून धक्के देऊन जागृत ठेवीत असतो, पण भडकला म्हणजे शेंकडों मैलांवरून प्रतीतीस येतो, त्याप्रमाणेंच केसरींतल्या लेखांनीं नेहमीं बृहन्महाराष्ट्रालाच धक्के वसत. पण १८९७, १९०८, १९१७, १९२२, या सालांतल्या त्याच्या धक्कयांनीं व ज्वालांनीं सबंध हिंदुस्थान त्यानें खडबडून जागें केलें होतें. लो. टिळकांनीं जें वळण, जें धोरण केसरीला घालून दिलें, त्यांनीं हिंदुस्थानचें राष्ट्रीय ध्येय 'स्वराज्य' हें जें ठरवून दिलें, त्या स्वराज्यप्राप्तीचीं आजच्या निःशस्त्र स्थितींत स्वदेशीबहिष्कारादि जीं साधनें ठरवून दिलीं, त्यांत रतिमात्र सुद्धां फरक न करतां त्यांच्या पश्चातहि केसरीच्या संपादकांनीं आपली जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडली आहे. इतकेंच नव्हे तर कौन्सिल-बहिष्काराच्या बाबतींत महाराष्ट्रानें आपलेंच म्हणणें देशबंधु दास, पंडित मोतीलाल नेहरू, श्रीयुत विठ्ठलभाई पटेल वगैरे पुढाऱ्यांच्या गळीं उतरविलें व स्वराज्यपक्षाची स्थापना गयेस घडवून आणली. येथें केसरीच्या ५० वर्षांच्या कामगिरीचें हिंदुस्थानच्या राष्ट्रीय ध्येयाच्या दृष्टीनेंच थोडक्यांत परीक्षण करावयाचें आहे. केसरीची कामगिरी म्हणजे अर्थात् तिच्या संपादकांचेंच कर्तृत्व होय. त्यांतहि लो. टिळकांचेंच कर्तृत्व विशेष. पण त्यांची कामगिरी अजमाविण्याला थोडासा पूर्वेतिहास पाहणें जरूर आहे. १८८१ सालीं जेव्हां केसरी निघाला त्यापूर्वी लो. टिळक व आगरकर यांचे काय विचार होते, हें **टिळक-चरित्राच्या** पहिल्या खंडांत (पृष्ठें ४४-४५) त्या मित्रद्वयाच्या संवादरूपानेंच दिलें आहे. 'पाश्चात्यांचें नांव काढतांच टिळक रागावत' आणि 'इंग्रज व मराठे समसमान दर्जाचे राजे' व 'मित्र' असावेत, ती स्थिति येईपर्यंत 'सर्व ठिकाणीं सरकारशीं झगडावें लागणार,' (पृ. ५०), असें ते म्हणत. या विचाराची मंडळी हिंदुस्थानचें राष्ट्रीय ध्येय काय ठरविणार हें सांगावयासच नको. पण फक्त टिळकांचेच त्या वेळेस हे विचार होते आणि इतर दूरदर्शी पुढाऱ्यांचे मुळींच नव्हते, असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. पण अशा विचारांचीं माणसें त्या वेळेस अर्थात् फारच थोडीं होतीं. स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं १८५७ सालीं जें युद्ध झालें त्यांतहि नानासाहेब पेशवे, तात्या टोपे व राणी लक्ष्मीबाई हे महाराष्ट्राचे पुढारीच प्रामुख्यानें होते. त्यानंतर वासुदेव बळवंत फडक्यांनीं १८७७ त तसलाच प्रयत्न केला. 'नानासाहेब पेशव्यानंतर ज्याचें नांव घेतांच इंग्रज कावरे-बावरे होत असा फडके हाच प्रथम झाला,' असें टिळक-चरित्रांत जें लिहिलें आहे,

तें सर्वस्वीं खरें आहे. स्वदेशीच्या कळकळीचा पहिला प्रयत्न सार्वजनिक काकांनीं १८७० त खादी स्वतः वापरून केला. त्यांनींच प्रथम त्या काळांत लवाद कोर्टें स्थापलें. १८८० सालांत 'देशाभिमानी कर्ते पुरुष निर्माण करणें हेंच या राष्ट्रीय शिक्षणाचें ध्येय' असणारें न्यू इंग्लिश स्कूल विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर वगैरे मंडळींनीं काढलें. शास्त्रीबुवांची 'निबंध-माला' ही 'आमच्या देशाची स्थिति' यासारखे आजहि सरकारास जाचणारे लेख तत्पूर्वींच प्रसिद्ध करीत होती. अशा ह्या विचारक्रांतीच्या काळांतच १८८१ सालीं या मंडळींच्या प्रयत्नानेंच केसरी जन्मास आला. या संक्षेपतः वर्णन केलेल्या पार्श्वभूमिकेवरून पाहिलें तर असल्या विचार-क्रांतीनंतर उच्चार-क्रांति आणि आचार-क्रांति होणें हें साहजिकच होतें. आणि तदनुसारच सरकारी नोकरीच्या भल्या मोठ्या पगाराच्या आमिषास न भुलतां दारिद्र्यांत राहण्याच्या संकल्प केलेल्या केसरीच्या जनकांनीं केसरीबरोबरच काढलेल्या न्यू इंग्लिश स्कूलच्या १८८३ च्या रिपोर्टांत लिहिल्याप्रमाणें 'हळू हळू पण शांततेची राज्यक्रांति' घडवून आणण्याचा निर्धार केला असावा हें कळतें.

पण हें लोकमान्य टिळकांसारख्या दूरदर्शी लोकांपुरतेंच ध्येय झालें. हें सर्व हिंदुस्थानचें राजकीय ध्येय कसें होणार ? कारण कीं, कर्तव्यताविमूढांचाच भरणा कोणत्याहि राष्ट्रांत अतिशय असतो आणि तदनुसारच गेल्या शतकार्धांत हिंदुस्थानांतील लोकस्थिति होती. १८८१ सालांत तर राष्ट्रीय सभाहि जन्मास आली नव्हती! महाराष्ट्रांतल्याच काय पण सर्व हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांस सुद्धां १८८५ पर्यंत राष्ट्रीय सभेची आवश्यकता वाटत नव्हती! राष्ट्रीय सभेचा जन्म झाल्यावर सात वर्षांनीं १८९२ मध्यें, तिच्या इंग्रज जनकानें—ह्यूमनें—जें एक पत्रक प्रसिद्ध केलें तें सुद्धां 'राजद्रोही' म्हणून अलाहाबाद व मुंबईच्या कॉंग्रेस कमिट्यांनीं प्रसिद्ध करण्याचें नाकारलें ! ( टिळकांचे लेख, खंड १, पृ. ४६ ). त्यानंतर प्रो. शिवरामपंत परांजपे ह्यांनीं त्यांच्या 'काळां'तून पूर्ण स्वातंत्र्याची तोफ जेव्हां डागली तेव्हां सर फेरोजशहा मेथासारख्यांनीं 'काळ पत्राचा निषेध करा' म्हणून १८९८ मध्यें केळकरांना कळविलें व तसें जर न कराल तर पुण्यावर मुंबईच्या पुढाऱ्यांची अवकृपा होईल असा धाक दाखविला. परंतु त्या वेळीं केळकरांनींहि त्यांना तितक्याच बाणेदारपणानें झिडकारिलें. बंगाल्यांतील कॉंग्रेस कमिट्यांनीं तर 'काळा'स कॉंग्रेसच्या जातींतूनच बहिष्कृत करणाचा ठराव केला. ( टिळकचरित्र, खंड २, भाग १, पृ. ११ ). १९०६ पर्यंत तर 'स्वराज्य' शब्द सुद्धां ध्येय म्हणून उच्चारावयास राष्ट्रीय सभा तयार नव्हती! दादाभाईनींच तें कॉंग्रेसच्या तोंडांत कोंबलें असें म्हटलें तरी हरकत नाहीं. कारण ह्या ध्येयाच्या प्राप्तीसाठीं जे साधनीभूत म्हणून ठराव झाले त्यांना हरताळ फासण्यासाठींच सुरतेस कॉंग्रेस भरविली होती.

लोकमताची ही अशी स्थिति १८८१ पासून १९०७ पर्यंत कशी होती हें दाखविण्यासाठींच हीं उदाहरणें दिलीं. अशा लोकमताला राष्ट्रीय वृत्तीचें वळण

लावून त्याला स्वराज्यप्रवण कसें करावयाचें हा प्रचंड प्रश्न त्या वेळच्या राष्ट्रीय वृत्तीच्या पुढाऱ्यांपुढें होता. तो केसरीनें पूर्वींच सोडविला होता. पण त्याला राष्ट्रीय वृत्ति रोजच्या राजकारणांत मुरवूनच लोकांच्या गळीं उतरविणें भाग होतें. लो. टिळकांनीं एका ठिकाणीं याबद्दल समर्पक दृष्टान्त दिला आहे. ते म्हणतात, ' बंडखोरीची ' बुद्धि हा राष्ट्रीय स्वातंत्र्याचा आत्मा खरा, तरी पण त्याला नित्य स्वरूपाच्या राज- ' कारणाच्या जड देहाचा आश्रय करावा लागतो. राजकारणाचें हें नित्यकर्म सहजच ' रूक्ष, नीरस, नाशवंत असें वाटतें. पण त्याचा आधार घेतल्याशिवाय बंडखोरी ही ' फळाला येत नाहीं. ' ( टिळकचरित्र, खंड ३ ). केसरीकारांना ' इंग्रज व हिंदी हे समसमान दर्जाचे राजे ' व्हावेत, ' धनी—नोकरांचें त्यांचें नातें राहूं नये, ' ही स्वराज्यपोषक वृत्ति लोकांच्या अंतःकरणांत वाढवावयाची होती. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या बालमूर्तीला जन्माला घातल्यानंतर तिला घातक राजकारणाचा थंडी-वारा लागूं नये, म्हणून तन्निवारणार्थ स्वदेशी बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण वगैरे अनुकूल उपायांचीं अंगडींटोपडीं घालणें केसरीकारांना अवश्य होतें. या धोरणाला अनु-सरूनच लोकमान्यांनीं १८८१ मध्यें बहिष्कारावर केसरीच्या ७ व्याच अंकांत लेख लिहिला. लोकपक्षाच्या बाजूनें अधिकाऱ्यांशीं अवश्य तेथें सामना करावयाचा, लोकपक्षाच्या न्याय्य हक्कांचें संरक्षण करावयाचें व संधि सांपडतांच ते वाढवून घ्यावयाचे, लोकपक्ष सुसंघटित करण्यासाठीं नवीन नवीन उपायांची योजना करा-वयाची, लोकांचें दारिद्र्य नष्ट कराण्याचे जे जे उपाय असतील ते ते लोकांना शिकवून त्यांना संपन्नतेचे मार्ग दाखवून द्यावयाचे, हें करितांना स्वार्थत्याग, तुरुंग-वास, हालअपेष्टा, दारिद्र्य, मानहानि वगैरे सर्व शारीरिक, मानसिक, संकटें स्वतः सोसावयाचीं व लोकांचा विश्वास संपादन करावयाचा, आणि त्यांना झेंपेल इतक्याच वेगानें त्यांना स्वराज्याच्या मुक्कामाकडे न्यावयाचें, या एकाच हेतूनें केसरींत लोकमान्यांनीं व त्यांच्या राजकीय वारसांनीं अनेक विषयांवर लेख लिहिले. कोल्हापूर प्रकरण, क्राफर्ड प्रकरण, संमती बिलाचा वाद, हिंदुमुसलमानांचे दंगे, गणपति आणि शिवाजी-उत्सव, दुष्काळनिवारणाची चळवळ, राष्ट्रीय सभेबद्दलचे वाद, मद्यपाननिषेध, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, होमरूल लीग, देशी उद्योग-धंद्यांची वाढ, असहकारिता, सत्याग्रह, अडवणूक, कौन्सिलबहिष्कार वगैरे नित्य-नैमित्तिक रीत्या हिंदी राजकारणांत उत्पन्न होणारे जे जे विषय पुढें आले, त्या सर्वांचा समाचार केसरीनें ह्या एकाच हेतूनें घेतला आहे. ही राज्यपद्धति शांततेच्या मार्गांनीं बदलून हिंदुस्थानांत जेणेंकरून हिंदी लोकांचेंच स्वराज्य होईल अशी पद्धति अस्तित्वांत आणणें हें जें हिंदुस्थानचें राजकीय ध्येय, त्याला अनुसरूनच केसरींतल्या लेखांचें धोरण असे. निःशस्त्र हिंदुस्थानला सशस्त्र इंग्रज सरकारशीं रणांगणावर दोन हात करून स्वातंत्र्य प्राप्त करून घेणें शक्य नाहीं, ह्याची केसरीस पूर्णपणें जाणीव असल्यानें निःशस्त्र प्रतिकाराचीं जीं जीं कायदेशीर साधनें उपलब्ध

असतील त्या सर्व साधनांचा उपयोग हिंदी लोकांनीं केला पाहिजे, हें केसरीनें हजारों वेळां लोकांच्या अंतःकरणावर बिंबविलें आहे. इच्छित स्वराज्य प्राप्त करून घेतांना निःशस्त्र साधनांपैकीं निर्वाणीचें अस्त्र म्हणजे ' अडवणूक ' होय. हें कित्येक वर्षांपूर्वींच केसरीनें प्रतिपादिलें आहे. ' तुमच्या कर्तबगारीवर जें राज्य चालतें तें ( तुम्ही, लोकांनीं, असहकारिता केल्यास ) कोठें तरी अडलेंच पाहिजे ' हें लोकमान्यांचें वचन; ' या कारभारांत आम्हांला कोठेंच स्थान नाहीं, कनिष्ठ दर्जाच्या जागा तेवढ्याच आमच्या, म्हणून सरकारवर दडपण घालावें, त्यांना थोडें चेपून पहावें असें आम्हांला वाटतें,' हे नेव्हिन्सनशीं बोलतांना त्यांचे निघालेले उद्गार, ' नव्या पक्षास सरकारास अडवण्याचा मार्ग देशांतील लोकांस शिकवावयाचा आहे, ' हें केसरींतलें वाक्य, ( ३-३-०८ ), किंवा लोकमान्यांच्या पश्चात् कायदेकौन्सिलांतल्या अडवणुकीबद्दल केसरीनें केलेला वारंवार पुरस्कार, हे सर्व एकाच हेतूचे गमक होते. मुळमुळीत व मिळमिळीत ध्येय किंवा साधनें ह्यांचा उच्चारहि केसरींत आढळावयाचा नाहीं. स्वराज्य शब्दालाच काय पण 'वंदे मातरम्' पदालाहि जेव्हां मवाळ भीत असत; बहिष्कार शब्द उच्चारल्याबरोबर जेव्हां ते घाबरे होत; अडवणूक, असहकारिता हे शब्द कानीं आल्याबरोबर जेव्हां ते यःपलाय करीत; तेव्हां, त्या काळीं, केसरीनेंच लोकांना स्वराज्याचा मंत्र शिकविला आणि केसरीनेंच स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, निःशस्त्र प्रतिकार, अडवणूक हे मार्ग लोकांना शिकविले. ' स्वावलंबन हेंच आमचें ब्रीदवाक्य राहणार. मग त्याकरितां कांहींहि सोसावें ' लागो. हिंदी लोकांच्या हिताकरितां आम्ही निर्वाणपदावर उभे राहण्याची तयारी ' केलेली आहे. तीन चार हजार लोकांना तुरुंगांत घालतांना सरकारला विचार ' करावा लागेल, जड जाईल. सत्याग्रहांतहि दडपशाहीच्या कायद्यापुरताच कटाक्ष ' आहे, ' हे आज महात्माजींच्या मुखांतून बाहेर पडणारे उद्गार महात्माजींच्या पूर्वीं कित्येक वर्षें अगोदर केसरीकारांनींच काढलेले आहेत. अलीकडचीं उदाहरणें हवीं असल्यास केसरींतलें ' संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय, ' ( ३-१-२८ ), अगर ' सोळा आणे स्वराज्य, ' ( २२-५-२८ ), हे लेख पहा. त्यांतहि बर्कनहेडच्या उद्धट साम्राज्यमदाला ' पूर्ण स्वातंत्र्य ' हें जें उत्तर कॉंग्रेसनें मद्रासला दिलें, त्याचा मोठ्या अभिमानानें पुरस्कार केला आहे. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळविणारच, ' हें ब्रीदवाक्य सर्व हिंदुस्थानाला शिकविणाऱ्या केसरीकारांनीं केसरींत हिंदुस्थानचें राजकीय ध्येय काय प्रतिपादित केलें असेल हें, खरें म्हटलें तर, सांगावयासच नको. तें स्वयंसिद्ध आहे. आणि गेल्या ५० वर्षांत त्याचेंच अनुसरण प्रत्येक केसरींत ह्या नाहीं त्यारूपानें होत गेलें आहे.

---

# मजूरपक्ष व हिंदुस्थान

[ डॉ. मोतीराम बाळकृष्ण वेलकर, एल्. एम्. अॅन्ड एस्. ]

हिंदी स्वराज्य आणि पार्लमेंटरी लेबरपार्टी यांची पक्की सांगड घालण्याचा प्रथम उपक्रम लोकमान्यांच्या प्रोत्साहनानें बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांनीं केला. त्यांनीं आपलें होमरूल बिल निश्चित स्वरूपांतच मजुरपक्षीय पुढाऱ्यांपुढें मांडिलें. पुढें आयर्लंडचा प्रश्न तहाचे रूपानें सोडविण्यांत आला. तत्पूर्वीच हिंदी स्वराज्याचे प्रश्नाबाबत हाच तहनाम्याचा मार्ग स्वीकारावा आणि राउंड टेबल परिषद् भरवूनच उभयपक्षीं निर्णय करावा, याहि गोष्टी त्यांनीं कायम करून टाकिल्या. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे पार्लमेंटरी लेबरपार्टीकडून हिंदी स्वराज्याचा प्रश्न हा त्यांनीं पक्षविषयक कार्यक्रमांत दाखल करून घेतला. मजूरपक्षाचे कार्यक्रमांत हें 'नवेंच उंटाचें पिल्लूं शिरलें' असे उद्गार त्या वेळीं लंडन टाइम्सनें काढिलेले केसरींत नमूद आहेत. तसेंच, मजूरपक्षाचे पुढारी मि. बेन स्पूर हे हिंदुस्थानांत आले होते, त्यांना मुंबापुरीच्या कामगारवर्गांनीं मानपत्र समर्पण केलें त्या प्रसंगीं, हिंदुस्थानाविषयीं मजूरपक्षाच्या मनांत किती हितबुद्धि वास करीत आहे याविषयीं ते म्हणाले, 'हिंदु-
'स्थानास स्वयंनिर्णय लागू करण्याबद्दल मजूरपक्षानें भाक दिली आहे. सध्यांचे
'ब्रिटिश पार्लमेंटांत मजूरपक्ष प्रबल नाहीं; परंतु पुढील निवडणुकींत तो जिंकील
'अशी आशा आहे.' ( २८-१२-२० ).

मजूरपक्ष अधिकारारूढ होतांच, तिकडे मध्यम व कनिष्ठ वर्गांना वाली भेटला, ही गोष्ट खरी. परंतु या मजूरपक्षाच्या अधिकारधारणामुळें आपल्याकडील मध्यम वा कनिष्ठ लोकांना कसलीच आशा बाळगण्याचें कारण नाहीं. ह्या गोष्टी स्पष्ट करितांना केसरी म्हणतो '......मजूरवर्गानें आपल्या इंग्लंडांतल्या गोरगरिबांची
'सँढर्स्ट कॉलेजांत वर्णी लाविली, तरी हिंदुस्थानांतला हा गरिबांचा मज्जाव कायमच
'राहणार. कारण 'परदुःखशीतल' हा न्याय मजूरपक्षालाहि लागू आहेच. असो.
'......इंग्लंडांतील मजुरांना फायदेशीर अशा सुधारणा आस्ते आस्ते होणार
'आहेत. परंतु हिंदुस्थाननें मात्र मजूरपक्षाकडून या देशाला कांहीं सवलती
'मिळतील अशी अपेक्षा करूं नये. 'अडवून घेतल्याशिवाय कोणी देत नाहीं,'
'हा न्याय जसा हुजूरपक्षाला तसाच मजूरपक्षाला लागू आहे हें विसरून चालावयाचें
'नाहीं.' ( ५-२-२४ ).

'मजूरपक्षांत हिंदुस्थानाविषयीं इतकी सहानभूति असेल असें म्हणवत नाहीं.
'तथापि दुसरा देश संपन्न व संतुष्ट राखल्यानेंच आपला व्यापार वाढतो हें जें मजूर-
'पक्षाचें तत्त्व आहे त्यास अनुसरून निदान स्वतःच्या स्वार्थाकरितां तरी हिंदुस्थान

' संतुष्ट व संपन्न करण्यासाठीं मजूरपक्षानें हिंदी जनतेला स्वयंनिर्णयाच्या मार्गानें आपले
' टप्पे ठरविण्यास मुभा द्यावी. ' ( १२-२-२४ ).

स्वराज्यपक्षीयांशीं मजूरपक्षानें तुटकपणें वागावें असा हुजूरपक्षाचा कटाक्ष. परंतु त्यांच्याशीं सहकार्यच करणें प्रशस्त, असाच उलट मजूरपक्षाचा अभिप्राय पडला ! याविषयीं केसरी लिहितो:—

' स्वराज्यपक्षीय चळवळ्यांशीं स्टेट सेक्रेटरीनें यत्किंचितहि संबंध ठेवूं नये असा
' हुजूरपक्षाचा कटाक्ष. पण लॉर्ड ऑलिव्हियर यांनीं मंत्रिमंडळातर्फे अधिकारयुक्त
' रीतीनें लॉर्ड पील यांस स्पष्ट बजावलें कीं, स्वराज्य व इतरपक्ष यांच्यांत असा भेदा-
' भेद करून स्वराज्यपक्षाला तेवढें अस्पृश्य मानावयाचें, हें धोरण मजूर सरकारास
' बिलकुल सम्मत नाहीं. उलट स्वराज्यपक्षीय पुढाऱ्यांशीं अधिकाधिक संबंध येऊन
' हिंदुस्थानांतील सद्यः परिस्थितीसंबंधीं विचारविनिमय व्हावा असेंच मंत्रिमंडळाचें
' धोरण आहे. स्वराज्यपक्षासारख्या उघड उघड विरोधी पक्षास मंत्रिमंडळानें मान्यता
' देणें याचा प्रत्यक्ष फायदा आज दाखवितां येण्यासारखा नसला, तरी ही मान्यता
' स्वराज्यपक्षानें केवळ आपल्या सामर्थ्याच्या जोरावर मिळविली असल्यामुळें त्यांतहि
' एक प्रकारचें महत्त्व नाहीं असें कोण म्हणेल ? ' ( १०-६-२४ ).

मजूरपक्षानें अधिकारपदावर पाय ठेविला म्हणून कांहीं हिंदवासीयांनीं मयूराप्रमाणें हर्षभरानें नाचावयास नको ! अधिकारसूत्रें हातीं धरून प्रत्यक्ष कार्यारंभाकरितां रॅम्से मॅक्डोनल्ड यांनीं मंत्रिमंडळाची जी निवड केली तीच कशी अनागत धोरणाची सूचक आहे. याविषयीं केसरी लिहितो:—'इंग्लंडचीं मर्मस्थानें दोन. एक हिंदुस्थान ' व दुसरें आरमार. '

'...या दोन जागा मॅक्डोनल्ड यांनीं मोठ्या कावेबाजपणानें भरल्या आहेत. भारत-
' मंत्र्याचे जागीं कर्नल वेजवुड यांची नेमणूक झाली असती तर इंग्लंडांतले कावळे
' ' काव काव ' करूं लागले असते. बरें लॉर्ड चेम्सफर्ड यांस ती जागा उघडपणें
' दिली असती, तर हिंदुस्थानांत गोंधळ उडाला असता. हा उघड निषेध टाळण्या-
' करतां तिसरेंच एक सर शोधून काढण्यांत आले.'

'भारतमंत्र्याचे जागीं कर्नल वेजवुड, हेंडरसन अगर बेनस्पूर यांसारखे हिंदुस्थानच्या
' कारभारांत लक्ष घालणारे व येथील स्थिति प्रत्यक्ष पाहून गेलेले न नेमतां, जमेका
' बेटांत गव्हर्नरचा अनियंत्रित कारभार चालविणारे भांडवलवाल्यांचे पुरस्कर्ते सर
' सिडने ऑलिव्हिअर यांची स्थापना झाली यावरून मजूर मंत्रिमंडळ स्वतःला जुन्या
' वचनांनीं बांधून घेऊं इच्छित नाहीं असें दिसतें. '

' प्रधानपदाधिष्ठित रॅम्से मॅक्डोनल्ड हे आतां आपल्या परिचयाचे पूर्वींचे उदार
' मतवादी गृहस्थ राहिले नाहींत, याची चुणूक त्यांनीं आपल्या एका मुलाखतींत
' प्रकट केलीच आहे. आम्ही देऊं तसे तसे हक्काचे तुकडे तुम्ही धीरानें घ्या. जर कां
' तुम्ही जबरीची भाषा बोलाल, तर याद राखून रहा. असल्या धमकीला आम्ही

‘ भीक चालणार नाहीं, असा बेमुर्वतखोर इशारा त्यांनीं आधींच देऊन टाकला
‘ आहे ! ’ ( २९-१-२४ ).

‘ ब्रिटिश पार्लमेंटमध्यें गेल्याचे मागील सोमवारीं हिंदुस्थानच्या परिस्थिती-संबंधीं वादविवाद झाला. हिंदी राजकारणाच्या या वाटाघाटींत रिफॉर्म कमेटीच्या प्रश्नावरहि भवति न.भवति झाली. तींत लॉर्ड ऑलिव्हिअर म्हणाले कीं, ‘ सध्यांच्या
‘ कायद्यान्वयें सुधारणांचें गाडें किती पुढें ढकलतां येईल तें तपासण्याकरितां एक
‘ कमेटी नेमिली आहे. तिला जर असें आढळून आलें कीं, सांप्रतच्या अॅक्टाचे
‘ निर्बंध ढिले केल्यावांचून राज्यकारभार सुरळीत चालू शकत नाहीं, तर मग ते
‘ निर्बंध ढिले कसे करावयाचे याचा विचार करणें अपरिहार्य ठरेल. तसें झाल्यास
‘ त्या कामासाठीं कमिशन नेमावें कीं काय आणि कमिशन नेमलेंच तर कमिशनला
‘ रिफॉर्म अॅक्टाची उलथापालथ करण्याइतपत फेरफार करावयास सांगावयाचें कीं
‘ काय याचा विचार त्या वेळीं पाहूं ! स्वराज्यपक्षानें मध्यप्रांत व बंगाल या इला-
‘ ख्यांतील राज्यकारभाराच्या मार्गांत जे कांटे पसरले आहेत, त्यांतून निसटण्यासाठीं
‘ राज्यशकटाचें तोंड फिरवून सोंपीव खात्यांच्या रस्त्यावरची गाडी राखीव खात्यांच्या
‘ मार्गावर आणून ठेवावयाची कीं काय याचा ऊहापोह होत असून गव्हर्नरानें तसें
‘ केल्यास त्याचें तें कृत्य कायद्याला सोडून होणार नाहीं, असाहि अभिप्राय भारत-
‘ मंत्र्यांनीं प्रकट केला. यावरून मजूरपक्षाचे मंत्री देखील अधिकारारूढ होतांच हुजूर
‘ पक्षाशीं कसें तादात्म्य पावतात तें दिसून आलें. मजूरपक्षाचें असें बेफिकिरीचें वर्तन
‘ पाहून ना. शास्त्रीप्रभृति शिष्ट निराश होऊन परत येण्यास निघाले.’ ( २९-७-२४ ).

१९२९ मध्यें मजूरवर्गाला पुन्हां अधिकारप्राप्ति झाली. या प्रसंगीं या मजूर-पक्षापासून प्रत्यक्ष लभ्यांश असो वा नसो, परंतु दुसरा कोणता बोध घेतां येईल याबद्दल केसरीनें लिहिलें आहे:

‘ ......हिंदवासीयांना ग्रेटब्रिटनमध्यें कोणताहि एक पक्ष अधिकारारूढ झाला तरी त्याची तादृश पर्वा नाहीं. तथापि चिकाटीनें व सनदशीर रीतीनें प्रयत्न केल्यास कालावधीनें कां होईना पण केवढी अधिकारक्रांति घडवून आणतां येते याचें हें प्रत्यक्ष उदाहरण पाहून मजूरपक्षाचें साश्चर्य कौतुक करावेंसें वाटतें. ’

एकंदरींत पार्लमेंटांत मजूरपक्ष काय किंवा हुजूरपक्ष काय, कोणताहि पक्ष अधिकारपदावर विराजमान झालेला असला तरी हिंदुस्थानानें आपल्याच सामुदायिक प्रयत्नांची शिकस्त करून स्वराज्य संपादन केलें पाहिजे, असें केसरीनें स्पष्टच म्हटलें आहे. दगडापेक्षां वीट मऊ, याच न्यायानें मजूरपक्ष थोडा बरा इतकेंच !

# देशी संस्थानें

[ प्रो. गणेश रघुनाथ अभ्यंकर, बी. ए., एलूएल्. बी. ]

केसरीच्या पहिल्या अंकांत वर्तमानपत्रावर लेख आला आहे व त्यांत वर्तमानपत्राच्या हेतूबद्दल जें मार्मिक विवेचन केलें आहे, त्यावरून संस्थानांची परिस्थिति केसरीच्या नजरेपुढें कशी होती हें दिसून येणार आहे. 'वर्तमानपत्रांचा 'एक मोठा उपयोग असा आहे कीं, त्यांनीं आपलें काम निःपक्षपातानें व 'निर्भीडपणानें बजावलें असतां सरकारी अधिकाऱ्यांवर मोठा दबदबा रहातो. 'रस्तोरस्तीं रात्रीं दिवे लागले असल्यानें व पोलिसांची गस्त सारखी फिरत असल्यानें 'जो उपयोग होतो, तोच ज्या त्या जागीं वर्तमानपत्रकर्त्यांची लेखणी सदोदित चालू 'असल्यानें होत असतो. सर्व गोष्टी सर्वांच्या समक्ष होत असल्या म्हणजे अर्थातच 'लांचलुचपत वगैरे जे अन्यायाचे प्रकार एऱ्हवीं होण्याचा संभव होत असतो, तो 'पुष्कळ अंशीं नाहींसा होतो. जुन्या एतद्देशीय संस्थानांतून वरील प्रकार किती चालत 'असे व अद्याप किती चालतो हें क्षणभर लक्षांत आणलें असतां, पत्रकर्त्यांची गस्त 'लोकांस किती हितावह आहे हें कोणाच्याहि लक्षांत आल्यावांचून राहणार 'नाहीं.' केसरीनें पन्नास वर्षांत वर्तमानपत्रकर्त्यांची गस्त देशी राज्यकारभारासंबंधीं डोळ्यांत तेल घालून अखंडपणें केली हें कोणासहि दिसून येईल. १८८१ च्या वेळीं संस्थानिकांबद्दल लोकांची वृत्ति हल्लींपेक्षां अगदीं भिन्न होती. संस्थानें अवशिष्ट वैभवाचीं स्मारकें आहेत. परकीय सत्तेच्या तडाख्यांतून शक्य त्या तऱ्हांनीं तीं रहावींत, निदान त्यांच्या नाशास स्वकीय वर्तमानपत्रकर्त्यांनीं कारणीभूत होऊं नये, ही इच्छा लोकांत बलवत्तर होती. त्यांच्या दोषांकडे डोळेझांक करून ममत्व दाखवून शक्य त्या रीतीनें त्यांच्या हक्कांची पायमल्ली होणार नाहीं व बेजबाबदार अधिकाऱ्यांचा त्रास त्यांना पोहोंचणार नाहीं अशी दक्षता महाराष्ट्रांतील ह्या प्रमुख पत्रानें आरंभापासून घेतली आहे.

कोल्हापूरच्या महाराजांना अत्यंत निर्दयपणानें वागविण्यांत येत असल्याबद्दल सर्व महाराष्ट्रांतील वर्तमानपत्रांत त्या वेळीं जोराचा हल्ला सुरू झाला होता. केसरीच्या तरुण संपादकांनाहि या संबंधाच्या हकीकती वाचून फार संताप वाटला व त्यांनींहि आपल्या पत्रांत ह्यासंबंधीं टीकात्मक मजकूर प्रसिद्ध केला (११-१०-८१). 'कोल्हापूरच्या छत्रपति महाराजांची सध्यांची अशी स्थिति आहे कीं, ती ऐकून पाषाण हृदयाच्या 'देखील काळजाला घरे पडतील. महाराजांचे प्राण जाऊन शव हातीं आल्यावर 'आमचे लॉर्डसाहेब जागृत होणार काय ? कोणत्याहि कारणानें छत्रपतींच्या जिवास 'अपाय झाला तर त्याचा कलंक बादशाही राणीच्या व तिच्या प्रतिनिधीच्या

'कपाळीं आल्याखेरीज राहणार नाहीं.' कोल्हापूरचे कारभारी रा. ब. बर्वे यांचे विरुद्ध कांहीं पत्रव्यवहार केसरींत प्रसिद्ध झाला व त्यामुळें अब्रुनुकसानीचा खटला होऊन संपादकांना एकशेंअकरा दिवस कारागृहवास भोगावा लागला व केसरी-पत्र सर्व महाराष्ट्राच्या अत्यंत आदरास पात्र झालें. केसरीचा जो अपूर्व लौकिक या पन्नास वर्षांत झाला आहे, त्याची मुहूर्त-मेढ या प्रकरणानेंच स्थापन केली, म्हणून केसरीबद्दल संस्थानी प्रजेस फार प्रेम व कळकळ वाटत असते. ता. २९ नोव्हेंबर, १८८१, सालीं केसरीनें खालील उद्गार काढले: 'कोल्हापुराएवढें संस्थान आणि 'त्यांत इतके दिवस एवढें खूळ माजून रहावें आणि चाबकाचा मार काय, 'छड्या काय, रंगमहालांतील लज्जास्पद व अधमाधमतेचा प्रकार काय, हे सर्व 'चालावेत आणि इंग्रजबहाद्दरांस त्याची खबरहि नसावी किंवा त्यांकडे एक-'सारखा कानाडोळा करण्यांत यावा, ही आमच्या सरकारच्या राजनीतीस व 'व्यवस्थेस अतिशय कालिमा आणणारी गोष्ट आहे. जें आमचें सरकार कैद्यांचे 'हाल होऊं नयेत म्हणून तजविजी करतें त्याच्या कानीं बिचाऱ्या छत्रपतींचा 'आक्रोश येतच नाहीं कीं काय ?'

ता. २२ जानेवारी, १८८४, रोजीं कोल्हापूरच्या हतभागी महाराजांचा अंत निर्दयपणानें व फार क्षोभजनक स्थितींत नगरच्या किल्ल्यांत झाला होता ! फार यासंबंधीं खालील उद्गार निघाले आहेत: 'आम्हांस तर या प्रकरणाचा इतका 'किळस आला आहे कीं, थोडा अन्याय शिक्षेवांचून जगांत राहिला तरी फिकीर 'नाहीं, पण त्या हतभागी राजाच्या संबंधानें या ग्रीनचें ( हा युरोपियन माणूस 'महाराजांवर रक्षक होता, त्यानें महाराजांस मारहाण केली व त्यायोगानें महाराजांची 'प्लीहा फुटून महाराज गतप्राण झाले असा हलकल्लोळ त्या वेळीं झाला होता ) 'नांव पुनःपुनः आमच्या कानीं येण्याचें टळेल तर फार नामी होईल. आतां जो 'दत्तक घ्यावयाचा तो बराच मोठा झालेला मुलगा घेतला म्हणजे तो बेडा आहे 'किंवा नाहीं, पुरुष आहे किंवा नाहीं, आई पाहिल्यावर चवताळतो आहे 'कीं नाही वगैरे गोष्टींची चिकित्सा करण्यास नीट होईल. थोडासा निबर 'पाहून घेतल्यास कांहींसा खाष्ट व अडाणी मिळेल खरा, पण मग त्याला घोड्याचे 'चाबूक खाण्याची किंवा वाढलेल्या प्लीहेवर दाब बसल्यामुळें डोळे पांढरे होऊन 'प्राणोत्क्रमण होऊं लागलें असतां तीर्थोदकांऐवजीं ग्रीनच्या हातची व्हिस्की 'पिण्याची पाळी येणार नाहीं. तें कसेंहि असो, परंतु २५ डिसेंबर, १८८३, ची ती 'काळरात्र, अहमदनगरच्या किल्ल्यांतील करवीरकर महाराजांचा तुरुंगवास, जवळ 'मायाममतेचें कोणी नाहीं अशा स्थितींत निराशेनें बेफाम झालेल्या अर्धवेड्या 'महाराजांचा संताप व त्यांचा ग्रीनसारख्या आडदांड धटिंगण सोजिराशीं मारा-'मारीचा प्रसंग, हा सर्व देखावा डोळ्यांपुढें आणला असतां मन अजूनहि कावरें-'बावरें व उदास होऊन जातें व महाराजांना निष्ठुरतेनें वागविण्यांत सद्बुद्धीनेंच पण

' जो दुराग्रह मुंबई सरकारनें दाखविला, तो लक्षांत घेतला असतां The way to ' hell is paved with good intentions ही इंग्रजी म्हण खरी आहे असें ' वाटूं लागतें. ' यानंतर सन १८९४ सालीं श्रीशाहू छत्रपति यांना अधिकार देण्यांत आले. सुमारें ६० वर्षांच्या कालांत आपल्या प्रभूच्या अंमलाखालीं रहाण्याचा प्रसंग करवीरच्या प्रजेस मुळींच नव्हता. १८३७ पासून कोल्हापूर ब्रिटिश सरकारच्या खास अंमलाखालीं असून त्यांत अर्वाचीन सुधारणा घडून आल्या होत्या. परंतु ' मराठी संस्थानच्या प्रजेचें अशा रीतींनीं परकीयांनीं कितीं ' जरी संगोपन केलें तरी बोर्डिंगांत घातलेल्या मुलांस केव्हांना केव्हां तरी ' आपल्या आईबापांची आठवण होऊन त्यांच्या दर्शनाकरितां तीं जशीं उत्सुक ' असतात, तशीच कोल्हापूरच्या प्रजेची या वेळीं स्थिति होती.' शाहूमहाराजांना इतकें व्यवस्थित असलेलें राज्य मिळालें, तथापि त्यांत त्यांस उत्तम ऑफिसरांची निवड करणें, लोकांना स्थानिक स्वराज्याचे हक्क देणें, धंदेशिक्षणाची वाढ करणें, प्राथमिक शिक्षणाचा फैलाव करणें व कोल्हापूरच्या मांडलिकांशीं देशकालानुरूप संबंध ठेवणें अशा पुष्कळ सुधारणा घडवून आणतां येण्यासारख्या आहेत व महाराजांनीं तिकडे लक्ष द्यावें असा उपदेश केला होता. कोल्हापूरचा जो अभिमान महाराष्ट्रीयांस वाटत आहे, त्याचें फार बहारीचें विवेचन ता. ३ एप्रिल, १८९४, रोजीं आलें आहे. ' गेल्या शतकांत आमच्या लोकांनीं जें हिंदु राज्य स्थापण्यास ' प्रारंभ केला, त्याचें एक मूळ हल्लीं करवीर क्षेत्रांतच काय तें राहिलें आहे. एवढें ' येथें सांगितलें म्हणजे या संस्थानची योग्यता आम्हांस विशेष कां वाटते व महा- ' राष्ट्रीयांस त्याच्या भरभराटीबद्दल इतकी कळकळ व अभिमान कां असावा याचें ' बीज कोणाच्याहि अगदीं सहजीं लक्षांत येईल. आपल्याकडील संस्थानिकांचीं ' हल्लींच्या काळांत कोणतीं कर्तव्यें आहेत, हें विस्तारानें सांगण्याची जरूरी नाहीं. ' हल्लींचा काल बदलला आहे खरा, तथापि सकल महाराष्ट्रीयांस अभिमाना- ' स्पद झालेल्या शिवछत्रपतींच्या वंशांतील पुरुषांनीं अद्यापहि आपल्या संस्थानां- ' तील प्रजेच्या, महाराष्ट्रीयांच्या, किंबहुना हिंदुस्थानवासी लोकांच्या कल्याणासाठीं ' पुष्कळ गोष्टी करण्यासारख्या आहेत. हिंदुत्वाचा योग्य अभिमान बाळगून त्याच्या ' अभ्युदयाकरितां निष्काम बुद्धीनें आपला देह झिजविणें हें कोल्हापूरच्या ' महाराजांचें कुलव्रत आहे. ' छत्रपतींच्या वंशजांसाठीं कारागृहवास सोसल्यानंतर बारा वर्षांनीं केसरीचे हे उद्गार आहेत. यानंतर बारा वर्षांनीं शाहूछत्रपति यांनीं सभाबंदीचा जाहीरनामा प्रसिद्ध केला, प्रतिनिधिसभेस बंदी केली व जाहीरनाम्यामध्यें संस्थानांत चळवळ करणारे लोकांचे पुढारी प्रजेचे व देशाचे शत्रु आहेत असा त्यांत उल्लेख केला ! त्यास अनुसरून, ( १८-६-०७ ), खालील उद्गार आढळून येतात. ' धिःकार असो या ' संस्थानिकांस कीं, जे आपणांस शिवाजीमहाराजांच्या वंशांतले म्हणून घेऊन अशा

' प्रकारें आमच्यांतील सुशिक्षित लोकांचा तिरस्कार करितात ! लॉर्ड मिंटो यांनीं
' बंगाल्यांत अशा तऱ्हेचा सभाबंदीचा हुकूम केला म्हणून त्याचें अनुकरण करून
' कोल्हापूरचें सरकार आपल्या दरबारांतील अनन्वित कृत्यांवरहि पांघरूण घालण्यास
' तयार झालें आहे! संस्थानांत राजकीय चळवळ करणारे लोक जे प्रयत्न करतात
' त्यांपासून गरीब राजनिष्ठ प्रजेचा बुद्धिभ्रंश होईल म्हणून कोल्हापूर दरबारास
' एवढी भीति वाटावी आणि प्रजेवर खुद्द दरबारकडून होत असलेल्या जुलुमाचा
' प्रतिकार करण्यास त्यांनीं काडीइतका देखील प्रयत्न करूं नये हें महाराजांचें
' किंवा देशाचें दुर्दैव होय. परंतु साहेबाच्या मागें री ओढणें हें क्षत्रियकुलावतंसाचें
' हल्लींचें ब्रीद झाल्यानें आमच्या संस्थानिकांकडून अकलेचे तारे तुटूं लागले आहेत
' व हा सर्व प्रकार किळसवाणा आहे.'

कोल्हापूर राजकन्येच्या विवाहसमयीं मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क यांनीं एक मोठें भाषण केलें व त्यांत असें म्हटलें कीं, ' संस्थानिक हे सार्वभौम सरकारचे पूर्ण राजनिष्ठ मांडलिक असून त्यांचें स्वातंत्र्य, अधिकार व दर्जा हीं कायम राखणें किंबहुना हल्लींपेक्षां जास्त वाढविणें हें ब्रिटिश सरकारचें कर्तव्य आहे व हें करण्यास इंग्रज सरकार तयार आहे.' यासंबंधीं केसरीची टीका अशी:—
' एकतंत्री, अनियंत्रित व जुलुमी राजसत्ता राष्ट्राचे प्रगतीस अपायकारक असून देशास
' स्वराज्य—प्रजेच्या मतानें चालणारें राज्य—मिळाल्याखेरीज देशोन्नति होणार नाहीं हें
' राजकीय तत्त्व सर्वांचे अंतःकरणांत बिंबावयास लागलें असतां वरच्यासारख्या
( साहेबाच्या ) विधानानें लोक आतां फसावयाचे नाहींत. ' ( ३१-३-०८ ).
पुढें ( १७-५-२१ ), ' आमचे स्वराज्यद्रोही छत्रपति ' या लेखामध्यें केसरीनें शाहू छत्रपतींच्या कुटिल कारस्थानांचा तीव्र निषेध केला आहे.

सन १८८७ सालीं अल्पवयस्क शिंदे सरकारच्या गंगाजळींतून फरशी फोडून तीन कोटी रुपये इंग्रज सरकारनें कर्ज काढिलें. या वर्तनाबद्दल केसरीनें तीव्र निषेध व्यक्त केला. ' एकवार अशा प्रकारचा प्रघात पडला तर संस्थानांत पैसा
' शिल्लक राहण्याचा मुळींच संभव नाहीं व लोकोपयोगी कार्य करण्यास कोणतेंहि
' साधन उरणार नाहीं. परचक्रापासून आपलें संरक्षण करून घेण्यासाठीं नेटिव्ह संस्था-
' निकांनीं एकदां धिप्पाड मुलूख तोडून दिला असतां आतां त्यांच्या कुणग्यांवर डोळा
' कशासाठीं ?' ज्युबिलीच्या निमित्तानें होळकरसरकार विलायतेस गेले होते, परंतु तेथें योग्य सन्मान व त्यांना चार घोड्यांच्या गाडींतून फिरतां आलें नाहीं व लंडनमधील राजवाड्यापुढें उतरून पायीं चालत जावें लागलें अशाबद्दल केसरीनें नापसंती व्यक्त केली आहे. भोपाळच्या एजंटसाहेबांनीं असा हुकूम फर्मावला कीं, ' बेगमसाहेबांच्या भ्रतारांनीं त्यांचे पासून दूर राहिलें पाहिजे. नबाबसाहेबांस संस्थानांतून हद्दपार करावें, ही गोष्ट बेगमसाहेबांस मान्य नसेल तर भोपाळांत राहिले असतील तर त्यांनीं निराळे महालांत राहिलें पाहिजे. बेगमसाहेबांनीं त्यांची गांठ घेऊं नये. घेतली असतां इंग्रज

सरकारची मर्जी त्यांचेवर खप्पा होईल. ' हे एजंट सर लिपेल ग्रिफिथ हे होत. त्यांनीं बेगमसाहेबांस आपल्या नवऱ्याकडील दिवाणगिरी काढावयास लाविली व ती आपल्या मोहबतींतल्या युरोपियन अंमलदाराकडे देवविली. या तऱ्हेचा जुलूम इंग्रजांच्या कीर्तीस लांछनास्पद आहे व नेटिव्ह राजांनीं युरोपियन कामगारास कां आश्रय द्यावा ? असें केसरीनें विचारलें आहे. १८८८ सालीं वर्तमानपत्रांत एक वाद चालू होता, त्याचा मथितार्थ इतकाच होता कीं, इंग्रज सरकारास सार्वभौमत्व मिळाल्यापासून इतर राजे आपल्या पूर्वींच्या बरोबरीच्या पदावरून ढासळून कांहीं अंशीं खालच्या पायरीवर उतरल्याचा भास होतो.

संस्थानिकांना दत्तकाची परवानगी १८६० सालीं देण्यांत आली. परंतु त्याचा एक विचित्र अर्थ १८९२ सालीं करण्यांत आला. दत्तकाच्या सनदांत ' तुमच्या दत्तक पुत्राकडे तुमची गादी अगर जहागीर चालविली जाईल ' असें स्पष्ट आश्वासन आहे. परंतु तुमचा दत्तक पुत्र म्हणजे तुम्ही स्वतः घेतलेला दत्तक पुत्र. संस्थानिकांच्या मागें त्यांच्या विधवेनें घेतलेल्या दत्तकाकडे गादी चालविण्याचें सरकारनें अभिवचन दिलें नाहीं. हा अर्थ अगदीं अन्यायाचा आहे व जरी त्या बाबतींत एखाद्या संस्थानांतच असा प्रश्न उत्पन्न झाला असला तरी ही बाब सर्व संस्थानिकांच्या हिताची असल्यामुळें त्यासंबंधीं पार्लमेंटपर्यंत संस्थानिकांनीं दाद लावून घ्यावी असें केसरीनें सुचविलें.

भरतपूरच्या महाराजांना १८९५ सालीं पदच्युत करण्यांत आलें व पार्लमेंटांत झालेल्या वादविवादांत असें सांगण्यांत आलें कीं, महाराज आपला राज्याधिकार चालविण्यास नालायक असल्याचें दिसून आल्यावरून त्यांस पदच्युत करण्यांत आलें आहे. महाराजांविरुद्ध त्यांचे प्रजेनें गिल्ला केला नव्हता. पोलिटिकल अधिकाऱ्यांनीं महाराजांची नालायकी ठरवून त्यांचे विरुद्ध गिल्ला केला. परंतु सरकारचें हें वर्तन तहनामे व करार यांविरुद्ध दिसतें. सरकारनें या बाबतींतील कागदपत्र प्रसिद्ध करावे, तसें न केल्यास या बाबतींत अन्याय झाला आहे, असें लोकमत ठरल्यास त्याचा दोष सरकारवरच आहे, असें केसरीनें बजाविलें. याच सुमारास झालावाड संस्थानच्या अधिपतींस पदच्युत करण्यांत आलें. या बाबतींत केसरीन म्हटलें आहे कीं, एकाद्या राजास पदच्युत करण्याचा जेव्हां प्रसंग येतो तेव्हां त्याच्या अपराधाची उघडपणें चौकशी होऊन मग काय तो निकाल सरकारनें करावा. हिंदुस्थानांतील सामान्य मनुष्यास सुद्धां चौकशीशिवाय दोषी ठरवितां येत नाहीं. मग केवळ पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या गुप्त शिफारशीवरून संस्थानिकांस पदच्युत करणें फार अन्यायाचें आहे. या बाबतींत मॉर्नींग पोस्ट या पत्रांत एक चमत्कारिक कारण प्रसिद्ध झालें होतें. महाराणीचे नातू ऑल्बर्ट व्हिक्टर यांचें स्मारक करण्याचा एक बूट निघाला. पुष्कळ संस्थानिकांनीं त्यास वर्गणी दिली. परंतु झालावाडच्या महाराजांनीं

पैसे देण्याचें नाकारलें व हा भयंकर गुन्हा फॉरेन ऑफिसच्या कानावर गेल्यावर महाराजांना पदच्युत करण्याची कारवाई निघाली असें ध्वनित केलें आहे. बंगाल्यांतील राजकुमार कॉलेजच्या हॅरि डे नांवाच्या प्रिन्सिपॉलनें त्याच्या शाळेंतील दोन राजपुत्र एके दिवशीं घोड्यांवरून फिरत जात असतां त्यांनीं साहेबमहाशयांस सलाम केला नाहीं, म्हणून त्यांस चाबकानें मारल्याची चमत्कारिक हकीकत आली होती.

पन्ना संस्थानचे महाराज माधवसिंग यांनीं आपला चुलता खामनसिंग याचा खून करविला असें लॉर्ड कर्झन यांस १९०१ सालीं आढळून आल्यावरून त्यांनीं महाराजांना गादीवरून काढून संस्थानचा कारभार आपले हातीं घेतला व या प्रकरणाची चौकशी करण्याकरतां एक कामिशन नेमण्यांत आलें. या बाबतींत केसरीनें केलेल्या सूचना विचार करण्यासारख्या आहेत. अशा कामिशनमध्यें मल्हारराव गायकवाड यांच्या संबंधीं नेमलेल्या कमिशनमध्यें जसे एतद्देशीय लोक नेमण्यांत आले होते तसे यांत नेमले पाहिजेत; इंग्लंडमध्यें एकाद्या लॉर्डानें जर गुन्हा केला तर त्याची चौकशी त्याच्या बरोबरीच्या लॉर्डांकडून व्हावी असा नियम आहे. त्याच प्रकारचा नियम संस्थानिकांचे बाबतींत होणें अगदीं अवश्य आहे. महाराजांना आपला बचाव करण्यासाठीं पैशाची टंचाई पडली व महाराजांनीं हिंदुस्थान सरकारकडे मागणी केली असतां आपल्या ताब्यांत असलेले हिरेमाणकें वगैरे संस्थानच्या मालकीचे जिन्नस महाराज सरकारचे हवालीं करण्यास तयार असतील तर त्यांस पैशाची मदत होईल असें त्यांस सांगण्यांत आलें. परंतु महाराजांनीं ही शर्त कबूल केली नाहीं.

सन १९०३ च्या दिल्लीच्या दरबाराबद्दल अग्रलेखांत केसरीनें सूचना केली कीं, संस्थानिकांची हल्लींच्या राज्यव्यवस्थेंत जेणेंकरून अधिक चांगला उपयोग करून घेतां येईल, अशी कांहीं तरी व्यवस्था करणें अवश्य आहे. दरबारसारख्या महोत्सवाचे वेळीं मांडलिक संस्थानिकांना गोळा करून आपल्या वैभवाचें प्रदर्शन करणें यांत मोठीशी कर्तबगारी नाहीं. परंतु संस्थानिकांना सार्वभौम सरकारच्या पदरचे सरदार या नात्यानें कर्तृत्वाची कांहीं तरी संधि ठेविली पाहिजे व देशांतील पुढारीपणा त्यांचेकडे राहील असा मार्ग काढला पाहिजे. याच सालीं श्रीमंत होळकर यांनीं राज्यसंन्यास केल्याचा मजकूर प्रसिद्ध झाला आहे. परंतु बाळासाहेब होळकर यांनीं खुषीनें राजीनामा दिला कीं काय हा महत्त्वाचा प्रश्न आहे. यासंबंधीं 'राजीनामा का बडतर्फी' असा सवाल केसरीनें केला. बाळासाहेब होळकर यांची कारकीर्द लोकांस प्रिय किंवा अप्रिय झाली हा प्रश्न नसून इंग्रज सरकारास एखाद्या संस्थानिकास बडतर्फ करतां येईल कीं काय ? इंदूरकरांस राज्यसंन्यास करावयाचा होता तर तो त्यांस अन्य उत्तम मार्गानें करतां आला असता. आपल्या मर्जीप्रमाणें आपल्या मुलांस शिक्षण देऊन त्यांस योग्य सल्लागार देऊन त्यांस मग हरी हरी म्हणत बसतां आलें असतें. परंतु या राजीनाम्याच्या बाबतींत अगदीं विपरीत स्थिति झाला आहे. राज्यकारभार इंग्रज सरकारनें आपल्या

हातांत घेतला आहे. अल्पवयी होळकरांस आपल्या ताब्यांत घेऊन आपल्या मर्जी-प्रमाणें त्यांस शिक्षण देण्यांत येणार आहे. या सर्व प्रकारांवरून हा राजीनामा खुषीचा नसून आपल्या विरुद्ध झालेल्या कागाळ्यांमुळें वैतागून जाऊन त्यांनीं तो दिला असावा व यांत खुषीपेक्षां सक्तीचा भाग अधिक असावा. या उदाहरणामुळें संस्थानिकांच्या हक्कांवर मोठी गदा येणार आहे.

सन १९०३ सालीं लॉर्ड कर्झन ग्वाल्हेरीस दौऱ्यावर जाणार होते त्यांचा हेतु महा-राजांनीं सर्व राज्यकारभाराचें ओझें आपल्या अंगावर न घेतां कारभारी नेमून त्यांजकडे तें सोपवावें, तसेंच आग्रा-मथुरा प्रांत घेऊन त्याच्या मोबदला उज्जन सरसुभा इंग्रज सरकारकडे द्यावा अशा तऱ्हेची कारवाई करण्याचा होता असें केसरींत प्रसिद्ध झालें होतें. तसेंच लॉर्ड कर्झन यांचा काश्मीरास जाण्याचा हेतु असा होता कीं, सरहद्दीच्या संबंधांत सुरक्षितपणा आणण्यासाठीं काश्मीर प्रांत घेऊन दुसरा एकादा प्रांत महाराजांस मोबदला द्यावा. कर्झन यांनीं वऱ्हाडचा कायमचा पट्टा याच सुमारास कसा मिळविला हें ज्यांना माहीत असेल त्यांना ग्वाल्हेर व काश्मीरमधील इंग्रजांच्या कारस्थानाबद्दल भीति वाटल्यास त्यांत आश्चर्य मानण्याजोगें कांहीं नव्हतें. याच सालीं सांगलीचे अधिपति श्रीमंत तात्यासाहेब कैलासवासी झाल्यामुळें संस्थानचा वारसा हल्लींचे आप्पासाहेब यांजकडे जाणें न्याय्य आहे, असें जोराचें समर्थन केसरीनें केलें.

सन १९०५ सालीं देशी संस्थानें व त्यांचीं सैन्यें यांबद्दल तीन सुंदर अग्रलेख आले आहेत. 'देशी संस्थानिकांचीं सैन्यें कशीं हतबल केलीं आहेत, या सैन्यांची 'संख्या कमी करण्याची जी कारवाई चालविली आहे, या सैन्याला कोणतेंहि लष्करी 'शिक्षण न मिळण्याची जी दक्षता घेण्यांत येत आहे व उत्तम शस्त्रास्त्रांचा 'पुरवठाहि अशा सैन्याला होऊं नये याबद्दल जे निर्बंध घालण्यांत येत आहेत व हीं 'सैन्यें म्हणजे निव्वळ निर्माल्यवत् मातीच्या बाहुल्यांसारखीं कशीं झालीं आहेत व 'या मार्गानें संस्थानिकांना हतबल करून पुन्हां त्यांच्यावर पैशाचें ओझें घालून व 'पूर्वीं संस्थानिकांच्या संरक्षणाकरतां घेतलेला मुलूख, खंडण्या व इतर आर्थिक फायदे 'हीं सर्व वशाखालीं पचवून इम्पीरियल सर्व्हिस ट्रूप ही टूम निव्वळ संस्थानिकांची 'फसवणूक करण्याकरतां कशी काढिली आहे,' याचें यांत फार समर्पक विवेचन केलें आहे. 'संस्थानिकांना लष्करांत मोठमोठ्या हुद्द्यांच्या जागा देऊन किंवा साम्राज्यांत 'त्यांना कर्तबगारी दाखविण्यास अवसर ठेवून व त्यांचीं सैन्यें लढाईच्या प्रसंगीं 'कार्यक्षम होतील अशी व्यवस्था करून संस्थानिकांना प्रामाणिकपणानें व सहानु-'भूतीनें मदत केल्यास हीं सैन्यें ठेवल्याचें चीज होईल. नाहीं तर या कामीं खर्च 'होणारा पैसा अनाठायीं होय.'

श्रीमंत नानासाहेब पंतप्रतिनिधि यांच्याबद्दल कमिशन १९०७ सालीं नेमण्यांत आलें त्यासंबंधीं केसरीनें लिहिलें कीं, संस्थानचे कारभारी मि. जेकब बापूजी यांना विषप्रयोग केल्याच्या तोहमतीची चौकशी या कमिशननें व्हावयाची

होती; परंतु या कमिशनच्या कायदेशीरपणाबद्दल असा सवाल करण्यांत येत आहे कीं, जेकब बापूजी हे संस्थानचे नोकर होते. ते ब्रिटिश सरकारचे नोकर या नात्यानें काम करीत नव्हते; त्यांनीं आपली दाद संस्थानच्या कोर्टांत मागावयास पाहिजे होती. बरें, कदाचित् कमिशन नेमण्याचेंच ठरलें तरी संस्थानचे अधिपति व जेकब बापूजी यांना सामान्य पक्षकारांप्रमाणें आपापल्या बाजूचें समर्थन करण्यास संधि द्यावयास पाहिजे होती. परंतु सरकारनें जेकब बापूजी यांचे अधिकार कायम ठेवून आपल्या अंगाखालीं घातलें आहे व फिर्यादीची सर्व जबाबदारी आपल्या माथीं घेतली आहे. इतकेंच नव्हे तर उलट नानासाहेब यांचे अधिकार काढून घेतले आहेत. त्यांना संस्थानांत जाण्याची बंदी केली आहे, त्यांना आपला पुरावा गोळा करण्यास लागणाऱ्या साधनांची व द्रव्याची कमतरता पाडली आहे, हा सर्व प्रकार एक प्रकारें पक्षपाताचा आहे. या कमिशनचा निकाल लागून नानासाहेब यांस पदच्युत करून पांच वर्षेंपर्यंत काळ्यापाण्याची शिक्षा देण्यांत आली. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांचे मनास तरी या निकालानें पूर्ण धक्का बसून त्यांचीं अंतःकरणें इंग्रजी पद्धतीबद्दल साशंक आणि असंतुष्ट झाल्यावांचून राहणार नाहींत. पिऱ्या मांगासारख्या बदमाषाच्या व नोकराच्या मुठींत आपली इज्जत, वैभव किंबहुना सर्वस्व आहे असा जो या प्रकरणाचा इत्यर्थ, त्यानें या संस्थानिकांचीं मनें ग्रस्त न झाल्यास त्यांची पशूंत गणना केली पाहिजे. आम्हांस तर असें साफ वाटतें कीं, केवळ एका आर्थरसाहेबाची म्हणजे एका गोऱ्या अधिकाऱ्याची इज्जत कायम टेवण्याकरितां या प्रकरणाचा असा विपरीत परिणाम लागला आहे. ( २४-९-०७ ). धार येथील कांहीं लोकांनीं शिवाजी-उत्सव केल्याबद्दल त्यांस संस्थानिक व पोलिटिकल एजंट या दोघांनीं शिक्षा केली. त्यासंबंधानें असें म्हटलें कीं, ' शिवाजीमहाराजांनीं स्वातंत्र्याचा झेंडा उभारण्यापूर्वीं कित्येक शतकें म्हणजे भोजराजाचे वेळीं धारानगर हें हिंदुस्थानांतील स्वराज्याचें मुख्य पीठ होतें. अशा पवित्र ठिकाणीं मराठी संस्थानिकांच्या अंमलांत शिवाजीमहाराजांचा उत्सव करणाऱ्याचा छळ व्हावा ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय. '

औंधचे श्रीमंत नानासाहेब यांचे बाबतींत अखेरच्या सरकारच्या ठरावाबद्दल उल्लेख करण्यांत आला आहे. 'पांच वर्षें शिक्षेची मुदत पुरी होण्यापूर्वींच व त्यांचे शिक्षेच्या
' कालांतील वर्तन चांगलें असल्याचें निदर्शनास आलें असूनहि त्यांचा गादीवरील हक्क
' कायमचा नाहींसा केला आहे. त्यांच्या जागीं त्यांच्या धाकट्या बंधूंचा हक्क असतांहि
' त्यांचे चुलते श्रीमंत बाळासाहेब यांजकडे गादी देण्यांत येत आहे. श्रीमंत बाळासाहेब
' हे शिक्षण, सौजन्य, विवेक, शिस्त इत्यादि गुणांत प्रतिनिधि घराण्यांतील सांप्रतच्या
' कुठल्याहि पुरुषांपेक्षां श्रेष्ठ आहेत यांत शंका नाहीं, व त्यांना गादी मिळाली
' ही गोष्ट चांगली झाली हेंहि खरें आहे. परंतु संस्थानचा वारसा ठरविण्याच्या
' बाबतींत हक्क वगैरेंचा असा चुराडा होणें हें व्यापक अशा राजनीतीच्या दृष्टीनें
' अत्यंत अनिष्ट होय व हें अनिष्ट धोरण असेंच चालावयाचें असेल तर संस्थानिक

' म्हणजे खालसांतील निव्वळ मामलेदार किंवा डि. डे. कलेक्टर यांच्या दर्जाचा ' एक सरकारी नोकर झाला असेंच म्हणण्याची पाळी येईल.' ( २१-९-०९ ).

सन १९१० सालीं लॉर्ड मिंटो यांनीं खालसांतील राजद्रोहाची चळवळ चालू आहे तिचें निर्मूलन कसें करावें व ह्या चळवळीचा शिरकाव संस्थानांत न होण्याकरतां काय उपाय करावेत ह्यासंबंधीं संस्थानिकांचीं मतें मागविलीं. तेव्हां केसरीनें असा सवाल केला कीं, खालसा मुलखाच्या राज्यकारभाराच्या बाबीं-संबंधानें संस्थानिकांचे अभिप्राय व सल्ला घेण्याची जी रीत लॉर्ड मिंटो यांनीं पाडली आहे ती अनेक दृष्टींनीं फार अपायकारक व चुकीची आहे. संस्थानांच्या कारभारावर व संस्थानिकांच्या राजकीय वर्तनावर खालसांतील लोकांनीं टीका करूं नये व संस्थानी रयतेनेंहि खालसांतील रयतेच्या या बाबीचे भानगडींत पडूं नये असें जर सरकारचें सामान्य धोरण आहे तर संस्थानिकांचें तरी मत कां घ्यावें हें समजत नाहीं. त्यांचें असें मत सरकारास घेणें इष्ट वाटत असेल तर संस्थानिकांच्या बऱ्यावाईट वर्तनावर, संस्थानी कारभारावर, विशेषतः त्यांच्या या मतांवर स्पष्ट निर्भय टीका करण्याचा अधिकार खालसा रयतेसहि असावयास नको काय ?

सन १९१६च्या नोव्हेंबरमध्यें दिल्ली येथें संस्थानी परिषद भरली त्यांत संस्था-निकांची एक सभा असावी यासंबंधीं मागणी केली होती. याबद्दल लिहितांना हल्लींची संस्थानिकांची स्थिति किती शोचनीय आहे याचें उत्कृष्ट वर्णन केसरीनें केलें. हल्लीं प्रत्येक संस्थानाचा संबंध पोलिटिकल खात्याशीं असल्यामुळें व समवायानें कोणतेंहि काम करण्याची संस्थानिकांना मुभा नसल्यामुळें संस्थानिकांचें पुष्कळ नुकसान होत आहे. संस्थानांतील अंतर्गत कारभारांत ब्रिटिश सरकारास जरी हात घालतां येत नाहीं ही गोष्ट तत्त्वतः खरी असली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत ती खरी नाहीं. गैरकारभार याची व्याख्या व केव्हां हात घालावा किंवा केव्हां घालूं नये याबद्दल व्यवस्था झाली पाहिजे. संस्थानिक जरी स्वतंत्रप्राय दिसतात तथापि त्यांची स्थिति सामान्य ब्रिटिश प्रजाजनांपेक्षांहि अडचणीची आहे. संस्थानिकांस कोण-त्याहि एकाद्या बाबतींत अन्याय किंवा त्रास झाल्यास त्याची दाद लागणें मुश्की-लीचें असतें. खुद्द सरकार म्हणजे गव्हर्नर किंवा गव्हर्नर जनरल हेंच त्यांचें वरिष्ठ न्यायकोर्ट. त्या न्यायकोर्टाचीं सर्व द्वारें पोलिसखात्याच्या हातीं ! ब्रिटिश मुलखांत प्रजेच्या कारभाराविषयीं कायदे कौंसिलांतून चर्चा होऊं शकते व वर्तमानपत्रद्वारां लोकमताचा पाठिंबा मिळूं शकतो. रेसिडेंट अगर पो. एजंट यांनीं एखादी गोष्ट म्हटली व ती संस्थानिकांनीं न ऐकली तर त्याबद्दल तो अधिकारी बदलून जाई-पर्यंत त्यांस गुप्त छळ सोसावा लागतो. वर्तमानपत्रद्वारां त्यांना आपलें दुःख वेशीवर टांगतां येत नाहीं किंवा बरोबरीच्या संस्थानिकांमध्यें त्याची चर्चा करितां येत नाहीं.

सन १९२६ सालीं वऱ्हाडसंबंधीं लॉर्ड रेडिंग यांनीं अखेरचा निकाल केला. संस्थानच्या अंतर्गत कारभारांत हात घालून संस्थानांतील प्रजेची सुस्थिति ठेवण्याचा

सार्वभौम सरकारचा हक्क आहे असें जें त्यांत नमूद केलें आहे त्यासंबंधीं खालील उद्गार केसरीनें काढले आहेतः—‘ लॉर्ड रेडिंग यांनीं ब्रिटिश राज्यसत्तेच्या या हक्काचा ‘ स्पष्टपणें खुलासा केला, हें संस्थानी प्रजेच्या दृष्टीनें फार चांगलें झालें असें ‘ आम्हांस वाटतें. ब्रिटिश सरकारचा हा हक्क अमान्य केला तर संस्थानिकांच्या ‘ जुलुमाविरुद्ध संस्थानी रयतेस परमेश्वराखेरीज दुसरें कोणतेंच अपील-कोर्ट शिल्लक ‘ राहणार नाहीं. पण संस्थानी प्रजेची तक्रार इतकीच कीं, वरिष्ठ सरकारच्या ‘ हक्काचा उपयोग प्रजेच्या कल्याणाच्या दृष्टीनं क्वचितच होतो. प्रजेच्या नांवावर ‘ सरकारचे अंतस्थ राजकीय हेतु सिद्धीस नेण्याकरितांच या हक्काचा वारंवार उपयोग ‘ करण्यांत आला आहे. ’

राणीच्या ज्युबिलीसाठीं पुष्कळ संस्थानिक इंग्लंडच्या महायात्रेस गेले तेव्हां केसरी म्हणतो, ‘ ज्यांना आपल्या राजधानींत गाडींत किंवा घोड्यावर बसून जात ‘ असतां, आपल्या प्रजाजनांकडून जमिनीपासून लवून केलेल्या अदबीच्या ‘ मुजऱ्यांची परेड पाहण्याची संवय त्यांना आपणांकडे कोणी ढुंकूनसुद्धां पहात ‘ नाहीं, व कोणी पाहिलेंच तर आपण एक प्रदर्शन करण्याजोगी कांहीं तरी ‘ असाधारण चीज आहों, अशा बुद्धीनं पहातात हें पाहून आमच्या चोपदारांच्या ‘ व चवरीवाल्यांच्या स्वामींच्या अंतःकरणांत विस्मय, खेद, वृथा संताप वगैरेंचें ‘ बोडण भरत असेल, अशी शंका येते. ’ ( १६-८-८७ ).

अहमदाबाद येथील प्रदर्शन उघडण्याचे वेळीं १९०२ सालीं श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं भाषण केलें. तेव्हां केसरी म्हणतो कीं, ‘ खालसातींमध्यें काँग्रेसचे पुढारी ‘ भाषणें करतात, परंतु तीं भाषणें कृतींत उतरून दाखविण्याची त्यांना सत्ता नाहीं. इंग्रजी ‘ मुत्सद्दी भाषणें करतात तीं आत्मसमर्थनाच्या स्वरूपाचीं असतात. परंतु संस्थानिकांनीं ‘ केवळ राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांप्रमाणें नुसतीं भाषणें करणें यांत मोठासा पुरुषार्थ ‘ नाहीं. तर त्यांनीं आपल्या कृतीनं आपलें पुढारीपण व्यक्त केलें पाहिजे. ’ ता. २३-१२-०२ च्या अंकांत असें लिहिलें आहे कीं, ‘ जपान देशानें हल्लीं जी उद्योग- ‘ धंद्यांत सुधारणा केली ती गेल्या तीस वर्षांतील आहे. परमेश्वराच्या कृपेनें जवळ ‘ जवळ दोन कोटी उत्पन्नाच्या मुलुखावर महाराजांची सोळा आणे नसली तरी बारा ‘ आणे सत्ता चालत आहे. आणि ही सत्ता निदान गेलीं २१ वर्षे तरी महाराज ‘ चालवीत आहेत. परंतु या काळांत जपानच्या मानानें बडोद्यांत सुधारणा झालेल्या ‘ दिसत नाहींत. ’

बटलर कमिटीच्या बाबतींत संस्थानिकांनीं अर्जविनंत्या करून सार्वभौम सरकार-कडे आपला दर्जा ठरविण्याबद्दल जी याचना केली त्याबद्दल ‘ अर्जदार संस्थानिक हजर है ’ या विनोदात्मक लेखांत केसरीनें चटकदार वर्णन केलें आहे. बटलर कमिटीनें संस्थानिक म्हणजे सार्वभौम सत्तेचे चिरंतन मांडलिक असा जो जोराचा अभिप्राय दिला, त्यायोगानें खुंटा हलवून बळकट करून घेण्याचें श्रेय संस्थानिकांनीं

आपल्या पदरीं बांधून घेतलें. कालाच्या ओघामुळें नरश्रेष्ठ व वीरमणी असे गत इतिहासांतील आपले संस्थानिक **नृपति** नसून सार्वभौम सरकारचे **नृपत्नि** बनले आहेत. 'बुडत्या राजास प्रजेचाच आधार,' राज्याची बळकटी प्रजेच्या संतोषावरच अवलंबून असते. प्रजा **नाराज** झाली म्हणजे **ना–राज** म्हणजे अराजक स्थिति प्राप्त होते.

मिरजकरांनीं परस्थांबद्दल जो आचरटपणाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला, त्याजबद्दल त्यांचा तीव्र निषेध केसरीनें केला आहे. संस्थानिक म्हणजे दैवाचे लाडके दौलतदार असें त्यांचें यथार्थ वर्णन एका ठिकाणीं केलें असून खुद्द मिरजकरांना, परस्थांच्या कायद्यासारखी अत्यंत जुलुमाची 'बर्लिन डिक्री' संस्थानी प्रजेवर त्यांनीं बजावूं नये व सरकारनेंहि ती त्यांस बजावूं देऊं नये असा इषारा दिला आहे व याच बाबतींत संस्थानिकांना तुम्ही 'प्रजा जोडणार कीं तोडणार?' असा कळकळीचा पण सडेतोड प्रश्न केला.

संस्थानिकांबरोबरच संस्थानिक प्रजेची वाट काय हाहि महत्त्वाचा प्रश्न केसरीनें उपस्थित केला आहे. 'संस्थानिक म्हणजे कांहीं संस्थानें नव्हेत. संस्थानांत तेथील प्रजेचाहि समावेश होतो. संस्थानिकांना जें महत्त्व आहे तें पांचसातशें संस्थानिक व्यक्तींमुळें नसून संस्थानी मुलुखांत असणाऱ्या एकंदर हिंदुस्थानच्या ⅟₄ प्रजेमुळें आहे. परंतु ही प्रजा जवळजवळ असून नसल्यासारखीच आहे. खालसांतील प्रजेला एकाच ब्युरॉक्रसीचा जाच असतो. संस्थानी प्रजेला हा जाच दुहेरी ब्युरॉक्रसीपासून होत आहे. इंग्रजी व देशी अशा जोड दुपदरी ब्युरॉक्रसीच्या वस्त्रांतून गळून खालीं पडेल तेवढेंच स्वातंत्र्यसुख काय तें संस्थानी प्रजेस लाभणार! खालसातींत स्थानिक स्वराज्यसंस्था आहेत, कायदे–कौन्सिलें आहेत, तसेंच वर्तमानपत्रांची मुभा आहे. ब्रिटिश प्रजेला मोडकें तोडकें कां होईना लोकमत व्यक्त करितां येतें. परंतु तेंहि संस्थानी प्रजेस करितां येत नाहीं. खालसांतील व्यक्तींना भाषणें, व्याख्यानें, सभा, परिषदा वगैरे राजकीय चळवळी बिनहरकत करितां येतात. परंतु संस्थानी मुलुखांत मात्र यांवर कडकडीत बहिष्कार घातलेला असतो. शिवाय कित्येक संस्थानें दडपशाहीचा कारभार खालसापेक्षांहि अधिक बेमुर्वतपणानें करितात. वाईट संस्थानिकांचा राग पिढ्यानूपिढ्या सोसावा लागतो. संस्थानिक लोक आपल्या पैशाचा चैनीकडे उपयोग करतात. अभिलाष-बुद्धीनें प्रजेचा पैसा ओढीत असतात. न्यायमनसुब्याची त्यांना ओळख नसते. संस्थानांत स्वराज्य तर लांबच राहिलें, पण सुराज्यसुद्धां असावें तितकें अद्याप नाहीं. संस्थानांत राजकीय चळवळ करणें खालसातींपेक्षांहि अत्यंत अवघड आहे. संस्थानांतून सुराज्य स्थापन करणें म्हणजे संस्थानिकांस गादीवरून काढून टाकून प्रजासत्ताक राज्य स्थापणें असें नसून इंग्लंडांतहि जशीं आज राजावर राज्यघटनेचीं बंधनें आहेत, तशींच संस्थानिकांवरहि तीं असावींत अशी मागणी करणें हें होय.

संस्थानच्या प्रजेनें राजकीय चळवळीस सुरुवात करितांच प्रथम प्रथम पुढाऱ्यांना त्रास सोसावा लागून स्वार्थत्याग करावा लागेल. परंतु त्यांनींच हें काम केलें पाहिजे. '

' प्रजास्वातंत्र्याच्या बाबतींत आम्हांस यापुढें मान खालीं घालण्याचा प्रसंग आहे, ही गोष्ट आम्हांस कष्टानें कबूल करावी लागते. संस्थानिक लोक हे आमच्या जुन्या स्वराज्य संस्थेच्या इमारतीचे अद्यापि उभे असणारे मोडके तोडके खांब आहेत, म्हणून त्यांचा आम्हांस अभिमान वाटतो. खालसा मुलखापेक्षां संस्थानांतून आमच्या लोकांना वरिष्ठ अधिकार बजावावयास सांपडतात, कित्येक संस्थानिक जुन्या खानदानी पद्धतीनें प्रजेस प्रेमानें व पीडा न देतां वागवितात. प्रजास्वातंत्र्याची दृष्टी आमच्या संस्थानिकांच्या मनांत यत्किंचित् उदित झाल्यास खऱ्या राष्ट्रीय राज्यपद्धतीचे नमुने खालसांत कदाचित् यापुढें शंभर वर्षेंहि पहावयास न मिळतील, असे संस्थानांतून आजच्या आज दृष्टीस पडूं लागतील, असाहि आम्हांस भरंवसा आहे. पण खालसा मुलखांत कायदेकौन्सिलांतून लोकनियुक्त प्रतिनिधींचें बहुमत आणि जबाबदार मंत्रिमंडळ मागवून तें मिळविण्याच्याहि बेतांत आम्ही असतां आमच्या कित्येक मोठमोठ्या संस्थानांतूनहि एकादी देखील खरी लोकमतप्रदर्शक संस्था आढळूं नये याहून दुःखाची गोष्ट कोणती ? आपणांभोंवतीं ब्रिटिश मुलखांत काय स्थिति आहे व तेथें कशा प्रकारची चळवळ सुरु आहे हें आमच्या सुशिक्षित व समजूतदार संस्थानिकांस कळत नसेल असें नाहीं. पण त्यांना सत्तेचा लोभ सुटत नाहीं. पुष्कळ संस्थानिकांना आपलीं राज्यें म्हणजे त्या खासगी वतनवाड्याच वाटतात. राज्यांतील सर्व जमिनीचे मालक आपण, प्रजा हीं सर्व आपलीं कुळें, राज्याचें सर्व उत्पन्न ही आपली खाजगी मत्ता, तिचा वाटेल त्या रीतीनें उपयोग करण्यास आपणांस पूर्ण अखत्यार असून प्रजेच्या हिताकरितां तिचा अमुक एक रीतीन उपयोग केला जावा असें आग्रहानें म्हणण्याचाच नव्हे तर नुसतें नम्रपणानें सुचविण्याचाहि अधिकार प्रजेला नाहीं असें ते मानतात. तात्पर्य, काल्पनिक सरहद्दीच्या एका बाजूस म्हणजे खालसांतील प्रजास्वातंत्र्याच्या कल्पना उदित झाल्या असतां त्याच रेषेच्या दुसऱ्या बाजूस म्हणजे संस्थानांत प्रजा हीं संस्थानिकांनीं एकतंत्री, जुलमी, राज्यसत्तेच्या काठीनें वळण्याचीं केवळ गुरेंढोरें अशी स्थिति आहे. ब्रिटिश सरकारासहि आमची अशी विनंति आहे कीं, संस्थानिक लोक निदान खालसाइतकी स्वतंत्रता, इतका लोकमतास मान आपल्या प्रजेस देण्यास तयार झाल्याशिवाय त्यांनीं या संस्थानिकांस कोणतेंहि कौन्सिल देऊं नये किंवा त्यांचीं कोणतींहि गाऱ्हाणीं ऐकूं नयेत. '

संस्थानिक व अखिल हिंदुस्थानांतील प्रजाजन यांसंबंधीं केसरीचा अभिप्राय फार मुत्सद्दीपणाचा आहे. एक सन १८८८ मधील आहे व दुसरा गेल्याच सालीं दिलेला आहे.

'इंग्रज सरकारच्या एकछत्री अंमलाखालीं हिंदुस्थानच्या राजेरजवाड्यांचे व इतर प्रजेचे संबंध कांहीं निराळ्या प्रकारचेच होऊं पहात आहेत. संस्थानिकांचा मान, अधिकार, संपत्ति वगैरे कितीहि मोठीं असलीं, तरी इतर प्रजेप्रमाणेंच आपणहि सार्वभौमिनी व्हिक्टोरियाचे ताब्यांतीलच आहों ही समजूत या दोन्ही वर्गांचा स्नेहभाव वाढविण्यास कारण झाली आहे. इंग्रजी मुलुखांत ज्याप्रमाणें कोणत्याहि एका प्रबल किंवा हुशार जातीस त्या त्या प्रांतांतील सर्व राज्यकारभार आपल्या ताब्यांत घेतां येत नाहीं, त्याचप्रमाणें एखादा संस्थानिक शिपाईगिरीच्या जोरावर कांहीं करूं म्हणेल तर तें आतां कधींहि घडून येणार नाहीं. इंग्रजी मुलुखांत जबाबदारीच्या व अंमलदारीच्या बहुतेक सर्व मोठ्या जागा परकीयांच्याच हातांत असल्यामुळें इकडील सर्व सुशिक्षित लोकांस नेटिव्ह संस्थानांखेरीज आपली कर्तबगारी दाखविण्याचा कोठेंच मार्ग उरला नाहीं, तेव्हां नेटिव्ह संस्थानांच्या मालकांनींच या कामीं पुढाकार घेऊन आपल्या लोकांस पुढें आणिलें पाहिजे. राजकारणासाठीं किंवा दुसऱ्या कांहीं कारणांकरितां इंग्रजी अंमलांत ज्यांच्या हातीं कांहीं अधिकार उरला आहे असे लोक म्हणजे नेटिव संस्थानचे मालकच राहिले आहेत. म्हणून तो अधिकार निरंकुश स्वेच्छेनें चालविणें अशक्य आहे व महाराणीच्या इतर प्रजेचा व आपला हिताहितसंबंध एकच आहे हें लक्षांत आणून जर आमचे राजेरजवाडे आपला अधिकार योग्य रीतीनें बजावून आपल्या संस्थानांच्याचसें काय पण एकंदर हिंदु प्रजेच्या हिताकडे लक्ष देऊन आपलें वर्तन ठेवतील तरच त्यांत एकंदर राष्ट्राचें हित आहे. इंग्रजी मुलखांतील लोकांनीं नेटिव्ह संस्थानांबद्दल आपली कळकळ अनेक वेळां प्रदर्शित केली आहे, व हल्लीं आमच्या संस्थानिकांस जें शिक्षण मिळतें त्यावरून व जे कांहीं थोडे सुशिक्षित संस्थानिक आहेत त्यांच्या वर्तनावरून त्यांच्या बाजूनेंहि दुसऱ्या पक्षाच्या हिताहितांकडे इतउत्तर योग्य नजर पुरविली जाईल असा भरंवसा वाटतो. मानानें किंवा अधिकारानें आपण कितीहि मोठे झालों तरी प्रबल परकीय राज्यछत्राखालीं आपला उत्कर्ष किंवा अपकर्ष इतर हिंदु प्रजेबरोबरच होणार. हेच आपले खरे हितचिंतक आहेत व आपल्या संस्थानच्या प्रजेप्रमाणें ह्यांचाहि पुरस्कार आपणांसच केला पाहिजे अशी ज्या वेळीं प्रत्येक संस्थानिकांची समजूत होईल व त्याप्रमाणें ते वागूं लागतील तो सुदिन म्हणावयाचा. इंग्रजी मुलखांत विद्येचा प्रसार जास्त झाला असल्यामुळें संस्थानांतील प्रजेपेक्षां इकडे समजूतदार लोकांची संख्या एकंदरींत अधिक आहे. पण अधिकार व संपत्ति या दोहोंचाहि इकडे अभाव असल्यामुळें एकंदर राष्ट्राचें पुरस्कर्तृत्व दोघांकडेहि सारखेंच वाटलें जातें. यासाठीं दोघांचा मिलाफ होणें सर्वांस इष्ट आहे. पण असा योग घडवून आणणें, पुष्कळांशीं संस्थानिकांवर अवलंबून आहे.' ( १८८८ ).

संस्थानिकांना संघात्मक राज्यपद्धतीमध्यें सामील होण्याबद्दल गोलमेज परिषदेच्या नंतर केसरीनें फार कळकळीचा उपदेश केला आहे. 'या योगानें संस्थानांचें अस्तित्व

कायम राहून त्यांची स्वायत्तता टिकेल, समाजिक बाबींमध्यें त्यांचें होणारें नुकसान दूर होईल व त्यांनीं आपल्या प्रजेस जबाबदार राज्यपद्धतीचे हक्क दिल्यास एकंदर त्यांचा राज्यकारभार चोखपणाचा होईल. या संघात्मक राज्यपद्धतीचे भागीदार होण्यानें त्यांना थोडासा अधिकारसंन्यास करावा लागेल तरी त्यांच्या अंगच्या खऱ्या कर्तबगारीस स्वतंत्र, विस्तीर्ण व बलाढ्य अशा हिंदुस्थानच्या एकंदर राज्यकारभारापैकीं कालांतरानें सैन्य, आरमार, विमानदळ व इतर वरिष्ठ दर्जाच्या जागा यांत मुबलक कार्यक्षेत्र मिळणार आहे. संस्थानिकांचें क्षात्रतेज व मुत्सद्दीपणा आणि हिंदवासीयांचें बुद्धिबल व संख्याबल यांचा संगम होऊन या भारताचा भाग्यरवि खरोखरीच उदयाचलावर तळपावयाचा असेल, तर त्यास आमचे संस्थानिक खग्रास ग्रहण लावणार कां उदयोस्तु म्हणणार हाच काय तो राष्ट्रापुढें महत्त्वाचा प्रश्न आहे.' ( १३-१२-३० ).

'संस्थानी स्वराज्य' अस्तित्वांत येण्यापूर्वी महाराष्ट्रांत संस्थानी राजकारणासंबंधीं वर्तमानपत्र मुळींच नव्हतें. नांवाजण्यासारखें एकहि वर्तमानपत्र संस्थानी राज्यव्यवस्थेवर निर्भीडपणें टीका करणारें असें अद्यापहि संस्थानांत अस्तित्वांत आलें नाहीं व याच कारणाकरितां या पन्नास वर्षांच्या कालांत संस्थानिकांच्या उन्नतीबद्दल, त्यांच्या हक्कांच्या समर्थनाबद्दल, त्यांच्या प्रजेच्या हिताबद्दल जी तळमळ केसरीनं दाखविली आहे तीबद्दल संस्थानी प्रजेस कृतज्ञताच वाटली पाहिजे. संस्थानांतून वर्तमानपत्रें नाहींत, मुक्तकंठानें आपलें म्हणणें वेशीवर टांगतां येत नाहीं, कायदेकौन्सिलांसारख्या संस्था नाहींत, यामुळें प्रजेस आपलें गाऱ्हाणें तोंडावाटें काढण्यास अवसर सुद्धां नाहीं. अशा स्थितींत पारतंत्र्याच्या अंधःकारांतून स्वातंत्र्याच्या ध्येयाकडे जातांना वर्तमानपत्ररूपी प्रखर व तेजस्वी कंदिलांचाच उपयोग अशरण अशा संस्थानी प्रजेस या दीर्घ कालांत या पत्रानेंच झाला आहे.

---

# असहयोग

[ प्रो. लक्ष्मण बळवंत भोपटकर, एम्. ए., एल्एल्. बी. ]

असहकारितेच्या कल्पनेनें, निदान शब्दानें, हल्लीं राजकारणाचीं सुमारें दहाअकरा वर्षे व्यापलेलीं आहेत. त्या अवधींत असहकारितेच्या स्वरूपांत, समजुतींत आणि प्रत्यक्ष क्रियेंत वेळोवेळीं अनेक फरक होऊन केसरीचें धोरणहि त्या त्या अनुसंधानानें वेगवेगळें दिसण्यासारखें असल्यामुळें या विषयावर लिहिणें ही गोष्ट थोडी अवघड होऊन बसते; परंतु केसरीच्या लेखांवरूनच केसरीचें धोरण मांडावयाचें

असल्यामुळें ती अडचण थोडी कमी होते. कसेंहि असो. मला असलेल्या थोड्या फुरसतींत मी केसरींतील लेखांची पुनः एकवार थोडथोडी उजळणी करून मला काय वाटतें तें खालीं देत आहें. या कामीं केसरी-प्रबोध-मंडळाच्या सहकारी लोकांनीं ज्या सूची व अनुक्रमणिका तयार करून ठेवल्या त्याचा मला बराच उपयोग झाला.

असहकारिता हा शब्द नवीन आहे असें नाहीं. याचा अर्थ असा कीं, असहकारितेची कल्पना म्हणजे तिचा आत्मा हा कांहीं नवा नाहीं. फरक इतकाच कीं, पूर्वी तिचें स्वरूप वज्रमुष्टींतल्या कुस्तीप्रमाणें ठोशाला ठोसा देण्याचें होतें, तर नव्या प्रकारांत पुनः कुस्तींतलेंच उदाहरण घ्यावयाचें तर खालीं आलेल्या गड्यानें जमीन धरून बसावयाचें व या निष्क्रिय बळजोरीनेंच वरच्या गड्याला दमवावयाचें. कारण जमीन धरून बसलेला गडी फक्त इतकेंच संभाळतो कीं, आपली पाठ लागूं नये. पण वरच्या गड्याला मात्र आपला बचाव करावयाचा तो करून शिवाय जमीन धरून बसलेल्या गड्याला चारी मुंड्यांवर उताणा लोळवावयाचें असतें व तसें झालें तरच कुस्ती सुटते. जुन्या कल्पनेंत असहकारिता याचा अर्थ कोणीकडून तरी विरोध. मग त्यांत अडथळ्यापासून, शिवीगाळीपासून अत्याचारापर्यंत सगळ्या गोष्टी येत असत. अर्थात् ज्याचा स्वभाव ज्या गोष्टीला अनुकूल किंवा जी गोष्ट ज्याला अधिक झेपे तीच तो करी. पण नव्या असहकारितेचा अर्थ प्रथम तरी प्रत्यक्ष विरोध असा नसून सरकारशीं फटकून वागण्याची कमाल असा होता. जुन्या कल्पनेंत अडथळा व विरोध यांचाच समावेश होई. याचें प्रत्यंतर असें कीं, नेमस्त किंवा मवाळ आणि राष्ट्रीय किंवा जहाल या पक्षांतील भेद दर्शवावयाचा असतां तो असा दर्शविला जाई. नेमस्त म्हणत, आमचें ब्रीद असें कीं, शक्य तेथें व तोंपर्यंत सरकाराला साहाय्य करावें व अपरिहार्य तेथेंच सरकारला अडथळा व विरोध करावा. उलट जहाल पक्ष म्हणे कीं, आमचें ब्रीद हें कीं, सरकार सुखानें वठणीवर येणारें नाहीं म्हणून जेथें तेथें अडथळा व विरोध करून त्याचा पाडाव करूं व जेथें नाइलाजच होईल तेथें त्याला साह्य देऊं किंवा सहकारिता करूं. म्हणजे सांगण्याचा मुद्दा असा कीं, पूर्वीच्या असहकारितेंत सक्रिय अशा धोरणा-वर जोर व रोख होता. पण महात्मा गांधी यांनीं असहकारितेची एक अशी कल्पना काढली कीं, ती पूर्वी त्या स्वरूपांत अंमलांत नव्हती. त्यांनीं निष्क्रिय अशा सक्रियतेवर जोर दिला. अत्याचारावर बहिष्कार घातला. नेमक्या ब्रिटिश मालावर बहिष्कार होता तो उठविला व सात्त्विक स्वार्थत्याग हें असहकारितेचें मुख्य स्वरूप ठरवून सरकाराशीं संबंध शक्य त्या गोष्टींत टाळून कौतुकानें सरकाराला मारावें व सरकारानें लोकांची सात्त्विक बुद्धि, त्यांचें साधुत्व व स्वार्थत्याग यांचें कौतुक करीत करीत लोकांना शरण यावें. अशी ही त्यांची नवी कल्पना होती. अर्थात् सरकारशीं शत्रुत्व ( विरोध किंवा असहकारिता हे दोन्ही शब्द टाळण्या-

करितां हा स्वतंत्र शब्द योजला आहे ), करण्याच्या स्वरूपांतहि एवढी मोठी क्रांति एकदमच झाली कीं, लोकांना प्रथम ती ध्यानांतहि येईना; मग तिची अंमल बजावणी एकदम कशी होणार ?

यामुळें पंजाबांतील अत्याचारांचा हिंदुस्थानांतील सर्व राजकीय इसमांना सारखाच राग व तिटकारा आला असला तरी व १९१९ च्या सुधारणा सर्वांनाच अपुऱ्या वाटत असल्या तरी हें शत्रुत्व साधून सरकारला शरण कसें आणावें, याविषयीं १९२० च्या कलकत्ता येथील स्पेशल काँग्रेसमध्यें त्यांच्यामध्यें मोठाच मतभेद झाला. पंजाब, महाराष्ट्र, बंगाल, या प्रांतांत पूर्वी अनेक प्रकारचे दंगेधोपे झाले होते व बंगाल्यांतील क्रांतिकारकांनीं तर नवेंच युग अवतरविलें होतें. यामुळें या प्रांतांतील पुढाऱ्यांनीं गांधींच्या असहकारितेच्या ठरावांना कसून विरोध केला. या विरोधांत सभेचे अध्यक्ष लजपतराय हेहि कांहीं अंशीं सामील होते. आणि कर्नाटक, महाराष्ट्र व बंगाल या प्रांतांतील बहुतेक सर्व पुढाऱ्यांनीं त्या ठरावाविरुद्ध मतें दिलीं. तरी शत्रुत्वाच्या जुन्या धोरणांत थारेपालट करण्याची स्वाभाविक इच्छा मनुष्यस्वभावाप्रमाणें लोकांना झाली. पण विशेषतः महात्मा गांधींनीं आपल्या अपूर्व साधुत्वानें लोकांच्या भावनेवर अशी कांहीं विलक्षण छाप या सुमारास पाडली होती कीं, त्यांनीं सुचविलेल्या नव्या स्वरूपाचें शत्रुत्व किंवा विरोध करून तरी काय होतें हें पाहूं या, असें त्यांना वाटूं लागलें. रोगानें जिकिरीला आलेला मनुष्य एक डॉक्टर सोडून दुसऱ्याकडे जातो. नवसाचेंहि तसेंच होतें. म्हणजे एक देव किंवा साधु सोडून दुसऱ्याच्या भजनीं लागावें, असें आर्त मनुष्याला वाटतें. यांत त्याची दृष्टि असलीच तर उघड उघड स्वार्थाची असते, जुना डॉक्टर किंवा जुना देव यांची निंदा किंवा निषेध करण्याची नसते. त्याचप्रमाणें सामान्य हिंदी लोकांनाहि या सुमारास असें वाटूं लागलें कीं, आपण काय बोलूनचालून पारतंत्र्याचा रोग घालवूं पाहणार, या नाहीं त्या उपायानें तो रोग हटला तर त्याला कोणची हरकत ? सारख्या दर्जाचे देव किंवा साधु ‘ कन्सल्टेशन कमिटी ’ भरवीत नाहींत. पण सारख्या दर्जाचे डॉक्टर अशी कमिटी भरवितात व कोणी नवीन सुचविलेल्या उपायांत तत्त्वतः कांहीं आक्षेपार्ह नसलें तर त्याचा प्रयोग करून पाहण्यास परवानगी देतात. राष्ट्रीय सभेंत मोठमोठे पुढारी जातात त्यांची ही कन्सल्टेशन कमिटीच होय. तेव्हां म. गांधींच्या रूपानें एका नव्या डॉक्टरानें इलाज सांगितला तर तोहि करून पाहूं या. असें लोकांना वाटून राष्ट्रीय संस्थेच्या प्रतिनिधींनीं बहुसंख्येनें म. गांधींचा ठराव मान्य केला. तेव्हां क्षणभर सर्वांचीच वृत्ति तटस्थ झाली. समुद्रावर भरतीओहटी यांचे व्यापार सुरू असतां पुरी भरती भरल्यावर एक क्षण असा जातो कीं, त्यांत समुद्र तटस्थ असतो. या स्थितीला समा असें म्हणतात. पण तें अर्थात् टिकत नाहीं व मग ओहोटी सुरू होते. त्याप्रमाणें कलकत्त्याच्या सभेंत प्रथम विरोधाची पराकाष्ठा झाली; पण म. गांधींच्या बाजूला प्रचंड बहुमत दिसून

आल्यावर क्षणभर जिंकणारांनीं आपण जिंकलें कसें व पराभूत झालेल्यांनीं आपला पराभव झाला कसा यांच्या आश्चर्यांत किंचित् काळ घालविला.

पण लगेच प्रतिक्रिया सुरू झाली व कौन्सिलांतील निवडणुकी हाच प्रचलित मुख्य विषय असल्यानें जित व जेते दोन्ही पक्षांच्या लोकांनीं एकी करून उमेदवारांनीं आपापलीं नांवें परत घेतलीं. नंतर हळू हळू विद्यार्थी, सरकारी व निमसरकारी शाळांतून बाहेर पडूं लागले. कांहीं वकिलांनीं व कांहीं पक्षकारांनीं नुकसान सोसून कोर्टांवर बहिष्कार घातला. खादीचा कपडा वापरण्यास सुरुवात झाली. टिळकस्वराज्य-फंडाच्या वर्गण्या जमूं लागल्या. कांहीं लोकांनीं सरकारी बहुमानार्थी पदव्या टाकल्या व अशा रीतींनीं राष्ट्रीय सभेच्या असहकारितेच्या ठरावाचा अंमल सुरू झाला. पण स्वतः गांधींनींच या कार्यक्रमांत एक वर्षाची मुदत घातली होती. ती इतकी सक्त कीं, जर दुसरा कोणी म्हणूं लागला कीं, ही मुदत औपचारिक किंवा लाक्षणिक आहे तर तसें नाहीं, असें महात्मा गांधी बजावीत. अर्थात् मुदत जर निश्चित आहे, तर प्रयोग कां करून पाहूं नये? असें सर्वांनाच वाटलें. यामुळें १९२० च्या डिसेंबरांत नागपुरास भरलेल्या राष्ट्रीय सभेंत कोणीहि विरोध केला नाहीं व ठराव सर्वानुमतें झाला. पण या निश्चित कालमर्यादेचा, किंबहुना ठासून सांगित-लेल्या कालमर्यादेचा परिणाम थोडा प्रतिकूल झाला. म्हणजे ती मुदत संपतांच लोक विचारूं लागले कीं, हें असेंच पुढेंहि चालवावयाचें कीं काय व काय म्हणून? शिवाय वर्षअखे बारडोलीस करबंदीची चळवळ करून लॉर्ड रेडिंग यांना वठणीला आणूं असें वाटून म. गांधींनीं पराकाष्ठेचा प्रयत्न करून पाहिला. पण इकडे लॉर्ड रेडिंग यांनीं योजलेली भेट त्यांना घेतां आली नाहीं व दुसरीकडे चौरीचुरा येथील अत्याचारांनीं म. गांधींना किंचित् भय वाटून त्यांनीं करबंदीची चळवळ मागें घेतली. या दोन्हीतिन्ही गोष्टींनीं १९२१ च्या अखेर असहकारितेच्या अनु-यायांत किंचित् डळमळ सुरू झाली. मुदत एक वर्षाची व तितक्यांत केलेल्या विधायक कार्यक्रमांतून कायदेभंग निर्माण व्हावयाचा व त्यांतून स्वराज्यप्राप्ति व्हावयाची, ही जी लोकांची पूर्वीची कल्पना ती शिल्लक न उरल्यानें पुनः डॉक्टर बदलावा किंवा नव्या साधूला पुनः नवस करावा, असें जनतेला वाटूं लागलें. कलकत्त्यास ज्या लोकांनीं असहकारितेच्या ठरावाला विरोध केला होता, त्यांनीं या संधीचा सहजच फायदा घेतला व कार्यक्रम बदला असें ते म्हणूं लागले. तेव्हां म. गांधी हे तुरुंगांत असल्यामुळें त्यांचे अनुयायी सांगूं लागले, ' अहो! एक वर्षाची मुदत सांगितली ती औपचारिक होती. अत्याचारानें डोकें वर काढलें म्हणून तीव्र विरोधाच्या चळवळी करणें हें अनत्याचारी व्रताला धोक्याचें आहे; तेव्हां विधायक कार्यक्रम हाच उरतो व तो किती वेळ करीत राहावें असें विचाराल तर स्वराज्य मिळेपर्यंत, ' असें ते उत्तर देऊं लागले. पण हें लोकांना फारसें पटेना; अर्थात् सर्वस्वी श्रद्धाशील अशा अनुयायांखेरीज. मग हा मतभेद बाहेरून खुद्द

गांधींच्या अगदीं निकटच्या मंत्रिमंडळांत शिरला व त्यांतलेच कांहीं लोक म्हणूं लागले कीं, गांधींच्या खऱ्या धोरणाचा अर्थ तुम्ही सांगतां तो बरोबर नाहीं. आम्ही सांगतों तोच बरोबर. कुस्तीच्या रंगणांत शिरणारा पहिलवान शिरा मोकळ्या करण्याकरितां चारदोन बैठका काढतो, एकदोन उड्या मारतो, दंडांवर बुक्क्या घालतो, पण ही कांहीं खऱ्या कुस्तींतील मेहनत नव्हे. त्याचप्रमाणें विधायक कार्यक्रम हें देखील एक गौण साधन आहे. खऱ्या कुस्तीची जागा तो घेऊं शकत नाहीं. हीं साधनें कायदेभंगाच्या अंतिम चळवळीकरितां आहेत. पण तीं करण्याची लोकांची तयारी आहे कीं नाहीं हें अजमाविल्याशिवाय नुसता विधायक कार्यक्रम किती दिवस करीत बसणार ? बरें, कायदेभंगाची म्हणजे त्यांतील स्वार्थत्याग करण्याची लोकांची तयारी आहे, असें बारडोलीच्या शेतकऱ्यांच्या उदाहरणावरून आपण समजूं. पण पुनः बारडोली पायावर खडी केली तर पुनः कोठें अत्याचार होणार नाहींत कशावरून ? तात्पर्य, साध्य एकदम साधावें म्हटलें, तर त्याला परिस्थिति अनुकूल नाहीं व तें साध्य जर साधत नाहीं तर त्याचीं म्हणून सांगितलेलीं विशिष्ट साधनें उगीच गिरवीत बटवीत बसण्यांत काय अर्थ ? तेव्हां १९२० सालीं जसा एक थरेपालट झाला तसाच आतां दुसरा करून पाहावा, अशा रीतीनें प्रामाणिक मतभेद झाला व गांधी तर स्वतः खुलासा कांहीं करूं शकत नाहींत. करबंदीचीच चळवळ नसली तरी एरव्हींच्या कायदेभंगाला पांचपंचवीस हजार लोक तुरुंगांत गेले, तेव्हां आतां त्याहि दिशेनें प्रयत्न अधिक होऊं शकत नाहीं. तेव्हां आपणच या गोष्टीचा निर्णय न करितां लोकांत जाऊन लोकांचेंच मत विचारूं, असें म्हणून कायदेभंग कामिटी नेमण्यांत आली.

या कमिटीनें हिंदुस्थानभर दौरा काढून बहुमतानें असें ठरविलें कीं, कायदेभंग, शाळांवरील बहिष्कार, न्यायकोर्टांवरचा बहिष्कार, स्थानिक स्वराज्यावरील बहिष्कार हे काढून टाकावे व कौन्सिलप्रवेशाची व कौन्सिलांच्या द्वारें विरोध करण्याची चळवळ हातीं घ्यावी. तथापि ती गोष्ट वादाशिवाय पार पडली नाहीं. दास-नेहरूप्रभृति लोकांनीं गयेच्या राष्ट्रीय सभेंत स्वराज्यपक्षाची स्थापना केली. तेथून मग पुढें दोनतीन वर्षें एकच धोरण अंमलांत राहिलें. मग स्वराज्यपक्षांतच दोन तट पडले, म्हणजे प्रतिसहकारपक्ष नांवाची एक शाखा स्वराज्यपक्षाला फुटली. प्रतिसहकारपक्षानें स्वराज्यपक्षांतून अंग काढून घेतलें व स्वतःचा पक्ष बळावून कौन्सिलच्या निवडणुकी जिंकल्या. अशा रीतीनें कौन्सिलप्रवेश हा दुप्पट सिद्ध झाला व कौन्सिलांत स्वराज्यपक्षाचेंहि धोरण बदललें. म्हणजे विरोधाबरोबर तो सरकारशीं सक्रिय सहकारिताहि इष्टतेथें करूं लागला. त्यांनीं प्रधानकी न घेतली तरी कायदेमंडळांतील पोट-कमिट्यांवर नेमणुका करून घेतल्या, आणि स्वराज्यपक्षांतील एका पुढाऱ्याचीच अध्यक्षाच जागीं नेमणूक झाली. लहरीप्रमाणें केव्हां कौन्सिलांत बसावें, केव्हां राष्ट्रीय सभेची आज्ञा म्हणून बहिष्कार घालावा, फिरून एखादें निमित्त

काढून जाग्यावर येऊन बसावें अशा गोष्टी सुरू झाल्या व हें सर्व चालू असतां तो आपल्याच घरच्या मुलांचा आवडता खेळ आहे तो मोडूं नये, असें म्हणून महात्मा गांधींनीं तिकडे ममतेनें दुर्लक्ष केलें. पण १९२८ सालापासून चळवळीला पुनः बेगळी दिशा लागली. तात्त्विक ध्येयवादित्व बळावलें; स्वातंत्र्याचे ठराव होऊं लागले; स्वराज्यपक्षाचे पुढारी मोतिलाल नेहरू यांना परवानगी देऊन कायदेमंडळांत केलेला राउंड टेबल कॉन्फरन्सच्या मागणीचा ठराव मागें पडला व कायदेमंडळाबाहेर सर्वपक्षीय सभेनें तयार केलेला स्वराज्याचा नेहरू रिपोर्ट हाहि कचऱ्याच्या टोपलींत टाकण्यांत आला आणि अखेर पूर्ण स्वातंत्र्य किंवा पूर्ण स्वराज्य हेंच ध्येय, कायदेभंग व सत्याग्रह हींच त्याचीं मुख्य साधनें असें राष्ट्रीय सभेनें ठरविलें. म्हणून यच्चयावत् राष्ट्रीयपक्षानें कौन्सिलें सोडलीं. कायदेभंगाच्या चळवळीनें पांचपन्नास हजार लोक तुरुंगांत गेले, ब्रिटिश मालावरील बहिष्काराला परिणामकारक स्वरूप आलें आणि शेवटीं 'धीरं विलोकयति चाटु शतैश्च भुङ्क्ते' अशा रीतीनें गांधी यांनीं लॉर्ड अर्विन यांचें निमंत्रण स्वीकारून त्यांच्याशीं चर्चा करून परवां तह केला व आतां कॉंग्रेसपक्ष हा राउंड टेबल कॉन्फरन्सला जाण्याचें निश्चित झाल्यामुळें फिरून एकबार १९१८-१९ सालीं मॉंटेग्युसाहेबांच्या दौऱ्यामुळें विलायतेस गेलेल्या शिष्टमंडळामुळें हिंदी राजकारणांत जो देखावा दिसत होता तसाच कांहींसा देखावा पुनः कांहीं दिवस दिसेल. असा हा गेल्या अकरा वर्षांतला असहकारितेचा इतिहास आहे. तो सांगून झाल्यावर त्यासंबंधीं केसरीचें धोरण सांगावयाचें.

केसरी प्रथम असहकारितेच्या चळवळीला विरोधी होता, पण कलकत्त्याचा ठराव पुढें सर्वांनीं मान्य करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें केसरीहि त्यांत सामील झाला. पण केसरीनें तसें करितांना प्रारंभींच असें बजाविलें होतें कीं, हें धोरण बदलून घेण्याचा आम्हांला हक्क आहे व योग्य वेळीं तें आम्ही अवश्य बदलून घेऊं. पुढें विधायक कार्यक्रमापैकीं कॉंग्रेसचे सभासद करणें, टिळक-स्वराज्य फंड जमविणें, हिंदुमुसलमानांची एकी ठेवण्याचा प्रयत्न करणें, कौन्सिल-बहिष्कार तात्पुरता अंमलांत आणणें, राष्ट्रीय शिक्षण फैलावणें, न्यायकोर्टांचीं कामें शक्य तितकीं बाहेर संपविणें इत्यादि गोष्टींना केसरीनें जोराचा पाठिंबा दिला. तथापि केसरींतील असहकारितापक्षाशीं कांहीं ज्या थोड्या बाबतींत मतभेद होता त्या अशा :—शिक्षणसंस्था व न्यायकोर्टें यांवर बहिष्कार पडावा, परंतु मुलांच्या शिक्षणाची सोय करीत करीतच शिक्षणबहिष्कार अंमलांत आणावा, एकस्या वकीलवर्गावर तुटून पडूं नये, त्याची एकट्याचीच निंदानालस्ती करूं नये, त्याजकडून स्वार्थत्यागाचा मात्र भरपूर मोबदला घ्यावा, असहकारितेचा अर्थ करितांना दृष्टि अगदींच संकुचित ठेवूं नये. स्वार्थत्यागाच्या बाबतींत उभ्या रेघा मारून किंवा कुंपणें घालून कोणत्याहि विशिष्ट वर्गावर लोकांची दोषदृष्टि एकीकृत करूं नये, सर्वांना सारखाच स्वार्थत्याग करण्याचा उपदेश करावा व ज्यांच्याकडून जो जो स्वार्थत्याग ज्या ज्या रूपानें मिळेल तो तो घेऊन

राष्ट्राची झोळी भरावी असें केसरीनें प्रतिपादलें. आंखीव किंवा राष्ट्रसभाप्रणीत कार्यक्रम न स्वीकारतांहि लोक सरकारशीं फटकून वागतील किंवा विरोध करतील तोहि असहकारितेच्या खातीं जमा धरावा; खादी वापरावी, तिला उत्तेजन द्यावें हें चांगलें, पण केवळ खादीनेंच स्वराज्य मिळेल असें प्रतिपादूं नये, खादीबरोबर शुद्ध स्वदेशी हातमाग, वगैरेंच्या कापडांनाहि उत्तेजन देऊन दोघांकडून मिळून परदेशी, विशेषतः विलायती कापडाचा बहिष्कार सिद्ध करावा असेंहि त्यानें प्रतिपादिलें. म. गांधी यांच्या निकटवर्ती अनुयायीमंडळांत जसजसें मतांतर होत गेलें तसतसा त्याचा फायदा घेऊन केसरीनें असहकारितेची आपली विशिष्ट कल्पना लोकांपुढें मांडण्याचा प्रयत्न केला आणि व्यक्ति या दृष्टीनें म. गांधी यांची तपश्चर्या, त्यांची साधुवृत्ति, त्यांचा स्वार्थत्याग, त्यांची नेतृत्व-शक्ति, त्यांचें स्त्रीदाक्षिण्य, हीन जातींच्या उद्धाराचें त्यांचें कार्य, त्यांच्या राहणींतील अनुकरणीय साधेपणा, त्यांचें कळकळीचें वक्तृत्व व लेखनपटुत्व, व त्यांची पराकाष्ठेची निर्भयता या सर्व गोष्टींचे गुण केसरीनें वेळोवेळीं घेतले; तथापि त्यांच्या स्वभावांतील धरसोड, त्यांचा लहरीपणा, त्यांचे अव्यवहारिक मार्ग, त्यांचें अयुक्त मतप्रतिपादन, त्यांचा विशिष्ट वर्गावरील रागलोभ, राष्ट्रीय सभेला केवळ सद्गुण-संवर्धक सभा बनविण्याचें त्यांचें धोरण इत्यादि त्यांच्या स्वभावांतील दोषांसंबंधानेंहि केसरीनें टीका करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. अर्थात् या सर्व प्रकारच्या क्रांतींत व मत-परिवर्तनाच्या अवस्थेंत केसरीला जनतेच्या रागलोभाचे अपूर्व अनुभव आले आणि केसरीच्या मित्रांचें मित्रत्व व शत्रूंचें शत्रुत्व हीं दोन्ही कसोटीला लागलेलीं केसरीला पाहावयास सांपडलीं. मी स्वतः केसरीचा पक्षपाती असल्यामुळें या बाबतींत माझें मत सर्वांना सारखेंच ग्राह्य वाटणार नाहीं; तथापि केसरी या दोन्ही कसोट्यांना उतरला, ही गोष्ट केसरीनें आपलें स्वत्व टिकवून, उत्कर्ष संभाळून, आपल्या कामांत सुधारणा व प्रगति करून संस्थेला पद्धतशीर स्वरूप देऊन, अखेर तीन लक्ष रुपयांचा लोकोपयोगी ट्रस्ट निर्माण करून नुकताच आपला एक्कावन्नावा वाढदिवस साजरा केला, यावरून माझें म्हणणें कोणासहि पटेल अशी आशा आहे. तथापि तो माझ्या लेखाचा मुख्य विषय नसल्यानें मी त्याविषयीं फक्त वर दिला एवढाच त्रोटक उल्लेख केला आहे. एक गोष्ट करावीशी वाटते ती अशी कीं, केसरीचे संपादक दे. भ. न. चिं. केळकर यांच्या कांहीं निवडक लेखांचें पुस्तक 'गेलीं पांच वर्षे' या नांवानें छापून प्रसिद्ध झालें आहे. त्याची प्रस्तावना वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी दे. भ. माधवरावजी अणे यांनीं लिहिली आहे. तींत प्रथमच मार्मिक पर्यालोचनाचा परिणाम म्हणून त्यांनीं खालील मत दिलें आहे, तें या पुस्तकाच्या वाचकांना सादर करावेंसें वाटतें.

'सन १९२० च्या प्रथमार्धांत सुधारणेचा कायदा जारी झाल्याबरोबर महाराष्ट्र कोणतें धोरण स्वीकारण्यास सिद्ध झाला होता, त्या धोरणाला प्रतिकूल अशा असहकारितेंतील कौन्सिलबहिष्काराच्या कार्यक्रमाचा राष्ट्रीय सभेंत त्यास उघड

मान्यता मिळेपर्यंत महाराष्ट्रानें कसा कसून विरोध केला, राष्ट्रीय सभेचा छाप असहकारितेच्या धोरणावर बसल्यानंतर केवळ काँग्रेसनिष्ठेस्तव त्या कार्यक्रमास तात्पुरतें साह्य करण्यास नाखुषीनेंच कां होईना महाराष्ट्र कसा सिद्ध झाला, सबंध १९२१ सालांत महाराष्ट्रानें इतर प्रांतांच्या मानानें तो कार्यक्रम यशस्वी करण्याकरितां कशी शिकस्त केली, त्यानंतर त्या कार्यक्रमांतील वैगुण्य व वैयर्थ्य निदर्शनास येतांच तो बदलण्यासाठीं बृहन्महाराष्ट्रांतून कशी खटपट सुरू झाली, या प्रयत्नांची ज्यांनीं टवाळी केली त्यांनाच शेवटीं निरुपायास्तव कायदेभंग-चौकशी-कमिटी कशी नेमावी लागली, या चौकशी-कमिटीच्या बहुसंख्याक रिपोर्टाला महाराष्ट्रीयांनीं कसा पाठिंबा दिला व त्याचा परिणाम गया येथें स्वराज्य-पक्षाच्या स्थापनेंत कसा झाला, नेमस्त पक्षाविरुद्ध स्वराज्यपक्षाच्या निवडणुकी लढून बृहन्महाराष्ट्रानें कसें अश्रुतपूर्व यश संपादन केलें व इतर प्रांतांतील स्वराज्यपक्षीय पुढाऱ्यांपेक्षां अखिल महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांनीं लोकमतावरील आपली छाप सर्व हिंदुस्थानच्या दृष्टीस कशा असंदिग्ध रीतीनें आणून दिली, शिस्तीकरितां स्वराज्यपक्षाच्या सतत विरोधाच्या तत्त्वाचें परिपालन करीत असतांच व्यवहार्य दृष्टीनें तो कार्यक्रम बदलण्याकरितां महाराष्ट्रीयांनीं काय खटाटोप केला, व त्यांत त्यांस कितपत यश संपादन करितां आलें; अखेरीस स्वराज्यपक्षाच्या व कायदेकौन्सिलांतील आपल्या सभासदत्वाचा राजीनामा देऊन अमृतसरच्या राष्ट्रीय सभेंत मान्य झालेल्या प्रति-सहकारितेच्या तत्त्वानुसार राजकारणाची दिशा ठरविण्यासाठीं लोकमत अनुकूल करण्याकरितां काय चळवळ केली, अकोला येथील परिषदेंत प्रतिसहकारपक्षाची स्थापना करून स्वराज्यपक्षास सर्व हिंदुस्थानांतील जनतेच्या वतीनें युद्धाकरितां आव्हान करण्यास महाराष्ट्र एकाकी कसा सज्ज झाला, या प्रयत्नास अप्रत्यक्ष मदत देऊन वाहत्या गंगेंत हात धुऊन घेण्याचा नेमस्तांनीं मुंबई येथें कसा उद्योग केला व शेवटीं, दिल्ली येथें प्रतिसहकारितेच्या तत्त्वाचा उघड पुरस्कार करण्याकरितां व त्या तत्त्वानुसार महाराष्ट्राबाहेरील निवडणुकी स्वराज्यपक्षाविरुद्ध लढविण्याकरितां लाला लजपतराय व पंडित मदनमोहन मालवीय यांच्या नेतृत्वाखालीं स्वतंत्र काँग्रेसपक्ष कसा स्थापन झाला व त्यामुळेंच आज स्वराज्यपक्षाच्या बालेकिल्ल्यांतून सुद्धां त्या पक्षाची कशी वाताहत होत आहे, या सर्व गोष्टींचा अत्यंत मनोवेधक इतिहास वाचकांचे डोळ्यांसमोर एकदम उभा राहून गेल्या पांच वर्षांच्या चळवळीचा साधकबाधक दृष्टीनें विचार करण्यास या पुस्तकानें त्यांस फार मदत होईल यांत कांहीं शंका नाहीं. '

---

# निवडक लेखमाला

केसरीच्या संपादकांनीं प्रासंगिक महत्त्वाच्या विषयांवर चर्चा केसरींतून केली असली तरी इतर लेखकांना देखील केसरीनें लेख लिहिण्यास अवसर दिला आहे. इतकेंच काय, पण केसरींत प्रसिद्ध होण्याजोगे लेख लिहितां येणें ही एक अभिमानाची बाब होऊन बसली, इतकें उच्च स्थान केसरीनें पटकाविलें आहे. तदनुसार पुढें वाङ्मयक्षेत्रांत चमकणारे पुष्कळ जण प्रथमतः केसरीचे लेखक म्हणूनच सरस्वतिमंदिरांत प्रवेश करणारे होते. अशांनीं केसरींतून महाराष्ट्रीय जनतेपुढें मांडलेल्या प्रमुख लेखमालांची आणि क्रमशः लिहिलेल्या निवडक लेखांची यादी दिली आहे. हेतु हा कीं, संपादकीय लिखाणाव्यतिरिक्त किती विविध विषयांवर बाहेरच्या लेखकांनीं हौसेनें लेख केसरींतून वाचकांपुढें मांडले ह्याची थोडी तरी कल्पना यावी. पन्नास वर्षांची केसरीची कारकिर्द आणि केसरीचें विस्तृत कार्यक्षेत्र लक्षांत घेतां ही यादी परिपूर्ण नाहीं हें न सांगतांच समजण्यासारखें आहे.

| अनुक्रम | लेखाचें नांव व संख्या | लेखक | लेखाचा प्रारंभ |
|---|---|---|---|
| १ | अहमदाबादविषयीं दोन शब्द ( ११ ) | ‘ एक दक्षिणी ’ | ९-८-८५ |
| २ | पब्लिक सर्व्हिस कमिशन ( ४ ) | लि. आ. म. | २५-१-८७ |
| ३ | हिंदु धर्म व त्याचे आधुनिक शत्रु (३) | ‘ एक मित्र ’ | १०-५-८७ |
| ४ | राणीसरकारचें हिंदुस्थान ( ४ ) | ‘ एक दक्षिणी ’ | ९-८-८८ |
| ५ | पांडवांचा काळ ( २ ) | शं. बा. दीक्षित | २३-७-९५ |
| ६ | मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ( ६ ) | का. ना. साने | ९-६-९६ |
| ७ | हिंदुस्थानचें नाणें व विलायती हुंडी (८) | ‘ धनुर्धारी ’ | २९-३-९८ |
| ८ | महाभारत ( ७ ) | म. गो. अभ्यंकर | २४-५-९८ |
| ९ | सायन निरयनवाद ( २ ) | ‘ ज्योतिर्विलास ’ | २८-६-९८ |
| १० | ज्ञानेश्वर व ज्ञानदेव एकच ( ३ ) | ज. र. आजगांवकर | ४-४-९९ |
| ११ | आळंदीचे ज्ञानदेव हेच ज्ञानेश्वरीचे कर्ते (२) | केशवशास्त्री दामले | २-५-९९ |
| १२ | किष्किंधा कोठें असावी ? ( ३ ) | म. गो. अभ्यंकर | १३-६-९९ |
| १३ | किष्किंधा विंध्याच्या दक्षिणेस असावी (३) | के. व्ही. लक्ष्मणराव | २९-८-९९ |
| १४ | राष्ट्रीय सभेबद्दल दोन शब्द ( ४ ) | ‘ एक सन्मान्य मित्र ’ | २९-११-९९ |
| १५ | ज्योतिःशास्त्रासंबंधानें लोकांचें कर्तव्य(२) | विनायकशास्त्री खानापूरकर | १-५-०० |

| अनुक्रम | लेखाचें नांव व संख्या | लेखक | लेखाचा प्रारंभ |
|---|---|---|---|
| ४१ | जातिभेद व त्यासंबंधीं राष्ट्रीय धोरण (५) | श्री. व्यं. केतकर | २२-७-१३ |
| ४२ | अर्वाचीन सुशिक्षितांचा वेदांत (१०) | म. मा. जोशी | २९-७-१३ |
| ४३ | फिरंग रोग अथवा सिफ्लीस (२) | ग. पां. काळोखे | २८-८-१३ |
| ४४ | मराठी टाईपांत सुधारणा (२) | ह. र. भागवत | ३-२-१४ |
| ४५ | आरोग्यमीमांसा व आर्यवैद्यक (२) | पं. कृ. कवडे | १०-३-१४ |
| ४६ | भगवद्गीता व डॉ. गुणे (२) | ॲ. जोशी | १०-७-१४ |
| ४७ | शेती सुधारण्याचे प्रयत्न (५) | अ. ब. मोडक | ५-२-१५ |
| ४८ | हिंदी शेतकऱ्यांची सुधारणा म्हणजे काय(४) | 'युनिअनिस्ट' | १३-७-१५ |
| ४९ | अर्वाचीन कृषिशास्त्राचें स्वरूप (३) | वा. रा. गाडगीळ | ३-११-१५ |
| ५० | चाऱ्यांचीं पिकें (८) | ग. के. केळकर व अ. ब. मोडक | ३१-१२-१८ |
| ५१ | दाक्षिणी ब्राह्मण व सहकारी संस्था (२) | त्रिं. भि. वेलणकर | ५-८-१९ |
| ५२ | शिक्षकांच्या दैवाचा खेळ (२) | 'परिस्थिति पीडित' | १४-१०-१९ |
| ५३ | इजिप्तचें नशीब कसें उघडलें ! (३) | रा. ब. सप्रे | १४-१२-२० |
| ५४ | अस्पृश्य विचार (२) | श्री. म. माटे | ९-८-२१ |
| ५५ | येरवड्यांतील खडतर अनुभव (७) | ज. स. करंदीकर | ८-८-२२ |
| ५६ | गीतारहस्य व टीकाकार (२) | मा. म. जोशी | १५-८-२२ |
| ५७ | अस्पृश्योद्धार (६) | दिवेकरशास्त्री | १९-९-२२ |
| ५८ | सत्ता आणि धर्म (२) | वामनशास्त्री किंजवडेकर | २६-९-२२ |
| ५९ | अमेरिका और विद्यार्थी (४) | 'त्र्यंबक' | २३-१-२३ |
| ६० | मराठे क्षत्रिय आहेत (२) | चिं. वि. वैद्य | १३-२-२३ |
| ६१ | राष्ट्रीय संस्थांचें स्थैर्य (३) | वि. मो. केळकर | २०-२-२३ |
| ६२ | वऱ्हाडांतील महारपट्टी (३) | ना. रा. बामणगांवकर | १३-३-२३ |
| ६३ | शुद्ध निरयन पंचांग (४) | वि. ब. नाईक | २०-३-२३ |
| ६४ | परलोक-विद्या व वेदांत (२) | वि. दा. ऋषि | १०-४-२३ |
| ६५ | राष्ट्रीय शिक्षण यशस्वी कसें होईल ? (४) | महादेवशास्त्री दिवेकर | १७-४-२३ |
| ६६ | देशी संस्थानें (२) | चिं. वि. वैद्य | ८-५-२३ |

# कोल्हापूरचे छत्रपति व इंग्रज यांचें हितगुज

१. महाराजांचें हिलसाहेबांना पत्र ( २६-६-०८ ):—' तुमच्याशीं किती तरी मला बोलावयाचें आहे व तुमच्यांकडून सर्व प्रकारची बातमी मला समजावून घ्यावयाची आहे. टिळकांना कैद केलें आहे असें मला समजतें व मला अशी आशा आहे कीं, नव्या कायद्याखालीं ' केसरी ' वर्तमानपत्र जप्त होईल. '

२. महाराजांचें मेजर वुडहाउस ह्यांना पत्र ( ३-१०-०८ ):— ' विश्ववृत्ताच्या खटल्याची पूर्व-चौकशी पुरी झाली. सुशिक्षित, विशेषतः ब्राह्मण, अशा लोकांवर खटला असल्यामुळें आम्हांला न्यायाधीश पाहिजे तो मोठा कडक पाहिजे. माझ्या नोकरींतले वरच्या वर्गातील न्यायाधीश ब्राह्मण असून कडक नाहींत आणि एकदां खालीं खटला बिघडला म्हणजे तो कौन्सिलांत सुधारुन घेण्याला फार अडचण पडणार. पुण्यांत नेटिव्ह न्यायाधिशांनीं मुकदमे बिघडविल्यामुळें हायकोर्ट जजांच्या मार्गांत अडचणी आल्या, हें आम्हांस माहीत आहे. म्हणून मला क्लेमंट्स्-साहेबांसारखा कडक न्यायाधीश पाहिजे; कारण ते मोठे निःपक्षपाती, त्यांच्या मनांत पूर्वग्रह म्हणून मिळावयाचा नाहीं ! लोक म्हणतील, सरकारनें कोल्हापूरदरबारला घोड्यावर घातलें; पण आपणांला लोकांशीं काय करावयाचें ? आपल्याला न्याय झाल्याशीं कारण. किंबहुना ब्रिटिश सरकार व कोल्हापूरदरबार एकविचारांनीं चालतात असें लोकांना दिसून आलें तरी तें इष्टच आहे. '

३. ' जॅक्सनच्या वधाचा पुरा सूड घ्यावा व कटांत सामील असलेल्या लोकांकडून साहेबांच्या कुटुंबास पेन्शन देववावें. बडोद्याची जशी मुंबईसरकारला नड तशी इचलकरंजीची मला पावलोंपावलीं नड होते. म्हणून इचलकरंजीकर व विशाळगडकर ह्यांना वेळींच शिक्षा दिल्या पाहिजेत. '

४. महाराजांचें सर जॉर्ज क्लार्क यांस पत्र ( २१-४-०९ ):—' बालिंजरसाहेबांचें व माझें ठीक चाललें आहे. के. डी. कुळकर्ण्यांच्या घरच्या झडतींत एक पत्र सांपडलें आहे, असें पोलीस म्हणतात. त्यांत असें म्हटलें आहे कीं, इचलकरंजीकर व विशाळगडकर ह्यांच्याप्रमाणेंच इतर संस्थानिकहि मदत करतील तर देशकार्य लवकर घडून येईल. या दोघांना सरकारनें जाब विचारला पाहिजे. पुण्यांत बॉंब होतात ही बातमी पक्की ठरत आहे. मला व बालिंजरसाहेबांना मैदान मोकळें मिळेल तर रावसाहेब, रावबहादूर व संभावित मानले जाणार संपादक यांच्याहि विरुद्ध पुरावा मिळूं शकेल. '

५. ' लॉर्ड मोर्लेसाहेबांची गांठ पडून त्यांच्याशीं एकवार बोलण्याची संधि मिळावी अशी फार इच्छा आहे. ती मिळाल्यास गोखले व इतर लोक जसे आपले विचार

मोर्लेसाहेबांपुढें मांडतात तसें मलाहि मांडतां येतील. गोखले व त्यांसारखे इतर लोक काय काय घाणेरड्या गोष्टी व युक्त्या करतात, त्या सांगून त्यांविषयीं मी एकदां खात्री पटवून दिली म्हणजे मग लॉर्ड मोर्ले आश्चर्यानें चकित होऊन त्यांचा चेहरा कसा दिसेल हें मला पहावयाचें आहे. या लोकांच्या खासगी भेटी घेतात तसें आम्हांलाहि स्नेहभावानें इंग्लंडला कां बोलावीत नाहींत ? '

६. **महाराजांचें म्यूर मॅकेंझीसाहेबांना पत्र ( ४-१२-०९ )** :—' संस्थानिकांनीं सरकारशीं राजनिष्ठ राहिलेंच पाहिजे. मग त्याचें बक्षिस मिळो वा न मिळो, तें केवळ कर्तव्य होय. पण ते अराजनिष्ठ होतील तर त्यांना शिक्षाच केली पाहिजे. मग ते छोटे जहागिरदार असोत अगर एकवीस तोफांच्या सलामीचे बडे राजे असोत. मिरज, जमखंडी, इचलकरंजी या हद्दींतून अराजक लोकांचें वाङ्मय, फोटो, बिल्ले वगैरे येऊन माझ्या हद्दींत विकले जातात. विजापूरकरांच्या खटल्यावरून तुम्हांस कळलेंच असेल कीं, त्यांच्या डायरींत हीं नांवें झळकलीं असून टिळक, बिपिनचंद्र पाल वगैरे लोकांच्या सभेला ते जातात व टिळक-फंडासारख्या फंडाला ते मदत करितात. इचलकरंजीकरांचा बहाणा असा कीं, आपण कौन्सिलांत जातों व निवडणुकींत मतें मिळविण्याकरितां या गोष्टी आपणांस कराव्या लागतात. पण हें खरें नाहीं. कारण रानडे, नामजोशी यांच्या वेळेपासून त्यांचे टिळकांशीं काय संबंध आहेत हें मला माहीत आहे. त्यांना फक्त रागें भरण्याचा सरकारचा विचार दिसतो, पण त्यांच्या पदराला खार न लागेल किंवा मानसन्मानाला चट्टा न बसेल, तर नुसतें रागें भरून काय होणार ? के. डी. कुळकर्ण्यांसारख्याला हे लोक पैसे देतात, पण राजाराम कॉलेजला कबूल केलेली वर्गणी देत नाहींत. या लोकांना असा चिमटा घेतला पाहिजे कीं, या लोकांना नवीन दिलेले अधिकार काढून घ्यावे. इतर गोष्टी मी तुमच्याशीं खासगी बोलेन. संस्थानी रयत राजद्रोही नाहीं, पण संस्थानिक आहेत. '

---

# मराठीचें शुद्धलेखन

[ श्री. गोविंद कृष्ण मोडकशास्त्री ]

१. **मराठींत शुद्धलेखनाला महत्त्व कां ?**—इंग्रजी भाषा अनेक शतकें लेखारूढ आहे; जगाच्या अनेक देशांत चालू आहे; तिच्यांत ग्रंथसंपत्ति प्रतिवर्ष, प्रतिमास, प्रतिदिन, इतकेंच नव्हे तर प्रतिक्षण, वृद्धिंगत होत आहे; कोट्यवधि लोक व्यवहारभाषा म्हणून ती उपयोगीत आहेत; तरी पण तिच्या लेखनाविषयीं निदान चालू शतकांत तरी कांहीं सुधारणा जबाबदारपणें सुचविण्यांत आलेल्या दिसत नाहींत. बरें, इंग्रजीची लेखनपद्धति सर्वांगपरिपूर्ण आहे, तिला शुद्धीची किंवा बदलाची अथवा अन्यथा-भावाची अपेक्षाच नाहीं असें नाहीं. But-चा उच्चार 'बट्' तर put चा उच्चार 'पुट्' कां करावा, हें शास्त्र सांगू शकत नाहीं; व या व्यवस्थेंत अथवा गैरव्यवस्थेंत सोय तर नाहींच. सारांश, इंग्रजी लेखनपद्धतींत अथवा शब्दाच्या वर्णविन्यासांत (Spelling) शास्त्रीयता किंवा सोय मुळींच नाहीं; म्हणजेच इंग्रजी स्पेलिंग सर्वथा अशास्त्रीय व स्वैर आहे; अर्थात् ही भाषा बोलणाऱ्या लोकसंख्येची वृद्धि होण्यास ही मोठीच अडचण आहे. तरी पण, ही अडचण निवारण्याचे इंग्रज लोक मुळींच मनांत आणीत नाहींत. यावरून त्यांची पुराणप्रियता, शास्त्रबाह्यता व चढेलपणा हे दोष व्यक्त होतात. Night (नाइट्) हा शब्द पूर्वकाळीं 'नक्त' किंवा 'निक्त' असा उच्चारिला जात होता. कालक्रमानें उच्चार बदलला तरी, लेखन पूर्वींचेंच कायम राहिलें. हा उच्चार व लेखन यांमधील विसंवाद कोण क्षम्य म्हणेल ? हा मोडून टाकला तर, म्हणजे उच्चारानुरूप लेखन केल्यास इंग्रजी भाषा बोलणाऱ्या नव्या व जुन्या लोकांचीहि पुष्कळ सोय होईल. पण अशी सोय करण्यास इंग्रज लोक कबूल होत नाहींत. या लोकांशीं आपली तुलना केल्यास काय दिसतें बरें ? संस्कृताचे काळीं असलेला **सप्त** हा शब्द पुढें **सत्त** व नंतर **सात** असा उच्चारण्यांत येऊं लागला. तदनुरूप आपण लेखनांतहि बदल करीत आलों आहों. यांत शास्त्र व सोय अशी दोन्ही आपण साधिलीं आहेत. 'उच्चारानुगामी लेख' हें **शास्त्र** आपण पाळितों व यामुळेंच, लिहिणें सोपें जातें, ही **सोय** आपण मिळवितों. असेंच उच्चारानुगामी लेखन संस्कृताच्या काळापासून आंग्लशाहीचे आरंभापर्यंत अप्रतिहत चालू होतें. जसा उच्चार तसा लेख. समय-चा उच्चार 'संवय' असा होऊं लागला, कीं तदनुरूप लेखनांत बदल झालाच म्हणून समजावें. मुद्रणकलेच्या प्रसारापूर्वीं हे फरक मुकाट्यानें होत असत. त्यासंबंधीं 'भवति न भवति'चा प्रसंग बहुधा येत नसावा. मुद्रणाच्या प्रसारापासून, विशेषेंकरून नियतकालिकांच्या फैलावामुळें कोणताहि फरक केल्यास तो तत्काल लोकांचे नजरेपुढें येऊं लागला. यामुळें

असा फरक करावा कीं नाहीं, ही गोष्ट सर्व वाचकवर्गाच्या मतावर अवलंबून राहूं लागली. यामुळेंच लेखनाची पद्धति काय असावी, ती कोणत्या नियमांनीं बद्ध असावी इत्यादि विचारांना महत्त्व येऊन, सुशिक्षित लोकांच्या लिहिण्यांत प्रचार-बाहुल्य पाहून तदर्थ नियम केले गेले. असे नियम निश्चित झाल्यामुळें लेखकांची पुष्कळ सोय झाली. या नियमांचें धोरण, प्रायः उच्चारानुगामी असेंच होतें. हें आपलें धोरण कोणीकडे व पूर्वोक्त इंग्रजांचें कोणीकडे ! आपण वृथापुराणवादित्व अवलंबीत नाहीं, तसेंच लेखनास उच्चाराची लगाम लावून त्यास स्वैर-संचारूंहि देत नाहीं. सारांश, **लेखनाची शुद्धता व लोकांची सोय** हीं आपणांस इष्ट असल्यामुळें आपल्या भाषेच्या शुद्धलेखनाचा विचार आपण आस्थेनें करीत आलों आहों. यावरून या विषयाला इंग्रजींत महत्त्व कां नाहीं व मराठींत कां आहे याचा सहज उलगडा होईल.

२. **शुद्धलेखनचर्चेचा उपक्रम**—१९०४ सालीं या आपल्या मुंबई इलाख्यांत शाळाखात्याकडून एक 'मराठी शुद्धलेखन—समिति' नेमण्यांत आली. या समितीमध्यें रा. साने, हातवळणे व गोडबोले हे गृहस्थ प्रमुख होते. त्यांनीं मराठीच्या शुद्धलेखनाविषयीं आपल्या संयुक्त मतानें पुष्कळ विचार करून कांहीं नियम ठरविले व त्यांस कालिकांतून व स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्धी दिली. त्यांनीं ठरविलेल्या नियमांचें स्वरूप पाहिल्यास त्यांच्या मुळाशीं शास्त्र, तर्क व सारासार विचार हे स्पष्ट दिसतात. याच संबंधांत रा. हातवळणे यांनीं पत्रद्वारां जनतेपुढें आपलीं मतें मांडिलीं आहेत. तीं मतें विचारपूर्वक वाचल्यास सर्वथा समंजस अशींच आहेत. रा. हातवळणे यांचेप्रमाणें दिवंगत रामभाऊ जोशी यांनींहि हा विषय केसरीद्वारां लोकांच्या निदर्शनास आणिला आहे. इतर लेखकांनींहि या विषयाची चर्चा मधून मधून केसरींतून जनतेपुढें मांडिली आहे. अशा रीतीनें शुद्धलेखन या विषयास विशेष प्रोत्साहन, प्रसंग आला तेव्हां केसरीनें १९०४ या वर्षी प्रथम दिलें, व पुढेंहि यथाप्रसंग वेळोवेळीं या विषयाला केसरीनें आपल्या पोटांत स्थान दिलें आहे.

३. **सुधारसमितीचें धोरण**—रा. हातवळणे वगैरे लोकांनीं केलेल्या सुधारणांना त्या वेळीं बुध्द्या विकृत रूप देऊन नांवें ठेवण्याचा खटाटोप करण्यांत आल्याचें दिसून येतें. कारण ५-७-१९०४ चे केसरीचे अंकांत हातवळणे यांचें पत्र प्रसिद्ध झालें आहे, त्यांत ते म्हणतात, 'प्रतिपक्षीयांनीं आम्हांवर मिथ्या 'आरोप करून आमच्या प्रयत्नास हाणून पाडण्याचा प्रयत्न केला आहे. मति-'सारखे शब्द दीर्घ लिहावे, मती-भ्रंश असें समास बनवावे व पाणीं, लोणीं असें 'अनुस्वारान्त शब्द लिहावे, असें म्हणणें प्रतिपक्षीयांनीं आम्हांवर लादिलें आहे. 'पण हें सर्वस्वीं निर्मूल आहे. आम्ही, मति-सारखे शब्द दीर्घांत लिहावे, असें 'म्हणतों; पण ते वाक्यांतील पद या नात्यानें; समासाचें पूर्वपद या नात्यानें नव्हे.

' पाणी, लोणी यांसारख्या नपुंसकलिंगी शब्दांच्या अंतीं, कीं ज्यांच्या अंताक्षरांमध्यें
' पंचम वर्ण आहे त्यांवर, अनुस्वार द्यावा, असें आम्हीं मुळींच म्हटलें नाहीं.
' एतद्भिन्न मोतीं, दहीं इत्यादि शब्दांवरच आम्हीं अनुस्वार ग्राह्य मानितों; व हें
' संप्रदायशुद्धच आहे.' याच पत्रांत रा. हातवळणे पुढें लिहितात—' शुद्ध-
' लेखनाच्या बाबतींत विद्वानांमध्यें चार पक्ष आढळून येतात. १ संस्कृताभिमानी,
' २ मराठीचे पुरस्कर्ते, ३ उच्चारवादी व ४ व्युत्पत्ति, सोय, उच्चार इत्यादींचा विचार
' करणारे—अर्थात् सारासारवादी. या सर्व पक्षांचा यावच्छक्य समन्वय करून आम्हीं
' शुद्धलेखनाचे नियम ठरविले आहेत.' हेच नियम रामभाऊ जोशी यांचे पत्रांत
( २७-९-०४ च्या केसरींत छापलेल्या ) दिले आहेत.

**४. सुधारसमितीचे नियम**—( १ ) नामाचे व विशेषणाचे अंत्य इ, उ हे स्वर दीर्घ लिहावे. असे शब्द समासांत पूर्वपद बनल्यास ते ऱ्हस्वच लिहावे. कोशांतहि ते ऱ्हस्वान्त म्हणूनच द्यावे. शब्द वाक्यांत आला म्हणजे त्यास पद म्हणतात. अव्ययें कोशांत व वाक्यांत एकाच रूपानें येतात, अर्थात् इतर शब्दां-प्रमाणें जर तीं वाक्यांत दीर्घ लिहिणें तर तीं कोशांतही तशींच लिहावीं. 'आणि तथापि, परंतु' इत्यादि थोडेसे अपवाद ऱ्हस्वान्त लिहिणें प्राप्त आहे. (२) अकारा-न्त नामाचे व विशेषणाचे उपान्त स्वर दीर्घ लिहावे; जसें—वीष, गूण, हीत; याच शब्दांचें सामान्यरूप होतांना हे उपान्त स्वर ऱ्हस्व होतीलच; जसें—विषानें, गुणामुळें, इत्यादि. या नियमास इंद्र, कुंड, विप्र, इ० अपवाद समजावे. या अपवादभूत शब्दांत अन्ताक्षरांत जोडव्यंजनें आहेत हें विद्वानांचे लक्षांत येईलच. ( ३ ) व्यंजनान्त भासणारे शब्द अकारान्त लिहावे, जसें—विद्वान, क्वचित, इ०. ( ४ ) ज्या अनुनासिकांस व्युत्पत्तीचा आधार नाहीं ते काढून टाकावे; जसें—धावतो, शेपूट, लाकूड, कीव, कोपर, ऊस, सवय, भोकणें, इ०. या संबंधांत जोशी म्हणतात–' येथील पहिल्या नियमाविषयीं आद्य व्याकरणकार
' दादोबा यांनीं कांहींच विचार केला नाहीं; व तिसऱ्या नियमास चिपळूणकर
' यांची संमति आहे.' ३०-८-०४चे पत्रांत रा. जोशी लिहितात-'चिपळूणकरांच्या
' निबंधांत व गोडबोले यांचे व्याकरणांत अंत्यस्वर दीर्घ लिहिणें प्रशस्त मानिलें
' आहे. तसेंच, प्रस्तुत नियमांपैकीं पहिले तीन नियम रा. भांडारकर यांस पसंत
' आहेत. शेवटल्या अनुनासिकाचे नियमाविषयीं ते कांहींच बोलत नाहींत.'

**५. सुधारसमितीचे नियम व केसरीनें केलेलें कार्य**—वरील नियमां-विषयीं केसरीनें क्रमानें चार अग्रलेख लिहिले. हे लेख १२-७-०४ च्या अंका-पासून २-८-०४ च्या अंकापर्यंत लागोपाठ आलेले आहेत. पैकीं पहिल्या अंका-मध्यें हातवळणे वगैरे तीन समितिघटकांस सहज जातां जातां मुनित्रय म्हटलें आहे. या उल्लेखावरून यांच्याविषयीं केसरीचें मत आरंभीं विशेष अनुकूल नव्हतें, असें दिसतें. १९ तारखेचा दुसरा अंक गहाळ झाला आहे. २६

तारखेच्या या विषयाच्या तिसऱ्या अंकांत अधिक माहितीमुळें केसरीची दृष्टि निवळलेली दिसते. पहिल्या अंकांतील लेख लिहिला तत्पूर्वी, डॉ. भालचंद्र, विनायक कोंडदेव ओक इ० गृहस्थांनीं सरकारी समितीच्याविरुद्ध सभा भरविली होती व त्या सभेंतील कामाचें अनुवृत्त ( Report ) केसरीकडे आलें होतें. या अनुवृत्तांत सरकारी समिति शुद्धलेखनामध्यें आपल्या अधिकाराचे जोरावर अवास्तव खटपट करीत आहे, संस्कृत शब्दांचें मराठींतील लेखन भ्रष्ट करीत आहे, भलभलत्या ठिकाणीं आजपर्यंतची रूढि मोडून पाणी, लोणी यांच्या अंतासारख्या स्वरांवर अनुस्वार देत आहे इ० सर्वथा निर्मूल असे आक्षेप घेण्यांत आलेले आहेत. हे आक्षेप समूल मानून केसरीनें आपल्या भेदक लेखणीनें समिति-घटकांस मुनित्रय या शेलक्या उपपदानें हास्यास्पद केलें. पुढें रा. हातवळणे यांच्या पत्रानें, व अवांतर मार्गांनें, माहिती मिळून समितीची विचारपद्धति योग्य आहे, असें दिसून येतांच समिति दोषार्ह नाहीं, असें चक्क प्रशस्तिपत्र (Certificate) केसरीनें त्यांस दिलें आहे. २-८-०४ च्या चवथ्या अंकांत समितीच्या नियमांस उचलून धरलें आहे (१) 'तत्सम' ऱ्हस्व इ-उ-कारान्त शब्द **कोशांत** ऱ्हस्व लिहावे व **वाक्यांत** पद या नात्यानें दीर्घांत लिहावे, असें विशेष प्रामुख्यानें सांगितलें आहे. अशा रीतीनें पदांचे अंत दीर्घ स्वीकारल्यानें त्यांमध्यें अव्ययेंहि समाविष्ट असल्यानें, त्यांचेहि अंत वाक्यामध्यें आपोआपच दीर्घ ठरतात. आतां अव्ययें हीं कोशांतल्याच रूपानें वाक्यांत प्रयुक्त होत असल्यामुळें वाक्यांत जर तीं दीर्घांत लिहावीं तर कोशांतहि तशींच लिहावीं, हें उघडच ठरतें. अर्थात् या नियमास 'आणि तथापि, परंतु' इ० परिमित अपवाद मानणें प्राप्त आहे. संस्कृत उकारान्तांचें रूप आपण बदलीत नाहींच असें नाहीं. गति-गत, रीति-रीत, जाति-जात अशाप्रकारें इकाराचे स्थानीं अकार योजितों. वस्तूचें रूप वस्त असें करितों. 'तन-मन—धनें करून' या प्रयोगांत तनूचें तन असें रूप आपण योजितों. असें स्वरांतर करून हे शब्द आपण शुद्ध मराठी बनवितोंच. या मराठीकरणामध्यें स्वरांतर ( इ—उ—चे स्थानीं अकार ) जर खपतें, तर स्वरदीर्घत्व कां खपूं नये ! शिवाय हेंहि दीर्घत्व सार्वत्रिक करावें, असाहि आम्ही आग्रह करीत नाहीं. मति-भ्रंश अशा ठिकाणीं समासांत शुद्ध ऱ्हस्वान्त रूप लाभावें म्हणून, हे शब्द कोशांत ऱ्हस्वान्त द्यावे, ही सवलत आम्ही ठेवीतच आहों. शिवाय ऱ्हस्वत्वाचा आग्रह धरणाऱ्या लोकांनाही मतीनें, धेनूला, भानूचा इ० ठिकाणीं म्हणजे **सामान्य रूपाच्या अंतीं** हे स्वर दीर्घ करणें मान्य आहेच. अशा प्रकारें समितीची कामगिरी केसरीनें प्रायः पसंत केली आहे. कांहीं थोडया ठिकाणीं विसंवादहि दाखविला आहे. ( २ ) घर, मग, फळ इ० शब्दांचा उपान्त अ जर दीर्घ लिहूं नये हें कबूल, तर विष, गुण इ० शब्दांचे उपान्त इ—उ हे तरी दीर्घ कां लिहावे ?

अ–इ–उ या तिन्ही स्वरांना सारखेंच वागवावें. शिवाय केसरी म्हणतो,–एकट्या उच्चाराचे जोरावर संस्कृत शब्दांचीं रूपें पालटणें योग्य नाहीं. केसरी पुढें म्हणतो, ( ३ ) व्यंजनान्त शब्द अकारान्त लिहावे हा नियम सर्वच शब्दांस एकदम लावूं नये. कारण, मराठी भाषा वाढती आहे, तेव्हां तिच्यांतील नियम सर्वस्वीं निरपवाद न करितां त्यांत अपवादांस जागा ठेवावी. ( ४ ) अनुस्वाराचे बाबतींत अग्रलेखांत म्हटलें आहे,–' जे अनुनासिक केवळ प्रांतविशिष्ट असतील ते ' गाळावे. प्रांतभेदानें जे वैकल्पिक असतील ते, अर्थभेदास उपयुक्त किंवा व्युत्पत्ती-' नें आधारित असतील तेच, अवश्य ठेवावे; पण ज्या ठिकाणीं आज आपण ' अनुनासिक देत नाहीं, तेथें व्युत्पत्तीला स्मरून नवीन प्रवृत्त करण्याचें कारण ' नाहीं; उदा० केंस हा शब्द कोंकणांत अनुनासिकानें सहित, तर देशांत रहित, ' उच्चारण्यांत येतो. हा अनुनासिक अर्थभेदास जरूर नाहीं. ( मग प्लेगची केस ' इ० ठिकाणच्या भिन्नार्थक शब्दाचा विचार केल्यास गोष्ट निराळी ). हा अनु-' नासिक मूल संस्कृत केश या शब्दांतहि नाहीं. करितां मराठींत केस असें अनु-' नासिकहीन रूप घेणें प्राप्त आहे. वांटणें हा शब्द प्रांतभेदानें अनुनासिकानें ' सहित व रहित असतो. या अनुनासिकानें '( मनाला ) वाटणें ' व '( भक्तांना ' प्रसाद ) वांटणें ' अशा ठिकाणीं क्रियापदांतील भेद व्यक्त केला जातो, म्हणून तो ' ठेवावा. परंतु 'सांचे जयांत सुरसाचे ' यांतील **सांचा** हा शब्द **संचय** यावरून आला ' आहे. अर्थात् त्यांतील अनुनासिक समूल आहे; म्हणून तो रक्षणीय ठरतो. आतां ' त्रिंशत्–तीस, कामला–कावीळ इ० ठिकाणीं **ती** व **का** या अक्षरांवर व्युत्पत्ति-' दृष्ट्या अनुनासिकाची प्राप्ति होते. तरी पण ' नसल्या ठिकाणीं अनुनासिक नवीन ' प्रवृत्त न करणें ' या नियमानुसार हे शब्द निरनुनासिकच लिहावे;' अशा प्रकारचें मत केसरीनें समितीच्या नियमांबद्दल व्यक्त केलें आहे. यांतच एक महत्त्वाचा इशारा दिला आहे तो असा–' भाषेच्या वाढीस सवड ठेवण्याकरितां कोणत्याही ' सुधारणेची अंमलबजावणी तात्कालिक किंवा कडकपणें करूं नये.' हा इशारा किती पोक्तपणाचा व आपलेपणाचा आहे, हें सांगणें नकोच.

६. **सुधारणासंबंधीं केसरीचें सामान्य धोरण**—शाळाखात्यानें भाषेची ओळख करून देणाऱ्या प्राथमिक पुस्तकांत वर्णमालेमध्यें अनेक प्रकारची फिरवा-फिरव, अर्थात् सद्धेतूनें, सुचिविली. तिच्यावर लिहितांना ४-१०-०४ च्या अग्रलेखास केसरीनें **आमच्या वर्णमालेचा खून** असा मथळा घातला आहे. यांत सरकारी धोरणाच्याविरुद्ध केसरीचें धोरण स्पष्ट दिसतें. त्याचें कारण, वर्ण-मालेंतील फेरफारांनीं मिळवूं पाहिलेला सोपेपणाचा लाभ हा त्यापासून होणाऱ्या शास्त्रीयता, पारंपरीणत्व इत्यादिकांच्या हानीपुढें अगदींच क्षुद्र होय, हेंच मत आहे. असो. हा वर्णमालेचा विषय प्रस्तुत नसल्यानें त्यावर जास्त लिहिण्याचें कारण नाहीं. या लेखावरून आपणांस एवढेंच उचलावयाचें कीं कोणतीहि

सुधारणा करतांना तज्ज्यन्य हित व अहित या दोघांची तुलना करून हित अधिक ठरेल तरच ती सुधारणा ग्राह्य, असें केसरीचें मत आहे. याच अग्र-लेखांत पुढें म्हटलें आहे कीं,—नव्हे—सरकारास एकप्रकारें आव्हानच दिलें आहे कीं, शाळाखात्याची व्यवस्था लोक मानतीलच असें नाहीं. भाषेची वाढ होणें ती लोकमत, युक्ति व विद्वत्ता यांच्याच जोरावर झाली पाहिजे; सरकारच्या जोरावर होऊन उपयोगी नाहीं. वर्णमालेंतील योजिलेल्या फेरफाराविरुद्ध लोकांनीं सरकारांत अर्ज पाठवून तद्विषयक आपली नापसंती स्पष्टपणें कळवावी, असेंही केसरीनें लोकांस बजाविलें आहे. येथील सरकारी धोरणावर टीका करतांना, आपलें उपहासाचें शस्त्र चालविण्यास केसरी विसरला नाहीं. तो लिहितो, 'मुलास ' अगोदर ग शिकवावा, नंतर म, पुढें भ. त्याच्यापुढें काय ? र ड, आणि अशा ' रीतीनें पुढें काय होणार ? ढ. '

याच संबंधांत तत्कालीन विद्याधिकरणाधिपति प्रायरसाहेब यांनीं १९०७ या वर्षी दिलेला अभिप्राय केसरीनें सादर छापिला आहे. यावरून इष्ट ती सुधारणा सरकारनेंहि केल्यास केसरी तिचें अभिनंदन करितो; वृथा पक्षाभिमानानें तिचा त्याग करीत नाहीं, हें उघड आहे. प्रस्तुत अभिप्राय १४-४-१४ च्या अंकांत 'मोडी कीं बालबोध?' या मथळ्याच्या अग्रलेखांत दिला आहे. तो अभिप्राय असा—'मोडींत ऱ्हस्वदीर्घांच्या खुणा नाहींत; यामुळें, मोडीचा अर्थ कळला नाहीं ' किंवा त्याबद्दल कोणाला शंका आली, असें एकही उदाहरण माझ्या आठवणींत ' नाहीं. करितां ऱ्हस्वदीर्घाभावामुळें मोडी लिपी त्याज्य मानूं नये. जास्त सोईकरितां ' तिच्यांत वाटल्यास फेरबदल कसे करावे.' यासंबंधांत प्रायरसाहेब स्पष्ट म्हणतात— ' कोणत्याही लिपींत फेरबदल व्हावयाचे ते लोकांचे लोकांनींच केले पाहिजेत. ते ' त्यांच्यावर लादणें चुकीचें आहे.' यासंबंधांत जातां जातां सुचवावेंसें वाटतें कीं, हल्लींचें व्याकरणासंबंधीं शाळाखात्याचें धोरण सर्वस्वीं एकतंत्री आहे. अलीकडे त्यानें व्याकरणसुधारणा (?) चालविली आहे. पण यासंबंधांत लोकमताचें सह-कार्य मिळविण्याकरितां, या सुधारणांची उघड खुली चर्चा तें करीत नाहीं; केवळ कांहीं विद्वान् मिळवून योजना ठरविण्यांत आली आहे व ती दरोबस्त जनतेवर अधिकारबलानें लादण्यांत येत आहे. या गोष्टीस उपरि उल्लेखिलेल्या आपल्या धोरणानुसार प्रतिबंध करणें केसरीस क्रमप्राप्त आहे. पण महत्तर राजकीय विषयां-पुढें असल्या वाग्विषयांचा विचार करण्यास केसरीस हल्लीं सवड होत नाहींसें दिसतें.

**लोकसंग्रह** हे सुधारणांच्या निर्वहणांतील केसरीचें धोरण इतर विषयांतहि दिसून येतें. केसरीच्या पंचाशद्वर्षपूर्तीच्या अंकविशेषांत चौदावें पानावर लोक-मान्यांचें पुढील मत महत्त्वाचें आहे. टाइपाच्या सुधारणेच्या बाबतींत ते म्हण-तात, 'लोकांच्या डोळ्यांत न खुपेल अशी आस्तेकदम सुधारणा असावी. सर्वच

‘ सुधारणेचा मक्ता आपण केव्हांहि घेऊं नये. आज थोडी सुधारणा करावी, ती
‘ पचनीं पडली कीं उद्यां थोडी. केव्हांहि सुधारणा करण्याला पुढील पिढीस वाव
‘ ठेवावा; म्हणजे आपल्यावर व लोकांवर बोजा न पडतां, सर्व काम निमूटपणें
‘ होतें. ’ याच अंकांत पान ६२ त ते म्हणतात–‘ केसरी महाराष्ट्राचा आहे. मीं
‘ आणिलाहि नाहीं व घेऊनहि जाणार नाहीं. ज्यांचें अंतःकरण खरोखर जळत
‘ असेल, अशा सर्व राष्ट्रभक्तांनीं तो चालविला पाहिजे. आज जे केसरीचे वर्गणी-
‘ दार व साहाय्यक आहेत, त्यांच्या विचाराबाहेर केसरीनें जावयाचें नाहीं. ते सर्व
‘ राखलेच पाहिजेत. येथें कोणाहि योग्य पुरुषास कर्तबगारी दाखविण्यास वाव
‘ आहे. ’ या अवतरणामध्यें केसरीची प्रेमळ लोकसंग्राहक व उदार अशी बुद्धि
स्पष्ट दिसून येते.

रा. केळकर यांनीं शुद्धलेखनाच्या बाबतींत पुष्कळच सुधारणा सुचविल्या
व त्या अमलांत आणण्याचें साहसहि करून पाहिलें. पण कोणची का होईना,
सर्वच्या सर्व सुधारणा लोक एकदम पतकरीत नाहींत हें पुन्हा एकदां सिद्ध झालें.
वास्तविक पाहतां रा. केळकर यांच्या सुधारणा सदोष नाहींतच; उलट सर्वस्वी
निर्दोष, इष्ट व आवश्यक आहेत असें म्हटलें पाहिजे. या सुधारणांची मराठी-
च्या वाढत्या संसारास अत्यंत जरूर आहे. पण सांगावयाचें तें इतकेंच कीं
जरूर अमलांत यावयास हवी अशा प्रकारची ही सुधारणा स्वीकार्य बनविण्यास
ती सगळीच्या सगळी लोकांपुढें मांडूं नये. कारण कीं चांगली वस्तु सुद्धां अप्रिय
बनून रहाते. असो.

**७. शुद्धलेखनासंबंधीं आनुषंगिक विचार**—महाराष्ट्रांत पेशवाईचा अंत
होऊन गेल्या शतकांत आंग्लशाही प्रवृत्त झाली. ही प्रवृत्त होण्याबरोबर विविध
क्षेत्रांत नानाविध फरक झाले. विद्यार्जनाच्या संबंधांत तर मोठीच क्रांति झाली.
जुन्या पंतोजींच्या शाळा व पाठशाळा क्रमानें मागें पडून नवीन पद्धतीच्या शाळा
प्रसृत होऊं लागल्या. या शाळांतून विद्याध्ययन चालून १८५०च्या सुमारास
मुंबई विश्वविद्यालय स्थापन झालें, व मराठींतील नियतकालिकें व पुस्तकें यांतून
गद्य लिहिण्यांत येऊं लागलें. यावेळीं, लेखक बहुधा उच्च वर्णांतील असत;
कारण त्यांच्यामध्येंच विद्याप्रसार झाला होता. इतर वर्ण प्रायः अशिक्षितच होते.
या गद्य लेखकांच्या प्रवृत्तीबरोबरच एक विशिष्ट प्रकारचें लेखन, अर्थात् बहु-
मतानें, मराठींत प्रवृत्त झालें. हें एकदम प्रवृत्त झालें, असें कोणीं समजूं नये.
भिन्न भिन्न लेखक आपल्या मतानुसार लेखन करीत असत. त्या सर्वांचा पर-
स्परांवर आघात-प्रत्याघात होऊन **शक्ततरातिजीवन** ( The survival of the
fittest ) या न्यायानें एक विशिष्ट नियम-समुच्चय रूढ झाला. या समुच्चयास अनु-
सरून सरासरीं १९०० सालपर्यंत लेखन सुरू होतें; म्हणजे लेखनपद्धति १८५०
पासून ५० वर्षेपर्यंत कांहीं विशिष्ट शुद्धलेखन–नियमांनीं नियमित होती.

काळाच्या ओघाबरोबर मागासलेले वर्णहि विद्यार्जन करूं लागले. अर्थात् त्यांची बुद्धिविषयक कुवत सापेक्षतेनें कमी असल्यानें, त्यांस पूर्वीचे शुद्धलेखनाचे नियम वारंवार अडूं लागले. हे नियम सुशिक्षित वर्गानें केले होते, व ते पाळिले होते-हि त्यानेंच. ते त्याला कठिण वाटण्याचें कारण नव्हतें. पूर्वी, मराठीची शिक्षित जनता थोडी अर्थात् लहान होती; ती आतां मोठी झाली. उच्च वर्णाबरोबर खालचे वर्णहि लेखन करूं लागले. लहानपणाचा कपडा मोठेपणीं अडूं लागतो; त्याप्रमाणें अल्पजनतेचे नियम मोठ्या जनतेच्या अंगास दाटूं लागले. तेव्हां हे नियम शिथिल करण्याकरितां तीव्र इच्छा जनतेंत उत्पन्न झाली. याच इच्छेचें फळ म्हणजे ( सरकारनें नेमलेली ) शासनिक सुधारसमितीची योजना हें होय. १८५० पासून १९०० पर्यंत एक नियमावली चालली, तशीच दुसरी नियमावली १९०० ते १९२५ पर्यंत चालली. याच्या पुढें मूळ-महाराष्ट्रप्रमाणें शाखा-महाराष्ट्रांतहि मराठीची जोपासना, शाळा, नियतकालिकें, कोश, इत्यादि रूपानें सुरू झाली; व अलीकडे मराठीच्या या नवीन उपप्रांतांतील लोकांची अशी मागणी चालू आहे कीं शुद्धलेखनाचे नियम अधिक सोपे अर्थात् संग्राहक करावे. ही मागणी मराठीच्या क्षेत्रविस्ताराची गमक असल्यानें सर्वथा अभिनंदनीय आहे. तिची पूर्तता केंद्रस्थ विद्वानांनीं यावच्छक्य केली पाहिजे; म्हणजे सुधारणा सशास्त्र व नियमित अशी होईल; अन्यथा ती अशास्त्रीय प्रवाहांनीं स्वैर वाहूं लागेल, हें उघड आहे. आपल्या कुटुंबाचा विस्तार व्हावा व मुलांनीं, नातवांनीं अधिकाधिक क्रीडांगणें, माड्या, जिने, गच्च्या, इत्यादि सुखसोई कर्त्या पुरुषांशीं मागाव्या, हें केव्हांहि इष्टच आहे. लकडीपुलावरची रहदारी वाढून जनतेला तो पूल अरुंद वाटल्यानें तिच्या मागणीप्रमाणें सोय करण्याकरिता तो रुंद केलाच कीं नाहीं ? अशाच रीतीनें शिकणाऱ्या वाढत्या जनसंख्येबरोबर तिच्या शक्तीस झेपतील अशाच बेताचीं ढिलीं नियमबंधनें ठेवावीं. पूर्वीचे नियम जनतेस जड जात असल्यास ते सोपे करणें प्राप्त आहे; मात्र हें काम विद्वानांनींच केलें पाहिजे. कपडा ढिला करून घ्यावयाचा झाला तरी तो कुशल शिंप्याकडूनच घ्यावा लागतो. अशा प्रकारची मागणी वऱ्हाड, गोवें, इत्यादि मराठीच्या उपप्रांतांतून अलीकडे जोरानें होऊं लागली आहे. या मागणीची यथाशास्त्र पूर्तता करण्यासाठींच मराठी साहित्यसभेनें अलीकडे ४ वर्षें खटपट चालविली आहे. सारांश, शुद्धलेखनांत फेरफार हे अभ्यासकांच्या संख्येच्या वाढीबरोबर अपरिहार्यच आहेत; व असे फेरफार शास्त्रानुसार करणें हे विद्वानांचें कर्तव्य आहे. या शुद्धलेखनासंबंधांत यथापूर्वोक्त काळाचे असे भाग पडतात. (१) **अग्रवर्णीय पर्व** १८५०--१९००. या पर्वांत बहुधा पांढरपेशे लोकच लेखन करीत असत. (२) **अनुवर्णीय पर्व** १९००--१९२५. या पर्वांत खालच्या वर्णांचे लोकहि विद्यार्जन करूं लागले. (३) **उपप्रांतीय पर्व** १९२५

पासून सुरू. या पर्वांत मराठीच्या उपप्रांतांत म्हणजे इंदूर, मध्यप्रांत, गोवें इ० भागांत विद्याप्रसार होऊन मराठीलेखनाची आवड व मुख्य महाराष्ट्रांतील विद्वानांशीं स्पर्धेची सात्त्विक ईर्ष्या उत्पन्न झाली आहे. या लोकांचाहि, थोरपणानें आपले धाकटे भाऊ म्हणून, केंद्रीय विद्वानांनीं आदर करणें प्राप्त आहे. असें केल्यानें केंद्रीय विद्वानांस सहचरांच्या संख्यावृद्धीचा लाभ होईल. या लाभाचे उतराई होण्यास विद्वानांनीं उपप्रांतीय लोकांच्या मार्गांतील अडचणी कमी करण्याकरितां, लेखनबंधनें ढिलीं करणें प्राप्त आहे. अशा रीतीनें सिद्ध होतें कीं खोलीनें व विस्तारानें **वाढणाऱ्या भाषेचें शुद्धलेखन तिच्या वाढीबरोबर वेळोवेळीं अधिकाधिक सुकर झालेंच पाहिजे.** तेव्हां ऱ्हस्व-दीर्घांचा लढा लागल्यास, दीर्घस्वर सुलभोच्चार वाटत असल्यानें तोच अखेर विजयी होणार हें उघड आहे. अशाच रीतीनें निरनुनासिक स्वर अनुनासिकावर मात करणार हेंहि निश्चित. मग जी गोष्ट अवश्य होणारच, तिला आपण होऊन संमति देऊन शिष्टांनीं आपला बोज राखावा, कीं तीस संमति न देतां आपल्या अनुज्ञेविरुद्ध ती घडलेली पाहून नुसतें जळफळत बसावें ? सारांश, शुद्धलेखनाचें धोरण सर्वथा संग्राहक असावें, परिवर्जक असूं नये.

८. **संशोधन**—( १ ) अनुवाक ५ मध्यें **संवय** व **भोंकणें** यांतील प्रथमाक्षरावरील अनुनासिक निर्मूल असल्याचें म्हटलें आहे. पण तो तसा नाहीं. वहिवाट, संप्रदाय, एतदर्थक **समय** हा शब्द संस्कृतांत आहे. **वहिवाट** या अर्थावरून **अभ्यास** हा अर्थ अत्यंत सुखसाध्य आहे. **संवय** हें रूपहि समय याचें सहज होण्यासारखें आहे. अशा रीतीनें संवय हा शब्द रूपतः व अर्थतः समय-वरून साध्य असल्यामुळें, त्यांतील अनुनासिक समूलच दिसतो. ढक्का—डंका, उच्च-उंच, भित्ति-भिंत, पिप्पल-पिंपळ, युद्ध-झुंज, इत्यादि शब्दयुग्मांवरून द्वि(रावृ)त्तव्यंजनामुळें मराठींत अनुनासिक येतो, असें दिसतें. एतदनुसार **बुक्क**-भुंकणें यावरून **भोंकणें** हें रूप सिद्ध होत असल्यानें, यांतीलहि अनुनासिक व्युत्पन्नच ठरतो. ( २ ) अनुवाक ६ मध्यें अ-वर्णाशीं इ-उ-वर्णांचें साम्य सांगितलें आहे. पण हें साम्य भ्रममूलक आहे. विहीण-विहिणीस, वरात-वरातींत, या शब्दयुग्मांत सामान्यरूपाच्या उपान्तस्थानीं ( दीर्घ ) ईकाराचे जागीं इ आला आहे; पण आकाराचे स्थानीं अ आला नाहीं. यावरून उघड ठरतें कीं इ—उ—वर्णांच्या ऱ्हस्वदीर्घांत जसा संबंध आहे तसा संबंध अ—आ यांच्यामध्यें नाहीं. अर्थात अ—ला इ—उ—वर्णाप्रमाणें वागविणें योग्य नाहीं, हें सिद्ध होतें. (३) याच अनुवाकामध्यें केवळ **उच्चारानुसार लेखन बदलूं नये**, असें सांगितलें आहे. पण हें वस्तुस्थितीस धरून नाहीं. **लेखनांत बदल होतो तो उच्चारानुसारच होतो**; मग तो उच्चार व्युत्पत्तीस धरून असो वा सोडून असो. द्वाविंशति याचे **बावीस** या रूपांत व्युत्पत्तिदृष्ट्या अनुनासिक प्राप्त होतो; शिवाय असा

अनुनासिक ' विहिरीस ' एतदर्थक ' बावीस ' या रूपाहून अर्थभेद दर्शविण्याकरितां उपयुक्तच झाला असता. अशा रीतीनें येथें व्युत्पत्ति व सोय दोन्ही अनुनासिक मागत आहेत, व एकटा उच्चार तो नाकारीत आहे; व आपण केवळ उच्चारास प्राधान्य देऊन अनुनासिक गाळीत आलों आहों; व पुढेंहि २ + २० एतदर्थक शब्दरूप बावींस असें लिहिण्याची शिफारस कोणी करील हें संभवनीय दिसत नाहीं.

---

# नाट्य

[ श्री. त्र्यंबक सीताराम कारखानीस ]

' केसरी व नाट्य ' हा शब्दप्रयोग आजच्या पिढीला तरी वदतोव्याघाताप्रमाणें वाटून कांहींसा बुचकळ्यांत पाडील. कारण केसरी म्हणजे राजकारण. मृगराज राजकारणनिमग्न, हीच त्याची वृत्ति. सिंहासन हें आसनच राजकीय, आणि या पिढीच्या प्रारंभींच दादाभाई नौरोजींनीं ' स्वराज्या 'ची निःसंदिग्धपणें घोषणा केली त्या वेळेपासून तर या पिढीच्या कर्णपथावर केसरीची ती एकच एक गर्जना प्रामुख्यानें दुमदुमून, केसरी म्हणजे राजकारण अशी भावना दृढमूल झाली तर त्यांत नवल कसलें !

पण चालू पिढीची ही भावना सामान्यतः जरी खरी वाटण्यासारखी असली, तरी केसरीची राशियत ही इंग्लंडांत एके काळीं होऊन गेलेल्या विरक्तां( Puritans )ची किंवा आमच्या इकडील निवृत्त धार्मिकांची राशियत नव्हे; अवरंगजेबाची कडवी बादशाही नव्हे किंवा प्लेटोची मनःकल्पित प्रजाशाही नव्हे; कीं ज्या राशियतींत नाटकगृहांना कुलपें बसलीं, नटांचें मुखावलोकनहि निषिद्ध मानलें गेलें, नटांना किंवा सोंगाड्यांना, फार काय सर्व ललितकलांनाहि, थारा नाहीं, असें झालें !

केसरीची राशियत अशी नव्हे, इतकेंच काय, पण महाराष्ट्रांतील नाट्यविषयक चळवळीच्या बाबतींत केसरीनें आज पन्नास वर्षांत काय कामगिरी केली, ती जर केसरीच्याच सिंहावलोकनानें आपण पाहूं लागलों तर केसरी केवळ राजकारण-निमग्न असा कडवा विरक्त तर नाहींच नाहीं, उलट नाट्यादि ललितकलांचा मोठ्या अभिमानानें पुरस्कार करणारा आहे असेंच आपणांस आढळून येईल; व त्यानें निदान आरंभीं आरंभीं तरी या बाबतींत जें कार्य केलेलें आहे,

तें पाहून आजच्या पिढीला कौतुक व धन्यता वाटल्यावांचून खास राहणार नाहीं. कारण, केसरीचें राजकारण सर्व मानवी प्रवृत्तींचा समावेश करणारें असून, मनुष्याच्या उत्सवप्रिय प्रवृत्तींतून निघालेल्या नाट्यादि ललितकला या जर त्यांच्या सुष्ट प्रभावानें उपयोजिल्या, तर त्या राजकारणाला उपकारकच आहेत, असा केसरीचा मुक्रर अभिप्राय आहे. केसरीच्याच शब्दांत सांगायचें तर, 'वर्तमान-
'पत्रें, मासिकपुस्तकें, ग्रंथ, व्याख्यानें इत्यादिकांचा प्रसार जसा सर्वथा इष्ट आहे,
'त्याप्रमाणेंच नाटकाचीहि गोष्ट होय.' (२९-११-८१)—'जशा शाळा वर्त-
'मानपत्रें, सभा वगैरे एकेक जबर तरफा लोकशिक्षणार्थ उपयोगी आहेत, त्या-
'प्रमाणेंच देशोन्नतीचें एक प्रचंड साधन वरील (नाट्य) कला, होय;'
(२१-१२-८१) असें केसरी स्पष्टपणानें म्हणतो.

आतां केसरीनें ही कामगिरी गेल्या पन्नास वर्षांत कशा प्रकारें केली, हें आपणांस संकलित रीतीनें येथें पाहावयाचें आहे. कोणत्याहि गोष्टीची एखाद्या समाजांत चर्चा सुरू होणें हें त्या गोष्टीविषयीं त्या समाजांत उत्पन्न झालेल्या आस्थेचें एक लक्षण होय आणि एखाद्या इष्ट गोष्टीविषयीं तशी आस्था जर उत्पन्न झाली नसेल, किंवा उलट अनास्थाच दृष्टीस पडत असेल, तर ती नाहींशी करून त्या जागीं योग्य ती आस्था उत्पन्न करण्यासाठीं आपण होऊन त्या गोष्टीची चर्चा सुरू करणें हें समाजांतील विद्वानांचें म्हणजे अर्थातच वर्तमानपत्रकारांचें एक प्रमुख कर्तव्य होय. केसरी सुरू झाला त्याच सुमारास वाङ्मयाच्या अभिवृद्धी-साठीं महाराष्ट्रांत 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' या नांवाची एक संस्था निघा-लेली होती. नाटकादि मनोरंजक ग्रंथ हेहि वाङ्मयांतच येत असतां त्यांना या 'मंडळी'नें अजिबात फांटा दिलेला पाहून, 'मंडळी'च्या या अनास्थेबद्दल केसरीनें त्यावेळीं जी गर्जना सुरू केली व त्या ग्रंथांची मोठ्या आवेशानें जी तरफदारी केली, ती पाहिली म्हणजे एकंदर ललितवाङ्मयासंबंधानेंच केसरीला केवढा अभिमान वाटतो हें आपणांस कळून येणार आहे. 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' या मथळ्याखालींच केसरीच्या पहिल्या वर्षांत एक लेखमाला आली असून, सदर 'मंडळी'च्या मूळ संकल्पांतील एतत्संबंधीं अनास्थेवर केसरीनें पुढीलप्रमाणें टीका केली आहे;—

'मूळ संकल्पांत मोठी चूक ही होय कीं, काव्यें, नाटकें, कादंबऱ्या वगैरे
'ग्रंथांस सदर मंडळीनें मूळ संकल्पांतच अगदीं फांटा देऊन, आजपर्यंत तसाच
'क्रम ठेवला आहे....प्रस्थापकांचा कृतनिश्चय दिसतो कीं, ऐतिहासिक, शास्त्रीय
'वगैरे प्रकारचींच पुस्तकें वाचकांच्या हातीं द्यावयाचीं, व 'मनोरंजक' या
'वर्गांत मोडणारीं जीं काव्यकादंबऱ्यादि पुस्तकें त्यांचा अगदीं स्पर्शहि महाराष्ट्र-
'देशीय वाचकांस होऊं द्यावयाचा नाहीं....या त्यांच्या आग्रहावरून खिदळ-
'णाऱ्या पोरासोरांस पुष्कळ वेळां शिष्ट वृद्धजनांकडून जो उपदेश होत असतो,

' त्याची बरीक आम्हांस येथें आठवण येते. ' अरे, किती नेहमीं खिदळतां रे !
' चांगलें एके ठिकाणीं बसावें, अभ्यास करावा, तें सोडून देऊन सारा दिवस धिंगाणा
' काय घालतां !' या उपदेशाच्या समयीं जेठा मारून स्वस्थ बसलेले उपदेशक
' आपलें लहानपण जसें अजिबात विसरून जातात, व ज्याच्या योगानें पोट भरत
' नाहीं तो खेळ काय उपयोगी, असें त्यांचें ठरीव मत होऊन तें ते निःशंकपणें
' बोलून दाखवितात, त्यांतलाच ग्रंथोत्तेजक मंडळीच्या व्यवस्थापकांचा हा प्रकार
' होय....साऱ्या पृथ्वींत सुधारलेले म्हणून गाजणारे जे इंग्रज लोक त्यांच्या
' घरची जर अशी स्थिति आहे कीं, तेथें शेंकडों शास्त्रें उजगारीस आलीं असतां
' व कित्येक नवींहि उत्पन्न झालीं असतां, नवीन कादंबरी निघाल्याखेरीज
' आठवडाहि लोटत नाहीं व नाटकाचा प्रयोग झाल्याखेरीज दिवस जात नाहीं,
' तर इकडे अजून कशासच कांहीं ठिकाण नसतां, काव्यनाटकादिकांविषयीं
' आम्हांस येवढें परमवैराग्य कशास धारण करायला पाहिजे !' ( ५-७-८१ ).

काव्यनाटकादि ललितवाङ्मयाची महति जाणणाऱ्या केसरीनें त्याचा कैपक्ष घेऊन ' ग्रंथोत्तेजक मंडळी 'च्या परमवैराग्यशीलतेला वरील लेखांत जो टोमणा दिला आहे, त्याची आठवण आजच्याहि कित्येक वैराग्यशील लोकांना करून देणें जरूर होईल काय ? ऐतिहासिक व शास्त्रीय ग्रंथांची योग्यता केसरी कांहीं कमी मानतो असें नाहीं. ती किती मानतो याची साक्ष केसरीची त्या बाबतींतील कामगिरीच देईल. पण वाङ्मय म्हणजे केवळ ऐतिहासिक आणि शास्त्रीय ग्रंथ तेवढेच होत असें नाहीं. कै. खरे हे संपन्न नसल्याकारणानें त्यांना केवळ पोटासाठीं नाटकें लिहावीं लागलीं व त्यामुळें ऐतिहासिक लेखनक्रियेंत व्यत्यय येऊन, त्यांच्या कालाचा अपव्यय झाला, याबद्दल एका इतिहासभक्ताचे खेदोद्गार कै. खरे यांच्या मृत्युलेखांत निघाले आहेत. नाटकादि ललितवाङ्मयाविषयींचा केसरीचा वरील लेखांतील कैवार अशा इतिहासभक्तांनीं मनन करण्यासारखा आहे.

केसरीचा जन्मकाळ म्हणजे उच्च शिक्षणाच्या नव्या नवलाईचा काळ. शेक्स्पियर-कालिदासादि अभिजात नाटककारांच्या नाटकांचें अध्ययन कॉलेजांतून तेव्हां होत होतें; भाषांतररूपानें व प्रयोगरूपानेंहि सदर नाटककारांचा सामान्य लोकांस परिचय होऊं लागला होता. साहजिक ' कालिदास हा हिंदुस्थानचा शेक्स्पियर होय ' ' कालिदास श्रेष्ठ किं भवभूति श्रेष्ठ ? ' असलीं मतें व प्रश्न यांच्या चर्चा लोकांत त्या नव्या नवलाईच्या काळीं सुरू झाल्या. त्या वेळीं ' उत्तम नाटक म्हणजे काय ? ' याचा खल करून वरील मतांची व प्रश्नांची चर्चा केसरीनें पहिल्याच वर्षाच्या ८-३-८१च्या अंकांत ' शेक्स्पियर, कालिदास व भवभूति ' हा अग्रलेख लिहून केली आहे; व ' कालिदास हिंदुस्थानचा शेक्स्पियर--म्हणजे हिंदुस्थानच्या
' कवींपैकीं शेक्स्पियरशीं तुलना करण्याजोगा कालिदास होय. यावरून शेक्स्-
' पियरचे सगळे गुण कालिदासांत आहेत, असा अर्थ मुळींच निघत नाहीं;' असा

आपला अभिप्राय सप्रमाण सिद्ध करून लोकांत रूढ होऊं पहाणाऱ्या भलत्याच भ्रमाचें आविष्करण केलें आहे.

पण हे जे आतांपर्यंतचे लेख ते, नाटकाचें श्राव्य म्हणजे वाङ्मयरूप त्याबद्दलची चर्चा करणारे होत. नाटकाचें खरें महत्त्व किंवा कार्य त्याच्या दृश्यरूपांतच व्यक्त व्हावयाचें असतें. तें होण्याला म्हणजे नाटकें करणें या गोष्टीला समाजाकडून वेळोवेळीं जो मोठा विरोध होत असतो, अशा वेळीं विद्वज्जनांचा पाठिंबा नाट्यकलेला मिळाला नाहीं तर देशोन्नतीच्या कामीं उपयोगी पडणाऱ्या, पण केवळ लोकाश्रयावर अवलंबून असलेल्या, या कलेचा मार्ग बराच दुस्तर होण्याचा संभव असतो. महाराष्ट्राच्या रंगभूमीचा इतिहास अद्याप एका शतकाचाहि झालेला नाहीं. पण तेवढ्या अवधींत तिला निदान दोन वेळां तरी विशेष रीतीनें, वरील प्रकारच्या विरोधाला तोंड द्यावें लागलें आहे. त्यापैकीं दुसऱ्या वेळचा विरोध हा केसरीच्या अमदानीच्या सुरवातीसच झालेला होता. त्यावेळीं, लोकधुरीण या नात्यानें वर्तमानपत्रानें खरोखर जें कार्य करावयाला पाहिजे तें अत्यंत महत्त्वाचें कार्य, केसरीनें रंगभूमीची वास्तविक योग्यता ओळखून, योग्य वेळीं तिची कड घेऊन केलेलें आहे व त्याबद्दल महाराष्ट्राची रंगभूमि केसरीची सदैव ऋणीच राहील.

हें कार्य कोणतें व त्याचें महत्त्व कां मानावयाचें हें नीट लक्षांत येण्यास प्रथम महाराष्ट्राच्या रंगभूमीला झालेल्या विरोधाचा थोडा पूर्वेतिहास येथें पाहाणें जरूर आहे. आमच्या रंगभूमीची मूळ स्थापना करणारे विष्णुदास भावे यांना अशा प्रकारच्या लोकविरोधाला अगदीं प्रारंभींच तोंड द्यावें लागलें होतें. नटवेष घेणें धर्मबाह्य म्हणून भावे यांचे नाटकांतील मंडळीस दोनतीन वेळ भरपंक्तींतून उठवून लोकांनीं बहिष्कार घालण्याची खटपट केली होती. पण भावे यांना खुद्द त्या वेळचे सांगलीचे श्री. अधिपति अप्पासाहेब यांचाच पाठिंबा होता. कारण रंगभूमीची स्थापना करण्याविषयीं त्यांना मूळ प्रोत्साहन देणारे तेच होत. श्रीमंतांचाच पाठिंबा असल्यामुळें हा अगदीं सामाजिक बहिष्कारापर्यंत जाणारा विरोध पुढें अधिक जोर धरूं शकला नाहीं हें खरें. तरी पण नाटकें करणें ही गोष्ट एकंदरीनें हलकीच गणली जाऊन, जरी समाजांत मानमान्यता असलेल्या एका उच्चवर्णीय संस्थानिकानें तिला पाठिंबा दिला, तरी त्या योगानें तिला समाजांत प्रतिष्ठा आली असें मात्र मुळींच नव्हे. पुढें शिक्षणाचा प्रसार जसजसा होत चालला, तसतशा समाजांत नव्या नव्या कल्पना येऊन त्या मूर्तरूपहि घेऊं लागल्या. रंगभूमीवर आरंभीं नुसतीं पौराणिक म्हणजे समयरंगरसोद्भावीच नाटकें होत, त्यांचे जोडीला पुढें बुकिश म्हणजे पुस्तकांतील ठराविक भाषणांचीं गद्य नाटकेंहि होऊं लागलीं. ही रंगभूमीची वाढ अर्थात् मंदगतीची, स्वाभाविक विकासाची आणि म्हणूनच फारशी लोकांच्या डोळ्यांवर येण्यासारखी नव्हती. पण पुढें

अण्णासाहेब किर्लोस्करांनीं संगीताची ‘नवी टूम’ प्रचारांत आणली, आणि तिचा जो उत्कर्ष झाला, त्या योगानें रंगभूमीचा दर्जा एकदम वाढून क्रांतिच घडून आल्यासारखें झालें. त्यामुळें, हलक्या गणलेल्या या गोष्टीचीहि भलतीच प्रतिष्ठा वाढत चाललेली पाहूनच कीं काय, नाटकाबद्दलच्या विरोधानें समाजांत पुन्हां उचल खाल्ली. हा या वेळचा विरोध पूर्वींहून अधिक तीव्र व व्यापक स्वरूपाचा होता. पूर्वींचा विरोध सांगलीसारख्या एकीकडच्या पंचक्रोशींत धार्मिक सबबीवर केवळ नटांनाच बहिष्कृत मानण्यापुरता मर्यादित होता. पण हा विरोध मुंबई-पुण्यासारख्या राजधानीच्या शहरीं सुरू झालेला असून त्याचें स्वरूपहि पूर्वीं-प्रमाणें केवळ गांवपंचाइतीसारखें नव्हतें. तर नुकतीच जोरांत येऊं लागलेली जी वर्तमानपत्राची संस्था तिचा उपयोग करून घेऊन, नाटकें करण्याची प्रवृत्तिच मुळीं वाईट असें मुळावरच घाव घालणारें पद्धतशीर लोकमत तयार करणें असें या वेळच्या विरोधाचें व्यापक, आणि म्हणूनच जरा जाचक असें स्वरूप होतें. रा. शंकर बापूजी मुजुमदार यांनीं जें अण्णा किर्लोस्करांचें चरित्र लिहिलें आहे, त्यांत या त्या वेळच्या विरोधाचे कांहीं मासले दिलेले आहेत. नमुन्यासाठीं एकच उतारा येथें देतों. तेवढ्यावरून देखील या विरोधाचें स्वरूप बरेच लक्षांत येण्यासारखें आहे. ‘आमच्या विद्वानांचीं कर्तव्यकर्मैं’ या मथळ्याखालील एका लेखांत पुढीलप्रमाणें टीका आहे—

‘लोकांत अज्ञान फार असल्यामुळें त्यांस नानाप्रकारच्या विपत्ति भोगाव्या ‘ लागत आहेत;......असें असतां आमच्या विद्वान् लोकांनीं नाटकें--म्हणजे एक ‘ प्रकारचे तमाशेच करण्यांत तल्लीन व्हावें काय !...लोक ज्यांस थोर मानतात... ‘ त्यांनीं कित्ता चांगला घालून द्यावा....हें जर ते करणार नाहींत आणि नाटका- ‘ सारखा भलताच कित्ता घालून देऊन जर त्यांस कुमार्गास लावतील, तर देशाचें ‘ सर्वस्वी अकल्याण केल्याचें खापर त्यांच्या माथीं फुटणार आहे.’ (चरित्र पृ. ८५)

अशा प्रकारच्या टीका उघड उघड ‘नाटकशत्रु’ अशा टोपण नांवानें त्या-वेळीं मुंबई-पुण्याच्या कांहीं वर्तमानपत्रांतून एकसारख्या येत होत्या. अर्थात् त्यांवरून या विरोधाचें स्वरूप किती गंभीर होतें, हें सहज दिसून येईल. असल्या विरोधाची उपेक्षा केली, तर ‘देशोन्नतीचें एक प्रचंड साधन’ अशी जी नाट्य-कला तिला जो लोकाश्रय अवश्य पाहिजे, तो मिळेनासा होऊन, तिची गळ-चेपीच केल्यासारखें होईल, असें केसरीला साहजिकच वाटलें. आणि म्हणून, ‘नाटकें करावीं कीं करूं नयेत !’ हा जो वर्तमानपत्रांतून मोठा वाद माजला होता, त्यावरच केसरीनें पहिल्या वर्षीं लागोपाठ पांच अंकांत (अं. ४८-५२) अग्रलेख लिहिले आहेत. कारण ‘हाच वाद यापूर्वींहि अनेक वेळां उपस्थित झालेला असून, ‘ पुढेंहि अनेक प्रसंगीं होणारच आहे; यास्तव त्यांत तथ्य कितपत आहे, याचा ‘ ऊहापोह’ सामग्र्यानें व कायमचा करणें केसरीला अत्यंत जरूरीचें वाटलें.

सुरवातीसच ‘ नाटकें करणें बरोबर आहे कीं नाहीं ?’ या प्रश्नाला ‘ अगदीं बरोबर आहे ’ असा सरळ रोकडा जबाब देऊन टाकून, मग पुढें क्रमाक्रमानें केसरीनें आपलें म्हणणें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें आहे.

बरोबर कां ? तर ‘ त्यापासून लोकरंजन होतें म्हणून. लोकरंजनाचा जो जो ‘ मार्ग असेल, तो तो लोकांत अवश्य प्रवृत्त झाला पाहिजे. इतकेंच कीं, त्यापासून ‘ शरीरास किंवा मनास, साक्षात् किंवा परंपरेनें इजा होण्यासारखी मात्र नसावी. ‘ ...मनुष्याच्या मनाचा असा धर्मच आहे कीं,...त्यास स्तब्धता बिलकुल आव- ‘ डत नाहीं. यास्तव लोकनियमनाचें काम ज्यांनीं पतकरलें आहे, व आपल्या ‘ राष्टानें निरंतर सुमार्गानें चालावें असें जे इच्छितात, त्यांनीं अत्यंत उच्छृंखल जें ‘ मन, त्याच्या नियमनाची तजवीज अवश्य केली पाहिजे....पाऱ्यास जसें स्थिर ‘ करतात, त्याप्रमाणें मनासहि स्थिर करणें अवश्य होय. तें जर चांगल्या करमणुकी- ‘ कडे गुंतवून ठेवलें नाहीं, तर अर्थातच तें हवें तिकडे बहकणार....स्वभावतःच ‘ जें मनुष्याचें उत्सवप्रिय मन, तें सत्कवीच्या कृतीकडे वगैरे वेधलें नाहीं तर ‘ किती छक्कडींत गुंतून जाईल याचा नेम लागायचा नाहीं. यावरून वाचकांच्या ‘ लक्षांत येईल कीं, मनुष्यास करमणूक तर पाहिजे, आणखी ती...चांगल्या प्रकार- ‘ ची पाहिजे. आम्हांस वाटतें कीं, नाटक ही अशा प्रकारची करमणूक आहे.... ‘ राष्ट्राच्या करमणुकी सुधारणें ही जर चांगली गोष्ट असेल, तर नाटकांची प्रवृत्ति ‘ जी आज इतके दिवस पडली आहे व आणखी पडत चालली आहे, तींत आमच्या ‘ बुद्धीनें कांहीं गैर दिसत नाहीं....वर्तमानपत्रें, मासिक पुस्तकें, ग्रंथ, व्याख्यानें ‘ इत्यादिकांचा प्रसार जसा सर्वथा इष्ट आहे, त्याप्रमाणेंच नाटकांचीहि गोष्ट ‘ होय....प्राचीन काळच्या व अर्वाचीन काळच्या सुधारलेल्या साऱ्या राष्ट्रांतून ‘ नाटकाचा संप्रदाय विद्वन्मान्य होऊन राहिला आहे....त्यांतून ज्या आमच्या ‘ विद्वानांस साहेबी बूट खाण्याची व आपल्या गौरकाय प्रभूंचा मिथ्या स्तव करून ‘ जिव्हा विटाळण्याची बिलकुल शरम वाटत नाहीं, त्यांस नाटकगृहांत जाण्याची, ‘ किंबहुना रंगभूमीवर येऊन आपल्या देशबंधूस रंजविण्याची येवढी लाज कशाला ‘ वाटायला पाहिजे, हें आम्हांस समजत नाहीं.’(व.१अं.४८)

केसरी ज्या तरुण विद्वान मंडळींनीं सुरू केला, त्यांनीं देशोन्नतीच्या कळकळी- नें इतरहि अनेक संस्था काढून त्या चालविल्या होत्या, हें मशहूरच आहे. ‘ विद्वानांचीं कर्तव्यकर्मे ’ काय, याचा ती मंडळी नुसता तोंडानें उपदेश करीत नव्हती. तर त्यांचें सर्व आयुष्यच ‘ विद्वानांच्या कर्तव्यकर्मा ’ना वाहिलेलें होतें. त्या ‘ कर्तव्या ’चें आचरण करीत असलेल्या केसरीनें वरील उताऱ्यांतील शेवट- च्या वाक्यांत ‘ ( आमच्या विद्वानांस ) रंगभूमीवर येऊन आपल्या देशबंधूंस ‘ रंजविण्याची येवढी लाज कशाला वाटायला पाहिजे !’ असें जे उद्गार काढले

आहेत, त्याचा अर्थ हाच कीं, ' विद्वानांच्या कर्तव्यकर्मा 'संबंधानें केसरीची कल्पना ' नाटकशत्रू 'सारख्या कित्येक लोकांप्रमाणें आकुंचित नाहीं; आणि म्हणून, ' विद्वान लोकांनीं नाटकें करणें म्हणजे तमाशे करणें ' इत्यादि प्रकारचे अगदीं कोते व नाटकासंबंधीं विद्वानांच्या कर्तव्यकर्माबद्दल दिशाभूल करणारे विचार लोकांमध्यें पसरून ते रूढ होणें ही गोष्ट केसरीला मुळींच इष्ट वाटली नाहीं. याजबद्दल सदर लेखमालेंतच पुढें एक दोन ठिकाणीं केसरीनें अगदीं स्पष्टपणानें व ठांसून आपलें मत प्रदर्शित केलें आहे. ' नाटकापासून लोकांची नीति बिघडते ' या, नाट्यकलेवर येणाऱ्या, एका आरोपाचें प्रथमतः समर्पक रीतीनें निरसन करून, पुढें केसरीकार लिहितातः—' वरील सर्व गोष्टी मनांत ' आणल्या असतां, हें उघड दिसणारें आहे कीं, अलिकडे विद्वान मंडळींचें नाट्य- ' कलेकडे अधिकाधिक लक्ष लागत चाललें आहे, ही गोष्ट शोचनीय नसून, सर्व- ' प्रकारें अभिनंदनीय होय.......रंगभूमि आणि अज्ञान व अनीति यांची सांगड ' जी लोकांच्या मनांत पडली आहे, तिची ताडातोड होण्यास, विद्वान लोकांचा ' जवनिकेंत प्रवेश होणें हें एकच साधन होय.'(२१-१२-८१).

' विद्याविशिष्ट मंडळींचें इकडे अधिकाधिक लक्ष लागण्याचीं जीं अलिकडे ' चिन्हें दिसूं लागलीं आहेत, तीं दुश्चिन्हें नसून, सुचिन्हेंच होत असा आमचा ' मुक्रर अभिप्राय आहे.'(२८-१२-८१).

आणि या आपल्या अभिप्रायाच्या समर्थनार्थ केसरीनें जीं प्रमाणें दिलीं आहेत त्यांतील पुढील विशेष लक्षांत घेण्यासारखीं आहेत—

' एतद्देशीय लोकांत सदभिरुचीचा प्रसार होण्यास, भाषांची अभिवृद्धि होण्यास, ' आणि स्वतांच्या प्राचीन स्थितीचें ज्ञान होण्यास उत्तम नाटकांच्या प्रयोगांसारखें ' प्रबल साधन आम्हांस दुसरें दिसत नाहीं.'(२१-१२-८१).

' नाट्यकर्म हें लोकशिक्षणाचें केवढें साधन आहे, हें आमच्या लोकांस ' अद्याप कळूं लागलें नाहीं. जशा शाळा, वर्तमानपत्रें, सभा वगैरे एकेक जबर ' तरफा लोकशिक्षणार्थ उपयोगी आहेत, त्याप्रमाणेंच देशोन्नतीचें एक प्रचंड ' साधन वरील कला होय.'(२१-१२-८१).

सदर लेखमाला एकंदरीनेंच फार महत्त्वाची असून नाट्यकलेच्या वास्तविक योग्यतेचें तात्त्विक विवेचन त्या लेखमालेंत कोणत्या प्रकारें केलें आहे, हें वर जे थोडे उतारे दिले आहेत, त्यांवरून लक्षांत येईलच. त्याशिवाय धार्मिक, अरसिक व कृपण असे जे सामान्यतः नाट्यकलेचे तीन प्रकारचे प्रतिपक्षी त्यांच्या आक्षेपांचेंहि खंडन सदर लेखमालेंत केलें असून केसरीनें त्यांचा नेहमींप्रमाणें खरपूस समाचार घेतला आहे. या आक्षेपकांचा नाटकवाल्यांवर एक मोठा विलक्षण आणि जबरदस्त आरोप असा कीं, ' नाटकवाले लोकांचा पैसा बुचाड- ' तात ! किर्लोस्कर आणि को० म्हणजे वासुदेव बळवंत आणि को०!' हा असला

आरोप उघड उघड वर्तमानपत्रांतूनहि अगदीं न्याय्य आणि यथार्थ म्हणून चोहों-कडे फैलावला जात होता, हें आजच्या पिढीला सांगितलें तर खरें तरी वाटेल काय ? केसरीच्या मतें ' हा विलक्षण आरोप अथेल्लोवर त्याच्या श्वशुरांनीं घेत-' लेल्या बालंटासारखाच होय. ' आणि ' यावर समर्पक उत्तर शेक्स्पियरच्या ' नायकानें राजदरबारापुढें दिलें तेच !'(१३-१२-८१)

हा जो त्यावेळचा वाद उपस्थित झाला, त्याचें मूळ कारण म्हणजे अण्णा-साहेब किर्लोस्कर यानीं काढलेली नवी संगीताची टूम होय, हें पूर्वी सांगितलेंच आहे. नाट्यकलेचा उत्कर्ष करणारा हा नवा प्रकार अण्णासाहेबांनीं सुरू केला, म्हणून सदर लेखमालेंत एक स्वतंत्र लेखच, त्यांच्या या ' बहादुरी 'चें कौतुक करून त्यांना ' प्रोत्साहन ' देण्यासाठीं म्हणून मुद्दाम, केसरीनें लिहिला आहे. अण्णासाहेबांनीं नाटकाला ' गायना 'ची जोड दिली. ' गायन हें मनुष्यमात्रास ' ...अत्यंत प्रिय...दुराचार व ग्राम्यता यांच्या मूर्ति ज्या वेश्या, त्यांच्या खेरीज ' वरील चित्तरंजनाचा प्रकार जर उपलब्ध होऊं लागला, तर ही थोडी सुधारणा ' झाली असें नव्हे;' असें या नवीन प्रकारामुळें होणारें इष्टकार्य लोकनिदर्शनास आणून शेवटीं अण्णासाहेबांच्या उदाहरणावरून घेण्यासारखी मोठी गोष्ट म्हणून सांगितली आहे ती ही—

' जो कोणी एखाद्या कार्याविषयीं समंजसतेनें दृढ प्रयत्न करील त्यास ' किती लवकर व केवढें यश येण्यासारखें असतें, हें प्रस्तुत प्रयोगकाराच्या उदा-' हरणावरून चांगलें शिकतां येण्यासारखें आहे...यास्तव जे ' नाटकशत्रु ' लोक ' अरसिकतेनें किंवा मात्सर्यानें प्रेरित होत्साते संगीतास नांवें ठेवतात व रा. किर्लो-' स्कर यांनीं कमावलेल्या तोड्याच्या राशी म्हणजे वासुदेव बळवंताचा दरवडा असें ' समजतात, ते जर अंमळ शांतपणानें व शोधपूर्वक विचार करतील, तर वरील ' तत्त्व त्यांच्याहि लक्षांत येईल......कोणी कांहीं बहादुरीचें काम केलें, तर त्याचें ' अभिनंदन करणें हें ' केसरी 'चें कर्तव्य असून त्याच्या प्रोत्साहनार्थ सटावधूनन-' पूर्वक† त्याची गर्जना अवश्य ऐकूं आली पाहिजे अशी आमची समजूत आहे. ' यास्तव रिकाम्या कोल्हेकुईस न जुमानतां सद्दू नाट्याचार्यानें आरंभलेला क्रम ' असाच उल्हासानें पुढें चालवावा अशी सूचना त्यास केल्यावांचून आमच्यानें ' राहावत नाहीं.'(६-१२-८१).

अण्णासाहेबांचें हें अभिनंदन केसरीनें किती थोरपणानें, व्यापक बुद्धीनें आणि मोकळ्या अंतःकरणानें केलें आहे ! पुढाऱ्यांच्या असल्या प्रोत्साहनानेंच जनतेंत कार्याविषयीं उल्हास उत्पन्न होऊन केव्हां केव्हां महत्कार्येंहि पार पडतात.

वस्तुतः महाराष्ट्राची रंगभूमि जी जन्मास आली, ती महाराष्ट्राचे भूमींत

---

† आयाळ झाडून

मूळ धरून जगण्या व तगण्यासाठींच आली. कोणतीहि जन्मास येणारी गोष्ट वाढीस लागून आयुरारोग्यसंपन्न व्हावयाची, ती वस्तुतः आपल्या जीवितहेतूच्या जोरावर मूळच्या जोमानेंच होत असते, हें जरी खरें असलें, तरी ती ज्या भूमींत, ज्या वातावरणांत आणि ज्यांच्याकरतां म्हणून जन्मास आली, त्या सर्वांकडून तिचें संगोपन व संवर्धन व्हावेंच लागतें. केसरीनें 'नाटकें करावीं कीं करूं नयेत?' या प्रश्नाचा एकदांच जो कायमचा ऊहापोह केला व महाराष्ट्रानें आपल्या रंगभूमीचें संगोपन व संवर्धन करणें अवश्य आहे असा जो आपला मुक्रर अभिप्राय दिला, तेंच नाट्याच्या बाबतींतील केसरीचें महत्त्वाचें कार्य होय.

वर सांगितलेले नाट्यविषयक अत्यंत महत्त्वाचे लेख केसरीच्या पहिल्या वर्षांतच आलेले आहेत. पहिल्या सहा वर्षांतील केसरीच्या नाट्यविषयक कार्यासंबंधानें नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ज्युबिली अंकांत जी थोडी माहिती आली आहे, ती येणेंप्रमाणें:—

'नाटक विषयाला मज्जाव मुळींच नव्हता. उलट 'आर्योद्धारक मंडळी'च्या 'नाट्यप्रयोगाविषयीं स्तुतिपर लेख आढळतात. या कंपनीच्या विरुद्ध, तसेंच शाळेंत 'होणाऱ्या विद्यार्थ्यांच्या नाटकप्रयोगांविरुद्ध असणाऱ्या लेखांस 'लिहून आलेला 'मजकूर' याहून अधिक मान्यतेची जागा दिलेली दिसत नाहीं. उलट प्रो. केरूनाना 'छत्रे, बाबा गोखले, दामोदर विश्वाधर गोखले, शिवराम हरि साठे असल्या 'पुढारी लोकांच्या सहीवर आर्योद्धारक नाटक मंडळीचा नाटकप्रयोग 'पुन्हा 'एकवार' (हा थिएटराबाहेरील वन्समोअरच होय.) होण्याविषयीं विनंतिपत्र 'पांचव्या पानावर केसरीच्या मथळ्याखालीं छापलेलें आढळतें.'

यापुढें सातव्या वर्षांत 'हल्लींची नाट्यकला व तिचे उपभोक्ते' या मथळ्याखालीं 'कलांचा उत्कर्ष इच्छिणाऱ्या' एका गृहस्थाचे मननीय विचार एका अंकांत (९-८-८७) दिले असून शिवाय खुद्द केसरीचीं अशीं तीन स्फुटें या विषयांना अनुलक्षून याच सालांत आलेलीं आहेत. पैकीं एकांत (१२-४-८७) पूर्वीप्रमाणेंच नाटकाच्या एका विरोधकाला सणसणीत उत्तर देऊन नाटकाची बाजू जोरानें उचलून धरली आहे. मात्र तसें करतांना नाटकवाल्यांची तरफदारी भलत्याच पक्षपातानें केसरीनें केली आहे कीं काय, असें ती तरफदारी वाचल्यानें कदाचित कोणास वाटेल. म्हणून त्यासंबंधानें येथें थोडें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. 'नाटकवाले आपल्या मिळकतीचा विनियोग वाईट मार्गानें करतात,' अशा प्रकारच्या आक्षेपाला सदर स्फुटांत केसरीनें पुढीलप्रमाणें उत्तर देऊन धुडकावून लावलें आहे:—'नाटक हा धंदा आहे. धंदेवाला आपल्या मिळकतीचा 'विनियोग कसा करतो हें पहाण्याचें काम गिऱ्हाइकाचें नाहीं. नाटकमंडळी 'देशहिताचा टेंभा कोठें मिरवतात? त्यांच्या खासगी वर्तनावर नजर ठेवायचा 'कारभार, ज्यांना जगाच्या उठाठेवी करायच्या असतील, त्यांनीं खुशाल करावा.'

या उत्तरावरून केसरीनें नाटकाची तरफदारी करण्याचे भरांत नाटकवाल्यांना स्वैरवर्तनाची अप्रत्यक्षपणें फूसच दिली कीं काय, असें वरवर पहाणाराच्या मनांत आल्यावांचून रहाणार नाहीं. केसरीला नीतिमत्तेची चाड नाहीं असें केसरीचा प्रतिपक्षीहि म्हणणार नाहीं; व मिळकतीचा स्वेच्छ विनियोग हा जर व्यक्तीचा जन्मसिद्ध हक्क तर त्यांत मुद्दाम प्रतिपादण्यासारखें कांहीं नाहीं; लोकप्रवर्तक या नात्यानें केसरीचा विशेष भर कर्तबगारीवर अधिक असतो ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे वरील उत्तराचा बरोबर झोंक समजून येईल. कर्तबगार पुरुष नीतिमान असेल तर तें सर्वोत्कृष्टच. पण असला योग दुर्मिळ असतो. म्हणून तो नसेल त्यावेळीं त्याचें शील उगाळीत बसण्यापेक्षां त्याच्या कर्तबगारीकडेच लक्ष देणें अधिक इष्ट. विशेषतः कर्तबगार पुरुषांचें शील चव्हाट्यावर आणून त्यांच्या कर्तबगारीला कमीपणा आणण्याचा प्रयत्न मत्सरी लोक करतात तो केसरीला मुळींच खपत नाहीं. आणि हेंच केसरीचें धोरण वरील उत्तरांत व्यक्त झालेलें आहे. 'आधीं बाजीराव होऊन दाखवा, मग कोणी मस्तानी ठेवली तरी हर- 'कत नाहीं.' असें एके प्रसंगीं लोकमान्यांनीं उत्तर दिल्याचें 'आठवणी'च्या एका खंडांत प्रसिद्ध झालें आहे. त्यांतहि केसरीचें वरील धोरणच व्यक्त झालेलें आहे.

याच सालांतील आणखी जीं दोन स्फुटें आहेत, तीं 'अभिनवतरुणीशिक्षण- नाटिके'चे प्रयोग त्यावेळीं पुण्यांत होत होते, त्या प्रयोगामुळें उडालेल्या खळ- बळीला अनुलक्षून आहेत. 'आपल्या नाटकापासून साऱ्या स्त्रीशिक्षणाची बेअब्रू 'होते असें नाटककारांस कळेल तर त्यांना खेदच होईल,' इतकेंच सदर खळ- बळीचे बाबतींत प्रथम नाटककाराच्या बाजूनें लिहून पुढें नाटकाबद्दलचा आपला अभिप्राय केसरीनें दिला आहे तो असाः—'मात्र ज्या प्रकारच्या स्त्रीशिक्षणा- 'पासून भयंकर प्रकार होतील, असें त्यांस ( नाटककारांस ) वाटतें त्या प्रकाराचा 'त्यांनीं स्पष्ट उल्लेख केला नाहीं......कित्येक ठिकाणीं भाषणें बीभत्स आहेत. 'त्यायोगें सुशीलांच्या मनाला किळस उत्पन्न होतो. हे दोष काढून स्त्रीशिक्षणाच्या 'त्याज्य दिशेविषयीं खुलासा करावा.' (६ व १३-९-८७).

पुढें 'फीमेल हायस्कुलांतील शिक्षणक्रम' ही लेखमाला केसरींत ह्याच वर्षी आली, तिला निमित्तकारण ही 'तरुणीशिक्षणनाटिके'च्या प्रयोगामुळें उडालेली खळबळच होय, ही गोष्ट नाट्याच्या—सुष्ट वा दुष्ट कोणत्याही असो पण—प्रभावाची द्योतक या दृष्टीनें येथें नमूद करण्यासारखी आहे.

यानंतर रंगभूमीविषयक महत्त्वाचा लेख म्हणजे 'छकडीचें खरें स्वरूप' हा होय. रंगभूमीच्या सुधारणेचें महत्त्व जाणूनच या लेखासहि केसरीनें त्यावेळीं अग्रस्थानाचा मान दिला आहे. 'नाटकें करावीं कीं करूं नयेत?' या लेख- मालेंत 'लोकरंजनाचा जो जो मार्ग असेल, तो तो लोकांत अवश्य प्रवृत्त

झाला पाहिजे, ' असें केसरीनें आपलें ठासून मत प्रदर्शित केलें, पण त्याच वेळीं घातलेली मर्यादाहि वाचकांच्या लक्षांत असेलच. तिला अनुसरूनच, अशा प्रकारें हानि होण्यासारख्या रंगभूमीवरील एका 'ओंगळ व घाणेरड्या गोष्टी 'चा वरील लेखांत केसरीनें तीव्र निषेध केला आहे.

पुढें 'छकडीची (खरोखरच) झोड थेटरांतून सारखी चालू ' असल्याचें केसरीच्या निदर्शनास आलें. छकडीच्या बाबत एक मुकदमाहि त्यावेळीं कोर्टांत आला होता. छकडीच्या मालकानें नाच्या पोऱ्याजवळून लिहून घेतलेल्या करार-पत्रावरून तो मुकदमा उपस्थित झालेला होता. छकडीच्या खेळांतील ओंगळ प्रकार 'सार्वजनिक व्यवहाराला बाधक ' असल्यामुळें कोर्टानें करार पोकळ ठरवून दावा रद्द केला. केसरीनें या दाव्यावरूनच त्यावेळीं लोकांचें लक्ष रंगभूमीवरील या किळसवाण्या प्रकाराकडे वेधण्याचा प्रयत्न केला, व सामाजिक वगैरे बाबतींत परक्यांची विशेषतः सरकारी कायद्याची वगैरे मदत घ्यावयाची नाहीं असें केसरीचें एकंदर धोरण असतांहि, या किळसवाण्या प्रकाराचा बंदोबस्त करण्या-साठीं मात्र 'सरकारनेंच हें काम हातीं घेतलें पाहिजे, ' असें स्पष्ट म्हटलें आहे, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

यापुढें मात्र केसरीला या विषयाकडे प्रत्यक्ष असें लक्ष द्यावयाला फारसा अवसरच मिळालेला दिसत नाहीं. केसरीच्या आठव्या वर्षीच म्हणजे सन १८८८ सालीं 'सुधारक' केसरींतून वेगळा झाला. तेव्हांपासून सामाजिक विषयासंबंधीं वादाला विशेष जोरानें तोंड लागून कांहीं काळपर्यंत तेच वाद कडाक्यानें चालले होते. सन १८८५ मध्यें राष्ट्रीय सभा स्थापन झाल्यापासून वर्तमानपत्रांचें लक्ष देशाच्या राजकीय परिस्थितीचें उद्घाटन करण्याकडे विशेष लागलें. राजकारणा-ला दिवसेंदिवस रंगच भरत गेल्यानें केसरीचा या कार्याचा व्याप सारखा वाढत गेला. त्यामुळें राजकारण व राष्ट्रीय जागृतीचे जाडे जाडे इतर विषय यांवांचून ललितकलांदि अन्य गोष्टींकडे केसरीला पुढें विशेष लक्ष देतां आलें नाहीं, तर त्याबद्दल विस्मय वाटावयास नको.

नाहीं म्हणायला, गायनकलेवर मात्र मध्येंच एक अग्रलेख सन १८९२ सालीं 'संगीतशास्त्र' या मथळ्याखालीं आला आहे. रणभूमीवरील सैनिकाला मध्येंच एखादे वेळीं घरच्या गोडगोड गोष्टींचें स्वप्न पडावें, तसाच कांहींसा केसरींतील या लेखाचा प्रकार वाटतो. गायनकलेची उत्पत्ति, व्याप्ती व प्रभाव याचें खरोखरच फार सुंदर विवेचन सदर लेखांत केलेलें असून, त्या वेळच्या आठ दहा वर्षांच्या काळांत या कलेसंबंधानें लोकाभिरुचींत जें 'मोठेंच अंतर पडलें ' त्याचें श्रेय 'सर्वस्वीं कविकुलगुरूच्या रसभरित वाणीस संगीता-ची जोड देणाऱ्या कै० किर्लोस्करांस दिलें ' आहे, हा त्या लेखांतील अभि-प्राय संगीताप्रमाणें नाटकाचाहि प्रभाव सूचित करतो. नाटकाला संगीताची

जोड मिळाली हा सुंदर योग योग्य प्रमाणांतच सुंदर असतो. पण पुढें त्या संगीताचा होत चाललेला अतिरेक अनिष्टसूचक असूनहि, त्याचेंहि एकप्रकारें, समर्थन जरी नव्हे तरी, इष्टत्व प्रस्थापित करण्याचा जो सदर लेखांत प्रयत्न केला आहे, तो केवळ, संगीताची प्राणिमात्रावर जी अलौकिक मोहनी आहे, तिचा द्योतकच म्हटला पाहिजे !

मोकळ्या मनानें एका गोष्टीचा या ठिकाणींच उल्लेख करणें योग्य होईल. नाटकाला संगीताची जोड मिळाली, त्यामुळें नाट्यकलेचा दर्जा वाढून मोठीच क्रांति झाली, ही गोष्ट निर्विवाद होय. या प्रकाराचा गौरव होऊन जें यथायोग्य प्रोत्साहन मिळावयास पाहिजे, तें त्या प्रकाराला, केसरीकडून व्यापक बुद्धीनें, उल्हासानें व मुक्तकंठानें मिळालेलें आहे. पण नाटकाचें वास्तविक स्वरूप जें गद्य त्याला मात्र तसें प्रोत्साहन, त्याचें महत्त्व लोकनिदर्शनास आणून देऊन जशा रीतीनें केसरीकडून मिळावयास पाहिजे होतें तसें, केव्हांच मिळालेलें नाहीं. केसरीचा राष्ट्रीय जागृतीचा व्याप लक्षांत घेऊन, केवळ नाट्यकलेच्या अभिमानानें म्हणून जरी केसरीवर कोणीं रुष्ट होऊं इच्छीत नसला, तरी कलेचा उपासक या नात्यानें त्याला ही गोष्ट जाणवल्याखेरीज कशी राहील !

पुढील चाळीस वर्षांत संपादकीय अशी या विषयासंबंधीं तीन चार स्फुटेंच आढळून येतात. त्यांपैकीं एक म्हणजे सन १८९५ सालीं पुण्यांत राष्ट्रीय सभा व्हावयाची, तिच्या फंडाला मदत करण्यासाठीं म्हणून, खऱ्या गुणांचें नेहमींच चीज करणाऱ्या पुण्याचा नाटक मंडळ्यांवरील जो हक्क त्या हक्कानें त्यांना उद्देशून लिहिलेलें होय. एक लहानसें स्फुट सन १९०४ सालांत आलें असून तें बेलसरे यांनीं 'शेक्सपियर–कृत नाट्यमाला' सुरू केली तिला उत्तेजनपर म्हणून आहे. बाकीचीं एक दोन स्फुटें भारत–नाट्य–समाजातर्फे नाटक मंडळ्यांचीं संमेलनें सन १९०५ पासून सुरू झालीं त्यांना अनुलक्षून आहेत. त्यांपैकीं विशेष लक्षांत घेण्यासारखें म्हणजे सन १९१०सालीं महाराष्ट्र नाटक मंडळीच्या मार्फत पुणें येथें जें सहावें संमेलन झालें, त्या वेळचें होय. 'नाट्यकलेच्या सुधारणेचें पाऊल दिवसेंदिवस पुढें पडत आहे;' असा केसरीनें त्यावेळीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. आणि त्याच सालापासून 'नाट्यकलेवर राजलक्ष्मीची विशेष वक्र दृष्टि फिरण्यास सुरवात झाली,' तिच्या शांत्यर्थ काय करणें जरूर तें प्रथम सुचवून नाट्यसमाजाचें खरें कार्य काय त्याचा इषाराहि समाजाला केसरीनें सदर स्फुटांत दिला आहे, तो ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.
'नाटकाच्या द्वारें 'राजमान्य' असेल तेवढेंच 'लोकशिक्षण' देणें हें नाट्य-
'समाजाचें खरें कार्य नसून, लोकमान्य झालेलें नाट्यकलेचें विशिष्ट अंग त्याहून-
'हि महत्त्वाचें आहे.'

नाटक मंडळ्यांच्या संमेलनामध्यें जोंपर्यंत जिवंतपणा होता, तोंपर्यंत त्या संमेलनांच्या हकीकती केसरींत फार चांगल्या आलेल्या आहेत. विशेषतः सन १९१३ सालीं श्री. छापखाने यांचे अध्यक्षतेखालीं पुण्यांत नववें संमेलन झालें; त्या वेळीं कै. डॉ. चिपळूणकर यांच्या 'जुनीं व नवीं नाटकें' या विषयावरील निबंधावर मोठा उद्बोधक असा खडाजंगी वाद होऊन त्या संमेलनाला जो अपूर्व रंग आला त्याची हकीकत केसरींत जितकी सुंदर व सविस्तर आली आहे, तितकी खुद्द भारतनाट्यसमाजाच्या अहवालांतहि आली असेल कीं नाहीं याची शंका वाटते. किर्लोस्कर संगीत नाटकगृह उघडण्याचा समारंभ सन १९०९ च्या सप्टंबरमध्यें झाला, त्या समारंभाची हकीकत देतेवेळीं पुण्यांतील नाटकगृहांचा थोडक्यांत इतिहास दिलेला आहे, आणि शेवटीं किर्लोस्कर नाटकगृहाबद्दल लिहितांना, राजकारणी केसरीची नाटकगृहांकडे रंगभूमीहून वेगळ्या नात्यानें पहाण्याची दृष्टि पुढील वाक्यांत व्यक्त झाली आहे. 'विशेषतः पुण्यास मोठ-
'मोठ्या सभा भरविण्यास असावी तशी इमारत नव्हती, ही मोठी गैरसोय सदर्हु
'इमारतीमुळें दूर झाली.'

वेळोवेळीं प्रसिद्ध होणारीं नाटकें व नाट्यविषयक ग्रंथ यांचें समालोचन करून मार्गदर्शक असे लेख लिहिणें हें एक नाट्यकलेची सुधारणा करण्याचे दृष्टीनें वर्तमानपत्रांचें प्रमुख कर्तव्य होय. या दृष्टीनें 'मराठी रंगभूमि' 'नाट्यकला-रुक्कुठार' 'नाट्यविषयाची सुशिक्षित चर्चा' 'नाट्यशास्त्र' वगैरे नाट्यविषयक ग्रंथांवर परीक्षणात्मक लेख आलेले आहेत. नाट्यांवरील परीक्षणें आरंभीं तरी बाहेरचींच आलेलीं दिसतात. संपादकीय अशीं परीक्षणें सन १९११ पूर्वी फारशीं आढळत नाहींत. तेव्हांपासून मात्र थोडी विस्तृत अशीं नाटकांवरील संपादकीय परीक्षणें येण्यास सुरवात झालेली दिसते. तरी त्यांचें प्रमाण वर्षास एकाहून अधिक पडेल असें वाटत नाहीं. परीक्षणाला योग्य अशा नाटकांची पैदासच तितकी होत नसावी हेंहि एक त्याचें कारण असूं शकेल.

दिवाकर (श्री. गर्गे) यांनीं नवाच निर्माण केलेला नाट्यछटा नांवाचा वाङ्मयप्रकार हा नाट्यवाङ्मयाचाच एक भाग असून, तो प्रथम लोकनिदर्शनास आणण्याचें कार्य केसरीनें केलें; हें, कोणत्याहि नव्या कौतुकास्पद गोष्टीला प्रोत्साहन देण्याचें केसरीचें जें ब्रीद, त्याला अनुसरूनच झालें.

नवीं नाटकें व त्यांचे प्रयोग यांचें थोडक्यांत समालोचन करण्यासाठीं म्हणून 'चार नवीं नाटकें' या नांवानें एक सदर सन १९१० सालीं केसरीमध्यें सुरू करण्यांत आलें होतें. तें जरी संपादकीय नसलें तरी तें सुरू करण्यांत केसरीचा रंगभूमीविषयक सद्धेतुच होता हें त्याला लिहिलेल्या प्रास्ताविक चार शब्दांवरूनच दिसून येतें:—'...या नाट्यप्रियतेचा एक परिणाम अलिकडे असा झाला आहे
'कीं, लोकशिक्षणाच्या जागा या नात्यानें शाळा, सभागृहें व वाचनालयें यांच्याहि-

' वर नाटकगृहें नंबर मिळवूं पहात आहेत....परंतु नाटकांची लोकप्रियता जितकी
' जास्त त्याच मानानें नाटकांतील दोषांपासून होणारें समाजाचें नुकसानहि अधिक...
' सांप्रत मराठी रंगभूमीस दिवसेंदिवस पोषण मिळत चाललें आहे; पण तिचें
' खाद्य सात्त्विक, पथ्यकर व गुणकारी असेंच असावयास पाहिजे; व हें घडवून
' आणण्यास....विवेचक टीका प्रचलित व्हावी हें आतां अगदीं अवश्य झालें
' आहे. तेव्हां या गोष्टीच्या उपक्रमादाखल 'नाट्यहंस' यांजकडून आलेल्या
' टीकापर लेखास आज मुद्दाम स्थळ दिलें आहे.' या उपक्रमानुसार विवेचक टीका दोनच वेळां आलेल्या असून पुढें हें सदर कायमचें बंद झालें, हें आमच्या रंगभूमीच्या दृष्टीनें बरें झालें नाहीं. हा क्रम चालू रहाता तर आजपर्यंत किती तरी नाटकांचें व त्यांच्या प्रयोगांचें योग्य तें समालोचन होऊन त्या विवेचक टीकेचा केसरीच्याच अपेक्षेप्रमाणें आमच्या रंगभूमीवर इष्ट तो परिणाम खास झाला असता.

असो; गेल्या पन्नास वर्षांतील केसरीच्या नाट्यविषयक कार्यांचें हें संकलित स्वरूप यथाशक्ति लोकांपुढें मांडलें आहे. झालें आहे तें कार्य महत्त्वाचेंच होय. पण या कलेच्या उपासकांची वाढती अपेक्षा थोडीच थांबणार आहे! 'नाट्य-कला ही देशोन्नतीचें एक प्रचंड साधन होय,' ही गोष्ट केसरीनें एके काळीं गर्जना करून सांगितली. सुधारलेल्या इतर देशांत या 'प्रचंड साधनां'चा कशा रीतीनें उपयोग करून घेण्यांत येत आहे हें, रशियांतील सोव्हिएट सरकारनें नाटकें सिनेमा वगैरे रंगभूमीच्या सर्व बाबी ताब्यांत घेऊन, त्यावर एक वेगळा अधिकारीच नेमून त्याच्या द्वारें मतप्रसाराचें व लोकशिक्षणाचें कार्य चालविलें आहे, त्या-वरून कळून येतें. आपल्या देशालाहि या साधनाचा तशा रीतीनें उपयोग करून घेण्याची वेळ जवळ येत चालली आहे. पण या साधनाची शुद्धता व क्षमता अनेक संस्कारांनीं वाढविल्यावांचून त्याचा व्हावा तसा उपयोग होणार नाहीं. कलेचे जे खरे उपासक आहेत, ते आपल्याकडून प्रयत्न करीत असतातच. सर-कार स्वकीय होईल तेव्हां तें त्या प्रयत्नांना प्रोत्साहन देईलच देईल. पण तोंपर्यंत मार्ग दाखविण्याची व प्रोत्साहन देण्याची जबाबदारी लोकनायकांवरच येते. लोकनायक केसरी नाट्यकलेच्या उपासकांची ही अपेक्षा सफल करील अशी बळकट आशा आहे.

---

# मराठीचा पुरस्कार

[ श्री. केशव नारायण वाटवे, एम्. ए. ]

'भाषोत्कर्षाबरोबर देशोन्नतिहि होते. हें देशाभिमानाचें एक अपरिहार्य अंगच आहे.'(के. ६-३-९४).

१. प्रास्ताविक—जितांच्या मनोभूमींत हरतऱ्हेच्या अवनतिकारक भावनांची निपज होत असते व त्यांतहि जेते जर विदेशी, विधर्मी व आक्रमणशील असतील तर त्याच भूमीचें खातेरें बनून त्यांत बुजबुजणारे कुविचार–कृमी अल्पकालांत राष्ट्रप्रकृतीचा फडशा पाडल्याखेरीज राहात नाहींत; पण क्रियेस प्रतिक्रिया या न्यायानें सदर स्थितीवर कांहीं उपाययोजना करण्याइतकी धमक वा धुगधुगी राष्ट्रांत शिल्लक राहिली असल्यास त्यांवर इलाज मात्र नाहीं असें नाहीं. राष्ट्राच्या गतवैभवाची व पराक्रमाची त्यास साक्ष पटवून देऊन, स्वदेश, स्वधर्म व स्वभाव यांच्या निष्ठापूर्वक सेवेस त्यास प्रवृत्त करणें हें या किंवणावर जालीम औषध आहे; व शास्त्रशुद्ध विचाराच्या जळजळीत मुशींतून निघालेल्या या स्वाभिमान–सुवर्णगुटिकेच्या वळशाला हा राष्ट्रघात टाळून त्यास पुनरपि ऊर्जितदशेस आणतां येतें हेंसुद्धां तितकेंच इतिहाससिद्ध तत्त्व आहे. या सिद्धान्ताच्या भक्कम बैठकीवर अधिष्ठित होऊन देशसेवेचें कंकण बांधलेल्या 'केसरी'-च्या आद्य संस्थापकांनीं आपल्या पत्राच्या द्वारें आपल्या विपन्न देशाच्या उन्नतीचें सर्व मार्ग चोखाळण्यास पन्नास वर्षांपूर्वी प्रारंभ केला; आणि राज़कीय, सामाजिक, धार्मिक व इतर सर्व राष्ट्रोन्नतीच्या अंगोपांगांबरोबर मराठी भाषेच्या उत्कर्षासाठीं नेटानें कंबर कसली. त्यांनीं आरंभिलेलें हें मराठीच्या पुरस्काराचें पवित्र व्रत सदर संस्थेनें आजतागायत कसें आचरिलें व तिचें किती हित संपादिलें हेंच या लेखांत पाहावयाचें आहे.

२. अव्वलपासून अखेरपर्यंत एक धोरण—'केसरी'च्या प्रसिद्ध पत्रांतच मराठीच्या जोमदार पुरस्काराचें ठाम धोरण स्पष्ट दिसतें. सदर पत्रांत 'केसरी निव्वळ महाराष्ट्र भाषेंत' निघावयाचा आहे असें सांगून त्यांत येणाऱ्या विषयांत 'नवीन ग्रंथांवर टीका' येईल अशी खात्री दिली आहे व देशस्थित उद्घाटन व्हावयास पाहिजे तसें तें होत नाहीं या उणीवेची जाणीव ग्राहकांस करून देऊन ती भरून काढण्याची स्पष्ट योजना जाहीर केली आहे. 'केसरी'पूर्वी इंदुप्रकाशासारखीं पत्रें इंग्रजी–मराठी अशीं सरमिसळ निघत ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे 'निव्वळ महाराष्ट्र भाषेंत' या शब्दांची उमदी खोंच वाचकांच्या ध्यानीं येईल. त्या वेळच्या संपादक मंडळींतील

प्रमुखांनीं आपल्या लोकप्रिय 'निबंधमाले'च्या द्वारें मराठीच्या तरफदारीचें धोरण आगाऊच प्रगट केलें होतें. त्याच दिशेनें, त्याच आत्मीय भावनेनें व त्याच जोमानें 'केसरी' संस्थेनें मराठीचा पुरस्कार अखंड एकसूत्रीपणानें केला व आजहि करीत आहे. त्याचा मनोरंजक व स्फूर्तिदायक वृत्तांत—'केसरी'त तो प्रसंगपरत्वें, मागेंपुढें आला असला तरी विषयाच्या क्रमवार जोडणीसाठीं पुढील-प्रमाणें येथें निवेदन केला आहे.

**३. भाषा व राष्ट्रीयत्व**—त्या काळच्या स्वभाषा-विमुख सुशिक्षितांना स्व-भाषेच्या सेवेस प्रवृत्त करण्यास 'केसरी'नें त्यांच्या भावनेबरोबर बुद्धीलाहि चेतविलें. मनुष्यमात्रांचे विचार परस्परांस कळविणें हें अत्यंत महत्त्वाचें काम भाषाद्वारें होत असल्यामुळें तिनें मनुष्यजीवनांतील एक फार मोठा भाग व्यापिला आहे. इतकेंच नव्हे तर मनुष्यसमाजाचा व्यवहार, समाजाचा विचार, त्याचा व्याप, आणि त्याची भाषा यांतील संबंध इतका निकट आणि नित्य आहे कीं एकाचें प्रतिबिंब दुसऱ्यांत उमटल्याखेरीज राहात नाहीं. एकाची वृद्धि तर दुसऱ्याची वृद्धि, व एकाचा क्षय तर दुसऱ्याचा क्षय, हा अबाधित सिद्धान्त आहे. नाडीवरून जशी शरीरांतील रोगाची किंवा स्वास्थ्याची परीक्षा होते त्याचप्रमाणें भाषेवरून राष्ट्राची बरीवाईट स्थिति तज्ज्ञ लोक तेव्हांच ताडतात. व या अन्योन्यसंबंधावरून भाषा ही धर्माबरोबर एकराष्ट्रीयत्वाची भावना जागृत करणारी आहे व त्यामुळें भाषोत्कर्षाबरोबर देशोन्नति होते असें क्रमप्राप्त अनुमान काढिलें आहे. हा नित्यसंबंध लक्षांत आणिल्यास वंगभंगामुळें बंगाली लोकांस राग कां आला हें आपणांस समजण्यासारखें आहे. कारण तेथें एक भाषा बोलणाऱ्या प्रांताचे दोन विलग भाग केल्यामुळें राष्ट्रीयत्वाची हानि होत होती. 'एकराष्ट्रीयत्वाचें मर्मच असें आहे कीं धर्म, भाषा, चालीरीति, परंपरा 'व उद्दिष्ट हीं एकाद्या लोकांच्या अंगीं जितकीं अधिक असतात त्याप्रमाणें त्यांची 'एकराष्ट्रीयत्वाची भावना प्रबल किंवा दुर्बल असते. राजकीय बंधनाची दावण 'त्यांस तितकें निगडित करूं शकत नाहीं. आमचा देश राहोंच, पण युरोपांतील 'राष्ट्रांची घटना केवळ धर्म किंवा धर्मपंथ यांच्या अनुरोधानें झालेली नसून ती 'स्थूलमानानें भाषेच्या अनुरोधानें झालेली आहे.' (के. २१-१-१२).

**४. मराठीचा उगम व वाढ**—यावरून इंग्रजी अमदानीच्या पहिल्या अमलांत हिंदुलोक चोळामोळा बनून राष्ट्रीयत्वाची घडी पार विस्कटली असतां तिला पुनरपि व्यवस्थित बसविण्याचा प्रयत्न करणाऱ्या केसरीसंस्थेनें महाराष्ट्रांत मराठीचा पुरस्कार येवढ्या जिव्हाळ्यानें कां केला हें आतां समजेल. मराठीबद्दल व सामान्यतः आपल्या सर्वच पूर्वसंस्कृतीबद्दल जें एक अनादराचें पटल दुर्विदग्ध नवशिक्षितांच्या मनावर आलें होतें त्याचा निरास करण्याचा प्रयत्न केसरीनें हरतऱ्हेनें केला. कारण इंग्रजी विद्या, इंग्रजी रीतिरिवाज, इंग्रजी

धर्म, व सर्व कांहीं इंग्रजी याच्या भपक्यानें प्रथम इकडच्या माणसांचे डोळे दिपले, व त्यांतच सुखलोलुपता व लोचटपणा यांची भर पडली होती. म्हणून 'केसरी'नें मराठीची कुळकथा व तिचें वैभव समजावून देऊन तिच्या ठिकाणचा अर्थव्यंजकतेचा मगदूर सोदाहरण दाखविला. हें सर्व वृथाभिमानाच्या भरीस पडून न करतां मराठीच्या खऱ्या मर्यादा व तिच्यांतील उणीवा यांहि ठिकठिकाणीं सुधारणाबुद्धीनें दिग्दर्शित केल्या. संस्कृत–प्राकृत–अपभ्रंश या प्रणालीनें मराठीचा उगम सांगून ५व्या शतकापासून आपला नवा संसार थाटून ही महाराष्ट्रवधू यादव राजांच्या आश्रयानें व उत्तेजनानें ज्ञानेश्वरींतील उदात्त-रमणीय स्वरूप कसें पावली याचा मोठा सुंदर वृत्तान्त केसरींत कथिला आहे. (२९-५-०६). तसेंच हल्लीं उपलब्ध असलेलें महाराष्ट्रवाङ्मय प्रायः धार्मिक कां, या प्रश्नाचा पुढीलप्रमाणें समर्पक खुलासा केला आहे. 'हिंदूंना यवनांनीं छळलें 'त्याचा परिणाम हिंदूंची धर्मश्रद्धा बळकट होणें असाच झाला; व धर्माखेरीज 'दुसरें कांहीं मोकळेपणानें बोलता येणें अशक्य असल्यानें हिंदूंनीं आपले धार्मिक 'विचार आपल्या लोकांस स्वभाषेचा आश्रय करून सांगितलें. रामदासांनीं जसा 'देशस्थितीचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केला किंवा तदर्थ उघड प्रयत्न केले तसा 'उल्लेख एकनाथांस करता आला नसता असें नाहीं; किंवा त्यास देशस्थिति व 'स्वकर्तव्य समजत नव्हतें असेंहि नव्हे. तर त्यास आपले इतर विचार परकीय 'सत्तेच्या जड दडपणाखालीं बोलून दाखवतां येत नव्हते हें त्याचें रहस्य होय.' (के. २९-५-०६ ).

५. **संतांचा मराठीवर उपकार**—खरें पाहिलें असतां संतमंडळींचा महाराष्ट्रभाषेवर मोठा उपकार झाला आहे. त्यावेळीं राजकीय व सामाजिक विचार परकीय लोकांच्या भाषेंतून चालत; व न्याय, व्याकरण इत्यादि शास्त्रीय विवेचन संस्कृतांतून पंडित करीत. या स्थितींत धर्माची बाब संतांनीं जर आपलेकडे घेतली नसती तर ज्ञानेश्वरी हा पहिला व शेवटचाच ग्रंथ झाला असता. शिवाजीमहाराजांनीं 'राज्यव्यवहारकोशानें' मराठीवरील मुसलमानीच्या मोठ्या आक्रमणाला आळा वसविला. 'महाराजांचा अभ्युदय म्हणजे मराठी भाषेचा अभ्युदय असें म्हणण्यास हरकत नाहीं.' याप्रमाणें भाषा व धर्म हीं एकराष्ट्रीयत्वाचीं प्रधान अंगें यांचें संगोपन आपत्कालीं महाराष्ट्रांत भागवतधर्मीयांनीं व हिंदूराजांनीं कसें केलें इतकेंच नव्हे तर त्यांस यावच्छक्य वाढीस कसें लावलें हें या विवेचनावरून स्पष्ट होईल.

५. **केसरीकडून मराठीचा कैवार**—या भाषारूप अमूल्य ठेव्याचा अव्हेर इंग्रजी शिकलेल्या तिच्याच औरस पुत्रांकडून झालेला पाहून केसरीच्या अंगाचा नुसता तिळपापड झाला.(के. १-४-९०); व स्वाभिमानाच्या उसळीसरशीं मराठीचा कैवार घेऊन तिच्या तमाम प्रतिपक्षांस कठोर वाक्प्रहारांनीं त्यानें सळों कां पळों

करून सोडिलें. शास्त्रीबोवांनीं मराठीच्या कुवतीबद्दल काढलेले उदात्त उद्गार अद्यापिहि आपल्या कानांत दुमदुमत आहेत. 'जिच्यांत ज्ञानेश्वर-तुकारामादि 'संतशिरोमणींनीं श्रुतिवंद्य अर्थाचें निबंधन केलें, जिला मुक्तेश्वर, वामन व 'मोरोपंत अशा कवींनीं संस्कृतची प्रौढी संपादून दिली व जी बोलणारांनीं अटके- 'पर्यंत आपले झेंडे रोविले त्या मराठी भाषेला अर्थगांभीर्य व डौलदारपणा या- 'साठीं दुसऱ्या कोणत्याहि भाषेच्या तोंडाकडे पहाणें नलगे !' खुद्द लोकमान्य टिळकांनींहि याच जाणिवेनें या प्रभावशाली भाषेचें तेव्हाचें दैन्य महाराष्ट्रासमोर मांडिलें आहे. ते म्हणतात—'जी भाषा एके काळीं महाराष्ट्रांतच काय पण 'म्हैसूर, कर्नाटक, हैदराबाद, गुजराथ, बडोदें, माळवा व मध्यप्रांत वगैरे दूरच्या 'प्रांतांतहि राजकीय भाषा म्हणून प्रचलित होती ती आतां त्या ठिकाणांहून हुस- 'कूस खुद्द महाराष्ट्रांतच परकी होऊं पाहात आहे ही गोष्ट महाराष्ट्रभाषेच्या पुत्रांस 'अत्यंत लाजिरवाणी आहे.'(के० २२-११-०४). हिंदी, बंगाली वगैरे देशी भाषा सुस्थितींत असून मराठीसच कोणी विचारीत नाहीं याचें त्यांना वाईट वाटे. 'सरकार पाठिंबा देत नाहीं व लोक उदासीन, या स्थितींत तिनें कोणाच्या तोंडा- कडे पहावें ! ' असा सवाल त्यांनीं टाकला आहे. वर्तमानपत्रें कांहीं करूं म्हण- तील तर त्यांवर अँग्लोइंडियनांचा कटाक्ष, सरकारी बुककमिटी पहावी तर नसती उलथापालथ करिते व खिस्ती मिशनरी हिंदू पोरांप्रमाणें आमच्या भाषेसहि भ्रष्ट करूं पहातात व सुशिक्षितांनीं मराठी भाषेस केव्हांच सोडचिठ्ठी दिली आहे. व दोन कोटी लोकांच्या जन्मभाषेंत हजारापेक्षां जास्त ग्रंथ निघत नाहींत अशी तक्रार करून शेवटीं 'कोणत्याहि देशांतील सुशिक्षित वर्ग परभाषेच्या 'द्वारें ज्ञानसंपन्न झालेला रहाणें हें देशी भाषांच्या दृष्टीनें राष्ट्राचें दुर्दैव होय' (के० १९-६-०६), असा जळजळीत उद्वेगाचा शेरा मारिला आहे.

**६. मराठीचे नवे व जुने पुरस्कर्ते**—'मराठीचे शिवाजी' हें बिरुद मोठ्या अभिमानानें व यथार्थतेनें मिरविणारे विष्णुशास्त्री, तसेंच आगरकर व लोकमान्य टिळक यांसारखे गाढे विद्वान् व कसलेले खंदे लढवय्ये मराठीची कड घेऊन उसळून उठतांना पाहिले म्हणजे मराठीच्या पूर्वींच्या विपन्नावस्थेंत एके- काळीं ज्ञानेश्वर, एकनाथ व मोरोपंत यांनीं घेतलेल्या अशाच कैवाराची आठ- वण कोणा सहृदयास होणार नाहीं ! व कोणाचा कंठ कौतुकानें व धन्यवादानें दाटून येणार नाहीं ! 'माझा मऱ्हाटाचि बोलू कवतिकें । परी अमृतातेंहि पैजा जिंके । ऐशीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥' या मराठीची तरफदारी करणाऱ्या आद्य कवीच्या उद्गारांतील मराठीचा अभिमान व स्वतांच्या वाक्पटुत्वाची दुर्दम जाणीव हे दोनहि गुण या केसरीच्या कैवाऱ्यांत कसे तंतोतंत दिसतात याचें सकौतुक आश्चर्य वाटतें !

**७. मराठी व संस्कृत**—मराठीविषयीं लिहितांना नुसतें अभिमानानें

उसळणें निराळें व तिच्या उन्नतीबद्दल शांतपणें व नेटानें सक्रिय झटणें निराळें. पण केसरीनें या दोन्ही गोष्टी केल्या. मराठीचा परिपोष प्रायः एका विशिष्ट धार्मिक वळणानेंच होत गेला, यासाठीं तिचीं दुसरीं अंगेंहि तितकींच विकसित होऊन तिला संस्कृत वाणीचें प्रौढत्व आणि इंग्रजी भाषेचा मगदूर व व्याप यावा ही केसरीची महत्त्वाकांक्षा; पण ती साधण्यास पोकळ अभिमानाची कोती दृष्टि त्यानें कधींहि स्वीकारली नाहीं. वरील दोनहि संपन्न भाषा मराठीच्या उशापायशाशीं आहेत तर त्यांजकडून जरूर तें साहाय्य अवश्य घेतलें पाहिजे असा केसरीचा नेहमींचा कटाक्ष. संस्कृत तर मराठीचा मूळ झरा. वेद, उपनिषदें, शास्त्रें, दर्शनें, पुराणें, नाटकें व काव्यें यांमधून झिरपून आलेल्या ज्ञानप्रवाहाची बनलेली नदी म्हणजे-च मराठी अशिक्षितांचें किंवा सुशिक्षितांचेंहि ज्ञान! असें सांगून 'मराठी भाषें-' तून संस्कृत भाषा सर्वस्वीं काढून घेतली तर जाग्यावर मराठी म्हणून कांहींच ' शिल्लक राहणार नाहीं, तेव्हां संस्कृत व मराठी या एकमेकींपासून सर्वांशीं विलग ' करणें घातकीपणाचें आहे,' (३१-५-११) असें केसरीनें प्रतिपादिलें आहे.

८. **मराठी व इंग्रजी**—तीच गोष्ट इंग्रजीची. जगांतील बऱ्याच मोठ्या क्षेत्रावरील मानवी व्यवहार, कला, राज्यतंत्रें, धर्म, तत्त्वज्ञान व सर्व आधिभौतिक शास्त्रांचा व्याप जिच्यांत साठविला आहे तिच्या संपन्नतेचा चालून आलेला फायदा सोडणें गैर. कारण मराठींत धार्मिक वाङ्मय विपुल असलें तरी शिल्प-शास्त्र, अर्थशास्त्र, रसायनशास्त्र व मानवशास्त्र इत्यादिकांवरील ग्रंथांची वाण आहे. त्यांतले शब्द व विचार परकीयांकडून घेतलेच पाहिजेत. पण हें करतांना जुन्या व नव्या विचारांची सांगड घालून ते मराठींत एकजीव करून मांडले पाहिजेत हा केसरीचा बाणा. इंग्रजी ज्ञान घ्या, पण तें आत्मसात् करून घ्या व इंग्रजीला मराठीचें आक्रमण करूं देऊं नका हें त्याचें सार आहे. कारण इंग्रजी भाषा हें मराठीच्या समृद्धीचें तात्पुरतेंच साधन. इंग्रजी राज्य दोनशें वर्षें हिंदुस्तानांत टिकलें तरी हिंदी मुलें धुळपाट्यांवर ओनाम्याचे ऐवजीं A, B, C, गिरवूं लागतील असें मानणें मंद बुद्धीचें द्योतक आहे!

९. **मराठी ग्रंथरचनेच्या प्रोत्साहनाचे मार्ग**—यानंतर मराठींत ग्रंथरचना व्हावी याबद्दल केसरीनें केलेल्या कामगिरीचा विचार पहावयाचा. ज्ञानाचा व सु-शिक्षणाचा प्रकाश केवळ उत्तुंग प्रासादशिखरांवर व वृक्षाग्रांवर न राहतां त्याचें लोण झोंपड्याझुडपांपर्यंत पोहोंचलें पाहिजे तरच तो देशास हितकारक होतो. म्हणून देशभाषेंत ग्रंथरचना करून तद्वारां सामान्य जनतेंत ज्ञानप्रसार करणें हे नवशिक्षितांचें कर्तव्य. पण त्या वेळच्या सुशिक्षितांचा व सामान्य जनतेचा एकजीव होईना. म्हणून लोकांस सुचतील व राष्ट्रीय भावना जागृत करतील असे जिव्हाळ्याचे विषय सुशिक्षितांनीं हातीं घ्यावे ही केसरीची शिकवण. या दृष्टीनें 'पोवाडे' हा आपल्या खास राष्ट्रीय वाङ्मयाचा वीररसप्रधान व बहुजनाभिमत

भाग केसरीनें नमुन्यादाखल घेऊन त्याची जोपासना करण्यास सुचविलें आहे. मराठ्यांच्या सेना चंदीचंदावरापासून विंध्याद्रीपर्यंत 'हुतूतू' घालून परत येत व धनाजीचें नांव ऐकिल्यानेंहि शत्रूचे घोडे पाणी पीत नसत, त्या काळच्या वीरश्रीची आठवण देऊन केसरीनें दुहेरी अर्थांचा असा खोंचदार सवाल टाकिला आहे कीं, 'क्लीबांसहि मर्दानी आवेश आणणारे ते पोवाडे आतां कोठें आहेत ?' (८-७-१८९०). त्याचप्रमाणें धर्मश्रद्धावान् होऊन सुशिक्षितांनीं स्वधर्माचें रहस्य लोकांस मराठींतून समजावून दिलें पाहिजे असें केसरीचें मत आहे. (के. १९-६-०६).

१०. **सार्वजनिक प्रयत्न**—या बाबतींत नुसते व्यक्तिविषयक प्रयत्न तर हवेतच, पण यास सार्वजनिक प्रयत्नांची जोड द्यावयास पाहिजे असें सांगून राजे-रजवाडे, संस्थानिक व धनिक यांजकडून पैसा गोळा करून ग्रंथनिर्मितीचें व प्रकाशनाचें काम चालवावें अशा अर्थाच्या सूचना 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' च्या अहवालाच्या निमित्तानें केसरीनें केल्या आहेत.( १८८१ ). तसेंच नवीन विद्वानांनीं मुद्रणकर्माचें आधिपत्य आपणांकडे घ्यावें म्हणजे छपाईचें काम जास्त शुद्ध व सुकर होईल अशी एक नवी योजना लोकांपुढें केसरीनें मांडली.

११. **परके शब्द मराठींत कसे घ्यावे ?**—परभाषेंतील शब्द मराठींत कसे व किती घ्यावे हाहि मोठा महत्त्वाचा प्रश्न त्यावेळीं उपस्थित झाला होता. त्याचा निकाल केसरीनें आपल्यापरीं लाविला आहे. 'परभाषेंतील शब्द म्हणून बिलकुल घेऊंच नयेत' अशा त्या वेळच्या ( १८८१ ) एका पक्षाचा उपन्यास करून केसरीनें त्यावर असें म्हटलें आहे कीं 'जेथें मूळ भाषेंत शब्दच नाहींत तेथें परकी शब्दांस निमंत्रण करण्यास हरकत नाहीं.' ( १८८१ ). त्यांतून फारशी, अरबी शब्द तर आपल्या भाषेला अगदीं खिळून गेले आहेत. इंग्रजींतील 'बटाटा' व 'तमाखू' यांसारखे शब्द सोंवळ्यांतहि शिरले आहेत. म्हणून 'अर्थवाहक शब्दांस सर्वत्र प्रचाराची परवानगी असावी.' त्यामुळें भाषेस शब्दप्राचुर्य, वैचित्र्य इत्यादिकांचा लाभ होतो. मात्र असे शब्द शिरजोर होऊं नयेत. तसेंच १८८७सालीं मराठी भाषेच्या कैवाऱ्यांत नवीन शब्द कसे बनवावे याबद्दल असलेल्या तीन पक्षांचा केसरींत उल्लेख केला आहे.ते तीनहि पक्ष आजसुद्धां अस्तित्वांत आहेतच; ते असे.–( १ ) संस्कृतचा व्यासंग करणारांचा; त्यांचे मतें सर्वत्र नवीन संस्कृत शब्द घ्यावेत, व संस्कृत व मराठी या दोघींचेंहि शब्दभांडार येणेंप्रमाणें मिश्रित करून दोघींचा एकजीव करावा. संस्कृतप्राकृताचा एकजीव करून रस, सुबोधता व स्वारस्य यांची एककालीन सिद्धि हेंच मराठीचें पूर्ण स्वरूप. ( २ ) ज्यांना संस्कृत येत नाहीं किंवा त्याचा उपयोग करूं नये असें प्रतिपादणारे, यांचा; त्यांचें म्हणणें मराठी संस्कृतापासून अलिप्त ठेवावी. प्राचीन व अर्वाचीन काव्यें, बखरी इत्यादिकांतील भाषेप्रमाणें मराठी ठेवावी. निव्वळ मराठी शब्दानें रस साधला

जावा ही त्यांचे मतें पूर्णता. ( ३ ) हातांत येईल तें—उपयोगीं पडेल तें उचलावें म्हणणारांचा; त्यांचे मतें शब्द संस्कृत, मराठी, फारशी कसाहि असो, तो लोकांस कळून लवकर प्रचारांत येण्याजोगा असला म्हणजे झालें. हे तीनहि पक्ष थोडयाफार सत्यावर अधिष्ठित असल्यामुळें व विशेषतः हा अभिरुचीचा प्रश्न असल्यानें केसरीनें यावर स्वतांचें मत दिलें नाहीं. यशस्वी होईल तो चांगला हा त्याचा अर्थ !

**१२. सरकार व युनिव्हर्सिटी यांना उत्तेजनासाठीं पाचारण**—वर सांगितल्याप्रमाणें मराठीचे अभिवृद्ध्यर्थ स्वतांचे लोकांस विनवूनच केसरी स्वस्थ बसला नाहीं. तर त्यानें पहिल्या वर्षापासून सरकारास या कामीं पाचारण केलें आहे. कारण कितीहि नेटानें केलेल्या खासगी प्रयत्नापेक्षां सरकार व युनिव्हर्सिटी यांच्या द्वारें झालेल्या प्रयत्नानें हा मार्ग अधिक सुकर होतो अशी इष्ट दृष्टि त्यानें ठेविली होती. म्हणून सरकारी विद्याखात्यावर केसरीचा फार कटाक्ष. राजकीय बाबतीप्रमाणें याहि गोष्टींत वृत्तपत्रद्वारें सरकारच्या विद्याखात्यावर लोकमताचा दाब असावा असें केसरीचें मत व या दृष्टीनें १८८१त केलेलें 'नवनीताच्या नव्या आवृत्तीचें परीक्षण' अवश्य प्रेक्षणीय आहे. युनिव्हर्सिटींत मराठीच्या प्रवेशा-साठींहि केसरीनें हातभार लाविला आहे. सरकारचे दोष दाखवूनहि गुणग्रहणास केसरी कधींहि विन्मुख नाहीं. 'देशभाषांची अभिवृद्धि होऊन त्यांच्या द्वारें 'लोकांस ज्ञानप्राप्तीचा मार्ग खुला व्हावा यासाठीं सरकारनें हजारों रुपये खर्च 'करून महाराष्ट्रभाषेचे दोन प्रचंड कोश करविले. ग्रंथकारांच्या उत्तेजनार्थ विद्या-'खातें व दक्षिणाप्रैज कमिटी स्थापन केली, दक्षिणाफेलोची जागा निर्मिली व 'यामुळें मराठी भाषा सांप्रतच्या व्यवस्थितपणाला येऊन पोहोंचली आहे,' असे योग्य उद्गार केसरीनें काढिले. 'जिंजीवास' हें पुस्तक जप्त केल्यामुळें सरकारचा पुढील तीव्र शब्दांत निषेध केलेला आढळतो. 'हिंदी प्रजेमध्यें प्रत्यक्ष अगर 'अप्रत्यक्ष रीतीनें स्वाभिमान, ओजस्विता, धैर्य, शौर्य, महत्त्वाकांक्षा, इत्यादिकां-'ची भावना उत्पन्न करणारें शब्दच हिंदुस्तानांतून नाहींसे करण्याचें सरकारचें 'धोरण असल्यास न कळे.'( ९-८-१० ). सारांश जेथें जेथें मराठीच्या कैवाराचा प्रश्न आला तेथें तेथें केसरी तांतडीनें धावला आहे. मग प्रतिपक्षी सरकार असो, युनिव्हर्सिटी असो, टाइम्ससारखे पत्रकार असोत वा स्वजन असोत; एक-भाषा बोलणारे प्रांत या दृष्टीनें नागपूर व वऱ्हाड हे प्रांत मुंबई इलाख्यास जोडावें अशीहि एक सूचना केसरीनें केलेली आहे.( १९१२ ).

**११. लेखाच्या मर्यादा व उरलेले विषय**—वरील भाषाविषयक सर्व कामगिरी १८८१ तें १९११-१२ पर्यंत मुख्यत्वें आहे. मराठीचा पाठीराखेपणा केसरीस याच मुदतींत जास्त करावा लागला. अर्थात् पूर्वीच्या तक्रारी व प्रश्न यापुढें राहिले नाहींत. मराठी भाषेस बरे दिवस आले. या मुदतीनंतरची केसरीची

कामगिरी हा विषय या लेखाचे कक्षेंत येत नसल्यामुळें त्याबद्दल येथें लिहिलें नाहीं. तसेंच वरील कामगिरींतहि सांगावयाच्या राहिलेल्या युनिव्हर्सिटींत मराठीचा प्रवेश, मराठींतून शिक्षण, भाषाशुद्धि, केसरीची मराठी भाषा, वगैरेसारख्या प्रमुख बाबी स्वतंत्र लेखांत आल्या असल्यामुळें त्यांचाहि येथें उल्लेख केला नाहीं.

**१२. मराठीच्या सर्वांगीण उन्नतीची व्यापक दृष्टि**—शेवटीं वाचकांच्या मनावर एका गोष्टीचा मात्र ठसा उमटेल असा अंदाज आहे ती ही कीं, मराठीच्या पुरस्कारांत केसरीचें धोरण व्यापक, सर्वांगपरिपूर्ण, सावध आणि स्वाभिमानाचें होतें. त्या धोरणाचा व्याप केवढा होता हें दाखविण्यास शेवटीं एकच अवतरण देतों. प्रश्न नवा जुना कसाहि असो. एक ठराविक धोरण केसरीनें आजतागायत राखिलें आहे. एखादी महाराष्ट्रीय सभा स्थापन होऊन तिनें पुढील कामें करावींत अशी (केसरीनें २१-११-०४) सूचना केली. ‘ तिनें महाराष्ट्र ‘ भाषेंतील पूर्वापार विचारांचें संशोधन करावें, मराठी भाषेंतील प्राचीन व अर्वा- ‘ चीन ग्रंथांचा संग्रह करावा, अप्रकाशित ग्रंथ प्रकाशित करावे, ऐतिहासिक लेख ‘ व कागदपत्र सुरक्षित ठेऊन क्रमानें लिहून बाहेर आणावे, महाराष्ट्र कवींचीं चरित्रें ‘ प्रसिद्ध करावीं, मराठी भाषेचा इतिहास लिहावा, मराठी भाषेचें व्याकरणदृष्ट्या व ‘ व्यावहारिक दृष्ट्या संशोधन करावें, आधुनिक ग्रंथकारांस उत्तेजन द्यावें, वगैरे; व ‘ जेणेंकरून मराठी भाषेची योग्यत्ता वाढेल व तिचा फैलाव होईल व लोकांत तिची ‘ अभिरुचि जास्त उत्पन्न होईल. असे सर्व बाजूचे प्रयत्न करणें हें या सभेचें मुख्य ‘ कर्तव्य असावें.’ यावर टीकेची जरूर नाहीं. फक्त येवढेंच सांगावेंसें वाटतें कीं यांत केसरीनें स्वतः हातभार लाविलेल्या बाबी किती व उरलेल्या किती यांचा पडताळा वाचकांनीं मनाशीं करावा.

---

# साहित्यचर्चा

[ श्री. दत्तात्रय केशव केळकर, बी. ए. ]

दोन भिन्न संस्कृतींची गांठ पडली असतां संस्कृतीच्या इतर क्षेत्रांप्रमाणें साहित्याच्या क्षेत्रांतहि खळबळ सुरू होते. अशा वेळीं परकीय संस्कृतीच्या लौंढ्यानें आपलें क्षेत्र वाहूं न देतां आपल्या संस्कृतींतील रक्षणीय व अभिमानास्पद अशा विचारांचा बांध घालून परकीय संस्कृतींतील ग्राह्य विचारांचेंच तेवढें

जल आपल्या संस्कृतीच्या वाफ्यांत सोडून तो वाफा पूर्वीपेक्षांहि अधिक सुपीक करावयाचा असतो. हें कार्य केसरीनें साहित्याच्या क्षेत्रांत कसें केलें हें थोडक्यांत पाहणें आहे. तें पाहात असतां निरनिराळ्या साहित्यसंमेलनांचे किंवा वसंत-मालेसारख्या व्याख्यानांचे जे निवळ अहवाल केसरींत आले आहेत ते सर्वथा सोडून खुद्द केसरीकारांचे किंवा खास केसरीकरितां लिहिलेल्या इतरांचे लेख तेवढेच जमेस धरले पाहिजेत हें सांगावयास नकोच.

पाश्चात्य वाङ्मय प्रौढ, गंभीर आणि रमणीय आहे. त्यांतील कांहीं ग्रंथ असे आहेत कीं, त्या प्रकारचा विचार आपल्या वाङ्मयांत फारसा आढळत नाहीं. अशा उत्तमोत्तम ग्रंथांना देशीकार लेणें चढविणें हा आपल्या वाङ्मयाला समृद्ध करण्याचा एक उपाय होय. दुसरे कित्येक ग्रंथ असे आहेत कीं, ते गहन व रमणीय असले तरी त्यांतील विचारसरणी आपल्या वाङ्मयाला पूर्ण परिचित आहे. अशा दुसऱ्या प्रकारच्या ग्रंथांचाहि आपल्या वाङ्मयांत प्रवेश करणें वावगें नाहीं. पण तो करतांना मात्र कोण्या सर्वस्वी अभिनव ग्रंथाचा प्रवेश आपण करवीत नसून तशा प्रकारच्या आपल्या जुन्या ग्रंथाच्या शेजारीं आसन देण्यास योग्य अशा ग्रंथासच आपल्या वाङ्मयांत आणीत आहों, अशी भाषांतरकारानें भूमिका घेतली पाहिजे. त्रिखंडपंडित असा जो स्पेन्सर त्याच्या अज्ञेयमीमांसा या प्रख्यात ग्रंथाच्या भाषांतराचें उदाहरण घ्या. ग्रंथ सर्वस्वी भाषांतरालायक आणि ग्रंथकार जगद्वंद्य; अर्थात् ग्रंथकाराविषयीं पूज्यभाव वाजवी, पण त्यांतील विचारसरणी ही आपल्या वाङ्मयाला अभूतपूर्व नसल्यानें तशा झोकानें ती आपल्या वाङ्मयांत प्रवेशित करणें हें गैरवाजवी. यामुळें अज्ञेयमीमांसेच्या फडके यांनीं केलेल्या भाषांतरासंबंधीं लिहितांना केसरीकार लिहितात 'स्पेन्सरच्या सिद्धान्ता-'संबंधीं सुधारक व आमच्यांत जर कांहीं मतभेद असला तर तो पुढील प्रकारचा 'आहे. आमचें म्हणणें असें आहे, कीं स्पेन्सरसाहेबांच्या अज्ञेय सिद्धान्तां-'चें आमच्या बंधूस जितकें महत्त्व वाटतें तितकें हिंदुस्थानांत जन्मून आम्हांस 'वाटण्याची जरूरी नाहीं. इंद्रियार्थसंनिकर्षापासून झालेलें ज्ञान प्रत्यक्ष असतें व 'तसें ज्ञान 'इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः। मनसस्तुपरा बुद्धिर्योबुद्धेः परत-'स्तु सः।' असल्या विषयाबद्दल होणें शक्य नाहीं. हें तत्त्व आमच्या पूर्वीच्या 'वेदान्त्यास दर्शनानुशासन, पदार्थविज्ञानशास्त्र अथवा जीवनशास्त्र यांच्या साहाय्यानें 'जरी सिद्ध करतां आलें नसलें, तरी त्या तत्त्वाची त्यास इतकी ओळख पटलेली 'होती कीं त्याबद्दल ज्यास्त पुराव्याची त्यांस यत्किंचितहि जरूर नव्हती. किंबहुना 'स्पेन्सरसाहेबांनीं या अज्ञेयवादास जें स्वरूप आणलें आहे त्यापेक्षांहि परिणत 'स्वरूप आमच्या ग्रंथांतून या तत्त्वास प्राप्त झालेलें आहे. अशी स्थिति असतां 'दिक्कालादिकांनींसुद्धां अनवच्छिन्न, अतएव त्यांच्या मुळाशीं असूनहि स्वरूपतः 'अज्ञात, अशा तत्त्वाचा केवळ स्पेन्सरच्या आधारावर आम्हांस उपदेश करूं पाहणें

' म्हणजे एकप्रकारचें घरचें सोनें विसरून जाऊन लोकांच्या रुप्याकरितां घाव ' घेण्यासारखें आहे. सुधारकांत किंवा प्रस्तुतच्या फडके यांच्या पुस्तकांत जो दोष ' आहे तो हाच होय. केवळ स्पेन्सरच्याच ग्रंथाचें भाषांतर वाचकांपुढें मांडल्यानें ' हें एक कांहीं नवेंच तत्त्व ग्रंथकार आपणापुढें मांडीत आहे, असा कांहींसा भास ' होतो, व त्याचा गैरसमज होऊन त्याच्या विचारासहि अनिष्ट वळण लागतें. तशी ' स्थिति होणें इष्ट नाहीं. करितां ज्यांस स्पेन्सरसाहेबासारख्यांचे तत्त्वविचार ' आमच्या लोकांपुढें मांडावयाचे असतील त्यांनीं ते इकडील पूर्वींच्या विचारांशीं ' ताडून पाहून परस्परांचें साम्य अगर भेद लक्षांत आणून मग लोकांपुढें मांडले ' पाहिजेत.' ही मुख्य चूक सुधारल्यावर परकीय ग्रंथकाराची खरी योग्यता कबूल करण्यांत कोणत्याहि तऱ्हेनें न कचरतां केसरीकारांनीं त्याची मुक्तकंठानें स्तुतिहि केली आहे. ते लिहितात कीं, ' यावरून स्पेन्सरसाहेबांची योग्यता आमच्या ' बंधूपेक्षां ( सुधारक ) आम्ही कमी मानतों असें कोणींहि समजूं नये. पाश्चात्य ' तत्त्वविचारास या महातत्त्ववेत्त्यानें एकप्रकारचें निराळेंच वळण लावून दिलें ' आहे, असें म्हटलें तरी चालेल. हे आधुनिक काळचे ऋषिवर्य आम्हांसहि पूज्य ' व वंद्य आहेत !' ( १८-८-९६ ).

ज्या विषयांत आमचे ग्रंथ पाश्चात्यांच्या तोडीचे आहेत त्याविषयीं वरील प्रकारची वृत्ति धारण करावयाची आहे. पण जेथें आमचे ग्रंथकार व कवी पाश्चात्यांच्या कांहीं ग्रंथकार व कवी पेक्षां कमी दर्जाचे आढळतात तेथें साहित्याच्या तात्त्विक चर्चेच्या दृष्टीनें केसरीकारांनीं त्यांना तसें लेखलेंहि आहे. कालिदासाचेंच उदाहरण घ्या. कालिदासाला संस्कृत कवींचा कुलगुरु म्हणून संबोधण्यांत येतें, पण त्याच्या उपलब्ध तिन्ही नाटकांतील वैचित्र्याभाव पाहिला व आपल्या नाट्यसृष्टींत विविधता व वैचित्र्य यांची खैरात करणाऱ्या शेक्स्पिअरशीं त्याची तुलना केली म्हणजे तेवढ्यापुरता कालिदास तुलनेस उतरत नाहीं. केसरीकार लिहितात कीं ' लिहिण्याचीं साधनें, इतिहासाचा अभाव, अन्यराष्ट्रांशीं चालू व्यवहार ' नसणें वगैरे अनेक कारणांनीं कालिदासाचीं नाटकें शेक्स्पिअरपेक्षां कमी प्रतीचीं ' उतरलीं असावीं. पण कसें झालें तरी तीं तशीं आहेत हें कबूल केलेंच पाहिजे. ' कालिदासास हिंदुस्थानचा शेक्स्पिअर म्हणून संबोधण्यांत येते ते गौरवार्थी, शेक्स्पिअरचे सर्व गुण त्याच्यांत आहेत असा त्याचा अर्थ नव्हे.' (१८८१ अंक १०).

विदग्ध वाङ्मयांतील नाटकविभागांत अशा रीतीनें आपला कमीपणा कबूल करावा लागत असला तरी दुसऱ्या एका बाबतींत यथार्थतेनें श्रेष्ठपणा मिरविता येण्यासारखाच आहे व ती श्रेष्ठता पटविण्याकरितां केसरीनें साहित्यशास्त्रांत नवीन भर टाकली असल्यानें तिकडे कोणाचेंहि लक्ष सहज जाण्यासारखेंच आहे. रा. ब. चिंतामणराव वैद्य यांच्या Mahabharat-a Criticism ह्या पुस्तकाच्या परीक्षणाचा प्रसंग आहे. वैद्यांनीं आपल्या ग्रंथांत महाभारताचे epic या नात्यानें

जें परीक्षण केलें तें इंग्रज साहित्यशास्त्रज्ञ अर्नोल्ड यानें बांधलेल्या लक्षणावरून केलें. स्थितिच अशी कीं संस्कृत साहित्यशास्त्रांत महाभारतासारख्या आर्ष महाकाव्याला लागू पडेल असें लक्षणच दिलेलें नाहीं. पण अर्नोल्डच्या लक्षणापेक्षां महाभारतास लागू पडणारें लक्षण तर अधिक व्यापक पाहिजे. म्हणून केसरीकारांनीं जुन्या साहित्य-ग्रंथांत आर्ष-महाकाव्याचें लक्षण कां बांधलेलें नसावें हें दर्शविलें असून नवीन लक्षण कसें बांधतां येईल हें लक्षण बांधूनच दाखविलें आहे. केसरीकार लिहितात ' संस्कृतांत साहित्य व अलंकारशास्त्रावर अनेक ग्रंथ आहेत. परंतु ' इंग्रजींत ज्यास एपिक पोएम म्हणतात व ज्याचें भाषांतर आर्षमहाकाव्य असें आम्हीं ' केलें आहे त्याचें स्वरूप काय, कालिदासादिप्रणीत महाकाव्यापासून तें कसें ' ओळखावें, याबद्दल साहित्यशास्त्रावरील ग्रंथांतून कोठेंहि फारसा विचार केलेला ' दिसत नाहीं. साहित्यदर्पणाच्या सहाव्या परिच्छेदांत ' सर्गबंधो महाकाव्यं तत्रैको ' नायकः सुरः ' वगैरे जी महाकाव्याची व्याख्या दिली आहे ती रघुवंशादि महा' काव्यासच अनुलक्षून असल्यानें महाभारतासारख्या आर्षमहाकाव्याचें स्वरूप ' त्यानें चांगलें व्यक्त होत नाहीं. महाभारतादि काव्य व रघुवंशादि काव्य यांमध्यें ' 'अस्मिनार्षे पुनः सर्गा भवंत्याख्यानसंज्ञकाः' एवढाच काय तो भेद दिला ' आहे. परंतु हा भेद अगदीं क्षुल्लक आहे. रघुवंशादि काव्यें आणि आर्षमहाकाव्यें ' यांच्यामध्यें जमीन-अस्मानाचें अंतर आहे; तें, एकांतील प्रकरणास सर्ग म्हणतात व ' दुसऱ्यांतील प्रकरणास आख्यान म्हणतात, असला किरकोळ भेद दाखवून व्यक्त ' करणें अशक्य आहे. ' मग संस्कृत साहित्यशास्त्रांत आर्षकाव्याचें लक्षण कां आढळत नाहीं ! याचें उत्तर केसरीकार देतात कीं, ' साहित्यशास्त्रावरील आमच्या ' ग्रंथकारांस महाभारतादि ग्रंथांची योग्यता समजत नव्हती असें आमचें म्हणणें ' नाहीं. परंतु ऋषिप्रणीत महाकाव्यें हीं साहित्यशास्त्रांवरील ग्रंथकारांच्या अधि' कारावाहेरचीं आहेत अशी त्यांची समजूत असावी. तें कसेंहि असो; इंग्रजी ' वाङ्मयातील साहित्यशास्त्रावरील ग्रंथांत ही उणीव भरून काढली आहे; आणि ' आर्षमहाकाव्य या नात्यानें महाभारताचें जें परीक्षण रा. ब. वैद्य यांनीं केलें ' आहे, त्यास आधारभूत म्हणून सदर काव्याचें लक्षण इंग्रजी साहित्यकारांच्या ' ग्रंथावरून घ्यावें लागलें आहे. साहित्यशास्त्रज्ञ अर्नोल्ड यानें ' ज्यांतील विषय ' महार्थगहन आणि एकार्थसंगत असतो व ज्यांतील प्रधानपात्रें अत्युच्च कुळांत ' जन्मलेलीं असून धीरोदात्त असतात व कथेंतील वस्तु रसानुकूल आणि श्रुति' सुखवृत्तांत कोठें संभाषणानें तर कोठें आख्यानरूपानें आणि कोठें आत्मगत ' भाषणानें सांगितलेलीं असते, तें आर्षमहाकाव्य होय; ' असें आर्षमहाकाव्याचें ' लक्षण बांधलें आहे. आमच्या मतें हें लक्षण महाभारतास किंवा रामायणास ' लावण्यापूर्वीं त्यांत बरीच सुधारणा केली पाहिजे. मुख्य म्हणजे आर्षमहाकाव्यां' तील नायकाचें चरित्र लोकांत शील व चारित्र्य यांचें वर्धन करणारें असलें

' पाहिजे ही होय. रा. वैद्य यांनीं एपिक काव्याच्या इंग्रजी लक्षणांतील हा दोष
' अखेरीस दाखविला आहे. एपिक काव्यांत नैतिक तत्त्व कांहीं नसतें. परंतु महा-
' भारताची तशी स्थिति नाहीं. आर्षमहाकाव्याचें आम्हीं जें लक्षण बांधावयाचें तें
' प्रथमतः आमच्या महाकाव्यास लागू पडेल असेंच असलें पाहिजे. आमच्या
' साहित्यकारांनीं तर हें लक्षण दिलेलें नाहीं, अर्थात् नवीनच तयार केलें पाहिजे.
' तथापि व्यासांनींच महाभारतांत आपल्या ग्रंथाचें ठिकठिकाणीं जें वर्णन दिलें
' आहे त्याचाच आधार घेऊन व इंग्रजी साहित्यशास्त्रांतील व्याख्या लक्षांत ठेवून
' आम्ही बहुतेक महाभारतांतीलच शब्दांनीं आर्षमहाकाव्याचें खालीं दिल्याप्रमाणें
' लक्षण बांधतोंः—

महत्सु राजवंशेषु जातानां दिव्यकर्मणाम् ।
श्रीविभूतिमतां वाऽपि प्राचीनानां महात्मनाम् ॥
चरित्रं कीर्त्यते यत्र पुण्यमेकार्थसंगतम् ।
इतिहासप्रधानार्थं शीलचारित्र्यवर्धनम् ॥
धीरोदात्तं च गहनं श्रव्यैर्वृत्तैरलंकृतम् ।
वाक्यजातिविशेषैश्च रसोत्कर्षप्रपोषकैः ॥
अद्भुतार्थाः कथाः यत्र धर्मकामार्थसंश्रिताः ।
लोकयात्राक्रमश्चापि पावनः प्रतिपद्यते ॥
विचित्रार्थपदाख्यानं सूक्ष्मार्थन्यायबृंहितम् ।
रोमहर्षणकृत् काव्यमनेकसमयान्वितम् ।
महाकाव्यवरिष्ठं तन्महार्थं चार्षसंज्ञितम् ॥

' वरील लक्षणांतील शेवटच्या चार ओळींवरून व्यासाचें महाभारत आणि
' होमरचें इलियड यांजमध्यें भेद कोणता हें चांगलें व्यक्त होतें. काव्यांतील
' वृत्त कानास गोड लागणारें आणि रसास अनुकूल असावें याचाहि जर एपिक
' काव्याचें लक्षणांत अर्नोल्डसाहेबांनीं उल्लेख केला आहे, तर सदर काव्य
' सूक्ष्मार्थन्यायानें युक्त व संसारांतील अनेक प्रसंगांचें द्योतक आणि पावन लोक-
' यात्राक्रमाचें प्रतिपादक असावें या गोष्टीचाहि त्यांत कां समावेश होऊं नये हें
' आम्हांस समजत नाहीं. पाश्चिमात्य आर्षमहाकाव्यांत हे गुण पूर्णपणें नसले तर
' त्यामुळें महाभारताची योग्यता कमी न होतां अधिक वाढते हें आम्हीं लक्षांत
' ठेवलें पाहिजे;' (१८-४-०५) अशा शब्दांनीं केसरीकारांनीं साहित्यचर्चेंत
नवीन भर टाकली आहे.

जुन्या काव्यवाङ्मयाच्या संशोधनानें तत्कालीन समाजस्थितीचें चित्र तयार करण्याची जी काव्यसंशोधनपद्धति पाश्चात्य वाङ्मयांत हल्लीं रूढ आहे ती प्राचीन इतिहासास उपयुक्त असली तरी काव्याकडे काव्य या दृष्टीनें पाहण्याच्या आड येण्यासारखी असते. या विषयाची जाणीव केसरीकारांनीं माधवराव आळतकर यांच्या

' कालिदासाची काव्यसृष्टि ' या व्याख्यानाच्या प्रसंगानें करून दिली आहे. केसरी-
कार लिहितात कीं—' व्याख्यानाच्या वेळीं कित्येक उपवक्त्यांनीं बोलून दाखविलें
' कीं विषयाच्या नांवावरून जी अपेक्षा उत्पन्न झाली ती परिपूर्ण झाली नाहीं.
' याचें कारण काव्यसृष्टीच्या पर्यालोचनांत एक विशिष्ट व तीहि गौण दृष्टि ठेवण्यांत
' आली. काव्यें वाचतांना त्यांत हुडकून काढण्यासच कोणी बसेल तर ऐतिहासिक
' माहिती, सामाजिक स्थितीचें ज्ञान, धर्म व नीति यांसंबंधीं कांहीं सिद्धान्त यांचे
' कण हातीं लागतील हें खरें. पण काव्यसृष्टीच्या अवलोकनांत काव्यदृष्टि
' हीच सर्वांत अधिक महत्त्वाची आहे. प्रतिभाविलासांत रंगण्याकरितां
' कवीनें लिहिलेल्या काव्यांत ध्येयासारख्या दिसणाऱ्या कांहीं भावना व समाज-
' स्थितीचे उल्लेख येऊं शकतात. पण ते पुष्कळ वेळां इच्छित नसून वर्णनाच्या
' ओघांत अपरिहार्य असतात. पण भारत-रामायणकालीन विषयावर काव्य, नाटक
' लिहिणारा धड त्या काळची स्थिति बरोबर वर्णन करूं शकत नाहीं व स्वतः
' त्याच्या काळच्या लोकस्थितीचे जे उल्लेख त्याच्या लेखणींतून येतात ते त्याला
' लिहितांना टाळतां येत नाहींत म्हणूनच येतात. नैतिक ध्येयें व सिद्धांत याची
' गोष्ट तर अधिक अवघड. वागणाराच्या गुणधर्मांप्रमाणें पहाणाराचे व बरेवाईट
' म्हणणाराचे गुणधर्महि नीतीचें स्वरूप बदलूं शकतात. उदाहरणार्थ, भीष्माच्या
' सत्यप्रतिज्ञतेचें कौतुक सनातन होय. पण भीष्म व शंतनु यांचेंच कथानक घेऊन
' कोणी असेंहि नाटक रंगवील कीं म्हातारपणीं फिरून लग्न करण्याची इच्छा
' झालेल्या बापाची अखेर फजिती होते व सात्त्विक कपटाचरणानें मुलगा आपलेंच
' कार्य साधतो; आणि हेंच बरोबर झालें असें म्हणत प्रेक्षक घरोघर परत जातील.
' शेक्स्पिअरचें उदाहरण घेतलें तरी हेंच दिसून येईल. त्यानें शेंकडों भूमिका रंग-
' विल्या. पण त्यांतून त्याला कोणती स्तुत्य व कोणती निंद्य वाटली हें सांगता येणें
' कठिण. हॅम्लेट हा ज्ञानी मूर्ख, तर आथेल्लो हा शूर मूर्ख; या व इतर भूमिका
' लक्षांत घेतां वैचित्र्य रंगविणें हाच शेक्स्पिअरचा मुख्य व प्रत्यक्ष हेतु; ध्येय सांगणें
' हा नव्हे असें वाटतें. कालिदासानें प्रणव, प्राक्तन, स्वाहा, स्वधा, उत्सर्ग, अपवाद
' वगैरे सर्व प्रकारच्या शास्त्रांतील उपमानें घेतलीं. पण या ठिकाणीं त्यांना शास्त्रा-
' च्या दृष्टीनें महत्त्व नसून त्यांच्या समर्पकतेमुळें कालिदासाच्या काव्यदृष्टीलाच
' महत्त्व अधिक. ' ( १२-६-२३ )

संस्कृत काव्याकडून मराठी काव्याकडे दृष्टि वळविली म्हणजे गेल्या पन्नास वर्षांचा काळ हा मराठी काव्यास बराच झटापटीचा गेलेला दिसतो. इंग्रजी काव्याच्या अध्ययनानें जें नवीन काव्य निर्माण झालें तें विषय व प्रतिपादनशैली या दोन्ही दृष्टींनें पूर्वीच्या काव्याच्या पेक्षां निराळ्या धर्तीचें होतें. यामुळें ' प्राचीन कवि विरुद्ध अर्वाचीन कवि ' असा वाद कांहीं काळ रंगलेला दिसतो. त्यांत प्राचीन कवींना राष्ट्रीयत्वाची कल्पना नव्हती, ते केवळ टाळकुटे होते, काव्य या दृष्टीनें

त्यांचें लिखाण कुचकामाचें होय, त्यांच्या कल्पना शिळ्या व परपुष्ट; त्यांनीं आळविलेला भक्तिरस हा मानसशास्त्रदृष्ट्या रस पदवीसच पोंहचूं शकत नाहीं, वगैरे आरोप जुन्या कवींच्या पदरीं बांधण्यांत येत असून, नव्या कवींत भाषेवर प्रभुत्व नाहीं, वृत्तबंधाची शिस्त त्यांना मानवत नाहीं, त्यांचे विषय क्षुद्र व प्रतिपादन थिल्लर अशा धर्तीचे आरोप नवीनांवर लादण्यांत येत. आणि कोणी तर कवित्वास संतत्वाची कसोटी लावून जुने कवी संत असल्यामुळेंच कवित्वांतहि श्रेष्ठ होत अशी भूमिका घेत. या विचारांच्या गलबल्यांतून जुन्या व नव्या अशा दोन्ही कवींतील गुणग्रहणाचा मार्ग दर्शविण्याची कामगिरी केसरीनें बजावलेली आहे. जुन्या कवींचें संशोधन व संग्रह यांसंबंधीं राजवाडे, पांगारकर-पराडकर, आंजगावकर, भिंगारकर, न. चिं. केळकर, निफाडकर वगैरेंचे पत्रव्यवहार व लेख यांचें जसें केसरीनें स्वागत केलें तसेंच नव्या कवींच्या काव्यसंग्रहाबद्दलच्या घाटे, यंदे, रानडे वगैरेंच्या पत्रव्यवहारासहि स्थान दिलें आहे. नव्याजुन्याचा वाद कांहीं काळ धुमसत राहिल्यावर १९१२ मध्यें पेटलेला दिसतो. नवे कवि जुन्यांपेक्षां सरस होत असें प्रतिपादन करणारा बालकवि ठोंबरे यांचा लेख व जुन्याची तळी उचलून नवीनांना टोमणे मारणारा अनंततनय आपटे यांचा लेख अशा दोन्ही लेखांना केसरीनें स्थान दिलें आहे. हे दोन्ही लेख व्याजोक्ति, उपरोध वगैरेंनीं चुरचुरीत असून या वादांतील गोळीबाराची कल्पना येण्याच्या दृष्टीनें वाचनीय आहेत. बालकवि लिहितात कीं—

'गाण्यानें कविच्या प्रभाव तुमचा वर्धिष्णुता घेइल।
स्फूर्तींचा तुमच्या पिढ्यांस पुढल्या साक्षी कवि होइल॥'

'ही केशवसुतांची उक्ति नव्या कवींसंबंधानें सर्वस्वी सार्थ होय.' अनंततनयांनीं प्रथमच टोमणा मारला आहे कीं आधुनिक कवींची तरफदारी करण्यास एका आधुनिक कवीनें सरसावावें हें औचित्यास सोडून होय. 'तुम्हीच 'स्वतःची तरफदारी करण्यास निघणें म्हणजे आम्हांला मोठे म्हणा असें 'जगाला सांगत सुटण्यासारखा प्रकार ! तुम्ही म्हणतां यमकादिकांचीं नसतीं बंधनें 'आम्ही पाळूं इच्छीत नाहीं. बरोबर आहे, पाळणार कोठून ! यमकें साधण्याची 'कुवत अंगीं असेल तेव्हांना !' वगैरे. (२७-२-१२). ह्याच सालीं ना. ह. आपटे यांनीं मराठी कादंबऱ्यांच्या परपुष्टत्वावर व उष्टेपणावर खरमरीत टीका केलेली आढळून येते. ते लिहितात कीं, 'इंग्रजी वाङ्मयांतील उत्कृष्ट कादं-'बऱ्यांचा परिचय झाला असतांहि एक हरिभाऊ आपटे वगळले असतां स्वयंस्फूर्त 'व स्वतंत्र कादंबऱ्या लिहिणारांची वाण पडावी हें आश्चर्य नव्हे काय ?' मराठीनें उसनवारी केली ती इंग्रजी कादंबऱ्यांचीच केली नसून बंगाली, हिंदी वगैरे कादंबऱ्यांचीहि केली आणि तीहि कांहीं वेळां डोळे मिटून म्हणजे हिंदी कादंबरी मूळचीच उसनी असावी आणि ती स्वतंत्र समजून तिला मराठी पेहराव चढवावा

अशी. ह्या प्रकारचीं कांहीं उदाहरणें दाखल करून अशा कादंबरीकारांना उद्देशून लेखक बजावतों कीं, 'आम्ही खात्रीपूर्वक सांगतों कीं, हिंदी भाषेंत स्वतंत्र 'कादंबऱ्या लिहिणारा लेखक अद्याप झाला नाहीं.' ( २३-७-१२ ).

आतां प्राचीन कवींसंबंधानें पाहतां त्यांच्या वतीनें लिहिण्याचा प्रसंग खुद्द केसरीकारांस केसरीच्या अगदीं पहिल्याच वर्षीं आलेला आढळतो. त्या सालीं प्रसिद्ध नवनीताची दुसरी आवृत्ति काढण्यांत आली. त्यांत शाळाखात्याच्या लहरी-मुळें आध्यात्मिक अतएव अवघड विषयावर काव्य लिहिणारा म्हणून ज्ञानेश्वरास रजा देण्यांत आली आणि त्याच्या जागीं नामदेवाची स्थापना करण्यांत आली. त्याला उद्देशून केसरीकार लिहितात कीं, 'मराठी काव्याच्या सिंहासनाकडे 'कौतुकादरानें पहावें तों जेथें शालजोडी चमकावयाची तेथें घोंगडी दृष्टीस पड-'ण्याचा प्रसंग. महाराष्ट्र कवींपैकीं कोणी अध्यात्मच वर्णिला असतां त्यास अजीच 'काढून टाकणें काय उपयोगी ?' या आध्यात्मिक वा सांप्रदायिक कवींच्या कवनाचा अर्थ लावण्यांत चिकित्सक दृष्टीच्या डोळ्यावरोबर परंपरेचा डोळाहि उघडा राखला पाहिजे हें प्रतिपादन करण्याचा प्रसंग केसरी-कारांना पटवर्धन--केळकर--कृत तुकारामाच्या अभंगाची चर्चा या पुस्तकावरील अभिप्रायांत आला आहे. या पुस्तकांत प्रत्येक अभंगावर जे शेरे आहेत त्यांत एक असा आहे कीं 'तुकोबा उत्तम कवि म्हणून पंढरीवर कोणीं अभंग करून 'मागितले असतील त्यांच्या समाधानार्थ केलेल्या अभंगांपैकीं हा अभंग असेल.' यावर केसरी लिहितो, 'असलें तर्कट भरकटतांना चर्चाकारांच्या डोळ्यापुढें 'हल्लींचे हुकमी कवी नाचत होते कीं काय ? या एकचष्मी दर्शनाच्या दोष-'निरसनार्थ वारकरी दृष्टीस जुळेसा अर्थ घेणेंच वाजवी.' ( ३-१२-२९ ). उलट नुसत्या भाविकपणेंच जुन्या मराठी काव्याकडे पाहूं लागलें असतां कशी चूक होते हेंहि दर्शविलेलें 'संतकविकाव्यसूची' या पुस्तकाच्या अभिप्रायांत दिसून येतें. या सूचींत ज्या शेंकडों जुन्या कवींचा समावेश केला आहे त्या सर्वांना सूचीकारानें एकजात सरसकट संत ही पदवी बहाल केली आहे. जणों कांहीं संत आणि कवि यांचें समीकरणच आहे; आणि दुसरें म्हणजे मराठी कवींची सूची अभिप्रेत असतां त्यांत शाहिरांना अज्जीच वगळलें आहे. एतत्संबंधीं केसरी लिहितो--'या सूचींतील इतर किरकोळ दोष सोडले, तरी पोवाडे करणारे 'मराठी शाहीर रा. चांदोरकरांनीं प्रायः गाळले हा त्यांचा अपराध आम्ही 'अक्षम्य मानतों. शाहीर हेच खरे राष्ट्रीय कवि. त्यांचा आदर सर्वांचे आधीं 'व्हावयास पाहिजे. कदाचित् त्यांना संत म्हणण्यास चांदोरकर कचरत असतील. 'पण या सूचीस ठेवलेलें नांवच मुळीं आम्हांस अन्वर्थक वाटत नाहीं. संतकवि या 'सामासिक पदाचा अर्थ तरी काय ? संत पदवीचे कवि असा नांवाचा अर्थ असेल 'तर वैद्यकसारकर्ता दाननारायण व औषधीबाडवाला गोवर्धन वगैरे यादींतले

‘ संत कोठच्या गांवचे ? खऱ्या कवीला कवि या नात्याचें भूषण खचित पुरून
‘ उरण्यासारखें आहे. ज्यांत भक्तिरस प्रधान आहे तें तेवढें काव्य असें सुच-
‘ विण्याचा चांदोरकरांचा हेतु असल्यास तो मान्य होण्यासारखा नाहीं.’

भक्तिरस ज्यांत असेल तेवढेंच काय तें खरें काव्य हा एकांतिक सिद्धांत वरील सूचींत ध्वनित केला असला तर उलट भक्तिरसास मानसशास्त्रदृष्ट्या रस म्हणून मानताच येणार नाहीं असा आक्षेप जगन्नाथ पंडिताच्या वेळेपासूनच चालत आला आहे. पण ज्या भावनेंत मन रंगतें, जी चर्वणामय म्हणजे मनांत घोळावीशी वाटते ती भावना रसपोषक होय; अशीहि विचार-सरणी बरोबर असेल तर भक्तिरसाचें रसस्थान नाकारतां येणार नाहीं. एतद्विषयक ‘ रसतत्त्व आणि भक्तिरस’ ही नुकतीच केसरींत येऊन गेलेली लेखमाला वाचकांच्या नजरेस पडली असेलच. आतां प्राचीन कवींना राष्ट्रीय भावना नव्हती असा एक आक्षेप त्यांच्यावर घेतला गेला होता. त्यावर ‘ मराठी कवींना राष्ट्रीयत्वा-ची कल्पना नव्हती काय ! ’ या मथळ्याखालीं रा. पांगारकरांनीं मराठी कवींची बाजू मांडली आहे. ते प्रथम बजावतात कीं, मराठी कवींची भूमिका राष्ट्रीयत्वाच्या भूमिकेपेक्षांहि श्रेष्ठतर होती. तथापि राष्ट्रीयत्वाची संकुचित भावना-हि त्यांना पारखी नव्हती. ते लिहितात ‘ बहुतेक मराठी कवि साधु असल्या-
‘ नें एकदेशपरिच्छिन्न अशा राष्ट्रीयत्वाच्या संकुचित मर्यादेपलीकडे ते गेलेले
‘ होते. ‘ हें विश्वचि माझें घर ’ अशी त्यांची वृत्ति होती. आणि यामुळेंच चोखा-
‘ मेळा, जनाबाई, शेखमहंमद, यांच्या हातून मराठींत ग्रंथरचना झाली. हें
‘ विश्वात्मकतेचें आमच्या मराठी कवींचें शुद्ध स्वरूप होय. तरी ते परिच्छिन्न अशा
‘ खालच्या पायरीवर लोकोद्धारार्थ येऊन देशाचीं कामेंहि करीत. उदाहरणार्थ,
‘ मुकुंदराज व जयपाळ, आणि रामदास व शिवाजी यांचा संबंध इतिहासप्रसिद्ध
‘ आहे. एकनाथांना तर स्वग्रामरक्षणार्थ एकदां प्रत्यक्ष हातांत तरवार घ्यावी लागली
‘ होती. रावबाजीची भरसभेंत फजिती करणारा अनंतफंदीहि मराठी वाङ्मयास
‘ अवगत आहे. मुक्तेश्वराच्या महाभारतांतहि

**जावी जंगी फिरंगी । इंग्रेज बहुधा रक्तरंगी ।**
**मल्लेबार नौकामार्गी । विघ्नकर्ते दंडिले ॥**

‘ अशा ओव्या पाहणारास आढळतात. शिवाय नुसत्या मातृभाषेची सेवा
‘ करण्यासाठीं या कवींनीं जे अश्रांत परिश्रम केले त्यावरूनहि त्यांचा स्वाभिमान
‘ दिसून येतो. एका कृष्णदयार्णवाचेंच उदाहरण घ्या. पन्नाशी उलटून गेलेली,
‘ कुष्टरोगांनीं शरीर जर्जर झालेलें, कोरान्न मागण्याइतकें दारिद्र्य, अशा स्थितींत या
‘ कवीनें सतत पंधरा वर्षें खपून अर्धा लाख ग्रंथ संपविला. त्यांत भाषेच्या द्वारें
‘ लोकसेवा करण्याची अनिवार उत्कंठाच दिसत नाहीं काय !’ (२७-१०-०३).

पाश्चात्य नाटकांत शोकपर्यवसायी नाटकांना बरेंच वरिष्ठ स्थान आहे. इंग्रजी वाङ्मयाचा कुलगुरु जो शेक्स्पिअर त्याच्या नाट्यसृष्टींत तर शोकपर्यवसायी नाटकांनाच सिंहासनाचा मान आहे. ह्या नाट्यसृष्टीशीं परिचय होतांच शोक-रसांत आनंद कसा निर्माण होतो हा प्रश्न सुचण्यासारखा होताच. तो केसरीनें ‘ कवि आणि काव्यरति ’ या लेखांत चर्चेला घेतलेला आढळतो. केसरीकार ‘ शोकरसांतील आनंदाविषयीं लिहितात कीं, ‘ शोकपर्यवसायी नाटकापासून निवळ ‘ आनंदच होतो हें खरें नसून दुःखमिश्र आनंद होत असतो असें म्हणणें योग्य. ‘ हें कसें होतें ! तर काव्यवाचनांत किंवा त्याचा प्रयोग पाहण्यांत एकमेकां-‘ पासून अगदीं भिन्न असे दोन मानसिक व्यापार चाललेले असतात. एक, कल्पना-‘ शक्ति प्रज्वलित होऊन ती मनाचें काव्यवस्तूशीं तादात्म्य करण्यासाठीं झटत ‘ असते. दुसरा, इंद्रियापुढें प्रत्यक्ष असणाऱ्या किंवा कल्पनेनें निर्माण केलेल्या ‘ काव्यवस्तु आपआपल्या स्वभावाप्रमाणें वाचकांच्या व प्रेक्षकांच्या अनुकूल व ‘ प्रतिकूल संवेदनांस अंशतः कारणीभूत होत असतात. यामुळें दुःखपर्यवसायी ‘ काव्यें वाचीत असतां वृत्तीला थोडीशी खिन्नता उत्पन्न होते, आणि सुखपर्यवसायी ‘ काव्य वाचीत असतां थोडासा आनंद होतो. ( वर्ष ६ अंक ४६।४९). केसरी-कारांचा अभिप्राय असा आहे कीं, कल्पनाशक्तीस चांचल्य प्राप्त झालें असतां आनंद होतो व शोकरसांतहि कल्पनाशक्ति प्रज्वलित होत असल्यानें आनंद अनुभूत होतो.

केसरीचा मुख्य अवतार राजकीय स्वातंत्र्याकरितां असल्यानें केसरींतील साहित्यचर्चा हा भाग केवळ दुय्यम प्रासंगिक निमित्तानेंच आलेला; पण राज-कीय स्वातंत्र्य व स्वदेशाभिमान हा चालू काळचा युगधर्म होऊन बसल्यानें वाङ्मया-दि कलाहि या युगधर्मानुयायी बनल्यास नवल नाहीं. १९०६ सालीं पुण्यांत ग्रंथकारांचें प्रथम संमेळन भरलें त्याच वेळीं अध्यक्ष भारताचार्य वैद्य म्हणाले कीं, ‘ मराठी वाङ्मयाची अधिष्ठात्री देवता आजवर ईशभक्ति होती ती आतां राष्ट्र-‘ भक्ति झाली आहे. प्रत्येक काळीं एक प्रभावी भावना अथवा युगधर्म जनतेच्या ‘ हृदयसिंहासनावर अधिष्ठित असतो व त्या भावनेच्या छंदानुवर्तित्वानें शास्त्र, ‘ वाङ्मय, कला, ही आपला संसार मांडीत असतात. हा युगधर्म व त्याची अधिष्ठात्री ‘ देवता बदलली कीं नवे संप्रदाय उदयास येतात.’ वजनदार वर्तमानपत्रें ही या नव्या काळांतील नवे संप्रदाय होत. वारकरी, धारकरी, वगैरे संप्रदायाचे जसे अधिकृत ग्रंथ असतात व त्या त्या पंथांतील लोक प्रायः आपआपल्या पंथांतील ग्रंथांचींच पारायणें करीत असल्यानें आपल्या अनुयायांना अवश्य असणारें हरतऱ्हेचें ज्ञान एका सांप्रदायिक ग्रंथांतच समाविष्ट केलेलें असतें, तसेंच अलीकडची लोक-मताला वळण लावणारीं वजनदार वर्तमानपत्रेंहि आपल्या ध्येयभूत मुख्य विषया-बरोबर त्याला पोषक अशी अवांतर माहिती व मतेंहि वाचकांस सादर करीत

असतात. जुन्या पद्धतीचा भाविक वाचक दासबोध किंवा गुरुचरित्र याचीं पारायणें करून आपणाला हवी ती माहिती त्यांतून मिळवितो, तद्वत् एकच एक केसरी वर्षानुवर्षें अव्याहत खळ न पडतां वाचून त्यांतूनच हरतऱ्हेचें ज्ञान मिळवणारे केसरीचे भाविक वाचकहि खेडोपाडीं हजारों असतील. असे सर्व वाचक राजकारणाबरोबरच इतर हरएक बाबतींतहि मार्गदर्शित्वाच्या नात्यानेंच 'प्रासादिक' केसरीकडे पाहात असतात. अर्थात् ही जबाबदारी साहित्याच्या क्षेत्रापुरती केसरीनें कशी ध्यानीं वागविली हें दर्शविण्यापुरता वरील त्रोटक आढावा मांडला आहे.

---

## मथळे

[ श्री. नरहर रामचंद्र पारसनीस, बी. ए. ]

शितावरून भाताची परीक्षा होते किंवा नाडीज्ञानानें प्रकृतिमान अचुक सांगता येतें, किंवा नाकाच्या सौष्ठवावरून मुखसौंदर्याचें समीक्षण करतां येत, तशीच गत लेखाच्या मथळ्याची आहे. लेखाचा मथळा किंवा शीर्षक म्हणजे लेखाची नाडी होय. हृदयभांडाराची मुखचर्या ही जशी किल्ली ( Face is the index to the man ) तशीच लेखभांडाराची मथळा ही किल्ली होय. मथळा कळला कीं, लेखाचा सूर कोणच्या सप्तकांत वाहतो हें सहज कळून येतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एका सूत्रमय, सुटसुटीत, सौष्ठवपूर्ण व सुभाषितवजा मथळ्यांत लेखकाचें वा संपादकाचें प्रतिबिंब दिसतें. लेखकाच्या बहुश्रुततेची, रसिकतेची, व मार्मिकतेची पारख करण्यास मथळा हें एक महत्त्वाचें गमक आहे. एवढेंच काय पण तो लेखक हळुवार मनोवृत्तीचा आहे कीं बंडखोरवृत्तीचा आहे, वरिष्ठांच्या ताटाखालचें मांजर होऊन बसण्यांत आनंद मानणारा आहे कीं सर्व बाजूंनीं जरी बाह्योपाधींनीं जखडला तरी स्वाभिमान व स्वातंत्र्य यांच्या प्रेमामुळें जाचक व अपमानकारक बंधनांना जुमानणारा नाहीं, किंवा संपादकीय खुर्चीच्या जबाबदारीमुळें सारासार विचार करून समतोल लिहिणारा आहे कीं, ध्येयप्राप्तीसाठीं सर्वस्वाचा होम करावयास तयार आहे, इत्यादि कित्येक गोष्टींचें अनुमान केवळ लेखांच्या मथळ्यांवरून करतां येईल. हें विधान कदाचित् प्रथमदर्शनीं कोणाला अतिशयोक्तिपूर्ण वाटेल; परंतु केसरीच्या जन्मापासून आतांपर्यंतच्या सर्व मथळ्यांचा बारकाईनें व आस्थापूर्वक अभ्यास केला तर वरील विधानाची यथार्थता खात्रीनें पटेल.

वर्तमानपत्रकर्त्यांना मथळ्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. कारण मथळा म्हणजे वाचकांना सकृद्दर्शनींच वश करण्याचें अमोघ अस्त्र आहे. इंग्रजी वृत्तपत्र-संस्थेंतून कधीं कधीं संपादकापेक्षां सुद्धां चटकदार, चमत्कृतिपूर्ण व चित्तवेधक मथळे देणाऱ्याला अधिक महत्त्व दिलें जातें; एवढेंच नव्हे तर इतर लेखकांपेक्षां त्याला वेतनहि अधिक मिळतें. यांतील गोम तरी हीच कीं, वर्तमानपत्राचा खप चटकन् व चोहोंकडे होण्यास मथळे कारणीभूत होतात. याची प्रचीति नुकत्याच निघालेल्या व अल्पावधींत लोकप्रिय झालेल्या 'फ्री प्रेस' या इंग्रजी दैनिकावरून येईलच. तीच माहिती किंवा तीच बातमी एकाद्या सुटसुटीत व हृदयंगम मथळ्या-खालीं दिली कीं, वाचक ती उत्सुकतेनें वाचतो, एवंच मथळ्याचें इतकें महत्त्व स्पष्ट असतांनाहि आपल्याकडील मराठी वृत्तपत्रकार त्याकडे द्यावें तितकें लक्ष देत नाहींत. नाहीं म्हणावयास अशा तऱ्हेचा उपक्रम जसा केसरीनें सुरू केला, तसाच व तितकाच परिणामकारक उपक्रम 'सुधारकानेंहि' केला. मुंबईच्या 'नवाकाळां'तूनहि कित्येक वेळां मर्मभेदी मथळे वाचावयास सांपडतात.

केसरीच्या बाबतींत मथळ्याकडे दोन दृष्टींनें पाहिलें पाहिजे. केसरी दैनिक नसल्यामुळेंतो ताजी बातमी तितकीशी देऊं शकत नाहीं. किंवा अगोदर ती इतरत्र वाचल्यामुळें ताजी वाटत नाहीं. वाचक जो केसरी वाचतो तो त्यांतील विशिष्ट धोरणानें मांडलेली विचारसरणी, सरकारी कारभार कोणच्या चष्म्यांतून पाहावा याची दृष्टि, किंवा हरएक प्रसंगीं घडलेल्या वृत्तांत-विषयीं राष्ट्रीयत्वाला जागून लोकमत दर्शविणारी बुद्धि इत्यादि गोष्टींकरतां वाचतो. त्यामुळें अग्रलेख, स्फुटसूचना, विचारतरंग व प्रासंगिक बोल, इतर बातम्या वगैरे सर्व ठिकाणीं मथळ्याचें कार्यक्षेत्र येतें. केसरीच्या मथळ्यांचें कार्यक्षेत्र विस्तृत असल्यामुळें व त्याकरतां स्थान व कालहि मर्यादित असल्या-मुळें प्रस्तुत लेखांत केवळ अग्रलेखांच्या मथळ्यांचाच विचार करण्यांत येणार आहे.

केसरीचे मथळे म्हटलें कीं, लागलींच 'पुनश्च हरिः ॐ'—'हे आमचे गुरूच नव्हेत!'—'प्रासादशिखरस्थोऽपि काको न गरुडायते'—'बोलणें त्यागाचें करणें भोगाचें'—'भ्रमाचा भोपळा फुटला'—'शान्तिरस्तु...अविघ्नमस्तु' इत्यादि मथळ्यांचें स्मरण झाल्यावांचून राहणार नाहीं. केसरींतील प्रत्येक मथळा चित्तवेधक वा मनोरंजक असतो, असें म्हणण्याचा उद्देश नाहीं; किंबहुना तसें कोणत्याहि वर्तमानपत्राविषयीं म्हणतां येणार नाहीं. कांहीं मथळे मामुली स्वरूपाचे चमत्कृतिशून्य असणें साहजिकच आहे. पण मधून मधून विशेष प्रसंगामुळें चटकदार मथळे केसरींत येऊन गेले आहेत. गेल्या पन्नास वर्षांच्या आयुष्यांत तसे किती मथळे आले याची ठोकळ मानानें जरी गणती केली तरी ती सुमारें तीनशेंवर जाणारी आहे. अर्थात् त्या सर्व मथळ्यांचा एकाच दृष्टीनें समन्वय करणें दुरापास्त होईल. तरी पण मथळ्याच्या शरिरावरून व

आल्यावरून कांहीं ठोकळ विभाग पाडतां येणें शक्य आहे. कित्येक मथळे म्हणजे संस्कृतमधील लोकप्रसिद्ध सुभाषितें आहेत; कांहीं मथळे म्हणजे मराठींतील म्हणी व वाक्प्रचार यांच्या सदरांत जाण्यासारखे आहेत; तर बरेचसे मथळे सरकारच्या अरेरावीच्या कारभारावर व लोखंडी चौकटींतील गुणी बाळांच्या बालिश लीलांवर झणझणीत व सडेतोड टीका करणारे आहेत. थोडे आव्हानात्मक ( Challenging ) आहेत, तर कांहीं विकल्पात्मक आहेत.

**१. संस्कृत सुभाषितपर शीर्षकें**—कितीहि झालें तरी मराठीवर इतर कोणच्याहि भाषेपेक्षां संस्कृत भाषेचें मोठें ऋण आहे. आणि त्या ऋणाला जाणूनच कीं काय, संस्कृत शब्द, वाक्यें, श्लोकचरणें वा सुभाषितें मराठी लिखाणांत समाविष्ट करणासाठीं लेखक विशेष काळजी घेतात. तेंच अनुकरण केसरींतहि पाहावयास सांपडतें. प्रि. रँ. परांजपे व केसरी यांचे संबंध कसे होते, हें महाराष्ट्रीयांस विदितच आहे. शिक्षणसंस्थांतून धर्मशिक्षण देणें अशक्य आहे, अशा विचारसरणीचा निबंध प्रिन्सिपाल—मजकुरांनीं 'ईस्ट अँड वेस्ट' मासिकांत लिहिला. त्याला उत्तर देतांना केसरीनें बजाविलें कीं, 'ना. परांजपे जरी मोठे 'गणितज्ञ असले तरी त्यांना धर्मशिक्षणासारख्या विषयावर लिहिण्याचा अधिकार 'येतो असें नाहीं. तसेंच तो अधिकार त्यांना फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल 'असण्यानेंहि येतो असें नाहीं. कारण प्रसिद्धच आहे कीं, 'प्रासादशिखरस्थोऽपि 'काको न गरुडायते' (१७-५-०४). त्याच विचारसरणीचा अनुवाद जरा निराळ्या रीतीनें कां होईना, पण डॉ. भांडारकर व न्या. रानडे यांनीं केला. त्याला अनुलक्षून केसरीनें सर्वश्रुत असा एक अर्थान्तरन्यास योजिला. 'एकादा 'मनुष्य घसरूं लागला म्हणजे मग त्यास सांवरण्यास जे लोक प्रयत्न करतात 'त्यांना देखील आपल्या स्नेह्याचीच अधःपतनगति स्वीकारावी लागते. विवेक'भ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः' (३१-५-०४). कालाचा महिमा आतांपर्यंत काव्यमय भाषेंत पुष्कळांनीं गाइला. केसरीनें त्याला तर्कांच्या निकषाला लावून असें अनुमान काढलें कीं, 'भूगर्भशास्त्रवेत्ते आणि ज्योतिषज्ञ 'शास्त्री यांची एकवाक्यता करून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, या पृथ्वीचा 'जन्म होऊन आज वीस कोटी वर्षांपेक्षां कांहीं तरी जास्त वर्षें खचित झालीं 'आहेत. तेव्हां सत्य, त्रेता, द्वापर, कलि इत्यादि कालविभाग हे केवळ कविनिर्मित 'आणि सत्यापासून अत्यंत विभक्त असावेत असा तर्क होतो.' यालाच 'यस्यान्तं न विदुः सुराः सुरगणाः कालाय तस्मै नमः' (के. १-७-१०) असा मार्मिक मथळा केसरीनें दिला. भवति न भवति होऊन काँग्रेसनें कायदेमंडळांच्या निवडणुकी लढविण्याचें मुक्रर केलें. 'निवडणुकींत काँग्रेसचें द्रव्यबळ, मनुष्यबळ खर्च 'करून सुधारणारूपी हत्ती पोसण्यास काँग्रेसवाले तयार झाले. पण या हत्तीस 'थोडें तरी वळवितां येईल असा अंकुश (प्रधानपद) हातीं धरण्यास मात्र ते

'तयार नाहींत.' याला केसरीनें 'आक्रीते कारिणी किमंकुशे विवादः ?' ( १२-१०-२६ ) असें समर्पक शीर्षक देऊन वादावर लख्ख प्रकाश पाडला. गेल्यावर्षी ( १९३० ) नुकताच गेलेला 'शांतिरस्तु! पुष्टिरस्तु!...' हा मथळा वाचकांच्या स्मरणांतून गेला नसेल. 'शांतिरस्तु'—कांहीं एक न दिलें तरी (हिंदी लोकांना); 'पुष्टिरस्तु'—ब्रिटिश साम्राज्याची; 'तुष्टिरस्तु'—कुणाची? तर ती ब्रिटिश व्यापाऱ्यांची; 'अविघ्नमस्तु'—हिंदुस्थानांतील नोकरशाहीच्या कारभारांत; 'आरोग्यमस्तु'—ब्रिटिश फौजांचें; 'धनधान्यसमृद्धिरस्तु'—ब्रिटिश जनतेची.'( ४-११-३० ) ह्या मथळ्यांत ब्रिटिश नीतीचा व नोकरशाहीच्या वृत्तीचा मायावीपणा व मानभावीपणा पूर्णपणें प्रतिबिंबित झाला आहे. मुडिमन सुधारणा—( कीं कुधारणा ? )—कमिटींत एकमत न झाल्यामुळें बहुमतवाल्यांचा एक व अल्पमतवाल्यांचा एक असे दोन पृथक् पृथक् भाग मिळून जो रिपोर्ट बनला, त्याची संभावना 'शंखान्दध्मुः पृथक् पृथक्' (१०-३-२५) या मथळ्यानें करण्यांत केसरीचें मार्मिकत्व व उपहासबुद्धि दिसून येते. १८९९ सालीं लो. टिळकांची तुरुंगांतून सुटका झाल्यावर 'जवळ जवळ दोन वर्षांच्या कर्म-
'लोपानंतर पुनः स्वाध्यायास सुरवात करण्यापूर्वी ज्या जगच्चालकाच्या कृपेनें
'आजचा दिवस प्राप्त झाला त्याचें अंतःकरणपूर्वक स्मरण करणें हें पवित्र कर्तव्य
'समजतों'—हें हृद्गत त्यांनीं केवळ दोनच शब्दांत आणि तेंहि अगदीं परि-चयाच्या शब्दांत केल्यामुळें त्या मथळ्याचा लेख सर्वतोमुखी झाला आहे. आणि तो म्हणजे 'पुनश्च हरि ॐ' (४-७-९९). याशिवाय 'अहो प्रमादः !' ( ११-६-८९ ) 'साहसे श्रीः प्रतिवसति' ( १-६-१५ ) 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति' ( ८-१-२४ ) इत्यादि संस्कृत मथळे पाहिले म्हणजे केसरीच्या संपादकांवर संस्कृतचा संस्कार किती होता हें दिसून येतें.

२. मराठी म्हणी—केसरींतील कित्येक मथळे म्हणजे लोकप्रचारांतील मराठी म्हणीच आहेत. १८९३ सालच्या कायदे-कौन्सिलाविषयीं केसरी म्हणतो कीं, त्यांतील सभासद कितीहि बहुश्रुत, वजनदार असले तरी एकदां कौन्सिलांत शिरल्यावर ते लोकमताकडे व हिताकडे दुर्लक्ष करतात. याचें वर्णन—'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' ( १०-१-१८९३ ) या म्हणीनें कसें यथायोग्य केलें आहे! कारण हे दांडे जेव्हां सरकारच्या कुऱ्हाडींत जाऊन बसतात तेव्हां त्याचा 'उपयोग स्ववंशच्छेदनाकडे करण्यांत येतो.' 'कॉंझरव्हेटिव पक्षाची रात्र
'संपून लिबरल पक्षाचा सूर्य क्षितिजावर आला म्हणजे आम्हांस हक्क मिळतील,
'म्हणून आमच्याकडील कांहीं पंडितंमन्य मंडळी आज बरेच दिवस मिटक्या
'मारीत होती.' पण मोर्लेसाहेबांच्या भाषणानें तो 'भ्रमाचा भोंपळा लवकरच
'फुटला.' ( ६-३-१७०६ ). कारण ते म्हणाले, 'हिंदवासीयांची लायकी मला
'कबूल आहे, पण लिबरल पक्षाकडून लवकरच त्यांना कांहीं हक्क मिळतील असें

' मानणें मूर्खपणाचें आहे.' १९१७ सालीं प्रेस ॲक्टावर चर्चा बरीच झाली. लोकपक्षानें तो कायदा स्वातंत्र्यविघातक व अदूरदर्शीपणाचा आहे असें वारंवार बजाविलें. परंतु नोकरशाहीच्या हटवादापुढें लोकमत दुबळें ठरलें. यावेळीं केसरीनें असें स्पष्ट बजाविलें कीं, ' सरकारास अनियंत्रित सत्ता पाहिजे असल्यास ' खुशाल घ्यावी, कारण त्यांचा अधिकारच आहे. पण त्याचें मंडन करण्याचा ' वृथा प्रयत्न करून आपल्या अधिकाराचें हसें व क्षुद्र बुद्धीचें प्रदर्शन करून ' घेऊं नये. ' कारण जसें ' कोळसा उगाळला तरी काळाच ' (१३-३-१७) तसेंच वाइटाचें समर्थन केल्यानें ते कमी होत नाहीं. १९१८ सालच्या सुधारणेचें सत्यस्वरूप—' जनाब, देहेल्ली तो बहोत दूर हैं ' या मार्मिक मथळ्यानें उघडकीस आणलें. ' स्वराज्य म्हणजे दिल्लीचा कारभार आमच्या ताब्यांत देणें होय. ' पण मॉंटेग्यूसाहेब आपल्या रिपोर्टांतच असें म्हणतात कीं, ' पहिल्यानें म्युनिसि- ' पॅलिटी हातांत घ्या; किंवा प्रांतिक सरकारच्या कारभारांत हमाली करण्यास ' शिका. उतावीळपणें जास्त मागण्याची आशा ठेवूं नका. कारण, अजून दिल्ली ' दूर आहे.' ( के. १६-७-१८ ). १९२८ सालच्या बार्डोलींतील करबंदीच्या चळवळीविषयीं सरकारचें धोरण म्हणजे बुडत्याचा पाय खोलांत जाण्यापैकीं आहे. ' करबंदीची चळवळ शिस्तवार व नेटानें चालल्यामुळें नोकरशाही चिडून नेली. ' अन्यायामागून असत्यप्रतिपादन व समर्थन, अन्याय चालला नाहीं म्हणजे तो ' चालविण्यास धाकदपटशा व जुलूम आणि प्रतिपक्षाविषयीं गैरसमज पसरविण्याचा ' खोटेपणा व तोहि नीट चालला नाहीं म्हणजे निरपराध्यास खुनशीपणानें शिक्षा ' आणि तिचें समर्थन ' अशा ह्या घसरगुंडीचें वर्णन ' बुडत्याचा पाय खोलांत ' ( ५-६-२८ ) या मथळ्यानें किती यथार्थ झालें आहे ! १८८८ सालीं लॉर्ड डफरीन यांनीं सन्मान्य सर दि. पेटिट व राजा मुकरजी यांच्याकडून मोठ्या शिताफीनें मिठावरील वाढविलेल्या जकातीविषयीं अनुकूल अभिप्राय मिळविला. मीठ महाग झालें म्हणून ओरडावें तर आमच्या नांवाच्या मुखत्यारांनीं त्याला संमति दिली. म्हणजे हा निवळ ' तोंड दाबून बुक्क्यांचा मार ' म्हणावयाचा. ( २१-२-८८ ) ' केली कोंडी, पण झाला कोंडमारा ' ( १६-१२-१३ ) या मथळ्यांत प्रसिद्ध हिंदी पेढीवाला चुनिलाल सरय्या यानें जगांतील सर्व चांदीची कोंडी करून त्यांत स्वतःचाच कोंडमारा कसा करून घेतला हें उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. याचप्रमाणें इतर पुष्कळ म्हणींचा मथळ्यासाठीं केसरीनें कसा मार्मिकतेनें व परिणामकारक रीतीनें विषयप्रतिपादनासाठीं उपयोग केला हें दिसून येईल.

**३. नोकरशाहीवरील टीकास्त्र**—केसरीचें मुख्य कार्यक्षेत्र राजकारण असल्याकारणानें आणि केसरीचें व नोकरशाहीचें विळ्याभोपळ्यासारखें सख्य असल्यामुळें सरकारी कारभारावर केसरीच्या टीकास्त्राचा भडिमार एकसारखा

होत असतो हें साहजिकच आहे. टीकेला विषयीभूत झालेली व्यक्ति कोणीहि बडा अधिकारी असली तरी केसरीचें टीकास्त्र भीतीनें पराङ्मुख झालें नाहीं. १९०४ सालीं लॉर्ड कर्झनविषयीं लिहितांना केसरी म्हणतो, 'साहेबमजकुरांनीं 'आपल्या अलंकारिक भाषेंत (आपली) किती जरी प्रशंसा केली तरी हिंदी 'प्रजेच्या दृष्टीनें पाहिलें तर यांच्याइतके लोकांच्या हक्कांची पायमल्ली करणारे, 'अरेरावी, धूर्त व्हाइसरॉय आजपर्यंत हिंदुस्थानांत आले नव्हते.' अशा व्हाइस-रॉयाची 'आमचे बोलघेवडे व्हाइसरॉय' (५-४-०४) म्हणून संभावना केल्यास कोणालाहि नवल वाटणार नाहीं. १९२५ सालीं हिंदुस्थानचे स्टेटसेक्रेटरी यांनीं हिंदुस्थानाविषयीं पार्लमेंटांत भाषण केलें. त्याच्यावर टीका केसरीनें अशी केली कीं, 'तें भाषण इतकें नीरस, निःसत्त्व, पोकळ व मामुली थाटाचें झालें कीं, 'तें वाचीत असतां एकाहि वाचकाची भुवई वर उडाली नसेल, डोळा विस्तार 'पाऊन चमकला नसेल किंवा ओठावरील सुरकतीहि मोडली नसेल.' मग याला 'कोरड्या ढगांचें अवडंबर' नाहीं तर काय म्हणावयाचें! (१४-७-२५). १९०० सालीं ना. जाईल्ससाहेब विद्याखात्याचे अधिपति (Director) 'यांच्या 'नाकांत राजद्रोहाचा वास भरल्यामुळें नसत्या ठिकाणींहि राजद्रोह हुडकून काढून 'तो साफ करण्याचा ते प्रयत्न करीत. गणपतिउत्सवांत जाणें साहेबांस आवडत 'नसे. अगर शिवाजीउत्सवांत सरकारची मदत घेणाऱ्या खासगी शाळेंतील कोणी 'देखील मास्तर गेलेलाहि त्यांस खपत नसे.' या त्यांच्या संशयखोर व खुनशी वर्तनावर केसरीनें तीन अग्रलेख लिहून—'ना. जाईल्ससाहेब यांचें राज-द्रोहाचें पिसें' 'त्यांचीं मुक्ताफळें' 'त्यांची ओवाळणी' (२५-९-००, २-१०-००, १६-१०-००) या मथळ्याकरवीं खरमरीत टीका केली. १९०५ च्या स्वदेशी चळवळींत विद्यार्थी भाग घेऊं लागले म्हणून डेक्कन कॉलेजचे प्रो. सेल्बी यांचें पित्त खवळूं लागले, व ते विद्यार्थ्यांवर नाहीं नाहीं तसलीं नियंत्रणें घालूं लागले. या प्रकरणावरील टीकालेख व त्या सर्वांचा मथळा 'हे आमचे गुरुच नव्हेत' (१७-१०-०५) महाराष्ट्रीयांच्या स्मरणांतून कधींहि जाणार नाहीं. 'इंग्लंडांतून येणारे शिक्षक हिंदुस्थानचे खरे हित पाहण्यासाठीं येत नसून बडे 'पगार उकळण्यासाठीं येतात. आणि जे आम्हांस निव्वळ इंग्रजी लिहिण्या-'वाचण्याशिवाय राष्ट्रधर्माचें शिक्षण देणार नाहींत ते आमचे गुरुच नव्हेत' असें केसरीनें भाडभीड न ठेवतां निक्षून बजाविलें. त्याचप्रमाणें 'लिटनशहांची पोपटपंची' (९-१२-२४) 'सिडमहॅमसाहेबांचा पोटशूळ' (९-१-१७) 'हेले गेले पण घाण गेली नाहीं' (६-३-२३) 'विषारी नागिणीचा दंश' (१-११-२७) 'गोऱ्या नागिणीचे कांहीं फूत्कार' (८-११-२७) 'मेयोबाईचें शिमगा-पुराण' (२२-११-२७) इत्यादि मर्मभेदी मथळे केसरींत येऊन गेले आहेत. कोठल्याहि व कसल्याहि अधिकाऱ्याची भीडमुर्वत न ठेवतां त्याच्या

कृत्यावर सडेतोड व झणझणीत टीका करण्याचें केसरीचें धोरण वरील मथळ्यांत निःसंशय दिसून येतें. त्याचप्रमाणें ' नोकरशाहीची शॉयलॉकगिरी ' (८-३-२०) व 'न्यायनीतीचा सुलतानी बहाणा ' ( २-१२-२४ ) उघडकीस आणण्यांत केसरीच्या कामगिरीचें वैशिष्ट्य आहे. किंबहुना हिंदुस्थानाला स्वयंनिर्णयाचे हक्क देऊं, देत आहोंत वगैरे इंग्रजांचा मायावीपणा किंवा 'आवळा देऊन कोहळा काढणाऱ्या ' ( २-११-२० ) सरकारचें खरें अंतरंग लोकनिदर्शनास आणण्याचें काम केसरीनें उत्कृष्ट रीतीनें बजाविलें आहे. मॉंटेग्यूसाहेबांनीं सुधारणा दिल्या तरी ' उजाडलें, पण सूर्य कोठें आहे ! ' हा प्रश्न शिल्लक राहिलाच ! ( ९-७-१८ ). हिंदी लोकांना कायदे करण्यासाठींच पांगळी असेंब्ली दिली पण तिच्याहि वाटेंत कौन्सिल ऑफ स्टेटची धोंड ठेविली हें पाहून केसरी विचारतो ' पांगुळगाड्याला ब्रेक कशाला ! ' ( ६-१०-२५ ) हिंदुस्थान म्हणे ब्रिटिश साम्राज्याचा एक घटक. हिंदी माणूस कोठेंहि गेला तर त्याच्या संरक्षणाची जबाबदारी अर्थातच ब्रिटिश साम्राज्यावर. पण आफ्रिकेंतील हिंदी लोकांची काय स्थिति आहे ! हिंदुस्थानच्या दृष्टीनें ' साम्राज्य म्हणजे शेळीचें शेपूट ' ( १३-१०-२५ ) ' कारण ' शेपूट अंगावरील माशा वारील इतकें लांब नसतें व लाज झांकील इतकें रुंद ' नसतें. तद्वतच ब्रिटिश साम्राज्य आफ्रिकेंतील हिंदी लोकांचें संरक्षण करूं शकत ' नाहीं व लाजहि राखूं शकत नाहीं.'

४. प्रतिपक्षीयांचा समाचार—सरकारवरच टीका करतांना केसरीची लेखणी तिखट व तीक्ष्ण होती असें नाहीं, तर ती प्रतिपक्षीयांवर टीका करतांना तितकीच सफाईनें चालत असे. मग ते डॉ. भांडारकर असोत कीं, न्या. रानडे असोत, कीं ना. गोखले असोत, कीं बॅ. जिना असोत. १९१९ सालीं टिळक–केळकर यांच्या मानपत्रास ना. रँ. परांजप्यांनीं केलेला विरोध महशूर आहे. त्या वेळचा ' ना. परांजप्यांचा जळफळाट ' (१६-१२-१९) हा लेख म्हणजे नामदारमजकुरांची सडेतोड हजेरीच होय ! १९१५ च्या मद्रासच्या राष्ट्रीय सभेचें वर्णन केसरीनें मोठें मजेदार केलें आहे. मुंबईचे मवाळ पुढारी मद्रासेस राष्ट्रीय सभेचें राष्ट्रीयत्व नाहींसें झालें तरी बेहेत्तर, पण आमच्या मजलशींत राष्ट्रीय पक्षाचे पुढारी नकोत असा निर्धार करून गेले. अर्थातच केसरीनें विचारिलें कीं, ' ही राष्ट्रीय सभा कीं मवाळांचा क्लबोत्सव !' (५-१-१५). महात्मा गांधींनीं महाबळेश्वरीं गव्हर्नरांची भेट घेतली व नंतर ' तरी पण मी असहकारवादीच आहें ' असें सांगितलें. या वर्तनाला ' बोलणें त्यागाचें, करणें भोगाचें ' ( ८-६-२६ ) असें केसरीनें म्हटलें आहे. कौन्सिलप्रवेशाचा पहिला धडा नेहरूपक्ष महाराष्ट्रापासून शिकला. मग प्रधानपदाचा धडा शिकण्यास कां

हरकत घ्यावी ! कौन्सिलप्रवेशाचा ' हत्ती गटगट ' गिळला. मग प्रधानपदाच्या ' मुंगीला कां कटकट ! '( ११-५-२५ ).

५. स्पष्ट इशारा—केसरींतील कित्येक मथळे इशाऱ्याच्या वा सूचनेच्या स्वरूपाचे आहेत. सरकारला दिलेला इशारा जरा कडक व झणझणीत भाषेंत तर लोकांना दिलेला इशारा सहानुभूतिपूर्वक असतो. याची साक्ष १९२४ सालचा 'शुद्धीवर न याल तर कराच्या भोंवऱ्यांत गोते खाल ' (२३-९-२४) हा मथळा पटवील. समिति कायदा रद्द करण्याचें डॉ. गौर यांचें बिल प्रचंड लोकमतानें पास झालें. सरकारचा मोड झाला. त्यावेळीं केसरीनें सडेतोड इशारा दिला कीं, ' हा ' एकमती निकाल पायाखालीं तुडवाल, दडपशाहीची झोटिंगगिरी गाजवाल तर ' क्रांतिकारकांना ताम्रपट दिल्यासारखें होईल.' १९०१ सालीं जमीनमहसुलाचें बिल निघालें. त्याच्याविरुद्ध सारे सहाशेंच अर्ज गेले हें लक्षण कांहीं इष्ट नव्हतें. ' लाखों लोकांच्या अंगाखालील जमिनी एका पेनाच्या झपाट्याबरोबर काढून ' घेतल्या जात आहेत. ही गोष्ट जितक्या पुरतेपणीं लोकांस कळली पाहिजे ' तितकी अद्याप कळली नाहीं असें दिसतें.' तरी ' उठा, अजून वेळ गेली नाहीं ' (१३-१०-११) असा तातडीनें इशारा केसरीनें जनतेला दिला व तक्रारीअर्ज मुंबई कौन्सिलकडे पाठविण्यास निक्षून बजाविलें. याचप्रमाणें ' उत्तरच पाहिजे, तर हें घ्या ' ( ३१-३-९६ ); ' हें कांहीं आतां टळत नाहीं ' (२५-९-०६) इत्यादि मथळे केसरीच्या विशिष्ट धोरणाची कल्पना आणून देतात.

६. विकल्पात्मक पण सत्यस्वरूपाविष्कारी—' पाच्छाही कां गुलामगिरी !' ( १६-२-०२ ) हा मथळा विकल्पात्मक आहे. पण त्याबरोबर तो विषयाचें सत्य स्वरूप दाखवितो. इंग्रज लोक स्वसंरक्षणासाठीं कर देत असले तरी ते स्वातंत्र्य भोगीत आहेत. पण कांहीं साम्राज्यवाद्यांच्या अनावर राज्यतृष्णेमुळें जर अधिक कर देऊं लागले तर तेच अधिकाधिक गुलाम बनत चालले आहेत. वरवर साम्राज्यशाही दिसली तरी अधिक कर द्यावे लागल्यामुळें इंग्रज गुलामच होणार. १९०३ सालीं बाळासाहेब होळकरांना राजिनामा द्यावयास लावून त्यांच्या मुलास गादीवर बसविलें. या प्रकरणाला ' हा राजिनामा कां बडतर्फी ! ' ( १०-२-०३ ) हा मथळा देऊन त्या प्रकरणाचें सत्यस्वरूप लोकनिदर्शनास आणलें. सरकार नेहमीं, जमा कमी आहे अधिक कर बसविल्याशिवाय भागत नाहीं असें साळसूदपणें कायदेमंडळांत सांगतें. पण ' गोऱ्यांचे लाड सत्राकोटींची धाड ' ( ३-६-२४ ), यासाठींच बहुतेक नारळ खर्च केल्यावर बिचाऱ्या हिंदी लोकांना नारळाच्या आईशिवाय काय मिळणार ! या प्रकाराला केसरीनें असे संबोधिलें कीं, ' ही जमेची तूट ' नसून ' खर्चाची लूट ' ( ८-३-१० ) आहे. महात्मा गांधींनीं १९२४ सालीं स्वराज्यपक्षाला राष्ट्रीय सभेच्या अधिकारस्थानावरून हुसकून देण्याचें नवें फर्मान काढलें. त्यामुळें अर्थात् बोहोंकडे खळ-

बळ उडून गेली. याला 'ही संघटना का विटंवना ?' (१०-६-२४) यापेक्षां दुसरें काय म्हणावयाचें ?

७. कुतूहलपूर्ण व चमत्कृतियुक्त—'आतांमात्र हातघाईवर आलें' (२-२-८६) 'फडशा पडला' (६-६-०५) 'लाडू अधिक कोणास पाहिजेत?' (१७-३-०८) 'जर्मन गरुडाचे तोडलेले पंख पुन्हा फुटले' (५-५-२५) इत्यादि मथळे वाचून वाचकाचें तेव्हांच लक्ष वेधलें जातें. लेख वाचण्याची उत्कंठा वाढूं लागते. मग मथळ्याचें इष्ट कार्य झालें असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. अलीकडच्या हिंदी स्त्रिया राजकारणांत भाग घेऊं लागल्यामुळें ना. सर हर्बर्ट रिस्ले यांचें पित्त खवळलें; म्हणून त्यांनीं बड्या कौन्सिलांत वर्तमानपत्राच्या बिलावर भाषण करतांना 'शकुंतलाख्यान' लावलें. (के.२२-२-१०). साहेब म्हणाले, 'कुठें ती कवि कालदासाची विनम्र,शालीन, 'शकुंतला आणि कुठें त्या झनान्यांतसुद्धां राजद्रोहाचे गुप्त कट करणाऱ्या 'हल्लींच्या शकुंतला !' साहेबमजकुरांचे यथायोग्य कान उपटून केसरीनें सांगितलें कीं, आमच्या स्त्रियांत अज्ञान, निरक्षरता म्हणजे कोण माजलें आहे, मग उगाच अवस्त्वारोप करून आपल्या क्षुद्र बुद्धीचें प्रदर्शन करण्यांत काय शहाणपणा आहे ! 'कोऱ्या कागदाची कहाणी' (के.६-२-२३) म्हणजे काय ? म्हणून प्रथमदर्शनीं गूढ पडतें. जाणण्याची उत्सुकता वाढते. महाराष्ट्रांतील पक्षभेद मिटवून एकी करण्यासाठीं, केळकरपक्षानें गंगाधरराव देशपांडे यांना सांगितलें कीं, तडजोडीसाठीं तुम्ही एकादा कोरा कागद जरी दिलांत तरी त्यावर आम्ही सही करूं. तत्संबंधींचा हा लेख. बादशहांनीं आपल्या राजवाड्यांत दारुबंदी केली, म्हणून 'बादशहा ब्राह्मण झाले !' (६-४-१५) असें केसरीनें वर्णन केलें. मथळ्यांतील नुसत्या 'ब्राह्मण' या शब्दानेंच कितीतरी अर्थ प्रतीत होतो ! ना. शास्त्र्यांच्या परदेशांतील दौऱ्यास 'कळसूत्री बाहुल्यांचा नाच !' (के.२०-५-२२). या मथळ्याचा अहेर केसरीनें केला. त्याचप्रमाणें 'ब्राह्मण विरुद्ध म्हणे सर्व जग !' (३१-८-२६) 'प्रायश्चित्ताचें वेळींच नवें पाप' (२२-२-२०) 'कौरवसभेंतील कोलाहल' (१३-९-२०); 'गोषांतील खार्ती उजेडांत आणा' (३१-१-२२) इत्यादि मथळे कुतूहलपूर्ण असून वाचकांचें लक्ष वेधण्यास पूर्ण समर्थ आहेत.

८. शब्दचमत्कृति—केसरींतील अलीकडील मथळ्यांत शब्दचमत्कृति किंवा शब्दांची कसरत पाहावयास सांपडते. आणि त्याच्या जोडीला अनुप्रास व ध्वनिसाम्य असल्यामुळें मथळ्यांना अधिकच रम्यत्व येतें. 'मुंबईच्या मवाळांची मजलस' (१६-५-२२); 'कॉंग्रेसचे कुशल कर्णधार' (७-९-२०); 'तख्त तागडी, तरवार' (२६-१-०९) हे मथळे, व 'जशी कामना तशी भावना' (३-९-१२); 'कामाचा सुकाळ तर माणसांचा दुष्काळ' (७-५-१२)

' साम्राज्याच्या गरजा येती आमच्या काजा ' ( ३०-४-१७ ) इत्यादि मथळे वरील विधानाची सत्यता पटवितील.

येथपर्यंत केसरीच्या गेल्या पन्नास वर्षांतील लेखांच्या वेचक शीर्षकांचें निरनिराळ्या तऱ्हेनें विवेचन केलें आहे. हा विषय अगदीं नवीन स्वरूपाचा असल्यामुळें स्वतःचीच कांहीं तरी विशिष्ट प्रमाणें ठरवून त्यांच्या अनुराधानें ही चर्चा यथामति केली. पूर्वीचे केसरीचे मथळे विंचवानें मारलेल्या नांगीसारखे झणझणीत होते. अलीकडच्या मथळ्यांत सडेतोडपणा, मार्मिकता, झणझणीतपणा याबरोबर वाङ्मयीन ( अनुप्रास, ध्वनिसाम्य वगैरे ) दृष्टीची जोड मिळाली आहे. शेवटीं, चटकदार, अर्थबोधक मथळ्यांचें लोण पहिल्यापासून तें आतांपर्यंत चालत आलें तें तसेंच पुढेंहि चालूं राहावें अशी आशा प्रकट केल्याशिवाय राहवत नाहीं.

---

# संपादकीय निर्देश

[ श्री. गोपीनाथ गणेश तळवलकर, सं. ' आनंद ' ]

पाश्चात्य देशांत जन्म पावून ज्या अनेक कला व संस्था नवयुगाचे आरंभीं आमच्या देशांत आल्या त्यांत ' वर्तमानपत्र ' ही एक प्रमुख कला होय. 'वाङ्मय ही कला असून वर्तमानपत्रें हा धंदा आहे ' असें एक वाक्य प्रसिद्ध आहे. पण तें पूर्णांशानें खरें नाहीं. कारण वर्तमानपत्रांतील ' वार्ताविहार ' सोडला तरी त्याचीं सामाजिक, राजकीय, आंतरराष्ट्रीय, धार्मिक इ० अनेक अंगें अशीं आहेत कीं त्यांत वाङ्मयप्रकर्षाला भरवूर वाव आहे. शिवाय जगांतील हालचालींची आणि घडामोडींची चटकदार माहिती जनसमूहास देणें एवढाच जर वर्तमानपत्रांचा हेतु असेल तर तो नुसता व्यवसाय ( profession ) होऊं शकेल. पण तसें नाहीं. वर्तमानपत्रें हीं जनतेचीं उपदेशक व मार्गदर्शक होत. ' फॉर्टनाइटली रिव्ह्यू 'चें संपादकत्व सोडतांना मोर्लेसाहेबांनीं ' अखेरचा प्रणाम ' अशा शीर्षकाचा एक सुंदर अग्रलेख लिहिला आहे. त्यांतील उपसंहारात्मक परिच्छेदांत एक मार्मिक वाक्य आहे. ते म्हणतात—' जोरदार व संघटित राजकीय पक्ष ' अस्तित्वांत येण्यापूर्वी स्वतंत्र विचारसांप्रदाय ( Schools ) निर्माण करण्याची ' आवश्यकता आहे. ' लोकशाहीच्या व स्वातंत्र्याच्या विशुद्ध वातावरणांत शेकडों शतकें वावरणाऱ्या इंग्लंडांत जर स्वतंत्र विचारसंप्रदाय निर्माण करण्याची एवढी

महती तर आमच्या परतंत्र, स्वातंत्र्यासाठीं अहर्निश तळमळणाऱ्या देशांत त्याची किती आवश्यकता आहे बरें !

हें विचारसंप्रदाय निर्माण करण्याची शक्ति वर्तमानपत्रांचे ठायीं असते. लोकजागृतीची प्रचंड लाट उसळून देशाला स्वातंत्र्योन्मुख करण्यांत ज्यांनीं आपलें आयुष्य वेचलें त्या लो. टिळकांना याची पूर्ण जाणीव होती. म्हणूनच—

'डेक्कन एज्युकेशन सोसायटी कायमची सोडून देऊन सार्वजनिक चळ- 'वळींत पडावयाचें व स्वमतप्रसार करावयाचा हें टिळकांनीं निश्चित केल्यावरो- 'बर, त्यांनीं पहिली गोष्ट केली ती ही कीं छापखाना व वर्तमानपत्रें यांच्या 'वांटणींत कर्जासकट वर्तमानपत्रें आपल्या वांटणीला घेतली, छापखाना दुसऱ्या 'भागीदाराला दिला व स्वतः संपादक होऊन अखत्यारीनें मतप्रसार सुरू केला.'

(के. ३-८-२९).

'वर्तमानपत्रें व तारायंत्रें हीं हल्लींच्या काळांत कोणत्याही चळवळीचीं ज्ञानें- 'द्रियें असल्यानें तीं परवश न होतां आत्मवश होतील, अशीं हिंदी लोकांनीं 'तरतूद करणें जरूर आहे.' (के. ६-११-१७). हें वेळींच ओळखून आपल्या राजकीय जीवनाला आरंभ करतांक्षणींच त्यांनीं एक मराठी व दुसरें इंग्रजी पत्र हस्तगत करून घेतलें.

'केसरी' हें अभिधान एक उज्ज्वल, राष्ट्रीय वृत्तीच्या विचारसांप्रदायाचें द्योतक आहे. जागतिक व राष्ट्रीय परिस्थितीच्या वेळोवेळीं पालटणाऱ्या स्वरूपांत 'केसरी'च्या लेखनांत व विचारांत थोडीबहुत मुरड पडत गेलेली आढळत असली तरी एका विशिष्ट उच्च भूमिकेवरून तो केव्हांच खालीं उतरलेला नाहीं. वर्तमानपत्रकर्त्यांची जबाबदारी केवढी आहे याचा विसर 'केसरी'ला केव्हांच पडला नव्हता. १९१७ सालीं 'प्रेस ॲक्ट' रद्द करण्याची विनंति करण्याकरितां मि. हॉर्निमन् यांच्या अध्यक्षतेखालीं एक शिष्टमंडळ व्हाइसरॉय लॉर्ड चेल्म्स- फोर्ड यांचेकडे गेलें होतें. शिष्टमंडळाला उत्तर देतांना व्हाइसरॉयसाहेबांनीं नेहमीं- प्रमाणें राष्ट्रीय वर्तमानपत्रांस लाखोली मोजलीच. पण वर साळसूदपणानें असेंहि सांगितलें कीं, प्रेस ॲक्ट अस्तित्वांत असल्यामुळें वर्तमानपत्राच्या प्रगती- स अडथळा येत नाहीं. आपल्या विधानाच्या समर्थनासाठीं प्रेस ॲक्ट अस्तित्वां- त आल्यानंतर जन्मास आलेल्या शेकडों नियतकालिकांची यादी व्हाइसरॉय- साहेबांनीं शिष्टमंडळापुढें मांडली. या प्रसंगाला उद्देशून 'केसरी'नें लिहिलेला लेख अत्यंत मननीय आहे. 'गुळगुळीत कागदावर बुळबुळीत मजकूर' छापून जनमनोरंजन करणारीं 'घासलेटी' नियतकालिकें शेकडों निघालीं तरी तेवढ्या- वरून वर्तमानपत्रांची प्रगति झाली असें म्हणतां येत नाहीं. असें सांगून उत्कृष्ट वर्तमानपत्रांचीं कर्तव्यें कोणतीं, हें 'केसरी'नें थोडक्यांत स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे.

' देशाची राजकीय स्थिति काय, राजकीय दृष्ट्या लोक कोणत्या अवस्थेंत
' आहेत, त्यांचे हक्क कोणते, राजकीय दृष्ट्या बाल्यावस्थेंतून निघून प्रौढावस्थेंत
' कसें यावें, किंवा अशा प्रकारच्या प्रगतीस जे विघ्नें आणतात त्यांच्या दोषांचें
' आविष्करण करून ते दोष दूर करण्यास राष्ट्रानें राजनिष्ठपणानें आणि कायदे-
' शीरपणानें कोणते उद्योग करावे हें लोकांस समजावून देण्यासाठीं, त्यांच्या
' मनांत भरविण्यासाठीं आणि तदनुरूप उद्योगास त्यांस प्रवृत्त करण्यासाठीं
' लोकांचे राजकीय शिक्षक म्हणून स्वतंत्र देशांतील वजनदार वर्तमानपत्रें प्रयत्न
' करीत असतात.' (के. १३-३-१७).

परकीय सरकारला विवेकाचे चार शब्द सांगून त्याच्या स्वैर अरेरावी वर्तनाला आळा घालणें हें जसें अगत्याचें तितकेंच किंबहुना त्याहूनहि अधिक अवश्य कर्तव्य म्हणजे देशद्रोही व स्वार्थसाधु स्वकीयांच्या दांभिकतेचें आविष्करण करणें हें होय. ' केसरी 'सारख्या राष्ट्रीय पत्रासंबंधीं माबाप सरकारला बदसल्ला देणाऱ्या एका वैद्यविद्याविशारद ' सरा ' वर टीकेचा आसूड केसरीनें कसा चालविला हें पाहण्यासारखें आहे केसरीचें सार्वजनिक बाबतींतील धोरण, निर्भिड लेखनपद्धति व त्या वेळच्या संपादकांचा (लोकमान्यांचा) तापटपणा या लेखांत चांगलाच व्यक्त होतो ' केसरी ' म्हणतो——

' केवळ स्वधर्मांकरितांच ही खटपट होती तर मुसलमान लोकांच्या अंजुमान-
' प्रमाणें डायरेक्टरसाहेबांशीं उघड पत्रव्यवहार करण्यास कोणती हरकत होती ?
' अशा तऱ्हेचा उघड पत्रव्यवहार केला नाहीं इतकेंच नव्हे तर ' केसरी 'त ही
' बातमी प्रसिद्ध झाल्यावर सरसाहेबांनीं ' तुमच्या आफिसांतून ही बातमी कशी
' फुटली ? ' असें डायरेक्टरसाहेबांस विचारून डाव साधल्यास गौप्यगोपनाच्या
' कर्झनी कायद्यानें ' केसरी 'कारास डोंगरीची हवा दाखविण्याचाहि प्रयत्न केला
' होता ! धिक्कार असो अशा गृहस्थांना कीं जे मातृभूमीशीं अशा प्रकारचा द्रोह
' करून फिरून आपल्यावर कडक टीका करणारांस तुरुंगांत पाठविण्यास तयार
' होतात !

' वाचकहो, आतां तुम्हीच विचार करा कीं लोकांत पुढारी म्हणून नाचणारे
' बडे बडे लोक जेव्हां स्वदेशी चळवळीची अशा गुप्त रीतीनें मान कापूं लागतात,
' तेव्हां त्यांच्या पाठीवर कोरडे ओढल्याखेरीज कोणाच्यानें तरी राहवेल काय ?
' सर भालचंद्र हे हाडाचे दुष्ट नसतील, व कदाचित् श्ववृत्तींत वाढलेल्या एखाद्या
' हलकट रावबहादूरानें त्यांस पछाडलें असेल आणि बंधुभावानें सरहि घसरले
' असतील ! पण हें सांगून आतां उपयोग काय ? एक तर सर भालचंद्र ही गोष्ट
' स्वतः कबूल करीत नाहींत. आणि यदाकदाचित् कबूल केली तरीहि स्वयंभू
' डिटेक्टिवाचा नाहीं तर दुधखुळेपणाचा तरी दोष त्यांच्या पदरीं येतो तो येतोच.
' असे दुधखुळे किंवा स्वयंभू डिटेक्टिव पुढारी आम्हांस नको आहेत; किंबहुना

' यांनींच आमचा घात केला आहे असें आम्ही म्हणतों. इनॉक्युलेशनची गोष्ट
' सरसाहेबांच्या धंद्यापैकीं तरी होती, परदेशी साखरेची गोष्ट तशी नाहीं; आणि
' मराठी चौथे पुस्तक वाचण्याचेंहि सरसाहेबांस कारण नव्हतें..

' गरीबांच्या चुकांपेक्षां मोठ्यांचींच पातकें लोकांस अधिक भोगावीं लागतात;
' आणि एवढ्याकरितांच गुन्हेगाराचा मोठेपणा व त्याच्या गुन्ह्यावरील टीकेचा
' कडकपणा यांचे प्रमाण व्यस्त न ठेवतां सम ठेवण्याची ' केसरी 'कारांची
' वहिवाट आहे. सार्वजनिक कामांत पुढाकार घेण्यास जे तयार होतात
' ते आपलें वर्तन देशाशीं बेइमानीपणाचें न ठेवण्याची पहिल्यानेंच खबरदारी
' घेण्यास जर चुकतील--मग ती चूक दुर्बुद्धीनें होवो किंवा दुधखुळेपणानें
' होवो--तर आपल्या चुकीवर कोणी कितीहि कडक टीका केली तरी त्याबद्दल
' त्यांना विषाद वाटता कामा नये. सार्वजनिक कामांत पुढें येणें हें एक प्रकारें
' असिधाराव्रत आहे; आणि ते जर सरसाहेबांच्या हातून योग्य रीतीनें पार पडत
' नसलें तर त्यांनीं आपला सर्व काल प्रिस्क्रिप्शनें लिहिण्यांत घालवावा. आमचा
' त्यांचा कांहीं द्वेष नाहीं; व असण्याचें कांहीं कारण नाहीं. सार्वजनिक कामांत
' नेटानें पुढाकार घेण्यास ते स्वभावतःच नालायक आहेत. याला आतां दुसरा कांहीं
' पुरावा नको; व अशा नालायक पुरुषाच्या सार्वजनिक दोषावर होणारी टीका
' जितकी कडक असेल तितकी चांगलीच. हे आमचे कोणीहि लागत नाहींत;
' पण त्यांच्या ठिकाणीं जर आमचे कोणी काके मामे असते तरीहि असत्पक्षाचा
' अभिमान धरल्याबद्दल त्यांस भारतांतील प्रसिद्ध धनुर्धराप्रमाणें नम्रतापूर्वक कडक
' टीकारूपी देहांत शासन देण्यासहि आम्हीं मागेंपुढें पाहिलें नसतें.

' केसरी माणसांचा अभिमानी नाहीं, मताचा अभिमानी आहे, हें अनेक
' वेळां आमच्या वाचकांच्या प्रत्ययास आलेलें आहे; आणि सध्यांचा ' केसरी '-
' कार वृद्ध होवो वा मरो, बड्या लोकांचीं घाणेरडीं गुप्त कृत्यें जगापुढें मांडून
' त्यांतील ढोंगीपणा कडक टीकेच्या रूपानें लोकांच्या मनांत ठसविण्याची ' केसरी 'ची
' वहिवाट-किंवा पाहिजे तर खोड म्हणा,—नेहमीं कायमच राहील.'(के. २४-९-०७)

**' नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता '** हें वचन स्वतंत्र देशांत देखील बव्हंशीं खरें ठरतें तर सत्ताधारी परकीय असणाऱ्या आमच्या हिंदुस्थानांत त्याची सत्यता पुरेपूर पटावी यांत नवल नाहीं. लोक किंवा सरकार यांपैकीं एका कोणाची तरी मर्जी संपादन करणें शक्य आहे. ' केसरी 'नें तर जन्मापासूनच लोकसेवेचें कंकण हातांत बांधलेलें. जनताजनार्दनाची उपासना हेंच ' केसरी 'चें ध्येय, आणि त्या ध्येयावर ' देह जावो अथवा राहो ' अशी अनन्यसाधारण निष्ठा. तेव्हां सरकारच्या कृपेची छाया ' केसरी 'ला केव्हांच मिळाली नाहीं यांत आश्चर्य तें कसलें !

'एक पक्षीं आपलीं मतें पूर्णपणें प्रतिपादन करण्यास ज्या अडचणी आल्या
'होत्या त्या नाहींशा होऊन भवभूतीनें म्हटल्याप्रमाणें—

'ये नाम केचिदिह न प्रथयंत्यवज्ञां
जानन्तु ते किंमपि तान्प्रति नैष यत्नः'

'असें म्हणण्याची त्यास स्थिति आली ही मोठ्या सुदैवाची गोष्ट आहे.
'ज्यास असली वृत्ति धरावयाची असते त्यास इतर कवींप्रमाणें राजाश्रयाची
'अगर राजानुचराश्रयाची अपेक्षा न करतां त्यावर पाणी सोडावें लागतें हें भव-
'भूतीचा चरित्रावरून स्पष्ट होत आहे.' (के. १२-१-९२).

'केसरी सरकारास म्हणजे नोकरशाहीस केव्हांहि प्रिय नव्हताच; आणि
'आमच्या मतें निर्भीडपणें लोकसेवा करून नोकरशाहीची मर्जी संपादन करणें
'केव्हांहि शक्य नाहीं.'( के. १६-३-२० ).

असे उद्गार 'केसरी'नें वेळोवेळीं काढले आहेत. सामर्थ्यवान् सत्ता-धाऱ्यांच्या इतराजीची तलवार डोक्यावर टांगलेली असतांना निर्भयपणें जनतेचा कैपक्ष घेणें किती जोखमीचें आणि धाडसाचें होतें हें सांगणें नकोच. प्रेस ॲक्टापूर्वी देखील एकादा कडक लेख लिहिणाऱ्या संपादकांस कायद्याच्या कचाटींत पकडण्याचें साधन सरकारच्या हातीं होतेंच. त्यानंतर प्रेस ॲक्टचा वरवंटा आला. त्यांतून केसरीचे लोकमान्य संपादक केवळ जोमदार लेखनच करून थांबणारे नव्हते तर सक्रिय चळवळीचीहि जोड त्यांनीं आपल्या लेखनाला दिलेली. मग त्यांचा कडकपणा सरकारास असह्य व्हावा यांत काय नवल! त्यांतून मावाप सरकारची कृपा संपादन करण्यास झटणारे 'केसरी'च्या साध्या-सुध्या वाक्यांतूनहि राजद्रोहाची गूढार्थ प्रचीति सरकारास करून देण्यास टपलेले. अशा स्थितींत आपलें अस्तित्व संशयित आहे याची जाणीव 'केसरी'ला होती. प्रेस ॲक्ट अस्तित्वांत आल्यानंतर 'केसरी'ला सरकारनें ताकीद दिली त्याप्रसंगीं 'केसरी'नें आपल्या असिधाराव्रताची ओळख अगदीं मोजक्या शब्दांत करून दिली आहे—

'केसरीचें अस्तित्व यापुढें चालू राहणें म्हणजे एके बाजूस—तो बंद पाडण्या-
'ची अधिकारी वर्गाची इच्छा, बदललेली परिस्थिति, नवीन कायद्यांतील व्यापक
'शब्द, मानवी बुद्धीची स्खलनशीलता; आणि दुसऱ्या बाजूस-केसरी संस्थेचा मूळ
'हेतु, सरकारच्या कृत्यावर जाहीर टीका करून त्यांतील गुणाप्रमाणें दोष दाख-
'विण्याची वास्तविक जरूरी, लोकशिक्षणाच्या कर्तव्याची जाणीव, कायद्याचें
'संकट डोळ्यांपुढें उभें असतांहि स्वाभाविकपणें माघार न घेण्याची मतस्वातंत्र्याची
'हौस व स्वाभिमान बुद्धि इतक्या सर्व गोष्टींचा मेळ पडणें होय.'(के. १३-९-१०)

'मॅकमिलन' मासिकांत 'व्हीलर' नामें कोणी एका लेखकानें एक लेख लिहिला होता. त्यांत हिंदी वर्तमानपत्रावर अनेक आक्षेप घेतले होते. त्यांतील

मुख्य आक्षेप असा कीं हिंदी वर्तमानपत्रांचा फार मोठा भाग राजकीय लेखांनीं व्यापलेला असतो. या आक्षेपास ' केसरी 'नें चोख प्रत्युत्तर दिलें आहे.

' आम्ही एतद्देशीय लोक सापत्निक वर्गांत मोडत असल्यामुळें आमच्यावर ' राजवर्गीयांस विश्वास ठेवणें जड वाटतें. खरी हकीकत न समजल्यामुळें सत्ता- ' धीशांचें वर्तन संशयास कारणीभूत होतें आणि इंग्लिश लोकांची वस्ती आम्हां- ' ला नाशाला नेणारी आहे असा मनाचा ठोकळ समज झाल्यामुळें इंग्रजी लोकां- ' च्या प्रत्येक कामांत कांहींतरी गुप्त हेतु असेल असा साहजिक संशय उत्पन्न होतो. ' या दोन कारणांमुळें सरकारच्याविरुद्ध लेख येण्याचा संभव आहे.' (के. २५-९-८८)

तथापि असे लेख केवळ विकारवशतेच्या उमाळ्यांत न लिहितां स्पष्ट, मुद्देसूद, पण जोरदार असावेत असा ' केसरी 'चा कटाक्ष असे. वर उद्धृत केलेल्या लेखाचा समारोप करतांना ' केसरी 'नें दिलेला उपदेशात्मक इषारा वर्तमानपत्र- कारांना फार उद्बोधक होईल——

' लिहिण्यामध्यें शांतता, गांभीर्य, आणि सत्यप्रेरित निस्पृहीपणा हीं स्पष्ट ' दिसलीं पाहिजेत. सरकारविरुद्ध टीका जेथें योग्य दिसेल तेथें करण्यास काडीमात्र ' हरकत नाहीं. पण टीका करतांना आपल्यास जी माहिती मिळण्याचा संभव ' असेल तेवढी मिळवून मग लिहिण्यास आरंभ करावा.'

**' मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं चिरम् '** हें वाक्य ध्येयवादाच्या दृष्टीनें मनोज्ञ आहे. पण एका प्रचंड देशाला गाढ निद्रेंतून जागा करण्याची ज्यांनीं खटपट चालविली आहे त्यांना नेहमीं अशी पतंगवृत्ति स्वीकारून चाल- णार नाहीं. हातीं असलेल्या साधनांचा ज्यास्तींत ज्यास्त उपयोग करून विधायक कामगिरी करतांना मोठ्या सावधगिरीनें ध्येयाचरण करावें लागतें.

' ज्या काळीं कायद्याप्रमाणें जितकी मोकळीक दिलेली असेल तिचा पूर्ण ' फायदा घेऊन लोकमत जागृत करण्याचें व सरकारशीं आम्हीं मागत अस- ' लेल्या हक्कांचें समर्थन करण्याचें जें काम आम्हीं पत्करिलें आहे, तें काम ' निर्भयपणें चालविणें आम्हांस जरूर आहे.' ( के. ४-७-९९ ).

यांत ' केसरी 'च्या राजकीय धोरणाचा पूर्ण खुलासा मिळतो. बहुजन- समाजाला मार्ग दाखविण्याकरितां दीपशिखेप्रमाणें उत्कृष्ट वर्तमानपत्रांनीं अखंड तेवत राहिलें पाहिजे. लोकजागृति करणें हा मुख्य हेतु बाळगणाऱ्या वर्तमान- पत्रानें अस्तित्व टिकविण्याची शर्थ केली पाहिजे. कारण **' जीवन् नरो भद्र- शतानि पश्येत् '** या न्यायानें अस्तित्व राहिलें तर महत्कार्य करून दाखवितां येईल. मात्र भीरुतेचा अंगीकार करून जगण्याची खटपट करणें ' केसरी 'ला केव्हांहि पसंत नसतें.

' विनाकारण डोंगरीवर जाऊन पडण्यांत पुरुषार्थ नाहीं ! पण तसाच कांहीं ' लाग असला तर येरवड्यालाहि केसरीकार भिणार नाहींत.' (के. १८-१-८७).

यावरून ' केसरी 'ची वीरवृत्ति स्पष्टपणें उमगून येते. ' केसरी 'च्या अर्ध-शतकाचें सिंहावलोन करतांना, ' And behold! the bush was burning bright, but was not consumed ' हें बायबलांतील मार्मिक वाक्य देऊन ' केसरी 'कारांनीं आपल्या धोरणाची पूर्ण कल्पना आणून दिली आहे.

महाराष्ट्रांत 'सामाजिक सुधारणा आधीं, कीं राजकीय सुधारणा आधीं?' हा वाद ' केसरी 'च्या जन्मापासून चालला होता ही गोष्ट विश्रुत आहे. ' केसरी 'नें राजकीय सुधारणांचा पुरस्कार केला व सामाजिक सुधारणेला विरोध नाहीं तरी तिजविषयीं औदासीन्य दाखविलें. पण आपलें तेवढें वाईट आणि परकीयांचें तेवढें चांगलें असें नित्य प्रतिपादन करून स्वाभिमान खच्ची करण्याचा प्रयत्न जर कोणीं केला तर मात्र ' केसरी ' खवळून उठत असे.

' इंग्रजी विद्येच्या परिशीलनानें आमच्यांतील बऱ्यावाईट गोष्टी दोनहि पक्षांस ' सारख्याच कळूं लागल्या आहेत. अशा स्थितींत प्रस्तुतचे ' नायक ' जर ' आत्मविद्याभिमानानें आम्हांस भलतीकडे ओढून नेऊं पाहातील तर त्यास ' वेसण घालून मार्गावर आणण्याचा प्रयत्न आम्हांस स्वसंरक्षणार्थ जरूर करावा ' लागेल.'( के. ३-१-८८ ).

असें सांगतात कीं अटलांटिक महासागरांतील परस्परविरुद्ध दिशेनें जाणारे उष्ण अंतःप्रवाह ज्या ठिकाणीं एकमेकांवर आदळतात त्या ठिकाणीं समुद्रपृष्ठांवर धुकें पसरतें. महाराष्ट्रांतील राजकीय सुधारक व सामाजिक सुधारक यांच्या चकमकींत असेंच गैरसमजाचें धुकें उत्पन्न होऊन बहुजनसमाजाच्या मताचें तारूं भलती-कडे झुकेल कीं काय अशी भीति वाटत होती. ' केसरी 'ला देखील स्वकीयांशीं विवाद करण्यांत कांहीं आल्हाद वाटत होता असें नाहीं.

' सामाजिक विषयासंबंधानें गेल्या दोन तीन वर्षांत केवढालीं रणें पडलीं हें ' सर्वांस माहीत आहेच. अशा तऱ्हेनें विनाकारण दुही माजविण्यांत अर्थ नाहीं. ' इतर तऱ्हेचे शास्त्रीय विषय आहेत. त्यांची माहिती आपल्या वाचकसमूहास ' करून देणें इष्ट आहे.'( के. २५-९-८८ )

प्रथमपासूनच ' केसरी ' पूर्णपणें लोकपक्षाकडे झुकलेला. त्यांतून सत्ताधीशां-च्या रोषाचे चटके जसजसे अधिक बसूं लागले आणि लोकांचें साहाय्य व सहानु-भूति जसजशी अधिकाधिक मिळूं लागली तसतशी जनताजनार्दनावरील ' केसरी-' ची भक्ति अधिकाधिक दृढ होऊं लागली. वर्तमानपत्रें बहुजनसमाजाच्या हिता-करितां आहेत असा लोकमान्यांचा दृढविश्वास होता.

' वर्तमानपत्र हें कांहीं अंशीं नाटकासारखें व वाचकसमुदाय प्रयोगप्रेक्षका-' सारखा आहे !...अनंतविध वाचकांच्या संतोषासाठीं व्यक्तिविशेषाच्या आवडी-' निवडीकडे दुर्लक्ष करून मुख्य निबंधापासून कामगारांच्या नेमणुकापर्यंत सर्व ' सदरें वर्तमानपत्राच्या प्रत्येक अंकांत घालणें जरूर आहे.'( के. १८-१-८७ )

केसरी निघण्यापूर्वीं महाराष्ट्रीय सुशिक्षित समाजाचा ओढा एकंदरीनें इंग्रजी भाषेकडे अधिकच होता. लेखनवाचन करावयाचें तें इंग्रजींत; मराठी भाषेचें अभिव्यक्तिसामर्थ्य (power of expression) अत्यंत अल्प आहे अशी तत्कालीन इंग्रजी सुशिक्षितांची श्रद्धा असे. प्रसिद्ध पुढाऱ्यांनीं आपला मतप्रसार इंग्रजी भाषेंतून करण्याची वहिवाट ठेविल्यामुळें निव्वळ मराठी शिक्षित समाजांत राजकीय आकांक्षेचें ज्ञान फैलावणें शक्य नव्हतें. पण 'केसरी'नें बहुजनसमाज—निव्वळ मराठी जाणणारा समाज हाच देशाचा फार मोठा घटक आहे असें ओळखून उत्कृष्ट व जोरदार अशा आबाल-सुबोध मराठी भाषेंतून लोकशिक्षण देण्यास आरंभ केला. 'केसरी'चा जन्म होऊन वीस वर्षें उलटल्यानंतर सिंहावलोकन करतांना संपादकांनीं केसरीच्या वर्गणीदारांची संख्या आरंभीं ७०० होती ती १३००० हजारावर कशी आली, मराठी समाजांत वाचनाची अभिरुचि कशी वाढत गेली, इ० गोष्टी सांगून म्हटलें आहे—

'त्यावेळच्या व हल्लींच्या काळांत मोठा फरक म्हटला म्हणजे हा कीं वीस 'वर्षांपूर्वीं मराठी वर्तमानपत्रांतून लेख लिहिणारे प्रसिद्ध गृहस्थ आपले लेख 'मुख्यत्वेंकरून इंग्रजी शिकलेल्या लोकांकरितांच आहेत असें समजत आणि त्या 'वर्गास ते पसंत पडले म्हणजे आपलें काम झालें असें मानीत. पण आज ही 'स्थिति जाऊन त्याऐवजीं इंग्रजी शिकलेल्या वर्गापलीकडे अर्धवट इंग्रजी किंवा 'निव्वळ मराठी लिहितां वाचतां येणारांचा जो एक मोठा वर्ग आहे, व ज्या 'वर्गांत देशांतील बहुतेक सर्व कर्त्या व दक्ष लोकांचा समावेश होतो, तो वर्ग 'आपला वाचक आहे, त्याच्या हिताहिताची चर्चा आपणांस कर्तव्य आहे व 'त्यांची स्थिति कशी सुधारेल हें केवळ इंग्रजी शिकलेल्यांच्याच दृष्टीनें नव्हे, तर 'या मोठ्या वर्गाच्या दृष्टीनेंहि, आपण त्यांच्यापैकींच एक समजून, आपणांस 'पाहिलें पाहिजे अशी वर्तमानपत्रांच्या लेखकांची स्पष्ट किंवा अस्पष्ट समजूत 'झाली आहे व होत चालली आहे.

'पूर्ण इंग्रजी शिकलेल्या लोकांखेरीज इतर वर्गाचें म्हणणें काय आहे, त्यांचे 'कांहीं अक्षेप असल्यास ते सयुक्तिक आहेत कीं नाहींत, हें त्यांच्यापैकींच आपण 'एक आहों व आपणांस जो कांहीं उद्योग करावयाचा आहे तो त्यांच्या हिता-'करितांच आहे आणि तो त्यांस बरोबर घेऊन केला पाहिजे अशा समजुतीनें 'पाहण्याची किंवा त्याबद्दल वर्तमानपत्रांत चर्चा करण्याची केसरीनें सुरवात केली; 'निदान प्रघात तरी पाडला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

'सारांश आमचा वाचकवर्ग केवळ इंग्रजी शिकलेल्या लोकांपेक्षां अधिक 'विस्तृत आहे, आणि त्याचें हिताहित कोणतें हें ठरवितांना केवळ इंग्रजी शिक-'लेल्या लोकांच्या विचारांवर भिस्त न ठेवतां या मोठ्या वाचकवर्गाच्याहि सम-'जुती जमेस धरल्या पाहिजेत; इतकेंच नव्हे तर त्यांतील योग्य असतील त्यांचें

' समर्थनहि केलें पाहिजे. अशा तत्त्वावर केसरींतील लेखांचा पाया रचलेला
' आहे; व तोच पुढें कायम ठेवून या मोठ्या वाचकवर्गाची आपल्या हातून
' होईल तितकी उत्तरोत्तर अधिकाधिक सेवा करण्याचा केसरीचा संकल्प आहे.'
(के.११-२-०२).

विविधतेप्रमाणें वर्तमानपत्र स्वस्तांत देणें हेंहि आवश्यक आहे. कारण त्या-शिवाय तें बहुजनसमाजांत प्रसृत होणार नाहीं. ' केसरीचीं पानें वाढवा. आम्ही अधिक वर्गणी देण्यास तयार आहों, ' अशा आशयाचीं अनेक पत्रें ' केसरी 'ला आलीं. पण आकार वाढविला म्हणजे किंमत जास्त ठेवावी लागणार आणि पूर्वी जे ग्राहक होते त्यांतल्या कित्येक ग्राहकांना तें विकत घेणें अशक्य होणार. ही गोष्ट लक्षांत घेऊन लोकमान्यांनीं ' केसरी 'चा आकार वाढविण्याचें रहित केलें. पहिल्या आठ वर्षांचें सिंहावलोकन करतांना ' केसरी ' म्हणतो—

' वर्तमानपत्राचा प्रसार होण्यास कारणें दोन; एक लोकांमधील वाचनाची
' अभिरुचि व दुसरें पत्राची स्वस्तता. पैकीं पत्र जरी स्वस्त झाल्यानेंच त्याचा
' ज्यास्त प्रसार होत नाहीं तरी त्यामुळें वाचनाची अभिरुचि असणाऱ्या ज्यास्त
' ज्यास्त वाचकांच्या हातीं पडून एकंदर वाचनाभिरुचि थोडथोडी वाढत जाते.'

वीस वर्षें उलटल्यानंतर मागील कामगिरीचा आढावा घेतांना ' केसरी 'नें आपलें मनोगत उघड करूनच सांगितलें आहे—

' खेडेगांवांतील शाळामास्तर किंवा लिहितां वाचतां येणारे हलक्या पगाराचे
' शिपाई यांस देखील स्वतःचा केसरी घेतां येऊन तो त्यांनीं वाचावा अशी
' आमची इच्छा आहे. किंमत वाढवून वर्गणीदार कमी झाले तरी हल्लींइतका
' किंवा किंबहुना त्याहूनहि ज्यास्त नफा राहण्याचा संभव आहे. पण वर सांगितल्या-
' प्रमाणें वाचकवर्गाची मर्यादा व व्याप्ति अधिकाधिक वाढावी हाच आमचा
' प्रमुख हेतु असल्यामुळें वाचनाची अभिरुचि असणाऱ्या गरीब वाचकांच्या
' शक्तीच्या बाहेर केसरीची वर्गणी जाईल अशा रीतीनें केसरीची सुधारणा करण्या-
' स आमचें मन धजत नाहीं. ' (के. ११-२-०२).

' ' केसरी ' दैनिक करावा अशीहि सूचना कित्येकांनीं केली होती. अर्थात्
' केसरी दैनिक करणें म्हणजे त्याचा प्रसार पुष्कळच कमी होणार व वाचकवर्ग
' कमी झाला म्हणजे केसरीची नियोजित उपयुक्तताहि कमी होणार, ही गोष्ट
' टिळकांना दिसत होती. आणि त्यांचें ध्येय तर असें कीं, आपला केसरी
' खेड्यापाड्यांतल्या लोकांनींहि वाचावा ! म्हणून केसरीच्या प्रगतीची टिळकां-
' ची कल्पना अर्धसाप्ताहिकापलीकडे दैनिकापर्यंत गेली नाहीं.' (के. ३-८-२९)

' केसरी ' परदेशी कागद कां वापरतो अशी पृच्छा पुष्कळ वाचकांनीं केली होती. त्या वेळीं ' केसरी 'नें त्याचें समर्थन योग्य प्रकारें केलें आहे. वर्तमान-पत्राला लागणारा गवताचा कागद परदेशींच तयार होतो. स्वदेशी चिंध्यांचा

कागद फार महाग असतो. गवताचा कागद बंगालमधील एकाच गिरणींत होतो. पण तो तेथून आणण्यांत होणारा वाहतुकीचा खर्च जबर असल्यामुळें त्याचा कांहींच फायदा होत नाहीं. अशा स्थितींत दोनच मार्ग उरतात. एक परदेशी गवताचा कागद वापरणें अथवा स्वदेशी चिंध्यांचा कागद वापरणें. पण दुसरा मार्ग पत्करिल्यास 'केसरी'ची किंमत दुप्पट ठेवावी लागेल आणि गरीब वर्गणीदारांस नाइलाजानें 'केसरी' बंद करावा लागेल. त्यामुळें परदेशी गवताचा कागद वापरावयाचेंच 'केसरी'नें ठरविलें. 'अधिकांचें अधिक कल्याण' करण्याची लोकमान्यांची सदिच्छा ओळखूनच 'केसरी'नें 'दुप्पट दौड' करण्यास सुरुवात केली तरीहि त्याची वर्गणी वाढविण्यांत आली नाहीं.

असो. गेल्या अर्धशतकाचें सिंहावलोकन केलें तर 'केसरी' नें केवढी महत्त्वाची कामगिरी केली आहे हें दिसून येईल. अँग्लोइंडियन पत्रें, नेमस्त, सरकार इ० अनेक प्रतिपक्षीयांकडून 'केसरी'वर हल्ले झाले. जामिनकी, दंड, कारावास इ० संकटपरंपरेंतूनहि त्याला जावें लागलें. कर्मयोगाची ध्वजा महाराष्ट्रांत धडाडीनें फडकविणाऱ्या केसरीनें यांपैकीं कशालाहि दाद दिली नाहीं. निष्ठापूर्वक स्वकर्म आचरीत असतां——

'कोणी राजकारणांत केसरी मवाळ बनला असें म्हणून, कोणी त्याला म.
'गांधींचें शत्रुपद देऊन, कोणी तो खादीचा विरोधी असें म्हणून, कोणी प्रांतवार
'किंवा भाषावार विरोधी अभिमान जागृत करून, कोणी तो ब्राह्मण पक्षाचा असें
'ठरवून, तर कोणी उलट पक्षीं तो सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करतो म्हणून;
'तात्पर्य, ज्याला जें कारण सुचलें तें त्यानें पुढें करून केसरीचा पाडाव करण्या-
'चा प्रयत्न शिकस्तीनें केला.' (के. ३-८-२९)

हा झाला स्वकीयांचा विरोध. परकीय सत्ताधाऱ्यांनीं तर काय 'केसरी'शीं उभा दावा मांडला होता. तथापि ध्येयाच्या ध्रुवताऱ्याकडे पाहात आणि जनता-जनार्दनाच्या कृपाप्रसादाची सदैव याञ्चा करीत 'केसरी'नें आपला प्रगतिमार्ग आक्रमिला. गेल्या पन्नास वर्षांत 'केसरी'नें जी कामगिरी केली तिचें फळ आज राजकीय क्षेत्रांत दृश्यरूपानें दिसूं लागलें आहे.

---

# हिंदुसंघटन

## [ श्रीमज्जगद्‌गुरु शंकराचार्य ]

केसरीनें ५० वर्षांच्या अव्याहत परिश्रमानें सर्व भरतखंडांत अनेक प्रकारची जी जागृति केली, तीविषयीं कृतज्ञता व्यक्त करण्याची संधि या ग्रंथानें महाराष्ट्रियां-ना दिली ही संतोषाची गोष्ट होय. केवळ केलेल्या कामाची स्तुति न गाता केसरीपासून मिळालेल्या सामग्रीच्या आधारावर पुढचें कार्यमंदिर कसें रचतां येईल या विचारालाहि पोषक असेच लेख या ग्रंथाच्या संपादकांनीं प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे, ही गोष्ट त्या संतोषांत भर घालणारी आहे.

जगत्कर्त्याला आणि जगन्नियंत्याला जगाची सुस्थिति पाहिजे असल्यानें काल-चक्राच्या परिभ्रमणामुळें अवनतीला पोंचलेल्या कोणत्याहि राष्ट्राच्या उन्नतीची चिंता त्या प्रभूला असणें स्वाभाविक आहे; आणि त्यांतल्यात्यांत पुण्यभूमि हें नांव सार्थ करण्यासारख्या भरतभूमीची अवनति जगाच्या कल्याणाच्या दृष्टीनें परमेश्वराला असह्य असली पाहिजे. म्हणूनच सांप्रतच्या सारख्या काळीं त्या त्या परिस्थितींतून राष्ट्राला वर काढण्यास समर्थ व त्या त्या समयाला अनुरूप अशा विभूतींचा आणि संस्थांचा उदय वेळोवेळीं राष्ट्रांत होत असलेला दृष्टीस पडतो. अशा दृष्टीनें पाहतांना कितीतरी शतकांपासून या भरतखंडास दुर्दशेच्या भोंवऱ्यां-तून सोडविण्याचा प्रयत्न एकामागून एकाकडून होत असलेला दिसून येईल. प्रस्तुतच्या केसरीच्या कार्याचीहि गणना त्यांमध्यें झाल्यावांचून राहात नाहीं.

केसरीचा उद्भव झाला तो काळ किती आणीबाणीचा होता हें सांगावयास नको. इंग्रजी शिक्षणाचा चांगला पगडा बसून प्राचीन संस्कृतीचा तिरस्कार करणें हा त्यावेळीं सुशिक्षितपणा वाटत होता. आपल्या पारतंत्र्याकडे लक्ष न जातां सरकाराकडून मिळालेली एखादी नोकरी किंवा पोकळ मानमर्यादा यांचाच मोठे-पणा वाटत होता. 'स्व' हा शब्द मुखांतून काढणें भयंकर राजद्रोह होत होता व त्यामुळें भोगावा लागणारा कारागृहवास अत्यंत निंद्य व असह्य गणला जात असे. क्लोरोफॉर्मची गुंगी आल्यावेळीं शस्त्रक्रियेची जाणीव राहात नाहीं. तद्वतच आपली अर्थहानि, मानहानि व प्राणहानि परक्यांच्या हातून स्वच्छंदानें होत असतां आपल्याला त्याचें कांहीं वाटत नसे. अशा विकट परिस्थितींतून स्वातंत्र्य व स्वाभिमान यांचा मार्ग दाखविण्याचा कार्यक्रम केसरीनें आंखला; आणि अनेक प्रकारचीं संकटें व विघ्नें आलीं तरी ठरलेली वेळ कधीं न चुकता नियमितकालीं प्रसिद्ध होऊन आजच्या परिस्थितीला आपल्या राष्ट्राला आणि त्याबरोबर महाराष्ट्राला नेऊन पोंचविलें.

सर्व प्रकारें अवनति प्राप्त झाल्यावेळीं सर्वांगांनीं उन्नतीच्या मार्गांची अपेक्षा असल्यामुळें त्या वेळीं केसरीचें कार्य एकांगी होणें शक्य नव्हतें. म्हणूनच त्याला राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक व इतर सर्व आनुषंगिक विषयांशीं संबद्ध होणें अपरिहार्य होतें. त्यांपैकीं एका विशिष्ट विषयासंबंधीं केसरीनें केलेलें काम वाचकांच्या निदर्शनास आणून देण्यासाठींच हा लहानसा लेख लिहिला आहे; आणि तो विषय म्हणजे, 'हिंदुसंघटन' हा होय.

विचारांत भर पडत पडत 'हिंदुसंघटन' या विषयाला आज महत्त्वाचें स्वरूप आलें असलें तरी चाळीस वर्षांपूर्वींच्या केसरीच्या अंकांतून हा विषय बीजरूपानें मांडला असल्याचें आढळून येईल. इसवी सन १८८७ सालच्या मे महिन्यांतील १०, २४ व ३१ तारखांच्या अंकांतील 'हिंदुत्व व हिंदुधर्म यांचे आधुनिक शत्रु' या अग्रलेखांवरून केसरीची प्रवृत्ति या विषयाकडे कशी होती हें कळून येईल. तेव्हांपासून आतांपर्यंत या विषयांवर पर्यायानें त्या त्या प्रसंगीं केसरींतून प्रसिद्ध झालेले अनेक अग्रलेख, स्फुटें, प्रासंगिक बोल आणि बातमीपत्रें यांचें विमर्शपूर्वक मनन करणाऱ्यांना या विषयाचा सर्वांगांनीं सुंदर ऊहापोह झालेला आढळून येईल.

'हिंदुस्थान'च्या उद्धाराला अवश्य अशा चळवळींत 'हिंदुसंघटन' हें अग्र-पूजेला पात्र आहे. हिंदुस्थान या नांवाच्या अर्थाकडे लक्ष दिल्यास भ्रांति पडेल अशी जरी आजच्या हिंदुस्थानची स्थिति आहे, तथापि संस्कृतीच्या दृष्टीनें हिंदु-स्थान हें हिंदूंचेंच स्थान आहे हें निर्विवाद ठरेल. प्रत्येक राष्ट्राचें कांहीं वैशिष्टय असतें. भरतखंडाचें वैशिष्टय म्हणजे वैदिक संस्कृति होय. विषम जगांत समत्व प्रस्थापित करण्याच्या मार्गामुळें वैदिक संस्कृतीचें वैशिष्टय केव्हांहि नष्ट होणार नाहीं. म्हणून वैदिक संस्कृति केवळ हिंदुस्थानालाच नव्हे तर जगालाहि उप-कारक अशी आहे. तिच्या संरक्षणासाठीं हिंदुस्थानानें नाहीं तर झटावें तरी कोणीं ! वैदिक संस्कृतीचें रक्षण हें अवैदिकाशीं भांडण्यासाठीं नव्हे तर, त्यांनाहि वैदिक बनविण्यासाठीं. अवैदिकांना वैदिक बनविणें म्हणजे त्यांच्या संकुचित दृष्टीला विस्तृतपणा आणून देणें; महंमदाचा किंवा खिस्ताचा भक्त वा अनुयायी झाल्या-वांचून उद्धार नाहीं या संकुचित बुद्धीनें हिंदुस्थानावर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें बलात्कार करण्यास बाहेरून आलेल्या परधर्मीयांना कोणाचा तिरस्कार अथवा कोणावर बलात्कार न करतां अनेक सन्मार्गांपैकीं आपणांस आवडेल व साधेल त्या सन्मार्गाचा अवलंब करण्यास शिकविणें म्हणजेच संकुचित दृष्टीला विस्तृत करण्यास लावणें होय. ज्या वैदिक संस्कृतींतून निष्पन्न झालेलें तत्त्वज्ञान जीवाला ब्रह्मपदास पोंचविण्यास समर्थ असून धर्म जगाला उपयुक्त अशा शौर्य, वाणिज्य, सेवा, या वस्तूंशींसुद्धां संबद्ध आहे व कोठेंहि व केव्हांहि आचरितां येईल, इतक्या व्यापकपणानें जगाच्या अभ्युदयाबरोबर निःश्रेयसाचीहि

प्राप्ति करून देण्यास शक्त आहे अशा वैदिक संस्कृतीकडे वैदिक धर्मानुयायी म्हणविणाऱ्या हिंदूंनीं तरी दुर्लक्ष करितां कामा नये. वैदिक संस्कृतीचा नाश म्हणजेच हिंदुस्थानाचा नाश व तिचें रक्षण म्हणजेच त्या राष्ट्राचें रक्षण होय. वैदिक संस्कृतीचा नाश प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें करण्यास उद्युक्त झालेल्याशीं टक्कर देण्यासाठीं—त्यांचा नाश करण्यासाठीं नव्हे—आपसांतील परस्परांविषयींच्या विपरीत ग्रहांमुळें विघटित झालेल्या हिंदुसमाजाला संघटनेव्यतिरिक्त दुसरा उपायच नाहीं. आणि स्वतःच्या कल्पनेनें किंवा परक्यांच्या चिथावणीनें उद्भवलेलें परस्परांतील वैमनस्य एका बाजूला सारून सर्व हिंदूंना संघटित व्हावयाचें तर, 'तप्तेन तप्तमयसा घटनाय योग्यम्' या उक्तीप्रमाणें कोणावर एक तर कोणावर दुसरा असा आघात व्हावयास पाहिजे. कुटिल नीतीच्या बळावर चालणाऱ्या इंग्रज सरकारनें उचलून धरल्यामुळें फारच शेफारलेला मुसलमान समाज हिंदुसमाजांतील कोणाची भीड न धरतां सरसकट सर्वांवर ज्या वेळीं अत्याचार करील, आणि सामान्य वेळीं दाखविल्या जाणाऱ्या न्यायीपणाला व निःपक्षपातीपणाला एकीकडे गुंडाळून ठेवून सरकार उघडपणें अन्याय व पक्षपात स्वीकारील त्याच वेळीं ब्राह्मण-ब्राह्मणेतर, स्पृश्य-अस्पृश्य, अशा सर्व भेदांना तिलांजलि देण्यास संधि मिळते. त्याचप्रमाणें दुसऱ्यावर संकट आल्या वेळीं जो आधार मिळत नाहीं तो आपल्या इष्टमित्रांवर तसा प्रसंग आल्यावर मिळूं लागून, एका काळीं कांहीं कारणपरत्वें प्रचारांत आलेल्या ज्या चाली व रूढि सांप्रतकाळीं समाजांत परस्परांमध्यें वैमनस्य उत्पन्न करण्यासारख्या असतील अथवा परक्यांकडून आपल्या समाजाचा नाश होऊं देणाऱ्या असतील त्यांत इष्ट त्या सुधारणा करून घेण्यास लावण्याइतकें शास्त्राचें औदार्य अशाच वेळीं अनुभवास येतें. संघटनेचें हें तात्त्विक स्वरूप ता. १०-६-२४ च्या केसरींत आलेल्या, 'हिंदुधर्माचें संरक्षण' या विषयांवरील प्रवचनाच्या सारांशांत दर्शविलें गेलें आहे.

याप्रमाणें संघटनेचें स्वरूप, आवश्यकता व शक्यता या गोष्टी निदर्शनास आल्यावर संघटन म्हणजे काय कोण जाणें, तें पाहिजे कशाला, आणि तें शक्य कसें, असले आक्षेप जरी दूर होतील तरी तें प्रत्यक्ष घडवून आणावें कसें हा एक मोठाच प्रश्न राहतो. आणि तो सोडवायला गेल्यास, एकासाठीं दुसरें अशी कारणमाला वाढत जाऊन हा विषय इतका व्यापक होईल कीं, श्रीकृष्णानें विश्वरूप दाखविल्या वेळीं त्यांत सर्व चराचर जगत् पाहून अर्जुन चकित झाला त्याप्रमाणें इतर सर्व महत्त्वाचे विषय या संघटनेच्या उदरींच दृष्टीस पडून आपणांस चकित व्हावें लागेल.

हिंदुसमाजाचें संघटन जर अस्तित्वांत यावयास पाहिजे तर त्याला विघटित करणाऱ्या विघ्नांचें निवारण आधीं व्हावयास पाहिजे. तीं विघ्नें बाहेरचीं व

आंतलीं अशीं दोन प्रकारचीं आहेत. त्यांत पुन्हा बाहेरचीं विघ्नेंहि दोन प्रकारचीं आहेत. पहिलें म्हणजे मुसलमानांचा दांडगेपणा, व दुसरें ख्रिस्त्यांचा मुत्सद्दीपणा. मुसलमानांकडून होणारी दांडगाई थांबविण्यासाठीं क्षात्रतेज जागृत करणें, ठिकठिकाणीं व प्रत्येक देवस्थानाला जोडून एक एक तरी व्यायामशाळा, स्वयंसेवकमंडळ वगैरे स्थापणें अवश्य आहे. ख्रिस्ती लोकांच्या मुत्सद्दीपणाला आपण बळी पडूं नये म्हणून त्यांच्याच पद्धतीला धरून पण स्वतःच्या तत्त्वाला न सोडतां मठ, देवस्थान इत्यादि आपल्या धर्मसंस्थांना व्यवस्थितपणानें धर्मप्रसार करण्यास लावणें अवश्य आहे. यांतच शुद्धीकरण, हिंदूकरण, धर्मशिक्षण, धर्मोपदेश, (हरिकथा, पुराण, प्रवचन, लेखनादिद्वारां) रुग्णालय व अनाथाश्रम अशा विषयांचा समावेश होतो.

आपलीं विघ्नें म्हणजे हिंदुसमाजांतील अनेक संप्रदाय व पंथ ह्यांच्यामध्यें परस्परांविषयीं गैरसमज, पुराणमतवादी व नवीनमतवादी ह्यांचा एकमेकांशीं विरोध, ब्राह्मणब्राह्मणेतरवाद आणि स्पृश्यास्पृश्यवाद याप्रमाणें अनेक प्रकारचीं आहेत.

या सर्व विषयांसंबंधीं आपलें कर्तव्य काय याचें विस्तारानें किंवा संक्षेपानें विवेचन करणारे लेख त्या त्या प्रसंगवशानें वेळोवेळीं केसरींतून प्रसिद्ध झाले आहेत. हें प्रारंभापासूनच्या केसरीच्या वाचकांना केसरींतील उताऱ्यांकडे बोट दाखवूनच सांगावयास पाहिजे असें नाहीं.

हिंदु समाजाची व हिंदुस्थानची दुर्दशा जोंवर सरली नाहीं तोंवर उन्नतीची अपेक्षा करण्यापूर्वी अवनतीच्या चिखलांतून बाहेर पडण्याकरितां ज्यामुळें हिंदुस्थानचें नांव राहील त्या हिंदुसमाजाला आड येणारीं सर्व विघ्नें दूर करण्याकडेच एकवटून लक्ष लावणें अवश्य आहे. आणि या कामीं केसरीनें वेळोवेळीं दाखविलेली दिशा हिंदुसमाजाला हितावह होईल यांत शंका नाहीं. आपल्यावर आपत्ति कशी आली आहे हेंच आधीं कित्येक हिंदूंच्या लक्षांत येईना. तें सर्वांच्या निदर्शनास आणून देण्याच्या आजवर झालेल्या कार्यांत केसरीचा भाग लहान नाहीं. आतां बहुतेक सर्वांना परिस्थिति कळून चुकली आहे. सर्वांना जें पाहिजे असें वाटतें त्यांत सूक्ष्म रीतीनें विचार केल्यास एकवाक्यताच दिसेल. परंतु, त्यासाठीं काय करावयास पाहिजे ह्याविषयीं मात्र वरवर जो भेद दिसतो तो आपल्यास कार्यपराङ्मुख करण्याइतका बलाढ्य होऊं नये अशा चौकटींतच तो बसविण्याजोगा आहे. आपल्यापुढें विघ्नें अनेक आहेत. त्यांतील एकाद्याच्या निवारणार्थ एकादा कोणी प्रयत्न करीत असलेला पाहून आपण ज्या मार्गानें जाऊं पहातों, त्याहून त्याचा मार्ग भिन्न दिसतो एवढ्यानेंच त्याचा विरोध आपण करावयास जातों. ही आपली प्रवृत्ति नाहींशी झाल्यास हिंदु-

समाजाला संघटित होण्यास फारसा वेळ लागणार नाहीं. अनेक दिशांनीं प्रयत्न पाहिजे आहेत. जो ज्या दिशेनें करील त्या बाबतींत तो आपला लाभच झाला, अशी दृष्टि सर्वांची झाली म्हणजे पुष्कळच कार्य होईल. ज्याविषयीं सर्वांची एक-वाक्यता होते, त्यासंबंधीं तर सांगावयास नकोच. आतांपर्यंत ज्या शास्त्री-पंडितांना स्वराज्याशीं आपला कांहीं संबंध आहे असें सुद्धां वाटत नव्हतें तेहि आतां वर्णाश्रम धर्माच्या पायावर स्वराज्य मिळविलें पाहिजे म्हणून पुढें येऊं लागले आहेत त्यांनीं आपल्या मंडळीमध्यें जागृति उत्पन्न करावी; कार्यक्रम आंखावा आणि प्रयत्न चालवावे. या अर्थाची सूचना केसरीनेंहि त्यास दिली आहे ती सर्वथा योग्य आहे. परंतु, त्याबरोबर आपल्या दृष्टीनें वर्णाश्रमनियमाला सोडून इतरांचा प्रयत्न आहे असें पंडितांस वाटत असेल तर त्यास विरोध करणें हेंच पडितांनीं आपलें कार्य ठरवूं नये, एवढा उदारपणा त्यांनीं दाखवावा. घराला आग लागल्यावेळीं त्यांतून वांचविण्यासाठीं बाहेर काढल्या जाणाऱ्या वस्तू अव्यव-स्थितपणें एका ठिकाणीं टाकल्या गेल्या तरी आग विझविल्यावर पुनः त्या व्यव-स्थितपणें ठेवण्यास फार जड पडणार नाहीं. अशी दूरवर दृष्टि आपण सर्व ठेवूं लागलों तर बाहेरच्या शत्रूबरोबर आपणहि आपसांत एकमेकांचा शत्रु होण्याची आपली आत्मघातकी प्रवृत्ति नाहींशी होऊन एका ठिकाणीं एक तर दुसऱ्या ठिकाणीं दुसरा असे आपल्यामध्यें असणारे सर्व गुण आणि शक्ति एकवटून सर्व विघ्नें निवारण करण्यास आणि पुनः समर्थ व कार्यक्षम बनण्यास हिंदुसमाजास फार वेळ लागणार नाहीं.

---

## पन्नास वर्षांतील धर्मकार्य

[ गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे ]

' धर्मे सर्वं प्रतिष्ठितम् '

हिंदुधर्माची रचनाच अशी सर्वव्यापी आहे कीं, व्यवहाराची कोणतीहि बाजू घेतली, तरी त्या व्यावहारिक भागाचे अंकुर हिंदूंच्या धर्मभूमींतूनच निघालेले असावयाचे. तत्त्वज्ञान, नीति, उपासना, आचार व प्राचीन इतिहास हीं धर्माचीं मुख्य अंगेंच असल्यामुळें, केसरीला धर्माचे बाबतींत तटस्थ किंवा उदासीन राहून स्वाभिमानपूर्वक लोकजागृतीचें काम करणें शक्यच नव्हतें. स्वाभिमान जागृत करण्याकरितां उच्च ध्येयाचा निश्चय करून त्याची शिकवण देण्याचें देखील

काम करावयाचें होतें; इंग्रजाकडून सर्व बाजूंनीं चढावाचें आक्रमण एकसारखें सुरू होतें. त्यांतून समाजानें स्वतःचा बचाव करून, इंग्रजांसमोर हक्क मागण्याकरितां दंड थोपटून उभें रहावें, अशी परिस्थिति केसरीला निर्माण करावयाची होती. ध्येयाचें भव्य व उदात्त स्वरूप लोकांच्या मनःचक्षूपुढें उभें केल्याखेरीज, इंग्रजांच्या वरपांगी डौलानें दिपून गेलेली जनता सावध होण्यासारखी नव्हती. म्हणून प्रजासत्ताक राज्य किंवा स्वातंत्र्य हेंच ध्येय लोकांच्या मनश्चक्षूपुढें धरणें अवश्य होतें. इंग्रजांसारखा प्रतिस्पर्धी, राजकारणांत पूर्ण विजयी होऊन जेता या नात्यानें ५०-६० वर्षें देशांत निष्कंटकपणें नांदत होता. त्या अवधींत त्यानें राष्ट्राचीं सर्व अंगें कैचींत पकडलीं असल्यानें, स्वातंत्र्य व स्वाभिमान या दृष्टींनीं समाज अगदीं नादान बनला होता. अशा वेळीं राष्ट्रजागृति उत्पन्न करावयाची झाल्यास ती एकाच विषयांत करूं पाहाणें अशक्यच असतें. म्हणून, मुख्य उद्देश नसतांना देखील, केसरीला हिंदूंचा आचारधर्म, त्यांची नीतिमत्ता किंवा उपासना व तत्त्वज्ञान, ह्या धर्माच्या तीनहि कांडांचा प्रसंगाप्रसंगानें विचार करणें भागच होतें.

अव्वल इंग्रजींत राजकीय दृष्ट्या हिंदुस्थान जिंकून झाल्यावर तें धार्मिक व सामाजिक दृष्ट्या जिंकण्याचा उद्योग सुरू झाला. या उद्योगांत मिशनरी लोक पुढें आले. त्यांना इंग्रज अधिकाऱ्यांचा भरपूर पाठिंबा मिळणें स्वाभाविकच होतें. पैसा व सत्ता यांच्या जोरावर गरीब व अडाणी लोकांत मिशनऱ्यांचा धुमाकूळ सुरू झाला. त्यांतच कांहीं हुशार पाद्रीसाहेबांनीं सुशिक्षित वर्गाला देखील भारण्यास सुरुवात केली. इंग्रजी विद्येंत निष्णात झालेल्या प्रारंभींच्या सुशिक्षितांना आपला धर्म, समाज अगदींच गचाळ व टाकाऊ वाटूं लागला. असल्या सुशिक्षितांपैकीं, कांहीं मेंढरें पाद्र्यांच्या कळपांत ओढलीं गेलीं. कित्येकांनीं पाद्र्यांच्या कळपांत न जातां बाहेर राहूनच त्यांच्या कामास हातभार लावण्यास सुरुवात केली.

इंग्रजांचा हा धार्मिक हल्ला १८७० पर्यंत बराच यशस्वी झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. १८८० पासून केसरीची गर्जना सुरू झाली नसती तर मिशनऱ्यांच्या मार्फत चढवलेला हिंदुधर्मावरील हा हल्ला पूर्ण यशस्वी झाला असता असा तर्क करण्यास हरकत नाहीं. लोकांना जागृत करण्याकरितां गर्जना करून उठलेल्या केसरीला मिशनऱ्यांच्या या हल्ल्यांतून समाजाचा बचाव करणें अवश्य वाटलें तर त्यांत फारसें आश्चर्य नाहीं. केसरीचे पहिले संपादक विष्णुशास्त्री चिपळोणकर यांनीं अगोदरपासूनच हस्तें परहस्तें चाललेल्या पाद्र्यांच्या धुमाकुळास निबंधमालेंतून आळा घालण्यास सुरुवात केली होती. केसरी सुरू झाल्यावर मधून मधून त्यांची दृष्टि या पाद्र्यांच्या चळवळीकडे वळली असल्यास त्यांत फारसें नवल नाहीं. शास्त्रीबुवांनीं आपल्या लेखांतून मिशनऱ्यांच्या चळवळीवर टीका केली असली तरी धार्मिक बाबतींत

हिंदु समाज कांय करीत आहे व त्यानें काय करावयास पाहिजे याविषयीं त्यांनीं केसरींत फारसा ऊहापोह केला नाहीं. केसरीला त्यांचा अल्पकाळच सहवास घडल्यामुळें त्यांच्या पश्चातच या कार्याला खरें तोंड लागलें. केसरींत पहिली उठावणी आगरकरांनींच केली. हिंदूंच्या आचारधर्मावर आगरकरांची कडक टीका सुरू झाली. लोकांना आगरकर हे एक आपल्या धर्माच्या शत्रुपक्षांतीलच आहेत कीं काय असें भासूं लागलें. कारण पाद्री व त्यांचे हस्तक यांनीं हिंदूंच्या आचारधर्मावर आधींपासूनच जोराचा हल्ला चढविला होता. आणि त्यांतच केसरीचीहि मधून मधून भर पडत असलेली पाहून साहाजिकच लोकांचा गैर-समज झाला. पण वस्तुस्थिति तशी नव्हती. मिशनरी व केसरीकार दोघेहि हिंदु-धर्मावरील टीकाकार असले, तरी या दोनहि टीकांच्या मुळाशीं असलेल्या हेतूंत जमीनअस्मानाचें अंतर होतें. मिशनरी लोक तुमचे देव खोटे आहेत असें हिंदूंना सांगून उलट आमचा देव चांगला व खरा आहे, असें म्हणून येशूख्रिस्ताकडे बोट दाखवीत. ‘ तुमच्या धर्मांत सांगितलेलीं व्रतवैकल्यें खोटीं व खुळचट असून ‘ आमच्या आकाशांतील बापानें सांगितलेला धर्म मात्र खरा आहे ’ हे पाद्र्यांचे जाहीर उपदेश असून त्यांच्या आंतून कारवाया पुष्कळ प्रकारच्या चालू असत. येनकेनप्रकारेण सांपडतील तितकीं मेंढरें आपल्या कळपांत ओढून क्रमाक्रमानें सर्व हिंदुसमाज ख्रिस्ती बनवावयाचा असा त्यांच्या मनांतील डाव होता. केसरींतून हिंदूंच्या आचाराविचारावर कितीहि टीका येत असली तथापि तिच्या मुळाशीं अधमपणाचा हेतू बिलकुल नव्हता, हें आतां कोणीहि कबूल करील. लोकांतील भोळसटपणा नाहींसा होऊन त्यांनीं चालू परिस्थितीचा नीट डोळे उघडून विचार करावा, समाजाची उन्नती ज्या ज्या गोष्टींनीं होईल त्या त्या स्वीकाराव्या; एकंदरींत समाजोन्नतीचें ध्येय पुढें ठेवून हिंदूंनीं व्यवहार-प्रवण असा आपला जीवनक्रम आंखावा, असा आगरकरांच्या टीकेचा रोख होता, व तसें त्यांनीं केसरीच्या अग्रलेखांतून स्पष्ट नमूदहि केलें आहे. पुनर्जन्म, नवस, भुतेंखेतें, इत्यादि भावनांच्या नादीं लागून त्या कामीं पैसा खर्च न करितां शिक्षणासारख्या लोकोपयोगी कामांतच पैशाचा व्यय व्हावा म्हणजे मनुष्यानें नीति व व्यवहार यांच्यावर दृष्टि ठेवून आपली उन्नति घडवून आणावी अशा हेतूनेंच केसरीनें त्या वेळीं सामाजिक विषयावर लेख लिहिले आहेत. ही केसरीची त्यावेळची टीका हिंदुसमाजाला अतिशय हितकारक झाली. कारण, जनतेंतील व्यवहारपराङ्मुखता फारच पराकाष्ठेला पोहोंचली होती. व्यवहारांत घडणारी प्रत्येक महत्त्वाची बाब अदृष्ट कल्पनेस जोडण्याचा लोकांनीं जणूं काय विडाच उचलला होता ! सीतादेवीच्या वरानेंच इंग्रज हिंदुस्थानचा राजा झाला आहे असें राजरोसपणें लोक म्हणत असत. परमावधीस पोहोंचलेला हा भाविक-पणा काढून टाकण्यास केसरीचे तत्कालीन काडेचिरायती लेख उपयोगी पडले तर

त्यांत नवल तें कोणतें ! आतां १८८१ पासून ५-६ वर्षांच्या काळांत केसरींतून सामाजिक आचारविचारावर जी अनुकूल वा प्रतिकूल टीका झाली ती प्रायः वरवरचीच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण आचार-धर्मांवर टीका करतांना त्या आचारांचें प्राचीन स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें. त्यांच्या मुळाशीं कोणतीं तत्त्वें आहेत व तीं तत्त्वें मानवी जीवनक्रमाच्या दृष्टीनें कशी श्रेयस्कर आहेत, इत्यादि खोल विषयांचा काळजीपूर्वक अभ्यास करून ही टीका लिहिली जात नव्हती. दैनंदिन व्यवहारांतील ज्या गोष्टी व्यवहारदृष्ट्या निरुपयोगी किंवहुना हानिकारक आहेत अशा वाटत होत्या, त्यांवरच बहुधा ही टीका होत असे. पण या टीकेचा जनतेच्या मनावर थोडातरी उपयुक्त परिणाम झालाच. पुढें इंग्रजांच्या राजवटीशीं लोकांचा संबंध अधिकाधिक येऊं लागला, इतिहासाच्या अध्ययनाचा थोडाबहुत प्रसार झाला व लोकांनाहि ऐतिहासिकदृष्ट्या आपल्या आचारधर्मांकडे विवेकपूर्वक पाहाण्याची इच्छा होऊं लागली. सुधारकांनीं यापुढें अभ्यासपूर्वकच टीका करावयास पाहिजे होती, ती दुर्दैवानें केली नाहीं. आपल्या टीकेचा उथळपणा कायम ठेवला, हा प्रश्न निराळा.

आचारांचा किंवा चालीरीतींचा विचार शास्त्र, नीति, व तत्त्वज्ञान या तीन मार्गांनीं करावा लागतो. ह्या तीन साधनांनीं विचार करूनच कोणते आचार त्याज्य व कोणते आचार ग्राह्य हें ठरवावयाचें असतें. केसरीच्या बालपणांतील विनोदी टीकेनें लोकांची धार्मिक दृष्टि उघडूं लागली. आपल्या चालीरीति अगदीं भोळसटपणाच्या आहेत असें सुशिक्षितवर्गाला वाटूं लागलें. अशा वेळीं मन्वादिस्मृति ग्रन्थांवरून, आचारधर्मांचा शास्त्रीय विचार करणें अगत्याचें होतें. म्हणजे लोकांच्या आचारविचारांची चेष्टा करून टीका करण्यापेक्षां ती स्मृतिवचनांच्या आधारेंच व्हावयास पाहिजे होती. अशा वेळीं केसरीच्या संपादकवर्गांत बदल झाला. हें परिवर्तन धार्मिक चळवळीकरितां नव्हतें, हें जरी खरें असलें तथापि तें योग्य असेंच झालें असें म्हटल्यावांचून गत्यंतरच नाहीं. लोकांची मनोवृत्ति आचारविचारांचा शास्त्रीय विचार करण्याविषयीं तयार होण्यास व टिळकांनीं केसरी हातीं घेण्यास एकच गांठ पडली. हा काळ १८९० च्या सुमाराचा होता. या सुमारासच पुण्यास चहाप्रकरणाला रंग चढला व धर्मशास्त्राच्या चर्चेला हा एक चांगलाच प्रसंग उत्पन्न झाला. चहाप्रकरणाच्या बाबतींत केसरीचें कार्य सव्यसाचीपणाचें चालू होतें. एका हातानें धर्मशास्त्राची देखील टर उडवण्यास तयार झालेल्या सुधारकांना टोला मारावा तर दुसऱ्या हातानें टोंकास गेलेल्या पुराणमताभिमानी लोकांवर शास्त्रार्थाचें ब्रह्मास्त्र सोडावें; या वादांत इंग्रजांचे आचार चांगले की हिंदूंचे चांगले हा मुद्दा मुळींच पुढें येऊं शकला नाहीं. जुन्या काळांत इतर वेळीं नव्याजुन्या पक्षांत वाद होत असतां नवीन पक्षाकडून इंग्रजांच्या आचारविचाराकडे अंगुलिनिर्देश केला जाणें संभवनीय होतें. परंतु चहा-

प्रकरणाच्या वादांत तशा प्रकारच्या कोटिक्रमाला जागाच नव्हती. न्यायमूर्ति रानड्यांसारखे अव्वल दर्जाचे प्रगतिप्रिय पण लोकोत्तर विद्वान सुधारकांचे सेनापति होते. आणि जुन्या पक्षाकडे शंकराचार्यांच्या आस्थानपण्डितापासून तों एखाद्या पोकळ दुङ्खाचार्यापर्यंत सर्वच लोक स्वपक्षसमर्थनार्थ तयार झाले होते. या वेळीं केसरीनें शास्त्रीय विचाराचा मध्यबिन्दू बिनचूक पकडून दोनहि पक्षांस नामोहरम केलें. जुन्या पक्षाची विचारसरणी अजूनहि लोखंडी म्हणजे अपरिवर्तनशील अशीच होती. त्याच्याशीं वादविवाद करून, प्रायश्चित्तें झालीं तरी सर्व सारखीं नव्हत किंवा आचार असले तरी ते सगळे एकाच मापानें मोजणें बरोबर नाहीं असें केसरीनें प्रतिपादन केलें. 'विष्णवे नमः' म्हणून नेत्रस्पर्श करणें हें देखील प्रायश्चित्तच आहे. तथापि सक्षौर प्रायश्चित्तांत व या प्रायश्चित्तांत जमीनअस्मानाचें अन्तर आहे. त्याचप्रमाणें पूर्वेस तोंड करून आचमन करावें हा आचारविधिच असला तथापि तो उपनयनाच्या आचारविधीपेक्षां फारच क्षुल्लक आहे. म्हणून आचारधर्मांचा विचार करतांना शास्त्राच्या आधारानें त्याचें तारतम्य ठरविणें जरूर आहे. परिस्थितीप्रमाणें जुने आचार सुटणें व नवे चिकटणें हें अपरिहार्यच आहे. अशा संक्रमणाच्या काळांत रूढाचार सोडल्याबद्दल कोणी अल्पस्वल्प प्रायश्चित घेतलें तर ती गोष्ट गैरशिस्त आहे असें म्हणतां येत नाहीं. प्रायश्चित्त हें पापनाशक कर्म आहे. पापाच्या तारतम्यावरूनच प्रायश्चित्ताचें तारतम्य ठरणार हें उघड आहे. परिस्थितीप्रमाणें स्पृश्यास्पृश्यविचार देखील करावयास पाहिजे. ज्या टोपीवाल्यासाहेबाचें पूर्वी दर्शनसुद्धां घेण्यासारखें नव्हतें, त्याला दररोज स्पर्श करण्याची आतां पाळी आली आहे. युरोपियन किंवा मुसलमान इत्यादि लोक स्पृश्य कीं अस्पृश्य हा प्रश्नच उपस्थित करणें वेडेपणाचें आहे. ज्याचा आमच्या धर्माशीं कोणताहि संबंध नाहीं, किंबहुना जे मनांतून आमच्या धर्माचें शत्रुत्वच करितात, त्यांचा स्पर्श झाल्यास सचैल स्नान करून निराहार उपोषणच करावयास पाहिजे. परंतु हल्लीं परिस्थिति तर अशी येऊन ठेपली आहे कीं, त्यांच्या स्पर्शाबद्दलचें प्रायश्चित्त तर दूरच राहिलें, पण त्यांनीं आपणांस स्पर्श केल्याबद्दल त्यांचे आभार मानण्याची वेळ आली आहे. अशा स्थितींत देखील त्यांच्या हातचा चहा घेतल्यामुळें झालेल्या पातकांच्या क्षालनार्थ कोणी प्रत्याम्नाय प्रायश्चित्त केलें तर ती गोष्ट चांगलीच समजली पाहिजे. कारण परिस्थितीला अनुसरून त्यानें वर्तन केलें असलें तथापि स्वतःच्या धर्मशास्त्राबद्दल त्याचें अंतःकरणांत पूर्ण आदर वास करीत आहे असें त्यानें केलेल्या प्रत्याम्नाय प्रायश्चित्तावरून ठरतें; ही गोष्ट अभिनंदनीयच होय असा केसरीनें जुन्या पक्षावरील केलेल्या टीकेंतील अभिप्राय आहे.

सुधारक पक्षांतील बरेचसे पुढारी आपल्या भाषणांतून धर्मशास्त्राविषयीं बेपर्वाई दाखवीत होते. न्यायमूर्ती रानड्यांसारखे कांहीं लोक वगळल्यास सरसकट

सुधारक लोक असेंच प्रतिपादन करीत कीं, स्मृति किंवा धर्मग्रंथ अगदींच कुचकामाचे असून वचनप्रामाण्य हें एक थोतांडच आहे. कोणतेंहि कार्य करण्याचे वेळीं तें आपल्या बुद्धीला पटतें कीं नाहीं तें पाहावें. व्यावहारिक नफ्यातोट्याचा विचार सुशिक्षित मनुष्यास करतां येतो, व तसा विचार करून कोणतेंहि काम करण्याचा सुशिक्षित मनुष्यास अधिकारच आहे. 'बाबा-वाक्यं प्रमाणम्' ही कल्पना अजीबात झुगारूनच दिली पाहिजे. परलोक, पुनर्जन्म किंवा ईश्वरी निग्रहानुग्रह हे भोळसट विचार मनुष्यानें आपल्या मनांतून पार काढून टाकावेत व या धार्मिक गुलामगिरीचा नायनाट करावा. असल्या प्रकारचे विचार सुधारक पक्षाकडून समाजापुढें मांडले जात होते. एका टोंकाला गेलेल्या मनुष्याची धर्मबुद्धि जशी सोवळ्याओवळ्याला चिकटून बसली होती, तशीच सुधारक पक्षाचीहि सुधारणा अगदींच उघडीवाघडी होऊन दुसऱ्या टोंकाला गेली होती. सुधारणेच्या या फाजील अग्रगामित्वानें सुधारणा या शब्दाचा खरा अर्थ नष्ट होऊन तो एक निंदाव्यंजक शब्द होऊन राहिला. खरी सुधारणा कोणत्याहि टोंकाला जाऊन होत नाहीं. ती मध्यबिंदूच्या भूमिकेवरच घडवून आणतां येते. समाजांत स्वत्वाची जागृति करावयाची असल्यास त्याला स्वतःच्या परंपरेविषयीं योग्य अभिमान उत्पन्न व्हावयास पाहिजे. सुधारकांच्या या आग्रही सुधारणेनें हिंदु समाजाची परंपरा विच्छिन्न होऊन तो स्वाभिमानशून्यच व्हावयाचा. हा धोका केसरीनें बरोबर ओळखला म्हणूनच या चहाग्रामण्याच्या प्रसंगापासून केसरीनें मध्य बिंदूची भूमिका स्वीकारली, व दोन्हीहि टोंकावरून स्वकीयांना मध्य बिंदूकडे ओढण्याचा प्रयत्न सुरू केला. याचे अनुकूल व प्रतिकूल असे दोन्ही प्रकारचे परिणाम घडून आले. नेहमीं मध्यभूमिकेवर उभा राहणारा केसरी टोंकाला गेलेल्या दोन्हीहि पक्षांस प्रसंगविशेषी शत्रूसारखा भासूं लागला व कांहीं गोष्टी दोन्ही पक्षास जुळण्यासारख्या असल्यामुळें प्रसंगविशेषीं तो मित्रासारखा वाटूं लागला. तथापि १८८८ पासून तो १८९७-९८ पर्यंतच्या काळांत केसरी हा जुन्या पक्षाचा अभिमानी आहे असें बऱ्याच अंशीं समजलें जात होतें. या दशवार्षिक कालांत प्रसंगाप्रसंगानें धर्मशास्त्रांतलि वचनांच्या आधारें धर्माविषयीं शास्त्रीय चर्चा केसरीनें सुरू ठेविली होती. दत्तकप्रकरण, पतिपत्नींचा अधिकार, इत्यादि विषयांवरील केसरीचे अग्रलेख चांगल्या धर्मशास्त्रज्ञानें देखील अभ्यास करण्याजोगे आहेत. केसरीनें केलेल्या शास्त्रचर्चेचा योग्य तोच परिणाम झाला. मागील दशकांत नुसत्या चालिरीतींची नव्या पक्षानें चेष्टा करावी तर जुन्या पक्षानें त्याचें समर्थन करावें असेंच चाललें होतें. परंतु आतां कोणत्याहि धार्मिक गोष्टीचा विचार करावयाचा झाल्यास सुशिक्षित लोक स्मृतिग्रंथाचीं पानें चाळूं लागले. छापखान्यांची सोय झाल्यामुळें स्मृतिशास्त्राच्या दुर्मिळ वाटणाऱ्या पोथ्या आतां छापील पुस्तकानें सहज मिळूं लागल्या. त्यामुळें सुधारकांची उथळपणाची टीका

मागें पडूं लागली. सुशिक्षितांचा समाज आतां एक पायरी वर चढला असें म्हणण्यास हरकत नाहीं. आचारधर्माचें बाह्य स्वरूप आणि व्यवहारांत दिसून येणारे त्याचे तात्कालिक परिणाम एवढ्यांवर दृष्टि ठेवूनच सुशिक्षित लोक धर्माचा विचार करीत असत ते आतां बाह्य आचारांची वरची पायरी जें धर्मशास्त्र त्याचाहि विचार करूं लागले. केसरीच्या काळांतील सुधारक पक्षाची एक पिढी जाऊन आतां दुसरी पिढी उदयास येत होती. डॉ. भाण्डारकर, न्या. रानडे, यांच्यासारखे प्राच्यविद्याविशारद लोक सुधारकांच्या या नवीन पिढींत नव्हते असें वाटतें. कारण या सुमारास सुधारकांनीं धार्मिक वादविवादाच्या आखाड्यांतून काढता पाय घेतला.

पुराणमताच्या टोंकास गेलेले लोक केसरीला स्वकीय समजण्यास तयार नव्हते. कारण सरसहा सर्व चालीरीतींचें किंवा आचारांचें उठल्या बसल्या केसरी समर्थन करीत नव्हता. मनुस्मृतीसारख्या वरच्या प्रतिष्ठित ग्रंथांत ज्या गोष्टींना भरपूर आधार असेल त्याचेंच केसरीकडून समर्थन होत असे. परंतु अशा तऱ्हेच्या उच्च प्रकारच्या धर्मशास्त्रांत ज्या सवलती शास्त्रकारांनीं ठेविल्या होत्या, त्यांचा भरपूर फायदा घेऊन त्या बाबतींत सुधारणा घडवून आणण्याविषयीं केसरी जोराची खटपट करीत होता. योग्य मर्यादेपर्यंत बालविधवांना पुनर्विवाहास परवानगी मिळावी अशी सूचना केसरीनेंच पुढें मांडली आहे. सरसहा पुनर्विवाह सुरू करण्यापेक्षां सप्तपदीचा संस्कार विवाहाचे वेळीं न करितां तो गर्भाधानप्रसंगीं करावा असें मत केसरीनें प्रतिपादन केलें. बालविवाहाची मर्यादा वाढवून ती १३-१४ वर्षांपर्यंत नेण्यास हरकत नसावी असेंहि केसरीनें साधार व सप्रमाण सिद्ध केलें आहे. केसरीच्या या धार्मिक सुधारणेमुळें पुराणमताभिमानी लोकांस त्याचा राग येत असे व प्रसंगविशेषीं ते केसरीशीं विरोधहि करीत असत. तथापि त्यांच्या विरोधाकडे विशेषसें लक्ष न देतां शास्त्रार्थाचें मार्मिक विवेचन करून केसरीनें या सुधारणा धर्माभिमानी पण प्रगतिप्रिय अशा विचारी लोकांस पटवून दिल्या. केसरीच्या या १५-२० वर्षांच्या काळांतील धार्मिक कामगिरीचा आढावा घेतल्यास केसरीनें धार्मिक उत्क्रांतिमंदिराच्या दोन पायऱ्या आक्रमण केल्या असें दिसून येईल. शास्त्रीय विचाराच्या दुसऱ्या पायरीवर पाऊल ठेवल्यानंतर केसरीच्या धार्मिक कामगिरीवर तिसऱ्या भूमिकेची छाया पडूं लागली असें दिसतें.

गणेशोत्सवाची चळवळ हेंच या वरील विधानाचें गमक आहे. या चळवळीनें धर्माला राष्ट्रीय स्वरूप येऊं लागलें. हिंदूंच्या सर्वजाती या उत्सवांत समाविष्ट करण्याचा कसून प्रयत्न झाल्यामुळें सर्व जातींच्या हिंदूंना धार्मिक समान भूमिकेची कल्पना उत्पन्न होण्यास तें एक चांगलेंच कारण घडलें. या चळवळीचा पुरस्कार करण्याकरितां केसरीनें आपलें शक्तिसर्वस्व खर्च केलें असें म्हटलें तरी

चालेल. या प्रयत्नांत केसरीला जुन्या मताशीं सारखेंच झगडावें लागलें. ' गणोबाचे गोंधळ ' असें म्हणून सुधारक पक्षानें गणेशोत्सवाची टर उडवण्यास प्रारंभ केला; तर म्हारापोरानें सुद्धां गणपतीचे उत्सव करावेत व सर्वांनीं सबगोलंकार करून गणपतीच्या मिरवणुकी काढाव्यात हा निव्वळ भ्रष्टाकार आहे, अशानें धर्म मात्र बुडेल, अशा जुन्या पक्षाच्या तक्रारी सुरू झाल्या. या दोनहि पक्षांच्या आक्षेपांस व टीकांस उत्तर देण्याला केसरी पुरून उरला होता. हा वादविवाद चालवून केसरीनें या उत्सवाची चळवळ नेटानें चालविली व ती पूर्णपणें यशस्वी करून दाखविली. या गणेशोत्सवाच्या चळवळीच्या निमित्तानें केसरी हिंदुधर्माच्या राष्ट्रीय स्वरूपाचें प्रतिपादन करूं लागला. हिंदुधर्म हा जसा व्यक्तीला श्रेयस्कर आहे तसाच तो समाजाला मार्गदर्शक आहे. गणपतिस्थापन व पूजन हें जसें धार्मिक स्वरूपाचें आहे तसेंच त्याचें राष्ट्रीय स्वरूप देखील लक्षांत घेणें अगत्याचें आहे. प्रत्येक हिंदूच्या घरीं, मग तो जातीचा कोणीहि असो, गणपतिपूजनाची परंपरा अविच्छिन्न चालू आहे. म्हणूनच गणेशोत्सव हा राष्ट्रधर्म होय, तो नुसता व्यक्तिधर्म नव्हे, किंबहुना गणेशोत्सवाप्रमाणेंच राम-कृष्णादिकांच्या जयंतींचे उत्सव देखील राष्ट्रधर्माच्या स्वरूपाचे होत, असें केसरीचें प्रतिपादन होतें. ' गणेशोत्सवाविषयीं केसरींत प्रसिद्ध झालेले तत्कालीन सर्व वाङ्मय वाचल्यास असेंच कबूल करावें लागतें कीं वचनप्रामाण्याच्या आधारावर केल्या जाणाऱ्या धर्मशास्त्राच्या चर्चेपेक्षां उच्च प्रतीच्या तत्त्वज्ञानाच्या विचारसरणीजवळजवळ केसरीनें धार्मिक चळवळ पोहोचविली आहे. गणेशोत्सवाचा प्रसंग साधून केसरीनें या वेळीं समाजाला उच्च प्रकारच्या तिसऱ्या भूमिकेवर नेण्यास प्रारंभ केला.

या चळवळीच्या अगोदरच हिंदुमुसलमानांचे दंगे सुरू झाले होते. अधिकारीवर्गाकडून मुसलमानांचा पक्षपात केला जात असल्यामुळें हिंदूंवर हा अन्याय होत आहे अशी केसरीपक्षानें तक्रार चालविली होती. एका बाजूला इंग्रज अधिकारी व दुसऱ्या बाजूला मुसलमान लोक अशा कात्रींत हिंदु समाज सांपडला. सामाजिक दृष्ट्या संघटित झाल्यावांचून हिंदूंचा निभाव लागणार नाहीं, हें केसरीनें बरोबर ओळखलें. अडचणींतूनच शहाणपणा येतो या न्यायानें स्वाभिमानी अशा हिंदु सुशिक्षितवर्गाला समाजाच्या सुसंघटितपणाची गरज पटली. अशा वेळीं गणेशोत्सवाच्या स्वरूपानें केसरी सामुदायिक धर्माचें प्रतिपादन करूं लागला. नुकत्याच होऊन गेलेल्या हिंदुमुसलमानांच्या मारामारीमुळें उत्सवांत सामील होणाऱ्या सामान्य लोकांच्या तोंडून मुसलमानांचा विरोध बाहेर पडूं लागणें स्वाभाविकच होतें. त्यामुळें गणेशोत्सवांतील चळवळींत मुसलमानांच्या द्वेषाचा भास होऊं लागला. त्याचा फायदा घेऊन केसरीच्या विरुद्ध असलेल्या सुधारक लोकांनीं व राजपक्षीय लोकानींहि जातिद्वेषाचा केसरीवर आरोप केला. या

आरोपाचें निरसन करण्यास देखील केसरीला बरीच मेहनत घ्यावी लागली. परंतु अखेरीस हा आरोप साफ खोटा असल्याचें केसरीनें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें. गणेशोत्सवाची चळवळ मुसलमानांच्या द्वेषाकरितां नसून हिंदूंतील राष्ट्रधर्माची बुद्धि जागृत करण्याकरितां आहे, हें तत्त्व बऱ्याच दिवसांनीं सर्वांच्या लक्षांत आलें व तसेंच तें सर्वांना पटलें.

केसरीची धार्मिक कामगिरी सुरू होऊन आतां जवळ जवळ दोन तपें होत आलीं होतीं. या दुसऱ्या भागाच्या अखेरीस व तिसऱ्या भागाच्या आरंभाला देशांत म्हणण्यासारखी नवीन धार्मिक चळवळ सुरू नव्हती. १८९८ पासून १९०२–३ सालापर्यंतचीं पांच सहा वर्षें प्लेगच्या धामधुमींतच गेलीं. तथापि केसरीची दृष्टि राष्ट्रधर्माच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वज्ञानाकडेच झुकली होती. म्हणून वचनप्रामाण्याचा कीस काढणें आतां केसरीनें कमी केलें होतें. तत्त्वज्ञानाचा विचार करण्याची संधि जसजशी मिळाली, तसतसा तात्त्विक विचारावर भर देण्यांत आला. ज्ञानेश्वरीच्या वादाच्या निमित्तानें या विषयांस केसरीकडून पुष्कळच चालना देण्यांत आली. ज्ञानेश्वरीच्या वादाप्रमाणेंच स्पेन्सरच्या अज्ञेयमीमांसेविषयीं केसरींत विचार करण्यांत आला. ज्ञानेश्वरीच्या वादांत केसरीची पुष्कळच जागा खर्च पडली, त्या मानानें अज्ञेयमीमांसेला मिळालेलें स्थळ फारच थोडें होतें. तथापि या अज्ञेयमीमांसेच्या विचारांत केसरीच्या मताची तात्त्विक चमक चांगलीच दृग्गोचर झाली आहे. डार्विन, स्पेन्सर यांसारख्या पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनीं संशोधनपूर्वक तत्त्वज्ञानाचे जे सिद्धान्त प्रस्थापित केले आहेत त्यांची वैदिक तत्त्वज्ञानाशीं तुलना करणें फारच अगत्याचें आहे असें केसरीनें प्रतिपादन केलें. इंग्रजी शिकलेल्या विद्वानांकडून पाश्चात्य तत्त्वज्ञानाचें परिशीलन केलें जात होतें. परंतु अशा मंडळींना आर्य वेदान्ताचा अभ्यास करण्याची इच्छा होत नव्हती. कारण पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांची प्रतिपादनशैली अत्यंत चित्तवेधक व बुद्धिग्राह्य असल्यामुळें तशा प्रकारची शैली त्यांना संस्कृत वेदान्तग्रंथांत आढळून येणें शक्य नव्हतें. शिवाय आर्यांच्या वेदांताची प्रक्रिया बरीच क्लिष्ट असल्यानें नुसत्या वाचनानें ती लक्षांत येण्याजोगी नव्हती. बुद्धपूर्वकालीन ऋषिप्रणीत तत्त्वज्ञान व उत्तरकालीन संन्यासमार्गीय तत्त्वज्ञान असे दोन भाग आर्यांच्या वेदान्तांत असल्यामुळें ब्रह्मविद्येचा अभ्यास करणें असाध्य नसलें तरी कष्टसाध्य झालें होतें. त्यामुळें इंग्रजी सुशिक्षित वर्गांत भारतीय वेदान्ताविषयीं एक प्रकारची निराशाच पसरली होती. १८९५-९६पासून केसरींत आणखी एक प्रकारचें तत्त्वज्ञानावरील वाङ्मय मधून मधून प्रसिद्ध होत असे. बेझंटबाईचीं व्याख्यानें व त्यांच्या थिऑसॉफिकल सोसायटीच्या चळवळीच्या रूपानें केसरींतून प्रसिद्ध होणारें वाङ्मय बरेंच लोकप्रिय झालें होतें. बाईनीं इंग्रजींत कितीहि व्याख्यानें दिलीं असलीं तरी त्यांच्या विचाराची छाप महाराष्ट्रावर केसरीच्यामार्फतच बसली होती यांत

शंका नाहीं. केसरीच्या या वाङ्मयप्रयत्नानें लोक आचारावरून आतां विचारभूमिकेकडे जाऊं लागले. थिऑसॉफिस्टांची हकीकत असो, ज्ञानेश्वरीचा वाद असो, किंवा अज्ञेयमीमांसेचा विचार असो, ज्या ज्या साधनांनीं हिंदु संस्कृतीची खरी योग्यता लोकांच्या निदर्शनास आणतां येईल, त्या त्या साधनांचा भरपूर उपयोग करून घ्यावयाचा असा केसरीचा बाणाच होता. याच दृष्टीनें केसरीनें महाभारतावरील लेखमाला लिहिली.

महाभारतावरील केसरीकारांचें प्रेम खरोखर अवर्णनीय होतें. केसरीच्या उत्तेजनानेंच लोकांची दृष्टि महाभारताकडे वळली असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं. कारण श्रीआद्यशंकरचार्यांच्या मागाहून दोनतीनशें वर्षांनंतर श्रीमत् भागवतालाच महत्त्व आलें. महाराष्ट्रांतील संतांच्या चळवळीनें भागवताचें हें महत्त्व शिखरास पोहोंचलेलें होतें. त्यामुळें लोकांना महाभारताचें जवळ जवळ विस्मरणच झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. कथाकीर्तनांतून आर्याभारताच्या रूपानें भारतीय आख्यानें जनमनाचें रंजन करीत होतीं खरीं; पण भारताला राष्ट्रीय ग्रंथाचा मान सहसा कोणाकडून दिला जात नसे. परंतु **केसरीनें भारत व रामायण हे हिंदूंचे राष्ट्रीय ग्रंथ होत, अशी लोकांना शिकवण दिली.** हिंदूंचें तत्त्वज्ञान, महाभारत, वाल्मिकीरामायण यांसारखें राष्ट्रीय ग्रंथ अशा विषयाकडे जनतेचा मोहरा वळविणें हें काम सोपें नव्हतें. तें केसरीनें फार उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, हिंदु धर्माचा विचार करतांना नुसत्या निबधग्रंथांवर किंवा स्मृतिग्रंथांवरच अवलंबून न राहतां महाभारत व उपनिषदें या ऋषिप्रणीत ग्रंथांचाहि विचार करणें अगत्याचें आहे; किंबहुना महाभारत, उपनिषदें याच ग्रंथांत हिंदु धर्माचीं मूलतत्त्वें, सांठविलीं असल्यामुळें त्यांचा अगोदर विचार करूनच मग स्मृत्यादि ग्रंथांकडे पाहाणें उचित होय, हीं गोष्ट समाजांतील विचारी लोकांना पूर्णपणें पटली.

१९०२-३ सालाचे सुमाराम वेदोक्त प्रकरण शिजूं लागलें. आधींपासून बरेच दिवस या प्रकरणाची वाटाघाट आंतल्याआंतच चालू होती. श्री. राजोपाध्यांचें उत्पन्न जप्त व खालसा झालें. आणि कांहीं दिवसांनीं ब्रह्मनाळकर स्वामींनी कोल्हापूरकर महाराजांचा वेदोक्त अधिकार कबूल केला. यामुळें वेदोक्त प्रकरणाच्या वादास जाहीर प्रारंभ झाला. यावेळीं ब्रह्मनाळकर स्वामींचें गुरु भिलवडीकर हे हयात होते. त्यांना महाराजांचा वेदोक्ताधिकार कबूल नव्हता. त्यामुळें वादाच्या पुढील धुमश्चक्रींत गुरुस्वामी व शिष्यस्वामी अशा नांवानेंच हे दोन पक्ष ओळखले जाऊं लागले. करवीर संस्थानचे हद्दींत असलेली स्वामींची जहागीर करवीर दरबारनें बरेच दिवसापासून जप्त ठेविली होती. वेदोक्ताचा अधिकार मिळाल्यानंतर जप्त असलेली उत्पन्नाची रक्कम, जहागीर व कोल्हापुरांतील मठाची भव्य इमारत ही सर्व इस्टेट शिष्य-

स्वामींना—म्हणजे ब्रह्मनाळकरांना ताब्यांत मिळाली व ते कोल्हापुरांत जाऊन स्थायिक झाले. या घटनेमुळें वेदोक्तप्रकरणाचें मूळचें स्वरूप बदललें, आणि वेदोक्ताच्या पायीं सुरू झालेल्या गुरुशिष्यस्वामींच्या कलहाचें स्वरूप त्यास प्राप्त झालें. ब्रह्मनाळकरस्वामींची सांपत्तिक दृष्ट्या आतां सुस्थिति झाली, व संकेश्वरच्या गुरुस्वामींची मात्र यावेळीं फारच हलाखीची स्थिति होती. वृद्धापकाळानें स्वामी फारच थकलेले, खजिन्यांत फारसा पैसा नाहीं, पदरीं माणूस नाहीं, व मठांत फारसें सामानहि शिल्लक नाहीं, अशा विकट परिस्थितींतून पार पाडण्यास लोकाश्रयावांचून दुसरा मार्गच नव्हता. लोकाश्रय मिळवावयाचा झाल्यास त्या कामीं विद्वान्, कर्तृत्वशाली व चतुर अशा मनुष्याची गरज लागते. सुदैवानें या योग्यतेचे पंडित बाळशास्त्री तेलंग हे गुरुस्वामींना भेटले. यांनीं परिस्थितीचें बरोबर आकलन करून प्रथम केसरीकडेच धाव घेतली व केसरीच्या साहाय्यानेंच लोकमताच्या गंगेचा प्रवाह गुरुस्वामींकडे वळविला. आतां वेदोक्ताच्या वादांत कोल्हापूरकरमहाराजांचे ऐवजीं स्वामींचेंच नांव पुढें येऊं लागलें होतें. म्हणून पंच नेमून या सर्वच वादाचा निकाल करावा असें केसरीनें जाहीर केलें व पुढें गुरुस्वामींच्या तर्फे पंचांचीं नांवेंहि केसरींत प्रसिद्ध करण्यांत आलीं. यावेळीं वंगभंगाच्या चळवळीस रंग चढूं लागला होता. लोकांत स्वदेशाभिमानाची भावना प्रदीप्त होऊं लागली होती. अशा वेळीं केसरीनें गुरुस्वामींची बाजू उचलून धरली व संकेश्वर मठानेंहि लोकांत मिसळण्याचें धोरण प्रत्यक्ष अमलांत आणलें. त्यामुळें संकेश्वर मठाचे स्वामी हेच आपले खरे शंकराचार्य होत असें वाटून बहुजनसमाज गुरुस्वामींच्या पक्षाकडे वळला, व ब्रह्मनाळकरस्वामींच्या पक्षाची बाजू सपशेल ढासळली. त्यामुळें नैतिक दृष्ट्या तरी त्यावेळीं संकेश्वरमठ पूर्ण विजयी झाला. 'गुरुस्वामींचा पक्ष केसरीनें हातीं धरला म्हणूनच तो विजयी झाला' असें पंडित बाळशास्त्री तेलंग यांनीं काढलेले उद्गार प्रस्तुत लेखकानें समक्ष ऐकिले आहेत. गुरुस्वामींच्या बाजूनें समर्थन करतांना वेदोक्ताविषयींचें आपलें मत केसरीनें कायमच ठेविलें होतें.

वेदोक्ताविषयींचें केसरीचें मत पुढीलप्रमाणें आहे असें म्हणतां येईल. श्रीछत्रपति शिवाजी महाराजांनीं मराठी राज्याची गादी स्थापन केली. राज्याभिषेकाचे वेळीं महाराजांचा वेदोक्त अधिकार पूर्णपणें मान्य करण्यांत आला होता. महाराजांचा अधिकार त्यांच्या वंशजांकडे चालणें क्रमप्राप्तच होतें. कोल्हापूरचें घराणें हें शिवाजी महाराजांच्या राजघराण्याचा एक भागच असल्यानें कुलक्रमानेंच हा वेदोक्तअधिकार कोल्हापूरकर महाराजांना प्राप्त होतो. मध्यंतरीं परंपरा विच्छिन्न झाल्याबद्दल योग्य प्रायश्चित्त घेतल्यावर कोल्हापूरकर महाराजांस वेदोक्तकर्मे करण्यास कोणतीच हरकत नसावी हें केसरीचें स्पष्ट मत होतें. कै. वे. शा. सं.

बाळशास्त्री तेलंग हे या वेदोक्ताच्या वाटाघाटींत प्रमुखपणें भाग घेत होते. शास्त्रीबुवांनीं केसरीच्या मताचा अनुवाद करून या गोष्टीला जगद्गुरु स्वामींचीहि संमति मिळेल असें सुचविलें. प्रायश्चित्ताची सामान्य कल्पना कोल्हापूरकरांच्या पक्षास सकृद्दर्शनी मान्यहि झाली. परंतु प्रायश्चित्ताच्या तपशीलांत वांधा उत्पन्न झाला. प्रायश्चित्तद्रव्य किती असावें या प्रश्नास बरेंच महत्त्व आलें असावें असें वाटतें; परंतु याच वेळीं राजोपाध्ये यांच्या प्रकरणास विशेष रंग चढल्यामुळें प्रायश्चित्ताची कल्पना मागें पडूं लागली. कोल्हापूरकर ब्रह्मवृंदांचें ( राजोपाध्ये वगैरे मंडळींचें ) म्हणणें असें पडलें कीं, वेदोक्त कर्माबद्दल महाराजांना परवानगी देणें न देणें हा अधिकार कोल्हापूरकर ब्रह्मवृंदांचा आहे, यांत जगद्गुरु स्वामींनीं ढवळाढवळ करूं नये. तेव्हां महाराजांचा पक्ष बाजूस राहून जगद्गुरुस्वामी व कोल्हापूरचे ब्रह्मवृंद यांचीच हमरीतुमरी होण्याची वेळ आली. वादाची शाखा भलत्याच दिशेकडे फुटूं लागली असें पाहून तेलंगशास्त्री यांनीं दूरदर्शीपणानें थोडीशी पिछेहाट घेतली; म्हणजे स्वामींच्या पक्षाचें म्हणणें थोडें थोपवून धरलें व ब्रह्मवृंदांच्या म्हणण्याचा महाराज काय निकाल करतात तें तटस्थपणानें पाहावें असें ठरवून शास्त्रीबुवा किंचित् स्वस्थ बसले. कोल्हापूरकर ब्रह्मवृंदानें या वेळीं तडजोडीचें धोरण स्वीकारून जगद्गुरु व महाराज यांचेपुढें थोडेसें नमतें घेतलें असतें तर भावी परिणामाच्या दृष्टीनें तें बरें झालें असतें असें आतां वाटल्यावांचून राहात नाहीं. पण 'भावि चेन्न तदन्यथा' हेच खरें ! ब्रह्मवृंद किंवा त्यांचे पुढारी व महाराज यांचे समक्ष वादविवादांत कांहीं तरी अधिक प्रसंग झाला व राजोपाध्यांचा वार उडाला. या गोष्टीमुळें सगळ्यांचीच मसलत फसल्यासारखी झाली. केसरीच्या धोरणाप्रमाणें जर अखेरपर्यंत ही मसलत टिकून राहिली असती तर वेदोक्ताच्या वादाला असलें भेसुर स्वरूप आलेंच नसतें असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहावत नाहीं.

कोल्हापूरकर महाराजांसारख्या क्षत्रियांना वेदोक्त कर्में करण्यास मुळींच हरकत नाहीं. स्वामींचा तंटा मूळ वेदोक्ताकरितां नसून अधिकाराकरितां आहे. जे स्वामी लोकमतानुवर्ती असतील, तेच शंकराचार्यांच्या पीठास योग्य ठरतील, अशा अर्थाचा केसरीनें खुलासा केला आहे. पुढें वेदोक्ताचा वाद मागें पडला व स्वामींचा तंटा शेवटीं श्रीमत् शंकराचार्य डॉ. कुर्तकोटीं यांनीं मोठ्या धडाडीनें संपविला. या वेदोक्तप्रकरणाच्या वादांत प्राप्त झालेल्या संधीचा उपयोग करून नेहमीं बाजूस उभा राहणाऱ्या आचार्यपीठाला देखील केसरीनें लोकशाहीच्या क्षेत्रांत आणून बसविलें, ही त्यांची कामगिरी राष्ट्रधर्माच्या दृष्टीनें प्रशंसनीय होय.

वंगभंगाच्या वेळीं केसरी राष्ट्रधर्माच्या तत्त्वावर राजकारण प्रतिपादन करीत होता. परदेशी साखर व कापड इत्यादि विषयांच्या बहिष्काराचें वाङ्मय राष्ट्रधर्माच्या घाटाचें बनलें गेलें. या सुमारासच महाराष्ट्रांत पंचांगशुद्धीविषयीं

चर्चा सुरू झाली. केसरींत पंचांगशुद्धीचा जोरानें पुरस्कार करण्यांत आला. ग्रहलाघवीय गणित व दृक्प्रत्यय यांत येणारा फरक दूर करून दृक्प्रत्ययाला जुळेल अशीच पंचांगाची रचना व्हावयास पाहिजे असें केसरीनें प्रतिपादन केलें. ज्योतिषशास्त्र हें मुख्यत्वेंकरून प्रत्यक्ष प्रमाणावरच—दृक्प्रत्ययावरच आधारलेलें असल्यानें या बाबतींत वाद होण्याचें वस्तुतः कांहींच कारण नव्हतें. परंतु दैवी चमत्काराच्या भोळसट कल्पनांनीं ज्योतिषशास्त्राला तरी कोठें सोडलें होतें ! वऱ्हाड प्रांतांत फिरत असतां प्रस्तुत लेखकाला एका ज्योतिषीबुवांनीं समक्ष असें सांगितलें कीं, 'भास्कराचार्यांनीं गणितशास्त्रावर जी ग्रंथरचना केली ती 'स्वतःच्या बुद्धीनें नसून प्रत्यक्ष सूर्यनारायणानें भास्कराचार्यांला ज्योतिषचक्राची 'सर्व माहिती दिली, व तीच आचार्यांनीं ग्रंथरूपानें लिहून ठेविली. इ०' ही हकिगत सदर ज्योतिषिबुवांनीं नुसती तोंडींच सांगितली असें नसून वरील-सारख्या मजकुराची छापील हस्तपत्रकेंहि छापून प्रसिद्ध केलीं होतीं. सदर हस्त-पत्रकावर आणखीहि कांहीं ज्योतिषशास्त्रज्ञांच्या सह्या होत्या. अशा प्रकारच्या भोळ्या समजुतीच्या लोकांना सूर्यनारायणाच्या प्रसादानें सुरू झालेल्या पंचांगांत बदल करणें म्हणजे जुनी परंपरा विच्छिन्न करणें होय असें वाटलें तर त्यांत फारसें नवल नाहीं. अशा अनेक कारणांनीं प्रारंभीं तरी या पंचांगवादांत दोन पक्ष निर्माण झाले. ग्रहलाघवीय गणितांत फरक करावयाचा असला तरी त्या-बरोबर युरोपीय गणित शास्त्राचा स्वीकार करावयाचा असें नाहीं. पाश्चात्यांच्या शोधांनीं व त्यांच्या यंत्रादि साधनांनीं ग्रहांचे वेध घेऊन जे दृक्प्रत्यय येतील त्यांना अनुसरून प्राचीन गणितशास्त्रांतील नियमांना संस्कार करावयाचा व अशा रीतीनें ज्योतिषशास्त्रांत योग्य ती सुधारणा घडवून आणणें अवश्य आहे. कोणत्याहि धार्मिक कृत्यास तिथिनक्षत्र इत्यादि पंचांगांची अत्यंत आवश्यकता असते. संवत्सरगणनेचा शास्त्रीय दृष्ट्या विचार करून कालाचा निश्चय करणें धार्मिकदृष्ट्या देखील फार अगत्याचें आहे. **योग्य कालीं धर्माचरण केलें तरच तें फलद्रूप होतें. असा धर्मशास्त्राचा नियम आहे.** कोणत्याहि कर्माला 'देशकालाच्या संकीर्तनानें प्रारंभ करावा अशी हिंदूंची धार्मिक परं-परा अनादिसिद्ध आहे म्हणून जुन्या मताच्या शास्त्रीवर्गानेदेखील या विषयांत मन घालून ज्योतिषशास्त्रांत योग्य ती सुधारणा घडवून आणावी अशा-विषयीं केसरीनें अनेक प्रकारें ऊहापोह केला. १९०६-७ सालाच्या सुमारास या पंचांगशुद्धीच्या कामाला रीतसर सुरवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं व हें कार्य पुढें १०।१२ वर्षांनीं म्हणजे १९१८-१९ च्या सुमारास पूर्ण झालें. हिंदु समाजांतील ज्योतिषशास्त्राचा धर्माशीं जिव्हाळ्याचा संबंध आहे. ज्या नाना प्रकारच्या विद्याकलांनीं राष्ट्रधर्माचीं अंगें परिपूर्ण होतात त्यांपैकीं ज्योतिर्गणित हें एक महत्त्वाचें अंग आहे. या ज्योतिषाच्या वादांत देखील

केसरीनें आपलें मध्यबिंदूचें धोरणच कायम ठेविलें होतें. जुने शास्त्रीय नियम दृक्‌प्रत्ययाशीं ताडून पाहून त्यांत जे विशेष दोष आढळून येतील ते काढून टाकावेत आणि शास्त्र व दृक्‌प्रत्यय यांचा मेळ घालतांना अर्वाचीन ज्योतिर्गणिताचाहि अवश्य तेथें उपयोग करावा. जुन्या गोष्टींत नव्यांची भर घालावयाची असल्यास जुनी परंपरा न बिघडेल इतक्या बेतानें ती घालण्यास हरकत नाहीं. अशा प्रकारचें संस्करण प्राचीन काळीं पूर्वाचार्यांनीं केलें असल्याचा दाखला इतिहासांत सांपडतो. असें या वादांतील केसरीचें प्रतिपादन होतें. पंचांगाचें शुद्धीकरण हें हिंदु धर्मांतील एक महत्त्वाचें कार्य होतें. तें बहुतांशीं तडीला नेऊन या दिशेनें देखील केसरीनें धर्माला प्रगतिपर असेंच चालन दिलें.

१९०८ ते १९१८ पर्यंतच्या दहा वर्षांच्या काळांत देशांत धार्मिक घडामोडी बऱ्याच झाल्या. संस्कृत विद्येला स्वतंत्रपणें पदवी द्यावी किंवा नाहीं असा प्रश्न मुंबई युनिव्हर्सिटीपुढें आला असतां, त्यावर पूर्वोत्तर पक्षांची चांगलीच लढाई सुरू झाली. एका इंग्रजी विद्याभिमानी प्रसिद्ध गृहस्थानें या प्रश्नास कसून विरोध केल्यामुळें वादाला पुष्कळच रंग चढला. केसरीनें या बाबतींत लोकांच्या बाजूचें समर्थन फारच सयुक्तिक व जोरदार असेंच केलें. या सुमारासच दक्षिणेंतील पंडित घराण्यांच्या इतिहासावर एक बरीच मोठी लेखमाला प्रसिद्ध करण्यांत आली. या लेखांत संस्कृत विद्येचा इतिहास, तिची परंपरा व रूपरेषा इत्यादि विषयांचा सविस्तर उहापोह करण्यांत आला आहे. याशिवाय धर्मशिक्षणाची आवश्यकता, शीलसंवर्धनास धर्मशिक्षणाचा उपयोग, जगद्गुरूची गादी, अवतारकल्पना, इत्यादि विषयांवर केसरीनें प्रसंगोपात्त उत्कृष्ट अग्रलेख लिहून लोकमताला धार्मिक दृष्ट्या चांगलें वळण दिलें आहे. १९१५ सालाचे सुमारास ‘ गीतारहस्य ’ प्रसिद्ध झालें. तेव्हांपासून गीतेंतील कर्मयोगशास्त्राचा पुरस्कार केसरींतून एकसारखा होतच आहे. १९२० च्या सुमारास शुद्धिसंघटनाची चळवळ देशांत जोरानें सुरू झाली. या चळवळींत केसरीनें आपल्याला साजेसाच भाग घेऊन ती चांगलीच भरभराटीस आणली. जुन्या सुधारकांनीं ज्या प्रकारचीं सामाजिक मतें प्रतिपादन केलीं होतीं त्या मतांत आणि या चळवळींत महत्त्वाचा फरक होता. धर्मबंधनें अजिबात तोडून टाकावीं म्हणणाऱ्या सुधारकांना शुद्धि किंवा पतितपरावर्तन यांत विशेष वाटण्यासारखें नव्हतें हें खरें ! शुद्धि किंवा परावर्तनासारख्या गोष्टी करणें धर्मदृष्ट्या किती अगत्याचें आहे याची त्यांना कल्पना होणें शक्य नाहीं. हिंदु समाजांत हजारों वर्षें जी घट चालली आहे तिला आळा घातला नाहीं तर हिंदु समाजावर नामशेष होण्याचा प्रसंग येईल याविषयीं सुधारकांना फारशी भीति वाटत नाहीं. कारण ‘ व्यावहारिक दृष्ट्या ‘ समाजाची सुस्थिति राहिल्यावर धर्माची आवश्यकता काय !’ आणि जेथें धर्म-

बंधनच अनवश्यक ठरलें तेथें शुद्धि किंवा पतितपरावर्तन यांसारखे विषय म्हणजे पोरखेळ वाटले तर त्यांत फारसें आश्चर्य नाहीं. असल्या मतांच्या सुधारकांना शुद्धिसंघटनेच्या चळवळींत राम नाहीं असें वाटणें साहजिक आहे. सुधारकांचे हें मत मूळांत चुकीच्या पायावरच उभारलेलें आहे. धर्मबंधनावांचून समाजाची सुस्थिति राहणें अशक्य आहे हें तत्त्वच त्यांना कळत नाहीं. त्यामुळेंच त्यांना या चळवळींचें महत्त्व कबूल करवलें नाहीं. परंतु समाजस्वास्थ्याला मुख्य धर्म-तत्त्वें व त्यांचे नियम यांची अत्यंत आवश्यकता आहे हें केसरीचें मत शास्त्रशुद्ध असून मानवी इतिहासाच्या दृष्टीनें अनुभवसिद्धच आहे. अस्पृश्यतानिवारण, पतितपरावर्तन इत्यादि चळवळी १९१८ पासून सुरू झाल्या त्या धर्म-शास्त्राच्या नियमास शक्य तोंवर धरूनच करण्यांत आल्या आहेत. या चळवळींत भाग घेणाऱ्या पुढाऱ्यांची धर्मनिष्ठा कमी प्रतीची आहे असें म्हणणें बरोबर नाहीं. सुधारकांनीं अस्पृश्यता निवारण्याची चळवळ केली असली तरी ती धर्मबुद्धीनें केली नव्हती. अस्पृश्यतानिवारणासारख्या चळवळी समाजहिताच्या दृष्टीनेंच करण्यांत आल्या होत्या, व अजूनहि त्याच दृष्टीनें पुढेंहि करण्यांत येतील असा अंदाज करण्यास हरकत नाहीं. राजकारणाच्या झगड्यांत लोकांचे पुढारी नोकर-शाहीबरोबर ज्या बुद्धीनें भांडतात तसल्या प्रकारची तीव्र बुद्धि सामाजिक तंट्यांत कोणत्याहि पक्षानें उत्पन्न होऊं देऊं नये. नोकरशाहीबरोबर भांडतांना सत्याग्रह करणें योग्य ठरलें तरी सामाजिक चळवळींतील भांडण सत्याग्रहाच्या थरावर उभय पक्षांनींहि सहसा जाऊं देऊं नये असें या चळवळीचें प्रसंगीं केसरीनें प्रतिपादिलें आहे. हिंदुस्थानांतील प्रजापक्ष व नोकरशाही या दोहोंत भक्ष्य-भक्षकाचें ( परस्परहितविरोधी ) नातें उत्पन्न झालें आहे. असा प्रकार अंतर्गत चळवळींत शक्य व इष्टहि नाहीं. म्हणून सामाजिक चळवळींतील केसरीचें नेमस्तपणाचें धोरण सर्वांशीं श्रेयस्करच ठरलें.

## उपसंहार

पन्नास वर्षांपूर्वी केसरीचा जन्म झाला तेव्हां हिंदुधर्माची स्थिति केवळ आचारप्रवण झाली होती. आचारावांचून धर्माचें महत्त्वाचें अंग दुसरें कोणतेंच नाहीं असा समज पसरला होता. हिंदूंच्या या आचारधर्मांत समाजधर्माला मुळींच स्थान नव्हतें. त्यामुळें वैयक्तिक जीवनक्रमांत वैयक्तिक आचार ज्या मानानें कडकपणें पाळले जातील त्या मानानें ती व्यक्ति धर्मदृष्ट्या श्रेष्ठ ठरत होती. धर्मशास्त्राच्या गणितांत समाजरूपी रक्कम घेतली जात नसल्यामुळें समाजा-ची सुस्थिति किंवा दुस्थिति धर्मदृष्ट्या विचार करण्याजोगी आहे ही कल्पनाच हिंदूंच्या अंतःकरणांतून नष्ट झाली होती. धर्मबुद्धीच्या या पराकाष्ठेच्या संकोचा-मुळें धर्माचीं इतर अंगेंहि अतिशय संकोच पावलीं होतीं. आचारधर्माप्रमाणेंच

हिंदु धर्मांचा प्राचीन इतिहासहि अत्यंत महत्त्वाचा होता. पण भक्तिभावानें श्रवण करण्यापलीकडे या इतिहासाला जागा मिळत नव्हती. तसेंच हिंदूंचें तत्त्वज्ञान अत्यंत गंभीर व उदात्त होतें. परंतु आचार, व्यवहार इत्यादिकांशीं असलेला त्याचा संबंध अजीबात तोडून टाकण्यांत आला होता. मीठ तोडल्यामुळें मनुष्याची प्रकृति जशी दुर्बळ व क्षीण होते किंवा पाणी द्यावयाचें बंद केल्यानें एखादा वृक्ष जसा जागच्या जागीं वठून जातो त्याप्रमाणेंच तत्त्वज्ञानाचा जिव्हाळा बंद झाल्यानें हिंदूंचा आचारधर्म निर्जीव होऊन राहिला होता. वैदिक ऋषींनीं वेदामध्यें इतिहास, पुराण व आचार या तीनहि अंगांचीं मांडणी मुळांत एकमेकांस अनुग्राहक अशीच केली आहे. परंतु बुद्धोत्तर कालांत या अंगांचा परस्परसंबंध नाहींसाच केल्यामुळें त्यांतील जिवंतपणा नष्ट होऊन तीं निरुपयोगी झालीं. मुसलमानांच्या स्वाऱ्या, हिंदूराजांची आपसांतील राक्षसी युद्धें, इंग्रजांचा दिग्विजय, अशीं अनेक अरिष्टें राष्ट्रावर कोसळत असतां त्यांचें निवारण करण्यास हिंदुधर्म असमर्थ ठरला. या परिस्थितीचा फायदा घेऊन, समाजधारणाचें ( राष्ट्रधर्माचें ) तत्त्व हिंदु संस्कृतींतच नाहीं असा परकीय लेखकांनीं बोभाटा केला आणि त्यावर आमच्यांतील कित्येकांचा विश्वासहि बसला. अव्वल इंग्रजींत विलायती सुधारणांचें झगझगीत स्वरूप पाहून हिंदुसमाज दिपल्यासारखा झाला. या मोहावस्थेंत इंग्रजांचें अनुकरण केलें असतां आपण त्यांच्या बरोबरीचे होऊं असें सकृद्दर्शनीं कित्येकांना वाटलें. पण पुढें इंग्रजांच्या स्वाभिमानवृत्तीपुढें स्वाभिमानाला पारखे झालेले हिंदुलोक दुबळेच ठरतात, म्हणून यापुढें हिंदुसमाजांत स्वाभिमानाची वृत्ति जागृत केल्याखेरीज त्याचा तरणोपाय नाहीं असें पुढाऱ्यांना उघड उघड दिसून आलें. ही स्वाभिमानवृत्ति जागृत करतांना स्वधर्माभिमान्यांचीहि आवश्यकता वाटूं लागली आणि धर्मजागृतीच्या प्रत्यक्ष कामाला सुरवात झाल्यावरोबर धर्माच्या स्वरूपाचें परीक्षण साहजिकच होऊं लागलें. या परीक्षणांत जे जे आगंतुक दोष आढळून आले, ते सर्व दोष काढून टाकण्याचा प्रयत्न करणें अपरिहार्यच होतें.

केसरीचा मूळ उद्देश राजकारण हाच होता. रात्रीं गस्त घालण्यानें जसे लोक स्वसंरक्षणाबद्दल सावध रहातात, तसेंच इंग्रजांच्या राजकारणावर गस्त घालून लोकांना त्या बाबतींत सावध ठेवावें आणि अधिकारीवर्गाला देखील नैतिक धाक उत्पन्न करावा असा केसरीचा मुख्य उद्देश होता. परंतु राजकारणाकरितां स्वदेशाभिमान, स्वदेशाभिमानाकरितां स्वधर्माभिमान, स्वधर्माभिमानाकरितां धर्मपरीक्षण आणि धर्मपरीक्षणांनूनच धर्मसंस्करण अशीं कार्यें केसरीला करावीं लागलीं. हिंदु जनता स्वभावतःच धर्मप्रवण होती. धर्माचें व्यापक स्वरूप विसरलें असलें तरी आचारधर्माच्या एका लहानशा तंतूला हिंदु समाज पक्का बिलगला

होता. याचें कारण तरी त्याची धर्मप्रवणता हेंच होय. या धर्मप्रवणतेमुळेंच धर्माभिमान जागृत केल्यावांचून हिंदु समाजाचे राष्ट्रीय सद्गुण प्रगट होण्यासारखे नव्हते. इ. स. १८८० च्या सुमारास समाजांत आचारधर्मालाच प्राधान्य असल्यामुळें केसरीला आचारधर्मांची सविस्तर चर्चा करावी लागली. आचारधर्माबरोबरच हिंदूंच्या प्राचीन इतिहासाचें विवेचन करून आचारधर्मांचा दुवा इतिहासपुराणास कसा जोडला जातो तेंहि केसरीनें सोपपत्तिक दाखविलें. आचारधर्मांचें विवेचन करतांना कांहीं आचारांचा अप्रामाणिकपणा व कांहीं आचारांत बदल केसरीनें सशास्त्र दर्शविले. आचारांत बदल केला तर आचारधर्मावरील लोकांची श्रद्धाच केसरीनें नष्ट केली असें एखाद्या प्रतिपक्षानें कुत्सितपणें म्हटलें तर ती गोष्ट निराळी. परंतु सरळपणानें केसरीवर असा आरोप करता येणार नाहीं. कारण केसरीनें कांहीं आचार त्याज्य ठरविले तरी ते धर्मशास्त्राच्या आधारानेंच, आणि कांहीं नवीन आचार ग्राह्य ठरविले तरी तेहिपण धर्मशास्त्राच्या आधारानेंच ठरविले आहेत. म्हणजे आचारधर्मावरील श्रद्धा कमी होऊं न देतां त्यांत योग्य त्या सुधारणा करणें अगत्याचें आहे असें केसरीचें धोरण होतें. त्याप्रमाणेंच इतिहासपुराणावरील भक्ति कायम ठेवूनच त्यांची नवीन ऐतिहासिक दृष्टीनें शास्त्रशुद्ध व समर्पक चिकित्सा करता येते असें केसरीनें स्वतः अनेक लेख लिहून समाजाच्या निदर्शनास आणिलें. केसरीच्या या प्रयत्नानेंच लोकांच्या अंतःकरणांत पुराणग्रंथाविषयीं श्रद्धायुक्त ऐतिहासिक बुद्धि जागृत झाली.

बुद्धोत्तरकालांत झालेल्या वेदान्तग्रंथांत प्रायः संन्यासमार्गाचाच अंगीकार केल्यामुळें वेदान्त व व्यवहार यांची फारकत झाली. कर्म व ज्ञान यांचा तमःप्रकाशासारखा विरोध आहे ही समजूत संन्यासमार्गानें सर्वत्र पसरविली होती. त्यामुळें तत्त्वज्ञानाचा वैयक्तिक अगर सामाजिक व्यवहाराला कांहींच उपयोग होत नव्हता. अर्थात् वेदान्ततत्त्वज्ञान म्हणजेच संन्यासमार्ग असा गैरसमज लोकांत दृढमूल होऊन ‘ आमचें तत्त्वज्ञानच राष्ट्र बुडविण्याला कारणीभूत झालें ’ असेंहि लोकांना वाटूं लागलें. परंतु गीतेचा आधार घेऊन केसरीनें या गैरसमजुतीवर आघात करण्यास प्रारंभ केला. शेंकडों वर्षें पडलेला बांध फोडण्यास जसे अतिशय प्रयत्न करावे लागतात त्याप्रमाणेंच वेदान्त व व्यवहार यांमध्यें संन्यासमार्गी गैरसमजुतीचा जो जुनाट बांध पडला आहे त्यावर पहिला घाव केसरीनेंच घातला. यापूर्वीं कित्येक विद्वान् लोकांना किंवा साधुसंतांनादेखील वेदान्त व व्यवहार यांचा मेळ घालणें फारच अगत्याचें वाटलें व त्यांनीं तसे प्रयत्नहि केले. परंतु समोरासमोर उभा राहून या स्वाभाविक वाटणाऱ्या कर्मज्ञानाच्या विरोधावर कोणींहि आघात केला नव्हता. हें मनोधैर्य केसरीनेंच दाखविलें. शंभर वर्षांच्या इंग्रजी राजवटीमुळें केसरीच्या या कामगिरीला अनुकूल अशीच, आधिभौतिक उत्कर्षाच्या आकांक्षेकडे वळलेली विचारसरणी लोकांत उत्पन्न

झाली होती, म्हणूनच केसरीला हें धाडस करतां आलें, असें कोणीं म्हटल्यास तीहि गोष्ट क़बूल करण्यास हरकत नाहीं. प्राप्त झालेली परिस्थिति बरोबर ओळखून तिचा सत्कार्याकडे उपयोग केल्यानें केसरीच्या धैर्याचें किंवा कामगिरीचें महत्त्व कमी होईल असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. शुद्ध बुद्धीनें केलेलें कर्म तत्त्वज्ञानास विरुद्ध तर नाहींच उलट तें तत्त्वज्ञानास पोषकच होतें. ज्ञानाच्या योगानें बुद्धि अत्यंत निर्मोह होते. अशा ज्ञानयुक्त शुद्ध बुद्धीनें केलेलें कर्म सर्वभूतहितकारक म्हणजेच राष्ट्रहितकारक होतें. असें प्रतिपादन करून केसरीनें राष्ट्रधर्माचा अतिशय खोल व भक्कम असा पाया घालून दिला. केसरीच्या या प्रयत्नानें समाज किंवा राष्ट्र हीच परमेश्वराची मूर्ति असून समाजसेवेनेंच ईश्वरसेवा घडते अशी बुद्धि लोकांत जागृत झाली, हेंच राष्ट्रधर्माच्या उषःकालाचें मुख्य लक्षण होय यांत शंका नाहीं. यावरून केसरीनें राष्ट्रधर्माचा अरुण उषःकाळाच्या क्षितिजावर आणला असें निर्विवाद सिद्ध होतें.

हिंदुधर्माची रचनाच अशी आहे कीं, कोणत्याहि सद्व्यवहाराचें मूळ या धर्माच्या अंतरंगापर्यंत जाऊन भिडलेलें असतें. राजकारणाकरतां म्हणून का होईना केसरीला धर्मक्षेत्रांत पुष्कळच काम करावें लागलें आहे. व अत्यंत झीज सोसून गेलीं पन्नास वर्षें केसरीनें तें उत्तम प्रकारें बजाविलें आहे. सांप्रतकाळीं धर्मनिष्ठ असें कांहीं पुराणमताभिमानी लोकदेखील सार्वजनिक काम करण्यांत परमार्थ समजत आहेत. पतितपरावर्तन, शुद्धि, अस्पृश्यतानिवारण पोटजातींचें एकीकरण इत्यादि विषयांचा धर्मशास्त्रास अनुसरूनच विचार करूं लागले आहेत. म्हणजे धार्मिक विचारांत समाजकल्याण ही एक महत्त्वाची बाब आहे हें तत्त्व शास्त्रीय वैदिकांना देखील पूर्णपणें मान्य झालें आहे. यापेक्षां राष्ट्रधर्माच्या उषःकालाचें दुसरें प्रमाण कोणतें ?

केसरीची कामगिरी म्हणजे केसरी वर्तमानपत्राच्या आजपर्यंतच्या सर्व संपादकांचीच कामगिरी होय हें निराळें सांगावयास नको. श्री. चिपळूणकरांपासून श्री. करंदीकरांपर्यंत झालेल्या सर्व मुख्य व सहकारी संपादकांनाच हें श्रेय देणें वाजवी आहे. परंतु संस्थेच्या नांवांत या सर्वांचाच अंतर्भाव होत असल्यामुळें त्यांचा नामनिर्देश निराळा करण्याची आवश्यकता नाहीं. हिंदुधर्माची ( वैदिकधर्माची ) रचना सर्वव्यापी असल्यानें केसरीनें केलेल्या राजकारणाला देखील त्याच्या धार्मिक कामगिरींत मुख्य स्थान देण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. परंतु कांहीं आधुनिक लोकांना प्रचलित राजकारणाचा धर्मांत समावेश करणें बरोबर वाटत नाहीं. त्याचें कारण इतकेंच कीं, वैदिक धर्माचें सर्वव्यापी स्वरूप त्यांनीं लक्षांत घेतलेलें नसतें. आधुनिकांची ही एकदेशीय दृष्टि स्वीकारून केसरीचें राजकारण बाजूस ठेविलें आणि केसरीची केवळ धार्मिक कामगिरीच लक्षांत घेतली तरी ती राजकारणापेक्षां अल्प किंवा कमी योग्यतेची आहे असें

कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं. सूवर्णमध्याच्या धोरणानें केसरीनें जी धर्मसेवा बजाविली, तिच्या योगानेंच हिंदु धर्माच्या उत्क्रांतीचा अरुणोदय झाला आहे. म्हणूनच केसरीची ही धार्मिक कामगिरी भावी इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखी झाली आहे. अशीच उज्ज्वल धर्मसेवा केसरीचे हातून चिरकाल घडो व केसरीचें हातूनच वैदिक धर्माच्या पूर्ण उत्कर्षाचें कार्य इतउत्तर होवो अशीच आम्हां वाचकांची इच्छा आहे.

---

# संस्कृत विद्येचीं स्थित्यंतरें

[ श्री. नारायण सिताराम भट. बी. ए., एल्एल्. बी. ]

व्यवहारांत व घरांत संस्कृत भाषा बोलण्याचा प्रघात नाहींसा होऊन सुमारें अडीच हजार वर्षें होत आलीं. वेदकालापासून इ. सनापूर्वी ८०० वर्षांपर्यंत म्हणजे पाणिनीचे कालपर्यंत ही भाषा प्रचारांत होती याबद्दल संशोधकांचें एकमत झालेलें आहे. पतंजलीनें लिहिलेल्या संवादात्मक ग्रंथांत ' अथ शब्दानुशासनम् ' या प्रकरणाचें सुरवातीस ' केषां शब्दानाम् ' असा प्रश्न असून त्यावर ' वैदिकानां लौकिकानां च ' असें उत्तर आहे. अर्थात् ' लौकिकानाम् ' म्हणजे प्रचारांतील असाच अर्थ अभिप्रेत आहे. यावरून पतंजलीचे वेळींहि संस्कृत भाषा लोकांचे बोलण्यांत असावी असें दिसतें. वत्सराज व वासवदत्ता यांचे संवादावरून तसेंच अनुमान काढतां येतें. एका जलक्रीडेचे प्रसंगीं वत्सराज वासवदत्तेच्या अंगावर पाणी उडवीत होता. तेव्हां ' मोदकेन ताडय ' असें ती राजास म्हणाली. लगेच वत्सराजानें मोदक आणविले. ते पाहून तिनें विचारलें कीं ' मी आपणांस ' मा उदकेन ताडय ' असें सांगितलें तें आपणांस कसें कळलें नाहीं ? ' या संवादावरून एका पंडितानें असा शोध लाविला आहे कीं त्या काळांतील स्त्रियादेखील श्लेष करून बोलत असत.

यावरून साधारणतः इ. स. पूर्वी ३०० वर्षांपर्यंत संस्कृत भाषा प्रचारांत होती असें अनुमान काढलें असतां फारसें चुकणार नाहीं. मात्र त्यानंतर बौद्धांची पाली भाषा व नंतर प्राकृत भाषा प्रचारांत आली. संस्कृत भाषेची पिछेहाट झाली, व पुढच्या काळांत परिस्थितीप्रमाणें व स्थलभेदानुरूप स्थानिक भाषांचा प्रचार होत गेला याबद्दल ज्यास्त खुलासेवार माहिती केसरी ता. २-६-१४चे अंकांत मिळूं शकेल. अशा रीतीनें संस्कृत भाषा बोलण्याचा प्रघात नाहींसा झाला

तरी संस्कृत विद्येचें अध्ययन मात्र बंद पडलें नाहीं व त्यासाठीं विद्यालयें देखील चालू होतीं. या बाबतींत जी माहिती उपलब्ध आहे ती फार अपुरी आहे.

**पूर्वींचीं संस्कृत विद्यालयें व पंडितांची कामगिरी**—पूर्वी तक्षशिला येथें एक संस्कृत विद्यापीठ होतें. पाणिनि, आर्य चाणक्य, आत्रेय वगैरे पंडितांनीं याच ठिकाणीं अध्ययन केलें. प्रथम हें विद्यापीठ ब्राह्मण धर्मीय होतें, पण पुढें तें बौद्धधर्मीय झालें. बौद्धधर्मामुळें गृहस्थाश्रमपरंपरा नष्ट झाली. बुद्ध भिक्षु व संन्यासी बागा, मठ, विहार, अशा ठिकाणीं विद्यार्थ्यांना जमवून अध्यापन करूं लागल्यामुळें विद्यापीठें रानावनांतून पसरलीं गेलीं. अशा स्थितींत बराच काळ गेल्यानंतर, इसवी सन सहाशेंच्या सुमारास बंगालमधील नलंद नामक विद्यालयाची कीर्ति सर्वत्र ऐकूं येऊं लागली. त्यांत दहा हजार विद्यार्थी अध्ययन करीत होते व १५१० अध्यापक होते. यानंतरच्या पांचशें वर्षांत उदंतपुरी व विक्रमशीला हीं विहार प्रांतांतील विद्यालयें नांवलौकिक मिळवून पुढें आलीं. पैकीं पहिल्यांत ६०० शिक्षक होते व दुसऱ्यांत १०८ शिक्षक होते. व्याकरण, दर्शन, अभिधर्म आणि वैद्यक यांचें अध्ययन होत असे, व विद्यार्थीवर्गहि बराच मोठा होता. या विद्यालयांचा सन १२०३ मध्यें एका मुसलमान राजाकडून नाश झाला. चवदावे शतकांत मिथिला येथें ब्राह्मणमताचें संस्कृत विद्यापीठ होतें. त्या ठिकाणीं न्यायशास्त्र उत्तम शिकवीत असत. त्यानंतर नडिया ऊर्फ नवद्वीप येथें विद्यालय निघालें व मिथिला विद्यापीठाचा लोप झाला. या ठिकाणीं वासुदेव नांवाचा महापंडित होऊन गेला. त्याच्या रघुनाथ नांवाचे शिष्यानें न्यायशास्त्रावर, रघुनंदनानें हिंदुधर्मशास्त्रावर, कृष्णानंदानें तंत्रशास्त्रावर व चैतन्यानें वैष्णवधर्मावर अत्यंत विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिले. या नवद्वीप येथील संस्कृत विद्यापीठाचा लौकिक अद्यापहि कायम आहे.

**दक्षिणी पंडितांची कीर्ति**—पूर्वींच्या काळांत या उत्तरेकडील पंडितांनीं लौकिक मिळविला त्यापेक्षांहि अधिक लौकिक आपल्या दक्षिणेकडील पंडितांनींहि मिळविला. पण त्यांचा इतिहास फक्त पंधराव्या शतकापासूनच आढळण्यांत आहे. त्या काळांत पैठण येथें एक प्रसिद्ध विद्यापीठ होतें. तें रामेश्वरभट्ट नामक महापंडितानें स्थापन केलें होतें. त्याची शिष्यशाखा फार मोठी असून, द्रवीड, कर्नाटक, आंध्र, गुर्जर, मालव, व्रज, हिमालय, उत्कल, गौड वगैरे दूरदूरचे देशांत त्याचे शिष्य म्हणविणारे पंडित होते. पैठण येथील विद्यापीठाची व्याकरण, न्याय, मीमांसा व वेदान्त याबद्दल प्रसिद्धि होती. वृद्धापकाळीं रामेश्वरभट्ट काशीयात्रेस गेले व तिकडेच मुलांचीं लग्नें व सोयरीक झाल्यामुळें, त्यांनीं कायमचें वास्तव्य काशीस केलें. त्यांचा मुलगा नारायणभट्ट हा बापापेक्षांहि विद्वान् निघाला. श्रुति, स्मृति व षड्दर्शनें, यांत त्याचा हातखंडा असून त्यानें मिथिला व गौड येथील पंडितांबरोबर वादविवाद करून दक्षिणी पंडितांचें श्रेष्ठत्व सिद्ध केलें. त्याचा अधिकार

काशी, कनोज, मिथिला येथेंच काय, पण सर्व बंगाल प्रांतांत मानला जात असे. त्यानें ग्रंथहि अनेक लिहिले. त्यांत मीमांसाशास्त्रदीपिका व कालनिर्णयासंबंधीं कारिका विशेष प्रसिद्ध आहेत. त्याचे वडील मुलानें कोटिहोमादि पद्धति वगैरे ग्रंथ लिहिले. दुसरा मुलगा शंकरभट्ट यानें धर्मद्वैतनिर्णयचंद्रिका, सर्वधर्मप्रकाश इत्यादि ग्रंथ लिहिले. त्याचा शिष्य भट्टोजी दीक्षित यानें सिद्धान्तकौमुदी लिहिलेली आहे ती सर्वांच्या परिचयाची आहे. त्यानंतरचे काळांत नारायणभट्टाचाच वंशज गागाभट्ट प्रसिद्धीस आला. त्यानें शावर भाष्यावर व जैमिनीसूत्रावर टीका लिहिली व मीमांसा, अलंकार, वेदान्त यांवर ग्रंथ लिहिले. शिवाजींचे राज्याभिषेकास याच पंडितास मुद्दाम आणविण्यांत आलें होतें. कारण तो दक्षिणी होता. यानंतर नागोजीभट्ट प्रसिद्धीस आला. त्यानें अनेक ग्रंथावर टीका लिहिल्या त्या प्रसिद्धच आहेत. तो १७७६ मध्यें वारला. १७९१ सालीं बनारस संस्कृत कॉलेजची स्थापना झाली. त्यांत पहिले प्रोफेसर दक्षिणी पंडितच होते. याखेरीज धर्माधिकारी, भारद्वाज पायगुंडे, चौधरी, पुणतांबेकर, ही शास्त्री मंडळी काशीस प्रसिद्धीस आली. हे सर्व विद्वान् पंडित व त्यांनीं लिहिलेले ग्रंथ महाराष्ट्रीयांस निरंतर अभिमानाचा विषय होऊन रहातील. आतां ज्या मंडळींनीं यानंतरचे काळांत कीर्ति संपादिली त्यांत राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर, महावाक्यार्थखंडन व ब्रह्मानंदीखंडन लिहिणारे त्यांचे चिरंजीव नारायणाचार्य, अभ्यंकरशास्त्री, माटेशास्त्री, अष्टपुत्रे, नैयायिक मेरुशास्त्री गोडबोले, सदाशिवशास्त्री थत्ते यांची घराणीं त्याचप्रमाणें पुणेंशहरांतील व्याकरणशास्त्रांत प्रवीण म्हणून प्रसिद्धीस आलेले नीलकंठशास्त्री भट यांचें घराणें, हीं सर्व घराणीं म्हणजे निरनिराळ्या पाठशालाच होत्या. याखेरीज निरनिराळ्या प्रांतांत धर्मसिंधुकार बाबाशास्त्री पाध्ये, घुले शास्त्री, रामशास्त्री प्रभुणे, भट्ट यज्ञेश्वरशास्त्री, राजारामशास्त्री बोडस, वासुदेवशास्त्री अभ्यंकर, गणेशशास्त्री लेले व गोविंदशास्त्री निरंतर, बापटशास्त्री, किंजवडेकर, राजवाडे, हीं अगदीं अलीकडच्या काळांतील पंडितरत्नें, यांच्या योग्यतेमुळें व ग्रंथलेखनामुळें संस्कृत विद्येची कीर्ति कायम राहिली यांत शंका नाहीं. याशास्त्री-पंडितांची व संस्कृत विद्यालयांची खुलासेवार माहिती केसरीनें सन १९१२ मध्यें जूनपासून डिसेंबरपर्यंत संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन या विषयावर जे दहा अग्रलेख लिहिले त्यांत पहावयास मिळेल.

**उत्तर हिंदुस्थानांतील विद्येची सांप्रतची स्थिति**—या ठिकाणीं शास्त्रीमंडळींनीं जशी परंपरा कायम राखली आहे तसाच प्रयत्न पण जरा विस्तृत प्रमाणावर, पंजाब, संयुक्तप्रांत, बिहार या ठिकाणीं चालू होता व आहे. १९२७ सालीं बाबा राघवदासांनीं दिलेल्या माहितीवरून असें समजतें, कीं गोरखपूर येथें ९० पाठशाळा आहेत. त्यांना सरकारी व लोकलबोर्डाची मिळून २८ हजार ग्रँट मिळते. संयुक्तप्रांतांत ४-५ हजार पाठशाळा आहेत, त्यांना ४० हजारांची मदत मिळते.

काशीचे संस्कृत कॉलेजास ४० हजार रुपये ग्रँट मिळते. याशिवाय टोल या नांवाच्या संघटनाहि अनेक आहेत, तेथें गुरुजींच्या घरोघर विद्यार्थी जमतात व अध्ययन करतात. गुरुजींना सरकारी वेतन मिळतें. बिहार प्रांतांत पाठशाळा व टोल मिळून ३४ शें आहेत. मुजफरपूर येथें संस्कृत कॉलेज असून त्या ठिकाणीं सहा शास्त्रांचें अध्यापन होत असतें. ( २७-९-२७ ). संस्कृत विद्या जिवंत राखण्याचें श्रेय जसें शास्त्रीमंडळींकडे आहे तसेंच जगद्गुरु शंकराचार्यांच्या निरनिराळ्या मठाकडेहि आहे. या मठांतून अद्वैत वेदान्त, व द्वैत वेदान्त यांचे पाठ व शास्त्रांचें पठन हा रोजच्या कार्यक्रमांतील एक भागच असतो.

**इंग्रजी अंमल चालू झाल्यानंतरची स्थिति**--अशा तऱ्हेनें पाणिनीचे कालानंतर आपल्या देशांत संस्कृत विद्येचें अध्ययन व अध्यापन कशा तऱ्हेनें चाललें याचें स्थूल दृष्टीनें विवेचन झालें. परंतु मध्यंतरीं संस्कृत विद्येवर एक गंडांतर आलें होतें, त्याचा उल्लेख करणें या ठिकाणीं अप्रस्तुत होणार नाहीं. हिंदुस्थानांत इंग्रजी अम्मल सुरू झाल्यावर थोड्याच वर्षांत म्हणजे १८३५ सालीं लॉर्ड मेकॉले यानें या विद्येवर शस्त्र उगारलें. केसरी लिहितो ‘ त्यानें संस्कृत विद्येवर जें जहर ओतलें त्यानें त्या विद्येचा प्राण कंठाशीं ‘ आणला. तो म्हणतो ‘ संस्कृत ही मृत भाषा आहे, त्यांत व्यवहा-‘ रोपयोगी व शास्त्रीय ज्ञान मुळींच नाहीं. त्यांत बाष्कळ इतिहास, बाष्कळ पदार्थ-‘ विज्ञान, व बाष्कळ ईश्वरज्ञान यांशिवाय दुसरें कांहीं नाहीं. त्यांतील भूगोल ‘ म्हणजे पंचामृताचे व दुधाचे अफाट समुद्र, व इतिहास म्हणजे तीस तीस हजार ‘ वर्षें राज्य करणाऱ्या राजांचीं वर्णनें. अशा या त्याच्या टीकेचा त्याचे मना-‘ प्रमाणें उपयोग झाला व त्याचे प्रयत्नास यश येऊन संस्कृत विद्येचें अध्ययन ‘ बंद करण्याचा ठराव पास झाला. अशा तऱ्हेनें लेखणीच्या एका फटकाऱ्यानें ‘ संस्कृत विद्या पदच्युत होऊन तिचें सिंहासन आंग्लविद्येस मिळालें. या वेळीं ‘ देशाची परिस्थितिहि बिकट झाली होती. जनतेलाहि नोकरी मिळविण्यासाठीं ‘ आंग्लविद्येचें पाय धरावे लागले व संस्कृत विद्या सर्वसाधारण दृष्टीनें नामशेष ‘ झाली. ही स्थिति अर्थातच फार वेळ टिकली नाहीं. कारण लवकरच म्हणजे ‘ १९१२ सालीं, पुढारी मंडळींच्या प्रयत्नांनीं सरकारास सिमला येथें कॉन्फरन्स ‘ भरविणें प्राप्त झालें व संस्कृत विद्येस सर्व तऱ्हेनें उत्तेजन देण्यासाठीं एक संस्था ‘ स्थापन करावी असें ठरविण्यांत आलें. सरकारचा विरोध कमी होऊन संस्कृत ‘ विद्येवर कृपादृष्टि होण्याला दुसरेंहि एक महत्त्वाचें कारण झालें.

‘ अतिराष्ट्रीय अशा ज्या कांहीं थोड्या सात्त्विक गोष्टी असतात, त्यांत ज्ञान ‘ व विद्या हींच श्रेष्ठ होत. राजकारणामुळें राष्ट्राराष्ट्रांचें वैमनस्य होऊं शकतें, ‘ पण समान–विद्याव्यासंग व सरस्वतीदेवीची भक्ति यांच्या योगानें राष्ट्राराष्ट्रां-‘ तील कृत्रिम मर्यादा नाहींशा होतात, व एकमेकांबद्दल प्रेम व आदर यांची

'वाढ होऊं शकते. याच दृष्टीनें इंग्रज व जर्मन पंडितांना भारतीय लोकांबद्दल
'जो आदर वाटूं लागला त्याचा इतिहास रम्य व मनोरंजक आहे.

'सातव्या शतकांतील संस्कृत वाङ्मयाची ध्वजा पहिल्यानेंच यूरोपच्या
'किनाऱ्यावर रोविली गेली. भर्तृहरीचे शतकास या परद्वीपांत अग्रपूजेचा मान
'मिळाला. १६५१ सालीं त्याचें डच भाषांतर प्रथमतः प्रसिद्ध झालें. १८७४
'सालीं सर वुइल्यम् जोन्स यानें शाकुन्तलाचें इंग्रजी भाषांतर केलें व १७९१
'मध्यें त्याचें जर्मन भाषांतर प्रसिद्ध झालें. याच ग्रंथानें संस्कृत काव्याची गोडी
'जर्मन लोकांना वाटूं लागली व अठराव्या शतकाच्या अखेरीस युरोपीय
'पंडितांनीं तुलनात्मक भाषाशास्त्राचे अभ्यासास सुरवात केली. १८०८ मध्यें
'भारत, रामायण, मनुस्मृति या ग्रंथांची जर्मनपंडितांना ओळख झाली. त्या-
'नंतर रूपर्ट या जर्मन पंडितानें संस्कृतवाङ्मय जर्मन भाषेंत ओतण्याचा जन्मभर
'सतत प्रयत्न केला. त्यानेंच उपनिषदांचीं जर्मन भाषांतरें केलीं. या वेळेपासूनच
'आर्यसंस्कृतीचें श्रेष्ठत्व त्यांना पटूं लागलें व संस्कृतविद्येचे पुनरुज्जीवनाचा
'त्यांच्याकडून बहुमोल प्रयत्न झाला.' अशा तऱ्हेनें संस्कृत विद्येचा जर्मनींत
कसा फैलाव झाला याची माहिती ३-१२-१२ चे केसरीचे अंकांत दिली आहे.

या प्रयत्नाची दिशा व पद्धति भिन्न व नव्या तऱ्हेची आहे. त्यांत तुलनात्मक
दृष्टि, चिकित्साबुद्धि व संशोधकपणा हे गुण विशेष आहेत. या पद्धतीमुळें त्यांचा
संस्कृत विद्येचे अंतरंगांत सुलभतेनें प्रवेश झाला व हिंदी संस्कृतीच्या प्राचीन
विधात्यांनीं जीं ज्ञानरत्नें निर्माण केलीं होतीं तीं हुडकून काढून जगापुढें मांड-
ण्याचा त्यांनीं मान मिळविला. हा प्रकार पाहून नव्या पिढींतील हिंदी लोकांचे
डोळे उघडलेच, पण ज्यास्त महत्त्वाची गोष्ट म्हणजे इंग्रज सरकारलाहि आर्यसंस्कृती-
चें व संस्कृत विद्येचें श्रेष्ठत्व कबूल करावें लागलें. त्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे
१९१२ सालीं न्यायमूर्ती सर नारायण चंदावरकर यांनीं एल्फिन्स्टन हायस्कूल-
मध्यें केलेलें भाषण व १९१७ चे फेब्रुवारींत लंडन शहरीं संस्कृतविद्यापीठाचा
उद्घाटन समारंभ खुद्द बादशहांचे हस्तें झाला त्यावेळीं त्यांनीं केलेलें भाषण,
यांत पहावयास सापडेल. बादशहांनीं सांगितलें कीं हिंदी लोकांचें अंतरंग व
आर्यसंस्कृतीचें मर्म कळण्यास संस्कृत वाङ्मयाचें अध्ययन आपल्या देशांत होणें
अत्यंत जरूर आहे. (केसरी स्फूट-सूचना ता. २७-२-१७). न्या. मू. चंदावर-
करांनीं तर मुक्तकंठानें संस्कृत भाषेची स्तुतिच केली. ते म्हणाले 'संस्कृत
'भाषेसारखी व्यवस्थित, बुद्धीला कुशाग्रत्व देणारी, शब्दसौष्ठवयुक्त व ज्ञान-
'भांडारसंपन्न अशी दुसरी भाषाच नाहीं. तिची आवड नसणारा हिंदूच नव्हे.'

आधुनिक काळांत जर्मन पंडितांनीं संस्कृत विद्येची जी सेवा केली त्याचें
वर्णन करावें तेवढें थोडेंच होईल. जर्मनीमधील अतिशय विद्वान् अशा ३२
पंडितांनीं संस्कृतमधील निरनिराळ्या विषयांचें अध्ययन करून त्यावर ग्रंथ लिहिले

आहेत व निरनिराळ्या युनिव्हर्सिट्यांमधून ते अध्यापन करीत आहेत. (के.२१-१-३०). तिकडील बहुतेक विद्यार्थी वैकल्पिक विषय म्हणून संस्कृत भाषेचाच अभ्यास करतात; या दृष्टीनें पाहतां इतर कोणत्याहि देशापेक्षां जर्मनींत हिंदी संस्कृति व प्राचीन वाङ्मय यांचा अभ्यास जास्त आस्थेनें चालू आहे, ही गोष्ट विसरतां कामा नये, इतकेंच काय पण जर्मन पंडित हे संस्कृत विद्येच्या अध्ययनाचे बाबतींत हिंदूच आहेत असें म्हटल्यास चूक होणार नाहीं.

**संस्कृत अध्ययनाच्या दोन पद्धति**—या युरोपियन पंडितांनीं अध्ययनाला मार्मिक व शोधक बुद्धीची जोड देऊन व एक विशिष्ट पद्धति उत्पन्न करून संस्कृत विद्येच्या अज्ञात रसांचे झरे वाङ्मयक्षेत्रांत वहाण्यास लावविले असतील व आमच्याकडील आधुनिक पंडितांस चकितहि करून सोडलें असेल. परंतु त्यामुळें इकडील जुन्या पद्धतीचें महत्त्व यत्किंचितहि कमी होऊं शकत नाहीं. प्रत्येक जुन्या संस्कृतीचे बुडाशीं असा एक पाया असतो कीं तो केवळ तर्कपद्धतीनें दिसूं शकत नाहीं. त्या संस्कृतीचें परंपराप्राप्त रहस्य समजण्यास त्या संस्कृतीशीं निगडित अशी जी विशिष्ट पद्धति असते तिचें अवलंबन केल्याखेरीज चालत नाहीं. जर्मन पंडित बुल्हर नेहमीं म्हणे कीं, पाश्चात्य अभ्यासकला संस्कृतशास्त्रांच्या तत्त्वज्ञानात्मक विवरणाचे बाबतींत हिंदी पंडितांची मदत घेतल्याशिवाय पुढें पाऊल टाकणें शक्य नाहीं. प्राचीन सूत्रमय ग्रंथांचा अर्थ समजण्यास त्यांचीच जरूरी आहे. नॉर्वे येथील स्टेनकोनाव नामक पंडिताचेंहि तसेंच मत आहे. तो म्हणतो कीं, 'हा भारतीय पंडितांचा वर्ग नाहींसा होऊं देणें म्हणजे 'प्राचीन शास्त्रांचे अध्ययनांतला प्राणच काढून घेण्यासारखें आहे. आमच्या 'पाश्चात्य पद्धतीशीं भारतीयांच्या जुन्या पद्धतीचें साहचर्य करून देण्यानें प्राचीन 'संस्कृतींतील ज्ञानरत्नांचा स्वयंसिद्ध प्रकाश पहाण्याचे मार्ग नाहींसे होतील.' (के. २३-८-२७).

अशा रीतीनें जुन्या पद्धतीचें महत्त्व डोळ्यापुढें असतांना व नव्या पद्धतीचे गुण मनाला पटत असतांना या दोन्ही पद्धतींचें एकीकरण करणें, निदान साहचर्य घडवून आणणें फायद्याचें होईल असें हिंदुस्थानांतील आधुनिक पंडितांना वाटूं लागलें. कारण एकींत स्मरणशक्तीची करामत व मेहनत तर दुसरींत बुद्धीचा व्यापकपणा व विस्तार; एकींत शब्दप्रामाण्यावर भिस्त तर दुसरींत आत्मप्रत्यय व विचारस्वातंत्र्य यावर जोर; एकींत गहनावगाहनशीलता तर दुसरींत बुद्धीचा चौकसपणा, अशा या दोन्ही पद्धतींतील गुणांचा मिलाफ करता आला तर त्या पद्धतीनें तयार होणारा आधुनिक विद्वान् मोठ्याच योग्यतेचा होणार हें निःसंशय. जुन्या पद्धतींत एकाग्रता हा गुण अवश्य असल्यामुळें विद्यार्थी तेवढ्यापुरते का होईना पण निष्णात होत; त्याचप्रमाणें स्मृतिसामर्थ्य वाढल्यामुळें व ग्रंथ मुखोद्गत झाल्यामुळें वाटेल त्या जागीं व वाटेल त्या क्षणीं प्रति-

प्रश्नीयास उत्तर देण्याची तयारी असे. परंतु हें सर्व त्या विद्यार्थ्यानें अध्ययन केलेल्या शास्त्रापुरतेंच असे. इतर विषयांची माहिती शून्य. हा एकांगीपणा अर्थात-च अपूर्णत्वाचें लक्षण समजला जाऊं लागला. उलटपक्षीं, बऱ्याचशा विषयां-ची विविध माहिती असणारा आंग्लविद्याविभूषित पदवीधर एकाहि विशिष्ट विषयांत पूर्ण निष्णात नसल्यामुळें 'एक धड ना, भाराभर चिंध्या' वाळगणारी एक व्यक्ति आहे, असें दिसून आलें. म्हणून एकांगित्व व अनेकांगित्व, यांचा मेळ असावा अशी इच्छा अलीकडे उत्पन्न होऊं लागली आहे, व त्याच दिशेनें झालेला एक प्रयत्न म्हणून पुण्यांत १९२७ सालीं संस्कृत विद्यालयाची स्थापना करण्यांत आली, त्याचा उल्लेख येथें करणें जरूर आहे. वाईस असलेल्या प्राज्ञपाठ-शाळेंतहि जुन्या व नव्या पद्धतींची सांगड घालणारा शिक्षणक्रम सुरू करण्यांत आलेला आहे.

**स्थित्यंतरांचे विभाग**—अशा तऱ्हेनें वेदकालापासून तें चालू कालापर्यंत संस्कृत विद्येसंबंधीं थोडक्यांत जें विवरण झालें त्यांत साधारणपणें लेखकाचे दृष्टीनें तीन स्थित्यंतरें दिसून येतात. त्यांपैकीं वेदकालापासून तें पाणिनीचे कालापर्यंत म्हणजे इ. स. पूर्वीं ८०० वर्षांपर्यंत संस्कृत विद्येचें मुख्य मंदिर तयार झालें. वेद हे अनादि आहेत ही भूमिका सोडून संशोधनपद्धतीनें ठरविण्यांत आलेला काल तात्पुरता ग्राह्य धरला तर इ. स. पूर्वीं ५००० तें ४५०० वर्षांचे दरम्यान वेदसंहिता, ३००० ते २५०० चे दरम्यान शतपथब्राह्मण ग्रंथ व १२०० पर्यंत उपनिषदें व भगवद्गीता अशीं हीं संस्कृतवाङ्मयांतील बहुमोल रत्नें निर्माण झालीं. ( के. २३-९-३० ). भगवद्गीतेला संस्कृत विद्येच्या मुख्य मंदिरावरील सोन्याचा कळस म्हटल्यास खात्रीनें चालू शकेल. यानंतरच्या काळांत भाष्यें, वार्तिकें, निरनिराळ्या स्मृत्या व अठरा पुराणें तयार झालीं. हा काल म्हणजे इ. स. पूर्वीं ८०० पासून इ. स. नंतर ८०० पर्यंतचा होय. याच कालांत संस्कृत काव्यें व नाटकें वरींच लिहिलीं गेलीं. अशा रीतीनें मुख्य मंदिरापुढील सभामंडप, चौक, कारंजीं, पुष्पवाटिका तयार होऊन जी आज संस्कृत विद्या म्हणून ओळखली जाते तिची पूर्णता झाली. जिला वेदविद्या म्हणतात ती थांतच पाणिनीच्या कालापूर्वींच तयार झाली होती. स्थित्यंतराचा दुसरा भाग म्हणजे इ. स. ८०० पासून १८०० पर्यंत होय. यांत संस्कृत विद्येचें अध्ययन आवडीनें व उत्साहानें चालू राहिलें व नवीन ग्रंथहि लिहिले गेले, पण अप-वादात्मक थोडे ग्रंथ सोडले तर स्वतंत्र विषयावर स्वयंप्रकाश ग्रंथ मुळींच तयार झाले नाहींत. या कालांतील अध्ययन जुन्याच पद्धतीचें होतें हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. परंतु या कालांत एक विपरीत गोष्ट घडून आली ती सांगणें अवश्य आहे. सन १२०० पासून १८०० चे दरम्यान हिंदुस्थानांत ज्या घडामोडी झाल्या, परचक्रें आल्यामुळें जी धामधूम झाली, परस्परांतील वैमनस्यामुळें जी यादवी

माजली व समाजाची घडी अत्यंत विस्कळित झाली, त्याचा परिणाम असा झाला कीं संस्कृत विद्येस उतरती कळा लागली, कित्येक ग्रंथ नाहींसे झाले व सर्वसाधारण जनतेची अध्ययनाकडे दुर्लक्ष करण्याची वृत्ति बळावत चालली. अशा भोवऱ्यांत सांपडलेली विद्या बुडूं न देण्याविषयीं शास्त्री व पंडित मंडळींनीं जी कामगिरी केली त्याची माहिती प्रथमच थोडक्यांत दिलेली आहे. हा काल संस्कृत विद्येच्या दुसऱ्या स्थित्यंतराचा होय.

सन १८०० नंतर या बुडत्या विद्येचा पाय जास्तच खोलांत जाऊं लागला; कारण हिंदवासीयांना परिस्थितीपुढें मान वाकवून आंग्लविद्येचे पाय धरावे लागले आणि संस्कृत विद्या जवळ जवळ नामशेष झाली. ही परिस्थिति लवकरच विद्वान् मंडळींच्या ध्यानांत आली व त्यावर उपाय सुरू करण्यांत आले. संशोधन, तार्किक विवेचन व तुलनात्मक अभ्यास या त्रिगुणात्मक पद्धतीचा अवलंब करून त्यांनीं संस्कृतविद्येचे अध्ययनांत नावीन्य उत्पन्न केलें. राजा राममोहनराय, राजेंद्रमित्र, रमेशचंद्रदत्त, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, तारानाथ तर्कवाचस्पति यांनीं हा नवीन उपक्रम सुरू करून अनेक संस्कृत ग्रंथ टीकेसहित व भाषांतरा-सहित छापविले. बंगाली पंडितांनीं या बाबतींत आघाडी मारली तरी मार्मिक व शोधक विद्वत्तेचे बाबतींत महाराष्ट्रच श्रेष्ठ ठरला. या गोष्टीचा पुरावा निर्णय-सागर, व्यंकटेश व आनंदाश्रम या संस्थांचे मार्फत प्रसिद्ध झालेल्या संस्कृत ग्रंथांत पहावयास सांपडेल. पुण्यांतील भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूटचें कार्य देखील वाखाणण्यासारखें आहे. तसेंच याशिवाय म्हैसूर, त्रावणकोर, बडोदें, काश्मीर या संस्थानांनीं संशोधन करून बरेच संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध करून उपयुक्त कार्य केलें आहे. या दृष्टीनें सन १८०० नंतरचा काल हा संस्कृतविद्येच्या तिसऱ्या स्थित्यंतराचा काल समजण्यास हरकत नाहीं. काल व परिस्थिति यांच्या अवाढव्य ढिगाऱ्याखालीं दडपून गेलेली विद्या संशोधन करून उंजेडांत आणण्या-चा प्रयत्न चालू आहे. त्यांत यश आल्यास ही प्राचीन विद्या पुनः आंग्लविद्येचे जोडीनें आपला प्रभाव दाखवूं लागेल अशी आशा आहे.

---

# स्त्रीशिक्षण

[ सौ. गिरिजाबाई केळकर ]

कोणाच्याहि मताबद्दल चर्चा करण्यापूर्वी त्याच्या भोंवतालच्या परिस्थितीचा विचार करावा लागतो. तीच स्थिति केसरीबद्दलहि आहे. केसरीची कामगिरी एकाच बाजूची होती, नव्हे एकच बाजू तो पहात असेल, तो राजकारण तेवढें ओळखतो. समाजसुधारणेस त्याचा विरोध होता, असें पुष्कळांचें म्हणणें आहे, व त्याच्या पुष्ट्यर्थ म्हणून स्त्रीशिक्षणाकडे केसरीनें कधींहि लक्ष दिलें नाहीं असें प्रतिपादण्यांत येतें. पण आपण जर स्त्रीशिक्षणावरील केसरींतील लेख पाहिले, तो काळ लक्षांत आणला, तर तो स्त्रीशिक्षणाचा कैवारी होता असेंच आपल्याला म्हणावें लागेल. पण मोठ्या व्यक्तीचें व संस्थांचें नेहमीं असें असतें कीं घरांत काय अगर जगाच्या व्यवहारांत काय मोठी जोखमीचीं कामें आपण उचलायचीं व कमी महत्त्वाचीं कामें इतरांकरितां ठेवायचीं. म्हणून त्या काळाला जें अवघड, जोखमीचें पण अगत्याचें असें राजकारण तें केसरीनें आपल्या शिरावर घेतलें. बऱ्याच वर्षांच्या झोपेनें समाज अंतर्बाह्य सुस्त, आळशी व आंधळ्यासारखा झाला होता. अर्थात् त्याचा परिणाम भित्रेपणा हाहि त्याच्या अंगीं आला होता. तो घालवून त्याला आत्मस्वरूपाची खरी ओळख करून देण्याचें महत्कार्य केसरीनें हातीं घेतलें होतें. त्यामुळें इतर बाबींकडे मुद्दाम होऊन वेळ व जागा केसरीस देतां येणें शक्य नव्हतें. पण जेव्हां जेव्हां प्रसंग येई त्या त्या वेळीं केसरींत जे विचार प्रकट झाले आहेत ते पाहिले तर तो स्त्रीशिक्षणाचा विरोधी खास नव्हता हें कळून येईल. केसरींतील लेख वाचले म्हणजे आपली खात्री पटते कीं तो स्त्रीशिक्षणाचा पुरस्कर्ता होता व आहे. पण ज्या वेळीं लोकांना साहेब, शिपाई व तुरुंग ह्या शब्दांची भीति वाटत होती व स्वराज्य शब्द उच्चारणेसुद्धां राजद्रोह ठरत होता, त्यावेळीं केसरीनें आपलें लक्ष बायका सुशिक्षित आहेत का अशिक्षित आहेत, त्यांनीं चोळ्या घालाव्या का पोलकीं घालावीं ह्या विषयाकडे लक्ष दिलें नाहीं म्हणून केसरीस नांवें ठेवणारांची कींव करावी तितकी थोडीच आहे. केसरीचें म्हणणें असें कीं आज आधीं आपल्याला आपलें वतन मिळवायला पाहिजे, मग स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह हे प्रश्न सोडवितां येतील व रिकाम्या माणसांनीं हे उद्योग केले तर त्याला ते विरोधहि करीत नसत.

केसरींतील स्त्रीशिक्षणावरील लेख वाचून आपल्याला असें कळून येईल कीं तो स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध नसून स्त्रीशिक्षण देण्याच्या पद्धतीविरुद्ध होता. केसरीनें

म्हटलें आहे कीं, कांहीं वर्षांनीं तुम्ही पुढें जाल, तुमच्या रहाणींत बदल होईल; हें जरी काळाच्या ओघाबरोबर असलें तरी आज समाजाला सोडून जाऊं नका, या म्हणण्यांत तथ्य आहें हें कोणीहि कबूल करील. आजसुद्धां आहे हें शिक्षण समाजहिताच्या दृष्टीनें सदोष आहे असें पुष्कळांना वाटतें. मग पन्नास वर्षांपूर्वींचा आपला समाज पाहिला म्हणजे त्या वेळेस ज्या शाळा निघाल्या त्यांतील मुलांच्या धर्तीचें मुलींचें शिक्षण पाहून केसरीनें जी टीका केली ती अयोग्य कोण म्हणेल ? मुलांच्या नित्य नव्या शाळा निघतात तितक्या भरतात, एवढ्याकरतांच सध्यांचें महागडें, आईबापांच्या खिशाला चाट लावण्याच्या युक्त्या शिकविणारें पण मुलांचा मेंदू कोरडाच ठेवणारें शिक्षण चांगलें आहे असें कोण म्हणेल ? तसेंच मुली शिकताहेत, शाळांची संख्या वाढत आहे, इतर संस्था उदयास येत आहेत व पुष्कळशा मुली पदवीभूषित होत आहेत म्हणूनच तें शिक्षण चांगलें कसें म्हणावयाचें ! केसरीची हीच विचारसरणी होती. आमची समाजरचना जसजशी बदलेल तसतशी शिक्षणपद्धति बदला. स्त्री सुशिक्षित पाहिजे हें कबूल. पण तिला ज्या कुटुंबांत वावरावयाचें त्यांत सुखासमाधानानें रहातां येईल असें शिक्षण द्या. त्यावेळेस ११-१२ वर्षांच्या पुढें लग्नाची वयोमर्यादा जात नव्हती. आतां ती १५-१६ वर आली आहे. विभक्त कुटुंबें आपल्याआपणच होऊं लागलीं आहेत. अशा वेळीं शिक्षण आपोआपच पुढें जातें. पण सर्व विचारी माणसांना अद्यापहि वाटतें कीं पोटाकरितां बाहेरच्या जगांत वावरून धकाधकीच्या मामल्यांत बायकांनीं शिरावें हें हिंदुसंस्कृतीचें ध्येय नव्हे. बायकांचें शिक्षण संसारांत नवऱ्याला योग्य सहकारी होण्याकरितां असतें व तें काम पार पाडण्याला योग्य असेंच शिक्षण संपादण्याचा त्यांनीं प्रयत्न करावा. आतां जेव्हां विशिष्ट काळ व विशिष्ट परिस्थिति येते, तेव्हां सर्वच माणसें आपापल्या शक्तीप्रमाणें कांहीं तरी करतात, तशा स्त्रियाहि जरूर पडेल तेव्हां काम करण्यास माघार घेत नाहींत, हें आजच्या मुंबईच्या उदाहरणावरून दिसतेंच आहे. आज मुंबईस ज्या अनेक स्वयंसेविका आहेत त्या सगळ्याच सुशिक्षित नाहींत. पण प्रत्येक व्यक्तीला बुद्धि ही असतेच व ती विशिष्ट काळापुरती मुक्तस्थानें काम करते. त्याकरितां निवळ गोऱ्यावर काळीं अक्षरें काढण्यास शिकविणाऱ्या शिक्षणाची फारशी जरूरी नसते. पूर्वकाळीं जेव्हां जेव्हां लढाया झाल्या तेव्हां तेव्हां निरक्षर सैन्यानेंच जीव दिले आहेत. अहिल्याबाई, लक्ष्मीबाई किंवा किल्लेदारीण यांनीं ज्या निरनिराळ्या प्रसंगीं नांव गाजविलें ती परिस्थिति येईल म्हणून त्यांना कुठें शिक्षण दिलें होतें ? त्या वेळच्या पुष्कळ राजस्त्रियांना युद्धोपयोगी शिक्षण व राजकारणाचें ज्ञान असे. एखाद्याला त्याचा उपयोग करण्याची संधि सुदैवानें अगर दुर्दैवानें येते. म्हणून केसरीचें म्हणणें असें कीं, तुम्ही स्त्रियांना जें शिक्षण देतां तें त्या स्त्रिया व विशेषतः हिंदु स्त्रिया आहेत, हें लक्षांत आणून द्या.

नुसत्या मुलींच्या शाळा काढावयाच्या म्हणून काढूं नका. तुम्ही आहां त्या जागेवर थांबूं नका. खुशाल अगदीं पुढें जा, पण इतर देश कसे हळूहळू गेले हें बघा आणि तुम्हीसुद्धां समाजाला घेऊन पुढें जा. सगळा समाज मागें टाकून आपलें घोडें पुढें दामटूं नका. पुष्कळ सुधारक असें म्हणतात कीं ते ध्येय मोठें ठेवितात. पण ज्यानें पायथा गांठला नाहीं त्याला शिखर दाखवून उत्साह वाढविण्याऐवजीं भीतीनें छातींत धक्का बसतो ही गोष्ट ते नेहमीं विसरतात.

ज्यांना जगांत आपण कांहींतरी केलें असें म्हणून घेण्याकरितां कांहीं करावयाचें असेल त्यांची गोष्ट वेगळी. पण ज्यांना कर्तव्य म्हणून कांहीं करावयाचें असतें त्यांना त्या त्या काळांत समाज कितपत पुढें जाईल हें पाहून आपण तेथें उभें राहून समाज आपल्यावरोबर आणावयाचा असतो व तें करतांनासुद्धां आपल्या राष्ट्राच्या अभ्युदयाला आधीं कशाची जरूर आहे हें ठरवावेंच लागतें. मुळांतील अभिमान असल्यानें समाजाला साक्षरतेची झिलाई देण्यापेक्षां महत्त्वाचें कार्य कोणतें ह्याचा विचार करूनच त्यानें राजकारणांत उडी घेतली होती. जसें राजकारणांत आधीं राष्ट्र मग व्यक्ति, तसेंच समाजांत आधीं समाजस्वास्थ्य व मग व्यक्तिगत सौख्य हें केसरीचें तत्त्व होतें. समाजांतलें अर्धें अंग जे पुरुष ते जर आपला आळस टाकून आपलेपणा ओळखूं लागतील तर पूर्वीचे शूर धाडशी दिसणारे पुरुष आज मेषपात्र व बायकी थाटाचे दिसत आहेत तसे न होतां त्यांच्या ठिकाणीं पुनः पाणीदारपणा खेळूं लागेल. अर्थात् पतीची, पुत्राची वीरश्री पाहून बायकाहि साहजिकपणेंच शूर व धीट होतील असें केसरीला वाटे व त्याला भर म्हणून स्त्रियांना जें शिक्षण द्यावयाचें तें त्यांच्या त्या वेळच्या समाजाला रुचण्याजोगें व पचण्याजोगेंच असावें असें केसरीचें म्हणणें होतें. केसरी म्हणतो, ' प्रस्तुतच्या ' स्त्रीशिक्षणक्रमाच्या पुरस्कर्त्याइतकेच किंवहुना जास्तहि स्त्रीशिक्षणाचे आम्ही ' कैवारी आहों व स्त्रीशिक्षणाकडे आमच्या मनाची जात्याच प्रवृत्ति आहे. तथापि ' हल्लींचा शिक्षणक्रम आम्हांस बिलकूल पसंत नसल्यामुळें आमच्यावर प्रति- ' पक्षीयांनीं बरीच उचल करून आम्हांस विनाकारण युद्धास प्रवृत्त केलें. आमचा ' मुद्दा इतकाच होता कीं, ज्याअर्थीं पुरुषांप्रमाणें स्त्रियांसहि संसारांत ईश्वरानें कांहीं ' कर्तव्यें अवश्य लावून दिलीं आहेत, त्याअर्थीं पुरुष व स्त्रिया यांचा कार्यक्रम ' भिन्नभिन्नच असला पाहिजे. पुरुषांचा धंदा करूं इच्छिणाऱ्या स्त्रियांची ' संख्या नेहमींच अत्यंत अल्प असणार. तेव्हां स्त्रीशिक्षणाचा पाया ' घालणाऱ्या लोकांनीं केवळ या अत्यंत अल्प वर्गाच्या सोयीकडेच लक्ष देऊन ' उपयोगी नाहीं. कोणतेंहि राष्ट्र घेतलें तरी स्त्रियांचा आयुष्यक्रम पुरुषांच्या ' आयुष्यक्रमाहून भिन्न आहे, व हा भेद आमच्या देशांत तर विशेषच नजरेस ' येतो. इतउत्तर शिक्षणानें किंवा एकंदर सुधारणेच्या योगानें हा भेद अगदीं कमी ' केव्हां होईल तो होवो; पण हल्लींच्या स्थितीचा विचार करितां सामान्यतः मध्यम-

'प्रतीच्या हिंदु स्त्रियांस जगांत ज्या स्थितींत राहावें लागतें त्या स्थितीस अनुकूल
'असेंच शिक्षण त्यांस दिलें पाहिजे. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे विवाहितावस्था व
'गृहकृत्यें हीं स्त्रियांचीं दोन प्रधान कर्तव्यें असल्यामुळें स्त्रियांच्या व पुरुषांच्या
'शिक्षणाची दिशा लवकर भिन्न भिन्न करावी लागणार. साधारण लेखन व वाचन
'दोघांसहि एकाच यत्तेंत दिल्यास हरकत नाहीं. पण पुरुषांप्रमाणें स्त्रियांस १५।१६
'वर्षेपर्यंत घोकंपट्टी करण्यास लावणें अत्यंत अहितकारक व स्वभावविरुद्ध आहे.'

ह्यावरून केसरी स्त्रीशिक्षणाविरुद्ध होता असें वाटत नाहीं. ज्याप्रमाणें लहान कुटुंबांत आपण पाहातों कीं नवराबायको दोघेहि काम करतात; शेतकऱ्याची बायको पहाटें उठून दळण दळते, भाकरी करते, गुराढोरांचीं व मुलांचीं वगैरे सर्व कष्टाचीं कामें करते, पण तिचा नवरा जे कष्ट करतो त्या मानानें तिचे कष्ट दुय्यम असतात. कितीहि थंडी असो त्या थंडींत बैलजोडी घेऊन शेतांत जायचें, पाणी प्यायलेल्या जमिनींतून बर्फाप्रमाणें थंडगार वारे येतच असतात, वरून दव व भोंवतालचा गारठा, अशा स्थितींत तो जेव्हां मोट हाकतो; उन्हाळ्यांत वरून सूर्याची कृपा, खालून धरणीमातेची फोडणी अशा वेळीं जेव्हां त्याचा नांगर चालतो तेव्हां जर आपण पाहिलें तर त्याचे कष्ट जास्त का बायकोचे कष्ट जास्त ह्याची आपल्याला कल्पना येईल. मग आधीं शेतीचा मनुष्य जास्त का आधीं भाकरीची बायको जास्त ? धान्य असलें तर बायको दळील. तेंच उदाहरण समाजरूपी कुटुंबाला—राष्ट्ररूपी घराला लागू आहे.

जर राष्ट्रांत आपल्या मालकीचें धान्य असेल तर दळणारे मिळतील व ते असल्याबद्दल कोणीहि त्याचें अभिनंदन करील. पण मुख्य 'तत्त्वमसि' पाहिजे. तें मिळविणें अतिशय जरूर तितकेंच कठीण होतें व आहे. हें ओळखूनच केसरीनें आपली शक्ति व बुद्धि त्यांत खर्च केली. केसरीला असें वाटे कीं आधीं राष्ट्रपुरुष जागा होऊं दे, त्याला आपली स्वतःची ओळख पटूं दे, त्याला आपल्या गरजा कोणत्या तें समजूं दे व त्या आपल्या मनगटाच्या जोरावर पुरविण्याची इच्छा त्याला होऊं दे. भिक्षांदेहीची वृत्ति जाऊन राष्ट्र कर्तृत्ववान झालें म्हणजे स्त्रीशिक्षणासारख्या शेंकडों सुधारणा तेव्हांच करतां येतील व हें काम कोणीं केलें नाहीं तरी बदलत्या काळाच्या प्रभावानें व राज्यकर्त्यांचें उदाहरण पाहून कैक लोक तें काम करायला पुढें येतील; असें वाटूनच केसरीनें त्यांत विशेष भाग घेतला नाहीं. पण म्हणून केसरी स्त्रीशिक्षणाविरुद्ध होता किंवा केसरीला राष्ट्रांत मूर्ख, अजागळ, नेभळ्या, अक्षरशत्रु स्त्रिया हव्या होत्या, किंवा अशा स्त्रियांच्या पोटीं, शिवाजी, रानडे, गोखले, कुंटे जन्माला येतील अशी त्यांची कल्पना होती असें मानणें हें धाष्ट्यांचें होईल. मात्र आज जसें कित्येकांना वाटतें कीं मुलांप्रमाणें डिग्री मिळविलेली तीच खरी सुशिक्षित स्त्री तसें केसरीस वाटत नव्हतें. छापखान्यांतील बांधीव पुस्तकापेक्षां निसर्गानें ठेवलेलीं पुस्तकें व वडील माणसांच्या

अनुभवानें दृढ झालेलें शिक्षण ज्यास्त चांगलें असें केसरीस वाटत असावें म्हणून आपली कर्तबगारी स्त्रीशिक्षणाची वाढ करण्यांत खर्ची न घालतां स्त्रियांचें स्त्रीत्व-शील-संभाळायला जी स्वतःची सत्ता राष्ट्रांत लागते ती मिळविण्या-करितां सर्वांना जागृत करण्यांत केसरीनें खर्ची घातली. कारण केसरीला ठाऊक होतें कीं साक्षरतेचें शिक्षण हें दुधांत साखर पडल्याप्रमाणें आहे. पण साखरेशिवायचें दूध निसर्गानें स्त्रियांजवळ उपजत ठेवलें आहे. तें वाढायला राष्ट्रांत जागृति पाहिजे, कर्तबगार, धाडशी, तेजस्वी पुरुष पाहिजेत कीं ज्यांच्या सहवासानें स्त्रियांना पाटीपेन्सिलीशिवाय स्त्रीत्वाला युक्त असे गुण प्राप्त होतील. त्यांत साक्षरतेची साखर घालण्याचें काम आपल्या आपणच जागृत झालेला समाज करील.

---

## सामाजिक सुधारणा आणि कायदा

[ डॉ. गो. वि. देशमुख M. D. (Lond.) F. R. C. S. (End.) ]

केसरीचें धोरण म्हणजे समाजसुधारणेला अनुकूल पण कायद्याला प्रतिकूल असें आहे.

समाजसुधारणेचे राजकीय, धार्मिक आणि सामाजिक असे तीन भाग पडतात. राजकीय सुधारणेच्या बाबतींत केसरीच्या गेल्या ५० वर्षांतील कामगिरीबद्दल बोलायचें म्हटलें म्हणजे इंद्रधनुष्यावर नवीन रंगाचा लेप चढविण्यासारखें आहे. बोलून चालून राजकीय सुधारणा करण्याकरितां म्हणून तर केसरीचा अवतार. जन्मच मुळीं या कार्याकरितां घेतलेला; आणि केसरीकर्त्यांना सध्यांच्या चळवळीचे 'आद्यप्रवर्तक' म्हणून शत्रूंनींहि कबुली दिली आहे; किंबहुना सध्यां ज्या चळवळीचा वणवा सर्व हिंदुस्थानभर पेटलेला दिसतो त्याचें बरेंच श्रेय केसरीकडे आहे, असें अभिमानानें म्हणायला हरकत नाहीं. आज जे हजारों लोक देश-कार्याकरितां स्वाभिमानानें व स्वखुषीनें तुरुंगांत जातात त्याचा पाया कित्येक वर्षांपूर्वींच केसरीच्या कार्यकर्त्यांकडून घातला गेला; आणि त्या पायावरचीच आजची भव्य इमारत दिसत आहे.

पूर्वींच्या वेळीं समाजाचे तिन्ही विभाग एकाच संस्थेमध्यें एकवटलेले होते. ही स्थिति आपल्याच देशांत होती असें नाहीं. तर पृथ्वीवरच्या सगळ्या देशांचे इतिहास पाहिले तर हीच स्थिति दृष्टीस पडते. रोमचा पोप पहिल्यानें नुसता धर्माधिकारी म्हणून सुरवात करतो, व पुढें राजकीय व सामाजिक संस्था

बळकावून बसतो; मुसलमानी धर्मांतल्या खलीफाचीहि तीच हकीकत. एकाद्याच्या ठिकाणीं कोणत्याहि तऱ्हेची सत्ता आली म्हणजे सगळ्याच गोष्टींत सत्ता चालवण्याची इच्छा उत्पन्न होऊन, सगळे विषय तो आपल्या कबजांत घेतो. पण आपल्या देशांत एक सुधारणा निदान तात्त्विक दृष्टीनें तरी अगदीं पूर्वीपासूनच घडून आली.

राजकीय सत्ता राजाकडे सोंपवून धार्मिक व सामाजिक बाबतींत नियम करण्याची व त्याचप्रमाणें वर्तन समाजाकडून करविण्याची जबाबदारी विद्वान लोकांनीं अंगावर घेतली. हें तत्त्व जरी मान्य झालें तरी व्यवहारांत अधिकाराच्या प्रभावामुळें व तज्जन्य शहाणपणामुळें अधिकार असलेल्या एका व्यक्तीमध्यें तिन्ही सत्तांची गुंतागुंत असणें साहजिकच होतें.

**परवशतेचा परिणाम**—देश परतंत्र झाल्यामुळें धर्माचा संबंध येतो अशा राजकीय बाबतींत सगळीच सत्ता राज्य करणारांनीं आपल्या हातीं घेतली, आणि राज्यकर्त्यांनीं जेथें गैरसोय अथवा खिशास चट्टा बसेल अशा बाबतींत हिंदुधर्माची पर्वा बाळगली नाहीं. गोवध किंवा सुरापान यांसारख्या पंचमहापातकाच्या बाबतींत सरकार हिंदुधर्मीयांना विचारीतहि नाहीं. तेव्हां अशा बाबतींत लोक सुधारणा काय करणार ? आणि कितीहि धर्माचीच नव्हे तर नीतीची बाब असली तरी सरकार कायदा काय करूं देणार ?

**सामाजिक बाबतींत स्वयंनिर्णय**—पण जेथें सामाजिक बाब असेल किंवा सामाजिक अधिक धर्माची बाब असेल, त्या बाबतींत केसरीची वृत्ति वर लिहिल्याप्रमाणें गेल्या पन्नास वर्षांत दिसून येणारी आहे. सामाजिक सुधारणा समाजानें आपली आपणच केली पाहिजे. त्यांत परक्याचा हात नको; हें स्वयंनिर्णयाचें तत्त्व केसरीनें पूर्वीपासूनच कायम ठरविलेलें दिसतें. केसरीनें लिहिलें:—

'आपल्या व्यवहाराची व सामाजिक रीतीभातींची सुधारणा करणें असल्यास 'ती आपली आपणांसच केली पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे, व तसें करण्या-'सहि मुख्य साधन म्हटलें म्हणजे स्त्रिया व मध्यम प्रतीचे लोक यांच्यांत या 'गोष्टीची विशेष चळवळ सुरू केली पाहिजे, हें होय. परकीय सरकार केवळ 'दहापांच लोकांच्या म्हणण्यावरूनच हिंदु लोकांच्या रीतीभातींत कोणताहि 'महत्त्वाचा फरक कायद्यानें करण्यास धजणार नाहीं हें अगदीं उघड आहे.'

( २८-११-९० ).

कायद्यानें सुधारणा घडवून आणण्यापेक्षां दुसरा इष्ट मार्ग केसरीनें सुचविला तो असाः—' कायद्याची मदत घेऊन साऱ्या समाजावर एकदम सुधारणा लादण्या-'पासून फायदा न होता गैरफायदाच होण्याचा संभव आहे. तेव्हां ज्यांना

'सुधारणेची खरी कळकळ आहे त्यांनीं......सुधारणा अमलांत आणण्याबद्दल 'आपल्या स्वतःसच बांधून घ्यावें '......( २८-१०-९० ).

'आधीं केलें मग सांगितलें ' या दण्डकानुसार आचरण करणें आवश्यक आहे हें सांगण्यासाठीं केसरीनें म्हटलें कीं, 'कोणतीहि सुधारणा करणें तीं तत्त्व-प्रवर्तकांनीं आधीं केली पाहिजे. ' ( ४-११-९० ).

याचीं कारणें उघडच दिसतात. राज्य परक्याचें. स्वराज्य असतें तर केसरीची ही वृत्ति इतकी जाज्वल्य असती काय? हा एक मोठा मनोरंजक प्रश्नच मनापुढें उभा राहतो. राज्यांत दंड करणारी संस्था असणें हें अपरिहार्य आहे. आणि दंड जो व्हायचा तो कोणत्या तरी कायद्याप्रमाणें अथवा नियमाप्रमाणेंच झाला पाहिजे हेंहि निश्चितच आहे. तरी ह्या प्रश्नाचा निकाल सध्यांचें वेळीं तरी अप्रस्तुत आहे.

**केसरीची जन्मकुंडली**—पण केसरीची ही वृत्ति कळायला केसरीची जन्मकुंडली किंवा त्याच्या जन्मकालची परिस्थिति पाहिली पाहिजे. त्यावेळीं शिकलेल्या बहुतेक लोकांवर जेवढें म्हणून परकी किंवा इंग्रजी असेल तेवढें चांगलें, व हिंदु असेल तेवढें वाईट या कल्पनेची सावली पडलेली दिसते. हिंदुधर्म तिरस्करणीय, हिंदुधर्म निंद्य, हिंदु व्यवहार तुच्छ, तात्पर्य जेवढें म्हणून हिंदु असेल तेवढें निंद्य व त्याच मानानें परकीयांचें अथवा राज्यकर्त्यांचें सर्वच स्तुत्य; स्वाभिमानाचा लेशहि त्या वेळच्या शिकलेल्या लोकांत नव्हता.

जुन्या लोकांकडे पाहिलें तर तेहि तितक्याच मानानें हट्टी, दुराग्रही, आम्हांला कांहीं नवें शिकावयाला नको, एक हजार वर्षांपासून पारतंत्र्याची शृंखला पायांत वाजत असतां आम्ही आहोंत तसेंच बरे, आहे त्यांतच आमचा ऐहिक व पारमार्थिक मोक्ष आहे, अशाच मतांना चिकटून बसलेले.

**धार्मिक बेबंदशाही व लाजिरवाणी राजनिष्ठा**—सुधारक लोकांना राज्यकर्त्यांचा धर्म, नीति, व्यवहार यांपैकीं प्रत्येक गुण अनुकरणीय; तर पूर्वाभिमानी लोकांमध्यें सगळीच बेबंदशाही; धर्म शंकराचार्यांच्या ताब्यांत तर धार्मिक खटले स्वतः न सोडविता धर्मगुरु स्वतः दंडधारी बनून खालच्या अधिकाऱ्याकडे सोपविणार. खटला स्वतः नेऊनहि वादी न्याय मानण्याला नाकबूल; आणि धर्मांचा कबजा वरच्या आचार्यांपासून खालच्या आचारीवर्गापर्यंत सगळ्यांच्याच ताब्यांत. शास्त्री, भिक्षुक यांची समजूत पडेल पण आचारी कबूल नाहीं; एकूण सर्वच अराजकता. अशी एकीकडे बेबंद अराजकता व दुसरीकडे लाजिरवाणी राजनिष्ठा, या दोन्ही संकटामधून केसरीला यावेळीं वाट काढून, राष्ट्रीयत्वाला पोषक गुण समाजांत वाढवून, राष्ट्रीयत्वाच्या ध्येयाकडे लोकसमूह ओढीत न्यावयाचें कार्य करावयाचें होतें. निःपक्षपातानें सांगावयाचें म्हणजे केसरीनें हें कृत्य मोठ्या कुशलतेनें केलें असेंच म्हटलें पाहिजे. सुधारकांना स्त्रीशिक्षण हवें, पुराण-

मतवादी विरुद्ध; सौ. आनंदीबाईसारख्या सुशिक्षित राष्ट्रीयत्व ठेवणाऱ्या स्त्रियांचें केसरी अभिनंदन व गौरव करतो. केसरींत राष्ट्रीयत्वाला लागणाऱ्या स्त्रीशिक्षणाविरुद्ध एक अक्षरहि काढलेलें माझ्या वाचण्यांत नाहीं. सुधारकांना बालविवाह नको; पुराणमतवादीयांची धर्म बुडाला म्हणून ओरड. केसरीकार १६ वर्षेपर्यंत मुलीचा विवाह नको म्हणून सही द्यावयाला तयार; इतकेंच नव्हे तर २०० मंडळी तयार करून आपल्याला कायद्यानें बांधून घ्यावयाला राजी. ह्यासबंधानें टिळकांच्या सहीनें प्रसिद्ध झालेलें खालील विनंतिपत्रक ता. २८-१०-९० च्या केसरींत आढळतें.

' माझ्या मतें ज्या सुधारणा अवश्य आहेत त्या खालीं नमूद केल्या आहेतः—

१. मुलीचें लग्न १६ वर्षांचे आंत करूं नये.

२. मुलाचें लग्न २० वर्षांचे आंत करूं नये.

३. पुरुषाचें लग्न ४० वर्षांपुढें होऊं नये.

४. ४० वर्षांपुढें लग्न करणें झाल्यास विधवेशीं विवाह करावा.

५. दारू पिणें बंद असावें.

६. हुंडा घेण्याची चाल अजीबात बंद करावी.

७. प्राप्तीचा १० वा भाग सार्वजनिक कामाकडे द्यावा.

८. विधवेचें वपन करूं नये.

ता. २६-१०-१८९०.     बाळ गंगाधर टिळक. '

ह्यावरून केसरीची सुधारणेसंबंधीं मतें स्पष्ट होतात.

पण दुःखाची गोष्ट ही कीं बालविवाह नको म्हणणाऱ्यांमध्यें २०० सुद्धां मंडळी त्यावेळीं निघूं नयेत! उलट नवीन जात काढल्याचेंच कुभांड केसरीकारावर यावें! सुधारकांना जरठकुमारीविवाह नको; पुराणमताभिमानी लोकांना निपुत्रिक मरणामुळें स्वर्ग बुडण्याची धास्ती; केसरीकार ४० वर्षांनंतर लग्न नको म्हणून सही द्यावयाला तयार. सुधारकांना पुनर्विवाह पाहिजे; पुराणमतवादी सुधारक कोणत्या पापकर्माला नेतील याचा थांग नाहीं म्हणून म्हणणार; केसरीकार ४० वर्षांपुढें लग्न करणें झाल्यास विधवेशीं विवाह करावा म्हणून ठासून सांगतात; किंबहुना पुरुषांना हिंदुधर्मांत स्वर्गांत जाण्याकरितां लग्नाची गरज नाहीं म्हणून शास्त्रांतील आधार दाखवून कळकळीनें उपदेश करतात. ज्या दुराग्रही लोकांना केसरी सुधारणेच्याविरुद्ध आहे असें म्हणण्याची संवय लागली आहे, त्यांनीं केसरींतील पुनर्विवाह हा लेख अवश्य वाचावा. ( केसरी १-८-१५ मार्च १८९२). पुरुषांचें कर्तव्य आणि स्त्रीजातीविषयीं उदात्त कल्पना यांनीं भरलेला असा सुंदर लेख क्वचितच लिहिला गेला असेल. त्यांतील कांहीं उतारे पाहाः—

' पुनर्विवाहाचें नांव काढल्याबरोबर माथें फिरून जाणाऱ्या व अंधपरंपरेनें

' प्राचीन स्मृत्यादि ग्रंथांचे गोडवे गाणाऱ्या धर्माभिमान्यांच्या लक्षांतून शास्त्र-
' निषिद्ध असून अलीकडे बोकाळलेला हा पुरुषपुनर्विवाह कसा अजिबात गळला
' ह्याचें आम्हांस मोठें आश्चर्य वाटतें. अमुक वयापुढें लग्न करूं नये किंवा एक
' बायको असतांना दुसरी बायको करूं नये वगैरे नियम करावे असे क्वचित्
' निर्बंध ऐकूं येतात. ( के. ८-३-९२).

' पण केंस पिकले, चारपांच पोरें झालीं, लेंकीसुना घरांत चांगल्या नांदत्या
' झाल्या अशांनींहि पुनः आठदहा वर्षांच्या सुकुमार मुलीला लेंक किंवा नात
' म्हणून नव्हे, तर सहधर्मचारिणी म्हणून मांडीवर घेणें व तिच्याशीं एखाद्या
' अल्पवयस्क नवरदेवाप्रमाणें सर्व विलास करणें म्हणजे त्या पवित्र विवाह-
' विधीची, त्या सहधर्मचारिणीची, आपल्या पौरुषाची व वृद्धपणाच्या अकलेची
' निव्वळ थट्टा करणें नव्हे काय ? ( कित्ता ).

' गाय, म्हैस, घोडा, कुत्रा, वगैरेंपैकीं एखादें गेलें किंवा निकामी झालें
' म्हणजे जसें दुसरें घ्यावयाचें त्याचप्रमाणें एक बायको मेली कीं दुसरी करा-
' वयाची अशीच बहुतेकांची कल्पना. लग्नामध्यें 'धर्मे चार्थे च कामे च' असें
' शपथपुरस्सर जिचें पाणिग्रहण केलें, आपल्या संसाराचा जिनें अर्धा बोजा
' शिरावर घेतला, पतीच्या सुखदुःखांत वांटेकरी होणें जी आपलें कर्तव्य समजत
' होती व जिच्या समागमांत आनंदानें अनेक वर्षें गेलीं ती काळाच्या फेऱ्यांत
' सांपडून किंवा अनेक वेळां नवऱ्याच्याच जाचामुळें अकालीं परलोकवासी झाली
' तर दहा दिवसांच्या आंतच तिला सवत शोधूं लागणें व महिना दोन महिने
' झाले नाहींत तोंच किंबहुना तेराव्याच दिवशीं पुनः संसारीं बनणें ह्यासारखें
' आपली कृतघ्नता, निर्दयपणा व नीचत्व प्रगट करणारें दुसरें कोणतेंहि कृत्य
' नसेल. ( कित्ता ).

' विवाहबंधनें सैल करून आधींच बेताल झालेल्या विषयवासनेला उत्तेजन
' देण्यानें एखाद दुसऱ्या व्यक्तीचें दुःख निवारण झालें तरी ती खरी सुधारणा
' नव्हे हें आमच्या संसारपरायण सुधारकांच्या लक्षांत आलें नाहीं तें ठीकच
' आहे. तसेंच स्त्रीपुनर्विवाह शास्त्रनिषिद्ध एवढ्यावरून त्याजविरुद्ध ओरड
' करणाऱ्यांनीं आपण तितकेच किंवा त्याहूनहि वाईट शास्त्रनिषिद्ध प्रकार
' हरघडीं आचरीत आहों हें मनांत आणूं नये हेंहि त्यांच्या अप्पलपोटे-
' पणाला अनुरूपच आहे. विधवांना शास्त्रकारांनीं संन्यासव्रत सांगितलें म्हणून
' त्यांची थोरवी गाऊन, त्याच शास्त्रकारांनीं विधुराविषयीं तितकेच कडक निर्बंध
' केले आहेत ते विसरून जाणें, व आपल्या सुनालेकींना पातिव्रत्यधर्माचा लांब-
' लचक उपदेश करून स्वतः एकामागून किंबहुना एक जिवंत असतांनाहि
' दुसऱ्या हव्या तितक्या बायका करणें, व इतकेंहि करून धर्मरक्षणाचा आपल्या

‘ कडेच मक्ता घेऊं पाहाणें याला अप्पलपोटेपणा म्हणूं नये तर काय म्हणावें हें
‘ आम्हांस समजत नाहीं. ’ ( ८-३-९२ ).

पण सुधारकांच्या विरुद्ध पण सुधारणेला अनुकूल असा मार्ग काढण्यांतच निवळ केसरी गुंतलेला दिसत नाहीं.

चहा पाण्यांत ओतल्यामुळें स्वातंत्र्यप्रिय अमेरिकन लोकांवर इंग्रजांनीं लढाई केली; तर चहा पोटांत ओतल्यामुळें स्वातंत्र्यप्रिय केसरीकर्त्यांवरहि ग्रामण्याचा प्रसंग आला. दूध, साखर व चहाला शुद्ध अग्नीची जोड मिळाली तर तो कसा बाटतो किंवा चहाला जर दोष तर तो कांदे, बटाटे यांना कां नाहीं म्हणून पुराण-मतवाद्यांचा पण खरपूस समाचार केसरीनें घेतला. केसरीची ही युद्धकुशलता पाहून कोणत्या राष्ट्राभिमानी व्यक्तीला आनंद झाल्याशिवाय राहील ?

यावरून दिसून येईल कीं या आणीबाणीच्या वेळीं केसरीवर दोन्ही बाजूनें मारा चालला असतांना, मध्यें केसरीनें खंबीर राहून, दोन्हीकडे दुधारी पट्टा चालवून आपलीच स्वतंत्र वाट कापून काढली. आजमितीस या बऱ्याच गोष्टी शिळ्या झाल्या आहेत. आणि त्या वेळच्या कांहीं कथा वाचल्या म्हणजे प्रहसन वाचल्याप्रमाणें होईल. पण महायुद्धाच्या वेळीं ज्याप्रमाणें एका यःकश्चित् ड्यूकचा खून झाला व सर्व जगभर युद्ध सुरू झालें, त्याप्रमाणें भावना उद्दीपन करायला काय कारण होईल याचा अदमास करतां येत नाहीं. आणि कांहीं एक वर्षें लोटल्यावर त्याच गोष्टी क्षुल्लक वाटूं लागतात.

**खरा खटका**—सामाजिक सुधारणेला कायद्याची मदत घ्यायची कीं काय यासंबंधीं लहानशी चुणूक ‘ रखमाबाईनीं आपल्या नवऱ्याबरोबर नांदायचें कीं नाहीं ?’ यावेळीं जरी झालेली असली, तरी खरा खटका संमतिवयाच्या बिलाच्या वेळीं उडाला.

‘ ह्या असल्या मनोनिग्रहाची विद्या शिकविण्याचें कार्यहि कायद्याकडेच
‘ जाणार आहे काय ? आणि मुलास आपल्या सतराव्या वर्षी व मुलीस तिच्या
‘ तेराव्या वर्षी आपआपले मनोविकार दमन करण्याचें सामर्थ्य कायद्यानें येणार
‘ आहे काय ? जोंपर्यंत आमचा शिमगा भरज्वानींत आहे, जोंपर्यंत तमाशे,
‘ छकडी, गलिच्छ प्रहसनें, रेनॉल्डच्या कादंबऱ्या इत्यादि मदनज्वराचीं उपकरणें
‘ आपआपल्या शक्तिसामर्थ्यांत आहेत, चार पुरुष एके जागीं बसले असतां अश्लील
‘ शब्द नाहींतसे होत नाहींत, बारा वर्षांच्या आचरट पोरापासून तों साठ वर्षांच्या
‘ वातरट जरठापर्यंत जोंवर प्रत्येक पुरुषव्यक्तीची ताबुताच्या दिवशीं डोल्याकडे न
‘ पाहतां खिडक्यांतील डोळ्याकडे पाहाण्याची संवय गेली नाहीं, तोंपर्यंत
‘ कायदे नाहीं कायद्याचे प्रपितामह आले तरी शक्तिहिंसक मदनबाणाचा प्रभाव
‘ एक अणुरेणूइतकासुद्धां कमी होणार नाहीं. सुधारणाचमूंतील प्रत्येक सेनाग्रणीनें

' हें लक्षांत ठेवावें कीं कायदे करितात ते अल्पलोकांच्या लहरींचें समाधान ' करण्याकरितां नव्हे ' ( २-८-९० ).

या वेळीं दोन्हीहि बाजू हट्टाला पेटलेल्या दिसतात. मुख्य कायद्यांतच जर पाहिलें तर प्रश्न अगदींच क्षुल्लक. मुलीच्या वयाच्या प्रमाणें विचार केला तर १० आणि १२ काय दोन्हीहि वयांत मुलीची अपक्व दशा. बरें, जुन्या मताप्रमाणें पाहिलें तर चरक-सुश्रुतासारख्या भिषग्वरांनीं १६ वर्षांच्या पुढेंच गर्भधारणा झालेली बरी म्हणून निक्षून सांगितलेलें. धर्माधिकारी यांनींहि चतुर्थीकर्म सांगितलें तें १६-२० वर्षांच्या वयांतच. तेव्हां हा एवढा लढा कां उत्पन्न झाला?

या वेळेपासूनच सुधारणेमध्यें परकीयांचा कायदा नको ही तेढ उत्पन्न झाली म्हटलें तरी चालेल. तेव्हां यावेळीं युद्धाची मांडणी कशी होती याचा विचार करणें जरूर आहे. दोन पक्षांपैकीं सुधारक पक्षाची सगळीच मदार परकीय सरकारावर. राज्यकर्त्यांचे खायचे दांत निराळे व दाखवावयाचे निराळे ही साधी राजनीतिहि त्यावेळीं आमच्या सुधारकांच्या लक्षांत आली नाहीं. आणि ज्या सरकारांनीं पुढें २५ वर्षांत वेळोवेळीं लोकनियुक्त सभासदांनीं केलेल्या सामाजिक सुधारणेला अशक्य अटी उत्पन्न करून प्रतिबंध केला, त्याच सरकारला त्या वेळींच एवढी भूतदया कोठून उत्पन्न झाली हा प्रश्नच राहतो. सुरापानासारख्या व्यसनामुळें सर्व राष्ट्राची खराबी होत असतांना ' पानस्वातंत्र्य ' असावें म्हणणारें सरकार हिंदुस्थान देश सुधारावा म्हणून संमतिवयासारखा कायदा पुढें करील असें शक्य दिसत नाहीं. तर विचार केला असतां एकच अनुमान निघतें कीं ही युक्ति राज्यकर्त्यांनीं सुशिक्षित लोकांत दुही पाडण्याकरितां उत्पन्न केली असावी आणि ते सुशिक्षित लोकहि या फसवणुकीला बळी पडले.

सुधारकांचा भरंवसा सरकारवर, तर केसरीकारांचा भरंवसा लोकांवर; सुधारकांचें धोरण परावलंबी तर केसरीला आत्मविश्वास, आत्माभिमान उत्पन्न करून लोकांत राष्ट्रीय गुणांची उत्पत्ति करावयाची. सुधारक परावलंबी तर केसरीकार स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर उभे. केसरीच्या वर लिहिलेल्या धोरणाची म्हणजे सामाजिक सुधारणेला अनुकूल पण कायद्याला प्रतिकूल अशी दिशा यामुळेंच आंखली गेली.

**खळबळीचें फळ**—ही सामाजिक सुधारणेबद्दल लढाई झाली तींत जे दोन्ही बाजूंनीं रथी महारथी पडले, आणि त्यांत आधुनिक सुधारणा व पुराणधर्मकल्पना यांचा जो ऊहापोह झाला त्यापासून पुढच्या पिढीवर महत्त्वाचा परिणाम झाला नाहीं असें कोण म्हणूं शकेल?

आज महाराष्ट्रांत किंवा सर्व हिंदुस्थानांत हिंदुत्व कायम ठेवून, स्वाभिमानी, स्वावलंबी, राष्ट्राविषयीं कळकळ बाळगणारी, आपल्या मताबद्दल कष्ट सोसणारी,

आपल्या राजकीय, धार्मिक, सामाजिक बाबतींत सुधारणा करणारी जी पिढी दिसते आहे ती याच खळवळीचें फळ होय.

**नवी विटी, नवें राज्य**—बाल्यदशेंत जे संस्कार होतात ते फार टिकाऊ असतात हें तत्त्व सर्वमान्यच आहे. आरंभीं जें केसरीचें धोरण होतें तेंच पुढें राहील काय ?

'हा प्रश्न मनोरंजकच आहे. परिस्थिति बदलली; केसरीनें सुचविलेल्या 'मार्गांचा म्हणजे सभा भरवून, व्याख्यानें देऊन, मंडळ्या स्थापून, जनसमूहा- 'पुढें दोन्ही बाजू मांडून लोकमत तयार करण्याचा मार्गहि देशांतील पुढारी 'करूं लागले आहेत. ज्यांस सुधारणा होणें इष्ट वाटत आहे त्यांनीं एखादी 'मंडळी स्थापन करून मिशनरी लोकांप्रमाणें या कामीं लेखन, वाचन व उदा- 'हरण या तिन्ही रीतींनीं यथाशक्ति मदत कां करूं नये, हें आम्हांस समजत 'नाहीं. पुस्तकापेक्षांहि कीर्तन किंवा व्याख्यानापासून जास्ती उपयोग होतो ही 'गोष्ट सर्वांस ठाऊकच आहे......करितां २५-३० वर्षांत कोणत्या गोष्टी घडून 'येणें शक्य आहेत याचा नीट विचार करून त्याप्रमाणें लेखन-वाचन-उदा- 'हरण-द्वारां लोकमत आपल्या बाजूचें करण्यास प्रथमतः उद्योगास लागावें 'अशी सर्व सुधारणेच्छु जनांस आमची प्रार्थना आहे.' (के. १८-११-९०).

स्वतःविषयीं अभिमान, स्वावलंबन, हिंदुत्व वाखाणण्याची ईर्ष्या, आपल्या राष्ट्राची उन्नति करण्याबद्दलची जाज्वल्य भावना हे गुणहि लोकांत प्रदीप्त झाले आहेत.

परिस्थिति बदलली म्हणजे बदलत जाणें हें जिवंत संस्थेचें लक्षण आहे. केसरीचा एक अग्रलेख 'नवी विटी नवें राज्य' असा मॉंटेग्यू सुधारणावर आहे. त्यांत व्यक्त केलेले 'परिस्थित्यनुरूप बदल' हें धोरण सामाजिक बाबतींतहि केसरीनें अवलंबिलें आहे हें अलीकडील इतिहासा-वरून दिसेल.

---

# हिंदुधर्म

[ श्री. विश्वनाथ माधव देशमुख, बी. ए. एल्एल्. बी. ]

' प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता।
' उपास्यानामनियमश्चैतद्धर्मस्य लक्षणम् ॥ ( २५-९-१९०० )

' व्यक्तीचा किंवा राष्ट्राचा संसार चालवितांना स्वतः अलिप्त राहून ' आध्यात्मिकाकडेच ज्यास्त लक्ष द्यावयाचें व त्यासच ज्यास्त श्रेष्ठ मानावयाचें ही ' आपली शुद्ध, सात्त्विक व पवित्र परंपरा आपण सोडतां कामा नये. (२०-७-१२). ' आमचा धर्म जुना असून त्यांत सांगितलेल्या मुख्य गोष्टी दुसऱ्या कोणत्याहि ' धर्मांतील गोष्टींपेक्षां अधिक सयुक्तिक आहेत. ( २५-९-१९०० ). हिंदुधर्माच्या ' पुरातनत्वाकडे लक्ष दिलें तर बौद्ध, ख्रिस्ती किंवा महंमदी धर्म म्हणजे अलि-' कडचीं अर्भकें होत. ( २७-२-८१ ). हे तिन्ही धर्म मूळ हिंदुधर्मांची संतती ' आहेत. ( ७-७-३० ). हिंदुधर्माइतका सहिष्णु धर्म जगांत दुसरा सांपडणार ' नाहीं. ( २४-९-०७ ).

' पाश्चिमात्य विद्येची ज्या वेळेस आमच्याकडे पहिल्यानें सुरुवात झाली त्या ' वेळेस पाश्चिमात्यांचें ज्ञान व पद्धति पाहून कांहीं मंडळी इतकी दिपून गेली ' होती कीं, घटपटादिकांची व्यर्थ खटपट अगर द्वैताद्वैती काथ्याकूट त्यांस नीरस ' वाटून त्यांनीं एकदम पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाकडे धांव घेतली. आमचा खरा ' धर्म कोणता आहे, जीवेश्वराचा काय संबंध आहे, ह्या विषयावर आपणांमध्यें ' कोणते ग्रंथ आहेत, त्यांत कसा काय विचार केला आहे, या विचारांचा व बाह्य ' आचारांचा कितपत संबंध आहे, इत्यादि गोष्टींचा विचार न करतां निरीश्वर ' देवाच्या आधुनिक प्रार्थनेस भुलून या मंडळींनीं नाना पंथ काढले व त्यांचा ' यथाशक्ति प्रसार करण्याचाहि प्रयत्न केला, परंतु ही प्रवृत्ति लवकरच कुंठित ' झाली. ज्ञान, कर्म व भक्ति यांचा आमच्या ग्रंथकारांनीं केलेला ऊहापोह जरी ' या मंडळींना पसंत नव्हता तरी सदर ग्रंथांचें अध्ययन केलेल्या युरोपियन ' लोकांचे लेख आमच्या मंडळीच्या डोळ्यांत अंजन घालण्यास कारणीभूत झाले. ' मॅक्समुल्लरादिकरून संस्कृतज्ञ इंग्रजांचे लेख व थिऑसॉफिकल सोसायटी-' सारख्या संस्था यांनीं हिंदुधर्माच्या उज्ज्वल तत्त्वांस पुनरपि तेजी आणली. ' आपल्या ऋषींचे आत्मानात्मविचार, योग्यांची प्राणायामादि समाधीचीं साधनें हीं ' अगदीं शुष्क व वायफळ आहेत असा जो आमचा समज होता तो पालटूं लागला. ' तत्त्वविचाराचे कांहीं सिद्धान्त दृश्यशास्त्राच्या आटोक्याच्या बाहेरचे आहेत असें

'कळून आलें आणि एकंदर सर्व धर्मग्रंथांची तुलना करतां तत्त्वविचाराच्या संबं-
'धानें हिंदुस्थानचाच नंबर वर येईल अशी हळू हळू खात्री होत चालली,
'सारांश, आमच्या घरांत काय आहे त्याचें दिग्दर्शन जेव्हां परकीयांनीं केलें तेव्हांच
'आम्हांस त्याची योग्यता कळून आली; व आम्हीं गेल्या पांचपंचवीस वर्षांत जो
'फुकट उपद्याप केला त्याची निरर्थकता आम्हांस भासूं लागली. आमच्या धर्म-
'विचारांस जें हल्लीं वळण लागत आहे तेंच चालू राहून कायम झाल्यास त्या-
'पासून एकंदर राष्ट्राचें पुष्कळच हित होणार आहे. ( २३-२-९२ ).

'आमच्यामध्यें कितीहि बरे वाईट पंथ असले तरी सर्व नद्या सागरांत ज्या-
'प्रमाणें एकवट होतात त्याप्रमाणें हें सर्व पंथ ईश्वराकडेच नेणारे आहेत अशी
'आमची समजूत आहे. जगामधील दुसऱ्या कोणत्याहि धर्मांत इतकी उदारता
'अगर समंजसपणा दृष्टीस पडावयाचा नाहीं. कोणी ईश्वराचा जगामध्यें एकच
'अवतार झाला आहे असें मानतात व कोणी मूर्तिपूजा सोडून देऊन निर्गुण
'परमेश्वराचें ध्यान करण्याचा आंव घालतात. परंतु आपल्या आचरणानें मूर्त्यु-
'पासक जितके आग्रही असतात तितकेच निर्गुणोपासक असतांहि आपण
'नाहीं असें लोकांस दाखवितात. कोणताहि धर्मग्रंथ घ्या नीतितत्त्वांची
'सरमिसळ ही असावयाचीच. मग ती कोठें जास्ती असेल कोठें कमी असेल.
'तात्पर्य, या निवळ धर्मतत्त्वांचें सार असार गोष्टींपासून पृथक् करून सदर
'तत्त्वांचा केवळ सत्य दृष्टीनें विचार ज्यांत केला आहे असा आर्यधर्माखेरीज इतर
'धर्म क्वचितच सांपडेल. हीं तत्त्वें कोणतीं, त्यांचा आपल्या जुन्या ग्रंथांतून कसा
'विचार केला आहे, ऐतिहासिक दृष्ट्या त्यांची उत्पत्ति व अभिवृद्धि कशी झाली
'इत्यादि गोष्टींचा विचार वास्तविक पाहातां आमचा आम्हींच करावयास पाहिजे
'होता; परंतु आमचे सर्व विचार आधिभौतिक विद्यांकडे वळल्यामुळें आत्म-
'विद्येचा हल्लीं आम्हांस कंटाळा आला आहे. ( २३-२-९२ ).

'मराठी शाळेंत, 'श्रीगणेशायनमः'—छे, छे, 'अ आ' लिहिण्यास मुलगा
'घातल्यापासून तो एम्. ए. किंवा एल्एल्. बी. होऊन युनिव्हर्सिटीच्या चरकांतून
'बाहेर पडेपर्यंत धर्म म्हणजे काय व तो कशाशीं खावा याचें बिलकुल ज्ञान
'नसतें. मराठी किंवा इंग्रजी क्रमिक पुस्तकें यांतील ग्रेस दार्लिंगची गोष्ट तो पाठ
'म्हणेल, पण हरिश्चंद्राचे कथेचा कोठें उल्लेख आला असतां, हा 'ॲल्युजन'
'कोठला म्हणून त्यास संस्कृत पुस्तकाच्या नोटा चाळाव्या लागतील. कॉलेजांत
'इतर शिक्षणहि याच प्रकारचें असतें. तर्कशास्त्र, ज्योतिष, गणित, अर्थशास्त्र
'यांतील सिद्धान्त कोणत्या क्रमानें सिद्ध करावे लागतात हें या विद्यार्थ्यांकडून
'घोकून घेतलेलें असतें; व रहाटाचा बैल गाडीस जुंपला म्हणजे जसा बिचकतो
'व वांकडा वांकडा चालू लागतो. त्याप्रमाणें धर्मग्रंथांचा विचार करण्यास लागलें
'असतां कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या मनाची स्थिति होते. धर्मविचारांसंबंधीं ही

'अवस्था झाली. धर्माच्या बाबतींत प्रेमादि ज्या कांहीं मनोवृत्ति जागृत व्हाव्या
'लागतात त्यांचें तर पूर्वीच गुळखोबरें झालेलें असतें. अर्थात् तप दीड तप
'अभ्यास करून युनिव्हर्सिटींतून बाहेर पडल्यावर हे राजश्री इतके श्रद्धाहीन,
'कुतर्कवादी आणि स्वार्थपरायण बनलेले असतात कीं उदरंभरणापलीकडे
'व्यवसाय करण्याची त्यांचे ठायीं उमेद राहात नाहीं. स्वार्थत्याग म्हणजे काय
'याचें शाब्दिक ज्ञान झालेलें असलें तरी त्याप्रमाणें कृति होत नाहीं; एखाद्या
'गोष्टीवर पूर्ण श्रद्धा ठेवून त्याकरितां सर्वस्व अर्पण करून व्यवसाय करण्याची
'संवय झालेली नसते, आणि कोणतीहि गोष्ट मी आपल्या जन्मांत साध्य करीन
'अशा प्रकारची उमेद किंवा ती सिद्ध करण्यास लागणारें मानसिक धैर्य अथवा
'करारीपणा यांस हे गृहस्थ पूर्णपणें आंचवलेले असतात. परमेश्वराची प्राप्ति
'करून आयुष्याचें सार्थक करणें हा धर्माचा मुख्य विषय होय हें खरें आहे. पण
'धर्मश्रद्धेनें संसारांत, किंवा राष्ट्राच्या व्यवहारांत, किंवा राष्ट्राच्या इतिहासांतहि
'पुष्कळ फायदा होतो. इतकेंच नव्हे तर राष्ट्राच्या उत्कर्षास अशा प्रकारची
'श्रद्धा राष्ट्राच्या पुढाऱ्यांच्या अंगीं असणें अवश्य आहे हा सिद्धान्त हल्लीं हल्लीं
'सर्वमान्य झाला आहे. असो. ( २७-१०-०३ ).

'दुसऱ्याचा जीव कसा घ्यावा याचा अभ्यास न केल्यामुळें हिंदु लोक आज
'परचक्रांत सांपडले आहेत ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे असें मॅक्समुल्लर
'एका व्याख्यानांत म्हणाले. हिंदुस्थानावर हजारों वर्षें जो परकीय राजांचा अंमल
'गाजत आहे त्यास मॅक्समुल्लर म्हणतात तेवढेंच कारण आहे किंवा दुसरीं
'कांहीं कारणें झालीं आहेत याचा विचार आज आपणांस कर्तव्य नाहीं. आमची
'दुर्बल स्थिति कशाहि रीतीनें झाली असो, किंबहुना आमचे तत्त्वविचारक ग्रंथहि
'त्यास थोडेबहुत कारण झाले असतील असें मानलें तरी त्यामुळें सदर ग्रंथांची
'योग्यता मुळींच कमी होत नाहीं. ( २३-२-९२ ).

'ज्या वेळेस जगांतील बहुतेक देश अज्ञानांतच बुडाले होते व धर्म म्हणजे
'काय याचीहि त्यांस पुरी ओळख नव्हती, त्या वेळीं या देशांत धर्माचें खरें स्वरूप
'लोकांस अवगत झालें होतें—नव्हे, जीं तत्त्वें अगदीं अलिकडे लोकांस
'समजलीं आहेत असें आपणांस वाटतें त्या तत्त्वांचा पूर्ण ऊहापोह करून आमच्या
'ऋषींनीं मागेंच निर्णय केला आहे. जीवाचे धर्म ईश्वरांत कोणते आहेत अगर
'असणें शक्य आहे, सच्चिदानंदस्वरूपीं ब्रह्मज्ञानाचा आचाराशीं कितपत संबंध
'आहे, धर्माचें खरें स्वरूप बाह्याचार होय, कां तत्त्वज्ञान होय, इत्यादि प्रश्नांचा
'उलगडा आपल्या वेदान्तग्रंथांतून फार चांगल्या रीतीनें केलेला आहे. आम्ही
'मूर्त्युपासक असलों, जातीच्या संबंधानें भेदाभेद आमच्या आचारांत कितीहि
'दिसून येत असला, नीतीचें व धर्माचें ऐक्य आहे असें जरी आम्हीं पदोपदीं
'प्रतिपादन केलें, कर्ममार्गावर आमची किती जरी श्रद्धा असली अगर भक्ति-

'मार्गानेंच परमेश्वर सामान्य जनांस किंबहुना सर्वत्रांस ज्ञेय आहे असें जरी 'आम्हीं अनेकवार सांगितलें, तरी वेदान्तविचार सर्व धर्मांचें मूळ आहे अशी 'प्रत्येकाची समजूत आहे. ( २३-८-९२ ).

'आत्मानात्मविचाराचें हिंदुधर्म हें माहेरघर आहे. ( २६-२-०१ ). त्यांत 'आत्म्याचें स्वरूप वर्णिलें असून, आत्मा व ईश्वर एक आहेत हा त्याचा सिद्धान्त 'आहे. ( १७-९-०१ ). हिंदु धर्माचे आचारासंबंधाचे नियम सांप्रतच्या 'स्थितींत कितीहि कडक वाटले, तरी शारीरिक, मानसिक व आत्मिक शुद्धता हीच 'त्याचे मुळाशीं आहे. याकरितां सुशीक्षित हिंदूंनीं पुन्हां आपल्या सदाचारां-'च्या मार्गावर यावें. (३०-७-१२). हिंदुलोकांनीं प्राणांपलीकडे जपण्यालायक असा 'दुसरा सद्गुण म्हटला म्हणजे मद्यमांसपराङ्मुखता होय. या सद्गुणाचा अमो-'लिक ठेवा आपणांस आपल्या थोर पूर्वजांपासून मिळत आला असून त्याचेच 'जोरावर जगास थक्क करून सोडणारें बुद्धिवैभव, मानसिक उन्नति व शरीर-'शुद्धता आपण कमाविली आहे. ( ३०-७-१२ ).

'निःश्रेयसहेतुको धर्मः । ही धर्माची व्याख्या आतां चालावयाची नाहीं. 'सर्वच लोक आपापल्या धर्मानें पारलौकिक कल्याण होतें असें आतां म्हणूं 'लागले आहेत; व या इतर धर्मांहून आमच्या धर्मांत विशेष काय आहे त्याचा 'आमच्या धर्माच्या लक्षणांत समावेश करणें जरूर झालें आहे. जें लक्षण बांधा-'वयाचें तें न्यायशास्त्रांत ज्यास अतिव्याप्ति किंवा अव्याप्ति म्हणतात त्या दोषांनीं 'युक्त असूं नये. खिस्ती किंवा महमंदी धर्म खिस्त किंवा महंमद हे एकटेच व 'एकदांच झाले असें मानितात. हिंदुधर्मांत जर कांहीं विशेष असला तर तो 'हाच होय कीं, अशा तऱ्हेनें ईश्वराची करणी किंवा प्रसाद मर्यादित आहे असें 'आम्ही मानीत नाहीं. यामुळें हिंदुधर्माची खिस्ती किंवा महमंदी धर्मापासून 'व्यावृत्ति करण्यासारखें जर लक्षण बांधावयाचें असेल तर विभूतींचें अनंतत्व 'आणि ईश्वराचें एकत्व ही आमच्या धर्मांतील विशेष गोष्ट त्यांत घातली पाहिजे. 'देव एक आहे पण लोक त्यास अनेक तऱ्हेनें भजतात हें तत्त्व ऋग्वेदापासून 'भगवद्गीतेपर्यंत सर्वांस सारखें मान्य आहे. याचा परिणाम असा झाला आहे 'कीं, रुचिवैचित्र्यामुळें उपास्यदैवतें जरी भिन्न असलीं तरी एकच परमेश्वर 'साध्य असल्यामुळें आम्हीं त्या सर्वांसच हिंदुधर्मी समजतों. इतर धर्मांतल्या 'लोकांनीं आपलीं उपास्यें कायमचीं व नियमित ठरविलीं आहेत. हिंदुधर्माचा 'तसा प्रकार नाहीं. प्रत्येक पंथांतले लोक आपापलें उपास्य श्रेष्ठ समजतात व 'उपासनेकरितां तशी समजूत असणें जरूर आहे. पण सर्व उपासकांस कोणतें 'तरी वेदान्तमत कबूल असल्यामुळें उपास्यांच्या भेदामुळें हिंदुत्व नष्ट होत 'नाहीं. उपासकाची योग्यता, अधिकार व आवड याप्रमाणें उपास्यदैवत स्वीकार-'ण्याची त्यास मोकळीक ठेवून पुढें उत्तरोत्तर त्याचे अंगीं सात्त्विक गुणांचा

‘ जसा विकास होईल त्याचप्रमाणें अधिक योग्यतेच्या सगुण उपास्याची त्याज-
‘ कडून आराधना करवून त्यास अखेरीस ईश्वरप्राप्ति करून देणें हाच मार्ग
‘ अधिक सयुक्तिक व समंजस होय. हिंदुधर्मांत हाच मार्ग सांगितला आहे व
‘ त्यामुळें उपास्यांचा अनियम हेंच एक त्याचें विशेष लक्षण होय.
( के. २५-९-१९०० ).

‘ आपल्या इकडील जातिभेद बुद्धिमत्ता, घटनासामर्थ्य, कला-
‘ कौशल्यामधील हुषारी इत्यादि स्वाभाविक गुणांवर अवलंबून आहेत. भेद
‘ नसतील तर तें उत्तमच, पण जर ते असणारच तर ते जितके नैसर्गिक गुण-
‘ कर्मांवर आणतां येतील तितकी त्यांची जांचणी खात्रीनें कमी होईल. आमच्या
‘ धर्मशास्त्राचा असाच कटाक्ष आहे. बुद्धिमत्तेमुळें ब्राह्मणवर्गाला जें नैसर्गिक
‘ श्रेष्ठत्व आहे त्याच्याबद्दल क्षत्रियवर्गाकडे राजसत्ता व वैश्य वर्गाकडे सांपत्तिक
‘ सत्ता देऊन त्यांचेंहि श्रेष्ठत्व स्थापन केलें आहे. हा एक प्रकारचा ‘ बॅलन्स
‘ ऑफ पॉवर ’ आहे व तो उत्तम साधला आहे. आतां ज्ञानप्राप्तीचा मार्ग
‘ ब्राह्मणाशिवाय इतरांस बंद होता हें म्हणणेंहि बरोबर नाहीं. ‘ मां हि पार्थ व्यपा-
‘ श्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ।’
‘ ह्या भगवद्वचनाप्रमाणें खुद्द आत्मज्ञानाचा मार्ग जर शूद्रांससुद्धां खुला होता,
‘ तर सामान्य ज्ञानप्राप्तीचे मार्ग क्षत्रिय-वैश्यांस बंद असणें शक्यच नाहीं.
‘ जनक, काशिराज इत्यादि सर्व ज्ञानसंपन्न पुरुषांच्या उदाहरणांवरून हीच गोष्ट
‘ प्रत्ययास येते. योग्य शूद्रांनाहि वरच्या जातींत जाण्यास प्रत्यवाय नव्हता असें,
‘ शुचिरुत्कृष्टशुश्रूषुः मृदुर्वागनहंकृतः । ब्राह्मणाद्याश्रयो नित्यमुत्कृष्टां जातिमश्नुते । ’
‘ ( अ. ९; ३३५ ) या मनुवचनावरून स्पष्ट दिसतें. याप्रमाणें हिंदुधर्म
‘ आपलें उच्च कार्य करीत आला आहे. वैषम्य नाहींसें करणें, ऐक्य वाढविणें
‘ हेंच धर्माचें ध्येय आहे. परंतु अशा प्रकारचे भेद एकदम व तेहि अयोग्य
‘ मार्गांनीं मोडण्याची हांव शास्त्रकारांनीं धरली नाहीं. ब्राह्मणांनीं शूद्राप्रमाणें
‘ वागून शूद्रांत मिसळून सबगोलंकार करावा हें हिंदुधर्मास मान्य नाहीं. सर्व
‘ जातींनीं आपापल्या उत्तम आचरणानें उत्तरोत्तर उच्च वर्गांत येऊन ब्राह्मणांशींच
‘ काय पण ईश्वराशींसुद्धां एकरूप व्हावें अशी आमच्या धर्मांत सोय आहे. हेंच
‘ समाजस्थिति सुधारण्याचें पवित्र कार्य, वेद व धर्मशास्त्रें यांचा सारांश
‘ महाराष्ट्र भाषेंत आणून, मराठी साधुसंतांनीं केलेलें आहे व आतांहि हें कार्य
‘ करण्याचा अधिकार तपोनिष्ठ लोक व धर्माचार्य यांचा आहे. त्यांच्या
‘ साहाय्यानें इतरांनीं आपले आचार सुधारून व ज्ञान संपादन करून ब्राह्मणांच्या
‘ बरोबरीनें आत्मज्ञान संपादावें, त्याला कोणाचीच हरकत नाहीं. (के.१६-९-१३).

‘ दुष्ट परिणाम टाळून जातिभेद मोडण्यास दोनतीन शतकें निदान लागतील.
‘ जातिभेद मोडणें म्हणजे एखादा ऊंस मोडण्यासारखें नव्हे. जातिजातींची

'महत्त्वाकांक्षा कायम ठेवून, कनिष्ठ जातीस वरिष्ठ करण्यास किती काळ लागेल,
'किती शक्ति पाहिजे, कोणतीं साधनें आहेत याचा पूर्वी विचारच करावयाचा
'नाहीं काय ? आजमितीस जातिभेद नाहींसा होईल तर तें इष्ट आहे, दहा
'वर्षांनीं होत असेल तरी इष्ट आहे, पन्नास वर्षांनीं मोडेलच अशी आशा कर-
'ण्यास जागा असेल तरी चिंता नाहीं; परंतु दोनतीन शतकांनीं मोडेल एवढीहि
'आशा जर असेल तर आम्ही आपले प्रयत्न या कामीं लावण्यास आज
'तयार नाहीं. ( के. २४-५-८७ ).

'आमच्या दूरदर्शी ऋषींनीं सत्ता किंवा सामर्थ्य यांच्यावर आमचा धर्म
'अवलंबून न ठेवतां तो शहाणपणावर अवलंबून ठेवला आहे. उदारबुद्धि,
'उपकारबुद्धि अशा लोकांवर धर्मगुप्ती सोपवून त्याला चिरकाल राखण्याची
'व्यवस्था त्यांनीं केली आहे. (के.५-९-११). राजकीय चळवळीसंबंधानें हिंदुस्थान
'जरी आज जागें झालें असलें तरी आमच्या पूर्वीच्या लोकांचें धर्मवैभव, पारमार्थिक
'तत्त्वज्ञान, प्राणिमात्राच्या उन्नतीकरितां करावयाच्या खटपटींचे मार्ग हीं अद्याप
'श्रेष्ठ स्वरूपाचीं असून, राजकीय उन्नतींत उच्च स्थितीस पोहोंचलेल्या पश्चिमेला
'बऱ्याच गोष्टी शिकविण्याची ताकद आमच्या धर्मांत आहे. ही हिंदुस्थानची
'धर्मगुरूची पदवी दैदीप्यमान व्हावी व ऐहिक सुखलालसेचे युरोप अमेरिकेंत
'दिसणारे दुष्परिणाम हिंदुस्थानांत दिसूं नयेत, अशी हिंदुधर्माच्या सर्व अभि-
'मान्यांची महत्त्वाकांक्षा आहे. हिंदुधर्माचें वर्चस्व स्थापण्यास (सरकारी) अधि-
'काऱ्यांच्या प्रत्यक्ष मदतीची जरूरी नाहीं. हिंदूंच्या संस्थांत, हिंदूंच्या धर्म-
'विचारांत, हिंदूंच्या तत्त्वज्ञानांत तें सामर्थ्य आहे ( के. ३०-२-१९१० ).

'रूढीसारख्या भुसभुशीत पायावर हिंदुधर्माची इमारत उभारलेली असती
'तर कधींच ढासळून गेली असती; ती सर्वदा सत्य, अविनाशी व शुद्ध अशा
'ब्रह्मतत्त्वावर बांधली असल्यामुळेंच इतकें दिवस टिकली आहे; ही गोष्ट हिंदु-
'धर्माच्या निंदकांनीं व अभिमान्यांनीं सदोदित लक्षांत बाळगली पाहिजे.
'आचारविचारावर कोणत्याहि प्रकारचें नियन्त्रण नसावें असें वाटून हिंदु रीती-
'भाती मोडण्यास प्रवृत्त होणें निराळें आणि हिंदुधर्मावर पूर्ण विश्वास असून
'त्यांतले त्यांत देशकालानुरूप फेरफार करण्यास झटणें निराळें. सर्व प्रकारच्या
'लोकांनीं अमुकच धर्ममतावर विश्वास ठेवावा किंवा अमुकच आचरण करावें असा
'नियम करणें म्हणजे नातवाचें आंगडें आजोबाला घालणें किंवा जवानाचें काम
'लहान पोराला करूं सांगण्यासारखें आहे. हिंदुधर्माखेरीज इतर कोणत्याहि धर्मांत
'हें तारतम्य राखलेलें आढळत नाहीं. समुद्राला भरती येत असतांनाहि लाटांचें
'पुनःपरावर्तन व्हावें लागतें; त्याप्रमाणें हिंदुधर्माचा वेळोवेळीं ऱ्हास झाला असें
'आपापतः वाटलें तरी सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करणाराला त्याची हळूहळू पण
'एकसारखी वृद्धिच होत आली आहे असें आढळून येईल. ' ( के. ६-९-०४).

इसवी सन १८८० मधील धर्मसंमूढ महाराष्ट्र व सन १९३१ चा ‘ नष्टो मोहः ’ असा महाराष्ट्र ! त्या वेळची ती आपला धर्म म्हणजे अंधश्रद्धा व रूढि यांचा एक गठ्ठा असें मानणारी व उपदेशणारी महाराष्ट्रीय सुशिक्षित सुधारक चमू, व आपला धर्म पुष्कळ अंशीं अत्यंत श्रेष्ठ व उज्ज्वल आहे असें मानणारी आजची पिढी ! गौरकायांच्या मुखांतून स्रवणाऱ्या व लेखणींतून झरणाऱ्या अनेक धारांच्या विचारगंगेनें स्नान करून पूत झालेले त्या वेळचे ते समाजोद्धारक व आपल्या आर्यधर्माच्या औपनिषदीय तत्त्वज्ञानाचे अभ्यासू व वेदान्तविचारानें समतोलपणा राखणारे आजचे समाजसेवक ! पाश्चात्य संस्कृतीच्या प्रथम दर्शनाच्या चकचकाटानें डोळे दिपून जाऊन किंकर्तव्यमूढ झालेला तो १८८० तला महाराष्ट्र, व स्वकर्तव्याच्या सम्यग्ज्ञानानें आंतला मार्ग जाणून तो निष्काम कर्तव्यबुद्धीनें आक्रमणेच्छु असा आजचा महाराष्ट्र ! आपल्या जेत्यांच्या सामर्थ्याचें रहस्य त्यांच्या मद्य, मांस व मीनाक्षी यासंबंधींच्या वर्तनांत आहे असा भ्रम झालेला त्या वेळचा महाराष्ट्र व आपल्या जेत्यांचें सामर्थ्य त्यांच्या संघटनादि व्यवहार्य सद्गुणांत आहे अशी खात्री पटलेला आजचा महाराष्ट्र ! मिशनऱ्यांच्या घरच्या चहापानानें आपला धर्म बुडाला असा टाहो फोडणारा त्या वेळचा महाराष्ट्र, व मिशनऱ्यांच्या येथल्या चहापानानेंच काय पण बाप्तिस्म्याच्या जलाभिसिंचनानें येशूच्या कळपांत दाखल झालेल्यांना होमहवनादि रीत्या पुन्हां आपल्यांत सामावूं पहाणारा आजचा महाराष्ट्र ! विवाह, वपन व पुनर्विवाह इत्यादि बाबतींत अनुदार व भ्रामक बुद्धीनें स्त्रियांचा विचार करणारा त्यावेळचा महाराष्ट्र व त्याच बाबतींत उदार व समजूतदार धोरणानें विचार करणारा आजचा महाराष्ट्र ! आपण भूदेव आणि बिचारे अस्पृश्य हे या पृथ्वीतलावरले साधे मनुष्यप्राणी सुद्धां नाहींत, अशी ठाम समजूत असलेला त्यावेळचा महाराष्ट्र व अस्पृश्य आणि आपण दोघेहि माणसेंच आहोंत, अशी हळूहळू समजूत पडूं लागलेला आजचा महाराष्ट्र ! या दोन महाराष्ट्रांत जो फरक—तो महत्त्वाचा फरक म्हणजेच बव्हंशीं केसरीचें पन्नास वर्षांतील कार्य होय !

केसरीचें खरें क्षेत्र राजकारणाचें. तदनुषंगानें ज्या ज्या वेळेस त्याला धर्मकारणांत स्वमतमंडन वा परमतखंडन करावेंसें वाटलें त्या त्या वेळेस त्यानें तें प्राप्त कर्तव्य म्हणून केलें. अर्थात् अशा प्रसंगोपात्त लेखांतून धर्माच्या संपूर्ण स्वरूपाचें मंडन असंभवनीय. तरीसुद्धां या प्रसंगोपात्त लेखांनीं जनतेचा विचारलंबक सुवर्णमध्यावर आणण्याचें महत्त्वाचें कार्य अनेकवार केलें आहे. केसरीचीं धार्मिक मतें हींच सामान्य जनतेचीं धार्मिक मतें आज आहेत हें एक त्याचें प्रत्यंतर आहे. अशा महत्त्वाच्या कामगिरीबद्दल महाराष्ट्र केसरीचा ऋणी राहील यांत काय संशय !

---

# स्त्रियांच्या चळवळी

[ कु. बाळुताई खरे, प्रदेयागमा ]

केसरीच्या जन्मापासून आतांपर्यंत स्त्रियांच्या बाबतींत केसरीचीं जीं मतें आहेत तीं कायम आहेत व केसरीचें समाजसुधारणेचें धोरण प्रारंभीं होतें तेंच आतांहि आहे. असें असतांहि केसरी एके काळीं आतां ठरत नाहीं इतका अप्रागतिक ठरला होता. वस्तुतः अव्वलपासून आतांपर्यंत एकाच प्रकारच्या मतांचा केसरीनें पुरस्कार केलेला आढळतो. याचें कारण हेंच कीं, प्रारंभीं केलेलें मतप्रतिपादन हें समतोल बुद्धीनें केलेलें होतें व तीच बुद्धि अजूनहि आहे. केसरीचें वैशिष्ट्य जर कांहीं असेल तर तें हेंच कीं राष्ट्रीयत्व हें केंद्र मानून त्या भोंवतालीं असणाऱ्या कोणत्याहि सुधारणेला केसरीनें पुष्टिच दिली आहे.

सामाजिक परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें न्या. घोस यांनीं १९०७ सालीं जें भाषण केलें त्याला उद्देशून केसरी म्हणतो, ' न्या. घोस यांनीं अध्यक्ष या ' नात्यानें केलेलें भाषण पूर्वीच्या अध्यक्षांच्या भाषणाहून विशेष महत्त्वाचें असून ' तें उतावळ्या व उच्छृंखल सुधारकांनीं मनन करण्यासारखें आहे. सामाजिक ' सुधारणेचा प्रश्न जितका प्रचंड व घोंटाळ्याचा आहे तितकाच नाजूकहि आहे. ' सामाजिक सुधारणा म्हणजे हिंदु समाजाच्या पूर्वपरंपरेचें निर्मूलन करणें ' नसून नवीन परिस्थितीस योग्य असें तिला स्वरूप देणें होय. समाज- ' सुधारणा म्हटली कीं एकदम सुरुंग लावून जुन्या समाजाचा धुव्वा उडवणें नव्हे. ' समाजसुधारणेंत व राजकीय सुधारणेंत हाच महत्त्वाचा फरक आहे.' (१।१।०७) समाजसुधारणा मुंगीच्या पावलानेंच होते. नुकताच पास झालेला शारदा—कायदा हें याचें मूर्तिमंत उदाहरण आहे. सुमारें ४०-५० वर्षें ही समाजसुधारणेची बाब घासतां घासतां आतां थोडीशी उजळल्यासारखी वाटूं लागली आहे. तरी अजून तिला कितीतरी विरोध आहे ! सुधारणा पचनीं पडावयास बराच काळ लागतो; तत्पूर्वी ती वादानें रटरटून शिजावी लागते. केसरीचें धोरण ' चलत्येकेन पादेन तिष्ठत्येकेन बुद्धिमान् । नापरीक्ष्य परं स्थानं पूर्वमायतनं त्यजेत् ' । या सुभाषिता- प्रमाणें आहे. केसरीला बहुजनसमाजाला बरोबर घ्यावयाचें असल्यानें एक पाय स्थिर करून दुसरा टाकणें हेंच हिताचें आहे; व याचें खरें कारणहि हेंच कीं पूर्वसंस्कृतीचे बसलेले हुकमी ठसे पुसून टाकणें कठिण असतें. स्त्रियांची सुधारणा ही समाजसुधारणेचा आत्माच होय ! त्यांची सुधारणा म्हणजे निम्या हिंदु- स्थानची सर्वजातीय सुधारणा ! असें असल्यानें स्त्रियांच्या दोषांचें निर्मूलन

करतांना त्यांच्याइतकेंच नाजुक हत्यार कोमल रीतीनें समतोलपणें वापरलें पाहिजे. **समाजदोष हा आत्मदोष व राजकीय दोष हा परदोष आहे.** परदोषाचें निर्मूलन करण्यांत समाज जितका तत्पर असतो तितका समाजदोष–आत्मदोष नाहींसा करण्यांत तत्पर व समर्थ असत नाहीं. म्हणून बहुजनसमाजाला राजकीय सुधारणा हवीशी वाटते व समाज-सुधारणा टोचते म्हणून नकोशी वाटते. केसरीनें हें मर्म ओळखलें. आंधळ्याला चालतांना आधार द्यावयाचा तो काठीचा. हळूहळू एकेक पाऊल पुढें टाकून दिला पाहिजे. त्याला मोटारला बांधून फरपटत नेणें म्हणजे त्याचे वाभाडे काढणें होय. या दृष्टीनेंच स्त्रीसुधारणेकडे केसरी पहात आला आहे. पण तेवढ्यावरून तो अप्रागतिक खास नाहीं. स्त्रियांबद्दल कळकळ व अभिमान हीं केसरींत अनेक ठिकाणीं व्यक्त झालीं आहेत. स्त्रियांना दास्यांत ठेवाव्या असें केसरीचें मत मुळींच नाहीं. १९१० सालीं विलायतेंत मताधिकारासाठीं मताभिलाषी स्त्रियांनीं व त्या-विरुद्ध पार्लमेंटनें चालविलेला झगडा पाहून व विलायतेंतील स्त्रियांसंबंधीं पुरुषांचें धोरण पाहून केसरी म्हणतो—

'ज्या वळणानें समाजस्थितीचें पाणी आजपर्यंत विलायतेंतील लोकांनीं जाऊं 'दिलें आहे त्याच वळणानें तें अखेरपर्यंत जाऊं दिलें पाहिजे. त्याशिवाय गत्यं-'तर नाहीं. मध्येंच बांध घालून तें अडविण्याचा त्यास अधिकार नाहीं व त्या-'पासून विलायती समाजाचें अंतिम हितहि नाहीं. आणि खरोखर कोठेंहि झालें 'तरी एका निम्या मानवी जगाचीं सूत्रें दुसरा निम्मा भाग निवळ दांडगाई 'व जुलूम केल्याशिवाय जगाच्या अखेरपर्यंत आपल्या हातीं कसा ठेवूं शकणार ! 'व निवळ दांडगाई आणि जुलूम करून तरी तीं राहतील काय ?' (१९।७।१०)

स्त्रियांवर पुरुषांनीं जुलमी सत्ता गाजवावी असें केसरीचें मत यावरून मुळींच सिद्ध होत नाहीं. उलटपक्षीं जुलूमजबरदस्तीनें स्त्रियांना दास्यांत ठेवणें चुकीचेंच आहे असें केसरी म्हणतो. अमेरिकेंत एका गांवीं अमेरिकन स्त्रियांनीं अगदीं स्त्रीराज्य केलें. वकील स्त्रिया, डॉक्टर स्त्रिया, ऑफीसर्स स्त्रिया; सर्व स्त्रीमय झालें. त्या वेळीं पुरुषांच्या तंबाखूच्या व्यसनाला आळा घालण्यासाठीं स्त्रियांनीं कसें नाजुक व बिनतोड उपाय योजले हें सांगतांना केसरी म्हणतो—'स्त्रियांच्या 'सौम्य उपायांनीं कित्येकदां जें कार्य होतें तें मोठ्या प्रयासानें कायद्याचेंहि साहाय्य 'मिळून होत नाहीं. स्त्रियांना जर पुरुषांवरील आपल्या अमलाची खरी मर्यादा 'कळली तर पुरुषांनीं त्यांना छळणें कठिण होईल,' (१६।८।८७)

१९१० सालीं रशियाचें कर्ज इराणच्या डोक्यावर बसूं नये म्हणून इराणी स्त्रियांनीं केलेला अप्रतिम स्वार्थत्याग व परिश्रम पाहून कोणासहि स्त्रियांच्या साम-र्थ्याची साक्ष पटण्याजोगी होती. त्या वेळीं इराण देशाला स्त्रियांनीं वांचविला. 'स्त्रियांना राजकाज फारसें कळत नाहीं. याचें कारण त्या त्यांत लक्ष घालीत

'नाहींत. परंतु राष्ट्राचे विचार कोणत्या वळणानें वाहात आहेत, हें त्यांना चांगलें
'कळत असतें......जेव्हां त्या कोणत्याहि राष्ट्रीय बाबतींत मन घालतात तेव्हां
'राष्ट्राचे विचार त्या बाबतींत किती खोल गेले आहेत व दृढमूल झालेले आहेत
'याचें अनुमान त्यांच्या चळवळींवरून बिनचूक कळण्यासारखें असतें. पुरुष हा
'दारूच्या खजिन्यासारखा संग्राहक आहे. परंतु स्त्री ही हा खजिना पेटविणारी
'सुरुंगबत्ती होय.' (के. १२।७।१०) हा अभिप्राय पाहातां स्त्रियांना राजकारण करतां येणार नाहीं, त्या मूढ आहेत असें केसरीचें मत नसून स्त्रियांनीं राजकारणांत मन घातलें म्हणजे राजकारण समाजाच्या खालच्या थरापर्यंत जाऊन दृढमूल होईल व राष्ट्रकार्य फोफावेल असा स्पष्ट मथितार्थ आहे. चालू चळवळींत स्त्रियांकडून झालेली अमोल कामगिरी हेंच सिद्ध करीत नाहीं काय ? खेडोपाडीं असणारे लोक व स्त्रिया यांत चळवळीनें मूळ धरलें याचा अर्थहि राष्ट्राचे विचार राजकारणांत खोल गेले आहेत हाच होय.

पार्लमेंटांत मताधिकार मिळावा म्हणून १९१० सालीं इंग्लंडमध्यें स्त्रियांनीं धूम उठविली. पुरुषासारख्या पुरुषांनाहि त्या चळवळीनें त्राहिभगवन् म्हणावयास लावलें. स्त्रियांना मताधिकार नसावा असें म्हणणारे लॉर्ड ॲस्क्विथसारखे बरेच लोक होते. पण मताधिकार नको म्हणावयाला त्यांनीं पुढें केलेली ढाल फारच विचित्र होती. पार्लमेंटमध्यें ब्रिटिश स्त्रियांना मताधिकार कां नको याबद्दल ते असा कोटिक्रम करूं लागले कीं, ब्रिटिश साम्राज्यांत ४० कोटी लोक आहेत; त्या पैकीं ३० कोटी पौर्वात्य असून त्यांना बायकांच्या राजसत्तेखालीं राहाणें आवडत नाहीं म्हणून स्त्रियांना हक्क नको. ॲस्क्विथसाहेब या कोटिक्रमानें दडूं पाहत होते. पण एरवीं हिंदुस्थानचें मत कस्पटासमान मानीत असतां आतांच त्याला किंमत कां ? व्हिक्टोरिया राणीच्या हाताखालीं हिंदी लोकांत दंगे माजले नाहींत. मग मिस् पँखर्स्ट पार्लमेंटांत येऊन दंगे कसे माजतील ? हें तर्कशास्त्र कुठलें ? बुरख्यांतील बेगमेच्या सत्तेखालीं हिंदुस्थानांत तीन पिढ्या राज्य चाललेंच. स्त्रियाबद्दल पूज्यबुद्धि, आदर, भक्ति हिंदवासियांस वाटत नाहीं असें ॲस्क्विथसाहेब कोणत्या आधारावर बोलतात ? केसरीनें असा सवाल टाकला; यांतच केसरीची स्त्रियांबद्दलची भावना व्यक्त होत आहे. विलायतेंत मताधिकार देण्यास इतकीं रणें माजलीं. मुंबई कौंसिलांत २५ विरुद्ध २५मतांनीं मताधिकार स्त्रियांना द्यावा असें ठरलें. 'या वादविवादांत लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट हीच कीं, हिंदी लोक
'आपल्या स्त्रियांना दास्यांत ठेवतात अशी खोटीच हाकाटी करणारे युरोपियन
'सभासद स्वतः या मताधिकारदानाला विरुद्ध होते.'

स्त्रिया या श्रमविभागाच्या तत्त्वानें आर्थिक मदतहि पुरुषांना करीत असतात. वरचे वर्ग सोडून दिल्यास खालच्या वर्गांत स्त्रीपुरुष दोघेंहि अर्थसंपादन

करीत असतात. १९१० मध्यें धारवाड-परस्पर-सहकारी मंडळी निघालेली होती तीमध्यें असा अनुभव आला कीं, मंडळीला साहाय्य स्त्रियांकडून अधिक होतें. सहज शेजारणीपाजारणींशीं बोलतां बोलतां त्या मंडळीविषयीं माहिती भराभर पेरीत जातात व शिवाय स्त्रियांच्या अंगीं सचोटी, काटकसर, पत, चोखी अधिक त्यामुळें त्यांच्याशीं पैशाचा व्यवहार करणें जितकें सोईचें, तितकें पुरुषाबरोबर नाहीं, असाच धारवाडच्या परस्पर, सहकारी मंडळीला अनुभव झाला. उद्योग-धंद्यांनीं स्त्रिया आर्थिक व्यवहारांत मदत करतात. या व्यावहारिक शहाणपणास साक्षरतेनें मिळणाऱ्या शहापणाची जोड झाल्यास अर्थातच दुधांत साखर पडल्या-सारखें होईल.' ( के. १६-८-१६ )

केसरीनें प्रसंगोपात्त स्त्रियांबद्दल गौरवपर उद्गार काढले आहेत. त्यांना शिक्षण असावें व तेंहि राष्ट्रीयत्वाला पूरक असावें असें केसरीचें ठाम मत आहे. ' समा-
' जाला उपयुक्त असें शिक्षण स्वावलंबनाच्या तत्त्वावर व मातृभाषेंतून देण्याची
' कल्पना ही राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेला धरूनच आहे. ती जर स्त्रीशिक्षणा-
' संबंधानें घडवून आणतां आली तर तें यश खचित द्विगुणित होईल.
( के. ११-१-१६ )

' हिंदुस्थानच्या नव्या घटनेंत स्त्रियांनीं आपल्या शिक्षणाच्या सोयी आपल्या
' हातानें करून घेतल्या पाहिजेत आणि शारदा कायद्यासारख्या सामाजिक
' कायद्याचा उपयोग स्त्रीवर्गाच्या उन्नतीच्या कामीं शक्य तितका करून घेतला
' पाहिजे. आजपर्यंत झालेली स्त्रियांची सुधारणा व जागृति हीं दर्यांमें खसखस
' इतकीच आहे.' ( १५-१-३० )

हीं अवतरणें मुद्दाम देण्याचें कारण स्त्रीवर्गाच्या उन्नतीचा केसरीनें पूर्ण विचार केला होता, हें दाखविणें हें होय. ती सुधारणा कोणीं व कोणकोणत्या बाबतींत केली पाहिजे यावर केसरीनें असें म्हटलें आहे कीं, ' स्त्रीपरिषदांत केवळ सुधारले-
' ल्या व सुशिक्षित स्त्रिया गाळून गाळून वर येतात. परंतु अंधारांत पडलेला स्त्री-
' समाज केवढा आहे त्याचें मतपरिवर्तन या स्त्रियांनीं केलें पाहिजे.' ज्या काळांत स्त्रीशिक्षणाचा ओनामाहि घातला गेला नव्हता त्या काळांतहि केसरीनें स्त्रीशिक्षणा-बद्दल अनकूल उद्गार काढले नाहींत. केसरीचें म्हणणें हेंच कीं, पूर्वसंस्कृतीस अनु-सरून पुरुषांना तसेंच स्त्रियांना विविध प्रकारें प्रत्येकाच्या आयुष्याला उपयोगी पडणारें शिक्षण द्या. सर्वसामान्य स्त्रियांचें ध्येय पाहा. एकादी अपवादात्मक स्त्री कल्पने-पुढें उभी करून शिक्षणाचा क्रम रेखाटूं नका. असें म्हणतांना अपवादात्मक स्त्रियांनीं पुरुषांप्रमाणें शिक्षण घेऊन जर पुरुषांसारखी अगर त्याहून अधिक आघाडी मारली तर केसरीला त्या गोष्टीचें कौतुक नाहीं असें नाहीं. परंतु बहु-जनसमाजाकडे पाहून त्याच्या कलानें घेऊन एकेक पाऊल पुढें चला असें म्हण-ण्याचें केसरीचें धोरण आहे. शंभर पावलें उडी मारूं म्हणावयाचें व एकाच

हातावरील खड्डयांत पडावयाचें यांत तात्पर्य नाहीं. स्त्रियांची वेगळी युनिव्हर्सिटी अगर कोणतीहि शिक्षणसंस्था यासंबंधीं बोलतांना पूर्वसंस्कृति जगवून काय तें करा हेंच केसरी म्हणत आहे.

१८८७ सालीं मद्रासच्या सुप्रसिद्ध विदुषी श्रीरंगमल यांनीं प्राचीन ग्रंथांचे दाखले देऊन स्त्रीवर्गास शिक्षण घेण्यास प्रोत्साहन दिलें. त्या वेळच्या त्यांच्या प्रयत्नामध्यें जर कांहीं वैशिष्टय असेल तर तें पूर्वसंस्कृतीचें परिपालन. केसरीचें वैशिष्टय जर कांहीं असेल तर तें हेंच कीं, प्रत्येक गोष्टींत राष्ट्रीयत्वाची जोपासना व्हावी. सामाजिक सुधारणेंतहि राष्ट्रीयत्व खेळावें. स्त्रीशिक्षण अगर तदंतर्गत गोष्टींत सुधारणा करूं इच्छिणारांनीं अंधत्वानें वा उच्छृंखलपणानें पाश्चात्यांचें अनुकरण न करतां, ज्या हिंदी संस्कृतीचें पाश्चात्यांनीहि मनापासून गोडवे गावे ती संस्कृति राखून सर्व सुधारणा करावी. म्हणूनच श्रीरंगमल यांचें कौतुक करून केसरी म्हणतो कीं, 'ज्या काळांत परदेशगमन हें पुरुषांनाहि धाडस वाटावें, त्या 'काळांत आपल्या पत्नीला परदेशीं पाठवणारे गोपाळराव जोशी एकादेच 'निघावयाचे! बाकीच्यांनीं सुधारणेची वाच्यता करावयाची व हातून कांहीं 'व्हावयाचें नाहीं. परस्पर दुसऱ्याकडून सुधारणा इच्छिणारे हे लोक. स्वतः धाडस 'करणारा एकादाच. बाकीचे आम्ही सर्व लोक नुसत्या वाचामात्रेंकरून सुधा-'रणा उठविणार तेव्हां हें असें हसें व्हावयाचेंच!' (२०-९-८७).

स्त्रियांना पुरुषांहून निराळ्या तऱ्हेचें शिक्षण कां द्यावयाचें व त्या शिक्षणांत विशेष गोष्टी कोणत्या पाहिजेत, ह्याविषयीं स्पष्ट मतें केसरीनें दिलीं असून १८८७ सालीं केसरीचें याबाबत जें मत होतें तेंच आजहि आहे असें दिसून येईल. केसरी म्हणतो कीं, 'स्त्रियांना शिक्षण द्या पण तें पूर्वसंस्कृतीस अनुसरून द्या. स्त्री-'शिक्षण म्हणजे पुरुषांना जें, जसें व ज्या बाबतींत शिक्षण तेंच स्त्रियांना असें 'म्हटल्यास अविचारीपणाचें होईल. आधींच पुरुषांना मिळणारें शिक्षण त्यांच्या 'आयुष्याला निरर्थक, त्या ठिकाणीं त्याच खड्डयांत स्त्रियांनाहि लोटा म्हणण्याचा 'आग्रह कां? स्त्रीशिक्षण पुरुषांहून निराळेंच पाहिजे. सर्वांचीं तोंडें बांधून 'एकाच दावणींत गोवण्याचा विचार असल्यास जे त्या दुःखांत पडले आहेत, 'त्यांनीं मारुतीच्या नाकांतील गारपणाच्या गोष्टीचा अवलंब न करतां इतर जण 'त्या दुःखांत पडणार नाहींत अशी ओरड करण्यास प्रारंभ करणें साहजिकच 'आहे.' (२९-११-८७).

प्रो. कर्वे यांनीं स्त्रियांकरितां युनिव्हर्सिटी काढली तेव्हां स्वतंत्र अग्रलेख लिहून स्त्रीशिक्षणाबाबत केसरीनें स्पष्ट ऊहापोह केला.

'हल्लींच्या शिक्षणपद्धतींत जो मोठा दोष आहे तो हा कीं सर्व विद्यार्थ्यांस 'त्यांच्या त्यांच्या लायकीप्रमाणें किंवा आवडीप्रमाणें पुढें जो आयुष्यक्रम किंवा 'धंदा स्वीकारावयाचा असेल त्याला अनुकूल असें शिक्षण आमच्या शाळांतून

'मिळत नाहीं. याचा परिणाम असा होतो कीं, एकाद्या मारवाड्याचा किंवा 'सुताराचा मुलगा एकदां इंग्रजी शाळेंत शिकून तयार झाला म्हणजे पुढें तो 'आपला मूळचा धंदा विसरून नोकरीकडे धांव घेऊं लागतो. आणि मोठी नोकरी 'न मिळाली तर त्याचें आयुष्य बहुतेक फुकट गेल्यासारखें होतें. हल्लींचें स्त्री- 'शिक्षणहि अशाच प्रकारचें आहे. पण ह्याखेरीज हल्लींच्या स्त्रीशिक्षणाची उणीव 'ही कीं तें सरकारच्या ताब्यांत असल्यामुळें त्यांत इंग्रजी भाषेला महत्त्व देण्यांत 'येतें, आणि धर्मशिक्षणाच्या नांवानें तर तेथें बहुतेक भोपळ्याएवढें पूज्य असतें. 'पुरुषवर्गात शिक्षणाचा ज्या ज्या मानानें अधिक प्रसार होईल त्या त्या मानानें 'त्यांच्या सहधर्मचारिणीहि अधिक सुशिक्षित पाहिजेत हें कोणासहि नाकबूल करतां 'येणार नाहीं. पण सुशिक्षित म्हणजे काय, याचा विचार केला तर त्यांस मिळ- 'णारें शिक्षण अनादि कालापासून चालत आलेल्या गार्हस्थ्य—धर्मास लायक असलें 'पाहिजे असें म्हणावें लागतें आणि हें तत्त्व लक्षांत आणलें म्हणजे स्त्रियांचें 'शिक्षण देशी भाषेंत व्हावें, त्यांत योग्य प्रतीच्या धर्मशिक्षणाचा समावेश 'झालेला असावा आणि आमच्याकडील कुटुंबव्यवस्थेला तें अनुसरून असावें 'असें म्हणणें प्राप्त होतें.' ( के. २२-२-१६ ).

'स्त्री-विद्यार्थी व पुरुष-विद्यार्थी यांच्या शिक्षणाचा हेतु स्वभावतःच तंतोतंत 'सारखा असूं शकत नाहीं. पैसे मिळविण्याकरितां शिक्षण संपादणें हा हेतु 'कितीहि निषिद्ध मानला तरी द्रव्यार्जनाकडून दोनहि डोळे काढून घेणें त्यास 'शक्य नसतें. स्त्री-विद्यार्थ्यांची गोष्ट प्रायः याच्या उलट आहे. कारण संसार 'करणें हें पुरुष व स्त्रिया यांचें समान साध्य असलें तरी द्रव्यार्जनाचें काम प्रायः 'पुरुषाचें असतें. स्त्रियांचा संबंध फार तर त्या द्रव्याचा सद्व्यय करण्याचे कामीं 'मदत करण्यापुरता येतो. अर्थात् शिक्षण विषयाचा आनंद हा जरी पुरुष व 'स्त्री-विद्यार्थ्यांना सारखाच लाभणारा असला तरी विवक्षित परीक्षा पास होण्याच्या 'सक्तीचा परिणाम उभयतांवर निराळ्या प्रकारचा होतो. याकरितां स्त्री व पुरुष 'विद्यार्थ्यांच्या शिक्षणाचा क्रम एक न ठेवतां वेगवेगळा ठेवणें इष्ट असतें. 'स्त्रिया ह्या पुरुषापेक्षां बुद्धिमत्तेनें कमी अगर अधिक हा वाद घालीत न बसतां 'केवळ स्त्रियांची सामाजिक कर्तव्यें वेगळीं एवढ्याच करतां स्त्रीशिक्षण वेगळें 'पाहिजे.' ( के. ११-१-१६ ).

१८८७ सालापासून भिन्न व्यवसायाप्रमाणें भिन्न शिक्षणक्रम पुरुषासहि पाहिजे, मग स्त्रियांस तर पाहिजेच पाहिजे असें केसरी म्हणत आला आहे. केसरी हा बहुजनसमाजाकरितां लिहीत आहे. 'त्याला बहुजनसमाजाला बरोबर घेऊन 'जावयाचें आहे. त्यामुळें सामान्यतः स्त्रियांपैकीं शेंकडा ९९ स्त्रियांचा आयुष्य- 'क्रम निपरवाद संसाराकरितांच आहे तेव्हां त्यांच्याकडे पाहून शिक्षण कसें द्यावें 'हें केसरी सांगत आहे. ज्यांना पुरुषांच्या बरोबरीनें अगर त्यांनाहि मागें टाकील

' अशी विशेष कामगिरी करावयाची आहे त्यांनीं स्वतःस पाहिजे तें शिक्षण घ्यावें.
' त्यांनीं अमुकच प्रकारचें शिक्षण घ्यावें हा केसरीचा अट्टाहास नाहीं.'

राजकारण अगर समाजकारण यांसंबंधीं स्त्रियांनीं सज्ञानपणें केलेल्या चळवळीला केसरीनें पुष्टि दिली आहे हें केसरींतील वरील अवतरणावरून दिसून येण्यासारखें आहे. केसरीनें स्त्रियांना भलतेंच डोक्यावरहि चढविलेल्या नाहींत व पायदळींहि तुडविलेल्या नाहींत. स्त्रियांत आहे तितक्या व संभवनीय आहे तितक्या सर्वांगीण सामर्थ्यावद्दल केसरीनें योग्य कल्पना केलेली आहे हें निःसंशय.

समाजसुधारणा आधीं कीं राजकीय सुधारणा आधीं, हा जंगी वाद केसरीच्या जन्मापूर्वीपासूनच रसरसलेला होता. आधीं राजकीय सुधारणा होऊं द्या मग आपले दोष आपण खणून काढूं असें लो. टिळकांचें मत व त्या प्रांजल मतानेंच झुंजारवीराप्रमाणें लोकमान्य आजन्म लढले. अर्थात् केसरी हें राजकीय चळवळीचें मुखपत्र बनलें व समाजसुधारणा ही गौण गणली गेली.

उलट सामाजिक सुधारणा धसास लावूं इच्छिणाऱ्या लोकांनीं आपल्या मताच्या प्रसारासाठीं ' सुधारका'सारखीं वर्तमानपत्रें काढलीं. सामाजिक प्रश्नांपैकीं बरेचसे प्रश्न स्त्रियाभोंवतींच घोटाळत असल्यानें स्त्रियांच्या हरएक बाबीचे सांगोपांग विचार त्या वर्तमानपत्रांतून आपणांस वाचावयास मिळतात; तसे मात्र केसरींतून मिळणें शक्य नाहीं. राजकीय गोष्टींचा ऊहापोह करीत असतां अनुषंगानें अगर प्रसंगोपात्त अन्य कारणांनीं स्त्रियांविषयीं केसरीनें जे जे उल्लेख केले असतील त्यांवरूनच आपणास केसरीचीं मतें कळणार.

आगरकर, टिळक ह्यांसारखे रथीमहारथी दोन विरुद्ध पक्षाचे असतांना ' आधीं सामाजिक कीं राजकीय !' या विषयावर वादाच्या ठिणग्या कशा पडल्या असतील हें सांगावयास नकोच व त्यामुळेंच सामान्य समजूत अशी होऊन बसली आहे कीं, टिळकांचा केसरी म्हणजे सामाजिक सुधारणेचे बाबतींत पूर्ण अप्रागतिक. अर्थात् स्त्रियांचे बाबतींत पूर्ण अनुदार. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, राजकीय, शैक्षणिक अगर सामाजिक बाबतींत स्त्रियांच्या विविध चळवळींवर केसरीनें जीं जीं प्रसंगोपात्त मतें दिलीं आहेत तीं अप्रागतिक असें कोणीच म्हणणार नाहीं. एवढेंच नव्हे तर तीं समतोलपणेंच दिलेलीं आहेत असें आढळतें.

---

# हिंदुमुसलमान—वाद्यांचा प्रश्न

[ श्री. बळवंत नारायण भिडे. बी. ए. एल्एल्. बी. ]

' प्रजाजनांना सत्याग्रह व स्वावलंबन यांखेरीज तरणोपाय नाहीं. '

के. ३०-८-१९२७.

**प्रास्ताविक**—हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या धार्मिक समजुतीप्रमाणें वाद्यध्वनीच्या योगानें त्यांच्या धर्मकृत्यांस प्रत्यवाय येतो. त्यांच्या धर्मांतील प्रधान कर्तव्य निमाज पढणें हें मानलें जातें म्हणून निमाज पढण्याची सार्वजनिक जागा जी मशीद तिचेवरून सर्व प्रकारचीं वाद्यें सर्वकाळ बंद राहिलीं पाहिजेत असा त्यांचा कटाक्ष आणि याप्रमाणें जे वाद्यें बंद ठेवीत नाहींत अगर ठेवणार नाहींत, त्यांच्यांशीं ते दंडेली करून मनगटांतील सामर्थ्याचे जोरावर त्यांस ते तसें करावयास लावितात व लावण्याचा प्रयत्न करितात. मुसलमान समाज हा जात्याच धर्मवेडा व कलहप्रिय समाज असल्यामुळें कितीहि क्षुद्र व क्षुल्लक कारण असलें तरी तो तावडतोब दंग्यास प्रवृत्त होतो. यामुळें दोन्ही समाजांवर अनिष्ट असे परिणाम होतात; आणि हिंदुस्थानाचे पायांतील परदास्यशृंखलेचा फासा इतर साधनांनीं उकलण्याचे जरी प्रयत्न झाले तरी यामुळें अधिकच दृढतर बसविला जातो. हें दोन्ही समाजांचें व देशाचेंहि दुर्दैवच म्हटलें पाहिजे.

**वाद्यबंदी व महंमदी धर्मशास्त्र**—वास्तविक या विषयाचा जरा स्वतंत्र बुद्धीनें व खोल दृष्टीनें विचार केला तर असें स्पष्टपणें दिसून येईल कीं, वाद्यवादनाचे प्रश्नास मुसलमान समाज जें धार्मिक स्वरूप देतो तें तसें त्यास मूलतः नाहीं. ( के. ३०-७-१८९५ ). मुसलमानांचा पवित्र ग्रंथ ' कुराण ' यामध्यें तर याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. निमाजाचे वेळीं वाद्यांचे योगानें गडबड होऊं नये म्हणावें तर निमाज पढण्यास प्रत्येकानें मशिदींतच गेलें पाहिजे असा नियम नाहीं. महंमदी धर्मशास्त्राप्रमाणें जो जेथें असेल तेथेंच त्यानें निमाज पढावा. मुसलमान पुढारी भरसभांतून निमाज पढत असतांना पुष्कळांनीं पाहिलें असेलच. मग पृथ्वीचे पाठीवर मुसलमान म्हणून ज्या ज्या ठिकाणीं असेल त्या त्या ठिकाणीं वाद्यें बंद करावीं लागतील ! आणि यामुळें वाद्याचा रंगच अजीबात कटाप होईल !! कांहीं मुसलमान धर्मशास्त्रकारांचे मताप्रमाणें वाद्यश्रवणच मुळांत मुसलमानांना निषिद्ध आहे. परंतु हा नियम निवळ एकपक्षीय आहे. आणि तो जरी घटकाभर कबूल केला तरी दारू ज्याप्रमाणें मुसलमानांना वर्ज्य त्याचप्रमाणें गाणें बजावणेंहि वर्ज्य येवढाच त्याचा अर्थ होतो. नाहींतर सर्व

मुसलमान गवयांच्यावर धर्मांतर करण्याचीच आपत्ति ओढवेल! हराम म्हणून ज्या कांहीं गोष्टी सांगतात त्यांमध्यें कित्येकांचे मतें वाद्यांचा समावेश होतो. पण कित्येकांचे मतें होत नाहीं. इकडील मुसलमान मात्र ताबुतांत, शादींत, सुनतेचे वेळीं आपण होऊन वाद्यांचा सर्रास उपयोग करितात. मग त्यांत हराम-पणा कोठें राहिला!

बरें, मशिदीमध्यें निमाज पढत असतांना वाद्यांनीं एकाग्रता भंग पावते असें म्हणावें तरी आश्चर्यच! ऐन लढाईची धुमश्चक्री चालली असतांना पैगंबर शांत-पणें निजाम पढूं शकला आणि आजकालचे त्याचे अनुयायांना मात्र कांहींएक गडबड खपत नाहीं. त्याहिपेक्षां नवल हें कीं प्रत्यक्ष निजामाचे वेळीं मशिदींवरून ट्रामगाड्यांचा व इतर वाहनांचा चाललेला दणदणाट मुसलमानांना खपतो, पण मंजुळ वाद्यांचा सुस्वर जर कां कानीं आला तर तो खुपावयास लागतो.

**इतर मुसलमानी देश**—हिंदुस्थानचे बाहेर जर नजर फेंकली तर असें आढळून येईल कीं वाद्यें वाजविण्यास तेथें कोणत्याहि तऱ्हेची मनाई नाहीं. अरब-स्थान हें मुसलमानी धर्माचें आदिपीठ. तिकडील मुसलमान श्रद्धाळू व धार्मिक म्हणून प्रसिद्ध आहेत. पंजे, ताबूत, डुल्ले वगैरे प्रकार तिकडे नाहींत. सनईसारखें मंजुळ व कर्णमधुर वाद्य नाहीं. काय ते ताशे व ढोल. आणि ते वाटेल त्यावेळीं वाटेल त्या रस्त्यानें, मशिदीवरून निमाजाचे वेळींहि वाजविण्यास प्रत्यवाय नाहीं. मक्का येथील मशिदीपुढें वाद्यें खुशाल वाजवितात. इराणांतल्या व तुर्कस्थानांतल्या मशिदींपुढें वाद्यां-ना बंदी नाहीं. पॅरिस शहरांत तर नुकतीच एक मशीद वाद्यांच्या गजरांत उघडण्यांत आली. काबूलचे राजे यांनीं 'शाही' मशिदींत वाजविण्याकरितां मुद्दाम बँड ठेवलेले आहेत. आणि हे बँड खुद्द ईदच्या दिवशीं मशिदींत वाजतात. यावरून स्पष्ट दिसून येईल कीं, मशिदीपुढें वाद्यें वाजवूं नयेत हें खूळ फक्त हिंदुस्थानांतील-च मुसलमानी धर्मांत दिसतें. पण याचें 'मूळ' जरी कुराणांत नसलें आणि विस्तार जरी इतर मुसलमानी धर्माच्या देशांत नसला तरीपण या विषवृक्षाचा सोट हिंदुस्थानांत आहे खास. आणि या 'निर्मूल' सोटास इंग्रजांचे अमदानींत पालवी फुटली आहे. सन १८९५ सालींच ३०-७-९५ च्या अंकांत केसरी म्हणतो कीं, 'मुसलमानांचें म्हणणें कीं सर्व मशिदींवरून सर्व वाद्यें सर्व काळीं 'बंद झालीं पाहिजेत. कारण त्यामुळें आमचे धर्मास प्रत्यवाय येतो....पण ही 'धर्माची सबब बरोबर नाहीं....आणि धर्मसंबंधाची जर यांत कांहीं अडचण 'नाहीं तर फक्त वहिवाट काय होती हें पाहूनच या प्रश्नाचा निकाल केला पाहिजे.'

**वाद्यवादनाचा हक्क**—वाद्यें वाजविणें हा प्रत्येकाचा नैसर्गिक हक्क आहे. आणि हा निसर्गनिर्मित हक्क मानवी स्वभावाच्या अंतापर्यंत असाच टिकून राह-णार. मनुष्यच काय पण जनावरें सुद्धां वाद्यस्वरानें तल्लीन होऊन जातात. आंग्ल कवि शेक्सपीअर यानें एका ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें गाण्याची अगर वादनाची

ज्यास रुची नाहीं तो मनुष्य म्हणजे मोठा ' शठ ' असला पाहिजे. हिंदूंची तर सर्व तऱ्हेच्या कृत्यांमध्यें वाद्यें वाजविण्याची पूर्वापार वहिवाट आहे. पालखी, दिंडी, मिरवणूक प्रत्येक वेळीं वाद्यें हीं असावयाचींच. आणि अशा वेळीं वाद्यें नसतील तर तें एक अशुभलक्षण समजलें जातें. अशा सवाद्य मिरवणुकीस आमचे मुसलमान बंधू मशिदीवरून जाऊं देत नाहींत. सार्वजनिक रस्त्यावरून सवाद्य मिरवणुकी जाण्याची फार दिवसांची जुनी व पूर्वापार वहिवाट असली तरी देखील ती उद्दामपणानें झुगारून देऊन मुसलमान लोक तंटे उत्पन्न करितात, व त्यांचें पर्यवसान शेवटीं दंग्यांत व डोकेफोडींत होतें.

पोलीसनियमाप्रमाणें पाहातां ' सार्वजनिक प्रार्थनेच्या जागा ' म्हणून मशिदी व देवळें या दोन्हीवरूनहि वाद्यें वाजविण्याची बंदी पाहिजे. आणि १८९५ सालीं श्रीज्ञानोबा–तुकारामाची पालखी नेहमींच्या रस्त्यानें वाद्यें वाजवीत अगर बंद करून-हि न जाऊं देतां पोलिसांनीं मुद्दाम निराळ्या रस्त्यानें नेवविली. पण पुढें मोहोरमाचे वेळीं देवळांवरून, वाद्यांच्या नियमाप्रमाणें, ताबूत वाजत गाजत जाऊं नयेत, अथवा ताबुतांचा रस्ता बदलावा म्हणून हिंदूंनीं केलेला अर्ज मात्र फेटाळून लावण्यांत आला. आणि यासच सरकारी न्यायाचा धारवाडी कांटा असें म्हणतात ! त्याच बाबतींत केसरीकारांनीं म्हटलें आहे कीं ' हिंदूंच्या देवळापुढें वाद्यें बंद ठेवीत ' नसत ही गोष्ट खरी आहे. पण मुसलमान लोकांच्या सर्व मशिदींपुढें सर्व वाद्यें ' सर्वदा बंद ठेवावयाचीं कोठेंहि वहिवाट नाहीं. ज्या अधिकाऱ्यांना वहिवाटीस ' धरून चालावयाचें आहे त्यांनीं हिंदूंच्या देवळांपुढें वाद्यें वाजवूं दिलीं तर ' मशिदींपुढें सर्व वाद्यें सर्वदा बंद करतां कामा नये.' (९-७-९५.) 'शेख' म्हण-तात कीं मशिदींपुढें वाद्यें बंद करण्याचा हक्क प्रत्येक मुसलमानास आहे व तो त्यांना बादशहापासून मिळालेला आहे. आणि तो बंद करण्यास कोणासहि अधि-कार नाहीं. हे प्रलाप जितके ' अविचाराचे ' तितकेच ' उद्धटपणाचे ' आहेत. वाद्यामुळें जेव्हां जेव्हां दंगे झाले त्या त्या वेळीं दंग्यास निमित्तकारण मुसल-मानांचा चढेलपणा व अरेरावीचें वर्तन हेंच झालेलें आहे. दंग्याचा धाक घालून वेळोवेळीं मुसलमानांनीं स्थानिक अधिकाऱ्यांकडून हिंदूंच्या न्याय्य हक्कांवर गदा आणली आहे. पालेकर नांवाच्या एका जबाबदार अधिकाऱ्याचे उद्गार लक्षांत घेण्याजोगे आहेत. त्याचें तत्त्वज्ञान असें आहे कीं, ' ज्या अर्थी मुसलमान समाज ' चवताळून दंग्यास सहज प्रवृत्त होतो त्या अर्थी हिंदूंची जुनी वहिवाट वाद्यें वाज-' वीत जावयाची आहे हें सिद्ध झालें आहे असें मला वाटत असतांहि हिंदूंनीं ' यापुढें वाद्यें वाजविणें सोडलें पाहिजे.'

**मुसलमानांचा दुराग्रह व अधिकाऱ्यांचा पक्षपात**—नंदुरबार येथें अष्टमीचे दिवशीं पालखी वाजत गाजत नेण्याची हिंदूंची जुनी वहिवाट आहे. पण १९२४ सालीं मिरवणुकीचे वेळीं हिंदूंनीं कसलींच वाद्यें वाजवितां कामा नये असा

मुसलमानांनीं हट्ट धरला. स्थानिक अधिकाऱ्यांनीं हिंदूंना वाद्यें वाजविण्यास बंदी केली. पण फक्त झांजांना परवानगी शिकस्तीनें मिळाली. तरी पण मिरवणुकीचे वेळीं मुसलमानांनीं मोठा दंगा केलाच. कित्येक ठिकाणीं आगी लावण्यांत आल्या आणि शाहाद्याच्या पालखीस मशिदीवरून जाण्याची बंदी करण्यांत आली. बुरोडी येथें १९२६ सालीं पूर्वापार वहिवाट असतांहि पालखीस मुसलमानांनीं अडथळा केला. अधिकाऱ्यांनीं मुसलमानांच्या धाकदपटशास भिऊन हिंदूंच्या वहिवाटीविरुद्ध हिंदूंनींच वाद्यें बंद करावीं असें फर्माविलें. आणि हिंदूंनीं मात्र त्याप्रमाणें तो हुकूम अन्याय्य असतांहि मान्य केला. तरी देखील हिंदूंच्या मिरवणुकीवर मुसलमानांनीं छापा घातलाच. त्यांत एक हिंदू ठार व कित्येक जखमी झाले. खारेपाटण येथें हिंदूंची मशिदीवरून वाद्यें वाजवीत जाण्याची पूर्वापार वहिवाट आहे व ती मुसलमानांना मान्य असल्याबद्दल त्यांनीं हिंदूंना लेख लिहून दिले आहेत. तरी देखील त्या मार्गानें हिंदूंनीं वाद्यें वाजवीत मिरवणुकी काढूं नयेत असा मुसलमानांनीं हट्ट धरला. जी मशीद नव्हती ती मशीद आहे म्हणून दावा सांगितला आणि आमचा हट्ट न पुरविल्यास आम्ही दंगा करूं असा धाक घातला. शेवटीं न्यायप्रेमी सरकारनें असा हुकूम सोडला कीं, हिंदूंनीं त्यांची वहिवाट असली तरी वाद्यें बंद केलीं पाहिजेत. रत्नागिरी येथें तर एक केवळ घरगुती दर्गा आहे. त्यापुढेंहि वाद्यें वाजवितां कामा नयेत असा हेकेखोर मुसलमानांनीं दुराग्रह धरला आणि अधिकाऱ्यांनीं त्या रस्त्यानें मिरवणुकीस जाण्यास परवानगी दिली नाहीं. इ. सन १८९४ सालीं पुण्यांत नागपंचमीची मिरवणूक गणेश पेठेंतील दर्ग्यावरून वाजवीत जाऊं देऊं नये असा पोलिसांनीं बेत केला व तसे जाहिरनामेहि काढण्यांत आले. ही बंदी गैरकायदा असल्याबद्दल हिंदूंनीं डि. मॅजिस्ट्रेटकडे तक्रारी केल्या, पण त्यांनीं तक्रारींचा निकालच केला नाहीं ! मिरवणूक निघाली. वाजतगाजत मशिदीजवळ गेली. तिला पोलिसांनीं बंदी केली व लोकांचे वर चाल करून त्यांस अटकेंत टाकलें. आणि पोलिस ॲक्टाप्रमाणें त्यांचेवर खटले भरले. या प्रकारामुळें हिंदूंना आपले हक्क अबाधित ठेवण्यास हेकेखोर मुसलमान व त्याहिपेक्षां जुलमी व पक्षपाती असें सरकार कसे व्यत्यय आणतें हें स्पष्ट होतें. ४-९-९४ च्या अंकांत केसरीकारांनीं म्हटलेंच आहे कीं, ‘ मशिदींवरून ‘ वाजवीत गेलें तरी गुन्हा ! न गेलें तरी गुन्हा ! ! मिरवणूक काढली नाहीं तर ‘ दाव्याचें कारण घडत नाहीं. काढली तर शिक्षा होते. असा हा साहेबांचा ‘ न्याय आहे व हाच न्याय टिकेल तर हिंदु लोकांत असंतोष उत्पन्न होऊन ‘ पोलिसांचे काळपुरुष यमदूताप्रमाणें लवकरच गांजूं लागतील अशी आम्हांस ‘ धास्ती वाटते. ’

**हिंदूंचा शेळपटपणा**—केसरीनें १८९४ सालीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं

'मुसलमानांनीं हवी तशी दांडगाई करावी व सरकारनें ती चालूं द्यावी यावद्दल
'आमची नाखुषी सरकारास व मुसलमान लोकांस कळविण्यास जे जे कायदेशीर
'उपाय असतील ते जर आम्हीं केले नाहींत तर आमच्या हक्कांची व सामाजिक
'अधिकारांची पायमल्ली होण्यास फार उशीर लागणार नाहीं हें प्रत्येकानें पूर्ण
'लक्षांत ठेवावें.......मुसलमान लोक उद्दाम झाले असतां सहिष्णुतेच्या नांवानें
'अभिमानशून्यता झांकून ठेवण्याचा मूर्खपणा' (१७-७-९४) हिंदूंनीं करूं
नये. वास्तविक तह होतो तो समसमानांमध्यें. मुसलमानांनीं हिंदूंशीं तहाचें बोलणें
लावण्याइतका चिवटपणा अद्याप हिंदूंच्यांत कायम आहे येवढें हिंदूंना निःसंशय
दाखविलें पाहिजे. कारण असें कीं हिंदुलोक ठिकठिकाणीं पड खातात असें पाहून
उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान लोक त्यांस अधिक अधिक चेपीत चालले आहेत.
मुसलमानांच्या मशिदीवरून वाद्यें वाजवीत जाण्याचा आपला हक्क हिंदूंनीं हिंदु-
मुसलमानांच्या पूर्वीच्या दंग्यांत सोडून दिला. उलट मुसलमानांना मात्र हिंदूंचे
देवळांवरून वाद्यें वाजवीत जाण्याची मनाई नाहीं. आतां या नव्या मनूंत शेफा-
रलेल्या मुसलमानांना हिंदूंनीं आपल्या आरतीचे वेळीं झांजा वाजविल्या तरी
देखील त्यांच्या नाजूक कानांस सहन होईनाशा झाल्या आहेत. केसरी म्हणतो
कीं—'हिंदूंच्या जागीं दुसरा एखादा स्वाभिमानी समाज असतां तर आजपर्यंत
'जेवढा अन्याय व उपमर्द झाला तेवढ्यानेंच तो चिडून जाऊन त्यानें प्रतिकारास
'प्रारंभ केला असता. पण हिंदूंना चीड येण्याला आणखी किती जुलूम व्हावयास
'पाहिजेत!' (४-१०-२७).

**सरकारचें अंतरंग**—सरकारचें धोरण पाहावें तर तें धडधडीत पक्षपाताचें आहे. भेदनीतिप्रवीण सरकारास जेणेंकरून दोन्ही समाजांत बिघाड जास्त होईल अशा सर्व गोष्टी अवश्यमेव पाहिजेत. दोन्ही समाजांचे अस्वस्थतेमध्यें त्यांच्या राज्याचें अस्तित्व व चिरस्थायित्व आहे. आणि या धोरणास अनुसरूनच सरकारी अधिकारी उघड उघड अन्याय व पक्षपात करीत आले आहेत व करीत आहेत. शिवपुरास हिंदूंचे वस्तींत चार देवळांचे मध्यें एक मशीद बांधण्याचा मुसलमानांनीं उपक्रम केला. त्याबद्दल हिंदूंनीं ताबडतोब तेथील डि. मॅ. कडे तक्रार केली. पण त्या अर्जाची सुनावणी होण्याचे अगोदरच मशीद पांढरी झाली. नंतर या मुळापासूनच हिंदूंचे मुळावर आलेल्या मशिदीपुढें वाद्यें वाजविण्यांत येऊं नयेत म्हणून तेथील डि. मॅ. साहेब बहादुरांनीं हिंदूंच्यावर नोटीस बजाविली! यास म्हणावें न्याय!! आणि इतका धडधडीत अन्याय होत असतांना मुसलमानांनीं शेफारून जाऊन कसल्याच तडजोडीस नाकबूल व्हावें यांत मुसलमानांचेचकडे दोष कसा येतो!

**वहिवाटीची शाबिती**—केसरीकारांनीं वेळोवेळीं लिहिल्याप्रमाणें वाद्यांच्या प्रश्नांचा निकाल वहिवाटीस अनुसरूनच करणें योग्य आहे. आणि एकदां वहि-

वाट शाबीत झाल्यावर त्याप्रमाणें न्यायाची अंमलबजावणी मुलकी अधिकाऱ्यांनीं केली पाहिजे. पण कायद्याची आपली तऱ्हा विचित्रच ! वांईच्या एका गृहस्थानें अकरा मुसलमानांवर हिंदूची मशिदींवरून वाद्यें वाजवीत जाण्याची वहिवाट आहे असा ठराव होण्याकरतां म्हणून दावा केला. हेतु हा कीं यामुळें तरी वहिवाटीच्या प्रश्नाचा निकाल एकदांचा लागेल. पण वहिवाट आहे कीं नाहीं या मुद्दयावर मेहेरबान कोर्टानें निकालच दिला नाहीं. कारण अशाच तऱ्हेच्या दाव्याबाबत रावेर प्रकरणांमध्यें नामदार हायकोर्टाचा ठराव झालेला आहे. आणि त्याप्रमाणें सर्व जातींचा हक्क अगर वहिवाट यासारख्या सार्वजनिक हक्कास प्रतिबंध झाला तर त्यासंबंधानें दिवाणी दावा आणण्याचा अधिकार कोणत्याहि एका विशिष्ट व्यक्तीस प्राप्त होण्यास त्या व्यक्तीचे सदर प्रतिबंधापासून सर्व जातींचें जें नुकसान झालें असेल त्यापेक्षां कांहीं तरी ज्यास्त व विशिष्ट असें नुकसान झालें असलें पाहिजे. त्याशिवाय त्यास दावा आणतां येत नाहीं. एवंच दिवाणी दावा लागत नाहीं आणि मुलकी वहिवाटीचे प्रश्नाचा निकाल करूं शकत नाहींत. मात्र दुसरीकडे पोलिस ॲक्टांत म्हटलें आहे कीं अशा प्रश्नांचा निकाल कोर्टमार्फत करून घ्यावा. या सर्वांचा मेळ कसा बसावा ? नुकताच अलाहाबाद हायकोर्टानें दिलेला या बाबतींतील निकाल मात्र विचार करण्यासारखा आहे. त्यामध्यें असा ठराव झाला कीं मशिदींवरून पाहिजे त्यावेळीं वाद्यें वाजवीत जाण्याचा अधिकार हिंदूंना आहे. अशा तऱ्हेच्या हक्कांच्या अंमलबजावणीसंबंधीं मद्रास हायकोर्टानें अशा सूचना केल्या आहेत कीं वाद्यांच्या प्रश्नाबाबत मॅजिस्ट्रेटनें सर्व लोकांच्या सुरक्षिततेकडे लक्ष पुरविलें पाहिजे. अशा प्रसंगीं खाजगी हक्कांमध्यें होईल तितकी कमी ढवळाढवळ करावी. हल्लींचें सरकार सर्व धर्मांशीं निःपक्षपातपणानें वागण्याचें प्रसिद्धपणें कथन करतें. यास्तव पूर्वींचे सरकारचे वेळीं जी म्हणून वहिवाट होती ती हल्लीं गैरवाजवी होऊं शकेल या गोष्टीचाहि विचार करून एकामताचे लोकांस वगळून दुसऱ्या मताचे लोकांवर मेहेरबानगी न करण्याचा मॅजिस्ट्रेटनें कसोशीनें यत्न करावा.

**हें खूळ इंग्रजांचेंच राज्यांत**—पण सरकारचें प्रत्यक्ष धोरण काय हें पाहिलें म्हणजे संतापानें मन उद्विग्न झाल्याशिवाय राहात नाहीं. नागपूर येथील विजयादशमीचे दिवशीं निघणारी भोंसले सरकार यांची स्वारी मशिदीवरून वाजवीत नेऊं नये म्हणून डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांचा हुकूम निघाला. तशा तऱ्हेचा अपमान व पूर्वापार चालत आलेल्या न्याय्य हक्काची होणारी बुद्धिपुरःसर हेटाळणी व पायमल्ली सहन न होऊन श्रीमंतांनीं १९०३ मध्यें स्वारीच काढली नाहीं. या बाबतींत त्यावेळीं केसरीमध्यें आलेले विचार मननीय आहेत. केसरी (१३-१०-०३) म्हणतो 'भोसल्यांची दसऱ्याची स्वारी ही आजकालची 'मिरवणूक नव्हे व भोसले यांचें घराणें स्थापन झाल्यापासून मुसलमानांनीं तीस

'कधींहि हरकत घेतली नाहीं....मशिदीवरून वाद्यें वाजवूं नयेत, हें खूळ इंग्रज 'सरकारचे राज्यांत जसें मुसलमानांचे डोक्यांत भरलें आहे तसें तें पूर्वी कधींच 'भरलें नव्हतें. इंग्रजी राज्यांत, हिंदूंच्या धर्मसमजुतीस अनुकूल असा गोवध- 'बंदीचा नियम काढून टाकण्यांत आला. इतकेंच नव्हे तर मुसलमानांस नस- 'लेले हक्क त्यांनीं बजावावे अशाबद्दल त्यांना उत्तेजन देण्यांत आलें.' या- संबंधीं केसरीकारांनीं पूर्वीच सरकारास दिलेला इषारा महत्त्वाचा आहे तसाच तो यथार्थहि आहे कीं, 'लोकमताप्रमाणें जिल्ह्यांतील अधिकाऱ्यांस आपआपलीं 'कामें करावीं लागतील व या लोकमतास न जुमानणाऱ्या गव्हर्नरास स्वदेशीं 'परत जावें लागेल' (१२-१-९५).

**स्वावलंबन व सामाजिक बहिष्कार**—'मुसलमान बंधूंस हे सरकारी 'पक्षपाती धोरण मोठें फुशारकीचें वाटेल. पण यापासून त्यांचें हित व्हावयाचें 'नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांचे दुर्वर्तनास आळा बसण्याचा जर कांहीं संभव 'असला तर तो हिंदुमुसलमानांची एकी झाल्यानेंच आहे. न्याय व मामुली 'वहिवाट हीच प्रघात धरून दोघांनींहि आपलें वर्तन ठेविलें पाहिजे. असें 'होईल तर हिंदू लोक स्वभावतःच मुसलमान लोकांशीं कमी संबंध ठेवण्यास 'प्रवृत्त होतील. आणि त्यापासून दोघांसहि सौख्य नाहीं.' अशा तऱ्हेनें मुसल- मान लोक उद्दामपणानें वागतील तर हिंदूंनीं त्यांच्याशीं कमी संबंध ठेवावा, अगर जरुरीपुरता सामाजिक बहिष्कार घालावा अशाविषयीं केसरीनें वेळोवेळीं लिहिलें आहे. आणि त्याचा समाजावर यथेष्टच परिणाम झालेला दिसून येतो. १७-७-९४ च्या अंकांत 'आजपर्यंतच्या मुसलमानांच्या वर्तनावरून त्यांच्याशीं 'संबंध ठेवूं नये असें हिंदू लोकांस वाटूं लागलें. सर्व राष्ट्रभर अत्यंत पूज्य 'मानलेल्या पालखीस दर्ग्यावरून वाजत जाण्यास मुसलमानांनीं प्रतिबंध करावा 'आणि हिंदूंनीं मात्र हसनहुसेनाची मढीं काढण्यास खांदा द्यावा असला हिंदु- 'मुसलमानांमधील स्नेह आम्हांस नको आहे. मुसलमान आणि हिंदु यांचे हक्क 'राज्यांत सारखेच आहेत. आणि तो सारखेपणा कायम ठेवून आम्ही मुसलमानांशीं 'स्नेह करण्यास तयार आहों....यंदां पुण्यांत मोहोरमचा सण फारच चमत्कारिक 'झाला. दरसाल डोले ४०।५० मुसलमानांचे व १०० हिंदूंचे असत. 'यंदां मुसलमानांचे ६० व हिंदूंचे २५ च होते. हिंदु वाजंत्र्यांपैकीं एकहि 'चौघडेवाला वाजविण्यास गेला नाहीं व हिंदु लेझीमवालेहि नजरेस पडले 'नाहींत....समारंभ उदासीनतेनें व शांतपणानें पार पडला. म्हणजे उत्सव मूळ 'पीठिकेप्रमाणें बहुतेक प्रेतोत्सवाप्रमाणें झाला.' तसेंच १८९५ सालींहि केसरी- नें असें स्पष्टपणें बजावलें आहे कीं, 'सरकारास शेफारलेल्या मुसलमान 'लोकांस आवरून धरतां येत नाहीं. अथवा धरण्याची इच्छा नाहीं....आणि 'आम्हीं त्यांच्याशीं व्यवहाराची बंदी केली तीहि खपत नाहीं. हिंदु लोक गरीब

' खरेच. पण आम्ही अद्याप इतके निःसत्त्व झालों नाहीं कीं हर्षविषाद एकीकडे
' गुंडाळून ठेवून मुसलमान लोकांस हवें तें करूं देऊं, आणि सरकार आपल्या
' तव्येतीनुसार दाद घेईतोंपर्यंत स्वस्थ हरि हरि—अगर हारीस हारीस†—करीत
' बसूं. मुसलमानांनीं एखादी गोष्ट केली आणि तिचा प्रतिकार सरकारांतून
' झाला नाहीं, तर हिंदूंनीं आपली सोय पाहावयास नको काय ? ' (१२-२-९५).
अशा तऱ्हेनें केसरीनें हिंदु समाजास वेळोवेळीं स्वावलंबनाचे धडे दिलेले आहेतच. परंतु सरकारी अधिकाऱ्यांचें या बाबतींतील वर्तन आहे तें अगदींच अन्यायाचें, अरेरावीचें किंबहुना मूर्खपणाचें आहे. किंवा दुसऱ्या पक्षीं हिंदु-मुसलमानांत अशा प्रकारची दुही माजविणेंच त्यांना श्रेयस्कर वाटत आहे. तळेगांव दाभाडे येथील मिरवणूक १९२७ सालीं डि. मॅ. नीं संगिनीच्या जोरावर बंद पाडली. तसेंच नाशिक येथील काजीपुऱ्यांतील विठ्ठलमंदिरांतील भजन देवळावरून ताबूत अगर स्वाऱ्या जात असतांना बंद ठेवण्याचा हुकूम डि. मॅ. यांनीं काढला. हिंदूंच्या मिरवणुकी मशिदीवरून जात असतांना हिंदूंनींच वाद्यें बंद करावीं. व मुसलमानांच्या मिरवणुकी देवळावरून जात असतांना पुनः हिंदूंनींच भजन बंद करावें. कोणीकडूनहि गेलें तरी हिंदूंना बंधन आणि मुसलमानी समाज मात्र मोकाट ! कारण काय ? तर तो दंग्यास तेव्हांच प्रवृत्त होतो ! यावरून हें स्पष्ट होतें कीं मशिदी व वाद्यें यासंबंधाच्या हिंदु—मुसलमानांच्या भांडणांत बहुतेक सर्व ठिकाणीं अधिकाऱ्यांची कारवाई व फूस नडते व ज्या ठिकाणीं अधिकारी निःपक्षपाती असतात तेथें मुसलमानांचे हट्ट चालत नाहींत. कऱ्हाड येथील मुसलमानांनीं मशिदीवरून दिंडी वाजवीत नेण्यास हरकत केली. राजापूर येथें मेळ्यांचीं पदें व जयघोष हेहि मशिदीवरून होऊं नयेत अशी मुसलमानांनीं मागणी केली. पण दोन्ही ठिकाणीं हिंदूंची जूट व अधिकाऱ्यांची जबाबदार वर्तणूक यामुळें दंगा न होतां शांतपणें मिरवणुकी पार पडल्या. वऱ्हाडांत, अकोल्यासहि असेंच झालें.

**संस्थानिकहि इंग्रजांच्याच माळेचे**—मुसलमान लोक मात्र वेळीं अवेळीं आपल्या हटवादीपणाचा व बिनमुर्वतखोरपणाचा कळस करून व अधिकाऱ्यांस दंग्याची भीति घालून आपला कार्यभाग साधून घेण्याची कारवाई करीत असतात. अशा गोष्टी म्हणजे इंग्रजी अमलांतच होतात असें नाहीं. तर संस्थानांतहि आणि विशेषतः हिंदू संस्थानांत देखील अशा गोष्टी अनेक वेळां घडून येतात. अक्कलकोट संस्थानांत मुसलमानांनीं वाद्यें बंद करण्याची आपली वहिवाट शाबीत करून घ्यावी असा तेथील अधिकाऱ्यांनीं निर्णय दिला असतांना मुसलमानांनीं तसें केलें नाहीं. कारण उघडच आहे कीं, बेकायदेशीर दंडेली जेथें चालते तेथें

† लॉर्ड हॅरीस;—मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर.

कायद्याला कोण विचारतो ? १९२७ सालीं तेथील पोलिस अधिकाऱ्यांनीं व सबडिव्हिजनल मॅजिस्ट्रेट यांनीं गणपतीचे मिरवणुकीस बंदी केली; व मिरवणूक जाऊं दिली नाहीं. अशा तऱ्हेचा हिंदुस्थानांतील हिंदु संस्थानांत हिंदु अधिकाऱ्याकडून होणारा प्रकार पाहून प्रत्येक हिंदुमात्राचें मन संतापानें उद्विग्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण पुढें अक्कलकोटनें आपलें नांव सार्थ केलें व दोन वर्षांनंतर का होईना, पण तेथील अधिकाऱ्यांना एकदांची अक्कल सुचली आणि मुसलमानांनीं आपला हक्क दिलेल्या मुदतींत दिवाणी कोर्टांतून शाबीत करून घेतला नाहीं, सबब त्यांचा हट्ट व हक्क निराधार ठरविण्यांत आला आणि मिरणूक वाजत गाजत मशिदीवरून थाटानें पार पडली.

**राष्ट्रीय सभा ही मुसलमानांची मशीद नव्हे**—मुसलमानांतील 'विचारवंत ' गणलेले पुढारी ' विकारवश ' कसे असतात व त्यांना त्यांच्या वेडगळ धर्मसमजुतीपुढें इतर गोष्टी कशा तुच्छ वाटतात याचें प्रत्यंतर कोकोनाडाच्या काँग्रेसचे वेळीं आलेलें आहे. कोकोनाडा येथील हिंदी राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनास मौलाना महंमद अल्ली अध्यक्ष होते. राष्ट्रीय वृत्ति बाजूस ठेवून स्वजातीय धर्मसमजुतीचें घोडें पुढें कसें दामटावें या बाबतींत अध्यक्षांनीं त्यावेळीं चांगलीच कारवाई केली. पण घोडा जरी बेफाम झाला तरी कांटेरी लगाम त्यासहि ताळ्यावर आणतोच. कोकोनाडा येथील काँग्रेसमध्यें असा बूट निघाला कीं, राष्ट्रीय सभेच्या मंडपाच्या आवारांत कोणतेंच वाद्य वाजविलें जाऊं नये. सदर प्रश्न मौलवींनीं प्रथम उपस्थित केला. सर्व मुसलमानांस तो तावडतोब पटला व महंमद अल्लींनीं त्यावर शिक्कामोर्तब केलें. स्वागतमंडळाच्या स्वयंसेवकांना त्यांच्या अंमलबजावणीचे करडे हुकूम सुटले व वाद्यांना मज्जाव झाला. पहिलें वंदेमातरम्‌चें व दुसरें स्वागताचें पद साध्या पेटीशिवाय म्हटलें गेलें आणि आंध्र प्रांतीय लोकांनीं या विलक्षण हुकुमास हरकत घेतली नाहीं. यानंतरची पाळी सुप्रसिद्ध गायनाचार्य पंडित विष्णु दिगंबर पलुसकर यांच्यावर आली. त्यांच्या सांथीला अगदीं जरूर लागणारी हातपेटी, फिडल्, तबला वगैरे वाद्यें मंडपांत आणण्याचे वेळींच त्यांना मनाई असल्याचें सांगण्यांत आलें. पण तें त्यांनीं मानिलें नाहीं. त्यांची पद म्हणण्याची पाळी आली तेव्हांहि पुनः वाद्यें सुरू करण्यास हरकत आली. तेव्हां महंमदअल्लींना विचारतां त्यांनींहि मनाईचा हुकूम सोडला. त्यामुळें वाद्यांना राष्ट्रीय सभेंतून कायमचा अर्धचंद्र मिळतो कीं काय याची भीति वाटूं लागली. पण महाराष्ट्रीय पंडितजींना हा अपमान थोडाच सहन होणार ? पंडितजींनीं खणखणीत आवाजांत महंमदअल्लींना जबाब दिला कीं—' राष्ट्रीय सभा म्हणजे कांहीं मुसलमानांची ' मशीद नव्हे किंवा खिलाफतपरिषदहि नव्हे. राष्ट्रीय सभा जशी मुसलमानांची ' तशीच ती हिंदूंची व इतरांचीहि आहे. या राजकीय सभेंत वाद्यें वाजवूं नका

'असा आपण आग्रह धरतां याचा अर्थ काय ? आपण स्वतः निरनिराळीं वाद्यें 'वाजवीत ढोलग्यांच्या आवाजांत सभारंभानें मिरवीत राष्ट्रीय सभेच्या मंडपांत 'आलां, त्यावेळीं आपण वाद्यांना बंदी कां केली नाहीं ? गायनाच्या वेळीं वाद्यांना 'बंदी ही नोकरशाहीचीच अरेरावी झाली.' या स्पष्टोक्तीचें अंजन डोळ्यांत पड-तांच पंडितजींना वाद्यें वाजविण्याची परवानगी देण्यांत आली आणि या स्वाभि-मानी महाराष्ट्रीयाच्या बाणेदारपणामुळें राष्ट्रीय सभेच्या मागें लागणारी ही ब्याद टळली म्हणावयाची. अशा तऱ्हेनें मुसलमानांतील प्रतिष्ठित लोक आपल्या वजनाचा कसा गैरवाजवी उपयोग करूं पाहतात त्याचें हें एक सुंदर नमुनेदार उदाहरण आहे. हें झालें मुसलमान व्यक्तींचें कार्य !

**सत्याग्रहाचें अमोघ अस्त्र**—पण बहुतेक ठिकाणीं त्रयस्थ असें सरकार आपल्या अधिकाराचा उपयोग माथेफिरु लोकांच्या दंडेलीच्या दटावणीस भिऊन पूर्वापार वहिवाटीनें मान्य केलेले व न्यायकोर्टांनीं शाबीत धरलेले हिंदु लोकांचे वाजवी हक्क त्यांना उपभोगूं न देण्याकरितां करीत आहे. केसरीनें म्हटल्याप्रमाणें ' जोंपर्यंत सरकारी अधिकारी न्याय व वहिवाट यांचें संरक्षण न करतां केवळ ' दंडेली करणाऱ्यांच्या मुर्वतीसाठीं अन्यायानें मिरवणुकी बंद पाडतात तोंपर्यंत ' प्रजाजनांना सत्याग्रह व स्वावलंबन याखेरीज तरणोपाय नाहीं '-(३०-८-२७). व त्याबद्दल स्वतः सरकारच जबाबदार आहे. त्याचें प्रत्यंतर अलीकडे पुष्कळ ठिकाणीं येत आहे व आलें आहे. १९२५ सालीं पतुआखली येथें जन्माष्टमी-निमित्त हिंदूंनीं मिरवणूक काढली असतां तिला मुसलमानांनीं वाद्यांच्या सबबीवर हरकत घेतली व सरकारनें मिरवणुकीस बंदी केली. परंतु हिंदु लोकांनीं सत्याग्रह पुकारला व तो सतत दोन वर्षें सारखा चालवून शेवटीं 'हिंदूंना वाटेल त्यावेळीं वाद्यें वाजवीत जाण्यास हरकत नाहीं,' अशी मुसलमानांनीं हिंदूंना लेखी कबुली दिली व सत्याग्रह यशस्वी झाला. १९२७ सालीं रत्नागिरीस गोकुळआष्टमीचे दिवशीं निघालेल्या पालखीस मुसलमान आडवे झाले असें समजल्याबरोबर सर्व प्रकारचे हिंदु लोक तिच्या संरक्षणार्थ सज्ज झाले. आणि मुसलमानांना आपला अयोग्य हट्ट सोडावा लागला. त्याचप्रमाणें तळेगांवदाभाडे येथें १९२७ सालीं वारकरी मंडळींनीं सत्याग्रह करून पोलिसांचा हुकूम न जुमानतां भजन करीत पालखीची मिरवणूक मशिदीपुढून नेली. केसरी म्हणतो कीं—'या यशाचें मर्म संघटनाशक्तींत व सत्याग्रहांत आहे ' (२४-७-२८) हें विसरतां उपयोगी नाहीं.

---

# गोरक्षण

[ श्री. बाळकृष्ण मार्तंड चौंडे. ]

सामान्यतः राजकारणी पुढारी व वर्तमानपत्रें यांची कल्पना अशी असते कीं, एक राजकारण केलें म्हणजे त्यांत सगळें कांहीं आलें; राजकारणापुढें सर्व विषय तुच्छ होत. परंतु केसरीचें धोरण आरंभापासून याहून वेगळें दिसतें. ता. २५-१०-८७ च्या अंकांतील एका स्फुटांत गोरक्षणाविषयींचे ' केसरी 'चे विचार पुढीलप्रमाणें प्रगट झाले आहेत. मुंबईच्या कांहीं पारशी व गुजराथी प्रमुख मंडळींनीं त्यावेळीं सरकारकडे अर्ज करण्याची खटपट चालविली होती, त्याबद्दल लिहितांना केसरी म्हणतो, —' या इंग्रजी राज्यांत बिचाऱ्या गाईचा कोणीच ' पुरस्कर्ता राहिला नाहीं. आमच्या शास्त्राप्रमाणें गाईब्राह्मणांचा प्रतिपाळ राजा-' नेंच केला पाहिजे. परंतु ह्या एकोणिसाव्या शतकांत हें जुन्या लोकांचें शास्त्र ' काय उपयोगी ! ' गोब्राह्मणप्रतिपालक ' ही पदवी मिळविण्याकरितां आमच्या ' आर्य राजांना किती दीर्घ प्रयत्न करावा लागे, किती दक्षता ठेवावी लागे आणि ' किती धर्मभीरुत्व मनांत वागवावें लागे ! परंतु हल्लींचा मनूच निराळा; हल्लींच्या ' राज्यकर्त्यांना गाईचा प्रतिपाळ करणें कोठून आठवणार ? त्यांच्या स्वतःच्या व ' त्यांच्या स्वजातीयांच्या उदरपूरणार्थ आज हजारों अनाथ गाईंचा चक्काचूर उडत ' आहे. आमचे राजे हजारों गाईंना पाळीत असून त्यांच्या दुभत्यावर आपण व ' आपले प्रजाजन पुष्ट होत होते; पण तो काळ आतां गेला. इसापनीतींतील ' सोन्याचीं अंडीं घालणाऱ्या हंसीच्या मालकानें अधिक आशेनें हंसीच गट्ट केली ' व मग पश्चात्तापांत पडला, त्याप्रमाणें या युरोपियन लोकांची नुसत्या दुधानें ' तृप्ति न होतां, आज हजारों मुलांना केवळ दाईसारखें संतोषानें पोसणारी जी ' गाय तिच्यावरच यांच्या क्षुधेची धाड पडते. आम्हां हिंदूंना देवासमान गण-' लेल्या गाईची ही अवस्था पाहून अत्यंत दुःख होतें; परंतु आमच्यांत सत्त्व-' गुणाचा अंश अधिक असल्यानें कितीहि दुःख झालें तरी तें आम्ही गिळून जातों. ' तथापि मधून मधून हा गाईचा चाललेला होम कोणत्याहि उपायानें कमी ' होईल तर पहावा, या हेतूनें आमच्यांतील कोंवळ्या अंतःकरणाच्या लोकांची ' खटपट चालू असते. आजपर्यंत असल्या प्रयत्नांस यश आलें नाहीं; पुढेंहि ' पण येईलच असें आज म्हणतां येत नाहीं. तथापि जे प्रयत्न करतात त्यांस शाबा-' सकी दिली पाहिजे....असल्या प्रयत्नांस यश यावें अशी आमची मनापासून ' इच्छा आहे. हस्तें परहस्तें प्रत्येक हिंदु म्हणविणाऱ्यानें या सत्कृत्यास मदत ' केली पाहिजे. '

पुढें त्याच सालीं मद्रास येथें भरलेल्या कांग्रेसमध्यें नवसरीच्या प्रतिनिधींनीं गोवधबंदीचा प्रश्न काढला असतां तेथें जो प्रकार घडला त्यासंबंधीं लिहितांना केसरी म्हणतो, 'गोवधाविषयीं आम्हां हिंदूंना त्वेष यावा खरा, पण या इंग्रजी 'राज्यांत तो त्वेष आंतल्या आंत जिरला जात आहे. अगोदर मुसलमानांनीं 'व त्यांच्या मागून या इंग्रजांनीं, आमच्या दैवत मानलेल्या गाईस आपल्या 'भक्ष्यस्थानीं घालण्याचा तीनचारशें वर्षें सारखा क्रम ठेविल्यामुळें आम्ही निराश 'झालों आहों, व हल्लीं देशांत गोवधप्रतिबंधाविषयीं जी चळवळ दिसत नाहीं 'तिचें कारण तरी हें नैराश्यच असावें. गोवधाचा प्रश्न पुढें आला कीं, आमचे 'मुसलमानभाई किती बिथरतात याचा दाखला परवांच कांग्रेसच्या वेळीं आला. 'नवसरी प्रांतांतून कांहीं मुखत्यार हा गोहत्येचा प्रश्न कांग्रेसपुढें आणावा अशा 'निश्चयानेंच आले होते. परंतु त्यांनीं तेथें या प्रश्नाचें नांव काढलें मात्र, 'त्याबरोबर मुसलमान डेलिगेटांनीं आपली नाखुषी स्पष्टपणें दर्शविली. हा प्रश्न जर 'पुढें आला असता तर आम्हांस अनुकूल असलेले मुसलमान लोक देखील प्रतिकूल 'झाले असते. सारांश या विषयाची चर्चा करतांना फार सावधगिरी ठेविली 'पाहिजे. किती झाले तरी आम्ही हिंदु लोक शांत स्वभावाचे. आजपर्यंत ज्या-'प्रमाणें त्वेष गिळावा लागला तसाच आणखी कांहीं दिवस गिळला पाहिजे. 'मुसलमान लोक अनुकूल झाले तर ही गोष्ट सुसाध्य आहे. नाहीं तर आपल्या 'इच्छेनुरूप कांहीं लवकर होईलसें वाटत नाहीं.' ( ३१-१-२८ ).

धार्मिक किंवा गोरक्षणाचें ध्येय असलेल्या नियतकालिकांप्रमाणें तीव्र भावनो-त्तेजक लेख केसरीचे नसले तरी गोरक्षणाचें राष्ट्रीय महत्त्व व व्यावहारिक उप-युक्तता हीं केसरीनें कधींहि दृष्टीआड केलीं नाहींत. 'गोमांसासाठीं गोवध 'करण्याची सवड इंग्रज सरकारनें ठेवल्यानें घातक परिणाम किती होत आहेत तें 'पहा! गाईचा वध होत असल्याकारणानें शेतकीच्या बैलांचा पुरवठा एक-'सारखा कमी होत आहे व त्यामुळें जमिनीची मशागत चांगली होत नाहीं. 'शेणमुताचें खतहि जमिनीस भरपूर मिळत नाहीं. थोडें मिळतें त्या शेणाचा 'उपयोग सर्पणाकडे होत आहे. दुभत्या जनावरांचा तुटवडा पडत असल्यामुळें 'दुधातुपाची महागाई झाली आहे. त्यामुळें व भेसळीच्या दुधामुळें राष्ट्राच्या 'आरोग्यास मोठाच धक्का बसत आहे. अर्थात् गोवधाच्या बंदीचा प्रश्न राष्ट्रीय 'असून त्याचा सरकारनें त्वरित निकाल लावणें अगत्याचें झालें आहे. जंगलां-'तील क्रूर व रानटी जनावरें नामशेष होऊं नयेत म्हणून त्या त्या जातीच्या 'माद्या मारूं नयेत असा सगळ्या जगांतल्या शिकारी लोकांचा नियम आहे. 'सरकारहि शिकारीचे कायदे करून त्या प्राण्यांचें संरक्षण करतें. अमिरानेंहि 'गोवध बंद केला आहे. परंतु हिंदुस्थानांतील शेंकडा ८० लोकांच्या उप-

' जीविकेचें साधन असलेल्या शेतीस अत्यंत उपयोगी अशा बैलांचा पुरवठा सालो-
' साल कमी करणारा व मागेंपुढें अजिबात बंद करणारा गोवध मात्र सरकारनें
' चालू दिला आहे, हें राष्ट्रीय दृष्टीनें अत्यंत घातक आहे. हिंदुस्थानांतील सोजीर
' लोकांस पुरविण्यासाठीं या देशांतील सुमारें १४६००० जनावरें दरसाल मार-
' ण्यांत येतात आणि यांपैकीं सुमारें शेंकडा ८० गाई असतात, असा जबलपूरचे
' पार्शी गृहस्थ मि. जसावाला यांनीं अंदाज केला आहे. सरकारनें मुद्दाम कायदा
' करूनहि गोवध बंद करण्याइतका हा प्रश्न निकरावर आलेला आहे, असें
' आम्हांस वाटतें.' ( १२-१०-०९ ).

सन १९२७ च्या सप्टेंबरमध्यें मुंबई इलाख्याचे त्या वेळचे गव्हर्नर सर लेस्ली त्रुइल्सन यांच्या अध्यक्षतेखालीं पुण्यास एक सभा होऊन कॅटलब्रीडिंग व डेअरी फार्मिंग असोसिएन नांवाची संस्था काढण्याचें ठरलें आणि त्यासाठीं एक कमीटीहि नेमण्यांत आली. राष्ट्राचें आरोग्य, जीवन, व्यापार, कृषिकर्म इत्यादिकांस आवश्यक अशा या गोरक्षणाच्या कामीं आजपर्यंत शेंकडों लोकांनीं अनेक प्रकारें अर्ज, विनवण्या वगैरे केल्या असतां त्यांस नेहमीं वाटाण्याच्या अक्षता लावणाऱ्या इंग्रज सरकारला गोरक्षणाबद्दल एकदम इतका पान्हा कसा फुटला याचें आश्चर्य त्या वेळीं सर्वांसच वाटलें. आणि भावी व्हाइसरॉय कृषिप्रिय आहेत, त्यांच्या सुप्रसन्नतेसाठीं ही तजवीज असावी अशी बहुतेकांनीं कल्पना केली. परंतु हें असोसिएशनचें सोंग उभें करण्यांतला सरकारचा अंतस्थ हेतु केसरीनें मात्र बरोबर ताडला. केसरी म्हणतो—

' हिंदुस्थानांतील कत्तलखान्यांत होणाऱ्या दुभत्या व शेतीस उपयोगी अशा
' जनावरांच्या भयंकर संहारामुळें होणाऱ्या हानीची करुण कहाणी सरकारच्या
' कानींकपाळीं आजपर्यंत अनेक वेळां आदळली असतां या प्रश्नाबद्दल सरकारला
' आजच अचानक आस्थेचा उमाळा कसा आला हें कित्येकांस गूढ वाटत
' आहे. पण तें उकलणें फारसें कठीण नाहीं. गुरांचा भयंकर संहार इतकीं वर्षें
' चालल्यामुळें आतां कत्तलखान्यांत कत्तल करावयाला चांगलीं धष्टपुष्ट गुरेंच
' मिळत नाहींत अशी अडचण येऊं लागली आहे. तेव्हां चांगलीं गुरें उत्पन्न
' करण्याचें काम विशेष खर्च न करतां परभारें गोरक्षणी संस्था व सरदार इनाम-
' दार यांचेकडून उरकून घेण्याचें सरकारनें योजलेलें दिसतें ! या सभेंत चौंडे
' बुवांनीं गुरांचा संहार थांबवावा अशी सरकारास विनंति केली. डॉ. मॅन यांनीं-
' हि गुरांचा संहार ही एक राष्ट्रीय आपत्ति आहे असें सांगितलें आणि गव्हर्नरां-
' नीं या प्रश्नाबद्दल पोकळ सहानुभूति दाखविली. पण गुरांच्या संहारास कायद्या-
' नें बंदी करण्याचे बाबतींत मात्र त्यांनीं अवाक्षरहि काढलें नाहीं व जंगलां-
' तील गुरचराईचे बाबतींतील फाजील कडक नियम ढिले करण्यासहि सरकार
' तयार नाहीं.' ( ४।२०।२७ ).

केसरीचें अनुमान कसें अचूक आहे तें वांद्याच्या आंकड्यांवरून सिद्ध होतें. सन १९२३-२४ व १९२४-२५ सालीं अनुक्रमें ३३७२३ व ३०६८५ गोवध वांद्यास झाला होता; तो १९२६-२७ व १९२७-२८ सालीं १६८११ व १३७८२ झाला. गोवधबंदीचें एकमेव ध्येय पुढें ठेऊन सर्व गोरक्षणी संस्थांचें सहकार्य करावें आणि त्यासाठीं खेड्यापाड्यापर्यंत प्रचारकांचें जाळें पसरावें अशी श्रीगोवर्धन संस्थेची खटपट त्या सुमारास चालली होती. त्या सहकार्यास या सरकारी संस्थेनें शह बसून कित्येक गोरक्षणी संस्था सरकारच्या भेदनीतीस बळी पडल्या. अस्तु.

ब्रह्मदेशांत गुदस्तां 'बर्मा प्युअर मिल्क कंपनी' नांवाची ५॥ लक्ष रुपये भांडवलाची गोऱ्या भांडवलवाल्यांनीं एक कंपनी काढली; त्यासंबंधानें लिहितांना केसरीनें अशी टीका केली आहे कीं,––'(ही कंपनी) न्यूझीलंडहून गोठलेलें दूध 'व लोणी ब्रह्मदेशांत आणविणार व रंगून शहराला शुद्ध निर्भेळ ताजें दूध पुर- 'विणार आहे! ...हिंदुस्थानसरकारच्या जंगलविषयक धोरणानें दुधाळ जनावरें 'लोकांस ठेवण्याची ऐपत नाहींशी झाल्यावर वरीलप्रमाणें परकीयांच्या बोंडल्यानें 'तें देतील तें दूध पिण्याचा प्रसंग आल्यास त्यांत आश्चर्य कोणतें! आज ब्रह्म- 'देशांत जशी विदेशी कंपनी निघाली तशा उद्यां मुंबई, परवां मद्रास 'कलकत्ता येथें कंपन्या निघून त्या हा देश व्यापून टाकणार नाहींत कशावरून! 'प्रत्येक परकीय वस्तु पारतंत्र्याचा फांस दृढ करण्यास मदतच करीत असते ही 'गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. आज गाय निदान दृष्टीस तरी पडते. पुढें कदाचित् 'तिचें दर्शन चित्रांतच घ्यावें लागेल कीं काय अशी भीति कोणीं व्यक्त केल्यास 'ती अगदींच अनाठायीं ठरणार नाहीं....ही आगामी आपत्ति टाळण्यास पुढील 'उपाय केले पाहिजेत. दुभत्या व तरुण गाईम्हशींचा वध बंद करणें; दुभत्या 'गुरांची चांगली पैदास करण्यासाठीं संवर्धनक्षेत्रें उघडणें; गायरानें खुलीं करणें; 'सुशिक्षितांनीं दुग्धव्यवसाय हातीं घेऊन तो खेड्यांतील लोकांस पद्धतशीर करावयास 'शिकविणें; म्युनिसिपालिटीसारख्या स्थानिक स्वराज्य संस्थांनीं आपल्या शहरापुरतें 'तरी दूध पुरविण्यासाठीं दुग्धालयें काढणें. याप्रमाणें प्रयत्न न झाल्यास हिंदुस्थान दुधाच्या बाबतींतहि परावलंबी झाल्याखेरीज राहणार नाहीं.' गोरक्षणाची चळवळ करणारे लोक तरी यापेक्षां अधिक काय म्हणत आहेत?

गोरक्षणाच्या चळवळीचा साग्र इतिहास देण्याचें हें स्थळ नाहीं. महाराष्ट्राचें मुखपत्र म्हणून ख्याति पावलेल्या केसरीनें गोरक्षणाचे बाबतींत काय केलें याचें दिग्दर्शन करण्यासाठीं हा लेख लिहिला आहे. केसरीच्या प्रारंभापासून आतांपर्यंत निरनिराळ्या वेळीं व प्रसंगीं गोरक्षणाबद्दल जे अनेक लेख केसरीनें लिहिले आहेत, त्यांतील कांहीं उतारे वर दिले आहेत. त्यांवरून महत्त्वाच्या प्रत्येक विषयांत लोकांना विचारप्रवृत्त व सुसंस्कृत करण्याचें आपलें ब्रीद केसरीनें

गोरक्षणाच्या कामीं उत्तम प्रकारें संभाळलें असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. केसरीकडून आज ५० वर्षांवर घडत आलेली ही जनीजनार्दनसेवा श्रीसमर्थ-कृपेनें अशीच अखंड घडो.

---

## चॅन्सेलरांचीं भाषणें

[ श्री. दत्तात्रय बापू रानडे, एम्. ए. ]

केसरी हें महाराष्ट्राचें मुखपत्र आहे. लोकपक्षाचा कैवार घेऊन प्रबल, विधर्मी व भिन्न संस्कृतीच्या सरकारशीं टक्कर देण्यास नेहमीं सज्ज, अशी केसरीची ख्याति आहे. वर्तमानपत्र म्हणजे चोंहीकडून येणाऱ्या बातम्या पुरविणारें पत्र एवढाच संकुचित हेतु केसरी वर्तमानपत्राच्या मुळाशीं नसून, वेळोवेळीं उद्भवणाऱ्या महत्त्वाच्या प्रश्नावर निर्भीडपणें आपल्या मताचें प्रतिपादन, लोकमताचा वारा कोणत्या दिशेनें वाहात आहे याचें निदर्शन, व हिंदुस्थानची विचित्र राजकीय पद्धति सुधारण्याच्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन राज्यकर्त्यांच्या प्रत्येक महत्त्वाच्या कृत्यांतील राजकीय हेतूचें बहुजनसमाजास समजेल अशा तऱ्हेनें स्पष्टीकरण करणें हेंहि हेतु केसरीच्या मुळाशीं दिसून येतात. महाराष्ट्राचें मुखपत्र या नात्यानें केसरीनें एकहि महत्त्वाचा प्रसंग साधकबाधक टीका केल्याशिवाय सुना जाऊं दिलेला नाहीं. अशाच महत्त्वाच्या प्रसंगांत उच्च शिक्षण देणाऱ्या युनिव्हर्सिटयांचे अधिष्ठाते चॅन्सेलर व व्हा. चॅन्सेलर यांच्या पदवीदानसमारंभाचे वेळीं झालेल्या भाषणांचा अंतर्भाव होतो. उच्चशिक्षणाचें ध्येय गांठण्याच्या उद्देशानें निघालेलें युनिव्हर्सिटीचें तारूं कर्णधार कोणच्या तऱ्हेनें सुकाणूं फिरवून हाकीत आहेत हें पाहण्यास केसरी आपली टीकारूपी दुर्बिण घेऊन सतत बसलेला आढळतो. तरुण विद्यार्थीवर्ग राष्ट्राचा भावी आधारस्तंभ असल्यामुळें त्याचे विकार-विचारांना युनिव्हर्सिट्यांत दिल्या जाणाऱ्या शिक्षणानें योग्य वळण मिळत आहे कीं नाहीं, त्याची तडफ व राजकीय चळवळीविषयींची आस्था दडपून टाकण्याचे प्रयत्न केले जात आहेत कीं काय, इकडे केसरी डोळ्यांत तेल घालून पहात बसलेला आढळतो. १८९८ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर लॉर्ड सँढर्स्ट यांचें भाषण झालें; त्यांतील विद्यार्थीवर्गासंबंधानें त्यांचें म्हणणें यथार्थ नाहीं, असें केसरीनें लिहिलें आहे. त्यांची मुख्य

तक्रार ही कीं, कायद्यानें स्थापिलेल्या सत्तेचा हे मान राखीत नाहींत. स्वतःचीं मनें कशीं आवरून धरावींत हें त्यांना समजत नाहीं व कित्येक राजकीय चळवळी तर विद्यार्थ्यांच्या मदतीवर अवलंबून आहेत. या आक्षेपांना केसरीनें चोख उत्तर दिलें आहे कीं ' शिक्षणाचे ध्येय काय तर ज्ञान मिळविणें. तें शाळेंतच मिळतें ' असें नाहीं. शिवाजीच्या उत्सवांत किंवा कांग्रेसच्या मंडपांत पाहून व ऐकून ' मुलें फक्त ज्ञान मिळवीत असतात. राजकीय, सामाजिक, धार्मिक सर्व चळ- ' वळींपासून विद्यार्थ्यांना बऱ्याच गोष्टी शिकण्यासारख्या असतात; व त्या गोष्टी ' शिकण्यास या चळवळींचें योग्य अवलोकन त्यांनीं केलेंच पाहिजे. विद्यार्थ्यां- ' च्या सांप्रतच्या वर्तनांत बरीच सुधारणा झाली पाहिजे ही गोष्ट आम्हांसहि मान्य ' आहे. पण निरनिराळ्या चळवळींचा विचार केल्यानें, त्या पाहिल्यानें मनावर ' उत्पन्न होणाऱ्या संस्कारापासून दूरवर त्यांनीं राहावें ही गोष्ट आम्हांस संमत ' नाहीं. ' ( २२-२-९८ ).

१९०७ सालीं व्हाइस चान्सेलर प्रो. सेल्बी यांनीं आपल्या भाषणांत सुशिक्षित वर्गावर असा आरोप केला कीं राजकीय चळवळ व राजकीय विषयांची चर्चा यांतून सुशिक्षितांची बुद्धिच बाहेर पडत नाहीं. त्यावर केसरीनें असें सडेतोड उत्तर दिलें आहे कीं ' हिंदुस्थानची राजकीय स्थिति शोचनीय आहे; राजकीय ' अवनति नेटिवांना पावलोंपावलीं नडते राजकीय स्थिति ह्याच एका विषया- ' सभोंवतीं नेटिवांच्या बुद्धीला पिंगा घालीत बसणें कसें भाग पडतें हें सेल्बी- ' साहेबांना समजणार नाहीं. वेदना कायम आहेत तोंपर्यंत त्यांतून कसे सुटूं ' हीच सुशिक्षितांना काळजी लागली आहे.'( २६-२-०७ )-

याखेरीज चान्सेलर व व्हा. चान्सेलर यांचे भाषणांत युनिव्हर्सिटीचा अभ्यास- क्रम युनिव्हर्सिटीची रचना व ती सुधारण्याचे उपाय यांविषयीं विवेचन असून त्याचाहि केसरीनें परामर्ष घेतला आहे. १८९४ सालीं डॉ. भांडारकर हे मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हा. चान्सेलर असतांना त्यांनीं आपल्या भाषणांत कित्येक विद्वान लोक लवकर मरतात याचा युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमाशीं कांहींएक संबंध न जोडतां, त्याचा सर्व दोष फक्त कदन्न, व्यायामाभाव आणि बालविवाह यां- वरच लादण्याचा प्रयत्न केला. केसरीच्या मतें तो अगदीं चुकीचा आहे. कारण, ' विद्वान् निपजण्यासाठीं प्रत्येक बी. ए. होणाऱ्या मनुष्यास बारा बारा चौदा ' चौदा वर्षें अभ्यास करावयास लावून त्यास अगदीं पिळून काढावा हें अगदीं ' निर्दयपणाचें आणि वेडेपणाचें काम आहे.' केसरीची विधायक सूचना अशी कीं ' आपल्या समाजाची स्थिति लक्षांत आणतां सामान्य लोकांस झेंपेल इतकेंच ' ओझें त्यांजवर टाकावें.' ( २७-१-९४ ). युनिव्हर्सिटीच्या परीक्षकांविषयीं केसरीचें म्हणणें असें आहे कीं ' लोक नापास होतात यांत आम्ही परीक्षक दोषी ' आहेत असें समजत नाहीं. नवे नवे परीक्षक आल्यानें मतवैचित्र्यास वाव

' मिळतो. मुलांच्या तयारीचें व परीक्षकांच्या तब्येतीचें सूत्र जमत नाहीं ' यामुळेंच सारा घोटाळा होतो. मुलांना काय काय आलें पाहिजे याची मर्यादा ' ठरली म्हणजे मुलांना व परीक्षकांना दोघांनाहि चांगलें.' ( २४-१-८८ ).

युनिव्हर्सिटीच्या स्वरूपाविषयींहि केसरीनें स्तुतिपर उद्गारांच्या रूपानें आपलें म्हणजे लोकांपुढें मांडलें आहे. १८९९ सालीं कलकत्ता युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर लॉर्ड कर्झन यांनीं पदवीदानसमारंभाचे वेळीं असे उद्गार काढले कीं, हिंदु-स्थानांतील युनिव्हर्सिट्या विद्यार्थ्यांना शिक्षण देण्याचें काम करीत नाहींत, परीक्षा घेण्याचें त्या एक निव्वळ यंत्र आहेत व त्यामुळें घोकंपट्टीस उत्तेजन मिळतें. ' उच्च शिक्षण चेंगरून टाकावें म्हणून धडपडणारे कांहीं अँग्लो इंडियन व ' लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टनसारखे स्टेट सेक्रेटरी यांच्यासारख्या कोत्या समजुतीच्या व ' क्षुद्र मनाच्या लोकांच्या मतांस लॉर्ड कर्झनसारखा विचारी मुत्सद्दी फारशी भीक ' घालीत नाहीं ही समाधानाची गोष्ट होय,' ( २१-२-९९ ) असा या भाषणावर केसरीनें आपला स्तुतिपर अभिप्राय व्यक्त केला आहे. १९०१ सालीं लॉर्ड कर्झनसाहेबांनीं आपले भाषणांत ' युरोपांतील युनिव्हर्सिटीच्या ' धर्तीवर येथल्या युनिव्हर्सिटीची रचना व्हावी. युरोपांत विद्यार्थ्यांमध्यें उच्च ' प्रतीचे ज्ञानाचा प्रसार प्रत्यक्ष रीतीनें करतात व निरनिराळ्या विषयांत पूर्णपणें ' निष्णात माणसें निर्माण करणारीं विद्यापीठें आहेत ' वगैरे युनिव्हर्सिटीच्या योग्य स्वरूपाविषयीं कल्पना आणून देणारे मुद्दे सांगितले. त्यावर केसरीचें म्हणणें असें कीं इकडील युनिव्हर्सिटीची युरोपांतील युनिव्हर्सिटीच्या धर्ती-वर सुधारणा होणें अगत्याचें आहे. शिक्षणाच्या बाबतींत केसरीला किती कळकळ वाटली हें राजकीय प्रतिस्पर्ध्याविषयीं केसरीनें काढलेल्या उद्गारावरून सिद्ध होतें. ' युनिव्हर्सिटी सुधारण्याचें काम सिद्धीस नेऊन कॅनिंग, मेकॉले, यांच्या ' औदार्याचे कृत्यास उज्ज्वल स्वरूप देण्याचें श्रेय लॉ. कर्झनसाहेब घेतील व ' हिंदुस्थानच्या केंद्राची कायमची कृतज्ञता संपादन करतील अशी आम्हांस ' उमेद आहे. '

युनिव्हर्सिटीच्या स्वरूपाविषयीं केसरीची चिकित्सा अशी कीं, ' पूर्वीच्या ' संस्था बुडवून हल्लींचे सरकारी नोकरीकरतां परिक्षेचीं यंत्रें किंवा हमालखाने ' इंग्रज सरकारनें निर्माण केले आहेत. ' ( २४-२-०३ ). १९०७ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हा. चॅन्सेलर प्रो. सेल्बी यांनीं आपल्या भाषणांत विश्वविद्या-लयांत द्यावयाच्या शिक्षणाबद्दल आकुंचित व कोते विचार प्रदर्शित केले. त्यावर ' केसरीनें आपले शिक्षण विषयावर विचार प्रगट केले आहेत. ज्या विद्येनें मन ' सुसंस्कृत होऊन मानवी रागद्वेषांचें, आवडीनावडींचें, मनोवृत्तींचें व सुखदुःखांचें ' रहस्य विद्यार्थ्यांना अधिक चांगलें समजतें, असला मनाला, बुद्धीला व्यापकता ' येणारा शिक्षणक्रम हल्लींच्याप्रमाणें विश्वविद्यालयांत असूं नये असें कोणाचेंहि

'मत नाहीं पण एवढ्यानेंच भागत नाहीं. राष्ट्रांराष्ट्रांमध्यें चढाओढ असल्या-
'मुळें दुसऱ्यास चीत करण्याकरतां विविष्ट शक्ति व विशिष्ट ज्ञान
'संपादन केल्याशिवाय कोणच्याच राष्ट्राचें भागत नाहीं.' 'सुशिक्षित
" इंग्रजांचा सुसंस्कृत संभावितपणा अमच्यांत शिरला आहे.' मुंबई युनिव्हर्सिटीची
रचना ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींच्या धर्तीवर न करतां शोध, कल्पकता, व्यावहारिक
शास्त्रीय ज्ञान यांना जेथें उत्तेजन मिळतें अशा लिव्हरपूल, मँचेस्टर, बर्मिंगहॅम,
शेफील्ड वगैरे युनिव्हार्सिटीच्या धर्तीवर हवी होती. केसरीचा सवाल असा कीं,
'नुसता सुसंस्कृतपणा काय उपयोगी ! सांप्रत जगांतील चढाओढींत पुढें
पाऊल टाकण्यास कोणचें विशिष्ट ज्ञान पाहिजे' हें शोधण्याचें युनिव्हर्सिटीचें
काम आहे. 'सुव्यवस्थित व नीटनेटके नोकर तयार करणें एवढेंच काम नव्हे.'
धंदेशिक्षण, व्यापारी शिक्षण, शेतकीचें शिक्षण यांचा अभ्यासक्रमांत अंतर्भाव
झाला पाहिजे असा या टीकेंत केसरीचा कटाक्ष दिसून येतो.

१९०१ सालीं लॉर्ड कर्झन यांनीं आपल्या भाषणांत 'फेलोंची निवडणूक
व नेमणूक यांसंबंधीं कायमी सुधारणा करण्याचा सरकारचा बेत जाहीर केला.
त्यांना उद्देशून 'युनिव्हर्सिटीचें काम लायक माणसांच्या हातीं देण्याचा विचार
स्तुत्य आहे' असा केसरीनें अभिप्राय दिला. पण युनिव्हार्सिट्या सुधारण्याचे
भलत्याच दिशेनें प्रयत्न होऊं लागले व युनिव्हर्सिटी कमिशन नेमलें गेलें हें केसरीस
स्वस्थ बसून पाहणें अशक्य होतें; व त्या कमिशनची तरफदारी ज्या ज्या वेळीं केली
गेली त्या त्या वेळीं केसरीनें आपलें टीकास्त्र बाहेर काढलें. १९०३ सालीं मुंबई युनि-
व्हर्सिटीचे व्हाइस चान्सेलर व युनिव्हर्सिटी कमिशनचे एक सभासद डॉ. मॅकिकन
यांनीं आपल्या भाषणांत त्या कमिशनची तरफदारी केली 'ती एकपक्षीय व
भ्रामक असणार हें उघड आहे' असें केसरीनें म्हटलें आहे. 'युनिव्हर्सिटी
' 'परीक्षार्थी' आहे ती 'विद्यार्थी' बनविता येईल कीं नाहीं अशा दृष्टीनें कमि-
'शननें विचार केला आहे तो योग्य आहे. पण कमिशननें केलेल्या सूचना मात्र
'निरर्थक आहेत.' यावर केसरीनें एक समर्पक दृष्टान्त दिला आहे. 'एका सर-
'दारास सुंदर घोडा तर पाहिजे होता, पण पैसे खर्चण्याची इच्छा नव्हती. त्याच्या
'घरच्या अन्नावर वाढलेले व हांजी हांजी करणारे कारकून होते त्यांनीं दुधाची
'तहान ताकावर भागविण्याची 'प्रॅक्टिकल युक्ति' त्याला सुचविली. आपल्या
'खेचरांच्या कान व शेपट्या छाटाव्या, वरिष्ठ मोत्तदार ठेवावे व तीं खेचरें गाडीस
'जुंपावीं म्हणजे घोड्यासारखीं दिसतील. सेनेट सिंडिकेट नालायक आहे, पण
'ही उणीव सेनेटची संख्या कमी करून किंवा सिंडिकेटमध्यें चवथ्या प्रतीचे
'प्रोफेसर घालून किंवा डायरेक्टरास अध्यक्ष करून भरून येईल हें आम्हांस
'संमत नाहीं.' (२४-२-०३) केसरीचा कमिशनविरुद्ध मुख्य आक्षेप असा
कीं 'युनिव्हर्सिटी कशी असावी व ती स्थापण्यास काय करावें हें स्पष्टपणें सरकारास

' कळविणें कमिशनचें कर्तव्य होतें, तें त्यांनीं केलें नाहीं किंवा अर्धवट केलें.' ' खेचराचे कान कापून घोडा कसा करावा ' हें सांगण्यास कमिशन नेमलें नव्हतें अशी मॅकिकनच्या भाषणावरील केसरीची टीका निरुत्तर करणारी आहे.

युनिव्हर्सिटीची सुधारणा करण्यास पैसा पाहिजे. सरकार पैशाची थैली मोकळी सोडण्यास पहिल्यापासूनच तयार नाहीं व परोपदेशे पांडित्य करण्यास सरकारी अधिकारी सवकलेले. ही सरकारची कंजुष वृत्ति केसरीनें तेव्हांच ताडली व जेव्हां जेव्हां देणग्यासंबंधीं युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर अथवा व्हा. चॅन्सेलर गोष्ट काढीत तेव्हां तेव्हां त्यांना उत्तर देण्यास केसरी सज्ज असलेला आढळतो. १८८७सालीं ना. वेस्ट, मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हा. चॅन्सेलर यांनीं राजेरजवाड्यांनीं व शेट-सावकारांनीं मुंबई युनिव्हर्सिटीचें पोषण करावें असें आपल्या भाषणांत सूतोवाच करून ठेवलें. पुढें त्याच भिक्षावृत्तीचा प्रतिध्वनि उठूं लागला. १९०३ सालीं कलकत्ता युनिव्हर्सिटीचे पदवीदानप्रसंगीं ऑ. रॅले यांचा असा एक मुद्दा होता कीं स्कॉच लोकांप्रमाणें स्वार्थत्याग व औदार्य हिंदुस्थानचे लोक दाखवीत नाहींत. केसरीनें याला ' धाष्टर्य, हटवादीपणा व सत्यापलाप ' म्हटलें आहे. उदाहरणार्थ, मुंबई युनिव्हर्सिटीला देणग्या, पदकें, बक्षिसें यांचे रूपानें सढळ मदत झाली. केसरीची सूचना अशी कीं ' सरकारनें आधीं आपली पैशाची ' पिशवी मोकळी करावी व खरेंखुरें विद्यापीठ स्थापावें व मग देणग्या आल्या ' नाहींत तर लोकांचे नांवानें अधिकाऱ्यांनीं खडे फोडावे. ' १९०३ सालीं युनि-' व्हर्सिटीचे व्हा. चॅन्सेलर डॉ. मॅकिकन यांनीं शास्त्रीय शाळेकरतां दहा लाख रुपयांची मागणी केली. हें ' टोपी फिरविणें ' गैरशिस्त आहे असें केसरीनें म्हटलें आहे. १९०८ सालीं मुंबईचे गव्हर्नर क्लार्कसाहेब यांचें पदवीदानप्रसंगीं भाषण झालें, त्यांत युनिव्हर्सिटी सुधारण्याच्या बऱ्याच सूचना होत्या. पण त्याला ' विद्या-' खात्याचा खर्च वाढवला पाहिजे. घोडें पेंड खातें तें येथेंच. सरकारनें पैशाच्या ' थैलीचें तोंड दोनतीन पट अधिक सैल सोडण्यास तयार झालें पाहिजे, औषधोप-' चाराशिवाय नुसती चिकित्सा द्रव्यहीन विद्वानांना शोभते, पण इलाख्याचे ' गादीवर बसलेल्या अधिकाऱ्यांना चिकित्सेपेक्षां औषधोपचार अधिक शोभा ' देतो हें ना. क्लार्कसाहेबांस आम्हीं सुचवावयास नको;' असा केसरीनें टोमणा मारला आहे.

चॅन्सेलरांच्या व व्हाइस चान्सेलरांच्या भाषणांवरील केसरीच्या टीकेंत साधक बाधक विचार करण्याचें सामर्थ्य आहे. प्रतिपक्षास निरुत्तर करण्याची शक्ति आहे. तशी विधायक सूचनाहि करण्याइतका व्यापकपणा आहे. पण ह्या सर्वांहून विशेष गुण हा कीं, ती टीका या भाषणाचा वरवर विचार करून न थांबतां तळाशीं जाऊन भिडणारी व तेथें दडून बसलेले राजकीय हेतु व सरकारी कावे हुडकून काढणारी आहे. ती एखाद्या सूक्ष्मदर्शक यंत्रासारखी आहे. वरपांगीं मोहक

दिसणाऱ्या भाषणांत दडून असलेले राजकीय विशिष्ट हेतु केसरीनेंच उघड करून दाखवावे. सर्चलाइटप्रमाणें केसरीची टीका मोहजाळांत गुरफटलेले सरकारी डाव कसे उजेडांत आणते, याचे कांहीं मासले या चॅन्सेलर व व्हा. चॅन्सेलरांच्या भाषणावरील टीकेंत आढळतात. बहुतेक भाषणें सरकारी गोरे अधिकाऱ्यांचीं; क्वचित सरकारनियुक्त नेटिव्हांची. तेव्हां त्यांत सरकारी कृत्यांची तरफदारी, सरकारी चुक्यांवर सारवण व लोकांवर दोषारोप यांशिवाय कांहीं आढळणारच नाहीं. पण बहुजनसमाजाला शिक्षित करण्याचा केसरीचा उदात्त हेतु असल्यामुळें त्याच्या स्थूल दृष्टीला न दिसणारी बिंगें दाखविणें केसरी आपलें कर्तव्य समजत आला आहे. १९०३ सालीं डॉ. मॅकिकनच्या भाषणांत युनिव्हर्सिटी कमिशनच्या तरफदारीचे केसरीनें कसे धिंडवडे उडवले हें मागें आलें आहे. त्याच सालीं कलकत्त्यास ऑ. रॅलेंचे पदवीधरांना उद्देशून भाषण झालें. त्यांत युनिव्हार्सिटीच्या नव्या कायद्यानें युनिव्हर्सिटीचें स्वातंत्र्य वाढेल असें म्हटलें आहे. पण सिंडिकेटमध्यें सरकारी अधिकारी व युरोपियन प्रोफेसर नेमावयाचे, सिनेटचे अधिकार संपुष्टांत आणावयाचे, डायरेक्टरला सिंडिकेटचे अध्यक्ष नेमावयाचें, म्हणजे युनिव्हर्सिटी जोरकस न होतां ' शिरजोर ' मात्र होईल असें केसरीनें म्हटलें आहे. १९०५ सालीं डॉ. मॅकिकनच्या भाषणावर टीका करतांना केसरीनें हेंच म्हटलें आहे कीं, ' नव्या युनिव्हर्सिटीकायद्यानें शिक्षणाचा खरा अधिकार लोकांकडून काढून सरकारी अधिकाऱ्यांचे हातीं दिल्यानें युनिव्हर्सिटीची सुधारणा होणार नाहीं. १९०८ सालीं लॉर्ड मिंटो यांनीं कलकत्त्याच्या पदवीदानप्रसंगीं इंग्रजी शाळेंत धर्मशिक्षणाचा अभाव आहे याचा दोष आपल्या शिक्षणपद्धतीकडे आहे हें मान्य केलें व असें सुचविलें कीं, ' शाळांना जोडून बोर्डिंगें स्थापावीं व तेथें विद्यार्थ्यांच्या धर्मशिक्षणाची धार्मिक संस्थांनीं स्वतंत्रपणें सोय करावी. केसरीनें मिंटोसाहेबांचा कावा ओळखला कीं, ' धर्मशिक्षणाच्या साखरेंत बाह्यतः ' गोड केलेली अंधराजनिष्ठेची गोळी मुलांचे घशांत घालण्याचा हा डाव आहे.'

१९०५ सालीं रिस्ले सर्क्युलर निघालें व व्हा. चान्सेलर न्या. चंदावरकर यांनीं त्याची तरफदारी केली. त्यावर केसरीनें टीका केली कीं ' हा प्रश्न गुरु-' शिष्यांच्या परस्परांमधील संबंधाचा नसून विचारस्वातंत्र्य भाषणस्वातंत्र्य व ' लेखनस्वातंत्र्य ही त्रयी व राजसत्ता ह्यांमधील संबंधाचा आहे. अशा व्यापक ' दृष्टीनें चंदावरकरांनीं ह्या प्रश्नाचा विचार केला नसल्यामुळें त्यांचे सिद्धांत ' अगदीं टाकाऊ झाले आहेत.' (२३-२-०५).

१९०५ सालीं लॉर्ड कर्झन यांनीं कलकत्त्यास विद्यार्थ्यांना उपदेश केला त्यांत एशियाटिक लोकांत सत्यप्रियता कमी असें त्यांनीं म्हटलें व एशियाटिक लोकांबद्दल तिरस्कारबुद्धि जगास व्यक्त केली यावरून केसरीला ' इसापनीतींतील वैद्य होऊं पाहणाऱ्या बोकडाची ' आठवण झाली. ' इंग्रजी विद्याच मायावी आहे. हत्तीचे

‘ दाखवावयाचे दांत वेगळे व खावयाचे वेगळे, तसा इंग्रजी राज्यपद्धतीचा मासला ‘आहे.’ कर्झनला Oriental Diplomacy आठवली, पण ‘मॅकिव्हीलियन् पॉलिया ‘ परफिडियस आल्बियन’ ह्या म्हणी आठवल्या नाहींत. हिंदुस्थानांतील लोकांस ‘ इंग्रजी राज्यांत आपले गुण दाखविण्यास पुष्कळ जागा आहे, हें विधान ‘ लबाडीचें आहे. उलट गुणांची पायमल्ली होत आहे. मतास मान नाहीं. ‘ कर्तृत्व दाखविण्यास जागा नाहीं. राजकीयांची खुशामत केल्याखेरीज बढती ‘ नाहीं. अशा स्थितींत तुम्ही वाचाळता सोडून क्रिया करा, स्वतंत्र मतें बनवा, ‘ खुशामत करूं नका असा त्यांस उपदेश करणें म्हणजे दुःखावर डागण्या ‘ देण्यासारखें आहे.’ ( २१-२-०५ ).

शिवाय लॉर्ड कर्झन यांनीं असा ‘ मायावी ’ आशीर्वाद दिला कीं ‘ ज्ञाति ‘ व राष्ट्रीयत्व यांचा भंग न होता आणि साम्राज्याचीं सुरक्षितता कायम ठेवून ‘ ह्याची सांगड घालतां येईल अशी मला खात्री वाटते.’ पण ‘ साम्राज्याचे नाग-रिक ’ ह्या ‘ मोहक शब्दांनीं लोक भुलून जाण्याचे आतां दिवस राहिले नाहींत.’ असें केसरीनें निक्षून बजाविलें आहे व लॉर्डसाहेबांच्या मुखांतील जिव्हारूपी नागिणीनें टाकलेल्या विषाचा आपणांस अवश्य प्रतिकार केला पाहिजे असा सूचक उपदेश लोकांस केला आहे.

याच व्हाइसरॉयसाहेबांनीं मागें असा उपदेश केला होता कीं ‘ इंग्रज व इंडियन यांच्या संबंधांत कांहीं तरी ईश्वरी प्रेरणा गूढ रूपानें वास करीत आहे. उभयतांनीं देशाचें ऐक्य व प्रजेची भरभराट ह्या दोन गोष्टी साधण्यास झटावें. केसरीच्या सूक्ष्म दृष्टीला या विचारांत दडलेली एक कल्पना दिसली कीं ‘ इंग्रज ‘ नेटिव्हाहून अधिक सत्यप्रिय, सद्गुणी व श्रेष्ठ असून त्याचें राज्यपद्धतीमुळें हिंदु-स्थानचें सर्वतोपरीं कल्याणच झालें आहे.’ यावरून केसरीस एक दृष्टान्त सुचला तो असा. ‘ चित्र काढणारा प्राणी मनुष्य असला म्हणजे तो सिंहाची पारध ‘ करणाऱ्या शिकारी लोकांचेंच चित्र काढून सिंहापेक्षां आपलें श्रेष्ठत्व स्थापन ‘ करण्याचा प्रयत्न करणार हें उघड आहे.’

१९१० सालीं ना. क्लार्कसाहेबांनीं देशांतील राजकीय चळवळीमुळें मन अस्वस्थ झाल्यामुळें, पदवीधरांना सांगितलें कीं सहेतुक व विकारवश होऊन केलेल्या एकपक्षीय विचारांच्या श्रवणानें किंवा वाचनानें आपले विचार कोणीहि ठाम करूं नये. सरकारचें आसन स्थिर करण्यास सहानुभूतीची याचना गव्हर्नर-सारख्या अधिकाऱ्यानें करणें साहजिक आहे. पण हा वरपांगी, मायावी उपदेश करतांना सरकारला आपली वर्तणूक निःपक्षपातीपणाची आहे किंवा नाहीं हें उमगूं नये, यांतील कावा ओळखून केसरीनें सरकारचे दांत सरकारच्याच घशांत घालण्याचा प्रयत्न केला आहे, व ना. क्लार्कच्या भाषणावरून अशी टीका केली कीं ‘ अशीच क्लार्कसाहेबांप्रमाणें इतर अधिकाऱ्यांची वृत्ति बनेल तर फार बरें

' होईल. सरकारी रिपोर्टांबरोबरच लोकांच्या गाऱ्हाण्यांच्या हकीगती वाचा.
' अधिकाऱ्यांच्या उपदेशाबरोबर लोकपक्षाचें म्हणणेंहि विचारांत घ्या; सर जॉन
' स्ट्रॅचीं किंवा सर विल्यम लीवार्नर यांचे तेवढे हिंदुस्थानविषयक ग्रंथ वाचून
' हिंदुस्थानची राज्यपद्धति अगर लोकस्थिति याबद्दल आपलीं मतें बनवूं नका-
' तर डिग्बी, दादाभाई नौरोजी, दत्त इत्यादि ग्रंथकारांचे व लेखकांचेहि ग्रंथ व
' लेख वाचण्यास विसरूं नका, हेंच लोकपक्षीयांचें म्हणणें आहे. ना. क्लार्क यांनीं
' सांगितलेलें तत्त्व हिंदुस्थानांतील तरुणपिढी—राजपक्ष व प्रजापक्ष—या उभयतां-
' च्याहि ग्रंथांस व लेखांस निःपक्षपातीपणानेंच लावील अशी आम्हांस उमेद
' आहे. ' असा उलट उपदेश करून सरकारची कानउघाडणी ' जशास तसें '
या न्यायानें करून केसरीनें आपल्या टीकेचें वैशिष्ट्य दाखविलें आहे.

केसरीचा राष्ट्रीय बाणा प्रथमपासूनच असल्यामुळें त्यानें वरिष्ठ सरकारी अधिकारीवर्गाच्या पदवीदानप्रसंगीं केलेल्या भाषणावर सडेतोड टीका करावी हें साहजिकच आहे. अधिकाराच्या जागेवर अधिष्ठित होऊन तरुण पदवीधरांच्या गळीं आपले एकतर्फी, एकांगी विचार उतरविण्याचा प्रयत्न चान्सेलर व व्हा. चान्सेलर करूं लागले तर केसरी आपलें टीकास्त्र तेव्हांच उपसून त्या विचारांचें खंडन केल्याखेरीज राहिलेला नाहीं. युनिव्हर्सिटी कमिशनचा रिपोर्ट, रिस्ले सर्क्युलर ह्यांना जेथल्या तेथेंच ठेचण्यास केसरीनें कमी केलें नाहीं. सरकारच्या चाकोरींतून जाणाऱ्या, सरकारनें नेमलेल्या व्हा. चान्सेलरांच्या अहंमन्य अशा तऱ्हेच्या उपदेशांतील फोलपणा व विसंगतपणा दाखविण्यास केसरीनें कमी केलें नाहीं. शिक्षणाच्या बाबतींतील सरकारच्या कंजुषवृत्तीचा उपहासहि केला. पण हेंहि तितकेंच खरें कीं, या विध्वंसक व हितकर, अप्रिय पण पथ्यकर टीकेबरोबर केसरीनें मंडनात्मक कामगिरी कांहीं थोडी केली नाहीं. प्रतिपक्षीयांच्या कांहीं योग्य सूचना हिंदी लोकांचें हिताचे दृष्टीनें ग्राह्य वाटल्यास त्या स्वीकारून त्यांची केसरीनें मुक्तकंठानें स्तुतिच केली आहे. वेळोवेळीं विधायक सूचना केल्या आहेत व शिक्षणाची सर्वांगीण प्रगति कशी होईल व राष्ट्रांतील तरुण पिढी राष्ट्राची भावी आधारस्तंभ होण्यास कोणच्या गोष्टींचें बीज ह्यांचे मनांत रुजविलें पाहिजे ह्याविषयीं कळकळीचे व उत्तेजनपर विचार राजपक्ष व प्रजापक्ष यांचे-पुढें मांडण्यास केसरीनें मागें पाहिलेलें नाहीं. जशी डॉ. भांडारकर, डॉ. मॅकिकन, प्रो. सेल्बी, लॉर्ड कर्झन यांचेवर कडक टीका केली तसाच त्यांच्या भाषणांतील ग्राह्यांश हंसक्षीरन्यायानें केसरीनें ग्रहण केलेला आढळतो. केसरीची टीका अधिकाराची धुंद उतरविण्यास जशी कारण झाली आहे त्याचप्रमाणें अज्ञानां-धांना डोळस करण्यास व पंगु लोकांना विशिष्ट राजनीतीचे डोंगर ओलांडण्याची शक्ति आणून देण्यासहि कारण झाली आहे हें विसरून चालावयाचें नाहीं.

---

# हिंदुसंघटन

[ श्री. वि. गो. आपटे ]

**प्रस्ताव**—हिंदराष्ट्राची सर्वांगीण उन्नति साधण्याकरतां केसरी अवतरला. केसरीचा पक्ष राष्ट्रीय. तो राष्ट्राच्या अभ्युदयाकरितांच जन्मला व त्याकरितांच तो झगडत राहिला आहे.

हिंद देशाला आपला म्हणणारे व त्याबद्दल अभिमान बाळगणारे ते हिंदु लोक, हिंदु लोकांची संख्या मोठी; त्यांचीं धर्मतत्त्वें उदार व समंजस; उलट जगांत नुकतेच उदयास आलेले दुसरे धर्म एकांडे, आक्रमणशील व असमंजस. अशा धर्मानुयायांशीं टक्कर देऊन आत्मरक्षण करावयाचें काम हिंदूमधील पुढाऱ्यां-वर व राष्ट्रीय वर्तमानपत्रांवर पडलें.

**हिंदुधर्माची महती**—अशा वर्तमानपत्रांनीं व पुढाऱ्यांनीं आपल्या व्यापक धर्माचें वास्तविक स्वरूप काय आहे, याची चर्चा सुरू केली. आधिभौतिक साधनांनीं व तात्पुरत्या ऐश्वर्यांनीं फुशारून गेलेल्या परधर्मीयांच्या आचारविचारांनीं दिपून गेलेल्या कांहीं स्वकीयांच्या डोळ्यांत अंजन घालून त्यांच्यामध्यें स्वधर्माभिमान जागृत करणें इष्ट होतें.

'ज्या वेळीं जगांतील बहुतेक देश अज्ञानांत बुडाले होते व धर्म म्हणजे 'काय याचीहि त्यांना पुरी ओळख नव्हती त्या वेळीं आपल्या देशांत धर्माचें 'खरें स्वरूप अवगत झालें होतें, इतकेंच नव्हे तर जीं तत्त्वें अगदीं अलीकडे 'लोकांस समजलीं आहेत असें आपणांस वाटतें त्या तत्त्वांचा पूर्ण ऊहापोह 'करून आमच्या ऋषींनीं मागेंच निर्णय केला आहे.......निवळ धर्मतत्त्वांचें 'इतर असारभूत गोष्टींपासून पृथक्करण करून अशा धर्मतत्त्वांचा केवळ सत्य-'दृष्टीनें फक्त आमच्या आर्यधर्मानेंच विचार केला आहे....जगांतील इतर 'कोणत्याहि धर्मांत आमच्या धर्माइतकें औदार्य व समंजसपणा दिसावयाचा 'नाहीं.' अशा रीतीनें स्वधर्माच्या महतीची घोषणा केसरीनें १८९२ सालीं केली. इतकी घोषणा करूनच केसरी थांबला नाहीं तर त्यानें इतर धर्मांचा अर्वा-चीनपणा, त्यांच्या धर्मतत्त्वांचा संकोच इ० गोष्टी लक्षांत घेऊन त्यानें असें जाहीर केलें कीं—'जगांतील इतर धर्म हे सनातन–हिंदु-धर्माचे एकेक संप्रदाय होत' म्हणजे हिंदुधर्माच्या सनातन तत्त्वाच्या मानानें काल जन्मास आलेल्या इतर धर्मांचीं तत्त्वें विराट् हिंदुधर्मतत्त्वांच्या पासंगालाहि पुरावयाचीं नाहींत ! !

आमचा धर्म सनातन आहे; तो बुद्धिप्रधान असल्यामुळें विचारी आहे; तात्त्विक असल्यामुळें सयुक्तिक आहे व शेंकडों वर्षांचा जुना असल्यामुळें सर्वव्यापी आहे. आमच्या धर्मांत व्यावहारिक कल्याण म्हणजे अभ्युदय व पारलौकिक मोक्ष म्हणजे निःश्रेयस ह्या दोन्ही गोष्टींवर सारखाच भर दिला असल्यामुळें साहजिकच केसरीनें—'धर्म हीच सामर्थ्य व चारित्र्य यांची जननी आहे' असे प्रशंसोद्गार काढले आहेत!

**धर्माचें लक्षण**—अशा ह्या विश्वव्यापी धर्माची व्याख्याहि उत्क्रांतितत्त्वानुसार केसरीनें परिणतावस्थेला नेऊन ती विश्वव्यापी कशी बनविली हेंहि पाहाणें वावगें होणार नाहीं. महंमदी, खिस्ती इत्यादि धर्मांपेक्षां आपल्या धर्मांत विशेष काय आहे हें दाखविण्याचें पहिलें महत्त्वाचें कार्य करावयाचें असल्यामुळें ह्या उद्देशाला तंतोतंत उतरेल अशी व्याख्या म्हणजे—

प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता ।
उपास्यानामनियमश्चैतद्धर्मस्य लक्षणम् ॥

ही होय. 'खिस्ती किंवा महंमदी धर्माप्रमाणें ईश्वराची करणी किंवा प्रसाद मर्यादि-
'त आहे असें आम्ही मानीत नाहीं. विभूतींचें अनंतत्व व ईश्वराचें एकत्व ही
'आमच्या धर्मांत विशेष गोष्ट होय. वेदप्रामाण्य व उपास्यांचा अनियमितपणा
'याहि अधिक गोष्टी आमच्या धर्मांत आहेत.'

इतर धर्मांहून आमच्या धर्मांत विशेष काय आहे हें सांगण्यास वरील व्याख्या जरी पुरेशी असली तरी पण आपणांस हिंदु म्हणविणारे अनेक लोक ह्या व्याख्येच्या चौकटींत चांगलेसे बसत नसल्यामुळें—

'भारतवर्षीय महापुरुषानें प्रस्थापित अशा कोणत्याहि देवतेची उपासना करण्याची पात्रता असणें तें हिंदुत्व' अशी एक व्याख्या पुढें आली. पण अंतःस्फूर्तीनें फोंफावत जाणाऱ्या सर्व हिंदुधर्मानुयायांना गवसणी घालण्याला हीहि व्याख्या अपुरी वाटूं लागली. मग—

आसिंधुसिंधुपर्यंता यस्य भारतभूमिका ।
पितृभूः पुण्यभूश्चैव स वै हिंदुरिति स्मृतः ॥

'ज्याचे पितर सिंधु नदीपासून हिंदी महासागरापर्यंत पसरलेल्या भरतखंडांत वसत आले आणि म्हणूनच ती ज्यांची पितृभू आहे आणि ज्याचे धर्मसंस्थापक त्याच भूमींत व त्याच पितरांच्या उदरीं उत्पन्न होऊन आपापले धर्म स्थापिते झाले आणि म्हणूनच ती ज्याची पुण्यभू (Holy land) आहे तो हिंदु.'

आतां वाटलें कीं, प्रस्तुत व्याख्येंत सर्व हिंदुधर्मानुयायांचा खास समावेश होईल. पण डॉ. कूर्तकोटींनीं मागें म्हटल्याप्रमाणें 'अनेक मोठ्या हुद्द्यावरच्या
'पाश्चात्य परधर्मीयांनीं आपणांस हिंदु करून घेण्याबद्दल पीठाकडे विनंतिअर्ज

‘ केले. कित्येकांनीं आजन्म वैदिक तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला आहे. कित्येकांनीं ‘ फ्रान्समध्यें मंदिरें बांधून देण्याची विनंति केली आहे. कित्येकांनीं वैदिक सिद्धान्ता- ‘ ची पृच्छा केली. कित्येकांनीं तर संध्येचीं उपकरणें मागविलीं. ’ अशा सध्यां विधर्मी असणाऱ्या पण स्वखुषीनें हिंदुधर्मात येऊं इच्छिणाऱ्या असंख्य लोकांचा सांठा आपल्या उदरांत करील असें विश्वव्यापी लक्षण बांधणें प्राप्त झालें. **जो स्वतःस हिंदु म्हणवितो व हिंदुत्वाचा अभिमान बाळगतो तो हिंदु ’ हेंच** तें विराट् हिंदुधर्माचें विश्वव्यापी लक्षण होय.

**हिंदुधर्माचे शत्रु**—मोठ्यांच्या सर्वच गोष्टी मोठ्या व आचाट. ह्या नियमा-ला हिंदुधर्म कसा अपवाद असेल ! हिंदुधर्माच्या मोठ्या व्यापाप्रमाणेंच त्याच्या शत्रूंची संख्याहि कांहीं कमी नाहीं. त्याच्या उशापायशांशीं धूर्त व कावेबाज शत्रूंचा जागता पाहारा आहे. वाटेल त्या भल्याबुऱ्या साधनांचा उपयोग करून ह्या शत्रूंनीं हिंदूंना अल्पसंख्य व निर्बल करण्याचा चंग बांधला आहे. त्यांच्याप्रमाणें हिंदू-मधीलहि अंतस्थ हितशत्रूंचाहि त्रास हिंदूंना बराच जाणवला. हे शत्रु म्हणजे दुर्धारकी सुधारक होत. ‘आपले आचार टाकाऊं.विचार कुचकामाचे. धर्म दुबळा व एकांगी. ‘ धर्माचरणानेंच आपला ऐहिक उत्कर्ष खुंटला. जातिभेद फार. स्त्रिया अशि- ‘ क्षित, श्रेष्ठ कनिष्ठ भाव जाज्वल्य, भाषा कोती...इ...इ.’ अशा रीतीनें सदा-सर्वदा नाउमेदीची भाषा बोलून स्वधर्माला नांवें ठेवावयाचीं व परधर्माबद्दल व परधर्मीयांच्या आचाराविचारांबद्दल गोडवे गावयाचे हाच केवळ धंदा कित्येकांचा होऊन बसला होता. स्वतः हे लोक कधीं हिंदुसमाजाच्या खालच्या थरांपर्यंत जाऊन त्यांत मिसळले नाहींत. त्यांनीं स्वधर्माचा जागता अभिमान कधीं वाहिला नाहीं. अशा निष्क्रिय व बोलघेवड्यांना ताळ्यावर आणण्याकरितां केसरीनें स्व- ‘ धर्मावर श्रद्धा, आपलें राष्ट्र पुरातन असून तें ईश्वराच्या कृपेनें जगांतील इतर ‘ राष्ट्रांच्या बरोबरीचें होणें शक्य आहे असा दृढ आत्मविश्वास, अभिमान व ‘ भरंवसा आणि अशा विश्वासानें योग्य अशा तऱ्हेचा उद्योग कळकळीनें कर- ‘ ण्याची इच्छा किंवा उमेद व संवय असल्याखेरीज कोणत्याहि सुधारणेचें कार्य तडीस जाणें अशक्य आहे’ असा अप्रिय पण पथ्यकर उपदेश केला. पाश्चात्यां-च्या वेगडी वैभवाचें खरें अंतरंग नीट उमगल्यावर आतां कोणीहि सुधारक त्याला भाळूनहि जात नाहीं व स्वधर्माविषयीं उदासीनताहि फारशी दाखवीत नाहीं. हिंदुधर्मतत्त्वें अनुभवाच्या कसोटीवर घासली जाऊन त्यांना चांगला उजळा आला व त्यायोगें आतां स्वतःस हिंदू म्हणविणारा कोणीहि इसम हिंदु-धर्म नष्ट करण्याच्या उद्देशानें त्यावर सहसा आघात करीत नाहीं.

अशा रीतीनें हिंदूंमधील अंतर्गत बखेडा जरी कमी झाला तरी आक्रमणशील असणाऱ्या दुसऱ्या शत्रूंशीं हिंदुधर्मीयांना झगडावयाचें आहे. ‘ सुलभसंकोची, ‘ प्रसरणशून्य, असंघटित, आणि विस्कळित अशा एकट्या हिंदुधर्मीय समाजाचीं

'दोन जबर ग्रसिष्णु, शीघ्रप्रसारक, संघटित अशा परधर्मीय समाजाशीं गांठ 'पडली आहे. एक वनचर पर्वत ओलांडून हिंदु समाजावर घसरला व 'दुसरा जलचर समुद्राच्या लाटेसरशी उसळी मारून आंत घुसला.' अशा शब्दांनीं केसरीनें हिंदूंच्या विरुद्ध असलेल्या समाजाचें चित्र थोडक्यांत दिलेलें आहे. हे दोन खाबू समाज म्हणजे महंमदी व खिस्ती होत.

मुसलमानांचा चढेलपणा व आक्रमणशीलता सर्वविश्रुत आहे. 'हिंदूंशीं 'नसत्या कुरापती काढून प्रसंग घासाघाशीला आणण्यांतच खरा पुरुषार्थ व 'धार्मिक कर्मठपणा आहे असा मुसलमानांचा समज झालेला आहे.' हे केसरीचे उद्गार वस्तुस्थितीला धरून नाहींत असें कोण म्हणेल ? मुसलमान संख्येनें अधिक असोत, कमी असोत, ब्रिटिश हद्द असो कीं, संस्थानी हद्द असो. ज्या ज्या ठिकाणीं हिंदूंना त्रास देतां येईल त्या त्या ठिकाणीं ते त्रास देण्यास चुकत नाहींत. 'जेथें मुसलमान संख्येनें अधिक तेथें ते अधिक म्हणून हक्कानें 'आणि जेथें ते संख्येनें कमी तेथें ते दुबळे म्हणून दयाबुद्धीनें—मिळून त्यांच्या 'हिताच्या दृष्टीनें व लहरीनें वागूं दिले पाहिजे अशी आज मुसलमानांची 'स्थिति आहे,' (६-१-२५). हें केसरीचें म्हणणें अगदीं सत्याला धरून आहे. मुसलमानी चढेलपणाचें वर्णन अधिक स्पष्टपणें केसरीच्या पुढील उताऱ्यांत सांपडेल. 'केसाला बांधून रेशमाचा दोरा, रेशमाला बांधून सुताचा 'दोरा, सुताला बांधून सुतळी, सुतळीला दोरखंड, दोरखंडाला विध्वंसक द्रव्यांनीं 'भरलेला रणगाडा अशा रीतीनें मुसलमानांचा आग्रह हळूहळू पुढें सरकत येत 'आहे.' (१५-१२-२५). मशिदीवरून वाद्यें वाजविण्यानें त्यांच्या प्रार्थनेस अडथळा येतो. साध्या आरतीच्या वेळीं होणाऱ्या एकाद्या झांजेच्या आवाजानेंहि ह्या शिरजोर वृत्तीच्या लोकांची प्रार्थना भंग पावते. 'मशिदींतील प्रार्थनेला 'वाद्यांनीं अडथळा होतो ही दंगेखोर मुसलमानांची पोकळ सबब असून त्यांना 'हिंदूंतील संघटितपणाच्या निदर्शक अशा मिरवणुकीच पाहावत नाहींत हेंच 'दंग्याचें कारण !' असा केसरीचा ठणठणीत निर्वाळाच खरा ठरतो !

हिंदूंशीं कोणत्या तरी क्षुद्र कारणांवरून भांडण काढावयाचें ह्या मुसलमानी वृत्तीचीं शेंकडों उदाहरणें देतां येतील ! नव्या मशिदी उभारणें, हिंदूंच्या अबाधित चाललेल्या वहिवाटींना अडथळा आणणें, हिंदूंच्या मिरवणुकीवर चोरटे हल्ले करणें, गाईची कुरबानी हिंदूंच्या देखत करणें, हिंदूंच्या बायका पळविणें इत्यादि किती तरी गोष्टींचा पाढा वाचतां येईल !

कांहीं भुरट्या धर्मवेड्यांनीं हिंदु पुढाऱ्यांना धमकीचीं पत्रें पाठविलीं. हिंदी पुढाऱ्यांचे खूनहि केले. हेतु हा कीं, हिंदूंनीं मृतवत् पडून राहून ह्या रानट्यांचे चाळे खुशाल चालूं द्यावे !

अशा रीतीनें फाजील धर्मवेडानें पिसाळलेल्या मुसलमानांचे सरकार पक्षपाती

असल्यामुळें त्यांचें चांगलेंच फावलें. मुसलमानी बाळांनीं कांहीं लीला केल्या तरी परवडतील, पण हिंदूंना मात्र कायद्याच्या कात्रींत पुरें पकडावयाचें ही सरकारी वागणुकीची नित्याची रीतच आहे. 'मुसलमानांचा दुराग्रह कितीहि ' बेकायदेशीर असला तरी सरकार त्यांना ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न न करतां ' उलट हिंदूंनाच दडपूं पाहतें ही गोष्ट सरकारला नामुष्कीची आहे ' (११९२८) असें शेवटीं सरकारला केसरीनें हेटाळणीनें बजाविलें. सरकारचा हा पक्षपात तर शेवटीं अशा थराला गेला कीं, केसरीला ' अधिकाऱ्यांचे पक्षपातीं वर्तन सुधारेल अशा आशेंत न राहतां हिंदूंनीं जागरूक व संघटित झाल्यानेंच मुसलमानी दंग्याची लाट थांबेल,' ( ९-१०-२८ ) असें हिंदूंना सांगावें लागलें !

मुसलमानांचे हिंदूंना बाटविण्याचे प्रयत्न संघटितपणें चालू असतात. निजामसरकारहि ह्या भ्रष्टीकरणाला दरसाल तेरा लाखपर्यंत खर्च करतें. ६०० मुसलमान व ८० मातृ-धर्म-द्रोही हिंदु ह्या कार्याचा प्रसार करतात. याशिवाय आंतून न कळत फुसलावणीचे कित्येक प्रकार चालू असतात !

मुसलमानी भ्रष्टीकरणाच्या ह्या प्रयत्नाला जोड म्हणूनच कीं काय खिस्ती मिशनऱ्यांची साळसूद चळवळहि आपले हातपाय पसरीत असते. ' दर आठवड्यास दोन हजार लोक बाटून खिस्ती होतात ' असा १९२५ सालचा एका बिशपनें दिलेला आंकडा असून ह्या बाटणाऱ्यांत बहुतेक अस्पृश्यांची संख्या जास्त असते असें तो म्हणतो.

वरील विरोधकांशिवाय अँग्लोइंडियन वर्तमानपत्रें व जात-पात-तोडक म्हणविणारे कांहीं मूठभर उच्छृंखल हेहि आपल्या परीनें हिंदूंवर मधून मधून हल्ले करीतच असतात.

**शुद्धि व संघटन**—भ्रष्टीकरणानें होत असलेला हिंदूंचा ऱ्हास व सरकारी पक्षपातानें चाललेली मुसलमानी दंडेली ह्या दोन गोष्टी टाळण्याकरितां म्हणजे स्वसंरक्षणाकरितां हिंदूंतील जबाबदार पुढाऱ्यांनीं शुद्धि व संघटन हीं आयुधें पाजळलीं. त्याबरोबर कित्येक फाजील औदार्यानें मंडित असलेल्या कट्टरांना ही गोष्ट रुचली नाहीं. त्यासंबंधांत केसरी म्हणतो, ' हिंदुसंघटन म्हणजे मुसलमानी ऐक्याचा ' विघाड करणें अशीच ज्यांनीं आपल्या मनाची विपरीत समजूत करून घेतली ' आणि हिंदुधर्मियांनीं परधर्माचा स्वीकार केला म्हणून तरी बिघडलें काय असा ' उघड कोटिक्रम करण्यासहि ज्यास दिक्कत वाटत नाहीं असा मेणचट ढोंगी वर्ग ' हा धकाधकीच्या शुद्धिसंघटनाच्या मामल्यापासून दूर राहिला नसता तरच ' आश्चर्य !' (८-७-२५). केसरी पुन्हां एके ठिकाणीं म्हणतो ' खिस्ती, मुसलमान ' हे दोनहि आक्रमणाभिलाषी व सर्वसंग्राहक असे धर्म हिंदुसमाजांतील सांपडतील ते लोक सुचेल त्या मार्गानें बाटवून हिंदु समाजांतून उचलून नेत असतां

हिंदु समाजानें मात्र ही हानि थांबविण्याकरितां यत्किंचितहि हातपाय हालवूं नयेत असें म्हणणें कोणत्या तत्त्वाला किंवा न्यायाला धरून आहे !

एकाला संहाराची मोकळीक व दुसऱ्याला आत्मरक्षणाचीहि चोरी हा न्याय कुठला !

' त्यांनीं आपलें उडाणटप्पू तट्टू दुसऱ्याच्या शेतांत चरावयास सोडणें हा गुन्हा ' नाहीं. पण शेजाऱ्यानें शेताला कुंपण घालणें हा गुन्हा !' (के. १५-१२-२७). पुन्हां एके ठिकाणीं–' उदार संस्कृति किंवा मतें झालीं म्हणून त्या माणसानें आपण कोणत्या वर्गांत जन्मलों याचा विचारच करूं नये असें नाहीं.' (के. १५-१२-२५) असें म्हटलें आहे.

' आपणांत कांहीं भोंदू पंडितंमन्य राष्ट्राभिमानी आहेत ते शुद्धी चळवळीच्या ' नांवानें खडे फोडतात. पण त्यांचें आश्चर्य वाटतें तें हेंच कीं, त्यांचा उपदेश ' ख्रिस्ती व मुसलमानी प्रचारकांना नसतो. त्यांची सगळी राजकीय न्याय- ' प्रियता गरीब बिचाऱ्या हिंदु लोकांच्या मात्र बोकांडीं बसते.'

धर्माला गौण समजून स्वराज्यसाधनाच्या मागें लागणाऱ्यांना केसरीनें स्पष्ट बजाविलें कीं,

' आम्हांला हिंदू राहूनच स्वराज्य मिळवावयाचें आहे व हिंदु राहूनच भोगावयाचें आहे ! हिंदुत्वाचा विक्रय करून स्वराज्य मिळालें तरी तें नको ! '

' स्वधर्मांतून परधर्मांत गेलेल्यांना शुद्ध करून परत धर्मांत आणणें हा हिंदु ' समाजाचा अबाधित हक्क आहे. जोंपर्यंत ख्रिस्ती मिशनरी किंवा मुसलमान ' मौलवी आपला हात आंवरीत नाहींत तोंपर्यंत हिंदु लोकांस शुद्धि बंद करा ' म्हणून सांगण्याचा कोणास काय हक्क आहे !' असा रोकडा सवाल शुद्धीच्या आक्षेपकांना केसरीनें विचारला. अशा रीतीनें शुद्धिसंघटनाचा पुरस्कार करून ठिकठिकाणीं झालेल्या शुद्धीला उत्तेजन दिलें.

जिकडे तिकडे शुद्धीचा धूमधडाका सुरू झाला. पंजाबांतील मलकाना रजपूत गोव्यांतील गावडे, वसईजवळील कोळी लोक...इ० लोकांचीं गटानें शुद्धि करून घेतली.

' शुद्धीच्या मुळाशीं धर्मस्वातंत्र्याची सर्वमान्य व सर्वस्वीकृत अशी उदात्त ' कल्पना आहे.' समाजाचें संरक्षण व संवर्धन यालाच प्रसंगोपात्त शुद्धि व ' संघटन हीं नांवें प्राप्त झालीं आहेत. अशा प्रकारची चळवळ करण्याचा ' हक्क प्रत्येक समाजाला आहे व तो दहशतीनें किंवा फसगतीनें गमावून बसण्यास ' हिंदु समाज तयार नाहीं. ' अशा रीतीनें शुद्धि–संघटनाची आवश्यकता पटविली इतकेंच नव्हे तर ' भाषा, आचार व पोषाक इत्यादि बाबतींत बाटलेल्या

'मुसलमानांना व ख्रिस्त्यांना हिंदी संस्कृतीकडे खेंचणें हें शुद्धीचें एक अंग होय,' असें उपदेशून शुद्धीची व्याप्ति दाखविली.

**अहिंदूंचें हिंदूकरण**—मिस् मिलर नांवाच्या एका अमेरिकन विदुषीला डॉ. कूर्तकोटींनीं हिंदु धर्माची दीक्षा दिल्यामुळें अहिंदूंनाहि हिंदु करून घ्यावें कीं नाहीं, ह्या वादाला तोंड पडलें. 'जे पूर्वी केव्हांहि हिंदु नव्हते परंतु ज्यांची 'हिंदु धर्मांत प्रविष्ट होण्याची इच्छा आहे त्यांनाहि शुद्ध करून घेतां येतें.' '(के. १७-४-२८). परधर्मीयांनाहि स्वधर्मात घेण्याचें डॉ. कूर्तकोटींनीं दिलेलें 'कारण उद्बोधक आहे. शांतिसुखासाठीं तळमळणाऱ्या जीवांना मार्गदर्शक होऊन 'समाधान देण्यासारखें तत्त्वज्ञान वैदिक धर्माव्यतिरिक्त जगांत कोठेंहि नाहीं. 'धर्मासाठीं अशा रीतीनें असंतुष्ट स्थितींत तळमळणाऱ्या जीवांना शांति देण्या- 'करतां शुद्धीची चळवळ आहे. शुद्धीचें पावित्र्य तिच्या ह्या उदात्त हेतूमध्यें आहे. 'वैदिक धर्माच्या कल्पवृक्षाच्या छायेखालीं येऊन कोणींहि संतोष पावावें. कारण हिंदु 'होणें म्हणजे लहान तत्त्वाऐवजीं मोठ्या तत्त्वांचा स्वीकार करणें होय. किती उदात्त 'कल्पना!! आमच्याजवळ कितीहि चांगलें तत्त्वज्ञान असलें तरी पण तें जर जगाला 'बौद्धिक दृष्टीनें पटवून देतां आलें नाहीं किंवा ह्या तत्त्वज्ञानाच्या जोरावर 'आम्हांला आमचा ऐहिक अभ्युदय गांठतां आला नाहीं तर त्याकडे जगाचें 'लक्ष वेधणें शक्य नाहीं. वास्तव अभ्युदय व निःश्रेयस ह्या दोन्ही दृष्टींनीं आपण 'संपन्न झालों पाहिजे व अशा संपन्न दशेला जगालाहि नेऊन पोंचविलें पाहिजे. 'शुद्धीच्या चळवळीचा अंतिम हेतु हाच होय.'

शुद्धिसंघटन ह्या चळवळीचा व्याप इतका मोठा आहे कीं, निरलस कार्य-कर्त्यांचीं आयुष्येंहि त्याला अपुरीं पडतील! त्यांत अस्पृश्यतानिवारण, गोरक्षण, स्त्रीशिक्षण, अनाथालयें काढणें इत्यादि किती तरी गोष्टी येतात. 'शुद्धि व संघटन 'हे शब्द दिसण्यांत लहान दिसले तरी त्या शब्दांनीं दर्शविल्या जाणाऱ्या चळ- 'वळीचें क्षेत्र इतकें व्यापक आहे कीं, त्यांत असंख्य लोकांचा उत्साह शारीरिक 'मेहनत व द्रव्यबळ हीं जिरून पुन्हा करावयाचें पुष्कळच शिल्लक राहील;' (१८-१-२८) हें केसरीचें म्हणणें अगदीं यथार्थ ठरतें.

**ऐक्य**—आम्हीं हिंदु संख्येनें जरी ज्यास्त असलों तरी जोंपर्यंत आमच्यामधील जातीजातींतील सलोखा झाला नाहीं तोंवर त्या नुसत्या संख्येचा कांहीं उपयोग नाहीं. मराठ्यांचें औदार्य, शीखांचा कडवेपणा व शौर्य, ब्राह्मणांची बुद्धि, आर्य-समाजीयांचा निधडेपणा, प्रार्थनासमाजीयांचा व ब्राह्मोसमाजीयांचा समंजसपणा, जैनबुद्धांची संपत्ति इत्यादि गुणांचें केंद्रीकरण होऊन जर तें सर्व हिंदुधर्माच्या वाढी-कडे खर्च होईल तर आशामय भविष्यकाळांत असा एक दिवस खात्रीनें उगवेल कीं, ज्या काळांत जगांतील सर्व परधर्मीयांवर वैदिक धर्माच्या शाश्वत आचार-विचारांची गंभीर छाया पसरलेली दिसेल! 'राष्ट्राला स्वयंशासनाचें हक्क पाहिजे

'असल्यास त्या राष्ट्रांतील स्त्रीपुरुष समाज वीर्य, तेज व बल यांनीं संपन्न
' असाच असावयास पाहिजे.'(के.१-५-२३). मग हिंदूसारख्या बहुगुणी व बहुसंख्य समाजांत ऐक्य झाल्यास त्याला कोणाच्या मदतीचीहि जरूरी लागणार नाहीं व त्याला अशक्य अशी गोष्ट एकहि राहणार नाहीं.

हिंदु दुबळे दिसतात म्हणून त्यावर कोणी भित्रेपणाचा आरोप करतात त्याला केसरीनें फारच मार्मिक व सडेतोड उत्तर दिलें आहे. तो म्हणतो ' हिंदु लोक
' दुबळे असण्याचें कारण त्यांमधील विघटना हें होय. आपणास कोणी दडपता
' नाहीं, आपण करूं ती पूर्वदिशा अशी जोंपर्यंत मुसलमानांची खात्री आहे तों-
' पर्यंत त्यांचे चाळे चालतात. त्यांनाहि दडपता भेटला म्हणजे त्यांचेहि हातपाय
' लटपटतात आणि त्यांची दंडेली आपोआप नरमते. प्रतिकार करणारा भेटला
' तरीहि वाटेल ती आपत्ति सोसून स्वकर्तव्य चालूच ठेवावयाचें ही धैर्याची खरी
' कसोटी होय ! ह्या कसोटीला हिंदु लोक जितके उतरतात तितके मुसलमान
' उतरत नाहींत. मुसलमानांच्या प्रत्येक दंग्याच्या मुळाशीं आपल्यावर कांहीं घोर-
' पड ओढवणार नाहीं, ओढवलीच तर तींतून सहज निसटून जाऊं ही भावना
' असते. **उघडया डोळ्यांनीं संकटाच्या वणव्यांत उडी घ्यावी हिंदूंनींच !**
' अशा वृत्तीचे फार थोडे मुसलमान आढळतात. आणि यामुळेंच पराकाष्ठेच्या
' राजकीय चळवळींत मुसलमानांचें नांव क्वचितच आढळतें.' (के.१४-६-२७).

' हिंदु व मुसलमान ह्या दोघांत जर सलोखा व ऐक्य राहावयाचें असेल तर
' दोनहि जाती एकमेकांचा प्रतिकार करण्यास समर्थ आहेत अशी त्यांची समजूत
' होणें इष्ट आहे.' ( के. २२-८-९३ ).

**उपसंहार**—अशा रीतीनें हिंदूंमधील दोषाविष्करण करून त्यांना संघटित, सबळ व जागरूक करण्याचा यत्न केसरी आज सतत पन्नास वर्षें करीत आला आहे. केसरीनें हिंदुधर्मविषयक बांधलेलीं प्रमेयें, मांडलेले सिद्धान्त व काढलेलीं अनुमानें सर्वांनाच मार्गदर्शक होण्यासारखीं आहेत. हिंदुधर्म सनातन आहे म्हणजे तो जुना आहे एवढेंच नव्हे तर भविष्य काळींहि त्याचें सनातनत्व जोमदारच राहील अशी ग्वाही केसरीनें दिली आहे. हिंदूंची बाजू धैर्यानें व निर्भीडपणें पुढें मांडून केसरीनें हिंदूंची मोठी सेवा केली आहे. मुसलमानी अत्याचाराचा व दंग्याचा निर्भय प्रतिकार व त्यावर सयुक्तिक टीका करण्यास केसरीनें कोणा-चीहि भीड बाळगिली नाहीं. नोकरशाहीसारख्या जबरदस्त शत्रूशीं दोन हात करण्यांत जरी त्याचें आयुष्य वेंचलें तरी वेळांत वेळ काढून खिस्ती, महंमदी यांची खरमरीत हजेरीहि तो घेण्यास कचरत नाहीं. माथेफिरू मुसलमानानें श्रद्धानंदाचा खून केल्यावरच्या संतापांत केसरीनें असे उद्गार काढले कीं, ' हुता-
' **त्म्यांच्या रक्तानें त्यांच्या अंगीकृत कार्यास जोर चढत असतो.**' हिंदू-वरील केसरीचा विश्वास तर इतका दृढ आहे कीं, ' हिंदूंची संख्या बावीस कोटी

' असतांना सात कोटी मुसलमान आपणांस मिळत नाहींत म्हणून स्वराज्य दूरावर्ते ' हा आक्षेप खोटा आहे' असें स्पष्टपणें त्यानें सांगून टाकलें आहे. हिंदुधर्म-रक्षणासाठीं सदैव तळमळणाऱ्या व झटणाऱ्या अनेक व्यक्ति आहेत. त्यांनाहि सक्रिय सहानुभूति व साहाय्य अनेक प्रसंगीं केसरीनें केलें आहे. अशा रीतीनें पुष्कळ राजकीय पुढाऱ्यांकडून ज्या प्रश्नाला गौणत्व दिलें जातें तो प्रश्न प्रामुख्या-नें हातीं घेऊन धसाला लावण्याची स्पृहणीय कामगिरी केसरीनें केली आहे.

---

## युनिव्हर्सिट्या व देशभाषा

[ श्री. वि. सि. चितळे. बी. ए. व रा. ग. गोखले. बी. ए., बी. टी. ]

उपरिनिर्दिष्ट वादास सुमारें पन्नास वर्षांपूर्वी सुरुवात झाली. महाराष्ट्रांतील त्यावेळच्या विद्वानांत आपल्या मराठी भाषेबद्दल नुकताच कोठें आदर उत्पन्न होऊं लागला होता व तिच्या विपन्नावस्थेबद्दल त्यांस हळहळ वाटूं लागली होती. त्यांस असें वाटें कीं, ' एके काळीं आमची मराठी भाषा युनिव्हर्सिटींत राजरोस ' वावरत होती; पण पुढें तिच्या आईलाच—संस्कृत भाषेलाच—तिचा मत्सर उत्पन्न ' झाला व तिनें तिला युनिव्हर्सिटींतून हांकून लावून तिच्या जागीं सर्वत्र आपणच ' ठमकूं लागली. पुढें इनें कै. विष्णुशास्त्र्यांपाशीं कांहीं दिवस मोठ्या सुखानें काढलीं ' परंतु त्यांच्यानंतर तिला अजून म्हणण्यासारखा कोणाचाहि आश्रय मिळाला नाहीं.' (१८८८). केसरीच्या वरील उताऱ्यावरून कोणास असें वाटण्याचा संभव आहे कीं, संस्कृतबद्दल लोकांत आदर नव्हता; परंतु तसें नव्हतें. संस्कृतवर आई-प्रमाणेंच ते प्रेम करीत असत; परंतु मराठीचा झालेला अधःपात त्यांस पाहवेना व म्हणूनच तिचा प्रवेश पुन्हां एकदां युनिव्हर्सिटींत झाला असतां तिची विपन्ना-वस्था दूर होईल अशी त्यांची दृढ समजूत होती. अशा लोकांपैकींच त्या वेळीं एल्फिन्स्टन हायस्कूलचे हेडमास्तर प्रि. वा. आ. मोडक हे एक होत व त्यांच्या प्रयत्नानेंच वरील विषयासंबंधाच्या वादास तोंड लागलें. परंतु त्याचा निकाल अजूनहि समाधानकारक लागलेला आपणांस दिसून येत नाहीं.

**परकीयांच्या अमलाचे दुष्परिणाम**—' मराठीची उन्नति म्हणजे ' पर्यायानें हिंदुस्थानांतील सर्व देशभाषांची उन्नति होय; कारण मराठीची बाजू ' पुढें मांडणें म्हणजे पर्यायानें हिंदुस्थानच्या सर्व देशभाषांची तरफदारी आपण ' करीत आहों, ' असें वरील वादांत पडण्यापूर्वीच केसरीनें सांगून ठेविलें होतें.

युनिव्हर्सिटींत रूढ असलेलें इंग्रजी भाषेचें फाजील स्तोम व वर्चस्व काढून टाकून त्याच्याऐवजीं मराठी—अर्थात् देशभाषा—युनिव्हर्सिटींत सुरू करून तिचें वर्चस्व तेथें प्रस्थापित करावें हा या वेळच्या वादाचा मुख्य मुद्दा होता. इंग्रजी भाषा आमच्या युनिव्हर्सिट्यांत नुसता हैदोस कशी घालूं लागली या प्रश्नाला उत्तर म्हणून केसरी लिहितो, 'एका देशावर दुसऱ्या देशानें विशेषतः अर्धवट 'सुधारलेल्या राष्ट्रावर पूर्ण सुधारलेल्या राष्ट्रानें आपला पगडा बसवून तेथें बरींच 'वर्षें टिकणारा अंमल बसविला असतां, जिंकलेल्या लोकांस संमत असो अगर 'नसो, त्यांना तेथें आपली भाषा सुरू करणें भाग पडते व होता होता विजयी 'लोकांची भाषा जिंकलेल्या लोकांच्या भाषेस अगदीं संपुष्टांत आणून जेथें तेथें 'आपला तोरा मिरवूं लागते.' ( के. २०-३-८८ ). हीच गोष्ट इंग्रजी भाषेची हिंदुस्थानांत झाली! एवढेंच नव्हे तर 'इंग्रज लोकांनीं आपली भाषा जितक्या 'खोलवर जाऊन पोंचेल तितकी ती नेण्याचा प्रयत्न केला, तर त्यांचें तें करणें 'अगदीं स्वाभाविक नाहीं असें कोण म्हणेल!' ( के. २९-५-८८). राज्यांतर होतांच भाषेप्रमाणें इतर सर्व गोष्टी कमीअधिक त्वरेनें बदलत जाऊन पराभूत राष्ट्राला बहुतेक सर्व गोष्टींत त्यावर स्वार झालेल्या परकीयांच्या चालीरीतींचें व कल्पनांचें वळण लागल्याशिवाय रहात नाहीं. ( के. २०-३-८८ ).

या न्यायाप्रमाणेंच परकीय इंग्रजी अमलामुळें 'भारतीयांचें भारतीयत्व सुटत 'चाललें आहे व राजसेवेशिवाय त्यांस दुसरा उपाय राहिलेला नाहीं.' यासंबंधानें केसरी म्हणतो, 'आम्हां लतकोडग्या स्त्रैण लोकांना राजसेवेशिवाय गत्यंतर 'नाहीं असें झाल्यामुळें त्या चतुर व दूरदर्शी लोकांनीं 'शिशु दडपी जेवि ऊन 'भातानें' अशी आमची दशा करून टाकावी हें सामान्य मनुष्यस्वभावास किती 'सहज शोभण्यासारखें आहे! व आम्ही परोपकारी देशाभिमानी गब्रू लोकांनीं- 'हि आपल्या परकीय राज्यकर्त्यांस त्रास न पडावा, म्हणून ते म्हणतील त्याप्रमाणें 'वागण्यास सिद्ध व्हावें, हें आमच्या दास्यप्रिय शीलासहि किती शोभतें बरें!' ( २९-५-८८ ).

**राष्ट्रीयत्व कशांत असतें?**—'इंग्रजी भाषा राज्यकर्त्यांची जरी असली तरी 'तिला शिक्षणांत किती महत्त्व व कोणतें स्थान द्यावें व तिच्या द्वारें हिंदी लोकांना 'प्राथमिक काय, दुय्यम काय, पण उच्च शिक्षणहि द्यावें किंवा नाहीं हें ठरविण्या- 'चा या राष्ट्रांतील लोकांचाच प्रश्न आहे.'(के. १०-७-१७). 'कित्येकदां जिंकलेल्या 'लोकांच्या धर्माचेंसुद्धां निर्मूलन करतां येईल; परंतु त्यांतील बहुतेकांचा शिर- 'च्छेद झाल्याशिवाय त्यांची देशभाषा काढून घेऊन तिच्या जागीं दुसरी भाषा 'स्थापणें हें अगदीं अशक्य असतें' (के. १५-५-८८) व आहेहि. 'राजाची भाषा 'एक व प्रजेची दुसरीच अशा प्रकारची भानगड यापूर्वी जगाच्या इतिहासांत 'कमींतकमी १०-५ देशांत तरी झालेली आहे व त्या प्रत्येक ठिकाणीं अखेर

‘ मातृभाषांच्या पुरस्कारांचा जय झाला. तेव्हां लोकांच्या मातृभाषा दडपून टाकून
‘ त्यांना परकीय भाषेंतून शिक्षण—व्यवहार करावयास लावणें ही राष्ट्रीय दृष्ट्या जुल्‌-
‘ माची परमावधी होय.’(के.१७-७-१७).‘जे लोक हिंदुस्थानांत इंग्रजी भाषा स्थापित
‘ झाल्यास कांहीं हरकत नाहीं असें म्हणतात किंबहुना ती देशभाषा होण्याची
‘ इच्छा करतात, त्यांस स्वतंत्र राष्ट्र म्हणजे काय, तें अस्तित्वांत येतें कसें,उदया-
‘ प्रत पावतें कसें, चिरस्थायी होतें कसें व सुधारत जातें कसें, वगैरे गोष्टी सम-
‘ जत नसतात व त्या समजून घेण्याची त्यांची इच्छाहि नसते. मनुष्यांत ज्यांची
‘ नजर दूरवर जाऊन पोंचतें त्यांचीच विशेष प्रतिष्ठा होत असते. दूरच्या
‘ भविष्यकाळीं कोणती स्थिति येणार आहे, किंवा येणें इष्ट आहे हें जाणून ती
‘ स्थिति नियतकालीं प्राप्त होईल अशा प्रकारेंच वर्तन, ती कल्पना ग्राह्य झाल्या-
‘ पासून होऊं लागणें यांतच मनुष्याची थोरवी आहे. ज्या राष्ट्रांत अशा प्रकार-
‘ चा विचार करून तदनुसार वर्तमान क्रियांस वळण लावणारे पुरुष नसतील
‘ त्या राष्ट्रास पारतंत्र्य कधींहि सोडणार नाहीं.’ (के.१०-४-८८). वरील विचार-
सरणीच्या दृष्टीनेंच इंग्रजी भाषा हिंदुस्थानची देशभाषा होऊं शकेल किंवा नाहीं
या प्रश्नाचा शांतपणानें विचार केला पाहिजे; कारण ‘ भावी बलाढ्य व स्वतंत्र
हिंदु राष्ट्रांत देशी भाषांचाच प्रसार व व्यवहार होणार आहे व झाला पाहिजे.’
(के. १०-४-८८).

**हिंदुस्थानांत एकच राष्ट्रभाषा होऊं शकेल काय ?**—‘ आजमितीस
‘ राष्ट्रांराष्ट्रांत जी भिन्नता दिसते ती अत्यंत सकारण आहे, व जोंपर्यंत तीं कारणें
‘ अव्याहत चालतील तोंपर्यंत ही भिन्नता कायम राहील. हीं कारणें सर्वांशीं
‘ नाहींशी होण्याचा संभव नसल्यामुळें राष्ट्रभिन्नत्वहि सर्वांशीं नाहींसें होण्याचा संभव
‘ नाहीं. राष्ट्रभिन्नत्व उत्पन्न करणाऱ्या अनेक कारणांपैकीं आद्य कारण स्वसंरक्षणचिंता
‘ होय. ही चिंता एक प्रकारची उपजत बुद्धि होऊन गेली आहे. स्वाभिमान,
‘ स्वकुलाभिमान, स्वज्ञात्यभिमान, स्वभाषाभिमान, स्वधर्माभिमान, स्वदेशाभि-
‘ मान हीं त्या एका स्वसंरक्षणपरायणतेचीं निरनिराळीं रूपें होत. ही ‘ स्व ’ची
‘ सांप्रतची विशिष्ट व्याप्ती नाहींशी होऊन ती सर्वव्यापक होण्यास आणखी
‘ हजारों वर्षे लागतील. तेव्हां जी गोष्ट झाली तर ४।५ हजार वर्षांनीं होणार
‘ तिच्याविषयीं आजपासून तयारीस लागा असें म्हणणें हा तंद्राप्रिय भ्रांतिष्ट-तत्त्व-
‘ वेत्त्यांचा मोह आहे. निदान सर्व हिंदुस्थानांत एक भाषा स्थापण्याविषयीं त्यांचे
‘ जे विचार आहेत ते तर सध्यांच्या स्थितींत शुद्ध बुडबुडे आहेत.’(के.१७-४-८८).

‘ हिंदुस्थान हा स्वरूपतः एक देश आहे; पण वस्तुतः तो युरोपप्रमाणें महाद्वीप
‘ आहे. धर्म, चालीरीति व भाषा यासंबंधानें युरोपांतील पोटदेश एकमेकांशीं
‘ जितके संलग्न आहेत तितके, किंबहुना कांकणभर अधिकच, हिंदुस्थानांतील
‘ देश एकमेकांशीं संलग्न आहेत. मोठा भेद हा कीं युरोपांत राजसत्ता एक नाहीं

'हिंदुस्थानांत एक आहे; व यामुळेंच आमची विलक्षण स्थिति होऊन जाऊन 'परकी भाषा स्वभाषा करावी किंवा नाहीं, स्वदेशांतील शाळांत स्वभाषांच्या द्वारें 'शिक्षण द्यावें किंवा नाहीं, असल्या विजातीय प्रश्नांची वाटाघाट करण्याच्या 'फेंन्यांत आम्हीं सांपडलों आहों!' (के. १-५-८८).

**झाल्यास हिंदी ही राष्ट्रभाषा होऊं शकेलः**—'जर कधीं काळीं सामान्य 'व्यवहारभाषा हिंदुस्थानांत स्थापणें इष्ट वाटलें तर सुमारें ३२ कोटी हिंदी 'प्रजेपैकीं जवळजवळ निम्मे लोक हिंदुस्थानी बोलत असल्यामुळें हिंदी भाषा सामान्य 'भाषा करणें शक्य होईल. (के.८-५-८८). कारण हिंदी भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा 'असल्यामुळें व हिंदी संस्कृताची श्रेष्ठ कन्या असल्यामुळें तिची चांगली ओळख 'करून घेतली असतां तिच्या धाकट्या बहिणीची ओळख सहजरीत्या होण्याचा 'संभव आहे. तसेंच हिंदुस्थानींत महमदीच्या अनेक शाखांतील शब्दांचा 'कमी-अधिक भरणा झाला असल्यामुळें उरदु, फारशी, आरबी वगैरे अनार्य 'भाषा बोलणारांसहि ती सहज शिकतां येणार आहे.' (के.८-५-८८). शिवाय एकभाषा स्थापावयाची असल्यास अगोदर सर्व देशभाषांची एक लिपी होणें इष्ट आहे व ती गोष्ट हिंदुस्थानांत देवनागरी लिपी शिकून होण्यासारखी आहे; परंतु ज्याअर्थी इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी या देशांत एक धर्म व एक लिपी शिवाय व्यापार, विद्वत्ता, राजकारणकुशलता, सामान्य लोकस्थिति वगैरे बाबतींत त्यांचें साम्य असूनहि एक भाषा होत नाहीं, त्या अर्थी हिंदुस्थानांत एक भाषा हिंदुस्थानी होईलच असें नक्की सांगतां येणार नाहीं. परंतु हिंदुस्थानी सामान्य जनांची बोलभाषा जरी झाली नाहीं तरी तिचा आंतर-प्रांतीय (Inter-provincial) व्यवहारांत उपयोग होऊं लागून स्वतंत्र हिंदी राष्ट्राची ती प्रतिनिधी भाषा होऊं शकेल.

**भिन्नरुचिर्हि लोक**—ःहिंदुस्थानी भाषा राष्ट्रभाषा होण्यासंबंधाचा केसरीचा अभिप्राय कित्येकांस पसंत न पडून त्यांच्या राजभाषाप्रेमानें उसळी मारली व इंग्रजी भाषेची तळी उचलून धरण्यास त्यांनीं सुरुवात केली. 'हिंदुस्थानांत 'कित्येक इंग्रजी विद्यालयांची स्थापना झाली आहे व त्यांतून वर्षानुवर्ष ग्राजुएटांच्या 'झुंडी बाहेर पडताहेत, इंग्रजी ग्रंथांची विक्री वाढूं लागलेली आहे, आमच्यांत उत्तम 'कारकून, शिक्षक, व्यापारी, वक्ते, प्रोफेसर, न्यायाधीश व वर्तमानपत्रें निघूं लागलीं 'आहेत. शास्त्रीय विषयांचें उद्घाटन होऊं लागलें आहे, गोडगोड इंग्रजी 'बोलणाऱ्या पुरंध्री, युवती व कुमारी वारंवार दृग्गोचर होऊं लागल्या आहेत.' (के.१०-४-८८). यावरून कित्येकांस इंग्रजीचा उमाळा आला तर कित्येकांस ती तिरस्करणीय वाटली! हिंदुस्थानांत इंग्रजी भाषा राष्ट्रभाषा करण्यासंबंधानें केसरीला कित्येक भिन्न मतें दिसून आलीं. एक पक्ष म्हणतो कीं, 'देशभाषा या 'देशांतील मुख्य समाजाच्या लहानमोठ्या प्रत्येक व्यवहाराचें साधन होणार व

'झाल्या पाहिजेत. देशी भाषा युनिव्हर्सिट्यांच्या अभ्यासक्रमांत घालण्यांत
'याव्यात व त्यांच्या द्वारां कांहीं विषय शिकविण्यांत यावेत. असें आम्ही न करूं
'तर आम्हीं आपलें जाणूनबुजून नुकसान करण्यासारखें आहे.' दुसरा पक्ष
म्हणतो कीं 'देशीभाषा पुढेंमागें देशांत मुख्य भाषा व्हाव्या, पण आज त्या
'युनिव्हर्सिट्यांच्या अभ्यासक्रमांत घालण्यासारख्या नाहींत, घालणें जरूर नाहीं व
'घातल्या तर नफा न होतां उलट नुकसान होणार आहे. तेव्हां त्यांच्यासाठीं आज
'कोणत्याहि प्रकारची खटपट करणें जरूरीचें नाहीं.' तिसरा पक्ष स्पष्ट म्हणतो कीं,
'इंग्रजी भाषा हिंदुस्थानांत प्रस्थापित होणेंच विशेष फायद्याचें होणार आहे.'
या पक्षांतील लोकांस 'कोणतीहि भाषा या देशाची राष्ट्रभाषा झाली तरी चालेल.
'पण ज्या अर्थी आपण इंग्रज लोकांच्या अंमलांत सांपडलों आहों व ज्या अर्थी
'तो अंमल शेकडों वर्षें अव्याहत चालेल हें निर्विवाद आहे त्या अर्थी येथील
'भाषा नाहींतशा होऊन त्या सर्वांच्या जागीं इंग्रजी भाषाच रूढ होणें बरें!'
तेव्हां त्यांच्या मतें, '१७-१५ देशी भाषा पुढें आणण्याचा प्रयत्न न करतां त्या
'लवकर मागें पडत जाऊन इंग्रजी भाषा सर्वत्र तत्स्थानापन्न झाली पाहिजे.'
आपल्या म्हणण्याच्या प्रतिपादनार्थ तें असेंहि विश्वकुटुंबी तत्त्व पुढें आणतात कीं,
'भाषा ही मनुष्याचें हृद्गत व मनोगत परस्परांस कळविण्याचें साधन आहे; व
'ज्या अर्थी विचार व विकार जितके अधिकाधिक समजाविले जातील तितकें
'तितकें मनुष्यांस अधिक सुख होण्याचा संभव आहे त्याअर्थी कोणतीहि एक
'भाषा जितक्या अधिक लोकांच्या व्यवहाराचें सामान्य साधन होईल तितकें इष्ट
'आहे. मनुष्य सहवासप्रिय आहे व सहवासाचें मुख्य साधन भाषा आहे. म्हणून
'भाषाभिन्नत्व जितकें कमी होत जाईल तितकी सहवासाची मर्यादा विस्तृत होत
'जाऊन सुखाची वृद्धि होणार आहे. अर्थात् हिंदुस्थानांत एकभाषा असावी व
'हिंदुस्थानांतून तरी भाषानेकत्व नाहींसें व्हावें. तेव्हां ज्याअर्थी इंग्रजांचें प्रभुत्व
'आम्हांवर आहे त्याअर्थी इतर गोष्टींप्रमाणें त्यांची भाषाहि आम्ही आपली म्हणून
'तींत सर्व व्यवहार करूं लागण्याचा प्रयत्न कां करूं नये! हरएक प्रकारचा धंदा
'करणाऱ्यांच्या तोंडून वाणीच्या द्वारें विचारांचा व विकारांचा उद्गार होऊं लागणें
'हें बरेंच कठिण आहे. तेव्हां वृथा देशाभिमान एकीकडे ठेऊन देशाच्या भावी
'स्थितीकडे नजर देऊन इंग्रजी भाषा आपली म्हणून सर्वांनीं तिचा अंगीकार
'करावा!'

**इंग्रजी भाषा राष्ट्रभाषा होणें शक्य नाहीं**—परंतु या बाबतींत केसरीनें
पुनः पुनः बजावून सांगितलें आहे कीं, 'इंग्रजी ही आमची राष्ट्रभाषा होणें
'अशक्य व असंभवनीय आहे. जन्मास आल्यापासून ७।८ वर्षांपर्यंत ज्या स्त्री-
'पुरुषांशीं मुलांचा संबंध येत असतो त्यांची भाषा तीं सहज उचलतात
'व त्या भाषेंत आपलें मनोगत स्पष्ट करणें त्यांना सोपें जातें. अशा रीतीनें

'आलेल्या भाषेस देशभाषा, जन्मभाषा व मातृभाषा यथार्थतेनें म्हणतात. देश-
'भाषेचें ज्ञान शुद्ध अनुकरणानें होत असतें. तें समजण्यास मुलांस फार कष्ट
'पडत नाहींत. अशा तऱ्हेनें संपादन झालेल्या कल्पनांवर, भाषेवर व चाली-
'रीतींवर मनुष्याचें दृढ प्रेम बसून जातें व त्याविषयीं मोठा अभिमान उत्पन्न
'होतो. याशिवाय इतर प्रकारच्या कल्पना, चाली व भाषा त्यांस अप्रिय व
'असंपाद्य वाटूं लागतात, व तें संपादणें त्यास कष्टावह होतें. केवळ पुष्कळ
'फायद्याकडे लक्ष देऊन एकादा हे कष्ट करीलहि ! पण थोड्या बहुत फायद्या-
'करितां भलतेच श्रम करीत सुटणें व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या हातून घडत
'नाहीं.' ( २४-४-८८ ). केसरीची ही विचारसरणी निरुत्तर होती व आहे.
शिवाय 'साधारण शरीरसामर्थ्य, सुमाराचा अर्थसंचय व नित्य चरिता-
'र्थासाठीं करावे लागणारे कष्ट इत्यादि कारणांनीं सुधारलेल्या व संपन्न देशांत
'देखील शेंकडा ९९ लोकांचें व्यवहाराक्षेत्र संकुचित झालेलें असतें ! मग हिंदु-
'स्थानची काय स्थिति ! बरें इतकें करूनहि एकभाषा करण्याचे वेळीं हिंदी
'लोकांच्या देशाभिमानाच्या पिल्लानें उचल खाल्ली नाहीं तर आश्चर्यच म्हणा-
'वयाचें !'

'मोठ्या फायद्याकडे लक्ष देऊन आम्ही इंग्रजी भाषा शिकलों व त्यांत
'कितीहि निष्णात झालों, व अमराप्रमाणें वेब्स्टरसारख्यांच्या कोशांच्या आम्ही
'शेंकडों गुंडिका जरी नित्यशः केल्या तरी भारतीय आर्यांचे जे विशिष्ट आचार-
'विचार आहेत त्यासंबंधानें इंग्रजी भाषेंत आमच्यानें कधींहि नीटसें बोलविणार
'नाहीं व ते व्यक्त करण्यासाठीं केलेल्या इंग्रजी ओबडधोबड भाषांतरांपासून
'आमचें यथास्थित समाधान कधींहि व्हावयाचें नाहीं.' (के. १५-५-८८) 'शिवाय
'इंग्रजी वाङ्मयांतील कांहीं विचारांच्या हव्यासामुळें आपण अधीर होऊन व
'स्वभाषा टाकून देऊन परभाषेचा जर आम्हीं अंगीकार केला तर राष्ट्राच्या सर्व
'संस्कृतीच्या परंपरेचा समूळ उच्छेद होईल.' ( के.२३-१-१७ ). 'इंग्रजी भाषा
'ही राज्यकर्त्यांची भाषा आहे, तेव्हां सरकारी नोकऱ्याकरितां, आपलीं गाऱ्हाणीं
'त्यांस कळविण्याकरितां, हक्क संपादण्याकरितां, अधिकाऱ्यांचें दोषाविष्करण
'करण्याकरितां, इंग्रजी वर्तमानपत्रें चालविण्याकरितां व मोठ्या मानाच्या जागा व
'पदव्या मिळविण्याकरितां आम्हीं इंग्रजी शिकलेंच पाहिजे,' असें जे कित्येक
वावदूकांनीं उद्गार काढले त्याला उत्तर म्हणून केसरी म्हणतो, 'वरील कार्या-
'करितां फक्त ४-५ लाख लोक पुरेसे आहेत. तेव्हां ४-५ लाख लोकांची वरील
'कार्यांकडे निवड व्हावी म्हणून ३२ कोटी लोकांनीं इंग्रजी भाषा स्वभाषा करावी
'निदान ती चांगली शिकावी असें म्हणणें म्हणजे शुद्ध अविचार होय.'(के. १-५-८८).
'शिवाय वरीलप्रमाणें कोटिक्रम पुढें आणणें म्हणजे एकाची भाषा सुमारें ८००
'लोकांनीं शिकावी व बोलावी असें होतें; व तें कशापायीं तर तो एक राज्यकर्त्यांच्या

'जातीचा होणार म्हणून! शिवाय एकाची भाषा पारके लोक चौकशी, धंदा, मान,
'धन व ज्ञान यांपैकीं एकाच्या किंवा अधिकांच्या आशेनें शिकण्यास व वेडी-
'वाकडी बोलण्यास व लिहिण्यास तयार झाले तरी तिची ते जन्मभाषेच्या जागीं
'स्थापना करण्यास प्रवृत्त होतील काय? व्यापार–उद्योगधंदा व दररोजचा
'तत्सम इतर व्यवहार यांजकरितां मोडकीतोडकी इंग्रजी भाषा आली तरी
'चालते हा तर दररोजचा अनुभव आहे. इंग्रजी राज्य येथें चिरस्थायी झालें,–
'व तें चिरस्थाई होण्याचीं अनेक चिन्हें आहेत. इंग्रजीचा अभ्यास आतांहून
'विशेष झपाट्यानें शेंकडों वर्षें चालला, इंग्रजांच्या बऱ्याच रीतिभाति आम्हीं
'उचलल्या व शेवटीं आम्हीं आपली अंगाई-गीतेंहि इंग्रजींतूनच म्हणूं व गाऊं
'लागलों तर मात्र देशी भाषा पूर्वपश्चिम शब्दांच्या विचित्र बाकळा होतील!!'
(के. १५-५-८८). पण इंग्रजी राज्य येथें कितीहि वर्षे राहिलें तरी, किंवा इंग्रजीचा
'अभ्यास येथें कितीहि फैलावला तरी ज्यांना इंग्रजीचा गंधहि लागणार नाहीं
'असा आमचा बहुतेक स्त्रीसमाज व स्वतंत्रपणें चरितार्थ करणारे कोट्यवधि
'मजूर, शेतकरी, कारागीर, व्यापारी वगैरे लोक आमच्या अनेक देशी भाषांचे
'संरक्षक होतील' (कित्ता).

**केसरीची भविष्यवाणी**—तात्पर्य 'देशभिन्नत्वामुळें ज्या देशाची जन्मभाषा
'त्या देशांतील लोकांच्या तोंडांत व मनांत लहानपणापासून खिळून जाऊन
'तिचा त्यांच्याशीं एकजीव होऊन गेलेला असतो व म्हणूनच इंग्रजी भाषा
'येथील देशभाषा होणें अगर येथील लोकांच्या नित्यव्यवहाराचें साधन होणें
'शक्य नाहीं. कारण पुढेंमागें कांहीं वर्षें इंग्रजीचा अभ्यास झपाट्यानें चालून
'व तद्वारां लोकांचा स्वाभिमान जागृत होऊन हिंदुस्थानचें खरें हित कशांत
'आहे हें त्यांस समजूं लागेल व मग अशिक्षित लोकांत ज्ञानप्रसार करण्याविषयीं
'ते अत्यंत उत्कंठ होऊन त्यांस असें कळून येईल कीं, इंग्रजी भाषेंत लोक-
'शिक्षण देणें अशक्य व अहितकारक आहे. ही जाणीव झाल्यावर त्यांच्याकडून
'देशी भाषांत अनेक विषयांवर सुबोध ग्रंथ निर्माण करण्यास सुरुवात होईल.
'व अशा तऱ्हेनें ग्रंथविस्तार जसजसा अधिकाधिक होईल तसतशी इंग्रजी भाषेच्या
'अभ्यासास उतरती कळा लागून अखेरीस इंग्रजांचा अंमल व त्यांच्या भाषेचा
'अभ्यास संपुष्टांत येऊन, सर्व ठिकाणीं मोठमोठ्या अधिकारावर एतद्देशीय लोक
'चमकूं लागून बहुतेक राज्यसूत्रें तेच हालवूं लागल्यानें देशांतील अनेक लोकांचा
'व्यवहार उन्नतत्वाप्रत पावलेल्या देशभाषांतच होऊं लागेल.' (कित्ता).

**'पण इंग्रजी भाषा मातब्बर आहे व ती आपल्या प्रभूची भाषा आहे!'**—
केसरीनें केलेल्या वरील विवेचनानें कित्येकांचें समाधान झालें नाहींच; पण
उलट त्यांचा इंग्रजी भाषेबद्दलचा अभिमान जास्तच जास्तच बोकाळूं लागला.
परकी इंग्रजी भाषेची 'उदो उदो' करण्यांतच ज्यांनी आपलें आयुष्य वेचलें ते

इंग्रजी भाषेचे गोडवे गाऊंच लागले. त्यांच्या मतें '(१) इंग्रज हे या देशाचे 'प्रभु आहेत; अर्थात् प्रत्येकानें राजभाषेचा अभ्यास केलाच पाहिजे. (२) मनुष्या- 'मनुष्यांमधील व्यवहार सुकर होण्यासाठीं साधेल तर तो व्यवहार एकाच भाषेंत 'चालणें इष्ट असते. मग ती भाषा आपल्या प्रभूचीच–इंग्रजीच–कां नसावी ? '(३) इंग्रजी भाषा प्रत्येक विषयांत संस्कृतपेक्षां व संस्कृतापासून निघालेल्या 'कोणत्याहि चालू देशी भाषेपेक्षां श्रेष्ठ आहे. मराठी व तत्सम देशी भाषा भिकार 'व रानटी आहेत तर इंग्रजी भाषा मातब्बर व श्रीमंत आहे. (४) या देशां- 'तील कोणत्याहि भाषेंत चांगल्या ग्रंथांचा इंग्रजीप्रमाणें संचय मुळींच नाहीं. '(५) इंग्लंडांतील विद्वान् शिक्षकांच्या तोडीचे शिक्षक येथें सध्यां नाहींत व 'ते येथें मिळणारहि नाहींत. (६) येथील वरिष्ठ प्रतीच्या शाळांत सर्व 'जातीच्या विद्यार्थ्यास सर्वसाधारण अशा कोणत्या तरी एका भाषेंत शिक्षण 'दिलेंच पाहिजे व तें इंग्रजींतून देणेंच जास्तच सुलभ व प्रशस्त आहे. (७) 'इंग्रजीचा अभ्यास चालेल तितका चालविणें देशाच्या हिताच्या दृष्टीनें फायदे- 'शीर आहे; कारण त्या भाषेच्या द्वारें प्राचीन व अर्वाचीन युरोपांतील ज्ञान- 'भांडाराचीं द्वारें आपणांस खुलीं होणार आहेत. (८) इंग्रजी भाषा हिंदुस्थानचें 'एकीकरण करण्यास कारणीभूत झाली आहे; व या देशांतील निरनिराळ्या प्रांतांत 'दणळवळण वाढण्यास व लोकांचें मनोगत कळण्यास कारणीभूत झाली आहे.

'तात्पर्य केवळ ज्ञानसाधनास अत्युपयोगी भाषा कोणती या गोष्टीचा 'निर्णय करून मग तसें करण्यास जी भाषा योग्य दिसेल ती आपली देशभाषा 'करावयाची असें ठरविलें तर आमच्या गीर्वाण कन्यांची तर गोष्ट राहूंच द्या, 'पण खुद्द गीर्वाण भाषेलाहि हिंदुस्थानांतून पिटाळून देऊन जिकडे तिकडे 'इंग्रजी भाषेचा प्रवेश होऊं देणेंच हितकारक व न्याय्य होईल !!' (के. ३-४-८८).

**कांहीं खुळचट कल्पना**—(१) 'इंग्रजी विद्या, इंग्रजी नीतिशास्त्र 'व इंग्रजी आधिभौतिकशास्त्रें यांच्या अभ्यासाखेरीज देशोन्नति होणें ज्या अर्थी 'अशक्य आहे त्याअर्थी देशी भाषेंत शिक्षण दिल्यानें हिंदुस्थानचें पाऊल मागें 'पडून अखेर हिंदुस्थानभर शास्त्र्यांचा व पुराणिकांचाच सुळसुळाट होईल.' '(के. १३-४-१५). (२) 'हल्लीं जी राजकीय चळवळ चालू आहे ती इंग्रजी 'शिक्षणाचें फळ असूनहि ज्याअर्थी इंग्रज सरकारास प्रिय नाहीं त्याअर्थी देशी 'भाषांतून शिक्षण देण्याचा उपक्रम सुरू झाल्यास त्या निमित्तानें अखेर इंग्रजी 'शिक्षणाचा प्रसारहि सरकारमार्फत कमी कमी होत जाईल.' (३) 'देशी भाषा 'हिंदुस्थानांत २०० पेक्षां जास्त आहेत. तेव्हां प्रायः देशी भाषांतून शिक्षण देणें 'अशक्य आहे.' (४) 'बोधभाषा जरी मातृभाषा असली तरी परीक्षेचे प्रश्नो- 'त्तरांचे कागद मात्र इंग्रजींतून लिहिले गेले पाहिजेत.' (५) 'शिक्षणांतून हिंदी 'लिप्या अजिबात काढून टाकून, प्राथमिक शिक्षण देणें तेंच मुळीं

'रोमन मुळाक्षरांच्याद्वारें देण्याची सुरुवात करावी.' ( के. २२-८-८६ ).

देशभाषांच्या उन्नतीला विरोध करणारांच्या वरील विवेचनांत आलेले कित्येक मुद्दे केसरीला 'पर्वतप्राय दुराग्रही मतें' म्हणून संबोधावीं लागलीं, तर कांहींस 'वेडगळ कल्पना' म्हणून म्हणावें लागलें. केसरीच्या मतें 'देशी भाषांच्या 'दैन्यावस्थेचीं कारणें अनेक आहेत. परंतु वरील मतांसंबंधानें केसरीचें मत थोड-क्यांत अशा शब्दांनीं सांगतां येण्यासारखें आहे. 'सध्यां वरिष्ठ प्रतीच्या विद्या-'लयांतून जें शिक्षण देण्यांत येतें तें इंग्रजी भाषेंत इंग्रज शिक्षकांकडून देण्यांत 'येतें, व एके काळीं असेंच करणें भाग होतें; परंतु प्रस्तुत काळीं पुष्कळ विषय 'देशी भाषांच्या द्वारें देशी शिक्षकांकडून शिकवितां येतील. निदान सरकारनें व 'लोकांनीं मनावर घेतल्यास ही गोष्ट त्यांस ५।२५ वर्षांत तरी तडीस नेतां 'येण्यासारखी आहे.' ( ३-४-८८ ). इंग्रजी विद्यालयांत हिंदूंतील अठरापगड जातींतील विद्यार्थ्यांस शिक्षण मिळालें पाहिजे, ही गोष्ट केसरीला मान्य असूनहि केसरीनें देशी भाषांस विश्वविद्यालयांत घातलें पाहिजे असा आपला सिद्धान्त एकसारखा पुढें मांडलाच. हा देश शास्त्रीपुराणिकांचा होईल अशी ज्यांस भीति वाटत होती त्यांस केसरीनें असें स्वच्छ सांगितलें कीं, 'देशी भाषेंत 'शिक्षण देणें म्हणजे शिक्षणाचे विषय बदलणें असा अर्थ नसून फक्त तेच 'विषय थोड्या परिश्रमानें सर्वांस कसे समजून देतां येतील हाच मुख्य मुद्दा 'आहे. ( १३-४-१५ ). 'शिवाय देशी भाषांचा ज्या वेळीं विचार करा-'वयाचा त्या वेळीं एकाच भाषेच्या अनेक पोटभेदांचा विचार करावयाचा नसतो; 'व त्या दृष्टीनें पाहातां भाषाभेदाची दृष्टि व्यापक करूनहि हिंदुस्थानचे विभाग '१०।१५ पेक्षां जास्त होणार नाहींत. या दृष्टीनें पाहातां हिंदुस्थानासारख्या 'मोठ्या देशांत घोंटाळाहि माजण्यासारखा नाहीं.' ( १३-४-१५ ).

**देशी भाषांच्या दैन्यावस्थेचा परिणाम**—इंग्रजी भाषेचाच जिकडे तिकडे अभ्यास माजल्यामुळें मातृभाषांचें किती नुकसान होत आहे व झालें आहे याकडे देशी भाषांच्या विरोधकांचें लक्ष मुळींच गेलेलें नाहीं. एवढेंच नव्हे पण त्यांनीं देशी भाषांच्या अभ्युदयार्थ इकडची काडी तिकडेहि न करतां केवळ इंग्रजी भाषेचे गोडवे गाण्यांत व मातृभाषांवर कोरडे ओढून त्यांची लागेल तशी विटं-बना करण्यांतच त्यांस स्वर्गप्राप्तीचा आनंद होत असतो! अर्थात् 'देशभाषांस 'युनिव्हर्सिट्यांतून अजीबात पिटाळून लावल्यामुळें आमच्या लोकांस आमच्या 'कॉलेजांतून जें उदार शिक्षण दिलें जात आहे, त्याचा इतर देशांतील विद्या-'लयीन लोकांवर उदार शिक्षणाचा जसा परिणाम होतो, तसा येथील विद्यार्थ्यां-'वर मुळींच होत नाहीं व खुद्द त्यांच्या मनावर होत नसल्यामुळें त्यांच्या देश-'बंधूवरहि होत नाहीं.' (के. १९-५-८८ ) 'देशी भाषांचा प्रश्न केवळ तात्त्विक 'व ग्रांथिक आहे; तरी तो वाटतो त्यापेक्षां फार खोलवर आहे. देशी भाषांच्या

'दुर्दशेमुळें एकंदर तरुण पिढीच्या शिक्षणाला भलतेंच वळण लागलें आहे. व
'तेणेंकरून मुलांच्या कोंवळ्या मनावर दुष्ट परिणाम होत आहे. अर्थात् देशी
'भाषांचा प्रश्न वस्तुतः दुसऱ्या पुष्कळ प्रश्नांच्या मुळाशीं आहे.' (के.४-१२-९४).
'देशी भाषांच्या दैन्यावस्थेमुळें पुढारी म्हणविणाऱ्या मंडळींतील स्वाभिमान,
'उत्साह, व कर्तृत्वशक्ति नाहींशी झाल्यासारखी होत असून तरुण पिढी तर
'निःसत्त्व होत आहे.' (के.४-१२-९४) 'हें शिक्षणाचें ओझें असह्य होण्यास
'विषयांची दुर्बोधता किंवा बाहुल्य वस्तुतः कारण नसून इंग्रजी भाषेसारख्या
'परकीय भाषेंत त्यांस ते विषय शिकविण्याची पद्धतिच मुख्य कारण आहे.'
(२३-१-१७) 'या गोष्टीचा प्रतिकार करण्यास देशी भाषांना उत्तेजन देऊन
'सर्व प्रकारचें शिक्षण देण्यास त्यांना पात्र करणें हा एकच उपाय आहे.
'परकीय भाषेंतून दिलेल्या उष्ट्या व निस्सत्त्व शिक्षणानें मुलांचीं मनें कधींहि
'सुसंस्कृत व्हावयाचीं नाहींत व तीं तशीं झाल्याशिवाय त्यांच्या हातून मोठेपणीं
'कोणतीहि कर्तबगारी होणार नाहीं. अर्थात् देशी भाषांचा प्रश्न एकंदर भावी
'संततीच्या हितास मूलभूत असल्यामुळें युनिव्हर्सिटी परीक्षांतून देशी भाषांचा
'शिरकाव करणें हें या व्यापक प्रश्नाचें मुख्य अंग आहे. एवढ्याचाच प्रथम
'निर्णय झाला तरी पुष्कळ कार्यभाग झाल्यासारखा आहे.' (१८८८) 'तेव्हां
'जी गोष्ट कधींकाळीं करावी लागणार ती दिसावयास केवळ अलंघ्य दिसणाऱ्या
'अडचणी क्षणभर टाळण्याकरितां दिरंगाईवर टाकणें फायदेशीर नाहीं. आज
'तारखेस युनिव्हर्सिटींतील बहुतेक अभ्यासक्रम अनेक अडचणींसाठीं इंग्रजींत
'चालविणें भाग पडत आहे. म्हणून हीच अभ्यासरीति सदैव चालू ठेवण्याचा
'हट्ट धरून देशी भाषांस युनिव्हर्सिटीच्या पुण्य प्रांतापासून जितकें दूर पिटाळून
'लाववेल तितकें लावण्याचा आम्हीं स्वतः प्रयत्न केला पाहिजे! काय आमचा
'देशाभिमान! आणि कोण आमचें राजकीय दूरदर्शित्व!' (के.२९-५-८८).

बोधभाषा इंग्रजी असल्यामुळें ओढवलेली अनर्थपरंपरा—(१)
'आमचे राज्यकर्ते परकीय म्हणून आमच्या फायद्याकरितां आम्हांस परक्या भाषेंत
'विद्यार्जन करावें लागतें. हें विद्यार्जन आम्हां सर्व लोकांस अत्यंत कष्टावह
'झालें असून त्याकडे आम्हांस अनर्थ वेळ द्यावा लागतो. या अपरिहार्य अड-
'चणीमुळें इतर उपयोगी विषयांकडे जितका काळ व श्रम इतर देशांतील
'विद्यार्थ्यांस कॉलेजांत असतां लावता येतात, तितके आम्हांस येथें लावतां येत
'नाहींत.' (२) 'परक्या भाषेच्या घाण्यांत आमचीं पोरें उंसासारखीं पिळून जाऊन
'तीं निस्सत्त्व होत आहेत व त्यांची मानसिक वाढ अकालीच खुंटून जाते.'
(के.१९-२-२५) 'आजतारखेस असें होणें अपरिहार्य आहे असें मानिलें, तरी
'कालांतरानें तें सुपरिहार्य आहे असें कळूं लागून त्याच्या प्रतिकारार्थ आज काय
'करण्यासारखें आहे याची अटकळ केली पाहिजे.'(के.१०-७-८८) (३) 'उच्च-

' प्रतीचें सारें शिक्षण परक्या भाषेंत होत असल्यामुळें व देशीभाषांस वरिष्ठ शिक्षणा-
' लयांत मुळींच थारा नसल्यामुळें देशभाषांत कादंबऱ्यांसारखीं केवळ एकदेशीय
' कंगाल पुस्तकें होत आहेत.' (४) ' इतर प्रकारचीं पुस्तकें बहुधा होत नाहींत
' व झालींच तर त्यांना कोणी पुसत नाहींत, म्हणून देशी भाषांत कोणत्याहि
' वरिष्ठ प्रकारचा लेख पाहिला असतां तो वाचला जाण्याची किंवा त्याबद्दल
' वेतन मिळविण्याची अथवा प्रशंसा होण्याची मुळींच आशा नाहीं.' ( किता)
( ५ ) ' परकीय भाषेंतून संस्कृत अथवा मराठी भाषा या विषयांचीं उत्तरें
' परीक्षेचे वेळीं विद्यार्थ्यांस लिहावीं लागतात यापेक्षां त्यांचें दुसरें दुर्दैव तें
' कोणतें ! ' ( ६ ) ' दुय्यम शाळांतून जे विद्यार्थी पाठविले जातात त्यांचीं
' ५।७ वर्षें फक्त इंग्रजी भाषेचे शब्द, त्यांचें अनियंत्रित स्पेलिंग व उच्चार
' आणि देशी भाषांहून भिन्न अशी वाक्यरचना शिकण्यांतच जात असतात.
' हा कालाचा शुद्ध अपव्यय होय. साधारण इंग्रजी लिहिण्याबोलण्यासाठीं विद्यार्थ्यां-
' च्या आयुष्याचीं महत्त्वाचीं ५।७ वर्षें खर्चीं पडावीं हें व्यक्तिदृष्ट्याच नव्हे
' तर राष्ट्रीय हितदृष्ट्याहि मोठें दुर्दैव होय. बरें, इंग्रजी भाषेची याप्रमाणें ५।७
' वर्षें घोकंपट्टी करूनहि ती भाषा येतेच असें नाहीं ! याप्रमाणें ५।७ वर्षें
' विनाकारण घोकंपट्टींत घालविल्यामुळें गणित, पदार्थविज्ञान, इतिहास, अर्थ-
' शास्त्र, रसायनशास्त्र वगैरे राष्ट्रीय दृष्टीनें महत्त्वाचे शास्त्रीय विषय येणें जरूर, ते
' येत नाहींत. या दृष्टीनें पाहतां परकीय भाषा विनाकारण शिकण्यासाठीं देशां-
' तील तरुण पिढी मारावयाची कीं उपयुक्त शिक्षण देऊन शक्य तितकी अधिक
' सुशिक्षित करावयाची ?' ( के. १३-४-१५). ( ८ ) ' ब्रिटिश विद्यालयांतील
' विद्यार्थ्यांशीं केवळ बुद्धिसंपत्तीच्या दृष्टीनेंच तुलना करूं गेल्यास हिंदी विद्यार्थी
' कांहीं कमी भरणार नाहींत; जर त्यांच्या अंगीं कांहीं कमकुतपणा असेल तर तो
' विषयज्ञानाच्या भरणांतच मुख्यतः असतो. पण त्याचें कारण मात्र ते विषय
' त्याला स्वदेशी भाषेंतून शिकतां येत नाहींत, परदेशी भाषेंतून शिकावे लागतात
' हेंच होय.' ( के. २३-१-१७ ). ' मातृभाषेंतून शिक्षण मिळणें हा प्रत्येक
' विद्यार्थ्यांचा हक्क आहे.' ( के. २४-२-२५ ).

**मातृभाषाच बोधभाषा पाहिजे**—वरील विवेचनावरून येथील शाळांतून इंग्रजीनें व तिच्या पुरस्कर्त्यांनीं या दुर्दैवी देशांत नुसतें थैमान घातल्यामुळें देशी-भाषांची कशी गळचेपी झाली आहे हें चटकन समजून येणार आहे, व म्हणूनच केसरीनें टाहो फोडून सर्वांस सांगितलें कीं, ' ज्ञानाचें संपादन व दान यासाठींच
' कोणत्याहि भाषा शिकावयाच्या असतील तर देशभाषांचा अभ्यासच सुरू केला
' पाहिजे; कारण शेपन्नास वर्षांनीं तरी या देशांतील विद्वान् लोकांस असें स्पष्ट
' दिसून येणार आहे कीं, समाजांत जो विद्याप्रसार करावयाचा तो देशभाषांतच
' केला पाहिजे; परकी भाषेंत करणें अशक्य आहे.' ( के. १९-६-८८). ' आमच्या

'युनिव्हर्सिटींत स्वतंत्रपणें देशभाषांचा अभ्यास होऊं लागून उत्तरोत्तर त्यांत
'एकेक विषय शिकविण्याचा परिपाठ पडला तरच त्यांचें डोकें वर निघेल. देशी
'भाषांत शिक्षण दिल्यानें विद्यार्थ्यांस विषय अधिक सुगम होतील, ज्ञानाचा
'जास्त प्रसार होऊन तें या देशांत स्थिरावेल व त्याबरोबरच देशी भाषांचा
'उत्कर्ष होऊन विशिष्ट ज्ञानसामर्थ्य उत्पन्न होईल.' (१९१५). 'शिवाय मुलांचें
'शिक्षण मातृभाषेंतून झाल्यास तें परभाषेपेक्षां निम्या अगर तिजाई वेळांत होतें!
'अर्थात् मातृभाषा बोधभाषा ( Medium of Instruction ) झाल्यामुळें
'देशीभाषांस उत्तेजन मिळून त्या भाषांत ग्रंथसंपत्ति वाढेल व त्याबरोबरच देश-
'कल्याणहि होणार आहे.'

**संस्कृत भाषेची व देशी भाषांची फारकत**—देशी भाषांतून शिक्षण दिलें पाहिजे असें केसरीनें प्रतिपादिलें. यामुळें कोणांस अशी शंका येण्याचा संभव आहे कीं, केसरीस संस्कृत भाषेची गोडी असली तरी त्या भाषेच्या अभिवृद्धी-बद्दल विशेष आस्था नाहीं. परंतु ही गोष्ट सर्वथैव चुकीची आहे. कारण देशी भाषांचा पुरस्कार करीत असतांच केसरीनें असें स्पष्ट बजाविलें कीं, 'पुढेंमागें
'युरोपप्रमाणें हिंदुस्थान, इंग्लंड, फ्रान्स किंवा जर्मनी यांपैकीं एकाद्याप्रमाणें आमचा
'महाराष्ट्र, गुजराथ किंवा कर्नाटक एक स्वतंत्र प्रांत व्हावा अशी आमची इच्छा
'व महत्त्वाकांक्षा असेल तर आमच्या युनिव्हर्सिट्यांतून स्थानिक देशभाषांस तर
'उत्तेजन मिळालेंच पाहिजे; पण त्याबरोबरच संस्कृतकुल व द्रविडकुल या दोन
'भाषाकुलांपैकीं प्रधान भाषांचा अभ्यास करतां येण्याची सवड झाली पाहिजे.'
( ३-७-८८ ). 'जर पुढेंमागें देशभाषांत वरिष्ठ शिक्षण देतां येण्यासारख्या त्या
'व्हाव्या असा इरादा असेल तर त्या सर्वांची माता जी संस्कृत भाषा तिचा
'कॉलेजमध्यें जाणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याकडून थोडाबहुत तरी अभ्यास करविलाच
'पाहिजे; कारण कोणत्याहि शास्त्रीय किंवा करणुकीच्या विषयांत विशेष खोल
'जावयाचें म्हणजे गीर्वाण वाणीची आराधना केल्याखेरीज एक पाऊलहि पुढें
'टाकतां येत नाहीं. संस्कृतादि जुन्या भाषांचे ज्ञानामुळें नवेनवे विचार देशी
'भाषांत व्यक्त करण्यास पुष्कळ मदत होते. तेव्हां हल्लींच्या स्थितींत देशी भाषांची
'व त्यांच्या मातुश्रींची फारकत करूं देणें केसरीला सर्वांशीं अहितकारक वाटत
'होतें.' (के.६-३-९४) मात्र केसरीनें पुन्हां असें बजावून सांगितलें कीं, 'देशी-
'भाषांचा अभ्यास सुरू ठेवल्याशिवाय संस्कृत भाषेच्या अभ्यासापासून फायदा
'होण्याचा संभव नाहीं.' ( १२-६-८८ ).

**भाषावार प्रांतरचना**—'देशी भाषांतून शिक्षण देणें व तिची उन्नति करणें
'या विषयांतील अंतिम सुधारणा म्हणजे हिंदुस्थानांत भाषावार युनिव्हर्सिट्यांची
'स्थापना करणें होय' असें केसरीचें म्हणणें आहे; परंतु देशीभाषांना स्वराज्य पाहिजे म्हणजे त्यांना आपल्यापुरती स्वतंत्रता पाहिजे आहे असें म्हटल्यामुळें

मराठी विरुद्ध कानडी, हिंदी विरुद्ध बंगाली व कानडी विरुद्ध तेलगू अशा तऱ्हेचे कांहीं वेडगळ वाद देशांत उत्पन्न झाले. त्यांना उत्तर म्हणून केसरी म्हणतो, 'एका देशी भाषेनें दुसरीवर स्वारी करण्याचा हा प्रश्न नसून सर्व देशी भाषांनीं 'मिळून एका परकी भाषेविरुद्ध संघ करून आपापलें अंतःस्वातंत्र्य मिळविण्या-'चाच हा प्रश्न आहे. ज्या वेळीं मराठीची बाजू आम्ही पुढें मांडितों, त्या वेळीं 'उपलक्षणेनें इतर देशी भाषांची बाजू गर्भित रीतीनें मांडीत असतोंच; व या 'चळवळींत फळ मिळण्यास मराठीप्रमाणें इतर भाषांनाहि तें मिळाल्याखेरीज 'राहणार नाहीं. कारण मातृभाषा हाच स्वराज्याचा पाया होय.' (१०-१-१७).

**देशी भाषा व युनिव्हर्सिट्या**—देशी भाषांची उन्नति करणें तरुण पिढीच्या अर्थात् भावी देशोन्नतीच्या फायद्याचें कसें आहे याचें सांगोपांग विवेचन केल्या-नंतर केसरीनें या बाबतींत सरकार, युनिव्हर्सिट्या व लोक यांचें कर्तव्य काय या प्रश्नाच्या विचारास चालन दिलें. परंतु तसें करण्यापूर्वी लोकांस स्पष्ट बजावून सांगितलें कीं, 'देशी भाषांचा अभ्युदय होण्यास त्यांना युनिव्हर्सिट्यांकडून मदत 'घेण्याची जरुरी नाहीं. युनिव्हर्सिटींत संस्कृत भाषेचा अभ्यास होईल तितका 'झपाट्यानें चालवावा म्हणजे सारें काम होणार आहे. देशी भाषांस सुद्धा येण्यास 'बाहेरच्या बाहेर होतील तितके प्रयत्न करावे व तशी त्यांची शुद्धि व वृद्धि 'झाली म्हणजेच युनिव्हर्सिट्यांच्या पुण्यमंदिरांत प्रवेश व्हावा, हीं व असल्या 'तऱ्हेचीं मतें बाळगणाऱ्या सर्व लोकांस खूळ लागलें असें समजून त्यांस खुशाल 'वेड्याच्या इस्पितळांत पाठविण्यांत यावें.' (२२-५-८८). तसेंच 'ज्ञानवृद्धि 'व ज्ञानप्रसार करणें हें मात्र युनिव्हर्सिटीचें कर्तव्य; परंतु त्यांच्या साधनांचा 'विचार करणें मात्र त्यांचें कर्तव्य नाहीं;' अशा तऱ्हेचीं दुराग्रही मतें बाजूस सारून 'व केवढ्याहि अडचणी असल्या तरी एतद्देशीय भाषांत पुढेंमागें बहुतेक सर्व 'प्रघात पडतील अशा तजविजीस प्रत्येकानें लागावें. पण ही तजवीज आमच्या 'युनिव्हर्सिटींत देशभाषांस घातल्याशिवाय होणार नाहीं' असा स्पष्ट इषारा केसरीनें दिला आहे. तेव्हां 'आपल्या देशी भाषांच्या अभिवृद्धीसाठीं आपल्या युनिव्हर्सिट्यां-'च्या अधिकाऱ्यांकडून कोटिक्रमानें व गोडीगुलाबीनें कांहींतरी करून घेऊन लोकांनीं 'आपलें म्हणणें युनिव्हर्सिटीकडून अंमलांत आणलें पाहिजे. नाहींतर आपलें अज्ञान व 'असामर्थ्य कबूल करून युनिव्हर्सिटीचे अधिकारी जी गोष्ट कबूल करतील ती निमुटपणें 'मान्य करून विनतक्रार ते जसें वागावितील तसें वागवून घेतलें पाहिजे. या विषयासंबंधीं 'देशांत चळवळ झाली पाहिजे व या रीतीनें देशभर झालेला काहूर युनिव्ह-'र्सिट्यांच्या दरवाजापर्यंत पोंचून व त्यांचीं द्वारें खुलीं होऊन त्यांत थोड्या 'दिवसांच्या आंत देशभाषांचा प्रवेश झाला पाहिजे.' (के. १०-७-८८). 'कारण युनिव्हर्सिटी लोकांकरितां आहे, लोक युनिव्हर्सिटीकरितां नाहींत.' (के. १७-७-१७). 'युरोपीय अर्वाचीन भाषांस जें सुखरूप आलें आहे व त्यांत

'जो एवढा ग्रंथविस्तार झाला आहे तो त्यांच्या द्वारें युनिव्हर्सिटींतील शिक्षण देण्या-
'चा प्रघात पडला म्हणूनच. अर्वाचीन युरोपीय भाषांच्या द्वारें युरोपांतील युनिव्ह-
'र्सिट्यांत शिक्षण देण्यास जेव्हां प्रारंभ झाला तीच स्थिति आमच्या देशभाषांची सध्यां
'आहे खास!' परंतु या ठिकाणीं कोणी अशी शंका काढील कीं अर्वाचीन भौतिक शास्त्रां-
तील व तत्त्वज्ञानांतील गहन विचार सुबोध व सुलभ रीतीनें प्रकट करण्याची
शक्ती देशभाषांत येणार कशी ? या प्रश्नास केसरी उत्तर देतो कीं, 'मनुष्या-
'च्या इच्छेनें सांगितलेलें काम भाषेला एकाद्या आज्ञाधारक दासीप्रमाणें
'करावें लागतें; व करून करूनच तिच्या कामाला सौष्ठव व सौकर्य येत असतें.'
( २३-१-१७ ). 'हीच स्थिति देशभाषांची होणार. शिवाय पारिभाषिक
'शब्दांची अडचण जर भासली तर ( १ ) विद्वानांनीं व सरकारनेंहि या
'दिशेनें प्रयत्न चालविले पाहिजेत. ( २ ) अनेक शास्त्रांतील मुख्य शब्दांस
'सांपडण्यासारखे सारे प्रतिशब्द संस्कृत भाषेंतून धुंडाळून काढले पाहिजेत. (३)
'शब्दास प्रतिशब्द सांपडत नसतील तर त्याबद्दल नवीन सिद्ध, साधित किंवा
'संयुक्त शब्दांची योजना केली पाहिजे व ( ४ ) ज्यांचें बरोबर भाषांतर होण्या-
'सारखें नसेल त्यांना जसेच्या तसेच किंवा देशी पेहेराव चढवून देशी शब्दांत
'वागवून घेण्यास आपण तयार झालें पाहिजे.' ( २२-५-८८ ).

'स्वातंत्र्य प्राप्त झाल्यापासून थोड्या दिवसांच्या आंत देशभाषा केवढ्याहि
'दैन्यावस्थेंत असल्या, तरी त्यांच्या द्वारां लोकांस सर्व प्रकारच्या विद्यालयांत
'शिक्षण देण्याची कांहींतरी तोड काढतां येईल व आम्हांस आपल्या युनिव्हर्सि-
'टींत ४।२ वर्षांत, सध्यां चालत असलेले सारे विषय येथील ठळक ठळक देश-
'भाषांत शिकवितां येतील.' 'कोणतीहि भाषा प्रगल्भ दशेस येण्यास तिचा
'बाजारांत, न्यायसभेंत, दरबारांत, कौन्सिलांत वगैरे ठिकाणीं अप्रतिहत संचार
'झालाच पाहिजे.' 'सर्व राष्ट्रीयत्वाच्या बुडाशीं असलेल्या हिंदी भाषांचा आपण
'विचार करीत असतां खर्च अधिक लागेल, कारकून अधिक ठेवावे लागतील,
'परीक्षक आणि शिक्षक अधिक नेमावे लागतील अशा पोरकट सबबीवर ही
'सुधारणा आम्ही मागें पडूं दिली तर,' केसरी निश्चयानें सांगतो कीं, 'त्यांत
'सरकारच्या शहाणपणापेक्षां आमच्या पुरुषार्थाचीच परीक्षा होणार आहे.'
(१७-७-१७). अशा तऱ्हेनें लोकांनींच देशी भाषांचा उत्कर्ष करण्यास झटल्यानें
त्यांचा उत्कर्ष होऊन इंग्रजी, फ्रेंच, संस्कृत वगैरे परिणत भाषांचा प्रौढपणा
त्यांच्यांत येईल. ही क्रांति घडवून आणणें म्हणजे केसरीच्या मतें, 'स्वदेशा-
'भिनाचें एक अंग काबीज केल्याप्रमाणेंच होणार आहे.'

**देशी भाषासंबंधीं युनिव्हर्सिटयांचें कर्तव्य**—देशभाषांची उन्नति करण्या-
च्या कार्यांत लोकांचें कर्तव्य वर आपण पाहिलें. आतां त्यांच्यासंबंधानें युनि-

व्हर्सिट्यांनीं काय करावें यासंबंधीं केसरीनें खालील उपयुक्त सुधारणा सुचविल्या आहेत. '( १ ) पाश्चिमात्य ज्ञान इकडील ज्ञानापेक्षां सर्वांशीं श्रेष्ठ असलें तरी 'तें ज्ञान देशी भाषांतून देण्याची व्यवस्था युनिव्हर्सिटीनें करावी. ( २ ) युनि- 'व्हर्सिटीच्या परीक्षेचे वेळीं सर्व विषयांचीं उत्तरें देशी भाषांत देण्याची सवड 'तिनें ठेविली पाहिजे. विशेषतः मॅट्रिक परीक्षेस लागणारे इतिहास, संस्कृत, 'भूगोल, गणित, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र वगैरे विषय देशी भाषांतून शिक- 'विण्याची व्यवस्था करून पुढें २।३ वर्षें विद्यार्थ्यांकडून इंग्रजी भाषेचा अभ्यास 'करविला तर विद्यार्थ्यांवरील परीक्षेचें ओझें बरेंच हलकें होईल. (३) विद्यार्थ्यां- 'मधील घोकंपट्टी टाळावयाची असेल तर विद्यार्थ्यांस शिक्षण द्यावयाचें तें मातृ- 'भाषेंतूनच दिलें पाहिजे; एरव्हीं त्यांना कोणत्याहि विषयांतील मूळ कल्पना 'व सिद्धान्त नीट समजणार नाहींत. कारण लहान मुलांस केवळ आपल्या 'स्मरणशक्तीवर भार टाकून घोकंपट्टी करावी लागते. ( ४ ) देशभाषांतून 'ज्या प्रकारें ग्रंथ होणें आवश्यक आहे, तशा प्रकारचे ग्रंथ केवळ देशी 'भाषांतील जुन्या ग्रंथांच्या अध्ययनानें निर्माण होतील असें नाहीं. तेव्हां देशी 'भाषांतील जुने ग्रंथ नुसते घोकवून घेण्यापेक्षां निरनिराळ्या शास्त्रीय विषयां- 'चा अभ्यास व मनन देशी भाषांतून विद्यार्थ्यांकडून करविल्यास जास्त उप- 'योग होणार आहे. ( ५ ) युनिव्हर्सिटीनें देशी भाषांत कांहीं विषय 'शिकविले तर देशी भाषांत त्या त्या विषयांवर उत्तम ग्रंथ 'निर्माण होतील. ( ६ ) शिक्षणाची बोधभाषा देशी भाषा होण्यास 'कोणत्याहि विषयावरील ग्रंथ देशी भाषेंत झाले पाहिजेत असें नाहीं. त्या त्या 'विषयावरील सर्व ग्रंथ मग ते कोणत्याहि भाषेंत असोत उमेदवारानें वाचावे 'पण उत्तरें मात्र मातृभाषेंत द्यावीं. हीच पद्धति हल्लीं विलायतेच्या युनिव्हर्सिटींत 'प्रचारांत आहे; व तीच इकडे अंमलांत आल्यास देशी भाषेंतील ग्रंथांची वृद्धि 'होईल. नुसत्या देशी भाषा एम्. ए. अगर बी. ए. च्या परीक्षेस ऐच्छिक विषय 'ठेवल्यानें युनिव्हर्सिटीचें देशी भाषांसंबंधाचें कर्तव्य संपलें असें होत नाहीं. (७) 'हल्लींच्या राज्यपद्धतीमुळें इंग्रजीचें जितकें ज्ञान संपादन करण्यास विद्यार्थ्यांस 'आवश्यक आहे तितकें त्यांस मिळतें कीं नाहीं हें पाहून नंतर बाकीच्या कांहीं 'विषयांच्या परीक्षा देशीभाषांतून घेण्यास युनिव्हर्सिटीनें सुरुवात करावी. ( ८ ) 'इंग्रजी व संस्कृत या भाषांच्या ज्ञानाची यत्ता कमी न करतां सर्व विषय देशी भाषां- 'तून शिकविण्याची जर कॉलेजांतून सोय करितां आली तर सदर भाषांस उत्तेजन 'देण्याचे कामीं युनिव्हर्सिटीनें आपलें कर्तव्य थोडेंबहुत केलें असें होईल. नाहीं 'तर हल्लींसारख्या युनिव्हर्सिटीच्या चरकांत सांपडून आपआपल्या मातृभाषेचे 'व संस्कृतीचे होणारे धिंडवडे असेच चालू द्यावयाचे काय ?' (के. २३-२-२६).

देशी भाषेच्या उत्कर्ष-उन्नतीसंबंधानें केसरीला किती आस्था वाटत होती हें

आतां निराळें सांगण्याची गरज नाहीं. केसरीच्या मतांशीं सर्वस्वी जुळेल अशा तऱ्हेचें प्रसिद्ध पंडित जॉन स्टुअर्ट मिल्ल याचें, केसरीनेंच उद्धृत केलेलें मत वाचकांनीं एकवार वाचणें अत्यवश्यक आहे. तो म्हणतो 'इंग्रजी भाषा हिंदु-'स्थानची देशभाषा होणें अशक्य आहे; सबब हिंदुस्थानांतील देशी भाषांस उत्ते-'जन दिलें पाहिजे, त्यांच्या अभिवृद्धीसाठीं हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयांत देशी-'भाषांवर परिश्रम करणारे विद्वान् गुरु नेमले पाहिजेत; अशा उपायांनीं देशी भाषा 'उन्नत करून तद्वारां अर्वाचीन पाश्चिमात्य ग्रंथांचीं भाषांतरें किंवा त्यांच्या आधा-'रानें स्वतंत्र पुस्तकें हिंदुस्थानच्या लोकांच्या हातांत पडूं लागलीं पाहिजेत; व अशा 'तऱ्हेनें तेथें विद्याप्रसार झालाच पाहिजे.' सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वीं प्रसिद्ध केलेलें मिल्लचे विचार अजूनपर्यंतहि या देशांतील कांहीं लोकांस व शिक्षणांतील मुरब्यांस पटत नाहींत ही या देशाच्या दुर्दैवाची कमालीची मर्यादा होय! 'पाश्चात्य पद्धती-'च्या व परकीय भाषेंत दिलेल्या शिक्षणानें मंडित झालेला मनुष्य विद्वाना-'सारखा दिसला किंवा देवदूताप्रमाणें जरी तो बोलत असला तरी असल्या 'शिक्षणाची राष्ट्रभक्तीच्या व देशसेवेच्या दृष्टीनें फारशी किंमत नसल्यामुळें तो 'मनुष्य मधुर किंवा खणखणीत ध्वनी करणारें केवळ एक निर्जीव वाद्य आहे.' (२४-८-०१) असें केसरीनें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. शिवाय 'एकाद्या इंग्रजा-स, एकाद्या फ्रेंचास अगर एकाद्या जर्मनास इंग्लंडांत, फ्रान्सांत अगर जर्मनींत तूं 'आमच्या मराठींतून शिक्षण देशील कीं आपल्या मातृभाषेंतून? असा जर आपण 'प्रश्न विचारला तर तो त्याचें उत्तर आपल्यास संमत असें देण्यास कधीं 'तरी तयार होईल असें आपणास वाटतें काय? मग आम्हींच अशा तऱ्हेनें आत्म-'घातकीपणा कां करावा? जगाच्या अनेक व दूरदूरच्या भागांत विखुरलेल्या ज्यू 'लोकांना—कीं ज्यांना फिरून म्हणून आपला एखादा स्वतंत्र देश होईल अशी 'आशाहि करतां येणें शक्य नाहीं--इतर लोकांनीं गोधडीवजा ठरविलेल्या व 'अवमानिलेल्या, पण ज्यू लोकांना मातृस्थानीं असलेल्या 'यिडिश' भाषेस 'नांवारूपास आणण्यांत जर स्वाभिमान वाटतो तर हजारों वर्षे एकत्र राहून, 'हजारों बंधनांनीं एकगठ्ठा बनलेल्या हिंदी, बंगाली, मराठी, कानडी, गुजराथी, 'तामील, तेलगु, मल्याळम्, सिंधी, पंजाबी वगैरे प्राचीन व परिणत भाषा 'बोलणाऱ्या हिंदी लोकांनीं आपापल्या भाषांच्या द्वारेंच शिक्षण—मग तें कितीहि 'उच्च कोटींतील असो—मिळविण्याची आकांक्षा धरल्यास त्यांस नांव कसें ठेवतां 'येईल! म्हणूनच महात्मा गांधी म्हणतात कीं, 'देशी भाषांवरून ज्यांचा विश्वास 'उडाला त्यांचा स्वतः आपल्यावरीलच विश्वास उडाला असें म्हटलें पाहिजे.' 'देशी भाषेवरील अप्रीति हेंच राष्ट्रीय अधोगतीचें लक्षण होय.'(के.१०-७-१७).

---

# तत्त्वज्ञान

[ महादेव धोंडो विद्वांस, एम्. ए., एल्एल्. बी. ]

केसरीची तत्त्वज्ञानविषयक दृष्टि काय होती ह्या गोष्टीचा ऊहापोह या विभागांत करावयाचा आहे. केसरी हें वर्तमानपत्र लौकिक व्यवहारास वाहिलेलें असल्याकारणानें तत्त्वज्ञानविषयक मताचें उघड रीतीनें प्रतिपादन त्यांत सांपडणें कठिण. केसरीच्या तत्त्वज्ञानविषयक दृष्टीचा त्यांत प्रसंगोपात्त व्यतिरेकानें जो काय उल्लेख व्हावयाचा तेवढाच. अमुक एक प्रकारचीं तत्त्वज्ञानविषयक मतें प्रतिपादन करण्यास किंवा पुरस्कृत करण्यास केसरी जन्मास आला नव्हता. केसरी जन्मास आला त्या वेळीं हिंदुस्थानांत नवीन धर्मस्थापनेचे प्रयत्न चालू होते. महाराष्ट्रांत प्रार्थनासमाज किंवा सत्यसमाज यांचे प्रयत्न अशा प्रयत्नांपैकीं होत. परंतु असलें कार्य आम्हांस करावयाचें नाहीं असें केसरीनें एतद्विषयक पहिल्या लेखांतच स्पष्ट नमूद केलें आहे. केसरी म्हणतो, 'सर्व धर्मांचें सार काढून नवीन धर्म बनवणें... असल्या अकटोविकट कृत्यांत आजपर्यंत आमचा (राष्ट्राचा) अमोलिक वेळ पुष्कळ व्यर्थ गेला तर वरील चुकीची दुरुस्ती करण्याचा आमचा विचार आहे.' (४-१-८१).

याप्रमाणें प्रतिज्ञा करून केसरी निघाला; परंतु तत्कालीन परिस्थितीनें केसरीचा अलिप्तपणा फार दिवस टिकूं दिला नाहीं. ता. १७-५-८१ चे अंकांत एक मनोरंजक स्फुट आलें आहे. गुरुवार ता. १२ मे रोजीं रा. ब. नी. ज. कीर्तने यांचें हिराबागेंत हिंदुधर्म व त्याचा प्रसार या विषयावर भाषण झालें. त्या वेळीं 'रा. गो. ग. आगरकर यांनीं अप्रासंगिक आवेशाचे भरांत अशी धीट गर्वोक्ति 'केली की, धर्मवाद हा दुःखमूलक व संशयपूर्ण आहे, यासाठीं तो मुळींच सोडून 'देऊन नास्तिक पंथ धरावा.' त्या वेळीं रा. ब. रानडे यांनीं प्रार्थनासमाजासारखा नवीन धर्म स्थापावा अशा रोखाचें भाषण केलें. यावर केसरी लिहितों कीं, 'ज्याअर्थी धर्मसंबंधानें वाद करण्याची आमची इच्छा नाहीं त्याअर्थी वरील 'भाषणांपैकीं कोणाच्याहीवर आम्ही टीका करीत नाहीं. तथापि आम्हांस असें 'वाटतें कीं, 'परमात्मस्वरूपशोधन' 'जीवात्मस्वरूपनिर्णय' 'विषयोत्तर-'स्वरूपज्ञान' 'जगदनाद्यन्तत्व' वगैरे मानवी बुद्धीच्या पोंचाचे बाहेरचे विषय 'ज्याचे त्यावर सोंपवून सर्वसंमत व सर्वांस आकलन करण्यास सुबोध असें 'जगाचें जें बाह्य कल्याण तें संपादण्याविषयीं सर्वांनीं धर्मविषयक परस्परविरोध 'टाकून रात्रंदिवस झटावें.'

हा उतारा आगरकरांचा आहे ही गोष्ट निर्विवाद आहे व या उताऱ्यांत त्यांचें लौकिकचारित्र्याचें गमक निःसंशय सांठविलेलें आहे. पण यावरून त्यांचे इतर सहकारी यांचेहि त्यांचेप्रमाणेंच मत होतें व त्यांनींहि आपले लौकिकचारित्र्यास सुरवात याच तत्त्वावर केली असें जें कित्येक अनुमान करतात—नव्हे—दुराग्रहानें प्रतिपादन करतात तें निराधार होय. धर्मविषयक वादांत लोकांचा पाय रुतला असतां राष्ट्राचें ऐहिक निःश्रेयस जें स्वातंत्र्य त्याची प्राप्ति कधींच व्हावयास नको हें केसरीनें आरंभींच ओळखलें होतें व यास सर्वांची अनुमति होती एवढेंच फार तर म्हणतां येईल. जगाचें बाह्य कल्याण या शब्दानें स्पेन्सरचा जनहितवाद जो प्रतीत होतो, तेंच आगरकरांबरोबर त्यांच्या इतर सहकाऱ्यांचेंहि लौकिक-चारित्र्याचें गमक होय असें दुराग्रह्याशिवाय दुसरा कोणी म्हणणार नाहीं. या बाबतींत 'मानवी बुद्धीच्या पोंचाच्या बाहेरचे विषय ज्याचे त्यांजवर सोंपवावे' अशीच आगरकर म्हणतात त्याप्रमाणें आपापसांतहि केसरीच्या संस्थापकांनीं व्यवस्था केली असली पाहिजे.

केसरीच्या या स्पष्ट मतोच्चारानेंहि कार्यभाग साधला नाहीं व लवकरच केसरीस स्वतःची धर्मविषयक मतें एकदां सांगून टाकावीं लागलीं. अनुकरण या विषयावर लिहितांना प्रार्थनासमाजावर केसरीनें टीका केली. केसरी त्या वादांत अडकला गेला. ता. ३०-८-८१ रोजीं केसरी लिहितो 'ब्रह्मसमाज, प्रार्थना-
'समाज यांसारख्या नूतन धर्मांच्या घासाघाशींत मुळींच पडावयाचें नाहीं हा
'आमचा कृतसंकल्प खरा; पण परवां 'अनुकरणा'वर लिहितांना आम्हीं एक
'निबंध लिहिला.' केसरीनें 'पवित्र आत्मा बायकांच्या खोप्यांतील गजऱ्यावर फिदा
'होतो काय?' या मथळ्याखालीं प्रार्थनासमाजिष्टांच्या स्त्रीपुरुषमिश्रित समाजांत प्रार्थना करण्याच्या चालीवर 'हें एक पाश्चात्यांचें अनिष्ट अंधानुकरण आहे' अशा रोखाची टीका केली होती. त्यास 'हें परकीयांचें अनुकरण नाहीं कथाकीर्तनांतहि असा समाज एकत्रित होतो असें एकानें उत्तर दिलें.' त्यास केसरी म्हणतो, 'सगळाच हिंदुधर्म अगदीं कवडीमोलाचा आहे अशी खात्री
'होऊन तो सोडावा व दुसऱ्या एकाद्या नवीन पंथाचा स्वीकार करावा असें
'आम्हांस वाटत नसल्यामुळें प्रार्थनासमाजाची बारीकसारीक माहिती आम्हीं मिळ-
'विली नाहीं. बाह्य स्वरूपावरून जें वाटलें तें लिहिलें. बाकी हिंदुधर्माचा
'कंटाळा येऊन एकदम ख्रिस्ती धर्मांत धाव घेणाऱ्याला मध्यन्तरावर कांहीं अंशीं
'हिंदुधर्माचे बाजूलाच हें 'चर्च' आहे व त्यानें आर्यत्वाचें संरक्षण होईल यांत
'संशय नाहीं.'

ता. १३।९।८१ च्या स्फुटसूचनेंत केसरी लिहितो, 'अमुक एक धर्म
'चांगला कां वाईट असला वाद आम्हांस स्वभावतःच नको. पण ज्याअर्थीं या
'धर्मविवादाच्या पेंचांत आम्ही प्रसंगवशात् सांपडलों आहों त्याअर्थीं सत्यास स्मरून

'या बाबतींत आमचीं मतें ' धर्म ' या विषयावर निबंध लिहून दाखल करूं.' त्याचप्रमाणें ता. २७-९-८१ चे अंकांत धर्मावर लेख सुरू झाला. केसरी लिहितो, 'आम्ही आज जें लिहिणार आहों तें कोणास रुचेल असें आम्हांस 'वाटत नाहीं. कारण धर्मासंबंधीं केसरीचीं मतें तऱ्हेवाईक असल्यामुळें बहुतेकांस 'अप्रिय होण्याचा संभव आहे. धर्मासंबंधीं केसरी पराकाष्ठेचा उदासीन आहे. 'याला कारणें दोन. एक त्यानें जन्म धारण केला तो कोणत्याहि प्रकारचा धर्मवाद 'किंवा धर्मप्रसार करण्यासाठीं नव्हे. ज्याप्रमाणें नीति आणि धर्म यांचा उपदेश 'करण्याकरितां सुबोधपत्रिका अवतरली, त्याप्रमाणें शुद्ध ऐहिक किंवा सांसारिक 'विषयांचें ज्ञान लोकांना करून देण्याकरितां केसरी जन्मला. या अफाट धर्म- 'समुद्रांत तीर लागण्याचा मुळींच संभव नाहीं. यासाठीं ती दिशाच नको. केसरी- 'च्या मतें जे कोणीं धर्मावर फार विचार करतात, ते धर्मश्रद्धा व नास्तिक्य यांचे 'दरम्यान एक प्रांत आहे त्यांत जाऊन पडतात. दुर्दैवी केसरीची स्वतःचीहि 'तीच स्थिति झाली आहे. असें असल्यामुळें जात्या गंभीर खरा, तरी त्याला 'धर्मगर्जना करण्याची वासना होत नाहीं.' नंतर ता. ८-१०-८१ च्या अंकांत दुसरा व शेवटचा लेख लिहून त्यांत केसरीनें 'प्रार्थनासमाजाचा हिंदुधर्मांत अन्त- 'र्भाव होणार नाहीं. कारण दोहोंमध्यें कित्येक गोष्टी सारख्या दिसल्या तरी या 'दोहोंच्या तंत्रांत मोठा भेद आहे, व त्यामुळें यांचें परस्परांशीं पटावयाचें नाहीं. 'सारांश, केसरी जरी धर्मासंबंधानें पराकाष्ठेचा उदासीन असला तरी सोज्ज्वल 'धर्मोन्नति लोकांत व्हावी अशी त्याची उत्कट इच्छा आहे.' असें लिहिलें आहे.

याप्रमाणें व्यतिरेकानें केसरीनें धर्मविषयक मतें एकदां कायमचीं प्रतिपादन करून टाकलीं व आगरकर कायम संपादक होते तोंपर्यंत तीच परंपरा कायम राहिली. पुढें टिळकांचे हातीं केसरी आल्यानंतर धर्म व व्यवहार यांची खिचडी करण्याची त्यांची पद्धत नसल्याकारणानें प्रसंगोपात्त स्वमतप्रकाशन करण्या-पलीकडे त्यांचीहि मजल गेली नाहीं. केसरी जन्मास आला तेव्हां रा. ब. रानडे, प्रो. भांडारकर यांचेशीं धर्मविषयक विरोध व्यतिरेकानें जाहीर करण्यांत जरी टिळकआगरकरांची एकवाक्यता असली तरी परस्परांतील विरोध जाहीर करण्याची त्यांस आवश्यकता नव्हती व कारणहि नव्हतें. त्यामुळें आपसांतील अंतर्भिन्नता त्यावेळीं प्रकट होऊं शकली नाहीं. पण त्यामुळें त्यांचेमध्यें ऐकमत्यच होतें असें अनुमान काढणें चूक होय. आगरकर जरी अज्ञेयवादी नास्तिक होते व शेवटपर्यंत जरी ते तसेच राहिले तरी असें विधान टिळकांसंबंधीं करतां यावयाचें नाहीं. या बाबतींत टिळकांचे मनोविकासासंबंधीं या लेखकानें 'लोक-मान्यांचे आध्यात्मिक जीवन ' या सन १९२६ चे ऑगस्ट महिन्यांतील केसरी-तील लेखमालेंतून विवेचन केलें आहे. त्याचाच येथें पुनरुच्चार करणें प्राप्त आहे. केसरीच्या तत्त्वज्ञानविषयक धोरणाचा विचार करतांना टिळक व आगरकर यांचा

व्यक्तिविषयक उल्लेख करावा लागतो ही गोष्ट अपरिहार्य आहे. कारण तत्त्वज्ञान-विषयक मतें हीं व्यक्तींचींच असणार. केसरी या निर्जीव संस्थेस संस्थेचीं म्हणून तत्वज्ञानविषयक मतें असणें शक्य नाहीं. इतर लौकिक प्रश्नांचे बाबतींत वर्तमानपत्राचीं अशीं कांहीं ठरीव मतें व धोरण असतें व तेंच कोणीहि संपादक आला तरी कायम राहूं शकतें. किंबहुना त्या धोरणाचें सातत्य रहावें अशीच संस्थापकांची इच्छा असते. तत्त्वविचारांचें तसें नाहीं. आगरकर संस्थापक होते तोंपर्यंत स्पेन्सरीय तत्त्वविचारांचा पार्श्वभाग केसरीस होता तो टिळक आल्यावर बदलला. टिळक लिहितात ' मिल-स्पेन्सरच्या ग्रंथांची आम्ही पारायणें करतों पण त्यांचेपेक्षां फार पुढें गेलेल्या आपल्या पूर्वाचार्यांची आम्ही ओळखहि विसरून जावें यापेक्षां बुद्धिभ्रंशाची दुसरी खूण ती कोणती ?' ( सूक्ति ९०६.) ज्या बुद्धिभ्रंशाचा टिळक उल्लेख करितात तशा प्रकारचा बुद्धिभ्रंश खुद्द टिळकांचा त्यांनीं जेव्हां जनसेवेचा मार्ग १८८१ सालीं पत्करला तेव्हां झाला असें म्हणण्यास काडीचाहि पुरावा नाहीं. आगरकरटिळक यांची विचारांची बैठकच निराळी होती. दोघांचीहि पद्धति तार्किक बुद्धिप्रधान होती ही गोष्ट खरी. परंतु टिळकांचें वाचन विशेषतः संस्कृत तत्त्वज्ञानाचें प्रथमपासून होतें. वयाचें १७ वे वर्षी त्यांचा गीतेशीं परिचय झाला व पुढें जसें वाचन वाढलें तसें त्यांस त्या वर्षीं गीतेचें जें कोडें पडलें होतें त्याचा उलगडा झाला असा निर्वाळा त्यांनीं आपले गीतारहस्याचे प्रस्तावनेंत दिला आहे. त्यांनीं जनसेवेचा मार्ग स्पेन्सरचे जनहितवादास भुलून पत्करला नाहीं. आगरकर व टिळक यांचेमधील या विचारभिन्नत्वाचा उल्लेख स्पष्टपणें स्वतः टिळकांनीं ता. ११-१०-९६ चे केसरींत अज्ञेयवादावर लिहितांना केला आहे. रा. ना. ल. फडके यांनीं १८९२ सालीं स्पेन्सर मतप्रकाशनावर केसरींत १७ लेख लिहिले होते. त्यांनीं १८९६ सालीं अज्ञेयमीमांसा पुस्तक लिहिलें. त्यांत ते लिहितात कीं ' टिळक व ' आगरकर यांचा या बाबतींत मतभेद असेल तर स्पेन्सरचे विचारांच्या याथार्थ्या-' बद्दल नव्हे ' तर प्रस्तुत परिस्थितींत ते कितपत लागू करावे याबद्दल होय. यावर टिळक लिहितात कीं, ' रा. फडके यांनीं आमच्याबद्दल जो अभिप्राय लिहिला ' आहे तो चूक आहे. याथार्थ्याबद्दलचें विधान बरोबर आहे. पण पुढील विधान ' चूक आहे. आमचें म्हणणें असें कीं स्पेन्सरसाहेबांचे अज्ञेयसिद्धान्ताचे आमच्या ' बंधूंस जितकें महत्त्व वाटतें तितकेंच हिंदुस्थानांत जन्मून आम्हांस वाटण्याची ' जरूरी नाहीं. यद्यपि त्याची मीमांसा आम्हीं स्पेन्सरसाहेबांसारखी केली नसली ' तरी विश्वाच्या बुडाशीं जें कांहीं आहे तें सत् आहे इतकेंच नव्हे तर चिदानंदा-' त्मकहि आहे येथपर्यंत आमची मजल गेली आहे. या मजलेची ओळख ज्यांस ' झालेली नाहीं त्यांस स्पेन्सरसाहेबांची विचारसरणी जितकी मोहक व प्रगल्भ ' वाटेल तितकी ती केसरीकारांस न वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. स्पेन्सर-

‘ साहेबांनीं या अज्ञेयवादास जें स्वरूप दिलें आहे त्यापेक्षांहि परिणत स्वरूप आमच्या
‘ ग्रंथांतून या तत्त्वास प्राप्त झालें आहे. असें असतां केवळ स्पेन्सरच्या आधारावर
‘ आम्हांस उपदेश करूं पाहणें म्हणजे घरचें सोनें विसरून लोकांच्या रुप्याकरतां
‘ धाव घेणें होय ’ इ० इ० यावरून स्पेन्सरच्याविषयीं टिळकांची भावना दिसून येईल.

यावर असें म्हणता येईल कीं ही गोष्ट १८९६ सालची झाली. पण १८८० सालाविषयीं काय? त्यावेळीं टिळकांनीं स्पेन्सरचे जनहितवादाची कांस धरूनच जनसेवेचे मार्गांत उडी टाकली नसेल कशावरून? यास उत्तर असें कीं, टिळक तसा त्यांचा बुद्धिनाश झाला होता असें कोठेंहि म्हणत नाहींत. इतकेंच नव्हे तर लहानपणीं गीतेशीं त्यांची जी ओळख झाली तिचाच पुढें संस्कृताचे अभ्यासानें विकास झाला असें ते लिहितात व या विकासाचें परिणत फल १९०२ सालीं नागपुरास कर्मयोगावरील व्याख्यानरूपानें जरी दिसलें तरी त्याचे आधींच रा. म. रा. बोडस यांनीं केसरींत लिहिलेली व आतां पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेली ‘ वेदान्ताची अष्टाध्यायी ’ या नांवाची जी लेखमाला लिहिली तिचा शेवट करतांना स्पष्टपणें शेवटचे परिच्छेदांत टिळकी छापाचा व त्यांचे हातचा जो प्यारा आला आहे त्यांत दिसतें.

याप्रमाणें तत्त्वज्ञानाविषयीं टिळकांचें म्हणजे पर्यायानें केसरीचें धोरण होतें व त्याचें परिणत स्वरूप गीतारहस्याचे रूपानें जरी १९१५ सालीं जनतेसमोर आलें तरी केसरीनें केलेल्या चळवळीचा तो प्रमाणग्रंथ केसरीचे मागें सतत उभा होता. गीतारहस्यावर लेख लिहिण्याचें हें स्थान नव्हे. परंतु गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यामुळें महाराष्ट्रांत जी खळबळ उत्पन्न झाली व जो विचारप्रक्षोभ उत्पन्न झाला तो केसरींतील नसला तरी तें कार्य केसरीचेंच होय. कर्मयोगाचे नवीन तत्त्व काढून केसरीनें महाराष्ट्रांतच नव्हे तर अखिल हिंदुस्थानांत नवचैतन्य उत्पन्न केलें व तत्त्वविचार नुसते ग्रंथांत सांठविण्याकरतां नसून प्रत्यक्ष व्यवहारांत आचरणांत आणण्याकरता आहेत अशी विचार व आचार यांची सांगड घालण्यांत आली. केसरीच्या चळवळीचा महान् वृक्ष भूमीवर जरी उभा असलेला दिसला तरी झंझावातासहि दाद न देण्याचें सामर्थ्य व स्थैर्य त्यास प्राप्त करून देणारा गीतारहस्य हा ग्रंथ मूळरूपानें जमिनींत विस्तार पावला आहे व ही विचारांची शिदोरी केसरीस पिढ्यान्‌पिढ्या पुरणारी आहे. सबब केळकर, खाडिलकर, केतकर, करंदीकर इत्यादि मंडळी जरी केसरीची संपादक झाली तरी त्यांस कर्मयोगाचे तत्त्वज्ञानाशिवाय इतर तत्वज्ञानाची जरूरी भासली नाहीं व भासणारहि नाहीं.

केसरीचा व तत्त्वज्ञानाचा अशा प्रकारचा संबंध आहे. परंतु त्याशिवाय केसरीनें इतर दोन प्रकारानें तत्त्वज्ञानविषयाचे प्रसारास मदत केली आहे. ती म्हणजे एक कांहीं ग्रंथास प्रकाशन देऊन व दुसरें गणेशोत्सवासारखे धार्मिक उत्सव करून, त्यांत धर्मविषयक वार्षिक ज्ञानसत्रें चालवून, त्या ज्ञानसत्रांचे रिपोर्ट केसरींत

छापून. केसरींत प्रसिद्ध होऊन नंतर पुस्तकरूपानें जे लेख प्रसिद्ध झाले, त्यांचा येथें फक्त नामनिर्देश केला असतां पुरे. कारण ते चिरस्थायी रूपानें कोणासहि मिळण्यासारखे आहेत. अशा ग्रंथांपैकीं बोडस यांची ' वेदान्ताची अष्टाध्यायी ', महादेव मल्हार जोशी यांचा ' आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त ', प्रो. गोगटे यांचे ' नीतिशास्त्रविचार ' इत्यादि होत. रा. ना. ल. फडके, यांनीं १८९२ सालीं स्पेन्सरमतप्रकाशन म्हणून १७ लेख लिहिले. पण पुढें त्यांनीं स्पेन्सरचे ग्रंथाची ज्ञेयाज्ञेयमीमांसा अशीं पुस्तकें लिहिलीं. त्यांत स्पेन्सरमत आलेंच आहे. केसरींतहि फुटकळ कांहीं लेख आले आहेत व त्यांतील बहुतेकांचा केसरींतील लेखसंग्रह भाग ४ यांत अन्तर्भाव झाला आहे. गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यावर त्यावर टीकात्मक म्हणून केसरींत रा. वा. रा. कोठारी, डॉ. जोशी व इतर एकदोघे यांचे लेख प्रसिद्ध झाले. पण पुढें केसरींत आलेले व केसरी-बाहेर इतर नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले व व्यक्तिशः टिळकांकडे हस्त-लिखित असे जे लेख आले त्या सर्वांचा संग्रह सर्वांस एकदम एके ठिकाणीं उत्तर देण्याकरतां टिळकांनीं केला; पण त्यांचे अकालमृत्यूमुळें तें कार्य तसेंच राहिलें.

राहातां राहिले गणेशोत्सव व वसंतव्याख्यानमाला इत्यादि ज्ञानसत्रांत दिल्या गेलेल्या व्याख्यानांचे केसरींत प्रसिद्ध झालेले रिपोर्ट. एकतर अशीं व्याख्यानें ग्रंथ वाचून व्याख्याता सामान्य जनतेस समजेल अशा रीतीनें देत असतो. त्या-मुळें त्या सर्व व्याख्यानांचें सार या लेखांत काढून देण्याची आवश्यकता नाहीं. वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या लेखांची सूची केसरी कचेरीमार्फत प्रसिद्ध व्हावयाची आहे असें ऐकतों. तसें असेल तर या सूचींत तत्त्वज्ञान या विषयावरील केसरींत प्रसिद्ध झालेले लेख व व्याख्यानें जिज्ञासूंनीं पाहावीं असा हवाला देऊन हा लेख पुरा करतों.

---

# राष्ट्रीय शिक्षण

[ श्री. राजाराम दामोदर देसाई, बी. ए. ]

' स्वतंत्रतेकरितां लढणाऱ्या लोकांचा इतिहास वाचून आपणहि स्वतंत्रतेकरितां धडपड करावी असें ज्यास वाटणार नाहीं तो विद्यार्थी नव्हे, पशू होय, ' हा १९०६ च्या डिसेंबरांतील ' राष्ट्रीय शिक्षण व खासगी शाळांवरील जबाबदारी'

ह्या अग्रलेखांतील जळजळीत उद्गार केसरीचा राष्ट्रीय शिक्षणाविषयींचा जिव्हाळा ठळकपणें दाखवीत नाहीं काय ? विद्यार्थ्यांनीं भावनाशून्य व शेळपट बनूं नये, स्वतंत्रतेकरितां धडपड करावी, अर्थात् गुलामगिरींत राहूं नये व अशासाठींच राष्ट्रीय शाळांची आवश्यकता आहे. शिवाय 'स्वराज्य आम्हांस साध्य आहे व 'स्वदेशी चळवळ, बहिष्कारयोग व राष्ट्रीय शिक्षण हीं स्वावलंबनाचीं सदर हेतु 'सिद्धीस नेण्यास तीन मोठीं साधनें आहेत असा कायमचा सिद्धान्त बाविसाव्या 'राष्ट्रीय सभेच्या बैठकींत झालेला आहे' (८-१-१९०७). असा स्वराज्य व राष्ट्रीय शिक्षण यांचा निगडित संबंध असल्याचें केसरीनें दाखवून दिलें आहे.

केसरीनें राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार १९०२ पासून तें १९३० पर्यंत प्रसंगानुरूप सारखा केला आहे. ज्यांत राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं अग्रलेख, स्फुट विचार, इतरांचे लेख, व्याख्यानांचा सारांश, चर्चा किंवा माहिती यांपैकीं कांहींहि केसरींत आलें नाहीं अशी १९११, १९१५ व १९१६ हीं केवळ तीनच वर्षें इतक्या कालावधींत गेलीं. बाकीच्या कालांत सुमारें १५ अग्रलेख या प्रश्नावर आले आहेत. हा झाला हिशेब.

पहिलीं दोन तीन वर्षें सरकारी शिक्षणपद्धतींतील व्यंगें व सरकारचें शिक्षणविषयक धोरण राष्ट्रीयत्वाला विघातक कसें होत चाललें आहे, ह्या दोन गोष्टी उघड करून लोकांना दाखविल्या आहेत.

'इंग्रजी शिक्षण एकांगी आहे, तें फक्त सरकारी नोकरीस लागणारे अवश्य 'गुणच एतद्देशीय लोकांच्या अंगांत आणण्याकरितांच योजलेलें आहे. या शिक्षण-'क्रमांत धर्म, नीति, शास्त्रीय शोध, धंदेशिक्षण वगैरे राष्ट्राच्या उत्कर्षास लाग-'णाऱ्या ज्ञानाची व कलांची बिलकूल माहिती नसते, इत्यादि व्यंगें लोकांच्या 'हळूहळू नजरेस येऊं लागलीं......आमच्याकडे युनिव्हर्सिट्या स्थापन होऊन '५० वर्षें झालीं तरी खरे विद्वान बहुतेक इकडे निपजलेच नाहींत असें म्हटलें 'तरी चालेल....जपाननें अवघ्या ३० वर्षांत किती तरी सुधारणा केली. 'सारांश, युनिव्हर्सिट्या म्हणजे कनिष्ठ प्रतीच्या सरकारी नोकऱ्यांकरितां लागणारे 'उमेदवार तयार करणाऱ्या टांकसाळी किंवा हमालखाने आहेत असें कृतीनें 'सरकार स्पष्ट दर्शवीत आहे.' (१९-८-१९०२).

'युनिव्हर्सिटीच्या कार्यावर सरकारचा अधिक ताबा कसा राहावा, नोकरी-'साठीं जरूर त्यापेक्षां अधिक ग्रॅज्युएट्स् बाहेर न पडण्याची कशी तजवीज 'करावी, कॉलेजांतून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांच्या अंगीं बेताबाताचाच स्वाभिमान 'राहील अशा प्रकारची कोणती शिस्त कॉलेजांत ठेवावी, खासगी शाळा 'किंवा कॉलेजें यांजवर कोणत्या प्रकारची देखरेख ठेवावी, म्हणजे त्यांतील 'विद्यार्थी सरकारी शाळांतील विद्यार्थ्यांसारखे बाहेर पडतील हे प्रश्नच कमि-'शनला (लॉर्ड कर्झनचें युनि. कमि.) महत्त्वाचे वाटले आहेत.' (१९०२).

पुढें १९०४ मधील ' जुन्या विद्यापीठांची आरती ' या अग्रलेखांत लॉर्ड कर्झनच्या आत्मसमर्थनपर भाषणावर टीका करतांना ' सर्व शिक्षणाच्या दोऱ्या ' होतां होईतों आपल्या हातीं ठेवाव्या अशी सरकारास अनिवार इच्छा झाली ' आहे....शिक्षणक्रम सर्वथा सरकारचे हातीं गेला म्हणजे त्याचे परिणाम ' राष्ट्रीयत्वास किती घातक होतील हें निराळें सांगावयास नको' असें निदर्शनास आणलें आहे.

अशा रीतीनें दोषदर्शन केल्यावर उपाययोजना कशी करावयाची हें सांगणें ओघानेंच आलें. वंगभंगामुळें उत्पन्न झालेल्या ' स्वदेशी चळवळींत जे भाग ' घेतील त्या विद्यार्थ्यांस दंड करण्यांत येईल किंवा शाळांतून काढूनहि टाकण्यांत येईल ' अशा आशयाचें बंगाल सरकारनें सर्क्युलर काढलें. त्यावर ता. १४-११-१९०५ च्या अंकांत स्फुट लिहितांना केसरीकार म्हणतात, ' राजपुत्रांस राजभक्ति जर ' विद्यार्थिदशेंत शिकविली पाहिजे तर सामान्य विद्यार्थ्यांस राष्ट्रभक्तीहि त्याच ' दशेंत शिकवावयास नको काय ? ( राजकोटच्या राजकुमार कॉलेजांतील राजकुमारांस युवराजाच्या पाठीमागें मिरवणुकींत भाग घ्यावयास लावलें होतें त्यास उद्देशून), सरकारच्या सनदी नोकरांकडून अगर सरकारची मदत घेऊन ' ओशाळे बनलेल्या मास्तरांकडून हें काम होणें अशक्य आहे. अर्थात् हें काम ' दुसऱ्या कोणीं दुसऱ्या कोठें तरी केलें पाहिजे. लोकांच्या पुढाऱ्यांनीं आरंभ' लेल्या चळवळींत आपल्या दर्जाप्रमाणें सामील होण्याची विद्यार्थ्यांस मोकळीक ' देणें हें काम घडवून आणण्याचा हा एकच मार्ग आहे. शाळेंतील विद्यार्थ्यांस ' राष्ट्रीय शिक्षण मिळण्याचा दुसरा मार्ग म्हटला म्हणजे राष्ट्रीय युनिव्हर्सिटीची ' स्थापना हा होय. अगदीं स्वतंत्र व सरकारच्या कधींहि कह्यांत न जाणारी ' युनिव्हर्सिटी म्हणजे राष्ट्रीय युनिव्हर्सिटी होय. '

हें सिद्ध होण्यास पहिली जरूरीची गोष्ट म्हणजे काम करणारे लोक. १९०५ च्या शेवटीं राष्ट्रीय हिंदी विद्यापीठाच्या स्थापनेचा विचार करण्यासाठीं पुढारी मंडळी जमली असतां लो. टिळकांनीं सांगितलें कीं, ' युनिव्हर्सिटीकरितां काम ' करणारे लोक प्रथमतः पुढें आले पाहिजेत म्हणजे कामास लागणारे पैसे ' आपोआप मिळतात. ' आणि त्यांनीं आपण स्वतः तीन वर्षें या कामास देण्याचें अभिवचन दिलें. पण हें राष्ट्रीय हिंदी युनिव्हर्सिटीचें काम त्या वेळीं तसेंच राहिलें. राष्ट्रीय शिक्षणाचा प्रत्यक्ष प्रारंभ बंगालमध्यें ' बंगाल नॅशनल कॉलेज व स्कूल 'च्या स्थापनेनें झाला. त्याचें अभिनंदन केसरीनें केलें आहे.

पुढें ऑगष्ट १९०६ मधील समर्थ विद्यालयावरील स्फुटांत केसरीकार म्हणतात ' हिंदुस्थानांतील तरुण पिढीचें शिक्षण-म्हणजे ' त्यांचें सर्वस्व ' सरकारच्या ' –परकीय सरकारच्या–व अत्यंत स्वार्थदक्ष परकीय सरकारच्या–हातीं असणें ' राष्ट्रीय दृष्टया अपायकारक आहे हें आतां कोठें लक्षांत येऊं लागलें आहे....

‘ पाश्चात्य व पौर्वात्य शिक्षणपद्धतींचा मिलाफ करून तरुण पिढी राष्ट्रीय दृष्ट्या ‘ समर्थ व व्यवहारदृष्ट्या स्वावलंबी करणाऱ्या संस्थेचा नमुना समर्थविद्यालय ‘ आहे. ’ या वेळेपासून केसरीकारांनीं स्वतः महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळाचे सभासद होऊन राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतला आणि म. वि. प्रसारक मंडळाच्या राष्ट्रीय शिक्षणाचा प्रचार व निमसरकारी शाळांवर हल्ले असा दुहेरी कार्यक्रम जोरानें चालविला. ‘ राष्ट्रीय शिक्षण व खासगी शाळांची जबाबदारी ’ हे तीन अग्रलेख अनुक्रमें नोव्हेंबर व डिसेंबर १९०६ व जानेवारी १९०७ मध्यें लिहून त्याची परिसमाप्ति जुलैमध्यें ‘ चतकोर भाकरीची गुलाम-गिरी ’ या लेखानें केली आहे. या लेखांत ‘ हल्लींची सरकारी शिक्षणपद्धति सदोष ‘ आहे इतकेंच नव्हे तर खासगी शाळांच्या द्वारें हा दोष—हुषार पण भले ‘ नोकर बनविण्याचा—काढून टाकण्याची वीस वर्षांपूर्वी जी उमेद होती ती आतां ‘ राहिली नाहीं. लॉर्ड कर्झननें सरकारी व खासगी शाळांच्या सारख्याच मुसक्या ‘ बांधल्या आहेत. सरकारनें अमुक अमुक गोष्टी कराव्या असें म्हणण्याऐवजीं ‘ लोकांनीं काय करावें हे राष्ट्रीय सभेनें आतां सांगितलें आहे†; आणि ज्याअर्थी ‘ राष्ट्रीय सभा ही लोकांचीच संस्था आहे त्याअर्थी या ठरावाच्या अंमल-‘ बजावणीचें काम राष्ट्रीय सभेवरच येतें.’

‘ इंग्रजी शिक्षणानें नवीन पिढी विघडत चालली, म्हणजे स्वतंत्रता व राजकीय ‘ हक्क प्राप्त होण्याकरतां इच्छा बाळगूं लागली किंवा उद्योग करूं लागली हें ‘ चांगलें नव्हे असें ठरवून विद्याखात्याचे अधिकारी वागत आहेत. सरकार ‘ जर आपली पद्धति सुधारत नसेल, तर खाजगी शाळांनीं सरकारपासून आपली ‘ फारकत करून घेतली पाहिजे. सरकारच्या पोटांत शिरून आमच्या लोकांच्या ‘ माना मुरगळण्याचे किंवा तेजोभंग करण्याचे दिवस आतां निघून गेले. खाजगी ‘ शाळांच्या चालकांनीं बराच स्वार्थत्याग करून त्या आजपर्यंत चालविल्या ‘ आहेत, ही गोष्ट आम्हांस मान्य आहे. पण हा त्यांचा स्वार्थत्याग पालटलेल्या सर-‘ कारी धोरणानें आमच्या नाशास आतां कारणीभूत होऊं लागला आहे. हा ‘ आत्मत्याग व लोकाश्रय सरकारचे गुप्त हेतु पर्यायानें सिद्धीस नेण्यास जर उप-‘ योगी पडला तर आत्मत्यागाचें ऐवजीं आत्महत्येचें नांव त्यास द्यावें लागेल. ‘ लोकांनीं आपल्या पदरचे पैसे देऊन सरकारास जी मदत करावयाची ती सरका-‘ रचे मर्जीप्रमाणें तरुण पिढीस दास्यत्वांत ठेवण्याकरतां नव्हे आणि सरकारचें

---

†ठराव ९ वा—मुलांमुलींना शिक्षण देणाचा प्रश्न कळकळीनें हातीं घेण्याची व राष्ट्रीय दृष्टीनें व राष्ट्रीय हुकमतीखालीं देशाच्या सद्यःस्थितीला अनुरूप असें शिक्षण देणाऱ्या सर्व शाखांच्या शाळा सर्व हिंदुस्थानभर स्थापन करण्याची वेळ आली आहे असें या सभेचें ( बाविसाव्या राष्ट्रीय सभेचें ) मत आहे.

' पूर्वीचें धोरण जर पालटलें आहे तर कुलुंग्या कुत्र्याप्रमाणें सरकारच्या मागें जा-
' ण्यांत पुरुषार्थ राहिलेला नाहीं. तेव्हां ही चतकोर भाकरीची अपेक्षा न धरतां
' आपल्या व पालकांच्या हक्काकरतां धैर्यानें व नेटानें भांडणें हें खाजगी शाळांचें कर्तव्य
' आहे. ' असें खाजगी शाळांस आव्हान केलें आहे. आणि 'देशांतील तरुण पिढी
' देशाचें राजकीय, औद्योगिक व सामाजिक वैभव वाढविण्यास समर्थ व स्वाभि-
' मानी, निश्चयी, करारी व तेजस्वी होईल असें म्हटलें आहे. तात्पर्य ' राष्ट्रीय
' शिक्षणाचा प्रश्न, हा कांहीं नुसता व्यापारी व शास्त्रीय शिक्षणाचा प्रश्न नव्हे
' तर नवीन पिढीला कोणतें वळण लावावयाचें ?—मेषपात्री सरकारी कीं, स्वावलंबी
' ( राष्ट्रीय ) हा मुख्य मुद्दा आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या बाबतींत सरकारी हुकमत
' कोणत्याहि प्रकारची नसावी ही मुख्य गोष्ट आहे. सरकारी खात्याचा अँधि-
' कार सरकारी त्याचप्रमाणें खाजगी शाळांवरहि गैरशिस्त रीतीनें उपयोगांत
' आणण्यास सुरवात झाली म्हणून तर राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न पुढें आला.'

पुनः १९०८ च्या मार्चमध्यें—' बंगाल प्रांतांत राष्ट्रीय शिक्षणपरिषदेनें (नॅश-
' नल कौन्सिल ऑफ एज्युकेशन ) एका वर्षांत शाळा स्थापून दहा बारा लक्ष
' रुपयांचा फंड मिळविला असून १९०६ मध्यें सर गुरुदास बानर्जी व १९०७
' मध्यें सर रासबिहारी घोष हे अध्यक्ष झाले व राष्ट्रीय कॉलेजचे प्रिन्सिपॉल
' बाबू अरविंद घोष हे आहेत. अशा रीतीनें राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यांत मवाळ व
' जहाल हे एकत्र झाले आहेत. धंदेशिक्षणाची सोय केली आहे व लवकरच
' व्यापारी शिक्षण, लायब्ररी व प्रयोगशाळा यांची सोय करणार आहेत, ' असें
सांगून ' विद्यार्थी न येण्याची भीति राहिली नाहीं, लोकांकडून उत्तेजन मिळ-
' णार नाहीं हाहि प्रश्न उरला नाहीं. सरकारी शिक्षणाचे दोन दोष— (१) शेळ-
' पटपणा, (२) उपयुक्त शिक्षणाचा अभाव; हे दोन्ही दोष काढून टाकून स्वतंत्र
' शाळा व स्वतंत्र परीक्षा बंगालनें सुरू केल्या. अशा तऱ्हेचा अनुभव डोळ्यापुढें
' असतां आमच्या प्रांतांतील लोकांनीं केवळ अंधपरंपरेनें खाजगी शाळांचा
' अभ्यासक्रम आजपर्यंत चालत आला तसाच ठेवावयाचा किंवा सुधारावयाचा
' असा अत्यंत महत्त्वाचा व जबाबदारीचा प्रश्न उपस्थित झाला आहे. राष्ट्रांत
' उत्पन्न झालेल्या नव्या जागृतीला खाजगी शाळा, कॉलेजें जर मदत करणार
' नाहींत किंबहुना त्या जागृतीच्या अभिवृद्धीस साधनीभूत किंवा कारणीभूत
' होणार नाहींत, तर लोकाश्रयास त्या इतउत्तर पात्र होणार नाहींत अशी वेळ
' आलेली आहे; ' असें केसरीनें बजाविलें आहे. पुढें १९०९ ऑगस्टमधील
राष्ट्रीय शिक्षणावरील स्फुटांत ' पाश्चात्य पद्धतीच्या, पाश्चात्य वाङ्मयाच्या व
' पाश्चात्य भाषेंत दिलेल्या शिक्षणानें माणसास कितीहि विद्वत्ता आली तरी ती
' राष्ट्रीय दृष्टीनें निर्जीवच. ह्या शिक्षणानें मंडित झालेला मनुष्य विद्वानासारखा
' किंवा देवदूतासारखा बोलत असला तरी असल्या शिक्षणाची राष्ट्रभक्तीच्या व

'देशसेवेच्या दृष्टीनें फारशी किंमत नसल्यामुळें तो मनुष्य मधुर किंवा खणखणीत 'ध्वनि काढणारें केवळ निर्जीव वाद्यच होय. राष्ट्रीय शिक्षणांत स्वदेशाच्या इति- 'हासास, स्वधर्मास, स्वसंस्कृतीस, स्वभाषेस अग्रस्थान दिलें पाहिजे. फार तर 'शेंकडा तीस पालक सरकारी नोकरी करणारे असतील तर बाकीच्यांनीं निःसत्त्व 'सरकारी शिक्षण कां घ्यावें ?' असें केसरी विचारतो.

यानंतर महाराष्ट्रांतील प्रमुख राष्ट्रीय शिक्षणसंस्था ( समर्थ विद्यालय ) सर- कारनें बंद केली तेव्हां ती बंद करण्याचें कारण स्पष्टपणें न सांगतां किंवा कोण- त्याहि तऱ्हेचा इशारा न देतां ती बंद केली हा सरकारनें मोठा अन्याय केला असें केसरीनें 'समर्थ विद्यालयावरील गदा' ( १९१० जून ) या अग्रलेखांत म्हटलें आहे. पुढें त्याच वर्षाच्या नोव्हेंबर व डिसेंबर या महिन्यांतील 'राष्ट्रीय शिक्षणाचें पुढें काय ?' आणि 'राष्ट्र व शिक्षण' या अग्रलेखांत 'राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न खुद्द राष्ट्राच्याच इतिहासाशीं गुंतलेला असल्यामुळें एखाद्या विवक्षित प्रयत्ना- 'च्या यशापयशावर राष्ट्रीय शिक्षणाच्या सर्व भावी आशा अवलंबून राहणें 'शक्य नाहीं. प्रत्येक पिढीस आपापल्या रीतीनें राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न सोडवावा 'लागतो. 'कां न सदन बांधावें कीं, त्यांत बिळें करिल घूस ?' असें प्रोत्साहन 'देऊन दूरदृष्टि व अनुभवजन्य ज्ञान यांचा उपयोग करून लोकांनीं पुन्हा 'राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न हातीं घ्यावा. शिक्षणाच्या प्रश्नाकडे हिंदी समाजाच्या 'दृष्टीनें सरकारास पाहण्यास भाग पाडावें; अशा प्रकारची चळवळ हाच राष्ट्रीय 'शिक्षणाच्या चळवळीचा खरा अर्थ आहे. राष्ट्राच्या व समाजाच्या मनोरचने- 'नुरूप शिक्षणाची रचना असावी लागते. शिक्षण उत्तम कोणतें ? तर राष्ट्राच्या 'गरजा भागविण्यास सर्वांत अधिक उपयोगी पडेल तें; व त्यायोगें ज्याची सत्ता 'शिक्षणावर आहे, त्याच्या मनांत राष्ट्रीय गरजा व आकांक्षा यांचें उत्तम 'प्रतिबिंब पडलें पाहिजे. राष्ट्रीय शिक्षणामध्यें शिक्षणाचा राष्ट्रभर प्रसार कसा 'होईल व राष्ट्रास अत्यंत उपयुक्त अशा रीतीनें तें कसें देतां येईल हेच दोन 'मुख्य मुद्दे आहेत.' असा राष्ट्रीय शिक्षणाचा कांहींसा निराळा अर्थ करून म्हटलें आहे. पुढें १९१९ च्या जादा राष्ट्रीय सभेपासून राष्ट्रीय शिक्षणास पुनः जोर आला, तेव्हां लिहितांना पूर्वीच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत बौद्धिक तेज विशेष होतें व सध्यांच्या असहकारितेच्या चळवळींतील राष्ट्रीय शिक्षणांत भावनातेज विशेष आहे असें दाखवून, तरी पण 'भावी आशा किंवा आधार- 'स्तंभ या नांवानें विद्यार्थ्यांना भुलवून त्यांना लोकोत्तर स्वार्थत्यागाच्या भरीस 'घालणें हें दुसऱ्यानें करतां कामा नये. तें त्यांनीं स्वतः करावें. स्वयंस्फूर्तीनेंच 'केलेलें काम खरें व लाभदायक असतें.' अशी सावधगिरीची सूचना केसरीनें केली आहे. राष्ट्रद्रोही बडेजावीचें ( म्हणजे सरकारी व खाजगी शाळांचें ) कंवरडें फकिरी सोट्यानें (म्हणजे असहकारितेंतील राष्ट्रीय शाळांनीं) मोडलें तर आज तें

इष्टच आहे असें सांगून विद्यार्थ्यांच्या पालकवर्गास या असहकारितेच्या चळवळींतील आपली जबाबदारी व कर्तव्य ओळखून आपल्या मुलांस सरकारी किंवा निमसरकारी शाळांतून काढून राष्ट्रीय शाळांत घालावें असें कळविलें आहे. 'पालक 'वर्गास राजकीय परिस्थितीची आंच अद्याप लागलेली नाहीं. राष्ट्रसभेनें 'पाठविलेली स्वार्थत्यागाची हुंडी पटवून घेण्याची त्यांची तयारी नाहीं ही खेदाची 'गोष्ट आहे.' असें म्हटलें आहे व नुसतें म्हणून न थांबतां पुणें येथें टिळकांचें स्मारक म्हणून 'टिळक महाराष्ट्र विद्यापीठ' स्थापण्यांत 'केसरीकारांनीं भाग घेऊन त्यावरील अग्रलेखांत 'टिळकांचीं निरनिराळीं स्मारकें 'सर्वत्र होत आहेत, तथापि त्यांपैकीं बऱ्याच गोष्टींचा विसर पडण्याचा संभव 'आहे, पण शिक्षणविषयक स्मारक दिवसेंदिवस वृद्धि पावणारें आहे; हें अनेक 'शतकेंपर्यंत अबाधित चालावें अशी इच्छा बाळगणें वावगें होणार नाहीं' असे उद्गार काढले आहेत. पुढें टि. म. वि. च्या १९२३ मधील पदवीदानसमारंभावरील लेखांत केसरीकारांनीं आपल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या विचारांवर मुकुट चढविला आहे. 'सरकारी विद्यापीठाच्या पदवीदानसमारंभाचे वेळीं चॅन्सेलरांची 'दृष्टि जेव्हां पदवी घेणारावर पडते तेव्हां त्यांच्या मनांत प्रायः हाच विचार येतो 'कीं, या तरुण मुलानें सरकारी नोकरींत शिरावें, तेथें मिळेल तें वेतन घेऊन 'संतुष्ट राहावें, त्याचा गोरा अधिकारी हुकूम फर्मावील तो त्यानें इमानदारीनें 'पाळावा, व्यक्तिमात्रानें करतां येईल तितका कारभार सुयंत्रित व सुरक्षित करावा, 'व अशा रीतीनें इंग्रजांचें हिंदुस्थानांतील राज्य व जगावरील साम्राज्य हें सुदृढ, 'टिकाऊ व पुष्ट होण्यास मदत करावी. याच्या उलट टिळक विद्यापीठासारख्या 'राष्ट्रीय भावनेच्या विद्यापीठांतील पदवीदानसमारंभाचे वेळीं कुलपति किंवा 'कुलगुरु यांची दृष्टि पदवी घेणाऱ्या तरुणाकडे जाते, त्यावेळीं त्यांच्या मनांत 'कोणती विचारपरंपरा चालू असेल ? या मुलानें वाटेल तर उपाशी मरावें, व 'जरूर तर सामान्य मोलमजुरी करून देखील उदरनिर्वाह करावा, पण सरकारी 'नोकरीची कल्पनाहि मनांत आणूं नये; यानें निर्भय होऊन सरकारी अधिकारी, 'मग तो कोणीहि किंवा केवढाहि का असेना, अधिकारदृष्ट्या तुच्छ मानावा; 'इंग्रजसरकारचें हित तेंच प्रायः आपलें अहित व हिंदुस्थानचें हित तेंच प्रायः 'इंग्रजांचें अहित हा स्वाभाविक व दुस्तर विरोध निरंतर लक्षांत ठेवून क्षणशः 'व कणशः या विरोधांत स्वदेशाचें हित साधावें व त्याकरितां इंग्रजांचें 'अहित चिंतण्यास किंवा आचरण्यास कसूर करूं नये; सरकारी नोकर 'होऊन राज्ययंत्राचा राखणदार स्वतः तर बनूंच नये, पण हिंदी लोकांना 'स्वराज्य मिळावें म्हणून दुसऱ्याच्या हातीं असलेलें राज्ययंत्रहि शक्य तोंवर 'सुरक्षित व सुरळीत राहूं नये असाच प्रयत्न करावा; भावी महत्त्वाकांक्षेचा 'पाया म्हणून आपल्या पात्रतेप्रमाणें द्रव्यबल मिळेल तितकें मिळवून होईल

' तितका ओला स्वार्थत्याग करावा; अधिकारी व प्रजाजन यांच्या दरम्यान जेथें
' जेथें अन्यायाचें झुंझ चाललेलें दिसेल तेथें तेथें उडी टाकून आपल्या शक्ती-
' प्रमाणें स्वकीयांची न्यायाची बाजू उचलून धरावी, स्वराज्याकरितां जरूर तर
' साम्राज्यास धोका देण्याचे विचारहि याच्या मनांत खेळावेत व निर्वाणीचे
' प्रसंग थोडे येत असले तरी अशा प्रसंगांत त्यानें आहुति द्यावी, पण स्वकीयांचें
' हित साधावें. अशी अपेक्षा हा पदवी देणारा या पदवी घेणाराकडून करीत
' असेल यांत संशय नाहीं. ' पुनः १९२६ मध्यें–' राष्ट्रीय शिक्षणांतील मूलभूत
' कल्पना मुख्य ह्याः—( १ ) बोधभाषा देशी–मराठी, (२) शिक्षणक्रमांत पूर्ण
' स्वातंत्र्य, ( ३ ) कारभारांत पूर्ण स्वातंत्र्य. आज ज्या राष्ट्रीय शिक्षणसंस्था
' काढल्या जातात त्यांचा उद्देश एक सर्वोत्कृष्ट नमुना लोकांपुढें ठेवून त्याकडे
' इतर सर्व संस्थांना खेचण्याचा प्रयत्न करणें हाच आहे. राष्ट्रीय शिक्षणसंस्थांनीं
' सर्व शिक्षणक्षेत्र स्वतः आक्रमण करावयाचें नसतें. ती लहानशा क्षेत्रांत तयार
' केलेली उत्तम बियाण्यांची पैदास होय. या बियाण्यांच्या वाफ्यामध्यें तयार
' होणाऱ्या बीजांनीं हळूहळू सर्व क्षेत्राचें आक्रमण केलें म्हणजे यांचें काम संपलें,'
असें सार काढून केसरीकार केसरीची कामगिरी स्वतःच सांगतात. ' वर्तमान-
' पत्रकर्ते किंवा राजकीय पुढारी राष्ट्रीय किंवा इतर शिक्षणसंस्थांना जें साहाय्य
' करणार तेंहि मर्यादित असतें. प्रत्यक्ष त्या संस्थांत कार्य करून खपणारे वेगळे
' व बाहेरून सहानुभूतीनें साहाय्य करणारे वेगळे. टिळक झाले तरी, स्वतः
' समर्थविद्यालयांत जाऊन प्रत्यक्ष राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य करणें त्यांना शक्यच
' नव्हतें व तसें साहाय्य त्यांच्याकडून कोणीं अपेक्षिलेंहि नाहीं व न दिल्याबद्दल
' त्यांस दोषहि दिला नाहीं. लेख लिहून व व्याख्यानें देऊन बाहेरून करावयाची
' मदत त्यांनीं केली व कोणीहि वर्तमानपत्रकर्ता व राजकीय पुढारी तेवढीच
' मदत करूं शकेल;' अशी प्रत्यक्ष कार्यकर्त्यांस जाणीव करून दिली आहे.
शेवटीं एप्रिल १९२७ मध्यें ' जोंपर्यंत हिंदुस्थानांत पारतंत्र्य नांदत आहे आणि
' परकीय सरकार शिक्षणांतील दोष दूर करण्यास तयार नाहीं तोंपर्यंत राष्ट्रीय
' शिक्षणाची आवश्यकता कायमच राहणार. पारतंत्र्य व राष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणा-
' ची मजल स्वाभिमान व आत्मप्रत्यय उत्पन्न करण्यापलीकडे फारशी जात
' नाहीं. राष्ट्रीय शिक्षणसंस्था या स्वातंत्र्यमय होत. तेथून लोकांनीं स्वातंत्र्याची
' स्फूर्ति घेऊन जावयाचें असतें ' असें राष्ट्रीय शिक्षणाच्या आक्षेपकांस उत्तर
दिलें आहे. १९३० मधील ' राष्ट्रीय शिक्षणाची दुहेरी फलद्रूपता ' या लेखांत
केसरीकार सांगतात, ' राष्ट्रीय शिक्षणसंस्थांतील शिक्षक व शिष्य हे जरी प्रत्यक्ष
' स्वातंत्र्ययुद्धांत पडले तरी राष्ट्रीय शिक्षणसंस्था म्हणजे निव्वळ सत्याग्रहशिबिरें
' बनतां कामा नयेत तर त्या कायम चालणाऱ्या संस्थाच राहिल्या पाहिजेत.'

---

# संप व मजूरचळवळी

[ श्री. पांडुरंग वासुदेव गाडगीळ, वाङ्मयविशारद ]

मुंबईतील म्युनिसिपल भंग्यांनीं १८९० सालीं काम बंद केलें. या प्रकरणास 'मुंबईतील भंग्यांचा कट' असा केसरीनें मथळा दिला आहे. 'कट' शब्द आज वेगळ्या अर्थानें वापरतात. पण तसा तो तेव्हां वापरलासें वाटत नाहीं. कारण भंग्यांची बाजू केसरीनें उचलून धरिली आहे. बहुधा Strike या शब्दाला मराठी प्रतिशब्द वापरण्याचा हा प्रयत्न असावा. म्युनिसिपल नोकरी अशा प्रकारें सोडणें हा गुन्हा व्हावा असें ठरविण्याकरितां मुंबई कॉर्पोरेशनमध्यें ठराव आला होता. यासंबंधीं 'घाणेरडीं कामें करणाऱ्यावर अज्ञानें जुलूम होणार' अशी केसरीनें टीका केली आहे.

जी. आय्. पी. रेल्वेच्या तारमास्तरांनीं १८९९ सालीं काम बंद ठेवलें, त्या वेळीं 'संप' शब्द केसरीनें वापरला आहे. संपांची कल्पना आपल्याकडे नवीन असल्यामुळें ती समजून देण्याचा प्रयत्न ९-५-९९ च्या अंकांत केलेला दिसतो. 'तारमास्तरांचा संप'. या मथळ्याखालीं केसरी लिहितो–'नोकर लोक एक 'होऊन काम करण्याचें टाकून धन्यावर ज्या वेळीं रुसतात त्या वेळीं संप झाला 'असें म्हणतात. जेव्हां कलियुग माजतें म्हणजे जेथें थोडक्या लोकांच्या फायद्या- 'करितां व चैनीकरितां केवळ मनगटाचे जोरावर अन्यायानें इतरांस गांजण्यांत 'येतें, त्यांच्या श्रमाबद्दल मिळावयाच्या मोबदल्याची पायमल्ली करण्यांत येते, 'तेव्हां आघात सोसून प्रत्याघात उत्पन्न करण्याइतकी शक्ति सर्वांनीं एकोपा 'करून उत्पन्न केल्याशिवाय गत्यंतर नसते; व मग मजुरांना संप करून, श्रमा- 'शिवाय नुसत्या भांडवलावर कारखाना चालत नाहीं व फायदा मिळत नाहीं 'ही गोष्ट कारखानदारांच्या नजरेस आणावी लागते. नोकरांनीं संप करणें म्हणजे 'बेबंदशाही असें अँग्लोइंडियन ओरडतात. पण इंग्लंडांतील संप कसे खपवून 'घेतात ? काम बंद करणें म्हणजे उपास करून वेऊन मरणें हें उघड दिसत असतांहि 'तोंडचा घास खालीं ठेवण्यास या लोकांनीं तयार व्हावें, यावरून त्यांचीं 'गाऱ्हाणीं खरीं आहेत, व त्यांची दाद लावून घेण्याचे इतर मार्ग त्यांनीं 'आक्रमून पाहिले आहेत असेंच अनुमान निघतें,' वगैरे लिहून तारमास्तरांनीं असाच नेट धरावा असा केसरीनें सल्ला दिला आहे.

'प्लँटर्स लेबर बिल' नांवाच्या कायद्याचा एक मसुदा १९०३ सालीं कौन्सिल- पुढें येऊन पास झाला. त्यांत चहा, नीळ वगैरेंच्या मळ्यांतून जे मजूर करारानें

लावले जात त्यांनीं करार मोडला असतां त्यांजवर फौजदारी व्हावी असें ठरलें. याविरुद्ध लिहितांना केसरी लिहितो, ' पृथ्वीच्या पाठीवरील सर्व लोकांनीं गुलाम ' अथवा मजूर म्हणून राबावें व जमिनीवरील अथवा भूमीचे उदरांतील सर्व ' संपत्ति युरोपियनांस द्यावी अशा प्रकारचे सर्व जगांतील व्यवहाराचें सामान्य ' स्वरूप बनून जाणार काय ! ' (१०-३-०३).

मजूरचळवळींच्या प्रश्नांचा विचार करतांनाहि केसरीला विदेशी सत्ताच डांचते आहे. आणि वस्तुस्थितिच खरी असल्यामुळें ऐवढ्यापुरतें का होईना केसरीचें निदान अंशतः खरें ठरत आलेलें आहे. उदाहरणार्थ—१९०६ सालीं मँचेस्टरवाल्यांचें डेप्युटेशन मुंबईतील मजुरांच्या कामाचे तास कमी करावे म्हणून मोर्लेसाहेबांकडे गेलें. मोर्लेसाहेबांनींहि ' हा भूतदयेचा प्रश्न आहे ' असा आव आणला. केसरीनें म्हटलें कीं, ' स्वदेशी चळवळीमुळें मुंबईच्या गिरण्यांच्या मालाला ' मागणी वाढली व विलायती मालाची मागणी कमी झाली तेव्हां मोर्लेसाहेबांना ' हा कळवळा आला. आमचा देश शेतीप्रधान असल्यामुळें इंग्लंडप्रमाणें येथील ' मजूर सर्वस्वीं कारखानदारावरच अवलंबून नाहींत. मोर्लेसाहेबांना जर खरीच ' भूतदया आली असेल तर त्यांनीं येथील शेती सुधारण्याचा प्रयत्न करावा. ' म्हणजे मजूर कारखानदारावांचून अनन्यगतिक होणार नाहींत व मग मजुरां' कडून गैरवाजवी कामच मालकांस घेतां येणार नाहीं. त्यास मजुरांचा संतोष ' राखावाच लागेल.' (२०-३-०६).

तुतिकोरिन येथील कोरल मिल्सच्या ( या मिल्स युरोपियनांच्या असाव्यात असें वाटतें.) मजुरांच्या संपासंबंधानें लिहितांना केसरीनें संपाची अशी मीमांसा केलीः– ' युरोपियन व नेटिव्ह यांमध्यें संपत्तीची वांटणी विषम होते. विशिष्ट प्रकारच्या ' शास्त्रीय ज्ञानामुळें व परिस्थितीमुळें युरोपियनांनीं वाजवीहून अधिक संपत्तीचा ' वांटा आपणाकडे घेतला आहे. इकडील मध्यम व वरिष्ठ वर्गांच्या लक्षांत ही ' गोष्ट आली आहे, पण हातचें आहे तें जाईल या भीतीनें अधिक वाट्यासाठीं ' हट्टून बसण्याचें धाडस या वर्गाचे हातून होत नाहीं. ही वाटणी मागण्याचा ' प्रारंभ सर्वांत खालच्या म्हणजे मजूरवर्गाच्या हातून व्हावा लागतो. युरोपियनां' च्या इच्छेविरुद्ध सांपत्तिक प्रश्न नेटिव्हांना अनुकूल अशा रीतीनें सोडविण्याची ' प्रत्यक्ष युक्ति म्हणजे यशस्वी संप होय.' (३-३-०८).

यांत लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं केसरीनें मजुरांचे संप या प्रकरणीं सुद्धां ' मजूर विरुद्ध भांडवलवाले ' असा पक्षभेद पुढें न आणतां ' नेटिव्ह विरुद्ध युरोपियन ' असा पक्षभेद ठळकपणें पुढें दाखविला आहे. अर्थात्, युद्धसाधन म्हणून संपाचा पुरस्कार केलाच आहे. इतकेंच नाहीं, तर राजकीय प्रश्न लष्करी सत्तेनें ' दडपतां येतात, पण पोटापाण्याकरितां करावयाचे संप तसे दडपता येणार ' नाहींत.' (२६-११-०७). तसेंच ' परिणामाच्या दृष्टीनें संप लष्करी युद्धापेक्षां

अधिक यशस्वी होत.' (५-३-१२) असें संपाचें अमोघत्वहि प्रतिपादिलें आहे.'

अँग्लो-इंडियन व युरोपियन लोकांचा भरणा असलेल्या तारखात्याच्या संपा-संबंधानें १४-४-०८ च्या अंकांत केसरीनें काळ्या व निमगोऱ्यांमधील लढ्याची फोड केली आहे. ' अँग्लो इंडियन व युरेजियन यांचे संप युरोपियनांविरुद्ध यशस्वी ' कां होतात ?. व इंडियनांचे त्याविरुद्ध कां फसतात ! बरोबर आहे. अँग्लो-' इंडियनांनीं संपास प्रवृत्त होणें म्हणजे हिंदी लोकांना गोऱ्यागोऱ्यांचा आपसांतील ' कलह कळण्यासारखें आहे असें वाटून गोरे लोक अँग्लो-इंडियनास लवकर खूष ' करतात. पण अँग्लो-इंडियनांच्या संपाचें बीज युरोपियनांच्या सामाजिक दुहींत ' असल्यामुळें ते युरोपियनांस डोईजड होतील व नेटिवांच्या हातांत सुखसंपत्तीच्या ' वाटणीची गुरुकिल्ली जाईल.' युरोपांतील या सामाजिक दुहीसंबंधीं केसरीनें एके ठिकाणीं दिलेला अभिप्राय बराच चिन्त्य वाटतो. इंग्लंडमधील एका संपाचे प्रकरणीं मजुरांच्या तक्रारींचा विचार करण्यास एक कमिशन नेमलें गेलें होतें. ' या कमिशनचा उपयोग बहिरंगापुरताच होईल, अंतर्गत व्याधि नाहींशी होणार ' नाहीं. केवळ स्वार्थाच्या पायावर ज्या समाजाची रचना झाली आहे व लक्ष्मी ' हें ज्यांचें आराध्य दैवत आहे तेथें परस्परांच्या हितांमधील विरोध कधींहि नष्ट ' होणार नाहीं,' (१४-५-१२) असें केसरीनें मत दिलें आहे.

संपाच्या संकटांत ट्रान्सव्हाल सरकार सांपडलें तेव्हां सरकारच्या अडचणींचा फायदा घेऊं नये म्हणून गांधींनीं सत्याग्रह थांबविला. केसरीनें गांधींना धर्म-राजाची उपमा देऊन ' हा पौर्वात्य व पाश्चात्य मनोवृत्तींतील फरक पहा ' असें म्हटलें आहे. ( २०-१-१४ ).

यावरून पाश्चिमात्य लोक आसुरी संपत्तीचे व पौर्वात्य लोक दैवी संपत्तीचे असतात असें केसरीस सुचवावयाचें आहे काय ?

विलायतेंत संप यशस्वी कां होतात व येथें कां होत नाहींत याचें विवेचन करतांना केसरी लिहितो—' विलायतेंत ट्रेड यूनियन्स असून संप यूनियनच्या संमती-' नेंच होतात. यूनियन संपांचे प्रसंगाकरितां पोटापाण्याचा फंड नेहमीं तयार ' ठेविते व यूनियनमधील मजुरांनीं संप केला असतां रिकाम्या जागेसाठीं कामा-' वर जाण्यास टपलेल्या उचल्या 'मधुकऱ्यां'ना संपवाले झोडपून काढतात. संप ' यशस्वी होण्यास या सर्व गोष्टी अवश्य आहेत. ' ( ४-९-१९ ).

' भौतिक सुधारणेस अनुकूल अशा नवीन राहाणीस अधिक वेतनाची गरज ' मजुरांना पटूं लागली व त्यांत बहिष्कारशस्त्राची भर पडली कीं, संप जन्मास ' आलाच म्हणून समजावें, ' अशी, केसरीनें संपाची उपपत्ति लवली आहे. ( १०-३-०८ ).

मजुरांच्या चळवळी राजकीय नसून सामाजिक व आर्थिक असतात असा समज आहे आणि त्यास अनुसरून मजुरांना राजकीय चळवळींत घेऊं नये असें

कांहीं लोक म्हणत. पण स्वराज्यपरायण केसरीनें मात्र ओळखलें आहे कीं, ' हिंदी मजूरवर्गास राजकीय चळवळींतून वगळून स्वराज्याचे हक्क हिंदुस्थाननें ' मिळविले तर गोरी नोकरशाही जाऊन येथें काळी नोकरशाही प्राप्त होईल. ' तें कांहीं खरें स्वराज्य होणार नाहीं.' ( ३-४-२३ ).

वर एकदां सांगितलेंच आहे कीं, ' परकीय सत्ता विरुद्ध हिंदी ज़न ' हा विरोध केसरीला जितका सर्वत्र दिसतो तितका ' भांडवलशाही विरुद्ध मजूर ' हा विरोध खुद्द मजूर चळवळींतहि केसरीला फारसा भासला नाहीं. इतकेंच नव्हे तर, मजुरांची सुस्थिति वाढावी म्हटलें म्हणजे आधीं कारखानदारांना मिळकत चांगली झाली पाहिजे या मुद्द्यावर केसरीनें विशेष भर दिला आहे; व याकरितां संरक्षक जकाती बसवून गिरण्यांच्या मालास उत्तेजन दिलें पाहिजे हें केसरीनें वारंवार प्रतिपादिलें आहे. मात्र गिरणीवाले मजुरांचा छळ करतात त्याचाहि केसरीनें अनेकवार निषेध केलाच आहे. ' गिरणीवाल्यांनीं पगारवाढीचे ' बाबतींत वचनभंग केला हें निंद्य आहे. विदेशीय मजुरांना पगार भरपूर ' असून कामाचे तास कमी करण्याबद्दल ते भांडतात. आमचे मजूर पोटभर ' अन्न मागतात तें तरी गिरणीवाल्यांनीं नाकारूं नये.' ( १४-१-१९ ).

' भांडवलशाही व मजूर यांत तत्त्वतः हितविरोध आहे ' असें मानणारा मजूरचळवळींत एक फार मोठा पक्ष आहे. पण केसरीस हें मत मुळींच मंजूर नाहीं. उलट ' गिरणीवाले व मजूर हे परस्परांचे दावेदार न भासतां प्रेमरज्जूनें बांधले ' गेले पाहिजेत. गिरणीवाल्यांनीं याचा विचार करावा ' असें केसरी सुचवितो, (१३-१-२०). आणि गिरणीकामगार व गिरणीमालक यांचे संघ स्थापून वेळप्रसंगीं तडजोडीकरितां पंच व गव्हर्नरांसारखे वजनदार सरपंच नेमावे, असेंहि केसरीनें मत दिलें आहे. ( १०-२-२० ).

युरोपियन महायुद्धानंतर सर्व जगांत जी खळबळ उडाली तींत 'भांडवलवाले विरुद्ध मजूर ' या तंट्यास फारच तीव्र स्वरूप आलें व त्याची धग स्वाभाविकपणें हिंदुस्थानासहि लागल्यावांचून राहिली नाहीं. केसरीनें मजुराविषयीं सहानुभूतिपर पण या नवीन मताविषयीं साशंक धोरण ठेविलें आहे. मजुरांच्या जागृतीसंबंधानें केसरी म्हणतो—' आमची हिंदी मजुरांना अशी विनंति आहे कीं, ' युरोपांतील मजूर ज्याप्रमाणें कामाचे तास कमी करणें वगैरे बाबतींत राष्ट्रहित ' न पहातां आपल्या मागण्या बेलगाम चढवीत आहेत तसें हिंदी मजुरांनीं करूं नये.' ( १६-८-२० ).

मि. स्प्रॅटवरील खटल्यासंबंधीं लिहितांना ' आज लहानशा दिसणाऱ्या कम्यु' निस्ट पक्षाचे अंगीं सरकारच्या विरोधास टिकून राहण्याचा चिवटपणा आहे हें ' सरकारला कळून येईल, ' (२०-९-२७) असें कम्युनिस्टांबद्दल गौरवानें केसरीनें म्हटलें आहे. मिरतच्या खटल्यांतील आरोपींना केसरीनें सर्व प्रकारें साहाय्य

मिळवून देण्याची खटपटहि केली आहे. पण मुंबईत कम्युनिस्ट पुढाऱ्यांनीं जुन्या-नव्या पक्षांत तट पाडले व आपली चळवळ रशियांतील कम्युनिस्ट पद्धतीवर नेण्याचा प्रयत्न ते करतात याचा केसरीनें धिःकार केला आहे; आणि 'संप करण्यापूर्वी 'कांहीं विचार करा व अविचारी लोकांच्या नादीं लागून आपले खरे स्वार्थत्यागी 'पुढारी सोडूं नका नाहींतर अखेर पस्तावाल' असा मजुरांना इषारा दिला आहे. (२४-४-२८).

'ट्रेड युनियन कॉंग्रेसचीं शकलें कां उडालीं?' या अग्रलेखांत मजूर व भांडवलवाले यांच्या विरोधास फाजील महत्त्व देऊन कम्युनिस्ट मताचे लोक आमच्या मागसलेल्या देशावर रशियाचीं तत्त्वें लादूं पहातात असें मत देऊन त्यांचा केसरीनें निषेध केला आहे. (१४-१२-२९).

मजूर व भांडवलवाले यांचा विरोध तत्त्वतःच आहे हें जरी केसरीस मान्य नाहीं तरी कारखानदारांनीं मजुरांचे हक्क तुडवूं नयेत याबद्दल केसरीनें नेहमीं खटपट केली आहे.

मुदतबंदीनें विदेशीं पाठविल्या जाणाऱ्या मजुरांची बाजू घेऊन केसरीनें मुदतबंदीची पद्धति बंद करण्याची चळवळ केली. पण हिंदी मजुरांस विदेशास अजीबात जाऊं देण्यास बंदी करण्याच्या मात्र तो विरुद्ध असून उलट स्वेच्छेनें विदेशीं जाऊं इच्छिणाऱ्या लोकांचे संरक्षणाची हमी हिंदुस्थानसरकारनें घेतली पाहिजे असें केसरीनें म्हटलें आहे. (१२-९-१६).

---

# दुष्काळ

[ श्री. पांडुरंग वासुदेव गाडगीळ, वाङ्मयविशारद ]

**सरकारचें दुष्काळी धोरण**—हिंदुस्थानांत इ. स. १८७६ सालीं फार मोठा दुष्काळ पडून लाखों लोक अन्नाविणें मृत्युमुखीं पडले. सरकारच्या वार्षिक बजेटांतून अशा दुष्काळाचे वेळीं लोकांना मदत करणें अशक्य आहे असें पाहून त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड लिटन यांनीं दुष्काळाची कायम तरतूद करण्याकरितां 'लायसेन्स कर' बसविला व त्यांतून दरसाल १॥ कोट रुपये दुष्काळफंड म्हणून काढून ठेवण्यांत येतील असें सरकारतर्फें सांगण्यांत आलें. ही योजना म्हणजे दुष्काळाचा विमाच होय असेंहि तेव्हां सांगण्यांत आलें. पण सरकारनें आपला शब्द पाळला नाहीं. पुढें १८९५ सालीं दुष्काळाचीं चिन्हें दिसूं लागलीं असतां केसरी लिहितो,

' सरकारनें आरंभीं वचन दिलें खरें, पण पुढें पाहावें तो या फंडाचा राज्यकार-
'भारांत फन्ना उडून कांहीं कांहीं सालीं ९।१० लाख रुपयेच काय ते दुष्काळनिवा-
'रणार्थ काढून ठेवण्यांत आले. वास्तविक म्हणजे सरकारनें रयतेच्या पैशाची ही
'अफरातफर, दुरुपयोग अथवा चोरी करण्यासारखें आहे. एकाद्या गुमास्त्यानें असें केलें
असतें तर त्याच्या मालकानें त्याला पीलनकोडप्रमाणें कोर्टाकडून शिक्षा देवविली
' असती. सरकारला पीलनकोड लागू नाहीं तरी असला वचनभंग निंद्यच होय.
( ९-४-९५ ).

व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांनीं १९०८ सालीं एक खाजगी दुष्काळफंड काढून लोकांकडून फंड मागण्याकरितां जाहीर आवाहन केलें. ' तीस-
' बत्तीस वर्षांपूर्वीपासून लायसेन्सकराचे रूपानें दुष्काळफंड घेतला व वचनभंग
' करून निरनिराळ्या सरकारी खात्याकरवीं गिळंकृत केला. आणि आतां दुष्काळ
' आल्याबरोबर सरकार फंडाकरितां झोळी फिरवूं लागतें याचा अर्थ काय ! याचें
' उत्तर एवढेंच कीं आमचे राज्यकर्ते बलाढ्य, धूर्त व स्वार्थदक्ष असून आम्ही
' मात्र सर्वतोपरीं दुर्बल, अज्ञान व स्वहिताविषयीं बेफिकीर आहों. ( राज्यकार-
' भाराचा खर्च कमी करणें, म्हणजे सरकारी युरोपियन नोकरांचें अन्न कमी
' करणें ! तें न करतां त्याला दुष्काळफंड वापरून दुष्काळाकरितां सरकार पुन्हा
' फंड मागतेंच, व आम्ही मूर्ख तो देतों असा अर्थ. ) ' अशी टीका ते वेळीं
केसरीनें केली. ( २४-३-०८ ).

शहाण्णव सालच्या दुष्काळाचे वेळींहि केसरीचें म्हणणें असेंच होतें. ' एवढा
' दुष्काळ पडला व सरकारला पैशाची अडचण आहे, पण म्हणून गोऱ्या काम-
' गारांचा हुंडणावळीच्या वट्टयाकरितां वाढविलेला पगार कधीं कमी होईल का !
' पण कुरकूर करून काय उपयोग ? परकी लोक राज्य करणार म्हणजे असें हें
चालायचेंच.' (के.१९-१२-९६ ). वेडरबर्न यांच्या ' इंडियन फॅमिन यूनियन '
विरुद्ध ' हिंदुस्थानच्या कैवाऱ्यांनीं या प्रश्नास राजकीय स्वरूप दिलें आहे,' असा
कांहीं इंग्रजांनीं विलायतेंत आक्षेप घेतला होता. त्याला केसरीनें उत्तर दिलें,
' हिंदुस्थानांतील शेंकडा ८५ लोक शेतकीवर निर्वाह करणारे असतां राजकीय
' चळवळ करणारांनीं दुष्काळाच्या प्रश्नास एवढें महत्त्व दिलें तर यांत चूक
' कोणती ? ' ( ७-५-०१ ).

विलायतेंत लॉर्ड कर्झन यांनीं एक व्याख्यान दिलें. त्यांत, ब्रिटिश अमलानें
हिंदुस्थानांत दुष्काळाची व्यवस्था सर्व जगांत पहिल्या प्रतीची ठेविली होती असें
विधान केलें. त्यावर लिहितांना, आगगाड्या वगैरे साधनांनीं दुष्काळनिवारणास
होणारी मदत सामान्यतः मान्य करून केसरीनें उपरोधिकपणें लिहिलें:—
' दुष्काळांत मेलेल्या लोकांना पुरावयाचे खड्डे किती खोल असावे वगैरे सर्व
' बारीक सारीक बाबीसंबंधानेंहि लॉर्ड कर्झनचे कारकीर्दींत व्यवस्था लावण्यांत

‘ आली होती हें खरें. पण जपान, अमेरिका, फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड वगैरे देशांना
‘ कधींच न येणारी दुष्काळाची संधि हिंदुस्थानास ब्रिटिश अमलाखालीं अव्याहत
‘ असते यांत कर्झनसाहेबांस अभिमान कसचा वाटतो ? दुष्काळग्रस्त पाप्यांच्या
‘ पितरांवर राज्य करण्याचा अद्वितीय मान परमेश्वरानें इंग्रजांस दिला आहे
‘ खराच ! पण दुष्काळी नियमांच्या पूर्णावस्थेचे श्रेय इंग्रजी अमलदारास देण्या-
‘ पेक्षां दुष्काळास आपलें बिऱ्हाड येथें कायमचें ठेवण्यास ज्यानें मदत केली त्या
‘ ब्रिटिश अमलास देणेंच अधिक योग्य होईल.’ ( १९-२-०७ ).

**दुष्काळी कामें**—दुष्काळकामावरील मजुराकडून पुरें पुरें काम घ्यावें नाहींतर खाडे घालावे असे हुकूम सुटले होते. ‘ खाडा घातला तरी कमींत
‘ कमी ठरलेला शिधा मजुरास दिलाच पाहिजे. दुष्काळ कामें लोकांचे जीव
‘ बचावण्याकरितां काढिलीं आहेत. लोकांकडून काम चोपून करून घेण्याकरितां नव्हेत,’ असें केसरीनें त्याच वेळीं बजावलें. (८-१२-९६). दुष्काळकामावरील मजुरी सक्तमजुरीच्या कैद्याच्या शिध्याहूनहि कमी होती. यावर गुन्हेगाराहूनहि दुष्काळग्रस्तास सरकार हीन लेखतें असें केसरीनें म्हटलें आहे.

केसरींतील एका पत्रांत दुष्काळी कामासंबंधीं भाऊ सावळाराम कोटस्थाने लिहितात,—‘ हल्लीं चोहोंकडे खडीचें काम चालू आहे. यानें दुष्काळांत लोक
‘ कसेतरी जगतील. पण सरकारला एवढा खर्च येऊनहि कायमचा दुष्काळ हट-
‘ विण्यास धान्याचा पुरवठा केला जात नाहीं. सरकार शेती सुधारण्यास पैसे देते
‘ पण खडीचे मानानें फारच कमी. धान्याचा दुष्काळ प्राप्त झाला असतां पर्वत-
‘ प्राय तयार केलेल्या गोष्टींनीं प्राण्यांना कसे वांचवावें ? ही वेळ शेती सुधारण्याची
‘ आहे. खडी फोडणें बंद करून पाटबंधारे, विहिरी वगैरेसारखीं कामें काढावीं.’
(३-४-१९००).

**मिशनरी कीं गिधाडें**—दुष्काळाच्या वेळीं ख्रिस्ती मिशनरी लोक अन्नाची लालूच दाखवून गरीबांना बाटवीत. ‘ मोठी लढाई जुंपली म्हणजे गिधाडांची
‘ चैन होते. दुष्काळ वाढतो तसतसा मिशनरीबुवांचा बकध्यानीं चेहरा ज्यास्त
‘ ज्यास्तच खुलत आहे. हिंदु लोक द्रव्यहीन असून मिशनऱ्याप्रमाणें द्रव्याचा
‘ पाऊस पाडूं शकत नाहींत व आपल्या धर्मसमजुती इतरावर लादण्याच्या
‘ कामांत अचल व स्थिर आहेत. तरी अंगावर चाल करून येणाऱ्याचा मुसंडी-
‘ सरशी कपाळमोक्ष करण्याची शक्ति त्यांच्यांत आहे हें मिशनरीबुवांनीं ध्यानांत
‘ ठेवावें.’ असा इशारा त्यांना देण्यास केसरी चुकला नाहीं. (१३-१०-९६).

**दुष्काळ व जनतेचें कर्तव्य**—फॅमिन रिलीफ कोडमध्यें दुष्काळतरतुदीचे जे नियम होते ते अमलांत येते तर समाधानकारक होते. पण अधिकारी त्यांची बजावणी करण्यास नेहमीं कुचराई करीत. या नियमांची बजावणी करून घेण्याचें

काम केसरीनें पुढाऱ्यांच्या माथीं मारलें आहे. १८९६ सालीं दुष्काळासंबंधीं हिंदुस्थानास राणीसाहेबांचा सहानुभूतिपर संदेश आला होता. त्यांत लोकांचे प्राण वांचविण्यासंबंधीं सर्व खटपटी करण्यास अधिकाऱ्यास बजाविलें होतें. केसरी लिहितो, 'राणीसरकारचा अधिकाऱ्यांना असा हुकूम आला 'असतां सरकारकडे दाद मागण्याइतकीहि अक्कल लोकांत नसेल तर 'लोक मेले काय नी जगले काय सारखेच.' (१९-११-९६). फॅमिन रिलीफ कोडांतील नियमांची बजावणी करण्याकरितां हजारों अर्ज लोकांनीं करावे असें केसरीनें वेळोवेळीं सुचविलें आहे. सार्वजनिक सभेनें दुष्काळकमिटी स्थापून दुष्काळांत लोकांची दाद लावण्याचे कामीं फार खटपट केली. सदर कमिटीचे एक सेक्रेटरी श्री. अ. शि. साठे सारामाफी मिळविण्यासाठीं चळवळ करण्यास हिंडत असतां त्यांच्या खत्तलवाड येथील व्याख्यानासंबंधीं प्रशंसापर लिहितांना साठे यांचें अनुकरण करण्यास सांगून केसरीनें म्हटलें 'कायदेशीर रीतीनें सरकारशीं भांडावयास रयतेस कसें शिकवावें ही विद्या 'आमच्या पुढारी लोकांस अद्याप शिकावयाची आहे. ती ते शिकतील तेव्हां 'अधिकाऱ्यांचा उर्मटपणा उतरेल, कायदा करण्याचें काम सरकारचें आहे. पण 'त्याची अमलबजावणी करून घेणें ही आमच्या हातांतली गोष्ट आहे. त्याकरितां 'शंभरदां नाहीं हजारदां अर्ज केले पाहिजेत; हें राज्य कायद्याचें आहे. दांडगाईचें नव्हे. भांडणें झालें तरी कायदेशीर भांडलें पाहिजे.' (१२-१२-९६). दुष्काळांत रयतेची दाद लागण्यासंबंधींच्या कर्तव्याची जाणीव पुढाऱ्यास देतांना केसरीनें बजाविलें कीं, 'हीं कामें करणाऱ्यांवर सरकारची गैरमर्जी 'होईल. पण असल्या गोष्टीस भिऊन उपयोगी नाहीं. योग्य रीतीनें रयतेच्या 'पोटाकरितां भांडत असतां तुरुंगांत जाण्याचा प्रसंग आला तरी हरकत नाहीं. 'हें राज्य कायद्याचें व ओरडीचें आहे. कायदा सरकारनें केला आहे. ओरड 'करणें हें आपलें काम आहे. तें जर आपण केलें नाहीं तर त्याचा दोष 'आपल्या माथीं येणार आहे. आम्हीं अशी ओरड करणें हें अधिकाऱ्यांस 'अप्रिय असलें तरी त्यांत राजद्रोह नाहीं.' (१२-१२-९६).

दुष्काळ आला तेव्हां गरीब लोक लुटालूट करूं लागले. केसरी लिहितो– 'नाक दाबल्याशिवाय तोंड उघडत नाहीं. दुष्काळाच्या आरंभींच अजून धान्य 'पुष्कळ असतांहि व्यापाऱ्यांनीं नफा मिळविण्याकरितां तें महाग केलें असतां 'लोकांनीं बाजार लुटले असल्यास अथवा तसा धाक घातल्यास त्यांचा काय 'अपराध ? व्यापाऱ्यांनीं यावेळीं फाजील नफ्याची हांव न धरतां स्वस्त दराचीं 'धान्याचीं दुकानें काढून लोकांची सोय केली पाहिजे.' (२७-१०-९६). मुंबईचे धनिक शेटजी नारायणदास मुळजी यांनीं पुण्यास दुष्काळनिवारणार्थ मोठी मदत पाठविली. त्यांचा गौरव करतांना 'आमच्या इकडील धनिकांची उदार

‘ बुद्धि चहांतच बुडी मारून राहिली आहे,’ (१०-११-९६) असा टोमणा मारला आहे. लग्नाकार्यांतून दुष्काळाचे वेळींहि चालणारी उधळपट्टी पाहून केसरी लिहितोः—
‘ आमच्या देशांतील लाखों लोक आज अन्नास मोताद झाले आहेत अशा वेळीं
‘ वाजा किंवा ताशे न लावल्यामुळें विहीण रुसून दुसऱ्या पक्षाकडून ५०० रुपये
‘ उकळण्याइतकी सुशिक्षितांची निकृष्ट स्थिति झालेली पाहून कोणासहि वाईट
‘ वाटल्यावांचून राहणार नाहीं. धर्मदृष्ट्या कन्येचें लग्न योग्य काळीं अवश्य
‘ असलें तरी तेवढ्यामुळें अनन्वित हुंडा घेणें अथवा लाडू खाणेंहि भागच आहे
‘ असें नाहीं. यापेक्षां सध्यांचे दुष्काळांत व्याहीव्याही अथवा जावई साध्या
‘ जेवणावर तृप्त होऊन यावर्षीं आपला सर्व रुसवा दुष्काळपीडितास मदत
‘ करण्याचे कामीं लावतील तर बरें होईल. यांत फार तर लाडू खाण्याची इच्छा
‘ एक वर्षभर दाबून ठेवावी लागेल एवढाच स्वार्थत्याग आहे.’(२९-५-१९००).

**दुष्काळाचीं कारणें**—इंग्रजी राज्य हें ईश्वराचें वरदान असें मानण्याचा जो काळ होता त्या काळीं केसरीचा जन्म झाला आणि परकी राज्य व परकी वर्चस्व हेंच हिंदुस्थानच्या संकटाचें मूळ हें अनेक पर्यायांनीं लोकांच्या मनावर बिंबवण्याचें कार्य केसरीनें अंगीकारिलें. हिंदुस्थानांतील कोणत्याहि दुःखाचें मूळ कारण केसरीच्या मतें परकी सत्तेंतच आहे. अर्थात् दुष्काळकारणाचा विचार करतांनाहि केसरीस परकी सत्ताच दिसत असली तर त्यांत कांहींच नवल नाहीं. दुष्काळाचीं पूर्वचिन्हें १८९६ सालीं दिसूं लागतांच केसरी लिहितो, ‘ दुष्काळाचीं चिन्हें सर्व
‘ देशभर दिसूं लागलीं. सुखवस्तू माणूस तरी निभावून निघेल कीं नाहीं शंकाच
‘ आहे. वीस वर्षांपूर्वीं गांवोगांव पेवांतून धान्यें किती तरी भरून ठेविलीं असत.
‘ पण आज खेड्यापाड्यांतून शिल्लक कांहींच नाहीं. आम्ही मेहनत करून धान्य
‘ पिकवावें व परकी राष्ट्रांनीं यथेच्छ जेऊन पोटाच्या ढेऱ्यावरून हात फिरवावा अशी
‘ शोचनीय स्थिति झाली आहे. धान्य विकून आलेल्या रुपयांचा मळ मात्र
‘ आमच्या हातास लागतो. बाकी कराच्या रूपानें सरकार ते पैसे हिसकावून घेतेंच.
‘ दुष्काळाच्या वेळीं रिकाम्या कोठाराकडे पाहून ढळढळां रडावें, पण विष खाऊन
‘ प्राण देण्यासहि जवळ दमडी नाहीं. रयतेची शोचनीय स्थिति नाहीं म्हणणाऱ्या
‘ अधिकाऱ्यांनीं गार बंगल्यांत झोपीं जाण्याचा क्रम सोडावा व पाऊस न
‘ पडल्यामुळें रखरखलेल्या खेड्यापाड्यांतील लोकांचे कसे हाल होत आहेत
‘ हें स्वतःच्या डोळ्यांनीं पाहावें. धान्याची लुटालूट एव्हांपासूनच सुरू झाली.
‘ जेथील रयत घाणेरड्या अन्नाचा एकादा घास तोंडांत ढकलायला मिळावा
‘ म्हणून तुरुंगांत जाण्यास तयार असतात तो देश सुसंपन्न असें कोण म्हणेल ?
‘ परकी अमलानें हिंदुस्थान सुसंपन्न झाला म्हणणाऱ्यांनीं आपले विचार या वेळीं
‘ कसास लावून पाहावेत. पंधरा दिवसांत हताश होण्याइतके लोक निसत्त्व कां
‘ झालें ? ह्या सर्व रडक्या कहाणींतील मजा ही आहे कीं, सर्व प्रजा दुःखीकष्टी

' असतांनाहि आमचे अधिकारी नेहमींपेक्षां लवकरच गार टेकड्यावर सुखोपभोग
' घेण्यास पळतील.' (१३-१०-९६).

इ. स. १८७६ च्या दुष्काळांत माणसें मेलीं तशीं १८९६ च्या दुष्काळांत मेलीं नाहींत असें सरकारनें प्रसिद्ध केलें. त्यावर केसरीची टीका अशी--' पण
' दुष्काळांत एकंदर मृत्युसंख्या जी वाढते ती कशामुळें ? निवळ उपासमार
' होऊन खारकेसारखा वाळून कांहीं कोणी मरत नाहीं. त्यास योग्य अन्न कांहीं
' दिवस न मिळेल तर कांहींना कांहीं व्याधी जडतातच, हें नेहमीं लक्षांत ठेवलें
' पाहिजे.' ( ६-२-१९०० ).

दुष्काळांच्या अव्यवस्थेसंबंधीं लिहितांना केसरीनें लिहिलें:—' लॉर्ड सँढर्स्ट
' याजवर ही जबाबदारी नाहीं खरें; पण खालील अधिकाऱ्यांच्या कृत्यांस निवळ
' संमति देत राहायचें तर दरमहा १०००० रुपये खरचण्याचें प्रयोजन काय ?
' तें काम विलायतेहून तारेनेंहि होऊं शकेल.' ( ३०-१-१९०० ).

दुष्काळाच्या कारणांची संक्षिप्त मीमांसा केसरीनें अशी केली आहे. ' दहा वर्षें
' काम करूनहि एक वर्ष पुरे इतकी शिल्लक लोकांजवळ पडत नाहीं हें दुष्काळ पड-
' ण्याचें खरें बीज आहे. आमचे उद्योगधंदे बुडाल्यानें ही स्थिति आली.'
(१०-४-१९००).

' एखाद्या खेड्यांत चारदोन लक्षाधीश मारवाडी असल्यानें ज्याप्रमाणें मार-
' वाड्यांची संपत्ति वाढते पण खेड्यास निकृष्टावस्थाच येते. त्याप्रमाणें युरोपियन
' कारखाने, युरोपियन व्यापारी हिंदुस्थानांत चोहोंकडे झाल्यानें इंग्लंडची संपत्ति
' अतोनात वाढत आहे, पण आमचा व्यापार बुडून उद्योगधंदे रसातळास जाऊन
' आमच्या वाट्यास दारिद्र्य येत आहे.' ( ८-५-१९०० ).

दहाव्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष मि. वेब यांच्या एका भाषणावर लिहितांना केसरीनें म्हटलें ' युरोप व इंग्लंड येथील लोकसंख्येपेक्षां हिंदुस्थानां-
' तील लोकसंख्येची वाढ कमी आहे. पण युरोपांत दुष्काळ नाहींसाच झाला
' असतां तो आमच्या येथेंच कां आहे ? पाऊस न पडल्यानें दुष्काळ पडतो, हें
' खरेंच. पण वादाचा प्रश्न खरा असा आहे कीं दुष्काळाचे वेळीं टक्कर देण्या-
' इतकें सामर्थ्य लोकांत कां असूं नये ? हिंदुस्थानच्या दारिद्र्याचें कारण सांप्रतची
' राज्यव्यवस्था होय. तुंबडी लावून अंगांतलें रक्त शोषून घेतलें असतां जसा
' निवळ हाडाचा सांपळा उरतो, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील सर्व सत्त्व या राज्य-
' पद्धतीमुळें वाहात चाललें असून गुलामरूपीं पाप्याचीं पितरें मात्र येथें शिल्लक
' राहिलीं आहेत.' ( कित्ता ). इंग्लंडांतील मि. स्विनी यांच्या व्याख्यानाचा सारांश १५-५-०१ च्या केसरींत दिला आहे. ते म्हणतात 'युरोपांत १९व्या शतकांत
'रशिया व आयर्लंड या दोन देशांत दुष्काळ पडत असे. पैकीं आयर्लंडची पुष्कळशी

'संपत्ति इंग्लंडास जात होती व रशियाचा राज्यकारभाराचा खर्च अवाढव्य 'होता. हिंदुस्थानांत हीं दोनहि कारणें एकदमच असतां दुष्काळ कां न पडावा?'

**उपायशोधन**—सन १९०६ च्या सरकारी रिपोर्टांत यावर्षी दुष्काळांत कोष्टयांच्या मालाला मागणी असल्यानें त्यांचे हाल होणार नाहींत असें म्हटलें होतें. यावर केसरीचें असें म्हणणें कीं 'पूर्वीच्या दुष्काळांत नसलेली स्वदेशी चळवळ आज 'चालू असल्यामुळें कोष्टयांच्या मालाला आज मागणी आहे. स्वदेशी चळवळ 'अशीच चालू राहील तर शेतकऱ्यास फावल्या वेळांत करावयास लहान लहान 'धंदे मिळून मजुरीचे दर वाढतील व दुष्काळांत तग धरण्यास शेतकऱ्याजवळ दम 'राहील. दुष्काळावर स्वदेशी हा महत्त्वाचा उपाय आहे.' (३०-१-०६).

'इंडस्ट्री' नामधारी एका लेखकाच्या टाइम्समधील लेखाचा सारांश देऊन केसरीनें त्याचा पुरस्कार केला आहे. सदर लेखक म्हणतो, 'इतर देशांत एक वर्ष 'अवर्षण पडलें कीं, लगेच दुष्काळ पडत नाहीं. आमचे धंदे बुडाले हें दुष्काळाचें 'खरें कारण आहे. कारखानदारांनीं मालाची निपज व खप यासाठीं आपापल्या 'परीं कितीहि खटाटोप केला तरी धंदे वाढण्यास त्याचा उपयोग कधींहि होणार 'नाहीं. हिंदी लोकांनीं यापुढें कर व जकाती बसविण्याची सत्ता मिळविण्याकरतां 'चळवळीचें सर्व सामर्थ्य एकवटलें पाहिजे. खुल्या व्यापाराची पद्धति इंग्लंडला 'हितकारक आहे म्हणून इंग्लंडनें ती आमच्यावर लादली आहे. पण जर्मनी, 'जपान, अमेरिका वगैरे राष्ट्रांनीं संरक्षक पद्धतीनेंच आपले धंदे वाढविले. आम्ही 'तसें करणार नाहीं तोंपर्यंत अवर्षणांत दुष्काळ पडून खुल्या व्यापाराचे पायीं द्रव्य-'बळ, मनुष्यबळ व पशुबळ यांचा असाच नाश होत राहणार.' (९-४-१२).

**उपसंहार**—खरोखर ही कर व जकाती बसविण्याची सत्ता म्हणजेच अंशतः स्वराज्य प्राप्त करून घेण्याच्या चळवळीस १९१२ नंतर चार वर्षांत जोरानें तोंड लागलें. अर्थात् सर्व आपत्तींचा नाश करणाऱ्या स्वराज्यप्राप्तीच्या मूलग्राही मार्गास केसरीसारख्या पत्रांना हात घालावा लागल्यामुळें दुष्काळ इत्यादि शाखावजा चळवळींना स्वाभाविकतः महत्त्व कमी आलें. शिवाय कच्च्या मालाची पैदास हिंदुस्थानांत करण्याची कल्पना इंग्लंडांत बळावल्यामुळें कालवे व पाटबंधारे वाढविण्याची खटपट सरकारनें केली. आगगाड्यांच्या प्रसारानेंहि दुष्काळाची तीव्रता दिवसानुदिवस कमी कमी झाली.

---

# जातगोत मोडून विवाह

[ श्री. श्रीधर शंकर भागवत, बी. ए., एल्‌एल्‌. बी. ]

जातिबाहेर विवाह करण्याची प्रवृत्ति इंग्रजी विद्येच्या संस्कारामुळें उत्पन्न झाली. सुशिक्षितांत जुनीं धार्मिक बंधनें व रूढ आचार यांविषयीं तिटकारा उत्पन्न झाला. जातिभेदाचीं बंधनेंहि ढिलीं झालीं. हिंदू कायद्याप्रमाणें स्वजातिबाहेर केलेले विवाह कायदेशीर ठरत नाहींत. म्हणून नवमतवाल्यांवर ही मोठीच आपत्ति आली. तेव्हां ब्राह्मसमाजाच्या खटपटीमुळें असे विवाह कायदेशीर ठरविणारा १८७२ चा 'सिव्हिल मॅरेज ॲक्ट' पास झाला. ह्या कायद्यानें असगोत्रत्वाचें व सवर्णत्वाचें बंधन काढून टाकिलें, पण सपिंडत्वाचें बंधन तसेंच कायम राखिलें. पण ह्या स्वातंत्र्याचा मोबदला म्हणून सिव्हिल मॅरेज ॲक्टाप्रमाणें विवाह करणारास स्वधर्मास सोडचिठ्ठी द्यावी लागे; व हिंदुधर्म अशा विवाहितांस मुकत असे.

पण कालांतरानें परिस्थिति बदलली; व ब्राह्मसमाजांत आपलें हिंदुत्व नष्ट होऊं नये अशी इच्छा उत्पन्न झाली; व १९११ सालीं बसुबिल कायदेमंडळापुढें आलें. केसरीनें 'विशिष्ट विवाहाचा कायदा' या सदराखालीं चार लेख लिहून ह्या बिलास मान्यता दिली.

बसुबिल ज्या परिस्थितींत तयार झालें, त्या परिस्थितींत बदल होण्यास अनेक कारणें झालीं. एकतर, वर सांगितलेली ब्राह्मसमाजाची हिंदुत्व नष्ट होऊं न देण्याची इच्छा. दुसरें असें कीं, ब्राह्मो राहात हिंदुसमाजांत; पण ते धड हिंदुहि नाहींत व धड हिंदूबाहेरहि नाहींत अशी त्यांची त्रिशंकुवत् स्थिति झाली. ही स्थिति साहजिकच त्यांस जाचूं लागली. शिवाय, ब्राह्मसमाजाचा सवता सुभा स्थापल्याच्या योगानें हिंदुस्थानांत पूर्वी जे शंभर तट व पंथ होते त्यांत आणखी एकाची भर पडली. पण अशा रीतीनें झालेली ही हिंदुस्थानांतील पंथांची व तटांची वाढ असली तरी एकंदरीनें हिंदु राष्ट्राच्या शक्तीची ही वाढ नव्हे हेंहि समाजाच्या नजरेस येऊं लागलें. याशिवाय हिंदुसमाजांत येण्यांत ब्राह्मोंचा व्यावहारिक फायदा होता. निराळें राहण्यांत राजकीय हक्कांच्या बाबतींत अल्पसंख्याकत्वाचा दोष व तोटा ब्राह्मसमाजाच्या वांट्यास येत होता.

या बिलानें केसरीनें म्हटल्याप्रमाणें हिंदुधर्मावरचें एक संकट टळलें. ब्राह्मोंना स्वतःच्या इच्छेविरुद्ध १८७२ च्या कायद्यानें हिंदुधर्मास मुकावें लागत होतें. आतां ती आपत्ति दूर होणार होती. '१८७२ चा कायदा धड सनातन धर्मा-

'भिमान्यास हवा तसा नाहीं; व धडे समाजसुधारकास हवा तसाहि नाहीं; आहे
'तो अर्धवट आहे. त्याच्या योगानें विशिष्ट विवाह कांहीं थांबत नाहीं, पण तसे
'करणारे मात्र आपल्याच कबुलीनें पण आपल्या इच्छेविरुद्ध हिंदुत्वास मुकतात.'
(के. २५-४-११). बसुबिल हा या विषावरचा उतारा होता. हें बिल पास
होण्यांत हिंदुसमाजाचा फायदा होता. 'या बिलास कांहीं हरकत आहे, असें
'आम्हांस तरी वाटत नाहीं.'(के.२५-४-११).विजातीय विवाह जरी हिंदुधर्मावरील
आपत्ति असली, तरी ब्राह्मो हिंदुसमाजास मुकण्याची आपत्ति त्याहून जास्त
भयंकर होती. म्हणून केसरीनें स्वच्छ सांगितलें कीं, 'दरवाजा खुला करून
घरचीं मुलें घरांत घेतलीं पाहिजेत.'

हिंदुधर्मशास्त्राप्रमाणेंहि केसरीनें बिलावरील आक्षेपांचा विचार केला आहे.
बसुबिलावरील सर्वांत मोठा आक्षेप म्हणजे त्या बिलानें असगोत्रत्वाचें व सवर्ण-
त्वाचें बंधन उल्लंघिलें हा होय. पण हिंदुधर्मांतील इतर बंधनें न पाळणारे लोक
हिंदुसमाजांत पुष्कळ आहेत, व अशा लोकांस हिंदुधर्म कांहीं सोडावा लागत
नाहीं. 'हिंदुजातींतील बहुमतास संमत तें हिंदुत्व हें उघड आहे. या दृष्टीनें
'पाहातां आज विधवाविवाह, मांसभक्षण, मद्यपान याहि गोष्टी अहिंदुत्वदर्शकच
'नाहींत काय? व हें जर खरें तर ना. बसू यांच्या बिलास विरोध करणाऱ्या
'कित्येक लोकांस...हिंदुसमाजांतून हद्दपार करावयास पाहिजे.' (के.८-८-११).
'सुधारक झाले तरी त्यांस हिंदुसमाजांत होता होईतों नांदूं देण्यास कोणीं हर-
'कत घेण्याचें कारण नाहीं. आमच्या धर्मांत पतित झाले तरी ते आमचेच
'आहेत. राष्ट्रीयदृष्ट्या हिंदु इसम पतित व बहिष्कृत झाला तरी तो हिंदूच
'राहाणार. बहिष्कृत असूनहि समाजांत तो राहील तर पुढेंमागें शुद्ध होईल. किंवा
'त्याच्या पुढच्या पिढ्या शुद्ध होतील. पण जो हिंदुधर्म म्हणजे अर्थात् हिंदुसमाज
'या दोहोंना सोडून गेला तो कायमचा गेला हें विसरतां कामा नये.' (कित्ता).

पुढें १९१८ सालीं पटेल बिलासंबंधीं लिहितांना हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें विवाह
हा संस्कार आहे, करार नाहीं. पटेलबिल पास झाल्यास विवाहास कराराचें
स्वरूप येईल व धार्मिक आचारांचा लोप होईल असा आक्षेप बिलावर केसरीनें
घेतला. दुसरा आक्षेप असा कीं, 'पटेलबिलानें उद्वहेत् द्विजो भार्यां...सवर्णां...
'असमानार्षगोत्रजाम्। ह्या वचनांतील निर्बंधाचें उल्लंघन होणार. हे निर्बंध
'महाभारताच्या शेवटच्या काळापासून ब्राह्मण, क्षत्रिय पाळीत आहेत. सगोत्र
'विवाह धर्मशास्त्रानें निषिद्ध मानला आहे. वैद्यकशास्त्राप्रमाणें सुद्धां अशा
'विवाहानें आनुवंशिक रोग फैलावतात. सगोत्र, सप्रवर पतिपत्नींचा विवाह
'शास्त्राप्रमाणें भयंकर आपत्ति आहे. असा विवाह चुकून झाल्यास पतीनें जन्मभर
'पत्नीचें कन्येप्रमाणें पालन करावें अशी शास्त्राची आज्ञा आहे. पटेलबिलामुळें
'सगोत्रविवाह हिंदुसमाजावर कायद्यानें लादले जाणार अशी भीति केसरीस

'पडली; व म्हणून केसरीनें लिहलें कीं, व्यक्तिस्वातंत्र्य ज्याचें त्यानें पाहिजे तर
'आपल्या व्यक्तीपुरतें वापरावें. पण हें त्याला स्वातंत्र्य आहे म्हणून त्या स्वातंत्र्या-
'चे परिणाम धर्मशास्त्रानुसार वागणाऱ्या आपल्या दुसऱ्या बांधवावर लादणें
'कधींहि न्याय्य मानलें जाणार नाहीं.' ( १७-९-१८ ).

पटेलबिलानें असवर्णविवाह कायदेशीर ठरणार व मग वर्णसंकर होणार असा आक्षेप केसरीनें घेतला. प्रतिलोमविवाह हिंदुधर्मशास्त्रास मान्य नाहीं, व प्रतिलोमज संतति शास्त्रानें चांडाळ मानिली आहे. 'अनार्य पुरुष व आर्य स्त्री असा 'वर्णसंकर कोणत्याहि दृष्टीनें म्हणजे मनुष्यशास्त्राच्या किंवा समाजशास्त्राच्या 'दृष्टीनें इष्ट नाहीं.' (१०-१२-१८); पण पटेलबिलाखालीं झालेल्या विवाहाच्या 'संततीची इच्छा वरिष्ठ जातींत जाण्याची असणार व त्यामुळें समाजांत घोटाळा 'माजणार, हिंदुधर्मास व कायद्यास अमान्य अशी उलथापालथ दायविभागांत 'घडून येणार' अशी भीति केसरीस पडली. अशी संतति फक्त आपल्या बापासच वारस ठरणार नाहीं तर बापाचे नातलग, चुलते, आजा वगैरेस वारस ठरणार. हें हिंदु दायविभागाच्या तत्त्वास विरुद्ध होतें; व म्हणून केसरीनें श्री. दादासाहेब खापर्डे यांची उपसूचना–असवर्ण विवाहितास व त्यांच्या संततीस पूर्वजांच्या दृष्टीनें वारसा किंवा धार्मिक व सामाजिक हक्क राहूं नये–ही मान्य केली.

अनुलोम विवाहानेंहि संततीच्या जातीचा व वर्णाचा प्रश्न उत्पन्न होईल. अनुलोम विवाहास जरी शास्त्रानें परवानगी दिली असली तरी तो विवाह 'कामचार'च मानिला आहे. अशा विवाहानें होणाऱ्या संततीस पित्याची उच्च जात प्राप्त होत नाहीं तर मातेच्या जातीपेक्षां उच्च व पित्याच्या जातिपेक्षां कनिष्ठ अशा एका मधल्या जातींत ह्या संततीची गणना शास्त्रानें केली आहे. म्हणून केसरीनें सुचविलें कीं, अशा संततीची मिश्र जात ठरविणारें नवें कलम बिलांत घालावें.

पटेलबिलानें जरी विजातीय विवाह कायदेशीर ठरविले तरी समाजाची मान्यता त्यांना मिळणार नाहीं. शास्त्राप्रमाणें कऱ्हाडे, कोंकणस्थ, देशस्थ ह्या पोटजातींत विवाह करण्यास कांहीं हरकत नाहीं; पण समाज ह्या पोटजातीसुद्धां मोडण्यास तयार नाहीं; मग जाति कशा मोडणार ? पटेलबिलामुळें जुन्या जाति मोडण्याऐवजीं नव्या जाति मात्र निर्माण होतील असा इषारा केसरीनें दिला.

वसुबिलावर लिहितांना केसरीनें जी हिंदुसंघटणाची दृष्टि ठेविली होती त्याच दृष्टीनें केसरीनें २७ सालीं खानपाणंदीकर विवाहाचा निषेध केला. १९११ सालीं हिंदुसंघटनेच्या चळवळीचें नांवहि नव्हतें. त्यामुळें १९११त केसरीच्या लिहिण्यांत तसा स्पष्ट उल्लेख येत नाहीं, पण १९२७ सालीं हिंदुसंघटनाची चळवळ जोमानें चालली होती, व म्हणून केसरीनेंहि हिंदुसंघटनाच्या दृष्टीनें फार स्पष्टपणें मुसलमान गृहस्थावरोबर विवाह करणाऱ्या मालिनीबाई पाणंदीकरांचा निषेध केला आहे. 'व्यक्तिस्वातंत्र्य कीं समाजोन्नति' ( १६-७-२७) ह्या लेखांत

ज्ञानप्रकाशादि सुधारक वर्तमानपत्रांनीं ह्या विवाहाचें अभिनंदन करण्यांत कशी चूक केली आहे हें स्पष्ट दाखविलें आहे. ज्ञानप्रकाशकारांनीं व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वावर प्रस्तुत विवाहाचें समर्थन केलें. त्यांच्या मतें राजकीयदृष्ट्या हिंदु-संघटनापेक्षां हिंदुमुसलमानसंघटन ज्यास्त श्रेयस्कर, व म्हणून खान-पाणंदीकर विवाह अभिनंदनीय होय. प्रथम पोटजातींचें एकीकरण, नंतर जातींचे एकीकरण व शेवटीं भिन्नधर्मीयांचें एकीकरण ह्या त्यांच्या मतें राष्ट्रीय विकासाच्या पायऱ्या होत.

वर सांगितलेल्या लेखांत केसरीनें हे तिन्ही मुद्दे खोडून काढिले आहेत.(१) सुधारकांच्या वागणुकीला कांहीं धरबंद नाहीं, व त्यांनीं व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वाचा अनर्थ केला आहे. ' स्वातंत्र्य म्हणजे बंधनाभाव किंवा नियमनाभाव ' नव्हे. तर योग्य व समाजोन्नतिकारक नियमांची उभारणी व अयोग्य अशा ' समाजघातक नियमांची संहारणी. ' ( १२-७-२७ ). ' सुधारणा म्हणजे बेबंद-' शाही किंवा स्वेच्छाचारी वर्तन नव्हे. समाजाला बंधन व नियमन अवश्य ' पाहिजे. त्यांवाचून समाज उन्मार्गगामी होऊन त्याची वाताहात होईल. बंधनें ' किंवा नियमनें हीं परिस्थितीच्या बदलामुळें बदलावीं लागतात. तीं बदलणें ' म्हणजे सुधारणा. ' (कित्ता) (२) हिंदुमुसलमान संघटनाविषयीं ज्ञान-प्रकाशकारांची कल्पना विकृत आहे, असें केसरीनें सांगितलें. ' हिंदुसंघटन म्हणजे ' अनिर्बंध स्थितीनें होणारा गोलंकार, आणि हिंदुमुसलमान संघटन म्हणजे ' शिवाशिव न हिंदुर्न यवनः ' अशी खिचडी होणें असाच त्यांचा ( ज्ञानप्रकाश-कारांचा ) अर्थ दिसतो. ' (१२-७-२७). (३) समाजविकासाच्या तीन पायऱ्या ठरविण्यांतहि ज्ञानप्रकाशकारांनीं चूक केली आहे. समाज अनुभव घेत घेत पाऊल टाकीत असतो. अनुलोमाविवाहापासून होणारे अनर्थ ध्यानांत आल्यावर ते बंदच झाले. ' शिवाय या तीन पायऱ्या निश्चित आहेत असें गृहीत धरलें तरीहि ' आजच एकदम उडी मारण्यानेंहि फायदा नसून नुकसानच आहे. ' पुढें हिंदी-भाषा राष्ट्रीयभाषा होणार म्हणून आजच मराठीचा नाश करणें, मराठीचीं पुस्तकें समुद्रांत बुडविणें हें मूर्खपणाचेंच नव्हे पण आत्मघातकीपणाचेंहि लक्षण ठरेल.

विजातीय विवाहावर केसरीनें जे लेख लिहिले आहेत, त्याचा थोडक्यांत निष्कर्ष असा सांगतां येईल कीं, ज्या विजातीय विवाहामुळें हिंदुसमाजाचें सामर्थ्य वाढेल, हिंदुसंघटन दृढतर होईल तेवढेंच विजातीय विवाह मान्य करावे. हिंदु-समाजांत सुधारणा करणें म्हणजे काय ह्याचा अर्थ केसरीनें ' व्यक्तिस्वातंत्र्य कीं समाजोन्नति ' ह्या लेखांत सांगितला आहे. केसरीच्या मतें ' हिंदुसमाजास उप-योग होईल ती सुधारणा. ' सध्यां हिंदुसमाजाला वाईट दिवस आले आहेत, समाजरूपी वृक्ष आंतून पोंखरला गेला आहे, व त्याच्या शाखा शुष्क होऊन गळून पडण्याच्या बेतांत आहेत, अशा स्थितींत केसरीचें लिहिणें दूरदर्शीपणाचें व समाजाच्या हिताचें आहे, यांत बिलकुल शंका नाहीं.

# महाराष्ट्र-इतिहासविषयक कामगिरी

[ श्री. दिनकर विनायक काळे, एम्. ए. ]

१. **विषयाची मांडणी**—वर दिलेल्या मथळ्याला साजेशी विषयाची मांडणी दोन तऱ्हांनीं करितां येणें शक्य आहे. म्हणजे विषयाचा संपूर्ण परामर्श घेतांना त्याचे दोन भाग पाडण्यासारखे आहेत. एका भागांत केसरीमध्यें येऊन गेलेल्या ऐतिहासिक महत्त्वाच्या लेखांची, पत्रव्यवहाराची व माहितीची कमी-अधिक विस्तारानें कल्पना आणून द्यावी लागेल. अशीं सर्व प्रकरणें बहुधा इतिहासाच्या मुख्य मुख्य कालखंडांच्या अनुरोधानें वर्गवारीनें व्यवस्थित लावणें अर्थातच शक्य आहे. तशीं तीं लावून झालीं म्हणजे त्यांचा निरनिराळ्या दृष्टीनें उपयोग करतां येण्यासारखा आहे; तो असाः (१) लेख प्रसिद्ध होण्याच्या कालीं उपलब्ध ऐतिहासिक ज्ञानामध्यें त्यांनीं काय भर घातली ही एक अभ्यासाची बाब आहे, ( २ ) लेखकांबद्दलहि कांहीं मनोरंजक माहिती या अभ्यासावरून मिळवितां येईल, ( ३ ) सामान्यतः ज्या विषयांवर चर्चा होऊन गेली त्या विषयांच्या बाबतींतील मतप्रदर्शनाचा महाराष्ट्रीय विद्वानांचा दर्जा किंवा अधिकार, याबद्दलहि कांहीं साधार विधानें करतां येतील, ( ४ ) लेखकवर्गाचा वैयक्तिक विचार सोडून देऊन इतिहास–लेखन हा प्रश्न शुद्ध स्वरूपांतहि विचारांत घेण्यास हरकत नाहीं. त्याचीं साधनें, उत्क्रांति व गेल्या पन्नास वर्षांतील प्रगति असाहि एक महत्त्वाचा विभाग सजविण्यासारखा नजरेसमोर उभा राहतो.

ह्यांपैकीं सर्वच किंवा कांहीं तऱ्हांनीं विचार करण्यांत केसरीचा संबंध फारसा येत नाहीं. इतक्या नानाविध लेखांचा संग्रह करणारें पत्र या दृष्टीनें त्याच्या महत्त्वाकडे लक्ष वेधावें तसें वेधत नाहीं. केसरीची कामगिरी विचारांत घेण्याच्या ऐवजीं निरनिराळ्या लेखकांचीच कामगिरी विचारांत घेतल्यासारखें होतें. वरील विचारसरणीनें केसरी आणि त्यांतील लेख यांचा जिव्हाळ्याच्या संबंध नजरेआड होतो.

यासाठीं दुसऱ्या प्रकारची दृष्टि स्वीकारून केसरीविषयक विवेचनाला प्रामुख्य दिल्याशिवाय हा विषय यथार्थ व्हावयाचा नाहीं. केसरी हें एक इतरांसारखें वर्तमानपत्र आहे. असें असतांना त्याच्या जुबिलीनिमित्त गौरवपर लेख लिहून देण्याचा विचार करतांना 'केसरीची महाराष्ट्र-इतिहासविषयक कामगिरी' हाच विषय मनापुढें उभा राहिला. लेखकाची वैयक्तिक आवड हें ह्याचें एक कारण असूं शकेल नाहीं असें नाहीं. परंतु केवळ वैयक्तिक कलापेक्षां ह्या निवडीला

अधिक प्रबळ कारणें आहेत हें या पुढच्या विवेचनावरून स्पष्ट होणार आहे. प्रस्तुत लेखकानें इतिहासाचा—महाराष्ट्रेतिहासाचा अभ्यास सुरू करितांना त्या बाबतींतील वाचनीय ग्रंथांची यादी बनविली. त्या यादींत केसरीच्या फाइलांचा समावेश झाला पाहिजे आणि त्यांच्या अभावीं अभ्यासांत पूर्तता येऊं शकत नाहीं असें अल्पावधींतच त्याला दिसून आलें.

केसरीकारांची इतिहासविषयक विचाराची भूमिका कांहींशी त्यांनीं लिहिलेल्या काणेकृत लॉर्ड बेकनच्या चरित्राच्या परीक्षणांत पहिल्यानें दिसून आली. हें परीक्षण १ फेब्रुवारी १८८१ च्या अंकांत आलें आहे. एप्रिल १९ तारखेस पत्रव्यवहाराला उत्तरें देण्याच्या रकान्यांत 'One of your readers' अशा टोपण नांवाच्या गृहस्थाला—'सवाई माधवरावांच्या जन्मसंशयासंबंधाची चर्चा एकादे खेपेस करूं' असें आश्वासन दिलेलें आढळतें. यावरून मूळ विचारणाराच्या शंकेचें स्वरूप व केसरीकारांची तयारी यांची थोडीबहुत कल्पना येते. 'राजगुरु दादोजी कोंडदेव व छत्रपति शिवाजी महाराज' ह्या श्री. नागेश विनायक बापट यांच्या पुस्तकाची पोंचहि आली. त्यावर विस्तृत अभिप्राय क्रमशः देण्याचें अभिवचनहि दिलें गेलें. (मे १८९२). राजकीय मतांना पुष्टिदायक मजकूर लिहितां येण्याला निमित्त म्हणून केसरीनें ऑगस्टांत 'मल्हारराव गायकवाडांचा खरा इतिहास' याचें विस्तृत पुस्तकपरीक्षण सुरू केलें. लेखकाचीं सर्वच मतें अर्थात् केसरीला मान्य होण्यासारखीं नव्हतीं. पण 'अशा प्रकारचा ग्रंथ मराठी भाषेंतला पहिलाच आहे' असा त्यानें त्याचा गौरव केला आहे.

केसरींत इतिहास प्रत्यक्ष चमकला नाहीं. तथापि केसरीच्या चालनेमुळें इतिहासासारख्या किंवा तदनुषंगिक—तत्प्रेरक भावनांना व स्वस्थितिविषयक विचारांना महाराष्ट्रीय समाजांत तोंड फुटूं लागल्याचें चिन्ह १८८५ त प्रथम दिसतें. १७।२।८५ च्या अंकांत '[रायगड] समाधिशतावली'ची पोंच आली आहे. ह्या शतावलींत समाधीच्या दुःस्थितीचें वर्णन देऊन ती दूर करावी, म्हणून रानडे, तेलंग, केसरीकार यांना विनंति केली आहे. तसेंच अगदीं आजपर्यंत इतिहाससंशोधकांना सतावीत असलेला 'पुणें दफ्तर सरकार छापील काय?' हा प्रश्न ज्ञानप्रकाशकारांनीं दोन लेख लिहून चर्चिला, त्यावर (३-३-८५) केसरीनें दूरदर्शीपणानें स्वतःचा अभिप्राय एक स्फुट लिहून दिला आहे. केसरी म्हणतो, 'आम्हींहि यासंबंधानें थोडेसे हातपाय हालविले असते, पण त्यापासून 'फारसा फायदा होणार नाहीं असें वाटतें. असल्या विचारांची चळवळ इंग्रजी भाषेंत 'झाली तर सरकारच्या कानावर अधिक लवकर जाण्याचा संभव. केवळ वर्तमान-'पत्रांनीं हें काम होणारें नाहीं. सार्वजनिक ॲसोसिएशन् स्थापून न कंटाळतां त्यांनीं 'वर्षानुवर्ष पत्रव्यवहार केला पाहिजे.'

के. प्र. २—१३

यानंतर चार साडेचार महिन्यांनीं संपादकांची नजर खुद्द इतिहासलेखनाकडे वळल्याचें दिसतें. ता. २१ व २८ जुलै अशा दोन अंकांमिळून 'हिंदुस्थानच्या इतिहासाची अनास्था' केसरीकारांनीं उघड केली आहे. इंग्रजी शिक्षणानें आपल्यामध्यें इतिहासज्ञ पदवीधर निर्माण होत आहेत. आणि इतिहासाचीं बखरी आदिकरून साधनेंहि काव्येतिहाससंग्रहकार, विविधज्ञानविस्तार यांचे मार्फत पुढें येत आहेत. तेव्हां आतां स्वभाषेंत इतिहासलेखनाचे स्वतंत्र प्रयत्न करण्याची वेळ आली आहे. असा या लेखांचा मथितार्थ आहे. कीर्तने, भांडारकर, देव इत्यादिकांचे प्रयत्न बरे असले तरी ते बरेच एकदेशी आहेत असा शेरा देऊन अनास्थेचें सर्वांत महत्त्वाचें कारण म्हणून 'आमच्या तरुण इतिहासज्ञांस मराठी भाषेचा तिटकारा आहे' असें त्यांत सांगितलें आहे. महाराष्ट्रभाषाप्रिय माणसें आहेत त्यांनीं प्रयत्न करावा तर मराठींत वाचकहि नाहींत. अशा परिस्थितींत आमच्या लोकांनीं स्वाभिमानानें व सरकारनें द्रव्यद्वारा वगैरे साहाय्य करून या विषयावर वाङ्मय निर्माण होण्याची व्यवस्था केली पाहिजे असें त्यांनीं आपलें मत दिलें आहे. राजवाडे इत्यादि इतिहासाचार्यांच्या मनावर वरील कांहीं विचारांचा पगडा बसला असल्यास नवल नाहीं. या लेखाच्या दुसऱ्या विभागांत नवीन इतिहासाचें साधारण स्वरूप कसें असावें याबद्दल लॉर्ड बोलिंगब्रोकच्या आधारें केसरीकारांनीं चर्चा केली आहे.

केसरी स्वमतप्रसारार्थ नेहमीं जागरूक असे. शिवाजीमहाराजांच्या समाधीबद्दल लॉर्ड रे-च्या कारकीर्दींत पब्लिक वर्क्स खात्याकडून दुरुस्ती व्हावी असा हुकूम झाला त्याबद्दल आनंद प्रदर्शित करण्याकरितां (१५-१२-८५) व औरंगाबाद येथील औरंगजेबाच्या मुलीचें थडगें दुरुस्त करण्यासाठीं निजाम सरकारनें २० हजार रुपये दिले ही बातमी सांगतांना 'शिवाजीमहाराजांच्या छत्रीसाठीं कोणीं संस्थानिकानें मोठी देणगी कां देऊं नये?' (१२-१-८६) असा खेदकारक प्रश्न काढून केसरीनें इतिहासाचें स्मरण दिलें. ता. १३-४-८६च्या अंकांत पहिले इतिहासविवेचक कै. नीळकंठ जनार्दन कीर्तने ह्यांच्या ग्रांट डफवरील टीकेचा खरपूस समाचार केसरीकारांनीं घेतला आहे.

केसरीकारांनीं व्यापक राष्ट्रजागृतीची कामगिरी आपल्याकडे घेतली होती. त्यामुळें इतिहास–महाराष्ट्रेतिहास किंवा भारतेतिहास या विषयालाच प्राधान्य देण्याची त्यांना प्रथम प्रथम आवश्यकता वाटली नाहीं, परंतु केसरीचें धोरण सर्वसंग्राहक असल्यामुळें इतिहासविषयक चर्चेला व इतरांच्या लेखांना त्यांत पुरेसा वाव योग्य वेळीं व प्रसंगीं मिळावा अशा प्रकारची प्रवृत्ति येथपर्यंतच्या अवधींतहि दिसूं लागली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कीर्तने, रानडे, पारसनीस, आठल्ये, राजवाडे, पांगारकर, खरे, पाठक, अभ्यंकर, भट, भानू इत्यादि नाणावलेल्या इतिहासाभ्यासकांना केसरींत यापुढें फार उदारपणें स्थान मिळालें.

ज्याला ऐतिहासिक महत्त्वाच्या विषयावरील साधक अनुकूल लेख असें म्हणतां येईल असा पहिला अग्रलेख ८ जुलै १८९० च्या अंकांत आला. ' पोवाड्यांची किंमत आम्हीं ओळखली आहे काय ! ' हा मथळाच अस्तिपक्षीं आस्था दर्शवितो. ॲक्वर्थ व शालिग्राम ह्यांचें पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वीचा हा लेख आहे. ॲक्वर्थनीं मुंबई येथें मानवजातिमीमांसक मंडळीपुढें शालिग्राम यांनीं खटपट करून जमविलेल्या पोवाड्यांवर निबंध वाचला. त्या सभेची गौरवपूर्ण हकीकत या लेखांत दिलेली आहे. यांत पोवाड्यांच्या उपयुक्ततेचें वर्णन केलें आहे हें सांगण्याची अर्थात् आवश्यकता नाहींच. शिवाजी महाराजांच्या कालापासून मराठ्यांच्या इतिहासाचें विहंगमावलोकन करून, वेळोवेळीं मराठ्यांनीं प्रगट केलेल्या वीरश्रीचें यथार्थ स्वरूप पोवाड्यांतच पहावयास मिळतें असें सप्रमाण विधान केसरीनें या लेखांत केलें आहे. केसरीकार म्हणतात 'वाचकहो ! क्लीबासहि ' मर्दांनी आवेश आणणारे ते पोवाडे कोठें आहेत !... आपण त्यांचा जीर्णोद्धार ' करण्याचे कामीं उदासीन राहून मि. ॲक्वर्थसाहेबांसारखा एक युरोपिअन ' मिळतील तितक्या असल्या कविता छापण्याचें मनावर घेतो यांची तुम्हांस कशी ' लाज वाटत नाहीं ?' पुढें ' अजूनहि आपण निराशेच्या दुसऱ्या टोंकाला जाऊन ' पोंचलों नाहीं,' ( ८-७-९० ) असें आश्वासन देतांना केसरीकारांनीं वरील सभेची हकीकत बरीच रसवंत केली आहे. समारोपादाखल ते म्हणतात ' सरते- ' शेवटीं आम्हांस सांगावयाचें म्हणून एवढेंच आहे कीं आपल्या उदरनिर्वाहासाठीं ' अवश्य श्रम संपल्यावर आपल्या पाठीमागील पिढ्यांचा इतिहास मिळविण्या- ' चा ज्यांना हव्यास असेल त्यांनीं शोध करून कोनाकोपऱ्यांत कीटकांच्या ' भक्ष्यस्थानीं पडलेल्या बखरी व मुख्यतः कवनें, वाण्याच्या घरांत रद्दीचें स्वरूप ' धारण करून बसलेले महत्त्वाचे कागद, भाट गोंधळी, हरदास इत्यादिकांकडून ' मिळण्यासारखीं असतील तेवढीं कवनें व आख्यायिका अशा चिजा मिळवून त्या ' अल्प किंमतींत लोकांस जर वाचावयास दिल्या तर जनसमूहाचें रंजन होऊन ' त्यांस वाचनाची गोडी लागेल आणि हळूहळू पाश्चात्य तत्त्वांवर जे आपल्यास ' आपला देश, काल, वर्तमान पाहून फेरफार करावयाचे आहेत त्यांच्या परि- ' पाकार्थ या जनसमूहाची बरीच मदत आपल्यास होईल...पुनः एकदां प्रार्थना ' कीं त्यांनीं पूर्वकालीन गोष्टींची कांहीं तरी माहिती जनसमूहास देण्याचा प्रयत्न ' करावा.' मागील पिढ्यांचा इतिहास मिळविण्याचीं साधनें कोणतीं यांबद्दल केसरीकारांची यथार्थ कल्पना या उताऱ्यावरून स्पष्ट होते. हीं साधनें लोकांच्या आटोक्यांत आणून देण्यानें इतिहासज्ञानाचा फैलाव होईल हें उघड असलें तथापि केसरीकारांना ही संधि सामान्य लोकशिक्षणाचीच एक पर्वणी वाटते. देशस्थिति सुधारून तींत बदल करण्याला अनुकूल अशी मनःस्थिति निर्माण करण्याचें महत्त्वाचें काम करून घेण्यासाठीं केसरीकार प्रत्येक गोष्टीचा कसा

उपयोग करून घेऊं इच्छितात याचा उत्तम दाखला या उताऱ्यांत मिळतो. व केसरीचें इतिहासावरील लक्ष कोणत्या स्वरूपाचें होतें याचीहि या योगानें चांगली कल्पना येते.

'ऐतिहासिक पोवाड्यां'च्याच विषयावर पुढच्या वर्षांत दुसरा एक अग्रलेख आला. (ता. ८-९-१८९१). ॲक्वर्थ व शाळिग्राम यांचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतरचा हा लेख आहे. या लेखाची स्फूर्ति शास्त्रप्रवण नसून भावनाप्रधान आहे. याहि वेळीं हिंदी इतिहासाचें पर्यालोचन करून, मुसलमानी राज्याच्या जुलमाची लाट थांबविण्याचा प्रयत्न करणाऱ्या शीख, रजपूत व मराठे या तिन्ही राष्ट्रांचा यथोचित गौरव केला आहे. परंतु इतरांना अनुल्लंघ्य ठरलेली लाट मागें हटविण्याचे कामीं मराठ्यांनाच यश आलें यावरून अशा प्रकारचें यश मिळविण्यासाठीं आवश्यक असणारे गुण मराठ्यांतच आढळून आले याबद्दल समाधान व्यक्त केलें आहे. महाराष्ट्रीयांना अभिमान उत्पन्न करणारा हा निष्कर्ष सर्व इतिहासज्ञांना मान्य होणारा असाच आहे यांत शंका नाहीं.

व्यापक पुस्तकांमध्यें संकलनात्मक पुस्तकांचें लौकिक दृष्ट्या महत्त्व केसरी-कारांच्या नजरेसमोर होतें. त्यांच्या खालील वाक्यावरून कोणाहि मेहनती अभ्यासकाला कार्याची एक दिशा सुचण्यासारखी होती. ते म्हणतात, 'काव्ये-'तिहाससंग्रहांत कांहीं बखरी आहेत. पण त्यांचें एकत्र संकलन करून व्यवस्थित 'ग्रंथ लिहिण्याची जोखीम कोणी शिरावर घेऊं इच्छित नाहीं.' ह्याच विचारानें त्यांचे त्या सालांतील मुख्यत्वेंकरून परीक्षणात्मक लेख रंगलेले आहेत. श्री. मुरलीधर मल्हारराव अत्रे यांचें 'सुभेदार मल्हारराव होळकर' यांचें चरित्र व त्याच सालीं प्रसिद्ध झालेलें 'झांशीच्या राणीचें चरित्र' यांचा गौरव करतांना 'तें पुस्तक कोणत्याहि पुस्तकाचें भाषांतर नाहीं, स्वतंत्र लिखाण आहे,' हाच त्याचा विशेष म्हणून सांगितला आहे.

१८९४ च्या मे महिन्यांत भाषांतरित पुस्तकांबद्दलची अप्रियता सकारण प्रदर्शित करण्याची केसरीला चांगली संधी मिळाली. मिव्हंटर यांनीं संपादिलेली 'हिंदुस्थानचे राज्यकर्ते' ही माला प्रसिद्ध आहे. तिचें 'खरोखर भाषांतर करूं इच्छिणाऱ्यांना परवानगी पाहिजे असल्यास मिळूं शकेल' असें जाहीर झालें होतें. त्यावर एका स्फुटांत केसरीनें आपला अभिप्राय दिला. 'त्या ग्रंथांचीं 'अस्सलबरहुकूम झालेलीं भाषांतरें खरा प्रकार लोकांच्या नजरेस आणण्यास 'कितपत उपयोगी पडतील याची आम्हांस बरीच शंका आहे....त्या मालेंतील 'लॉर्ड डलहौसी व महादजी शिंदे यांचीं वर्णनें इंग्रजी राज्यास शोभतील अशींच 'लेखक देतात, हें बहुतेक अभ्यासी लोकांस माहीत आहे. तेव्हां अशा एकतर्फी 'ग्रंथांचीं निव्वळ भाषांतरें करण्यापेक्षां थोडीशी मेहनत घेऊन स्वतंत्रच ग्रंथ 'निर्माण केल्यानें अधिक फायदा होईल,' असा त्यांचा रोख आहे. मि. कीन

यांनीं लिहिलेलें महादजी शिंदे यांचें चरित्र त्यांजपुढें होतेंच. त्याची ऑन. रा. नातू यांनीं लिहिलेल्या चरित्राशीं त्यांनीं तुलना करून पहाण्याची केसरीनें शिफारस करून शेवटीं ' आपल्या देशाचा इतिहास आपण वाचला पाहिजे एवढेंच ' नव्हे तर तो आपण लिहिलाहि पाहिजे, एरवीं बारीक सारीक गोष्टींतील ' हकीकत आपल्या मताप्रमाणें अगर आपल्या तर्फेची कधींहि प्रसिद्धीस येत नाहीं. ' युरोपांतील मोठ्या राष्ट्रांतील लोक स्वदेशाच्या इतिहासाकरितां परकीयांच्या ' तोंडाकडे पहात नाहींत यांतील बीजहि हेंच होय' असें सुचविलें आहे. जून ५ च्या अंकापासून ' नाना व महादजी ' ही प्रो. भानूंची लेखमाला अग्रलेखांत येऊं लागली. श्री. खरे यांचें नाना फडणिसांचें चरित्र व त्यानंतर बरेच दिवसांनीं प्रसिद्ध झालेले ऑन. रा० विष्णु रघुनाथ नातू, बेळगांवचे वकील, यांचें महादजी शिंद्यांचें चरित्र या दोन महत्त्वाच्या व समकालीन आणि कांहीं अंशीं प्रतिस्पर्धी थोर पुरुषांच्या चरित्रांच्या अनुरोधानें ही बारा लेखांची माला ऑगस्टपर्यंत प्रसिद्ध होत होती. अगदीं पहिल्या लेखांत महाराष्ट्रांतील इतिहासलेखनाची प्रगति कीर्तन्यांच्या निबंधापासून अलीकडे प्रसिद्ध होणाऱ्या स्वतंत्र चरित्रांपर्यंतचीं साथ नमूद करून त्यामुळें जगमान्य झालेल्या नरपुंगवांच्या पंक्तीस बसणारे असे आपल्या देशांतहि कित्येक थोर लोक होऊन गेले हें लोकांना समजण्याचें साधन उत्पन्न झाल्याचा संतोष व्यक्त केला आहे. हाच विचार घोळून घोळून पुनःपुनः या मालेंत येऊन गेला आहे. हें केसरीच्या परंपरेला आणि मुख्य कार्याला साजेसेंच आहे. चरित्रग्रंथ लोकांच्या पुढेंच असल्यामुळें त्यांतील गोष्टी तपशीलवार देण्याचें रहित करून या उभय वीर मुत्सद्द्यांच्या कृति व अपकृति ह्यांचा परिणाम महाराष्ट्राच्या इतिहासावर काय झाला हें अजमावून पहाण्याचें वचन पहिल्याच लेखांत दिलें आहे. ' नाना आणि महादजी ' ही लेखमाला स्वतंत्र पुस्तकरूपानें अभ्यासकांना अवगत असल्यामुळें तिचा विस्तार येथें करीत नाहीं. या लेखांत विशेषतः नाना फडणिसांची तरफदारी केली गेली असा वाचकांचा गैरसमज झाल्याचा पुरावा तत्कालीन केसरींतच पहावयास मिळतो. सुमारें पांच लेख प्रसिद्ध झाल्याबरोबरच मुंबईच्या 'बाम्र' नामक कोणा लेखकानें हे लेख म्हणजे ' ब्राह्मणांच्या कटाचा व जात्यभिमानाचा परिणाम होय ' अशी तक्रार केल्याचें केसरीनें १०-७-९४ च्या स्फुटांत नमूद केलें आहे. पण तसें आपण करीत नाहीं असें केसरीनें आश्वासन देऊन उपसंहारात्मक लेखांत महादजीचे गुण व नाना फडणिसांचे कांहीं दोष दाखविले आहेत असें दिसून येईल.

या लेखमालेशिवाय आणखी एक दोन प्रसंगीं केसरीनें इतिहासाची आठवणीनें वास्तपुस्त केली आहे. मुंबईच्या रॉयल एशिआटिक सोसायटीच्या सभेपुढें मि. कर्केरिया या पारशी गृहस्थांनीं अफझुलखानाच्या वधाबद्दल वाचलेल्या

इंग्रजी निबंधाच्या प्रसंगानें केसरीकारांनीं आपले कांहीं विचार स्फुटांत प्रसिद्ध केले आहेत. ( १-५-९४ ). इंग्रजीवरून स्वभाषेंत इतिहास भाषांतर करून घेण्यासंबंधीं निषेध करण्याची संधी केसरीनें मागें घेतली होती. परंतु या वेळीं स्वभाषेंत महशूर असलेला इतिहास इंग्रजी भाषेंतून परक्यांच्या पुढें मांडण्याची उपयुक्तता त्यांनीं प्रतिपादिली. ‘ मि. कर्केरिया यांनीं मराठी बखरींत या प्रसंगाचें ‘ जें वर्णन आलें आहे त्याचें भाषांतर करून मांडलें हे त्यांचे मोठे उपकार आहेत. ‘ मराठींत असलेल्या इतिहासाच्या दुसऱ्या पुष्कळ गोष्टी अशा रीतीनें इंग्रजांच्या ‘ नजरेस आणणें जरूर आहे. तें काम करण्याकडे आपल्या विद्वानांची जर जास्त ‘ जास्त प्रवृत्ति होत जाईल तर देशहिताचें एक मोठेंच काम बजाविल्यासारखें ‘ होणार आहे. त्या योगानें केवळ मराठी इतिहासाच्या दृष्टीनें विचार पुढें मांडले ‘ जाऊन आपल्या लोकांचा हुरूप व उत्साह वाढल्याशिवाय रहाणार नाहीं.’

**२. केसरीकर्ते आखाड्यांत उतरलेः**—१८९५ च्या मार्चच्या सुमारास रायगड येथील महाराजांच्या छत्रीची अनास्था समक्ष पाहिल्यावरून विषण्ण झालेल्या एका गृहस्थाचें पत्र ‘नेटिव्ह ओपिनिअन’ मध्यें प्रसिद्ध झालें. त्याबद्दल २३-४-९५ च्या अंकांत केसरीनें एक हृदयस्पर्शी स्फुट लिहिलें. त्याचा परिणाम होऊन लगेच पुढच्या अंकांत एका गरीब विद्यार्थ्याचें तळमळीचें पत्र व महाडच्या शिवजन्मोत्सवाच्या खटपटीचें पत्र अशीं प्रसिद्ध झालीं. त्याच वेळीं त्या गरीब विद्यार्थ्याच्या दोन आण्याच्या देणगीचा स्फुटांत गौरवयुक्त उल्लेख करून हे दोन आणे स्मारकफंडाचे आरंभीचे समजून वर्गणी जमा व्हावी म्हणून जाहीर विनंति करण्यांत आली. वाढतां वाढतां पत्रव्यवहारी सहानुभूति अपार वाढून ३० मे-ला श्रीमंत औंधकरांचे अध्यक्षतेखालीं जाहीर सभा होऊन रायगड स्मारक मंडळाची प्राणप्रतिष्ठा झाली. केसरीनें स्फुटांवर स्फुटें लिहून या चळवळीचा पुरस्कार केलेला पाहून कित्येक देशी व इंग्रजी वर्तमानपत्रांनीं विरोध करण्याचा प्रयत्न करून पाहिला. त्यांना उत्तरें देतांना केसरीची चळवळ वाढतच चालली. डिसेंबरपर्यंत १० हजारांवर रक्कम जमून ३१ डिसेंबरला मोठी सभा भरवून टिळकांनीं झालेली हकीकत व आलेलें यश निवेदन केलें. सहा सात महिन्यांतील या दंगलीचे प्रत्यक्षाप्रत्यक्ष अनेक परिणाम झाले. शिवाजी महाराजांची बाजू स्वाभिमानाच्या दृष्टीनें मराठे उचलून धरतात तर त्याला विरोध करणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजून टाइम्स वगैरे इंग्रजी पत्रें सेलसारख्या कुत्सित लेखकाचीं पत्रें छापूं लागलीं. ‘दख्खन समाचार’ सारखे स्वाभिमानशून्य लेखक त्यांची री ओढून आगींत तेल ओतून केसरीकारांचीं व महाराजांच्या भक्तांचीं उत्तरें ओढवून घेऊं लागले. केसरीकारांनींहि रा० ब० रानड्यांसारख्यांनीं लिहिलेल्या शिवाजीविषयक निबंधांचीं स्तुतिस्तोत्रें गाऊन लोकांचें लक्ष त्यांच्याकडे वेधलें. १-१०-९५चे स्फुटांत शिवाजीचें शौर्य व युद्धकौशल्य यांशिवाय राजकारण-

कौशल्य, अष्टप्रधानपद्धति वगैरेंकडे लक्ष दिलें असतां शिवाजी तितकाच श्रेष्ठ ठरतो हें रानड्यांच्या निबंधाच्या आधारें केसरीनें मांडलें. एकंदरींत या खटपटीनें जी खळबळ उडाली, तिचा प्रतिध्वनि वाङ्मयांतहि ऐकूं आला. एका प्रवाशानें राजगड व तोरणा या ऐतिहासिक किल्ल्यांची तीन चार अंकांत वर्णनें दिलीं (जुलै, आगस्ट). तट्टू नांवाच्या गृहस्थानें राज्याभिषेक-भूमीप्रमाणेंच जन्मभूमीचा उत्सवविषयक व जीर्णोद्धारार्थ हक्क पुढें मांडला. (११-६-९५). या पंचाण्णव सालच्या चळवळीमुळें शाण्णव सालांतील इतिहासाच्या नव्या प्रवाहाला मार्ग करून दिला असें म्हणावयास हरकत नाहीं. या सर्वांचें चित्त वेधणाऱ्या मुख्य गोष्टीशिवाय १२-३-९५चा मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनच्या कारकीर्दीवरील व ७-५-९५ चा झांशीच्या राणीच्या चरित्रावरील अग्रलेख हे दोन्ही प्रत्यक्ष ऐतिहासिक विषयावरील केसरींतील अग्रलेख जमेस धरले पाहिजेत. मुंबईचे नवे गव्हर्नर लॉर्ड सँढर्स्ट यांनीं आपण एल्फिन्स्टनचा कित्ता गिरवूं असें अभिवचन दिल्यावरून तो कित्ता म्हणजे काय होतें, हें खुलासेवार सांगण्याकरितां पहिला अग्रलेख एल्फिन्स्टनच्या प्रजानुवर्ती धोरणी कारभाराच्या गौरवार्थ लिहिला असून दुसऱ्यामध्यें कै. रा. ब. द. ब. पारसनीस यांच्या 'झांशीच्या राणीच्या चरित्रा'चें अनुकूल परीक्षण केलें आहे.

१८ फेब्रुवारीच्या अंकांत पारसनीसांनीं केसरीला पत्र पाठवून 'शिवछत्रपतींच्या स्मारकासंबधानें दोन गोष्टी' सांगितल्या आहेत. पारसनीसांच्या आवडीचा व्यासंग लक्षांत घेतला म्हणजे त्यांनीं 'शिवछत्रपतींचें खरें स्मारक म्हणजे इतिहासलेखन हेंच होय' असें सांगितल्याचें नवल वाटण्याचें कारण नाहीं. आपल्या कित्येक वर्षांच्या अनुभवाचा निष्कर्षच जणुं काय या जाहीर विनंतींत त्यांनीं मांडिला आहे. शिवचरित्राच्या बाबतींत महाराष्ट्राबाहेरील बंगाली, हिंदी इत्यादि भाषांतील प्रयत्नांबद्दल माहिती देऊन, मुंबईचे कर्केरिया व रा. ब. रानडे यांच्या अगदीं अलीकडील प्रयत्नांचाहि इतिहास त्यांनीं दिला. 'ग्रांटडफच्या 'परकी लेखणींतून शिवाजीचा मोठेपणा थोडा अस्पष्टच उतरला आहे; त्याचें 'स्वकीय लेखकांनीं विशदीकरण करणें' जरूर आहे असा केसरीकारांच्या पद्धतीला अनुसरून सिद्धान्त त्यांनीं शेवटीं प्रतिपादिला आहे. शिवाजी महाराजांचे थॉम्सन आदिकरून चहात्यांची माहिती सांगून अशा स्तुत्य प्रयत्नांची एक दिशा म्हणून 'शिवाजी महाराजांच्या राज्यकारस्थानांचा खरा इतिहास लिहा' असा त्यांनीं यावेळीं कळकळीनें इशारा दिला. पारसनीस म्हणतात 'दुर्दैवानें जरी 'यापुढें अस्सल कागदपत्र मिळण्याचा संभव कमी आहे, तरी जे उपलब्ध होतात 'ते पाहून विस्मयानंद होतो. तेव्हां मिळतील तेवढे कागदपत्र मिळवून इतिहास 'लिहिण्याचें काम करूं लागण्यानेंच महाराजांचें खरें स्मारक होईल.' आमच्या मतें हें पत्र म्हणजे केसरींत नव्यानें प्रचलित होणाऱ्या इतिहासयुगाचें आरंभस्थान

होय. आम्हीं या पत्राला एवढें महत्त्व कां देतों हें स्पष्ट करणें जरूर आहे. पारसनीसां-च्या या पत्रांत प्रदर्शित केलेले विचार किंवा वापरलेली भाषा केसरीच्या वाचकांना अपरिचित होती असें मुळींच नाहीं हें यापूर्वीच्या विवेचनावरून सहज उघड होणारें आहे. परंतु केसरीची आजपर्यंतची भाषा केवळ उत्तेजक होती. खुद्द केसरीकार व्यवसायव्यापृतत्वामुळें स्वतः या तऱ्हेचें कार्य अंगावर घेऊं शकत नव्हते; यामुळें तिची कार्यप्रेरकता तितकी परिणामकारक होण्यासाठीं प्रत्यक्ष कार्यकर्त्याची जरूरी होती. ती पारसनीसांनीं भरून काढली. केसरीकारांना इति-हासविषयक जागृति होणें व्यापक राजकारणाची संपादणी व्हावी या दृष्टीनें महत्त्वाचें वाटत होतें. तर पारसनीसांना केसरीच्या लोकमान्यतेचें पाठबळ आपल्या कार्याला मिळविणें इष्ट वाटत होतें. परस्परांच्या साहाय्याची अपेक्षा करणाऱ्या व पूर्ण अधिकारी अशा दोन शक्ति एकत्र झाल्या आणि त्यामुळेंच काव्येतिहास-संग्रहासारख्या आकुंचित मैदानांत बोजड संचार करणारा अवजड इतिहास लोकप्रिय आणि केसरीसारख्या परिणामकारक साप्ताहिकामध्यें आपला संसार थाटण्यास आनंदानें प्रवृत्त झाला. हें पारसनीसांचें सूचनापत्र प्रसिद्ध झाल्यानंतर सातच दिवसांनीं २५ फेब्रुवारीच्या अंकांत, इतिहासांत अव्वल दर्जाचें साधन म्हणून वर्गीकरण करण्यास हरकत नाहीं अशा स्वरूपाचें पहिलें अस्सल पत्र पारसनीसांच्याच हातून प्रसिद्ध झालें. हें पहिलें पत्र म्हणजे औरंगजेबाचें शिवाजीस पाठविलेलें पत्र होय. या पत्रानें एका नव्या परंपरेला सुरवात झाली. तसें म्हटलें तर ही परंपरा अजीबात नवी नव्हती. परंतु नित्य वाचनांत येणाऱ्या साप्ताहिकानें इतिहास विषयाला स्थान देऊन इतिहासविषयक लोण सामान्य वाचकापर्यंत पोंचविणें ही गोष्ट नवीन होती. एका अर्थानें अनिच्छु अशा लोकांच्या कानावर इतिहास या स्वरूपांत आग्रहानें जाऊन आदळूं लागला. त्याचा व्हावयाचा तो इष्ट परिणामहि लवकरच दिसून आला. इतिहासाभ्यासकांना कोणत्या स्वरूपाचे कागद पाहिजे असतात याची माहिती सर्वत्रांना होऊं लागली आणि संशोधकांचें काम अल्पांशानें तरी सुलभ झालें. कित्येक घरंदाज लोकांनीं केसरींत मानाचें स्थान मिळतें हें पाहून आपले कागदपत्र स्वेच्छेनें प्रसिद्ध केले किंवा प्रसिद्धी-करितां केसरीकारांच्या हवालीं केले. असे अनेक कागदपत्र आणि पत्रव्यवहारद्वारां चर्चा यापुढें केसरींत आलेली आढळते, त्याचा श्रीगणेशा या पत्रानें झाला. शिव-जन्मतिथीच्या वादाचा मूळ उगम जेधे शकावली. ही लोकमान्यांच्या हातांत येण्याचें एक कारण केसरींत अशा तऱ्हेनें इतिहासाला मिळणारें स्थान लोकांच्या प्रत्ययाला आलें हेंच असण्याचा बळकट संभव वाटतो.

अफझुलखान-प्रकरणाचे निमित्तानें शिवचरित्रसाधनें जमविण्याची जाहीर विनंति केसरीनें केली. ता. १० मार्च १८९६ रोजीं लिहिलेल्या स्फुटाचें संपूर्ण स्वरूप लक्षांत घेण्यासारखें आहे. शिवाजी महाराजांनीं अफझुलखानास

विश्वासघातानें मारिलें असा जो त्यांजवर कित्येक इंग्रज ग्रंथकारांनीं आक्षेप घेतला होता त्याचें मि. कर्केरिया यांनीं बखरीच्या आधारें निबंध लिहून खंडण केलेंच होतें. या खंडणास प्रत्युत्तर टाइम्समध्यें लांब लेखांत आलें. त्यांत ' अफजल ' फक्त धरण्यास आला, मारण्यास नाहीं. विश्वासघात धरल्यानें होत नाहीं मारल्यानें ' होतो, इत्यादि ' ही हकीकत देऊन, केसरीकार पुढें लिहितात ' या लेखास ' खरमरीत उत्तर देण्याचा उद्योग चालू आहे. तथापि प्रसंगानुसार आमच्या ' लोकांस एवढी सूचना करणें जरूर आहे कीं ज्या कोणाजवळ **शिवाजीच्या** ' **वेळच्या माहितीचें कागदपत्र असतील त्यांनीं ते प्रसिद्ध करण्यास आतां** ' विलंब करूं नये. पेशवाईच्या वेळच्या माहितीचे बरेच कागदपत्र उपलब्ध झाले ' आहेत. परंतु शिवाजी अगर संभाजी या वेळची माहिती अजून मिळाली नाहीं. ' सभासदांच्या बखरीखेरीज आणखी दोन बखरी प्रसिद्ध झाल्या आहेत; तेव्हां ' अजूनहि माहिती मिळण्यासारखी आहे. ती मिळवून प्रसिद्ध करण्याचें काम ' शिवाजी स्मारकफंड कमिटीनें आपल्याकडे घ्यावें अशी पुष्कळांची सूचना आहे. ' या सूचनेचा कमिटीकडून विचार होईलच. तोंपर्यंत न थांबता लोकांनीं आपणा- ' जवळच्या बखरी व कागदपत्र प्रसिद्ध करावे अशी विनंति आहे. मावळ, रायगड, ' प्रतापगड इत्यादि ठिकाणच्या लोकांनीं ही गोष्ट मनावर घेतली पाहिजे. हें स्फुट प्रत्यक्षच उत्तेजन देणारें आहे.

धडाडीची व सुसूत्र नाहीं ती केसरीची कामगिरीच नव्हे. १० तारखेला जुने लेख प्रसिद्ध करण्याबद्दल जाहीर विनंति करून झाल्यावर लगेच पुढच्याच दोन अंकांत मिळून ' श्रीशिवछत्रपतींच्या कारकीर्दीचीं साधनें ' या नांवाचे दोन संगतवार माहितीनें भरलेले विस्तृत लेख आले आहेत. हे लेख बहुधा पारस-नीसांचे असावे. कोणते लेख प्रसिद्ध करणें इष्ट आहे हें लोकांना समजावें या उद्देशानें हा खटाटोप करण्यांत आला. हे दोन्ही लेख मननपूर्वक वाचण्यासारखे आहेत. यांपैकीं पहिल्याच लेखांत बडोदें येथें प्रसिद्ध शिवदिग्विजय नांवाच्या बखरीच्या पुरातनत्वाबद्दल साधार शंका प्रदर्शित केली होती. तेवढ्यावरूनच बडोद्याच्या एका ' इतिहासप्रिय ' वाचकाशीं वादाचें तोंड लागलें! त्याच्या आक्षेपाला सप्रमाण उत्तर ता. २४ व ३१ मार्च अशा दोन अंकांत एक एक स्फुट लिहून द्यावें लागलें. येथपर्यंत केसरीकार मतप्रदर्शन करून आपलें काम करीत होते. यावेळीं तिथिनिर्णयाच्या—म्हणजे प्रसिद्धीच्या शकाचा निर्णय करण्याच्या—भानगडींत सांपडल्यामुळें त्यांना शास्त्रीय परिभाषेची कांस धरावी लागली व या वेळींहि त्यांनीं आपली बाजू बरोबर मांडतांना आपली शास्त्रीय विचारसरणी लोकांच्या प्रत्ययास आणून दिली. ते म्हणतात ' शिवछत्रपतीं-' बद्दल आम्हांस कितीहि अभिमान असला तरी नवा लेख जुना आहे असें भास-

' विण्याचा आम्हीं प्रयत्न करूं इच्छित नाहीं. श्रीशिवछत्रपतींच्या नांवावर जुनें
' आणि नवें एकाच मापानें लेखण्याची किंवा जुन्याचें नवें व नव्याचें जुनें
' करण्याची आमची इच्छा नाहीं. जुन्या बखरी उपलब्ध असल्यास त्यापेक्षां
' नव्या बखरींची योग्यता पुराव्याच्या कामीं सामान्यतः कमी लेखिली पाहिजे हें
' कोणी पोरहि कबूल करील.' दुसऱ्या स्फुटांत तें म्हणतात, ' आक्षेपकांना असल्या
' ऐतिहासिक गोष्टींची कशी व किती बारकाईनें चौकशी करावी लागते ह्याचा
' गंधहि असल्याचें आढळण्यांत येत नाहीं...ज्यास इतिहासग्रंथांचें सूक्ष्म अव-
' लोकन कसें करावें लागतें हें समजत नाहीं त्यांस आम्हीं कितीहि सांगितलें
' तरी पालथ्या घड्यावर पाणीच.' यांतील इतिहासांत मुरलेल्या व कसलेल्या लेखकाला शोभेशी सरावलेली भाषा पाहिली म्हणजे ऐतिहासिकपद्धति म्हणून जी म्हणतात ती संपादकांच्या सहज अंगवळणीं पडल्यासारखी दिसते.

शिवदिग्विजय बखरीच्या कालावर शं. बा. दीक्षित यांचें सप्रमाण विवरण याच संधींत येऊन गेलें. कांहीं सनदापत्रें, रा. ब. का. ना. साने यांचे ' मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ' हें वसंत व्याख्यान मालेंतील मोठें व्याख्यान पेशव्यांच्या बखरीबद्दल खुलासा इत्यादि स्फुटप्रकरणें, झांशीच्या राणीचें चरित्र व टीका इत्यादि चर्चा लोकांनीं केली. परंतु केसरीकारांचें लक्ष यावर्षी इतिहासाकडे पुरतें लागल्याचें द्योतक चिन्ह असें आहे कीं ऑगस्ट-सप्टेंबरमध्यें ' मराठ्यांचा इतिहास ' अशा नांवाचे लेख लिहून त्यांत मराठ्यांचा इतिहास तयार करण्याचें आपलें पहिलें कर्तव्य होय असें प्रतिपादन केलें आहे. परंतु केसरीला लवकरच इतर विषयांकडे लक्ष देणें भाग पडलें. परंतु ८ डिसेंबरच्या ' भारतवर्षांवरील ' अग्रलेखांत ' गेल्या दोनचार वर्षांत इतिहासाबद्दल आस्था ' जागृत झाल्याचा पुरावाच भारतवर्षांची प्रसिद्धि ही होय ' असे समाधानाचे उद्गार काढले आहेत. वास्तविक ही सर्वव्यापी जागृती केसरीनें स्वतःच केलेली होती, हें कोणीहि कबूल करील.

१८९७ सालांत आरंभींच दुष्काळ व प्लेग यांनीं प्रजेची चाललेली गांजणूक हा विषय केसरीला एकसारखा भंडावून सोडीत होता. तथापि तेवढ्यांतच शिवाजीच्या चबुऱ्याबद्दल एकादें स्फुट ( १६-३-९७ ), खऱ्यांच्या ' ऐतिहासिक लेखसंग्रहाचे ' स्वागतार्थ चार ओळी ( २०-४-९७ ) किंवा रायगड येथें होणारा जन्मोत्सव प्लेगमुळें बंद ठेवावा लागतो याबद्दल दिलगिरी ( २७-४-९७ ) अशी सुमनांजली इतिहासाच्या वांट्याला खुद्द केसरीकर्त्यांकडून बहाल झालीच. टिळकांना राजद्रोही ठरवितांना शिवाजीवर वगैरे घेतल्या जाणाऱ्या आक्षेपांचाहि मधून मधून केसरी समाचार घेतच होता. परंतु टिळकांना अटक झाल्यानंतर ८ नोवेंबर १८९७ च्या अंकांत आलेला ' आंग्रेज व्यापाऱ्यांनीं श्रीशिवाजी

महाराजांचा पराभव केला काय !' हा अग्रलेखहि अभ्यासपूर्ण व महत्त्वाचा असा आला. वेफामपणानें इंग्रजांनीं स्वतःच्या सामर्थ्याबद्दल व शिवाजीसारख्यांच्या दुर्बळतेबद्दल प्रचलित केलेले गैरसमज कसे निराधार आहेत हें इंग्रजी साधनांचाच अभ्यास करून इंग्रजांच्या खोडसाळपणाचें माप त्यांच्या पदरांत घालण्याच्या दृष्टीनें हा लेख बिनतोड व निरुत्तर करणारा असाच उतरला आहे. ऐतिहासिक पद्धतीचा यांत सर्वत्र अंगीकार केलेला आहे. याच्या पुढच्याच अंकांत याच लेखाची पुरवणी एका स्फुटांत दिलेली आहे. विषयाचा मथळा कुतूहल उत्पन्न करणारा असल्यामुळें त्याची हकीकत थोडक्यांत देतों. टाइम्समध्यें शिवाजीची नाचक्की करणारे लेख येत. त्यांपैकीं एकांत शिवाजीमहाराजांनीं सुरतेची लूट केली तेव्हां इंग्रजांच्या वखारीला त्रास दिला नाहीं या महशूर गोष्टीचा विपर्यास करून इंग्रजांच्या भीतीनें शिवाजी मागें मागें राहिला म्हणजे 'आंग्रेज व्यापाऱ्यांनीं 'तुमच्या शिवाजीचा पराजय केला ! तर मग त्याचा मोठेपणा आम्हांला कशाला 'सांगतां ?' अशा थाटावर सवाल केलेला आहे. याला उत्तरादाखल लिहिलेल्या अग्रलेखांत १६६४ तील इंग्रज व्यापारी व मोटें सैन्य घेऊन आलेले शिवाजी महाराज यांच्या बलाबलाचा विचार तारतम्यानें करून इंग्रजांचें युद्धसामर्थ्य शिवाजीच्या पासंगालाहि पुरण्यासारखें नव्हतें असें यथायोग्य विधान केलेलें आहे. टालबॉय, व्हीलर, हंटर, मरे आदिकरून इंग्रज इतिहासकारांच्याच शब्दांनीं इंग्रजांचा दर्जा दाखविण्यांत केसरीला यश आलें आहे. ग्रँटडफ किंवा मराठ्यांच्या बखरींत इंग्रजांनीं केलेल्या प्रतिकाराचें वर्णन नाहीं यावरूनच त्या वेळीं मराठे इंग्रजांना कस्पटासमान मानीत होतें हें दिसून येतें. मग इंग्रजांची वखार न लुटण्याचें खरें कारण काय असलें पाहिजे ! याची मीमांसा करितांना ( १ ) इंग्रजांचें दारिद्र्य ( २ ) शिवाजीचें दुर्लक्ष किंवा पुढेंमागें फायदा करून घेतां येईल अशा भावनेवरून किंवा ( ३ ) दंतकथा प्रचलित आहे त्याप्रमाणें शिवाजी लुटीच्या पूर्वी दोन तीन दिवस गुप्तवेषानें शहरांत फिरत असतां, इंग्रज न कळत का होईना त्याच्या उपयोगी पडले, या विचारानें दिलेली सवलत, यांपैकीं कोणतेंहि एक किंवा अनेक कारणें संभवतात असा केसरीकारांचा शेरा आहे. या गोष्टीवर म्हणजे प्रत्यक्ष इंग्रजांची वखार कशी बचावली या गोष्टीवर अधिक निर्णयकारक प्रकाश पडण्याचीं साधनें अद्यापि हातीं न आल्यामुळें हा प्रश्न केसरीनें सोडला तेथेंच, परंतु निखालस सत्याच्याच मताला पुष्टिकारक अशाच या ठिकाणीं, सोडला पाहिजे.

'साधनें, कवनें शोधा' अशी हांक मारणारा केसरी 'शिवाजी-स्मारकाच्या' पुरस्काराकरितां शिवाजीच्या इतिहासाची सामग्री मागवून शिवचरित्राचा स्वतः अभ्यास करूं लागला येथपर्यंतचा हा बनाव इतिहासाला अत्यंत उपकारक असाच झाला. त्याची जाणीव केसरीला होऊन तो इतरांच्या प्रयत्नांना उत्तेजन देण्याची

आलेली संधि आस्थेनें घेत असे. १८-१-९८ च्या स्फुटांत खऱ्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाचें अभिनंदन करतांना केसरी म्हणतो ' सूक्ष्म रीतीनें विचार करूं ' पाहाणारांस असें दिसून आलें पाहिजे कीं अलीकडे कांहीं वर्षांत महाराष्ट्राच्या इति- ' हासाचें पुनरुज्जीवन कांहीं चमत्कारिक रीतीनें घडून आलें आहे. या पुनरुज्जीवना- ' च्या महत्त्वाच्या कालांतील कार्य प्रत्यक्ष प्रसिद्ध झालेल्या पुस्तकसंख्येवरून काढा- ' वयाचें नाहीं. तर इतिहासवाचन व परिशोधन यांची जी कांहीं एक सूक्ष्म पण ' सार्वजनिक अभिरुचि व आकांक्षा उत्पन्न झालेली दिसून येते तिजवरून समजा- ' वयाचें आहे. ' हें विधान किती यथार्थ आहे हें सांगण्याची जरूरी नाहीं. आणि या परिणामाचें जनकत्व केसरीकडे आहे याचीहि कोणाला शंका राहूं नये.

**३. अनुयायांची भरती**—इतिहासविषयक आकांक्षा व अभिरुची यांचें प्रत्यंतर यापुढील केसरीच्या फाइलांतून सररहा पहावयास मिळतें. केसरीच्या इच्छेप्रमाणें अनेकांचें लक्ष तिकडे लागून अभ्यासकांना जागा पुरविणें व वेळींप्रसंगीं स्फुटें, अग्रलेख यांतून पुरस्कार करणें एवढी सवलत देऊन केसरीनें हें काम प्रगतीच्या मार्गावर लोटलें तें कोठेंहि खीळ न पडतां आजपर्यंत अव्याहत चाललें आहे. १८९८ तच महाभारतावर अभ्यंकर व पळणीटकर यांचीं पत्रें, सातारकर छत्रपतींच्या जवाहिराबद्दल खेदकारक माहिती, राजवाडे पहिला खंड व कऱ्हाडे यांच्या-बाबत चर्चा मोकळेपणानें होऊं लागली. १८९९ त ' पानिपतच्या अपयशाचीं कारणें ' हा विषय कांहीं दिवस पुरला. सुप्रसिद्ध ज्ञानेश्वरीवर भिंगारकर—भारद्वाज-वाद याच वर्षी माजला. अभ्यंकरांचे रामायणावरील अभ्यासयुक्त लेख वाचकांची करमणुक करूं लागले. २८-३-९९ ला तात्या टोपी यांस अमली पदार्थ देऊन पकडलें ही हकीकत केसरीनें स्फुटांतच दिली. किष्किंधेचा वाद याच सालीं कांहींसा स्थिरावला. ' शिवाजीचें राज्य ब्राह्मणांनीं बुडविलें तेव्हां आतां त्यांना शिवाजीचें प्रेम कशाला ! ' अशी हिस्टॉरिकसची विचारसरणी पाहून मराठ्यांचे अभिमानी मि. कर्केरिया यांनीं त्याला उत्तरहि दिलें. पण तें अपुरें पडलें, म्हणून २२-८-९९ ला ' शिवाजी व ब्राह्मण ' असा अग्रलेख लिहून केसरीनें रोखठोक उत्तर दिलें. राज्यरक्षणाच्या दृष्टीनें परंपरागत गादीचा योग्य मान राखून राज्यसूत्रें कर्त्या माणसांनीं आटोपणें हें राष्ट्राला फायदेशीरच असतें हा मुद्दा पुढें मांडून शिवशाहीनंतर पेशवाई झाली यांत अन्याय कोणताच नाहीं असें प्रतिपादिलें. नव्या शिक्षणानें राजनीतिशास्त्र आतां आम्हांला चांगलें समजतें. त्यांत पाश्चात्यांनीं लुडबुडण्याचें कांहींच कारण नाहीं. आमचे इतिहासकार आतां समर्थ झाले आहेत. इतिहासा-विष्करणाच्या गप्पा झोंकून जातींजातींत वैमनस्य वाढविण्याचा लपंडाव आम्हांस चांगला समजतो, असाहि त्यांत इशारा देऊन ठेविला आहे. सुमारें चार महिन्यांनीं मि. कर्केरिया यांनीं ' मराठ्यांच्या इतिहासांतील

राजकीय साधू ' या विषयावर ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांचे संबंधानें मुंबईस निबंध वाचला त्याबद्दल त्यांचे आभार मानतांना केसरीनें ( १९-१२-९९ ) खालील विचार प्रगट केले. ' साधूंच्या प्रोत्साहनाचा महाराष्ट्र देशाच्या इति-
' हासावर काय परिणाम झाला ह्याची माहिती मिळविली पाहिजे....व आमच्या
' जुन्या इतिहासाचें सूक्ष्म व शास्त्रीय दृष्टया अवलोकन करण्याची अभिरुचि उत्पन्न
' झाली आहे ही समाधानाची गोष्ट आहे.' याचें प्रत्यंतर केसरीकारांकडे प्रसिद्धी-करितां येणाऱ्या मजकुरावरून सहज येतें. ' सारा वसूल करण्याची पेशवाईतील पद्धति ' अशासारख्या प्रश्नांवरील चर्चा अर्थातच इष्ट मार्गानें जात होती. परंतु आतां यापुढें केसरीनें पेटविलेली ज्योत प्रज्वलित झाली. अनेक अनुयायीहि या मेळ्यांत सामील झाले. त्यांनीं शोधून मांडलेल्या चिजा दुर्मिळ, अलौकिक त्याप्रमाणेंच मनोरंजकहि आहेत. परंतु तिकडचें लक्ष हळूहळू कमी करून आपल्याला फक्त केसरीच्या स्वतःच्या लेखणीचाच मागोसा घेत गेलें पाहिजे. केसरीनें यापुढें मार्गदर्शकत्वाचें काम झालेलें पाहून प्रत्यक्ष ऐतिहासिक चर्चेंत लक्ष घालण्याचें ठरविलें. आणि विविध महत्त्वाच्या विषयांवर लोकांना बोधप्रद लेख लिहिले. इतिहास पाहिजे हें म्हणण्याचें काम झालें असें पाहून आतां इतिहास कसा बनतो, त्याच्या पद्धति कोणत्या ह्या विषयांचें उद्घाटन याच्या पुढची पायरी म्हणून त्यांना सहजच करावें लागलें.

सुप्रसिद्ध नाना फडणीस यांच्या शतसांवत्सरिक श्राद्धतिथीनिमित्त ता. २० मार्च रोजीं केसरींत ' मुत्सद्दी नाना फडणीस ' या मथळ्याचा एक मोटा विस्तृत लेख प्रसिद्ध झाला. एप्रिल-मे-मध्यें शिवाजीमहाराजांची जन्मतिथि या प्रश्नावर लोकमान्य टिळकांनीं स्वतः लेख लिहिले व उपलब्ध पुराव्यांवरून वैशाख शु. १ शके १५४९ ही महाराजांची जन्मतिथि ठरविली. त्यांवर टीका-प्रतिटीका पुष्कळ झाल्या. त्यांना उत्तरें देतांना टिळकांनीं एकदोन तत्त्वें म्हणून लोकांपुढें टेविलीं तीं स्मरणार्थ देतों. ' तिथिनिर्णय करावयाचा तो फलज्योतिषांवरून
' नव्हे...तो जुन्या कागदपत्रांतील माहितीवरून केला पाहिजे. कागदपत्रांत विसंग-
' तता असेल तर निर्णय गणितावरून करून गणितानें खरी ठरेल तीच मिति ग्राह्य
' ठरविली पाहिजे.' जयंत्युत्सव सवडीप्रमाणें वाटेल त्या तिथीला केला तर काय बिघडलें असा वाद माजविणाऱ्या भोळसटांनीं १ मेच्या अग्रलेखांतील खालील वाक्याचें नीट मनन करावें. ' केवळ शिवाजीमहाराजांच्या प्रिय व पवित्र स्मरणार्थ
' म्हणून जो उत्सव करावयाचा तो वास्तविकपणें कोणत्याहि तिथीस केला
' तरी सारखाच. तथापि एकाद्याचा जयन्त्युत्सव म्हणून करणें झाल्यास तो होतां-
' होईतों पंचांगदृष्ट्या बरोबर ज्या तिथीस त्याचा जन्म झाला त्याच तिथीस केला
' पाहिजे. ' १९ जूनचा ' पेशवाईंतील कारभार, रीतिरिवाज व नीतिमत्ता ' हाहि अग्रलेख शास्त्रीय विचारसरणीच्या दृष्टीनें वाचनीय झाला आहे. रा. ब. रानडे

यांनीं पेशव्यांच्या रोजनिशांवरून काढलेल्या नवमतानुकूल निष्कर्षांवर यांत झोड उठविली आहे. मराठ्यांचें राज्य लयास जाण्याचें कारण महाराष्ट्रांतील जातिभेद असें रानड्यांनीं ठरविलें. पण इतिहासांतील इतर उदाहरणें घेऊन राज्य-नाश व जातिभेद ह्यांचा संबंध अपरिहार्य नाहीं हें टिळकांनीं दाखवून दिलें. पण ' एकदां भांडणास सुरवात झाली कीं मग ती फूट जाति-' भेदाच्या रूपानें आमच्यामध्यें अधिक बाहेर येते, निदान त्याला तशाच प्रकारचें ' रूप येतें ' एवढेंच न्यायमूर्तींचें मर्यादित म्हणणें असलें तर फारसा आक्षेप घेण्यासारखा नाहीं इतपत मान्यता दिली. पेशवाईत समाज सुधारणाप्रवण होता हें सांगण्याकरितां व विशेषतः केशवपन, विधवाविवाह या गोष्टींतील नवीन मतांचें समर्थन करण्याकरितां, सदाशिवरावभाऊ व नारायणराव यांच्या विधवां-चीं व पटवर्धनांच्या बालविधवा मुलीचें, दिलेलीं उदाहरणें योग्य आधारांचे अभावीं व परिस्थितिभिन्नतेमुळें लंगडीं पडतात हें केसरीचें म्हणणें अद्यापि खोडून काढलें गेलें नाहीं. इतिहासासारख्या नित्यव्यवसायाच्या बाजूच्या विषयावरहि इतकें प्रभुत्व पाहिलें म्हणजे अत्यंत कौतुक व आदर वाटतो. १९०० च्या उत्तरार्धात ' शाहूचें नांव शहाजी, स्याहू का शिवाजी ?' अशा-बद्दल खूप रणधुमाळी माजली होती. पण ग्रंथमालेंत अफजल पवाड्यांवर आठवल्यांचा लेख आला त्या निमित्तानें ग्रंथमालेची स्तुति करण्यासाठीं एक ( १९ जून ) व राजवाड्यांनीं मेणवलीदप्तरावर केलेले परिश्रम कृतज्ञतापूर्वक गौरविण्याकरितां एक ( १८ डिसें. ) अशीं दोन स्फुटें वगळलीं तर पुढील वर्षांच्या मार्चांतील ( ता. ५ ) ' ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर- चरित्र व पत्रव्यवहार ' हाच त्यानंतरचा महत्त्वाचा अग्रलेख आला. यांत चर्चिलेला विषय एका अर्थानें फारच महत्त्वाचा आहे. ' महाराष्ट्राच्या इतिहासांत असल्या महापुरुषांचें महत्त्व काय ?' हें यांत सांगितलें आहे. ( १ ) हे केवळ धर्मगुरु होते; ( २ ) हे काषायांबरधारी मुत्सद्दीच होते, ( ३ ) हे तटस्थ असून वेळ-प्रसंगीं इतर चार लोक होते त्यांप्रमाणेंच राजकारणाबद्दल उदासीन राहून राज-कारणी पुरुषांस द्रव्यद्वारा वगैरे मदत देत एवढेंच; असे या पुरुषांबद्दल विचार करणाऱ्यांचे मुख्य तीन पक्ष आहेत असें गृहीत धरून पारसनीसांच्या पुस्तका-वरून यांपैकीं कोणतें मत खरें आहे हें ठरविण्याचा केसरीनें या लेखांत प्रयत्न केला आहे. व शेवटीं ' तत्कालीन कर्त्या पुरुषांच्या मनाची धार्मिक स्थिति लक्षांत ' घेतां दृष्ट साधनांप्रमाणेंच अदृष्ट साधनांचेंहि त्यांना महत्त्व वाटत होतें असें दिसून ' येत असल्यामुळें ज्याला इंग्रजींत (moral force) किंवा अदृष्ट साधन म्हणता ' येईल तें या साधुसंतांनीं पुरविलें व राजकारणाचा गाडा पुढें लोटला' असें ठर-विलें आहे. ' ह्या अदृष्ट साधनाची राष्ट्रीय उन्नतीस अनुकूलता करून घेणें हेंच ' श्रीरामदासांसारख्यांचें अत्यंत महत्त्वाचें काम होतें. परंतु या कामाचें खरें स्वरूप

' लोकांच्या नजरेस येण्याकरितां ऐतिहासिक पुरावा आजपर्यंत प्राप्त झाला नव्हता. ' तो आतां झाला तेव्हां मराठी इतिहासाचें मर्म व त्यांतील साधूंची कामगिरी ' समजून घेऊं इच्छिणाऱ्यांनीं हें पुस्तक अवश्य वाचावें ' अशी केसरीनें अर्थातच शिफारस केली आहे. २३ एप्रिलचा ' राष्ट्रीयत्वाची कल्पना ' हा अग्रलेख मोठा मार्मिक आणि तत्त्वशोधन-पर, विद्वत्तापरिपूर्ण असा आहे.त्यांतील शिवजयंत्युत्सवाचे समर्थनार्थ केलेला एक फार सुंदर कोटिक्रम असा आहे. ' एके वेळीं निरनिराळें ' राष्ट्रीयत्व अनुभविलेल्या लोकांची सांगड घातली एवढ्यावरूनच त्यांचें राष्ट्रीयत्व ' एक झालें असें मानणें बरोबर नाहीं. व्यक्तीप्रमाणेंच प्रांताप्रांताचें प्रारब्ध ' निराळें आहे हें सूक्ष्म इतिहासवाचकांच्या लक्षांत आलेंच पाहिजे. अर्थात् सहा- ' राष्ट्रीयांनीं आपल्यापुरतें कर्तव्य ओळखून मुख्यतः मराठी भाषा व मराठी इतिहास ' यांवर विशेष भर दिला पाहिजे.' याचीच पुरवणी ४ जूनच्या स्फुटांत आल्या-सारखी दिसते. ' महात्मे एकाच देशांत होत नाहींत. सर्वत्र होतात. परंतु प्रत्येक ' देशाच्या समाजापुढें त्याच देशांतील महात्म्यांचीं चरित्रें विशेष रीतीनें ठेवणें या- ' पासूनच फायदा आहे. ' स्वेतिहासाभ्यासाचें आणखी समर्पक समर्थन अधिक तें काय असणार ? आंतरराष्ट्रीयत्वाचें तुणतुणें वाजविण्याचा मोह या कोटिक्रमापुढें कोणाला होईल असें वाटत नाहीं. केसरीनें याच वर्षांत महाराष्ट्रीय इतिहासाला २८ मेपासून ऑक्टोबरआरंभापर्यंत सहा सात अग्रलेखांची भरदार खंडणी दिली. खऱ्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाचें विस्तृत परीक्षण या अग्रलेखमालेंत आलें आहे. केवळ इतिहासाकरितां, राजकारणाला विशेष पोषक नाहीं अशा तऱ्हेनें, इतके पुष्कळ लेख लिहिल्याचा हा पहिलाच प्रसंग होय. परंतु यावरून महाराष्ट्रीय इतिहास ही स्वतंत्र विद्वत्तेची शाखा रंगारूपास येऊं लागलेली पाहून केसरीला तिचा व तिच्या अमलाखालीं गोळा झालेल्या अनुयायांचा गौरव इतक्या मोठ्या प्रमाणावर करण्याची आवश्यकता यावेळीं भासली असली पाहिजे हें उघड आहे. अशा रीतीनें उदारपणानें पाहुणचार करण्याच्या भरांत केसरीनें अभ्यागतांनीं शिष्टाचार सोडला असतां त्यांस ताळ्यावर आणण्यासहि माघार घेतलेली दिसत नाहीं. शाहूचे नांवाबद्दल मागच्या वर्षाचा वाद दिवेकरांनीं पुनः उकरून काढल्या-मुळें याहि सालांत तो रेंगाळत चालला होता. इंदूरचे आठल्ये याहि वेळीं त्यांच्या नेहमींच्या पद्धतीनें न कंटाळतां दंड थोपटून पुढें सरसावले होते. परंतु त्यांचा स्वभाव शांत चर्चेला फारसा अनुकूल नसल्यामुळें त्यांची भाषा बरीच उच्छृंखल होत असे. २७-८-०१ ला त्यांचे ' दिवेकरांचा भ्रम' हें पत्र छापून केसरीनें लगेच खालीं असा शेरा मारिला आहे. ' मराठ्यांच्या इतिहाससंबंधीं अस्सल कागदपत्र ' जमावे व त्यांचे योगानें त्या इतिहासावर नवीन प्रकाश पडावा अशी आमची ' मनापासून इच्छा आहे. नवीन व विश्वसनीय पुरावे गोळा करून केलेल्या ' चर्चेला सवडीप्रमाणें स्थळ मिळेल. परंतु ऐतिहासिक सत्यशोधनाचे कामीं

'होणाऱ्या चर्चेमध्यें कडक भाषा वापरण्याची मोठीशी आवश्यकता आहे असें 'नाहीं, येवढेंच आम्ही आमच्याकडे लेख पाठविणाऱ्या सर्व इतिहासशोधकांस 'सुचवितों.' लोकांनीं लिहावें अशी स्फूर्ति दिली गेली, तिचें कार्य दिसूं लागल्यावर आतां लोकांनीं कसें लिहावें हेंहि सांगण्याचें केसरीनें अंगावर घेतलें. गेल्या एकदोन वर्षांत अनेक विषयांवर अनेक प्रकारची चर्चा आली. १९०२ च्या एप्रिलांत तुकाराम महाराजांच्या स्वर्गारोहणावर शहाणे भावडे लेख आले. त्यांना मर्यादेंत ठेवण्याकरितां केसरीकारांना खालील टीप द्यावी लागली. 'तुकाराम-महाराजांसंबंधीं नवीन विश्वसनीय ऐतिहासिक माहितीस अवश्य स्थल मिळेल. मात्र लिहावयाचें तें थोडक्यांत व मुद्देसूद लिहिलेलें असावें!' बोअर युद्धाचें प्रसंगानें 'गनीमी काव्याची लढाई' असे एकंदर नऊ अग्रलेख १० जूनपासून २६ ऑगस्टपर्यंत प्रसिद्ध झाले. त्यांत मराठ्यांच्या युद्धपद्धतीचा भरपूर गौरव केलेला आढळतो. २४ जूनच्या स्फुटामध्यें टिळकांच्या शिवराज्यारोहण प्रसंगींच्या व्याख्यानाचा गोषवारा दिला आहे. त्यांत शिवाजीमहाराजांच्या उदयाबद्दल थोडी मीमांसा केलेली आढळते; तींत गनीमी काव्याचें समर्थन म्हणजे बहुतांशीं वर उल्लेखिलेल्या लेखमालेचें बीजच सांपडतें. म्हणून तें येथें देतों. शिवाजीमहाराजांचें वर्णन करितांना शिवाजी प्रथम लहान चोऱ्या करून मग दरोडे घालूं लागला व पुढें दैवानें राजा झाला असें सांगण्याकडे कुत्सितांची प्रवृत्ति दिसून येते. हें वर्णन निर्मूल व विकृत आहे. 'मुसलमानी साम्राज्याच्या अवाढव्य 'लाटेस थोपवून धरण्यास शिवाजीचे वेळीं गनिमीकाव्याशिवाय दुसरी कोणतीहि 'युक्ति नव्हती. मराठ्यांपेक्षां रजपूत कमी शूर किंवा लढवय्ये होते असें नाहीं. 'पण जें काम रजपुतांना दुर्घट झालें तेंच काम मराठ्यांनीं शौर्यास अक्कलेची 'जोड दिल्यामुळें घडून आलें. ज्या गनिमी काव्याच्या पद्धतीला आज ३०० 'वर्षांनीं पुनः महत्त्व आलें ती पद्धत शिवाजीनें स्वतःच्या मनाच्या स्फूर्तीनें सुरू 'केली; शिवाजीची खरी बुद्धिमत्ता यांतच आहे.' हा विचार टिळकांना सुचण्याचें कारण 'रशियाच्या अवाढव्य साम्राज्यास गेल्या सालीं चीन देशांत आळा बसला. 'इंग्रजी साम्राज्याची गति बोअर लोकांनीं थोड्या प्रमाणांत थोपविली. त्याच-'प्रमाणें फिलिफाईन्स बेटांत गनिमीकाव्यानें अमेरिकेस निरुद्ध केलें.' ह्या तीनहि गोष्टींतील गनिमीकाव्याचें कार्य लक्षांत घेतलें म्हणजे शिवाजीच्या व त्यानंतरच्या मराठ्यांच्या इतिहासावर एक प्रकारचा प्रकाश पडतो. त्याअन्वयें शिवाजीच्या आरंभींच्या कारवाईचें समर्थन वर दिल्याप्रमाणें करितांहि येतें. याच व्याख्यानां-त रामदास व ब्रह्मेंद्रस्वामी यांच्या मोठेपणाबद्दल राजवाडे व पारसनीस यांच्या चालू वादावर टिळकांनीं असें मत दिलें कीं, 'ब्रह्मेंद्रस्वामी रामदासांइतक्या 'योग्यतेचे पुरुष नव्हते हें निर्विवाद आहे. तथापि ते संसारपाशानें बद्ध नव्हते,

'व ऐहिक गोष्टींशीं त्यांच्या स्वतःकरितां त्यांचा संबंध नव्हता ही गोष्टहि तितकीच 'निर्विवाद आहे.' यापुढें नाना फडणिसांच्या पुण्यतिथीवर ( ७-१०-०२ ) व काव्यसंग्रहावर ( १६-१२-०२ ) अशीं दोन स्फुटें आलीं. नवप्रेरित जागृतींतून जुन्या इतिहासाप्रमाणेंच जुन्या वाङ्मयाकडेहि स्वाभिमानयुक्त, अभ्यास व चिकित्सक दृष्टि वळल्याचा दाखला याच सुमारास मिळूं शकतो. मयूरभूषण श्री. पांगारकर यांचे लेख आतां १९०१ पासूनच चमकूं लागले. अजगांवकर, भावे, भवाळकर, मोहोळकर हेहि पुढें सरसावले. काव्यसंग्रहकार श्री. नारायण चिंतामण केळकर तर 'असल्या कामीं जास्त माहिती मिळण्याला आपल्या पत्रासारखें दुसरें साधन नाहीं' असें उघडपणेंच सांगतात. पांगारकरांनीं 'मराठी कवींना राष्ट्रीयत्वाची दृष्टि खास होती' असें छातीठोकपणें सांगण्यासाठीं केसरीचाच आश्रय केला. केसरी आणि अभ्यासक ह्यांचा हा 'परस्परं भावयन्तः' असा लोकजागृतीचा व लोकशिक्षणाचा क्रम चांगलाच भरभराटीस येऊं लागला. केसरीचें काम अधिकारी माणसें स्वतःच्या लेखांनीं बरेंच करूं लागल्यामुळें केसरीनें २१ एप्रिलला एक शिवजन्मावर स्फुट व २२ डिसेंबरला सिंहावलोकनांत १७११ तील शाहू व मोंगल सुभेदार यांच्यामधील तहनाम्याच्या 'अस्सल ऐतिहासिक' लेखाचा शोध वगैरे कांहीं किरकोळ देऊनच समाधान मानलें असल्यास नवल नाहीं.

यापुढेंहि केसरीला हेंच धोरण पुढें चालविणें शक्य करण्याइतकी स्वतंत्र व उत्तरप्रत्युत्तरात्मक लेखांची व पत्रव्यवहाराची सहज वाण पडेनाशी झाली. त्यामुळें १९०४ मध्यें पारसनीसांचें मराठ्यांच्या आरमारावरील मुंबईचें व्याख्यान ( १६ फेब्रु. ), नानाफडणिसांचा वेळासचा उत्सव ( १५ मार्च ), सरस्वतीमंदिर व महाराष्ट्र इतिहास मासिक वगैरेंचा प्रासंगिक महत्त्वानुसार थोडाबहुत परामर्ष घेण्याचेंच काम काय तें राहिलें. मराठ्यांच्या आरमाराविषयीं मात्र मराठ्यांच्या त्या वेळच्या कौशल्याबद्दल लिहून, 'धुळपांनीं इंग्रजांचीं गलबतें एकदां 'पकडलीं होतीं, तेव्हां उत्तेजन मिळून नाविक कौशल्याची अप्रतिहत वाढ चालू 'रहाती तर आज पाश्चात्यांनीं केलेल्या सुधारणा आपल्यालाहि करतां आल्या 'नसत्या असें नाहीं.' असें प्रेरक विधान त्या स्फुटांत केलेलें आहे. या व पुढील वर्षांत ( १९०५ ) ब्रम्हेंद्रस्वामींच्या पत्रांवरून आठल्यांनीं जंजिऱ्याच्या मोहिमेबद्दल वाद उपस्थित केला, राणेखानाच्या सनदेवर काहूर उठविलें. चिमणाजी दामोदराबद्दल संशय उपस्थित केला, आणि राजवाड्यांना वादांत खेचलें. याच वर्षीं रा. दाजी नागेश आपटे व रा. विठ्ठल वामन ताम्हनकर अशासारखीं नवीं नांवें दिसतात. पण लवकरच वंगभंग व बहिष्काराला तोंड लागल्यामुळें केवळ शास्त्रीय दृष्टीच्या इतिहासादि विषयांकडे थोडें कमी लक्ष होणें अपरिहार्य झालें. तथापि ऐतिहासिक विवेचनाची व

तद्विषयक आस्थेची ज्योत अजूनहि फार मंद झाली नव्हती. ६ मार्च १९०६ च्या स्फुटावरून असें दिसतें कीं ' महाराष्ट्रांतील प्रमुख ऐतिहासिक ' महापुरुष श्रीशिवाजीमहाराज यांच्या वार्षिक उत्सवाचें बीजारोपण महाराष्ट्र- ' भूमींत सर्वत्र झालें आहे; ' अशी टिळकांची खात्री होऊन ते ' या उत्सवाच्या खालोखालच्या योग्यतेचा दुसरा ऐतिहासिक उत्सव ' नानाफडणिसांचा तो कसा मार्गास लागेल या विवंचनेस लागले. १९ जूनला स्फुटें लिहून शिवाजी-चा उत्सव जपाननें केला, मुसलमानांनींहि करावयास वास्तविक हरकत नाहीं असेंहि त्यांनीं धडकून सांगितलें. पण यापलीकडे स्वतः केसरीला लिहितां आलें नाहीं. यावर्षी श्री. गो. का. चांदोरकर यांनीं ' छत्रपतींचा उपदेशकाल ' ( २६ जून ) या प्रश्नावरून रामदासविषयक चर्चा सुरू केली. त्यांत नित्या-प्रमाणेंच आठल्ये यांनीं ' स्वराज्यस्थापनेंत रामदासस्वामींचें अंग होतें काय ?' या तऱ्हेनें दुसरी बाजू पुढें मांडली. श्री. बाळकृष्ण अनंत भिडे हेहि ' रामदास '-विषयक विचार पुढें मांडूं लागले. परंतु ह्या रामदासविषयक चर्चेत शास्त्राची वाढ होण्यासारखी लेखकांची मनोभूमि व संशोधनाची परिस्थिति आली नसल्याचें पाहून टिळकांनीं ह्या वादाचा थोडक्यांतच समारोप केला. त्यांनीं अशी टीप दिली;–' समर्थांचा सर्व अस्सल पत्रव्यवहार प्रसिद्ध होईपर्यंत या बाबतींत जास्त ' वाद करणें अयोग्य असल्यामुळें तोंपर्यंत या विषयावरील पत्रांस यापुढें केसरींत ' स्थळ देतां येत नाहीं.' ब्रह्मेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार पुढें आल्यावर त्यावर ज्याप्रमाणें मोकळेपणानें विचार करतां येतो तसा समर्थांच्या बाबतींत करतां येत नाहीं ही गोष्ट खरीच आहे.

४. **इतिहास–मंदिराची उभारणी**—केवळ केसरीच्या संपादकीय लेखांच्या द्वारां झालेल्या ऐतिहासिक कामगिरीचें समालोचन आतां आपल्याला लौकरच संपविलें पाहिजे. १९०७ व १९०८ या सालांत राजकारणाचे कोणते प्रसंग केसरीपुढें व केसरीवर येऊन आदळले हें महाराष्ट्रीयांना तरी सांगावयास नको. भारतीय राजकारण दिवसेंदिवस बिकट होत जाऊन शेवटीं लोकमान्यांचीच त्याला आहुति पडली. पण या दोन सालांत केसरीनें प्रस्तुत विषयावर स्वतःचे असे विचार विशेष प्रकट केले नसले तरी सवाई माधवरावांचा मृत्यु, नानांस राज्याधिकार, आर्यलिपि वगैरे विषयांवर इतरांचे लेख प्रसिद्ध केले आहेत. १९०९ मध्येंहि मस्तानी व बाजीराव ( बाजीरावाचें मद्यपान ! ), नानाफडणीस व इंग्रज, गंगाधर शास्त्र्यांचा खून असे विषय चर्चेला निघाले. आठल्यांचें ' शाहू ' प्रकरणीं पत्रहि प्रसिद्ध झालें. १९१० मध्यें राजवाड्यांचा ' शिवकालीन समाजरचना ' हा महत्त्वाचा निबंध २८ जून पासून खंडशः प्रसिद्ध झाला. जोशी-पाध्ये वाद थोडाबहुत रंगला व दीक्षित-पटवर्धनांचीं राजवाड्यांनाहि विचार करावयास लावणारीं अस्सल पत्रें प्रसिद्ध झालीं. परंतु याच वेळीं आषाढ शु० १

ला ( शके १८३२ ) भारत इतिहास-संशोधक-मंडळ या संस्थेची मुहूर्तमेढ राजवाड्यांच्या हातून रोवली गेली आणि केसरीला इतिहासाचें कार्य दुसऱ्यांच्या शिरावर टाकून आपला मोर्चा इतरत्र वळविण्याला मोकळीक झाली. केसरीच्या गेल्या कित्येक वर्षांच्या सतत प्रयत्नांना यश येऊन इतिहासाचें अत्यंत स्वाभिमानजागृतीचें काम संघटित स्वरूपांत करण्याला समर्थ व उत्सुक असें होणारें विद्वन्मंडळ स्थापन झालें.

१९१३ च्या जुलैमध्यें (२९ ता.) भा. इ. मंडळाचा तीन वर्षांचा अहवाल व उद्देश व भावी कार्यक्रम लोकांच्या माहितीकरितां केसरीच्या द्वारें प्रसिद्ध करण्यांत आला. त्याच्याच बरोबर मंडळाच्या ४।५ पाक्षिक सभांतील कामाचा अहवाल विद्वानांच्या वाचनार्थ छापला होता. २६ मे १९१४च्या अंकांत त्या वर्षी झालेल्या मंडळाच्या ऐतिहासिक वार्षिक संमेलनाचा बराच विस्तृत अहवाल देण्यांत आला होता. मंडळाच्या संशोधनकार्याच्या सुव्यवस्थितपणाबद्दल आणि भरीवपणाबद्दल अशा रीतीनें सप्रमाण पुरावा प्राप्त झाल्यामुळें लोकांच्या विश्वासाला व आदराला ही संस्था पात्र होण्याचीं चिन्हें दिसून येतांच केसरीनें पुढील दोन आठवडे मिळून दोन अग्रलेखांचा भरीव अहेर ' इतिहाससंशोधन ' या विषयाला केला. ( ता. २ व ९ जून ). यांपैकीं पहिल्याच लेखांत मंडळस्थापनेबद्दल समाधानाचे उद्गार काढले. ' गेल्या तीस पस्तीस वर्षें इतिहाससंशोधनाचें ' काम महाराष्ट्रांत चाललें. परंतु महाराष्ट्रावरहि त्याचा ठसा उमटला नव्हता. ' मग परप्रांतांची गोष्ट कशाला ? पण आतां चार वर्षांपूर्वी मंडळाची स्थापना ' झाल्यामुळें ही उणीव आतां अंशतः तरी भरून निघाली आहे. मंडळाच्या स्थापने' मुळें संशोधनाचें कार्य ठसा उमटविण्यास समर्थ होईल एवढेंच नव्हे तर संशो' धनकार्याची परंपरा चालू राहणें ही महत्त्वाची गोष्टहि त्यायोगानें सिद्धीस जाईल' अशी खात्री प्रदर्शित करून या संस्थेमुळें महाराष्ट्राच्या प्रगतिपर चळवळींत एका उपयुक्त संघटित मंडळाची भर पडली असा आनंद दर्शविला आहे. यानंतर इतिहाससंशोधनविषयक आस्थेचा उदय हा पाश्चात्य शिक्षणाचाच इष्ट असा परिणाम झाला हें विशद करून, दुसऱ्या लेखांत महाराष्ट्रांतील इतिहाससंशोधनाच्या विविध पायऱ्यांची उत्क्रांति वर्णन केली आहे. बखरी, ग्रँटडफादि इंग्रज, कीर्तने आदिकरून विवेचक, व खरे, पारसनीस, राजवाडे, साने आदिकरून संशोधक यांचें कार्य, त्यांतील गुणदोष व शक्याशक्यता यांचा मोठ्या मार्मिक सहानुभूतीनें आविष्कार करून इतिहासकार्याला आशीर्वाद दिला आहे. इतिहाससंशोधनाचे दोन लेख १९१४ सालीं आल्यावर १९१८ पर्यंत ' पेशवाई जाऊन शंभर वर्षें झालीं ' (४-६-१८) या गोष्टीचें स्मरण देण्याकरितां लिहिलेल्या अग्रलेखाव्यतिरिक्त केसरीनें इतिहासविषयावर मुख्य लेख लिहिला नाहीं. केसरींतील ऐतिहासिक अग्रलेख आतां विरळ होऊं लागले. त्यानंतर

' राधामाधवविलासचंपू ' या विलक्षण ग्रंथाचा परामर्ष घेण्यासाठीं एक ( २४ एप्रिल १९२३ ) व शिवभारताचे संकीर्तनार्थ दोन तीन ( ऑक्टो.–नोव्हें. १९२७ ) असे वाङ्मयपरीक्षणार्थ दूर दूर अंतरानें लेख आले. वासुदेवशास्त्री खरे ( १७ जून १९२४ ) व वि. का. राजवाडे ( ४ जाने. १९२७ ) या दोन इतिहासाचार्यांचे मृत्युलेख अग्रस्थानीं झळकले. हा केसरीनें अर्थात् इतिहासकार्याला दिलेला मान होय. याशिवाय केवळ ऐतिहासिक प्रसंगांचाहि बोलबाला केसरीनें अग्रलेखांत केलेला आहे. हे प्रसंग म्हटले म्हणजे जुन्या व नव्या तिथींप्रमाणें शिवछत्रपतींचे साजरे करण्यांत आलेले ' त्रिशत् सांवत्सरिक जन्मदिन-महोत्सव ' होत. १० मे १९२७ रोजीं केसरीनें ' शिवछत्रपतीचें ' त्रिशत्सांवत्सरिक जन्मदिनानिमित्त जुन्या तिथीप्रमाणें ' पुण्यस्मरण ' केलें असलें तरी खरी जन्मतिथि म्हणून केसरीला दुसरीच मान्य असल्यामुळें केसरीचे १८ मार्च व २२ मार्च १९३० मधील अग्रलेख विशेष दिलखुषीचे होते यांत शंका नाहीं. विशेषतः नवीन तिथीप्रमाणें महोत्सव झाल्यावेळीं शिवचरित्र-कार्यालयानें महाप्रयासानें उत्कृष्ट पुस्तकसंग्रह निर्माण केल्यामुळें त्या कार्याच्या गौरवार्थ ' शिवचरित्रकार्यालयाचें कार्य ' म्हणून फार सुंदर अग्रलेख लिहिण्यांत आला होता. तो वाचकांच्या स्मृतिपटलावरून अजूनहि गेला नसेल.

या दीर्घकालांतील केसरींत येऊन गेलेल्या स्फुटांचाहि आढावा देणें अनाठायीं होणार नाहीं. परंतु स्थलाभावीं तो मोह आवरतों व मागील विवेचनावरून त्यांच्या निर्विवाद महत्त्वाबद्दल कल्पना करण्याचें काम वाचकांवरच सोंपवितों. या सर्व काळांत महाराष्ट्रांतील लहानमोठ्या संशोधकांनीं व अभ्यासकांनीं ऐतिहासिक चर्चेत भाग घेतला व केसरीच्या विद्यमानें वडे छोटे लेख लिहून इतिहासदेवतेवर अनेक अलंकार चढविले. त्या सर्वांचें महार्हत्व व उपयोग विशद करून सांगण्यास आपल्यास स्थलाचा व कालाचाहि अवकाश नाहीं याबद्दल वाचकांनीं माफी करावी.

**समारोप**—हें अत्यंत त्रोटक असें विवेचन वाचूनहि विचारी वाचकांच्या मनांत महाराष्ट्राला ललामभूत झालेल्या केसरीविषयीं अनेक तऱ्हांनीं अभिमान जागृत होईल यांत शंका नाहीं. अगदीं वरवर पहाणारासहि दिसून येणारी पहिली गोष्ट ही आहे कीं, केसरीनें ऐतिहासिक दृष्टीच्या लेखांचा महाराष्ट्रांत फैलाव करण्यामध्यें जितके रकाने दिले आहेत तितके दुसऱ्या कोणत्याहि एका वृत्तपत्रानें किंवा इतिहासाला न वाहिलेल्या नियतकालिकानें दिले असतील असें वाटत नाहीं. केसरीसारख्या केवळ वर्तमानपत्राच्या हातून हें एवढें जें मोठें काम झालें, आणि इतर वर्तमानपत्रांकडून असें कार्य झालें नाहीं ह्याचें मुख्य कारण असें आहे कीं, केसरी वर्तमानपत्र हें केवळ बातमी पुरविणें ह्यापेक्षां उच्च आणि भिन्न अशा एका ध्येयाकरितां निर्माण झालें आणि ध्येयनिष्ठ अशा विद्वान्

संपादकांच्या हातीं राहिलें. ध्येयध्रुवावर अढळ नजर ठेविल्यामुळें तत्सिध्यर्थ इतिहासाच्या व्यापक आणि उद्बोधक क्षेत्रांत केसरीला अनिरुद्ध संचार अर्थातच करावा लागला.

---

# श्रीगणेशोत्सव

[ श्री. शंकर रामचंद्र दाते, बी. ए. ]

महाराष्ट्राचे सध्यांचे राष्ट्रीय महोत्सव असे ज्यांस यथार्थतेनें म्हणतां येईल, असे उत्सव दोन आहेत. ते म्हटले म्हणजे एक श्रीगणेशोत्सव व दुसरा श्रीशिवाजी महाराजांचा उत्सव हे होत. उत्तर हिंदुस्थानांत हिंदूंचे राष्ट्रीय म्हणून सध्यां रामनवमी व गोकुळअष्टमी हे उत्सव साजरे केले जातात. बंगाल्यांत काली देवीचा राष्ट्रीय महोत्सव करण्यांत येतो. खुद्द महाराष्ट्रांत पूर्व काळीं पेशवाईच्या अमदानींत विजयादशमीच्या समारंभास राष्ट्रीय स्वरूप असे. कारण त्या वेळीं खरें सीमोल्लंघन होत असून लुटून आणलेलें सोनें घरांत पहावयास मिळत असे. कालांतरानें मराठी साम्राज्य नामशेष झालें व विजयादशमीचा सीमोल्लंघनाचा समारंभ नांवाचाच राहिला. दिवाळी, शिमगा मकरसंक्रांत इत्यादि समारंभ हल्लींप्रमाणें पूर्वींहि होत असत; परंतु ते सणवजा असल्यानें त्यांस राष्ट्रीय महोत्सवाचें स्वरूप येण्यासारखें त्यांत विशेष कांहीं नव्हतें. सारांश, महाराष्ट्राच्या राजकीय जीवनाबरोबर राष्ट्रीय महोत्सवहि लुप्तप्राय झाले. ते पुन्हा १८९३सालीं केसरीनें प्रवर्तित केले व त्याबरोबरच महाराष्ट्राच्या राजकीय व सामुदायिक जीवनास पुन्हां सुरवात झाली.

हे उत्सव सुरू करण्यास अमुक एक कारण घडलें असें केसरीकारांनीं स्पष्ट शब्दांत लिहिलेलें आढळत नाहीं. किंबहुना तो कालच ध्वन्यर्थानें बोलण्याचा होता. सर्वसामान्य समाज अत्यंत दुर्बळ, भेकड, बुद्धिहीन व उदासीन बनला होता. सामुदायिक किंवा राष्ट्रीय जीवनाची ज्योत नाहींशी झालेली होती. इंग्रजी सत्तेची पकड पुरी बसल्यामुळें सर्व वातावरण निराशामय झालेलें होतें. अशा वेळीं समाजांत चैतन्य उत्पन्न करावयाचा कोणताहि प्रयत्न धर धरीत नाहीं. कै० विष्णुशास्त्री चिपळूणकरादिकांनीं लोकांवर व सरकारावरहि एकसारखे कोरडे ओढले; परंतु समाजावरील झांपड गेली नव्हती. सुशिक्षितांनीं पुढें राष्ट्रीय सभा काढली व सुशिक्षित समाज तदितरांहून दूरावंत चालला. अशा वेळीं सर्वसामान्य

समाजापुढें राष्ट्रीय महोत्सवाचा कार्यक्रम केसरीनें मांडला; व त्यास कालांतरानें केवढें स्थायी व अभिनंदनीय असें यशस्वी स्वरूप प्राप्त झालें तें आज सर्वांस दिसतच आहे.

इ. स. १८९३ च्या गणपति-उत्सवाच्या हकीकतींत गणपति-उत्सव सुधारून वाढविण्याची कल्पना प्रथम निघाली असें म्हटल्याचा उल्लेख आढळतो. हा उत्सव सुरू करण्याचा मुख्य हेतु हिंदु समाजास धर्माच्या पायावर संघटित करून तेजस्वी व प्रतिकारक्षम बनविणें हा होता हें उघड आहे. कारण त्या वेळीं म्हणजे सन १८९०-९४ या सालांत महाराष्ट्रभर हिंदुमुसलमानांच्या दंग्यांची सांथच उद्भवली होती. प्रथम प्रभासपट्टण येथें दंगा झाला; व पुढें लौकरच म्हणजे ता. ११ ऑगस्ट १८९३ रोजीं मुंबईस फारच मोठ्या प्रमाणावर दंगा झाला. पुण्यासहि त्याच वर्षी नागोबाच्या पालखीचें निमित्त घडून हिंदुमुसलमानांत मोठी मारामारी झाली. येवल्यासहि दंगा झाला; व पुढें तर तेथें खूनहि पडले. रावेर, आळंदी, तळेगांव, वाई, धुळें इत्यादि अनेक ठिकाणीं दंगे झाले व या सर्वांस कारणें मशिदीवरून वाद्यें वाजविणें, गोवध इत्यादि नेहमींचींच होतीं! ह्या सर्व प्रसंगीं हिंदूंची बाजू न्यायाची असावी, मुसलमानांनीं प्रथम आगळीक करावी व मुसलमानांच्या अन्यायाच्या पक्षाचाच सरकारानें पाठपुरावा करून हिंदु लोकांना शिक्षा कराव्या असा क्रम सुरू होता. हिंदु लोकांवर होणारा हा अन्याय व जुलूम केसरीकारांस सहन झाला नाहीं. त्यांनीं ह्या विषयावर त्या वेळीं अतिशय कडक व सडेतोड अग्रलेख लिहिलेले आढळतात. केसरीनें हिंदूंची न्यायाची बाजू सिद्ध केली, मुसलमानांचा उद्दामपणा व धटाई आणि मारामारी करण्याची प्रवृत्ति उघड करून दाखविली; व लोकांमध्यें आपापसांत भेद पाडून त्यांचें सामर्थ्य खची करण्याच्या दृष्टीनें सरकार मुसलमानांना कसें शेफारूं देत आहे हें उघड केलें. ह्या सर्व गोष्टींचा त्या वेळच्या समाजावर चांगला परिणाम झाला व अशा रीतीनें संतप्त झालेल्या समाजांत केसरीकारांनीं श्रीगणेत्सवाच्या राष्ट्रीय महोत्सवाचें बीज पेरल्याबरोबर तें तावडतोब रुजलें गेलें.

अशा रीतीनें लोकसमाजाचें धुरीणत्व केसरीकारांकडे जात चाललेलें कित्येकांना आवडलें नाहीं. त्यांनीं त्यांवर अनेक आक्षेप घेतले. सुशिक्षित म्हणविणारांनीं केसरीकारांची थट्टा व उपहास करण्यास सुरवात केली. परंतु ती उलट त्यांजवरच आंगलट आली. अँग्लोइंडियन लोकांनीं ब्राह्मणब्राह्मणेतर वादाचा बिबा घालून पाहिला; परंतु गणपतीच्या कृपेनें ह्या उत्सवांत ब्राह्मणेतरांनींच इतक्या मोठ्या प्रमाणांत भाग घेतला कीं, यांत 'ब्राह्मणांचा कावा आहे' असें म्हणणाऱ्या लोकांवरच परस्पर तो उलटला. हा उत्सव वर्षानुवर्ष इतक्या व्यापक प्रमाणांत वाढत गेला कीं कालांतरानें त्यावरील सर्व आक्षेप आपोआप गळून पडून सरकारनेंहि त्याजवरील आपली वक्रदृष्टि बरीच सरळ केली.

हा उत्सव सुरू करण्याचें तात्कालिक कारण वर उल्लेखिलेल्या हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत सांपडतें. मुसलमानांनीं हिंदूंवर हल्ला करावा, मूर्ति फोडाव्या, व त्यांचा प्रतिकार हिंदूंना करतां येऊं नये, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें त्यांतून वाट काढण्याच्या हेतूनें व हिंदुसमाजाला प्रतिकारक्षम बनविण्यासाठीं त्या वेळीं हा उत्सव सुरू करण्यांत आला. मुसलमान जर हिंदूंच्या मूर्ति फोडतात, तर हिंदूंनीं मुसलमानांच्या ताबुतापुढें नाचूं नये व मुसलमानांचे उत्सव साजरे करण्याचें बंद करून त्याऐवजीं तितकेच दहा दिवस चालणारा श्रीगजाननाचा उत्सव साजरा करावा अशी ती योजना होती. व म्हणूनच कित्येक सरकारपक्षीयांनीं हा उत्सव हिंदुमुसलमानांत भांडणें माजविण्याकरतां सुरू केला आहे असें त्यावेळीं जोराजोरानें प्रतिपादन केलें आहे. परंतु मुसलमानांच्या तोडीस तोड म्हणून जरी हा उत्सव त्यावेळीं सुरू करण्यांत आला, तरी हा उत्सव पूर्वपरंपरेंत चालू होता व म्हणून आपल्या देवतेचा उत्सव करण्याचा प्रत्येकास हक्कच आहे, असें सांगून केसरी पुढें म्हणतो—' गणेशोत्सव मुसलमानांना चिडवण्याकरतां काढला, असा ' आरोप करण्यांत येतो; पण जर मुसलमान हिंदूंच्या न्याय्य हक्कांवर उठल्या-' बसल्या दंडेलीनें आक्रमण करूं लागले तर गणेशोत्सव निर्माण करून हिंदूंचीं ' मनें मुसलमानांच्या ताबुतापासून परावृत्त करणें यांत कांहीं एक चूक नाहीं. ' ( २२-९-९६ ).

हा उत्सव सुरू करण्याचें तात्कालिक कारण जरी हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत व मुसलमानांच्या दांडगाईच्या प्रतिकारांत असलें, तरी त्याचें मुख्य उद्दिष्ट हिंदुसमाज बलवान् करण्याचें होतें यांत शंका नाहीं. या हेतूसंबंधानें लिहितांना केसरीकार म्हणतात, ' कोणत्याहि लोकांत ऐक्याची वृद्धि होण्यास जीं अनेक ' साधनें असतात, त्यांपैकींच एक उपास्य दैवत असणें हें एक कारण आहे. ' ( ३-९-१८९५ ). केसरीकार पुढें म्हणतातः—' राजकीय उपास्यदैवत एक ' असल्यानें जितका फायदा व्हावयाचा, तितका हल्लीं होत आहे; व आमच्या ' मतें धार्मिक उपास्यदैवत एक असल्यानें तोच फायदा दुप्पट होण्याचा संभव ' आहे. ' ( कित्ता ).

हें धार्मिक उपास्यदैवत ठरवितांना केसरीकारांनीं त्या स्थानीं सुखकर्त्या व विघ्नहर्त्या गणपतीची स्थापना केली, यांत त्यांचें चातुर्य व दूरदृष्टि दिसून येतें. महाराष्ट्रांत त्या वेळींहि धार्मिक उपास्यदैवतें थोडींथोडकीं नव्हतीं. पंढरपुरास आषाढीस व कार्तिकीस प्रचंड जनसमूह जमून धार्मिक महोत्सव साजरा करीत होता. महाराष्ट्रांत आळंदी, देहू, चिंचवड, इत्यादि शेंकडों तीर्थक्षेत्रें साधुसंतांच्या सहवासानें पुनीत झालेलीं असून तेथें त्यांच्या पालख्यांच्या रूपानें महोत्सव होत असत. तथापि हे उत्सव सामुदायिक होत असले तरी ते सार्वत्रिक होत नसत. उलट गणेशोत्सवाची बाब यांहून वेगळी होती. महाराष्ट्रांत पेशवाईपूर्वकाळापासून दरसाल भाद्रपद

महिन्यांत घरोघर गणपतीची स्थापना होत असे. पुढें पेशवाईत त्याचें खाजगी स्वरूप वाढतां वाढतां इतकें वाढलें कीं पेशव्यांचा गणपति-उत्सव म्हणजे त्यावेळीं तो महाराष्ट्राचा नव्हे, तर अखिल भरतखंडाचा महोत्सव समजला जात असे. या उत्सवांत विद्या व कला यांचा गौरव करण्यांत येत असे. परंतु कालांतरानें पेशवाईबरोबर उत्सवाचें वाढतें स्वरूप नाहींसें झालें तरी त्याचें मूळचें स्वरूप कायम होतें. तेव्हां पंढरपुरासारख्या क्षेत्रविशेषीं सामुदायिक रीत्या होणाऱ्या उत्सवांना सार्वत्रिक रूप देण्यापेक्षां सार्वत्रिक होणाऱ्या गणेशोत्सवास सामुदायिक—सार्वजनिक स्वरूप देणें जास्त सुकर व योग्य होय हें केसरीनें बरोबर ताडलें. कारण सामुदायिक उत्सवांना लागलेलें विशिष्ट वळण मोडून त्यांत कमीजास्त करणें व राष्ट्रीय दृष्टि त्यांत उत्पन्न करणें हें दुःसाध्य होय असें केसरीचें स्पष्ट मत होतें. उदाह० ' वर्षांतून दहा दिवसच का होईना, पण एका प्रांतांतील सर्व हिंदु लोकांनीं एका ' देवतेच्या उपासनेंत गढून गेलेलें असावें ही कांहीं लहान सहान गोष्ट नव्हे. ' (३-९-१८९५) ' केसरीकार पुढें म्हणतात; पंढरीच्या उत्सवासारखा एकादा ' दुसरा उत्सव सर्व लोकांना प्रिय होण्यासारखा आहे. पण हे उत्सव अथवा ' यात्रा पुरातन असल्यानें त्यांचें स्वरूप आपणांस पाहिजे तशा स्वरूपाचें करणें ' अशक्य नसलें तरी बहुतेक असाध्य आहे असें म्हटलें तरी चालेल. त्यांतून जो ' सार्वजनिक उत्सव असावयाचा तो ठिकठिकाणच्या लोकांस आपापल्या गांवीं ' करतां येण्यासारखा असला पाहिजे. तसा प्रकार यात्रेचा नाहीं. ही उणीव ' गणपतीच्या उत्सवानें नाहींशी होईल अशी आमची समजूत आहे. ' (कित्ता).

यावरून सामुदायिक पण सार्वत्रिक आणि नवीन वळणाच्या राष्ट्रीय दृष्टीच्या उत्सवाची केसरीकारांना आवश्यकता वाटत होती; व ती त्यांनीं गणेशोत्सवाच्या द्वारें पुरी केली, हें स्पष्ट दिसून येतें. याशिवाय मुसलमानी किंवा खिस्ती लोकांच्या जशा सामुदायिक प्रार्थना होतात, तसा प्रकार हिंदु समाजांत रूढ व्हावा अशी केसरीची मनीषा होती. केसरी म्हणतो ' खिस्ती किंवा मुसलमानी धर्मांत ' सार्वजनिक प्रार्थनेची जी पद्धत आहे त्यापासून त्या धर्मांतील लोकांना जो ' फायदा होतो, तशाच प्रकारचा फायदा दहा दिवसांचा गणपत्युत्सव सार्वजनिक ' झाल्यानें हिंदु लोकांस होईल अशी आमची खात्री आहे.' ( कित्ता ). परंतु गणेशोत्सव जरी धार्मिक उत्सव असला, तरी त्यास राष्ट्रीय स्वरूप प्राप्त व्हावें, त्यासाठींच त्याचा उपक्रम होता. केसरी म्हणतो ' गणेशोत्सवास राष्ट्रीय स्वरूप ' यावें अशी केसरीकारांची इच्छा आहे. ' (२२-९-९६).

या इच्छेबरोबरच लोकांना व्याख्यानें, प्रवचनें, कथाकीर्तनें, मेळे व त्यांतील पदें इत्यादिकांच्या साह्यानें लोकांना धर्मशिक्षण व देशपरिस्थितीचें ज्ञान देऊन विचार करण्याला लावावें हाहि दुसरा प्रमुख हेतु होता. केसरीकार म्हणतातः— ' श्रीगणेशोत्सवांत ज्ञानसत्र सुरू करून अज्ञ देशबांधवांना सज्ञान करण्याचा जो

' एक दुसरा हेतु हा उत्सव सुरू करण्यांत होता, तोहि फलद्रूप होऊं लागण्या-
' चीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. ' ( २८-९-२० ).

या उत्सवांत धार्मिक उन्नतीबरोबर सामाजिक सुधारणेच्या धोरणानुसार केसरीनें पुष्कळच पुढाकार घेऊन अग्रेसरत्व मिळविलें होतें. अस्पृश्यांच्या मेळ्यांना आपल्या गणपतीपुढें येऊं देणें त्यांच्या गणपतीपुढें केसरीकारांनीं व्याख्यानें देणें मिरवणुकींत त्यांच्या गणपतीस महत्त्वाचें स्थान प्राप्त करून देणें या बाबतींत केसरीचें साहाय्य असे. १९२४ सालीं अस्पृश्यतानिवारक मंडळातर्फे गणपतीची स्थापना करण्यांत आली व पुढें अस्पृश्यांचा एक मेळाहि निघाला होता. ' विसर्जनाच्या मिरवणुकीच्या संबंधानें लिहितांना ह्याबाबत केसरीकार म्हणतातः—
' मिरवणुकीच्या समारंभांतहि अस्पृश्यतानिवारक मंडळाच्या गणपतीबरोबरच
' अस्पृश्यांचे इतर गणपति कोणताहि भिन्नभाव न दर्शविता सामील झाले होते.
' या गणपतीपुढें चांभारांचा व मांगांचा असे दोन भजनी मेळे चालले होते.
' आणि इतर वर्गांतील शेंकडों प्रेक्षक हा मेळा पाहण्यास व भजन ऐकण्यास
' उत्सुकतेनें येत असत. सारांश, नुकत्याच होऊन गेलेल्या हिंदुधर्मपरिषदेंत
' सार्वजनिक कार्यांत व सार्वजनिक जागीं स्पृश्यास्पृश्य भेद मानण्यांत येऊं नये
' अशी शिफारस केली होती, तिची बजावणी बऱ्याच अंशानें करण्यांत आली
' ही गोष्ट अत्यंत समाधानकारक आहे.' ( १६-९-२४ ).

सारांश मुसलमानांच्या ताबूतांस तोंड म्हणून, हिंदु लोकांत धर्माभिमान उत्पन्न व्हावा, संघटना व्हावी, बळ वाढावें व प्रतिकारक्षमता यावी म्हणून, सामुदायिक व सार्वत्रिक आणि राष्ट्रीय स्वरूपाच्या श्रीगणेशोत्सवाचा उपक्रम केसरीकारांनीं त्या प्रतिकूल कालांत केला; व तो यशस्वी व चिरंजीव होण्याकरतां अटोकाट प्रयत्न केले. आज तो कसा चिरस्थायी व सार्वदेशीय झाला आहे हें आपण पाहातोंच. ह्या सर्वांचें श्रेय केसरीकार व त्यांचे स्नेही यांसच आहे.

आरंभीं आरंभीं या उत्सवास फार विघ्नें आलीं. उत्सव सुरू झाला व पुण्यास लौकरच प्लेगोबानें आपलें ठाणें दिलें. गणपतीनें प्लेग आणला असें भाविक लोक बोलूं लागले. ' जणूं काय प्लेग आणि गणपति हे दोन्ही ओपोर्टोंत किंवा हांग-
' कॉंग येथें बरोबरच होते ! ' ( २६-९-९८ ). कोणी गणपतीचें दैवत कडक व सोवळें; त्यास विटाळ खपत नाहीं असें प्रतिपादन करून उत्सवास विरोध दर्शविला; परंतु ' तुमच्या पंचायतनांतले गणपति काढून चवाठ्यावर मांडण्यास कोणी सांगत नाहीं ' ( २६-९-९८ ) असें त्यास केसरीनें उत्तर दिलें. सारांश स्वकीयांच्या व परकीयांच्या, भोळ्या भाविकांच्या व नास्तिक सुशिक्षितांच्या, मुसलमानांच्या व अँग्लोइंडियनांच्या आणि सर्वसमर्थ अशा सरकाराच्या विरोधास कधीं तोंड देत तर कधीं बगल देत, कधीं विरोध करून तर कधीं विरोधाला मान देऊन केसरीनें गणेशोत्सवाचा अंकुर महाराष्ट्रांत रोविला, व त्याची

अपेक्षेप्रमाणें फलद्रूपता आलेलीहि त्यांना पाहण्यास मिळाली. १९०५ सालच्या गणेशोत्सवासंबंधानें केसरीकार लिहितात ( १२-९-१९०५ ) 'आज
' सायंकाळची मिरवणूक व विसर्जनसमारंभ झाला म्हणजे यंदांचा श्रीगणपत्यु-
' त्सव समाप्त होईल. उत्सवाचे दिवाभीततुल्य आक्षेपक कांहींहि म्हणोत व
' शिळे आक्षेप आणि उष्टे कुतर्क दरसाल चघळीत बसणारें श्वानमंडळ कितीहि
' भुंको, मंगलमूर्तीच्या या उत्सवांत सर्व महाराष्ट्रभर होणारीं व्याख्यानें व
' पुराणें, भजनें व कीर्तनें आणि मेळ्यांचीं पद्यें, या सर्वांच्यामुळें लोकांच्या
' मनास विशिष्ट प्रकारचें वळण व शिक्षण मिळत चाललें आहे हें कोणाच्याहि
' लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. '

गणेशोत्सवाचीं मुख्य अंगें तीन. व्याख्यानें—प्रवचनें, मेळे व मिरवणुकी. पैकीं व्याख्यानांना सरकारनें हरकत घेतल्याचें फारसें कोठें दिसत नाहीं. कारण एक तर इं. पी. कोडाची तरवार त्यांच्या डोक्यावर टांगलेली होतीच. व शिवाय या व्याख्यानांचे विषय बव्हंशीं धार्मिक, सामाजिक किंवा अर्धराजकीय असत. त्यामुळें येथें सरकारास फारसें बोट शिरकावितां आलें नाहीं. परंतु मेळे व मिरवणुकी यांना मात्र सरकारनें मनसोक्त छळलें. मेळ्यांना पासांचें नियंत्रण घातलें, रस्त्यानें पदें म्हणण्याबाबत अटी घातल्या, जीं पदें म्हणावयाचीं तीं अगोदर सरकारी कमिटीनें मान्य केलेली असली पाहिजेत असें ठरविलें. मेळ्यांत कोणकोण येतात, त्यानें केव्हां हिंडावें, कोठें हिंडावें, रस्ता कोणता, रस्त्यानें काय म्हणावें व गणपतीपुढें काय म्हणावें याबद्दल बंधनें घालून मेळ्यांची अडवणूक व कुचंबणा केली; व थोड्याबहुत प्रमाणांत ती अजूनहि अस्तित्वांत आहेच.

तथापि या मेळ्यांनीं सरकारला दाद दिली नाहीं. गणेशोत्सवांत लोकांचें चित्त वेधण्यासारखा जर कोणता एखादा विशेष महत्त्वाचा भाग असला तर तो मेळ्यांचाच होय. पुण्यास ' सन्मित्र समाज मेळा ' पहिल्यानें निघाला, व त्यानें त्यावेळीं जें राष्ट्रीय वळण घालून दिलें, तें इतक्या वर्षांनंतर आजहि जवळजवळ अबाधित आहे. ह्या मेळ्यांतील मेळेकऱ्यांवर व पदांवर सरकारची खप्पा मर्जी होऊन त्याबाबत कै. सदाशिवराव लवाटे यांजवर खटलाहि झाला होता. १९०४-५ सालीं व पुढेंहि कांहीं दिवस नाशकासहि कवि गोविंद यांनीं मेळा काढून त्याचा कार्यक्रम पुण्यास केला व तो फारच उत्कृष्ट झाल्याचें वर्णन केसरीनें केलें आहे. कालेंकरून मेळ्यांची संख्या वाढली. मेळ्यांचा सरंजाम वाढला व थाटमाटहि वाढला. लोकसमुदाय एकत्र जुळवून त्यास गणपतीच्या भजनीं लावण्यास व लोकांचें चित्त आकर्षण करून त्यांस राष्ट्रीय वळण लावण्यास मेळ्यांनीं केलेली कामगिरी ही सर्वांत मोठी होय. मेळ्यांतील पदें गानप्रधान नसून अर्थप्रधान असत. धार्मिक, सामाजिक व राजकीय जागृति करण्याचें कार्य ह्या मेळ्यांनीं पोवाड्यांप्रमाणें केलें असें म्हटलें म्हणजे मेळ्यांचें खरें स्वरूप वाचकांच्या ध्यानीं

येईल. खेड्यापाड्यांतहि हा गणेशोत्सवांतील त्रिविध कार्यक्रम शक्यनुसार होऊं लागला.

मेळ्यांप्रमाणेंच मिरवणुकींनाहि सरकारनें निर्बंध घातले. मिरवणुकींतल्या प्रत्येक मेळ्यानें पास घेतलाच पाहिजे असे. त्याचप्रमाणें मशिदीपुढें वाद्यें वाजविण्याच्या बाबतींत अत्यंत जुलमी व अन्याय्य निर्बंध घालून हिंदूंचा उपमर्द केला; व कित्येक ठिकाणीं त्यामुळें तंटे उत्पन्न होऊन मिरवणुकी अडल्या व गणपति-विसर्जनहि राहिलें; परंतु या सर्वांस वळसे देऊन हा उत्सव आजपर्यंत नुसता टिकला एवढेंच नव्हे तर सरकारास पुरून उरला. प्रारंभापासूनच त्याची जी वाढ होत गेली, तिला खळ म्हणून पडला नाहीं. आरंभीं आरंभीं पुण्यास प्लेगमुळें प्रयत्न करूनहि गणपति-उत्सवास विशेष भव्य स्वरूप आलें नाहीं; परंतु ह्या दैवी आपत्ति दूर होतांच पुण्याचा गणपति-उत्सव जोरानें वाढला व त्यास भव्य स्वरूप प्राप्त झालें. परंतु आरंभापासूनच महाराष्ट्रांतल्या बहुतेक प्रत्येक मोठ्या शहरीं गणेशोत्सव होऊं लागला होता. व आतां तर त्याचा प्रदेशविस्तार इतका वाढला आहे कीं जेथें जेथें म्हणून महाराष्ट्रीयांची वस्ती आहे, मग ती मद्रासेस असो किंवा पंजाबांत असो, कलकत्त्यास असो किंवा कराचीस असो, फार काय, पृथ्वीच्या पाठीवर—दाक्षिण आफ्रिका, इराण इत्यादि कोणत्याहि ठिकाणीं असो, तेथें तेथें श्रीगणेशोत्सव हा महाराष्ट्राचा राष्ट्रीय महोत्सव म्हणून साजरा करण्यांत येतो. १९२० सालीं लोकमान्यांच्या निधनानंतर लगेच आलेल्या श्रीगणेशोत्सवासंबंधानें लिहितांना केसरीकार म्हणतातः—‘ या उत्सवासंबंधानें आतांपर्यंत ‘ जी हकीकत आमचे हातीं आली आहे, ती पाहतां या उत्सवाचे आद्यप्रवर्तक ‘ लो. टिळक यांच्या पश्चातहि हा उत्सव नेटानें व उत्तम रीतीनें चालेल असें ‘ सुचिन्ह दिसत आहे. ’ ( १८-९-२० ).

---

# भौतिकशास्त्रें आणि उद्योगधंदे

[ श्री. मोहिनीराज शंकर मुळे, एम्. ए. ]

आपल्या पाहिल्याच वर्षाचे १६ वे अंकांत ‘ आमच्या निकृष्ट स्थितीस कारण कोण ! ’ ( १९-४-८१ ) हा सुंदर लेख केसरीनें प्रसिद्ध केला आहे. लेखाचा आरंभच ‘ आपलाच दाम खोटा दुसऱ्यास बोल काय म्हणून ! ’ या अर्थपूर्ण

आणि अखिल हिंदुस्थानच्या दुःस्थितीचें खरें कारण सांगणाऱ्या म्हणीनें केला आहे. ही कारणमीमांसा करतां करतां पुढें ' आपला देश भिकारी होण्याचें ' कारण तरी आमचेंच औदासीन्य आणि स्वदेशकल्याणाविषयींची अनास्था हीच ' एका प्रकारें नव्हत काय ? ' ( १९-४-८१ ) असा सूचक प्रश्न करून त्याचें एक ठळक उदाहरण म्हणून ' देशी कपड्यांचें ' उदाहरण दिलें आहे. ' परदेशां-' तून येणाऱ्या कापडावरील जकात सरकारनें माफ केली, त्यामुळें इकडील ' गिरणीवाल्यांचें नुकसान होत आहे. तें न होण्यास इकडील लोकांनीं स्वदेशी ' कापड वापरण्याचा निश्चय केला तर लाखों रुपये त्यानिमित्त परदेशांत जात ' आहेत ते बंद होणार नाहींत काय ? पण त्याविषयीं स्वदेशहितार्थ तनमनधन ' अर्पिणाऱ्या अशा कै० गणेश वासुदेव जोशासारख्या पुरुषांनीं जंगजंग पछा-' डलं, पण त्याचा कितपत उपयोग झाला ? ' असें विचारून आणि आपलेच अधिकारी निव्वळ साहेबांची मर्जी संपादण्याकरितां खोटें सांगून आपल्याच गरीब लोकांचें कसें निष्कारण नुकसान करितात, याविषयीं उदाहरणें देऊन केसरीनें आपल्याच ' खोट्या दामा 'बद्दल खेद प्रदर्शित केला आहे.

' हिंदुस्थान आपल्या दारिद्र्यांतून आणि दारिद्र्यान्तर्गत दुःस्थितींतून कसा ' सुटेल ? ' हा प्रश्न सन १८८१ सालीं जितका तीव्र होता तितकाच किंबहुना तीव्रतर आज १९३० सालीं झाला आहे. या प्रश्नाला चालना देऊन, हिंदु-स्थानच्या दारिद्र्याची आणि दुःस्थितीची कारणत्रयी केसरीनें ' आम्ही आमच्या ' दारिद्र्यांतून कशानें सुटूं ? '( ३ ते २४-१-८२) या लेखमालेंत सप्रमाण दिली आहे. दारिद्र्याचें आणि सर्व प्रकारच्या हीन स्थितीचें प्रथम कारण ' आळस ' आणि ' अज्ञान ' हें दिलें आहे. दुसरें आणि अधिक महत्त्वाचें कारण—' आपण ' ( कच्ची संपत्ति ) उत्पन्न करितों, पण ती सारी ( अल्प मोबदल्यानें ) दुसरा ' कोणी काढून नेतो,' (३-१-८२) असें दिलें आहे. हींच कारणें आजलाहि हिंदु-स्थानांत आपला प्रताप पूर्णपणें गाजवीत आहेत, आणि त्यामुळें दारिद्र्य येथें कसें सार्वभौम राज्य करीत आहे ! ' इंग्लंड देशांतलीं विपुल द्रव्यें म्हणाल ' तर लोखंड आणि कोळसे ! पण कलाकौशल्याचे जोरावर तो देश आज बहु-' तेकांस संपत्तींत मागें टाकीत आहे. आणि आम्ही ! अं ! ! सर्व द्रव्यें भरत-' खंडांत विपुल असून अखेरीस ठणठणपाळ ते ठणठणपाळ !!' ( कित्ता ). ' आम्ही खंडीच्या खंडी मूळ द्रव्यें उत्पन्न करावीं, आणि तीं दुसऱ्या राष्ट्रांनीं ' जहाजें भरूभरून न्यावीं. आणि त्यावर कुशलतेची करामत करून ती पुनः ' आम्हांकडे विकण्यास आणावीं व हवे तसे पैसे मिळवावेत, ही केवढी दुःखाची ' गोष्ट होय ! आमच्या देशांतला कापूस बाहेर जाऊन इंग्रजी कोष्ट्यांची दिवाळी ' व्हावी, आणि आमच्या कोष्ट्यांनीं टाचा घाशीत उपाशी मरावें, हें आम्हांस ' लाजिरवाणें नाहीं काय? ' ( १०-१-८२ ). अशा प्रकारचा अंतःकरणास

भिडणारा प्रश्न करून लेखांतच त्यावर उपाययोजनाहि स्थूलपणें पुढील प्रकारें सुचविली आहे. 'व्यापारांत शत्रू हटविण्याचा खरा उपाय म्हणजे माल अशा 'तऱ्हेनें उत्पन्न करावयाचा कीं, शत्रूपेक्षां सवंग दरानें विकता यावा. असें 'होण्यास जेथें मूलद्रव्यें उत्पन्न होतात, तेथल्या तेथें त्यांना पुढचीं रूपांतरें देऊन 'त्यांच्या उपयोगाच्या चिजा बनल्या पाहिजेत.' ( किता ). आमच्या हिंदी डॉक्टरांना, एंजिनिअरांना, रसायनशास्त्रज्ञांना, व्यापाऱ्यांना त्या त्या संज्ञा मुळींच शोभत नाहींत. इंग्लंडचा, जर्मनीचा किंवा अमेरिकेचा येईल तो माल येथें खपवावा, त्याचे पैसे त्या त्या देशांना पाठवून द्यावे, आणि केवळ विक्रीच्या श्रमाबद्दल आमच्याच देशांतील गरीब लोकांच्या खिशांतील पैसे काढून घेऊन ते आपल्या खिशांत घालवेत अशीच आमच्या डॉक्टरांची, एंजिनिअरांची, रसायनशास्त्रज्ञांची आणि व्यापाऱ्यांची स्थिति आहे. ही केवढी शोचनीय गोष्ट होय !! असली ही दलाली किंवा दुकानदारपणा सोडून येथल्या येथें आपल्या हिंदुस्थान देशांत कच्च्या मालापासून चांगला पक्का माल उत्पन्न करण्याकडे साहस, बुद्धिसामर्थ्य व द्रव्य लावल्यास हिंदुस्थान देशाची धडगत आहे असें ५० वर्षांपूर्वीच केसरीनें स्पष्ट बजावलें आहे. दुर्दैवानें, जगांतील अत्यंत संपन्न, समर्थ, समंजस राष्ट्रानें सव्वाशें वर्षें राज्य केल्यावरहि आजला हिंदुस्थानची हीच भाडोत्रीपणाची, दलालीची आणि दारिद्र्याची दुःस्थिति आहे ! इंग्लंडचा त्या वेळचा म्हणजे सन १८८० च्या सुमाराचा दर माणशीं व्यापार २०२ रुपयांचा होता; आणि हिंदुस्थानचा दर माणशी ४ रुपयांचा !! केवढा प्रचंड व्यापार ! आणि इंग्लिश अमलाखालील हिंदुस्थानचो केवढी ही संपन्नता !! आजची स्थिति पाहावी, तर तीहि दुःस्थितीची आजी शोभण्यासारखी ! १९१९ सालीं इंग्लंडचा दर माणशीं व्यापार सुमारें ५६० रुपयांचा आणि हिंदुस्थानचा—ब्रिटिश राजवटींत सर्व बाजूंनीं कल्याण आणि प्रगति होत असलेल्या हिंदुस्थानचा—सवंध १० रुपयांचा !! रुपयांची किंमत बाजारांत आठ आणेहि नाहीं, ही गोष्ट पुनः निराळीच !!!

'विद्यार्थी-चांगले बुद्धिमान्, तेजस्वी आणि कर्तव्यक्षम विद्यार्थी परदेशांस जरूर ते 'बहुमोल उद्योगधंदे शास्त्रशुद्ध रीतीनें शिकण्याकरितां दरसाल पाठवावेत. साहसी 'व्यापाऱ्यांनीं, कारखानदारांनीं, बंगाल्यांतील जमीनदारांनीं, संस्थानिकांनीं या देश-'कल्याणप्रद कामास अवश्य अंतःकरणपूर्वक साहाय्य करावें. शिकून तयार 'होऊन आलेल्या विद्यार्थ्यांस येथें आपल्या देखरेखीखालीं योग्य भांडवलावर 'कारखाने काढून द्यावेत; आणि लोकांनीं या कारखान्यांमधून निघणारा माल 'देशी म्हणून निश्चयपूर्वक वापरावा,' इत्यादि हितपरिणामी सूचना केसरीनें त्याच वेळीं मोठ्या दूरदृष्टीनें केल्या आहेत. ( १०-१-८२ ). त्या आजच्या

५० वर्षांनंतरच्या परिस्थितींतहि हिंदुस्थानास ‘ हिंदी उद्योगधंद्याचे उत्पत्तीसाठीं आणि प्रगतीसाठीं ’ हितप्रदच आहेत, हें कोणीहि विचारी वाचक सांगूं शकेल.

हिंदुस्थानासारख्या नानाविध आणि बहुमोल कच्चीं द्रव्यें दरवर्षी विपुलतेनें उत्पन्न करणाऱ्या देशास शास्त्रसिद्ध उद्योगधंद्याशिवाय आणि खऱ्या व्यापाराशिवाय तरणोपाय नाहीं. ‘ हिंदी लोकांस कारखाने काढण्याची चटच लागली ‘ नाहीं. त्यामुळें आमचे पराकाष्ठेचें नुकसान होत आहे. साबण, अर्क, तेलें, ‘ औषधें, जाड कागद, चाकू, कातऱ्या, वस्तरे, काड्याच्या पेट्या, मेणबत्त्या, ‘ साखर इत्यादि जिनसांचे जागोजाग कारखाने घातले, तर व्याजानें रुपये ‘ लावण्यापेक्षां त्यास कमी फायदा पडणार आहे, असें नाहीं. पण असल्या शुष्क ‘ कामासहि लागणारें धाडस व माहिती आमच्या लोकांत कोठें आहे ! जे ‘ लोक आपले पैसे बँकेंत टाकून शेकडा ४ रुपये व्याजांत समाधान मानून घेतात, ‘ त्यांनीं लहान लहान कंपन्या काढून, अशा प्रकारच्या कारखान्यांत आपले पैसे ‘ घातले, तर त्यांना निदान बारा रुपये व्याज पडणार आहे;’ (३०-१०-८३), असा खरा उद्योगवर्धक उपदेश करून, आमच्या शहाण्या, समंजस आणि थोड्याशा संपन्न लोकांना केसरीनें कळकळीनें विनंति केली आहे कीं, ‘ त्यांनीं ‘ स्वतः ठिकठिकाणीं जाऊन किंवा आपल्या वतीनें दुसरे शिकलेले व हुशार लोक ‘ पाठवून तेथें जीं नानातऱ्हेचीं यंत्रें असतील, त्यांपैकीं कित्येकांचा या देशांत ‘ उपयोग करतां येईल, याचा शोध करवावा व ते ते कारखाने काढण्याची ‘ साहसानें सुरवात करावी. ’

सारांश, केसरी निःसंदेहानें पुनः पुनः बजावतो आहे कीं, इंग्लंडसारख्या देशाशीं टिकाव धरता येण्यास ‘मजूर’ आणि ‘ कच्चा माल ’ या दोन गोष्टींची ‘ विपुलता, अनुकूलता असली म्हणजे पुरें आहे असें नाहीं, तर यंत्रशक्ति, ‘ बुद्धिशक्ति आणि इतर साऱ्या शक्तीहि मोठ्या कौशल्यानें उपयोगांत आणल्या ‘ पाहिजेत. ’ ( ६-११-८३ ).

हिंदी उद्योगधंद्यांच्या उत्पत्तीसाठीं आणि प्रगतीसाठीं ‘ स्वदेशी,’ ‘ शास्त्रकलाभ्यास,’ ‘ यंत्रसाहाय्य,’ ‘ भांडवल,’ ‘ ऐक्य ’ आणि ‘ कारखाने ’ इत्यादि स्वरूपाचीं स्वतंत्र साधनें आणि उपाय सांगितल्यावर ‘ संरक्षित आणि अप्रतिबंध व्यापार ’ इत्यादिसारखीं प्रस्तुत परिस्थितींत पुष्कळशीं परतंत्र अशीं जीं उद्योगवृद्धीचीं साधनें त्यांचीहि केसरीनें अनेक लेखांमधून योग्य मीमांसा केली आहे. उद्योगधंद्यांचे बाल्यावस्थेंत ‘ संरक्षित व्यापार ’ आणि उद्योगधंद्यांचे शास्त्रशुद्ध आणि अप्रतिबंध भरभराटीचे काळीं ‘ अप्रतिबंध व्यापार ’ हें अगदीं साधें व्यापारवृद्धीचें तत्त्व आहे. तथापि तें अद्यापिहि हिंदी व्यापारास लाविलें जात नाहीं ! आहे कीं नाहीं सरकारला हिंदुस्थानाच्या पोटापाण्याची खरी काळजी ! ‘ परदेशी कापडावर जकात बसविण्याची आणि हिंदी कापडावरील

'प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष जकात उठविण्याची खटपट करणें आमचे व्यापाऱ्यांना,
'कारखानदारांना फारच अवश्य आहे. भांडण सुरू झाल्यावर इंग्रजी कापड
'न वापरण्याचा, इंग्रजी कोणताहि माल न घेण्याचा आणि शक्य तों हिंदी
'मालावरच सर्व काम भागविण्याचा हिंदी लोकांनीं अभेद्य निश्चय केला पाहिजे.'
(२५-१-८१). हें अमेरिकेचें उदाहरण देऊन आणि आपल्या अमोघ लेखणीनें व दृष्टान्तांनीं अनेक लेखांतून वाचकांचे मनावर बिंबविण्याचा केसरीनें सुसंगत प्रयत्न केला आहे. हिंदी उद्योगधंद्यांची खरी उत्पत्ति आणि खरी प्रगति करावयाची असेल, तर त्यास एकच द्विविध उपाय आहे. आणि तो असा कीं, हिंदुस्थानांत येणाऱ्या परकी मालावर एवढी जकात ठेवावयाची कीं, परकी व्यापाऱ्यास निव्वळ नुकसान करून घेतल्याशिवाय, आपला माल विकताच येऊं नये; आणि त्या त्या जिनसांचे कारखाने, प्रथम कांहीं वर्षें झीज सोसूनहि, चांगल्या शास्त्रशुद्ध पायावर क्रमाक्रमानें हिंदुस्थानांत प्रस्थापित करावयाचे.

'घरच्या धंद्यास आणि कामगारास उत्तेजन देण्यासाठीं आणि सरकारी
'तिजोरी भरून काढण्यासाठीं, अमेरिकेंत, फ्रान्सांत, जर्मनींत आणि खुद्द इंग्लंड-
'मध्येंहि बाहेरून येणाऱ्या मालावर अद्यापि जकाती आहेत. हिंदुस्थानांत शेतकी-
'च्या वर्षभर पोट न भरूं शकणाऱ्या कामावर असावे त्यांपेक्षां फाजील लोक
'आहेत; त्यांना तिकडून काढून दुसऱ्या उद्योगास लावले पाहिजे; ते उद्योग
'नीट चालून त्यांत घातलेलें भांडवल बुडूं नये यासाठीं येथील कापडाच्या
'गिरण्यांस आणि इतर कारखान्यांस उत्तेजन देणें हें अवश्य आहे. पण आप-
'मतलबामुळें बुद्धीस जें मांद्य येतें तें कशानें दूर होणार? असाच मतलब साधण्या-
'साठीं लिटनसाहेबांनीं जाड कापडावरील जकात उठविली, व तसें करून
'सरकारी जमा कमी करून घेतली; तिचा बोजा नवीन कराचे रूपानें हिंदुस्थान-
'च्या टाळक्यावर बसला; व इंग्लंडचें कापड स्वस्त झाल्यामुळें मुंबईच्या
'कित्येक गिरण्या ठार बुडाल्या; व त्यांत काम करणारे शेकडों लोक अन्नान्न
'करूं लागले ! हें अप्रतिबंध व्यापाराचें फळ !!' (१९-४-८१ ). ही ५०वर्षांपूर्वी केसरीनें केलेली हिंदी उद्योगधंद्यांच्या दुर्दैवाची मीमांसा, आजला हिंदुस्थानाला 'सुधारणा' मिळाल्यानंतर आणि नवीन पुष्कळच सुधारणा मिळण्याच्या सुकाळींहि तंतोतंत अनुभवास यावी, ही दुर्दैवाची परिसीमा होय ! !

'लोकानुरंजन' आणि तें खोटीं विधानें करून आणि खोट्या भावना उत्पन्न करून करणें, हें वर्तमानपत्राचें काम नव्हे. आणि तें केसरीनें कधीं केलें नाहीं, ही सत्य गोष्ट येथें सांगण्यास खरोखरच मोठा अभिमान आणि मोठें समाधान वाटतें. लोकांना संशोधनप्रवण आणि उद्योगप्रवण करावयाचें, पण तें प्रसंगीं अप्रिय पण पथ्य गोष्टी सांगून आणि खरे उच्च विचार प्रकट करूनच.
'आपण ज्या प्रांतांत किंवा देशांत राहतों, त्यामध्यें सृष्टिजन्य पदार्थसंपत्ति किती

‘ व कोणते प्रकारची आहे, हें समजून घेणें आपलें कर्तव्यकर्म आहे; परंतु हेंहि
‘ काम आपण जोंवर अन्यदेशीयांवर सोपवितों, तोंवर आपला व्यापार, उद्योग
‘ किंवा वास्तविक सुधारणा होण्याची आशाच नको. आपल्या प्रांतांत असणाऱ्या
‘ सर्व प्रकारच्या जमिनीचे व मातीचे मासले मिळविणें, डोंगरांत व जमिनींत
‘ सापडणारे जितके चमत्कारिक दगड वगैरे पदार्थ असतील त्यांचा, सर्व प्रकारच्या
‘ वनस्पतींचा, प्राण्यांचा व त्यांच्या अस्थिचर्मांचा संचय करणें, पिकांची उत्तम
‘ माहिती मिळविणें, हीं सर्व कृत्यें उद्योगी मनुष्याचे हातून सहज घडणारीं
‘ आहेत; व तीं नवीन विद्वानांनीं विशेषेंकरून हातीं घेतलीं पाहिजेत. इतकीं
‘ साधनें जवळ झाल्यावर, शास्त्रप्रयोग व संशोधन करून त्यांचे गुणधर्मपरीक्षण
‘ करून घेणें हें कर्तव्य व तिसरें त्यास व्यावहारिक उपयोगास लावण्याची खटपट.
‘ हा संचय आणि हा शोध प्रत्येक सुजाण मनुष्याचे हातून होण्यासारखा आहे.
‘ परंतु आधुनिक हिंदी विद्वानांस वृथा व्याख्यानांच्या व स्वधर्मद्वेष, चेष्टा आणि
‘ परदेशीयांचें निंद्य अनुकरण, यांच्या पलीकडे जाऊन, शांतपणें सृष्टिचमत्कार
‘ पाहणें, मानवजातीचे कल्याणाची आशा मनीं धरून सृष्टींतील सामर्थ्यांचा
‘ निरभिलाष शोध व संचय करणें या गोष्टी अद्यापि कळूं लागल्या नाहींत;
‘ आणि शास्त्रप्रयोग झाले नाहींत, तोंवर उद्योगाची मूळ साधनेंच नाहींत,
‘ असें म्हणण्यास चिंता नाहीं. जोंवर आपलें भांडवल आपणांस माहीत नाहीं,
‘ तोंवर व्यापारवृद्धीची वृथा आशा बाळगून उपयोग काय ? आणि
‘ आपल्या देशाचे दारिद्र्याबद्दल दुसऱ्यास दोष कां द्यावा ? ’ (२६-१२-८२).

खऱ्या संशोधक आणि शास्त्रशुद्ध काम करणाऱ्या माणसांची जशी हिंदुस्थानास गरज आहे, त्याप्रमाणेंच जागोजाग यंत्रसंग्रहालयें, पदार्थसंग्रहालयें, शास्त्रसंशोधन संस्था, शास्त्रशिक्षण संस्था, कलाप्रयोग शाला, आणि पुष्कळशाच सढळ हातानें दिलेल्या शास्त्रशिष्यवृत्त्या यांचीहि हिंदुस्थानास अत्यंत गरज आहे. यांच्या अभावीं हिंदुस्थानाचें खरें आणि भरभक्कम कल्याण होणार नाहीं. याच विवेकपूर्ण दृष्टीनें ‘ आपलें वैद्यक ’ आणि ‘ रसायनक्रिया ’ या व्याख्यानांत ‘ रसायनशास्त्रज्ञांनीं आणि सुशिक्षित डॉक्टरांनीं
‘ स्वतः पहिल्यानें आपल्या शास्त्राचा नीट अभ्यास करून पूर्वी सांगितलेल्या
‘ साधनांनीं वनस्पतींची संपूर्ण माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे, व जीं
‘ औषधें फार खातरीचीं वाटतील तीं प्रचारांत आणण्यासाठीं सप्रयोग झटलें
‘ पाहिजे. असें केल्यानें आर्यवैद्यकाचे खरें पुनरुज्जीवन केल्यासारखें होऊन,
‘ हल्लीं औषधानिमित्त जे लाखों रुपये विलायतेस व्यर्थ जात आहेत, त्यांपैकीं
‘ बराच भाग येथें वांचविल्यासारखा होईल.’ (२६-७-८१) अशी पूर्ण व्यवहार्य आणि आजलाहि आचरणीय अशी सूचना केसरीनें केली आहे. हें बिकट कार्य आहे,

पण तें केलें पाहिजेच. ' ही शिकण्याची वेळ आहे. प्राचीन व अर्वाचीन वैद्यकां-
' तील सार एकीकडे काढून जेव्हां आपण आपल्या देशाकरितां एखादें कालानुरूप
' वैद्यक तयार करूं तेव्हांच हिंदुस्थानाला खरें आरोग्य प्राप्त होणार आहे' (कित्ता).
असे पुरुषार्थप्रद विचार अनेक लेखमालांमधून केसरीनें प्रदर्शित केले आहेत.
' आपल्या इकडे विश्वविद्यालयें आहेत, तशींच यूरोप व अमेरिकेंतहि आहेत,
' परंतु त्यांची रचना इकडच्यापेक्षां फार भिन्न आहे. इकडील विश्वविद्यालयांत
' ज्यास शास्त्राची खरी आवड व गोडी आहे, अशा लोकांस स्वतंत्रपणें आपलें
' अध्ययन-संशोधन चालवून सुखानें राहता यावें अशी कांहींच सोय नाहीं.
' आणि त्यामुळें अध्ययन-संशोधन करणाऱ्या उत्साही लोकांस येथें कांहींच
' उत्तेजन नाहीं. म्हणून कालेजांत प्रोफेसर बनून राहिलेल्या आणि ऐष-
' आरामांत काळ घालवणाऱ्या किंवा विद्यार्थ्यांजवळ आपली अब्रू कशी बचा-
' वेल या विवंचनेंत असणाऱ्या अशा शिक्षकासच विद्वान्, शास्त्रज्ञ व प्रोफेसर
' म्हणण्याची आम्हांवर पाळी आली, ही स्थिति यूरोप-अमेरिकेंत नाहीं '
( २३-४-८३ ). तिकडे आपल्या ज्ञानानें आणि प्रत्यक्ष कृतीनेंच शास्त्रज्ञ आणि
प्रोफेसर होणारे लोक दरसाल नवीन नवीन शोध करतात; आणि त्यांचा व्यव-
हारांत योग्य उपयोग होत असल्यानेंच यूरोप-अमेरिकन उद्योगधंदांची एक
सारखी चलती चालली आहे. ' असल्या खऱ्या शास्त्रज्ञ, व्यवहार-व्यापारज्ञ
' आणि धनप्राप्तीकरतां महान् प्रयास करणाऱ्या लोकांचें त्या देशांत अत्यंत
' प्राचुर्य आहे.' (३०-१-८३) आणि आमचेकडे सारीच शून्यलब्धि ! हें केसरी-
चें ' परसंशोधन ' ' आत्मसंशोधना ' इतकेंच निःसंशय महत्त्वाचें आहे.
केसरीनें ' शास्त्राभ्यास ' ' भारतीय शास्त्रकलांचें पुजरुज्जीवन, ' ' शिल्पशाळा,'
मुंबई इलाख्याचे कलाकौशल्य,' ' उद्योगवृद्धि, ' इत्यादि लेखांमधून परिणाम-
कारक रीतीनें मांडलेली ही विचारसरणी पाहिली, म्हणजे खरोखर शुद्ध आदर-
भावच केसरीच्या निरंतर लोकसेवेसंबंधीं अंतःकरणांत उत्पन्न होतो.

' पुण्यांतील पहिल्या चिमणी ' चे आणि तिच्या संस्थापकाचे-' शेट हिंदुमल
बालमुकुंद ' यांचें केसरीनें समयोचित आणि मोठ्याच उत्साहवर्धक शब्दांनीं
स्वागत आणि अभिनंदन केलें. ' आमच्या गिरण्यांत सुधारणा करून त्यांतून
' निघणारा माल देशांतल्या देशांत खपेल अशी कांहीं तजवीज केली पाहिजे.
' आम्हांस लागत असलेलें कापड मँचेस्टर येथें तयार व्हावें व चिनी जपानी
' लोकांस लागणारें कापड आम्हीं मुंबईस तयार करावें, असला ' खो खो ' चा
' व्यापार कधींहि शाश्वत रहावयाचा नाहीं. हिंदुस्थानांतील कापडाचें जर बारीक
' सूत निघत नसेल तर यंत्रें सुधारून अगर परदेशचा कापूस आणून, आम्हांस
' पाहिजे तसा कपडा काढण्याची आम्हीं कांहींतरी तजवीज केली पाहिजे. आम्हीं

के. प्र. २-१५

'आमचा कपडा वापरण्याचा खरा निश्चय केला तर चीन व जपान या देशांशीं 'आमचा व्यापार अजिबात बंद झाला तरी त्यापासून आमच्या गिरण्यास कांहीं 'धोका यावयाचा नाहीं.' (२८-२-९३). जपाननें आपला स्वतःचा कापडाचा धंदा पूर्णपणें शास्त्रशुद्ध रीतीनें आजला प्रस्थापित केल्यामुळें आणि आम्हीं तशी सुधारणा न केल्यामुळें व आमचा हिंदी कापडच वापरण्याचा निश्चय असावा तितका पूर्ण व पक्का नसल्यामुळें, हिंदी गिरण्यांच्या हल्लीं होत असलेल्या हलाखीचे स्थिर्तीत, केसरीच्या ३७ वर्षांपूर्वीं केलेल्या बहुमोल सूचनांचें महत्त्व कोणाचेहि सहज ध्यानांत येईल. 'आणि यामुळें आमच्या साऱ्या नाड्या आंखडल्या जाऊन, पारतंत्र्यरूपी बेडी 'आम्हांस विशेषच जखडीत चालली आहे, ही गोष्ट खरोखर दुःसहतर आहे. 'कोल्हापूर संस्थानची औद्योगिक पाहणी झाली.' (–नुसती औद्योगिक पाहणी झाली. पण पुढें काय ? पुढें गेल्या ३६ वर्षांतहि–नुसती शून्यलब्धीच !!–) 'त्याचप्रमाणेंच आमच्या सरकारनें साऱ्या देशाची नीट औद्योगिक पाहाणी 'करून, खऱ्या शास्त्रीय ज्ञानाची व कार्याचीहि दिशा खऱ्या अंतःकरणानें 'दाखविल्यास आमच्या हिंदी तरुणांची 'नोकरी'करितां ऑफिसांत लोळणारीं 'विंडोळीं खात्रीनें कमी होतील. पण अनेक खुसपटें काढून घरच्या प्रजेवर 'आणि शेजाऱ्यांपाजाऱ्यांवर हत्यार धरणाऱ्या आमच्या सरकारास फुरसत आणि 'द्रव्य सांपडेल तेव्हां या गोष्टी व्हावयाच्या !' (किता).

'हिंदी अर्थशास्त्र' अद्यापि स्वतंत्र बुद्धीनें आणि नीट लोकांना समजेल अशा रीतीनें लिहिलें गेलें नाहीं. त्याचा सर्वसामान्य लोकांत प्रचार तर मुळींच झाला नाहीं. 'आमच्या दुर्दैवानें येथें अशी कांहीं मंडळी आहेत कीं, 'आपलें घर जळालें, तरीहि परकी अर्थशास्त्राचा सिद्धान्त उराशीं बांधून ते 'बाहेर पडतील; घर तर विझवण्याचा प्रयत्न मुळींच करणार नाहींत, आणि 'विचार करीत बसतील कीं, आतां नवें घर बांधणें चांगलें, कीं हॉटेलांत 'जाऊन राहणें चांगलें' (१७-३-९६). इतकें सुंदर, सहज मनांत भरणारें आणि केवळ वस्तुस्थित चित्र, स्वदेशीवर आणि हिंदी उद्योगधंद्यांच्या नवीन प्रस्थापनेवर घोकींव आक्षेप घेणाऱ्यांचें केसरीनें काढलें आहे. या चित्रांतील एकादा रंग नव्हे एकादी रेघहि कमजास्त करता आल्यास ती हिंदी अर्थशास्त्रज्ञांनीं अवश्य करावी !

'नैसर्गिक व कृत्रिम रंग व रंगविण्याची कला' या लेखमालेनें सर्व प्रमुख वनस्पतिजन्य व कृत्रिम रंगांचा शास्त्रशुद्ध इतिहास देऊन, या बाबींतले हिंदुस्थानचें विशेषतः संस्थानांचें कर्तव्य विशद केलें आहे. 'महाराष्ट्रांत हिरडे 'पुष्कळच उत्पन्न होतात. हिरड्यांचा काळा, निळा, करडा, पिवळा, खाकी, 'इत्यादि रंग पक्के करण्याचे कामीं बहुमोल उपयोग होतो. कोल्हापूर प्रांतांतून, 'भोर संस्थानांतून आणि सह्याद्रि पर्वतावरून दरसाल कितीतरी हिरडा परदेशीं

'जातो ! ह्या बहुमोल निसर्गसंपत्तीचा आम्ही आमच्याच फायद्याकीरतां जर
'योग्य उपयोग करून घेतला, आणि हिंदी रंगारी व उत्साहानें भरलेले हिंदी
'रसायनशास्त्रज्ञ व साहसी हिंदी कारखानदार यांनीं एकजुटीनें आणि उच्च
'ध्येयानें प्रेरित होऊन काम केलें तर याच जातीच्या कृत्रिम रंगाची बाजारांतून
'क्रमाक्रमानें हकालपट्टी होऊन हिरड्याचे नानाविध सुंदर व पक्के रंग आपल्या
'पूर्वीच्या जिवंत तेजानें खात्रीनें पुनः लवकरच विलसूं लागतील.' (२-९-२४).
या कळकळीच्या प्रतिपादनाचा उपयोग आजच्या कळकळीच्या स्वदेशी चळवळींत
केला तर, बहुमोल उपयोग होण्यासारखा आहे.

---

## हिंदुमुसलमान–राजकीय हक्क

[ श्री. स. के. नेऊरगांवकर ]

गोलमेज परिषदेंत मुख्य प्रधानांच्या मध्यस्थीनेंहि ज्या दोन समाजांची एकी होऊं शकली नाही त्या हिंदु व मुसलमान समाजांच्या एकीकरणाबद्दल व परस्परांच्या न्याय्य हक्कांबद्दल गेल्या ५० वर्षांत 'केसरी'नें ठेवलेलें धोरण व केलेलें कार्य, जर संक्षिप्त रूपानें महाराष्ट्रापुढें, सध्यांच्या प्रसंगीं मांडलें, तर तें 'केसरी'च्या आजपर्यंतच्या लौकिकास अनुसरून निःसंशय मार्गदर्शक होईल.

कांहीं शतकांपूर्वी असा एक काळ निर्दिष्ट करतां येतो कीं मुसलमान असा हिंदुस्थानांत नव्हता. त्यांत आज असलेल्या ५।६ कोटी मुसलमान लोकांच्या एक दशांशहि मुळचे इराण, अरबस्थान वगैरे परदेशांतून आलेले व भिन्न वर्णांचे लोक नव्हते. बाकीचे सर्व हिंदुच असून धर्मांतर पावलेले व बाटलेले असे आहेत. मुसलमान लोकांची हिंदुस्थानांतील वस्ती जी आज सुमारें ८।९ शतकांची आहे, त्या सर्वच काळांत हिंदु व मुसलमान यांमध्यें कायमचा दावा किंवा बेबनाव होता असें मुळींच नाहीं. निरनिराळ्या वेळीं निरनिराळी परिस्थिति होती. ११ व्या शतकानंतर जरी तरवारीनें कुराणास मदत केली तरी त्यापूर्वी तरवारीच्या आधीं मुसलमानी कुराणाचा थोड्याशा प्रमाणावर, परंतु केवळ आपल्या अंगबळांवर इकडे प्रवेश झाला होता. लुटारू स्वारीवाल्यांच्या पूर्वी हिंदुस्थानांत फकीर वगैरे मुसलमान लोक धर्मप्रसारार्थ येऊन त्या काळीं असलेल्या हिंदु राजांच्या सात्त्विकपणामुळें व सहिष्णुतेमुळें किंवा राजकीय दृष्ट्या पुढें ठरलेल्या अदूरदर्शित्वामुळें त्यांनीं साहजिकच थोडीबहुत शिष्यपरंपरा, हिंदु राजांच्या हिंदुस्थानांतहि मिळविली. पण केवळ धर्मप्रसारानें मुसलमानांचें समाधान झालें नाहीं. राज्य

प्रसार हा त्यांच्या धर्मप्रसाराबरोबरच प्रवास करीत असतो हें हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या निरनिराळ्या बादशाह्या व राज्यें यावरून दिसून येतें.

११व्या शतकापासून हे स्वाऱ्या करून हिंदुस्थानांतून लूट मिरवून परत जात. पुढें १२ व्या शतकापासून मुसलमानांच्या वसाहतीस जरी सर्रास सुरुवात झाली तरी या काळांत हिंदु व मुसलमान यांचें म्हणण्यासारखें धर्मवैर नव्हतें. 'निदान' केसरीकर्ते म्हणतात, 'एवढें खास म्हणतां येईल कीं याच काळाच्या सुमारास 'खुद्द हिंदु धर्मांतच सुधारणावादी पंथ निघाल्यामुळें या दोन्ही धर्मांस समान 'असणाऱ्या अशा गोष्टी घेण्याकडे दोन्ही धर्मांची प्रवृत्ति असे. अकबर बाद- 'शहानेंहि विश्वधर्म म्हणून एक पंथ सोळाव्या शतकांत काढला असून त्याचे वेळीं 'दोघांसहि सारखींच पूज्य अशीं कित्येक क्षेत्रें बनलीं होतीं.' ( १७-१-१९ ). यावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, प्रत्यक्ष आचारांत हिंदूला हिंदुत्व आणि मुसल- मानांना मुसलमानत्व सोडणें कठिण असलें तरी दोन्ही धर्मांचें रहस्य एकच आहे व आचारवैचित्र्य हें अपरिहार्य असलें तरी बरेंचसें निरर्थक आहे, असें आपल्या सद्भावनेनें आणि चारित्र्यानें दाखवून देणारे आणि ज्यांच्यावर लोकांची श्रद्धा बसेल असे साधु लोक केव्हांहि या मिश्र समाजांत आढळतात.

अकबरानें बसविलेली दोन्ही समाजांच्या एकीकरणाची घडी, त्याच्या मागून आलेल्या जहांगिर व शहाजहान बादशहांनींहि बिघडविली नाहीं. एकंदरीनें पहातां औरंगजेबाच्या कारकीर्दींत राजकारणाला धर्मवेडाची चांगलीच जोड मिळाली व त्या जोडीच्या आकर्षणामुळें जातिद्वेषास भरतें आलें होतें. औरंगजेबानंतरहि भरती अशीच टिकली नाहीं ही गोष्ट वेगळी 'पण' केसरी म्हणतो, 'या 'बादशहाचें अंगीं राजकारणांतील शहाणपण किंवा शौर्य तरी कोठें होतें!' ( १७-१-११ ).

तथापि सांगण्याचा मुद्दा असा आहे कीं खुद्द औरंगजेबासारख्या धर्मवेड्या व सक्त उद्योगी बादशहाच्या हातून हिंदु-मुसलमानसमाजाच्या एकीकरणाला विघातक अशा कित्येक गोष्टी झाल्या तरी त्याच्या हातून भंग न पावणाऱ्या अशा ज्या इतर कित्येक गोष्टी झाल्या होत्या, त्यांचा परिणाम या दोन समाजावर जसा तेव्हां घडला तसा तो अद्यापीहि दिसत आहे. तख्तनशीन एका व्यक्तीला समाजा- चें बरेंच नुकसान करितां येतें. तथापि कित्येक बाबतींत समाजाच्या कार्यांत उपद्व्यापी राजाचाहि हात शिरकूं शकत नाहीं. वास्तविक या दोन समाजांमध्यें बरेचसे परस्परविरोधी गुण पूर्वांपार आहेत. हिंदूंना स्वदेश सोडून फारसें बाहेर पडण्यास आवडत नाहीं. किंबहुना, विवक्षित मर्यादेच्या पलीकडे जाणें हें हिंदुधर्माचार्यांनीं पाप ठरवून त्यास प्रायश्चित्त सांगितलें आहे; उलट मुसलमानांस स्वाऱ्या, मुलुखगिऱ्या व वसाहती करणें हें फार प्रिय आहे. हिंदु लोक बहुशः हिंदुस्थानास चिकटून राहिलेले आढळतात; पण मुसलमान पहावें तों पूर्वेस

चीनच्या सरहद्दीपासून पश्चिमेस स्पेनपर्यंत त्यांच्या मुलुखगिरीची व वसाहतीची मर्यादा एके काळीं पसरली होती. हिंदु लोक सालस, प्रेमळ व शांतताप्रिय असे आहेत व मुसलमान लोकांचे अंगीं याच्या उलट गुण आहेत. अशी स्थिति असतांना शेंकडों वर्षें एकत्र राहिल्यानें या दोन्ही समाजांनीं बऱ्याच गोष्टी एकमेकांपासून घेतल्या. आजमितीस चालीरीति, पोशाख, भाषा, इतक्या बाबतींत हिंदु व मुसलमान या दोघांना साधारण अशा गोष्टी कोणत्या आहेत याचा विचार करणारास आश्चर्यकारक प्रकार नजरेस पडतील. नुसतें स्थायिक रहिवाशी न राहतां त्यांपैकीं अनेकांनीं हिंदु स्त्रिया आपल्या बायका केल्या व आजमितीस असलेल्या ६ कोटी मुसलमानांत असे किती तरी मुसलमान सांपडतील कीं त्यांच्यांत हिंदु रक्त खेळत आहे. पण केसरी म्हणतो 'हिंदुस्थानांतील प्रजेचे 'सामान्य हक्क संपादन करण्याकरितां जरी आम्ही एक झालों व होऊं तरी 'धर्माचा, खाण्यापिण्याचा आणि आचारविचारांचा हिंदुमुसलमान यांच्यांत जो 'भेद आहे तो कित्येक शतकें तरी कायम राहील या समजुतीवरच आम्हीं त्याची '(परस्परांच्या हक्कांची) योग्य व्यवस्था लाविली पाहिजे.' (१३-२-९४).

याच बाबतींत केसरी दुसरे ठिकाणीं म्हणतो, 'हिंदु-मुसलमानांत रोटीबेटी-'व्यवहार होण्याइतके धर्मौदासीन्य अथवा धर्मौदार्यहि होईल असें आमच्या 'बुद्धीस तरी निदान वाटत नाहीं. निदान हजार पांचशें वर्षांत तरी ही गोष्ट 'होणें शक्य नाहीं.' (१०-१०-९३).

अशा रीतीनें प्रथम मुसलमानांनीं हिंदूंवर राज्य स्थापिलें व कित्येक शतकें सत्ता गाजविली. पुढें हिंदूंच्या पुनरुदयाचा काल आला व त्यांनीं आपलें गेलेलें स्वातंत्र्य परत मिळविलें. १५० वर्षांपूर्वीं इंग्रजांनीं कोठें मुसलमानांपासून तर कोठें हिंदूंपासून मिळून दोघांचेहि हातून राजसत्ता बळकावून घेतली. यामुळें दोघेहि एकप्रकारें समदुःखी झाले. १७५७ सालीं प्लासीच्या लढाईनें मुसलमानी अमलाचा शेवट होऊन पुढें शंभर वर्षें त्यांच्या हीन स्थितीचा कडेलोट झाला. १८५७ सालीं व्यक्तिशः नानासाहेब पेशवे यांचा इंग्रजांना जितका दरारा बसला, तितका कोणत्याहि मुसलमान बंडवाल्याचा बसला नव्हता; तथापि ५७ सालच्या बंडास 'हिंदुबंड' असें न म्हणतां 'मुसलमानबंड' असें म्हणतात. बंडापासून पुढें २५ वर्षें मुसलमानांना इंग्रज राज्यकर्त्यांनीं कडक रीतीनें वागविलें. कित्येकांच्या मतें चालू शतकांत हिंदुमुसलमानांचें जें वैर सुरू आहे त्याचें मूळ ५७ सालच्या बंडानंतर हिंदूंना व मुसलमानांना इंग्रज सरकारनें निरनिराळ्या धोरणानें वागविलें यांत आहे. ही गोष्ट सर्वस्वी खरी आहे असें आम्हांस वाटत नाहीं; व असली तरी तिचा दोष मात्र हिंदु लोकांकडे येत नाहीं. कारण हिंदूंनीं मुसलमानांना तेवढें बंडाच्या तोंडीं दिलें व आपण मात्र अलग राहिले असें झालें नाहीं. बंड मोडल्यानंतर हिंदु व मुसलमान यांना वागविण्यांत जर थोडा-

बहुत फरक सकृद्दर्शनीं पडला असेलच तर त्याचें कारण मात्र असें कीं, हिंदु हे अधिक सुशिक्षित, नवीन शिक्षण मिळण्याची इच्छा करणारे, आणि सुराज्य-व्यवस्थेकरितां कारकुनी पेशाच्या लोकांची जी मदत त्या वेळीं सरकारास अगदीं जरूर होती ती पुरविण्यास सोळा आणे लायक असे होते. त्याच सुमारास झालेल्या विश्वविद्यालयाचा फायदा हिंदूंनीं जितका घेतला त्याच्या शतांशहि मुसलमानांनीं करून घेतला नाहीं. आधींच मुसलमानांची संख्या हिंदूंच्या एक–चतुर्थांश व त्यांतहि सुशिक्षित मुसलमानांचा अभाव; 'या जोड कारणामुळें' केसरी म्हणतो, 'जर मुसलमानांपेक्षां हिंदूंस तेव्हां अधिक महत्त्व आलें असलें तर तें वस्तु-' स्थितीमुळेंच होय. हिंदूंच्या अप्पलपोटेपणामुळें नव्हे. हिंदूंना ज्या जागा देण्यांत ' आल्या त्या केवळ त्यांच्या शिक्षणामुळें व सरकारच्या गरजांमुळें. हिंदूंनीं जाती-' विषयक मागणी केल्यामुळें नव्हे.' ( २४-१-११ ).

तें कसेंहि असो. बंडानंतरच्या पहिल्या पंचविशींत मुसलमान लोक स्वतः असंतुष्ट व सरकारास हल्लींहून कमी प्रिय होते यांत शंका नाहीं. पण सन १८८५ च्या नंतर ही परिस्थिति बदलली. या सालीं हिंदुस्थानांत राष्ट्रीय सभा निर्माण झाली व तिचें राजकीय धोरण पुढेंमागें आपणांस जड जाईल हें धूर्त इंग्रजी अधिकाऱ्यांना तेव्हांच दिसून आलें. हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व सुशिक्षित वर्ग या चळवळींत सामील झाला होता. अशा या चळवळींत मुसलमान पुढाऱ्यांनीं सामील व्हावें किंवा नाहीं असा प्रश्न अर्थातच निघाला व स्वयंस्फूर्तीनें वागणारे स्वतंत्र विचाराचे, न्या० बद्रुद्दीन तय्यबजीसारखे, मुसलमान पुढारी सामील झालेहि. पण मुसलमानांस या चळवळीपासून अलग राखलें तरच तरणोपाय आहे, असें कित्येक युरोपियनांस वाटावयास लागून त्यांनीं सर सय्यद अहमद वगैरे मुसलमान पुढाऱ्यांस हातीं धरून त्यांस असें भासविलें कीं, राष्ट्रीय सभेची चळवळ राजद्रोही आहे व सरकारपासून हक्क मागण्यांत हिंदूंचा फायदा आहे. सरकारच्या अवकृपेचीं फळें भोगल्याची आठवण ताजी असल्यामुळें, अथवा पुढें होणाऱ्या सरकारी कृपेची गोडी विशेष वाटल्यामुळें म्हणा, युरोपियन हित-वाद्यांनीं केलेला हा बुद्धिभेद मुसलमान पुढाऱ्यांस पसंत पडला व तूर्त आपलें काम मुसलमान समाजांत शिक्षणाची अभिवृद्धि करण्याचेंच आहे, राजकीय चळ-वळींत पडावयाचें नाहीं, असें त्यांनीं ठरवून, अलीगड येथें युरोपियन प्रोफेसरांच्या मदतीनें या धोरणाचा उपक्रमहि केला. या मुसलमानांच्या अनिष्ट धोरणांबद्दल केसरीनें एवढेंच लिहिलें—' त्यांच्या सर्वांचे उद्देश कांहीं असले तरी कोणत्याहि ' एखाद्या अहितकारी व्यवस्थेनें मुसलमानांचीं अंतःकरणें उचंबळलीं म्हणजे ' ते हा स्तुतिपाठ सोडून देऊन राष्ट्रीय सभेस साहाय्यच करतील. अशा वेळीं ' आमच्या लोकांनीं इतकी खबरदारी ठेविली पाहिजे कीं मुसलमान लोकांचा

'निश्चय आम्हांला कितीहि घातुक वाटला तरी त्याकरितां त्यांच्यावर तुटून पडणें 'रास्त होणार नाहीं.' ( १४-८-८८ ).

तसें पाहिलें तर हिंदूंची स्थिति ब्रिटिश आमदानीपेक्षांहि मुसलमानी आमदानींत थोडीशी अधिक बरी होती. मुसलमानांच्या हाडामासांत खेळत असलेलें धर्मवेड सोळाव्या शतकांत चांगलेंच प्रदीप्त होत असतांना अकबर व त्याच्यापूर्वी शेरशहा यांनीं धर्मासंबंधीं निःपक्षपातबुद्धि दाखविली. पण केवळ धार्मिक बाबतींत अशी बुद्धि दाखविली एवढीच काय ती त्यांची मुत्सद्देगिरी होती असें नाहीं, तर खुद्द राजकीय बाबतींतहि तिचा प्रवेश झाला होता. अकबराची समबुद्धि जाहीरनाम्याच्या शब्दांत होतीच होती, पण कृतींतहि उतरली होती. पाहावयास गेलें तर हिंदु व मुसलमान यांजमध्यें बंधुत्व इतकें मुरून गेलें होतें. परंतु आपण हिंदूंचे बंधू नसून त्यांचे 'वरिष्ठ' आहों अशा प्रकारची खोटी समजूत अलीकडे कॉंग्रेसच्या स्थापनेनंतर झालेली असल्यानें या नवीन राजकीय मन्वंतरांत हिंदूंपासून अलग राहून इंग्रज राज्यकर्त्यांपासून अधिक हक्क मागून घेण्याची व या मागणीवर रण माजविण्याची दुर्बुद्धि त्यांस झाली. तुम्ही आम्ही मिळून राजकीय भांडण भांडूं असें त्यांस सांगावयास गेलें तर मुसलमान आपल्या मनांत म्हणत कीं, 'छे, हिंदूंचा हा कावेबाजपणा आहे, आम्ही राष्ट्रीय सभेस मिळावें आणि त्यांचें हित साधून द्यावें हा डाव काय आम्हांस कळत नाहीं !'

कांहीं मुसलमानांच्या दृष्टीनें त्यांचें हिंदूंवरील राजकीय वर्चस्व हेंच कीं त्यांनीं हिंदुस्थानांतच हिंदूंवर एक वेळ राज्य केलें. इंग्रज येण्यापूर्वी हिंदुस्थानांत आम्हीच बादशहा होतों अर्थात् इंग्रजांच्या खालोखाल आम्हांसच अधिक राजकीय महत्त्व आहे. 'हिंदुस्थानांत मुसलमान आल्यापासून त्यांचा जो 'इतिहास येथें घडून आला त्याजवरून पाहतां त्यांनीं केवळ नाकानें वांगीं 'सोलून, हिंदूंस जिंकल्याबद्दल हिणवावें अशांतला खरोखर भाग नाहीं. मुसल'मानी सत्ता इंग्रज उदयास येऊं लागण्यापूर्वी हिंदूंनीं स्वतः कशी नाहींशी 'केली होती हें ऐतिहासिक रीत्या सिद्ध होतें,' असें केसरीचें त्यास उत्तर आहे. ( २१-२-११ ).

पण सन १९०६ पासून मुसलमानांस आपल्या धोरणाची निम्मी चूक कळून आली. राजकीय चळवळीवर आपण बहिष्कार घातला हा आपण आपल्या पायांवर दगड घालून घेतला असें त्यांस कळून आलें व राजकीय हक्क मागण्याकरितां त्यांनीं कंबरहि बांधली, पण ही एक चूक दुरुस्त करण्याकरितां त्यांनीं दुसऱ्या दोन चुका केल्या. एक तर त्यांनीं नवीन मोर्ले-मिंटो-सुधारणान्वयें अमलांत येणाऱ्या कायदे-कौन्सिलांत व स्थानिक स्वराज्य संस्थांत बेसुमार हक्क मागण्यास सुरुवात केली व दुसरी ही कीं, हिंदूंना वगळून त्यांच्यापासून आम्हांस वेगळें राखून हक्क द्या असें ते म्हणूं लागले व त्याप्रमाणें त्यांनीं ते हक्क मिळविलेहि,

या विशिष्ट हक्कांबद्दल १९०६ पासून आजपर्यंत मुसलमानांची जी सारखी ओरड चालू आहे त्याबद्दल ' केसरी 'चें म्हणणें काय हें एकदांच स्पष्ट सांगितलें म्हणजे पुरें.

' हिंदुस्थानापुरतेंच बोलावयाचें झालें तर एकपट मुसलमानांनीं तिप्पट हिंदूं-
' वर आपला राजकीय महत्त्वाचा हक्क सांगूं पाहाणें हें हास्यास्पद नव्हे काय!
' त्यांतूनहि हिंदुस्थानांत आज जी हिंदु लोकसंख्या आहे ती जर रानटी, अडाणी
' अशा प्रकारची असती, आणि दुसऱ्या पक्षीं मुसलमान लोकसंख्या जर विशेष
' सुशिक्षित व हरतऱ्हेच्या कामकाजांत धुरीणत्व पत्करणारी असती, तर ही गोष्ट
' वेगळी होती. निव्वळ लोकसंख्येच्या प्रमाणानेंच समाजाचें राजकीय महत्त्व
' कोणीं ठरवूं गेल्यास त्यांच्या नियमाला अपवाद दाखवितां येतील हें जरी खरें
' असलें तरी हिंदुस्थानांतील हिंदुलोक संख्येनें तर मुसलमानापेक्षां पुष्कळच
' अधिक आहेत. एवढेंच नव्हे तर शिक्षण, संस्कृति, समाजव्यवस्था, राजनीति,
' कर्तृत्व, शौर्य, याबद्दल हिंदू लोकांची परंपरा—या परंपरेबद्दल इतिहास काय
' साक्ष देतो—याची माहिती अहंकारानें फुगलेल्या अगर बेफाम झालेल्या महत्त्वा-
' कांक्षी मुसलमानानें, एखाद्या निःपक्षपाती युरोपियन गृहस्थास विचारून पहावी
' व परस्पर उत्तर मिळवावें म्हणजे हा राजकीय भ्रमाचा भोपळा तेव्हांच फुटेल.'

यावर कांहीं मुसलमान असें म्हणतील कीं, देशमर्यादा सोडून केवळ एकंदर लोकसंख्येच्या दृष्टीनें पाहतां मुसलमान लोकसंख्या ही हिंदूंच्या लोकसंख्येहून मोठी भरेल. पण यावर केसरी म्हणतो—' आपल्या जातभाईंचें पश्चिम सरहद्दी-
' पासून तुर्कस्थानापर्यंत स्वतंत्र स्वराज्य हिंदुस्थानाबाहेर आहे. या गोष्टीचें भूषण
' हिंदुस्थानांतील ज्या मुसलमानांस वाटत असेल त्यांनीं वाटेल तर खुशाल तुर्क-
' स्थान, इराण वगैरे देशांत जाऊन राहावें व तें ऐश्वर्य भोगावें. त्यांस नको कोणीं
' म्हटलें आहे!' (२१-२-११). हिंदुस्थानांत राहून, हिंदु लोकांच्या पोटावर पाय देऊन हिस्सेरशीनें मिळणाऱ्या राजकीय हक्काच्या चतकोर भाकरीवर ' माझ्या मानाचा आणखी एक तुकडा द्या ' अशी मागणी करून त्यांत कोणता पुरुषार्थ लाभणार? मानाचा म्हणून एक तुकडा अधिक मिळविला तरी तेवढ्यानें आमच्या मुसलमान बंधूंच्या खऱ्या महत्त्वाकांक्षेचें समाधान होतें काय? नाहीं. कारण, आपल्याच धर्माचे, आपल्याच परंपरेचे, आपल्याच इतके सुसंस्कृत असलेले तुर्कस्थानचे व इराणचे मुसलमान स्वतंत्र अशा पार्लमेंटांत बसून स्वातंत्र्य भोगीत आहेत. असें पहात असतां हिंदुस्थानांत मात्र सल्लागारीच्या पाळण्यांतून ज्याचें पाय अद्यापि बाहेर पडत नाहींत अशा कायदेकौन्सिलापर्यंतच्या आपल्या स्वराज्याची मजल गेलेली पाहून हिंदुस्थानांतील मुसलमानांस कसेंसेंच वाटणें स्वाभाविक आहे. पण पाय हिंदुस्थानांत आणि मन तुर्कस्थानांत, या दोन गोष्टींचा मेळ कसा बसणार? ' मिजास बादशहाची पण नांदणूक कैकाड्याची ' अशी स्थिति हिंदुस्थानांतील

मुसलमान आपली करूं पाहाताहेत असें म्हणून केसरीनें पुढील मार्मिक टीका केली आहे. ' आमच्या मुसलमान बंधूंनीं बाजवीहून अधिक व विशिष्ट प्रकारचे ' हक्क मागण्यास सुरुवात केल्यामुळें आज हिंदुस्थानांत ' खुदा बी रंजीस और ' मशीद बी रंजीस ' या मुसलमान म्हणीचा प्रत्यय येऊं लागला आहे.'

( २१-२-११ ).

वर सांगितलेंच आहे कीं, राष्ट्रीय सभेच्या पहिल्या दहावीस वर्षांत मुसलमान हे राष्ट्रीय चळवळीस विरोधी असेच भासले. परंतु गेल्या सुमारें बारा वर्षांपासून त्यांना राजकारणाची गोडी लागली. मुस्लीम लीगनें स्वराज्याचें ध्येय मान्य केलें व महायुद्धाचे सुमारास हिंदुस्थानांत झालेल्या मोठ्या चळवळीमुळें नवीन सुधारणा अमलांत येणार असें मुसलमानांनीं ओळखून पुनः आपली, अधिक प्रमाणावर जातवार हक्कांची मागणी पुढें मांडली व लखनौ येथील राष्ट्रीय सभेनें कायदेकौन्सिलांतील जागा कोणत्या समाजास किती प्रमाणांत मिळाव्या याविषयीं, मुसलमानांबरोबर करारमदार करून हिंदुमुसलमानांच्या एकीचा पाया घातला असें दिसतें. महायुद्धांत व महायुद्धानंतर झालेल्या चळवळींत दोघांनींहि सारखाच भाग घेतला व परवांपर्यंत मुस्लीम लीग व खिलाफत कमिटी ही राष्ट्रीय सभेच्या धोरणाचा कित्ता पुढें ठेवूनच आपलें धोरण ठरवीत असत. १९२०सालीं म. गांधी हें असामान्य पुरुष पुढें येऊन त्यांनीं मुसलमानांचें कार्य, स्वतः मुसलमानहि दाखवीत नाहींत इतक्या आस्थेनें, उचलून धरलें आणि हिंदुमुसलमानांच्या ऐक्याची गांठ आपल्या मतें कधीं फिरून न सुटेल अशी घट्ट बांधली.

पण महायुद्ध संपलें. खिलाफतीचा प्रश्न बारा आणे निकालांत निघाला व कौन्सिलें निर्माण होऊन त्यांतील सत्तेचा हिस्सा प्रत्येक समाजास किती मिळणार हें ठरून चुकलें. ' तप्तेन तप्तमयसा घटनाय योग्यम् ' हें कवीचें वचन व्यवहारांतहि खरें ठरतें. खिलाफतीचा अन्याय व पंजाबांतील अत्याचार यांनीं मुसलमान व हिंदु सरकारविरुद्ध तापून गेले होते तोंपर्यंत त्यांचा एकजीव झाला होता. परंतु उभयतांच्या असंतोषाचें एक कारण बरेंचसें नाहींसें झालें व दुसरें बरेंचसें शिळें झालें. त्यामुळें एकीची घडी फिरून विसकटली व राष्ट्रीय सभेच्या विधायक कार्यक्रमानें देखील ती पुनः जमली नाहीं. दिल्ली, कोहट, सोलापूर वगैरे ठिकाणीं मुसलमान पुंडांनीं हिंदूंवर अत्याचार केले. तेव्हां महात्मा गांधींनीं दोन्ही समाजांच्या एकीकरणाकरितां २१ दिवसांचा उपवास केला. पण थोडा वेळ शांत होऊन दंगे परत चालूच राहिले व शेवटीं स्वामी श्रद्धानंदासारख्या हिंदु पुढाऱ्याचा खून झाला ! यावेळीं सरकारचें मुसलमानांविषयींचें पक्षपाती धोरण कळसास पोहोंचलें. मुसलमानांकडून आगळीक झाली असतां हिंदूंनीं कसें वागावें याबद्दल केसरीनें लिहिलें आहे, ' मुसलमान अंगावर चालून आला असतां प्रतिकार करणें ' हेंच आपलें कर्तव्य होय. मनुष्य कोणीहि असो, विद्वान् ब्राह्मण असो, अगर

'बाप असो, त्याला बेलाशक चोपावा असा आमचा शास्त्राधारच आहे.' (२२-८-९३).

हिंदूंच्या कमकुवतपणाबद्दल उद्देशून केसरीकार म्हणतात, 'हिंदू लोक 'मुसलमानाप्रमाणें हिरवट व रानटी नसल्यामुळें आपण होऊन दुसऱ्याच्या 'अंगावर चालून जाण्याचें साहस त्यांच्या हातून बहुधा होत नाहीं हें खरें आहे; 'पण हिंदु लोकांत निदान मराठे लोकांत तरी 'दिधलें दुःख परानें उसनें फेडूं 'नयेचि सोसावें' अशा तऱ्हेचा नामर्दपणा अद्याप उत्पन्न झाला नाहीं ही मोठ्या 'सुदैवाची गोष्ट आहे. (२२-८-९३).

अशा वेळीं एकी कशी करावी असा राष्ट्रीय सभेपुढें मोठा प्रश्न येऊन पडला. याच वेळेस हिंदुस्थानास द्यावयाच्या सुधारणांचे चौकशी कमिशन नेमण्यांत येऊन त्या एकजात गोऱ्या सायमन कमिशनबरोबर सहकारिता न करण्याचें स्वाभिमानी राष्ट्रानें ठरविलें व निव्वळ बहिष्काराची चळवळ करून हे पुढारी थांबले नाहींत तर त्यांनीं एक सर्वपक्षीय परिषद बोलाविली व त्या परिषदेनें कै० पंडित मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या कामिटीनें, राष्ट्रीय मागणीबद्दल 'नेहरू–रिपोर्ट' या नांवानें प्रसिद्ध असलेला व मुसलमानांतील कांहीं कट्टर अपवाद सोडून सर्वमान्य असा रिपोर्ट प्रसिद्ध केला. राखीव जागा व वयांत आलेल्या मनुष्यास मतदानाचा हक्क या तत्त्वांवर संयुक्त मतदारसंघाची योजना एकजात मुसलमानांस पसंत पडावयास पाहिजे होती. सरकारी नोकऱ्यांत समान हक्कांची मुसलमानांची मागणी, सदर बाबतींत गुणावगुणाचाच प्रश्न असल्यामुळें, अर्थातच नाकारण्यांत आली. असो. ही एकराष्ट्रीयत्वाची कल्पना अलीबंधूसारख्या पुढाऱ्यांना पसंत पडूं नये व त्यांना याहि ठिकाणीं हिंदूंच्या वर्चस्वाचा खोटा संशय यावा हें दुर्भाग्य होय. मुसलमान समाज वास्तविक इतका मोठा आहे कीं त्यास निव्वळ संख्येमुळेंच हिंदूबरोबर नागरिकत्वाचे अधिकार तर मिळतीलच, पण स्वतःच्या समाजाचें रक्षण करितां येईल. पण मद्राससारख्या ज्या प्रांतांत मुसलमान हे अल्पसंख्य आहेत त्या प्रांतांत त्यांना हिंदूपासून ज्या सवलती पाहिजेत त्या ते सिंध व वायव्यसरहद्दसारख्या प्रांतांत–कीं ज्यांत हिंदू हें अल्पसंख्य आहेत–हिंदूंना देण्यास तयार नाहींत. शिवाय, पंजाबांतून शीख वगळल्यास मुसलमानच जास्त भरतील आणि बंगाल्यांत हिंदूंचें व त्यांचें समप्रमाण आहे तरी या दोन प्रांतांत स्पेशल हक्कांची त्यांची मागणी आहेच.

अशा रीतीनें भविष्यकाळांत परस्परांचीं नातीं राहावयाचीं असलीं तर स्वराज्य मिळविण्याचें कार्य जरी अशक्य नसलें तरी दुस्तर होणार आहे. म्हणून या समाजाच्या एकीकरणाचा प्रश्न वेळींच सोडविला पाहिजे. त्या बाबतींत केसरीनें केलेली चिकित्सा फार मार्मिक आहे.

'रणांगणांवरचीं सैन्यें जशी खांद्याकमरेला हत्यारें लटकावूनच शांततेचे

' व्यवहार करितात, तसेंच हिंदुस्थानांतील हिंदु व मुसलमान हे स्वराज्य व संयुक्त
' राष्ट्रीयत्व यांच्या गोष्टी बोलत असतां आपापले समाज प्रबळ व आक्रमणशील
' कसे होतील याचेच उद्योग त्यांचे हातून सुरू आहेत.' ( २२-६-२६ )
असें केसरीनें दोन्ही समाजांचें वर्णन केलें आहे.

वरून दिसावयास भांडणाचें कारण धार्मिक दिसतें. पण किंचित् खोल पाहिलें असतां त्यास राजकीयहि स्वरूप आहे. वाद्यांना मनाई व शुद्धिकार्याविषयीं उत्साह हीं निवळ रोगलक्षणें आहेत. खरें कारण म्हटलें म्हणजे मुसलमानास आज हिंदूंच्या वरचढपणानें, जगून, मिरवून सत्ता व वैभव भोगावयाचें आहे. आणि हिंदूंना खरी काळजी ही कीं सर्व बाजूंनीं पावलापावलांनीं मुसलमान लोक जर अतिक्रमण करूं लागले तर हिंदुसमाज कालांतरानें जाग्यावर तरी कसा उरणार ! ' आणि ' केसरी स्पष्ट विचारतो ' हिंदुत्व नष्ट व्हावयाचें असेल तर स्वराज्याची तरी काय मातबरी !' ( २२-६-२६ ).

या अतिक्रमण विरुद्ध संरक्षणाच्या लढ्यांत सर्वंच ज्वालाग्राही द्रव्यच पसरून राहिल्यानें आगीचा भडका होण्यास उशीर लागत नाहीं व टपालतारायंत्रामुळें दंग्याची एक प्रकारची हवाच देशांत उत्पन्न होते. सूक्ष्म स्वरूपांतच हा प्रश्न राहील तर प्रत्यक्ष चिंतेचा विषयहि फारसा होऊं शकत नाहीं. पण मनुष्य मर्त्य आहे हें शुद्ध ज्ञान वेगळें; व प्रत्यक्ष मानेवर सुरी येऊन पडणें हा अनुभव वेगळा. तशीच स्थिति आज झाली आहे. कशी ती पहा.

आज दोघांवरहि परकी इंग्रजी राज्य असलें तरी आज आपली लोकसंख्या व हक्क वाढवून, प्रबळ होऊन बसावयाचें आणि उद्यां राज्यक्रांतीची संधि आली तर चट्टदिशी पुढें होऊन परदेशच्या मुसलमानांच्या साहाय्यानें फिरून राज्य किंवा बादशाही मिळेल तशी स्थापन करावयाची असाहि कांहीं मुसलमानांच्या मनांत एक विचार असतो. या भावी व मुख्य महत्त्वाकांक्षेमुळेंच मुसलमानांच्या तोंडून कॉन्स्टंटिनोपलपासून, दिल्लीपर्यंत एक सांखळी जोडण्याचे उद्गार निघतात. आणि केसरी म्हणतो ' याच महत्त्वाकांक्षेचें उपांग म्हणून स्थानिक स्वराज्या-
' पासून वरिष्ठ कायदेकौन्सिलें व सरकारी खातीं येथपर्यंत साधेल तेथें सवता
' सुभा स्थापून त्यांत साम्राज्य व त्याच्या आधारावर इतर राजकारण–प्रांतांतहि
' निदान कोरडा तरी वरचष्मा गाजवावयास सांपडावा असा त्यांचा उपक्रम सुरूं
' आहे ' ( २२-६-२६ ); आणि नव्या राज्यपद्धतींत शिरगणती हें लाभाचें निर्णायक गमक ठरणार असल्यानें मुसलमानांच्या आजच्या संख्येंत या देशांत एकाला एक अशी भरच हरप्रयत्नानें पाडण्याचा त्यांचा उद्योग सुरू आहे. त्याकरितां ते आपला जोर, मशिदीपुढील वाद्याला प्रतिबंध होवो किंवा तझीम व तब्लीघ ही चळवळ होवो, त्यांत दाखवीत असतात. न्यायान्यायाचा विचार बाजूस सारून वाद निघाला कीं तेथें हट्टच धरावयाचा असें मुसलमानांनीं आपल्या

मनाशीं ठरवून ठेवलेलें दिसतें. मुसलमानांचा आग्रह कधीं कधीं हिंदूंनीं आपल्या इतर प्रांतांतील बंधूंच्या मदतीकरितां सभा देखील भरवितां कामा नये असें म्हणण्यापर्यंत जातो. यास अनुलक्षून केसरी म्हणतो 'यापासून जर मुसलमान 'लोकांस त्वेष आला असला तर त्याचा सर्व दोष मुसलमान लोकांकडेच येतो. 'जोंपर्यंत हिंदूंनीं केलेले व्यवहार कायदेशीर आहेत तोंपर्यंत त्यांनीं केलेल्या 'कोणत्याहि कृत्यांबद्दल मुसलमानांस वाईट वाटण्याचें कारण नाहीं.' ( १५-८-९३ ).

दुसरे ठिकाणीं याच विषयावर केसरीकर्ते म्हणतात--'हिंदु लोक धोतर 'नेसतात म्हणून जर उद्यां मुसलमान लोक चिडूं लागले तर त्यांत मूर्खपणा व 'दोष कोणाचा ! अशा वेळीं मुसलमान लोकांस चांगलीच जरब देऊन ताळ्या-'वर आणणें जरूर आहे. मुसलमान लोकांस वचकून अगर भिऊन आम्हीं जर 'नेहमींच्या गोष्टी करणें सोडून द्यावयाचें तर मग इंग्रज सरकारचें राज्य असण्या-'ची बिलकूल जरूरी नाहीं.' ( २२-८-९३ ).

हिंदूंना बाटविण्याचा जर मुसलमानांना अधिकार आहे, तर प्रथम त्यांना बाटूं न देणें हा अधिकार हिंदूंनाहि असला पाहिजे. शुद्धि या शब्दांतच मूळ धर्मांतर अध्याहृत किंवा गृहीत आहे आणि धर्मांतर म्हणजे हिंदुसमाजाची ती हानि असें असतां हिंदुसमाजानें आपली हानीहि थांबवूं नये आणि मुसलमानांना होणारा लाभ अप्रतिबंध चालूं द्यावा असा त्यांचा कांगावा. माझें तें माझें व तुझें तेंहि माझें हा न्याय कोणता !

प्रातिनिधिक संस्थांतील हिस्सेरशीचीहि तीच गोष्ट. जेथें तीन जागा वाढा-वयाच्या असतील तेथें संख्याबळावर दोन, संख्या अगदीं कमी असेल तर एकाहून खालीं जातां येत नाहीं म्हणून एक आणि जेथें आलटून पालटून म्हणून निम्मेनिम वांटणी व्हावयाची तेथें दीड देतां येत नाहीं म्हणून दोन असे हिस्से ते मागत असतात. सारांश, हक्काच्या आधारावर तीन, करुणा व सहानुभूति यांच्या आधावर कमींत कमी एक आणि सोयीच्या आधारावर दोन अशी त्यांची मागणी असते.

गोवधासंबंधानें पाहिलें तरी तेंच. गोमांस खाण्याला मुसलमानांना धार्मिक प्रतिबंध नसला तरी त्यांच्यांतले रुचिविवेकानें खाणारे लोकहि गोमांस हें सर्वांत श्रेष्ठ मानीत नाहींत. कुरबानीला गोवध अनिर्वाह्य आहे असेंहि कुराणांत नाहीं आणि खुर्षीत असले म्हणजे मुसलमान तद्विरुद्ध वचनेंहि काढून दाखवितात. अशी गोष्ट असतां गोवधाचा हट्ट मुसलमानांनीं धरण्याचें कारण आम्हीं वर दर्शविलें तेंच होय. अँग्लो-इंडियन पत्रांची मुसलमानांस उचलून धरण्याची केव्हांहि तयारी असतेच व संधि येतांच गोरक्षणासारख्या चळवळीशीं देखील दंग्याचें निमित्त जोडण्यास ते तयार असतात. केसरी म्हणतो, 'टाईम्स

'ऑफ इंडियासारख्या पत्रकर्त्यांनीं गोरक्षणाचा व दंग्याचा संबंध जोडून देणें
'म्हणजे एक प्रकारें मुसलमान लोकांस अप्रत्यक्ष रीतीनें उत्तेजन देण्यासारखेंच
'आहे.' ( १५-८-९३ ).

'हिंदूंचें म्हणणें' केसरीकर्ते लिहितात—'इतकेंच कीं मुसलमानांना गोवध
'करावयाचा तर त्यांनीं सरकार किंवा म्युनिसिपालिटी यांच्या परवानगीनें
'घातलेल्या, दूर गांवाबाहेरच्या खाटिकखान्यांत करावा आणि नैमित्तिक धर्मप्रसंगीं
'जरी तो त्यांना करावासा वाटला तरी त्यांनीं तो हिंदूंच्या दृष्टिआड कोठें तरी
'आपल्या वस्तींत करावा.' ( २२-६-२६ ). पण मुसलमानांच्या आक्रमणशील
अशा हट्टाचीच परिसीमा होण्याकरितां ते हिंदु मोहल्यांतून वाजत गाजत गायी
मारावयास नेतील.

मशिदीपुढील वाद्यांच्या प्रश्नांत मंगलवाद्य केवळ सार्वजनिक अशाच रस्त्यां-
वरून जावयाचें आणि याहून विशेष हें कीं आजघटकेला जुन्या मशिदींपैकीं
ज्यांच्यापुढून वाजवीत जाण्याचा हक्क वहिवाटीनें प्रस्थापित झालेला आहे त्यांच्या-
पुरताच तो वजावण्याचा हिंदूंचा आग्रह असें असतांहि हिंदु पुढारी एकी रहावी
म्हणून इतकें म्हणावयास तयार आहेत कीं प्रतिष्ठित मशिदीपुढून जातांना वहि-
वाटीचा हक्क असला तरी, चार पावलें मोठीं वाद्यें न वाजवितां भिरवणूक
न्यावी. पण मुसलमानांचा आग्रह असा कीं, रस्ता सार्वजनिक झाला तरी मशिदी-
पुरता तो जवळ जवळ खासगी स्वरूपाचाच मानावा. त्यांनीं किंवा सरकारनें
वाद्यें वाजत नेलीं तरी त्यांस हरकत नाहीं. पण हिंदूंनीं मात्र मशिदीपुढेंच नव्हे
तर आजूबाजूलाहि वाद्यें वाजवितां कामा नये. 'याचा सरळ अर्थ' केसरी
म्हणतो 'असा कीं, मुसलमान म्हणेल तेथें हिंदूंनीं वाद्यें वाजवूं नयेत.'
( ४-१२-२४ ).

यावरून असा प्रश्न निघतो कीं मुसलमानांकरितां हिंदूंनीं गय खावयाची
किती व हक्क सोडावयाचे तरी कोणकोणते ? 'दुसरें असें कीं' केसरीनें सर-
कारास असा सवाल विचारला आहे—'मुसलमानांनीं कांहीं म्हटलें तरी या
'अतिक्रमणाच्या व हक्कसंरक्षणाच्या बाबतींत सरकार स्वतःचें असें कोणतें
'धोरण स्वीकारणार ? सरकार हक्कसंरक्षणाविषयीं कांहींहि न करतां फक्त शांतता-
'रक्षणाविषयीं सर्व अधिकार पोलिस कमिशनरला देतें. सरकारला १४४ व्या
'कलमाप्रमाणें जाहिरनामा काढून एकादे वेळीं दंगा थांबवितां येईल. पण
'त्यानें कायमचा निर्वाह लागत नाहीं.' ( २७-११-२३ ). दर दोन महिन्यांनीं
एक याप्रमाणें दरवर्षी सहा जाहिरनामे काढून त्याच्या आधारानें हे दंगे थांबवूं
पाहाणाऱ्या सरकारास शतमूर्खच म्हणावें लागेल. कारण पोट बांधून भुकेची
कळ क्षणभर थांबेल, पण पोट बांधल्यानें कायमची भूक कशी थांबवितां येईल.
तीच गोष्ट हक्कसंरक्षणाची होय. अर्थात् दिवाणी स्वरूपाचे हक्क म्हणून कांहीं

चीज आहे कीं नाहीं ? व ते ठरवून घेण्याचा कांहीं कायदेशीर म्हणून मार्ग आहे कीं नाहीं ? तसेंच अशा रीतीनें झालेल्या हक्काचें संरक्षण करणें सरकारचें कर्तव्य आहे कीं नाहीं ? आणि मुसलमानांनीं जुलूम, जबरदस्ती, भांडखोरी, आततायी-पणा, माथेफिरूपणा, किंबहुना प्राणाघाताची तयारी दाखविली तरी सरकार न्यायाच्या बाजूला उभें राहून अन्यायवर्ती लोकांशीं झगडण्याला व आपली इभ्रत संभाळण्याला तयार आहे कीं नाहीं हा आज सरकारपुढें बिनतोड प्रश्न उपस्थित आहे. 'हिंदूंनाहि' केसरीकर्ते सरकारास स्पष्टपणें विचारतात, 'दम धरण्यास कांहीं 'यत्ता आहे. एकदां दोनदां अगर तीनदां मनुष्य दम खाईल पण कोठेंच 'न्याय न मिळण्याची त्याची जर खात्री झाली तर चौथ्यानें तो आपला हात 'चालविल्याखेरीज राहाणार नाहीं. निदान महाराष्ट्रांतील लोक तरी इतके 'हतवीर्य झाले नाहींत हें त्यांच्या पूर्वेतिहासावरून आपल्यासारख्या थोर 'मुत्सद्द्याच्या ( लॉर्ड हॅरिस यांच्या ) सहज लक्षांत येण्यासारखें आहे.' ( २०-२-९४ ).

एकीचा सर्वसामान्य उपदेश म्हटला म्हणजे तो समुद्रावर पडणारा पाऊस किंवा डोंगराच्या माथ्यावर खेळणारा वारा, यासारखा होय. कॉंग्रेस वर्किंग कमिटींत गाइलेल्या ऐक्यवर्णनांचा उपयोग खालच्या दर्जाच्या लोकांवर होत नाहीं. तेव्हां व्यवहाराच्या पोटांत मार्मिक रीतीनें शिरून, वादग्रस्त मुद्द्यांना हात घालून ते खेंचून बाहेर काढून व ते प्रश्नरूपानें लोकांपुढें मांडून त्यांचीं योग्य उत्तरें देऊन तीं सर्वमान्य करण्याचा व भांडखोर लोक तीं न मानतील तर कायद्याच्या आधारानें सामुदायिक लोकमत जबरदस्तीनेंहि त्यांजवर लादण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. याकरितां केसरीची सूचना अशी कीं,' कॉंग्रेसनें न्यायकोर्टाप्रमाणें निःपक्ष-'पातीपणा आणि विवेचकबुद्धि चालवून कांहींतरी नियम म्हणून बांधावेत. 'गोवध व वाद्यें हेच दोन सर्वांत मोठे वादग्रस्त कज्जे ठरतात. तरी गोवधाचे 'बाबतींत, हिंदु हे वादी आणि वाद्यांच्या बाबतींत मुसलमान हे वादी अशी 'कल्पना धरून मुद्दाम व्यापक स्वरूपाच्या फिर्यादी व कैफियती पुढाऱ्यांकडून 'मागवून त्यांच्या मुकाबल्यानें न्यायकोर्ट काढते त्या प्रकारचे स्पष्ट मुद्दे काढावे व 'त्याचीं उत्तरें एखाद्या न्यायनिवाड्याप्रमाणें देऊन त्या उत्तरांचे व्यवहारोपयोगी 'नियम बनवावेत; ते असे कीं, कोठेंहि भांडण उपस्थित झालें असतां या सर्व-'सामान्य आधारानें स्थानिक पुढाऱ्यांना स्वतःवर नसती जबाबदारी न घेतां व 'अप्रियता टाळून, निर्णय देतां येईल व सत्पक्षास मदत करतां येईल. या नियमां-'नीं व्यवहाराची व्यवस्था लागेल, भांडखोरांना दहशतीची इशारत मिळेल, 'आणि शांततावाद्यांचें कार्य सुलभ होईल. हेंच आमच्या मतें विधायक कार्य 'आहे.' (७-१०-२४).

हिंदुमुसलमानांतील परस्परांच्या गुणावगुणामुळें प्रत्येक समाज सुसरीच्या

पाठीवर बसल्यासारखा असून ' सुसर भाऊ तुझी पाठ मऊ ' असेंच परस्परांना तोंडानें म्हणावें लागत आहे. पण ज्या स्वभावांत कलहप्रियता असते त्यांतच ईश्वरानें विवेकबीजहि ठेवलेलें असतें; म्हणून तें बीज वाढीला लावणें याकडेच मनुष्याचा प्रयत्न वळलेला असतो. ' प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला ' हें ध्यानांत धरून ऐक्यसंवर्धनाचें काम केलें पाहिजे. दंगे झाले तरी नवीन प्रयत्न केलेच पाहिजेत. आपलें घर अपघातानें पडलें म्हणून तें कोणी टाकून देत नाहीं. भौतिक शास्त्रांतील प्रकाश व उष्णता यांच्याप्रमाणें सामाजिक गुणांची प्रगति देखील लाटांच्या गतीनेंच होत असते. म्हणून ज्याप्रमाणें निराकार ईश्वरोपासना व निर्विकल्प समाधि यांचा दर्जा जरी श्रेष्ठ असतो तथापि संसारांतील मनुष्याला सगुणोपासना व सविकल्प समाधि हीच अधिक व्यवहार्य ठरतात, त्याप्रमाणें निर्विकल्प उपदेशापेक्षां सविकल्प उपदेश व विधायक सूचना वादाच्या प्रसंगांत अधिक उपयोगी असतात. सद्धेतूनें केलेल्या प्रयत्नाला अविचारानें लाथाडणें हें केव्हांहि बरोबर नाहीं म्हणून ऐक्याच्या कार्यक्रमाची उपयुक्तता व स्नेहवृद्धीचा त्यांतील कळकळीचा उपदेश प्रांताप्रांतांतील पुढाऱ्यांनीं मिळून प्रत्येक शहरातून व गांवांतून शक्य तितका फैलावावा. केसरी म्हणतो ' मुसलमान लोक जर शिष्टसंप्रदाय आणि ' सौजन्य यांजकडे लक्ष देऊन हिंदु लोकांशीं वागण्यास तयार असतील तर हिंदु ' लोक त्यांच्याशीं सभ्यपणानें वागण्यास कधींहि मागें घ्यावयाचें नाहींत. ' (८-५-९४). आणि केसरीनें या विषयाचें मर्म बरोबर ओळखून पूर्वींच लिहिलें होतें कीं ' हिंदु व मुसलमान या दोघांना जर सलोखा व ऐक्य राखावयाचें असेल ' तर दोन्ही जाती एकमेकांचा प्रतिकार करण्यास समर्थ आहेत अशी त्यांची समजूत ' होणें अगदीं अवश्य आहे. ' समानशीलव्यसनेषु सख्यम् ' अशी आमची एक ' जुनी म्हण आहे. त्याप्रमाणें वाघ वाघ एकत्र राहूं शकतील, बकरीं बकरीं ' एकत्र राहूं शकतील. परंतु बकरें आणि वाघ एकत्र ठेवण्याचा प्रयत्न केल्यास ' दरवेशी आहे तोंपर्यंतच त्यांची मैत्री राहील व जरा दरवेशाची नजरचूक ' झाली कीं वाघ शेळीच्या बोकांडीं बसेल हें अगदीं साहजिक आहे. ' ( १२-८-९३ ).

सुमारें ४० वर्षांपूर्वीं केलेल्या परंतु आजहि सर्वथैव सत्य असलेल्या या उपदेशांत केसरीच्या महाराष्ट्रांतील पुढारीपणाची भरपूर साक्ष आहे यांत शंका नाहीं.

---

# इनॉक्युलेशन व प्लेगव्यवस्था

[ डॉ० रामचंद्र अनंत राईरकर, एम्. बी. बी. एस्. ]

शास्त्रसंशोधनाचा उपयोग व्यवहारांत करतांना कोणच्या अडचणी उपस्थित होतात याचा इतिहास पाहूं गेलें तर लोकांच्या ठराविक कल्पना, संशोधनाच्या प्रथमावस्थेंतील थोड्याबहुत चुका व त्या योगानें लोकांना होणारा त्रास, या सर्व गोष्टी विचारांत घ्याव्या लागतील. संशोधनाचे कामीं अमुक एका विवक्षित वेळांतच झालें पाहिजे असा निर्बंध नसल्यामुळें तें कार्य होण्यास कितीहि वेळ लागला तरी हरकत नसते व त्यामुळें येथें उत्पन्न होण्याऱ्या अडचणी जरी पुष्कळ असल्या, तरी त्यांचा परिहार करणें पुष्कळ वेळां शक्य होतें. जसजशी अडचण उपस्थित होईल तसतशी उपाययोजना होत गेली, म्हणजे संशोधक व इतर लोक या दोघांनाहि त्रास कमी होतो, व संशोधनाचें कार्य संथपणें पुढें चालू लागतें. परंतु कांहीं कांहीं वेळेला संशोधनास पाहिजे तितका वेळ मिळणें शक्य नसतें व अशाच वेळीं संशोधकांच्या कार्याची खरी कसोटी असते. मुंबईत प्लेगची लाट जेव्हां पहिल्यानें उसळली तेव्हां अशीच वेळ आली होती. मुंबईत १८९६ मध्यें प्लेग आला त्याच्या आधीं हिंदुस्थानांत प्लेग नव्हता असें नाहीं; पण त्याचें भीषण स्वरूप लोकांच्या दृष्टीस पूर्वीं एकदम पडलें नव्हतें व त्यामुळें संशोधनाचें महत्त्व तादृश ज्यास्त नव्हतें. परंतु ही लाट मुंबईस नव्हे तर पुणें, कराची, धारवाड, वगैरे निरानिराळ्या प्रांतांतील शहरांना जसजशी पोहोंचूं लागली तसतसे तांतडीचे उपाय अंमलांत आणण्याची खटपट सरकार व तज्ज्ञ लोक करूं लागले. अशा आणीबाणीच्या वेळीं संशोधक, सरकार व लोक या तिघांनींहि शांतपणें व एकोप्यानें काम करावें लागतें. तसें तें जर न होईल तर विचारी लोकांना कोणाचें कोठें चुकतें आहे हें सांगणें भाग पडतें व त्याप्रमाणेंच केसरीनेंहि या बाबतींतील आपलें कर्तव्य चोख बजावलें आहे. तें सांगण्यापूर्वी प्लेगचा थोडक्यांत इतिहास वाचकांना सांगणें योग्य होईल.

ड्रेजनच्या राजवटींत रूफसनें या तापांतील ग्रंथीचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे. हा ताप त्या वेळीं इजिप्त आणि सिरिया या देशांत आढळतो. साहाव्या शतकांत प्लेग युरोपमध्यें आला व त्या वेळच्या सर्व रोमन साम्राज्यांतहि पसरला. इंग्लंडमध्यें प्रथमतः बेडेनें, याचा उल्लेख केलेला आढळतो व तो उल्लेख इ. स. ६६४, ६७२, ६७९ व ६८३ यांमधील आहे. त्यानंतर 'ब्लॅकडेथ' म्हणून ज्या भयंकर रोगानें युरोपवर स्वारी केली त्यांतहि बराचसा

भाग प्लेगचाच आहे, यांत संशय नाहीं. इ. स. १६६४-६५ मधील लंडन येथील भयंकर प्लेग सर्वांना माहीतच आहे. त्यानंतर तो सतराव्या शतकांत तुर्कस्थान, उत्तर आफ्रिका, पोलंड, हंगेरी, ऑस्ट्रिया आणि जर्मनीमध्यें पसरला. युरोपियन डॉक्टरांनीं प्लेगची शास्त्रीय दृष्टीनें इजिप्तमध्यें पाहणी इ. स. १८७८ व १८७९ या वर्षीं केली.

हिंदुस्थानांत प्लेग असल्याचा उल्लेख १८०० सालापर्यंत सांपडत नाहीं, व त्यावरून अशी म्हणच पडली होती कीं, सिंधू नदीच्या पूर्वेला प्लेग कधींच गेला नाहीं. पण यापुढें मात्र ही स्थिति राहिली नाहीं. गुजराथ, काठेवाड व कच्छमध्यें १८१५मध्यें प्लेग उद्भवला व लागलीच त्यापुढील वर्षीं तो सिंधमधील हैदराबादे-पर्यंत जाऊन पोहोंचला. सन १८३६त मारवाड आणि राजपुतान्यांत त्याचा उद्भव झाला. अशा तऱ्हेनें प्लेगचा उपद्रव वरचेवर होऊं लागल्यामुळें सरकारनें डॉ. फ्रान्सिस आणि डॉ. पिअर्सन यांचे या बाबतींत कमिशन नेमलें.

पूर्वींपासूनच या तापाचा व ग्रंथीचा संबंध जोडण्यांत आला आहे. आपल्या-कडेहि अग्निरोहिणी म्हणून हा रोग उल्लेखिला जाई. वाग्भट उत्तरस्थान ३१व्या अध्यायांत याची व्याख्या दिली आहे.

मलेः पित्तोल्बणेः स्फोटा ज्वरिणो मांसदारणाः
कक्षाभागेषु जायंते येऽग्न्याभाः साग्निरोहिणी ॥

याचीं लक्षणें पुढीलप्रमाणें होत. डोकें दुखणें, अंग ठेचलेल्यासारखें होणें, आळस येणें, ग्लानि वाटणें, ताप, वांत्या, उसासे व झांपड येणें, व शेवटीं वरळू लागणें. यांत महत्त्वाचा भाग म्हणजे जांघ, खांक व मान येथें बदामासारखी गांठ येणें. यांत व अग्निरोहिणींत बरेंच साम्य आहे. एक गोष्ट मात्र येथें मुख्यतः लक्षांत ठेवली पाहिजे. ती अशी कीं, प्लेगमध्यें गांठ येणें अपरिहार्यच आहे असें नाहीं. गाठीशिवायहि प्लेगचे दोन प्रकार आहेत. हे दोन्हीहि प्रकार अत्यंत भयंकर असतात व हे रोग झालेले रोगी उठणें बहुशः अशक्यच असतें. त्याउलट, ग्रंथि-सन्निपातांत माणसें उठण्याचा संभव बराच असतो. हाच तापाचा प्रकार नित्यशः आढळत असल्यामुळें लोकांच्या मनांत प्लेग व गांठी यांचें साहचर्य कायमचें होऊन बसलें आहे. बिनगाठीचा (न्युमॉनिक) हा जो प्रकार वर सांगितला तो डॉ. चाइल्ड यांनीं मुंबईमध्येंच प्रथम शोधून काढला.

प्लेगची सांथ एकदां सुरू झाली म्हणजे ती थांबविण्यासाठीं दोन मार्गांनीं आपल्याला प्रयत्न करावे लागतात. एक प्लेग न होऊं देण्याचा व दुसरा प्लेग झाला असतां औषधोपचार करण्याचा. यांतील पहिला फार महत्त्वाचा आहे. व तो साध्य करण्यासाठीं जे उपचार करण्यांत आले त्यांच्याबद्दलच पुष्कळांचा मतभेद झाला. हें प्रकरण नुसत्या मतभेदावर

न थांबून त्यापासून कसकसे अनर्थ ओढवतात हे त्या वेळचा इतिहास वाचला असतां सहज कळण्याजोगें आहे. केसरीची कामगिरी अर्थातच येथेंच दृग्गोचर होते. पण ती काय आहे तें सांगण्यापूर्वी वरील उपचाराची माहिती वाचकांस देणें योग्य होईल.

प्लेग हा रोग एका सूक्ष्म जंतूपासून होतो. मनुष्यास उंदरावरील पिसा चावल्यानें हें जंतू शरिरांत शिरतात व कांहीं दिवसांनीं या रोगाचीं लक्षणें होऊं लागतात. अर्थात् हा रोग थांबविणें असेल तर पिसा व उंदीर यांचा नायनाट करणें भाग आहे. या तत्त्वावरच ज्या घरांत प्लेगची लागण झाली असेल तीं घरें धुऊन स्वच्छ करणें, त्यांतील सामान जाळणें वगैरे मार्ग अनुसरावे लागतात. तसें केल्यानें ते जंतू जास्त फैलावणार नाहींत हें उघड आहे; परंतु ही स्वच्छता राखण्यास जे उपाय योजले त्या उपायांची अमलबजावणी ज्या तऱ्हेनें केली, ती तऱ्हाच पुण्यांत हलकल्लोळ करण्यास कारणीभूत झाली. हा एक मार्ग. दुसरा मार्ग म्हणजे टोंचून घेणें हा होय. याची शास्त्रीय उपपत्ति थोडक्यांत अशी आहे. केसरीच्या भाषेंतच ती येथें उध्दृत केली आहे. 'लशीची 'कल्पना प्रथम देवीपासून निघाली. देवी हा रोग मनुष्यास आयुष्यांतून एकदां 'तरी येण्याचा संभव असतो, व तो एकदां आला म्हणजे बहुधा पुन्हां येत 'नाहीं असा अनुभव आहे. याकरितां एकदां स्वभावतःच मोठा देवीचा रोग 'येण्याची वाट पहात बसण्यापेक्षां ज्यास देवी आल्या असतील त्यांच्या अंगांतील 'थोडीशी देवीची लस आपल्या अंगांत टोंचून घालून सोप्या देवी निय- 'मित ठिकाणीं झाल्या म्हणजे पुन्हां देवी येण्याचा संभव कमी होतो. ही गोष्ट ''गोस्तन सीतला' काढण्यापूर्वींच हिंदुस्थानांत माहीत होती. पण अशी एका 'रोग्याची प्रत्यक्ष लस घेऊन दुसऱ्या माणसाच्या अंगांत घातल्यानें एखादे वेळेस 'खरोखरच नव्या माणसाच्या सर्वांगावर देवी येत. परंतु आतां असें आढळून 'आलें आहे कीं, पाडीच्या स्तनावर पहिल्यांदा देवी काढून मग त्याची लस 'माणसाच्या अंगांत टोंचून घातली असतां असा प्रकार घडत नाहीं व पुनः 'रोग न होण्याचा संभवहि अधिक दृढ होतो. डॉ. जेनर यांचा मुख्य शोध 'हाच होय व त्याप्रमाणें हल्लीं देवी टोचण्याचा प्रघात आहे. वर सांगितलेंच 'आहे कीं, प्लेगजंतूपासून एक प्रकारचें निर्जीव विष शरिरांत तयार होऊन त्याच्या 'योगानें प्लेगचा रोगी मरतो. परंतु या विषाच्या तडाख्यांतूनहि जे लोक वांचतात 'त्यांस एक प्रकारची अशी खात्री वाटते कीं, आपणांस एकदां प्लेग झाला, आतां 'पुन्हा होणार नाहीं. देवीच्या रोगाप्रमाणें प्लेग झालेल्या मनुष्यास लागलाच पुनः 'प्लेग होण्याचा संभव कमी असतो. एवढ्या तत्त्वावर प्लेगच्या लसीची योजना 'झालेली आहे. प्लेगजंतु आपल्या शरिरांत शिरून त्यांस आपल्या रक्तांत हवें 'तेवढें विष निर्माण करूं देण्यापेक्षां त्यांस आपल्या शरिराच्या बाहेर निर्माण

' करावयास लावून त्यांतलें थोडेसें विष ( जंतु नव्हे ) आपल्या शरिरांत टोंचून
' घातल्यानें स्वल्प प्रमाणांत प्लेगाच्या भावना आपल्यास होतील. आणि त्या तशा
' भावना झाल्या म्हणजे प्लेगमधून वरा झालेल्या माणसास ज्याप्रमाणें लवकर प्लेग-
' पासून भीति नसते, तद्वत् आपणांसहि कांहीं काळपर्यंत प्लेग होण्याची भीति
' राहणार नाहीं. सारांश, जिवावर जो प्रसंग यावयाचा तो शेंपटावरच भागवल्या-
' सारखें होईल. प्लेग टोचण्याची जी कृति आहे ती याच तत्त्वावर अवलंबून आहे.
' प्लेगजंतु निवडून काढून त्यांस कोणत्या तरी एखाद्या पदार्थांत आपलें विष उत्पन्न
' करूं द्यावयाचें आणि मग ते जंतु मारून विष तेवढें कायम ठेऊन तें विष लसीच्या
' रूपानें थोडथोडें प्रत्येक मनुष्याचे अंगांत घालून प्लेगची थोडीशी भावना त्याच्या
' अनुभवास आणून द्यावयाची, याचें नांव ' प्लेगची लस टोंचणें ' हें होय. '
( १५-८-९९ ). केसरीच्या भाषेंत वरील उतारा देण्याचा दुहेरी हेतु आहे. एक तर प्लेग टोचण्याची रीत वाचकांना कळावी व दुसरा शास्त्रीय विषय असूनहि लोकांना समजेल अशा भाषेंत याचें विवेचन करण्याची केसरीची पद्धत वाचकांच्या निदर्शनास आणावी. डॉ. जेनरनें प्रथमतः ही कल्पना व्यवहारांत आणल्यापासून या देवी व प्लेग टोचण्याचा प्रघात पुढें हलकें हलकें बराच फैलावूं लागला. प्रथमतः प्रयोगावस्था असल्यामुळें किती औषध टोचल्यानें योग्य परिणाम होईल हें ठरविण्यास बराच अवधि लागला. त्याप्रमाणेंच हें औषध तयार करण्याची रीतहि बरीच बदलावी लागली. लशींत प्रमाण व क्रिया यांमध्यें चुका झाल्यास त्यापासून लोकांना फार भीति असे. देवीच्या बाबतींत या टोचल्यानें गरमी, क्षय व महारोग प्रत्यक्ष हातावरून टोचण्याची पद्धत अंमलांत असतां इतर लोकांना होत असा दाखला सांपडतो. जसजसा अनुभव येत जाईल तसतशा सुधारणा होत जातात व लोकांना कमी कमी त्रास होत जातो.

इनॉक्युलेशननें लोकांस किती त्रास झाला याचा चांगला उल्लेख ९-१-१९०० च्या केसरींत हुबळीच्या पत्रांत आहे. त्यांत पांच जणांना त्यामुळें अंधत्व आलें; कांहीं लोकांच्या अंगावर चट्टे व डाग राहिले; बायकांचा गर्भपात झाला वगैरे उल्लेख सप्रमाण व नांवनिशीवार दिले आहेत.

या बाबतींत रा. गुरुजी यांची कामगिरी निःसंशय उत्कृष्ट आहे. त्यांनीं इनॉक्युलेशनपासून कोणकोणाला किती त्रास झाला हें सप्रमाण सिद्ध केलें आहे व हुबळीला कमिशन गेलें असतां तें त्यावेळीं काशीहून मुद्दाम साक्षीसाठीं परत येऊन, त्यांनीं आपला सर्व पुरावा कमिशनपुढें मांडला होता. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें साधारण १७००० टोंचलेल्या लोकांत निदान १००० तरी असे इजा झालेले लोक आहेत.

इनॉक्युलेशन प्रयोगावस्थेंत असल्यामुळें असल्या गोष्टी होणें शक्य होतें व तशा झाल्या म्हणून कोणी संशोधकांना नांवें ठेवीत नाहींत. वादाचा मुख्य मुद्दा

तो नसून अशा प्रथमावस्थेंत टोंचण्याची लोकांवर सक्ती करणें किंवा कसें हा आहे. या विषयावर डॉ. भालचंद्र व केसरी यांमध्यें वादहि झाला होता. त्या वादाचा केसरीनें केलेला उपसंहार वादाच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. आणि कोणतेहि प्रयोग प्रथमावस्थेंत असतांना त्यांचा व्यवहारांत कितपत उपयोग करावयाचा याचा ऊहापोह त्यांत केला आहे म्हणून जरा लांब असला तरी तोच उतारा आधीं येथें उद्धृत केला आहे. ' डॉ. भालचंद्र यांचा व आमचा कोणत्या महत्त्वाच्या ' बाबतींत मतभेद आहे हें वर लिहिलेल्या हकीकतीवरून स्पष्ट दिसून येईल. ' प्लेग टोचण्याची कल्पना प्रथम देवी टोचण्याच्या युक्तीपासून निघाली, पण ' देवींचा रोगच असा आहे कीं तो कोणाहि मनुष्यास एकदां आला असतां ' बहुधा पुन्हां येत नाहीं. प्लेगचा तसा प्रकार नाहीं. तेव्हां प्लेग टोचण्या- ' पासून टोचलेल्या मनुष्यास पुनः कधींहि प्लेग होणार नाहीं अशी खात्रीलायक ' लस तयार होईल कीं नाहीं याचा अद्याप जंतुशास्त्रज्ञांस संशयच आहे. तथापि ' हाफकिनसारख्या गृहस्थांनीं हिमतीनें आणि उद्योगानें नव्यानव्या कल्पना ' काढून त्याप्रमाणें प्रयोग करून अनुभव घेण्याचें काम चालविलें आहे. प्लेगनें ' टोचलेल्या इसमास कांहीं दिवस तरी प्लेग होण्याची धास्ती नसते असा बराच ' अनुभव आलेला आहे. पण हा निर्धास्तपणा किती दिवस टिकतो हें अद्याप ' निश्चित कळलें नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं प्रकृतीच्या लोकांस ही प्लेगची लस ' मानवत नाहीं हेंहि आमच्यामतें सिद्ध झाल्यासारखें आहे. अशा स्थितींत या ' उपायास अपरिपक्व म्हणावें किंवा प्रयोगावस्थेच्या पलीकडे गेलेला म्हणावें ' याचा वाचकांनींच विचार करावा. शास्त्रीय दृष्ट्या पाहिलें तर प्लेगच्या लसींत ' घन ( मृत जंतु ) आणि प्रवाही ( प्लेग-विष ) असे दोन घटकावयव असतात, ' त्यांचे शरीरावर पृथक् पृथक् काय परिणाम होतात हेंहि अद्याप नीट समजलें ' नाहीं. उद्योग चांगला आहे, स्तुत्य आहे व केव्हां ना केव्हां तरी त्यापासून ' जगाचें मोठें कल्याण होण्याची मोठी आशा आहे. पण या सर्व गोष्टी कबूल ' केल्या, तरी आज त्याची स्थिति अपूर्ण नाहीं असें आम्ही म्हणूं शकत नाहीं. ' अमक्या ठिकाणीं अमुक हजार माणसें टोंचलीं वगैरे जे आंकडे प्रसिद्ध झाले ' आहेत त्यांत आम्हांस तर कांहीं विशेष अर्थ दिसत नाहीं. प्लेग टोंचल्या- ' पासून टोंचलेल्या गृहस्थास कांहीं दिवस प्लेग होण्याची भीति नसते, एवढीच ' जर गोष्ट सिद्ध करावयाची असेल तर त्यांस आंकड्यांची जरुरी नाहीं. कारण ' क्षयरोग, टायफाईड ज्वर, यांसहि हेंच तत्त्व लागूं केलेलें असून तेथेंहि अशाच ' प्रकारें अनुभव आलेले आहेत. पण ते रोग टोंचण्याचे उपचार परिपक्व झाले ' असें मोठमोठे जंतुशास्त्रज्ञ मानीत नाहींत, तर प्लेग टोंचण्याचा उपचार ' प्रयोगावस्थेच्या पलीकडे गेलेला आहे असें म्हणणें कदापिहि वाजवी होणार ' नाहीं. मि. हाफ्किन यांनींहि आपल्या व्याख्यानांत ही गोष्ट कबूल केली

' आहे. या बाबतींत अद्याप पुष्कळ शोध व्हावयाचे आहेत. प्लेगच्या लसीं-
' तील घटकावयवांचे गुणदोष अद्याप समजावयाचे आहेत आणि तिची तीव्रता
' कमी करून कोणच्या प्रकृतीच्या मनुष्यास टोंचलें असतां त्यास इजा होणार
' नाहीं हेंहि अद्याप ठरावयाचें आहे. आज सिद्ध काय तें एवढेंच झालें आहे
' कीं, प्लेगचें थोडेंसें विष अंगांत घातलें असतां शरीरांत प्लेगबरोबर झुंजण्या-
' ची थोडीशी शक्ति येते. पण हें तत्त्व सिद्ध करण्यास एवढा खटाटोपहि
' नको होता. कारण वर लिहिल्याप्रमाणें नित्य अफू खाणारांस अफू बाधत
' नाहीं यांतील व देवी टोचण्यांतील बीज तेंच आहे. मुख्य मुद्द्याची गोष्ट ही
' आहे कीं, प्लेग टोंचण्यानें जो निर्धास्तपणा येतो तो देवी टोंचण्याइतका तरी
' कायमचा झाला पाहिजे. तसा जर तो पुष्कळ शास्त्रीय शोध करून न होईल
' तर त्या उपचाराची मातब्बरी फारशी राहाणार नाहीं. कसेंहि असो; हल्लीं तो
' अपूर्णावस्थेंत आहे एवढें आमच्या मतें निर्विवाद आहे. पूर्णावस्थेंत यावा अशी
' आमची मनापासून इच्छा आहे. पण त्यामुळें त्या अर्ध्या कच्च्या तयार
' झालेल्या रसायनाचा सर्वांनीं अंगीकार करावा आणि ते तसे करीत नसल्यास
' ' खुषीची सक्ती ' असें वेडेंवाकडें नांव देऊन सरकारनें लोकांवर जुलूम करून
' त्यांस टोंचून सोडावें असें मत देण्यास आमची मनोदेवता आम्हांस सांगत
' नाहीं.' ( २१-११-९९ ). एवढ्या उताऱ्यावरून इनॉक्युलेशनची त्या वेळची
' स्थिति वाचकांच्या लक्षांत येईल.

इनॉक्युलेशनप्रमाणेंच दुसरा मार्ग म्हणजे रोग्यांस निरोगी लोकांपासून वेगळें काढणें हा होय. यालाच सेग्रेगेशन असें म्हणतात. यांतील तत्त्व हेंच आहे कीं रोग्याच्या विष्ठा, घर्म, वगैरे त्याज्य पदार्थांपासून रोग फैलावण्याला मदत होते म्हणून रोग्यालाच उचलून निराळें ठेवणें. रोगी इस्पितळांत नेल्यावर अथवा रोगी मरण पावल्यावर ओघानेंच घरांतील घाण काढून टाकणें, मयत झालेल्या रोग्याची खोली, पांघरुणें वगैरे स्वच्छ करणें या गोष्टी येतात. घरांत प्लेगाची लागण झाली किंवा नाहीं हें कळण्यासाठीं घरोघर तपासणी करणें, तशी लागण आढळून आल्यास रोग्यास इस्पितळांत नेऊन जवळच्या लोकांना निराळ्याच एका कँपमध्यें ठेवणें वगैरे कामें करावीं लागतात. अशा तऱ्हेच्या कँपला क्वारंटीन असें म्हणतात. गांवांतून बाहेर जाणारीं व बाहेरून गांवांत येणारीं माणसें आपल्याबरोबर रोगांचें जंतु आणतील, तसें होऊं नये किंवा रोगाला प्रथमावस्थेंतील लोक ओळखूं यावे हा उद्देश अशा क्वारंटीनचा असतो. तपासणीच्या व्यवस्थेसंबंधीं केसरीकार म्हणतात,
' आतां खुद्द व्यवस्थेचाच विचार करूं. आमच्या मतें हल्लीं जो प्रकार चालला
' आहे हा एक प्रकारें धुमाकुळीचाच आहे. पलटणींतले स्वार, गोरे व काळे
' शिपाई, ऑफिसर, पोलीस, सभ्य गृहस्थ, यांचा जो घोळक्याचा घोळका जमत
' असतो याचा दिखाऊपणापलीकडे व बरेंच अवडंबर माजविलें होतें असा

' रिपोर्ट करण्यापलीकडे ज्यास्त कांहीं उपयोग आहे असें आम्हांस वाटत नाहीं.
' हा एवढा खटाटोप कशाकरतां ? तर हिंदु लोक घरांत सांथीच्या तापाचे
' रोगी ठेवून ठिकठिकाणीं रोगाचा प्रसार करतात तो, रोगी बाहेर काढून बंद
' करण्याकरतां होय. हा उद्देश बरोबर आहे असें जरी कबूल केलें, तरी तो
' तडीस नेण्यास इतकें अवडंबर उभें करण्याची बिलकूल जरूर नाहीं. झडतीचा
' दुसरा प्रकार म्हटला म्हणजे ज्या घरांत सांथीच्या आजारानें कोणी इसम मेला
' असेल तें घर साफ करणें त्यांतील रोग्यांच्या वापरांत असलेल्या वस्तूंचा नाश
' करणें हा होय. या कामीं अद्याप बरीच अव्यवस्था आहे असें दिसून येतें.
' सांथीचा रोगी ज्या घरांत मेला असेल त्या घरांवर एक तांबडी रेघ
' खुणेकरितां घातली आहे व तें घर एकदां धुरी देणारी पार्टी येऊन ते धुपवून
' टाकणार व मागून चुना देणारी पार्टी येऊन तें साफ करणार व दोन्ही पार्ट्या
' उभ्या रेघावर दोन आडव्या रेघा मारून चालत्या होणार अशी व्यवस्था केलेली.
' यामुळें ज्या घरावर एक तांबडी रेघ मारली आहे त्या घरांतील यच्चयावत् सर्व
' जिनसा जाळावयाच्या असा मात्र हुकूम नाहीं. ज्या खोलींत रोगी मेलेला
' असेल त्या खोलींतल्या मात्र जिनसा जाळावयाच्या आहेत.' ( १६-३-९७ ).
मार्च १८९७त हा त्रास इतका झाला होता कीं लोकांस अशा रीतीनें रोज त्रास देण्यापेक्षां एकदांच जुलुमानें डॉ. हाफाकिन यांनीं नवीन कल्पना काढल्या-प्रमाणें सरकारनें प्लेग टोंचून काढल्यास एकदांची कटकट मिटेल असें उद्गार समंजस लोकहि काढूं लागले होते. ही व्यवस्था धरांत प्लेगचे रोगी किती आहेत ते पाहाण्यासाठीं व तसे ते असल्यास त्यांना हॉस्पिटलमध्यें पोहोंचविण्यासाठीं अमलांत होती पण त्यांच्यापेक्षां येथील डॉक्टर लोक कशी व्यवस्था करीत याचे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत ते पाहिले असतां हा फरक नीट लक्षांत येईल.
' सोल्जर लोकांकडून घराची तपासणी ता. १३ मार्च रोजीं सुरू झाली. तेथ-
' पासून ता. १ एप्रिलपर्यंत त्यांनीं शहर तीनदां तपासलें व १६४ रोगी इस्पि-
' तळांत पाठविले. इतक्याच मुदतींत पुणें म्युनिसिपालिटीचे ३ मेडिकल ऑफिसर
' म्युनिसिपालिटीमार्फत जे काम करीत होते, त्यांनीं २७१ रोगी हॉस्पिटलांत
' पोहोंचते केले.' ( ६-४-९७ ).

या व्यवस्थेंतील तत्त्व सर्वांना मान्य होतें, पण तें अमलांत आणतांना जो त्रास होत होता तो कमी करावा व अन्य कांहीं मार्गांनीं तें तत्त्व व्यवहारांत आणतां आल्यास पहावें हाच त्या वेळच्या चळवळीचा उद्देश होता. ही चळवळ केसरीनें पुढाकार घेऊन चालविली होती व त्याचा थोडाफार उपयोगहि झाला होता. आतां या व्यवस्थेपासून जे दोन अत्याचार झाले त्यांचा उल्लेख करून हा लेख आटोपतां घेऊं.

त्यांपैकीं एक पुण्यास ता. २२ जून १८९७ ला रँडसाहेबाचा खून हा होय.

व दुसरा बुधवार ता. ९ मार्च ९८ या दिवशीं मुंबईंत मुसलमानांनीं केलेला दंगा हा होय. हा दंगा मुसलमानांतील एका बाईवरून घडून आला. तपासण्यास गेलेल्या डॉ. गिल्डर वगैरे लोकांना, पाहूं न दिल्यामुळें त्यांनीं मुख्य प्लेग-ऑफिसर व एक नर्स यांना आणून नर्सकडून बाईला तपासविलें. ही केस प्लेगचीच आहे अशी खात्री झाल्यावर तिला इस्पितळांत नेण्याची तयारी चालविली. पण मध्यंतरीं त्या मोहल्यांतील सारे मुसलमान तेथें जमले व त्यांनीं सर्व पोलिसांवर हल्ला केला. अशा तऱ्हेनें हा दंग्याचा वणवा पेटला. अर्थातच हा दंगा शमल्यावर या व्यवस्थेंत बरीच ढिलाई आली.

प्लेगचा कहर सुरू झाल्यावर आपले वैद्य कांहीं स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीं वैद्य त्र्यंबकशास्त्री लागवणकर यांच्या घरीं सभा भरवून बऱ्याच आधारावरून, ऋतुविपरीतपणानें कोंडलेली एक प्रकारची सविष हवा, या रोगाची उत्पादक आहे; तीमुळें ग्रंथी किंवा सूज उद्भवणें स्वाभाविक आहे असा निर्णय केला; व रोगाचे नांव वैकृत सन्निपात असें ठरविलें.

या रोगावर त्यावेळीं बरेच उपचार सुचविण्यांत आले. त्यांपैकीं एकदोन येथें देणें अनुचित होणार नाहीं. नलापूरकर नांवाच्या एका गृहस्थानें कडूलिंबाचा प्लेगवर उपयोग होईल असें सांगून त्याची देण्याची रीत व त्यापासून आलेला गुण कोष्टकरूपानें ३२५ पैकीं ११८ रोगी बरे झाले असा दाखविला.

स्वामी लवणानंद या नांवानें अलीकडे सर्वांना माहीत झालेले डॉ. रुईकर यांनींहि प्लेग व मीठ यांवर त्यावेळीं व्याख्यानें दिलीं होतीं.

प्लेग जरी हिंदुस्थानांत यावेळीं नव्यानेंच आला असें नाहीं तरी त्याचा १८९६ मधील हल्ला फारच जोराचा होता यांत शंका नाहीं. अशा वेळीं सरकार व लोक दोघेहि आपापल्या परीनें गांगरून गेले हें स्वाभाविकच होतें. पण मनाची अस्वस्थ स्थिति झाली म्हणून विवेक सोडतां उपयोगी नाहीं, हाच मुद्दा केसरीनें आपल्या प्लेग व इनॉक्युलेशनच्या व्यवस्थेविरुद्ध जी मोहीम केली तींत प्रामुख्यानें मांडला होता. प्लेगनिवारणार्थ उपाय योजावयाच्या शास्त्रीय उपायाविरुद्ध केसरी नव्हता. इनॉक्युलेशचेंहि त्याला वावडें नव्हतें. पण अशा प्रयोगावस्थेच्या उपायांस सक्तीनें उपयोगांत आणणें चांगलें नाहीं हेंच त्याचें म्हणणें होतें. सरकारच्या जाचानें एकीकडून मनें होरपळलेलीं व प्लेगच्या त्रासानें दुसरीकडून बरें पोखरलेलीं अशी दीनवाणी स्थिति जनतेची त्यावेळीं झाली होती. अशा वेळीं दोघांचेंहि चुकतें कोठें हें निःसंदेह रीतीनें सांगणें धाडसाचें होतें यांत शंका नाहीं. आणि तेंच धाष्टर्य केसरीनें दाखविलें याबद्दल केसरीची कोणीहि झालें तरी स्तुति करील. यावेळीं वर्तमानपत्रकर्त्यांची कशी स्थिति झाली होती यासंबंधीं केसरीचा एक उतारा पुढें दिला आहे. ‘ प्लेगच्या धामधुमींत नेटिव्ह पत्रकारांवर ‘ मोठ्या जबाबदारीचें काम होतें. रोग हटविण्याची शास्त्रीय पद्धत अमलांत

'आणणें जरूर आहे व तेवढ्यापुरतें सरकारचें म्हणणें ग्राह्य आहे, अशी एक
'बाजू होती व दुसरी लोकांस विनाकारण फाजील त्रास होत होता ही होय ! या
'दोन्ही बाजूंचा नीट विचार करून सरकार व लोक या दोघांचेंहि हित जेणेंकरून
'साधेल असा मार्ग काढावयाचा होता म्हणून तपासणी बरी वाटली तरी सोल्जर
'लोकांच्या चोऱ्यांचा होईल तितका आवेशानें निषेध करावा लागत असे.
( ६-७-९७ ).

जें काम आपल्या लोकांकडून चांगल्या तऱ्हेनें झालें असतें त्या कामाला विजातीय विधर्मी लोकांची मदत घेतल्यामुळें निष्कारण अनर्थ कोसळले ते सरकारनें जर नीट विचार केला असतां तर सहज थांबवितां आले असते, हाच केसरीच्या म्हणण्याचा निष्कर्ष आहे व तें म्हणणें अशा विकट परिस्थितींतहि जनतेपुढें मांडणें हीच केसरीची मोठी कामगिरी होती असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. विषय केसरीकारास अगदीं आडवळणी असूनहि तो आत्मसात करण्याची केसरीची पद्धत व त्या विषयाच्या दर्दी माणसाला शोभेल अशा तऱ्हेनें त्याची मांडणी करणें हा गुण निःसंशय प्रशंसनीय आहे असें कोणालाहि वाटल्याखेरीज राहाणार नाहीं.

---

# विवाहवय व संमतिवय

[ श्री. लक्ष्मण दत्तात्रय जोशी, बी. ए., एल्एल्. बी. ]

या विषयासंबंधानें गेल्या पन्नास वर्षांत पुष्कळच वाद झाले व सन १८८६ सालचें केसरीचें सर्व फाईलच विवाहासंबंधींच्या तात्त्विक चर्चेच्या वादांनीं भरलें आहे. पुण्याची वसंतव्याख्यानमाला व मुंबईची हेमंतमाला येथेंहि व्याख्यानें होत व या चर्चेशीं संबंध आला नाहीं असा पुण्यामुंबईचा एकहि प्रतिष्ठित किंवा बहुश्रुत मनुष्य त्या वेळीं नसेल. विवाहकालाची सुधारणा म्हणजे सामाजिक स्थित्यंतराचा इतिहास होय व हा विषय म्हणजे स्वतंत्र ग्रंथालाच पुरण्यासारखा आहे. तथापि ऐतिहासिक दृष्टीनें गेल्या पन्नास वर्षांतील कांहीं गोष्टींचें दिग्दर्शन करितां येईल.

१८१८ मध्यें हिंदुस्थानाची राजकीय स्वतंत्रता पूर्णांशानें नाहींशी झाल्यामुळें सर्व प्रकारची अवनति होऊं लागली, तेव्हां १८८०।९० चे सुमारास विद्वान्

लोकांत त्याचा विचार सुरू झाला. राजकीय स्वातंत्र्य व पारतंत्र्य वगैरे गोष्टी समाजाच्या सामर्थ्यावर अवलंबून असतात तेव्हां आपला समाज सुधारावा या दृष्टीनें तिकडे लोकांचें लक्ष गेलें व सुधारणेच्या वैभवाला चढलेली अशीं जीं पाश्चिमात्य राष्ट्रें व समाज यांच्याशीं तुलना करितां 'आपल्या समाजांत विवाह फार बालपणीं होतात' अशी गोष्ट नजरेस आली. तेव्हां त्यासंबंधीं सर्व तऱ्हेचा विचार सुरू झाला.

चाळीस वर्षांपूर्वी या विषयावर मुंबईतील प्रसिद्ध हेमंत व्याख्यानमालेंत व्याख्यानें होत व त्याचे सारांश केसरींत दिले जात. त्यांत डॉ. नानासाहेब देशमुख, आठल्ये वगैरेसारख्यांचीं व्याख्यानें असत. तसेंच श्री. चिंतामणराव वैद्य वगैरेसारख्या विद्वानांचे अवलोन्नतिमाला वगैरेसारखे निरनिराळे लेख केसरींत प्रसिद्ध करून व स्वतः लिहून या प्रश्नास केसरीनें चांगलें चालन दिलें.

संमतिवयासंबंधीं सविस्तर वादाची हकीगत टिळकचरित्र व लो. टिळकांचा लेख खंड ४ यांत आली असल्यानें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. तथापि त्यांतील पक्षभेदासंबंधीं लिहितांना केसरीनें त्यांचे तीन प्रकार केले आहेत. (१) कायद्याची मदत अवश्य आहे असें म्हणणारे (२) उपदेशद्वारां बहुमत तयार करावें व मग बहुमताप्रमाणें कायदा करावा अशा मताचे व (३) सुधारणा करणारांनीं आपल्यापुरता कायदा मागून घ्यावा, त्याप्रमाणें सुधारणा करून दाखवावी, म्हणजे मग लोक आपोआपच त्या मार्गावर येतील असें प्रतिपादणारा. आतां या तीन पक्षांत वाद असले तरी ते सर्व पक्ष सुधारणाप्रिय आहेत, नवद्वेषी नाहींत. भिन्नभाव काय तो कार्य साधण्याच्या मार्गांचा आहे.

मि. मलबारी यांना सरकारमार्फत कायदा होऊन सुधारणा अमलांत यावयास पाहिजे होत्या. न्या. रानडे हे कायदेवाल्या पक्षाचे अग्रणी होते. पण लो. टिळक यांच्या मतानें सुधारणा अवश्य आहे परंतु ती आपण केली पाहिजे, सरकारमार्फत नको. 'सुधारणा हवी आहे पण ज्यांचे विचार सुधारले नाहींत, त्यांच्या 'गळ्यांत सुधारणा कायद्यानें बांधणें मला प्रशस्त वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर 'तें अन्यायाचें व जुलमाचें कृत्य आहे. तेव्हां कायदा नको.' (के.२८-१०-९०). त्या वेळच्या सुधारकांना केसरीनें 'परस्परसुधारक' असें नांव देऊन 'सुधारणा स्वतः अमलांत आणा व उदाहरण घालून द्या' (२८-११-९०) असें आव्हान केलें आहे.

या संमतिवयाच्या बिलाचे बाबतींत जरी फार खळबळ झाली व प्रचंड लोकमत विरुद्ध होतें, तरी शेवटीं सुधारकांच्या खटपटीनें तें पास होऊन त्याचा कायदा झाला. असो, यानंतर सन १९२५ सालीं हें बिल पुनः दुरुस्तीला आलें व त्यांत विवाहित स्त्रीला १३ वर्षें व अविवाहित स्त्रीचे बाबतींत १४ वर्षें अशी संमतीची वयोमर्यादा ठरली. सातारा येथें भरलेल्या सामाजिक परिषदेनें वयोमर्यादेचा

कायदा असावा असा ठराव केला व त्यास अस्पृश्य व ब्राह्मणेतरांचे पुढारी अनुकूल होते. त्या वेळेंत व या वेळेंत फार अंतर पडलें. कारण १८९१ सालीं केसरीनें सदर बिलास विरोध केला तर या वेळीं श्री. तात्यासाहेबांनीं बिलास पुष्टि दिली, यामुळें लोकमत व बदलणारी परिस्थिति याप्रमाणें केसरीचें उदार धोरण व इष्ट त्या सुधारणा घडवून आणण्याचें व्रत यथायोग्य रीतीनें स्पष्ट होतें. या बिलासंबंधीं दिलेल्या व्याख्यानांत केसरीकार केळकर यांनीं असें सांगितलें कीं, ' सुधारणा ही समाजापुढें एक पाऊल जाऊन करावी, पण समाजाकडे दुर्लक्ष ' नसावें. या कायद्यानें धर्मांत हात घातल्यासारखा होतो पण तशी आज लोक- ' मताची तयारी आहे. १८९१ ची ओरड राजकीय स्वरूपाची होती. त्या वेळ- ' चीं कायदेमंडळें आतांसारखीं प्रातिनिधिक नव्हतीं. निव्वळ धार्मिक बाबतींत ' कोणी सरकारास हात घालूं देणार नाहीं. परंतु संमिश्र स्वरूपाच्या गोष्टीचा ' विचार कायदेमंडळानें केला पाहिजे.' (के. २९-९-२५). या वेळीं देखील, १४ वर्षांचे आंत विवाह होऊं शकतात त्यामुळें विवाहित स्त्रीचें वय १४ हें संमतिवय टरविण्यास श्री. केळकरांनीं विरोध केला. कारण संमतिवय व विवाहवय यांत फरक असणें अनर्थकारक होय. बिलांत योग्य ते सेफगार्ड्स नसल्यानें दुष्टांचे हातांत कोलीत दिल्यासारखें होऊन चमत्कारिक परिस्थिति उत्पन्न होईल, सबब १४ वर्षांच्या मर्यादेला हल्लींची परिस्थिति इष्ट नाहीं. ( के. २४-४-२५ ).

सन १८९२ मध्यें बालविवाहासंबंधीं लिहितांना केसरीनें असें म्हटलें कीं, बालविवाह आमचे अवनतीस थोडाबहुत कारण आहे हें आम्हांस कबूल आहे; परंतु फक्त बालविवाह बंद केल्यानें राष्ट्रोन्नति होईल असें नाहीं. याला ऐरिश लोकांचें चांगलेंच उदाहरण आहे. आयरिश लोकांनीं या सामाजिक सुधारणा आधींच केल्या आहेत. तेव्हां आमच्या पारतंत्र्याचा दोष बालविवाहावर टाकणें योग्य होणार नाहीं.

बडोदें राज्यांतील बाल-विवाहप्रतिबंधक कायद्यासंबंधीं केसरीनें अग्रलेख लिहून त्याचा समाचार घेतला आहे. त्याचाहि अर्थ इतकाच कीं सामाजिक सुधारणा कायद्यानें कधींहि होत नाहीं. त्याला बडोदें दरबारांतील खुळापैकीं एक खूळ म्हटलें आहे. ज्या सुधारणा इंग्रज करूं शकत नाहींत त्या संस्थानांत करण्यास हरकत नाहीं अशा विचाराचीं बरींच माणसें आहेत. ' कायद्याच्या सक्ती- ' नें सुधारणा होऊं शकत नाहीं हें तत्त्व इंग्रजी राज्यांत तसेंच संस्थानांतहि लागू ' असलें पाहिजे.' (के. १९-५-०३ ).

१८९० सालीं श्री. नानासाहेब वैद्यांनीं अबलोन्नति-लेखमालेचे लेख केसरीचे अंकाबरोबर वाटविले. यांत सुधारणा होण्यास मध्यम व कनिष्ठ लोकांचीं मनें बदललीं पाहिजेत असें प्रतिपादन केलें आहे. यांत सुधारणेच्या मार्गाचा शांतपणें विचार केला आहे व हे लेख म्हणजे सुधारणेच्या नव्या वळणाचा पाया

आहे. परंतु त्यांत 'सुधारणेच्या इष्टानिष्टतेचा ऊहापोह केलेला नाहीं.' अशा तऱ्हेचा आपला अभिप्राय प्रकट करून एकंदरींत वैद्यांचें केसरीनें अभिनंदनच केलें आहे.

यानंतर 'सुधारणा कशानें होईल?' या मथळ्याचा अग्रलेख लिहून त्या मार्गाचें दिग्दर्शन केलें आहे. 'इंग्रजी विद्येचा व रितीभातींचा आमच्या लोकांवर परि-'णाम होत आहे. आमच्या समाजांत कांहीं सुधारणा नकोत असें आमचें 'म्हणणें नाहीं, परंतु परकीयांचा उपदेश या कामीं निरुपयोगी आहे, कारण त्यांना 'आमच्या व्यवहाराचें मर्म समजत नाहीं. ज्यांना सुधारणासंबंधांत कायदा 'हवा असेल त्यांनीं लोकमत आपले बाजूस करून घ्यावें. सुधारणा करण्याचे कामीं 'स्त्रिया व मध्यम प्रतीचे लोक अनुकूल करून घेतले पाहिजेत.'(१८-११-९०). सर्व खटपटी करून लोकमत सुधारणेला अनुकूल करून घेतले पाहिजे, हा मुख्य सिद्धान्त स्पष्टपणें मांडून दिला आहे. तसेंच 'तिऱ्हाईत काय म्हणतो!' या लेखांत बालविवाह व वधूचे वयासंबंधांत खालील विचार प्रकट केले आहेत. 'बालविवाहामध्यें सर्व बाबतींत वधूवर अज्ञान असतात. त्यांत केवळ खरी 'आईबापांचीच हौस असते. ज्याची त्यानें निवड करणें रास्त आहे. संसारो-'पयोगी शिक्षण मुलीस मिळालें पाहिजे; पण तें लहानपणीं लग्न केल्यानें साध-'णार नाहीं. १२-१३ वर्षेपर्यंत मुलींनीं शिकलें पाहिजे, इतकेंच नव्हे तर '१४-१५ वर्षेपर्यंत शिक्षणासाठीं मोकळीक ठेवली पाहिजे. तसेंच वीस वर्षेपर्यंत 'मुलाचें लग्न करतां कामा नये. प्रजेकरितां लवकर लग्न केलें पाहिजे असें नाहीं.'

सन १९२६ सालीं कोल्हापूरसंस्थानानें मुलीचें १० वर्षांचे आंत व मुलाचे १४ वर्षांचे आंत लग्न करूं नये अशा प्रकारचा बालविवाहप्रतिबंधक कायदा केला. 'दरबारनें घातलेली ही वयोमर्यादा अत्यंत योग्य आहे व संस्थानानें 'फार चांगलें उदाहरण घालून दिलें,' अशा प्रकारचा संस्थानचा गौरव केसरीनें केला आहे. त्यावरून इष्ट त्या गुणाचें चीज करण्याची उदार प्रवृत्ति प्रतीत होते यांत शंका नाहीं.

१८९१ च्या संमतिबिलानंतर मोठी खळबळ उडविणारा सामाजिक विषया-संबंधाचा कायदा म्हणजे शारदा कायदाच होय.

जरी आतां वधूवरांचीं वयें वाढलेलीं आढळतात व शेंकडा ५० मुलींचे विवाह १४ वर्षांचे खालीं होत नाहींत तरी बाकी शेंकडा ५० मुलींचे व माग-सलेल्या वर्गांत होणारे बालविवाह बंद व्हावेत या चांगल्या हेतूनें शारदा बिल या नांवाचें बालविवाहप्रतिबंधक बिल हरविलास शारडा या मारवाडी जातीं-तील पेन्शनर मुनसफांनीं आणिलें होतें. त्यावर अनेकांनीं धर्मांत सरकारानें हात घालूं नये, सरकार परधर्मीय आहे, समाजावरच सुधारणा सोंपवावी, कौन्सिलें प्रातिनिधिक नाहींत, त्यांत निरनिराळ्या धर्मांचे लोक असतात,

ऋतुप्राप्तीनंतर लग्न करणें पाप आहे, योग्य काळीं लग्नें झाल्यास अनिति वाढेल वगैरे ठरीव आक्षेप घेतले. या सर्व आक्षेपांचा केसरीनें विचार करून त्यांचें केसरीनें खंडन केलें आहे.

दुष्ट चाली बंद करण्याला कायदे पाहिजेत व इतर देशांत या विवाहाच्या बाबतींत कायद्यानें सुधारणा झाली आहे हें दाखविलें आहे. इतकेंच नव्हे तर इंदूर, राजकोट, कोटा, मंडी, म्हैसूर व बडोदें इत्यादि आपल्या संस्थानिकांनीं असे कायदे केले आहेत हें नजरेसमोर आणिलें आहे. केसरीला शारदा कायदा तत्त्वतः मान्य आहे व त्यांतील तत्त्वाला त्यानें चांगलाच पाठिंबा दिला आहे. 'शारदेची आकाशवाणी' ही लेखमाला तर त्या वेळच्या सर्व लेखांत उत्कृष्ट असून केसरीच्या वाङ्मयांत चिरकाल राहण्यासारखी आहे. तथापि श्री. न. चिं. केळकर यांनीं मत विरुद्ध दिलें तें केवळ त्यांतील तपशिलाच्या बाबी त्यांना पसंत नाहींत म्हणूनच. पण तपशिलाचा मुद्दा गौण आहे. तसेंच हा कायदा केला तो आपल्याच लोकांनीं; सरकारनें यासंबंधांत अंगचोरपणाच केला आहे. सरकारनें उत्सुकतेनें मदत केलेली नाहीं. नेहमीं सुधारणेला, धर्माकरितां आक्षेप घेतांना धर्माची आवश्यक व अनवश्यक अंगें बघून त्याचा विचार केला पाहिजे. अनेक वेळां विशिष्ट रूढि आहेत असा केवळ समज असतो. बरें, तसें पाहूं त्यास यासंबंधांत निश्चित शास्त्राधार सांपडत नाहींत.

मुसलमानांनींहि विरोध केला पण अमक्या वयांत विवाह अगर गर्भाधान करावें असें मुसलमानी धर्मांत अगर कुराणांत नाहीं. तुर्कस्थान व इजिप्तमध्यें लग्न व संमतिवयासंबंधाचे कायदे आहेत. हिंदुस्थांतल्या अनेक जातींत १६ वर्षांनंतर लग्नें होतात, परंतु त्या मुली अनीतीचे मार्गाकडे गेलेल्या दिसत नाहींत. बालविधवा जर अनितीकडे जात नाहींत तर १५-१६ वर्षांच्या कुमारिका तेवढ्या कां जातील ? अशी विचारणा केली आहे. स्त्रीची सुरक्षितता नष्ट करावी असा कायद्यानें नवऱ्याला कधींहि हक्क दिलेला नाहीं. सदरचा कायदा पास करून घेण्याचा स्त्रियांचा निश्चय होता.

अशा तऱ्हेनें आक्षेप व उत्तरें वगैरे चळवळ झाली; पण शेवटीं हें बिल पास होऊन त्याचा कायदा झाला. पं. मालवीयांना देखील हें बिल तत्त्वतः मान्य आहे. फक्त वयासंबंधाचाच वाद होता.

हा कायदा झाल्यानंतर तो रद्द करून घेण्याची व त्याविरुद्ध सत्याग्रह करण्याची कित्येकांनीं चळवळ केली. परंतु हा कायदा रद्द होणार नाहीं असें आपलें मत केसरीनें प्रगट केलें. तसेंच कायदा झाला आहे तर तो मोडण्यांत अर्थ नाहीं. आहे त्या कायद्याप्रमाणेंच वागणें योग्य; त्यांत जे काय दोष असतील ते बदलून घेण्याची खटपट करावी हें योग्य आहे.

याप्रमाणें शारदा कायद्यानें १४ व १८ वर्षें अशा तऱ्हेचीं अनुक्रमें

वधूवरांची विवाहवयोमर्यादा ठरून गेली आहे व इतक्या दिवसांच्या चळवळी-नंतर झाली ही सुधारणा योग्य झाली असें म्हणणें योग्य होईल. आतां त्या कायद्यांत शिक्षा अगर अमलबजावणीसंबंधाचा जाचकपणा आहे तो काढून टाकण्याची खटपट करणें मात्र अयोग्य होणार नाहीं व तो जाचकपणा काढावा असाच केसरीनें आपला अभिप्राय व्यक्त केला आहे.

---

# थिऑसफी व डॉ. बेझंट

[ प्रो. राजाराम सखाराम भागवत, एम्. ए. ]

थिऑसफिकल सोसायटीच्या जन्मास आज पंचावन्न वर्षें होऊन गेलेलीं आहेत, व केसरीच्या जन्मासहि नुकतींच पन्नास झालेलीं आहेत. गेल्या अर्ध शतकांत या दोन भिन्नक्षेत्रीय संस्थांनीं आपापल्या दिशेनें बरेंच काम केलेलें आहे, व तें करीत असतांना मधून मधून केसरीच्या सिंहावलोकनांत थिऑसफी येऊन गेलेली आहे.

थिऑसफिकल सोसायटींत प्रत्येक माणसास मुक्तद्वार आहे तरी उच्च व सुसंस्कृत लोकांवरच प्रमुखतः आपल्या चळवळीचा प्रथम परिणाम करावा असें तिचें धोरण आहे. राजकारणांत या चळवळीप्रमाणें एकंदर सर्व जनतेला हल-विण्याचा थिऑसफीचा कटाक्ष नाहीं. अध्यात्मवाद खरा व जडवाद खोटा हें जगाला शिकविण्याचें काम थिऑसफी करीत आहे. त्यासाठीं जगांतील धर्मांची आजच्या काळास शोभेशी नवीन मांडणी तिनें केली आहे. जगांतील सर्व धर्मांस मूलतः योगशास्त्रांतर्गत अनुभवाचा पाया आहे व म्हणूनच जगांतील सगळ्या धर्मांत मुख्य मुख्य बाबींसंबंधानें एकवाक्यता असून त्यांमधील विरोध गौण व आभा-सिक आहेत असें तिचें म्हणणें आहे. हे धार्मिक विरोध मोडून जगांत बंधुत्वाच्या भावनेचा प्रसार करावा हें तिचें ध्येय आहे. या कामीं तिला ठिकठिकाणीं पुष्कळ विरोध झालेला आहे. प्रत्यक्षवादी व जडवादी लोकांना धर्माचा अध्यात्म-वाद कबूल नसल्यानें त्यांनीं विरोध केलेला आहे. तसेंच ज्यांना धर्मांची नवीन मांडणी करणें पटत नाहीं, त्यांनीं व आपलाच धर्म खरा, आपले धर्मग्रंथ जें सांगतात तेंच प्रमाण मानावें, तें युक्तीस पटतें कीं नाहीं त्याचा विचार करूं नये, धार्मिक चालीरीतींत सुधारणा करूं नये, अशा मताच्या लोकांनीं

विरोध केला आहे. हे दोन्ही प्रकारचे विरोधक थिऑसफीला जसे सर्व जगभर आढळले तसे ते हिंदुस्थानांत आणि महाराष्ट्रांतहि आढळलेले आहेत.

केसरी पत्र या विरोधकांच्या कोणत्याहि वर्गांत मोडणें शक्य नाहीं. केसरी हा जडवादाची तरफदारी करणारा केव्हांहि नव्हता व नाहीं. ज्या लोकमान्यांनीं गीतेचा शंकराचार्यांचा अर्थ अमान्य करून आजच्या काळास शोभेल असें नवीन गीताभाष्य लिहिलें, ज्यांनीं जुनीं पंचांगें दृक्प्रत्यय नाहींं म्हणून त्याज्य ठरवून नवीन तयार केलीं, ते नवीन काळ मुळींच ओळखणार नाहींत, ते सर्व बाबतींत जुन्या मतांस व चालींस चिकटून राहातील हें शक्य नाहीं. अर्थात् तत्त्वतः केसरी हा थिऑसफीचा पक्षपाती असणार विरोधक असूं शकणार नाहीं. या दृष्टीनें पाहिलें तर केसरी हा थिऑसफीचा विरोधक होता व आहे, असें जें आज अनेकांचें मत दिसतें तें कोणाहि विचारी माणसाला पटण्याजोगें नाहीं. जुन्या पक्षाकडून जेव्हां महाराष्ट्रांत थिऑसफीच्या उद्योगास विरोध झाला होता त्यावेळीं केसरीनें थिऑसफीचीच बाजू उचलून धरलेली आहे.

पण केसरी जरी थिऑसफीच्या विरोधकांत न मोडला तरी केसरीचें ध्येय, त्याचें क्षेत्र, त्याची कार्यसामग्री हीं थिऑसफीहून आरंभापासूनच भिन्न होतीं, हें उघड आहे. हिंदुस्थानची राजकीय प्रगति हें केसरीचें प्राधान्य. त्यासाठीं सर्व-साधारण लोकांची प्रचंड चळवळ करावयाची हें त्याचें धोरण. केसरी विश्व-बंधुत्वाचा विरोधक नाहीं व नव्हता. पण सर्वांत हिंदुस्थानच्या राष्ट्रीय प्रगतीस एकंदरींत इंग्रज लोकांनीं अनेक विघ्नें एकसारखीं उपस्थित केलेलीं असल्यामुळें ते लोक केसरीला अप्रिय वाटावे हे स्वाभाविकच आहे. अर्थात् थिऑसफीच्या चळवळींत अनेक गौरकाय माणसें प्रमुख असल्यामुळें केसरीला मधून मधून त्या चळवळीविषयीं परकेपणा वाटलेला आहे. त्यांत कांहीं व्यक्तीविषयीं अन्याय झालेला असेल, पण सार्वत्रिक व मोठ्या प्रमाणावर चळवळ करणाऱ्या केसरीला तो टाळणें साधणारें नव्हतें. दुसरें असें कीं केसरीची योगशास्त्रांतील अनुभवावर अश्रद्धा नसली तरी नीटशी श्रद्धाहि नव्हती व थिऑसफीची चळवळ तर या पायावरच उभारलेली. म्हणून केसरी जरी थिऑसफीचा तत्त्वदृष्ट्या पक्षपाती असला तरी अनेक प्रसंगीं त्यानें थिऑसफीस विरोधहि केलेला आढळेल.

केसरीच्या संपादकांत लो० टिळक हे योग्यतेनें सर्वश्रेष्ठ होत. एकंदर धोरण टिळकांच्याच सल्ल्याप्रमाणें होते हें सर्वांस माहीत आहे. तेव्हां थिऑसफीचे व केसरीचे ऋणानुबंध काय होते हें पहाणें म्हणजे बव्हंशीं (सर्वांशीं नव्हे) टिळकां-चे व थिऑसफीचे ऋणानुबंध पहाण्यासारखें आहे हें विसरतां कामा नये. लो० टिळक हे थिऑसफीकल सोसायटीचे सभासद होते कीं नाहीं याची प्रस्तुत लेखकाला स्वतःची अशी माहिती नाहीं. डॉ. बेझंट यांनीं एके ठिकाणीं जातांजातां आमच्या सोसायटीचे एक जुने सभासद असें म्हणून त्यांचा उल्लेख केलेला आहे.

ह्यावरून ते फार पूर्वी सभासद झाले असावे असें वाटतें.† ते सभासद झाले तरी त्यावरून त्यांची थिऑसफीला सहानुभूति होती इतकाच अर्थ काढतां येईल. कै० पिटकर व वैद्य यांशीं त्यांचा चांगला स्नेह असे. थिऑसफीसंबंधानें केसरींत लिहिण्यापूर्वी ते थिऑसफीचे ग्रंथ माझेकडून मागवून नेत व ते वाचल्यावरच मग केसरींत लिहीत, असें रा. वैद्य यांनीं मला बरेच वर्षांपूर्वी सांगितल्याचें स्मरतें. लो० टिळकांची थिऑसफीवरची टीका कोणत्याहि बाजूची असली तरी ती पूर्ण माहिती मिळवून केलेली असे. गेल्या शतकांत ज्या अनेक धार्मिक चळवळी जगांत झाल्या त्या सर्वांपैकीं थिऑसफीचीच अधिक माहिती व तिच्याविषयींच जास्त चर्चा केसरींत येऊन गेलेली आहे. केसरीकार स्वतः लिहीत व थिऑसफीच्या पुरस्कर्त्यांसहि केसरींत वारंवार जागा देत. अनंत या सहीनें केसरीला कै० पिटकर हे थिऑसफीविषयक व्याख्यानांचे रिपोर्ट वारंवार पाठवीत व त्यांस प्रमुख स्थान मिळत असे. महाराष्ट्रांतील थिऑसफीच्या पुरस्कर्त्यांचीं पत्रें व लेख केसरींत पुनः पुनः येत व हल्लींहि येतात.

थिऑसफिकल सोसायटी १८७५ च्या नवंबरांत अमेरिकेंत स्थापण्यांत आली. मॅडम ब्लॅव्हॅटस्की व कर्नल ऑलकॉट हे तिचे पहिले पुढारी होते. हीं दोन्ही माणसें १८७९ च्या फेब्रुवारींत प्रथम हिंदुस्थानांत आली व येथें चळवळीस सुरुवात करून त्यांनीं १८८२ सालीं मद्रासजवळ अड्यार येथें आपलें आद्यपीठ स्थापलें. केसरीचा जन्म १८८१ च्या जानेवारींत झाला. त्या वेळीं रशिया हिंदुस्थानावर स्वारी करील याची भीति हिंदुस्थानसरकारला वाटत असे. ब्लॅव्हॅटस्की बाई रशियन होत्या व थिऑसफीचें खोटें पांघरूण घेऊन रशियाच्या वतीनें हिंदुस्थानांत गुप्त कारस्थानें करण्यासाठीं त्या आल्या आहेत असा सरकारला त्यांच्याविषयीं मोठा संशय होता. म्हणून थिऑसफीच्या पुढाऱ्यांची हिंदुस्थानच्या राजकीय आकांक्षांशीं जरी संपूर्ण सहानुभूति असली तरी हिंदुस्थानचें राजकारण हें थिऑसफीचें क्षेत्र नसल्यामुळें आपल्या विरुद्ध सरकारचा संशय उगीच वाढूं नये म्हणून थिऑसफीचे हे दोघे सूत्रधार हिंदी राजकारणापासून त्या काळीं दूर

---

† डॉ. बेझंटकृत The Future of Indian Politics पृ. ६९ पहा. तेथें लो० टिळक यांस त्यांनीं a member of the Theosophical society in the early days असें म्हटलें आहे. लो० टिळक जर थिऑसफिकल सोसायटीचे सभासद (बाईनीं म्हटल्याप्रमाणें) झालेले असतील तर ते फार पूर्वी झालेले असावेत. आम्ही स्वतः थिऑसफिस्ट नाहीं असें १९०४ सालीं लोकमान्यांनीं लिहिलें आहे. (पहा. लो० टिळकांचे केसरींतील लेख, भाग ४ था पृ. ३८३.) त्यावरून असें वाटतें कीं जरी लोकमान्य सभासद झाले असले तरी ते पुढें सभासद राहिले नसावेत.

राहिलेले होते. यामुळें त्या वेळीं ते केसरीच्या दृष्टिपंथांत आले नसावेत. डॉ. बेझंट ह्या १८९३ च्या अखेरीस प्रथम हिंदुस्थानांत आल्या. त्याच्या पूर्वी केसरीचें थिऑसफीकडे लक्ष गेलेलें दिसत नाहीं. डॉ. बेझंट ह्या हिंदुस्थानांत आल्या त्या थिऑसफीच्या एक पुढारी म्हणून आल्या. १८९४ सालीं केसरीनें डॉ. बेझंट यांचें चरित्र क्रमशः देण्याची सुरवात केली. हें चरित्र सहानुभूतीच्या वृत्तीनें लिहिलेलें, माहितीनें भरलेलें व विश्वसनीय असें आहे. वीस मार्चच्या केसरीच्या अंकांत बाईसंबंधानें एक संपादकीय स्फुट आलेलें आहे व २७ मार्चच्या अंकांत एक अग्रलेख आलेला आहे. मद्रासच्या ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं बाईच्या विरुद्ध कांहीं लेख छापून ते केसरीकडे पाठविले होते, पण त्यांच्या मतास झिडकारून केसरीनें थिऑसफीविषयीं पुढील उद्गार काढले आहेत. 'अशा विदुषीनें जो पंथ आज 'वीस वर्षें विचार करून स्वीकारला आहे त्या पंथाचे प्रवर्तक सर्व मूर्ख असतील 'असें स्वतः समजणें किंवा लोकांची समजूत करून देणें हे दोन्ही प्रकार अत्यंत 'गर्ह्य होत.'

त्या सालापासून केसरींत थिऑसफीविषयीं मजकूर पुनः पुनः येऊं लागला. रा. वैद्यहि थिऑसफीच्या प्रतिवार्षिक परिषदांविषयीं लिहीत. खेरीज मराठी फेडरेशनच्या बैठकांचे रिपोर्टहि केसरींत मधून मधून येत. माझ्या लेखांसहि केसरीनें मधून मधून प्रसिद्धी दिली आहे. तसेंच अकोल्याचे रा. वासुदेवराव चिपळूणकर, पुण्याचे रा. गणपतराव मराठे वगैरेंच्या लेखांसहि मधून मधून केसरींत जागा मिळालेली आहे.

थिऑसफीच्या उलट असणाऱ्या माणसांचींहि पत्रें केसरींत मधून मधून छापलीं जात. कधीं कधीं केसरीकार स्वतःच अशा पत्रांस समर्पक उत्तरें देत. १९०४ सालीं ' हिंदु थिऑसफिस्टांस सहा प्रश्न ' या नांवाचा एक लेख एका थिऑसफीच्या विरोधकानें लिहिलेला होता. त्यास केसरीकारांनीं पुढील समर्पक उत्तर दिलें. ' थिऑसफी हा स्वतंत्र धर्म नाहीं, पंथ नाहीं. सर्व धर्मांत जीं सामान्य तत्त्वें 'आहेत त्यांची उपपत्ति लावणारें तें तत्त्वज्ञान आहे. तें ख्रिस्ती, मुसलमान, हिंदु, 'बौद्ध यानीं आपला दुराग्रह सोडल्यास त्यांस पटण्यासारखें आहे. मात्र कदाचित् 'कांहीं बाबी कोणास कबूल होतील, कोणास होणार नाहींत.....पण तेवढ्यानें 'सर्व धर्मांचें सामान्य रहस्य काढण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. किंबहुना विसाव्या 'शतकांत अशा रीतीचा उद्योग करणेंच श्रेयस्कर आहे.' डॉ. बेझंट यांनीं आपल्या पतीला सोडलें आहे तेव्हां त्यांना आपण आदरणीय समजूं नये असें याच लेखकानें आपल्या लेखांत म्हटलें होतें. पण केसरीनें बाईची बाजू धरून ' कोणतेंहि ' धर्मकार्य कळकळीनें करण्यास पति किंवा पत्नीच काय पण सर्व संसारहि सोडावा 'लागतो ' असें उत्तर दिलें आहे.

योगसिद्धीच्या साहाय्यानें तपासून पाहिलेल्या ज्या गोष्टी थिऑसफींत आहेत

त्यासंबंधानें केसरी म्हणतो,' थिऑसफीमधील गुप्त गोष्टी पुष्कळांस कबूल नाहींत. ' पण तेवढ्यामुळें त्या खऱ्या नाहींत, तें सर्व थोतांड आहे असें विधान करणें ' साहसाचें होय. ' ता. ५-४-०४ चा केसरी म्हणतो, ' केसरीकारांस थिऑसफी-'च्या गुप्त विद्येच्या कांहीं तत्त्वांबद्दल शंका आहे, मग ती शंका अनभ्यासाचें फळ ' असो किंवा अजाणतेपणाचा परिणाम असो. ' यावरून थिऑसफीचा गुह्यवाद खोटा आहे असें म्हणावयास केसरी तयार नव्हता, पण तो खरा आहे असेंहि त्याचें निःसंशय मत झालेलें नव्हतें. डॉ. बेझंट यांनीं काशीस १८९८ सालीं सेंट्रल हिंदु कॉलेज काढून तें नांवारूपास आणिलें. डॉ. बेझंट यांच्याविषयीं पुष्कळांच्या मनांत त्या वेळीं मोठी साशंक वृत्ति असे. या वेळीं केसरीनें अनेक लेख लिहिले असून कॉलेजच्या धोरणाचें मोठ्या जोरानें समर्थन केलें होतें. त्यांतला एक लेख ' थिऑसफी व हिंदुधर्म ' हा होता. याखेरीज ' हिंदुधर्मावरील कांहीं अलीकडचीं पुस्तकें ' या नांवाच्या लो. टिळकांनीं १९०३ सालीं लिहिलेल्या लेखांत सेंट्रल हिंदु कॉलेजची बाजू लोकमान्यांनीं उचलून धरलेली आहे. हिंदुधर्माची सांगोपांग माहिती देणारीं तीन पुस्तकें सेंट्रल हिंदु कॉलेजनें त्या वेळीं प्रसिद्ध केलीं होतीं. पण सेंट्रल हिंदु कॉलेजकडे संशयी वृत्तीनें पाहण्याची लोकांना संवय असल्यामुळें तीं लोकप्रिय झालीं नाहींत. सरकारला लोकजाग्रति नको होती म्हणून सरकारहि तीं शाळाखात्याकरितां मंजूर करीना. यावेळीं त्या पुस्तकांचें समर्थन करण्यासाठीं लोकमान्यांनीं तो अग्रलेख लिहिलेला असून तोहि तितकाच वाचनीय आहे. या गोष्टी १९०३–०४ च्या सुमारास झाल्या. १९११ सालीं दुसरा असाच एक वाद उपस्थित झालेला होता. डॉ. बेझंट यांनीं सेंट्रल हिंदु कॉलेज जेव्हां स्थापिलें तेव्हांच पुढेंमागें तें वाढवून त्याची युनिव्हर्सिटी करावी असा त्यांचा मनोदय होता. युनिव्हर्सिटी स्थापण्याच्या दिशेनें त्यांचे प्रयत्नहि सुरू होते. सनातनधर्माभिमानी पंडित मालवीय यांनाहि तशीच एक युनिव्हर्सिटी काढावयाची होती. दोघांच्या कल्पना व दोघांचे प्रयत्न स्वतंत्र होते. अशा स्थितींत आपण दोघांनीं सहकार्य करून एकच हिंदु युनिव्हर्सिटी काढावी असें त्यांस वाटूं लागलें. या वेळेस लोकमतांत पुष्कळच खळबळ माजली होती. हिंदुधर्माचा आकुंचित दृष्टीनें अभिमान धरणारे जे लोक होते त्यांच्या मनांत गौरकाय डॉ. बेझंट यांच्याविषयीं आढी होती. ते म्हणूं लागले कीं, पंडित मालवीयांनीं बाईच्या वाऱ्यासहि उभें राहूं नये व आपला सवता सुभा तसाच ठेवावा. या वादांत केसरीनें ' हिंदु विश्वविद्यालय ' नांवाचा अग्रलेख १३ ऑगस्ट १९११ च्या अंकांत लिहून डॉ. बेझंट यांचेविरुद्ध व्यक्तिशः बरीच कडक टीका केली. पण दोघांनीं मिळून एकजुटीचा प्रयत्न करावा असें आपलें मत दिलें. ' सनातनधर्मी व थिऑसफिस्ट यांच्यामध्यें सहकारिता होण्यास ज्या

‘ अडचणी दिसतात त्याहीपेक्षां हिंदुधर्मांतील निरनिराळ्या पंथांची एकवाक्यता
‘ होण्यास अधिक दुर्धर अडचणी आहेत. कारण थिऑसफी ही कोणत्याच धर्मास
‘ किंवा धर्मपंथास विरोधी अशी नाहीं. ’

आणखी एका खळबळीच्या प्रसंगीं केसरी व थिऑसफी यांचा निकट संबंध आलेला आहे. मात्र यावेळीं केसरी व थिऑसफी ह्यांचा परस्परविरोध होता. हा प्रसंग १९१२-१३ सालचा होय. जे. कृष्णमूर्ति हे त्यावेळीं पंधरासोळा वर्षांचे असून डॉ. बेझंट यांनीं त्यांस त्यांच्या बापापासून मागून घेतलें होतें, व त्यांच्या शिक्षणाची सर्व जबाबदारी आपणांवर घेऊन आपल्या खर्चानें त्यांनीं कृष्णमूर्तींना शिक्षणासाठीं युरोपांत ठेवलें होतें. कृष्णमूर्ति व बेझंटबाई यांचें नातें गुरुबंधूसारखें होतें. कृष्णमूर्ति हे पुढें अवतारी पुरुषासारखे होतील, अशी डॉ. बेझंट यांची थिऑसफींतील गुह्यविद्येनुसार समजूत होती व ती त्यांनीं बोलूनहि दाखविली होती. कांहीं उपद्यापी मंडळींनीं मि. कृष्णमूर्ति यांच्या वयोवृद्ध वडिलांना बाईच्या-विरुद्ध चिथावलें व माझा मुलगा माझ्या ताब्यांत द्या, अशी मागणी बाईकडे केली. तेव्हां बाईनीं कृष्णमूर्तींच्या वडिलांना कोर्टाचा रस्ता धरण्यास सांगितलें. सर्व हिंदुस्थानांत जोरजोराची टीका सुरू होती. केसरींतहि या प्रकरणासंबंधीं अनेक लेख येऊन गेले* आहेत. हे सर्व लेख बेझंटबाईच्याविरुद्ध व केसरीच्या स्वभावाप्रमाणें जोरदार व ठणठणीत आहेत. पुष्कळ थिऑसफिस्टांस ते आग्रहानें भरलेले व अन्यायमूलक वाटतील. या लेखांपैकीं ‘अवतारकृत्याचा पोरखेळ’ हा २२-४-१३ च्या अंकांतला अग्रलेख रा. नरसिंह चिंतामण केळकर यांनीं लिहिलेला आहे.

वादाच्या या वावटळींत निरनिराळे मुद्दे उपस्थित झाले होते. त्यांपैकीं केसरी-पक्षाला आजहि कित्येक समर्थनीय वाटण्याजोगे आहेत. गुह्यवादास दुजोरा देणारी एक महत्त्वाची गोष्ट केसरीनें प्रसिद्ध केलेली आहे. या लेखांत ती गोष्ट फार महत्त्वाची असूनहि महाराष्ट्रीय थिऑसफिस्टांचें तिच्याकडे लक्ष जाऊं नये हें आश्चर्य होय. थिऑसफींतल्या गूढ वादाचें असें म्हणणें आहे कीं पृथ्वीवर जीवन्मुक्त पुरुषांचा एक संघ अनादिकालापासून आहे व पृथ्वीवरील सर्व मोठ्या उद्योगांचीं सूत्रें मूळांत या संघांतल्या माणसांच्या हातीं असून ते तीं सूत्रें हलवून व योग्य माणसांस प्रेरणा करून त्यांच्या करवीं पृथ्वीवरचे उद्योग करवितात व अशा रीतीनें ते ईशसंकल्प पुरा करीत असतात. राष्ट्रीय सभेची स्थापना अशा

---

* केसरीच्या १९-११-१२ च्या अंकांत कांहीं स्फुटें आहेत, २२-४-१३ च्या अंकांत एक अग्रलेख आहे. तसेंच १३-५-१३, २०-५-१३, १५-७-१३, ११-११-१३ व २९-९-१३ या सर्व अंकांत लेख आहेत. शेवटच्या अंकांतील लेख वगळल्यास बाकीचे सर्व थिऑसफीच्या व बेझंटबाईच्या विरुद्ध आहेत.

रीतीनेंच झाली. अशी थिऑसफिस्टांची समजूत आहे. या समजुतीस दुजोरा देणारें एक पत्र केसरीनें १०-२-२५ च्या अंकांत प्रसिद्ध केलें आहे. कै० रा. साने हे त्या पत्राचे लेखक आहेत. केसरींतील या पत्रांत, मि. ह्यूम यांना हिमालयांत भेटलेल्या एका अनेकभाषाकोविद महंतानें हिंदी लोकांची सेवा करण्यास सांगितलें व त्यास अनुसरून पुढें त्यांनीं राष्ट्रीय सभा स्थापन केली असा मजकूर आहे.

केसरीचा व बिझांटचा राजकारणाच्या क्षेत्रांत जो अनेक वर्षे बराच निकट संबंध आला होता, त्याची विस्तृत चर्चा आम्ही या लेखांत करूं इच्छीत नाहीं. गोऱ्या माणसांची हिंदी राजकारणांत मोठी अडचणीची स्थिति होत असते. लो. टिळकांनीं हिंदी राजकारणांत स्वार्थत्यागपूर्वक मोठी चळवळ केली तर सामान्य इंग्रजमाणसास तें स्वाभाविकच वाटतें. पण इंग्रज माणसानें स्वार्थत्यागपूर्वक तसाच उद्योग केल्यास तो जातिद्रोह आहे, अशी त्याची भावना होत असते. बरें, हिंदी लोक पाहिले तर ते असल्या माणसाविषयीं मनांतून साशंक असतात. राजकारणांत मोठें संख्याबळ पाठीशीं असलें तरच पुढारी कार्यक्षम होऊं शकतो. गौरकाय मनुष्यास तो कितीहि प्रामाणिक, बुद्धिमान व स्वार्थत्यागी असला तरी त्याला मोठें संख्याबळ मिळणें कठीण असतें. राजकारणांत डॉ. बेझंट यांस या अडचणी वारंवार भोंवल्या आहेत. १९१३-१४ च्या पूर्वी डॉ. बेझंट या हिंदी राजकारणांत पडलेल्या नव्हत्या. त्या विलायतेंत गेल्यावर तेथें हिंदी राजकारणावर हिंदुस्थानच्या वतीनें बोलत. पण हिंदुस्थानांत राजकारणांत फारशा पडत नसत. त्या वेळीं लोकांस वाटे कीं राजकारणांविषयीं मूग गिळून बसणारी ही बाई मनांतून हिंदी राजकीय आकांक्षांच्या विरुद्ध असली पाहिजे. १९१३-१४ सालीं बाई राजकारणांत आल्या आणि लगेच काँग्रेसचा व टिळकांचा समेट करवून त्यांनीं टिळकांना काँग्रेसमध्यें जाण्याचा मार्ग मोकळा करून दिला. टिळक व डॉ. बेझंट यांच्या मनोरचनेंत बरेंच साम्य आहे व कांहीं फरकहि आहे. कळकळ, धडाडी, धैर्य, बुद्धिमत्ता, स्वार्थत्याग, जहालपणा, हातीं घेतलेल्या कामाचा पिच्छा पुरविण्याची चिकाटी ह्या बाबतींत टिळक व बेझंट यांचें फारच साम्य आहे. बारीक सारीक सुधारणा आम्हांला नकोत, एकदम होमरूल पाहिजे ही जशी टिळकांची वृत्ति तशीच बाईची वृत्ति; म्हणून त्यांनीं राजकारणांत पडल्यावर टिळकांशींच विशेषतः सहकार्य करून व स्वराज्यसंघ काढून सर्व देशभर फार मोठी चळवळ केली. त्या वेळीं केसरी व डॉ. बेझंट ( डॉ. बेझंट यांची थिऑसफी नव्हे ) हे कांहीं वर्षे एकजीव झालेले होते. दोघांवरहि सरकारचा रोष होऊन दोघांसहि फार मोठ्या अडचणी आल्या. व त्या प्रसंगीं केसरी व बेझंट यांनीं एकमेकांना मनोभावानें हरतऱ्हेची मदतहि केली. हें सहकार्य स्थूलमानानें १९१९ अखेरपर्यंत टिकलें. पुढें डॉ. बेझंट व लोकमान्य हळूहळू वेगळे

झाले. वेगळे होण्यापूर्वी केसरीची बाईसंबंधाची वृत्ति खऱ्या आपलेपणाची होती. पण पुढें वेगळे होतांना व झाल्यावर केसरीनें त्यांच्यावर टीकास्त्राचा जोरानें वर्षाव केला. ही टीका होण्यास अनेक गोष्टी निमित्तमात्र झाल्या. त्यांची चर्चा करणें येथें अप्रस्तुत होय.

लोकमान्य व बेझंट यांचे राजकारणांतील मार्ग एक होण्याला जसे त्यांचे स्वभावगुण कारण झाले तद्वत् ते मार्ग भिन्न होण्याला स्वभावगुणच बऱ्याच अंशीं कारण झाले. दोघांच्या मनोवृत्तींत जें साम्य होतें तें वर दिलेलेंच आहे. पण त्या दोघांच्या वृत्तींत भिन्नपणाहि आहे. डॉ. बेझंट या हिंदी राजकारणाकडे जगाचा भाग म्हणून पहातात व जगांतील प्रवाहानुसार हिंदी राजकारणाचें सुकाणूं वळावें ही त्यांची इच्छा असते. केसरीची व लोकमान्यांची दृष्टि राष्ट्रीय आहे, तिला सबंध जगाचा मंडप दृष्टीपुढें ठेऊन त्यांत हिंदुस्थानचा पाट आपण कसा व कोठें ठेवावा हा विचार करण्यापेक्षां ह्या पाटाची घडण हिंदुस्थानच्या ऐश्वर्यास साजेशी आहे कीं नाहीं याचा विचार करणें अधिक गोड वाटतें. यामुळें १९१९ च्या अखेरीस राजकारणांत मतभेद होऊं लागला, तेव्हां बाई व टिळक यांचे ऋणानुबंध सैलावत चालले व कांहीं बाबतींत विरोधालाहि सुरुवात झाली. पुढें टिळक लवकरच दिवंगत झाले. पण केसरीचें धोरण सहजच टिळकांच्या वृत्तीनुसार असल्यामुळें हा मतविरोध थोडाफार तसाच कायम राहिला. कॉमन् वेल्थ आफ इंडिया बिलाच्या कामीं केसरीनें डॉ. बेझंट यांस सहानुभूति दाखविली होती, व अगदीं अलीकडच्या राजकीय क्षेत्रांतल्या अनेक बाबींसंबंधानें केसरी व डॉ. बेझंट यांची मतें बरींच जुळतीं आहेत. तथापि लोकमान्यांच्या हयातींत केसरी व डॉ. बेझंट यांचे उद्योग जसे एकदां एकजीव झालेले होते तसे नंतर ते कदापि झालेले नाहींत. राजकारणाच्या रंगपालटींत केसरीनें डॉ. बेझंटवर बरेच वेळां फार कडक टीका केलेली आहे. ती किती योग्य आहे याचेविषयीं एकमत होण्यासारखें नाहीं. पण या टीकेंत तात्कालिक गोष्टींचा जरी संबंध असला तरी केसरी व बेझंट यांच्या दृष्टिभिन्नत्वाचाहि बराच संबंध आहे.

---

# ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी

[ श्री. प्रो. शंकर वामन दांडेकर, एम्. ए. ]

**लेखांचें वर्गीकरण**—केसरींत ज्ञानदेव व ज्ञानेश्वरी संबंधानें जे महत्त्वाचे लेख आलेले आहेत त्यांचें वर्गीकरण खालील रितीनें करतां येईल.

( अ ) ज्ञानेश्वर एक का दोन ? ( १८९९-१९०० )
( आ ) ज्ञानेश्वरांचें मूळ नांव कोणतें ? ( १९१३ )
( इ ) ' योगवासिष्ठ ' ज्ञानेश्वरांचें काय ? ( १९१४ )
( ई ) ज्ञानेश्वरी–मराठीचें व्याकरण. ( १९१० )
( उ ) ज्ञानेश्वरी आणि सृष्टिसौंदर्य ( १९१२ )
( ऊ ) ज्ञानेश्वरीबाबत लिहिलेल्या पुस्तकांचीं परीक्षणें. (१९०३,४-३०)

वरील मांडणी लेखांतील चर्च्य विषयांच्या जातीवरून केलेली आहे.

या सहा विषयांचे दोन विभाग पाडतां येतात. अ, आ, या लेखांचा संबंध ' ज्ञानदेव ' या व्यक्तीच्या चर्चेकडे अधिक आहे. तर इ, ई, उ, ऊ, यांचा संबंध ज्ञानदेवकृत ग्रंथांच्या चर्चेकडे आहे. या सर्व लेखांपैकीं ' ज्ञानेश्वरी-मराठीचें व्याकरण ' या विषयावरील लेख ' अग्रलेख ' म्हणून आलेले आहेत. बाकीचे लेख निरनिराळ्या लेखकांकडून त्यांच्या त्यांच्या नांवावर प्रसिद्ध झालेले आहेत.

## ( अ ) ज्ञानेश्वर एक का दोन ?

पहिल्या विभागांतील महत्त्वाचा मुद्दा म्हणजे ' ज्ञानेश्वर एक का दोन ?' हा विषय होय. या विषयावर ह. भ. प. श्रीपतिबोवा भिंगारकर यांनीं सन १८९९-१९०० या सालांत केसरींत एकंदर तेरा लेख लिहिले. आज ते, ' श्रीमहासाधु ज्ञानेश्वरमहाराज यांचा कालनिर्णय व संक्षिप्त चरित्र ' या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहेत. हे सर्व लेख उत्तरपक्षस्थानीं आहेत. त्यांचें मर्म व महत्त्व लक्षांत येण्याकरितां थोडक्यांत पूर्वपक्षाचाहि उपन्यास करणें अवश्य आहे. हा पूर्वपक्ष सुधारक पत्रांतून सन १८९८ मध्यें ' भारद्वाज ' हें टोपण मुनिनाम धारण करून श्री. भारदे* यांनीं केलेला आहे. थोडक्यांत तो असा आहेः—

श्रीज्ञानेश्वरांचे समकालीन संत एकनाथ, तुकारामादिक साधु, संतचरित्रें

* श्री० भारदे व भारद्वाज एकच आहेत हे श्री० भारदे यांनींच पुढें कांहीं दिवसांनीं विविधज्ञानविस्तारांत आपलें म्हणणें पुन्हां मांडलें होतें यावरून कळून येणारें आहे.

लिहिणारे महिपति, नामाजी वगैरे ग्रंथकार, इतर पूर्वींचें व हल्लींचे सांप्रदायिक वारकरी व महाराष्ट्रांतील सामान्यजनता या सर्वांचा समज असा कीं, नेवासेगांवीं श्रीमद्‌भगवद्गीतेवर ज्ञानेश्वरीरूपी लेणें चढवून महाराष्ट्रधर्माचा पाया ज्यांनीं रचिला, रेड्यामुखीं वेद बोलवून प्रतिष्ठानस्थ द्विजांचा गर्व ज्यांनीं हरण केला, ज्यांचें मातुलग्राम इंद्रायणीतीरचें आळंदीगांव व पितृग्राम गोदावरीतटाकचें आपेगांव, ज्यांचे वडील यजुर्वेदशाखीय विठ्ठलपंत नामें ब्राह्मण, ज्यांचे गुरू व बंधु नाथपंथांतील निवृत्तिनाथ, ज्यांनीं नामदेवाबरोबर यात्रा करून जगदोद्धार केला, व सरतेशेवटीं ज्यांनीं आळंदीस शके १११८ त कार्तिक वद्य १३ गुरुवार या दिवशीं जिवंत समाधि घेतली असे 'ज्ञानदेव' एकच होऊन गेले. पण भारद्वाजाचें म्हणणें असें कीं, वरतीं जी माहिती दिली आहे ती एका ज्ञानदेवाची आहे असें समजण्यांत मोठा घोंटाळा झाला आहे. वास्तविक अशा वर्तनाचा एक ज्ञानेश्वर झालाच नाहीं. ज्ञानेश्वर व ज्ञानदेव या दोन व्यक्ति भिन्न कालांत व भिन्न देशांत होऊन गेल्या. या दोन व्यक्तींसंबंधीं भारद्वाज यांचें मत खालीलप्रमाणें आहेः—

| | ज्ञानेश्वर | ज्ञानदेव |
|---|---|---|
| जन्मस्थान | आपेगांव | ठाऊक नाहीं. |
| जन्मशक | १२०० | ,, |
| समाधिस्थान | आपेगांव | आळंदी. |
| समाधिकाल | तेरावें शतक. | चौदावें शतक. |
| कुलवृत्त-वडील | निवृत्तिनाथ. | विठ्ठलपंत. |
| गुरुकुल—गुरु | नाथपंथ—निवृत्तिनाथ. शैव. | रामानुज—विठ्ठलपंत निवृत्ति वैष्णव. |
| ग्रंथकर्तृत्व | ज्ञानेश्वरी, अमृतानुभव. | अभंग. |

वरील दोन ज्ञानदेव ठरविण्याकरितां भारद्वाजांनीं जो निबंध लिहिला त्याचा लहानमोठ्या मुद्द्यांसह सांगोपांग विचार करून ह० भ० प० भिंगारकरबोवा यांनीं त्यावर उत्तरपक्ष केला आहे. त्यांत त्यांनीं चर्चेकरितां पांच मुख्य मुद्दे काढले आहेत. ते येणेंप्रमाणेंः—

( १ ) नामदेव व ज्ञानदेव समकालीन नव्हते; म्हणजे ज्ञानेश्वरीचा कर्ता ज्ञानदेव हा १३ व्या शतकांत झाला व नामदेवाबरोबर तीर्थयात्रेस जाणारा ज्ञानदेव हा १४ वे शतकांत झाला.

( २ ) ज्ञानेश्वरीच्या अंतिम ओव्यावरून ज्ञानेश्वरी हा ग्रंथ आळंदीच्या ज्ञानदेवानें केला नसून तो आपेगांवच्या ज्ञानेश्वरानें केला आहे.

( ३ ) आपेग्रामस्थ ज्ञानेश्वर व आळंदीचे ज्ञानदेव या उभयतांचें कुलवृत्त भिन्न असून गुरुशिष्यपरंपराहि भिन्न आहे.

( ४ ) भाषासरणीवरून पाहातां ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे दोनच ग्रंथ आपेगांवच्या ज्ञानेश्वरानें केले, व अभंग इत्यादि आळंदीच्या ज्ञानदेवानें केले आहेत.

( ५ ) ज्ञानेश्वराची समाधि आपेगांवीं आहे व ज्ञानदेवाची आळंदींत आहे.

या पांच मुद्द्यांपैकीं महत्त्वाचा मुद्दा म्हणजे पहिला मुद्दा होय व त्यावरच बाकींच्या सर्व मुद्द्यांची उभारणी आहे. तेव्हां ह. भ. प. भिंगारकरबोवांनीं सर्वच मुद्द्यांची छाननी करीत असतां या मुद्द्याच्या खंडनावर विशेष जोर दिला आहे.

**१. नामदेव व ज्ञानदेव समकालीनच होते**—नामदेव हा ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानेश्वराबरोबर नव्हता हें सिद्ध करण्याकरितां श्री. भारद्वाज यांनीं खालील पुरावे मांडले आहेत—

श्री. भारद्वाज यांचा मुख्य मुद्दा असा कीं, नामदेवाचा जन्मकाल शके ११९२ हा ज्या एका अभंगावरून ठरविला जातो तो नामदेवांचा अभंग खालीलप्रमाणें आहेः—

‘ अधिक ब्याण्णव गणित अकराशतें । उगवतां आदित्य तेजोराशी ॥
शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार । प्रभव संवत्सर शालिवाहनशक । ’

आतां भारद्वाजांचें म्हणणें प्रभवसंवत्सर ११९२ सालीं न येतां ११८९ सालीं येतो. तसाच तो शके १३०९ सालींहि येतो. तेव्हां त्यांच्या मतें हाच नामदेवाचा जन्मशक मानावयास पाहिजे. आणि

शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंद बाबा आदरें । लेखकुं झाला ॥ —ज्ञानेश्वरी अ. १८
म्हणजे श. १२१२ हा ज्ञानेश्वरीचा काल.

याशिवायहि खालील तीन चार किरकोळ मुद्दे त्यांनीं काढले आहेत. (१) जर नामदेवाचा जन्म शक ११९२ मानला तर नामदेवाच्या वडिलांचें वय मरणसमयीं १०५–११० मानावें लागेल. ( २ ) ज्ञानदेव नामदेव जर समकालीन तर ज्ञानदेवाच्या अभंगांतून मूर्ति फोडल्याचा उल्लेख नाहीं व नामदेवांच्या अभंगांतून ते उल्लेख आहेत असा भेद कां असावा ? ( ३ ) नामदेवांची, कबीर, नानक, भानुदास यांच्याशीं गांठ पडल्याचा उल्लेख त्यांचे अभंगांत आहे व हे सर्व तर १४व्या शतकांत होऊन गेले.

या सर्व मुद्द्यांचे बोवांनीं फारच तर्कशुद्ध पद्धतीनें खंडन केलें, त्यांचा नमुना म्हणून फक्त पहिल्या मुद्द्यांचेंच खंडन जवळजवळ त्यांच्याच शब्दांत देतों.

गणितानें शके ११९२ सालीं प्रभव संवत्सर येत नाहीं, म्हणून एकदम ११९२

हा जन्मकालच चूक, व तो १३०९ असला पाहिजे असें ठरवणें घिसाडघाईचें काम आहे. ११९२ सालीं प्रभव संवत्सर नाहीं येवढें सिद्ध करून काम भागत नाहीं. तर त्या अभंगांत वर्णन केलेल्या इतर गोष्टी १३०९ सालीं जुळतात का नाहीं, हेंहि दाखविलें पाहिजे. सिवेल व दीक्षित यांच्या पुस्तकांवरून विचार करितां १३०९ सालीं कार्तिक शुक्ल एकादशीस रविवार येत नाहीं हें सिद्ध आहे. मग भारद्वाज यांचा खटाटोप व्यर्थ गेला असेंच म्हणावयास पाहिजे. शिवाय इतर बाबी न जुळतां १३०९ सालीं प्रभवसंवत्सर आला आहे, म्हणून जर १३०९ साल हा नामदेवाचा जन्मकाल मानावयाचा, तर एखादा असें म्हणूं शकेल कीं, प्रभव संवत्सर हा ११८९ सालींहि येत आहे, तोच नामदेवाचा काळ कां मानूं नये ? तात्पर्य, केवळ संवत्सर जुळत नाहीं, येवढ्याकरितां एकदम ११७ वर्षें उडी मारून जाण्याचें कारण नाहीं. त्यांतून सुटण्याचे दुसरेहि मार्ग आहेत.

'प्रभव' हा हस्तदोष असण्याचा संभव आहे, नव्हे तो हस्तदोष आहे असें मानण्यास पुरावाहि आहे. कारण अभंगाच्या एका हस्तलिखित प्रतींत 'प्रमोद' असें आहे.

यांवरून संवत्सरभेदावरून नामदेवाचे कालास ११७ वर्षांची जी गचांडी भारद्वाजांनीं दिली तीस आधार नाहीं हें उघड आहे.

दामशेटीच्या वयाचा मुद्दा किरकोळ आहे व इतर मुद्दे अपुऱ्या माहितीवर कसे मांडलेले आहेत हें बोवांनीं फारच सुंदर नवीन माहिती देऊन सिद्ध केलें आहे. ज्ञानदेवांच्या समाधीचे वेळीं महाराष्ट्रांत स्वराज्य होतें व ज्ञानदेवांच्या समाधि-कालानंतर नामदेव जवळजवळ ५६ वर्षें जगले म्हणूनच ज्ञानदेव, नामदेव यांच्या ग्रंथांतील वर्णनांत फरक पडतो ही गोष्ट श्री. भारद्वाज यांनीं लक्षांत न ठेवल्यामुळें त्यांचा घोंटाळा झाला आहे. तसेंच मुळांतच कबीराचाच काळ अनिश्चित आहे, नामदेवाची व ज्या भानुदासाची गांठ पडली ती भानुदास ही व्यक्ति कोण आहे वगैरे गोष्टींचा श्री. भारद्वाज यांनीं विचार केलेला दिसत नाहीं.

या विवेचनाच्या सरतेशेवटीं ह. भ. प. भिंगारकर बोवांनीं अखेर सिद्धान्त खालीलप्रमाणें मांडला आहे—

'नामदेवास १४ व्या शतकांत ढकलणें हा भारद्वाजाच्या द्वैत पुराणाचा 'पायाच होय व तोच प्रथमतः समूळ खणून काढणें जरूर होतें. नामदेवाचा 'जन्मशक ११९२ ठरला म्हणजे 'बाराशें बारोत्तरीं' लिहिलेल्या ज्ञानेश्वरीचा 'कर्ता आणि नामदेव हे समकालीन होतात; व चौदाव्या शतकांत दुसरा कोणी 'तरी ज्ञानदेव होता असें मानण्यास पुरावाच रहात नाहीं. भारद्वाजाच्या पहिल्या 'मुद्द्याचें आम्हीं एवढ्या विस्तारानें जें परीक्षण केलें तें याचकरितां होय.'

ज्ञानदेव व नामदेव समकालीन नव्हते हा जो भारद्वाजांचा दोन ज्ञानदेव ठरविण्याच्या मंदिराचा पाया तोच ढासळल्यावर बाकीच्या पुढच्या मुद्द्यांचें विशेष

व सविस्तर विवेचन करण्याचें कारणच नाहीं. ह. भ. प. भिंगारकर बोवांनीं मात्र एकदां या वादाचा कायमचा निकाल लागावा म्हणून आरंभींच प्रतिज्ञा केल्याप्रमाणें लहानसहान मुद्दयांचें सुद्धां समग्र खंडन केलें आहे. परंतु येथें आम्ही विस्तारभयास्तव व मूळ मुद्दाच पोकळ ठरल्यावर इतर मुद्दे खंडण करणें म्हणजे लेखणीस जवळ जवळ निष्कारण शीण देणेंच असल्यामुळें राहिलेल्या मुद्दयांचें थोडक्यांत विवेचन करतों.

**२. ज्ञानेश्वरीचा कर्ता आळंदीचाच ज्ञानदेव होय**—ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानदेव आळंदीच्या ज्ञानदेवाहून भिन्न कल्पून श्री. भारद्वाजांनीं या दोन ज्ञानदेवांच्या गुरुपरंपरा व कुलपरंपरा भिन्न भिन्न दिल्या आहेत. तसेंच ज्ञानेश्वरी ही नेवासें येथें लिहिली असा जो समज आहे तो चुकीचा आहे हेंहि ठरवून टाकलें. त्यांच्या मतें ज्ञानेश्वरी आपेगावींच लिहिली.

गुरुपरंपरा व कुलपरंपरा याचा विचार पुढच्या मुद्दयाचे वेळीं करूं. तूर्त ज्ञानेश्वरीचें स्थल नेवाशाहून आपेगांवास हलवलें त्या बाबतींत आपल्या पुराव्याचा थोडक्यांत विचार करूं.

ज्ञानेश्वर आपल्या ग्रंथाच्या शेवटीं लिहितात—

‘ ऐसें युगीं परि कळीं । महाराष्ट्रभूमंडळीं ।
श्रीगोदावरीच्या कूळीं । दक्षिणलिंगीं ॥ १ ॥
जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ २ ॥ ’

या ओव्यांतील ‘ दक्षिण लिंगीं ’ म्हणजे ‘ शाक्तमताचें ’ लिंग म्हणजे चिन्ह व ‘ महालया ’ म्हणजे ‘ देवी ’ असा अर्थ करून श्री. भारद्वाज हे या ओवींतून आपेगांवचा उल्लेख काढतात. वास्तवीक ज्ञानेश्वरी नेवाशास लिहिली यास आजहि बाह्य पुरावा इतका भरभक्कम आहे कीं हे शाब्दिक चर्चेचे पुरावे किती पुढें आणले तरी तो खोटा ठरणार नाहीं. नेवाशास ज्ञानेश्वरी लिहिली ज्यावर तो खांब अजून दाखवतात व तेथील देवतेस अजून म्हाळसा अथवा मोहनीराज म्हणतात व संतग्रंथांतून तसे उल्लेखहि आहेत. अर्थात् भारद्वाज यांचा ‘ दक्षिण लिंगीं ’ याचा सरळ अर्थ सोडून ‘ शाक्तमताचें चिन्ह महालया जेथें आहे ’ तें आपेगांव असा अर्थ करण्याचा खटाटोप व्यर्थ आहे हें सिद्ध होतें.

**३. कुलवृत्त व गुरुशिष्यपरंपरा दोन नाहींत**—ज्ञानेश्वरीलेखनाचें स्थळ नेवाशाहून आपेगांवीं नेण्यास जसा एका ओवीच्या अर्थाचा अनर्थ केला, तसाच येथें कुलपरंपरा ठरवतांना दुसऱ्या ओवीच्या अर्थाचा अनर्थ भारद्वाज करतात. ज्ञानेश्वरीच्या शेवटीं खालील ओवी आहेः—

तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥

यांतील ‘ श्रीनिवृत्तिनाथसुतें ’ या पदावरून ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानेश्वरांच्या

वडिलांचें नांवहि निवृत्तिनाथ होतें असें श्री. भारद्वाज अनुमान करतात पण ही केवळ कल्पनाच आहे. कारण मागें प्रकरण गुरुपरंपरेचें चाललेलें आहे, या ओवींत ' महेशान्वय ' असा नाथपरंपरा दाखवणारा शब्द आहे. अशा स्थितींत हा उल्लेख पित्यास उद्देशून असेल हें संभवत नाहीं. तात्पर्य ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवांची भारद्वाजविरचित कुलपरंपरा असत्य आहे ही गोष्ट उघड आहे. तशीच त्यांनीं अभंग्या ज्ञानदेवाची म्हणून जी गुरुपरंपरा रामानुजाचार्य, देवाचार्य, प्रधानंद, राघवानंद, रामानंद, कबीर व विठ्ठल-विठ्ठलाचे निवृत्ति-निवृत्तीचे ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई ही रचली आहे तीहि स्वकपोलकल्पित आहे. कारण निवृत्तीच्या एकाहि अभंगांत आपला गुरु ' विठ्ठल ' असा उल्लेख नाहीं. उलट आपले गुरु ' गहिनीनाथ ' असा ' निवृत्ति गहिनी कृपा केली पूर्ण ' या कडव्यांत स्पष्ट उल्लेख आहे.

आपेगांवचे ज्ञानेश्वर व आळंदीचे ज्ञानदेव एकच ही गोष्ट प्रतिष्ठानस्थ द्विजांनीं ज्ञानदेवादि चारी भावंडांस दिलेल्या शुद्धिपत्राची जी नक्कल सांपडलेली आहे तीवरून व कान्होबा पाठकांच्या वंशजाजवळ सांपडलेला ज्ञानदेवांचा वंशवृक्ष यांवरून उघड होत आहे.

**४. भाषापद्धतिहि दोन नाहींत**—येथें भारद्वाजानें सहा मुद्दे काढले आहेत. पण त्यांचेहि बोवांनीं मार्मिक रीतीनें खंडण केलें आहे. त्यांतील महत्त्वाची एकच बाब आम्ही येथें नमूद करतों कीं बोवांनीं अभंग व ज्ञानेश्वरी ही एकाच कर्त्याची आहे हें दाखवण्याकरितां ३०।४० शब्द दोन्ही ग्रंथांत येणारे स्थळनिर्देशासह दिले आहेत.

**५. ज्ञानेश्वरीकारांची समाधि आळंदीसच आहे**—तात्पर्य, दोन ज्ञानदेव नसल्यानें एकाची समाधि आळंदीस व एकाची आपेगांवास असें मानण्यास कांहींच कारण नाहीं हेंहि अनायासेंच सिद्ध होतें. अर्थात् ज्ञानेश्वरांची समाधि एकच आहे व ती आळंदीस आहे हें सिद्ध झालें. आपेगांवच्या समाध्या त्यांचे पूर्वज त्र्यंबकपंत व गोविंदपंत यांच्या असण्याचा संभव आहे.

## ( आ ) ज्ञानेश्वराचें मूळ नांव कोणतें ?

ज्ञानेश्वरांचें मूळ नांव कोणतें, याबाबत श्री. गो. का. चांदोरकर ( धुळें ) यांनीं केसरीच्या १८-११-१९१३ च्या अंकांत एक लेख लिहून चर्चा केली आहे. ज्ञानेश्वरांचें नांव वेगळें असावें याबद्दल त्यांनीं कारणें खालीलप्रमाणें दिलीं आहेतः—

( १ ) सांप्रदायिक नांवें व मूळ नांवें भिन्न असतात. व ज्ञाननाथ वगैरे नांवें सांप्रदायिक आहेत हें खालील श्लोकांवरून कळून येईल—

आदिनाथं च मत्स्येंद्रं गोरक्षं गहिनीं तथा।
निवृत्तिं ज्ञाननाथं च भूयो भूयो नमाम्यहम् ॥

( २ ) साधारण ब्राह्मण वर्गांत ज्ञानदेवादि नांवें नसतात.

( ३ ) ज्ञानदेव सर्वत्र आपणांस निवृत्तीचा म्हणवतात यांत रहस्य आहे. व तें हेंच कीं, दोन्ही नांवें सांप्रदायांत सिद्ध होऊन सांप्रदायानें निगडित आहेत.

( ४ ) ज्ञानेश्वरांचें पाळण्यांतलें नांव दुसरें असावें अशी नुसती शंकाच करून थांबण्याचें कारण नाहीं. तर त्यांचें मूळचें नांव ' विद्याधर ' असावें असें मानण्यास जागा आहे. राजवाडेप्रतींत आरंभीं खालील श्लोक आहे--

श्रीसद्गुरुमुकुंदेन दत्ता ज्ञानेश्वरी शुभा।
विद्याधराय शिष्याय स्वीए सत्त्वं न शोभते ॥

त्यावरून अनुमान, ज्ञानदेवांचें पाळण्यांतलें नांव विद्याधर, विद्यागुरु, मुकुंद व मोक्षगुरु निवृत्तिनाथ असें निघतें.

या अनुमानास मदत करणारा असा संस्कृत विवेकसिंधूच्या प्रतींत श्लोक आहे—

एवं विज्ञापितः सन् अवनतशिरसा ज्ञानदेवेन धीमान्।
सद्यः कृत्वा हि तस्मै सकरुणहृदयः श्रीमुनींद्रो मुकुंदः ॥

या चर्चेसंबंधानें येथें तूर्त इतकेंच पुरें कीं, ज्या श्लोकावरून श्री. चांदोरकर हे ज्ञानदेवांचें पाळण्यांतलें नांव शोधून काढूं पाहातात त्याचाच आधार घेऊन एका मानभावी ज्ञानसिंह नांवाच्या पंथाच्या मासिकानें ज्ञानदेव मानभावी होते असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. दोन्ही प्रयत्नांत मूळ एकच आहे. पण अनुमानें थोडीं भिन्न आहेत. मानभावी मासिककार ' मुकुंदराय ' हे ज्ञानेश्वरांचे मोक्षदाते गुरु समजून त्यांची परंपरा श्रीआदिनाथ ( दत्तात्रेय ) श्रीचक्रधर ( हरिनाथ ) रामचंद्र ( रघुनाथ ) मुकुंद अशी लावतात व ती बहुतांशीं ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरीच्या शेवटीं सांगितलेल्या परंपरेशीं जुळते असें ठोकून विधान करतात; व ज्ञानदेव मानभावी आहेत असें ठरवतात. या परंपरेसंबंधानें दोन गोष्टी सांगितल्या कीं पुरे. ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा याच लेखांत मागें आपण पाहिलीच आहे. त्यांत दत्तात्रेय, हरिनाथ, रामनाथ अगर मुकुंद यांपैकीं एकाहि व्यक्तीचा नामनिर्देशहि नाहीं. ज्ञानेश्वरांचे गुरु जर मुकुंद असते तर गुरुभक्त ज्ञानदेव एकदांहि त्याचा उल्लेख न करते हें अशक्य. तात्पर्य, हा सर्व मानभावी गडबडगुंडा आहे.

त्याच्या खालोखाल पण केवळ तार्किक अनुमान श्री. चांदोरकरांचें आहे. त्यांना ज्ञानेश्वरीच्या अंतिम ओव्या समोर असतांना ' मुकुंद ' हा ज्ञानदेवांचा मोक्षगुरु म्हणण्याचें धाडस होईना. तेव्हां त्यांनीं या श्लोकाची व्यवस्था लावण्याकरितां पळवाट काढली, कीं मुकुंद हा विद्यादाता गुरु व निवृत्ति हा मोक्षदाता गुरु, पण यांस कल्पनेपरता आधार नाहीं. खुद्द ज्ञानेश्वर आपल्या ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, अभंग अगर इतर कोणत्याहि ग्रंथांत ' मुकुंदा 'चा उल्लेख करीत

नाहींत. सामान्य लोकांस मुकुंदराज जे ठाऊक आहेत त्यांची मोक्षदाते गुरु होण्याचीहि लायकी होती, मग ते विद्यादातेच कां राहिले ? याचाहि उलगडा होत नाहीं. का प्रसिद्ध साधु मुकुंदराय ते निराळे व हा विद्यादाता मुकुंद निराळा ? विवेकसिंधूंतील श्लोकांत अगर राजवाडे-प्रतींतील श्लोकांत जो ज्ञानदेवाचा उल्लेख आहे तो ज्ञानेश्वरीकर्त्याचाच कशावरून हें सिद्ध करण्यास बाह्यप्रमाण कांहींच दिलें गेलें नाहीं. तदभावीं ज्ञानदेवाच्या पाळण्यांतल्या नांवाचा हा सर्व डोलारा नुसता डोलाराच राहणार.

शिवाय सांप्रदायिक नांवें पुष्कळ वेळां वेगळीं असतात ही गोष्ट खरी; पण असतातच असा नियम नाहीं. तुकाराम, निळोबा, एकनाथ यांची सांप्रदायिक नांवें कोणतीं हें अजून प्रसिद्ध नाहीं. यावरून त्यांचीं नांवें बदललेलीं नाहींत हें उघड आहे. तसाच प्रकार ज्ञानदेवांचे बाबतींत नसेल हें कशावरून ? तात्पर्य, निश्चित बाह्यपुराव्याच्या अभावीं श्री० चांदोरकर यांच्या तर्कास फारसा आधार नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे.

## ( इ ) योगवासिष्ठ ज्ञानेश्वरांचें काय ?

दुसऱ्या विभागांत ज्ञानेश्वरांच्या ग्रंथासंबंधानें चर्चा आहे. त्यापैकीं एक लेख ज्ञानेश्वरकृत ' योगवासिष्ठ ' या विषयावर श्री० चांदोरकर यांचा आहे. श्री० चांदोरकर यांनीं श्रीज्ञानदेवांचे म्हणून ' योगवासिष्ठ ' स्वतंत्र रीत्या प्रसिद्धहि केलें आहे. या बाबतींत सुद्धां अधिक छाननी व्हावयास पाहिजे इतकेंच येथें लिहिणें पुरें.

## ( ई ) ज्ञानेश्वरी–मराठीचें व्याकरण

या विभागांतला महत्त्वाचा भाग म्हणजे ज्ञानेश्वरी-मराठीचें व्याकरण या विषयांवरील केसरींत १९१० सालीं आलेले पांच अग्रलेख होत. शके १८३१ मध्यें इतिहासाचार्य कै० वि० का० राजवाडे यांनीं ' श्रीज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण ' नांवाचें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. तत्कालीन मराठी, ज्ञानेश्वरीचा अभ्यास या दृष्टीनें हें पुस्तक अत्यंत महत्त्वाचें आहे. केसरीमध्यें या विषयावर पांच अग्रलेख आलेले आहेत. व त्यांत सामान्य वाचकांस या पुस्तकाचें महत्त्व दाखवून थोडक्यांत तत्कालीन मराठी व्याकरणाची माहितीहि करून दिलेली आहे. पहिल्या लेखांकांत ज्ञानेश्वरी-मराठीचें व्याकरण लिहिण्याचें काम हातीं घेणाऱ्यास कोणची सामुग्री पाहिजे यांचें त्यांनीं फार सुंदर विवेचन केलें आहे. मराठीचा उगम संस्कृत भाषेपासून खरा, पण प्रत्यक्ष संस्कृतपासूनच नसल्यामुळें ज्ञानेश्वरी-मराठीच्या व्याकरणकारांस पाणिनी ( संस्कृत व्याकरणकर्ता ) वररुचि ( प्राकृत व्याकरणकार ) हेमचंद्र ( महाराष्ट्र अपभ्रंश व्याकरणकार ) या सर्वांच्या ग्रंथांच्या माहितीची अपेक्षा आहे. याशिवाय महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्ञानेश्वरकालीन हस्तलिखित प्रत सांपडणें अवश्य आहे. कै. वि. का. राजवाडे

यांनीं ही सर्व सामुग्री जमा करून सामान्यतः एखाद्या शार्मण्यदेशीय अगर आंग्ल पंडिताकडे जो मान जावयाचा तो एका महाराष्ट्रीयाकडेच ठेवला ही मोठी अभिमानाची गोष्ट आहे.

दुसऱ्या लेखांकांत अपभ्रंश, मराठी ह्या भाषा संस्कृतापासून कशा तयार झाल्या याचें फारच सुलभ व सुंदर विवेचन केलें आहे. लेखांक तीन, चार व पांच यांमध्यें ' नामप्रत्ययेतिहास ' ' षष्ठी ' व ' क्रियापदाची प्रक्रिया ' यांचा विचार केला आहे. संस्कृतांतून प्राकृतांत, मराठींत शब्द कोणच्या नियमानें येतात उदाहरण 'तृण' चें तन, 'तैल'चें तेल, ज्ञानेश्वरींतील अकारान्त नामाच्या प्रथमेच्या शेवटीं येणारा उकार कानडीचा परिणाम नसून अस्-ओ–उ या द्वारां संस्कृत प्रत्ययाचा शेष कसा आहे, ज्ञानेश्वरींत 'नें' या प्रत्ययानें तृतीया कशी नाहीं षष्ठीच्या 'चा,ची,चें 'चीं रूपें विशेषणासारखीं कशी उपयोगांत येतात, व जातां जातां व्याकरणदृष्ट्या संस्कृतापासून तयार झालेल्या भाषांचा इतिहास पाहिला तर हिंदुस्थानांतील लोक एकजीव व एकवंशी आहेत हें कसें सिद्ध होतें इत्यादि इत्यादि गोष्टी फारच सुलभ व सुंदर रीतीनें या लेखांच्या द्वारां केसरीनें दाखविल्या आहे.

## ( उ ) ज्ञानेश्वरी आणि सृष्टिसौंदर्य

या प्रकरणांतला शेवटचा भाग म्हणजे 'ज्ञानेश्वरी आणि सृष्टिसौंदर्य' या विषयावरील श्री. निफाडकर यांचे सन १९०२ मधील दोन लेख. जुन्या कवींविरुद्ध नेहमीं असा एक आक्षेप घेण्यांत येत असतो कीं त्यांस धर्म, ईश्वर यांखेरीज दुसऱ्या विषयांवर विशेषतः निसर्गावर लिहितांच येत नाहीं. या आक्षेपांचें श्री. निफाडकर यांनीं मिल्टन, शेले यांच्या कवितेंतील उतारे व ज्ञानेश्वरींतले उतारे देऊन उत्तम निरसन केलें आहे. त्यांच्या लेखांचें मर्म एकाच वाक्यांत सांगतां येण्यासारखें आहे. श्री. निफाडकर म्हणतात, ' ज्ञानेश्वर नुसतें सृष्टि-
' सौंदर्याचें कवनच करीत होते असें नाहीं; तर ते व सृष्टि एकच होत असें माझें
' मत आहे. '

## ( ऊ ) ज्ञानेश्वरीबाबत लिहिलेल्या पुस्तकांचीं परीक्षणें

याशिवाय केसरींत पुष्कळ वेळां ज्ञानेश्वरीच्या ज्या निरानिराळ्या आवृत्त्या वेळोवेळीं प्रसिद्ध झाल्या त्यांचीं परीक्षणें येऊन गेलेलीं आहेत. केरळकोकीळकार आठल्ये, आगाशे यांच्या ज्ञानेश्वरींचीं परीक्षणें, तसेंच श्री. मोडक यांनीं लिहिलेलें भक्तिरसप्रधान ' ज्ञानेश्वरमहाराज ' नांवाचें नाटक, आनंदकर्ते वासुदेवराव आपटे यांनीं लिहिलेला ' ज्ञानदीप ' अथवा गद्यरूप ज्ञानेश्वरीसार वैगेर ग्रंथांचीं परीक्षणें केसरींत वेळोवेळां येऊन गेलेलीं आहेत. केसरीचीं परीक्षणें नेहमींच

मार्मिक, यथार्थ व विधायक अशीं असतात. व केसरीच्या परीक्षणास लोक किती मानतात हें महाराष्ट्रीयांस तरी निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

आतांपर्यंत केसरींत ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी यासंबंधानें आलेल्या विषयांची परीक्षणात्मक मांडणी वाचकांच्या पुढें केली आहे. या चर्च्ये विषयाचे आरंभीं म्हटल्याप्रमाणें दोन विभाग होतात. पहिला भाग ज्ञानेश्वर या व्यक्तिविषयक व दुसरा भाग त्यांच्या ग्रंथासंबंधीं. विशेषतः ज्ञानेश्वरीसंबंधीं या बाबतींत एकंदर निश्चित स्वरूपाची अशी ज्ञानांत भर ( Contribution ) केसरीच्या लेखांनीं कोणची घातली हें थोडक्यांत सांगून ही चर्चा पुरी करतों.

ज्ञानेश्वरविषयक लेखांत ज्ञानेश्वर एक का दोन या प्रश्नाचा केसरींतील लेखांनीं नास्तिपक्षीं कायमचा निकाल लावून टाकला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्ञानेश्वर एक का दोन हा प्रश्न पुनः फारसा कोणीं काढला नाहीं. पण या चर्चेंत आलेल्या किरकोळ मुद्द्यांनीं मधून मधून डोकें वर काढलेलें दिसतें. उदाहरणार्थ—नामदेवाचा काल हा विषय. या बाबतींत कै० सर रामकृष्णपंत भांडारकर यांनीं आपल्या 'वैष्णविझम् ॲन्ड शैविझम्' या पुस्तकांत पान ९२ वर चर्चा केली आहे.

( १ ) ज्ञानदेव व नामदेव यांच्या ग्रंथांची भाषा वेगळी.

( २ ) नामदेवाचे गुरु विसोबा खेचर हे मूर्तिपूजेविरुद्ध होते ही गोष्ट प्रसिद्धच आहे. व इतकें मूर्तिपूजेविरुद्ध मत मूर्तिभंजक मुसलमान महाराष्ट्रांत बलवान् झाल्यावरच शक्य. कारण तत्पूर्वीं रामानुजादिकांनीं मूर्तिपूजेलाच अवसर दिला.

( ३ ) नामदेवाच्या अभंगांत तुर्कांनीं मूर्ति फोडल्याचा उल्लेख आहे.

येवढ्याकरतां ज्ञानदेव नामदेव समकालीन मानणें चूक आहे. नामदेवाचा काळ एक शतक तरी पुढें ढकलला पाहिजे. दुर्दैवानें सुशिक्षित हिंदवासीयांत सुद्धां ऐतिहासिक दृष्टीचा अभाव दिसून येतो व यामुळेंच हा कालाचा घोंटाळा झाला असल्याचा संभव आहे. या सरसाहेबांच्या मताचें खंडन करण्याचें कारण नाहीं. कारण या सर्व मुद्द्यांचा विचार ज्ञानदेव नामदेव समकालीन होते या विभागांत येऊन गेला आहे. येथें एकच गोष्ट सांगणें अवश्य आहे व ती ही कीं विसोबा खेचर ज्ञानदेवांचे शिष्य होत व त्याच्या मूर्तिविषयक ज्या कथा प्रसिद्ध आहेत त्याकरितां मुसलमानी अंमलापर्यंत वाट पाहाण्याची गरज नाहीं. मान्य समजलेल्यांनीं कोणच्याहि गोष्टीचा अंगीकार केला कीं तिचा प्रसार होतो या न्यायानें प्राच्यभाषाकोविद डॉ. भांडारकर म्हणतात म्हणून डॉ. फरकूहर या गृहस्थांनींहि १९२० सालीं रॉयल एशिॲटिक सोसायटीच्या जर्नलच्या एप्रिलच्या अंकांत ज्ञानदेव नामदेव समकालीन नव्हते म्हणून सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांसहि केसरींतच पंडित पांडुरंग शर्मा यांनीं

४ डिसेंबर १९२३ च्या अंकांत उत्तम उत्तर दिलें आहे. तात्पर्य, या बाबतींत केसरीनें जें मागें लिहिलें आहे तेंच मत आजहि कायम आहे.

ज्ञानेश्वरींत विठ्ठलाचा उल्लेख नाहीं, अभंगाची भाषा वेगळी व ज्ञानेश्वरीची भाषा वेगळी वगैरे बाबींचीहि मधून मधून चर्चा ऐकूं येते. पण तीसहि प्रो. रा. द. रानडे एम्. ए. यांच्या अध्यात्मग्रंथमालेंतील 'ज्ञानेश्वरी' या पुस्तकांतील प्रस्तावनेंत त्यांनीं उत्तर दिलें आहे; व तेथेंहि केसरीपुरस्कृतच मत सिद्ध केलें आहे. तात्पर्य, या ज्ञानेश्वरविषयक बाबतींत असें म्हणावयास हरकत नाहीं कीं केसरींतील लेखकांनीं ज्ञानदेव व ज्ञानेश्वर एक होते व ज्ञानदेव नामदेव समकालीन होते या गोष्टी इतक्या निर्विवाद रीतीनें सिद्ध केल्या आहेत कीं अजून तरी हे सिद्धान्त बदलणारा पुरावा पुढें आला नाहीं; व पुढें येणारहि नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

## कीर्तनें व कीर्तनकार

[ श्री. विष्णु सखाराम घाटे ]

कीर्तनानें साधावयाचें काय हेंच कीर्तनकारांस समजत नाहीं, व ज्यांना तें समजतें त्यांना कीर्तनें करतां येत नाहींत. समाजांतल्या थोड्या भावड्या श्रोत्यांपुढें मायावादाचें तुणतुणें गाऊन पुराणांतल्या गोष्टींस शोधक बुद्धीचा उजळा न देतां अग्राह्य स्वरूपांत त्या सांगून आपण धर्मोपदेश करतों आहों असें आजचे हरिदास मानतात; याबद्दल त्यांची कींवच केली पाहिजे. खरोखर कीर्तन हें साधन इतकें उत्तम आहे कीं त्याचा जर उपयोग करणारा असेल तर त्याच्या हातून काय होणार नाहीं! धर्मकारण घ्या, राजकारण घ्या किंवा आणखी कुठलेंहि 'कारण' घ्या त्याचा अंतर्भाव कीर्तनांतून होण्यास काय हरकत आहे! कायदा, शाळा, कॉलेजें, वर्तमानपत्रें, नाटकें इत्यादि साधनांत, कीर्तन हें साधन सर्वव्यापी व उच्च दर्जाचें आहे. केसरीच्या मतें 'पिनल कोड हा जर मारका मास्तर तर कीर्तनकार हे सामोपचारानें शिक्षण देणारे गुरु होत.' कीर्तनसंस्था ही सामान्य संस्था नसून समाजास वळण लावून देण्याचें काम कीर्तनकारांस करितां येईल व या दृष्टीनें शाळेंतील शिक्षक किंवा वर्तमानपत्रकार यांच्यापेक्षांहि कीर्तनकारांचा अधिकार मोठा आहे असें त्याचें म्हणणें आहे. धर्माचा व नीतीचा उपदेश हा कीर्तनाचा आत्मा होय, व तसा उपदेश करण्यासाठीं

नाटकापेक्षां कीर्तनाचेंच साधन अधिक समर्पक होय. नाटक हें ' नाटक आहे ' ही भावना प्रेक्षकांच्या मनांतून जात नाहीं. शिवाय नाटकी मनुष्याचें वर्तन व कीर्तनकाराचें वर्तन यांविषयींच्या समाजाच्या समजुतीहि कीर्तनप्रकारालाच अनुकूल आहेत, ही गोष्टहि केसरी सांगण्यास विसरला नाहीं. ' या संस्थेनें स्व-
' राज्याच्या वेळीं फार कामगिरी केलेली आहे; स्वसंस्कृतीचा प्रसार या दृष्टीनें
' या संस्थेचें जें प्रयोजन होतें तें आजच्या काळांत जास्तच भासूं लागलें आहे;
' विद्वान्, बुद्धिवान्, स्वार्थत्यागी, व लोकशिक्षणाचा प्रसार करणारे हरिदास जर
' आजच्या काळीं ठिकठिकाणीं तयार होतील तर ते महाराष्ट्रीय जग जिंकतील'
असें केसरीचें मत आहे.

आजच्या काळाला नमुनेदार हरिदास कसा असावा याबद्दल केसरीनें मांडलेले मुद्दे ता. १८ डिसेंबर १९२८ च्या अंकांत प्रसिद्ध झाले आहेत. व ते फारच मार्मिक आहेत ' ( १ ) हरिदासांत वक्तृत्व हवें पण वावदुकी
' नको. ( २ ) गाणें हवें पण वस्तादी गवयाइतकें नको. कथेला गायन-
' वादनाची जोड म्हणजे मेजवानीच्या वेळीं उदबत्त्या लावण्याप्रमाणेंच आहे.
' केसरीचा हा दृष्टान्त फारच मार्मिक आहे. ( ३ ) अभिनय हवा पण नटा-
' इतका नको; ( ४ ) विनोद असावा पण तो विदूषकी नसावा. ( ५ ) उपमा,
' दृष्टान्त व गोष्टी या चटकदार असाव्यात पण अतिशयोक्तीच्या नसाव्यात
' ( ६ ) कोटींत विनोद व विद्वत्ता असावी पण शब्दाचा खेळ नसावा. ( ७ )
' विद्वत्ता पाहिजे पण घडघड पाठांतर नको. ( ८ ) आचाराची श्रेष्ठता असावी
' पण व्युत्पत्तिप्रियता नसावी. ( ९ ) पदें जुनीं असलीं तरी चाली नव्या
' असाव्यात. (१०) आख्यानें शक्य तोंवर पौराणिक अगर ऐतिहासिक कालां-
' तील लावावींत. ताज्या आधुनिक कालांतील मात्र तीं नसावींत. (११) निरू-
' पणांत सद्यस्थितींतील राजकारणाचे दाखले उघड देऊं नयेत. श्रोत्यांच्या
' कल्पनाशक्तीला थोडी तरी जागा ठेवावी. असें न केलें तर कीर्तनाचें कीर्तनत्व
' जातें. प्रचलित राजकारणाला किंवा इतर परिस्थितीला आधारभूत अगर
' पोषक असे प्रसंग महाभारतांतून वाटेल तेवढे सांपडतात व त्यांचें विवरण
' जर कुशलतेनें केलें तर आडपडद्यानें सध्यांची बिकट परिस्थिति व त्यांतून पार
' पडण्याचे मार्ग हे लोकांच्या डोळ्यासमोर उभे राहातील व त्या योगानें
' कीर्तनाचें कार्य होईल.' १८९७ सालच्या शिवाजीउत्सवांत ' असंतोषः श्रियो मूलम् ' या वचनाचा आधार घेऊन कै. प्रो. शिवराम महादेव परांजपे यांनीं दिलेल्या व्याख्यानाचा नमुना, आधुनिक हरिदासांनीं डोळ्यापुढें ठेवावा, अशी केसरीकार केळकर यांची शिफारस आहे.

प्रवृत्तिपर व प्रयत्नाढ्य अशा केसरीचे कीर्तनकारांनीं पूर्वरंग व आख्यान कसें लावावें याबद्दलचे विचार मनन करण्यासारखे आहेत. कीर्तनाचा पूर्वरंग

मुमुक्षु कोटींतील लोकांना उपयोगी पडेल असा करून तो उज्ज्वल स्वरूपाचा व प्रवृत्तिपर असावा. रामचरित्र सांगतांना ‘राम जन्मतःच देव होते’ असें सांगणें केसरीस पसंत नसे. ‘राम देव होते, कृष्ण देव होते आम्ही काय पामर. आमचे हातून काय होणार!’ ही विचारसरणी दुर्बल असून राष्ट्राचा घात करणारी आहे. श्रीरामचंद्राचें चरित्र यत्नप्रधान आहे व हरिदासांनीं त्यांतील प्रयत्नरहस्य लोकांस समजावून सांगावें. ‘यत्न तो देव जाणावा,’ ही रामदासांची शिकवणूक नेहमीं प्रतिपादावी. जें रामचरित्राचें तेंच पुराणांतल्या इतर कथांचें. महाभारत हा ग्रंथ केसरीचा अत्यंत आवडता असून त्यांतले भीष्म व कृष्ण हे दोन वीर आदर्शभूत असे केसरीस वाटतात. भीष्माचा दृढनिश्चय आणि श्रीकृष्णाचें मुत्सद्दीपण यांविषयीं केसरीचा बेसुमार आदर दृष्टीस पडतो व हरिदासांनींहि या पुरुषांच्या कथा त्या त्या गुणावर जोराचें प्रतिपादन करून सांगाव्या असें केसरीचें सांगणें स्वाभाविकच आहे.

केसरीची हरिदासपुराणिकावर फार भिस्त. आपल्या धर्मावर चोहोंकडून आघात होत असलेले पाहून केसरीचें हृदय तिळतिळ तुटे. व हरिदासांनीं इंग्रजी वगैरे पाश्चात्य ग्रंथ वाचून इतर धर्मांचा तुलनात्मक पद्धतीनें अभ्यास करावा. आपला धर्म श्रेष्ठ आहे असें लोकांस सिद्ध करून द्यावें असें केसरीस वाटे. तद्वतच इंग्लंडांत एम्. ए. झाल्यावर जसे एक्लिझिआस्टिकल म्हणजे धार्मिक खात्यांत, अगर मिशनरीपणा किंवा रामदासीपणा स्वीकारून मनुष्यें आजन्म धर्माची सेवा करितात तसें सुशिक्षित वर्गानें या कीर्तनाच्या धंद्यांत पडून आधुनिक काळास योग्य अशी कीर्तनें करून धर्मप्रसार व तद्द्वारां देशसेवा करावी असें केसरीस वाटत आहे. ‘नव्या सुधारणान्वयें कौन्सिलांत गेल्यावर जर एज्युकेशन पोर्टफोलिओ हातांत ‘आला तर, पहिल्यानें मी जी गोष्ट करीन ती ही कीं, आपल्यांतील पुराणें, कीर्तनें, ‘प्रवचनें इत्यादि जुन्या संस्था मी उर्जितावस्थेस आणीन. व ह्या धर्मप्रसाराच्या ‘जुन्या संस्था काबीज करून मी आपल्या सुशिक्षित, सुसंस्कृत आणि स्वार्थत्यागी ‘तरुणांना पुराणिक, प्रवचनकार व कीर्तनकार म्हणून देशांतील खेड्यापाड्यांमध्यें ‘सोडून देऊन, सद्यःस्थितीविषयींची लोकांना पूर्ण ओळख करून देईन आणि ‘लोकजागृतीचें काम करीन’ (१९१९) असें एकदां टिळक म्हणाले होते. केसरी वर्तमानपत्रांत हजारों रकाने लिहून जें काम नीट झालें नसतें तें एका गीतारहस्यानें झालें. तुरुंगांत जातांच नारदीय परंपरेच्या हरिदासाच्या भूमिकेवर आरूढ होऊन लोकमान्यांनीं एक आधुनिक कीर्तन केलें व तें त्यांचें त्यांसच इतकें उत्तम वाटलें कीं, जणूं काय आपण आजपर्यंत कीर्तनें केलीं नाहींत हें कांहीं बरें झालें नाहीं असें वाटूनच, त्यांनीं बोलून दाखविलें कीं, ‘समाजांत विशिष्ट मताची परिस्थिति ‘उत्पन्न करणें झाल्यास—मग तें मत राजकीय असो वा धार्मिक असो—

' आपल्या मताचें प्रस्थापन समाजांत करणें झाल्यास त्यास कीर्तन-संस्थेसारखें ' दुसरें साधन नाहीं; इतकेंच नव्हे, परंतु माझें असें ठाम मत आहे कीं, ' मी ' जर वर्तमानपत्राचा एडिटर झालों नसतों तर कीर्तनकार झालों असतों. '

कीर्तनाबद्दल इतकीं स्पष्ट मतें कोणींहि प्रगट केलेलीं नाहींत. केसरीकारांच्याच तोंडांतून तीं इतकीं निःसंदिग्धपणें बाहेर पडलीं. त्यांतल्या त्यांत ' गीतारहस्या'ची कीर्तनकृति तर खरोखरच अलौकिकच होय.

---

# प्राच्यविद्या

[ श्री. सिद्धेश्वर लक्ष्मण चित्रावशास्त्री ]

**प्राच्यविद्येचा पुरस्कार**—राष्ट्राचें सर्वांगीण धुरीणत्व स्वीकारणाऱ्या केसरीनें नवशिक्षितांना प्राचीन विद्येच्या अभ्यासाकरितां पुढें ओढण्याचा अनेक प्रकारांनीं प्रयत्न केलेला आहे. केसरींतील श्री. चिं. वि. वैद्य यांची अवलोन्नतिलेखमाला, महाभारत, रामायण, कै. पारखीशास्त्री यांच्या बाण-भट्ट व श्रीहर्ष यावर लिहिलेलें परीक्षण किंवा भट्ट मॅक्समुल्लर, प्रो. जिन्सी-वाले वगैरेंचे मृत्युलेख, डॉ. भांडारकर, प्रो. जिन्सीवाले यांच्या व्याख्यानांचे सारांश व सावळेकर, प्रो. पाठक, त्र्यं. गु. काळे, कै. वि. का. राजवाडे यांचा पत्र-व्यवहार वगैरे चाळले असतांहि याची सहज कल्पना येण्यासारखी आहे.

महाभारतावरील श्री. वैद्यांच्या इंग्रजी पुस्तकाचें परीक्षण करतांना लो. टिळक अनेक इंग्रजांचीं मतें सांगून पुढें म्हणतात, ' पाश्चिमात्य विद्वानांनीं काढलेल्या ' कल्पना खऱ्या किंवा खोट्या, खऱ्या असल्यास त्यांत सत्यांश किती आणि खोट्या ' असल्यास त्या खोट्या कशा याचें अलीकडे उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक ' साधनांनीं सशास्त्र परीक्षण करून लोकांच्या निदर्शनास आणून देणें हें देशांतील ' सुशिक्षित लोकांचें कर्तव्य आहे. पाश्चिमात्य विद्वानांनीं यासंबंधानें कितीहि लिहिलें ' तरी आपल्या ग्रंथांचा आम्हीं होऊनच स्वतंत्रपणें विचार केल्याशिवाय त्यांतील ' तथ्य आम्हांस समजावयाचें नाहीं' (१४-३-१९०५). नंतर कांहीं थोडें लिहून शेवटीं ' महाभारतासारख्या राष्ट्रीय ग्रंथावर पाश्चिमात्यांचे जे कांहीं आक्षेप असतील ' किंवा शंका असतील त्यांचें समाधान करून या ग्रंथाचें खरें स्वरूप आमच्या ' लोकांपुढें मांडणें हें काम आमचें आम्हींच केलें पाहिजे. ( १४-३-१९०५ ).

" धर्मदृष्ट्या किंवा राजकीयदृष्ट्या विचार केला तरीहि महाभारतापासून " आम्हीं पुष्कळ गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. ' ( ३०-५-१९०५ ). याशिवाय परदेशांतील प्राच्यविद्येच्या अभ्यासाची माहिती, शोध वगैरे लोकांपुढें ठेवण्याची संधि केसरीनें कधींहि वाया घालविलेली नाहीं. आपल्याकडील एखाद्या ग्रंथाचा किंवा ग्रंथकाराचा गौरव पाश्चात्यांनीं केलेला आढळल्यास तो कोणत्या तरी स्वरूपानें लोकांपुढें मांडला जाई. भाषाशास्त्राचें महत्त्व सध्यां लोकांना कळूं लागलें आहे. व तें शास्त्र अर्वाचीन आहे अशी समजूत दृढ आहे. यावर भाषाशास्त्राचा इतिहास थोडक्यांत कथन करून या शास्त्राचें मूळ पाणिनीच्या प्रकृतिप्रत्यविभागात्मक व्याकरणांत आहे असें केसरीनें लिहिलें आहे. व जगांतील चारपांच विद्वानांत पाणिनीची गणना आहे, हें एका अमेरिकन पंडिताचें मत दिलें आहे

**स्थलनिर्णय**—स्थलनिर्णयासंबंधीं केसरींत ' किष्किंधा कोठें असावी ?' हा वाद बराच महत्त्वाचा व विस्तृत असा झाला. त्यांत मुख्य लेखक म. गो. अभ्यंकर व के. व्ही. लक्ष्मणराव यांनीं विशेषतः भाग घेतला. श्री. म. गो. अभ्यंकर यांनीं रामाचा प्रवासमार्ग व कडक थंडी वगैरेंवरून सध्यांची पंचवटी व किष्किंधा खोटी ठरवून ती विंध्याच्या उत्तरेस असावी असें सप्रमाण सिद्ध केलें. (८-८-९९). पण के. व्ही. लक्ष्मणराव यांनीं सध्यांची किष्किंधाच रामायणांतील हें सप्रमाण प्रतिपादन केलें आहे. याशिवाय श्री. नाना भवानराव पावगी यांनीं केलेली आर्यांच्या मूळस्थानाविषयींची चर्चा लो. टिळकांच्या मताच्या विरुद्ध असली तरी अभ्यासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची आहे.

**प्राचीनकालनिर्णय**—हा विषय फार महत्त्वाचा आहे. केसरीचें हें दालनहि अनेक विद्वानांनीं भूषित केलेलें आहे असें आपणास सहज दिसून येतें.

पौराणिक वाङ्मयांतील वंशावळी किंवा कालविषयक मन्वंतरादिकांची योजना विस्कळित, अशक्य वाटणारी, विरोधी व काव्यमय असल्यामुळें नक्की म्हणून कांहीं ठरविणें कठिण होतें. एकावरून कांहीं अनुमान काढल्यास त्याला विरोधी म्हणून दुसरा ग्रंथ उभा राहातो. वैदिक वाङ्मयांत ब्राह्मणग्रंथांखेरीज कोठेंहि परंपरा आढळत नसल्यामुळें कालनिर्णयाला कांहीं साधनच नाहींसें होतें. विविध व तुटक सूक्तांनीं भरलेल्या व सर्वांनीं उल्लेख केलेल्या सर्वांत प्राचीन अशा ऋग्वेदाची तर गोष्टच बोलावयास नको ! परंतु यांतूनहि लो. टिळकांनीं आपल्या अपूर्व बुद्धिमत्तेनें मार्ग काढिला व ऋग्वेदांतील सूक्तांवरून व इतर श्रुत्यादि ग्रंथांतील प्रमाणांवरून मृगनक्षत्रपुंजांत वसंतसंपात होता तेव्हां म्हणजे शकापूर्वी सुमारें चार हजार वर्षें कांहीं ऋग्वेदसूक्तांची रचना झाली आहे असें सूक्ष्म व सविस्तर विवेचन करून दाखविलें आहे. ( ओरायन ). यावर कै. शं. बा. दीक्षित यांनीं आपल्या भारतीय ज्योतिषशास्त्रांत कांहीं आक्षेप

घेतले. पण त्यामुळें लो. टिळकांच्या वेदकालनिर्णयाला बिलकूल बाध आला नाहीं. उलट दीक्षितांच्या विवेचनानें केसरीकारांचा सिद्धान्त तपासला जाऊन अधिक बळकट झाला. वेदांची पूर्वकालमर्यादा शकापूर्वी सुमारें ६००० वर्षें याहून अर्वाचीन नाहीं, येवढें मात्र सांगतां येतें. त्याच्यापूर्वी वेदमंत्र कधीं प्रगट झाले हें कोणासहि सांगतां येणार नाहीं. म्हणजे तो काळ एका अर्थी अनादि आहे. ( भा. ज्यो. १३६ ). याच लो. टिळकांच्या सिद्धान्ताला बान युनिव्हर्सिटींतील डॉ. जॅकोबी यांनीं याच वेळीं इतर साधनांनीं ठरविलेल्या काळांनीं, सहज पुष्टि मिळाली. कै. व्यं. बा. केतकर यांनीं तैत्तिरीय ब्राह्मणांतील गुरुपुष्ययोग दाखवून त्याचाहि काल केसरीकारांच्या अनुमानास पुष्टिदायक असा दाखविला व त्यांनींहि त्या लेखाखालीं टीप जोडून आपल्या म्हणण्याला पोषक असा नवा आधार दाखविल्याबद्दल केतकरांचें अभिनंदन केलें. ( ३०-३-९७ ). आतां याच पद्धतीवर आपलें संशोधन चालविणारे श्री. वडेर व श्री. दत्तरी वगैरे लोक आहेत. परप्रान्तांतहि श्री. मुखोपाध्याय वगैरेंनीं नक्षत्रावर पुस्तकें लिहून कार्य चालविलें आहे.

कै. दीक्षित यांनीं आपला सुप्रसिद्ध भारतीय ज्योतिःशास्त्र हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यापूर्वी पांडवांच्या कालाविषयीं केसरींत चर्चा केली होती. ( २३-७-९५ ). त्यावर कै. व्यं. बा. केतकर, वि. कृ. लेले, केसरीकार लोकमान्य ( ३०-७-९५ ) व इतर कांहीं निनांवी पत्रव्यवहार प्रसिद्ध होऊन बराच कालपर्यंत चर्चा चालली होती. (२८-६-९८).कै.दीक्षित यांचें पुस्तक आज मराठींत तर अपूर्व आहेच.त्याच्या कांहीं भागांचें फ्रेंचमध्यें भाषान्तर झालें आहे व कांहीं परदेशी पंडित तें पुस्तक वाचण्याकरितां मराठी शिकले आहेत असें म्हणतात. त्यांनीं प्रतिपादन केलेल्या पांडवांच्या कालाचाच पुढें लो. टिळकांनीं पुरस्कार केला. श्री. चिं. वि. वैद्य यांनीं महाभारतावर लिहिलेल्या महाभारतपरीक्षण या इंग्रजी पुस्तकाचें परीक्षण करितांना केसरींत अनेक अग्रलेख लिहून त्यांत श्री. चिं. वि. वैद्य यांनीं मानलेला पांडवाचा काळ खोडून दीक्षितांचा इ. स. पू. १५०० हा पांडवांचा काल लोकमान्यांनीं सिद्ध केला आहे. त्या पूर्वींच्या बहुतेक युरोपियन लोकांनींहि प्रायः हेंच मत मान्य केलें आहे. विष्णु, भागवत व मत्स्य वगैरे पुराणांत दिलेल्या हिशेबानें हेंच मत ग्राह्य धरावें लागतें, हें लोकमान्यांनीं सिद्ध केलें आहे. ' भारयीय युद्धकालापेक्षां ' पांडवापासून नंदापर्यंत किती पिढ्या गेल्या हें पाहून त्यावरून कालनिर्णय कर- ' ण्याची पद्धत अधिक निर्दोष व सशास्त्र आहे असें कोणाहि विचारी मनुष्यास ' उघड दिसणार आहे ' ( के. २३-५-१९०५ ). कै. शं. बा. दीक्षित यांनीं मात्र आपल्या ग्रंथांत सर्व बाजू मांडून श. पू. १५०० ते ३००० पर्यंत असें शेवटीं मोघम विधान केलें आहे. ( भा. ज्यो. १२५ ). श्री. चिं. वि. वैद्य यांनीं केसरीस उत्तर देऊन आपलें मत म्हणजे स. पू. ३१०१ हा पांडवांचा

काल पुनः प्रतिपादला आहे. (ऐ. नि. खंड २. पा. ४०–६१). लो. टिळकांनीं दोन पारीक्षित जनमेजय सिद्ध केले तरी श्री. चिं. वि. वैद्य यांनीं आपलें म्हणणें सोडलेलें नाहीं व आपला कालहि अद्यापि सोडलेला नाहीं. या तऱ्हेनें एकदां सिद्ध केलेल्या गोष्टींचा पाठपुरावा करण्याचें काम केसरीनें अव्याहत चालविलें आहे. यांत पुराणें विचारांत घेतलीं जात नाहींत ही मोठी न्यूनता राहतें असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. कै. दीक्षित व श्री. चिं. वि. वैद्य यांनीं पुराणें न पाहिल्याबद्दल स्पष्टच म्हटलें आहे. पण लो. टिळकांनीं मात्र पांडवांचा काल ठरवितांना पुराणांतील वचनांवर भिस्त ठेवली आहे. कारण तीं पुराणवचनें एका पुराणांत येत नसून अनेक पुराणांत येतात. व परीक्षितापासून प्रत्येक राजांच्या कारकीर्दीचीं वर्षें देण्याचाहि तेथें प्रयत्न केलेला दिसतो. यामुळें तिकडे कोणाचेंहि लक्ष वेधतें. श्री. ज. स. करंदीकर यांनीं युधिष्ठिरशकाबद्दल थोडी चर्चा केली आहे. (६-११-२३). गीतेचा त्यांनींच तिथिनिश्चय केला असून त्याप्रमाणें गीताजयन्ती सुरू झाली आहे.

याशिवाय रामजन्मकालनिर्णय, सप्तग्रही व कपिलाषष्ठी निर्णयासारखे धर्मशास्त्रीय प्रश्न यांचीहि बरीच उद्बोधक चर्चा झालेली आहे.

प्रो. का. बा. पाठक यांनीं आद्यशंकराचार्यांच्या कालनिर्णयासंबंधीं महत्त्वाचे लेख केसरींत प्रसिद्ध करून आपल्या प्राचीन ग्रंथांच्या अभ्यासाचा लोकांना परिचय करून दिला. त्यांत न्या. तेलंग यांनीं व अर्वाचीन कोशकार र. भा. गोडबोले यांच्या विधानांचा चांगला समाचार घेतला आहे. अर्वाचीन कोशांतील जैन व बौद्ध ग्रंथांतील उतारे व विधानें निर्मूल असल्याचें दाखवून त्यांच्या खंडणाची आवश्यकता नाहींशी केली आहे. शेवटीं ग्रंथोल्लेखांच्या उतरणीवरून साखळी जोडीत शांकर दिग्विजयांत दिलेला आद्य शंकराचार्यांचा जन्मकाल श. ७१० व गुहाप्रवेश श. ७४२ हा सिद्ध केला आहे. (२०-६-९३).

केसरीच्या इतिहासांतील कालनिर्णयात्मक लेखांत कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचा पाणिनिकालनिर्णय फार महत्त्वाचा आहे. (२५-१०-१०). एखादी व्यक्ति राष्ट्राचा इतिहास बदलून टाकते त्याप्रमाणें कै. राजवाडे यांच्या या लेखानें पाणिनीच्या कालनिर्णयांत एकदम मोठा फरक घडवून आणला आहे. परदेशी पंडित इ. स. पू. ३००-३५० पर्यंत पाणिनीला ठरवीत होते व त्या धोरणानेंच आमच्याकडील विद्वान् बोलत असत. पण या लेखानें पाणिनीचा काल इ. स. पू. ९००-१२०० पर्यंत जाऊन पोंचला आहे. एक काल असा होता कीं कथासरित्सागराला अनुसरून पाणिनिकात्यायनादिकांना समकालीन मानीत असत. पण त्या युगाचाहि या लेखानें शेवट झाला. यामध्यें डॉ. ग. कृ. गर्दे व पं. बाळाचार्य गजेन्द्रगडकर या नव्या–जुन्या पंडितांनींहि भाग घेतला होता. कै. राजवाडे यांचा हा लेख म्हणजे अन्तर्गत सूक्ष्म अभ्यासाचा नमुनाच आहे. अशी

स्वावलंबी अभ्यासाची परंपरा कै. शं. बा. दीक्षित, राजवाडे यांच्या पुढें चालविली जाणें अवश्य आहे.

---

# शेतकी–इरिगेशन

[ श्री. सरदार राजाराम जनार्दन पोतनीस, बी. एजी. ]

'हिंदुस्थान देश मुख्यतः शेतीवरच अवलंबून राहणाऱ्या लोकांचा असल्या-
'कारणानें, जगांतील इतर देशांच्या मानानें हा शेतकऱ्यांचा एक मोठा देश
'गणला जात आहे. येथील रहिवाश्यांनीं आपलें मुख्य उपजीविकेचें साधन,
'जी शेती तिची सुधारणा करण्याकडे लक्ष पुरविलें पाहिजे. शेती सुधारण्याच्या
'कामीं शेतकऱ्यांनीं प्रयत्न करणें जसें आवश्यक आहे, तसेंच त्या प्रयत्नांस
'हरएक तऱ्हेची मदत करणें, व शेती जास्त उत्पादक होऊन त्या योगानें शेती-
'वर अवलंबून असणारा वर्ग अधिक संपन्न व सुखी कसा होईल हें पाहणें हें
'राज्यकर्त्यांच्या अनेक कर्तव्यांपैकीं आद्य कर्तव्य असून, तें पार पाडण्याची
'त्यांनीं अहर्निश खटपट केली पाहिजे. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं आपले
'राज्यकर्ते परकीय असल्यामुळें या कामांत जरूर ती जबाबदारी घेऊन खटपट
'करीत नाहींत.' ( के. २२-१०-०३ व १८-९-०६).

शेतीस चांगल्या जमिनीची जितकी आवश्यकता आहे, तितकीच वेळेवर मिळणाऱ्या पाण्याचीहि आहे. पावसाचें पाणी, सर्वत्र नियमित वेळीं व ठराविक प्रमाणांत पडतेंच असें नाहीं. शिवाय जें कांहीं पाणी पडतें, तें बहुतेक सर्व वाफेच्या रूपानें व जमिनीवरून अगर जमिनींतून निचऱ्याचे रूपानें निघून जातें. हिंदुस्थानांत पडणाऱ्या पावसापैकीं साठविण्याच्या अगर कालव्याचे कामास किती पावसाचा उपयोग होतो याची माहिती इरिगेशन कमिशननें आपल्या रिपोर्टांत नमूद केली असून, त्यांचें म्हणणें असें आहे कीं या साऱ्या पावसाच्या पाण्यापैकीं सरासरीनें वर्षास फक्त सव्वादोन इंच पाण्याचाच काय तो उपयोग साठवणीकडे होतो.

वर नमूद केलेलें पाणी दरसाल आडवून साठवीत गेल्यास शेतीस लागणारें पाणी मिळणारें आहे आणि यासाठींच कालवे बांधणें, विहिरी खणणें, इत्यादि प्रकारांची आवश्यकता आहे. अशा तऱ्हेनें पाणी आडविणें अगर विहिरी खोदून

सांठविणें व त्यांचा शेतीसाठीं उपयोग करणें यासच ' इरिगेशन ' म्हणजे पाट-बंधारे अशी संज्ञा आहे.

' हीं इरिगेशनचीं कामें, हिंदुस्थानांत फार पुरातनकाळापासून चालू आहेत.
' चिंगतपूट जिल्ह्यांत असलेल्या एक हजार वर्षांपूर्वीच्या दोन विहिरी, कावेरी
' नदीचा दुसऱ्या शतकांतील कालवा व पंजाब व सिंध प्रांतांतील मुसलमान व शीख
' राजांनीं बांधलेले कालवे हे या गोष्टींची साक्ष देत आहेत. ( के.२३-८-०४).

हिंदुस्थानांतील भौगोलिक रचनेवरून पाहतां कालव्यांची जरूरी तीन प्रकारांनीं निरनिराळ्या कारणांसाठीं भासतेः—

( १ ) सिंधदेशासारख्या ठिकाणीं पावसाचें शेतीस प्रमाण कमी असतें, त्या ठिकाणीं त्या देशांतून वाहात जाणाऱ्या लहानमोठ्या नद्या व नद यांचें पाणी आडवून बारमाही शेतीस पाणी देण्याची आवश्यकता, ( २ ) महाराष्ट्रासारख्या ठिकाणीं पाऊस पुष्कळ व पुरेसा पडतो, परंतु तो वेळेवर अगर नियमित प्रमाणांत पडत नसल्याकारणानें शेतीसाठीं या देशांत कालव्यांची जरूरी आणि ( ३ ) विहार ओरिसा यासारख्या देशांतून फक्त अवर्षण काळीं बचावाचें साधन म्हणून बंधाऱ्यांची व कालव्यांची उपाययोजना.

शेतीसाठीं उपयोगांत येणाऱ्या इरिगेशनच्या कामाचें साधारणपणें तीन वर्ग करता येतात. पहिला वर्ग म्हणजे देशांतील राज्यकर्त्यांनीं टोलेजंग धरणें बांधवून कालवे काढून विस्तृत प्रमाणावर शेतीसाठीं बारामाही पाण्याचा पुरवठा करणें हा होय. परंतु हिंदुस्थानसरकारनें या कामाकडे सन १९०१सालीं लॉर्ड कर्झन-साहेबांनीं कमिशन बसवीपर्यंत व ह्या कमिशनचा रिपोर्ट १९०३ सालीं बाहेर पडेपर्यंत मुळींच लक्ष पुरविलें नव्हतें, असें म्हटलें तरी चालेल.

इरिगेशनच्या कामापासून शेतकऱ्यांस फायदा होतो व अवर्षणाचे काळांत त्यापासूनच त्यांचा बचाव होतो. हें जसें सिद्ध झालें आहे त्याप्रमाणेंच सरकारास या कामापासून तात्कालिक २॥ टक्के व शेती सुधारल्यानंतर होणारी सारा-वाढ व दुष्काळनिवारणार्थ फंडाची बचत असे फायदे होत असल्याचें १९०१ च्या कमिशनच्या रिपोर्टावरून व केसरींतील लेखांवरून स्पष्ट दिसतें.

इरिगेशनचीं नवीन कामें कसोशीनें व तात्काल करणें हें सरकारचें कर्तव्य आहे व या कामांपासून सरकारचा फायदाहि होणार आहे. मात्र हीं कामें करीत असतां सरकारानें केवळ व्यापारी दृष्टि नेहमींच ठेवून चालावयाचें नाहीं. बऱ्याच रेल्वे बिनफायद्याच्या आहेत, असें पूर्वीं दिसत असतां त्या वेळीं त्या जास्त बांधण्याचा सारखा धूमधडाका कां चालू ठेवला होता ? हीच दृष्टि पाट बांधण्या-संबंधीं ठेवावी, असें केसरीनें लिहिलेलें असून ' आगगाड्या या प्रजेच्या कायम-
' च्या उपयोगाच्या नसून पाटबंधारे हेच उपयोगी होत ' तेव्हां इरिगेशनचीं कामें

‘ सर्व देशभर जितकीं जास्त असतील तितकें सरकार व रयत यांस हितावह आहे ‘ असें केसरीनें सुचविलें आहे.’ ( १४-१०-९० ).

इरिगेशनचे कामाचा दुसरा वर्ग म्हणजे जुने पाटबंधारे दुरुस्त ठेवणें व नवीन लहान तलाव व बंधारे बांधून पावसाळ्यांतील पुराचें पाणी थोपवून धरून चार-माही अगर आठमाही पिकांस तें जरूर तेव्हां वापरणें हा होय.

या वर्गांत जुने तलाव व बंधारे येतात. मुंबई इलाख्यांत हें अंदाजें नऊ हजार असून अडीच लाख एकर जमीन भिजून त्यापासून सरकारास जमीन–महसूल दहा लाख रुपये वसूल होतो. ( के. २३-९-९० ).

या जुन्या बंधाऱ्यांची व्यवस्था सरकार ( १ ) पब्लिक वर्क्स खातें व ( २ ) सिव्हिल खातें या दोन खात्यांमार्फत पाहातें. हीं कामें दुरुस्त राखण्याबाबत, सरकारनें आपल्यावरील जबाबदारी उडविल्यासारखीच आहे, कारण, मुलकी-खात्याच्या ताब्यांतील ७।८ हजार तलावांची दुरुस्ती हें खातें कांहीं एक खर्च न करितां चालवितें व पब्लिक वर्क्स खातें या तलावांकडे ढुंकूनहि पाहत नाहीं. सरकारचा मनोदय असा कीं हे बंधारे शेतकऱ्यांनीं स्वतःचे खर्चानें दुरुस्त ठेवावेत व सरकारास सारा मात्र भरपूर द्यावा. ( के. ७-१०-१८९० ). आतां पब्लिक वर्क्स खात्याचे ताब्यांतील सव्वा हजार मोठ्या तलावांबाबत सरकारनें ठराव केला कीं या कामीं शेतकरी रयतेची वहिवाट हे दुरुस्त ठेवण्याची आहे असें दिसून येतें. तेव्हां रयतेच्या जबाबदारींतून तिला मुक्त करितां येत नाहीं. काय न्याय आहे ! खर्चाचे बाबतींत वहिवाटीचें पिल्लू आणि सारा वाढवून पैसा वसूल करण्याचे बाबतींत काय विचार केला जातो ? रिव्हिजनसर्व्हेच्या वेळीं तांत्रिक थोडे फार पैसे या कामांवर, शेतकऱ्यांकडून वर्गण्या केल्याशिवाय, खर्च करावयाचे व दर ठरोती एकदांची उरकून घेतली कीं, मग ‘ येरे माझ्या मागल्या !’. शेतकऱ्यांकडून वर्गणी आल्याखेरीज मग हे तलाव दुरुस्तच होत नाहींत.

त्याचप्रमाणें या तलावांचे खालीं भिजणाऱ्या जमिनींतील पिकांत कांहीं सुधारणा घडवून आणण्याचा ७५ वर्षांत सरकारनें कांहीं प्रयत्न केला आहे असेंहि कोठें दिसत नाहीं.

या तलावांतील पाणी देण्याची व्यवस्था त्या तलावाखालीं शेती करणाऱ्या शेतकऱ्यांकडेच असते. बागाईतदार स्वतःचे खर्चानें पाटकरी ठेवीत म्हणून ते त्यांचे नोकर असून पाणी देण्याबाबत तत्पर व वक्तशीर असत. सरकारचे कालव्यावरील पाटकऱ्यांप्रमाणें त्यांचें वर्तन नसे.

पूर्वीं कालव्याबाबत सर्व व्यवस्था जुन्या ग्रामसंस्थेमार्फत होत असे. लॉर्ड कर्झनसाहेब यांनीं नेमलेल्या इरिगेशन कमिशनच्या बैठकी महाराष्ट्रांत झाल्या त्यावेळीं विजापूरचे ॲग्रिकल्चर खात्याचे जनरल इन्स्पेक्टर मि. मॉलिसन्साहेब यांनीं आपल्या साक्षींत व टाइम्समध्यें त्यावेळीं लेख लिहिणाऱ्या ‘ जे ’ नांवाच्या

लेखकानें या जुन्या तलावांची व बंधाऱ्यांची व्यवस्था ग्रामपंचायतीकडे देण्यांत यावी व अशा रीतीनें या पुरातन संस्थेचें या कामापुरतें तरी पुनरुज्जीवन करावें असें म्हटलें आहे. तेव्हां हीं कामें शेतकऱ्यांस दुरुस्त ठेवण्यास सांगून त्यांना त्याबद्दल आकारांत माफी द्यावी व वेळोवेळीं मदत करावी. (के. १४-१०-९०)

जुन्या पाटबंधाऱ्याप्रमाणेंच नेहमींसाठीं व पावसाळी पाणी अडविण्यासाठीं नवे लहान लहान बंधारे लोकांकडून करून घेण्याचें काम सरकारनें तगाई देऊन करावयाचें असतें. तें सरकार बरोबर रीतीनें बजावीत नाहीं. तगाई देण्याबद्दलचा नुसता कागदी कायदा पास करून चालत नाहीं. तगाई देण्यामध्यें जरा सढळ हात ठेवलाच पाहिजे. व व्याजाचे दरहि कमी केले पाहिजेत. त्याचप्रमाणें परत-फेडीस हल्लींपेक्षां जास्त मुदत द्यावी व ही मुदत तगाई देणारे कामगार आपल्या अधिकारांत कमी करणार नाहींत याबद्दल खबरदारी घ्यावी.

इरिगेशनच्या कामाच्या तिसऱ्या वर्गांत सरकारचे मदतीनें शेतकऱ्यांकडून जागजागीं विहिरीं खणून शेतांत पाणीपुरवठ्याची सोय करणें हें येतें.

मुंबई इलाख्यांत सन १९०२चे सुमारास एकंदर लागवडीचे प्रमाणाशीं बागाइताचें प्रमाण शेंकडा ४ टक्केहि पडत नाहीं; व हें प्रमाण इतर प्रांतांचें मानानें फारच कमी असल्याचें सिद्ध झालें आहे.

तेव्हां विहिरी खणून पाटबंधारे बांधण्यास सरकारनें लोकांस योग्य उत्तेजन दिल्यास लागवडीच्या जमिनीचें क्षेत्रफळ सात लक्ष एकर वाढेल म्हणून मि० मॉलिसन यांनीं आपल्या साक्षींत सांगितलें आहे.

महाराष्ट्राचा बहुतेक सर्व भाग खडकाळ असल्याकारणानें डोंगरावर पडणारें पावसाचें पाणी सखल प्रदेशावर खडकांचे आंतून भेगांतून वाहात असतें व हें पाणी विहिरी खणून तुंबविल्यास बागाइतीसाठीं उपयोगी पडणारें आहे. या प्रमाणें जागजागीं विहिरी खणण्याचा प्रघात महाराष्ट्राप्रमाणें कर्नाटकांतहि पुष्कळ आढळतो. सरकारनें पाणी शोधून यंत्रानें स्वस्तांत विहिरी खणण्याचे कारखाने वाढविल्यास शेतकऱ्यांवर मोठे उपकार होतील.

इरिगेशनच्या कामासंबंधीं माहिती दिल्यानंतर हीं कामें फायदेशीर व लोकांना उपयोगी होण्यास काय केलें पाहिजे हें केसरीनें ( २३-९-९० ) दिलें आहे तें खालीलप्रमाणें:—

( १ ) नदीचे पूर सांठविण्याचे खजीने बांधून त्याचे कालव्यांतून बारामाही अगर आठ किंवा चारमाही पिकांस पाणी पुरेल अगर बागाइताला अमुक एकरालाच तें मिळेल म्हणून लोकांस जाहीर करावें.

( २ ) पिकाचे दर एकवार कायम ठरवून टाकावेत. ( ही सूचना फार महत्त्वाची आहे. कायम धारा नसणें हें एक जमिनीची सुधारणा न होण्याच्या कारणांपैकीं एक कारण आहे. )

( ३ ) कालव्यांवरील प्रत्येक खेड्यांत एक एक नमुन्याचें सरकारी शेत असावें व त्यांत सर्व प्रकारचीं पिकें शेतकऱ्यांना करून दाखवावींत. पिकें तयार करण्यास लागणारा खर्च व मेहनत आणि त्यापासून होणारें फायदेशीर उत्पन्न हें प्रत्यक्ष दिसल्यावर शेतकरी तशी बागाईत करील.

( ४ ) कालवा बांधणारें खातें अगर लोक हेच व्यवस्था पाहणारे असणें उपयोगी नाहीं. पिकें उत्पन्न करावयास काय काय करावें लागतें याची पूर्ण माहिती असलेल्या शेतकीच्या माहितगारांची या कामीं योजना असावी.

( ५ ) शेतकऱ्यांस उत्तेजनार्थ वार्षिक इनामें, पाणपट्टींत सूट वगैरे असावींत.

( ६ ) खताचा डेपो खेड्यांत असून कालव्यावरील कामगारानें खतांची माहिती देऊन शेतकऱ्यांस पुरवठा करावा.

( ७ ) उंसाचे पिकास जळण स्वस्तांत मिळावें म्हणून कालव्याच्या कांठानें बाभूळ वगैरे झाडें मुबलक लावावीं व तीं माफक दरानें शेतकऱ्यांस द्यावींत.

( ८ ) गुराढोरांना चराईची व्यवस्था असावी.

( ९ ) पिकाची फेरपालट व बाजारांतील निरनिराळ्या ठिकाणची, निरनिराळ्या पिकांची मागणी व त्यांचे दर याबद्दलची माहिती कालवा-कामगारांनीं पुरवावी व बींबियाणें पुरवावें.

( १० ) गांवचे पाटीलकुळकर्ण्यांचे मार्फत लोकांत बागाइताची गोडी वाढवावी व त्यांना मेहनताना जास्त द्यावा.

( ११ ) कालव्यावरील गांवांच्या शाळेंतून मुलांना पिकांची, खतांची वगैरे माहिती द्यावी.

( १२ ) मुख्य गोष्ट भांडवल. शेतकऱ्यांजवळ भांडवल नसणारच. तेव्हां तगाईफंडांतून चांगल्या रीतीनें भरपूर पुरविलें जावें व कालव्यावरील कामगाराला तें देण्याचा अधिकार असावा किंवा सर वेडरबर्नच्या मूळ तत्त्वावर लोकांच्या पेढ्या असाव्यात.

( १३ ) सडका वगैरे तयार कराव्यात, कालव्यावरील प्रदर्शनें वेळोवेळीं भरवावींत; तीं मुंबई वगैरे ठिकाणीं भरवूं नयेत.

( १४ ) मोठालीं कामें खेरीज करून कालव्याचीं सर्व कामें रयतेकडेच सोंपवावीं.

मुख्य गोष्ट शेतकऱ्यांस या कामासंबंधीं आपलेपणा उत्पन्न केल्यास सरकारास या दुकानावरील ( इरिगेशन डिपार्टमेंट ) फाजील खर्च कमी होऊन फायदा दिसूं लागेल.

सन १८९६--९८ सालांत व त्यानंतर दुष्काळाचे उग्र स्वरूपानें सरकार जागें झालें व लॉर्ड कर्झनसाहेबांनीं १९०१ सालीं इरिगेशन कमिशन नेमिलें.

हें कमिशन नेमिलें त्यावेळीं सरकारनें रेल्वेवर भरमसाट खर्च करण्याचें थांबवून, दुष्काळग्रस्त रयतेसाठीं पाटबंधारे बांधण्यास तावडतोब सुरवात करावी म्हणून केसरीनें सूचना केलीच व शिवाय या नेमिलेल्या कमिशनपुढें सरकारी अधिकाऱ्यांच्या काय प्रकारें साक्षी होत आहेत व त्यांतून तगाई देण्याची निरुपयोगी व हानिकारक पद्धत व त्याबाबत गांव—कामगारांचा बिलकुल संबंध असूं नये वगैरे महत्त्वाच्या गोष्टी कशा बाहेर येत आहेत हेंहि लोकांच्या दृष्टीस आणलें. ( के. १९-११-०१ व १०-१२-०१ ).

कमिशनचा रिपोर्ट सन १९०३ मध्यें बाहेर पडला व त्यांत मुख्यत्वेंकरून ४४ कोट रुपये खर्चून पुढील वीस वर्षांत ६५ लक्ष एकर जमीन भिजेल अशी व्यवस्था व्हावी असें सांगितलें असून पंजाब, सिंधप्रांत, गुजराथ व महाराष्ट्र व मद्रास इत्यादि ठिकाणीं तावडतोब इरिगेशनचे कामास सुरुवात करण्याविषयीं शिफारस केली आहे. याशिवाय लहान लहान पाटबंधारे, विहिरी इत्यादि कामें सरकारनें करून पाणीपुरवठा करावा. त्याचप्रमाणें खाजगी जबाबदारीवरहि अशीं लहान लहान पाटबंधाऱ्यांचीं अगर विहिरींचीं कामें होतील त्यांस ग्रँट, तगाई इत्यादि मदत देऊन उत्तेजन द्यावें, अशीहि शिफारस केली आहे. ह्यांतील पुष्कळशीं कामें शेतकीच्या संरक्षणाचेच कामासाठीं हातीं घ्यावयास पाहिजेत. त्यापासून सरकारास पैशाचा फायदा कमी झाला तरी हरकत नाहीं. परंतु शेतीच्या उपयोगासाठीं हीं कामें करावींत. इतकेंच नव्हे तर लोकांना कांहीं मुदतीपर्यंत सारावाढ करणार नाहीं असें आश्वासन देऊनहि लहानसहान पाटबंधाऱ्यांच्या खाजगी प्रयत्नांस उत्तेजन द्यावें. यावरून मुंबई इलाख्यांत गोदावरी नदीस धरण बांधून कालवे काढण्याबद्दल मुंबई सरकारनें जाहीर पत्रक काढल्याचें केसरीनें लोकांस कळविलें आहे. ( १८-९-१९०६ ).

---

## पद्यवाङ्मय

[ श्री. चिंतामण गणेश कर्वे, संपादक—महाराष्ट्र शब्दकोश ]

केसरीनें केवळ गद्यवाङ्मय निर्माण केलें असें नसून अगदीं आरंभापासून प्रसंगानुरूप संस्कृत प्राकृत कविता केसरींतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

**संस्कृत कविता**—गेल्या पन्नास वर्षांचा आढावा घेतां असें आढळतें कीं,

सुमारें १४० निरनिराळ्या कवींनीं निरनिराळ्या विषयांवर तीनशेंपर्यंत कविता दिल्या; यांपैकीं संस्कृत तीस चाळीस आहेत. कै. पांडुरंगशास्त्री पारखी हे शीघ्र कवि असून ' श्रीरामवर्णन ' ( ३-१२-०१ ), ' मयूरेशाष्टकम् ' (२५-३-०२), ' शिवोपदेश ' ( २७-२-०५ ) यांसारख्या त्यांच्या संस्कृत कविता चांगल्या आहेत. कै. कृ. पां. लिमये ऊर्फ राधारमण हे १९०८ सालापासून १९१८ सालपर्यंत दरवर्षी गणेशाष्टक गणपतीच्या दिवसांत प्रसिद्ध करीत. पुढें ते वारले म्हणून खंड पडला. श्री. मिरजकर ऊर्फ मुकुंदराय यांनीं वेळोवेळीं मराठी-प्रमाणेंच संस्कृत कविता दिल्या. उदा––' राजसार्वभौमः ( १२-११-११ ), ' स्वराज्याष्टकम् ' ( १०-१०-१६ ), ' क्रिकेटधुरंधर ' ( २८-१२-२६ ). श्री. पाकणीकर यांनींहि ' सत्यमेव जयते ' ( ३-५-३० ), ' सरोजिनी ' ( २१-६-३० ), ' महात्मनः कारागृहवासः ' ( १-७-३० ) यासारख्या आधुनिक राजकीय चळवळीवर प्रोत्साहनपर कविता रचिल्या. यांखेरीज ' भारतमातृस्तोत्रम् ' ( २५-६-१२ ), ' रणदुंदुभि ' ( २२-४-३० ), ओगल्यांचें 'स्वराज्य-महिम्नस्तोत्र ' ( ६-५-३० ) वगैरे संस्कृत पद्यें आहेत. या संस्कृत काव्याविषयीं थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, त्या मागील अभिजात संस्कृत (classical) काव्यापेक्षां कमी दर्जाच्या नाहींत.

**सभावर्णन**—केसरींतील मराठी काव्याचें परीक्षणात्मक वर्गीकरण करूं गेल्यास विषयवार आणि कवीवार अशीं दोन मोठीं सदरें पाडावीं लागतील. आरंभीं आरंभीं सभा, समारंभ व निधन या प्रसंगांवरच कविता दिसतात. राष्ट्रीय सभेचे एक नाशिकचे डेलिगेट बळवंत खंडूजी पारख हे सभेंतच आपले कटाव म्हणून दाखवीत. त्यांचे कटाव फार चटकदार व प्रसंगाचें बरोबर चित्र उभें करणारे आहेत. शिवचरित्र व जयंत्युत्सव यांवरहि पारख यांचीं साधीं कवनें आहेत. (२२-१०-९५, १२-५-९६). कोल्हापूरच्या ना. श्री. निपाणीकर कवींनींहि पुण्याच्या संस्मरणीय राष्ट्रीय सभेवर श्लोक रचिलेले दिसतात. (१-१०-९५; १७-१२-९५). त्यांनीं ' लवणहि उपयोगी लादला टॅक्स त्याला ' असें सरकार-विरुद्ध अनेक गाऱ्हाण्यांपैकीं एक गाऱ्हाणें सांगितलें. दुसऱ्या एका ' स्पष्टवक्त्या ' कवीनेंहि ' प्रजाक्रोश ' (८-१०-९५) काय, तो समजावतांना ' मणामागें लागे लवण करण्या एक चवली । कराची त्यामागें विसपट परी धाड बसली ॥ ' असें सार्थ म्हटलें आहे. सभावर्णनविषयांत सुप्रसिद्ध अनंततनय कवींनींहि प्रथमच काव्यप्रांतांत पाऊल टाकतांना प्रवेश केलेला दिसतो.

**स्मारक-समारंभ**—शिवाजी महाराजांसारख्या ऐतिहासिक पुण्यपुरुषांच्या स्मारकांवर नेहमीं केसरींतून जाग्रतिपर कविता आल्या आहेत. शिवस्मारकासंबंधीं तर पुष्कळच संस्कृत-मराठी पद्यें आहेत. जयंत्युत्सव (१२-५-९६, १९-५-०३, १८-३-३०, २५-३-३० इ.) राज्योत्सव (८-६-०९); उपदेश, प्रशस्ति, अष्टक

(२७-६-०५; २४-४-१७; ९-३-२६ इ.); स्मारकफंड ( १०-९-९५ ) इ. कै. गोविंद कवींचें ' देशाचा पालनवाला ' हें जुनें पद (१५-३-३०) फार उत्तेजक वाटेल. ' कुठें ती धन्य शिवशाही, अहा तें लोपलें सारें ! ' हें हृदयनिवास्यांचें शोकगीतहि हृदयस्पर्शी आहे. ( २५-३-३० ). रामदास, शिवाजी, नाना फडणीस, चिपळूणकर वगैरे थोर पुरुषांचीं स्मरणें आलीं आहेत.

**लोकमान्यांवर कविता**—१९०८ सालापासून लोकमान्यांवर कविता येऊं लागल्या. त्या वर्षी टिळकांना हद्दपारीची शिक्षा झाली तेव्हां अखिल जनता कशी शोकाकुल बनली याचें सुरेख करुणरसपूर्ण वर्णन पारखीशास्त्री यांनीं केलेलें आहे. ( २८-७-०४ ). ' तो वाट पाहत असे तिलका मराठा। तो ' केसरी पुसतसे प्रिय तूज मोठा। त्यांना तुझें कुशल काय सख्या वदावें ?। ते ' सत्य दीन दिसतात कसें करावें ! ॥ '

**महात्माजींवर कविता**—म. गांधीवर मुकुंदराय कवीचींच दोन तीन पद्यें आहेत. सरपटवारांची ' महात्मा येतील कधीं परतून ' ही गांधींना बिनमुदत कैद झाल्यानंतरची कविता हृदयांत कालवाकालव करून सोडते. ( १३-५-३० ).

**सण व देवता**—यांवरहि पुष्कळ काव्य प्रासंगिक स्वरूपाचें असें आलें आहे.

**राजकीय विषय**—केसरी हें पत्रच मुळीं केवळ राजकारणाला वाहिलेलें असल्यानें त्यांत येणाऱ्या पुष्कळ कविता राजकीय प्रासंगिक विषयांवर असणारच. स्वराज्यासंबंधीं विचार ' स्वराज्याष्टक ' ( १०-१०-१६ ), 'स्वराज्यमार्गप्रतीक्षा' ( ७-११-१६ ), ' स्वराज्यध्येयाची एकरूपता ' ( २५-१२-१७ ), ' स्वातंत्र्याची प्रभात ' ( ७-१-२० ), ' स्वातंत्र्यगीत ' ( ५-४-३० ), ' स्वराज्यमहिम्नस्तोत्र ' ( ६-५-३० ) वगैरे पद्यांतून सुंदर ग्रथित झालेले आहेत. ज्याप्रमाणें देशांत राजकीय आंदोलनें होत त्याप्रमाणें काव्यविषयहि येत. १९०८ सालच्या मोर्लेमिंटो रिफॉर्म वादांत मवाळांची थट्टा होई. तिचाच अनुवाद ' मवाळांचे प्रातःस्मरण ' या व्याजोक्तिपर विडंबन काव्यांत आला आहे. ( ४-२-०८ ). ' मवाळ आम्ही सरकारदोस्त। मोर्लेकृपें होउनि पूर्ण मस्त। करूं टवाळां घनघोर शिक्षा। आंग्लांपुढें मागुनि नित्य भिक्षा ॥ ' असें ' मवाळ राजकवी 'नें म्हटलें आहे. यतींद्राच्या बलिदानासंबंधीं ( २१-९-२९; ३-६-३० ), सोलापूरच्या गोळीबारावर ( ३१-५-३० ), ' यहुद्यांची आक्रोशाची भिंत ' ( २४-९-२१ ), सत्याग्रहसंग्राम (२६-४-३०;१७-६-३०), बहिष्कार (१६-८-३०;२३-८-३०) इत्यादीवर मननीय पद्यें सांपडतात. समुद्रमंथन करून काढलेल्या १४ रत्नांनंतर मीठ हें १५ वें रत्न आतां निघालें असें काव्यशेखरानें दाखविलें आहे. ( २८-६-३० ), राष्ट्रीय निशाणावरहि, अज्ञानवासी, तिवारी यांसारख्या प्रसिद्ध कवींचीं पदें आलीं आहेत. ' बघ निशाण वर हें फडफडतें, दे अंतःस्फूर्तीला भरतें ॥ ' ही अज्ञातवासींची ओळ खरोखरच देशभक्तीची अंतःस्फूर्ति उत्पन्न

करील. ( १२-८-३० ), दु. आ. तिवारी यांनीं ‘ शिंग वाजलें, भेरि वाजल्या, डंके कडकडले। याच निशाणाखालीं योद्धे दख्खनचे जमले ॥ ’ असा आरंभ करून पानपतच्या युद्धांतील मराठ्यांची मर्दुमकी वर्णिली आहे. (७-१०-३०).

**देशभक्ति**—यापुढें देशभक्ति हा विषय साहजिकच येतो. देशकालपरिस्थिति पाहून दुःखानें निघालेले ‘ देशभक्ताचे उसासे ’ कोणाच्याहि मनाला व्यथित करतील. ( २४-४-०६; १८-८-०८ ). तुकारामाच्या नांवानें या कवीनें अभंग रचिले आहेत. ‘ तुका म्हणे केव्हां देखेन कळस, पळाली आळस निद्राभूक ’ हें कांहीं ठिकाणीं पालुपद आहे. ‘ देशभक्तीचा भुकेला, देव हद्दपार केला ’ असें लोकमान्यांचें वर्णन केलें आहे. ‘ जेणें सर्वस्वा मुकावें, तेणें देशभक्त व्हावें ’ अशी देशभक्ताची कसोटीहि सांगितली आहे. आनंदराव टेकाडे यांनीं ‘ तो पहा कळस भाग्याचा, परतंत्र भरत देशाचा, कां दिससी ऐसा उदासीन वदनाचा। चल हंसुनि एकदां श्वास सोडि धीराचा ॥ ’ याप्रमाणें निराश झालेल्या देशसेवकाला धीर देऊन, ‘ हा सूर्य दावी पूर्वेचा, स्वातंत्र्यकळस भाग्याचा ’ असें दाखवून दिलें व लगेच इशारा दिला कीं, ‘ तोंवरीच कांहीं मार्ग जाण आशेचा। ’ कारण ‘ सूर्यास्त झालिया......नकोच ही वाचा ! ’ ( ‘ निर्देश ’ १२-२-२४ ). गणेश कवीनेंहि ‘ धरि हिम्मत कांहीं ताज्या तरुणा बनूं नको नादान ? ’ असा ‘ इशारा ’ दिला. (१-४-३०). आजचे तरुण नादान ही निंदा ऐकून ‘ एका युवकानें ’ प्रत्युद्गार काढले कीं आजच्या युवकांनींच प्रचंड पराक्रम गाजविला आहे. ( १७-१२-२९ ). आजच्या घडीला शृंगारिक प्रेमविषयक फालतू गाणीं नकोत तर ‘ वीरगान गा हो ज्यानें, मातृभू मुक्त हो झणीं ’ अशी बऱ्याचजणांनीं ‘ कवींना विनंती ’ केली आहे. ( १०-१२-२९; ११-२-३०; २९-४-३० ). ‘ शृंगारींचीं कवनें आतां पुरेत मातीमोल,’ तर ‘ शाहिरा ! स्फूर्तीचे गा बोल ’ असा पुन्हां गणेशशास्त्री फाटकांनीं शाहिरांस इशारा दिला आहे. (२९-४-३०). तिवारीनींहि ‘निराशा’-जनक असे आजच्या तरुणांचें चित्र रेखाटलें आहे. (२५-११-३०). नंतर पुन्हां एका ‘ अनुवादका’नें ‘ सोडुं नको धैर्यास, आपुल्या सोडुं नको धैर्यास। कारण कार्यारंभीं कोणीं म्हटलें भले कधीं कोणास ? ॥’ असें समजावलें आहे. ( २७-१२-३० ).

देशभक्ताचें जीवर अलोट प्रेम असते त्या हिंद व महाराष्ट्र मातृभूमीच्या गौरवपर कविताहि अनेक दिसतील. श्री. ग. स. मराठे यांनीं विवेकानंदाच्या ‘ To the Awakened India ’ चें रूपांतर म्हणून ‘ भारतभूमीची भूपाळी ’ ( १३-६-११ ) चटकदार केली असून, ‘ मायदेश ’ या नांवचें महाराष्ट्राचें एक राष्ट्रगीतहि रचिलें आहे. ( २७-६-१६ ). मायभूमीला भिण्याचें मुळींच कारण नाहीं, कारण ‘ पुत्र तुझे मनुज आम्ही। मेष महिष नव्हत खास ॥’, असें आश्वासन

दिलें आहे. चिंचाळकरांची 'मराठा तोच' ही कविता फार साधी व पटणारी वाटेल. 'खाउनि साधी भाकर मिरची। घेउनि हातीं भालाबरची। देशासाठीं तनुमन खर्ची। तोच मराठा कीं।' ही मराठ्यांची व्याख्या बरोबर नाहीं असें कोण म्हणेल? (८-२-३०). 'चला रायगडा, शिवरायाचं दर्शन घेऊं।' हें प्रसिद्ध गिरीश कवींनीं केलेलें 'मावळ्यांचें गाणें' (१८-१०-३०) मावळी मेळ्यांतील पदांसारखें अभिजात सुंदर आहे. 'किती काळ देवा आतां अंत पाहणार!। भारतीं जरीपटक्याचा करी फडत्कार'॥ ही टेंभूर्णीकरांची 'एकच आशा' हृदयस्पर्शी तर खरीच. 'शत्रुशिरीं ध्वज फडकूं दे आस हीच फार' म्हणून 'कंदमुळें पाला सेवूं, राहुं वस्त्रहीन'। कारण 'पराधीनतेचें परि तें पुरें जिणें हीन' (१२-११-२९).

**स्वदेशी**—देशभक्तीच्या ओघानेंच स्वदेशीची चळवळ चालते. तेव्हां १८९६ सालांतहि देशी कापड वापरण्याविषयीं काव्यांतून उपदेश आल्यास नवल नाहीं. कवि पेठे यांनीं 'निजवसनग्रहण' काव्य कांहीं उच्छ्वासांमध्यें केलेलें दिसतें. (२-६-९६). Free trade 'अप्रतिबंधोद्यम'—ला आपण प्रतिकूलता कां दाखवावी याचा कवीनें सोदाहरण ऊहापोह केला आहे. महाराष्ट्रभाषामयूर श्री. आठल्ये यांचा जुना स्वदेशीवरील सुंदर फटका केसरीनें पुन्हां छापला आहे (१२-८-३०) तो या दिवसांत अगदीं प्रासंगिक आहे. महात्मा गांधींना चरखा फार प्रिय आहे म्हणून त्यांच्या ६१ व्या वाढदिवशीं एका 'अनामिक' कवीनें त्यांना चरख्यावरच्या पद्याचा आहेर केला (५-१०-२९); 'चरखा नोहे चक्रसुदर्शन। आयुध दारिद्र्यासुर–मर्दन' असा चरख्याचा महिमा यथार्थ वर्णिला आहे.

**सामाजिक**—या सदरांत जातिभेद, मद्यपाननिषेध, अस्पृश्यतानिवारण, हिंदुमिशन इत्यादि विषय आढळतील.'एका खानदेशी कुळकर्ण्या'नें एका फटक्यांत कुळकर्ण्यांची दुःस्थिति कींव येण्याजोगी वर्णिली आहे. तो म्हणतो 'घर घर मागा भिका। अथवा कुणास बाइल विका। परी कुळकर्णी होऊं नका॥ (१८-८-१४).

**शोकगीतें**—कोणी मोठा माणूस, पुढारी किंवा पंडित निर्वतला म्हणजे केसरींत अग्रलेख किंवा स्फूट ज्याप्रमाणें येई, त्याप्रमाणेंच वेळोवेळीं विलापाचीं पद्येंहि आलीं आहेत. प्रि. आपटे, गं. ना. केतकर, रानडे, घाटे, अण्णासाहेब पटवर्धन, विजापुरकर, प्रो. परांजपे वगैरेंवर कविता (संस्कृत प्राकृत) आढळतील. यांपैकीं कांहीं फारच चांगल्या आहेत.

**विविध**—दे. भ. सी. के. दामले, कवि यशवंत, कवि सुमंत य. न. केळकर इ. अनेक कवींची विविध विषयांवर अनेक काव्यें केसरींत आलीं आहेत.

**काव्यालंकार व सौंदर्य**—केसरींतील कविता अलंकारांच्या दृष्टीनें कोणीं तपासल्यास त्यास काव्यांतील शृंगार–बीभत्स–रौद्र या रसांखेरीज बाकीचे सर्व

काव्यगुण जागजागीं आढळतील. वीररस तर प्रधान म्हणतां येईल. उपमा-रूपकांचें जाळें सुलभतेनें न उलगडतां येण्याइतकें मोठें व गुंतागुंतीचें आहे. अन्योक्ति, वक्रोक्ति, अतिशयोक्ति वगैरे प्रकार सररहा आढळतील. सारांश, हा केसरींतील काव्योदधि त्या हेतूनें कोणीं मंथल्यास इष्ट काव्यरत्नें सांपडतील हें थोड्याशा अनुभवानें प्रस्तुत लेखकास सांगतां येतें.

---

# देशी लांब धाग्याचा कापूस

[ श्री. सदाशिव मोरेश्वर फडके. बी. ए. ]

भारतीय कापूसः—‘ आश्वलायन श्रौतसूत्रांत कापसाचे वस्त्राबद्दल उल्लेख ‘ आहे. लॅटिन भाषेंतील ‘ कोर्पास, ’ ग्रीक ‘ सीडोन ’ कापड-सिंध अगर हिंदु ‘ मधील—व संस्कृत ‘ कार्पास ’ हे शब्द वरील अनुमानास पुष्टिदायकच आहेत. ‘ पेरीप्लस या प्राचीन ग्रीक ग्रंथांत देखील हिंदी कापसाचे निर्यातीचा उल्लेख आढळतो.’ ( व. २८ अं. ९ ). परदेशी निर्यातः—‘ आज ज्या हिंदुस्थानांत सत्तर कोटींचें ‘ कापड इंग्लंडहून येतें त्या हिंदुस्थानचा व्यापार कापडाचे बाबतींत पूर्वी इराणी ‘ आखात, सीरिया, भूमध्यसमुद्र, आफ्रिकेचा उत्तर भाग ते झांजीबार, व हिंदी-‘ महासागरांतून मलायाद्वीपकल्प, सुमात्रा, जाव्हा, बालीपर्यंत चीनदेशाच्या मार्गानें ‘ चालत असे. ( व. २८ अं. ९ ). तलम कापडः—थोरले माधवराव पेशवे ‘ यांचे निधनापूर्वी तीन वर्षे जेम्स वॅटनें वाफेचें यंत्र काढिलें व त्या यंत्राचे जोरा-‘ वरच तिकडे भौतिक शास्त्रांची वाढ झाली.

कापसाच्या गुणानुक्रमांत अमेरिकन वेस्ट इंडियन कापूस ४० नंबरपर्यंत, ऑरल्यन्स ६० नं., इजिप्शियन सफेत रंग कापूस ६० नं., इजिप्शियन ब्राऊन १३० नं., सी आयलंड ३०० नं., आस्ट्रेलिया २०० नं., व हिंदुस्थानी १२० नं., हिंगणघाटी ४० नं., उमरावती, बेळगांव, तिनीवेल्ली, धारवाड, धोलेरा, मद्रास, बंगाल वगैरेचा कापूस १५ ते ३० नंबरपर्यंत लागे. वेदांतील जानव्याचा देवकापूस हाच इकडील बारीक लांब धाग्याचा कापूस असावा असें दिसतें. ह्याची लागवड ईजिप्त, आफ्रिका, अरबस्थान, चीन, जाव्हा, जपान व हिंदुस्थान ह्यांच्या देवालयांच्या बगीच्यांत व इतर प्रदेशांत होत असे. वनस्पति-शास्त्रज्ञांना ह्याचें मूळचें स्थान अद्याप निश्चयात्मक रीतीनें समजलेलें नाहीं. बारीक सुताच्या धाग्यासंबंधानें देशी हुन्नर पुस्तकांत पुढील उतारा सांपडतोः—

सन १८६७ त नागपूर प्रदर्शनांत चांदा येथील सुताचा गुंडा एक रत्तल वजनाचा ठेविला होता, त्याची लांबी एकशेंसतरा मैल भरली ! ! फिरंगी व्यापाऱ्यांनीं तसल्या लांब धाग्याच्या सुतावर मोहून शिष्टाचाराचे व नीतिअनीतीचे सर्व नियम झुगारून प्रदर्शनांतील त्या मालाचे तुकडे लांबविले ! ! त्या वेळीं विणकलेंत अत्यंत निष्णात असलेल्या चिंगलपट गांवच्या कसबी लोकांनाहि ज्याचें बारीक धाग्यामुळें सूत विणतां येत नसे अशा जातीच्या बारीक व लांब धाग्याच्या कापसाची लागवड पारुधी गांवचे आसपास होत असे.

सर्व जगांतील हल्लींच्या उत्तम कापसाचा अनुक्रम असा—सी आयलंड, इजिप्शियन, अमेरिकन, भडोच, कुमठा, वऱ्हाडी वगैरे. हिंदुस्थानांतील कापसाचे प्रकार तीनः—( १ ) लांब धागा, ( २ ) मोठ्या गुटीचा व ( ३ ) कोंकणी. कायम लावलेलीं झाडें २५ वर्षे जगतात व वार्षिक झाडांची पावसाळ्यांत पेरणी करून नऊ महिन्यांत पीक येतें. ( वर्ष २८ अं. ९ ). हिंदी कापडाचा इंग्लंडमधील प्रसार—इ. स. १६०० मध्यें इंग्लंडांत निव्वळ लोकरीचाच व्यापार चाले. ईस्ट इंडिया कंपनी हिंदुस्थानांतून तयार कापड विलायतेंत नेई. विलायती कॅलिको माल हिंदुस्थानांतील कालिकतचा पाहून बनविलेला होता. थाटामाटाचे सर्व प्रसंगांत नखरेदार हिंदुस्थानी कापड सर्वत्र दिसे. इंग्लंडमधील सर्व बाजारी पेठांतून ' हिंदी विणलेली हवा ' म्हणजे तलम कापड फैलावलें होतें. इंग्लंडचा लोकरीचा व्यापार बसणार इतकी दहशत हिंदी कापडानें उत्पन्न केली व म्हणून त्या कापडावर जबर जकात बसविली; तरी मालाचा खप वाढताच राहिला. पुढें वाफेचीं यंत्रें आलीं व अमेरिकन कापूस चांगला निघूं लागला; त्यानें इंग्लंडमधील हिंदी व्यापाराला जबर धक्का दिला. सन १८१२ मध्यें हिंदी कापूस अमेरिकन कापसापेक्षां कमी प्रतीचा ठरूं लागला. ( वर्ष १६ अं. ३२ ). अमेरिकन व्यापाऱ्यांची जूट व परिणामः—लांब धाग्याचा कापूस केवळ अमेरिकेंत व इजिप्तमध्यें पिकतो व हा कापूस जगाच्या सर्व गिरण्यांना अपुरा पडणार हें इंग्लंडमधील धूर्त व्यापाऱ्यांना पटूं लागलें व मॅन्चेस्टर दणाणूं नये म्हणून खास बादशाहांचे कृपाछत्राखालीं विलायतेंत ब्रिटिश कॉटन ग्रोइंग असोसिएशन स्थापण्यांत आली. ह्याच सुमारास अमेरिकन व्यापाऱ्यांनीं जूट करून सर्व कच्चा माल अमेरिकेंतच ठेवावा असें ठरविलें. ह्या ठरावामुळें मॅन्चेस्टरचे डोळ्यापुढें अंधारी आली व ब्रिटिश साम्राज्यांत मोडल्या जाणाऱ्या हिंदुस्थानसारख्या शेतीप्रधान राष्ट्रांत व सर्व ब्रिटिश साम्राज्यभर लांब धाग्याची निपज करण्याकरितां प्रयत्न सुरू झाले. इंग्लंडमध्यें पन्नास लक्ष पौंड फंड या कामाकरितां उभारला गेला. पुढें हिंदी सरकार खडबडून जागें झालें. ( वर्ष २४ अं. ९ ). ' नमुन्याच्या शेतीची लागवड ' अमेरिकन बीं आणवून बंगाल, आसाम व ब्रह्मदेशमध्यें सुरू झाली.

हिंदुस्थानांतील प्रयोगाचे बाबतींत बूड आल्यास, कॉटन ग्रोइंग असोसिएशननें पुढील अटीवर हिंदी सरकारास ३७ हजार रुपये देणगीदाखल दिले. ती अट अशी ' हिंदी कापूस इंग्लंडमध्येंच अगर इंग्लंडमार्फत विकावयाचा ' (व.२६ अं.११). मुंबई अहमदाबादचे रोख पैसे देणारे गिरणीवाले व मँचेस्टरवाले हिंदी सरकारास सारखे असतांना शेंसवाशें कोट वार्षिक उत्पन्न असणाऱ्या हिंदी सरकारनें तीस चाळीस हजार रुपयांच्या क्षुल्लक वार्षिक रकमेकरितां, असली आंतबट्याची अट कबूल केली. (वर्ष २६अं.११) व सिंधमधील लांब धाग्याचा कापूस मुंबईचे व्यापाऱ्यांचे दृष्टीस न पाडतां परस्पर विलायतेंत रवाना केला. १८२० सालीं बोरबोन जात इकडे पिकवा अशी शिफारस झाली. १८२० मध्यें डॉ. लूश यांचे उंची कापूस, सुधारलेली लागवड पद्धत व जातवारीप्रमाणें, युरोपचे बाजारांत विक्री यांना अनुलक्षून धारवाड, बेळगांव, व कदालगी जिल्ह्यांत प्रयोग सुरू झाले. (वर्ष १६ अं.३२). थोड्या खर्चांत कापूस युरोपला रवाना करण्यांत सर रॉबर्ट ग्रँट गव्हर्नर ह्यांनीं प्रयत्न केला, पण अखेरीस सर्वत्र निराशाच अनुभवाला आली. १८३६ मध्यें डॉ. लूश यांनीं सिंगाहल्ली शेतांत मनपसंत माल पिकविला व सार्वत्रिक उत्पन्न वाढविण्याचे हेतूनें उत्तम कापूस पिकविणाऱ्या शेतांना पांच वर्षेंपर्यंत साराबंदीची परवानगी मिळाली. पण १८३८ मध्यें एकंदरीनें निपज कनिष्ठ प्रतीची होते म्हणून सवलत परत घेतली. १८४१त कॅप्टन वेल्स याला अमेरिकेमध्यें उत्तम अमेरिकन बीं आणण्याकरितां पाठविलें. अमेरिकन उत्तम बीं आलें पण प्रयोगाअंतीं इंग्लंडमध्यें हिंदी कापूस कोणत्याहि बींचा असला तरी अमिरेकेंतील कापसापुढें फिक्का, असें कायमचें ठरलें गेलें; व तेव्हांपासून हिंदुस्थानांतील सरकारी प्रयत्न ढिला पडला. (वर्ष १६ अं. ३२). प्रांतिक सरकारनें हा प्रयत्न करून बघावा असें हिंदुस्थान सरकारचें धोरण राहिलें; व त्याप्रमाणें कलकत्त्याचे शॉ वालेस कंपनीला ३००० पौंड मदत मिळाली. (वर्ष २४अं.४७). तसेंच प्रांतांचे सरकारास मदत करणें, खासगी प्रयत्नांत निरनिराळ्या शेतकऱ्यांना उत्तेजन देणें, कस्टम ड्यूटी कमी करणें वगैरे प्रयत्न चालू झाले.

डाक्काच्या तलम मलमलीचें बीं अस्सल हिंदुस्थानांत असतांना येथें कापसाची लागवड अमेरिकेशीं टक्कर देण्याइतक्या श्रेष्ठ प्रतीची होणें संभवनीय नाहीं असें सरकारी मत कसें पडलें ? येथील कापडाच्या कनिष्ठ दर्जाची हाकाटी कां झाली ? वास्तविक कनिष्ठ कापूस येथें निपजूं लागला. त्याचें कारण अस्सल व निर्भेळ बियाणें याचा अभाव. सर्व जातींच्या बिया जिनांत एके जागीं गोळा होत व हें भेसळीचें बियाणें परत जिनांतून शेतांत जाई. ( वर्ष २४ अं. ४७).

सरकारी प्रयत्न—लँकेशायरची हाकाटी ऐकून हिंदुस्थानसरकारनें प्रांतांनीं ' लांब धाग्याच्या कापसाची निपज ' करण्याचे हातीं घ्यावें असें ठरवून ५००० रु. खर्च पत्करला. परस्पर माल विलायतेंत पाठविण्याची गोम ह्यांत होती. ( वर्ष २६

अं. ११ ). उत्तम विदेशी बीं पुरवून डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर यांनीं स्वतां-चे (व.२६ अं.३१) विलायती बींच्या रोगाचे इलाज सुचविले तरीहि 'लांब धाग्याचे बाबतींत' सुधारणा होणें शक्य नाहीं असें अनुभवास आलें.

खासगी प्रयत्न—नंतर सरकारनें खासगी प्रयत्नांना उत्तेजन देण्याचें ठरविलें. ( २६ जुलै १८९६ ). धारवाडकडे न्यू ऑरलिन्स जातीचा कापूस काढूं लागले. न्यू ऑरलिन्स तांबड्या काळ्या मिश्र जातींचे रानांत पिकतो. धारवाडकडे या रानास 'हुल्लकयरे' ही संज्ञा आहे. १०-१५ फूट खोलीच्या एकसारख्या काळ्या रानांत हा कापूस येत नाहीं. याला २०-२५ इंच पाऊस व ४-५ संपुटें असणारे बीं उत्तम. मैल्याचें व हाडाचें खत योग्य .( व. २६ अं. ३१ ). अमेरिकन कापसाचा मासला ८५।८६ सालीं इकडे आला. त्याची किंमत १६८० पौंडांला २८० रुपये होती. हा कापूस कोल्हापूर, धारवाड, विजापूर व पंचमहाल प्रांतांत लागवडीस आला. सिंधहैद्राबादाकडे बोरबोन जातीचा कापूस पाठविला. त्याचें पींक उत्तम पण थोडें आलें. धारवाडचे बाजूस मात्र हें बियाणें टिकून राहिलें. अमेरिकन जमिनीपेक्षां इकडील जमीन भुसभुशीत व सूर्यकिरणांचा निसर्गनिर्मित फायदा घेणारी आहे. हा कापूस देणाऱ्या जमिनीचे पृथक् घटक ४५००शेरांत उत्तम माती ३३२४,पूड न होणारे खडे९३६, व गारगोटी२४० असे पडले. जमीन पांच जातींची निघाली. (१) दिगर, शुद्ध काळीभोर. (२) भुरी व पिंगट, खडक, कंकर, १० फूट खोलीची चुनखडीयुक्त. ( ३ ) खडक काळी. (४) मळई, नदीकाठीं. ( ५ ) तांबूस खडी मिसळीची. (व. १६ अं. ३३). चांगल्या बींची परीक्षाः–दाणा आडवा कापल्यावर साईसारखा, दमट, काळ्या ठिपक्याचा गर असलेला चांगला; व पिंवळा, भुरा व सुरकुतलेला गर वाईट बींचा. परंतु इतकी सर्व खबरदारी घेऊन हिंदुस्थानांत एक एकरांत शुद्ध कापूस १०० पौंड तर अमेरिकेंत दर एकरीं २०० ते २५० पौंड !! ह्या फरकास खरी अडचण हिंदुस्थानची विशिष्ट हवाच असें मत मि. मर्सर यांनीं दिलें. ( व. १६ अं. ३३ ). विलायती बीला येथील हवा मानवत नाहीं हें समजतांच बेळगांवीं देवकापसाचे लागवडीचे प्रयोग सुरू झाले. मि. स्पेन्स यांचा डिसा येथील अनुभव मुंबई गॅझेटीयरमध्यें प्रसिद्ध आहेच. देवकापशीचें झाड २० वर्षें टिकाऊ असतें म्हणून त्यांनीं दर एकरीं ५००० झाडें लाविलीं. त्याचा दर एकरीं ४०० रत्तल कापूस काढला. इतर बींची कपाशी हिंदुस्थानांत दर एकरीं ४०-५० रत्तलवर नाहीं !! तसेंच इजिप्तचें प्रमाण ४००-५०० रत्तल व अमेरिकन बींचें प्रमाण २००-२५० !! ह्यावरून देवकापशीचें महत्त्व सहज लक्षांत येण्यासारखें आहे. ( व. २६ अं. ३८ ). स्पेन्सनें या कापसाचे ७० नं. सूत काढलें; व हा कापूस दरशेरीं १४ आण्याला विकून त्याचें बीं एका रत्तलास दहा रुपयेप्रमाणें विक्रीला ठेवलें. ( व. २६ अं. ३८ ). भारतीय कापूस-

झाडाचें दर एकरीं वार्षिक उत्पन्न ६० ते १५० रत्तल आहे. पहिल्या तीन वर्षांत हें पीक दर एकरीं ५०० ते ७०० रत्तल व पुढें कमींत कमी २००० रत्तल पीक देतें. म्हणून भारतीय कापूस लावणेंच इष्ट आहे. विलायती बीं आणून 'हिंदुस्थानांतील चहाच्या मळ्याप्रमाणें' कापसाचे बाबतींत केवळ मजूर बनण्यांत हंशील नाहीं !! (व. २८ अं. ९).

सुधारलेल्या पद्धतशीर लागवडीनें ह्याची पेरणी केल्यास उत्तम कापूस निपजेल. ह्या जातीच्या झाडास एक वर्षभरच पाणी लागतें. पुढें मेघानें अवकृपा केली तरी तात्रडतोब उत्पन्न बुडण्याची भीति नाहीं. खत घालून दर एकरीं उत्पन्न दोन हजार रत्तल येतें. मशागत व इतर खर्च ६०-७० रुपयांत भागतो; व खत न घालतां देखील दर एकरीं ५००रत्तल उत्पन्न येतें ! बियाणें तीन रुपयांत एक रत्तल मिळतें; व एक रत्तल बीं पांच सहा हजार झाडें देतें. (व. २८ अं. ९). मोठ्या प्रमाणांत ह्या पिकाची लागवड पाहिजे म्हणजे कांहीं वर्षांनीं हिंदुस्थान वस्त्राचे बाबतींत पूर्वीप्रमाणें पूर्ण स्वावलंबी बनेल. (व. २६ अं. ३८).

---

# आयुर्वेद

[ वैद्य पुरुषोत्तम गणेश नानल, आयुर्वेदाचार्य ]

कोणतेंहि शास्त्र अथवा विद्या राजाश्रयाविना वाढीस लागत नाहींत; किंवा लोकाश्रयाखेरीज त्या शास्त्राचें पूर्ण संगोपन होऊं शकत नाहीं; पण ज्या वैद्यकास कोठलाहि आश्रय नसल्यानें अत्यंत वाईट दिवस आले त्याची योग्यता सरकार व जनता ह्या दोघांसहि उत्तम तऱ्हेनें पटवून देण्याकरितां, केसरीनें अत्यंत परिश्रम करून आयुर्वेदाची बहुमोल सेवा केली आहे हें कार्य केसरीनें अग्रलेख, स्फुटें, प्रासंगिक विचार, तज्ज्ञांचीं पत्रें, चिकित्सकांचीं व्याख्यानें पुस्तकांचीं परीक्षणें, कायदे-कौन्सिलांतील भाषणें, व संमेलनांचीं वृत्तें इत्यादि साधनांनीं, केलें आहे. विलायती वैद्यक शिकलेल्यांना उद्देशून केसरी म्हणतो, 'मेडिकल कॉलेज-'मधून शिक्षा घेऊन निघालेला डॉक्टर घ्या त्याचें विलायती औषधाखेरीज 'एक पाऊलहि पुढें पडावयाचें नाहीं. पण ज्या देशांत वैद्यकाचा 'धंदा अनेक बुद्धिमान् लोक आज हजारों वर्षें करीत आले व ज्यांच्या 'औषधांची उपयुक्तता इतक्या वर्षांच्या अनुभवांच्या कसास उतरली 'त्या देशांत परकीय विद्येनें देशी वैद्यकावर इतका पगडा बसवावा ही 'गोष्ट मोठी खेदकारक व लज्जास्पद आहे. वैद्यशास्त्र हें अनुभवप्रमाण असल्यानें

'रोगांची उपपत्ति व निदान किती जरी सूक्ष्म करितां आलें तरी लोकांत
'त्या शास्त्राची योग्यता गुणावरूनच केली जाणार. प्राचीन वैद्यकांत नाहींत
'अशीं कांहीं रामबाण औषधें हल्लींचे वैद्यकांत आहेत हें खरें, पण त्यामुळें
'आमच्या ४।५ हजार वर्षांच्या अनुभवास कमीपणा खास येत नाहीं. हिमा-
'लयाच्या उच्च शिखरापासून कन्याकुमारीपर्यंतचे टोंकांपर्यंत आपल्या देशांत
'हजारों वनस्पति आहेत. या वनस्पतींचा औषधांचे कामींहि चांगला उपयोग
'झाला आहे. ज्योतिष व वैद्यक ह्या दोन्हीहि विद्या अनुभवप्रमाण असल्यानें
'ह्या दोन्हीहि शास्त्रांत म्लेंच्छांपासून आम्हीं आजपर्यंत पुष्कळ गोष्टी घेतल्या
'आहेत. पण परकीय शास्त्रांचा विचार करीत असतांना ही गोष्ट लक्षांत ठेविली
'पाहिजे कीं, परकीय शास्त्रास स्वशास्त्राचें पूरक म्हणून घ्यावयाचें, स्वशास्त्राचें
'ऐवजीं नव्हे. आर्य औषधें लोकांच्या विशेषतः इंग्रजांच्या अनुभवास आणवून
'हळू हळू मेडिकल कॉलेजच्या शिक्षणक्रमापर्यंत त्यांचा प्रवेश करवून आमच्या
'मात्रा, काढे, भस्में पुनश्च प्रचारांत आणण्याचें श्रेय एतद्देशीय डॉक्टरांनीं
'घ्यावें. (२८-२-८८).

कै. भाटवडेकर यांचीं हेमंतव्याख्यानमालेंत आर्यवैद्यक व पाश्चात्य वैद्यक यांवर सहा उत्कृष्ट व्याख्यानें झालीं. व्याख्यानाचे शेवटीं अध्यक्ष डॉ. भालचंद्र म्हणाले कीं, 'अनेक शोध लागून आजचें इंग्रजी वैद्यक जरी वर्धिष्णु आणि स्पृहणीय झालें 'असलें तरी पण आमच्या कर्तबगार पूर्वजांनीं आजपर्यंत जोपासिलेलें आर्यवैद्यकहि 'त्या पूर्वजांचे आम्हीं वंशजांनीं अवश्यमेव रक्षिलें पाहिजे, व त्याकरितां उभय वैद्यकें 'शिकविणारी साधनसंपन्न शाळाहि सुरूं केली पाहिजे.' आक्टोबर १८८८चे एका अंकांत डॉ. ग. कृ. गर्दे व वैद्य चिपळोणकर यांची त्रिदोषवाद व आर्यांग्ल वैद्य शाळा यांबद्दल साधकबाधक पत्रें प्रसिद्ध झालीं असून शेवटीं त्या पत्रांत डॉ. गर्दे म्हणतातः या नमुनेदार आर्यांग्ल शाळेमध्यें जरूर तेवढें पाश्चिमात्य वैद्यक व सर्व आयुर्वेद शिकवावा. १९-१-१८९२ चा स्फुट लेखः––रक्तपितीचें चौकशी-कमिशन, मुद्देः––( १ ) हा रोग स्पर्शजन्य असल्यानें फार भयंकर आहे असें म्हणणें अतिशयोक्तीचें आहे. ( २ ) भटकणाऱ्या रोग्यास बळजबरीनें एकेजागीं कायदा करून ठेवावें. ( ३ ) आणि या रोग्यास तरतमभावानें औषधोपचार करावेत. या निकालावर केसरीचें म्हणणें––हा निकाल आमच्या वैद्यकास अगदीं विरुद्ध आहे. आमच्या इकडील वैद्यांनीं हा विषय हातीं धरून इकडचें वैद्यकच खरें आहे अशाबद्दल जोराचा प्रयत्न करावा, तरच त्यांचें नांव राहून लोकांचेंहि कल्याण होईल. 'आर्यवैद्यकाचें पुनरुज्जीवन' हा लेख मुंबई एथें डॉ. पोपट यांनीं आयुर्वेदिक कॉलेज सुरूं केलें व पनवेल एथील श्री. विष्णु-शास्त्री पुराणिक यांनीं आपल्या कारखान्याचा उत्सर्ग केला यावर अभिनंदन-पर आला आहे. ( अंक १८ सन १८९६ ). त्यांत म्हटलें आहे कीं

आमचें जुने वैद्यक अद्यापहि अत्यंत उपयुक्त व कार्यक्षम आहे. आणि तें आपल्या देशास व राहाणीस सोईचें असल्यानें तें बुडूं न देण्याबद्दल होईल तेवढी खटपट करणें हें आमचें पवित्र कर्तव्य आहे. ग्रीन इलेक्ट्रिसिटी कपाळावर लावल्यानें तेथील दुःख राहतें हें खरें, आणि एखादी सहदेवीसारखी वनस्पति कपाळावर बांधली असतां ताप जातो असें जुन्या वैद्यकांत सांगितलें असल्यास तें मात्र अविश्वसनीय अशी मनाची क्षुद्रवृत्ति ठेऊन उपयोगाची नाहीं. डॉक्टरांची परावलंबी स्थिति असल्यानें मुंबईच्या डॉ. देशमूख, भाटवडेकरप्रभृति डॉक्टरांनीं व तत्कालीन प्रमुख वैद्यांनीं आर्य व आंग्ल वैद्यकांचें संयुक्त शिक्षण देणारें एक महाविद्यालय लौकरच सुरू करावें. लोकांचे आरोग्याची व जिवितांशीं विशेष संबंध असलेल्या वैद्यकीसारख्या शास्त्राचें सांगोपांग अध्ययन केल्यावांचून हा धंदा करूं लागणें निंद्यच नव्हे तर अपायकारकहि आहे, ( १९-७-१० ) असें केसरीचें मत आहे. पण मेडिकल रजिस्ट्रेशन कायद्यासंबंधीं केसरी म्हणतो मुंबईच्या डॉक्टर मंडळींनीं जो मेडिकल रजिस्ट्रेशनचा कायदा मागितला आहे तो जर फक्त इंग्रजी वैद्यकापुरताच असता तर या कायद्याविरुद्ध कोणासच तक्रार करण्याचें कारण नव्हतें. परंतु सर्वच डॉक्टरांस या कायद्याचा फायदा द्यावयाचा आणि वैद्य व हकीम यांवर हत्यार उपसावयाचें असें या कायद्याचे भावी धोरण असल्यानें त्याविरुद्ध प्रचंड चळवळ व्हावी यांत नवल नाहीं. या कायद्याविरुद्ध आयुर्वेदिक व युनानी मेडिकल संस्थेनें एक मुद्देसूद अर्ज मुंबई सरकारकडे केला आहे हें योग्यच आहे. विशेष महत्त्वाची गोष्ट कीं एकंदर जनसमूह अद्याप आपल्या स्वदेशी वैद्यकपद्धतीसच धर्माच्या व सत्त्वाच्या अभिमानानें चिकटून राहिला आहे. ह्यास रजिस्ट्रेशनच्या कायद्याच्या अप्रत्यक्ष दडपणानें इंग्रजी वैद्यकाकडे एका प्रकारच्या जबरदस्तीनें हांकून नेणें अपायकारक आहे. जन्ममृत्यूचें सर्टिफिकेट नोंदलेल्या डॉक्टरांचेंच तेवढें चालावें व औषधोपचार वगैरेंची फी रोग्यांकडून वसूल करून कोर्टानें द्यावी, असे घातुक नियम कायद्यांत घातल्यानें वैद्य, हकीम व सामान्य लोक यांचे हक्क व स्वातंत्र्य यास मोठा धक्का येऊन आयुर्वेदिक वैद्यकाचा विनाकारण उममर्द केल्याचा दोष सरकारकडे येणार आहे. ( क्रित्ता ).

भारतीय रसायनशास्त्रांत गंधकाम्ल ( Sulphuric Acid ) या विषयावरील लेखांत वैद्यराज काळे म्हणतात, रुद्रयामलांतील वचनावरून प्राचीन भारतीय आर्यांस Mineral, Vegetable, Nitric and Sulphuric वगैरे Acids ( अम्लें ) कशीं तयार करावींत त्यासंबंधीं सुसूत्र साधार अशी माहिती होती. ह्या सर्व अम्लांचा शोधक जो रसार्णव नांवाचा ग्रंथ त्याचा काल इ. स. पू. दुसऱ्या शतकांत ठरविला आहे. ( के. १४-११-११ ). डॉक्टरनोंदणीचे बिलासंबंधीं केसरी लिहितो—लोकमत प्रतिकूल असतांनाहि वाटेल तें बिल पास करण्याचा

अधिकार सरकारचे हातीं असल्यानें सदर बिल ते पास करोत. परंतु ते लोकांना पसंत नाहीं. ही गोष्ट कायदेमंडळांतील वादविवादावरून सिद्ध झालेली आहे. सरकारची नोंदणी म्हणजे वैद्यककलेचें रामबाण संमतिपत्रक असें लोक मानतील अशी सरकारची अपेक्षा असेल तर ती चुकीची आहे. डॉक्टर किंवा वैद्य यांची प्रसिद्धि त्यांच्या पाट्यावर किंवा पदव्यावर नसते. ती त्याजपासून गुण येण्याच्या त्यांच्या गुणावर असते. नव्या वैद्यकाबरोबर जुन्या वैद्यकाच्या परीक्षा घेण्याची व शिक्षण देण्याची कांहींतरी व्यवस्था सरकारनें केली असती तर फक्त वैद्यशास्त्रास उत्तेजन देण्याचा त्यांचा उद्देश आहे असें आम्हांस म्हणतां आलें असतें. (२८-११ ११). सरकारचे मनांत विद्यमान देशी वैद्यकाबद्दल आदर तर नाहींच पण त्या वैद्यकांत आज जो कांहीं थोडाबहुत गुण असेल तो वाढावा अशा प्रकारें उत्तेजन देण्याची देखील सरकारला खरी इच्छा नाहीं. परंपराप्रिय हिंदु लोक लॉर्ड लीस्टर यांस वैदू म्हणण्याइतके मूर्ख खास नाहींत. पण हल्लींचा कायदा मंजूर झाला म्हणजे, हिंदी लोकांचे अश्विनीकुमार किंवा धन्वंतरी आज प्रत्यक्ष अवतरले तरी सरकारचे कृपाप्रसादानें पुनीत व प्राणप्रतिष्ठा झालेल्या डॉक्टरांचे मालिकेंत त्यांची नोंदणी होणें हें मात्र सर्वस्वी अशक्य आहे. ( १९-३-१२ ). सोलापूर एथील आयुर्वेदाश्रम संस्थेचे चालक भि. र. ग. कृ. पाटणकर यांनीं आपल्या कारखान्यांत तयार केलेली रसायनक्रियेची व वैद्योपयोगी कांहीं यंत्रें व भांडीं पुण्यास स्नेही मंडळीस दाखविण्यास आणिलीं होतीं. सदरच्या यंत्रावरून रा. पाटणकर यांची योजकबुद्धि व कल्पनाशक्ति चांगली असून त्यांची कृति फार उपयोगी आहे, असें उघड दिसतें. नवीन होणारे कायद्याचे तोंडांत मारून जुनें वैद्यक आपल्या अंगचे खरे गुण दाखवून आपलें तेज पाडल्याखेरीज राहाणार नाहीं, ( १३-४-१९१२ ) असें केसरीनें म्हटलें. एक आयुर्वेदप्रेमी गृहस्थ मोठ्या कळकळीनें असें सुचवितात कीं, ज्याप्रमाणें, सर्जन डिमक, बार्डन, हूपर, वॉट्, शेरीफ्, दत्त, सखाराम अर्जुन, खोरी, नाडकर्णी, वेरिंग, किर्तीकर, बसूप्रभृति आयंग्ल डॉक्टरांनीं आयुर्वेदीय वनौषधीशास्त्रावर कोश रचिले. त्या सर्व संस्कृत, प्राकृत व इंग्रजी द्रव्यगुणकोशांचे एके ठिकाणीं समालोचन होऊन या सर्व ग्रंथांचा सारभूत असा एक मोठा द्रव्यगुणकोश मराठींत होणें जरूर आहे.

**आयुर्वेदाचें महत्त्व**—वैद्यराज अप्पाशास्त्री साठे यांचें व्याख्यान. ( के. १६-४-१९१२) जुनी वैद्यकाची परंपरा काशी येथें कायम आहे. तेथें वैद्यकाचें ज्ञान सूत्ररूपानें दिलें आहे, व प्रत्येक वैद्याला लघुत्रयी, गुरुत्रयी, मध्यत्रयी व संग्रहत्रयी असे बारा ग्रंथ शिकावे लागतात. वालुकाप्रभृति यंत्राच्या भट्ट्या उत्तम कार्यक्षम आहेत. रुधिराभिसरण हें सुश्रुतासच प्रथम माहीत होतें. सन १६८० नंतर इंग्रजी वैद्यकास रुधिराभिसरणाचा शोध लागला. सतराव्या

शतकापर्यंत आमच्या वैद्यकीय ज्ञानांत जर सारखी भर घातली जात होती तर पुढें आमची प्रगति आम्ही करणार नाहीं कशावरून ?

अप्पाशास्त्री साठे यांचें रुधिराभिसरण या विषयावर व्याख्यान. (२-६ १९१४). Harvey साहेबांनीं सुश्रुताच्या कांहीं अध्यायांचें भाषांतर केलें आहे. पण शोणितवर्णनीय अध्यायाचें भाषांतर करितांना मोठी टीप देऊन अनुधावतः हा शब्द कोणीतरी मागाहून प्रक्षिप्त केला आहे असें म्हटलें आहे. कारण काय ? तर या विशेष शब्दावरून Harvey साहेबांच्या पूर्वी रुधिराभिसरण होतें असें मानावें लागेल, पण याच अध्यायांत अनुधावतः हा शब्द तीन वेळां आला आहे ह्याची वाट काय ? आरोग्याबद्दल सरकारी ठरावः—सरकार देशी औषधांचें शिक्षण किंवा देशी औषधांची तपासणी ह्याविषयीं कांहींच पुरवठा करीत नाहीं. त्याचप्रमाणें कोणतीहि उपाययोजना करण्यापूर्वी डॉक्टरांस एथल्या परिस्थितीचें व समाजाचें ज्ञान अवश्य पाहिजे असें सरकारच म्हणतें. परंतु आरोग्य खात्यांतील वरिष्ठ तर राहोच पण दुय्यम प्रतीच्या जागेवर देखील विलायती पदवीधर नेमून टाकतें. (२-६-१९१४).

जुन्या वैद्यक ज्ञानाला प्रयोग—ज्ञानाची जोड देऊन शुद्ध करणें आवश्यक आहे. दगडी इमारतींत जुने नवे अशी मिसळ खपत नसेल. पण विद्या व संस्कृति यांची इमारत नव्याजुन्या मिसळीनेंच बनलेली असतें हें सरकारनें ध्यानांत ठेविलें पाहिजे. सरकारनें आर्यवैद्यकाची एखादी शाळा चालू ठेविली किंवा दुसऱ्यानें काढलेल्या शाळांस मदत दिली व परीक्षा घेतल्या तर आंग्ल वैद्यकाच्या मोटारचे बरोबरीनें आर्यवैद्यकाचा गाडा धांवू न शकला तरी तो चालत मात्र खास राहील. (के. २८-८-१५).

के. ७-११-१६यांत सुप्रसिद्ध वैद्य प्राणाचार्य बाळशास्त्री लागवणकर यांच्या शोचनीय निधनाबद्दल मृत्युलेख आला आहे. लागवणकर यांच्या वंशामध्यें आज अकरा पिढ्यांपर्यंत अव्याहत आयुर्वेद विद्येचा अखंड झरा वाहात असून त्या झऱ्यांतील ज्ञानोदक मोठ्या कुशलतेनें आपल्या शिष्यवर्गामध्यें पसरून देऊन आयुर्वेद विद्येच्या उद्धाराची बहुमोल कामगिरी शास्त्रीबुवांनीं बजाविली आहे. असें गौरवपर लिहिलें आहे. राजमहेंद्री १३ वें नि. भा. वैद्यसंमेलन अध्यक्षः—वै. पं. कृष्णशास्त्री कवडे. याबद्दल केसरी असें म्हणतोः—पाश्चात्य 'सरकार, आंग्लवैद्यकाभिमानी डॉक्टर व सामान्य जनता यांचा दुर्ग्रह 'झालेला असे तो या संमेलनाचे बारा वर्षांचे तपश्चर्येनें दूर करून देशी वैद्यकाकडे 'राष्ट्राचें लक्ष वेधविल्याबद्दल हें संमेलन प्रशंसेस पात्र आहे.' (९-१-१९२३). धुळ्याच्या देशी दवाखान्यावर लिहितांना—दवाखान्यांचे कामांत सरकारनें नसती विघ्नें उत्पन्न केलीं याबद्दल उद्वेग व्यक्त करून मुंबई इलाख्यांतील इतर म्यु. कमेट्या असाच देशी औषधालयांचा फायदा जनतेस करून देतील अशी आशा केसरीनें व्यक्त

केली आहे. सरकार व देशी वैद्यक यांसंबंधीं केसरी म्हणतो, आपल्या देशांतील भाईबंदांची थोडी सोय लावतां याची हा मनोदय असल्यावर हिंदुस्थानांतील मानव जातीच्या कल्याणाचें ढोंग पुढें करून केवळ पाश्चात्य पद्धतीची नव्हे पण पाश्चात्य देशांतून तयार झालेलीं औषधें घेण्याबद्दल एथील सरकारनें आग्रह धरावा यांत नवल नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांनीं हें सुचवावें व हिंदी लोकांनीं पूर्वीचें वैद्यशास्त्र आहे हें विसरून जाऊन नंतर राज्यकर्त्यांनीं ते कायदे मंजूर करावेत व त्यांचे जोरावर हिंदी लोकांचें जगणेंहि परावलंबी करावें व यांतच हिंदुस्थान देशाचें आम्ही कल्याण करितों असें म्हणावें हें ढोंग परकीय सत्तेलाच शोभतें. ( २७-५-१९२४ ). पुणें म्यु. कमिटीनें नेट धरून आयुर्वेदाचा दवाखाना तीस वर्षेपर्यंत कायम केलाच आहे, आणि यापुढें कमेटीनें एक पाऊल पुढें टाकून शहरांतील निम्मे दवाखाने आयुर्वेदीय पद्धतीचे व निम्मे इंग्रजी पद्धतीचे काढावेत असा ठराव एकमतानें मंजूर करून आपली स्वाभिमानबुद्धि व्यक्त केली. ( २-१२-१९२४ ). खेड्यांतील शाळा-मास्तरांना परदेशी औषधांचे एजंट बनवून देशी वैद्यकाला खो देण्याचा प्रयत्न एथें सुरू आहे. महिन्या दोन महिन्यांत तयार केलेला प्रथमोपचारक सरकारास चालेल पण तज्ज्ञ देशी वैद्य चालणार नाहीं इतकें सरकारास देशी वैद्यक वावडें आहे. ( २६-८-१९२४ ).

पुणें येथील शेठ ताराचंद रामनाथ या टिळक महाविद्यालयानें चालविलेल्या आयुर्वेदिक रुग्णालयाचा केसरीनें सर्वदा आत्मीयत्वानें पुरस्कार केला आहे.

---

## अवतरणरूप सुभाषितें

[ श्री. मुकुंद गणेश मिरजकरशास्त्री ]

केसरीला मिळालेला आजपर्यंतचा संपादक वर्ग विद्वान् व रसिक असल्यामुळें त्यानें केलेली अवतरणयोजना वाचकांस आनंददायकच झाली आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं निबंधमालेंत दिलेलीं अनेक सुभाषितरूप अवतरणें प्रसिद्धच आहेत. त्यानंतर शास्त्रीबुवांच्या सहकारी मंडळीनें केसरी पत्रालाहि या अवतरणांचा तोटा केव्हांहि पाडलेला नाहीं. इतकेंच नव्हे, तर आज पन्नास वर्षांत निघालेल्या मासिक पुस्तकांत व वर्तमानपत्रांत केसरींतील सुभाषितें जितकीं वाचकांच्या नित्य पाठांत बसलीं आहेत तितकीं इतर कोणत्याही मासिकाचीं किंवा वृत्तपत्रांचीं बसलेलीं नाहींत हें निःसंशय होय.

निबंधमालेंतील अवतरणरूप व स्वतंत्र सुभाषितें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं आहेत. त्याप्रमाणें केसरींतील अवतरणांकित सुभाषितें कोणीं प्रसिद्ध केल्यास त्यानें महाराष्ट्र वाचकांचा मोठा फायदा होणार आहे. आमच्या मतें केसरीच्या पन्नास वर्षांच्या अंकांतून अशीं सुभाषितें निवडूं गेल्यास तीं हजार दीड हजार तर सहज भरतील व हा नव्या पिढीला व होतकरू लेखकांना नवा ठेवाच मिळाला असें वाटेल.

केसरींतील अवतरणांसंबंधीं दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं हीं अवतरणें केवळ सामान्य जनांच्या परिपाठांत असलेल्या काव्यनाटकांतील नसून वेदापासून आजतागायतच्या सर्व निरनिराळ्या ग्रंथांतील नानाविध विषयांवरील आहेत. वेद, उपनिषदें, स्मृति, महाभारत, वेदांत ग्रंथ, काव्यें, नाटकें या सर्वांतील उतारे यांत समाविष्ट झाले असून ज्ञानेश्वरांपासून आजतागायतच्या कवींचेहि उतारे यांत आलेले आहेत. यामुळें त्यांस विविधता प्राप्त झालेली असून आबालवृद्धांस त्यांपासून ज्ञान व आनंद मिळत आहे.

केसरीच्या अवतरणांतील आणखी एक विशेष असा आहे कीं, मूळ सुभाषितांतील एकाद्या शब्दांत पाठभेद करून तें आजच्या स्थितीला तंतोतंत लागू करणें. कित्येकांच्या मतें असे पाठभेद करणें योग्य नसतें. कारण त्यामुळें मूळ ग्रंथकाराचा पाठ बाजूला राहून हाच पाठ परिपाठांत पडतो व एक प्रकारें त्या ग्रंथकारास कमीपणा येतो. पण आम्हांला यामुळें कांहीं नुकसान आहे असें वाटत नाहीं. क्षणभर आपल्या सोईकरितां एकादा शब्द बदलून विवक्षित अर्थ सजविल्यास मूळ ग्रंथाचा अपमान होत नसून उलट गौरवच होतो. मूळ पाठ वाचकांस माहीत असतातच. उदाहरणार्थ—

यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः । या ठिकाणीं
यस्यास्ति सत्ता स नरः कुलीनः ।

असा केसरीकारांनीं पाठभेद केला आहे (२०-४-१९२०) व त्यामुळें आपल्या राज्यकर्त्यांस हा चरण किती बेमालूम लागू होत आहे हें कोणासहि सहज कळेल. अर्थात् अशा स्थळीं आपल्या सोईकरितां हें पाठांतर केलेलें असतें, व या कामीं केसरीचे संपादक वाकबगार आहेत एवढेंच आम्हांस दाखवावयाचें आहे.*

---

* प्रिन्सिपल आगरकरांनीं 'डोंगरीच्या किल्ल्यांतील १०१ दिवस' या पुस्तकांत म्हटलें आहे कीं—

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वदे परमानंदमाधवम् ॥ १ ॥

या पद्यांत 'माधवा'च्या ठिकाणीं 'रूपक' असें पाठांतर केलें असतां पैशाच्या

आतां केसरीच्या लेखांतील कांहीं अवतरणें खुलाशासह येथें देतों.

( १ ) प्रथम केसरीच्या मथळ्यावर सतत विराजमान असणारा--

स्थितिं नो रे दध्याः क्षणमपि मदांधेक्षण सखे ।

हाच श्लोक पहा. एका ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, 'कवितेचा ध्वनि हा कवितेच्या अर्थाचा प्रतिध्वनि असावा'. हें वाक्य प्रस्तुत उताऱ्याला पूर्णपणें कसें लागू पडत आहे! शिखरिणीवृत्त वीररसाचें अत्यंत परिपोषक आहे. कवितेंत 'क्ष' सारख्या कठोर व्यंजनाची आवृत्ति झाल्यानें व वारंवार आघात-युक्त उच्चार होत असल्यानें मूळ रसाचा उत्कर्ष होत आहे. सामासिक दीर्घ पदांनीं ओजोगुण प्रतीत होत आहे. ('ओजः समासबाहुल्यम्') गजश्रेणीनाथ, मदान्धेक्षण इत्यादि विशेषणांनीं प्रतिपक्षी फार मोठा आहे पण केसरी एकदां जागा झाल्यावर त्याला 'पळतां भुई थोडी' करून टाकील हा अर्थ सूचित होत आहे.

( २ ) 'राज्य करणें म्हणजे सूड उगवणें नव्हे.' या लेखांत (१३-७-१८९७). आपले राज्यकर्ते सध्यां कसे मदांध झाले आहेत हें दाखवितांना पुढील श्रीमद्भगवद्गीतेंतील अवतरण आलें आहे.

ईश्वरोमहंभोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी ।
आढ्योऽभिजनवानस्मि कोन्योऽस्ति सदृशो मया ।

( ३ ) पुण्यांतील 'काळा'वर ('काळ'पत्रावर) मुंबईच्या काळानें (टाईम्सनें) 'हें पत्र हल्लीं राजद्रोही व उच्छृंखल होत चाललें आहे' अशी टीका केली. तेव्हां

शशी दिवसधूसरो गलितयौवना कामिनी ।
सरो विगतवारिजं मुखमनक्षरं स्वाकृतेः ॥
प्रभुर्धनपरायणः सततदुर्गतः सज्जनो ।
नृपांगणगतः खलो मनसि सप्तशल्यानि मे ॥ १ ॥

हें अवतरण देऊन केसरीकार म्हणतात कीं—

'या सात शल्यांपैकीं पहिलीं सहा सयुक्तिक आहेत. परंतु सर्वांच्या शेवटीं 'राजाच्या अंगणांत दृष्टीस पडणाऱ्या खलाचा जो निर्देश केला आहे त्यांतील 'रहस्य काय हें एकाएकीं लक्षांत येण्यासारखें नाहीं. जन्मतःच जे 'अकारणा-'विष्कृतवैरदारुण' आहेत त्या खलांस पाहून कोणाचेंहि मन संतप्त झाल्या-'वांचून राहणार नाहीं. पण हेच खल जेव्हां राजाच्या अंगणांत किंवा हल्लींच्या

---

सामर्थ्याचें खरें वर्णन होणार आहे. अथवा असलें पाठांतर करण्याचीहि जरूर नाहीं. कारण माधव हा लक्ष्मीपति आहे तेव्हां माधव याचाच अर्थ रुपया असा केला म्हणजे झालें!

' परिभाषेत बोलावयाचें असल्यास गव्हर्नरसाहेबांच्या गार्डन पार्टीत किंवा दर-
' बारांत दृष्टीस पडतात तेव्हां मात्र सज्जनांच्या पायाची आग मस्तकास गेल्या-
' खेरीज राहात नाहीं.' (२७-९-१९०४)

(४) नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ १ ॥

(के. ५-९-१९०५).

या भगवद्गीतेंतील (अ. २ श्लो. ४०) श्लोकाचें अवतरण देऊन केसरीकार म्हणतात कीं-' राष्ट्रांतील लोकांनीं देशी माल वापरण्याचा निश्चय केला तर शिरो-
' भागीं लिहिलेल्या वचनाप्रमाणें या धर्माचें जितकें जितकें अधिकाधिक आचरण
' होईल—मग दर वेळेस तें थोडें कां होईना तितकें तें देशास कल्याणकारकच
' होऊन अखेरीस आपले इष्ट हेतु तडीस जातील. हा योग श्रेयस्कर आहे, शक्य
' आहे, निरपवाद आहे. आणि ' नहि कल्याणकृत्कश्चिदुर्गतिं तात गच्छति ' या
' भगवद्वचनाप्रमाणें (गीता ६-४०) या योगाचा अभ्यास करणारांस कधींहि
' दुर्गति प्राप्त व्हावयाची नाहीं. थोडें जरी याप्रमाणें त्यांच्या हातून आचरण घडलें
' तरी तें परमेश्वरकृपेनें कल्याणप्रदच होईल अशी आमची खात्री आहे.

(५) (केसरी २४-१०-१९०५) ' मनूनें बायकाबद्दल लिहितांना एके
' ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं—

' पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
' पुत्रास्तु स्थाविरे भावे न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥ १॥

' लॉर्ड कर्झन किंवा प्रि. सेल्वी हे जी आम्हांस कदर लावून देत आहेत ती
' अशाच प्रकारची आहे. शाळेंतील मुलांनीं विद्यार्थी म्हणून राजकीय चळवळींत
' पडूं नये, मोठ्यांनीं राजाचे नोकर म्हणून पडूं नये आणि म्हाताऱ्यांनीं पेन्शवर
' म्हणून पडूं नये.

बाल्ये राजगुरुर्यन्ता यौवने भृतिदो नृपः ।
तथा पेन्शनदाता च न हिन्दुः प्रभुरात्मनः ॥ १ ॥

केसरीकार श्लोकावरून प्रतिश्लोक रचण्यांत कसे निष्णात असत हें यावरून लक्षांत येईल.

(६) मूळ श्लोकांतील पदें बदलून विपरीत अर्थ दर्शविणारा श्लोक पाहा (२८-११-१९०५).

परित्राणाय दुष्टानां सुकृतां नाशनाय च ॥ सरकारचा अवतार आहे.

(७) कॉंग्रेसचीं मतें नेहमीं नेमस्तच काय म्हणून असावीं? त्यांत कधीं सुधारणा होऊं नयेच कीं काय? असे विचार प्रकट करीत असतां केसरीकार म्हणतात--(२७-८-१९०७) ' मिरच्या तिखट, सोनामुखी रेचक, ऊंस

गोड, वाटाणा वातुळ आणि आलेलिंबाचा रस पित्तशामक असतो. इत्यादि सदर पदार्थांचे गुणदोष सुश्रुत-वाग्भटादि ग्रंथांतून ज्याप्रमाणें दिले आहेत तद्वत्--

काँग्रेसो वातुलः स्निग्धः शीतलो मधुरस्तथा ॥

अशी राष्ट्रीय सभेच्या गुणदोषांची मीमांसा कोणच्याहि राजकीय ' एम्. डी.' च्या किंवा प्राणाचार्यांच्या राजवैद्य ग्रंथांत केलेली आम्हांस आढळली नाहीं.

( ८ ) हल्लींच्या लोकांची आयुष्यमर्यादा कमी असते व पूर्वकालीं ती अधिक होती असें प्रतिपादीत असतां केसरीकार पुढील श्लोक उध्दृत करतात. ( २७-२-१८९४ ).

आकर्णपलितः श्यामः वयसाशीतिपंचकः ।
रणे पर्यचरद्द्रोणो वृद्धः षोडशवर्षवत् ॥ १ ॥

( ९ ) १९१९ सालीं सोलापूरच्या प्रांतिकसभेंत बेझंटबाईचा बहुमतानें पराभव झाला त्यावेळीं केसरीकार म्हणतात ( १३-४-१९२० ).

पूतना हरिवधार्थं मायया प्राप तत्र वधमेव चात्मनः ॥

( १० ) कायदे कौन्सिलांत लोकांनीं निवडून दिलेले प्रतिनिधि विद्वान्, बोलके व अधिकारसंपन्न असले तरी भित्रेपणामुळें त्यास सरकारच्या विरुद्ध जाववत नाहीं असें प्रतिपादीत असतां केसरीकार पुढील उदाहरण देतात-- ( १०-१-१८९३ )

शूरोऽसि कृतविद्योऽसि दर्शनीयोऽसि पुत्रक ।
यस्मिन् कुले त्वमुत्पन्नो गजस्तत्र न हन्यते ॥ १ ॥

( ११ ) नामदार गोखले वयाच्या अवघ्या ४९व्या वर्षीं परलोकवासी झाले. पण त्यांनीं केलेलें देशकार्य बहुमोल आहे हें दाखवीत असतां केसरीकारांनीं महाभारतांतील पुढील अवतरण दिलें आहे. ( २३ फेब्रुवारी १९१५ )

मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं चिरम् ॥

( १२ ) मुसलमान लोक दंगे करून आपल्या अंगावर चवताळून येतात तेव्हां अशा आततायी पुरुषांस योग्य शासन करणें हें आपलें कर्तव्य आहे असें दाखवीत असतां केसरीकार ' जुना शास्त्रार्थ ' देतात तो असा--( केसरी २२-८-१८९३)

गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् ।
आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन् ॥ १ ॥

गुरूची व बहुश्रुत ब्राह्मणाची जर ही दशा तर मग देखत ऐकत परधर्मी उन्मत्त लोकांची काय पर्वा ?

( १३ ) लोकांनीं भरविलेल्या सभा उधळून लावणें किंवा त्यांनीं केलेले अर्ज केराच्या टोपलींत टाकणें असलेच उपाय फार तर सरकारास करतां येतील, पण त्यांच्या अंतःकरणांत जाग्रत झालेली देशाभिमानाची ज्योत त्यास केव्हांहि

विज्ञवितां येणार नाहीं असें दर्शवीत असतां केसरीकार म्हणतात—( के. २३-३-१८९७ )

अंभोजिनीवननिवासविलासमेव ।
हंसस्य हन्ति नितरां कुपितो विधाता ॥
नत्वस्य दुग्धजलभेदविधौ प्रसिद्धां ।
वैदग्ध्यकीर्तिमपहर्तुमसौ समर्थः ॥ १ ॥

( १४ ) हिंदुस्थानांतील नोकरशाहीच्या बेजबाबदार वर्तनाला आळा घालणारे लोक विलायतेंत क्वचित् आहेत, पण त्यांचा आम्हांस काय उपयोग ? आम्ही एकीकडे राहणार व ते भलतीकडे असणार. आमचें गाऱ्हाणें त्यांच्या कानावर कसें पोंचणार ? असें प्रतिपादीत असतां केसरीकार म्हणतात–( के. २९-११-०४ )

हिमवति दिव्यौषधयः शीर्षे सर्पः समाविष्टः ॥

( १५ ) 'लोकमान्यांचें विश्वरूपदर्शन ' या लेखांत ( ४-८-२५ ). 'लोकमान्यांच्या आख्यायिका व आठवणी ' या ग्रंथावर अभिप्राय देतांना केसरीकार म्हणतात–' आठवणींच्या पुस्तकांत लोकमान्यांचें जें व्यापक दर्शन होतें तसें इतर ' पुस्तकांत लाभणें शक्य नाहीं. निरनिराळ्या परिस्थितींत व प्रसंगांत लोकमान्यांचें ' श्रेष्ठत्व प्रकट झालेलें या पुस्तकांतून वाचून—

'नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते । नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ॥' अध्याय ११. अशा तऱ्हेचा लोकमान्यांविषयीं पूज्यभाव उत्पन्न होतो.

( १६ ) ' शिवछत्रपतींचें पुण्यस्मरण ' या लेखांत भूषण कवीचें पुढील हिंदी पद्य उद्धृत केलें आहे !

रावण के राम कार्तवीज के परशुराम ।
दिल्लीपतिदिग्गजके सेर सिवराज ॥ १ ॥ १८-५-२७.

( १७ ) ' बेसिल-कन्येचें रूप व शील ' या अग्रलेखांत पुढील सुभाषित देऊन केसरीकार म्हणतात–( २५-१-२७ )

सुवर्णालंकृता कन्या हेमालंकारवर्जिता ।
सा कन्या विधवा जाता गृहेरोदिति तत्पतिः ॥ १ ॥

' कारण या बिलानें सुवर्णाचें कागदी चिटोरें हातांत येणार आणि खरें ' हेम ' ' वर्ज्यच राहणार. ही कन्या जरी बेसिलसाहेबांनीं हिंदी राष्ट्रपुरुषाच्या गळ्यांत ' बांधली तरी तिजपासून इंग्लंड, अमेरिका, जपान इत्यादिकांचा फायदा. स्वदेशी ' धंदे बुडणार. खरे मालक हिंदी कारखानदार व शेतकरी यांस रडावयाचीच ' पाळी येणार. '

( १८ ) ' सत्याग्रहाच्या युद्धाचा रणदुंदुभि वाजूं लागला.' या लेखांत—

राजन्योपनिमंत्रणाय रसति स्फीतो यशोदुंदुभिः ॥

हें वेणीसंहार नाटकांतील अवतरण देऊन म. गांधींच्या चळवळीचें भीषण-

स्वरूप केसरीकारांनीं उत्तम रीतीनें वाचकांच्या डोळ्यांसमोर उभें केलें आहे. ( ११-३-३० ).

( १९ ) 'इंपीरिअल कॉन्फरन्स ऊर्फ साम्राज्यपरिषद' या लेखांत महाभारतांतील पुढील अवतरण देऊन केसरीकार म्हणतात—

प्रस्कंदेन प्रतिस्तब्धः छिन्नमूल इव द्रुमः ॥

'एकादा जुनाट वृक्ष असावा त्याचीं दूरवर पसरलेलीं मुळें कुजून तुटून 'गेलेलीं असावीं तथापि सभोंवार रचिलेल्या चिरेबंदी पाराच्या आधारावर उभें 'राहावें तशी आमच्या इंग्रजी राज्याची स्थिति झाली आहे.'(११-१०-३०).

मुंबई प्रांतिक युद्धपरिषदेंत लॉर्ड विलिंग्डन यांच्या अध्यक्षतेखालीं लो. टिळक भाषण करीत असतां लोकमान्यांना हवें तें अध्यक्षांनीं बोलूं दिलें नाहीं. तेव्हां लोकमान्य तसेच सभागृह सोडून आले. यावर केसरीनें 'लॉर्ड विलिंग्डन यांचा अत्याचार' असा लेख लिहून—

मय्यप्यास्था न ते चेत् त्वयि मम सुतरां
एव राजन् गतोऽस्मि ॥

असें भर्तृहरीचें अवतरण घातलें ( १८-६-१८ ).

---

# प्रचलित शिक्षण-पद्धति

[ श्री. माधव तुकाराम ठाकूर, बी. ए. ]

वास्तविक पाहतां या देशांत पाश्चिमात्य शिक्षण ज्यांनीं प्रथम सुरू केलें त्यांचें असें मत होतें कीं या 'उदार शिक्षणानें लोकांचीं मनें सुसंस्कृत होऊन लोक अधिक हक्क मागावयास लागले तर तो आम्ही सुदिन समजूं' पण पुढें येणाऱ्या लॉर्ड कर्झनप्रभृति मुत्सद्द्यांना ही गोष्ट कळून चुकली कीं 'या पाश्चिमात्य शिक्षणामुळें 'हिंदुस्थानांतील वर्गाचीं डोकीं भणाणून जाऊन स्वतंत्रतेच्या किंवा राष्ट्रीय हिताच्या 'अगर चळवळीच्या अनेक कल्पना त्यांच्या मनांत येतील' व हें भलतेंच अरिष्ट आपणांवर येईल म्हणून त्यांनीं 'ही इंग्रजी विद्या म्हणजे वाघिणीचें दूध असतां हें दूध पाणचट कसें बनवितां येईल व त्यायोगें येथील प्रजा हिणकस व निःसत्त्व 'कशी करतां येईल' याचे उपाय सुरू केले. याची कारणमीमांसा केसरीनें अशी केली, 'हिंदुस्थानांतील लोक पाश्चात्य विद्येंत शास्त्रांत किंवा कलांत निपुण होऊन 'त्यांनीं सुधारलेल्या राष्ट्रांतील विद्वानांबरोबर, धंदेवाल्याबरोबर किंवा व्यापाऱ्या-

'बरोबर आपल्या बुद्धिवैभवानें करामतीनें, कौशल्यानें, किंवा हिंमतीनें, टक्कर 'देण्यास तयार व्हावे, अशी आमच्या सरकारची इच्छा नाहीं किंवा इच्छा असल्यास 'कृति तरी नाहीं. एरवीं जपानासारख्या राष्ट्रानें तीस वर्षांत ज्या सुधारणा केल्या 'त्या तिसाचे दुप्पट साठ वर्षांत हिंदुस्थान देशांत कां होऊं नयेत याचें दुसरें 'कांहीं एक कारण आम्हांस दिसत नाहीं.' ( १९ ऑगस्ट १९०२ ).

सध्यांचें शिक्षण देण्यांत येथील सरकारचा खरा उद्देश काय आणि जपान-सारखा देश स्वतंत्र असल्यामुळें एकच पाश्चिमात्य शिक्षण त्याला अमृताप्रमाणें कां होतें आणि आम्हांला मदिरेप्रमाणें कां होतें, याबद्दल केसरी म्हणतो, 'रसायनशास्त्र, भूगर्भशास्त्र, उद्योगधंदे किंवा नानाप्रकारच्या कला, या शिकण्या-'करितां दरवर्षी शेंकडों विद्यार्थी जपाननें ज्याप्रमाणें गेल्या तीसचाळीस वर्षांत 'परदेशांत पाठविले तसें कधीं हिंदुस्थानसरकारनें केलें आहे काय ?

'देशाचें खरें हित जर करावयाचें होतें तर ह्यापूर्वी शेंकडों हिंदी विद्यार्थी 'परदेशांत पाठवावयास नको होते काय ? हिंदुस्थानचें राज्य मूठभर युरोपियन 'अधिकाऱ्यांनीं हांकणें अशक्य असल्यामुळें त्यांच्या मदतीस लागणारे 'सबॉर्डिनेट 'सर्व्हिस' मधील नोकरमंडळ तयार करण्यापलीकडे हिंदुस्थानांतील लोकांस 'विद्यादान देण्यांत सरकारचा जास्त कांहीं इरादा नाहीं. अशा स्थितींत आमच्या 'युनिव्हर्सिटींतून शोधक विद्वान् गेल्या पन्नास वर्षांत बाहेर पडले नाहींत तर त्यांत 'नवल कोणतें ? घरामध्यें शोभेसाठीं किंवा चैनीकरितां कुंड्यांतून लावलेल्या 'झाडांमध्यें आणि मोठ्या बागेंत वाढणाऱ्या झाडांमध्यें जें अंतर आहे तेंच हिंदी 'आणि जपानी विद्यार्थ्यांत दिसून येतें. स्वतंत्रतेचें वारें मिळून गगनचुंबी वाढलेला 'मंदारवृक्ष कोणीकडे आणि मेघदूतांत सांगितल्याप्रमाणें यक्षाच्या बायकोनें 'आपल्या रत्नवापीजवळ कौतुकानें लावलेला 'हस्तग्राह्यस्तबकनमित' बालमंदार 'कोणीकडे! हिंदुस्थानांतील युनिव्हर्सिटींतून किंवा इतर नोकरखान्यांतून जे विद्वान् 'बाहेर पडतात ते या बालमंदार वृक्षासारखे होत. परंतु मौज ही कीं त्यांची अशा 'प्रकारची वाढ झाल्यावर फिरून 'शूरोऽसि कृतविद्योऽसि दर्शनीयोऽसिपुत्रक । 'यस्मिन् कुले समुत्पन्नः गजस्तत्र न हन्यते' म्हणून त्यांसच उलट दोष देण्यांत येतो. 'हिंदुस्थानांतील राज्यकर्ते आम्हांस स्वतंत्र देशांतील लोकांस योग्य असें 'शिक्षण देत नाहींत, किंवा देऊं इच्छीत नाहींत, हीच काय ती मुख्य गोम आहे 'आणि ती झांकून ठेवून जातिभेद वगैरे सबबीवर लोकांस दूषण देणें म्हणजे 'चोराच्या उलट्या बोंबा या न्यायानें आमच्या दुःखावर डाग देण्यासारखें आहे.' ( ६ डिसेंबर १९०४ ).

'जपान चाळीस वर्षांत पुढें येऊन पाश्चिमात्य राष्ट्रांच्या पंक्तीस बसलें आणि 'आम्ही दरवर्षी अधिकाधिक हताश, हतवीर्य आणि परकीयांचीं ओझीं वाहणारे

'वनत चाललों, याचा योग्य खुलासा जर कोणास पाहिजे असेल तर तो
'‘स्वतंत्रता’ या एकाच शब्दानें होईल’ (६ डिसेंबर १९०४).

'दोन्ही देशांतील म्हणजे जपानांतील आणि हिंदुस्थानांतील शिक्षण पाश्चिमात्य
'खरें, पण एकास मिळालेलें पाश्चिमात्य शिक्षण अमृत होय आणि दुसऱ्या-
'स मिळालेली पाश्चिमात्य मदिरा होय. सारांश, शिक्षणाच्या दिशेंत, धोरणांत
'आणि स्वरूपांत भेद असल्यामुळें पाश्चिमात्य शिक्षणाचें हिंदुस्थानांत आणि जपानां-
'त निरनिराळे परिणाम घडून आलेले आहेत.' (६-१२१९०४).

'आमच्या सरकारचें शिक्षणाबद्दलचें विशिष्ट धोरण येणेंप्रमाणें आहे:—'हिंदु-
'स्थान देश इंग्लंड देशाच्या शेंपटाप्रमाणें कायमचा विलायतेच्या अंकित राहावा,
'हिंदुस्थानांतील उद्योगधंदे विलायतेंत करतां येतील तितके विलायतेस न्यावे,
'आणि हिंदुस्थानांतील प्रजा सुशिक्षित झाली तरी तिच्या अंगांत स्वाभिमान,
'स्वावलंबन इत्यादि गुण फारसे उत्पन्न होऊं नयेत, कारण ते उत्पन्न झाले तर
'परकीयांची अनियंत्रित राज्यसत्ता फार दिवस टिकावयाची नाहीं. मोठा इंजिनी-
'यर, मोठा डॉक्टर, मोठा इतिहासकार, शोधक, रसायनज्ञ किंवा पदार्थविज्ञान
'शास्त्रवेत्ता, मोठा न्यायाधीश, अथवा योद्धा अगर पंडित हिंदुस्थानांत निर्माण
'होण्याची या सरकारास जरूर नाहीं व तशी त्यांची इच्छाहि नाहीं. हीं सर्व माणसें
'विलायतेहून इकडे यावयाचीं आहेत; आणि त्यांच्या हाताखालीं काम करण्या-
'इतकें ज्ञान आम्हांस असलें म्हणजे बस्स आहे. अशी आमच्या सरकारची समजूत
'आहे; आणि त्या समजुतीप्रमाणें सरकारी विद्याखात्याचें काम चालू आहे.'
(२७-११-१९०६).

या विशिष्ट सरकारी धोरणामुळें होणारे प्रचलित शिक्षणाचे दुष्परिणाम 'केसरी'-
कारांच्याच शब्दांत पहा:—'खुद्द सरकारी किंवा सरकारच्या छायेखालीं अस-
'लेल्या शाळांतून जें शिक्षण दिलें जातें त्याचा परिणाम राष्ट्रीय उन्नतीच्या चळ-
'वळीला अपायकारक असा होतो. सरकारच्या कह्यांत असलेल्या किंवा गेलेल्या
'शाळांतून शारीरिक शिक्षणाची हेळसांड होते, धार्मिक शिक्षणाचा पूर्ण अभाव
'असल्यामुळें विद्यार्थी धर्मभावनाशून्य अतएव देहात्मवादी होतात, व त्यांना उच्च
'ध्येयच राहात नाहीं; त्यांना मिळणारें वाङ्मयशिक्षण अराष्ट्रीय असल्यानें त्यांचे
'विचारहि राष्ट्राभिमानशून्य होत जातात; त्यांना शिकविलें जाणारें समाजशास्त्र
'पौर्वात्य राष्ट्रांच्या दीर्घकालीन अनुभवाशीं विसंवादी असून त्यापासून त्यांच्या
'मनांत समाजरचनेविषयीं विपरीत कल्पना उद्भूत होतात व ते समाजविध्वंसक
'होतात. राजकीय शिक्षणांत तर पदोपदीं त्यांच्या पदरांत नालायकी बांधली
'जात असल्यामुळें आपण खरोखरीच स्वराज्याला अपात्र आहों अशी त्यांची
'भावना दृढमूल होऊन जाते. शास्त्रीय आणि औद्योगिक शिक्षण वोंडल्यानें दूध

'पाजल्यासारखें इतक्या बेतावेतानें दिलें जातें कीं त्याचा व्यवहारांत उद्योग-
'धंद्यांच्या वाढीस काडीमात्र उपयोग होत नसून केवळ पाश्चात्यांचे चोचले व
'चैनीचे प्रकारमात्र आपल्यांत शिरतात, आणि आपण त्यांच्या मालाचें एक
'कायमचें गिऱ्हाईक होऊन बसतों, व सर्पाला दूध पाजण्याप्रमाणें आमच्या शत्रूस-
'च अधिकाधिक बलसंपन्न करूं लागतों! याशिवाय या शाळांतून गुरुशिष्यसंबंध
'प्रेमाचे व विश्वासाचे न राहता गुरूंना शिष्याची नुसती तोंडओळख देखील
'नसते;' (३-४-१९२८).

'धिक्कार असो ह्या सुधारलेल्या सरकारला कीं, ज्याच्या कारकीर्दींत शंभर
'वर्षांच्या शिक्षणानें लोकांना आगकाड्या कशा कराव्या हें शिकविलें गेलें नाहीं
'किंवा कोट्यवधि रुपयांचा ऊंस या देशांत होत असतां स्वदेशी साखरेचे धंदे
'बुडून जाऊन मॉरीशस बेटांतील इंग्लिशांचीच नव्हे तर जर्मनीसारख्या परदेशां-
'तील कोट्यवधि रुपयांची साखर या देशांत येऊं लागली! कापडाचा धंदा
'बुडाला, तेलाचा धंदा बुडाला, चामड्याचा धंदा बुडाला, आणि आम्ही निव्वळ
'शेतकरी बनलों! ( २७-१२-१९०६ ).

शिक्षणाचा खरा उद्देश काय असावा याविषयीं केसरीकार म्हणतात:--
'देशांतील शिक्षण वास्तविक म्हटलें म्हणजे देशांतील लोकांची उन्नति
'होण्यासाठींच होय. जेणेंकरून देशांतील लोकांचें उद्योगधंद्यांचें
'ज्ञान वाढून त्यांच्या निर्वाहाची सोय होईल, त्यांची नीति व देशाभिमान वाढेल,
'आणि राजकीय व सामाजिक बाबतींत हितकारक कल्पनांचा प्रसार होऊन लोकांस
'आपली स्थिति सुधारण्यास किंवा जास्त सुखकारक करण्यास सांपडेल अशा
'प्रकारचें शिक्षण देशांतील सर्व लोकांस मिळणें जरूर आहे. याखेरीज शिक्षणाचा
'दुसरा मोठा उपयोग म्हटला म्हणजे स्वधर्म, स्वभाषा यांबद्दल त्याच शिक्षणानें एक
'प्रकारची आस्था व कळकळ लोकांचे मनांत उत्पन्न झाली पाहिजे.'
( ८-१२-१९०१ ).

याप्रमाणें खऱ्या शिक्षणाची मीमांसा झाली. केसरीनें असें स्पष्ट सांगितलें कीं,
'ज्यास खरें शिक्षण म्हणतात तशा प्रकारचें शिक्षण हल्लींच्या संस्थांतून आम्हांस
'बिलकूल मिळत नाहीं. आमच्या देशांत सरकारनें जीं कॉलेजें व युनिव्हर्सिट्या
'काढल्या आहेत त्यांत सरस्वतीदेवीस राजसत्तेची दासी बनविली आहे. आमच्या
'मनाची व बुद्धीची वाढ परकीय राज्यकर्त्यांस जितकी पाहिजे तितकीच ठेवण्या-
'करितां हीं परकीय राज्यकर्त्यांनीं उत्पन्न केलेलीं मारक यंत्रें होत.'
( १७-१०-१९०५ ).

'आमच्या युनिव्हर्सिट्या व कॉलेजें म्हणजे सरकारच्या ताटाखालचीं मांजरें
'होत.' (१७-१०-१९०५).

हीं आमच्या देशांतील शिक्षणसंस्थांची स्थिति झाली. आतां स्वतंत्र देशां-

तील शिक्षणसंस्थांतील विद्यागुरु किती बाणेदारपणाचें वर्तन करतात तें पाहा:--

'देशामध्यें जेव्हां कोणचीहि सार्वजनिक चळवळ उत्पन्न होते, तेव्हां स्वतंत्र 'देशांतील युनिव्हर्सिटींत असलेले विद्यागुरु प्रचलित विषयावरील आपलीं मतें 'उघडपणें प्रसिद्ध करतात आणि त्यांस जी बाजू राष्ट्राच्या हिताची दिसेल ती 'विद्यार्थ्यांच्या मनांत ठसवून तदनुसार वर्तन करण्याकडेहि त्यांची प्रवृत्ति करतात.' (१७-१०-१९०५).

हें चित्र आपण पाहिलें, आतां परतंत्र राष्ट्रांतील गुरूंचें हें दुसरें चित्र पाहा:-

'या शाळेंतील गुरु खाजगी रीतीनें किंवा पडद्याच्या आंत सार्वजनिक चळ-'वळीशीं सहानुभूति दाखविणारे असतील, पण उपयोग काय! हें घरचें सौभाग्य 'सार्वजनिक रीतीनें प्रसिद्ध करण्याचा त्यास पारतंत्र्यामुळें अधिकार नाहीं. अर्थात् 'हे या बाबतींत आमचे गुरु होणें शक्य नाहीं, असेंच समजलें पाहिजे.' (७-११-१९०५).

'मिल्टन, शेक्स्पियर किंवा बेकन शिकविणारे हे गुरु आहेत खरे, पण 'राष्ट्राच्या वाढीचीं तत्त्वें अथवा राष्ट्रीय चळवळीचें बीज जर आमच्या तरुण 'पिढीस शिकावयाचें असेल तर तें या सरकारी कॉलेजांतील गुरूपासून मिळा-'वयाचें नाहीं.' (१७-१०-१९०५).

शिक्षण व राजकारण—विद्यार्थ्यांनीं राजकारणांत पडावें किंवा नाहीं हा अलीकडे बराच वादग्रस्त प्रश्न झाला आहे व पुष्कळ विद्वद्वर्यांचेंहि म्हणणें असें पडतें कीं विद्यार्थ्यांनीं आपणांला सार्वजनिक चळवळीचें वारें लागूं देऊं नये. यावर 'केसरी'चे विचार वाचकांना उद्बोधक होतील असें वाटतें. 'केसरी' म्हणतो, 'शिक्षण आणि राजकारण हे शब्दच इतके व्यापक आहेत कीं, त्यांनीं 'कोणत्याहि राष्ट्राचें एकंदर जीवित व्यापून टाकलेलें असतें असें म्हणण्यास हरकत 'नाहीं. अर्थात् अशा दोन्ही गोष्टींची पुरी आणि कायमची ताटातूट करण्याचा 'प्रयत्न करणें म्हणजे त्या राष्ट्ररूपी शरिरांतला प्राण काढून घेण्याचा प्रयत्न करण्या-'सारखेंच आहे.' (५-८-१९१३).

विद्यार्थ्यांनीं सार्वजनिक चळवळींत पडूं नये म्हणून वेळोवेळीं सरकारकडून पुष्कळ प्रयत्न करण्यांत आले. शिक्षणसंस्थांची जितकी म्हणून गळचेपी करतां येईल तितकी करण्याची शिकस्त झाली. रिस्ले सर्क्युलर हा त्याचाच एक मासला होय. पण केसरीनें छातीठोकपणानें सांगितलें कीं 'आम्हीं आपलीं मुलें 'शिकण्याकरितां सरकारी शाळांत पाठविलीं म्हणजे तीं कांहीं सरकारास विकलीं 'नाहींत किंवा शाळेबाहेर मुलांच्या वर्तनावर देखरेख करण्याचा हक्क सरकाराकडे 'सोंपविला नाहीं हें सरकारनें लक्षांत ठेवलें पाहिजे........सरकारास एखादी 'गोष्ट अप्रिय असली म्हणजे ती बेकायदेशीर, राजद्रोही अथवा अनीतीची असलीच 'पाहिजे असें नाहीं. अर्थात् सरकारास प्रिय असतील तेवढ्याच गोष्टी आमच्या

'मुलांनीं ऐकाव्या किंवा पाहाव्या असा आग्रह धरणें मूर्खपणा होय......
'विद्यार्थ्यांच्या आईबापांनीं, पालकांनीं किंवा सरकारावर सर्वस्वी अवलंबून नसले-
'ल्या शाळेच्या व्यवस्थापकांनीं सरकारचे असले हुकूम मानणें म्हणजे सत्याचा,
'न्यायाचा, स्वातंत्र्याचा आणि स्वाभिमानाचा उपमर्द करणें होय.' ( ३०-७
-१९०७ ).

'सरकारच्या या जुलमाचा व अन्यायाचा प्रतिकार करणें व आपल्या मुला-
'बाळांस या कचाटींतून सोडविणें हें प्रत्येक देशाभिमानी पुरुषाचें व देशी संस्थेचें
'कर्तव्य होय. सगळ्या भाकरीकरितां सरकारचे गुलाम झालेले सरकारी नोकर सोडून
'द्या. पण ज्या संस्था पुष्कळ अंशीं लोकाश्रयावर अवलंबून आहेत त्यांनीं अशा
'बाबतींत सरकारची री ओढणें म्हणजे चतकोर भाकरीकरितां आपलें स्वातंत्र्य
'गमावणें आणि आपणांस मिळत असलेल्या लोकाश्रयाचा दुरुपयोग करणें होय.'
( ३०-७-१९०७ ).

'आज सरकारास शिवाजीउत्सव अप्रिय, तर उद्यां गणेशोत्सव किंवा राम-
'नवमीचा उत्सव देखील अप्रिय होऊं शकेल, आणि परवां धर्मविषयक व्याख्या-
'नेंहि सरकारास नकोशीं होतील. मग याकरितां आम्ही आपलीं मुलें सदर उत्सवा-
'स, व्याख्यानास किंवा कीर्तनास पाठवावयाचीं नाहींत काय ? आणि तीं पाठवूं
'नयेत म्हणून म्हणणारें सरकार कोण ? आणि त्यांत चोंबडें पोलीस तरी हवें
'कशाला ?

'तरुण पिढीच्या वर्तनास कोणती दिशा लावावी हें ठरविण्याचें काम व हक्क
'आईबापांचा आहे आणि त्यांत जोंपर्यंत कांहीं बेकायदेशीरपणा उत्पन्न होत नाहीं
'तोंपर्यंत सरकारास त्यांत हात घालण्याचा काडीइतका देखील हक्क पोंचत नाहीं.
'......रिस्ले सर्क्युलरसारख्या हुकुमानें पालकांच्या हक्कांची पायमल्ली करणें
'अत्यंत जुलमाचें आणि अन्यायाचें होय.' (३०-७-१९०६).

'हिंदुस्थान सरकारचे सेक्रेटरी मि. रिस्ले हे एके ठिकाणीं सहजगत्या असें
'लिहून गेले आहेत कीं, युनिव्हर्सिटीच्या नवीन कायद्याप्रमाणें जे नियम करावया-
'चे ते विद्यार्थ्यांनीं राजकीय चळवळींत पडूं नये, अशा हेतूनें त्यांजवर शाळेंत
'आणि बाहेर नजर ठेवण्याकरितां करावयाचे आहेत;आणि ते केले म्हणजे खासगी
'शाळांसंबंधानें दुसऱ्या तजविजी करण्याची जरूर नाहीं. सरकारचें युनिव्हर्सिटीचा
कायदा करण्यांत खरें धोरण काय याची याउप्पर जर कोणास शंका असेल तर
'स वै मुक्तोऽथवा पशुः ' असें समजलें पाहिजे. सरकाराला जें कांहीं करावयाचें
'आहे तें आतां निश्चित व ठाम झालेलें आहे.' (२७-११-१९०६).

**धार्मिक शिक्षणाची आवश्यकता**—बाल्यावस्थेंत मुलांच्या मनावर होणारे संस्कार चिरकाल टिकाणारे असतात. मुलांचीं कोवळीं मनें लहानपणींच जास्त संस्कारक्षम असतात आणि अशा वेळींच जर धर्माचा आणि नीतितत्त्वांचा ठसा

त्यांच्या मनःफलकावर उमटविता आला तर सर्व भावी आयुष्यालाच एक विशिष्ट वळण लागेल यांत शंका नाहीं. तेव्हां शिक्षणसंस्थांत ज्याप्रमाणें इतर पुष्कळ विषय शिकवितात त्याप्रमाणेंच नीतिशिक्षण व धर्मशिक्षण देतां आलें तर बरें; किंबहुना तें अत्यवश्यक आहे, असें केसरीचें मत आहे. पण नुसती धर्मशिक्षणाची आवश्यकता पटून चालत नाहीं. आपल्या देशांत नाना पंथांचे व नाना धर्मांचे, व नाना मतांचे लोक आहेत, व 'भिन्नरुचिर्हि लोकः' याप्रमाणें हिंदु धर्मांचें शिक्षण देऊं म्हटलें तर मुसलमान चवताळणार किंवा उलट दुसऱ्या धर्माचें देऊं म्हटलें तर हिंदु रुसणार, आणि याबद्दल कोणाला दोष देणेंहि योग्य नाहीं. या गोष्टी लक्षांत आणून 'केसरीनें' उपाय सुचविला आहे. 'सामान्य धर्मतत्त्वें 'त्रिकालाबाधित असतात तेव्हां त्यांचें शिक्षण देणें मुळींच अवघड नाहीं. शिवाय 'नवीन पद्धतीनें तुलनात्मक धर्मविचारांचेंहि थोडेंसें शिक्षण दिलें असतां धर्म-'विचारांतील एककल्लीपणाचा दोष टाळून धर्मशिक्षणाचा गुण तेवढा तरुण 'मुलांस प्राप्त करून देणें शक्य आहे.' (१२-४-१९१०).

केसरीनें वेळोवेळीं शिक्षणाबाबत सरकारवर केलेली टीका स्पष्ट, कडक, मुद्देसूद व स्वाभिमानपूर्ण अशीच आहे. सरकारनें स्थापन केलेल्या शिक्षण-पद्धतींत दोष आहेत येवढेंच सांगून केसरी राहिला नाहीं; तर हे दोष सरकारनें मुद्दाम सहेतुकपणें ठेवून दिले आहेत याविषयींहि पण केसरीला बिलकूल शंका राहिली नाहीं. उदात्त विचार, उच्च आकांक्षा, आणि उत्कट देशाभिमान यांचा देशांत लोप होत चालला आणि त्याऐवजीं भ्याडपणा, श्ववृत्ति आणि 'चतकोर भाकरीची गुलामगिरी' पदरीं आली. आणि दुःखाची गोष्ट ही कीं, लोक त्यांतच आनंद मानून घेऊं लागले. त्यांना वेळींच केसरीनें आपल्या सत्त्वाची, आपल्या पराक्रमाची व आपल्या तेजस्वितेची जाणीव उत्पन्न करून दिली.

---

# सामाजिक भूमिका

[ श्री. प्रभाकर वासुदेव बापट एम्. ए., बी. टी. ]

समाजाच्या प्रचलित परिस्थितींत सुधारणा व्हावयास पाहिजे याबद्दल टिळक-आगरकरांत अगदीं ऐकमत्यच आहे व ही गोष्ट लक्षांत घेऊनच आगरकर केसरी-कारासारख्या प्रथम सुधारकांवर विश्वास ठेवूं नका असा उपदेश बहुजनसमाजास करीत असत. किंबहुना सुधारणा होणें इष्टच नव्हे तर अपरिहार्यहि आहे असें केसरीकारांनीं प्रतिपादिलें आहे. 'पाश्चात्य राष्ट्राचीं व आमचीं कर्मधर्मसंयोगामुळें 'जी सांगड पडली आहे तिचा सांखळीच्या दोन्ही दुव्यावर परिणाम झाल्या-'खेरीज राहणार नाहीं. प्राच्य व पाश्चात्य आध्यात्मिक व आधिभौतिक अशा या 'नव्याजुन्या सुधारणांचा अपूर्व संयोग घडून आल्यावर हिंदुसमाजाच्या मूलभूत 'तत्त्वांतहि फेरफार करावाच लागेल याबद्दल शंका नव्हती.' (२८-१-९६). पण सुधारणेचें जें स्वरूप व जे मार्ग त्या वेळीं सुधारकांनीं स्वीकारले होते त्याबद्दल तीव्र मतभेद होता. या बाबतींत केसरीकारांचा पहिला सिद्धान्त असा आहे कीं कोणत्याहि समाजाची सुधारणा ही त्या त्या समाजानें स्वतःच केली पाहिजे. परधर्मीय व परकीय संस्कृतीच्या लोकांचें या बाबतींत कांहीं काम नाहीं. 'एका धर्माच्या लोकांनीं दुसऱ्या धर्माच्या लोकांच्या धार्मिक 'बाबतींत हात घालणें इष्ट नसतें, इतकेंच नव्हे तर त्याचे परिणामहि 'चांगले होत नाहींत. जो तो आपली धर्मसमजूत खरी मानीत असतो आणि 'स्वतःपुढें आलेल्या कोणत्याहि प्रश्नाचा निकालहि तो आपल्या समजुतीप्रमाणेंच 'करीत असतो.' (१९-९-१९००). राजसत्तेनें समाजसुधारणेच्या बाबतींत किती मर्यादेपर्यंत हात घालावा व कायद्यानें समाजसुधारणा लोकांवर सक्तीनें लादावी कीं नाहीं हे प्रश्न सोडून दिले, तरी हिंदुस्थानांतील परिस्थितींत राजसत्ता विधर्मी असल्यामुळें समाजाच्या व्यवस्थेंत कोणत्याहि प्रकारें हात घालतां कामा नये असा खडखडीत इशारा केसरीकारांनीं दिला आहे. अशा तऱ्हेनें परकीय सरकारच्या आश्रयानें एकादा कायदा करून इष्ट असलेली सुधारणा चट-कन घडवून आणता येईल, व अशा तऱ्हेनें समाजाच्या इच्छेविरुद्ध ती त्याच्यावर लादणें इष्ट व शक्य आहे असें कबूल केलें, तरी त्यापासून ही एक घातुक पद्धत पडून समाजाचें नुकसानच अधिक होणार. कारण अशा रीतीनें विधर्मी सर-

कारास आपल्या अंतर्व्यवस्थेंत ढवळाढवळ करण्याचा एक हक्क मात्र आपल्या हातानेंच आपण निर्माण करून देतों. म्हणून सामाजिक सुधारणेची ही जबाबदारी प्रचलित परिस्थितींत तरी समाजानेंच उचलणें जरूर आहे. ती जबाबदारी अर्थातच समाजांतील पुढाऱ्यावर पडते. 'हरएक समाजाचे आधारस्तंभ म्हणजे त्यांतील विद्वान् विचारी व संभावित गृहस्थ होत.' (१९-३-०१). त्यांनीं ती जबाबदारी योग्य तऱ्हेनें संभाळली नाहीं हेंच सुधारणा यशस्वी न होण्याचें पहिलें कारण आहे असें केसरीकारांनीं प्रतिपादिलें आहे. नवमतवादी सुधारकांनीं आपलें काम बरोबर केलें नाहीं व आपल्या चुकीचें खापर मात्र त्यांनीं समाजावर फोडलें.

सामाजिक क्रान्ति घडवून आणणाऱ्या या नवीन प्रवाहाचें जनकत्व पाश्चात्य शिक्षणाकडेच आहे असें केसरीकारांनीं प्रतिपादिलें आहे. हें शिक्षण मात्र बरेंच एकांगी होतें व म्हणून त्याचा परिणामहि तसाच झाला. (१९-३-१९०१). धर्म व नीति यांच्याबद्दल इंग्रजी धर्तीवर काढलेल्या शाळांतून एक चकार शब्दहि काढावयाचा नाहीं, अशी धर्मौदासीन्याची सरकारनें शपथ घेतल्यापासून, रीतच पडली होती. या शिक्षणाचा राजकीय हेतु कांहींहि असला तरी त्याच्या पोटीं सांस्कृतिक विजय मिळविण्याचा हेतूहि होताच. हा हेतु मात्र भिन्न परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें शेवटीं कसा फसला याचें उत्कृष्ट चित्र म. प्रांताचे डायरेक्टर मेयू यांनीं आपल्या Education in India या पुस्तकांत काढलेलें आहे. 'या शिक्षणाच्या एकांगीपणामुळें इंग्रजी शाळांतून पाहिल्यांदा बाहेर पडलेल्या मंडळींची स्थिर फार शोचनीय झाली होती.' (१९-३-०१). या शाळांतून मिळालेल्या शिक्षणांतून स्वधर्मांचें किंवा स्वदेशाच्या इतिहासाचें ज्ञान बेताचेंच असून उलट पाश्चात्य संस्कृतींतील चांगला भागच उज्ज्वलतेनें दाखविला गेल्यामुळें, त्याचा परिणाम स्वकीयांचा तेजोभंग व परकीयांची बौद्धिक गुलामगिरी यांतच झाला. उलट स्वधर्माचे व त्यांतील नीतितत्त्वाचें शिक्षण न मिळाल्यामुळें एतद्देशीय संस्कारपरंपरेची सांखळी तुटून त्यालाहि हे नवीन सुशिक्षित लोक पारखे झाले. यामुळें समाज व हे सुशिक्षित यांच्यामधील अंतर वाढत जाऊं लागलें. याहिपेक्षां विशेष दुर्दैवाची गोष्ट म्हटली म्हणजे राज्यकारभाराच्या नवीन पद्धतीस अशा इंग्रजी जाणणाऱ्या माणसांची जरूरी असल्यामुळें, या लोकांना सरकारदरबारीं मान व आश्रय मिळूं लागून समाजांत एक प्रकारचा अयोग्य मोठेपणा व तदनुषंगानें समाजाचें पुढारीपण यांस प्राप्त झालें. आधींच मिळालेल्या शिक्षणामुळें, व परंपरागत बंधनाबद्दल असलेला आदर नाहींसा झालेला, त्यांत नवीन मिळालेल्या विचारप्रणालीस मानाधिकाराची व लौकिकाची व आचारस्वातंत्र्याची जोड मिळाल्यावर हे समाजांतील पुढारी स्वल्पज्ञानानें संतुष्ट, बेपर्वा व खसुखाभिलाषी स्वतःस विद्वान् मानून इतर सर्व प्राचीन मतांचा उपहास करणारे असे झाले, यांत नवल

नाहीं. ( १९-३-०१ ). समाजहि अत्यंत दुर्बल व शिथिलावस्थेंत असल्यामुळें त्यालाहि या पुढाऱ्यांवर आपलें नियमन टाकून त्यांच्या आचारविचारस्वातंत्र्याला मर्यादा घालण्याचा प्रयत्न करतां आला नाहीं. याचा परिणाम म्हणजे एकंदर बहुजनसमाज व हे सुशिक्षित यांच्यामधील अंतर फारच वाढून त्या दोहोंचीहि फारकत झाली. ज्या देशांत समाज व त्यांचे पुढारी यांच्यामध्यें परस्परांविषयीं आदरभाव व प्रेम वसत असून विचारांची देवाणघेवाण होते त्यांचीच प्रगति होते. उलट जेथें असा परस्परदेवघेवीचा अभाव उत्पन्न होतो, त्या देशांतील प्रगतीच्या मार्गांत फार मोठीच अडचण उत्पन्न झालेली असते. यामुळें समाजाच्या पोटांत शिरून त्याचें अंतरंग जाणून त्याच्या विचारभावनांना वळण लावणें हें जसें पुढाऱ्यांस अशक्य झालें तसेंच समाजाच्या स्वपरंपरेच्या व 'बंधनाच्या पलीकडे' गेलेल्या पुढाऱ्यांविषयीं साशंक होऊन त्यांच्या म्हणण्याचा विचार करण्यासहि समाज प्रतिकूल होऊं लागला. याचा प्रतिक्रियारूप परिणाम म्हणून हे नवमतवादी सुशिक्षित जास्तच स्वतंत्र झाले. समाजाचें व धर्माचें कोणतेंच बंधन शिल्लक न राहिल्यामुळें ज्यानें ज्याला वाटेल तें म्हणावें व आपल्याच सुचविलेल्या सुधारणा समाज मान्य करीत नाहीं, याबद्दल त्याच्यावर आग पाखडावी असा क्रम चालू झाला. समाजांतील अमुक अमुक व्यंगें आहेत तीं दुरुस्त कशीं करावीं याचा समाजनिरपेक्ष विचार करावयाचा, व त्याप्रमाणें समाजाचे व्यंगचित्र काढून त्यानें आपलें म्हणणें मान्य न केलें तर त्याबद्दल रागवावयाचें या दररोज घडणाऱ्या प्रकाराबद्दल समाज मनांत अगदीं चिडून गेला होता, व त्याच्या या रागास अजून वाचा फुटली नव्हती तरी त्यामुळें चांगल्या सुधारणेचें पाऊल मागें पडलें यांत शंका नाहीं. ( १९-३-१९०१ ). सुधारकांमधली ही बेबंदगिरी, त्यांच्या मनाची अव्यवस्थित स्थिति, व विशेषतः कोणत्याहि प्रकारच्या धार्मिक बंधनांचा अभाव त्या वेळच्या न्या. रानडे, इत्यादि जाणत्या पुढाऱ्यांच्ना ध्यानांत आलेला होता व प्रार्थनासमाज स्थापन करण्यांत ही स्थिति सुधारणें हा प्रधान उद्देश होता. सुधारणेचें पाऊल पुढें पडण्यास सुधारकांची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे ही गोष्ट न्या. रानडे यांना पटली होती व पुढें सामाजिक परिषद काढण्यांत हा एक महत्त्वाचा हेतु होता. त्यामध्यें त्यांचीं जीं भाषणें झाली त्यांत ही गोष्ट त्यांनीं विस्तारशः मांडलीहि आहे. खुद्द आगरकरांच्या केसरींतील व सुधारकांतील लेखांतहि त्यांनीं या सुधारकांवर बरेच कोरडे ओढले आहेत. या अव्यवस्थितपणाखेरीज या सुधारकांवर केसरीकारांनीं आणखी एक आक्षेप घेतला आहे. 'या इतक्या सुधारणांपैकीं 'एकसुद्धां यशस्वी होत नाहीं. याचें कारण त्याविषयीं लागणारी निष्ठा व झीज 'सोसण्याची तयारी यांचा या सुधारकांच्या ठिकाणीं अभावच होता.' 'सुधारकांनीं 'शतावधानी होऊन चालणार नाहीं. बालविवाहनिषेध, पुनर्विवाह...इत्यादि

'कोणतीहि गोष्ट भरभराटीस येत नाहीं. याचें कारण त्या त्या गोष्टीकडेच तिच्या
'उत्पादकांचें अव्याहत लक्ष नाहीं. आम्हांपैकीं बहुतेकांची स्थिति मधुकरां-
'सारखी झाली आहे. ज्यांना इतर गोष्टींची अनुकूलता आहे, त्यांच्या अंगीं एक
'काम हातीं धरून तें लोकांची भीति न बाळगतां तडीस नेण्याचें धैर्य नाहीं.
'कोणतीहि करण्यासारखी गोष्ट पुढें आली कीं कोणी तिला मनापासून आपला
'खांदा देऊन तिची जबाबदारी आपल्या अंगावर घेईल असें कधीं घडावयाचें
'नाहीं.' ( २९-३-८७ ). डॉ. कीर्तिकरांनींहि या 'क्षणिक सुधारकां'चें फार
गंमतीचें चित्र काढलें असून,'लोकसुधारणेच्या कार्मी स्वतःचा देह झिजविणाऱ्या
केवलआत्मनिरपेक्ष अशा माणसांचा अभाव' हेंच सामाजिक प्रगति न होण्याचें एक
प्रमुख कारण त्यांनीं सांगितलें आहे. सुधारकांवरील तिसरा आक्षेप त्यांचे वैयक्तिक
आचरणाबद्दलचा होता. सामाजिक पुढारी होऊं इच्छिणाऱ्यानें आपलें वर्तन
चोख ठेऊन समाजाच्या मनांत आदर उत्पन्न केला पाहिजे. 'या चळवळी ज्यांनीं
'उभारल्या त्यांची नीतिदृष्ट्या, धर्मदृष्ट्या व आचारदृष्ट्या योग्यता असावी तशी
'नव्हती,' ( २-४-१९०१ ). व 'म्हणूनच हे सुधारक जन्मतः व वरपांगीं हिंदु
'आहेत खरे, पण विचारानें आणि शिक्षणानें हे धर्मदृष्ट्या बहुतेक परकीयच बनले
'असें लोक समजतात व लोकांचा हा समज पुष्कळ अंशीं साधार व खराहि
'आहे. अशा स्थितींत समाजाची सुधारणा होणें शक्य नव्हतें.' (१९-१-१९०४).
'लोकांत जर कोणत्याहि विशिष्ट मताचा प्रसार करावयाचा असेल तर त्यास बुद्धि-
'वादापेक्षां निराळ्या तऱ्हेचा अधिकार लागतो.'(२-४-०१) 'म्हणून सुधारणेच्या
'खऱ्या पुरस्कर्त्यांनीं समाजसुधारणेच्या अयशस्वितेबद्दल समाजास दोषी न ठरवतां,
'आपले मार्गच बदलले पाहिजेत व तसें ते करतील तर इष्टफलप्राप्ति लवकर
'घडवून आणतां येईल. सुधारणा यशस्वी करण्याची खरी इच्छा असेल तर
'पुढाऱ्यांनीं आपली जबाबदारी नीट ओळखून, निर्बंध व स्वातंत्र्यांत पर्यंक-
'पंडित होण्यांतच आनंद व धन्यता मानून स्वेच्छाचारी न होतां समाजांत
'मिसळून त्याचा विश्वास संपादन करावा व अशा रीतीनें आपसें पुढारपण सार्थ
'करावें. खरी सुधारणा समाजापासून तुटून जाण्यापासून कधींहि होणार नाहीं.
'खरा सुधारक आत्मसुखाचा त्याग करतो.पण स्वेच्छाचारी पुरुषाचें वर्तन तेंच त्याचें
'आत्मसुख. सुधारकाचें कर्तव्य समाजाची स्थिति चांगली करणें हें होय. व त्या-
'करितां तो आपणांस कितीहि कष्ट पडले तरी ते मानीत नाहीं. स्वेच्छ मनुष्यास
'उलट समाजांची व तत्कृत बंधनांची कांहीं पर्वा नसते व कांहीं तरी सबबीनें
'त्यांचें उल्लंघन करण्यास तो नेहमीं तयार असतो.' ( ५-४-१८८७ ). 'कोण-
'त्याहि समाजाचा ज्यास पुढाकार घ्यावयाचा असेल, त्यानें आपल्या एकनिष्ट-
'पणानें, नीतिमत्तेनें, स्वार्थत्यागानें व समाजाबद्दलच्या खऱ्या कळकळीनें समा-
'जाचा विश्वास पहिल्यांदा संपादन केला पाहिजे.' (१९-३-१९०१).

सामाजिक सुधारणा घडवूं इच्छिणाऱ्या सुधारकाला सुधारणेच्या दृष्टीनें जरा विशेष महत्त्व असल्यामुळें केसरीचें त्याविषयींचें म्हणणें अमळ विस्तारानें वर मांडलें आहे. पण होऊं पाहाणाऱ्या सामाजिक सुधारणेच्या स्वरूपाविषयींहि केसरीकारांनीं आपली स्वतंत्र विचारसरणी मांडली आहे. न्या. रानड्यांशिवाय पूर्वी या गोष्टीचा फार विचारहि कोणी केला नव्हता व आगरकरांनाहि युरोपियन समाजशास्त्र्यांनीं शोधून काढलेलीं तत्त्वें सुधारणेचा पाया रचण्यास पुरेशीं वाटल्यामुळें त्यांनीं तीच आपल्या सुधारणावादाला आधारभूत म्हणून स्वीकारून मतप्रसाराला सुरवात केली होती. म्हणूनच केसरीकारांच्या या प्रतिपादनाला विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. केसरीकारांच्या मतें जुनी समाजव्यवस्था नवीन परिस्थितींत कायम ठेवतां येत नाहीं हें जितकें खरें तितकेंच सुधारणेच्या नांवाखालीं निरर्गल आचारस्वातंत्र्य आणूं पाहाणें अप्रयोजक व घातक आहे. ‘ कोणताहि समाज घेतला तरी त्याचें ‘ स्वतंत्र असें एक वैशिष्ट्य असतें व तें कायम राहूनच कोणती सुधारणा करावयाची ‘ ती केली पाहिजे.’(२-४-१९०१).अमुक एका तत्त्वावरच समाजाची रचना झाली तरच तें राष्ट्र सुखी होतें हें म्हणणें अविचाराचें आहे. ‘ प्रत्येक समाजाची रचना ‘ कांहीं कांहीं मूलभूततत्त्वावर व बंधनावर झालेली असते व तीं तत्त्वें त्याच्या परंपरेंत ‘ अनुस्यूत झालेलीं असतात, व ही कायम ठेवण्यांतच त्या राष्ट्राचें एकंदरीनें हित ‘ साधणारें असतें. युरोपांतील समाजरचनेचें तत्त्व आम्हीं सर्वांशीं घेऊं म्हटलें तर ‘ आमच्या प्रयत्नास यश येण्याची फारशी आशा बाळगावयास नको. सुधारणा ‘ झाली तरी त्यांत सत्त्व सोडतां कामा नये व हा आपलेपणा आम्हीं आजपर्यंत कायम ‘ राखला म्हणून इतकीं वर्षें आम्ही जिवंत तरी राहिलों आहोंत.’ (२८-१-१८९६). ‘ अगदीं निर्दोष अशी समाजरचना कोठें आहे ? ज्या युरोपांतील समाजाचें उदा‘ हरण आमच्या डोळ्यापुढें उभें राहून आम्हांस एवढें विलोभन उत्पन्न करतें ‘ त्या समाजांतसुद्धां वाईट परिणाम होत नाहींत काय ? व तेथेंहि समजसुधारणेस वाव ‘ व त्याकरितां प्रयत्न करणारे सुधारक निर्माण होत नाहींत काय ? पण स्वतंत्रतेचा ‘ व राष्ट्रीयत्वाचा अभिमान म्हणून जो कांहीं जोम आहे तो राष्ट्रांत जागृत असतो ‘ तोंपर्यंत समाजरचना कशी असली तरी त्यांतील दोष राष्ट्रोन्नतीच्या आड येत नाहींत. ‘ व म्हणून नवीन समाजरचना घडवून आणण्यापेक्षां लोकांमध्यें एकप्रकारचा आपल्या ‘ संस्थेबद्दल व देशाबद्दल अभिमान जागृत ठेवण्याची प्रत्येक देशकल्याणेच्छु माणसानें ‘ आधीं तजवीज ठेवली पाहिजे. नाहींतर तेजोभंग होऊन त्या राष्ट्राचा जगांत उपहास ‘ होतो.’ (१८-१-९६). ‘ पाश्चात्य संस्कृतीशीं गांठ पडल्यावर हिंदुसमाजाच्या ‘ बाह्य स्वरूपांतच नव्हे तर समाजरचनेच्या मूलभूत तत्त्वांतहि फेरफार करावाच ‘ लागेल. पण वाद एवढाच कीं वरील या दोन सुधारणांपैकीं एकीचा लोप करून ‘ दुसरी स्थापन करावयाची किंवा जुन्या संस्थेंतच योग्य असे कांहीं फेरफार करून

'तिचें पुनरुज्जीवन करावयाचें.'(२८-१-९६). 'सुधारकांच्या हातून जर अत्यंत
'मोठी चूक झाली असेल तर त्यांनीं या समाजवैशिष्ट्याची किंवा परंपरेची क्षिति
'बाळगितां किंबहुना ती काय आहे याचा शोधहि न घेतां केवळ तर्कशास्त्राच्या
'आधारानें नवीन सामाजिक रचना प्रवर्तन करण्याचे प्रयत्न केले. हिंदुसमाजाचीं
'मूलभूत तत्त्वें कोणतीं आहेत त्यांपैकीं प्रचलित परिस्थितींत कोणतीं सोडून दिलीं
'पाहिजेत, कोणतीं ठेवणें इष्ट आहे व ही मुरड घालतांना जुन्यानव्याचा बेमालूम
'सांगाडा कसा जुळवून देतां येईल याचा कधींहि विचार केला नाहीं. यांनीं ज्या
'ज्या चळवळी केल्या, जीं जीं मतें प्रतिपादिलीं तीं पाश्चिमात्य शिक्षणास व तत्त्व-
'ज्ञानास हुरळून जाऊन केलेलीं होतीं व त्यापैकीं पुष्कळशा मतांना व तत्त्वांना
'समाजांत जागा देण्यापूर्वीं मुरड घालणें जरूर होतें. जुनें तेवढें नेमकें वाईट
'असा पुढील पिढीचा गैरसमज होत चालला होता व ही गोष्ट समाजास अत्यंत
'अहितकारक होती.' (२-४-१९०१). 'समाजास कांहीं बंधनें पाहिजेत व
'बंधनें कायम राहण्यास प्राचीन संस्थांचा एकप्रकारचा अभिमानहि समाजांत
'जागृत असला पाहिजे व जागृत करण्याचा प्रयत्न न करतां तर्कशास्त्राच्या
'आधारावर समाजाचीं सर्व बंधनें वाटेल तेव्हां तोडण्यास तयार होऊन त्यास
'तसेंच सोडून देणें म्हणजे जाणूनबूजून समाजनौकेस वावटळींत सोडण्यासारखें
'आहे. (किंत्ता). नुसत्या तर्कशास्त्राच्या जोरावर कोणतीहि सुधारणा शास्त्रशुद्ध
'ठरूं शकत नाहीं. राजकीय बाबतींतसुद्धां तर्कचक्र अप्रतिहत चालविणें कठिण
'जातें, मग सामाजिक व धार्मिक प्रकरणाची गोष्ट कशाला! समाजावर तार्किक
'हल्ले करणें म्हणजे निवळ पाडापाडीचें काम करणें होय. त्यानें समाजाचीं बंधनें
'शिथिल होतात. नवीन मात्र उत्पन्न होत नाहींत.'(४-६-१९१६). कॉंट मिल
'इत्यादि पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनींहि ही गोष्ट कबूल केली आहे.' अशा तऱ्हेनें
'बौद्धिक वादाचा आश्रय करून आधींच शिथिलबंधन व विस्कळित झालेल्या
'समाजास जास्तच घोटाळ्यांत पाडण्यासारखें होणार आहे. त्यापेक्षां तींच बंधनें
'पुनः शुद्ध स्वरूपांत तेजस्वी करून त्यांच्या आधारानें समाजाचें पाऊल पुढें
'टाकलें तर तें सुधारणेचें पाऊल जास्त खंबीर पायावर उभारल्यासारखें होणार
'आहे. कांहीं कांहीं सुधारकांची मजल सबंध राष्ट्र खिस्ती झालें तरी हरकत
'नाहीं' (१९-१-१९०४), पण त्यांना इष्ट वाटणाऱ्या सुधारणा अवश्य घडून
आल्या पाहिजेत असें म्हणण्यापर्यंत गेली होती हें पाहिलें म्हणजे केसरीकारांच्या
या प्रतिपादनाचें महत्त्व लक्षांत येतें.

अशा तऱ्हेनें वैशिष्ट्य राखून सुधारणा करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे ती धर्माच्या
पायावर करणें हाच होय. हिंदुसमाजाचा आजपर्यंतचा इतिहास पहातां समाजाची
रचना धर्माच्या अधिष्ठानावरच झाली असल्याचें दिसून येतें. आजपर्यंतच्या
सामाजिक क्रान्त्या यांचें स्वरूप तत्त्वतः धार्मिकच होतें व धर्माची हांक हिंदु

अन्तकरणाला जशी लवकर पोंचते व वश करते तशी इतर कशाचीहि पोंचत नाहीं. आज धर्माचें स्वरूप अवनत झालेलें असलें तरी सर्व जगांतील तत्त्व-जिज्ञासूंची भूक शमन करण्याइतका खोल व गंभीर विचार या बाबतींत प्राचीन आर्य ऋषींनीं केलेला होता. आमच्या प्राचीन धर्माचें स्वरूप फार उज्ज्वल असून त्यायोगेंच ' आमच्या राष्ट्रांत उदात्त विचारांचें तेज प्रगट होऊन त्याची आध्या-
' त्मिक व ऐहिक उन्नति झाली होती. आमची हल्लीं अवनति झाली आहे ती हिंदु-
' धर्मामुळें झाली नाहीं ही गोष्ट धर्माभिमानी व सुधारक या दोघांनींहि ध्यानांत ठेवण्या-
' सारखी आहे. ' (८-३-१८९२). आतां जर आपणास सुधारणा करून राष्ट्राची उन्नति करावयाची असेल तर आपल्या धर्माचें स्वरूप शुद्ध करून त्याच्या पायावर केल्यास लवकर व योग्य तऱ्हेनें होईल. अशा तऱ्हेचे प्रयत्न करणारे स्वामी विवेकानंदासारखे हिंदु व प्रो. मॅक्समुल्लरासारखे पाश्चात्य विद्वानहि उत्पन्न होऊं लागले आहेत ही भारतवर्षाच्या भावी भाग्योदयाचीं पूर्वचिन्हेंच होत. केसरीचें प्रथमप्रथमचें धर्मसंबंधीं उदासीन धोरण बदलून तें याप्रमाणें धर्माकडे विशेष आत्मीयतेनें वळलें, हा टिळकांच्या धर्मसंबंधीं वृत्तींत जो इष्ट फरक पडला त्याचा परिणाम होता. पण एकदां ही क्रान्ति घडून आल्यावर अनुभवानें व अधिक विचारानें ती दृढतरच होत गेली व वाढत्या जोरानेंच इष्टफलप्राप्तीचें अचूक साधन या जाणीवेनें प्रगट होऊं लागली, व केसरीच्या सामाजिक सुधारणाविषयक धोरणाचें केन्द्र होऊन राहिली आहे. पण यापुढें होणाऱ्या सुधारणेचें अधिष्ठान करण्यास आपल्या प्राचीन धर्मग्रंथांचें परिशीलन करून त्यांतील शुद्धविचारसरणी जनतेपुढें आणली पाहिजे; इतकेंच नव्हे तर आधुनिक बुद्धिप्रधान युगाला जुळेशी त्याची नवी मांडणीहि केली पाहिजे.(१९-३-१९०४). या बाबतींत सुधारकाप्रमाणें शास्त्रीमंडळीसहि केसरीनें फार दोष दिला असून सुधारणा होण्यास धर्मविचारांस जोराची चालना दिली पाहिजे असें प्रतिपादिलें आहे. प्राचीन धर्मशास्त्राचे व महाभारतरामायणासारख्या राष्ट्रीय संस्कृतीच्या वाहक अशा आर्ष काव्याचें मंथन करून त्यांतील उज्ज्वल विचार लोकांपुढें नीट मांडून त्यांस पटविले तर राष्ट्र पुन्हां सतेज व सामर्थ्यसंपन्न होण्यास वेळ लागणार नाहीं असा केसरीचा आशावाद आहे. (१४-३-१९०५). स्वामी विवेकानंद, चिंतामणराव वैद्य व डॉ. बिझांट व थिऑसॉफिकल सोसायटी यांनीं अशा तऱ्हेचे उद्योग करून हिंदी समाजास कायमचें ऋणी करून ठेवलें आहे. (८-७-१९०१). त्याचप्रमाणें गणेशोत्सव, साधुपुरुषांच्या पुण्यतिथि यांचें महत्त्व याच दृष्टीनें असून अशा तऱ्हेचे नवविचार प्रस्तृत करणाऱ्या या महापर्वण्या होत व प्रत्येक खऱ्या सुधारकानें त्यांचा तसा उपयोग करून समाजाच्या धर्मविचारांना योग्य वळण लावण्याचे शिकस्तीनें प्रयत्न केले पाहिजेत. अशा तऱ्हेनें हिंदुसमाजांत नवीन चैतन्य उत्पन्न झालें कीं हिवाळ्यांत शुष्क झालेलीं पानें गळून पडून वाळून गेल्यासारखा दिसणारा वृक्ष टवटवीत

दिसावा त्याप्रमाणें हिंदुसमाज पुन्हां कार्यक्षम होऊन जगाच्या चढाओढींत आपलें श्रेष्ठस्थान पटकावल्याशिवाय राहाणार नाहीं. सुधारकांनीं केलेल्या प्रयत्नास यश न येण्याचें कारण हिंदु समाजांतील धर्माचें स्थान त्यांनीं ओळखलें नाहीं हेंच होय. व १९०४ सालीं मद्रासेस सामाजिक परिषदेंतून फुटून हिंदु ॲसोसिएशन निघाली त्यावेळीं त्यावर चर्चा करतांना हाच मुद्दा केसरीकारांनीं प्रामुख्यानें पुढें मांडला होता. ' पन्नास वर्षांपूर्वीं जे समाजसुधारक बनले त्यांस त्यावेळीं हिंदु- ' धर्माची अगर त्यांतील ग्रंथांची माहिती नव्हती. व त्यामुळें सुधारणेची भलती- ' च दिशा त्यांनीं पत्करली. ' ( ५-१-१९०४ ). ' त्यानंतर हल्लीं सामाजिक ' सुधारणेचा प्रश्न ज्या लोकांनीं पुढें आणिलेला आहे त्यांस हिंदुधर्माचा अभिमान ' नाहीं व हिंदुधर्मांतील तत्त्वें समजून घेण्याचा त्यांनीं कधीं प्रयत्न केला नाहीं ' असें प्रो. रंगाचार्य यांचें म्हणणें आहे व तें खरेंहि आहे.' (१२-१-१३०४). ' नव्या परिस्थितीला अनुरूप जे फेरफार व्हावयाचे त्यामुळें हिंदुत्वाचा अभिमान ' नष्ट होऊं नये अशी प्रत्येकानें खबरदारी घेतली पाहिजे; तरच आमचें राष्ट्रीयत्व ' कायम राहून आम्ही प्रयत्नाच्या मार्गाला लागूं.' ' तेव्हां खरी सुधारणा घडवून आण- ण्यास शास्त्री व पंडित यांस नव्या परिस्थितीचें व नव्या सुशिक्षित वर्गास हिंदु धर्मांतील तत्त्वांचें व परंपरेचें ज्ञान करून दिलें पाहिजे. असें झाल्याखेरीज दोघांचा मिलाफ व्हावयाचा नाहीं. दोघांतहि एकेक प्रकारच्या शिक्षणाची उणीव आहे व ती उणीव भरून काढणें हें खऱ्या सुधारकांचें कर्तव्य आहे.' हिंदुधर्मांतील तत्त्वें सुधारणेस प्रतिकूल आहेत असें नाहीं. तसें असतें तर आजपर्यंत हिंदु धर्मानें टिकावच धरला नसता व हिंदु राष्ट्रहि कायम राहिलें नसतें. (१२-१-१९०४). धर्माचें हें महत्त्व लक्षांत घेऊन सुधारणा योग्य तऱ्हेनें यशस्वी होण्याकरतां हिंदु धर्माचें शिक्षणहि शाळांतून देण्याची तजवीज केली पाहिजे. (३-११-१९०३). व विधर्मी सरकार जर ही गोष्ट मान्य न करील तर धार्मिक शिक्षण देण्यास स्वतंत्र संस्थाहि समाजांतील लोकांनीं निर्माण करण्याची आवश्यकता केसरीनें प्रतिपादिली आहे.

सामाजिक सुधारणा करणाऱ्या लोकनायकांचीं कर्तव्यें, पात्रता व अधिकार तशींच समाजसुधारणेचीं मूलभूत तत्त्वें यासंबंधीं केसरीचें धोरण पाहिल्यावर या विवेचनाचा तिसरा भाग जो सामाजिक सुधारणेचे मार्ग त्याकडे आपण वळूं. या बाबतींतहि तत्कालीन समाजसुधारकांनीं स्वीकारलेल्या मार्गाशीं कांहीं कांहीं बाबतींत केसरीकारांचा तीव्र मतभेद झाला होता. केसरीकारांच्या मतें सामाजिक सुधारणेचा मुख्य मार्ग म्हणजे ' लोकप्रवर्तन ' हाच होय. हें लोकप्रवर्तन करणें ही गोष्ट फार कष्टाची असली तरी त्या एकाच मार्गानें केलेली सुधारणा टिकाऊ नव्हे तर हितप्रद ठरते; हा मार्ग न्या. रानडे वगैरे सुधारकांनीं स्वीकारला होता. इतकेंच नव्हे तर सामाजिक परिषदेचें समर्थन करतांना तिच्या योगानें होणारा मतप्रसार

हा सर्वांत मोठा फायदा होय असें सामाजिक परिषदेच्या अध्वर्यूंनीं प्रतिपादिलेलें होतें. पण हा मार्ग या सुधारकांना हा हिंदुसमाज हलविण्यास अपुरा वाटला व म्हणूनच कायद्याच्या जोरावर हीं इष्ट सुधारणा लोकांवर सक्तीनें लादण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. केसरीकारांनीं या सुधारणेच्या कायद्यास विरोध करण्याचें एक मुख्य कारण बहुजनसमाजावर अशा तऱ्हेनें सक्ति करण्यास सुधारणेच्या कार्यास जरूर असणारी बहुजनसमाजाची सहानुभूति आपण गमावतों ' हें होय. ' जी सुधारणा देशाच्या हिताची म्हणून करणार ती समाजाला पटवून ' देऊन करणें हाच सुधारणेचा उत्तम मार्ग होय, व समाज त्याला पटल्यास ' इष्ट ती सुधारणा करण्यास पुढें येईल. कायदा तरी शेवटीं योग्य रीतीनें परिणाम-' कारक होण्यास बहुजनसमाजाची अनुकूलता लागतेच. पुनर्विवाहाच्या कायद्या-' नें समाजांत पुनर्विवाह विशेष प्रमाणांत आढळून आले नाहींत.' (२९-५-१९००) ' सुधारकांच्या मतप्रसारास यश न येण्याचीं कारणें म्हणजे खऱ्या कर्त्या सुधारकांचा ' अभाव हेंच आहे. बहुजनसमाजाशीं मिसळून व एकाच कार्याशीं समरस होऊन ' त्याच्या प्राप्तीसाठीं आटोकाट प्रयत्न करणारे खरे लोकाग्रणी आमच्याकडे निपजले ' नाहींत हें सामाजिक सुधारणेचें दुर्दैव होय. खुद्द मलबारींचें उदाहरणच त्यांनीं ' अनुकरणार्थ पुढें ठेवून, त्याच्याप्रमाणें शिकस्तीचे प्रयत्न करून लोकांस वळवून ' घेतल्यास सुधारणेचें ध्येय येथें नीट योग्य पाळेंमुळें धरील.' ( १२-८-९० ) ' सुधारकचमूंतील प्रत्येक सेनापतीनें हें लक्षांत ठेवावें कीं कायदे करतात ते अल्प ' लोकांच्या लहरीचें समाधान करण्याकरितां नव्हे. ' बहुजनसमाजास जर त्या-' पासून सुख होण्याची आशा असेल तरच विशेष प्रकारच्या कायद्यास लोकसत्ताक ' राज्यांतील लोक मत देतात; ' (२-९-१८९०) ' कारण, लोकमताची क्रान्ति ' इष्ट तऱ्हेनें झाल्यावर तिला स्थैर्य प्राप्त करून देण्यास कायद्याचा फार उपयोग ' होतो.' (१२-८-९०) असें बहुमत पाठीशीं असेल तर सामान्यतः कायद्याची ' जरूरीच नाहीं व नसेल तर कायदा करणें अन्यायाचेंच ठरेल.' (२९-१०-१९०१) ' म्हणून युरोपांतहि कायदा करून समाजसुधारणा घडवून आणण्याचें तत्त्व ' मागें पडलें आहे.' येथें तर सरकार विधर्मी असल्यामुळें त्याकडून असा ' कायदा करून घेणें कदापि इष्ट नाहीं. पण स्वधर्मी व एकसत्ताक राज्य असलें ' तरी लोकमतविरोधी अशा अप्रिय कायद्याच्या योगानें असंतोषजन्य बंड ' उत्पन्न होण्याचा फार संभव असतो व शहाणे राजे हा मार्ग कधींहि स्वीकारीत ' नाहींत. अशा प्रकारचीं उदाहरणें पाहाण्यास कोणत्याहि देशाचा इतिहास ' फार वेळ धुंडाळण्याची जरुरी नाहीं. मग अशी स्थिति असतां केवळ हिंदु-' समाजाच्या दुर्बळतेचा फायदा घेऊन कायद्यानें एकादी सुधारणा जबरीनें ' त्याच्यावर लादण्याकरितां आमच्यांतील पुढारी म्हणविणारे लोकच पुढें यावेत ' व त्यास या अन्यायाचें कांहींच वाटूं नये ही आमच्या तेजोहीनपणाची

'व स्वाभिमानशून्यतेची परमावधि होय. आतां कांहीं कांहीं कायदे सुधारणा
'प्रत्यक्ष अमलांत आणून ती लोकप्रिय करणाऱ्या कर्त्या सुधारकांच्या मार्गांतील
'अडचणी दूर करण्याकरितांच जरूर असतात. याकरितां, तेवढेंच तत्त्व गोवून
'तेवढ्यापुरता कायदा करण्यासहि केसरीकारांची हरकत नाहीं. (१७-९-१८)
'कारण समाजावर ज्याप्रमाणें इष्ट सुधारणा सक्तीनें लादण्याचा कोणाला हक्क
'नाहीं,त्याचप्रमाणें समाजानें योग्य व्यक्तिस्वातंत्र्याला किती मर्यादा घालावी यालाहि
'कांहीं नियम आहेतच. पण हें व्यक्तिस्वातंत्र्य देतांना तें त्या त्या व्यक्तीपुरतेंच
'वापरावें इतकी खबरदारी अवश्य घेतली गेली पाहिजे. कारण या व्यक्तिस्वातंत्र्याचा
'प्रत्यक्ष परिणाम समाजांत ढवळाढवळ करण्याचा होता कामा नये.'(१७-९-१८).
पण कांहीं झालें तरी होतां होईतों कायदा करण्याचा प्रसंग न येईल तर बरा. कायदा हवाच असला तर अनुकूल असलेल्या मंडळीपुरताच घ्या अशी तडजोड केसरीनें सुचविली. (२८-१०-१८९०).

हें लोकप्रवर्तन करतांना इष्ट प्रचाराचा युक्तायुक्ततेच्या दृष्टीनें विचार करणेंच अधिक योग्य होय. समाजसुधारणेच्या कांहीं पुरस्कर्त्यांनीं समाजसुधारणा समाजाच्या बुद्धीला पटून स्वीकारली जाण्याचा संभव दिसेनासा झाल्यावर नवीन सुधारणा म्हणजे जुन्या आर्यधर्मांतील चांगल्या चालीरीतींचा पुनरुद्धार होय असें दाखविण्याचा प्रयत्न केला. (७-६-८७). यांत अर्थात् त्यांच्या जुन्या वैभवाच्या काळाविषयीं असलेल्या प्रेमभावनेस जागृत करून त्या आधारानें समाजसुधारणा लोकप्रिय करण्याचा त्यांचा हेतु होता. परंतु यापेक्षां कोणत्याहि सुधारणेची भूमिका युक्तायुक्ततेच्या दृष्टीनें ठरवून ती लोकांस पटविण्यांत जास्त कष्ट असले तरी एकंदर दृष्टीनें हाच सुधारणेचा मार्ग सुपरिणामी ठरणार यांत वाद नाहीं. ( १४-७-८७ ). आतां योग्य रीतीनें सुधारणा करण्याकरितां परंपरेचा आश्रय घेणें जरूर असल्यामुळें त्याकरितां एकाद्या सुधारणेचा पुरस्कार करतांना ती या परंपरेशीं व तद्विषयक शास्त्रवचनाशीं विरोधी नाहीं निदान त्यांतील प्रत्यक्ष विरोध असला तरी एकंदर धर्मशास्त्राच्या व खऱ्या हिंदुधर्माच्या मूलतत्त्वांना धरून आहे असा धर्मशास्त्राच्या 'युक्तीनें' विचार करावा लागेल. पण हें करणें निराळें. आणि नवीन सुधारणा म्हणजे जुन्याचा पुनरुद्धारच होय हें म्हणणें निराळें यानें बुद्धिवादापेक्षां भावनेस जास्त प्राधान्य मिळून लोकांची दिशाभूल होण्याचाहि संभव असतो. शिवाय हेंच शस्त्र सुधारकावरहि परत उलटण्याचा संभव कमी नाहीं, म्हणून बुद्धिवादाच्या आश्रयानें लोकप्रवर्तन करण्याचा मार्गच श्रेयस्कर होय. याकरितां निरनिराळ्या सभा काढून त्यामार्फत किंवा व्यक्तिशः याच दृष्टीनें फार जोराची चळवळ केली पाहिजे. 'देशहिताकरितां
'भगवीं वस्त्रें धारण करण्याचा मार्ग महाराष्ट्रास अपरिचित आहे असें नाहीं त्याचा-
'च आश्रय करून निष्कामबुद्धीनें रामदासाप्रमाणें किंवा साल्हेइनिष्ठांप्रमाणें या

'बाबतींत उपदेशकाचा धंदा स्वीकारला पाहिजे.' याकरितां खिस्ती धर्मोपदेशकाच्या 'धांवेचें व दीर्घप्रयत्नांचें अनुकरण सर्वथैव करण्यासारखें आहे.'(१८-१२-१८९०).

या सुधारणा करतांना लोकनायकानें पहिल्यांदां उदाहरण घालून दिलें पाहिजे व या उदाहरणाकरतां समाजाचा छळ सोसून त्याला त्याचें महत्त्व पटविण्याचा उपदेश सतत चालू ठेवला पाहिजे. इष्ट सुधारणा त्रासाशिवाय आचरणांत आणतां यावी म्हणून बहुजनसमाजापासून फुटून निघून निराळे पंथ किंवा समाजहि स्थापन करतां कामा नये. कारण यांचा परिणाम समाजावर अनुकूल होण्याऐवजीं एक तऱ्हेची विरोधी भूमिका निर्माण करण्यांतच होऊन इष्ट सुधारणेचें पाऊल उलट मार्गेंच पडतें. प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज यांवर केसरीनें हेच आक्षेप घेतले आहेत. तेव्हां समाजसुधारकानें समाजांतून फुटून न जातां त्यांत राहूनच सुधारणेचा गाडा पुढें ढकलण्याचा प्रयत्न केला पाहिजे व त्याकरतां समाजाच्या रागासहि तयार असलें पाहिजे. (२५-१०-८७) 'सुदैवानें बहिष्काराचें भय दिवसें-दिवस आतां कमी पडत चाललें आहे.' (४-२२-१८३०) व इष्ट सुधारणेकरितां स्वार्थत्यागपूर्वक झीज सोसणाऱ्या सुधारकाचें वजन समाजावर पडल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. सुधारलेल्या राष्ट्रांतून अशी रीत आहे कीं जेव्हां एखादी गोष्ट अमलांत आणणें इष्ट आहे असें कांहीं लोकांस वाटतें तेव्हां लागलीच ते लोक एकादी लहानशी मंडळी स्थापून जिवापाड श्रम करून स्वार्थाकडे नजर न देतां एकसारखी लोकमत आपल्या बाजूचें करण्याची खटपट सुरू करतात त्याचप्रमाणें वर्तमानपत्रें, व्याख्यानें, स्वतंत्र पुस्तकें व लहान लहान पत्रकें यांच्या द्वारें मतप्रसार करतात, त्याप्रमाणें ज्या ज्या मार्गें शक्य तशा रीतीनें आपलें कार्य आपण पुढें ढकललें पाहिजे. (१८-११.१८५०). कांहीं कांहीं सुधारकांनीं स्वतःची लूथर, ज्ञानदेव, तुकाराम इत्यादि थोर थोर धर्मसुधारकांशीं तुलना केली. तेव्हां केसरीकारांनीं ह्या थोर महात्म्यांचा, स्वमतांच्या ठिकाणीं दृढ विश्वास व तें लोकांशीं पटविण्याचा अट्टाहास, स्वार्थत्याग करण्याची तयारी स्वजनांविषयीं खरें प्रेम व कळकळ याच्या शतांश या सुधारकांच्या ठिकाणीं असतें तर सुधारणेचें पाऊल किती तरी पुढें पडलें असतें असें म्हटलें आहे. (२१-१-१८९६). 'खरा सुधारक आत्मसुखाचा त्याग करतो. त्याचें कर्तव्य सर्वांची स्थिति चांगली करणें होय मग त्यांत आपणास किती कष्ट पडले तरी हरकत नाहीं' असें जें केसरीनें म्हटलें आहे त्यांतील बीज हेंच होय.

पण अशा तऱ्हेनें सुधारणा करूं गेल्यानें इष्ट सुधारणा घडून येण्यास फार विलंब लागेल व त्यामुळें राष्ट्रोन्नतीच्या कार्यांत मोठा अडथळा उत्पन्न होईल असा यावर तत्कालीन सुधारकांनीं आक्षेप घेतला होता. याला केसरीकारांनीं दोन तऱ्हांनीं उत्तर दिलें. विशिष्ट प्रकारची सामाजिक परिस्थिति हे इतर प्रकार-च्या प्रगतीचें आवश्यक अंग नसून ती पूर्णपणें सुधारल्याशिवाय राष्ट्राची प्रगति

होणें शक्य आहे हें निरनिराळ्या देशांचीं उदाहरणें देऊन केसरीकर्त्यांनीं प्रतिपादिलें आहे. तेव्हां सामाजिक प्रगति झाली नाहीं म्हणून राजकीय प्रगति अडवून धरण्याचें कारण नाहीं. (२८-१-१८९६). किंवा राजकीय प्रगतीबरोबर सामाजिक प्रगतीची त्वरा करण्याचें कारण नाहीं. (५-४-८७). आधीं राजकीय कीं सामाजिक हा वाद उत्पन्न करून तो वाढविण्यांत राज्यकर्त्यांचें अंग असून राजकीय प्रगति विलंबित करण्याचा त्यांचा डाव असल्याचा वास केसरीकारास येत होता (११-१-९६) व आज पन्नास वर्षांनंतर सरकारचें एकंदरींत धोरण पहातां केसरीकारांचा तर्क खराच असल्याचें ठरूं पहात आहे. केसरीकारांचें दुसरें उत्तर तात्त्विक दृष्टीचें आहे. कितीहि विलम्ब लागला तरी सामाजिक सुधारणेचा लोकप्रवर्तन हा एकच मार्ग असल्यामुळें या बाबतींत अयुक्त घाई करणें म्हणजे आडमार्गानें जाऊन समाजास नसत्या संकटांत ओढण्यासारखें आहे. त्यापेक्षां सरकारी विलोभनास न जुमानतां हळुहळु पण निश्चयानें ज्ञानप्रसार करून लोकप्रवर्तनाच्या मार्गानें समाजसुधारणा केल्यास ती भक्कम पायावर उभारल्यास राष्ट्रोन्नतीची खरी घटक होईल. या बाबतींत बौद्ध धर्माच्या व इतर पंथांच्या प्रसाराची हिंदुस्थानच्या इतिहासांतील उदाहरणें देऊन हजारों वर्षें ब्राह्मण याच मार्गानें धर्मसुधारणा करीत आले आहेत असें केसरीनें म्हटलें आहे.

समाजसुधारणेचे मार्ग सांगतांना, ही समाजसुधारणा यशस्वी होण्यास त्यांत कार्यविभागाचें तत्त्व अमलांत आणलें पाहिजे असें आणखी एक तत्त्व केसरीकारांनीं सांगितलें आहे. सर्व सुधारणांच्या मागें सर्वांनीं लागण्यापेक्षां एक एक विवक्षित सुधारणा करणें हेंच आपलें जीविताचें ध्येय असें समजून त्याकरितां आपली सर्व शक्ति वेचिली पाहिजे. अशा प्रकारें एकादी सुधारणा अमलांत आणण्याकरितां आपला सर्व जन्म वाहण्याचें ठरवून तसें आचरण करणारे निष्ठावंत समाजसेवक देशांत निर्माण होतील तर सुधारणांचें कार्य फार सुकर होऊन मार्गास लागेल. एक तर यापासून भिन्नभिन्न प्रकृतीचीं माणसें एका सुधारणेच्या कार्यीं पडून उत्पन्न होणारा मतभेद टळेल व जीवितकृत्याच्या जाणीवेनें ती चळवळ अंगीकृत करून तिच्याकरितां झटणारा मनुष्य ज्या तऱ्हेचे प्रयत्न करील तसे सर्वांनीं मिळून होणार नाहींत. तसेंच भिन्न भिन्न प्रांतांतील व जातीजातींतील, धर्मभेदांतील परिस्थिति वेगवेगळी असल्यामुळें त्या सर्वांचें एकीकरण करून समाजसुधारणेला एक निश्चित स्वरूप किंवा वळण देणें जवळ जवळ अशक्य आहे. (२८-१-९६). सामाजिक परिषद राष्ट्रीय होऊं शकेल ही कल्पनाच हास्यास्पद आहे असें केसरीनें म्हटलें त्यांतील इंगित हेंच होय. असें एकीकरण न करण्यानें एकाद्या सुधारणेविषयीं प्रतिकूल ग्रह दुसऱ्याच्या आड येणें वांचलें असतें. या सर्व कारणांमुळें सामाजिक सुधारणेचें वोडण न भरतां श्रमविभाग व कार्य-

विभागाचे तत्त्वावर इष्ट सुधारणा घडवून आणाव्या असा सिद्धान्त केसरीकारांनीं बांधला आहे.

सुधारणेच्या मार्गांची तिसरी भूमिका व्यावहारिकपणाची आहे. जी सुधारणा आपण करूं इच्छितों ती कोणत्या स्वरूपांत व किती मर्यादेपर्यंत आपणांस अमलांत आणणें शक्य आहे हें सुधारकानें सदैव ध्यानांत वागविलें पाहिजे. (२२-९-८७). येथें पूर्वीं उल्लेखिलेला ध्येयवादी व व्यावहारिक सुधारक यांमधील विरोध सगळ्यांत जास्त तीव्रतेनें प्रगट होतो. आकाशांतील ध्येयताऱ्यावर दृष्टि ठेवून नांवाचा भूमीवर पण मनानें अंतरिक्षांत संचार करणाऱ्याच्या ध्येयांत ध्येयवादाचा केवढाहि उत्कर्ष असला तरी व्यावहारिक सुधारकास त्याच्या पार्थिव मर्यादा ओळखाव्याच लागतात. 'हिमालय पर्वत सपाट करून व पृथ्वीवरील सर्व खांचखळगे भरून 'काढावे व अशा तऱ्हेनें समपातळींत आलेल्या पृथ्वीवर नवीन पद्धतीनें रचना 'करण्याचें ध्येय कितीहि रम्य व निर्विवाद दिसलें तरी प्रत्यक्ष व्यावहारिक सृष्टींत कुच- 'कामाचेंच ठरणार.' साधा आगगाडीचा रस्ता करतांना सुद्धां वाटेंत टेकडी आल्यास डोंगरास भोक पाडण्यापेक्षां वळसा घालूनच कुशल कारागिरास पुढें रस्ता आणावा लागतो हीच गोष्ट व्यावहारिक समाजसुधारकाची आहे. पाश्चात्य समाजांतील गृहव्यवस्थेचें चित्र पाहून तें तसेंच्या तसेंच येथें आणण्याच्या खटपटीस आपण लागलों तर त्यायोगानें इष्टफलप्राप्ति दूरवर राहून आपणच हास्यास्पद होण्याचा फार संभव. हीच गोष्ट इतर सर्व सुधारणांची आहे. (११-१०-८७). व्यावहारिक भूमिकेमुळें उत्पन्न होणारी दुसरी मर्यादा समाजाच्या तयारीबद्दलची. सुधारणा सर्व परीनें योग्य असली तरी ती एकदम अमलांत आणण्यास समाजाची कितपत तयारी आहे व भोंवतालच्या परिस्थितीची किती अनुकूलता आहे या गोष्टीचा सुधारकानें अवश्य विचार केला पाहिजे. पुष्कळ वेळां सर्वतोपरीं इष्ट सुधारणा हळूहळू व पायरीपायरीनेंच समाजाच्या पचनीं पाडतां येते. झेपेल तितकेंच ओझें घेतल्यानें कार्यहि लवकर होतें. केसरीकारांनीं म्हटल्याप्रमाणें 'शहाणा 'सरदार शिपायांची कुवत जाणूनच लढाईची सिद्धता करतो त्याप्रमाणें समाजाची 'कुवत पाहूनच सुधारकाग्रणींनीं आपली योजना ठरविली पाहिजे. (९-२-९१). 'बोलणें व प्रत्यक्ष आचरणांत आणणें याच्या सापेक्ष मर्यादा भिन्न असल्याचें जर 'सुधारकांतच आपणास आढळतें व प्रथम मार्गांतील कुशल वाटाडे दुसऱ्या 'मार्गांत कवडीमोल ठरलेले दिसून आले आहेत,' तर समाजाकडे त्याच दृष्टीनें पाहाण्यास नको काय ? याचकरितां सुधारकाच्या अनेक गुणांत सदयता व दूरदृष्टि हे गुण डॉ. कीर्तीकरांनीं वर्णिले होते. पुढाऱ्यानें समाजाला आपल्याबरोबर पुढें घेऊन जाण्यांतच पुढाऱ्याच्या पुढारीपणाची खरी परीक्षा असल्यामुळें समाजाच्या कलानें व त्याच्या चालीनें त्याला चालावें लागतें. (४-१०-८७).

सरतेशेवटीं एका विशेष मुद्दयाचें विवेचन करून समाजसुधारणेच्या मार्गांचें

हें प्रकरण पुरें करतों. सामाजिक सुधारणा धर्माच्या पायावर व समाजाची परंपरा न सोडतां व्हावी असें केसरीकारांनीं प्रतिपादलें आहे. त्या दृष्टीनें विचार करूं लागल्यास शास्त्र व सुधारणा यांचा समन्वय कसा घालावा हें एक कोडें उत्पन्न होईल. परंपरेच्या पायावर व स्वत्वाच्या अभिमानानें सुधारणा करावयाची तर शास्त्राविषयींचा अभिमान जागृत ठेवलाच पाहिजे. समाजाला एकादी सुधारणा पटून त्यानेंच शास्त्राची फारशी चिकित्सा न करतां स्वीकारली तर गोष्ट निराळी. पण तोंपर्यंत इष्ट असलेली सुधारणा शास्त्राच्या आंतर धोरणाशीं तर विरोधी नाहीं एवढें सुधारकानें दाखविणें बरें असतें.(कं.२२-३-९२). उलट, समाजाच्या मनावर शास्त्राची पक्कड कायम नसल्यास समाजसुधारणा अशक्यच होणार आहे. यांतून केसरीकारांनीं काढलेला मध्यम मार्ग त्यांच्या धोरणास एकंदर साजेसाच आहे. शास्त्रांतील सर्व वचनें हीं कांहीं विधिरूप नसतात. तेव्हां प्रत्यक्ष विधीचा विरोध येत नसेल तेथें सुधारणा करण्यांत शास्त्रविरोध उत्पन्न होतच नाहीं. ज्या ठिकाणीं विधि असेल त्या टिकाणीं अगदीं इष्ट सुधारणेचा प्रत्यक्ष निषेध नसल्यास आड वाटेनें विधीची अडचण आपल्यास थोड्या आडवळणानें आपल्या मार्गांतून दूर करणें सहज साध्य आहे.(४-११-१८९०). याचें उत्कृष्ट उदाहरण, विवाहवय वाढण्याच्या बाबतींत तें शास्त्राच्या विधीरूप मर्यादेशीं विसंगत नाहीं, हें टिळकांनीं सिद्ध करतांना जें धोरण स्वीकारलें त्यांत पहावयास सांपडतें. केसरीकारांच्या या शास्त्र व सुधारणा यांचा विरोध काढून टाकण्याच्या धोरणाशीं रोमन इतिहासांत फार सदृश असें एक उदाहरण आहे. रोमन लोकांनीं आपलें साम्राज्य वाढविल्यावर त्यांचा जुना कायदा परकीय लोकांबरोबर वागतांना किंवा परस्पर त्यांच्या त्यांच्यातच न्यायनिवाडा करतांना अपुरा व अयोग्य वाटूं लागला तेव्हां यांतून मार्ग काढतांना रोमन प्रेटरनीं याच युक्तीचा अवलंब केला होता; व अशा रीतीनें प्रत्यक्ष लोकमताला मान्य असलेल्या रोमन कायद्याच्या आधारानेंच त्यांनीं फार मोठी क्रान्ति घडवून आणली. इतकी कीं तेवढ्यापुरतें त्याचें मूळ स्वरूप पार बदलून गेलें. लोकांनाहि त्यांत कांहीं वाटलें नाहीं. पुढें त्याची जस्टिनियनकडून नीट रचना झाल्यावर कायद्याची पायमल्ली न करतां इष्ट त्या सुधारणा मात्र त्यांनीं घडवून आणल्या हें जगाच्या निदर्शनास आलें. शास्त्राविषयींची केसरीची वृत्ति याच तऱ्हेची असून ही त्यांच्या सामाजिक सुधारणेच्या मताची गुरुकिल्ली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

केसरीनें प्रतिपादिलेलीं सामाजिक सुधारणेचीं तत्त्वें अशा प्रकारचीं आहेत. केवळ सामाजिक सुधारणेचें ध्येय केसरीनें आपल्यापुढें कधींच ठेवलें नव्हतें व पुढें टिळकांच्या हातांत केसरी आल्यावर स्वतःस राजकीय प्रगतीसच त्यानें आपणांस मुख्यतः वाहून घेतलें असल्यामुळें, सामाजिक सुधारणेचा केसरीनें आनुषंगिक रीतीनेंच विचार केला. पण सर्वांगीण राष्ट्रोन्नति हेंच केसरीचें अंतिम साध्य

असल्यामुळें या बाबतींतहि खोल विचार करून केसरीनें आपली विचारसरणी निःसंदिग्ध रीतीनें मांडली आहे. या बाबतींत सुधारकांकडून त्यास दोष पदरीं घ्यावा लागला. व इंग्रजी विद्येनें प्राप्त झालेल्या उदार शिक्षणास लाज आणल्याचा दोषारोपहि पत्करावा लागला. (६-३-८८). उलटपक्षीं राजकीय प्रगति हेंच मुख्य ध्येय असल्यामुळें स्वतःच प्रतिपादलेल्या तत्त्वाप्रमाणें सामाजिक सुधारणेचा पाठपुरावा करण्याचे विशेष प्रयत्न त्यांनीं केलें नाहींत. तरी राष्ट्रोन्नतीच्या विविध अंगांपैकीं एक महत्त्वाचें अंग म्हणून सामाजिक व धार्मिक सुधारणेकडे त्यांनीं लक्ष पुरविलेंच व आपल्या मताप्रमाणें पुढें खटपटहि केली. यामुळें यांच्यावर बराच रोष झाला.(८–३–९२). पण केसरीनें दोघांच्याहि रागालोभाची फारशी पर्वा केली नाही व आपलें कार्य तसेंच पुढें चालविलें. आज सामाजिक सुधारणेस जें राष्ट्रीय वळण लागलेलें दिसत आहे तें त्याचेंच फल होय. त्या वेळीं निर्बंधनसुधारणेचा झेंडा रोवूं इच्छिणाऱ्या सुधारकांच्या चळवळीला बांध घालून त्यांच्या लाटा केसरीनें परतवल्या व अशा तऱ्हेनें समाजाचें रक्षण केलें. या बाबतींत त्यांचा बहुतेक सुशिक्षितांशीं विरोध झाल्यामुळें केसरी हा समाजसुधारणेचा विरोधी आहे असा देखावा वर वर पाहणाऱ्यास दिसत होता व यामुळें त्यांच्या सामाजिक सुधारणाविषयक धोरणाविषयीं महाराष्ट्रांत गैरसमजहि पसरलेला आहे. वास्तविक परिस्थिति मात्र अगदीं भिन्न आहे. केसरीनें सामाजिक चळवळीचा पुरस्कारच केला, इतकेंच नव्हे तर त्याची योग्य दिशाहि दाखविली. सुधारणेच्या ऐन भरांत बरोबरीच्या सुशिक्षित मंडळींची निंदा सोसूनहि केसरीनें या बाबतींतलें बहुजनसमाजाच्या वतीनें आपलें कर्तव्य योग्य प्रकारें बजावलें नसतें तर सामाजिक सुधारणेला किती अहितकारक वळण लागलें असतें याची कल्पनाहि करवत नाहीं. सुरू झालेल्या सामाजिक क्रान्तीच्या झगड्यांत ध्येयवादाच्या योग्य मर्यादा दाखवून सामाजिक सुधारणेच्या हिताचा मध्यम मार्ग केसरीनें दाखविला व स्वतः समाजाला तसें पटविलें हीच केसरीची महनीय सामाजिक कामगिरी होय व या दृष्टीनें त्याचें योग्य स्थान भावी इतिहासकारास द्यावें लागेल. तत्कालीं उत्पन्न झालेल्या वादळांमुळें उडालेला धुराळा आतां खालीं बसला असल्यामुळें वातावरण निर्मळ झालें असून ऐतिहासिक दृष्टीनें व निर्विकार बुद्धीनें त्या झगड्याकडे बघतां येण्याजोगी परिस्थिति आज प्राप्त झाली आहे, व तसें करणें हें सुधारणेच्या खऱ्या हितचिंतकाचें कर्तव्य आहे. कारण, आजहि आपल्यापुढें अनेक सामाजिक प्रश्न पडले असून ते सोडविण्यांत गेल्या पन्नास वर्षांतील केसरीचें हें धोरण आपणांस मार्गदर्शक होईल यांत शंका नाहीं.

---

# केसरीनें प्रसृत केलेली परिभाषा

[ श्री. आबा चांदोरकर ]

'जामदारखान्यांत केवळ रत्नें असल्यानें भागत नाहीं, तर ज्याप्रमाणें जाम-
'दारखान्याच्या मालकाजवळ सदर रत्नांच्या रूपाची, वर्णाची किंवा किंमतींची
'याद असावी लागते, तद्वत् भाषेचें शब्दभांडागार वापरणाऱ्यांची स्थिति होय.'
(के. १९०३ अंक ४२).

केसरीनें आतांपर्यंत प्रसृत केलेली निरनिराळ्या विषयांवरील परिभाषा या लेखांत संक्षेपतः देत आहें. गेल्या अर्धशतकांत केसरीनें अनेकविध चळवळींवर लेख लिहिले. त्या त्या ठिकाणीं, त्या त्या चळवळींचें स्पष्टीकरण करितांना महाराष्ट्रांतील सामान्य जनतेस समजेल अशा सोप्या भाषेंत आपलें लेखन करण्याची केसरीची नेहमींची रीत होती. त्यामुळें पुष्कळ वेळां त्याला नवीन शब्दसृष्टि निर्माण करावी लागली तर कांहीं ठिकाणीं पूर्वी प्रचारांत असलेल्या शब्दांना नवीन अर्थाचा पेहराव द्यावा लागला. कित्येक लेखकांनीं केसरीद्वारां पारिभाषिक शब्द पुढें आणून केसरीच्या कार्याला हातभार लावला. असल्या सर्व शब्दसंग्रहाची वर्गवारी करणें सोयीचें दिसल्यावरून, त्याची पुढीलप्रमाणें विल्हे लाविली—(१) आर्थिक—औद्योगिक. (२) कायदा—कायदेमंडळ. (३) धार्मिक. (४) भाषा. (५) मद्यपान. (६) मवाळ पक्ष व त्याचें राजकारण. (७) यांत्रिक. (८) यौद्धिक. (९) राष्ट्रीय पक्ष व त्याचें राजकारण. (१०) राष्ट्रीय सभा. (११) व्यापार. (१२) वृत्तपत्रीय. (१३) शास्त्रीय. (१४) शिक्षण. (१५) शेती. (१६) सरकार. (१७) सामाजिक. (१८) स्थानिक स्वराज्य; ग्रामसंस्था. (१९) किरकोळ. (२०) कोटीवाक्प्रचार—म्हणी. या वर्गांतील निवडून काढलेल्या शब्दांची एकंदर संख्या २८७० म्हणजे जवळ जवळ तीन हजार भरली. इतके शब्द व म्हणी वगैरे दिल्यास लेखाची मर्यादा ओलांडली जाईल म्हणून निवडक शब्द पुढे दिले आहेत. कांहीं ठिकाणीं शब्दांचें स्पष्टीकरण होण्यासाठीं ते ते शब्द ज्यांत आले आहेत अशीं केसरीनेंच लिहिलेलीं वाक्यें घेतलीं आहेत. सारांश, अशा निरनिराळ्या विषयांच्या परिभाषेचा त्रोटक संग्रह या लेखांत केला आहे. परंतु, लेखकाला ही जाणीव आहे कीं, हा संग्रह पूर्ण नाहीं, तें काम पुढें कोणींतरी करावें.

या संग्रहांत सर्वांत कमी (म्हणजे ५०) शब्द 'आर्थिक' विभागांत असून सर्वांत जास्त (म्हणजे ४८०) शब्द 'राष्ट्रीय पक्ष व त्याचें राजकारण'

या विभागांत आहेत. असें होणें साहजिक आहे. कारण, देशांत राजकीय जागृति उत्पन्न करण्याचें ध्येय केसरीनें आपल्यापुढें ठेविलें आहे व तें तो अव्याहत पाळीत आला आहे.

या संग्रहाचे बहुशः चार प्रकार पडतात. पहिला—मूळच्या इंग्रजी शब्दास किंवा म्हणीस मुद्दाम बनविलेला मराठी शब्द किंवा म्हण; उ० इंग्रजी 'ब्युरो-क्रसी' या इंग्रजी शब्दासाठीं बनविलेला 'नोकरशाही' हा मराठी पारिभाषिक शब्द आणि 'गुड गव्हर्नमेंट इज नो सब्स्टिटयूट फॉर सेल्फ गव्हर्नमेंट' या इंग्रजी म्हणीची छायारूप 'स्वराज्याची तहान सुराज्यानें भागत नाहीं' ही मराठी म्हण. दुसरा—इंग्रजी शब्दांना आपल्या इकडे पूर्वी वापरण्यांत असलेले समानार्थक शब्द हुडकून ते देणें; उ० 'रिप्रेशन' शब्दासाठीं 'सोटेबारगिरी' किंवा 'दडपशाही' हे शब्द वापरणें. तिसरा—पूर्वी प्रचारांत असलेल्या शब्दांना चालू परिस्थितींत उपयोगी पडेल असा निराळा अर्थरूपी पेहराव चढविणें; उ० 'आगंतुक बहुमत,' 'चातकवृत्ति' इत्यादि. चौथा—स्वतंत्रच शब्द बनविणें.

इंग्रजी शब्दांना जे मराठी पारिभाषिक शब्द दिले आहेत त्यांच्या पुढें मूळ इंग्रजी शब्द द्यावयास पाहिजेत, पण त्यामुळें लेखविस्तार होईल म्हणून ही रीत सर्वत्र अंमलांत आणिली नाहीं.

## ( १ ) आर्थिक व औद्योगिक

**अर्थशास्त्र,** अर्थशास्त्रसाधु ( आपला स्वार्थ साधणारा अर्थशास्त्री ); आर्थिक स्वातंत्र्य, आ० व्यवस्था; **औद्योगिक** स्वातंत्र्य, औ० पारतंत्र्य, औ० पहाणी, औ० बहिष्कार, औ० शाळा, औ० शिक्षण; **चलन,** सुवर्ण च०, रौप्य च०, कागदी च०, कृत्रिम च०; **व्यापारी** मंडळ, व्या० महामंडळ ( चेंबर ऑफ कॉमर्स ); **हुंडणावळ** ( एक्स्चेंज, होम चार्जेस ), हुंडणावळाई ( एक्सचेंज कॉम्पेन्सेशन = युरोपियन अधिकाऱ्यांस देऊं केलेली हुंडणावळीची रकम); **कृत्रिम** किंमत, कृ० नाणें, कृ० महागाई; **श्रमसंयोग** ( यूनिअन ऑफ लेबर); **लोखंडी रस्ता** ( रेल्वे ); **शिलकेच्या सौभाग्याचा टिळा** ( बजेटांत कांटाकांट करून दाखविलेली शिल्लक ); **संघशक्ति; स्वदेशी** चळवळ, स्व० भांडवल, स्व० उद्योगधंदे; **धंदे** घरगुती (कॉटेज इंडस्ट्री), धनोत्पादक धं०, धं० शिक्षण, धं० शि० च्या शाळा; **गंगाजळी; आधीं** तक्रार मग पैसा ( ग्रीव्हन्सेस बिफोर सप्लाय ); **देशी** माल.

इकडील बुकिश अर्थशास्त्र्याबद्दल केसरीनें विनोदानें पुढील वाक्य लिहिलें आहे—'येथें अशी कांहीं मंडळी आहेत कीं, आपलें घर जळलें तरीहि (इंग्रजी) 'अर्थशास्त्राचा सिद्धान्त उराशीं वांधून ते बाहेर पडतील आणि विचार करीत

' बसतील कीं, आतां ( आपल्यासाठीं ) नवें घर बांधणें चांगलें कीं हॉटेलांत ' जाऊन रहाणें चांगलें ! '

## ( २ ) कायदा व कायदेमंडळ

**अंदाजपत्रक**, जमाखर्चाचा खर्डा, ( त्यांतील ) आंकड्याचें गौडबंगाल, आं० भ्रामक चक्रव्यूह, आं० प्रदर्शन,अंकगणिती कोड्या; बिलाचें पहिलें–दुसरें-तिसरें वाचन; **नगदी** खातें; **पिशवीवरील** ताबा, पि. ची दोरी ढिली करणें; **खजिन्याची** किल्ली; **अल्प** संख्याकवर्ग, **मागासलेला** वर्ग; **बहुसंख्याक** वर्ग; **मध्यम** व **कनिष्ठ** वर्ग; **अस्पृश्य** वर्ग; **पुढारलेला** वर्ग; **वरिष्ठ** वर्ग; **अंमल-बजावणी** खातें; **परराष्ट्र** खातें व त्याचा मंत्री; **फडणीस** व फडणिशी खातें; **गुप्त** चौकशी खातें;**कायदेकानुमंडळ**,प्रांतिक का.मंडळ,वरिष्ठ का. मंडळ,प्रांतिक सल्लागार कौंसिल,स्थानिक का.कौं.,बादशाही का.कौं.; कार्यकारी किंवा कारभारी कौं. किंवा मंडळ, लोकनियुक्त कौं., मध्यवर्ती कायदेमंडळ, विधिमंडळ; **आमदार**; **खासदार**; **मंत्री**, आरोग्यमंत्री, कायदेमंत्री, शिक्षणमंत्री, मंत्रिमंडळ, गृहमंत्री, मंडळ ( पॅनेल ); ( कायदेमंडळांतील ) **तोडून** दिलेल्या बाबी, सोंपीव खातीं, राखीव खातीं; **लोकनियुक्त** प्रतिनिधी, **सरकारनियुक्त** प्रति.; **जातवार** प्रति.,जा. प्रतिनिधित्व, जा. निवडणूक, जा. सभासद; **जबाबदार** राज्यपद्धति, ज.प्रातिनिधिक राज्यशासनपद्धति; **एकतंत्री** कारभार, ए० सत्ता, एकहाती कारभार; **कायदा**, जुलमावर कायद्याचा पेहराव चढविणें, कायदेशीर जुलूम, विधवापुनर्विवाहाचा–बालविवाहाचा-बालावृद्धविवाहाचा–काळीच्या जमीनमहसुलाचा–संमतिवयाचा–गौप्यगोपनाचा–विद्याधनाचा–उडाणटप्पूचा–स्वराज्याचा ( रिफॉर्म )–दडपशाही-चा–जुन्या इमारतींचें संरक्षण करण्याचा–ग्रामसंस्थांचा–राज्यघटनेचा कायदा; कायदेशीर लबाडी, कायदेशीर न्यायाऐवजीं राजकीय न्याय देणें, कायदेशीर मोकळीक, का० जबाबदारी, कायदेभंग; **मोर्ले-मिंटो व मांटफर्ड योजना** ( यांतील सुधारणांना अनुलक्षून योजलेले संकेत ) **बड्या** नालायकांचें कौन्सिल ( इंपेरिअल कौं. ), ब. ना. माळका, ब. राजबिंड्यांचें कौं. नोटेबल किंवा प्रतिष्ठित नालायकांची सभा, सुधारणारूपी टोणग्याचें आंचळ, तांदुळाचे भातेण, पोचट सुधारणा, भाकड वांझ गाय (डायार्की), **दुतोंडी** राज्यकारभार, दुहेरी रा., दोहाती रा.,द्विदल रा.,**प्रांतिक** स्वराज्य, प्रां. स्वातंत्र्य: दिवाण, दिवाणशाही, प्रधान; **अप्रीति** म्हणजे ( सरकाराबद्दल ) प्रीतीचा अभाव नव्हे ( १९१६ चा टिळक खटला बॅचलर–शहा–निर्णय ); **काट** (कट बजेटांतील); **सभासदांची** निवड-णूक करण्याच्या शेलक्या मंडळ्या ( इलेक्टोरल ऑलिगॉर्कीज ); **मत**, मतदान, मतदारसंघ, म.ची पायमल्ली, प्रमाणशीर मतदानपद्धति, मतदारसंघाचें बहुमत ( रेफरेंडम ), स्वतंत्र मतदारसंघ, मिश्रमतदारसंघ; **प्रतिनिधी** मुखत्यार; **कर**-

**बंदी**; **गोलमेज** परिषद, वाटोळी प., चक्री प.; **चौकशी** मंडळ ( कामिशन ); **जोडमंडळ** ( जॉइंट कमेटी ); **तडजोड** करणारी मंडळी ( कन्सीलिएटिंग कमेटी ); **तपासनीस** मंडळ; **निंदाव्यंजक** ठराव; **नरेंद्रमंडळ**; **प्रमाणपत्र** ( सर्टिफिकेट ); **प्रतिवृत्त** ( रिपोर्ट ); **प्रतोद** ( व्हिप ); **फेर** निवडणूक; **विन** मुदत तहकूब; **भिन्न** मतपत्रिका; **मुख्य** नियामक राज्यसंस्था ( सेंट्रल गव्ह. ); **राजकीय** गुन्हा, रा. बंदी; **लोकनियुक्त** सभासद, लो. पंच ( ज्यूरी ); **वट-हुकूस**; **सनद** ( कॉन्स्टिटयूशन ); **कांटकसरेची** कात्री; **राष्ट्रसंघ**; **कायद्यानें** प्रस्थापित झालेलें राज्य.

## ( ३ ) धार्मिक

**व्याजोनारायण**, **मुद्दलनारायण** ( संन्यास घेऊन सावकारी करणारा ); **क्वायेटिझम्** ( संन्यास ); **समानोदक** बांधव; **कुल**—प्रवर्तक; **तत्त्वज्ञपुंगव**; **ईश्वरभाव** ( राजसत्ता ); **स्वधर्मश्रेष्ठत्व**—स्वराष्ट्रश्रेष्ठत्व जोडी; **योग** (धर्म व व्यवहार यांची जोडी घालण्याची युक्ति ); **धर्महित**; धा. शिक्षण; **अदृष्टार्थक**, अदृष्ट फलक; **अस्तिनास्तिरूपी** किंवा तत्तदितररूपी विभाग ( डिव्हिजन बाय डायकॉटमी—उ० ब्राह्मणेतर पक्ष ); **उपासकबंधुत्व**; **उत्सवभक्ति**; **उपाधि** (कंडिशन).

## ( ४ ) भाषा

**देशी** भाषा, दे. भा. तील शिक्षण; **भाषोत्कर्ष**; परिणत भाषा; भाषानुसार प्रांतविभाग किंवा रचना; पिंडान्वय व भाषान्वय; **उच्चारसंकर**, उ. भेद उ. शरणपक्ष; **जिव्हवळणी** उच्चार; **आर्ष** महाकाव्य ( एपिक पोएम ); **वैयाकरणांची** कांग्रेस; **वैयाकरण** खसूचि; **एकदेशी** भाषा, राष्ट्राचें हत्यार; **भाषावृद्धि**; **मातृभाषा**; **भाषामालाकार**.

## ( ५ ) मद्यपाननिषेध

**मद्यपान**, म. निषेध, म. नि. मंडळ--सभा--चळवळ; **मितपान**; **पान-स्वातंत्र्य**, पा. चें बंड; **बेतानें** पान करणाऱ्या मंडळ्या ( टेंपरन्स असोसिएशन्स); **सुराग्रह** ( यज्ञांत पूर्वी ताकांत गूळ कालवून घेण्याचा प्रघात असे त्यास अनुसरून ); **पहारा** किंवा निरोधन ( पिकेटिंग ); **रंभा** ( दारू ); **टयूटॉनिक व्हाइस**; **अबकारी** खात्याच्या मदिरा देवीचा स्वयंभू ' नाइट एरंट '( मुख्याधिकाऱ्यावरील कोटी ).

## ( ६ ) मवाळपक्ष व राजकारण

**अर्जाचीं** भेंडुळी; **थपडा** खाणें; **आर्जव** करण्याची सनद किंवा हक्क; **चार** आणे स्वातंत्र्य, आठ आणे, स्वा. आकुंचित; स्वा. गोडवेपणा, दे ग बाई जोगवा,

पोंचटपणा; पुच्छप्रगति; भैक्ष्यवृत्ति, भिक्षांदेही; मंदगामी, मुळमुळीत विरोध; विनंतीअर्जांचा मार्ग; हंगामी डेप्युटेशनें, अधिकाऱ्याचा दास; चतकोर भाकरी-वाला, चार आणे स्वातंत्र्यवाला; आशाळु, उभयान्वयी, कातडी बचावणारा, गद्बळ मतीचा; गौरीहाराची पूजन करीत बसणारी वधू ( पार्लमेंटांतील निर-निराळ्या पक्षावर अवलंबून असणारा ); चहाडचुचका, चातकवृत्ति; जुना पक्ष, जुनीं खोडें व नवीन शेवाळें; जोहुकुमवाला; बैल ( डोळझांपणें लावून नोकर-शाहीच्या किल्ल्याभोंवतीं हिंडण्यास शिकविलेला ); नरम; बृहन्नडा; भगत; भीक मागणारा, नोकरशाहीचा भाट; मवाळकीची टिमकी वाजविणारा; मेषपात्र; रड्ये (पेसिमिस्ट); राष्ट्रीय सभेचा वतनदार—वतनदारीचा हक्क; लंगडा; विद्वान; सरकारच्या हातांतील खेळणें; सरकारजमा; सरकारचा तुताऱ्या, खो खो घाल-णारा ( सरकारावांचून आपलें चालणार नाहीं आणि सरकारशीं विरोध करणें इष्ट नाहीं या दोन खुंटाभोंवतीं ); होयबा पुढारी; कणगुल्यांतील सभा ( मवाळांची कन्व्हेन्शन ); नेमस्तांना गोळा करा ( रॅलि धी मॉडरेट्स-मोर्ले ); भारतीय मवाळ सभा; मॉडरेशन—' सुधारक, गैरसुधारक या सामाजिक भेदा-पासून मॉडरेशन उर्फ नेमस्तपणा आणि एक्स्ट्रीम अथवा जहाल जाणारे हा भेद करण्याचा कित्येकांनीं प्रयत्न केला.' ( ४-७-१८९९ ). म्हणजे नेमस्त व जहाल हीं दोन नांवें, रँड प्रकरणाच्या वेळीं पुण्यांतील सुधारकपक्षानें, राजकीय पक्षोपन्यासप्रकरणीं आपण होऊन शोधून काढिली व आपला बचाव करण्याचा प्रयत्न सुरू केला.

## ( ७ ) यांत्रिक

चित्रयंत्र ( फोटो कॅमेरा ), चलच्चित्र ( सिनेमा )—पट, छायाचित्र (फोटो), तेलाड्या ( जमिनींतील तेलाचे झरे शोधणारा ), दूरदर्शक यंत्र, दूरध्वनिवाहक-यंत्र ( टेलिफोन ) ध्वनिप्रक्षेपक यंत्र ( ब्रॉडकास्टिंग ), पाणाड्या, बिनतारी तारायंत्र, बैठक ( बेस ), लोहमार्ग ( रेलवे ), वाटाड्या ( पायलट ), वातोदक ( सोडा वॉटर ), सृष्टिगत शक्ति, शिल्पचितारी (ड्राफ्ट्समन), धावता घोटा—( त्यांतील ) बाण्याची किंवा आडवणीची कांडी, ताकदीचें सूत, ( ताण्याच्या ) गुंडाळ्या, कमान ( स्प्रिंग ), पांजणयंत्र.

## ( ८ ) यौद्धिक

अग्निजलवृष्टि, हुकमतीची जागा, आकाशयान—विद्या, आरमारी लढाई, आ० वेढा, उघड चढाओढीची परीक्षा, कुलपी गोळा, खडी फौज, खंदकांची किंवा चराची चढाई, दमछाकीची ल०, गण, गणवेष ( युनिफॉर्म ), गरनाळ ( हावित्झर ), चिलखती गाडा—रणगाडा ( टँक ), शिस्तीची पिछेहाट, गनिमी

कावा–लढाई, गुपचुपी धोरण, चढावाचें धोरण, चढाऊ हल्ला, डांबरबत्ती, दर्यासारंग, लांब पल्ल्याची तोफ, थंडें मिशन ( तिबेटवर गेलेलें ), बिनधुराची दारू, विषारी वायू–धूर, नाविक दळ, निरोप्या ( डिस्पॅच रायडर ), निर्मनुष्य भूमि, नागरिक, नाविक सैन्य, पगारी–भाडोत्री शिपाई, पाणबुडी, पाणतीर, पाणसुरुंग, फेरहल्ला, फुंकणी ( केपाची बंदुक ), बचावाचें धोरण, गर्दीचें साल ( १८५७ ), बेडर जहाज, पेन्शनर भूयसी ( बाउंटी ), भारतसंरक्षक सैन्य, मनुष्यबल, महायुद्ध, युद्धमंत्री, यु० परिषद, यु० भूमि, युद्ध्यमान, अयुध्यमान, रणगाजी, रुग्णपरिचर्या–पथक, लढाऊ जात, लष्करी भूत, ल० नोकरशाही, ल० मिशन, ल० कमिशन, ल० भरती, ल० अरेरावी, ल० वर्णभेद, शुश्रूषा-पथक, तात्पुरता तह, शस्त्रास्त्रांनीं राखलेली शांतता ( आर्म्ड पीस ), सरक पूल, सरकती सरहद्द, सरदार ( सेनापती ), फौजी किंवा जंगी (लाट ) कमांडर इन् चीफ, सर सेनापति, सैन्यभरती, स्वयंसैनिक.

## ( ९ ) राष्ट्रीय पक्ष व राजकारण

अखेर किंवा अंतिम फळ किंवा साध्य ( गोल ), अडवणूक--मार्ग, अंत-र्व्यवस्था--मागणी, अप्रत्यक्ष प्रतिकार, अदृष्ट साधन ( मॉरल फोर्स ), अन्योन्य प्रतियोगी, अत्याचार, उपाधी ( योजना ), असंतोष, अराजक, अ० चळवळ, अस्वस्थता, आत्ममहत्त्व ( स्वाभिमान ), तुरुंगांतील शिस्त ( इंग्रजी राज्यांतील शिस्त), इंग्रजी जळू, उदारपक्ष, मजूरपक्ष, हुजूरपक्ष, एकमत, उदारमतवादी, एक व्यक्त पाऊल ( ए डेफिनेट स्टेप ), एतद्देशीय, एकविचारानें भरणें, एकमुखी सत्ता-मागणी, कमाल ( मॅक्झिमम् ), किमान, कायदेशीर मार्ग-हक्क-चळवळ-भांडण-लढाई-लेख, क्रांतिकारक-चळवळ, गरम पक्ष, जहाल, सणसणीत ज०, जबाबदार प्रातिनिधिक राज्यशासनपद्धति, जशास तसें, जंगल-सत्याग्रह, जिल्हा-संस्था, जिव्हाळ्याचा चिमटा, झीज सोसून, टप्प्याचा दगड, डोंगरीची हवा, तीन दुकली ( वेदांती–स्वर्गप्राप्ति व मोक्ष, व्यावहारिक–मोहोर व फल, राजकीय–स्वराज्य व स्वातंत्र्य ), तरुण पिढी, दांत व नखें काढून घेणें, देशी–कापड–चळवळ–वर्तमानपत्रें–उद्योगधंदे–भाषा–सुधारणा, निग्रहसामर्थ्य, निराशाधैर्य, ‘ न गणसि मज जातों तुच्छ मानूनि तूतें ’ ( १८ जून १९१८ चा वुइलिंग्ड-नचा मुंबईचा युद्धदरबार ), ना मत ना कर, नवीन ( राष्ट्रीय ) पक्ष, निराशा-जनक असंतोष, निर्भीड पक्ष, प्रभातफेरी, पाळीव जनावरें ( हिंदी लोक ), पडदानशीन चौकशी, पुनश्च हरिः ॐ, पाचरेच्या चंचुप्रवेशाचें तत्त्व, पूर्ण स्वराज्य, प्रतिकार–निःशस्त्र प्र०, प्रांतिक व्यवस्था, प्रजापक्ष–पक्षीय राजनीति–सत्ताक राज्य, प्रतिनिधी ( डेलिगेट )–सत्ताक राज्यपद्धति, पाच्छाईपणा ( इंपेरियालिझम् )–भूत बंगालफाळणीबहिष्कार–शस्त्र, बेगडी सुधारणा बहुमत मत–वैचित्र्य–

प्रसार--विरोध--स्वातंत्र्य--भेद--भेदांत मतैक्य, मार्गभेद, माथेफिरू ( अना-र्किस्ट ), मेंढरें ( हिंदी लोक ), योजना ( स्कीम ), रक्तपातशून्य क्रांती, राज-कारण, राजकीय सुधारणा-कैदी-हक्क-चळवळ-नावाडी-बहिष्कार-झगडा-धर्म-असंतोष-शिक्षण-वैद्य ( पुढारी ), राष्ट्रसंघ, राष्ट्रीय-पक्ष-उत्सव-अस्तित्व-हितबुद्धि-चळवळ-झेंडा-ताबा-स्वातंत्र्य-हित-एकी इमारत-उन्नति-धोरण, राजनीति-कपटप्रयोग, राज-धर्मबंधुत्व, राज्यक्रांति-घटना-सूत्रें-कारभाराच्या गाड्यास खीळ घालणें, लोकमताची दोरी-वाढ-हक्क-सरकारास विकणें-पायमल्ली-जागृत करणें, लोकसंग्रह-नायक-नियुक्त सभासद, लोकशाही (डेमॉक्रसी), लोकतंत्रराज्यपद्धति, वंगभंग-चळवळ, विचार-स्वातंत्र्य-क्रांति, लोकमान्य, विभूतिपूजा, शिष्टमंडळ, संघ ( लीग )-शक्ति,संघायक संस्था, सदाशावाद, सनदशीर ( कॉन्स्टिट्यूशनल) ना. गोखल्यांनीं १९०७ चे सुमारास कॉन्स्टि० याला सनदशीर हा शब्द प्रथमतः वापरला. तो केसरीला मान्य नव्हता. त्यांचें म्हणणें--इंग्लंडांत लोकांना स्वराज्याची सनद म्हणजे कॉन्स्टि० आहे म्हणून तेथली चळवळ सदनशीर म्हणण्यास हरकत नाहीं, पण येथें तशी सनद नाहीं, किंबहुना अशी स्वराज्याची सनदच आम्हांस मिळवावयाची आहे म्हणून सनदशीर हा शब्द योजणें म्हणजे 'मृगजलाप्रमाणें देशाचे मनांत भ्रम उत्पन्न करून लोकांना सपशेल फसविणें आहे.'–( के. १२-२-०७,५-३-०७ ). भांडण-चळवळ-हक्क, समानहितत्व, सवतीचीं पोरें ( हिंदी लोक ), संस्थानी स्वराज्य, सार्वजनिक–सभा–दृष्टि–नाईक (पुढारी)–हित, सामुदायिक शहाणपण, सुराज्य, सुवर्णमध्य स्मशानशांतता, स्वदेशी–चळवळ–अंतिम स्वरूप स्वराज्य, स्वराज्य–स्व म्हणजे ज्याचा तो म्हणून प्रजेच्या सल्लयानें चालणारें तें–चा म्हणजे दिल्लीचा कारभार–स्वातंत्र्याची पायरी–निर्भेळ–वादी ( होमरूलर )–तीन प्रकार साधे स्वराज्यवादी, वीर स्वराज्यवादी व पूर्ण स्वातंत्र्यवादी )–हक्काची मागणी–प्रांतिक–पूर्ण–हें कायदेशीर ध्येय–हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळविणारच–रूपी बंदर व चळवळरूपी नौका–संघ ( होमरूललीग )–वाले, स्वातंत्र्य-पूर्ण स्वातंत्र्य अनियंत्रित स्वा०-स्वा० चें सार-झगडावादी, साम्राज्य–चा घटकावयव–भागीदार–अंतर्गत–साम्राज्याच्या गरजा येती आमच्या कामा--ची नड तीच हिंदुस्थानची सवड, हक्क, होमरूल--संघ-स्पेशल ( गाडी ).

## ( १० ) राष्ट्रीय सभा

अधिवेशन, अंतरराष्ट्रीय, आंतिमांतील अंतिम मर्यादा–अंतिम हेतु (क्रीड )--अं. मूलतत्त्व ( क्रीड ), अनत्याचारी, असहकारिता, असहकारवाद--वादी, अर्ध्या भाकरीचें स्वराज्य, अर्धे स्वातंत्र्य, असंदिग्ध मागणी, आगंतुक बहुमत ( रा. सभा ज्या प्रांतांत भरते तेथील प्रतिनिधी जास्त असतात, त्यामुळें प्रांतवार मतमोजणींत त्या प्रांताचीं मतें जास्त पडतात तें ), एकगठ्ठा, एक--

राष्ट्र--राष्ट्रीयत्वाचें जाळें, एकमुखी रुद्राक्ष ( एकहाती सत्ता, एकमत ), कांग्रेस--भक्त--मुख्य मागणी-- लीग, स्कीम--लोकशाही पक्ष ( कां० डेमोक्रॅटिक पार्टी )--जादा कां०, कार्यक्रमपत्रिका, कंठाळी ठराव, कायमठशाचे ठ०, खुला अर्ज, खादी--चळवळ, गैरसनदशीर, गण ( कोरम )—भरती, गोठ्यांतील गुरें ( हिंदी लोक ), गीतावाक्य ( पालुपद ), घटक ( यूनिट ), चरखा, चर्चात्मक ( डेलिबरेटिव्ह ), जाहिरनामा ( मॅनिफेस्टो ), जोर ( स्ट्रेस ) ची हरकत, दर्जा (स्टेटस्), दुही, ध्येय, नागरिक हक्क, नाफेर-पक्ष-वाला, नियंत्रणमंडळ, निर्वाणीचा खलिता, निःशस्त्र-युद्ध-प्रतिकार, परकी-सरकार-राज्य-अधिकारी, पक्षभेद, पुढारी-तोतये, प्रतिकार-शक्ति-बुद्धि, प्रतिनिधी-सत्ताक राज्य-सभा, प्रतिसहकार-पक्ष, प्रतियोगी सहकारिता, प्रचारक, प्रजा-पक्ष-द्रोह-सत्ताक राज्य, प्रांतिक-सभा-स्वातंत्र्य, प्राप्तव्य (गोल), फेरपक्ष-वाला, बहिष्कार-राजकीय-व्यापारी--योग--राष्ट्रीय, बहुमत--विस्तार--चा जुलूम, मुखत्यार ( डेलिगेट ), राजकीय—सभा—चळवळ--मिशन—पक्षोपन्यास--हक्क, राष्ट्रीय—सभाबलुतेदार ( स्वयंसेवक ), राष्ट्रीय सभा--राजकीय मिशन- मवाळांची मजलस ( १९१४ ची ), राष्ट्राचें मुख--सभापति--वार्षिक श्राद्ध--तमाशा ( मवाळांची ), लोकमत-दांडगें- प्रबळ, केंद्रीकरण दाब, वसाहत-चें स्वराज्य, दर्जा, विशिष्ट मत ( क्रीड ), वाटोळी परिषद, विषयनियामकमंडळ, विघातक चळवळ-पुढारी, शिष्टमंडळ, संमिश्रपक्ष, संकुचित स्वार्थ, सत्याग्रह, सविनय कायदेभंग, सर्वाधिकारी, संमेलन, सामुदायिक चळवळ, सहकारिता, सर्वस्पर्शी-चळवळ-ठराव, सभासद-भाषणस्वातंत्र्य-चीं मतें पुन्हां घेणें ( री-ओपनिंग धी क्वश्चन ), स्वराज्य-दानाची पर्वणी-ची तहान सुराज्यानें भागत नाहीं-ची चतुःसूत्री-संयुक्त स्वराज्य ( फेडरल गव्ह. )—एकमुखी मागणी-चीं तीन साधनें-वाद-वादी, स्वयंनिर्णय, स्वागतमंडळ, स्वसत्ताक, स्वयंशासित, स्वावलंबन, स्मशानगीत, स्वातंत्र्य-अमर्याद बिनतावेदारीचें, हस्तपत्रक, हातकातणीची व हातविणीची खादी, हिंदी स्वराज्यसंघ.

## ( ११ ) व्यापार

नाकेदारी ( बंदरांची )—नाकेबंदी, खुला व्यापार, अप्रतिबंध व्या०, संरक्षित-सप्रतिबंध ( प्रोटेक्शन ), व्यापारी-हिताहित-मोहीम-शिक्षण-मंत्री-वकील-द्रव्य-शोषण-वर्चस्व-स्वातंत्र्य लुबाडणूक, जकात-आयात-निर्गत-संरक्षक-स्थानिक, कमताना ( बट्टा ), पतपेढी, विलायती-कापड-माल-त्यावरील बहिष्कार-निरोधन, माल-पक्का-कच्चा, देशबुडवी दलाली, हुंडी, हातचें कर्ज, मंडळ ( ब्यूरो ), पैशाची सरकारी मदत ( बाउंटी ), घरमोडीचा व्यापार, भयंकर द्रव्यशोष.

## ( १२ ) वृत्तपत्रीय

ईश्वरनिर्मित वाटाडे ( अँग्लो इंडि० वृत्तपत्रकार. कोटी ), गंजीवरील कुत्रीं ( अँ. इं. वृ. कार )--राजांगणांतील काटे--हिंदुस्थानावर चरणाऱ्या गोऱ्यांचे बगलबच्चे--चा कोल्हेशाई उपदेश, अग्रलेख, आन्हिक पत्र ( डेली ), आरती ( टीका ), आरोपित लेख, ओवाळणी (टीका), इशारत, कर्णधार (संपादक), कागदी लढाई, खलाशी ( लेखक-कोटी ), खेप ( अंक ), चरचरीत लेख, चाळणी ( टीका ), छेदक ( प्यारा ), टांकानें व ओठानें हुल्लड करणें, टाइम्स-लुटारूपक्षाचा--कोंवडा--अँ. इं. चें कुलंगें कुत्रें--इंग्रजी काळ, टीकालेख तार-वटलेले टीकाकार टीका--कुचकी--कडक, पत्रकर्त्यांची गस्त (के० व. १ अं. १), परप्रकाशमंडळी ( इंदुप्रकाश, ज्ञानप्रकाश )--पुण्यामुंबईचीं फेरोजशहाचीं तुण-तुणीं--मवाळपक्षीय दिवट्या, पुनश्च हरिः ॐ, प्रात्याहिक ( डेली ), प्रेस ॲक्ट, बातमीदार, सथळा, मानेभोंवतालची दोरी--तांत--फास ( १२४ अ कलम ), मुद्रण--स्वातंत्र्य--अधिकार, मुद्रित ( प्रुफ ), मेघनाद ( प्रथम लंडन टाइम्स नंतर टाइम्स ऑफ इंडिया, हल्लीं दोन्ही ), मेथा शेटजीच्या शाळेंतील लहान पोर व तिची ठेंगु किंवा नीच नजर ( इंदुप्रकाश, त्याचा बुटका संपादक ), राजद्रोह-चें माप, लेखनस्वातंत्र्य, लेखणीहास्ये, लेखणीपांडित्य, वर्तमानपत्र--देशी--कर्त्या--चें स्वातंत्र्य--लोकांचें राजकीय शिक्षक-चा कायदा ( प्रेस ॲक्ट ), लि. आ. म. ( लिहून आलेला मजकूर ), वहिवाटदार ( मॅनेजर ), वाचिक प्रतिकार, वाटोळीं जुडकीं, वार्ताहर, व्यवसायबंधु, शीर्षक ( हेडिंग ), शिरोलेख, शिवरें पत्र, सदर ( कॉलम ), सरकारजमा, स्फुट सूचना, सहसंपादक, सहकारी, सूतउवाच, सर-स्वतीदान ( कडक टीका ), स्थलसंकोच, स्थानिक, ज्ञानाचा खंदक, इहवृत्त.

## ( १३ ) शास्त्रीय

रसायनशाळा, पंचांग--शोधन--सूक्ष्ममान--निरयन--रीत--ज्योतिषीशास्त्रदृष्ट-फलक, अपूर्णावस्था, औषधांचें वीर्य--तीव्रता, उत्क्रमणतत्त्व ( इव्होल्यूशन ), नियमबद्धतेची सार्वत्रिकता ( यूनिफॉर्मिटी ऑफ लॉ ), ज्ञेयशास्त्र, मनोधर्म ( मॉरल इन्टेन्शन ), सुखवाद ( हिडॉनिझम ), सत्यबोध, द्रव्य ( मॅटर ), गति-शक्ति ( फोर्स ), संवेदनशक्ति ( कॉन्शस्नेस), प्रयोगसिद्ध, किरणपट्टा (स्पेक्ट्रम), शास्त्रकलामंदिर, शब्दव्युत्पत्तिशास्त्र ( फायलॉलजी ), भुवनसंस्था, अंकपाश, पाण्यानें मलमूत्र वाहून नेणारा मोठा नाला ( ड्रेनेज ), सोनखतांतील अंधःकार-प्रिय जंतु--अंधेरे व उजेडे किडे--यांच्याकडून मैला शुद्ध करण्याची पद्धत ( शोन सिस्टिम ), प्लेग टोंचण--लस--चे सजीव विषकण ( अति सूक्ष्म प्लेग जंतु )--प्रति-विषाची लस--खुषीची सक्ति--संचारी रोग, सूक्ष्म जंतुशास्त्रविद्या--जंतुज्ञ, सुईण

( नर्स ), यथादर्शन पद्धति, पाणी साठविण्याचें निवळण्याचे व गाळण्याचे हौद, आरोग्यगृह, ग्रंथिक सन्निपात, चालक ( डायरेक्टर ), मर्की (प्लेग), संसर्गविरोध (सिग्रिगेशस)--स्थानत्याग, सरकपडदा (ड्रॉप), गोस्तनसीतला.

## ( १४ ) शिक्षण

**सरकारी शिक्षण**—तेजस्विता नाहींसें करणारें--खर्डेघाशी--विलायती रोप--गुलाम उत्पन्न करणारें, शिकलेल्यांचा एकांगीपणा, उच्च प्रतीचें (युनिव्हर्सिटीचें), उच्च प्रतीच्या शास्त्रीय शिक्षणाचें उच्च विद्यापीठ ( पोस्ट ग्रॅज्यूएट यूनि. ), खाजगी शाळा--नवऱ्याच्या मागें बायको जाते त्याप्रमाणें सरकारी शाळांमागें जाणाऱ्या--सरकारी गाड्यामागचा नळा, ग्रँट--लालूच देऊन मुस्कटदाबी--भैक्ष्यवृत्ति--सरकारी जूं—चतकोर भाकरीची गुलामगिरी--लोकांची तीन चतकोर खाऊन एका चतकोरासाठीं सरकारची श्ववृत्ति पत्करणें--सरकारी पैसा सरकारी बुद्धि—अराष्ट्रियत्वाचें भूत—आत्महत्या—गढूळ झरा, शिक्षक--सरकारचा ओशाळलेला वर्ग--हे आमचे गुरुच नव्हत--वेतनगुरु-पोटभरु--पापतरु--असुरी रीतीनें शिकविणारे--राष्ट्रघातकी--हिरण्यकशिपूनें ठेवलेले, विशारद ( ग्रॅज्युएट ), प्रोफेसर--चुटपुटते-पोरेहांकू--खर्डेघाशा--उदरंभरी--आचरट--शुकीश पंडित,प्राथमिक शिक्षण--देशी भाषेचें कनिष्ठ प्रकारचें-सक्तीचें व मोफत-दुमजली (मुलामुलींचें)-दुमजली इमारतीचा पुंडावा ( मुलामुलींच्या प्रा. शि. चा पुणें म्युनि० मधील वाद ), परीक्षा-विद्यार्थ्यांच्या हुषारीची चटणी करणारा पाटावरवंटा, मध्यमप्रतीचें शिक्षण, माध्यम, महाविद्यालय, विश्वविद्यालय-सरस्वतीमंदिर-विद्योपचयस्थान-परीक्षेचा शिक्का देणारें यंत्र-विद्यापीठ-विद्येचे पिठें-दारूचे पिठें-कनिष्ठ नोकर तयार करणारी टांकसाळ-सरकारी-हमालखाना, परीक्षायंत्र-पढतमूर्ख व निःसत्त्वाचा चरक-नौकरखाना, विद्याखातें-खात्याचा वरवंटा, विद्या-आश्रम-गुरु-परिषद-विद्यार्थ्यांचें सर्क्युलर ( रिस्ले ), व्यवहारोपयोगी शिक्षण, सातयात्रा ( मॅट्रिक )-वार्षिक यात्रेकरू, प्रधान गुरु ( प्रिन्सिपाल ), सरकारी शिक्षण-पाश्चिमात्य मदिरा-बालमंदारवृक्ष-एकतंत्री-खच्ची करणारें-भाडोत्री-पोषाकी-शिळपट, उदार शिक्षण, सार्वजनिक शिक्षण, शास्तेमंडळी ( गव्हर्निंग बॉडी ), सुशिक्षित वर्ग लढाईतील घोडा ( हुषार परंतु परक्याच्या तंत्रानें चालणारा )-शिकलेलीं बावळटें, कुलपति ( चान्सेलर ), पुस्तकी विद्या, हस्तलिखित.

**राष्ट्रीय शिक्षण**---स्वतंत्रपणाचें-हितकारक अनुपानाचें-राजकीय सिद्धान्ताचें बाळकडू-राष्ट्र बनविण्याचें मोफत सक्तीचें देशभाषेंतील, ऐच्छिक, राष्ट्रीय वळण, राष्ट्रीय देऊळ-विचार-गुरु.

## ( १५ ) शेती

जमीन-ची खानेसुमारी-चा हक्क, प्रतिवर्षाचा भाडेपट्टा, फेरपहाणी, मालकी

हक, सरकारी शेतवाडी ( फार्म ), शेतमालक सरकार शेतकरी कूळ शेतकी, परस्पर साहाय्यकारी पेढी किंवा मंडळी, शेतकरी ऋण-मुक्त करण्याचा कायदा, आकाबाईचें पोर ( १९०१ शेतकी बिल ), सावकार मेला आणि कुणबीहि मेला, उपरीकूळ-ची पत, मालकाऐवजीं मजूर, फक्त नांगरटीचा हक्क, सावकारी पेढी, कारागीर मंडळी, मदतीचा अर्ज, शेतपेढी, कुणबाऊ धाड ( असंतुष्ट शेतकऱ्यांचें बंड ), चारणफी, गोरक्षण, दुष्काळ-फोड-फंड-दुष्काळाचा विमा ( फॅमिन फंड )-दु० काम-पत्र-तळ.

## ( १६ ) सरकार

अटक, अडथळा ( स्वराज्यास ) आणणारी त्रयी ( विलायतेस गेलेले पेनशनर नौकरशाही, येथील नोकरशाही व अँग्लो इंडियन ), अंतस्थ राज्यव्यवस्था, अधिकारी वर्ग ( नोकरशाहीच्या पूर्वींचा शब्द )–जुलमी–अन्यायी अनियंत्रित–सनदी–उद्दाम–सम्राट सत्तेचा व्यक्त प्रतिनिधि–अधिकारमदानें वेडावलेला–अरेराव–धूर्त–चरणारा–बदसल्लागार--बेगुमान--बिनमुर्वतखोर--परका--शाहिस्ते-खान--फुल्लरशाही, अधिकार–चष्मा–दडपण, अभिवचन--हरताळ फासणें, अरे-रावी--जुलूम--मंडळी, अनियंत्रित सत्ता, आंग्लभौम, ऑर्डिनन्स--बहाद्दर, आका-बाई ( नोकरशाहीच्या पूर्वींचा शब्द ), इंग्रजी--कोठावळे, इंग्रजी राज्य--झारशाही--मोंगलाई--गोऱ्यांच्या फायद्यानें--रावणराज्यपद्धति--इंग्रजी कावा--सरकार हें निर्जीव निरिंद्रिय व निराकार असें भाववाचक नाम--राज्यसत्तेचा मोठा रूळ--नोकरांच्या तांड्याचें वेसण- निःसत्त्व करण्याचा चरक, इभ्रत, इज्जत, उत्तम गुराखी ( नोकरशाही ), एकसत्ताक राज्य, एकमुखी सत्ता, खऱ्या स्वार्थाचा जुलूम ( एन्लायटन्ड डेस्पॉटिझम ), कडक उपाय, कमिशनें--लोकास चकविण्याचें सोंग, पंच-वार्षिक करार अथवा फारकती ( मोर्लेमिंटो सुधारणेपूर्वी हिंदुस्थानसरकार व प्रांतिक सरकारें यांच्यांत दर पांच वर्षांनीं देण्याघेण्याचा करार होत असे ), काल-भैरवाचा नाच ( नोकरशाही ), कायद्यानें प्रस्थापित झालेलें राज्य म्हणजे अधि-काऱ्या ( नोकरशाही ) व्यतिरिक्त जी सरकारची सत्ता, कायदा व सुव्यवस्था, काळपुरुष--काळीं डगलीं ( पोलीस ), कोठवळे, कोल्हेशाई, खजिन्याची किल्ली, खोऱ्यानें पगार ओढणें, खडीसाखरी भाषण, गट ( पार्टी ), गांव पोलीस ( रामोशी ), गुमास्ता ( एजंट, व्हाइसराय, नोकरशाही ), गोरा अधिकारीवर्ग-चरणी व वरणी, गोरे जांवई, चांदोबा ( स्वराज्याचा ), चिटणीस कचेरी ( सेक्रेटरीएट ), जादा--पोलीस -पत्रक, झारशाही, झोटिंगपातशाही, डायलेमा (अन्यतरापत्ति दोष ), तरवारींची शांतता, ताम्रपट ( राज्य करण्याचा ), तिजोरीची लूट, दडपशाही--दाबदपटशा- दंडुकेपणा--दंडपाणीपणा-- दंडुकेशाही, दुल्लेखानी, दृष्टिकोण--दृष्टिकक्षा--धोरण ( पॉलिसी ), धनगरी न्याय, नागडा स्वार्थ, नबाबी

अंमलदार नोकरशाही--देव--पुजारी--तटबंदी पोलादी चौकट, परकी-अंमल--राज्य, परराज्य खातें, पर्वतयात्रा, पाशवी शक्ति (ब्रूटफोर्स), पांढरा हत्ती, पुरभय्या (नोकरशाही ), प्रधानमंत्रि, प्रांतिकसरकार, प्रवाहपतितकार्य, प्रामाणिक स्वदेशी (मिंटो), फड ( सेक्रेटरीएट ), फाजील पंतोजी ( नोकरशाही ), फोडा व झोडा, वज्रलेप फाळणी ( मोर्ले ), बड्या लोकांची सभा ( हाऊस ऑफ लॉर्ड्स ), बीरमंत्र, बेकार बेजबाबदार राज्यपद्धति, बेकायदेशीर जमाव, भाषणबंदी, भारतमंत्री, मुस्कुटबंदी—कायदा, राणीचा जाहीरनामा, अशक्य सदन ( कर्झन), रावणराज्य, राज्य—चक्र—गाडा-गाड्यास खीळ घालणें—यंत्र गंजलेलें, राजकीय शिक्षा ग्रंथ ( पिनलकोड ), राजद्रोह—तप्तमुद्रा ठोकणें-पिसें, लाठी-राज्य-शाही-बहाद्दर, लोकमत-उपमर्द-लगाम, वटहुकूम, वरिष्ठ सरकार, वचनभंग, वरवंटा ( दडपशाही ), वसाहत, विलायत सरकार, विश्वासघातकी इंग्रजी राष्ट्र (परफिडीयस आल्बियन), शिक्केबाजी ( व्हेटो, सर्टिफिकेशन ), सनद (चार्टर)—सनदी नोकर, सप्तग्रही ( सायमन क० ), सरकार-नोकरी हिडीस देशबुडवी-रौप्यशृंखला--नोकरीच्या प्रवाहांतील शालिग्राम ( स. नोकर )--बगीच्या सांवलीखालीं पळणारीं उर्मट कुत्रीं, स. धोरणाचा झोपाळा, स. भाडोत्री-आपमतलबी-मारवाडी, स. मुठींतील सत्ता, स. नियुक्त सभासद, सभाबंदी-कायदा, स्वराज्य-हप्तेबंदी, साम्राज्य-गाडा-घटकावयव-स्वायत्त घटक, सामान्य लोकप्रतिनिधिसभा (हाऊस ऑफ कॉमन्स), सार्वजनिक शांतता-भंग, सुभेदार ( गव्हर्नर ), सोटेशाही, सोटेबारगिरी, सुधारणा ( रिफॉर्म्स ), सुलतान-तर्कशास्त्र, हडेलहप्पी राज्यव्यवस्था, हिंदुस्थान-सरकार-इंग्रजी साम्राज्याचा भारवाहक बैल-दुभती गाय, हिंदुस्थानला पिळून काढलें पाहिजे. ( सॅलिस्बरी ).

## ( १७ ) सामाजिक

अंध—सुधारक, अस्पृश्य--वर्ग-सुधारणा-चळवळ, अति—मनुष्य ( सुपरमॅन ), अनुकरणेच्छा ( फॅशन ), गाईची करुणा न येतां दशवार्षिक बचडीचा स्वीकार करणारा, जाती-गुणधर्म, तत्त्ववर्तक, दत्तोबा ( दत्तक ), नवविद्वेषी, पक्षाभास, पुढारी--नावाडी-राष्ट्राचा जीव, परिस्थिति--बंड, फिरता उपदेशक, वाट (विटाळ), मध्यमवर्ग, मागसलेला-वर्ग-चळवळ, मानपत्र, व्यक्तिस्वातंत्र्य--बंड, डबल लाईफ चा आचरटपणा, संमतिवय--बिल, समाज-धारणा-रचना-बंधनें-सुधारणा--शास्त्र, सामाजिक-सुधारणा, हडेलहप्पी, नाचरी चळवळ, सा. बहिष्कार, स्त्रीजाकिटेवाले, सुधारक--स्त्रीछत्राखालील बृहन्नटा--परस्परसुधारक ( दुसऱ्यानें सुधारणा करावी म्हणणारा )--कुत्र्याचें वक्र शेपूट--वेगडी--त्रिदोषी (अविचारी, मंदमती, दुराग्रही) खर्डेघाशा-पोरेहांकू--उथळ बुडाचे--पाषाणपूजक (झोपाळू प्रार्थना समाजिस्ट ),

सुधारणेच्या महातत्त्वाचीं पिसें, स्मारक ( मेमोरिअल), सार्वजनिक-सभा-चळवळ-गणपती-उत्सव-मेळा, हिंदु मुसलमान-तेढ-दंगा-ऐक्य, प्रीतिभोजन.

## ( १८ ) स्थानिकस्वराज्य–ग्रामसंस्था

गांवपंचायत–ग्रामसंस्था–स्वराज्याचा पाया, लोकनियुक्त पंच–पंचायत, स्थानिक–कमेटी ( म्युनि. )–स्वराज्य–स्व. मळमळीत सौभाग्य–नियामक मंडळ, ( बोर्ड ऑफ मॅनेजमेंट )–सभासद ( कार्पोरेटर ), नगरसभा, नगराध्यक्ष, घरपट्टी स्थानिकसंस्था, कंपू (कॉकस), ग्रामपद्धति, ग्रामसंघटना.

## ( १९ ) किरकोळ

उपनगर, उखळबेरी, कोकरउडी ( वायफळ प्रयत्न, आनंद ), खेदप्रदर्शन, खेळखाना ( स्पोर्टिंग क्लब ), गळपट्टी ( नेकटाय ), दारिद्र्यगृह ( पुअर हाऊस), पराक्रम ( कॅरेक्टर ), बकाली ( कॉस्मापॉलिटन ), शार्मण्य ( जर्मन), शृंगापत्ति, सामना ( मॅच ), गोरे उडाणटप्पू, दवदव ( त्रास ), रोजनामा ( डायरी ), फर्माईष ( फॅशनेबल ), हस्तांदोलन, शिष्टाचाराचा खून, साखरावगुंठित, भीस ( लोकर ), औत्पादिक, मजलीस नशीन ( अध्यक्ष ), अनुध्यां, एकांडेपणा, ऐतिहासिक ठेच.

## ( २० ) कोटी-वाक्प्रचार-म्हणी

या कोट्या, म्हणी व वाक्प्रचार १६५ निवडून काढले होते, पण लेखमर्यादा संपत आल्यानें येथें त्यांपैकीं फक्त ४५ च देतों.

१ अठरापगड जातींत ही टोपीवाल्यांची जात एकोणिसावी आली. २ आई ( हुंडणावळाई ), ३ आधीं मैत्रिणी मग सोबतिणी व शेवटीं खिस्तिणी करून टाकणें ( पं. रमाबाईबद्दल ), ४ आमच्या पायगतची नदी उशागतीं नेऊन ठेविली ( पुण्याचें खडकवासल्याचें धरण ), ५ निर्विकल्प समाधींत डुलत राहाणाऱ्या मूठभर योग्यापुढें आमच्या योगक्षेमाची काळजी वहाणाऱ्या योगीराजाचें पांडित्य ( पार्लमेंटपुढें भारतमंत्र्याचें इंडियाबजेट मांडणें ), ६ क. स. ई. ( के. सी. एस्. आय्. ), ७ संस्थानिकांच्या हक्काची उतरती श्रेढी, ८ संस्थानिक म्हणजे इंग्रजसरकारचे सरंजामदार नोकर, ९ भरल्या पोटीं पांडित्य, १० करदीपिका भार्या ( म्हातारा नवरा–लहान नवरी ), ११ किंबहुना गांवांत कावळे आले किती व गेले किती ही माहितीहि कुळकर्ण्यास द्यावी लागते, १२ डुक्करमाऱ्या गोरा अंमलदार, १३ नवराबायकोचीं छोटेखानी विठोबारखुमाईचीं कुटुंबें ( हल्लींची कुटुंबपद्धति ), १४ त्रयस्थ म्हणजे तिठ्यावरील लोक, १५ संकासुराचें सोंग ( डायरेक्टर जाइल्स ), १६ राजकीय चळवळींतील शिखंडी ( सर

सय्यद अहंमद ), १७ म्हैसूर सुटलें त्याचें भरीस वऱ्हाड गेलें, १८ पंचवार्षिक मेंढीचा वपनविधि ( पूर्वी हिंदुस्थानसरकार हें प्रांतिकसरकाराची शिल्लक दर पांच वर्षांच्या अखेरीस आपल्याकडे घेत असे ), १९ फुल्लर हा लेचापेचा शाहिस्तेखान नसून बेबंदनगरींतील कायदेशीर इंग्रजी राज्यांतील कायदेशीर झोटिंग बादशहा आहे, २० गणेशचतुर्थीचे चंद्रनिरीक्षण ( राजद्रोहाचा आरोप ), २१ सिमल्याचा महादेव ( व्हॉइसराय ), २२ सर इनॉक्युलेशन ( डॉ. सर भाटवडेकर ), २३ उजाडलें पण सूर्य कोठें आहे, २४ मॉंटेग्युशिरः कर्टिसपुच्छंप्रतिष्ठा, २५ प्रिन्सिपाल पशुपाल कीं शिशुपाल ( रँ. परांजपे ), २६ पिशाचगणास प्रतिनिधित्वाचें कुंकु लावून सवाशीण बनविणें, २७ ही हायस्कुलांत तयार झालेली बायको त्रासदायक होईल असें सरकारास वाटलें, पण पुढें ठरलें, शिकलेली तरी ही बायकोच ( मवाळपक्ष ), २८ गुप्तांत गुप्ती ( १९१४ गोखल्यांचें गुप्त पत्र ), २९ धाबळींतील खवुतरें ( बगलबच्चे ), ३० किंबहुना (व्हिक्टोरिया) राणीसरकार पेशवाईच्या मुळावर जन्मास आल्या, (जन्म १८१९), ३१ पुढील सालचा अंदाज, संपणाऱ्या चालू सालचा फिरून तपासलेला अंदाज आणि मागील सालाचा नक्की हिशेब, म्हणजे दर वर्षी ही एक प्रकारची जमाखर्चाच्या श्राद्धांतील त्रयीच आहे, ३२ विलायतेंतील शनि ( भारतमंत्री ), ३३ फेसाचा दगड झाला आहे. आतां त्याचें वज्र होणें आहे. ( मोर्ले आमच्या चळवळीस फेस म्हणे त्यावर बहिष्काराची जोड मिळाली असतां ), ३४ बाल्ये राजगुर्व्यता यौवने भ्रातिदो नृपः । तथा पेन्शनदाता च न हिंदुः प्रभुरात्मनः॥ ३५ केरावारी प्रिन्सिपालशिप, ३६ गणेशटेबल ( पोलीस कॉन्स्टेबल विशेषतः युरोपियन सार्जंट ), ३७ पुणेंकरांचा नेहमीं उतूं जाणारा उत्साह, ३८ घरचें सौभाग्य सार्वजनिक रीतीनें प्रसिद्ध करणें, ३९ शहाणपण सत्तेंत आहे दैन्यांत नाहीं, ४० रात्रीं खा तूप आणि सकाळीं बघ रूप, ४१ चित्त मिळालें वित्त मिळेल, ४२ प्रजाद्रोहाला पिनलकोडांत शिक्षा नाहीं, ४३ वरच्यास हात खालच्यास लाथ, ४४ हकाचे बाबतींत देवघेवीचा प्रकार लागू पडत नाहीं. ४५ राजा देव तर प्रजाहि देव, प्रजादेवानें राजादेवाचा जुलूम काय म्हणून सोसावा !

याप्रमाणें २० विभागांत एकंदर शब्द विभागले. शक १८०२ (केसरी) पूर्वी मराठींत वर्तमानपत्रें व मासिकें निघत होतीं. तेव्हां त्यांनीं कांहीं पारिभाषिक शब्द निर्माण केले असतीलहि. पण अशांची संख्या फार थोडी असावी, कारण हे संपादक बहुशः इंग्रजी शब्द वापरीत. राष्ट्रीय सभेचें जीवन यापुढें सुरू झालें आणि त्यामुळें राष्ट्रीय विचारांचा ओघ देशांत वाहूं लागला. या ओघांत परकीय भाषेंत विचार करण्याची, बोलण्याची व लिहिण्याची विद्वानांची सवय वाहून जाऊं लागली आणि स्वभाषेंतील शब्दसृष्टीस प्रारंभ झाला. तिचें त्रोटक स्वरूप वर दाखविलें आहे. केसरीनें स्वतः निर्माण केलेले शब्द जसे यांत आहेत तसेच

अनेक लेखकांनींहि तयार केलेले शब्द आहेत. केसरीनें त्यांच्या शब्दांची आपण होऊन प्रसृति केली. त्यामुळें या लेखाला ' केसरीनें प्रसृत केलेली परिभाषा ' असें नांव दिलें आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें हा पारिभाषिक लेख वेळेच्या व स्थलाच्या अभावीं अपुरा झाल्यानें यांत भर घालून जास्त मोठा करण्यास कोणासहि सवड ठेविली आहे. कारण केसरीनें म्हटलेंच आहे कीं, ' देशांत संपत्ति ' कितीहि विपुल असली तरी तिचा एके ठिकाणीं ज्याप्रमाणें व्यवस्थित संग्रह ' करावा लागतो, तद्वतच...शब्दरत्नें मोठ्या काळजीनें आणि व्यवस्थित रीतीनें ' संग्रहित करावीं लागतात.' ( के. १९०३ अं. ४२ ).

---

# शेती—लागवड, चारा, पिकांचे रोग

[ श्री. नरहर गंगाधर आपटे, बी. एजी. ]

केसरींत राजकीय विषयच प्राधान्यानें येणार हें उघड आहे आणि इतर विषय प्रासंगिकापैकींच असणार म्हणून केसरींत शेतकीसारख्या विषयावरील शास्त्रीय लेख कमी आढळतात.

शेतींतून उत्पन्न होणाऱ्या मालांकडे तुलनेनें पहातांच सहज ध्यानांत येतें कीं शेतीच्या चालू पद्धतींत फरक करणें प्राप्त आहे. कालवे, रेल्वे व इतर वाहतुकीचीं साधनें यांच्या प्रसारामुळेंहि हा फरक आवश्यक ठरतो. या गोष्टींकडे केसरीस लक्ष पुरविणें शक्य झालें नाहीं. तरी वारंवार एतद्विषयक उपयुक्त माहिती अधिकारी लेखकांकडून केसरीनें लिहून घेऊन प्रसिद्ध केली आहे. उदाहरणार्थ आंब्याची लागवड श्री. फातरपेकर यांजकडून मुद्दाम माहिती मागवून छापली आहे. तसेंच १९३० सालीं आंब्यासंबंधी जुनी व मनोरंजक माहिती मिळवून लेख छापला आहे. आंब्याची लागवड व जोपासना ही इ.स. पूर्वी ४००० वर्षांपासून चालली आहे. याच्या लागवडीचा योग्य तऱ्हेनें आपल्या देशांत कालमान पाहून प्रसार झाला तर आर्थिक फायदाहि बराच होईल. जेथें आम्रफलास अधिक मागणी येण्याचा संभव तेथें नैसर्गिक अडचणींमुळें त्याचें पीकच होत नाहीं. यामुळें ज्या ठिकाणीं आम्रसंवर्धन चालू आहे तेथें या वाढत्या खपाकडे दृष्टि ठेवून नवीन नवीन प्रयोग करण्याकडे प्रवृत्ति होत आहे. कलमाच्या निरनिराळ्या जाती हुडकून काढल्या ही गोष्ट हेंच दर्शविते. हापूस, पायरी, मनकुरात वगैरे जातींचीं फळें चाखलीं आणि त्याचा व्यापारी दृष्टीनें टिकाऊ पदार्थ करतां आला तर कितीहि पैदास वाढली असताहि ती खपाचे मानानें अपुरीच पडेल असें वाटतें. आम्ररस किंवा बाटलींत घातलेल्या आंब्याच्या फोडी दोन दोन वर्षें

टिकतात. तसेंच इंग्रजी पद्धतीचा मोरांबाहि होऊं शकतो. एखाद्यानें जर या झाडांचा बहार लांबविण्याचें व वर्षभर फळ कसें मिळेल याचें संशोधन केलें तर त्याचें फळ आपणांस हवें तितकें हवें त्या वेळीं मिळेल. हा एक निराळाच धंदा होऊं शकेल. श्री. वा. रा. गाडगीळ यांनीं ' आम्रसंवर्धन ' नांवाचें एक पुस्तक छापलें. त्यावरील अभिप्राय लिहितांना केसरीचें या विषयासंबंधीं सर्वसाधारण मत व्यक्त झालेलें आढळतें. ' नवीन शास्त्रीय शोधाप्रमाणें अधिकाधिक कोणत्या ' सुधारणा करतां येतील...इत्यादि विषयांबद्दल साधार, शास्त्रीय व अनुभविक ' माहिती या देशांत बागाइती करणारांस असणें अवश्य आहे...हिंदुस्थानांत ' ज्या फळांची लागवड होते त्यापैकीं महत्त्वाच्या फळासंबंधानें अशाच प्रकारची ' शास्त्रीय बागाइती व व्यापारी माहिती छोट्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्यास ' शेतकीस व तद्वारां देशासहि पुष्कळ फायदा होईल....हें शोध सामान्य ' शेतकऱ्यांस समजावून देऊन शेतीचें किंवा बागाइतीचें उत्पन्न जेव्हां पूर्वीपेक्षां ' अधिक होऊं लागेल तेव्हांच शेतीची खरी सुधारणा झाली असें आम्ही ' समजूं.' या अभिप्रायांत शेतसुधारकांचें अंतिम ध्येय, शेतकऱ्यांस शक्य तितका जास्त फायदा करून देण्याचें असलें पाहिजे, येथें होणारी सर्व सुधारणा येथील शेतकऱ्याच्या फायद्याची असावी असा आशय आहे.

आंब्याप्रमाणें केसरीनें निरनिराळ्या पिकांच्या माहितीस शक्य तितकी प्रसिद्धी दिली आहे. त्यांतील उत्पन्नाच्या दृष्टीनें महत्त्वाचें पीक म्हणजे कापूस. ता. ३–३--१९०८ च्या केसरीनें ' भारतीय कापूस' म्हणून जो लेख छापला आहे तो फारच मननीय आहे. त्यांतील माहिती वेंगुर्लें येथील प्रयोग करणाऱ्या शेतकी-खात्यानें प्रसिद्ध केली आहे. या लेखांत या कापसाच्या प्राचीनतेविषयीं माहिती, व विरोध दिसण्यासाठीं इंग्लंडची त्या वेळची स्थिति वर्णन केली आहे. लॅटिन भाषेंतील शब्द संस्कृत कार्पास या शब्दापासून झाला आहे. डॉ. हंटरचें मतें या धंद्याचा काल महाभारताच्याहि पूर्वीचा आहे. आपणांस लागणारा सर्व जाडी व तलम कपडा येथल्यायेथेंच तयार होऊन वापरला जाई आणि शिल्लक राही तो चीन, जावा, झांझिबार व सीरिया वगैरे भागांत जाई. परंतु पुढें वाफेनें चालणारीं यंत्रें निघून हा व्यापार थांबला. या कापसाच्या धाग्याची माहिती देतांना चांदा येथील शेतकीप्रदर्शनांत १ रत्तल कापसांतून ११७ मैल सूत काढण्याचा प्रत्यक्ष पुरावा दिला आहे. नंतर त्याची लागवड देऊन $\frac{३}{४}$ क्षेत्रांपेक्षां जास्त क्षेत्रांत हा कापूस पेरूं नये अशी सूचना दिली आहे. जास्त कपाशी केल्यानें निरनिराळे तोटे कसे होतात याची प्रचीति खानदेशांतील १९१४--१९२४ पर्यंत कपाशी मागून कपाशी काढल्यानें आली आहे. लढाईमुळें कापसाचा उपयोग स्फोटक द्रव्यें करण्याकडे होऊं लागून कापसाची मागणी वाढली, त्यामुळें कापसाचा भावहि वाढला व कापसाचें क्षेत्र वाढलें. त्याबरोबरच

ज्वारी व गहूं यांखालील क्षेत्र व जनावरांचा चाराहि कमी होऊं लागला.

शेतीच्या जनावरांप्रमाणेंच दुभत्या जनावरांचीहि अवस्था झाली व त्यांचें दूधहि कमी झालें. त्यांतच मधल्या दुष्काळांत बरींचशीं जनावरें मेलीं. जनावरांचें अभावीं खताचा पुरवठा कमी पडला. सन १९२५-२६ सालापासून कपाशीचे भावहि उतरले. सारांश, पीक प्रमाणाबाहेर काढल्यास ही आपत्ति येणार. शेतांतील सर्व मागण्यांचा पुरवठा करून जी बाकी शिल्लक राहील ती जर जास्त राहील तरच त्यास किफायत म्हणतां येईल.

इ. स. १९२४ चे नोव्हेंबर ता. १८ चे केसरींत भुइमुगाचे निर्गतीबद्दल उल्लेख आला आहे. त्यांत 'शें. २५ नें निर्गत वाढली आणि याच प्रकारची 'लागवड वाढल्यास निर्गत आणखी वाढेल व शेतकऱ्यांचा फायदा होईल असें 'म्हटलें आहे. भुइमुगाचें पीक एका एकरास काढावयाचें झाल्यास त्यांत तीस 'गाड्या शेणखतांत असणारीं नत्रद्रव्यें घालणें आवश्यक आहे. पण शेंकडा पांच 'शेतकरी खत घालीत नाहींत. अर्थात् खत न घालतां अशी जमीन निकस 'करणारीं पिकें सतत काढूं लागल्यास कपाशीची जी स्थिती झाली आहे तीच 'भुइमुगाची होईल. सन १९२४ नंतर भुइमुगाचे निर्गतीची कठिण परि'स्थिति झाली. जर्मन, अमेरिकन व इंग्रजी कंपन्यांनीं २।३ वर्षांत माल 'घेण्याचें तहकूब केलें, त्यामुळें वाढलेल्या पिकांचे भाव कमी झाले व पैसा येईना; 'त्याबरोबर प्रथम गुरांची व मागाहून माणसांची उपासमार झाली. तेव्हां कोण'त्याहि पिकाची लागवड प्रचारांत आणतांना अंतिम फळ तज्ज्ञांनीं ध्यानांत 'घेऊनच पिकाची वाढ करावी,' अशी सूचना केसरीकारांनीं केली आहे.

पपयांचा खप शहराचे आसपास वाढल्यानें त्यास पीक या सदरांत येण्याइतकें महत्त्व आलें, (केसरी २९ ऑगष्ट १९११). तिच्या लागवडीसंबंधीं माहिती प्रसिद्ध केली आहे. त्याचप्रमाणें जावा बेटांमध्यें होणाऱ्या एका बांबूच्या झाडाची माहितीहि प्रसिद्ध केली आहे. (६-४-१९०६). या कळकाची वाढ फार जलद असून हा वजनानें हलका असतो व त्यामुळें तो विमानें करण्यासहि उपयुक्त होतो. त्याचीं फुलें खाण्यास उपयोगीं पडतात व हा कळक टेबलें, खुर्च्या, खांब वगैरे अनेक उपयुक्त वस्तु करण्याचे कामीं वापरतात.

कालव्याची वाढ व पावसाची कमतरता यामुळें चाऱ्याची टंचाई भासूं लागली. कालव्याचे भागांत पैसे मिळणारीं पिकें जास्त प्रमाणांत निघूं लागल्यामुळें कडबा कमी निघूं लागला व पाऊस कमी झाल्यामुळें वैरणीचीं पिकें निघेनाशीं झालीं. त्या ठिकाणीं कोल्हापुरी गवत लोकांनीं लावावें अशी सरकारनें केलेली शिफारस लोकांचे पुढें मांडली आहे. ( २०-११-२३ ).

चाऱ्यांच्या पिकांचा प्रश्न सन १९१८-१९ सालीं फारच प्रामुख्यानें पुढें आला. यावेळीं केसरींतून युनियन एजन्सीचे मालक रा. मोडक व रा. केळकर यांची

लेखमाला प्रसिद्ध झाली आहे. त्यामध्यें एकंदर २१ प्रकारच्या पिकांची माहिती दिली आहे. त्यांत मुख्यतः कालव्यावर अगर विहिरीचे पाण्यावर करण्याचे पिकांचीच यादी दिली आहे. हीं पिकें ६० ते ८० दिवसांत होणारीं व निरनिराळ्या वेळीं लावलीं असतां सर्व वर्षभर ओली वैरण जनावरांना खाण्यास मिळण्याजोगी आहेत. हीं पिकें दुष्काळाचे वेळींहि उपयोगीं पडणारीं आहेत तरी याच (१९१८) दुष्काळाचे वेळीं इतर प्रांतांचीं उदाहरणें देऊन सरकारास कालव्याचें पाणी चाऱ्याचे पिकांत कमी दरानें देण्याची सूचना केली आहे. त्याप्रमाणें एकराक तलावाचें पाणी (सोलापूर जिल्हा) २००० एकरांस सरकारनें देऊं केलें.

त्यानंतर अन्य पदार्थांपासून चारा तयार करण्याच्या पद्धतीची सूचना केलेली आहे. हा चारा निवडुंगापासून निवडुंगाचे काटे जाळून त्याचे बारीक बारीक तुकडे करून त्यांत मीठ मिसळून तो जनावरास चारावा अशी शिफारस केली आहे.

चराईचा कर लोकांना कठिण जातो व गांवालगतच जंगलाची हद्द आल्यानें व जनावरें त्यामध्यें गेल्यानें जो कोंडवाड्यांतील दंड द्यावा लागतो तो देणें तर शेतकऱ्यांच्या आवाक्याच्या बाहेरचें होतें अशी टीका अनेक वेळां केलेली आहे. त्याचा फायदा होऊन जंगलासंबंधीं कांहीं सवलती सरकारनें दिल्याचें दिसतें. (२९-११-१०).

जनावरांच्या जोपासनेसंबंधीं व गाईच्या संहारासंबंधीं पुढील माहिती आली आहे. (२५-३-१३). अमेरिका, इंग्लंड वगैरे देशांतील जनावरांची तुलना त्या देशांतून शेतीस घोडे वापरण्याची पद्धत, दुधाच्या जनावरांचें रक्षण करण्याची माहिती आली आहे. हिंदुस्थान देश कृषिप्रधान असून येथील शेती बैलावर अवलंबून असल्यानें गाय अगर बैल यांचा संहार सर्व दृष्टीनें कसा त्याज्य आहे हें दाखवलें आहे. कसाईखान्यांत ज्या जनावरांचा संहार होतो त्यांत बराचसा मोठा भाग कालवडी वगैरे सात वर्षांचे खालील जनावरांचा शेंकडा ८० टक्के असतो. अशा जनावरांचा पैदाशीकडे उपयोग होतो. अशी जनावरें मारण्याकरितां घेतलीं असतां त्यांचेपासून होणारी पैदास होत नाहीं; व दर जनावरामागें निदान ३।४ वासरें उत्पन्न होत नाहींत. हा सर्व संहार युरोपियन सैनिकासाठीं करावा लागतो. वगैरे गोष्टी देऊन कसाईखान्यांत सातवर्षांचे आंतील कोणतेंहि जनावर पैदाशीचे अगर कामाचे उपयोगी असणारें इतर कोणतेंहि जनावर मारूं नये; त्यासाठीं कसाईखान्यावर देखरेख करण्यासाठीं निराळे कामगार ठेवावे आणि कायदेमंडळाची एक कमेटी नेमून तिनें कसाईखान्याची वेळोवेळीं तपासणी करावी असें म्हटलें आहे. चांगल्या जातीचीं कामकरी व दुभतीं जनावरें निर्माण करण्यासाठीं चांगल्या जातीचे सांड वापरून ज्या निरानिराळ्या जनावरांच्या जातींची पैदास करणारे

लमाण वगैरे वर्ग आहेत त्यांना शक्य तितक्या सवलती द्याव्या या विषयींहि सूचना केसरीनें प्रसिद्ध केल्या व लोकांना करमाफी असावी व त्यांचेवर जंगलचे कायद्याची अंमलबजावणी इतक्या काटेतोलपणानें होऊं नये व शक्य तितकें त्यांस प्रोत्साहन द्यावें असें म्हटलें आहे. ( ११-४-११ ).

पिकें जास्त प्रमाणांत शिल्लक असल्यास अगर कालव्यावरील बागाइतांमध्यें चाऱ्याचीं पिकें जास्त निघाल्यास त्याच ( ओल्या ) स्थितींत त्यांचें रक्षण करण्यास सुधारलेल्या सायक्लेजच्या पद्धतीनें ती ठेवण्यासंबंधींची माहिती तारीख ३-५-१९१० व १-९-१९३० च्या अंकांत आहे.

शेणखताची आवश्यकता, व तें चांगलें ठेवलें असतां त्यांतील पोषक घटक कायम राहून जमिनींतील सेंद्रिय भागाचें प्रमाण वाढतें ही गोष्ट खळीं तयार करून त्यांत शेण वगैरे टाकण्यापासून तों थेट शेण बाहेर काढून शेतांत घाली-पर्यंतची सर्वच माहिती केसरी २६-४-१९१० च्या केसरींत आढळते. पिकावर पडणारे रोग व आकस्मिक येणाऱ्या टोळधाडी यांच्यासंबंधींहि माहिती वेळोवेळीं दिली आहे. बटाट्यावर पडणारा बांगडी रोग झाला असतां सर्व बटाटा कुजून त्याची विक्री होण्यास जड जाते. कपाशीवरील बोंडांतील कीडहि याच प्रमाणांत नास करते. भातावरील सुरमा, गव्हावरील व ज्वारीवरील काती वगैरे अनेक रोग व किडी यांचाहि उल्लेख करून त्यांवरील उपाय दिले आहेत.

शेतकऱ्यांस उपयुक्त अशा रेशमांच्या किड्यांचा धंदा आहे. त्याचा उपयोग शेतकऱ्यांस होणारा असल्यामुळें ती समग्र माहिती केसरींत प्रसिद्ध झाली आहे.

---

## प्राथमिक शिक्षण

[ श्री. यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एल्‌एल्. बी.
मुख्य संपादक—महाराष्ट्र शब्दकोश. ]

**सरकारचें शिक्षणविषयक कर्तव्य**—देशांतील प्रत्येक नागरिकास निदान प्राथमिक शिक्षण तरी सुलभतेनें मिळालें पाहिजे व तें तसें प्राप्त करून देणें हें प्रत्येक सरकारचें कर्तव्य आहे ही गोष्ट केसरीनें प्रथमपासून वारंवार पुढें मांडली आहे व सरकारला या आपल्या कर्तव्याची पुन्हा पुन्हा जाणीव करून दिली आहे. तसेंच तें शिक्षण कसें असावें यासंबंधींहि वारंवार चर्चा करून कार्यक्षम व स्वतंत्र वृत्तीचे नागरिक तयार करणें हें शिक्षणाचें ध्येय केसरीनें अनेकवार प्रतिपादन केलें आहे. इंग्रजी अमलाबरोबर नवीन सुधारणा

अमलांत आल्या. त्यांत शाळा या मुख्य होत. या विद्यादानाच्या स्वरूपानें अव्वल अमदानींतील मंडळी इतकी भाळून गेली कीं, वेदाचे आरंभीं जसा ओंकार असावयाचा, तसें त्या वेळच्या प्रत्येक पुस्तकाच्या प्रस्तावनेचे आरंभीं दयाळु इंग्रज सरकारच्या राज्यांत झालेल्या विद्याप्रसाराचे पवाडे प्रथमतः गायलेले आढळावयाचेच ! परंतु तो मनु लवकरच पालटला. पहिली चकाकी पाहून अंध झालेल्या डोळ्यांना खरें स्वरूप समजावयाला लागलें व इंग्रज राज्यकर्त्यांनीं हमालीचीं कामें करणारे भारवाहक पैदा करण्यासाठीं स्थापन केलेल्या संस्था शाळा नसून हमालखाने आहेत व सरकारी नोकर तयार करणाऱ्या कंपन्या आहेत हें सर्वांस लवकरच कळून चुकलें ( १४-४-०३ ). तसेंच सरकारनें रेल्वे व लष्करी खर्च यांस प्राधान्य देऊन शिक्षणाचें ओझें प्रांतिक सरकारवर व त्यांनीं लोकल बोर्डांवर लादलें या गोष्टींतील अन्याय केसरीनें चव्हाट्यावर मांडून युरोपमधील लहान लहान देशांतील सरकारेंहि माणशीं २ पासून ११ पेन्सपर्यंत शिक्षणाकरितां खर्च करीत असतां येथें ½ पेन्सहि माणशीं खर्च सरकारास करणें जड होतें अशी टीका केली. ‘ इकडे खर्च नको सत्ता मात्र पाहिजे.’

हिंदुस्थानांत शिक्षणाचा पाया १८३५ च्या मेकॉलेच्या मिनिटानें घातला व त्यांत बोर्ड ऑफ डायरेक्टर्सनीं १८५४ सालीं थोडी वाढ केली. पण १९०४ पर्यंत सक्तीच्या व मोफत शिक्षणाचा कोठें उल्लेखहि नाहीं. याबद्दल केसरीनें जपान वगैरे इतर देशांत सरकार शिक्षणाची वाढ किती झपाट्यानें करीत आहे व तीच गोष्ट आमचें सरकार कशी अंगावाहेर टाकीत आहे हें विशद केलें आहे. ( १५-३-०४ ). या कामीं आपण कांहीं करीत आहों असें दाखविण्यासाठीं वरिष्ठ सरकारनें प्रांतिक सरकारचीं मोफत शिक्षण द्यावें काय या प्रश्नावर मतें मागिवलीं. पण शिक्षणप्रसार जास्त व्हावा एवढीच गोष्ट प्रांतिक सरकारनें सुचविली. मुंबई सरकारनें मोफत शिक्षणाच्या विरुद्धच मत दिलें. याबद्दल केसरीनें म्हटलें आहे ‘ सामान्य जनसमूह निरक्षर व अज्ञान आहे त्यास सावकार व ‘ चळवळे लोक फसवितात असा सरकारी अधिकाऱ्यांचा आरोप आहे. पण या ‘ फसवणुकींतून त्यांची सुटका करण्यास प्राथमिक शिक्षण मोफत करा म्हटलें तर ‘ पैसा नाहीं असें उत्तर येतें; सक्तीचें करा म्हटलें तर जुलूम कसा करावा, असा ‘ प्रश्न विचारण्यांत येतो. सरकार सुधारलेलें, शहाणें व सद्धेतुप्रेरित असें आहे असें ‘ वारंवार सांगण्यांत येतें; पण आवश्यक लष्करी कामें—पैसा असो वा नसो—त्वरित ‘ अमलांत आणलीं पाहिजेत असें जसें सरकारास वाटतें तसें प्राथमिक शिक्षणा- ‘ संबंधानें कां वाटत नाहीं !’

यानंतर १९१३ सालीं वरिष्ठ सरकारनें एक खलिता प्रसिद्ध करून पुढील १० वर्षांत शाळांची संख्या दुप्पट करण्याचें आश्वासन दिलें. परंतु महायुद्धामुळें ही गोष्ट शक्य झाली नाहीं. नंतर १९१६ सालीं वरिष्ठ सरकार, प्रांतिक सरकार

व लोकलबोर्डें आणि म्युनिसिपालिट्या यांनीं प्रत्येकीं ⅓ खर्च सोसून पुढील दहा वर्षांत शाळांची संख्या दुप्पट करावी अशी योजना करून त्यावर प्रांतिक सरकारचीं मतें मागवावयाचीं तों प्रांतिक सरकारास पूर्वापेक्षां जास्त स्वातंत्र्य द्यावयाचें ठरलें व लवकरच मॉंटेग्युस्कीमप्रमाणें प्राथमिक शिक्षण प्रांतिक सरकाराकडे गेल्यामुळें वरिष्ठ सरकार ' आपल्या जबाबदारींतून मोकळें झालें.'

सक्तीचें शिक्षण—मोर्लेमिंटो सुधारणांस अनुसरून लोकनियुक्त सभासदांस ठराव व खाजगी बिलें आणण्याचा जो अधिकार प्राप्त झाला त्याचा फायदा घेऊन कै. ना. गोखले यांनीं सक्तीच्या मोफत शिक्षणाचा ठराव १९१० सालीं वरिष्ठ कायदेकौन्सिलपुढें मांडला. पण तो त्यास परत घ्यावा लागला. पुढें १९११ सालीं त्यांनीं यासंबंधीं आपलें प्रसिद्ध बिल पुढें मांडलें. त्यावर प्रांतिक सरकारांचीं मतें मागविलीं असतां सर्वांनीं आपलीं मतें विरुद्ध दिलीं त्यामुळें त्यांचें बिल फेटाळलें गेलें. परंतु या वेळीं सर्व स्थानिक संस्थांनीं व कांहीं युरोपियन अधिकाऱ्यांनीं व अँग्लो-इंडियन पत्रांनींहि त्यास आपली मान्यता दर्शविली होती. मध्यंतरीं ना. रा. ब. शर्मा यांनीं प्राथमिक शिक्षण १५ वर्षांत मोफत व सक्तीचें करावें असा ठराव मांडला. पण तोहि नामंजूर झाला. पुढें ना. शास्त्री यांनीं प्राथमिक शिक्षणावर ३० लाख रुपये अधिक खर्च करावे अशी सूचना आणली तीसहि सर शंकर नायर यांनीं विरोध केला व तो ट्रेंड शिक्षक पुरेसे नाहींत या सबबीवर. यावर केसरीनें ट्रेंड शिक्षकांची संख्याहि वाढवा व शाळाहि वाढवा; दोनहि तऱ्हेनें सुधारणा चालू ठेवण्यास हरकत कोणती ? अशी पृच्छा केली आहे.

यानंतर ना. पटेल यांनीं आपलें सक्तीच्या शिक्षणासंबंधींचें बिल मुंबई कौन्सिलास सादर केलें. या बिलाचा विस्तृत सारांश केसरीनें देऊन त्याबद्दल आपली मान्यता दर्शविली व कै. ना. गोखले व ना. पटेल यांच्या बिलांत मुख्यतः फरक कोणते ते विषद करून सांगितले. पण या बिलांतील महत्त्वाचा मुद्दा जो खर्चासंबंधीं त्यासंबंधीं मात्र केसरीनें स्पष्ट इशारद दिली. ' या बिलांत सरकारच्या आर्थिक ' मदतीविषयीं खुलासा केलेला नाहीं. या बिलानें सरकारच्या तिजोरींतल्या एक पैला ' देखील धक्का लागावयाचा नाहीं व अधिकाराचा बडगा तेवढा सरकारच्या हातीं ' ठेवला आहे. मग सरकार माघार घेईल कशाला ? परंतु म्युनिसिपालिटीस हें मान्य ' होईल काय ? बिलाच्या आवश्यकतेसंबंधीं चर्चा करण्याचें कारण नाहीं; परंतु ' बिलास शेवटच्या कलमानें ( तपासणीची सत्ता ) जें गालबोट लागलें आहे तें ' सिलेक्ट कमिटीनें पुसून टाकावें अशी आमची सूचना आहे. प्राथमिक शिक्षणाच्या ' खर्चाची अवघी जबाबदारी स्थानिक संस्थांवर कोठेंहि टाकण्यांत येत नाहीं आणि ' येथेंहि आजपर्यंतची वहिवाट तशी नाहीं. वाढत्या खर्चाचा कितवा हिस्सा सरकार ' सोसणार याचा नक्की अंदाज म्युनिसिपालिटीस नको काय ? गव्हर्नरसाहेबांचें ' शाब्दिक अभिवचन कौन्सिलच्या प्रोसिडिंगमध्यें तसेंच राहील आणि हें खर्चाचें

'कलम मात्र म्युनीसिपालिटीच्या बोकांडीस बसेल. याकरितां खर्चांचा खुलासा 'वेळींच स्पष्ट झाला पाहिजे.(३१-१-१७).

यानंतर ना. परांजपे शिक्षणमंत्री झाल्यावर त्यांनीं न्या. चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली व तिच्या सूचनांस अनुसरून एक सक्तीच्या शिक्षणासंबंधीं बिल मुंबई कायदेकौन्सिलपुढें सादर केलें. पटेल बिलाची व्याप्ति म्युनिसिपालिट्यांपुरतीच होती; पण परांजपे यांचें बिल लोकलबोर्डांसहि लागू असून पटेलबिल ऐच्छिक होतें तर या बिलांत सरकारास सक्ति करण्याचा अधिकार होता. त्याबद्दल केसरीनें म्हटलें आहे कीं, 'स्थानिक संस्था कसूर 'करीत आहे हें ठरविण्याला साधन काय हें बिलांत नाहीं; केवळ हम करे सो 'कायदा असें धोरण ठेवावयाचें असेल तर अलाहिदा. पण जुलुमाचा रामराम 'नको असेल तर स्थानिकसंस्थांची सांपत्तिक स्थिति व जनतेची मागणी या दोहोंचें 'कांहीं तरी निश्चित व दृश्य असें गमक ठरविलें पाहिजे. तसेंच शिक्षणाची खरी 'सत्ता बोर्डाच्या बजावणी कामगाराच्या हातांत असून त्या कामगाराच्या नेमणुकी- 'ला सरकारी पसंती पाहिजे यांतच ब्यूरॉक्रसीची मेख आहे. सरकारनें म्युनिसि- 'पालिट्यांस ग्रँट किती द्यावी यासंबंधांत मतभेद झाल्यामुळें पटेलबिलाचा 'व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. नवीन बिलांतहि सरकार १/२ च ग्रँट देईल तर 'त्याचाहि व्हावा तसा उपयोग होणार नाहीं. म्युनिसिपालिट्यांस २/३ व बोर्डास ३/४ 'ग्रँट मिळेल तर अल्पावधींत सक्तीच्या शिक्षणाचा प्रसार सर्वत्र होईल.'

(१९-९-२२; ३-१०-२२).

या बाबतींत केसरीनें मुख्यतः सक्तीच्या शिक्षणामुळें जी प्राथमिक शिक्षणाच्या खर्चांत वाढ व्हावयाची त्याचा कितवा हिस्सा सरकार सोसणार हें निश्चित करून घेण्यासंबंधीं अनेकवार प्रतिपादन केलें व खर्चाच्या रकमेचें प्रमाण स्थानिक संस्थांच्या सांपत्तिक स्थितीवर अवलंबून ठेवलें तरच या बिलाची अंमलबजावणी होईल असें वारंवार बजावून सांगितलें व पुढें लोकलबोर्डांकडे प्राथमिक शिक्षण गेल्यावर त्यांना या बाबतींत जो अनुभव आला त्यावरून केसरीची ही पूर्व सूचना किती महत्त्वाची होती हें ध्यानांत येईल.

**पुण्यांतील सक्तीचें शिक्षण**—पटेलबिल पास झाल्यानंतर पुणें म्युनिसिपालिटीनें आपल्या हद्दींत सक्तीचें शिक्षण सुरू करण्यांत यावें याबद्दल खटपट चालविली. त्या वेळीं म्युनिसिपालिटींत राष्ट्रीय पक्षाच्या हातांत कारभार होता. पटेल-बिलामध्यें सरकारनें वाढत्या खर्चांचा बोजा सरकारवर टाकला नव्हता. तेव्हां या बाबतींत सरकार वाढत्या खर्चापैकीं कोणता हिस्सा सोसणार हें अनिश्चित होतें व सर्वच खर्च म्युनिसिपालिटीस सोसणें अशक्य होतें. त्या वेळीं एक काटकसरकमिटीहि नेमण्यांत आली होती व तिनें शाळांच्या इमारतीचा उपयोग दुहेरी करण्याकरितां पाळीपाळीनें दोनदां शाळा भरवून प्रत्येक वेळीं

३॥ तास शिक्षण द्यावें अशीहि एक सूचना केली होती. राष्ट्रीय पक्षाचें म्हणणें त्या वेळीं होतें कीं, प्रथम मुलांस तेवढी सक्ती लागू करावी व पुढें पैशाची आणखी तजवीज करून पांच वर्षांनीं मुलींसहि सक्तीचें शिक्षण सुरू करावें. या वेळीं पुण्यांत या सक्तीच्या शिक्षणाच्या प्रश्नानें मोठी खळबळ उडवून दिली होती. त्या वेळच्या जहाल आणि मवाळ या दोन राजकीय पक्षांनीं या बाबतींतहि दोन बाजू स्वीकारून हा प्रश्न मतभेदाच्या जाळ्यांत गुंतवून शिक्षणाचा प्रश्न पुढें ढकलला. ज्या अर्थी राष्ट्रीय पक्ष म्युनिसिपालिटीमध्यें अधिकारावर होता व त्यांनीं फक्त मुलांस सध्यां सक्तीचें शिक्षण द्यावें असें ठरविलें त्या अर्थी मवाळांनीं मुलींसहि सक्तीचें शिक्षण तावडतोब द्या नाहीं तर कोणासच नको असा हट्ट धरला व या पक्षांतील सहा म्युनिसिपल कौन्सिलरांनीं सरकारी सभासदांशीं संगनमत करून मुलांच्या शिक्षणाच्या सक्तीच्या ठरावास जरूर तेवढें मताधिक्य मिळवूं दिलें नाहीं. यासंबंधीं पुण्यास एक स्त्रियांची मोठी मिरवणूक निघाली होती व किर्लोस्कर थिएटरमध्यें भरलेल्या एका प्रचंड सभेंत गोंधळ उडून ती मोडण्यांत आली होती. या वेळीं 'मुलांच्या शिक्षणांतील षड्रिपु' हा अग्रलेख लिहून केसरीनें राष्ट्रीय पक्षाची फार उत्तम तरफदारी केली होती. त्या वेळचा हा वाद मोठा मनोरंजक असून पुणेंकरांच्या स्मरणांतून तो जाणें शक्य नाहीं. या बाबतींत केसरीनें ना. गोखले व ना. शास्त्री यांचींहि मतें कशीं आपल्या बाजूचींच होतीं हें दाखविलें होतें व लोकमत अजमावयाचें असेल तर रेफरेंडम घ्यावें अशीहि सूचना केली होती. पण या वादाच्या मुळाशीं शिक्षणाविषयीं कळकळ नसून पक्षभेदच असल्यामुळें अखेरीस कोणतीहि योजना पास होऊं शकली नाहीं. त्यावेळचा केसरी म्हणतो 'आपलें शिक्षण-
'विषयक प्रगतिपर कर्तव्य केलें हें श्रेय राष्ट्रीय पक्षाला मिळणार या भीतीनें
'गांगरलेले मत्सरग्रस्त मवाळ आपला सूड उगाविणार आणि निदान मुलांना जें
'मिळालें असतें त्यास अपशकून करणार. सक्तीचें शिक्षण करण्याची तळमळ राष्ट्रीय
'पक्षाला आज दीड वर्ष लागली असून षड्रिपूंच्या विरोधामुळें ती निष्फळ झाली
'आहे. शहरच्या सांपत्तिक स्थितीचा विचार न करतां वाटेल तितका कर बसवा आणि
'मुलांस व मुलींस सक्तीचें शिक्षण एकदम द्या. तसें न कराल तर मुलांसहि द्याव-
'याचें नाहीं हा आततायीपणा करणारे सच्चे प्रामाणिक व आज मुलांकरितां हा
'उपक्रम करूं, लवकरच अधिक खर्च करण्याची तयारी करूं व मग मुलीं-
'नाहि या सक्तीचा फायदा देऊं असें म्हणणारे राष्ट्रीय मात्र अप्रामाणिक! हा
'खासा न्याय! पण हा न्याय असें जनता कधीं म्हणणार नाहीं. संसारांतील
'आर्थिक जबाबदारी पुरुषाची प्रथम पुरुषानेंच निस्तरली पाहिजे व ही जबाबदारी
'त्यांच्या हातून पार पाडण्यास लागणारें शिक्षण तो आपखुषीनें न घेईल तर तें
'त्याला सक्तीनेंहि प्रथम दिलें पाहिजे. तें स्त्रियांना पुरुषांबरोबर देतां आल्यास

‘ हरप्रयत्नानें द्यावें पण तसें नसेल तर शिक्षणाचा मान म्हणा फायदा म्हणा ‘ किंवा जाच म्हणा प्रथम पुरुषासच होणें अपरिहार्य आहे.’ ( १७-२-२० ). ‘ त्यांच्या ( मवाळांच्या ) नाचरेपणाच्या मुळाशीं स्त्रीशिक्षणाची कळकळ ही ‘ खरी नसून कांहीं तरी करून लब्धप्रतिष्ठित बनण्याची हांव हीच आहे. सुधारणे- ‘ चा जो नवा बाजार भरणार त्यांत उचलेगिरी करून कांहीं हातीं लागतें का ‘ पाहावें अशा भावनेनें आरंभिलेल्या उद्योगाचीं हीं कचीं फळें आहेत म्हणून मवाळां- ‘ ना त्यांचे स्त्रीशिक्षणासारखे जुने चोचलेच काय पण ज्यांनीं आजपर्यंत ‘ तेली, ‘ तांबोळी, गुंड’ या शब्दांनीं ज्यांची संभावना केली त्यांना बगलेंत मारण्याचे ‘ नवे चाळेहि सुचूं लागले आहेत. ’ ( कित्ता ). मतदारांच्या संघांत आपण मताधिक्य उत्पन्न केलें आहे असें जर यांना वाटत असेल तर रेफरेंडम घेण्यास कोणती हरकत ? पुंडाईपेक्षां मतें मोजणें अधिक हितावह असतें अशी लॉर्ड मोर्ले यांची शिकवणूक आहे. पण लॉर्ड मोर्ले यांचें मत धिंगाण्यांत मौज मारणाऱ्या तारवटलेल्यांना काय उपयोगाचें ? मतदारसंघाच्या मताबद्दल ज्यांच्या मनांत एवढी तुच्छता ते स्वराज्याच्या हक्काचें संरक्षण कसें करणार ? ते मतदारसंघाकडे जावयाचे नाहींत तर सरकारी अधिकाऱ्यांकडे धांव घेतील. ( कित्ता ).

सक्तीच्या शिक्षणाच्या बाबतींत सरकार कितवा हिस्सा खर्चाचा सोसणार हें निश्चित ठरल्याशिवाय सक्तीच्या योजनेस हात घालूं नये असें केसरीनें मुळापासून प्रतिपादन केलें व या बाबतींत ना. गोखले व ना. शास्त्री यांचा कसा आग्रह होता हेंहि निदर्शनास आणलें व पुणें म्युनिसिपालिटीनें मुलांच्या बाबतींत दोन-तृतीयांश व मुलींच्या बाबतींत तीनचतुर्थांश खर्चाचा हिस्सा सरकार देण्यास तयार असेल तरच सक्ती करावी, निदान तशी सरकारकडे आग्रहाची मागणी करावी असें बजावलें व राष्ट्रीय पक्ष स्त्रीशिक्षणाभिमानी असला तरी दुधखुळा नाहीं हें खूप समजून असावें म्हणून सांगितलें. पुढें तीनचतुर्थांश मदतीची मागणी करावी हें राष्ट्रीय पक्षाचें म्हणणें नेमस्त पक्षानें मान्य केल्यावर उभयतां मुलांमुलींचें शिक्षण सक्तीचें करावें व खर्चाचा मेळ बसत नसेल तर कांहीं शाळा ५ तासांच्या ठेवून त्यांत भर-फी घ्यावी व कांहीं शाळांत सक्तीचें व मोफत शिक्षण ठेवून तें तीन तासांचें ठेवावें असें राष्ट्रीय पक्षानेंहि धोरण ठरविलें. ‘ ही तीनचतुर्थांश मदतीची मागणी करण्यास नेमस्त पक्ष गुदस्ताच तयार झाला ‘ असता तर हा प्रश्न गेल्या बारा महिन्यांत सलोख्यानें सुटला असता. परंतु राष्ट्रीय ‘ पक्षावर त्यांनीं केलेल्या निंदास्पद आक्षेपामुळें शिक्षणाचें गांठोडें मधल्यामध्येंच खुंटीला टांगून पडलें. ’ ( ४-१०-२१ ).

या बाबतींत टर्मिनल टॅक्स बसवून वाढत्या खर्चाची तजवीज करावी अशी डॉ. लोहोकरे यांची सूचना होती तीसहि सरकारची मंजुरी मिळाल्यास पाहावी म्हणून केसरीनें शिफारस केली होती. परंतु खर्चाची तरतूद करण्याची दुसरीहि

एखादी योजना तयार करून ठेवावी, नाहीं तर हा सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न पुन्हा घोंटाळ्यांत पडेल असें बजावलें होतें.

सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न मुंबई म्युनिसिपालिटीनें सरकार खर्चाचा कितवा हिस्सा सोसणार या बाबतींतल्या अनिश्चिततेमुळें पुढें ढकलला तेव्हांहि केसरीनें या बाबीचें महत्त्व जाणून सरकारनें दोनतृतीयांश खर्च निदान सोसलाच पाहिजे त्याशिवाय कोणत्याहि म्युनिसिपालिटीनें सक्तीच्या शिक्षणाचा कायदा लागू करून घेऊं नये असें निक्षून सांगितलें होतें. ( २४-२-२० ).

सक्तीच्या शिक्षणास मुसलमान आड येतात अशी एक लंगडी सबब सरकार बरींच वर्षे सांगत असे. पण पंजाबमध्यें मुलांस व मुलींसहि सक्तीचें शिक्षण देण्याबद्दल पंजाबमध्यें पास झालेल्या बिलाचा निर्देश करून मुसलमान दंगे करतील हें सरकारचें म्हणणें किती खोटें आहे तें दाखविलें व त्याबरोबर पंजाबसरकार मारवाडी नसून खर्चाचा बोजा घेण्यासहि कसें तयार आहे ही गोष्ट निर्दिष्ट केली. ( ३-१०-१७ ).

**गरीब शाळामास्तरांची कैफियत**—प्राथमिक शाळांतील शिक्षकांस प्रथमपासूनच पगार अगदीं थोडा मिळत असे. त्यांच्याबद्दल एकदां केसरीनें म्हटलें आहे ‘ चाकरी मिळेना तर माग भीक व कोणी वाढीना तर पंतोजीपणा शीक.’ ‘ ही म्हण आजच्या शिक्षकांच्या हलाखीची पूर्णपणें द्योतक आहे. लेखणीनें ‘ डोळ्यांतील काजळ काढून घेणारा कारकून, चावडींतील रकस्यावरून बादशाही ‘ गाजविणारा पाटील, दीड हात दंडुक्याच्या जिवावर जुलूम करणारा पोलीस, ‘ मद्यपी बनवून कलालाचें व सरकारचें घर भरणारा अबकारी नोकर, यांची ‘ कामगिरी सरकारच्या डोळ्यांत भरावी आणि रात्रीं कोणाला न कळत शेतावर ‘ पडून धान्याला अंकुर फुटविणाऱ्या परोपकारी पावसाप्रमाणें लोकांच्या डोळ्यां‘ आड खेडेगांवांत बसून कोंवळ्या मुलांच्या मनाला वळण लावण्याचें कार्य कर‘ णाऱ्या शाळामास्तरचें काम सरकारच्या डोळ्यांत भरूं नये हा केवळ कालमहिमा ‘ म्हटला पाहिजे. संप होऊन सरकार व शिक्षक यांच्या संबंधांतील अब्रूचें कांचेचें ‘ भांडें एकदां फुटलें म्हणजे तें फिरून सांधलें जाणार नाहीं. शाळाखात्याचे पगार न ‘ वाढले तर सरकार या एकाच खात्याला विशेष तुच्छ मानतें किंवा या एकाच ‘ खात्यांतील नोकरांच्या अंगीं स्वाभिमानाचा विशेष अभाव आहे, याशिवाय ‘ तिसरें अनुमान तिऱ्हाइतास काढणें शक्य नाहीं.’

ना. परांजपे शिक्षणमंत्री झाल्यावर त्यांनींच केलेली साठे--परांजपे योजना अंमलांत येईल अशी शिक्षकांस आशा होती. परंतु त्या बाबतींत त्यांची पूर्ण निराशा झाली. ना. परांजपे यांनीं ही गोष्ट आपल्या अंगाबाहेर टाकण्याकरितां चंदावरकरांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली व तिच्याकडे हा प्रश्न सोंपविला. या कमिटीनेंहि साठे—परांजपे योजना मान्य केली. परंतु अंमलबजावणीचें

चिन्ह दिसेना. पुढें शिक्षक-संघाच्या डेप्युटेशननें दिवाणसाहेबांची भेट घेतली तींत साठे–परांजपे योजनेंतील आरंभींचा पगार मान्य केला, पण अखेरचा पगार इतका कमी देऊं केला कीं, पहिल्या वर्षांच्या ट्रेंड शिक्षकास बढतीच्या मानानें पूज्य, सिलेक्शन ग्रेड बंद व चांगल्या कामाबद्दल शिफारस झाल्यास अलावन्स देऊं असें आमिष दाखविण्यांत आलें. पण तें मिळणें न मिळणें इन्स्पेक्टरच्या लहरीवर. अशा वेळीं एकीकडे सक्तीच्या शिक्षणाची योजना सुरू आहे तर दुसरीकडे हजारों शिक्षकांवर अन्याय करून असंतोष पसरविण्यांत येत आहे हें कांहीं सुचिन्ह नव्हे असें केसरीनें ध्वनित केलें आहे.

पुढें बोर्डाच्या ताब्यांत शिक्षण देण्यापूर्वीं एक नवें स्केल शिक्षकांच्या बाबतींत जाहीर करण्यांत आलें. त्यानंतर ना. जाधवराव दिवाण झाले व त्यांनीं सुर्वेकमिटी नेमून या प्रश्नाची टोलवाटोलवी चालविली. सुर्वेकमिटीनें पगारवाढींत फारशी सुधारणा न करतां हेडमास्तर व फर्स्ट असिस्टंट यांस मुलांच्या संख्येच्या मानानें अलावन्स देण्याची पद्धति सुरू विली व त्यांतहि सिंधमध्यें उर्दू शाळांस पक्षपात दाखविण्यांत आला. सुर्वेकमिटीनें साटे- परांजपे योजना देण्यास कोणत्या म्युनिसिपालिट्या तयार आहेत अशी विचारणा करून कालहरण करण्याचाहि एक प्रयत्न केला, पण त्यांत धुळ्यासारख्या कांहीं म्युनिसिपालिट्यांनीं साठे--परांजपे योजना मान्य असल्याचेंहि कळविलें. साटे--परांजपे स्कीम मान्य केल्यास दरसाल २०लक्ष रुपये जास्त खर्च होईल त्याऐवजीं तेवढ्या पैशांत चार पांच हजार शाळा नवीन काढतां येतील असें सुचविलें होतें. या युक्तिवादांतील बाष्कळपणा केसरीनें चांगलाच चव्हाट्यावर आणला. (१८-८-२५). या सुर्वेकमिटीच्या रिपोर्टास जी. बी. प्रधान व शिवदासानी यांनीं भिन्नमतपत्रिका जोडल्या होत्या. वरील अलावन्स देण्यासंबंधींच्या योजनेचा केसरीनें निषेध केला व हेडमास्तर व फर्स्ट असिस्टंट या दोघांसच अलावन्स ठेवल्यामुळें या जागा पटकावण्याकरितां विद्यार्थ्यांच्या शिक्षणाकडे लक्ष देण्यापेक्षां वरिष्ठांची मर्जी संभाळण्याकडे आणि वशिल्यांच्या लटपटी करण्याकडे शिक्षकांची प्रवृत्ति होणें स्वाभाविक नाहीं काय? अशी पृच्छा करून यामुळें शिक्षकवर्गांत तोंडपुजेपणा व चोंबडेपणा यांनाच उत्तेजन मिळेल असें बजावलें होतें व पुढें अनुभवहि तसाच आला. शिक्षकांच्या पगारासंबंधीं केसरीनें वरचेवर इतके वेळां लेख लिहिले कीं, एका प्रसंगीं केसरीकारांनींच ' या प्रश्नावर लिहून लिहून आमची लेखणी बोथट झाली आहे पण ' कौंसिलांतील कित्येक शिष्टांना प्राथमिक शिक्षकांच्या दुःस्थितीची कल्पनाच येत 'नाहीं ' असें म्हटलें आहे (११-८-२५).

---

# ट्रस्टी वि॰ टिळक-बंधू

[ श्री. लक्ष्मण बळवंत भोपटकर, एम्. ए., एल्एल्. बी. ]

केसरी-मराठा संस्थेसंबंधानें पुण्याच्या दिवाणी कोर्टांतून मु॥ नं. १२६४/१९२७, मु॥ न. [illegible]/१९२७ व मु॥ नं. २०२/१९२८, असे एकंदर तीन दावे चाललेले होते. यांपैकीं पहिला दावा वरील संस्थेचे ट्रस्टी दे. भ. तात्यासाहेब केळकर व बाबासाहेब विद्वांस यांनीं लोकमान्यांचे चिरंजीव श्री. रामभाऊ टिळक व कै. बापूराव टिळक यांचेवर लाविलेला होता, तर बाकीचे दोन दावे टिळकबंधूंनीं ट्रस्टींवर लाविलेले होते. हे दोन्ही दावे श्री. रामभाऊ यांनीं पुढें काढून घेतले! ट्रस्टींच्या दाव्याचा निकाल सन १९२९ च्या मार्च महिन्यांत पुणें कोर्टांत ट्रस्टींच्या वतीनें झाला. त्यावर श्री. रामभाऊ यांनीं स्वतःतर्फे व कै. बापूराव यांच्या अज्ञान मुलांतर्फे नामदार हायकोर्टांत नं. १९२/१९२९ चें अपील केलें होतें. त्याचाहि निकाल ट्रस्टींच्या तर्फेनें झालेला आहे.

२. ट्रस्टींनीं आपला दावा ता. १६ ऑगस्ट, १९२७, रोजीं दाखल केला व त्याचा निकाल ता. ७ मार्च, १९२९, रोजीं झाला. या दरम्यानच्या काळांत व नंतरहि या दाव्याकडे महाराष्ट्राच्या जनतेचें लक्ष अनेक दृष्टींनीं वेधून गेलेलें होतें, यांत कांहीं संशय नाहीं. लोकमान्य, त्यांची परंपरा व त्यांनीं निर्माण केलेला ट्रस्ट, यांच्याबद्दल भक्ति व अभिमान बाळगणाऱ्या लोकांना, ट्रस्टींना ट्रस्टच्या बाबतींत दावा करण्याचा व तोहि लोकमान्यांच्या चिरंजिवांवर करण्याचा, प्रसंग यावा, याबद्दल मनांतून वाईट वाटणें अगदीं साहजिक होतें. ट्रस्टींना तर मरणप्राय दुःख वाटत होतें! परंतु करतात काय बिचारे? एक तर दावा करून ट्रस्टचें जतन तरी करावें, नाहीं तर स्वस्थ बसून डोळ्यांदेखत ट्रस्टचा नाश खुशाल होऊं द्यावा. अशा अत्यंत बिकट पेंचांत ट्रस्टी सांपडलेले होते. परंतु अखेर स्वकर्तव्याला जागून त्यांनीं योग्य त्या मार्गाचाच अवलंब केला, याबद्दल टिळकभक्त त्यांना केव्हांहि दुवा दिल्याशिवाय खचित राहणार नाहींत. आपण हा दावा केल्यानंतर, लोकमान्यांचे, त्यांच्या परंपरेचे व ट्रस्टींचे प्रकट वा प्रच्छन्न शत्रु, या गोष्टीचा पूर्ण-पणें गैरफायदा घेऊन, लोकमान्य, ट्रस्टी किंबहुना महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्ष, त्यांच्या वर एकच काहूर उसळून देण्यास चुकणार नाहींत, याची जाणीव ट्रस्टींना नव्हती असें नाहीं. दुसऱ्या एखाद्या कच्च्या दिलाच्या ट्रस्टींनीं हा मार्ग पतकरण्यास बहुधा अळंटळमच केली असती! परंतु सुदैवानें ट्रस्टींच्या ठिकाणीं दे. भ. तात्यासाहेब केळकर व बाबासाहेब विद्वांस यांच्यासारखे खंबीर मनाचे गृहस्थ असल्या-कारणानें, त्यांनीं योग्य व आवश्यक अशा मार्गाचाच अंगिकार केला व त्यांनीं

दाखविलेल्या या मनोधैर्याबद्दल कोणीहि निःपक्षपाती मनुष्य केव्हांहि त्यांचें कौतुकच करीत राहील !

३. एकीकडे वरीलप्रमाणें वस्तुस्थिति होती, तर दुसरीकडे कित्येक विघ्नसंतोषी लोकांना पूर्वोक्त दावे दाखल झाल्यानंतर आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. पूर्वीच्या वैराचा सूड उगविण्यास, नाहीं तर केसरी संस्थेवर धोपाट्या घालण्यास ही उत्तम संधि आहे असें पाहून पुणेंमुंबईच्या लेखकांनीं व पत्रकारांनीं दोनतीन वर्षेंपर्यंत ट्रस्टींवर जें तोंडसुख घेतलें, त्याला तर सीमाच नव्हती ! हा धांगडधिंगा घालण्यांत निर-निराळ्या लेखकांचे निरनिराळे हेतु होते. कोणास ट्रस्टींच्या नांवाखालीं लोक-मान्यांच्या स्मृतीवर तडाखे लगवावयाचे होते तर कोणास ट्रस्टी ब्राह्मण म्हणून त्यांची बदनामी करावयाची होती; कोणास ट्रस्टी सारस्वतव्यतिरिक्त ब्राह्मण—विशेषतः कोंकणस्थ ब्राह्मण—म्हणून त्यांना निंदावयाचें होतें, तर कोणास केसरी प्रतिसहकारित्वाचा पुरस्कर्ता म्हणून त्यावर घाव घालावयाचे होते; कोणास तात्या-साहेबांचा बोलबाला सहन होत नव्हता म्हणून त्यांचा पाणउतारा करावयाचा होता, तर कोणास या संधींतून जमल्यास स्वतःचा लग्गा साधून घ्यावयाचा म्हणून तो या धूमधडाक्यांत सामील झालेला होता! सारांश, प्रत्येक लेखक कांहीं तरी विशिष्ट हेतूनें प्रेरित होऊन त्यानें दोनतीन वर्षांच्या अवधींत मनःपूत असें लिखाण केलें! या सर्व लिखाणांत अर्थात् सभ्यपणास फांटा देण्यांत येऊन वाष्कळपणास जसा काय ऊत आलेला होता ! असें करण्यांत या लेखकांना टिळकांच्या चिरंजिवांबद्दल प्रेमाचा मोठा पान्हा फुटत होता असें नव्हे ! सगळ्यांची मनोवृत्ति एकच कीं, तिकडे ते ट्रस्टी मरोत, नाहीं तर चिरंजीव मरोत, कैक दिवस पोटांत ढवळत असलेलें विष बाहेर ओकून टाकण्याची जी संधि प्राप्त झाली आहे, ती वांया घालवा कां ? त्यांतच मधून मधून श्री. रामभाऊ व कै. बापूराव हे आपल्या स्वतःच्या लेखांची व मुलाखतींची भर घालण्यास चुकत नसत ! अशा परिस्थितींत या लेखकांच्या टोल्यास उलट टोला देऊन त्यांची चांगलीच खरड घ्यावी, विशेषतः त्यांनीं केलेले खोटेनाटे आरोप कागदोपत्री पुराव्यानें खोडून काढून त्यांच्या विचित्र स्वभावांचें व मनोवृत्तीचें माप भरपूर त्यांच्या पदरांत घालावें, अशी इच्छा ट्रस्टींना अनेकदां झालेली असल्यास त्यांत मुळींच आश्चर्य नाहीं. परंतु ट्रस्टी हे माझे पक्षकार व मी त्यांचा वकील असल्यामुळें, हायकोर्टांत दाव्याचा निकाल होईपर्यंत कोण-त्याहि टीकेला कसलेंहि उत्तर द्यावयाचें नाहीं अशी मी ट्रस्टींना मनाई केलेली होती व मला लिहिण्यास आनंद वाटतो कीं, ती त्यांनीं अक्षरशः अंमलांत आणिली. चौफेर टीकांचा भडका उडालेला असतांना ट्रस्टींनीं त्याबद्दल कोठेंहि अवाक्षर काढलें नाहीं किंवा लिहिलें नाहीं, याचें कारण ही माझी मनाईच होय ! हायकोर्टाचा निकाल लागेपर्यंत या बाबतींत ट्रस्टींना मूक वृत्ति धारण करण्यास लावण्यांत जर कदाचित् कोणाचा दोष असलाच, तर तो सर्वस्वीं माझाच आहे !

माझ्या या मनाईमुळें ट्रस्टींना दोनतीन वर्षेपर्यंत अनंत मानसिक यातना सहन कराव्या लागल्या, याची मला पूर्ण जाणीव होती व आहे. तथापि, कोर्टांत दावा चालू असे तोंपर्यंत वर्तमानपत्रांतून या वादाचा खल करणें व दाव्यांतील पुराव्याची विरी घालवून टाकणें चांगलें नव्हे असें वाटून मी केलेली मनाईच इष्ट होती असें अद्याप मला वाटतें.

४. ट्रस्टी व टिळकबंधू यांच्यामधील वादांत जे चारदोन महत्वाचे मुद्दे गोंविलेले होते, त्यांपैकीं एक महत्त्वाचा मुद्दा असा कीं, केसरी-मराठा संस्थेबद्दल ट्रस्ट निर्माण करण्याची मूळ कल्पना कोणाची ? व ती जर लोकमान्यांची असली, तर त्याबद्दल त्यांची इच्छा कोणत्या प्रकारची होती ? याचा विचार करतांना जरासा पूर्व इतिहास पाहणें अवश्य आहे. सन १८८० सालीं कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या सहकारी मित्रांच्या साहाय्यानें न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना केल्यावर सर्वांच्या मनांत इंग्रजी व मराठी साप्ताहिक वर्तमानपत्रें काढून स्वतःचा छापखाना काढण्याची इच्छा प्रादुर्भूत झाली. सर्वजण अत्यंत धडाडीचे व कर्तृत्ववान् तरुण असल्यामुळें, थोड्याच अवधींत त्यांनीं आपल्या इच्छेला मूर्त स्वरूप प्राप्त करून दिलें. न्यू इंग्लिश स्कूल झालें काय, किंवा इतर व्यवसाय झाले काय, ते कोणा एकट्याच्या मालकीचे नसून सर्वांच्या मालकीचे होत, अशीच सर्वांची दृष्टि होती व त्याप्रमाणेंच सर्वांचें वर्तन असे. सन १८८१ ते १८८७ पर्यंत मराठ्याचे प्रकाशक म्हणून लोकमान्यांचा केसरीशीं संबंध होता व त्याबद्दल कोल्हापूर प्रकरणांत त्यांना व कै. आगरकरांना तुरुंगवास भोगावा लागला. या अवधींत ते केसरीमध्यें क्वचितच लिहीत असत. आपण बरे कीं आपलें कॉलेज बरें, असेंच त्यांचें सामान्य धोरण होतें! सन १८८७ सालीं केसरी-मराठा हीं वर्तमानपत्रें व आर्यभूषण छापखाना, टिळक, वासुदेवराव केळकर व गोखले या तिघांच्या मालकीचीं होऊन, टिळक केसरीचे संपादक झाले. तरी पण केसरी व मराठा हीं पत्रें चालविण्याचें काम टिळकांपेक्षां केळकरच अधिक करीत असत. सन १८९१ सालीं केसरी व मराठा हीं पत्रें एकट्या टिळकांच्या पूर्ण व खाजगी मालकीचीं अशीं झालीं. दोन वर्तमानपत्रें दर आठवड्यास लिहून प्रसिद्ध करणें एकट्यास अशक्यप्राय आहे असें वाटल्यावरून, सन १८९६ सालीं टिळकांनीं तात्यासाहेब केळकर यांना मदतनीस म्हणून घेतलें. लगेच सन १८९७ सालीं लोकमान्यांवर पहिला राजद्रोहाचा खटला होऊन त्यांत त्यांना शिक्षा झाली. या खटल्यामुळें सबंध महाराष्ट्रांत अभूतपूर्व अशी खळबळ त्या वेळेस उडून गेलेली होती! या खटल्याच्या बाबतींत महाराष्ट्र जनतेनें त्यांना हरएक प्रकारचें साहाय्य केलें. खटल्याचे वेळीं लोकमान्यांनीं जरी त्या साहाय्याचा स्वीकार केला तरी त्याची फेड, या नाहीं त्या रूपानें, करणें आपलें कर्तव्य होय, अशी जाणीव त्यांना सतत होती. तुरुंगांतून सुटून आल्यानंतर केसरीची फारच भरभराट झाली. सन १९०४ सालीं त्यांनीं बडोदें सरकारकडून

गायकवाड वाडा खरेदी केला. केसरी-मराठा हीं पत्रें केवळ आपल्या स्वतःच्या मालकीचीं, त्यांत इतरांचा काडीचाहि संबंध नाहीं, एवढीच लोभी दृष्टि जर लोकमान्यांची असती, तर गायकवाड वाड्यासारखा अवाढव्य वाडा खरेदी करण्याचें त्यांना विशेषसें प्रयोजन नव्हतें. परंतु केसरी-मराठा पत्रांचा जन्म समाईक बौद्धिक भांडवलांत झालेला, त्यांचें बाळपणहि समाइकींतच गेलेलें, मध्यंतरीं हीं पत्रें आपल्या एकट्याच्या मालकीचीं झालेलीं असलीं तरी मूळ कल्पनेला अधिक व्यापक स्वरूप देणें हेंच त्यांचें वास्तव पर्यवसान होय व त्याकरितां या पत्रांच्या वाढत्या व्यापास अनुरूप अशीच मिळकत संपादन करून ठेविली पाहिजे, असाच दूरवर विचार करून त्यांनीं गायकवाड वाडा खरेदी केला असावा. मुंबईचे रा. रा. माधवराव बोडस हे ट्रस्टींना लिहिलेल्या आपल्या एका पत्रांत असें लिहितात कीं, 'सन १८९८ सालीं टिळक बंदींतून सुटून आल्यापासून केसरीचा ट्रस्ट करण्याची 'कल्पना निघाली व गायकवाड वाडा विकत घेतल्यावर ती कायम झाली.'

५. सन १९०८ सालीं लोकमान्यांवर राजद्रोहाचा दुसरा खटला होऊन त्यांत त्यांना सहा वर्षांची सजा मारण्यांत आली. पहिल्या खटल्यापेक्षांहि या खटल्यानें सबंध महाराष्ट्र जास्त हादरून गेला आणि केसरी व मराठा हीं महाराष्ट्राचीं मुखपत्रें म्हणून त्यांचें स्थान स्थिर झालें. त्यांच्यावर ओढवलेल्या प्रसंगावद्दल महाराष्ट्रानें जी जिव्हाळ्याची सहानुभूति प्रदर्शित केली, तीमुळें त्यांच्या मनावर खास विलक्षण परिणाम झालेला असला पाहिजे. त्या वेळेस गांवांत तर रोज नवीन नवीन कंड्या उठत असत. लोकमान्यांचीं पत्रें व मालमत्ता सरकार जप्त करणार आहे, अशीहि एक कंडी त्या वेळेस पिकलेली होती ! टिळक व सरकार यांच्यामध्यें अनेक वर्षें अपूर्व द्वंद्वयुद्ध चाललेलें होतें ! दोन्हीहि पक्ष एकमेकांवर उलटसुलट डावपेंच करून एकमेकांस नामोहरम करण्याविषयीं आपली शिकस्त करीत होते ! अशाच डावपेंचांपैकीं जप्तीचा डावपेंच सरकार टिळकांवर टाकणार आहे, म्हणून तेव्हां एक भूमका उठलेली होती. अशा सुमारास लोकमान्यांनीं मंडालेच्या तुरुंगांतूनच ता. ७ एप्रिल, १९०९, रोजीं गायकवाड वाड्यासंबंधानें आपल्या मुलांच्या नांवानें बाक्षिसपत्र केलें व तें मुंबईच्या सब-रजिस्ट्रारपुढें ता. ५ मे, १९०९, रोजीं नोंदण्यांत आलें.

६. सहा वर्षांच्या कैदेपैकीं एक वर्ष संपल्यानंतर लोकमान्यांनीं ता. २० ऑगस्ट, १९०९, रोजीं आपलें पहिलें मृत्युपत्र केलें. हें मृत्युपत्र व इतर कागदपत्र केसरीच्या 'ज्युबिली अंकां'त प्रसिद्ध झालेले आहेत. या मृत्युपत्रांतील ठळक बाबी अशा कीं, ( १ ) वाड्यासंबंधानें जरी चार महिन्यांपूर्वींच बक्षिसपत्र झालेलें होतें, तरी त्याचा अंतर्भाव एकंदर मिळकतींत करण्यांत आलेला आहे. उघडच आहे कीं, बाक्षिसपत्र म्हणजे लोकमान्यांचा सरकारावर एक उलट पेंच होता; त्यामुळें आपली पूर्ण स्वत्वानिवृत्ति करण्याचा त्यांचा उद्देश दिसून येत नाहीं. कारण, जर

तो तसा असता, तर त्यांनीं आपल्या स्वार्जित मिळकतींत वाड्याचा समावेश खात्रीनें केला नसता. शिवाय, मृत्युपत्राचें तेरावें कलम असें आहे कीं, ' हल्लीं नुकतेंच ' माझा वाडा, त्यांतील सामान व ग्रंथसंग्रह यांचें बक्षिसपत्र मुलांचे नांवानें मी ' करून दिलें आहे. तथापि आमच्या राहत्या घरभागाखेरीज इतर इमारत, ग्रंथसंग्रह ' व सामानसुमान वगैरे हें प्रेस इन्स्टिटयूटकरितां, माझे मुलांनीं ट्रस्ट मिळकत म्हणून ' संभाळावें. पुढेंमागें वाड्याची वांटणी करण्याचा प्रसंग आल्यास मुलांनीं पूर्वेकडील ' राहता घरभाग, समोरील मोठा दिवाणखाना, पिंपळाचा पार वगैरे भाग स्वतःकडे ' घ्यावा.' यावरून हें स्पष्ट होत आहे कीं, वाड्याचा पूर्वेकडील भाग मुलांना व पश्चिमेकडील भाग प्रेस इन्स्टिटयूटला देण्याचा लोकमान्यांचा हेतु होता. ( २ ) या मृत्युपत्रांत त्यांनीं केसरी व मराठा या वर्तमानपत्रांची ' इन्स्टिटयूट ' केलेली आहे. सोळांवें कलम असें आहे कीं, ' केसरी व मराठा या वर्तमानपत्रांची मी ' इन्स्टि- ' टयूट ' करीत आहें व त्याच्या उपयोगाकरितां, ट्रस्ट मिळकत म्हणून, छापखाना, ' यंत्रें, टाईप फौंडरी, सामान, पुस्तकें व केसरी-मराठा पत्रांवरील स्वामित्वाचे हक्क ' इत्यादि मी लावून देत आहें. या ट्रस्टला ' प्रेस इन्स्टिटयूट ' किंवा इतर कोण- ' तेंहि योग्य तें नांव द्यावें. ' म्हणजे त्यांच्या मनांत असलेल्या ट्रस्ट करण्याच्या इच्छेला त्यांनीं स्पष्ट व कायदेशीर स्वरूप दिलेलें आहे. ( ३ ) त्यांची मनापासूनची अशी इच्छा कीं, या ट्रस्टचीं सूत्रें दे. भ. तात्यासाहेब केळकर, कृष्णाजीपंत खाडिलकर व बाबासाहेब विद्वांस यांच्या हातीं असावींत व मुलांपैकीं कोणी लायक असल्यासच त्यास कामावर घेण्यांत यावें किंवा एक ट्रस्टी म्हणून नेमण्यांत यावें. मृत्युपत्राच्या १७, १८, १९ व २७ व्या कलमांमध्यें असें स्वच्छ लिहिलेलें आहे कीं, ' केसरी-मराठा वर्तमानपत्रांची व्यवस्था, वरील ट्रस्टाअन्वयें, श्री. नरसिंह चिंतामण ' केळकर व श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांजकडे द्यावी. त्यांनीं ती नाकारल्यास ' मगच दुसऱ्या कोणाला द्यावी....श्री. धोंडोपंत विद्वांस यांना, वरीलप्रमाणेंच, ' मॅनेजर म्हणून त्यांजकडे व्यवस्थापकाचें काम द्यावें.......माझ्या एकाद्या मुलाची ' इच्छा इन्स्टिटयूटमध्यें काम करण्याची असल्यास व तो कामाला लायक असल्यास ' त्या कामावर त्याचा पहिला हक्क आहे असें समजावें.....माझ्या मुलांपैकीं जर ' कोणी एखादा सज्ञान व लायक असेल तर त्याला ट्रस्टींपैकीं एक ट्रस्टी नेमण्यांत ' यावा.' ( ४ ) केसरी-मराठा पत्रांच्या धोरणासंबंधानेंहि त्यांनीं अशी स्पष्ट आज्ञा २१ व्या कलमांत केलेली आहे कीं, ' हल्लींप्रमाणेंच महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाचीं ' मुखपत्रें या स्वरूपानेंच केसरी व मराठा हीं वर्तमानपत्रें चालविलीं जावीं. संपा- ' दकांना पत्रांचें धोरण बदलण्याचा अधिकार नाहीं. ' ( ५ ) आणि पांचवी बाब २८ व्या कलमांतील अशी कीं, ' ट्रस्ट इन्स्टिटयूटचें काम चालणें अशक्य झाल्यास ' त्याची मिळकत माझे मुलगे किंवा त्यांचे वंशज आणि खालील सभासदांचें ' बोर्ड यांजकडे परत जावी. मग ती त्यांनीं विकून येईल त्या रकमेचा स्वतः उपयोग

' करावा किंवा ती मिळकत वाटल्यास दुसऱ्या एखाद्या शिक्षणविषयक किंवा ' सार्वजनिक कार्याकडे लावावी. ' म्हणजे या कलमांत ट्रस्टसंबंधाच्या उत्तराधिकारासंबंधानेंहि व्यवस्था करण्यांत आलेली आहे.

७. मंडालेच्या तुरुंगांतून सुटून आल्यानंतर सुमारें चार वर्षांनीं लोकमान्यांनीं आपलें दुसरें व अखेरचें वुइल ता. ५ एप्रिल, १९१९, रोजीं कोलंबो येथें केलें ! या मृत्युपत्राचे वेळीं त्यांच्या खाजगी व सार्वजनिक जीवनक्रमांत प्रचंड घडामोडी झालेल्या होत्या. त्यांचें प्रतिबिंब या मृत्युपत्रांत पडलेलें स्पष्ट दिसून येतें. विशेषतः त्यांची सांपत्तिक स्थिति या वेळीं निकृष्ट झालेली होती. पहिलें व हें मृत्युपत्र एकत्र वाचलें असतां कांहीं गोष्टी प्रामुख्यानें नजरेस येतात, त्या अशा कीं, ( १ ) पहिल्या मृत्युपत्रांत त्यांनीं केसरी व मराठा यांची ' प्रेस इन्स्टिटयूट ' केलेली होती, तर या मृत्युपत्रांत त्यांनीं त्यांचा ' पब्लिक ट्रस्ट ' केलेला आहे. ( २ ) वाडयाची वांटणी दोन्ही मृत्युपत्रांमध्यें एकच आहे. परंतु या दुसऱ्या मृत्युपत्रान्वयें सर्व वाडयाच्या विम्याचा खर्च, वाडयाची दुरुस्ती व सर्व पट्या यांचा भार पत्रांवर टाकण्यांत येऊन शिवाय मुलांना दरमहा रु. ७५ प्रमाणें भाडें देण्याबद्दल लिहिलेलें आहे. ( ३ ) दे. भ. बाबासाहेब विद्वांस त्यांच्याबद्दल असें लिहिलेलें आहे कीं, ते असेपर्यंत त्यांना छापखाना व ऑफिसचा मॅनेजर ठेवावें व 'त्यांना पगार एडिटरइतका द्यावा,' त्यांत कमी नसावा. ( ४ ) पत्रांच्या धोरणासंबंधानें पूर्वीच्याच आशेचा पुनरुच्चार करून असें लिहिलें आहे कीं, ' पेपरांची पॉलिसी ( Editorial Policy ) आहे तशीच ठेवणें, कांहीं झालें तरी बदलूं नये. ' ( ५ ) मृत्युपत्राप्रमाणें व्यवस्था करण्याचा अधिकार पूर्वीच्या मृत्युपत्रांत जो सहा जणांना देण्यांत आलेला होता तो रद्द करून या दुसऱ्या मृत्युपत्रान्वयें तो एकट्या बाबासाहेबांनाच देण्यांत आला व ते नसतील तर श्री. रामभाऊ यांना देण्यांत आला. ( ६ ) आणि या दुसऱ्या व्यवस्थापत्रासंबंधानें कांहीं भानगड पडल्यास कोर्टांत न जातां रा. तात्यासाहेब केळकर, विश्वनाथ गंगाधर केतकर व श्रीरंग मोरेश्वर साने या तिघांनीं निकाल करावा व तो सर्वांनीं मान्य करावा. ट्रस्टसंबंधाचा वाद नीट लक्षांत येण्यास वरील सहा प्रमुख बाबी ध्यानांत धरावयास पाहिजेत. वरील हकीगतीवरून हें कोणासहि समजून येईल कीं, पत्रें व छापखाना यांचा ट्रस्ट करण्याची मूळकल्पना लोकमान्यांची व तिला निश्चित व विशिष्ट स्वरूप त्यांनीं पुन्हां आपल्या कोलंबोच्या मृत्युपत्रांत दिलेलें आहे.

८. चिरोल केस सपशेल लोकमान्यांच्या अंगावर आली. या खटल्यासाठीं त्यांनीं पाण्यासारखा पैसा खर्च केला होता; इतका कीं, ते जवळ जवळ कफल्लकच बनलेले होते ! त्यांतच चिरोलसाहेबांच्या खर्चाचा बोजा शिरावर येऊन पडला ! खटल्याच्या निकालाची तार पुण्यास येऊन थडकल्यावर साहजिकपणें त्यांच्या अनुयायांना अत्यंत दुःख झालें. लोकमान्यांना एक सहानुभूतीची तार पाठवावी, कां करावें तरी काय, याबद्दल विचार करण्यासाठीं कांहीं निवडक मंडळी एकत्र

जमली असतां, दे. भ. तात्यासाहेब केळकर यांनीं अशी एक कल्पना सुचवली कीं, टिळकभक्तांनीं शक्य तितक्या लवकर तीन लाख रुपये जमवून ती रक्कम लोकमान्यांना समर्पण करावी व अशा रीतीनें त्यांना ऋणमुक्त करून त्यांच्या वरील आपला अढळ विश्वास व्यक्त करावा. ही कल्पना सर्वांना मान्य होऊन तेथल्या तेथेंच आंकडे घेण्यांत आले व ते अतिशय उत्तेजनकारक असे पडल्याकारणानें सर्वांचा उत्साह वृद्धिंगत झाला. बोल बोल म्हणतां वर्गणीचा आंकडा फुगत जाऊन एकंदर रक्कम रु. २,८६,३५७८७८२ इतकी जमली. ता. २२ मे, १९२०, रोजीं जाहीर समारंभ करण्यांत येऊन ती लोकमान्यांना अर्पण करण्यांत आली. ही रक्कम जमल्याकारणानेंच लोकमान्य पैशाच्या ओढघस्तींतून पार पडले; इतकेंच नव्हे तर सुखानें दिवस घालावितां येतील, अशी तरतूद त्यांना आपल्या मुलांची करितां आली. मुलांना जी मिळकत मिळाली ती तात्यासाहेबांच्या वरील कल्पनेचें व लोकमान्यांच्या अनुयायांच्या भक्तिभावाचें निव्वळ फळ होय, ही गोष्ट कोणींहि विसरतां कामा नये! जर ही कल्पना तात्यासाहेबांनीं काढली नसती किंवा ती टिळकांच्या भक्तांनीं उचलून धरून ती साध्य करण्यासाठीं त्यांनीं ऐपतीबाहेर आपला हातभार लाविला नसता, तर टिळकांच्या चिरंजिवांच्या खाका तर केव्हांच वर झाल्या असत्या, किंबहुना टिळकांचें कर्ज फेडतां फेडतां केसरी व मराठा पत्रांच्याहि नाकीं नऊ आले असते! पण हें लक्षांत घेतो कोण?

९. टिळकभक्तांनीं ही जी त्यांना सुमारें तीन लाखांची पर्स अर्पण केली, ती त्यांना त्यांनीं त्यांच्याच स्वतःकरितां अर्पण केली, यांत बिलकुल संशय नाहीं. तरी पण एका दृष्टीनें तें त्यांच्या भक्तांनीं त्यांना दिलेलें कर्जच होतें, हेंहि कांहीं खोटें नव्हे. स्वतः लोकमान्यहि या पर्सकडे याच दृष्टीनें पहात असत! हें कर्ज, या नाहीं त्या रूपानें, परत करणें आपलें कर्तव्य आहे, तरच लोकमान्यांचा आत्मा वर स्वर्गांत संतुष्ट होईल ही जाणीव प्रथमपासून ट्रस्टींना असल्याकारणानें, त्यांचे त्या दिशेनें प्रयत्न चाललेलेच होते व अखेर त्यांना यश गेल्या वर्षी आलें. त्याप्रमाणें ट्रस्टींनीं गेल्या ता. १ ऑगस्ट, १९३०, रोजीं तीन लाखांचा ट्रस्ट निर्माण करून त्याबद्दल ट्रस्ट-डीडहि केलें. हें पाहून लोकमान्यांच्या आत्म्यानें खास आनंदाश्रु ढाळले असतील! दे. भ. तात्यासाहेब यांच्या हातून आजवर अनेक सत्कृत्यें झालेलीं आहेत. परंतु यासारखें सत्कृत्य निःसंशय दुसरें कोणतेंहि नसेल. आपल्या गुरुवरील निस्सीम भक्तीचें प्रत्यंतर आणखी कोणतें हवें? हें ट्रस्ट-डीड केसरीच्या ज्युबिली अंकांत समग्र प्रसिद्ध झालेलें आहे. चालू राजकारणाच्या धुमाळींत लोकांचें लक्ष तिकडे जावें तसें गेलेलें दिसत नाहीं. परंतु ही धुमाळी जरा शांत झाल्यावर, या ट्रस्टचें महत्त्व व उपयोगित्व सर्वांस पटल्याशिवाय खचित राहणार नाहीं! या ट्रस्टसंबंधानें रामभाऊंनीं 'हलवायाचे घरावर तुळशीपत्र' या नांवानें प्रसिद्ध केलेल्या एका अश्लील चोपड्यांत ट्रस्टींची निंदा करण्याच्या भरांत त्यांनीं लोकमान्यांना—

खुद्द आपल्या वडिलांनाच—' बाळकू गवळ्या 'च्या पायरीवर आणून बसविलेलें आहे !

१०. लोकमान्य ता. १ ऑगस्ट, १९२०, रोजीं कालवश झाले. दुःखाचा पहिला उमाळा कमी झाल्यावर लोकमान्यांचा कलिजा जो त्यांचीं केसरी-मराठा पत्रें व त्यासंबंधाचा त्यांचा ट्रस्ट यांकडे सर्वांचें लक्ष वेधणें साहजिकच होतें. लोकमान्यांचे चिरंजीव चांगले कर्तेसवरते झालेले होते, त्यांना जिव्हाळ्याचा सल्ला देण्यास त्यांची आप्तेष्ट व मित्रमंडळी जवळ होतीच, दोघेहि जात्या निर्भीड स्वभावाचे असल्या-मुळें, स्वतः लोकमान्यांच्या हयातींत आपले मतभेद जाहीर रीतीनें प्रसिद्ध करण्यास ते जेथें डरत नव्हते, तेथें ते इतरांशी पतरास ती काय ठेवणार ? शिवाय, ते स्वतःच्या हितसंबंधाविषयीं सतत जागरूकहि असत. या विषयासंबंधानें बाटाघाट होऊन शेवटीं ट्रस्ट-डीड करण्याचें निश्चित करण्यांत आलें व त्याप्रमाणें १६-८-२० रोजीं रा. रामभाऊ टिळक, बापूराव टिळक व बाबासाहेब विद्वांस अशा तिघांनीं ट्रस्ट-डीड करून तें नोंदलें !. या ट्रस्टडीडवरील एक साक्ष दे. भ. कृष्णाजीपंत खाडिलकर यांची आहे. ट्रस्ट-डीडच्या सरनाम्यांत असा मजकूर आहे कीं, ' आम्हांपैकीं नं. ३ ( विद्वांस ) यांस सदरचे ( कोलंबो येथें ' केलेल्या ) मृत्युपत्रांत एक्झिक्यूटर नेमिलेलें आहे व आम्हांपैकीं नं. १ व नं. २ ' हे मयताचे वारस पुत्र आहेत. त्या मृत्युपत्रांत केसरी छापखाना, वर्तमानपत्रें वगैरे ' संबंधाची जी व्यवस्था आमच्या वडिलांनीं व मामांनीं केली, तिलाच संमति देऊन ' त्यांचे हेतु पूर्ण होण्याकरितां व मृत्युपत्राची पूर्तता होण्याकरितां आम्ही त्रिवर्ग हें ' ट्रस्ट-डीड लिहून ठेवीत आहोंत. ' ट्रस्ट-डीडचें पहिलें कलम असें आहे कीं, ' कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनीं केसरी व मराठा वर्तमानपत्रें हातांत घेतल्या-' पासून त्या पत्रांचे द्वारें राजकीय शिक्षणाचा प्रसार करून लोकांत राजकीय हक्कांची ' जाणीव उत्पन्न करणें व राष्ट्रीय ध्येयास पोषक अशा इतर अनेक अंगांच्या सार्व-' जनिक चळवळी करणें वगैरे सर्व कामें ज्या हेतूनें केलीं, तोच त्यांचा हेतु त्याचे ' पश्चात् निरंतर व अबाधित अंमलांत येण्याचें साधन म्हणून हें ट्रस्ट-डीड करण्यांत ' आलें आहे. ' ट्रस्ट-डीडच्या इतर कलमांमध्यें ट्रस्टी व टिळकांचे चिरंजीव यांच्या मधील हक्कसंबंध निश्चित करण्यांत आलेले आहेत.

११. या ट्रस्ट-डीडचा मसुदा टिळकपुत्रांच्या एका जवळच्या नातेवाईक वकिलानें केलेला असून, तो कै. बापूराव टिळक यांनीं स्वहस्तें लिहिलेला आहे. सर्व बाबींची शहानिशा होऊनच मग ट्रस्ट-डीडचीं कलमें मुक्रर करण्यांत आलीं, व नंतर ट्रस्ट-डीड लिहून नोंदण्यांत आलें. या सर्व वाटाघाटींत श्री. रामभाऊ व बापूराव यांनीं प्रामुख्यानें भाग घेतलेला होता. कोलंबोचें मृत्युपत्र हें या ट्रस्ट-डीडचा पाया असून, सदर मृत्युपत्रांतीलपेक्षां जास्त बोजा चिरंजिवांच्या आग्रहा-वरून केसरी संस्थेवर लादण्यांत आला, व एक बहुमोल हक्क त्यांना देण्यांत आला.

उदाहरणार्थ, ( १ ) कोलंब्रोच्या मृत्युपत्रान्वयें टिळकपुत्रांना जे दरमहा रु. ७५ प्रमाणें मिळावयाचें ती रक्कम रु. १०० अशी वाढविण्यांत आली. ( २ ) कोलंब्रोच्या मृत्युपत्रांत ट्रस्टींनीं भाडेचिठ्ठी लिहून देण्याबद्दल कांहीं मजकूर नाहीं. परंतु ट्रस्ट-डीडमध्यें अशी एक शर्त आहे कीं, 'त्याबद्दल ( म्हणजे ट्रस्टींच्या 'ताब्यांतील जागेबद्दल ) सदरचे ट्रस्टी यांनीं आम्हांपैकीं नं. १ व नं. २ ( म्हणजे 'टिळकपुत्र ) यांस निरंतरची भाडेचिठ्ठी लिहून द्यावी.' ( ३ ) कोलंब्रोच्या मृत्युपत्रांत गणेशोत्सवाचा उल्लेख नाहीं. परंतु ट्रस्ट-डीडमध्यें याबद्दल अकरावें कलम असें आहे कीं, 'आजपर्यंत गायकवाड वाड्यांत श्रीगणपत्युत्सव केसरी 'ऑफिसचे खर्चानें होत आला आहे, त्याप्रमाणें तो उत्सव यापुढेंहि ही संस्था 'कायम आहे तोंपर्यंत टस्टी यांनीं ट्रस्ट मिळकतींतून खर्च करून साजरा करावा.' ट्रस्ट-डीडमध्यें असें स्वच्छ कलम असतांना, चिरंजिवांनीं दोन वर्षे या उत्सवाचे बाबतींत केवळ हटवादीपणानें केवढा धिंगाणा माजवून दिला होता? ( ४ ) केसरी संस्था नष्ट झाल्यास ट्रस्ट मिळकतीची व्यवस्था कशी करावयाची याबद्दल मंडालेच्या मृत्युपत्रांत आज्ञा असली, तरी कोलंब्रोच्या मृत्युपत्रांत ती नाहीं. मंडालेच्या मृत्युपत्रान्वयें सदर मिळकत टिळकांचे चिरंजीव व ट्रस्टी यांच्याकडे परत जावयाची असून त्यांनीं ती मिळकत विकून येईल त्या रकमेचा विनियोग स्वतःकडे अगर एखाद्या शिक्षणविषयक किंवा सार्वजनिक कार्याकडे करावयाचा होता. ट्रस्ट-डीडअन्वयें हा उत्तराधिकार फक्त टिळकांच्या मुलांनाच देण्यांत आलेला आहे. आठव्या कलमांत अशी शर्त आहे कीं, 'ही संस्था कोणत्याहि कारणानें 'नष्ट झाल्यास व ती पुढें केव्हांहि सुरू करणें अशक्य आहे असें वाटल्यास ट्रस्टची 'मिळकत आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांची अगर त्यांचे वारसांचे मालकीची 'होईल.' सारांश, कोलंब्रो मृत्युपत्रानें मुलांना दिलेले हक्क व ट्रस्टींवर टाकलेल्या जबाबदाऱ्या ट्रस्ट-डीडनें यत्किंचितहि कमी केलेल्या नसून, उलट मुलांना जास्त हक्क देऊन ट्रस्टींवर जास्त जबाबदाऱ्या लादलेल्या आहेत! अशी वस्तुस्थिति असतांहि, टिळकांच्या मुलांनीं, ट्रस्टींनीं आम्हांस बुडविलें म्हणून उलट ओरड करावी, तेव्हां हा उरफाटा न्याय नव्हे तर काय? केसरी-मराठा संस्था ही लोकमान्यांच्या अनुयायांची संस्था आहे, महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाची संस्था आहे! तिचे ट्रस्टी आज केळकर व विद्वांस आहेत, उद्यां दुसरे कोणी नेमिले जातील. हा प्रश्न टिळकांचे चिरंजिवांविरुद्ध केळकर व विद्वांस असा वस्तुतः नसून, टिळकांचे चिरंजिवांविरुद्ध राष्ट्रीय पक्ष असा तत्त्वतः आहे! ट्रस्टींवर केले जाणारे आरोप हे एका अर्थी राष्ट्रीय पक्षावरच केले जात आहेत. हा वाद जर निव्वळ खाजगी स्वरूपाचा असता, तर माझी खात्री आहे कीं, सध्यांच्या ट्रस्टींनीं आपल्या नेहमींच्या सौजन्यास व दिलदारपणास अनुसरून तो केव्हांच मिटता घेतला असता. परंतु, तो तसा नव्हता म्हणूनच त्यांना तो कष्टानें व नाइलाजानें मांडावा लागला.

ता. १७-८-२० च्या केसरीच्या अंकांत उभयतां ट्रस्टींनीं ट्रस्ट-डीडबद्दलची हकीगत प्रसिद्ध केली. तिजमध्यें टिळक-बंधूंना उद्देशून असा मजकूर आहे कीं, ' आपल्या वडिलांनीं निर्माण केलेली ही संस्था चालविण्यास, ते आपलें शिक्षण पूर्ण ' करून लवकर पुढें येतील, अशी लोकांची अपेक्षा आहे व तसें पुढें येऊन वडिला- ' जित राष्ट्रीय कार्याची धुरा ते स्वीकारतील, तेव्हां दुधांत साखर पडली असें वाटून ' सर्वांसच आनंद होईल. ' परंतु शिक्षण पूर्ण करण्याऐवजीं दोघांहि बंधूंनीं त्यास लवकरच रामराम ठोकला! व राष्ट्रीय कार्याची धुरा वाहण्याची लायकी आपल्या ठायीं आणण्याविषयीं जी ट्रस्टींची सदिच्छा ती फलद्रूप केली नाहीं!

१२. ट्रस्ट-डीड झाल्यानंतर सुमारें सातआठ महिन्यांनीं टिळकांच्या मुलांनीं कांहीं वादाचे प्रश्न उपस्थित केल्यावरून ट्रस्ट-डीडअन्वयें नेमिलेल्या पंचांकडे ते निकालासाठीं सोंपविण्यांत आले व पंचांनीं त्याबद्दलचा लवादानमा ता. १४-३-२१ रोजीं दिला. त्यास अनुसरून ता. १५-३-२१ रोजीं रिलीज डीड ऊर्फ बेदावापत्र आणि ता. १६-३-२१ रोजीं दोन भाडेचिठ्या वगैरे कागद ट्रस्टी व चिरंजीव यांनीं एकमेकांस लिहून दिले. या सर्व कागदांवर लोकमान्यांचे जामात व नाशिकचे प्रसिद्ध वकील रा. विश्वनाथ गंगाधर ऊर्फ अप्पा- साहेब केतकर यांची साक्ष आहे. तसेंच, लवादांच्या निर्णयाप्रमाणें ट्रस्टींना रामभाऊ व बापूराव टिळक यांनीं वेळोवेळीं रकमा दिलेल्या व त्यांबद्दल त्यांनीं ट्रस्टींना पावत्या दिलेल्या आहेत. हे सर्व कागद व या पावत्या ज्युबिली अंकांत प्रसिद्ध झालेल्या आहेत. पावत्या वाचल्या असतां एक गोष्ट चटकन् कोणाच्याहि लक्षांत येईल कीं, चिरंजिवांनीं ट्रस्टींकडून आणेपैपर्यंतहि रकमा वसूल केलेल्या आहेत! त्यावरून ते त्या वेळींहि चांगले हिशेबी गृहस्थ होते, हें स्पष्टपणें निदर्श- नास येतें. ता. २७-११-२० रोजीं आपले मेव्हणे रा. अप्पासाहेब केतकर यांना लिहिलेल्या पत्रांत रा. रामभाऊ टिळक असें म्हणतात कीं, ' इतर गोष्टीं- ' संबंधीं लिहावयाचें म्हणजे आमचे इष्टेटीची सर्व व्यवस्था आतां रा. यशवंतराव ' नेन्यांजवळील पैशांखेरीज नीट लागली असें म्हणावयास हरकत नाहीं. ' ता. १६-३-२१ रोजीं सदर केतकरांना लिहिलेल्या पत्रांत कै. बापूराव टिळक असें म्हणतात कीं, ' All the five documents have been duly registered.' ट्रस्ट–डीड झाल्यानंतर टिळक-बंधूंनीं वर्तमानपत्रांतून, आम्ही ट्रस्ट केला आहे, आम्ही यंव केलें आहे आणि त्यंव केलें आहे, असें कितींदां तरी प्रसिद्ध केलेलें आहे! परंतु पुढें सोयीचें व नफ्याचें दिसूं लागलें तेव्हां याच बंधूंनीं आपल्या पूर्वील सर्व पत्रांवर व लेखांवर हरताळ फांसून, ट्रस्टींनीं आम्हांस बुडविलें, आमच्या जवळून लबाडीनें कागद करून घेतले वगैरे ओरड सुरू करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं!

१३. पुढील दोन वर्षे ट्रस्टींना जराशीं शांततेचीं गेलीं. टस्टकडून शक्य तितक्या रकमा वसूल करून आतां तिकडून जास्त पैसे मिळणें शक्य नाहीं, अशी

खात्री झाल्यावर, टिळकबंधूंनीं आपली दृष्टि कै. यशवंतराव नेने यांचेकडे वळविली व त्या बाबतींत ट्रस्टींना आपल्या पक्षास ओढतां आलें तर पहावें म्हणून एकीकडे पुन्हां ट्रस्टींशीं धुसफूस सुरू केली व दुसरीकडे हायकोर्टांत एक विचित्र अर्ज केला ! ट्रस्टींशीं धुसफूस करण्यांतील मुख्य मुद्दा असा होता कीं, लोकमान्यांच्या मरणसमयीं केसरीची बेचाळीस हजारांची जी शिल्लक होती ती आपणांस देण्यांत यावी. केसरीच्या शिल्लकेच्या दुप्पट रक्कम केसरीला देणें आहे, हें चिरंजिवांना माहीत नव्हतें असें नाहीं. परंतु मुद्दाम आडरानांत शिरणाराला कोण काय करणार ? अर्थात्, हा वाद लवादांकडे सोंपविण्यांत आला. तेव्हां असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं, केसरीची शिल्लक जर बेचाळीस हजार रुपये असली, तर देणें सत्त्याऐंशीं हजार पांचशें रुपयांचें आहे. यासंबंधाचा लवादनामा ता. २४-६-२३ चा ज्युबिली अंकांत प्रसिद्ध झालेला आहे. रा. रामभाऊंचा हायकोर्टांतील अर्ज असा होता कीं, यशवंतराव नेने यांचेकडून कांहीं रक्कम वसूल करावयाची असल्यामुळें, कोलंब्रोच्या मृत्युपत्राचें प्रोबेट घेण्याविषयीं रा. विद्वांस यांना हुकूम करण्यांत यावा. वस्तुतः कायद्याप्रमाणें सदर वुइलाचें प्रोबेट घेण्याचें कांहींच कारण नव्हतें. शिवाय, मृत्युपत्राप्रमाणें मिळकतीची सर्व व्यवस्था झाल्याकारणानें प्रोबेट काढण्यासारखी स्थितीहि राहिलेली नव्हती. यशवंतराव नेने यांच्यावर दावा करण्यास प्रोबेटची जरूरी नव्हती व प्रोबेट पाहिजेच होतें तर त्याचा खर्च चिरंजिवांनीं विद्वांसांना द्यावयास पाहिजे होता. परंतु चिरंजीव हे मोठे भोळेभाबडे पडल्यामुळें, त्यांनीं भोळेपणानें असा अर्ज केला कीं, खर्च करावा विद्वांसांनीं आणि फायदा घ्यावा आम्ही ! अर्थात्, हायकोर्टानें आपल्या अर्जाची जशी वासलात लावावयाची तशीच लाविली. हायकोर्टानें अर्जावर असा हुकूम केला कीं, अमक्या मुदतींत अर्जदार जर कोर्टांत खर्चाची सर्व रक्कम भरतील तर ती विद्वांसांना देण्यांत यावी व मग त्यांनीं प्रोबेटचा अर्ज करावा. हा निकाल सन १९२३ च्या जून महिन्यांत झाला. आतां हें सांगावयास नकोच कीं, कांहीं तरी वितंडवाद करीत सुटणें हाच ज्या अर्थी अर्जांतील प्रधान हेतु होता, त्या अर्थी चिरंजिवांकडून खर्चाची रक्कम भरण्यांत आली नाहीं व म्हणून प्रोबेटचा अर्जहि करण्यांत आला नाहीं !

१४. पण एवढ्यावरच ही धुसफूस थांबली नाहीं. केसरीच्या वाढत्या व्यापामुळें गायकवाड वाड्याचा ट्रस्टींच्या ताब्यांतील भाग अपुरा पडत असल्यामुळें ट्रस्टींनीं संपादकांच्या उपयोगासाठीं म्हणून एक नवीन इमारत बांधण्याची योजना केली. तिला चिरंजिवांनीं हरकत घेऊन इमारतीचें काम बंद पाडलें. सन १९२४ च्या जानेवारी महिन्यांत केसरी मशिनचें जुनें निरुपयोगी ऑइल इंजिन विक्रीस काढलें असतां, त्यांनीं ट्रस्टींना अडथळा केला, एवढेंच नव्हे तर ट्रस्टींविरुद्ध पोलिसांकडे फिर्यादहि दिली ! अर्थात्, सदर फिर्यादींत कोठेंच कांहीं तथ्यांश नसल्यामुळें, पोलिसांनीं ती काढून टाकिली. इकडे त्यांनीं कै. यशवंतराव नेने यांच्यावर

नामदार हायकोर्टांत नं ३४९/१९३० चा दावा दाखल केला. त्या दाव्याचा अद्याप निकाल झालेला नाहीं. ता. १६ मार्च, १९२१, ते ता. १० डिसेंबर, १९२३, पर्यंत भाड्याबद्दल ट्रस्टींना दिलेल्या पावत्या खालीलप्रमाणें असतः—

'Received from Messrs. N. C. Kelkar and D. V. Vidwans, Trustees of the Kesari and Mahratta Institution, Rs. 100/- ( one hundred only ) for the rent of the month........

R. B. TILAK,
S. B. TILAK.'

*Dated.........*

सन १९२४ च्या जानेवारीपासून पावतीचा नमुना खालीलप्रमाणें बदलण्यांत आला.

'Received from the Kesari and Mahratta Institute Rs. 100/- ( one hundred only ) as rent for the month of........'

*Dated.........* (Sd.)

म्हणजे केळकर व विद्वांस यांचीं नांवें पावतींतून गाळण्यांत येऊं लागलीं !

याच सुमारास टिळकबंधूंनीं पश्चिमेकडील खुल्या जागेंत मातीरोड्यांचा ढिगारा रचून सदर जागा गलिच्छ तर करून टाकलीच, पण त्यामुळें केसरीच्या कामकरी मंडळींना बराच उपसर्गहि पोहोंचला.

१५. नेन्यांच्या विरुद्ध दाव्यांत ट्रस्टी आपल्या बाजूनें येण्याचा रंग दिसत नाहीं असें पाहिल्यावर, टिळकबंधूंनीं विद्वांसांना प्रतिवादी करण्यांत यावें म्हणून वरील दाव्याचे कामीं हायकोर्टांत अर्ज गुदरला. एवढ्यावरच ते थांबते तरी त्यांत विशेषसें कांहीं झालें नसतें. परंतु लोकमान्यांनीं तारीख १९-९-१८ रोजीं पुणें येथें तिसरें मृत्युपत्र केलें असल्याचा एक नवीनच वाद त्यांनीं प्रथम उपस्थित केला ! कोलंबोच्या मृत्युपत्रान्वयें ट्रस्ट-डीड झालें, ट्रस्ट-डीडान्वयें लवादनामे झाले, लवादनाम्यान्वयें इतर कागदपत्र झाले व हिशेबठिशेब होऊन ट्रस्टींनीं टिळकबंधूंना मोठाल्या रकमाहि दिल्या. या बुइलाचें प्रोबेट विद्वांसांनीं घ्यावें, म्हणून हायकोर्टांत अर्जहि करण्यांत आला. आणि आतां जास्त लभ्यांश होण्याची आशा नाहीं अशी खात्री झाल्यावर, कोलंबोच्या मृत्युपत्राच्या मुळाशींच घाव घालण्याच्या इराद्यानें एक तिसरेंच मृत्युपत्र झाल्याचा वाद उपस्थित करण्यांत आला, तेव्हां शर्थ आहे कीं नाहीं म्हणावयाची ? एकीकडे हा वाद सुरू केला, तर दुसरीकडे केसरीच्या प्रत्यक्ष व्यवस्थेंत ढवळाढवळ करण्यासहि पुनः प्रारंभ केला ! सन १९२६ च्या सप्टेंबरांत रामभाऊंनीं केसरीच्या मेत्रिसचा तयार झालेला कागद फाडून टाकला व त्यामुळें केसरीचा अंक प्रसिद्ध होण्यास विलंब झाला. आणखी कितीतरी बारीकसारीक उपद्रव त्यांनीं दिले. परंतु ट्रस्टींनीं ते सर्व मुकाट्यानें सहन केले. सन १९२७ सालीं तर त्यांनीं कहरच उडवून दिला. ट्रस्टींच्या ताब्यांतील शौचकूपांना कुलुपें तर काय लाविलीं, मुख्य दरवाजाचा व दिंडीचा कडीकोयंडा

तोडून तर काय टाकला, दरवाजाची फरशी तर काय उकरून काढली, खुल्या जागेंत पुन्हां राड्यारोड्यांचा ढीग करून चुन्याची घाणी तर काय सुरू केली, अशीं एक कां दोन, अनेक कृत्यें करून ट्रस्टींना तर नुसतें भंडावून सोडिलें ! सरते शेवटीं ट्रस्टींना नं. $\frac{१२६४}{१९२७}$ चा दावा पुणें कोर्टांत गुदरणें भाग पडलें ! तो दावा ट्रस्टींनीं केला नसता तर, मला वाटतें कीं, एव्हांना केसरी-मराठा पत्रें बंद पडून ट्रस्टची व्यवस्था करणें अशक्यप्राय झालें असतें ! यासंबंधानें न्या. ब्रूम्फील्ड यांनीं देखील आपला असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे कीं, " I am satisfied that the plaintiffs ( *i. e.* trustees ) were driven to this litigation."

१६. हा दावा कोर्टांत गुदरण्यापूर्वीं ट्रस्टींपैकीं 'बाबासाहेब' विद्वांस यांनीं ट्रस्ट-डीडमध्यें नेमिलेल्या लवादांकडे फिर्याद केली. लवादांनीं या फिर्यादींच्या नकला टिळकबंधूंकडे पाठविल्या. त्यांस या बंधूंनीं दिलेलें उत्तर मासलेवाईक असल्यामुळें तें खालीं जसेंच्या तसेंच दिलें आहे:—

'( Registered A. D. ).

Gaikwad Wada,
POONA CITY.
*Date 29th June, 1927.*

To

Messrs. N. C. Kelkar,
V. G. Ketkar and
S. M. Sane

DEAR SIRS,

We have your letter of the 6th inst. ( posted from Nasik on the 21st inst. ).

We are very much obliged to you for the friendly spirit in which your letter is written.

We regret to have to say that we decline to submit to your decision. We deny that you have any right or authority to decide on any alleged complaints against us.

Without prejudice to the said contention, we may mention that we are equally anxious to maintain good relations with the Kesari–Mahratta Institution and Mr. Widwans. We are, however, convinced from our past experience that the decisions of the arbitrators cannot help us in this direction. We may suggest that if the Kesari and Mahratta Institution were to

remove their Officers and the Printing Press from the Gaikwad Wada, much of the ill-feeling may be removed and friendly relations established.

Yours truly
R. B. TILAK,
S. B. TILAK.'

या उत्तरांतील ठळक तक्रारी अशा कीं, ( १ ) लवादांना लवाद करण्याचा कोणताहि हक्क अगर अधिकार असल्याचें मान्य नसल्यामुळें, वादग्रस्त बाबींचा निर्णय लवादांमार्फत करून घेण्यास आम्ही ( टिळक-बंधू ) तयार नाहीं; ( २ ) पूर्वीच्या अनुभवावरून आमची अशी खात्री झाली आहे कीं, लवादांकडून आम्हांस साहाय्य होणें शक्य नाहीं; आणि ( ३ ) ट्रस्टींच्या ताब्यांतील जागा खाली करून ते आपली संस्था जर दुसरीकडे नेतील, तर दोघांमध्यें सलोखा होईल.

ट्रस्ट-डीडमध्यें नेमिलेले लवाद एकंदर तीन, म्हणजे तात्यासाहेब केळकर, वि. गं. केतकर व श्री. मो. साने. यांपैकीं केळकरांशिवाय बाकीचे दोघेजण टिळकबंधूंचे प्रत्यक्ष मेव्हणे. त्यांनीं केलेले दोन लवादनामे टिळकबंधूंना पूर्वी मान्य झाले व त्याप्रमाणें ट्रस्टींनीं त्यांची अंमलबजावणीहि केली. रा. अप्पासाहेब केतकर यांना कै. बापूरावांनीं ता. २८-५-२२ रोजीं लिहिलेल्या एका पत्रांत असा मजकूर आहे कीं, ' आमचे परमपूज्य तीर्थरूप कै. लोकमान्य टिळक यांनीं मृत्युपत्रान्वयें नेमिलेल्या ' त्रिवर्ग पंचांपैकीं आपण एक असल्यामुळें त्या नात्यानें आपण आपलें कर्तव्य योग्य रीतीनें ' व निःपक्षपात बुद्धीनें बजावीत आलांच आहांत व पुढेंहि बजावाल यांत तिळमात्र ' संदेह नाहीं. ' तर मग या वेळींच या तिघांना लवाद म्हणून नाकबूल करून जातां जातां त्यांना कोपरखळी मारण्यांतील मतलब असा होता कीं, केतकर व साने हे जरी आपले मेव्हणे असले व त्यांच्या मनाचा ओढा जरी आपल्याकडे असला, तरी त्यांना विवेकबुद्धि असल्यामुळें त्यांचा निर्णय आपल्या वतीनें होणें दुरापास्त. तेव्हां लवादांकडे हा वाद सोंपवून त्यांच्या निकालाची धोंड आपल्या गळ्यांत बांधून घ्या कां ? त्यापेक्षां त्यांचा अधिकारच अमान्य करून मोकळे व्हा कसे ? ट्रस्टींनीं दावा लावलाच व त्याचा निकाल उलट झालाच, तर त्याचा अर्थ इतकाच कीं, आपणांस जें मिळावयाचें नव्हतें तें मिळालें नाहीं, म्हणजे आपलें कांहीं नुकसान नाहीं; बरें, जर कांहीं मिळालें तर तो फायदाच; निदान चार दिवस ट्रस्टींवर तोहमत घेऊन आग पाखडावयास सांपडली, तर काय कमी झालें ?

परंतु याहिपेक्षां केसरी संस्थेची जागा खालीं करण्याविषयींच्या सूचनेंतील मतलब अधिक खोल व वक्र असा होता. तो असा कीं, ज्या अर्थी लोकमान्यांनीं सबंध वाड्याचें बक्षिसपत्र करून देऊन त्यावरील आपली स्वत्व-निवृत्ति केली होती, त्या अर्थी त्यांनीं केलेली वाड्याची वांटणी अनधिकाराची होती. एकदां वाडा

बक्षिस दिल्यावर, पूर्वेकडील भागांत मुलांनीं नांदावें व पश्चिमेकडील भागांत केसरी-संस्था नांदावी, अशी वांटणी करण्याचा लोकमान्यांना अधिकार राहिला कोठें ? म्हणून अशी सूचना करण्यांत आली कीं, केसरी संस्थेचें बिऱ्हाडबाजलें दुसरीकडे न्या, म्हणजे दोघांमध्यें सलोखा होईल ! या दाव्याचे बाबतींत एकदां तडजोडीसाठीं मंडळी माझ्या घरीं जमा झाली होती. रा. रामभाऊंच्या तर्फेनें मुंबईचे रा. कोठारी सॉलिसिटर हजर होते. तेव्हां ट्रस्टींतर्फेनें मी कोठाऱ्यांना असें सुचविलें कीं, लवादांना पाठविलेल्या पत्रांत टिळक-बंधूंनीं जें लिहिलें आहे कीं, केसरी-संस्था दुसरीकडे गेल्यास सलोखा होईल, हें त्यांचें म्हणणें अद्याप कायम आहे काय, असें तुम्ही आपल्या अशिलांना विचारा. त्याप्रमाणें त्यांनीं रामभाऊंना विचारलें आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, रामभाऊंनीं माझी सूचना अमान्य केली ! तात्पर्य काय कीं, वेळ येईल तशा तक्रारी करून कोणीकडून तरी ट्रस्टींशीं भांडण उकरून काढण्याचा टिळकबंधूंचा उघड उद्देश होता !

१७. ट्रस्ट-डीडअन्वयें लवादांमार्फत निकाल होणें वरीलप्रमाणें अशक्य ठरल्यावर ट्रस्टींना कोर्टांत दावा गुदरणें भाग झालें. हा दावा पहिल्या कोर्टांत सुमारें दीड वर्ष चाललेला होता. टिळकबंधूंच्या वर्तानें पहिल्यानें स्थानिक वकिलांच्या हातीं बचावाचीं सूत्रें होतीं. परंतु पुढें तीं मुंबईचे रा. माधवराव बोडस यांच्या हातीं गेल्यावर दाव्यास खूप मजा आला ! या दाव्यांत टिळकबंधूंनीं मुख्य मुद्द्यांच्या गोष्टीऐवजीं श्रीगणेशोत्सवाच्या बाबीवरच खूप रण माजविलें ! या उत्सवासंबंधानें ट्रस्ट-डीडमध्यें स्पष्ट कलम असतांना सुद्धां त्यांनीं अशी तक्रार केली कीं, उत्सवाचा खर्च करावा ट्रस्टींनीं व तो साजरा करावा आम्ही ! लोकमान्यांच्या मृत्युपत्राच्या प्रोबेटच्या बाबतींत ज्या प्रकारें त्यांचें म्हणणें होतें, त्याच मासल्याचें हेंहि होतें ! व त्या बाबतींत हायकोर्टानें जसें तें मान्य केलें नाहीं तसेंच याहि बाबतींत पुणें कोर्टानें तें मान्य केलें नाहीं ! आणि कोणतें शहाणें कोर्ट असलें उरफाटें बोलणें कबूल करील बरें ? टिळकबंधूंच्या या विक्षिप्त तक्रारीमुळें व या उत्सवाच्या बाबतींत त्यांनीं अवलंबिलेल्या दांडगाईच्या मार्गामुळें सन १९२७ व १९२८ या दोन सालचे उत्सव पार पाडतां पाडतां ट्रस्टींची पण दमछाक उडून गेली. उत्सवाचे बाबतींत ट्रस्टींना हरकत करूं नये म्हणून कोर्टानें टिळकबंधूंना ताकीद द्यावी व रा. रामभाऊंनीं ती बेधडक धुडकून लावावी. ट्रस्टींनीं त्यासंबंधानें अर्ज करावा व तो सुनावणीस निघाला कीं, ट्रस्टींनीं थोर मनानें तो पुढें चालविणें नाहीं म्हणून आपल्या वकिलामार्फत कोर्टास कळवावें, असा जणूं काय एक क्रमच पडलेला होता !

१८. सन १९२७ सालचा गणेशोत्सव कोर्टाच्या सल्ल्यानें ट्रस्टींनीं मुक्रर केला असतां व त्यांत व्यत्यय न आणण्याविषयीं कोर्टानें टिळकबंधूंना ताकीद दिलेली असतांना सुद्धां, तिला न जुमानतां त्यांनीं खालीलप्रमाणें दोन हस्तपत्रकें प्रसिद्ध करून व करवून अखेर उत्सवाच्या कार्यक्रमांत गोंधळ घातलाच !

( १ ) ' गायकवाड वाड्यांतील कार्यक्रम
आज शुक्रवार ता. ९ रोजीं रात्रौ
कोर्टाचे परवानगीनें
११ वाजेपर्यंत
पानसुपारी
व नंतर
मेळे

रा. ब. टिळक. '

( २ ) ' पुणें अस्पृश्य समाजाचा
श्रीकृष्ण मेळा

कै. लो. टिळक यांचे चिरंजीव श्री. श्रीधरपंत टिळक यांचे खास आमंत्रणावरून आज ता. ९-९-२७ शुक्रवार रात्रौ ११॥ वाजतां गायकवाड वाड्यांतील गणपतीच्या मांडवांत जाणार आहे. '

रा. रामभाऊंची मजल येथपर्यंत गेली होती कीं, कोर्टाचा त्यांचे विरुद्ध हुकूम होऊन त्यांचेवर ताकीद बजाविलेली असतांना सुद्धां ' कोर्टाचे परवानगीनें ' अशा प्रकारें लोकांची दिशाभूल करण्यास व कोर्टाच्या हुकुमांची अवहेलना करण्यास त्यांचें मन मुळींच कचरलें नाहीं! कै. बापूराव कोर्टाची ताकीद बजाविली जाईल म्हणून दुपारपासून जे घराबाहेर पडले होते ते रात्रीं श्रीकृष्ण मेळ्यास आणी-पर्यंत वाड्यांत आलेच नाहींत! त्यांची कल्पना अशी कीं ट्रस्टी त्यांना व मेळ्याला मज्जाव करतील व मग आपणांस खूप धिंगाणा घालण्यास सांपडेल. परंतु ट्रस्टींनीं तसला प्रकार न करतां, त्यांचा व मेळ्याचा आदरसत्कार केलेला जेव्हां त्यांनीं पाहिला तेव्हां आपण टाकलेला डाव आपल्याच आंगावर आल्यामुळें ते मनांत खजील झाल्यास नवल तें काय? टिळकबंधूंनीं उत्सव यशस्वी करण्याच्या बुद्धीनें जर कार्यक्रमांत भाग घेतला असता, तर तो ट्रस्टींना नको का होता? जेथें ते दुसऱ्यांना खुशाल घेऊं देतात, तेथें तो प्रत्यक्ष लोकमान्यांच्या चिरंजिवांनीं घेतला, तर त्यांना आणखी तें काय पाहिजे? तसेंच अस्पृश्यांची अस्पृश्यता घालविण्याच्या चळवळीचे ट्रस्टी हे पुरस्कर्ते व कित्येक वर्षें गायकवाड वाड्यांतील गणपतीपुढें अस्पृश्यांचे मेळ्यांना आमंत्रण दिलें जात आहे, तेव्हां श्रीकृष्ण मेळा गायकवाड वाड्यांत आला तर तो ट्रस्टींना यावयास पाहिजेच होता व म्हणून त्यास मज्जाव करण्याच्या ऐवजीं त्यांनीं त्याचा मानमरातबच केला! परंतु टिळकबंधूंची बुद्धि सरळ नसल्याकारणानें त्यांनीं वाम मार्गाचा अवलंब केला व म्हणूनच ट्रस्टींना या बाबतींत कोर्टाकडे दाद मागावी लागली! याच श्रीकृष्ण मेळ्यानें मांडवांत पद्या-वलींतून पद्यें गायिलीं तिजमध्येंच गतवर्षी गायकवाड वाड्यांत उत्सवाच्या चालकांनीं मेळ्याचा कार्यक्रम केला अशा आशयाचा आभारप्रदर्शक उल्लेख होता.

१९. पुढील वर्षीच्या म्हणजे सन १९२८ च्या गणेशोत्सवांत रा. रामभाऊ यांनीं तर बहार उडवून दिली म्हणावयाची ! टिळक पंचांगाप्रमाणें तो उत्सव ता. १९-८-२८ ते २९-८-२८ पर्यंत असा पडला होता. जुन्या पंचांगाप्रमाणें उत्सवाच्या तारखा निराळ्या होत्या. गेल्या वर्षीच्या उत्सवाच्या बाबतींत रामभाऊंचा हक्क कोर्टानें नाशाबीद धरून जरी त्यांना ताकीद दिलेली होती, तरी त्यांनीं ता. २८-७-२८ रोजीं ट्रस्टींना उत्सव न करण्याबद्दल खाजगी नोटीस दिली, व ता. २९-७-२८ च्या ज्ञानप्रकाशांत खालील जाहीरनामा प्रसिद्ध केलाः—

'जाहीरनामा

सर्व तमाम हिंदु बांधवांस कळविण्यांत येतें कीं, यंदां गायकवाड वाड्यांतील लो. टिळकांचा सार्वजनिक गणपति सर्व चातुर्वर्णीय हिंदु बांधवांस स्पृश्यास्पृश्यभेद न मानतां उत्सवाचे सर्व दिवस दोन्ही वेळच्या पूजेच्या वेळीं पूजेकरितां मोकळा ठेवण्यांत येणार आहे. आज आपल्या हिंदुस्थान देशांत एकीकरितां अस्पृश्यता-निवारणाचा जो प्रश्न प्रामुख्यानें सोडविला जात आहे, त्यांतील मुख्य मुद्दे म्हणजे सार्वजनिक देवस्थानें व सार्वजनिक पाणीपुरवठे यांवरील अस्पृश्यांना असलेला मज्जाव दूर करणें हे होत. तरी त्यांपैकीं पहिल्या मुद्द्याच्या सोडवणुकीस आपल्याकडून जितका अल्पस्वल्प हातभार लावतां येईल तितका लावावा या सद्धेतूनें हा जाहीरनामा काढला आहे. तो यशस्वी करून दाखविणें हें सर्वस्वीं पुण्यांतील व ठिकठिकाणचे ब्राह्मणेतर, मराठे व अस्पृश्य बांधव व त्यांचे पुढारी यांजवर अवलंबून आहे. तरी गायकवाड वाड्यांत उत्सवांत हिंदूंमधील ब्राह्मणेतर सर्व जातींच्या झुंडीच्या झुंडी लोटून आपला हक्क बजावितील व ह्या प्रश्नाच्या सोडवणुकीस मदत करतील अशी आशा आहे व असें झालें तरच वरील परवानगीचें चीज होणार आहे. एवढें कळवून सर्व ब्राह्मणेतर हिंदुबांधवांची रजा घेतों. कळावें.

आपला
एक नम्र सेवक व हिंदी बांधव
रा. ब. टिळक,
गायकवाड वाड्यांतील लो. टिळकांचे
सार्वजनिक गणपति-उत्सवाचा मालक.

वरील जाहीरनाम्याचा रोख वाचकांच्या लक्षांत आलाच असेल. श्रीगणेशोत्सव ट्रस्टींचा, तो साजरा होतो ट्रस्टींच्या ताब्यांतील जागेंत, त्याचा सर्व खर्च करतात ट्रस्टी, तो उत्सव साजरा करण्याचा शिरस्ता लोकमान्यांचे वेळेपासून एका विशिष्ट प्रकारचा पडलेला, व १९२७ सालीं तो ट्रस्टींनीं साजरा केलेला; असें असतांहि, हा जाहीरनामा काढण्यांतील उद्देश असा होता कीं, उत्सवाचे मालक आपण असल्याचें जगजाहीर करावयाचें, आणि ब्राह्मणेतर व अस्पृश्य यांच्या साहाय्यानें उत्सवांत व्यत्यय आणावयाचा ! या जाहीरनाम्यामुळें ट्रस्टींना कोर्टांत ताकिदीचा अर्ज करणें भाग

पडलें, व तो त्यांनीं ता. २-८-२८ रोजीं केला. या अर्जास रा. रामभाऊ यांनीं ता. १०-८-२८ रोजीं जबाब दिला. त्यांत त्यांनीं केलेल्या तक्रारींपैकीं एक तक्रार अशीः—

'ज्या पंचांगाप्रमाणें चालू सालीं श्रीगणपत्युत्सव करण्याचें वादी म्हणतात, ती पद्धत लो. टिळकांचे गायकवाड वाड्यांत आज सुमारें ३४ वर्षांचे वर ज्या पद्धतीनें व वहिवाटीनें श्रीगणेशोत्सव होत आला त्या पद्धतीशीं व वहिवाटीशीं पूर्णपणें विसंगत आहे. व सदरहु पद्धत नवी व पुण्यांतील बहुमत आणि सर्वसंमत गणपत्युत्सवाचे विरुद्ध आहे. तक्रारीकरतां गायकवाड वाड्यांतील सदरील गणपत्युत्सव करण्याची वहिवाट वादींची आहे असें धरून चाललें तरी, वादी यांस फार तर आजपर्यंतच्या व जुन्या वहिवाटीस अनुसरून गायकवाड वाड्यांतील गणपत्युत्सव करतां येईल. वादी म्हणतात त्या नवीन तऱ्हेनें करतां येणार नाहीं.'

२०. वरील तक्रारीचा मथितार्थ असा कीं, वादींना गणेशोत्सव करण्याचा हक्क असल्याविषयीं जरी कोर्टाचा अभिप्राय झाला, तरी तो त्यांनीं जुन्या पंचांगाप्रमाणेंच करावा, नवीन पंचांगाप्रमाणें करूं नये, असा त्यांना हुकूम करण्यांत यावा! मनुष्य एकदां वेफाट तक्रारी करूं लागला म्हणजे मागला पुढला विचार न करतां त्याची मजल कोठपर्यंत जाऊं शकते, याचा हा एक उत्कृष्ट मासला आहे! ट्रस्टी म्हणत होते कीं, **आम्ही उत्सव टिळक पंचांगाप्रमाणें करणार आहोंत. यावर टिळकांच्या चिरंजिवांची अशी तक्रार कीं, तो जुन्या पंचांगाप्रमाणेंच झाला पाहिजे, टिळक पंचांगाप्रमाणें होतां कामा नये!** केवढें अलोट हें पितृप्रेम! बरें, त्यांची तक्रार खरी तरी होती का? तसेंहि नव्हे. टिळक पंचांग ऊर्फ शुद्ध निरयन पंचांग शके १८४० पासून सुरू झालें. शके १८४१ सालीं जुन्या पंचांगाप्रमाणें अनंतचतुर्दशी ता. ८-९-१९ रोजीं पडत होती, तर नवीन पंचांगाप्रमाणें ती ता. ९-९-१९१९ रोजीं पडत होती. लोकमान्यांनीं व केसरी-मराठा संस्थेनें त्या सालीं अनंतचतुर्दशी नव्या पंचांगाप्रमाणें ता. ९-९-१९ रोजीं पाळली; इतकेंच नव्हे तर पुण्यांतील सर्व सार्वजनिक गणपतींची मिरवणूक त्याच दिवशीं निघाली. लोकमान्य आपल्या घरांतील सर्व कार्यें नवीन पंचांगाप्रमाणेंच करीत असत. ते वारले ती तारीख म्हणजे ता. १-८-२० नव्या पंचांगाप्रमाणें शके १८४२, आषाढ वद्य १ होती, तर जुन्या पंचांगाप्रमाणें ती तिथि अधिक श्रावण वद्य १ अशी होती. सर्व हिंदुस्थानभर त्यांची मृत्युतिथि आषाढ वद्य १ अशीच समजण्यांत येते. या सर्व गोष्टींवरून रा. रामभाऊंची वरील तक्रार किती फोल होती, हें तेव्हांच निदर्शनास येतें.

पण ह्या व दुसऱ्या अनेक भरमसाट तक्रारींचा कोर्टानें ता. १६-८-२८ रोजीं योग्य तोच परामर्श घेतला, म्हणजे त्या रद्द करून ट्रस्टींकडून साजरा होणाऱ्या उत्सवांत कोणताहि प्रत्यवाय रामभाऊंनीं आणूं नये अशी त्यांना ताकीद देण्यांत आली. कोर्टाच्या निकालाविरुद्ध रामभाऊंनीं हायकोर्टाकडे अपील केलें, पण तेंहि रद्द करण्यांत आलें.

२१. अशा प्रकारें कोर्टाकडून निराशा झाल्यावर त्यांनीं कायदा स्वतःच्या हातीं घेण्याचा निश्चय केलेला असावा असें दिसतें ! कारण ता. १९-८-२८ रोजीं सकाळीं सुमारें अकरा वाजतां श्रीगणपतीच्या मूर्तीची विधिपूर्वक प्रस्थापना झाल्यावर, सुमारें बारा वाजतां गणपतीच्या मखरास ट्रस्टींनीं लाविलेलें कुलूप रामभाऊ काढूं लागले, तेव्हां बंदोबस्ताकरतां असलेल्या शिपायानें त्यांना तसें करूं दिलें नाहीं. नंतर कांहीं वेळानें रामभाऊंनीं शिपायाची नजर चुकवून मखराच्या पुढील मोकळ्या भागांतून आंत उडी टाकली व ते गणपतीची मूर्ति उचलणार इतक्यांत शिपायाचें लक्ष तिकडे जाऊन त्यानें त्यांस बाहेर काढलें. पोलिसांपुढें झालेल्या जबानींत त्यांनीं असें सांगितलें कीं, **जर शिपायानें आपणांस बाहेर काढलें नसतें, तर आपण गणपतीची मूर्ति उचलून आपल्या घरीं नेणार होतों, व जर पुन्हां संधि मिळाली तर आपण ती नेल्याशिवाय राहणार नाहीं !** वर पितृप्रेमाचा मासला दिला आहे. हा धर्मप्रेमाचा मासला पहा ! यांतलें खरें मर्म असें कीं, टिळकबंधूंना स्वार्थापलीकडे कांहीं दिसत नसल्याकारणानें, या वादांत आपल्या वडिलांची स्मृति भरडून निघाली, किंवा धर्माची अगर देवतांची विटंबना झाली, तरी त्यांत त्यांना मुळींच क्षिति वाटत नसावी असें वाटतें !

२२. दोन सालांच्या गणपत्युत्सवाची इतकी विस्तृत हकीकत देण्याचें कारण असें आहे कीं, मूळ मुद्यापेक्षां याच मुद्यावर टिळकबंधूंनीं थैमान उडवून दिलें होतें; आणि मूळ मुद्याची चौकशी होण्याची वेळ जेव्हां जवळ येऊन ठेपली, तेव्हां आपणांस खटला पुढें भांडणें नाहीं, असा एक अर्ज देऊन रामभाऊ हात झाडून मोकळे झाले ! कैफियतींत तक्रारींची मारे रेलचेल उडवून दिलेली होती ! त्यांत अशी एक अत्यंत महत्त्वाची तक्रार होती कीं, ट्रस्टींनीं आम्हां बंधूंस फसवून, आम्हांस भूलथापा मारून व आम्हांवर अयोग्य वजन पाडून ट्रस्ट-डीड करून घेतलेलें असल्यामुळें तें आम्हांवर बंधनकारक नाहीं ! म्हणून सर्वजण याबद्दलच्या पुराव्याची मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात होते. टिळकद्वेष्टे लेखक व पत्रकार आपापल्या लेखण्या परजून टिळकांची व ट्रस्टींची भंबेरी उडवून देण्यास कसे सज्ज होऊन बसलेले होते ! परंतु पाहतात तों पुराव्याच्या ऐवजीं वरील अर्ज, व टिळक-बंधूंच्या कैफियतीचा डोलारा सपशेल खालीं कोसळलेला ! आणि खरें पाहिलें असतां, ते पुरावा देणार तरी काय ? जेथें आडांतच नाहीं, तेथें पोहऱ्यांत येणार तरी कोठून ? जेथें मुळांतच तक्रार बनावट, तेथें रामभाऊ, नव्हे प्रत्यक्ष बृहस्पति आला, तरी पुरावा देणार कुठला व कसला ? अर्थात्, या तक्रारीचा व तसाच इतर तक्रारींचा निकाल पुणें कोर्टानें व हायकोर्टानें रामभाऊंच्या विरुद्ध केला !

२३. ट्रस्टींचा टिळकबंधूंविरुद्ध मु॥ नं. $\frac{१२६४}{१९२७}$ चा दावा चाललेला असतांना, तोडीस तोड म्हणूनच कीं काय कोण जाणे, त्यांनीं ट्रस्टींपैकीं बाबासाहेब विद्वांस यांच्यावर ता. ६-२-२८ रोजीं मु॥ नं. $\frac{२९२}{१९२८}$ चा हिशोबाचा दावा लाविला व

दोघांहि ट्रस्टींवर ता. २०-१२-२७ रोजीं मु॥ नं. १६६७/१९२७ चा दावा लाविला. हे दोन्हीहि दावे मासलेवाईक, नव्हे तऱ्हेवाईक असल्यामुळें, त्यांपैकीं एका तरी दाव्यांतील त्यांची फिर्यादअर्जी देण्याचा मोह आवरणें शक्य नाहीं. मु॥ नं. १६६७/१९२७ मधील त्यांची फिर्याद खालोलप्रमाणें होती:—

**पुणें येथील से. क्ला. सब-जज्ज यांचे कोर्टांत**

रे. दि. मु. नंबर १६६७/१९२७

१. रामचंद्र बळवंत टिळक, जात महाराष्ट्र ब्राह्मण, वय ३३, धंदा शिक्षण, राहणार मुंबई व पुणें,

आणि

२. श्रीधर बळवंत टिळक, जात महाराष्ट्र ब्राह्मण, वय ३१, धंदा लेखक, राहणार पुणें. उभयतां कै. लो. बाळ गंगाधर टिळक यांचे औरस पुत्र व वारस.

} वादी

विरुद्ध

१. नरसिंह चिंतामण केळकर, जात ब्राह्मण, वय ५५, धंदा संपादक केसरी, राहणार घ. नं. ५५४ सदाशिव पेठ, शहर पुणें,

आणि

२. धोंडो वासुदेव विद्वांस, जात ब्राह्मण, वय ६०, धंदा मॅनेजर, केसरी व मराठा, राहणार घ. नं. ६ पेठ नारायण, शहर पुणें.

} प्रतिवादी

दावा रु. २७९० कोर्टाचे हुकमतीकरितां व वकीलफीकरितां.

सदरहू वादी रामचंद्र बळवंत टिळक आणि श्रीधर बळवंत टिळक कळवितों कीं:—

जिल्हा व तुकडी पुणें, तालुका व तुकडी हवेली सब-रजिस्ट्रार यांचे हद्दींतील शहर पुणें, नारायण पेठ, येथील घ. नं. ५६८ व सिटी सर्व्हे नंबर ५६८ च्या गायकवाड वाडा या नांवानें प्रसिद्ध असलेल्या घराचे उभयतां वादी मालक असून, कै. लो. बाळ गंगाधर टिळक यांचे औरस पुत्र आणि सर्व खासगत इस्टेटीचे कायदेशीर वारस आहेत. सदर वाड्यापैकीं पश्चिमेकडील खुली जागा पूर्व-पश्चिम सुमारें १४८ फूट व दक्षिणोत्तर सुमारें १८० फूट व तींतील बांधलेल्या इमारती प्रतिवादींस दरमहा रु. १०० भाड्यानें अनियमित मुदतीचे भाडेचिठ्ठीनें दिलेल्या आहेत व सदर भाडेचिठ्ठी तारीख १६ मार्च, १९२१, रोजीं पुणें सब-रजिस्ट्रारचे कचेरींत रजिस्टर झाली आहे व ती प्रतिवादी नं. १ व २ यांनीं केसरी-मराठा संस्थेचे ट्रस्टी या नात्यानें लिहून दिली आहे. सदरहू भाडेचिठ्ठीसंबंधानें वादी व प्रतिवादी यांचे दरम्यान बरेच वाद आहेत, परंतु त्याचा चालू दाव्याशीं कांहीं संबंध नाहीं.

२. सदर भाडेचिठ्ठीप्रमाणें तींत निर्दिष्ट केलेली जागा व इमारती फक्त केसरी छापखाना व केसरी-मराठा पत्रांच्या कचेऱ्या यांचे उपयोगाकरितांच भाड्यानें

दिली असल्यामुळें इतर कामांकडे वापरण्याचा किंवा इतर संस्थांस भाड्यानें किंवा फुकट वापरण्यास देण्याचा प्रतिवादींस बिलकुल अधिकार नाहीं. परंतु प्रतिवादींनीं महाराष्ट्र प्रॉव्हिन्शिअल काँग्रेस कमिटी व टिळक-स्वराज्य-संघ या संस्थांचे कचेऱ्यांना सदर भाडेचिठ्ठींतील इमारतींपैकीं कांहीं जागा वापरण्यास दिली आहे, असें वादींचे नजरेस आलें आहे. सदर कचेऱ्या व दुसऱ्या कित्येक संस्था वादींचे वाड्यांत असल्यामुळें भलत्यासलत्या लोकांची रहदारी वादींचे वाड्यांत होऊं लागली आहे व त्यामुळें वादींस फार त्रास होतो. सबब त्या कचेऱ्या काढून टाकण्याविषयीं प्रतिवादींस ता. ३० नोव्हेंबर, १९२७, रोजीं रजिस्टर पोस्टानें लेखी नोटीस दिली असतां, प्रतिवादींनीं तिला उद्दामपणाचें उत्तर देऊन वादींवरच उलट फौजदारी चालण्याचा धाक घातला आहे. आणि अशा रीतीनें वादींचे कायदेशीर हक्कांस बाध आणण्याचा व वादींवरच उलट दंडेलीचा आरोप करून प्रतिवादींनीं आपला डाव साधण्याचा घाट घातला आहे. सबब हा दावा करणें वादींस भाग झालें आहे.

३. प्रतिवादींस भाड्यानें दिलेल्या खुल्या जागेंत वादींचे आगाऊ परवानगीशिवाय कोणत्याहि प्रकारची इमारत, शेड किंवा इतर बांधकाम बांधण्याचा प्रतिवादींस अखत्यार नाहीं. परंतु सन १९२१चे मे महिन्यांत कागद ठेवण्याकरितां बांधलेली पक्की गोडाउन एकाएकीं आग लागून निकामी झाल्यानें प्रतिवादींची अडचण ध्यानांत आणून वादींनीं कागद ठेवण्याकरितां पत्र्याची तात्पुरती शेड प्रतिवादींस त्यानंतर बांधूं दिली. पण अलीकडे तिची जरूरी नाहींशी झाली असून त्या शेडमध्यें कागद न ठेवतां प्रतिवादींनीं टाइपांच्या केसींचे घोडे ठेवून कायमची कंपोझिंग रूम केली आहे. तसें करण्याचा प्रतिवादींस बिलकुल अधिकार नाहीं. गरज संपल्याबरोबर सदर शेड काढून टाकणें प्रतिवादींचें कर्तव्य होतें, तसें करण्याविषयीं ता. १ डिसेंबर, १९२७, ची प्रतिवादींस नोटीस दिली असतां प्रतिवादींनीं उद्दामपणाचें उत्तर दिलें. सबब ती पत्र्याची शेड कोर्टाचे हुकुमानें काढून टाकण्याकरितां हा दावा करणें प्राप्त झालें आहे.

४. वर लिहिल्याप्रमाणें फक्त केसरी-मराठा संस्थेचे उपयोगाकरितां सवलतीचे भाड्यानें दिलेल्या जागेंत दुसऱ्या संस्थांस भाड्यानें अगर अन्य तऱ्हेनें जागा देण्यास प्रतिवादींस बिलकुल अधिकार नाहीं. तसेंच खुल्या जागेंत कायमचे उपयोगाकरितां शेड बांधण्याचा, ठेवण्याचा किंवा वापरण्याचा प्रतिवादींस मुळींच हक्क नाहीं. वादींचे आगाऊ परवानगीशिवाय प्रतिवादींनीं हीं कृत्यें केलीं असल्यामुळें, सदर जागेचे गैरकायदा उपयोगाबद्दल जास्त भाड्याऐवजीं नुकसानी मागण्याचा व तसेंच नुकसानी देण्याचें नाकारल्यास त्याबद्दल अगर इतर गैरवर्तनाबद्दल भाडेकरी म्हणून प्रतिवादींस काढून टाकण्याचा वादींस हक्क प्राप्त झाला आहे. या दाव्यांत फक्त भाड्याऐवजीं नुकसानमागणीचा व सदरील नवीन व इतर संस्था व शेड काढून

टाकण्याचा दावा वादींनीं केला आहे. तसेंच दाव्यांतील भाडेचिठ्ठीस बाध येईल असें अगर त्यासारखें कोणतेंहि वर्तन प्रतिवादींनीं करूं नये म्हणून त्यांस निरंतरची ताकीद देण्याकरितांहि दावा करणें भाग झालें. यांखेरीज व इतर ज्या दादी दाव्यांतील भाडेचिठ्ठीच्या बाबतींत वादींस मागणें जरूर वाटेल त्याबद्दल वादी हे प्रतिवादींवर अलाहिदा कायदेशीर इलाज करतील. वादींनीं प्रतिवादींस ता. ३० नोव्हेंबर, १९२७, व ता. १ डिसेंबर, १९२७, रोजीं रजिस्टर पोस्टानें लेखी नोटिसा पाठविल्या. त्यांना नकारात्मक जबाब ता. ३-१२-१९२७ रोजीं प्रतिवादींनीं पाठविला. सबब दाव्याचें कारण त्या दिवशीं या कोर्टाचे हद्दींत घडलें. चालू दाव्याचे विषयाचे बाबतींत वादी-प्रतिवादी यांचे दरम्यान कोणत्याहि इतर रीतीनें वादाचा निर्णय होणें शक्य न झाल्यानें चालू दावा करणें भाग झालें आहे.

५. कोर्टाचे हुकमाकरितां व वकीलफीकरितां दाव्याची आकारणी रु. २७९० ची केली आहे, ती येणेंप्रमाणें—

( अ ) पत्र्याचे शेडच्या भाड्याऐवजीं नुकसानीचे दरमहा रुपये २५ प्रमाणें दाव्यापूर्वी तीन वर्षांचे रु. ९००.

( आ ) महाराष्ट्र प्रॉव्हिन्शिअल कॉंग्रेस-कमिटीचे ऑफिसाचे भाड्याऐवजीं नुकसानीचे दरमहा रु. २५ प्रमाणें दाव्यापूर्वीच्या तीन वर्षांचे रु. ९००.

( इ ) टिळक-स्वराज्य-संघाचे ऑफिसाच्या भाड्याऐवजीं नुकसानीचे दरमहा रु. २५ प्रमाणें दाव्यापूर्वीच्या तीन वर्षांचे रु. ९००.

( ई ) पत्र्याची शेड वादींचे वाड्यांतून कोर्टामार्फत काढून टाकण्याकरितां इंजंक्शनची मागणी केली आहे त्याची आकारणी रु. १५.

( उ ) महाराष्ट्र प्रॉव्हिन्शिअल कॉंग्रेस-कमिटीची कचेरी व टिळक-स्वराज्य-संघाची कचेरी वादींचे वाड्यांतून कोर्टमार्फत काढून टाकण्याकरितां इंजंक्शनें मागितलीं आहेत त्या दोहोंबद्दल रु. ३०.

( ऊ ) स्थानिक स्वराज्य-संस्था ( Local Board Association ), गीता-धर्म-मंडळ वगैरे सर्व संस्थांच्या गुप्त कचेऱ्या वादींचे वाड्यांतून कोर्टमार्फत काढून टाकण्याकरितां इंजंक्शनें मागितलीं आहेत, त्यांबद्दलची आकारणी एकंदर मिळून रु. ३० ची केली आहे.

( ए ) दाव्यांतील भाडेचिठ्ठीच्या शर्तीस बाध येईल असें अगर त्यासारखें कोणतेंहि कृत्य प्रतिवादींनीं करूं नये म्हणून प्रतिवादींस निरंतरची ताकीद देण्याकरितां दावा रु. १५ चा केला आहे.

येणेंप्रमाणें सबंध दाव्याची आकारणी रु. २७९० केली आहे.

६. प्रतिवादींनीं मूळ लिहून दिलेली भाडेचिठ्ठी, वादींनीं प्रतिवादींस दिलेल्या नोटिसा व त्यांस प्रतिवादींनीं दिलेलें उत्तर, स्थानिक संस्था-मंडळांसंबंधींचा कागद,

गीता-धर्म-मंडळाचा अहवाल सन १९२४ ते १९२५ चा आणि सहा फोटो सध्यां या फिर्यादीबरोबर हजर केले आहेत.

७. वादींची विनंति अशी आहे कीं :—

( अ ) वादींचे वाड्यांत प्रतिवादींस भाड्यानें दिलेल्या भागांतील खुल्या जागेंत कागद ठेवण्याकरितां तात्पुरती पत्र्याची शेड प्रतिवादींनीं बांधली होती, तिची आतां कागद ठेवण्याकरितां जरूरी नसल्यामुळें ती तावडतोब काढून टाकण्याचा हुकूम व्हावा.

( आ ) प्रतिवादींना भाड्यानें दिलेल्या जागेंत महाराष्ट्र प्रॉव्हिन्शिअल कॉंग्रेस-कमिटीची कचेरी आहे, ती तावडतोब काढून टाकण्याचा हुकूम व्हावा.

( इ ) सदर जागेंत टिळक-स्वराज्य-संघाची कचेरी आहे, ती तावडतोब काढून टाकण्याचा हुकूम व्हावा.

( ई ) स्थानिक-स्वराज्य-संस्था ( Local Board Association ), गीता-धर्म-मंडळ वगैरे इतर संस्थांच्या गुप्त कचेऱ्या, ज्या कांहीं वादींचे वाड्यांत प्रतिवादींना भाड्यानें दिलेल्या जागेंत प्रतिवादींनीं ठेवूं दिल्या असतील त्या सर्व काढून टाकण्याचा हुकूम व्हावा.

( उ ) वरील गोष्टी प्रतिवादींनीं न केल्यास वादींनीं त्या गोष्टी कराव्या व जो खर्च येईल तो प्रतिवादींनीं वादींस द्यावा असा हुकूम व्हावा.

( ऊ ) पत्र्याची शेड, महाराष्ट्र प्रॉव्हिन्शिअल कॉंग्रेस-कमिटीची कचेरी व टिळक-स्वराज्य-संघाची कचेरी या प्रत्येकींबद्दल दरमहा रु. २५ प्रमाणें दाव्याचे तारखेपर्यंत मागील तीन वर्षांचे भाड्याऐवजीं नुकसानीचे रुपये २७०० ( सत्ता-वीसशें ) प्रतिवादींकडून वादींस देववावे.

( ए ) दाव्याचे तारखेपासून पुढें सदर कचेऱ्या व शेड काढून टाकीपर्यंत प्रत्येकीबद्दल दरमहा रु. २५ प्रमाणें भाड्याऐवजीं नुकसानी आकारून होईल ती रक्कम वादींस देववावी.

( ऐ ) वरील दाव्यांतील आकारणी एकंदर रु. २७९० याजवर फिर्याद दाखल झाल्यातारखेपासून दरसाल दरशेंकडा ६ टक्केप्रमाणें पुढील व्याज, रक्कम पदरीं पडेपर्यंत वादींस प्रतिवादींकडून मिळावें असा हुकूम व्हावा.

( ओ ) दाव्यांतील भाडेचिठ्ठीच्या शर्तीस बाध येईल असें अगर त्यासारखें कोणतेंहि कृत्य प्रतिवादींनीं करूं नये अशी प्रतिवादींस निरंतरची ताकीद देण्यांत यावी व कोर्टास इतर योग्य व न्यायाचे वाटतील असे हुकूम कोर्टानें करावेत.

( औ ) वादींचा सर्व खर्च प्रतिवादींकडून जातीवर देववावा.

येणेंप्रमाणें वादींचा दावा आहे. आज मुकाम पुणें ता. १२-१२-२७. दाखल ता. २०-१२-२७.

( सही ) रामचंद्र बळवंत टिळक, द. खुद्द.
( सही ) श्रीधर बळवंत टिळक, द. खुद्द.

२४. कां आहे कीं नाहीं दैवाचा विचित्र खेळ? लोकमान्यांच्या खुद्द चिरंजिवांनींच स्थानिक-स्वराज्य-संस्था, गीता-धर्म-मंडळ, या संस्थांना 'गुप्त मंडळ्या' म्हणावें, व त्यांच्या कचेऱ्यांत 'भलतींसलतीं' माणसें येत असल्यामुळें आपणांस त्रास होत असल्याबद्दल त्यांनीं फिर्याद करावी, आणि त्याच चिरंजिवांच्या ताब्यांतील वाड्याच्या भागांत 'समाज-समता-संघ' व 'खाणावळ' अशा अव्रूदार संस्था असाव्यात, व त्यांत येणाऱ्या जाणाऱ्या माणसांचा मात्र त्यांना बिलकुल त्रास होऊं नये, हा प्रकार अवलोकन केल्यावर, लोकमान्यांच्या आत्म्यास केवढा संतोष वाटला असेल नाहीं बरें? व त्यांचे तोंडून किती तरी धन्योद्गार निघाले असतील कीं, बस्स, पुत्र व्हावेत तर ऐसे गुंड कीं, जे बापास बाप न म्हणतां, किंवा दुसऱ्या कोणाचाहि मुलाहिजा न ठेवितां, आपल्या वडिलांनीं स्थापिलेल्या व वाढविलेल्या केसरी संस्थेवर मारे बेशक तीव्र आघात करताहेत, टिळक पंचांगास कोर्टांत खेंचून नेताहेत, आणि स्थानिक-स्वराज्य-संस्थेस व गीता-धर्म-मंडळास बेधडक गुप्त मंडळ्यांच्या यादींत ढकलून अनायासें एक प्रकारें जणूं काय गुप्त पोलिसांची कामगिरीच करताहेत !

वरील दाव्यांत ट्रस्टींनीं रीतसर आपल्या कैफियती दाखल केल्या, आणि दोन्ही दावे मिळून जेव्हां पुराव्याची वेळ जवळ येऊं लागली, तेव्हां चमत्कार असा झाला कीं, रा. रामभाऊंनीं आपले दोन्ही दावे बिनशर्त काढून घेतले !

२५. वरील दाव्याच्या भरतीस टिळकबंधूंपैकीं कै. बापूराव यांनीं आपला 'माझा व्यासंग' हा ग्रंथ सन १९२८ सालीं प्रसिद्ध केला! सदर ग्रंथाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं वाचकवर्गास अशी ग्वाही दिली आहे कीं, 'लो. टिळकांचे निधनानंतर पुढें वेळोवेळीं मी जे लेख प्रसिद्ध केले त्यांपैकीं, विनोदी, उपरोधी, विवेचनात्मक आणि सुविचार-परिप्लुत अशा योग्य लेखांची निवड करून तेवढेच या पुस्तकांत ग्रथित केले आहेत.' पुस्तकांतील लेख वरील कसोटीस उतरतात कीं नाहीं, हें पाहण्याचें काम वाचकांचें आहे व तो प्रस्तुत मुद्दाहि नाहीं. मयतासंबंधानें अगोदर बोलूं नये, व बोललेंच तर चांगलेंच बोलावें, हा शिष्टाचार आहे खरा: परंतु सदर पुस्तकाची प्रस्तावना वाचली म्हणजे मनांत अशी शंका उभी राहते कीं, कै. बापूरावांनीं पुस्तकांतील लेखांसाठीं प्रस्तावना प्रसिद्ध केली, कां प्रस्तावनेसाठीं लेख प्रसिद्ध केले? आणि प्रस्तावनेंतील शिव्याशाप अपुरे पडतील कीं काय अशी भीति वाटूनच कीं काय कोण जाणे, त्यांनीं तिला एका अर्पणपत्रिकेची पुस्तीहि जोडलेली आहे! त्या अर्पणपत्रिकेंत त्यांनीं निदान आपल्या मातोश्रीचें, त्या माउलीचें, नांव तरी गोंवावयास नको होतें. प्रस्तावनेस साजेलसें असें एखादें स्त्रीरत्न उभें करून त्यास आपला ग्रंथ अर्पण करण्यास त्यांना विशेषसें जडहि गेलें नसतें! या कामीं त्यांच्या पुणेंमुंबईच्या मित्रांनीं त्यांना खचित मनःपूर्वक हातभारहि लाविला असता! ग्रंथाची प्रस्तावना म्हणजे टिळकबंधूंच्या नेहमींच्या रडकथेची केवळ सुधारून वाढविलेली आवृत्तीच होय! अर्पणपत्रिका येणेंप्रमाणें आहे:—'आई, परमपूज्य लोकमान्यांचे अखेरचे तुरुंगवासांत तुझा

‘ छळ करणारी सोनेरी टोळी आतां आमचेवर उलटली असल्यामुळें तुझें विस्मरण ‘ कसें बरें होईल ? आणि हा छोटा ‘ लेख-संग्रह ’ तुजवांचून मी अन्य कोणास ‘ अर्पण करणार ?–तुझा लाडका-बापू.’ कां आहे कीं नाहीं अगदीं कादंबरींतील थाटमाट ? भाषा किती भारदस्त, आणि ‘ सुविचार ’ तर काय अगदीं ओतप्रोत भरलेले ! आईचें स्मरण होण्याचें कारण तरी किती यथायोग्य ? आणि अक्षरन् अक्षर सत्यानें कसें ओथंबलेलें आहे ! लोकमान्यांचे गैरहाजिरींत ‘ सोनेरी टोळी ’नें त्यांच्या पत्नीचा छळ केला आणि लोकमान्यांच्या आप्तेष्टांनीं व लहानपणापासूनच आहाराबाहेर शहाणे असलेल्या त्यांच्या चिरंजिवांनीं तो खुशाल होऊं दिला, आणि लोकमान्य तरी असे दुधखुळे कीं, तुरुंगांतून परत आल्यानंतर त्यांनीं या सोनेरी टोळीस याबद्दल जाबसाल विचारण्याऐवजीं आपल्या मृत्युपत्रानें कोणाला पंच नेमिलें, तर कोणाला एक्झिक्यूटर नेमिलें, कोणाला हें बक्षिस दिलें, तर कोणाला ती बढती दिली ! मंडालेच्या तुरुंगांतून केसरी-मराठा पत्रांच्या व्यवस्थेवर व तसेंच घरांतील बारीकसारीक गोष्टींवर ज्या लोकमान्यांची सतत करडी नजर होती, इतकेंच नव्हे तर आपल्या पत्नीच्या दुखण्यांत औषधपाण्याची खडान् खडा माहिती ज्यांना पुरवावी लागत असे, त्या लोकमान्यांनीं, त्यांच्या पत्नीचा खरोखर छळ करण्याची तर गोष्ट राहूंद्याच, पण करण्याची नुसती कल्पना जर कोणीं मनांत आणली असती, तर त्याला उभा चिरून खाल्ला असता ! वस्तुस्थिति अशी कीं, त्या माउलीस पतिवियोगाचा विसर पडावा म्हणून लोकमान्यांचे शेंकडों इष्ट-मित्रें आपापल्या परीनें झटत असत ! परंतु दुखण्यामध्यें सर्व इलाज थकून त्यांत त्या माउलीचा अंत झाला, त्याला कोण काय करणार ?

२६. लोकमान्यांच्या पश्चात् टिळकबंधूंना सुमारें अडीच तीन लाखांची मिळकत मिळाली. तिचा तपशील ज्युबिली-अंकांत दिलेला आहे. लोकमान्यांच्या अनुयायांनीं त्यांना सुमारें तीन लाखांचा जो ‘ पर्स-फंड ’ अर्पण केला तो केला नसता, तर चिरंजिवांना मिळकत मिळाली असती पूज्य. लोकमान्यांच्या पश्चात् लवकरच दोघां बंधूंनीं आपला शिक्षणक्रम आंखडता घेतला. दोन्ही भावांचा स्वभाव फारच खर्चिक असल्याकारणानें त्यांना मिळालेल्या मिळकतीला ओहोटी सुरू झाली. जवळचा बराचसा रोकड पैसा घरावर खर्च केला; याशिवाय खर्चास अनेक तोंडें पडलीं होतीं तीं निराळींच! साहजिकपणें पैशाची अडचण भासूं लागल्यावर त्यांची दृष्टि केसरी ट्रस्टकडे वळली, व त्यांना वाटूं लागलें असावें कीं, हें बरें घबाड आहे, येथें जर युक्तिप्रयुक्तीनें आपला शिरकाव करून घेतां आला, तर आपली उत्तम सोय होईल; आणि त्या दिवसापासून त्यांनीं ट्रस्टींवर हत्यार उपसलें ! व वेळेला सुचतील तसले सुसंगत, विसंगत आरोप ट्रस्टींवर बिनदिक्कत करण्यास त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं ! एवढेंच नव्हे तर ट्रस्टींबरोबर आपल्या मेव्हण्यांनाहि भरडून काढण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं ! आपण लोकमान्यांचे चिरंजीव असल्यामुळें व एका दृष्टीनें

त्यांच्या थोरपणावर आरूढ झाल्याकारणानें ते स्वतःस फारच मोठे समजूं लागले. त्यांतच केसरीविरुद्ध असलेल्यांची त्यांना भर मिळाली. मग काय विचारतां ? बोलण्याचालण्यांत, लिहिण्यांत तर त्यांनीं जवळजवळ ' हुतात्म्या 'चेंच अवसान आणिलें ! ट्रस्टींनीं व त्यांच्या प्रत्यक्ष मेव्हण्यांनीं त्यांना फसवून ट्रस्ट-डीड वगैरे कागदपत्र त्यांचेकडून करून घेतले ही गोष्ट जर खरी होती, तर ते रद्द ठरवून घेण्यासाठीं त्यांनीं ट्रस्टींवर व मेव्हण्यांवर दावे कां केले नाहींत ? अजागळासारखे अगदींच स्वस्थ कां बसले ? दाव्याच्या खर्चास त्यांचे जवळ पैसे होते, व बरा वाईट सल्ला देण्यास सल्लागारहि कांहीं थोडेथोडके नव्हते. त्यांना कोर्टदरबारचा अनुभवहि कांहीं कमी नव्हता. बरें, हेंहि जाऊं द्या. ट्रस्टींनीं लाविलेल्या फिर्यादींत हे कागदपत्र रद्द बातल ठरवून घेण्याची संधि त्यांना अनायासें प्राप्त झालेली होती. मग तिचा फायदा घेऊन ट्रस्टींची व मेव्हण्यांची लबाडी कोर्टाकडून शाबीद करून घेण्याऐवजीं ऐन वेळीं माघार ती काय म्हणून घेतली ? यांतलें इंगित असें कीं, कागदपत्रांसंबंधींची तक्रार ही त्यांना वास्तविक तक्रार करावयाचीच नव्हती, तर त्या तक्रारींच्या पांघरुणाखालीं ट्रस्टच्या क्षेत्रांत जर आपला हात घुसवितां आला तर तो त्यांना पाहिजे होता !

२७. टिळकबंधूंच्या खर्चाच्या योजना मोठ्या लोकविलक्षण असत ! गायकवाड वाड्याच्या पूर्वेकडील भाग दोन्ही बंधूंना राहण्यास पुरून उरण्यासारखा होता. त्यावर खर्च करण्याची बिलकुल जरूरी नव्हती. भाड्याचें उत्पन्नच जर काढावयाचें होतें, तर दुसरीकडे चाळी अगर घरें बांधून तें काढितां आलें असतें. परंतु एखाद्या लक्ष्मीपुत्राप्रमाणें त्यांनीं त्या भागावर एवढा अवाढव्य खर्च केला कीं, खर्चाची व उत्पन्नाची तोंडमिळवणी होणें अशक्य आहे. दुसरा एक मासला असा कीं, सन १९२८ च्या मे महिन्यांत कै. बापूरावांना अपघातानें मरण आल्यानंतर त्यांचें स्मारक करण्याची कल्पना रा. रामभाऊंच्या मनांत आली. येथील डेक्कन जिमखाना हाउसिंग सोसायटींत कै. बापूरावांनीं सुमारें आठ हजार रुपयांस चार प्लॉट्स् खरेदी केले होते. ता. ९-११-२८ रोजीं रा. रामभाऊंनीं डेक्कन जिमखान्याच्या सेक्रेटरीला पत्रानें असें कळविलें कीं, 'आपल्या बंधूंचें स्मारक म्हणून वरील प्लॉट्स्च्या जागीं 'Skating Rink' उभारण्यासाठीं सदर प्लॉट्स् व वर दहा हजारांची रक्कम देण्यास आपण तयार आहोंत, तेव्हां याप्रमाणें करण्यास तुम्ही तयार आहांत कीं नाहीं हें कळवावें.' त्याप्रमाणें डेक्कन जिमखान्याच्या कार्यकारी मंडळानें या देणगीस मान्यता दिली. आणि दोघांमध्यें रीतसर करारमदार होणार तों ती बातमी कै. बापूराव यांच्या पत्नी श्री. गं. शांताबाई यांना कळल्यावर त्यांनीं आपल्या अज्ञान मुलांतर्फे जेव्हां खडखडीत बजाविलें, तेव्हां ते करारमदार पुरे होण्याचें थांबलें; नाहीं तर ही आठ हजार किंमतीची स्थावर मिळकत व दहा हजारांची रोकड रक्कम टिळकघराण्यांतून अचानक बाहेर गेली असती ! स्मारकाची योजना तरी किती

और ? योजना कोणती तर म्हणे पुण्यासारख्या शहरीं ' Skating Rink ' बांधावयाची ! स्मारक करावयाचेंच होतें, तर पुण्यांत मदत करण्यासारख्या संस्था किंवा सर्वांना उपयोगी पडण्यासारख्या बाबी काय थोड्या पडल्या होत्या ? पण जगाविरहित कल्पकता जर दाखविली नाहीं, तर मग रामभाऊंचें रामभाउत्व तें राहिलें कुठें ?

२८. टिळकबंधूंच्या तिरकस स्वभावाचें आणखी एक उदाहरण म्हणजे असें कीं, लोकमान्यांची विधवा भावजय बहिणाबाई नांवाच्या आहेत. लोकमान्यांनीं आपल्या हयातींत त्यांना अन्नवस्त्र दिलें व आपल्या मागून तें मिळण्याची व्यवस्थाहि केली. मंडालेच्या मृत्युपत्रांत त्यांनीं लिहून ठेविलें होतें कीं, ' माझ्या नांवें असलेल्या रु. १५०० च्या प्रॉमिसरी नोटांच्या व्याजांतून माझी विधवा भावजय बहिणबाई हिला दरसाल रु. ७० पोटगी म्हणून आणि माझ्या इतर मिळकतींतून एकदां रु. ५०० काशीयात्रेचा खर्च म्हणून द्यावे. ' कोलंबोच्या मृत्युपत्रांत त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, ' चि. गं. भा. बहिणाबाईस मी हयात आहेंपर्यंत दरसाल रु. १०० देणें. माझेनंतर दोन हजार रुपयांच्या प्रॉमिसरी घेतलेल्या आहेत, त्यांचें व्याज रुपये सत्तर येईल तें व भरतीस पांच रुपये घालून एकंदर पाउणशें देणें व तिला आगर व घर बांधून केळशी येथें दिलें आहे, त्याचा उपभोग तिनें हयात आहेपर्यंत घेणें. नंतर सदर आगर व घर चिरंजीव गंगाधर वासुदेव विद्वांस माझा भाचा यांस देणें. याचेवर दुसरा कोणाचा हक्क नाहीं. ' लोकमान्यांच्या पश्चात् असें आढळून आलें कीं, त्यांनीं या बाबीसाठीं प्रॉमिसरी नोटा रुपये दोन हजारांच्या ऐवजीं रुपये सहा हजारांच्या घेतलेल्या होत्या. त्या नोटा ट्रस्टींनीं टिळक-बंधूंच्या स्वाधीन केल्या, आणि टिळक-बंधू व विद्वांस यांनीं सदर बहिणाबाईंना दरसाल रु. २०० देण्याविषयीं ता. १६-३-२१ रोजीं करार लिहून दिला, व त्याप्रमाणें सन १९२७ अखेरपर्यंत टिळक-बंधूंनीं सदर बाईंना दर तीन महिन्यांस रु. ५० प्रमाणें पोटगीहि दिली. परंतु पुढें काय डोक्यांत आलें कोणास ठाऊक, पण त्यांनीं पोटगी देण्याचें थांबविलें ! शेवटीं बाईंनीं पुणें कोर्टांत मु॥ नं. ५०७/१९२९ चा दावा लाविला. त्या कामीं रामभाऊंनीं छप्पन्न तक्रारी केल्या. त्या सर्व रद्द करून कोर्टानें ता. ४-१०-३० रोजीं बाईसारखा निकाल केला. रामभाऊंचा ठराविक शिरस्ता जो कीं, अगोदर कर कर तक्रारी करावयाच्या; परंतु शपथेवर जबानी देण्याची पाळी आली कीं, साक्षीच्या पिंजऱ्यांत म्हणून जावयाचें नाहीं व उलट बाजूकडून होणारी उलटतपासणी टाळावयाची; व दाव्याचा निकाल झाला न् झाला कीं, कुठें अपील कर, तर कुठें फेर-चौकशाचा अर्ज कर, याप्रमाणें पुन्हां भुणभुण चालू करावयाची; त्या शिरस्त्यास अनुसरून त्यांनीं या बाबतींतहि फेर-चौकशीचा अर्ज केलेला आहे !

२९. आणि शेवटीं कडेलोट म्हणजे खुद्द कै. बापूराव यांच्या मुलांच्याच बाबतींत झाला ! कै. बापूराव सन १९२८ च्या मे महिन्यांत मरण पावले. मरणा-

पूर्वी त्यांनीं पुण्याच्या कलेक्टरांना एक पत्र लिहिलें. तें पत्र म्हणजे बापूरावांचें मृत्युपत्रच होय, त्या पत्रानें आपल्या मुलांचें पालन करणार आपणांस आपल्या भावानें नेमिलेलें आहे, तेव्हां इस्टेटीची जी व जशी व्यवस्था आपण करूं तींत ढवळाढवळ करण्याचा कोणासहि हक्क नाहीं, वगैरे भ्रामक समजुती रा. रामभाऊ यांनीं करून घेतल्या असाव्यात असें वाटतें. याचा परिणाम मात्र असा झाला कीं, त्यांची व त्यांची भावजय श्री. गं. भा. शांताबाई यांची धुसफूस सुरू झाली, व शेवटीं ही धुसफूस इतक्या निकरास गेली कीं, शांताबाई ह्या आपल्या मुलाबाळांना घेऊन वऱ्हाडांत आपल्या मामाकडे निघून गेल्या. नंतर त्यांनीं आपणांस आपल्या मुलाबाळांच्या शरिराचें व मिळकतीचें पालन करणार म्हणून नेमण्याविषयीं कि. अ. नं. ११३/१९२९ चा अर्ज पुणें डिस्ट्रिक्ट कोर्टांत केला. त्यास रा. रामभाऊंनीं शक्य त्या हरकती घेतल्या. त्या कामीं आपल्या मुलाबाळांच्या खाण्यापिण्याबद्दलच्या खर्चाची तरतूद करण्याविषयीं शांताबाईंनीं कोर्टास अर्ज केला, त्यालाहि हरकती घेण्यांत आल्या. अशा रीतीनें इतर सर्व इलाज खुंटल्यामुळें शेवटीं शांताबाईंनीं आपल्या अज्ञान मुलांतर्फे पुणें फर्स्ट क्लास कोर्टांत मु॥ नं. १३/१९३० चा अव्वल दावा लाविला; व त्या कामीं कोर्टानेंच जेव्हां हुकूम केला, तेव्हां शांताबाईंस खर्चासाठीं दरमहा रु. १०० मिळूं लागले ! यासंबंधानें फिर्यादअर्जांत शांताबाईंनीं लिहिलेला मजकूर असा आहे कीं, ‘ वादींची ( कै. बापूरावांचे मुलगे जयंत ‘ व श्रीकांत यांची ) आई आपल्या मुलाबाळांस घेऊन सन १९२९ च्या मार्च ‘ महिन्यांत उमरावतीस गेली. वादी, वादींची आई व वादींच्या वहिणी थोर, ‘ कुलीन व सुखवस्तु घराण्यांतील माणसें आहेत. वादींच्या आईजवळ कोणतीच ‘ रक्कम शिल्लक नव्हती. वादींच्या नातेवाइकांवर फार दिवस अवलंबून राहणें शक्य ‘ नव्हतें व घराण्याच्या लौकिकास साजेलसेंहि नव्हतें. वादींच्या आईस पैशाची ‘ जरूरी होती, पण पैसे तर तिजजवळ नव्हते. म्हणून केसरी-मराठा संस्थेच्या ट्रस्टीं- ‘ कडून दरमहा मिळावयाची रक्कम आपणांस देण्याविषयीं वादींच्या आईनें त्यांना ‘ सांगितलें व त्याप्रमाणें त्यांनीं थोडी रक्कमहि दिली. ही गोष्ट प्रतिवादीस ( राम- ‘ भाऊंस ) समजतांच, प्रतिवादीनें सदर ट्रस्टींना नोटीस देऊन रक्कम न देण्या- ‘ विषयीं कळविलें व त्यांनीं अर्थात् रक्कम देण्याचें थांबविलें. यानंतर प्रतिवादी ‘ स्वतः वादी व त्यांची आई व बहिणी यांच्या गुजाऱ्याकरितां रक्कम पाठवील अशी ‘ कल्पना होती; परंतु रु. १०० पेक्षां एक कपर्दिकाहि प्रतिवादीनें अद्याप वादींच्या ‘ आईकडे पाठविली नाहीं. यामुळें सर्वांचे दिवस अत्यंत हलाखींत व शरमेनें जात ‘ आहेत. शेवटीं वादींच्या आईनें वरील कि. अ. नं ११३/१९२९ चे कामीं यासंबंधानें ‘ व्यवस्था होण्याविषयीं अर्ज केला. पण त्याप्रमाणें प्रतिवादीनें कांहींच व्यवस्था ‘ केली नाहीं; एवढेंच नव्हे तर सदर अर्जास प्रतिवादी कसून विरोध करीत आहे. ‘ यावरून प्रतिवादीचा हेतु कोणता आहे, हें स्पष्ट दिसून येतच आहे. ’

प्रतिवादी रामभाऊसंबंधानें सदर फिर्यादअर्जीत शांताबाई असें लिहितात कीं, ' प्रतिवादीचा स्वभाव अत्यंत उधळ्या, एककल्ली व तिरसट असा आहे. त्यांचें ' लग्न झालेलें नसल्यामुळें व त्यांच्या हिश्श्यास बरीच मिळकत असल्याकारणानें, नाते- ' वाईक, इष्टमित्र, समाज वगैरेसंबंधानें त्यांचें वर्तन प्रथमपासून उद्दामपणाचें व ' बेपर्वाईचें आहे......वादींचे वडील मयत झाल्यानंतर कांहीं दिवस वादीच्या ' आईनें कसेबसे काढले. परंतु प्रतिवादीनें त्यांचे खाण्यापिण्याचे फारच हाल केले. ' प्रतिवादी मात्र स्वतःच्या चैनीसाठीं बेगुमानपणानें पैशाची उधळपट्टी करीत होते ' व आहेत. असे हाल होऊं लागल्यानंतर वादींची वाटलेली इस्टेट वादींतर्फे त्यांच्या ' आईच्या ताब्यांत देण्याविषयीं, आणि न वाटलेल्या इस्टेटीचे दोन हिस्से करून ' एका हिश्श्याची मिळकत ताब्यांत देण्याविषयीं नातेवाईकांच्या मध्यस्थीनें वादींच्या ' आईनें पुष्कळ खटपट केली. परंतु प्रतिवादीनें मुळींच दाद दिली नाहीं; इतकेंच ' नव्हे तर वादींच्या वांटणीच्या गव्हमेंट सिक्यूरिटीज् कलम पोटकलम ( ' अ ' ' मधील ' परिशिष्ट २ अ ' ) यांत वर्णिलेल्या विकून टाकण्याची प्रतिवादीनें ' धमकीहि दिली व प्रतिवादी मुंबईस निघून गेले. '

कै. बापूरावांचें मृत्युपत्र म्हणून ज्यास रामभाऊ म्हणत होते, त्यासंबंधानें शांताबाई फिर्यादअर्जीत असें लिहितात कीं, ' कि. अ. नं $\frac{११३}{१९२९}$ चे कामीं प्रतिवादीनें ' वादींच्या वडिलांची शेवटली इच्छा दर्शविणारा म्हणून एक कागद हजर केलेला ' आहे. सदर कागदाची वादींस अगर त्यांच्या आईस कांहीं माहिती नाहीं व तो ' त्यांना कबूलहि नाहीं; सदर कागद कायदेशीर नाहीं व वादींवर बंधनकारक नाहीं; ' व त्यामुळें वादींच्या कोणत्याहि हक्कास बाध आलेला नाहीं व येत नाहीं; किंवा ' प्रतिवादीस कोणताहि हक्क प्राप्त झालेला नाहीं अगर होत नाहीं. क्षणभर सदर ' कागद खरा व कायदेशीर आहे असें मानलें, तरी प्रतिवादीच्या वर वर्णन केलेल्या ' वर्तनामुळें व वादींच्या वडिलांचा प्रतिवादीनें विश्वासभंग केलेला असल्यामुळें त्याचा ' यापुढें अंमल करणें वादींच्या हिताच्या दृष्टीनें योग्य, न्यायाचें व कायदेशीर होणार ' नाहीं. वादी अज्ञान असल्यामुळें त्यांच्या हिताचें संरक्षण करणें हें कोर्टाचें कायदेशीर ' कर्तव्य आहे व तें बजावून सदर कागद यापुढें रद्द व अंमल करण्यास अयोग्य ' आहे, असें कोर्टानें ठरविण्याविषयीं अज्ञान वादींची विनंति आहे. तसेंच, वादी व ' त्यांचे वडील यांचें एकत्र व अविभक्त कुटुंब असल्यामुळें वादींच्या वडिलानें ' प्रतिवादीच्या नांवानें ज्या गव्हमेंट सिक्यूरिटिज् ट्रॅन्स्फर केलेल्या आहेत, तो व्यवहार ' रद्दबातल आहे व तो वादींवर बंधनकारक नाहीं व त्यामुळें वादींचे कोणतेहि हक्क नष्ट ' झालेले नाहींत अगर होत नाहींत व प्रतिवादीस कोणतेहि हक्क प्राप्त झालेले नाहींत ' अगर होत नाहींत. '

हा दावा ता. २४-१-३० रोजीं दाखल झाला व सुमारें दहा अकरा महिने रा. रामभाऊ हे यांत कडाक्यानें भांडले. परंतु गेल्या डिसेंबर महिन्यांत वादी-

तर्फेच्या पुराव्यास प्रारंभ झाल्यानंतर उभय पक्षांमध्यें तडजोड होऊन तो संपला, ही खरोखर संतोषाची गोष्ट होय !

३०. वरील कलमें २७ ते २९ यांमध्यें नमूद केलेल्या बाबींशीं टस्टींचा प्रत्यक्ष संबंध नाहीं हें जरी एका अर्थी खरें असलें, तरी त्या बाबी टिळकबंधूंच्या स्वभावाच्या निदर्शक असल्याकारणानें, त्यामुळें त्यांच्या ट्रस्टींबरोबर झालेल्या वादावर योग्य प्रकाश पडणार असल्यामुळेंच, त्या निर्दिष्ट करण्यांत आलेल्या आहेत ! 'ट्रस्टी वि. टिळकबंधू' या वादासंबंधाच्या फक्त कांहीं थोड्याच कागदांचा या लेखांत निर्देश करण्यांत आलेला आहे. ह्या व आणखी इतर शेंकडों कागदपत्रांचा निःपक्षपातबुद्धीनें विचार करणारांची अशी खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं कीं, केसरी-मराठा संस्थेसंबंधानें झालेलें ट्रस्ट-डीड व इतर कागद-पत्र लोकमान्यांचे आप्तेष्ट व मित्रमंडळी यांच्या सल्ल्यानेंच, लोकमान्यांच्या इच्छेस अनुसरून व तिची पूर्तता करण्याच्या सद्बुद्धीनेंच, टिळकबंधूंना त्यांच्या हक्कांची पूर्ण जाणीव करून देऊनच व ती त्यांनीं करून घेऊनच मग झालेले आहेत ! त्या-बद्दल कोणीहि टिळकबंधूंना फसविलेलें नाहीं, अगर बुडविलेलें नाहीं, व तसें करण्याचें कोणास कारणहि नव्हतें, व तसें होऊं देण्याइतके टिळकबंधू भोळे-भाबडे व अंधविश्वासीहि नव्हते ! उलट, असाच प्रकार दृष्टोत्पत्तीस येतो कीं, वेळोवेळीं अनेक तक्रारी उपस्थित करून त्यांनीं लोकमान्यांच्या इच्छेपलीकडेहि जास्त रकमा ट्रस्टींकडून वसूल केल्या, व कुठें जा लोकमान्यांच्या चिरंजिवांशीं भांडत, म्हणून ट्रस्टींनीं त्या त्यांना बिनबोभाट दिल्या ! आणि शेवटीं जेव्हां अगदींच नाइलाज झाला, तेव्हांच ते कोर्टाची पायरी चढले ! सन १८९६ सालीं दे. भ. तात्यासाहेब केळकर हे लोकमान्यांच्या बोलावण्यावरून त्यांना येऊन मिळाले. त्यांत लोकमान्यांनीं तात्यासाहेबांना नांवारूपास आणलें असलें तरी स्वतःची सोय पाहिली, व एक बिनमोल सहकारी मित्र संपादन केला ! लोकमान्यांना येऊन मिळाल्यावर तात्या-साहेबांनीं त्यांच्या शिष्यत्वाबरोबर अल्पसंतुष्टतेचाहि स्वीकार केला ! केसरी-मराठा पत्रांच्या संपादक-वर्गात सामील होण्याऐवजीं जर त्यांनीं आपला वकिलीचा धंदा चालविला असता, तर एव्हांना ते खास लाखोपती बनले असते. अशीच गोष्ट दे. भ. बाबासाहेब विद्वांसांची. दोघेहि लोकमान्यांना येऊन मिळाले, वीस-पंचवीस वर्षेपर्यंत दोघांहि जणांनीं आलेल्या संकटांस लोकमान्यांबरोबर टक्कर दिली, व लोकमान्यांच्या गैरहजिरींत दोघांहि जणांनीं केसरी व मराठा पत्रें अशा धडाडीनें चालविलीं व त्यांची व्यवस्था अशा टाकठिकीनें केली कीं, तीं महाराष्ट्राचीं नुसतीं मुखपत्रेंच बनलीं नाहींत, तर तीं सांपत्तिक दृष्ट्या स्थिर पायावर उभीं राहिलीं ! केळकर व विद्वांस हे लोकमान्यांचे डावेउजवे हात होते, व त्या दृष्टीनें स्वतः लोकमान्य त्यांच्याकडे सतत पहात असत ! अशा स्थितींत लोकमान्यांनीं केळकरांस तीन पंचांपैकीं एक पंच व विद्वांसांना व्यवस्थापक नेमिलें, हें

यथायोग्यच केलें. व त्यांचे पश्चात् या दोघांनीं जर केसरी-मराठा ट्रस्टचे ट्रस्टी व्हावयाचें नाहीं, तर मग काय त्यांच्या शिकाऊ मुलांनीं कां थिल्लर बाजारबुणग्यांनीं व्हावयाचें ? बरें, या ट्रस्टचीं सूत्रें हातीं आल्यापासून ट्रस्टचा नफा झाला कां नुकसान झालें, अशा कोत्या व्यावहारिक दृष्टीनें जरी विचार केला, तरी तिकडूनहि कोणाचेंहि समाधानच होईल. व याची साक्ष गेल्या ऑगस्ट महिन्यांत ट्रस्टींनीं केलेला तीन लाखांचा ट्रस्टच देत आहे. ट्रस्टींना शिव्याशाप देण्यास कांहीं विशेषशी अक्कल लागत नाहीं ! निंदाच करावयास बसलें म्हणजे कोणाचीहि निंदा सहज करतां येते ! दौतींत लेखणी बुचकळून पांढऱ्यावर काळें केलें व त्याची प्रसिद्धि करण्यास चार चारगट पत्रें हाताशीं असलीं किंवा द्रव्यानें हाताशीं केलीं, म्हणजे निंदेला हो काय तोटा ? आणि त्यांतल्या त्यांत मनांत एवढा विश्वास वाटत असला कीं, ट्रस्टी आपली पायरी सोडून बदनामीबद्दल आपणांस दिवाणी अगर फौजदारी कोर्टांत खेंचण्याचा संभव नाहीं, म्हणजे कोणासहि मांसळी-बाजार भरविण्यास असा वेळ तो कितीसा लागणार ?

केसरी-मराठा ट्रस्ट हा कोणाहि व्यक्तीचा ट्रस्ट नसून तो टिळकभक्तांचा ट्रस्ट आहे ! या ट्रस्टवर कोणाचाहि, टिळकांचा मुलगा म्हणून, किंवा मित्र म्हणून, व्यक्तिगत हक्क पोहोंचत नाहीं ! हा ट्रस्ट चालवितांना त्या त्या वेळीं जीं जीं लायक माणसें उपलब्ध असतील त्यांच्याच करवीं तो चालविणें सर्वथैव उचित आहे ! सन १९२० च्या किंवा आजच्या परिस्थितींत दे. भ. तात्यासाहेब केळकर व बाबासाहेब विद्वांस यांच्यापेक्षां केसरी-मराठा संस्थेस जास्त जवळचीं व जिव्हाळ्याचीं लायक माणसें महाराष्ट्रांत आहेत कोठें ? आम्ही लोकमान्यांचे चिरंजीव म्हणून आम्हांला ट्रस्टी नेमा असें म्हणण्यास ही काय एखाद्या संस्थानची गादी आहे कीं काय ? कीं ओंठावर मिशू फुटली कीं, हातावर अष्टाधिकारांचें उदक हें सुटा-बयाचेंच ! हा टस्ट म्हणजे एक फार मोठी जबाबदारी आहे, व तो संभाळण्यास तशाच लायकीचीं माणसें असलीं पाहिजेत !

हा ट्रस्ट चालविण्यास पुढें मागें जर टिळकघराण्यांतच लायक माणसें निपजलीं, तर टिळक-भक्तांस दुधांत साखर पडल्यासारखें निःसंशय वाटेल ! सध्यांच्या ट्रस्टींना मोठी आशा वाटत होती कीं, टिळकबंधू योग्य तें शिक्षण संपादन करून हा ट्रस्ट चालविण्याची पात्रता आपल्या ठायीं आणतील, व मग आपण या जबाबदारींतून मोकळे होऊं ! पण टिळकबंधू कसले खमंग ? लोकमान्यांचे पश्चात् त्यांनीं लवकरच भराभर आपापलीं कॉलेजें सोडून देऊन ते मोकळे मुदाने झाले, व दुसरा कांहींच व्यवसाय नसल्याकारणानें त्यांनीं आपली वक्रदृष्टि ट्रस्ट व ट्रस्टी यांच्याकडे वळविली! असो. झालें तें झालें, तें कांहीं आतां परत येत नाहीं. सुदैवानें कै. बापूराव यांचे जयंत व श्रीकांत असे मुलगे आहेत व ते चलाख असल्याविषयीं त्यांची बोलवा आहे. आम्हां टिळकभक्तांची परमेश्वराजवळ केव्हांहि अशीच प्रार्थना असणार कीं, परमेश्वरा,

या दोन मुलांना तूं दीर्घायुष्य व आरोग्य देऊन आपल्या आजोबांचा ट्रस्ट चालविण्यास कायिक, वाचिक व मानसिक दृष्टींनीं समर्थ कर, आणि त्यांच्या करवीं लोकमान्यांच्या परंपरेचा व तद्द्वारां हिंदुस्थानचा याहिपेक्षां जास्त उत्कर्ष घडवून आण!

---

# केसरीचें आंतरराष्ट्रीयदृष्ट्या महत्त्व

[ प्रो. एन्. एन्. गोडबोले, एम्. ए., बी. एस्‌सी., पी. एच्‌डी. ]

पुण्यास असतांना मंगळवारीं सकाळीं ' केसरी, पुणें ' ही आरोळी व त्याचप्रमाणें मुंबईस असतांना ' घ्यारे मंगळवारचा केसरी ' हे शब्द माझ्या अतिशय परिचयाचे आहेत. हा आवाज कानीं पडल्यावर 'केसरी' विकत न घेणें म्हणजे कांहीं तरी चुकल्यासारखें वाटतें ! परंतु पुण्यास किंवा मुंबईस राहणाऱ्यास केसरी इतका परिचयाचा झाला आहे कीं, एखादे वेळीं ' अतिपरिचयादवज्ञा ' म्हणतात अशाप्रमाणें होण्याचा संभव आहे ! परंतु ज्यांनीं महाराष्ट्राच्या बाहेर बरींच वर्षें काढलीं आहेत त्यांना मात्र अवज्ञा तर राहिलीच, परंतु ' केसरी 'ची केवढी योग्यता आहे याचें खरें महत्त्व समजतें.

मला आज महाराष्ट्राच्या बाहेर रहावयास लागून वीस वर्षें पुरीं झालीं. त्यांपैकीं पांच वर्षें महाराष्ट्राच्याच बाहेर नव्हे, तर आपली मायभूमि हिंदुस्थान त्याच्याहि बाहेर अनोळखी अशा जपान, जर्मनी इत्यादि देशांतून राहण्याचा प्रसंग आला. महाराष्ट्राच्या बाहेर राहिल्याशिवाय ' केसरी 'ची खरी योग्यता कळून येत नाहीं. लाहोरास असतांना मराठी भाषा बोलणारे पाहुणेहि भेटणें कठीण, त्यामुळें ' केसरी ' पोस्टानें येण्याचा वार म्हणजे मराठी बोलणारा एखादा विद्वान् पाहुणा आपल्याकडे आला आहे कीं काय असें वाटे ! इंग्रजी पत्रें ' ट्रिब्यून,' ' पंजाबी,' ' लीडर ' किंवा ' स्टेटस्‌मन् ' वगैरे कितीहि वाचलीं तरी ' केसरी ' वाचण्यानें जी मनाची शांति व तृप्ति होई ती दुसऱ्या कशानेंहि होत नसे ! इतकेंच नव्हे तर स्वतंत्रपणें व मनाला पटेल अशा मराठी भाषेंत लिहिलेला ' केसरीं 'तला अग्रलेख वाचल्याशिवाय आपण पोटभर जेवलों आहोंत असेंहि वाटत नसे ! !

कांहीं वर्षांनीं लाहोरच्या ट्रिब्यून पत्राच्या एडिटरनीं थोडेंसें लिहिण्याचें काम मजकडे सोंपविलें व त्या वेळीं मला असें बजाविलें कीं, औद्योगिक, शैक्षणिक किंवा रासायनिक विषयांवर जें कांहीं आपण लिहाल त्याबद्दल जबाबदारी माझ्यावर आहे व तुरुंगांत मला जावें लागेल, आपणांस नाहीं. तेव्हां तर ' केसरीं 'तील लिहिण्याच्या शैलीचें मला जास्तच कौतुक वाटूं लागलें. ' जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ' त्या म्हणीचा अर्थ मला पटूं लागला. या लिहिण्याच्या कामीं मला ' केसरी 'ची अतिशय मदत होऊं लागली.

पुढें सन १९१७ सालीं मी जेव्हां जपानला गेलों, तेव्हां 'ट्रिब्यून 'व 'हिंदु' या दोन्ही इंग्रजी पत्रांस मी बातमीपत्रें पाठवीत होतों. त्या निमित्तानें जपानमधील पत्रें ( विशेषेंकरून 'जपान क्रॉनिकल 'सारखीं ) मला वाचावीं लागलीं. त्या वेळीं Censoring फार कडक होतें ! त्यामुळें लढाईची वगैरे बातमी ( त्या वेळीं लढाई जोरांत चालू होती ) फारच जपून पाठवावी लागे. अशा प्रसंगीं 'केसरी 'चें महत्त्व जास्तच वाटूं लागलें. निरनिराळ्या पत्रांच्या एडिटर लोकांना भेटून आमचीं इंग्रजी दैनिक पत्रें त्यांना दाखवूं लागलों; परंतु त्यांतील विचार इतके सर्वसाधारण व नेभळे असत कीं, ते पाहून त्या वेळचे Japan Chronicle चे एडिटर रॉबर्ट यंग मला म्हणाले, "Is this the sort of stuff you read in India? Don't you think that some of the ideas are absolutely old?" याला उत्तर मला देतां येईना. परंतु केसरींतील उच्च विचार व कल्पना मी त्यांना कसे समजविणार ? वादविवाद करितांना केसरीचा मला फारच उपयोग पडे. मला नेहमीं असें वाटे, केसरीचे विचार जर सर्व जगाला समजते तर त्याची कीर्ति (International) आंतरराष्ट्रीय झाली असती. परंतु भाषा मराठी असल्यामुळें व त्याचें खरें मार्मिक भाषांतर करणें अशक्य असल्यामुळें केसरीची खरी योग्यता फारच थोड्या लोकांना समजते. बरें, भाषा मराठी नसती तर, जी कामगिरी केसरीनें थोड्याच अवकाशांत महाराष्ट्रांत केली ती त्याच्या हातून कधींच घडली नसती. जपानमधला अनुभव पुनः मला जर्मनींत असतांना आला ! परदेशांत असतांना फॉरेन मेलकरितां आम्ही टपून असतों. कारण आठ दिवसांनीं एकदां टपाल यावयाचें. त्यांत केसरी एखादे वेळीं न आला तर आपल्य जिवलग नातलगाचें पत्र न आल्याइतकें वाईट वाटे. केसरी एकदां वाचला म्हणंजे आपली माहिती up-to-date झाली असें वाटे ! ! जगांतील प्रख्यात पत्रें मला वाचावयास मिळालीं आहेत, तीं सर्व पाहून मला असें वाटतें कीं, केसरीचा दर्जा इतका मोठा आहे कीं, त्याला आंतरराष्ट्रीय महत्त्वाचें वर्तमानपत्र असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं.

---

# गोमांतकांतील केसरीचें कार्य

[ श्री. यशवंत सूर्यराव सरदेसाई ]

केसरीला मी १९०३ सालापासून म्हणजे माझ्या वयाच्या अकराव्या वर्षापासून ओळखतों. पण मी येथें पोर्तुगीज शाळेंत असतां, आमचे एक नातेवाईक केसरी वाचीत असत व त्यामुळें मला त्याच्या वाचनाची सहज गोडी लागली. वयाच्या मानानें अर्थात् त्या वेळीं वर्तमानसार, स्फुटें वगैरेंच्या पलीकडे दृष्टि जात नसे. पण केसरी वाचून एक गोष्ट मात्र मनावर ठिंबून गेली आणि ती ही

कीं, हिंदुस्थान देश हा आमचा हक्काचा देश असून हे इंग्रज परकी आहेत, आमच्या घरांत हे दुसरे कोणी शिरून आम्हांला जाच देत आहेत, यांना बाहेर घालविल्याशिवाय आपला तरणोपाय नाहीं ! पोरपणांतील ही भावना, पण इंग्रजी हिंदुस्थानांतल्या वर्तमानपत्रांच्या वाचनाकडे विशेष लक्ष लागण्यास ती कारण झाली. राजद्रोहाच्या आरोपास पात्र होऊन कांहीं वर्षांपूर्वीं येथें येऊन राहिलेले बेळगांवचे डॉ. पुरुषोत्तम वामन शिरगांवकर यांची व माझी ओळख झाली. त्यांनीं ' हिंदु क्लब ' ही संस्था हातांत धरून व्याख्यानें वगैरे सुरू केलीं होतीं व त्या संस्थेमार्फत शिक्षणविषयक व प्रागतिक स्वरूपाचे असे स्वसमाजाच्या उन्नतीचे प्रयत्न करण्याविषयीं रा. शांबाराव सरदेसाई, कै. जिवाजीराव महात्मे, कै. सदाशिवराव सुखठणकर वगैरे गृहस्थ झटत असत. आम्ही सर्व, डॉ. शिरगांवकर यांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे, ' पोरें ' तिकडे जमत असूं. कोणी केसरीचे लेख वाचून दाखवी, कोणी निबंध आणि कोणी व्याख्यानें देई, असा धडाका कांहीं दिवस चालू होता. केसरी अमुक म्हणतो, केसरीनें तमुक लिहिलें आहे, केसरीचें मत असें आहे, असा ऊहापोह नेहमीं चालत असल्यावरून केसरी या नांवानें माझ्याच नव्हे तर पुष्कळ तरुणांच्या हृदयाची पकड घेऊन त्यांच्या दृष्टीसमोर एक सार्वजनिक कार्याच्या हौसेचें व कर्तव्याच्या निष्ठेचें ध्येय उभें केलें, असें म्हणण्यास बिलकुल प्रत्यवाय नाहीं. नंतर रुसो-जपानी युद्ध, बंगालची फाळणी, स्वदेशी, बहिष्कार, लोकमान्यांची चतुःसूत्री, सुरतेची कॉंग्रेस, मंडालेची यात्रा, अशा रीतीनें केसरीच्या कार्याला बहर येऊन त्याच्या लेखांनीं जनता भारून गेली, ती इतकी कीं, वाचनालयाच्या ऐवजीं टपालांत गर्दी होऊं लागली व केसरीचा अंक पाहून आज अमुक वार आहे, अशी आठवणहि होऊं लागली ! केसरीच्या वाचनाची इतकी गोडी लागली कीं, पणजी येथील बाप्परोब नांवाच्या दुकानदाराकडे रद्दी कागदांत असलेले केसरीचे मागील अंक विकत घेऊन आमच्या कित्येक मित्रांनीं वाचले. ती वेळ आठवली म्हणजे आज मौज वाटते. केसरी व मनोरंजन हीं ज्यांनीं वाचलीं नाहींत त्यांची गणना त्या वेळीं सुशिक्षितांत होत नव्हती !

गोमांतकांतील राजकारण पोर्तुगीजांच्या ताब्यांत असतां व आपल्या प्रांताचें सुखदुःख पोर्तुगालशीं निगडित असतां त्याची गोमांतकांत फारशी क्षिति नव्हती. त्यांना आपल्या दुःखाची स्मृति नव्हती. पण ब्रिटिश हिंदुस्थानकडे त्यांचें चित्त लागून राहिलें होतें. कर्झनसाहेबांचा त्यांना इतका राग येत होता कीं, त्या संतापांत जणूं काय गोमांतकीय राजवटींत भोगीत असलेलीं दुःखें त्यांना बाधतच नव्हतीं ! महाराष्ट्रांतच गोमांतक प्रांत असतां राजवटीच्या भिन्नतेमुळें त्याची ओळख बाहेरच्या कोणासहि पूर्वीं नव्हती. कोणी त्याला परराष्ट्र म्हणे, तर कोणी 'हिंदी संस्थानें' या सदराखालीं त्याची वर्गवारी लावी, कोणी त्याला 'महाराष्ट्रा'ची वसाहत म्हणे तर कोणी त्याच्या मागें बृहन्महाराष्ट्राची उपाधि लावी. पण पुढें मडगांव येथें व्याख्यानमाला

सुरू होऊन जसजसे महाराष्ट्रांतील अनेक पुढारी गोमांतकांत येऊं लागले, तसतशी गोमांतकाची ओळख इतर महाराष्ट्रीयांना होऊं लागली व याच गोमांतकपरिचयाची वाढ म्हणजे गोमांतकांत भरलेलें पंधरावें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन होय. मराठी भाषेचा अभिमान प्रतिकूल परिस्थितींत व राजद्रोह करून देखील गोमांतकानें प्रकट केला होताच, पण त्याबरोबर स्वदेश, स्वराज्य व जगांतील एकंदर परिस्थिति यांची जाणीव गोमांतकांतील मराठी वाचकांना करून देऊन त्यांच्यांत स्वत्व, स्वाभिमान व सार्वजनिक कार्यांची आवड प्रथमतः केसरीनें उत्पन्न केली, असें म्हटल्यास केसरीबद्दल आपण न्यायच केला असें होईल. हिंदूप्रमाणेंच ख्रिस्ती समाजहि गोव्यांत भरपूर आहे, इतकेंच नव्हे तर तो हिंदूंपेक्षां श्रीमंत, विद्वान्, वजनदार व मनांत आणलें तर कर्तबगार आहे. पण राष्ट्रकार्याला त्याची धडाडी व स्वार्थत्याग हिंदूंइतका नाहीं, किंबहुना शब्दाच्या 'होळ्या' नाचविण्यापलीकडे त्याची मजल जात नाहीं ! चाळीस वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांत चाललेलें क्लबांतील राजकारण व तोंडपाटिलकीची देशसेवा अजूनहि ख्रिस्ती लोकांत इकडे चालते. पण हिंदु समाज जागृत झाला असून त्याला शारीरिक कष्टांची, मानसिक तपाची व वाचिक जबाबदारीची कल्पना आहे. हा समाज यथाशक्ति व यथाविचार मार्ग चोखाळतो, याचें कारण त्याला देशसेवेची दीक्षा मराठी भाषेंतून मिळाली आहे. त्याच्या समोर महाराष्ट्रांतील त्यागी पुरुषांचीं उदाहरणें आहेत. हा आदर्श पुढें ठेवण्यांत गोमांतकांत केसरीनें आघाडी मारली आहे म्हणून केसरीचें महत्त्व इकडे मानण्यांत येतें.

हिंदुसमाजांत केसरीन मान्यता मिळविली यांत मोठेंसें नवल नाहीं. पण मराठी भाषा न समजणाऱ्या व महाराष्ट्रीय राजकारणाविषयीं कांहींसें उदास रहाणाऱ्या ख्रिस्ती लोकांतहि केसरीविषयीं आदर आहे. एखाद्या खेडेगांवांतील हिंदूच्या दुकानावर सुशिक्षित व अशिक्षित किरिस्तांव जमलेले आहेत व मध्यें दुकानदार अगर कोणी दुसरा हिंदु गृहस्थ केसरी वाचून त्यांतील अर्थ पोर्तुगीज अगर कोंकणी भाषेंत श्रोत्यांना सांगत आहे, असा देखावा मी पुष्कळ ठिकाणीं पाहिलेला आहे. केसरीचा वर्गणीदार असणें हें भूषण समजणारे सुशिक्षित गृहस्थ माझ्या परिचयाचे आहेत, इतकें केसरीनें मराठी वाचकांच्या हृदयावर निष्कंटक साम्राज्य गाजविलें, यांत शंका नाहीं. १९०८ सालीं तर केसरीच्या लोकप्रियतारूपी समुद्राला भरतीच्या माडां-एवढ्या लाटा उसळत होत्या व त्या वेळीं 'केसरी आणि टिळक' हीं अक्षरें बायका-मुलांपर्यंत पोहोंचलीं होतीं. पुढें कित्येक वर्षेंपर्यंत केसरी पाहिला म्हणजे स्त्रियादेखील 'ते टिळक आतां कुठें आहेत ? त्यांना सरकारनें सोडलें नाहींच ना ?' असें विचारीत असत ! या लोकप्रियतेच्या जोरावरच केसरीनें हातीं घेतलेलें कार्य यशस्वी करून दाखविलें.

गोमांतकांत केसरीशीं लोकांचें किती तादात्म्य होतें याचें प्रत्यंतर म्हणजे थट्टे-करितां देखील लोक केसरीचा उपयोग करीत हें होय. एखादा तरुण मराठी लेख लिहूं

लागला, व्याख्यानें देऊं लागला, वाचनमंदिरें अगर असल्याच दुसऱ्या संस्था स्थापन करण्याची खटपट करूं लागला म्हणजे त्याची संभावना ‘ तुम्ही काय टिळक होऊं पाहातां काय ? तें त्यांचें त्यांनाच शोभतें.’ या शब्दांनीं एका काळीं होत असे. वर्तमानपत्र, मग तें कोणतेंहि असो, हातांत असलें म्हणजे ‘हा काय केसरी ! काय म्हणतो केसरी ?’ इत्यादि प्रश्न व्हायचेच. कित्येक ठिकाणीं तर पूर्वी वर्तमानपत्रालाच केसरी हें नांव पडलें होतें. जसें कांहीं ‘ केसरी ’ याचा अर्थ वृत्तपत्राचा अंक ! कोणीहि जरा सार्वजनिक कार्याची धडधड करूं लागला म्हणजे तो लोकांच्या दृष्टीनें झालाच ‘ टिळक !’

केसरीचें महत्त्व ओळखून ख्रिस्ती लोकांकडून ‘ कितें सांगता तुमचो केसरी ?’, ‘ तिलकालें मत कसें ? ’ असे प्रश्न विचारण्यांत येत असत. पण त्याबरोबर कांहीं लोक केसरीच्या धोरणाला नाकें मुरणारे लोकहि होते. गोमांतकांतील हिंदु लोक केसरीच्या वाचनामुळें अराष्ट्रीय ( ! )—म्हणजे पोर्तुगीज राष्ट्राच्या दृष्टीनें— बनत चालले आहेत, त्याकरितां केसरीला या हद्दींत बंदी व्हावी म्हणून वर्तमान-पत्रांतून व कायदेकौन्सिलांतूनहि कांहीं ख्रिस्ती व लुसो-इंडियन लोकांनीं प्रयत्न चालविले होते. पण त्यांना यश आलें नाहीं. उलट १९०८ सालीं लोकमान्यांवर खटला चालू असतां गोमांतकांतील नेमस्त विचाराचे व हेरोल्ड या दैनिक पत्राचे संपादक डॉ. कुंज हे मुंबईस जाऊन स्वतः कोर्टांत हजर राहिले. तेव्हां त्यांना टिळक ही काय विभूति आहे याचें ज्ञान झालें व तेव्हांपासून ते टिळकांचे भक्त बनले.

वाचकांच्या मनावर केसरीनें ताबा चालविला त्याचप्रमाणें इतर व्यवसायबंधूंच्या समोर वर्तमानपत्राच्या स्वरूपासंबंधानें सुंदर व नीटनेटका आदर्श ठेविला हेंहि तितकेंच खरें आहे. मराठी भाषेच्या सौंदर्याबरोबर तिच्यांत विलक्षण जोम, चित्ताकर्षकता व कार्यप्रवीणता उत्पन्न केली, तशीच वृत्तपत्राच्या संस्थेलाहि योग्य उदाहरण घालून दिलें. भाषेचें वळण, विषयांची निवड, छपाईची काळजी, मज-कुराची वर्गवारी, अर्थसूचक मथळे, मनोवेधक माहिती या सगळ्या प्रकारांतून आंखलेल्या धोरणाचा व दृष्टीसमोरच्या ध्येयाचा सरळ काढलेला धागा या गुणांनीं केसरीनं पहिलें स्थान पटकाविलें हें उघड आहे.

राष्ट्रीय भावनेचें बीजारोपण करण्यांत गोमांतकांत केसरीपत्रानें सुरुवात केली. अर्थात् या महोत्सवप्रसंगीं अत्यंत आदरभावानें, हें त्याचें श्रेय त्याच्या पदरांत टाकणें हें माझें एक कर्तव्यकर्म बजावतों हें उघड आहे. भावनेच्या दृष्टीनें गोमां-तकाचा केसरीशीं असलेला संबंध आतां प्रत्यक्ष परिचयानें वाढीस लागला असून केसरीपत्राप्रमाणें त्याच्या संपादकांचाहि गोमांतकांत जाण्याचा परिपाठ पडलेला आहे. गोमांतकाबद्दलचे गैरसमज आतां हळू हळू नाहींसे होत असून इतर महाराष्ट्रीयांना त्याची ओळख अधिकाधिक पटवून देणें हें अनेक वर्षांच्या ऋणानु-बंधामुळें केसरीचें कार्य आहे, अशी इच्छा केल्यास ती वावगी म्हणतां येणार

नाहीं. गोमांतकीय विषयांवर स्फुटें, वातमीपत्रें, प्रसिद्ध करून गेल्या आठ वर्षांपासून देशभक्त न. चिं. केळकर यांनीं केसरीला गोमांतकाचा अगत्यवाद आहे हें सिद्ध केलें असून तीच परंपरा पुढें चालेल असा भरंवसा आहे. असो. केसरीसंस्थेचें महत्त्व थोडक्यांत सांगणें शक्य नाहीं. अर्थात् लेखाची मर्यादा मनांत आणून लेखणी थांबविणें बरें ! केसरीरूपी ' सुनीति ' मातेच्या उदरांत जन्म घेतलेल्या हिंदुस्थानच्या असंतोषरूपी ध्रुवानें ' सुरुची ' या सापत्न मातेच्या छळास कंटाळून स्वराज्याचें अढळ पद मिळविण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें तो मार्ग निश्चयानें चोखाळीत आहे.

---

# देशी वृत्तपत्रांवरील राजद्रोहाचे खटले

[ श्री. द. गो. फडके, बी. ए., एल्एल्. बी. ]

"......प्रमुख न्यायाधिशाकडून प्रचलित कायद्याचाच निराळा अर्थ करून
" कायद्यांत फेरफार होतो, तेव्हां ' फेरफार करणाऱ्या जज्जापुढें जो खटला असतो,
" त्यासच तो पहिल्यानें लागू होऊन निदान एक तरी कायद्याचा बळी अशा वेळीं
" न्यायदेवतेस द्यावा लागत असतो. '...... " —केसरी, ४ जुलै, १८९९.

गेल्या ५० वर्षांत देशी वर्तमानपत्रांवर राजद्रोहाबद्दल जे खटले झाले, त्यांची संगतवार यादी केसरीच्या फायलींच्या आधारें करून खालीं दिली आहे. ती सर्वसंपूर्ण असणें शक्य नाहीं. परंतु, गतकालांत राजद्रोहाचा अर्थ किती संकुचित दृष्टीनें केला जात असे आणि भारतीय मुद्रणस्वातंत्र्यार्थ झगडणारांचे ब्रिटिश न्यायदेवतेनें किती बळी घेतले याची साधारण कल्पना येण्यास ही यादी पुरेशी होईल. आज आपणांस मुद्रणाच्या ज्या थोड्या फार सवलती आहेत, त्या बळी गेलेल्या वीरांच्या कडक तपश्चर्येमुळेंच मिळाल्या आहेत यांत शंका नाहीं. मात्र अशा संपादक-मुद्रक-प्रकाशकांची ही तपश्चर्या कोठल्याहि शुद्ध निसर्गसुंदर तपोवनांत चालली नसून अमानुष व्यवस्था असलेल्या परम न्यायी ब्रिटिश राज्यसत्तेखालच्या तुरुंगांतच होत असे ! अशी तपश्चर्या कोठेंहि केली तरी फलद्रूप झाल्याविना रहावयाची नाहीं. आज असणारें तुटपुंजें मुद्रणस्वातंत्र्य मिळविण्यासाठीं ज्यांनीं अनन्वित देहदंड सोसले, खरोखर चंदनाप्रमाणें ज्यांना स्वशरीर कारागृहाच्या दगडी भिंतीवर झिजवावें लागलें आणि भावी पिढीचा मार्ग सुखकर व्हावा म्हणूनच ज्यांनीं यावच्छक्य प्रयत्न केले अशा पुण्यपुरुषांचे आपण किती ऋणी आहोंत ही भावना जागृत होण्यास ही नांवनिशी उपयोगी पडेल.

देशी वर्तमानपत्रांवर जे राजद्रोहाचे खटले झाले त्यांत कलकत्त्याच्या 'वंगवासी' पत्रावर झालेला खटला पहिला होय. सन १८९७ सालीं केसरी पत्रावर झालेला खटला दुसरा होय.

इ. स. १८९१ ते १८९७

१४ सप्टेंबर, १८९७, रोजीं केसरीचे संपादक लो. बा. गं. टिळक यांना १८ महिने सक्त मजुरीची शिक्षा झाली. या खटल्यांत 'डिसअफेक्शन' या शब्दाचा अर्थ न्या. स्ट्रॅची यांनीं प्रीतीचा अभाव असा केला ! ( टिळकचरित्र, पूर्वार्ध, पृ. ५७३ ).

'गुराखी' नांवाच्या मुंबईच्या वर्तमानपत्रावर १८९९ सालीं राजद्रोहाचा खटला झाला. त्याचे संपादक श्री. विनायक नारायण भाटे हे होते. २६, ३०, ३१ मार्च, १८९९, च्या

इ. स. १८९९

गुराखीच्या अंकांत 'राजा व राज्य,' 'चाफेकर, द्रवीड-बंधू व मि. ब्रुइन' ह्या मथळ्यांखालीं लिहिलेले लेख राजद्रोही होते, त्याबद्दल खटला झाला. सदर लेख उपसंपादक श्री. ल. ना. जोशी यांनीं लिहिले होते. त्यांचें नांव रा. भाटे यांनीं कोर्टास कळविलें. रा. जोशी यांनीं लेख लिहिल्याचें कबूल केलें. त्यांस सहा महिने सक्त मजुरीची शिक्षा झाली. संपादक गांवीं नसतां दुसऱ्यानें लिहिलेल्या लेखांबद्दल नापसंती प्रसिद्ध केली असतां लेखकापेक्षां संपादकास जास्त शिक्षा व्हावी हा जुलूम आहे. मुंबईच्या 'टाइम्स'कारानें चाफेकरांसंबंधीं माहिती प्रसिद्ध करितांना झालेल्या चुकीबद्दल दिलगिरी प्रसिद्ध केली होती, तेव्हां त्यास कांहीं झालें नाहीं.

मुंबईच्या 'रास्त गोफ्तार' पत्रावर कलकत्त्याच्या 'चँपिअन' पत्रानें खटला केला. कारण 'गुराखी'मधील लेख 'चँपियन'मधील लेख वाचून लिहिले असें श्री. जोशी यांनीं सांगितलें, असें 'रास्त गोफ्तार' यानें लिहिलें होतें. त्याबद्दल सदर पत्राचे संपादकास एक हजार रुपये दंड झाला.

काशी येथील 'कालिदास' पत्राचे संपादक श्री. कृष्णाजी आबाजी गुरुजी, त्यांचे चिरंजीव वामन कृष्ण गुरुजी व मॅनेजर श्री. स. ग. लवाटे यांजवर सदर पत्रांत 'काळा व गोरा' व 'धर्माचें

इ. स. १९००

राक्षसी ढोंग' हे लेख लिहिल्याबद्दल इं. पी. कोडाच्या १५३ अ प्रमाणें ता. १७-१०-०० रोजीं खटला होऊन रा. गुरुजी यांस पांच हजारांचे दोन जामिन, तीन हजारांचा जातमुचलका अगर एक वर्ष साधी कैद व मुलांस पांचशेंचे दोन जामीन व एक हजाराचा जातमुचलका, याप्रमाणें शिक्षा झाल्या. सदर गृहस्थांना पर-प्रांतांत मोठा जामीन मिळणें शक्य नव्हतें. त्यामुळें कैद भोगावी लागली. रा. लवाटे यांस सोडून देण्यांत आलें. क्रि. प्रो. कोडाच्या कलम १०८ प्रमाणें जामीन केवढा घ्यावा यास निर्बंध नाहीं ! ( ३०-१०-०० )

पुण्याच्या 'भाला' पत्राचे संपादक श्री. भास्कर बलवंत भोपटकर यांजवर ता. ११-१०-०५ चे अंकांत 'नरकाचा दरबार' हा लेख लिहिल्याबद्दल ता. १५-१२-०५ रोजीं राज-

इ. स. १९०५-०६

द्रोहाचा खटला झाला व फेब्रुवारी १९०६ मध्यें सहा महिने कैद व एक हजार रुपये दंड अशी शिक्षा झाली. खटला मुंबईस हायकोर्टांत चालला.

लाहोरच्या ' पंजाबी ' पत्राचे संपादक रा. आठवले व मालक लाला जसवंतराय यांजवर सदर पत्रांत ' गोऱ्या अंमलदारानें काळ्याचा खून केला, ' अशी बातमी प्रसिद्ध केली म्हणून इं. पी. कोडाच्या १२४ अ व १५३ अ या कलमांखालीं फेब्रुवारी १९०६ मध्यें खटला होऊन रा. आठवले यांस सहा महिने सक्त मजुरी व रु. २०० दंड व मालक लाला जसवंतराय यांस २ वर्षें सक्त मजुरी व १००० रु. दंड अशी शिक्षा मि. मॉंट यांनीं दिली. शब्दाची ओढाताण करून बेअब्रूचा गुन्हा समाजद्वेषांत व समाजद्वेषाचा राजद्रोहांत ढकलून दंडाऐवजीं जबर शिक्षा देणें म्हणजे लोकांचा विनाकारण छळ करणें आहे. सदर निकालावर अपील होऊन हायकोर्टानें त्यांची शिक्षा सहा महिने साधी कैद अशी केली. हायकोर्टाच्या या निकालावर कलकत्त्याच्या ' इंग्लिशमन ' पत्रानें अशी टीका केली कीं, आणखी दोन तीन कोर्टें असतीं तर शिक्षा अजिबात नाहींशी होऊन संपादकास जहागीर मिळाली असती ! अगदीं बरोबर ! विलायतचें प्रिव्ही कौन्सिल, लोकमत व परमेश्वर हीं तीं तीन कोर्टें व शेवटच्या कोर्टांत खरोखर जहागीर मिळाली असती.

इ. स. १९०७

कलकत्ता येथील ' युगांतर ' पत्राचे संपादक भूपेंद्रबाबू यांजवर जुलै १९०७ मध्यें राजद्रोहाचा खटला होऊन एक वर्ष सक्त मजुरीची शिक्षा झाली, व ज्या ' साधन ' छापखान्यांत युगांतर पत्र छापलें जात असे, त्याचें ॲक्टाप्रमाणें डिक्लेरेशन केलें नसल्यामुळें तो जप्त करण्यांत आला. त्याच महिन्यांत लाहोरच्या ' इंडिया ' पत्राचा छापखाना जप्त करण्यांत आला. सदर हुकूम क्रि. प्रो. कोडाच्या कलम ५१७ प्रमाणें करण्यांत आले. या कलमान्वयें चोरीच्या खटल्यांत सांपडलेला माल निकालानंतर मालकांस परत देण्यांत येतो. राजद्रोहाच्या खटल्याला सदर कलम लागू करणें गैरशिस्त आहे.

यवतमाळ येथील ' हरिकिशोर ' पत्राचे संपादक रा. पृथ्वीगीर हरिगीर यांजवर ता. २४-८-०७ रोजीं राजद्रोहाचा खटला होऊन, ' लाला लजपतराय हद्दपार झाले, ' ' पुढें काय ? ' व ' नवीन पंथ व निःशस्त्र प्रतिकार ' हे लेख लिहिल्याबद्दल ता. १२-११-०७ रोजीं दोन वर्षें सक्त मजुरी व एक हजार रुपये दंड अशी शिक्षा झाली.

इ. स. १९०८

या वेळचा महत्त्वाचा राजद्रोहाचा खटला म्हटला म्हणजे लो. बाळ गंगाधर टिळक यांच्यावर ' केसरी ' पत्राच्या १२ मे व जूनच्या अंकांत ' देशाचें दुर्दैव ' व ' हे उपाय टिकाऊ नाहींत ' हे राजद्रोही लेख लिहिल्याबद्दल झालेला होय. या खटल्यांत लो. टिळक यांस २२ जुलै, १९०८, रोजीं सहा वर्षें काळे पाण्याची शिक्षा झाली. या खटल्यांत बरेच

वादग्रस्त मुद्दे पुढें आले व कायद्याच्या अधिकाराचा बराच दुरुपयोग करण्यांत आला. जामिनावर आरोपीस सोडणें, खटला भलत्याच कोर्टापुढें करणें, नको ती ज्यूरी गळ्यांत बांधणें, लेखांचीं भाषांतरें चुकीचीं करणें व अयोग्य अशी शिक्षा देणें हे ते मुद्दे होत.

पुण्याच्या ' काळ ' पत्राचे संपादक प्रो. शिवराम महादेव परांजपे यांजवर ता. १५-५-०८ च्या अंकांत राजद्रोही लेख लिहिल्याबद्दल इं. पी. कोडाच्या १२४ अ कलमाखालीं खटला होऊन १९ महिने स. म. शिक्षा झाली. बंगाल्यांतील मुजफरपूरच्या बाँबच्या खटल्यांतील आरोपी पकडल्याबद्दल नेटिव्ह अंमलदारांस खटला होण्यापूर्वी बक्षिसें वांटण्यांत आलीं त्याबद्दल हा लेख होता.

याच वेळेस मुंबईच्या ' हिंद स्वराज्य ' या गुजराथी व ' विहारी ' व ' अरुणोदय ' या मराठी वृत्तपत्रांवर राजद्रोहाचे खटले झाले. विहारीचे रा. मंडलीक यांस ' प्रबोधन ' या कवितेबद्दल २ वर्षे सक्त मजुरी व अरुणोदयचे रा. फडके यांस १४ महिने सक्त मजुरी अशा शिक्षा झाल्या.

इस्लामपूरच्या ' प्रतोद ' पत्राचे संपादकांस राजद्रोहाबद्दल जून १९०८ मध्यें काळे पाण्याची शिक्षा झाली. याप्रमाणें मुंबई इलाख्यांत शिक्षांचें सत्र सुरू झालें, तेव्हां त्यासंबंधीं लिहितांना केसरीनें असे उद्गार काढले कीं, ' मुजफरपुरास बाँब उडाला त्याचा धक्का मुंबईच्या सेक्रेटेरिएटला बसावा हें फाजील नाजुकपणाचें लक्षण होय. ' ( २६-५-०८ ).

सन १९०८ मध्यें ' स्वराज्य ' नांव असलेल्या प्रत्येक पत्रावर सरकारची करडी नजर असल्याचें दिसून येतें. हिंदी स्वराज्य, मराठी स्वराज्य, ऊर्दू स्वराज्य व तेलगू स्वराज्य या पत्रांवर राजद्रोहाचे खटले करण्यांत आले.

ऑगस्ट १९०८ मध्यें यवतमाळच्या ' हरिकिशोर ' पत्रावर दुसरा राजद्रोहाचा खटला झाला. ' वर्तमान राजनीति ' या मथळ्याखालीं कलकत्त्याच्या ' इंग्लिशमन् ' पत्रांतील एका उताऱ्याचें भाषांतर दिल्याबद्दल संपादक श्री. नरहर विठ्ठल भावे यांस ५ वर्षे सक्त मजुरीची शिक्षा होऊन छापखाना जप्त करण्यांत आला.

अलिगडच्या ' ऊर्दू-इ-मौला ' पत्रावर याच महिन्यांत खटला होऊन संपादक फाजल हसन यांस २ वर्षे सक्त मजुरी व ५०० रु. दंड झाला. ज्या लेखावरून सदर शिक्षा झाली तो लेख पतियाळा संस्थानांतील एका बड्या अंमलदाराच्या मुलानें लिहिला होता व त्यांत इजिप्तमधील इंग्रजी शिक्षणाच्या धोरणावर टीका होती. राजद्रोहाबद्दलच वर्तमानपत्रकर्त्यांवर खटला होत नसून तो सरकारच्या लहरीप्रमाणें होतो असें म्हणणें भाग आहे. कारण एका इटालियन देशभक्ताचे विचार प्रसिद्ध केल्याबद्दल मुंबईचा ' विहारी ', आठवड्यांतील बातमी छापल्याबद्दल यवतमाळचा 'हरिकिशोर' व परदेशांतील कारस्थानाबद्दल अलिगडचा 'उर्दू-इ-मौला' या वर्तमानपत्रकारांना शिक्षा झाल्या.

वर उल्लेख केलेल्या जबर शिक्षा कोणीकडे व यापेक्षां भयंकर अपराधाबद्दल कोरिया देशांतील अतिसौम्य शिक्षा कोणीकडे! रूसो-जपानी लढाईनंतर कोरिया देश जपानी सत्तेखालीं गेला; तेव्हां कोरियामध्यें रहावयास गेलेल्या मि. अर्नेस्ट थॉमस बेथेल नांवाच्या इंग्रज गृहस्थानें कोरियन भाषेंत एक वर्तमानपत्र काढलें व त्यांत पुढील मजकूर लिहिलाः—' जपानी लोकांच्या सत्तेस मदत करणाऱ्या स्टीव्हन्सन्-साहेबाचा खून करणारे लोक खरे देशभक्त, राष्ट्रभक्त व नीतिमान समजले पाहिजेत.' जपानी राज्यपद्धतीची इटलींतील जुलुमी राज्यपद्धतीशीं तुलना एका लेखांत केली होती व एकांत तर असें लिहिलें होतें कीं, ' रक्तपातावांचून महापुरुषास महत्कृत्यें करितां येत नाहींत, व याच मार्गानें आम्ही आपला देश ( कोरिया ) स्वतंत्र करणार.' ( ४-८-०८ ). या प्रकारच्या लेखाबद्दल सदर बेथेलसाहेबांस राजद्रोहाच्या अपराधावरून न्यायाधिशानें फक्त तीन आठवडे साधी कैद व सहा महिनेपर्यंत चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन अशी शिक्षा दिली व त्यांना खास सवलतीचे कैदी म्हणून कोणत्याहि तुरुंगांत सोय नसल्यामुळें एका जहाजावर तीन आठवडे ठेवण्यांत आलें. मुद्रणस्वातंत्र्याच्या व न्यायदानाच्या बाबतींत केवढा हा फरक!

ऑगस्ट सन १९०८ मध्यें खटल्याचें सत्र मुंबई इलाख्याप्रमाणें मद्रासकडेहि सुरू झालें. चिदंबर पिल्ले यांस जन्मठेप काळे पाण्याची व सुब्रह्मण्याशिव यांस ७ वर्षें काळे पाण्याची शिक्षा झाली. तिनवल्लीच्या दंग्याबाबत मि. गुरुनाथ अय्यर यांस ७ वर्षें सक्त मजुरी व दोन हजार रुपये दंड व लोकनाथ अय्यर यांस ५ वर्षें सक्त मजुरीची शिक्षा झाली. सदर अय्यर हे हायकोर्ट वकील होते. यांपेक्षां जास्त खुनशीपणाचें उदाहरण म्हणजे ' स्वदेशमित्रम् ' नांवाच्या तामिल दैनिकाचे संपादक मि. जी. सुब्रह्मण्य अय्यर यांजवरील राजद्रोहाचा खटला हें होय. हे गृहस्थ मद्रासच्या ' हिंदु ' पत्राचे प्रवर्तक होते. ते वेळी कमिशनपुढें साक्ष देण्याकरितां इंग्लंडमध्यें व कर्झनच्या दिल्लीदरबारास आमंत्रित पाहुणे म्हणून गेले होते. खटल्याचे वेळीं त्यांचें वय ५५ वर्षांचें होतें व रक्तकुष्ट व काळजाचा रोग अशा व्याधींनीं पीडित असतांहि त्यांचेवर 'स्वदेशमित्रम्' मध्यें एकंदर नऊ राजद्रोही लेख लिहिल्या-बद्दल खटला करण्यांत आला.

या सालांतील शेवटचा खटला म्हणजे नागपूरच्या ' देशसेवक ' पत्राचे संपादक श्री. अच्युत बलवंत कोल्हटकर यांचेवरील होय. त्यांनीं बाबू अरविंद घोष यांचीं भाषणें पुस्तकरूपानें छापलीं असा त्यांचेवर आरोप होता. पुस्तक छापलें त्या वेळीं ते छापखान्याचे मालक नव्हते. पुस्तकाच्या विक्रीचे पैसे त्यांनीं घेतले नाहींत. पुस्तक छापण्यास त्यांनीं सांगितलें नाहीं! तें छापलें तेव्हां ते नागपुरास नव्हते. इतके मुद्दे कोर्टापुढें आले असतां त्यांस २॥ वर्षें सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत आली. मुंबईच्या ' गुराखी ' पत्राचे संपादक रा. भाटे यांस सन १८९९ मध्यें जशी शिक्षा झाली त्यांतलाच हा प्रकार होय.

सन १९०९ मध्यें वृत्तपत्रांवरील राजद्रोहाच्या खटल्यांस कोल्हापूर संस्थानांत सुरुवात झाली. 'विश्ववृत्तां 'तील 'वैदिक प्रार्थनांची तेजस्विता ' या लेखाबद्दल प्रो. अण्णासाहेब विजापूरकर, तळेगांवच्या समर्थ विद्यालयाचे चालक, श्री. वामनराव जोशी, संपादक, विश्ववृत्त, व श्री. जोशीराव, मुद्रक, यांचेवर इं. पी. कोडाचें १२४ अ व खुनाला मदत केल्याचा आरोप यांबद्दल खटला होऊन स्पेशल सेशन्स जज्ज मि. किंकेड यांनीं आरोपींस अनुक्रमें ३ वर्षे साधी, ३ वर्षे सक्त मजुरी व १॥ वर्ष अशा शिक्षा दिल्या.

इ. स. १९०९

सदर लेखांतील आक्षिप्त वाक्य येणेंप्रमाणें—'जे क्षत्रिय शत्रूच्या सैन्याचा व दुनियेंतील गुलामगिरीचा वींमोड करीत नाहींत, त्यांच्या छत्रपतित्वाचा व समशेरबहाद्दरत्वाचा त्यांच्या राष्ट्राला काय उपयोग ?' ( १२-१-०९). आततायी लोकांना क्षत्रियांनीं व राजांनीं मारिलें पाहिजे, असें सांगणारा खुनास मदत करतो हा अर्थ कोठला ? वैदिक वाङ्मयांत कोल्हापूरचे छत्रपति व बडोद्याचे समशेरबहाद्दर कशाला आले ? सदर लेख एका आर्यसमाजी पंडितांनीं लिहिलेला होता. त्यांच्याशीं प्रो. विजापूरकर यांचा कांहीं संबंध नव्हता. ते कोल्हापुरासहि नव्हते. कोल्हापुरास सन १८६० सालचें पीनल कोड सन १८८८ सालीं लागू केलें. त्यांत १२४ अ कलमहि नव्हतें. खुनाला मदत केल्याच्या आरोपास विशिष्ट व्यक्तीचा खून जरुर असतो.

या सालांतील दुसरा खटला पुण्याच्या 'काळ' पत्रावरील होय. काळ पत्रावरहि हा दुसरा खटला होता. सदर पत्राचे संपादक श्री. पुरुषोत्तम बापूजी खरे—ना. दाजीसाहेब खरे यांचे पुतणे—यांनीं ता. १८-१२-०८ च्या अंकांत 'बुडत्याचा पाय खोलांत' हा लेख लिहिल्याबद्दल हा खटला होता. खटल्यांत 'दिवाळी कसली करतां ?' व 'ह्या देणग्या नाहींत, ही लुच्चेगिरी आहे,' हेहि लेख दाखल करण्यांत आले होते. सदर लेखांत राज्यपद्धतीवर टीका होती. 'राज्यपद्धति सहानुभूतिशून्य व दडपशाहीची असल्यामुळें शास्त्यांस व शासितांस सारखीच अपायकारक आहे,' असें त्यांत म्हटलें होतें. ( २-२-०९ ).

याच वेळेस 'तेलगू स्वराज्य' पत्रावर खटला करण्यांत आला.

नागपूरच्या 'देशसेवक' पत्राचे संपादक श्री. गोपाळ अनंत ओगले यांचेवर ता. १८-१०९ च्या अंकांत राजद्रोही लेख लिहिल्याबद्दल खटला करण्यांत आला. सदर लेख पूर्वीचे संपादक रा. कोल्हटकर यांचेवरील खटल्यासंबंधीं होता. आक्षिप्त मजकूर असा होता. 'जितके राजद्रोहाचे खटले झाले, त्यांत आरोपींना शिक्षाच झाल्या. राजद्रोहाचे खटल्यांत सरकारी नोकर न्यायाधीश नसावे, त्रयस्थ असावे, म्हणजे योग्य न्याय मिळेल.' दुसरा लेख नागपूरचे महाराजबागेंतील राणीच्या पुतळ्यासंबंधीं झालेल्या खटल्याबाबत होता. या खटल्यांतील मौजेचा प्रकार असा कीं, खटल्यास सरकारची मंजुरी लागते ती ट्रान्स्लेटरनीं, मजकूर राजद्रोही आहे असा रिपोर्ट

केल्यावर देण्यांत येते. परंतु 'ज्या लेखावरून खटला झाला तो लेख राजद्रोही व अब्रू-नुकसानकारक आहे असें म्हणण्याचा मला हुकूम आहे. मी रिपोर्ट केला नाहीं,' असें ओ. ट्रा. अबदुल अझीझ यांनीं खटल्याचे वेळीं सांगितलें.

मुंबईच्या वर्तमानएजन्सीचे मॅनेजर रा. गणेश बळवंत मोडक, बी. ए., यांनीं श्रीयुत बिपिनचंद्र पाल यांचें विलायतेंत निघणारें पाक्षिक 'स्वराज्य' यांत राजद्रोहाचे लेख असतां प्रसिद्ध केल्याच्या व विकल्याच्या आरोपांवरून खटला होऊन ऑगस्ट १९०९ मध्यें एक महिना साध्या कैदेची शिक्षा झाली. सदर खटल्यांत बरेच महत्त्वाचे प्रश्न निघाले होते. सदर अंक थॉमस कुक अँड सन्स यांचे मार्फत येत असत व कस्टम कलेक्टरकडून तपासल्यानंतर देण्यांत येत असत. सदर खटल्यांत कस्टम कलेक्टरची वॅ. बॅप्टिस्टा यांनीं उलटतपासणी केली. तेव्हां सदर अंक आमचेकडे दोन आठवडे पडून होते व आरोपीस कांहीं एक इशारत न देतां अंक त्याचेकडे पाठविले असें त्यांनीं सांगितलें. लेख राजद्रोही आहे काय ? लेखकाचा तसा हेतु आहे काय ? व विकणाराचा तसा हेतु आहे काय ? असे मुद्दे निघाले. आक्षेपित लेखाचें प्रत्यक्ष ज्ञान असल्यावांचून एजंट दोषी होऊं शकत नाहीं. इंग्लंडमधील 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज्' च्या सप्टेंबर १९०९ च्या अंकांत 'स्वराज्या'वरील खटल्यासंबंधीं मि. स्टेड म्हणतात, 'सदर लेख जर बिपिन पाल यांनीं प्रसिद्ध केला नसता, तर १००० पौंड फी देऊन असला लेख लिहविणें स्टेट सेक्रेटरीचें काम झालें असतें, इतक्या चांगल्या रीतीनें बॉंबची मीमांसा सदर लेखांत केली आहे.' ( २-११-०९ ). ज्यांच्या कारकीर्दीत हा खटला झाला त्याच लॉर्ड मोर्ले यांनीं 'आयर्लंडांतील गुन्ह्यांची मीमांसा' हा लेख 'पॉलमॉल गॅझेट'मध्यें लिहिला होता.

नागपूरच्या 'देशसेवक' पत्राचे माजी संपादक रा. शंभुराव गाडगीळ, बी. ए., एल्. एल्. बी., यांनीं 'पदव्यांचा पोकळपणा' हा लेख लिहिल्याबद्दल राजद्रोहाचा खटला होऊन १००० रु. दंड झाला. नाइटहुड = सरकी, राजनिष्ठ = राजभक्त, पदव्यांची खैरात = भीक असे शब्द त्यांनीं वापरले होते. ( २१-९-०९ ).

सालअखेर दिल्लीच्या 'जश' नांवाच्या साप्ताहिकाचे संपादक मि. मनेशीलाल यांचेवर राजद्रोहाचा खटला झाला व लाहोर येथें सरदार अजितसिंह यांचेवर खटला झाला.

इ. स. १९१०

सन १९१० पर्यंत सिंधप्रांतांत राजद्रोहाच्या खटल्याचा संपर्क नव्हता. परंतु फेब्रुवारीमध्यें मि. विरूमल वगैरे तीन गृहस्थांवर 'स्वदेशी चळवळ' या विषयावर लेख लिहिल्याबद्दल खटला होऊन काळे पाण्याची व दंडाची अशा शिक्षा झाल्या. शिक्षा देतांना सेशन जज्ज मि. वॉर्ड यांनीं आपले विक्षिप्त व वेडगळ विचार प्रदर्शित केले. 'राजद्रोह हा खुनापेक्षां भयंकर गुन्हा असून राजद्रोही मनुष्यास खुनी मनुष्याचे आधीं फांसावर चढविलें पाहिजे !' ( १-२-१० ).

एप्रिल महिन्यांत खानदेशांत श्रीसच्चिदानंदस्वामी ( पूर्वाश्रमींचे केशवशास्त्री दामले ) यांचेवर भगवद्गीतेंतील 'तस्मात् सर्वेषु कालेषु माननुस्मर युध्य च ' हा श्लोक घेऊन त्यावर श्लोकबद्ध व सार्थ टीका लिहिल्याबद्दल, आणि मुद्रक व प्रकाशक श्री. शंकर श्रीकृष्ण देव, बी. ए., एल्‌एल्. बी., यांचेवर खटला करण्यांत आला व स्वामींस एक वर्ष साधी कैद व श्री. देव यांस २ महिने साधी कैद व २०० रु. दंड अशा शिक्षा देण्यांत आल्या. आक्षेपित वाक्य असें:–' अहिंसा प्रत्येकाचें कर्तव्य असलें तरी, लोक आपल्याशीं जसें वागतील तसें आपण वागावें व शांततेचे सर्व उपाय हरतील, तेव्हां कडक उपाय योजावे. कृतयुग नाहीं. सैतानाचे पुत्र मुमुक्षूंस अडथळा करितात. मोक्ष, Salvation, liberation, freedom, independence मिळाल्याखेरीज इहलोकीं वा परलोकीं खरें सुख नाहीं !' निकालांत जज्जांनीं असें म्हटलें कीं, ' रा. दामले यांचे पुस्तकांत अध्यात्मिक प्रतिपादन केलें असलें तरी मुख्य श्लोक व शब्द हल्लींच्या परिस्थितींत भलते ग्रह उत्पन्न करणारे आहेत व तें पुस्तक इ. स. १९०८ सालीं प्रसिद्ध केलें ही चूक झाली. ' ( २४-५-१० ).

सालअखेर कलकत्त्याच्या ' कर्मयोगिन् ' नामक इंग्रजी पत्रावर बाबू अरविंद घोष यांच्या ' माझ्या देशबांधवांस ' या लेखाबद्दल खटला झाला. बाबू अरविंद घोष पाँदेचरीस गेले होते म्हणून ते सुटले व मुद्रक बाबू मनमोहन घोष यांस सहा महिने सक्त मजुरीची शिक्षा झाली. त्या निकालावर अपील होऊन न्या. मू. मि. होमवुड व मि. फ्लेचर यांनीं आरोपीस दोषमुक्त करून सोडून दिलें. हा निकाल विशेष महत्त्वाचा झाला व ज्या प्रकारची भाषा वापरल्याबद्दल पूर्वीचीं दोन तीन वर्षे खटले होऊन कडक शिक्षा होत होत्या ती भाषा कलकत्ता हायकोर्टानें कायदेशीर ठरविली. मोर्लेमिंटोसुधारणा फोल आहेत, हा लेखाचा प्रतिपाद्य विषय होता.

इ. स. १९११

सन १९११ मध्यें राजद्रोहाचे खटले झाले नाहींत. कारण त्या सालीं बादशहा पंचम जॉर्ज हिंदुस्थानांत आले. नाहीं म्हणावयास कोल्हापुराकडे मात्र खटले झाले. रा. ग. ब. मोडक व श्री. श्रीपाद दत्तात्रय नागपूरकर यांचेवर पोलिटिकल एजंट कर्नल फेरिस, व दिवाण रा. सबनीस व डि. मॅ. रा. जाधव यांचे खुनाचा प्रयत्न केल्याच्या आरोपावरून खटला करण्यांत आला.

देशी वर्तमानपत्रांवर असे भरमसाट खटले भरण्यांत आले, तरी इंग्रजी वर्तमानपत्रांना वाटेल तें, वाटेल तेव्हां बहकण्यास पूर्ण मुभा होती, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. हिंदुस्थानची राजधानी कलकत्त्याहून दिल्लीस आणली त्यामुळें इंग्रज वर्तमानपत्रकर्त्यांचीं माथीं फिरून गेलीं. कलकत्त्याच्या ' स्टेटसमन् ' पत्रानें तर असें लिहिलें कीं, ' या सर्व प्रकरणांत हिंदुस्थानांतील लोकांना फसविण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें बादशहांना आंत खेचलें हें दिसून येतें. ' ( २६-१२-११ ). ' राजधानी बदलण्याचें हें कृत्य बेजबाबदारपणाचें, हलकटपणाचें आहे, हा अमर्याद व विलक्षण मूर्खपणा आहे. ' ' इंग्लिशमन् ' पत्रानें लिहिलें, ' वंगभंग रद्द

करून व रशिया इराणांत जें कांहीं करीत आहे, तें त्यास करूं देऊन, सरकार मुसलमानांची राजनिष्ठा फारच ताणीत आहे. ' ' देणग्यांचीं बक्षिसें देण्याचे ऐवजीं आम्हांला बाँब देण्यांत आले आहेत आणि या दोन आश्चर्यांनें थक्क करून सोडणाऱ्या गोष्टी जाहीर करण्याचे कामांत राजेसाहेबांस नेऊन घातलें हें लॉर्ड हार्डिंज व त्यांची चौकडी यांनीं नीचपणाचें कृत्य केलें. ' ( २६-१२-११ ).

इ. स. १९१३

सन १९१३ त नडियाद येथील फूलचंद बापूजी शहा यांजवर प्रेस ॲक्टाखालीं खटला करण्यांत येऊन ५ रु. दंड करण्यांत आला. त्यांचेकडून ॲक्टान्वयें तीन हजारांचा जामीन मागण्यांत आला होता. नोटीस लागल्याचे दुसरे दिवशीं त्यांनीं आपला बंद असलेला छापखाना विकला. बंद छापखाना ताब्यांत राहिल्याबद्दल दंड ! परंतु हायकोर्टानें त्यांस दोषमुक्त केलें.

जुलै १९१३ मध्यें कलकत्याच्या अमृतबझार पत्रिकेवर बारिसाल येथील कटाचा खटला चालू असतां तत्संबंधीं लेख प्रसिद्ध केल्याबद्दल कोर्टाची बेअदबी केल्याचा खटला करण्यांत आला. बाबू मोतीलाल घोष हे संपादक किंवा लेखक नसल्यामुळें सुटले; परंतु प्रिंटरवर लेख छापल्याबद्दल खटला चालला. न्या. मू. सर लॉरेन्स जेंकिन्स, न्या. मू. स्टीफन व मुकर्जी यांनीं आरोपीस सोडून दिलें व असा अभिप्राय दिला कीं, ' झडत्या सरसकट घेऊं नका, आरोपींना जामिनावर सोडा, अमुक मॅजिस्ट्रेटपुढें खटला चालवूं नका, अशा सूचना केल्या असतां बेअदबी होत नाहीं. त्यांच्या लिहिण्यानें न्यायाचे कामांत प्रत्यक्ष विघ्न होईपर्यंत खटला करणें चुकीचें आहे.' ( ८-७-१३ ).

इ. स. १९१४

सन १९१४ च्या ऑक्टोबर महिन्यांत पुण्यांत राजद्रोहाचा खटला झाला. आरोपी सीताराम तुकाराम सुर्वे, हरि रामचंद्र देसाई व कमलाकर रामचंद्र सुमंत यांचेवर स्वातंत्र्यपत्रकांचा प्रसार केल्याच्या आरोपावरून इं. पी. कोडाच्या १२४ अ खालीं खटला झाला. सुमंत यांचा धंदा ज्योतिषाचा असून त्यांस २ वर्षे सक्त मजुरी, सुर्वे यांस २ वर्षे साधी व देसाई यांस ६ महिने सक्त मजुरी अशा शिक्षा झाल्या. या लोकांनीं एक हँड प्रेस ठेविला होता व त्यावर बंडाचें निशाण उभारण्यास सूचना असलेल्या हस्तपत्रकांचा फार्म बसविलेला होता. सावरकर-वगैरे राजद्रोही लोकांचे फोटो त्यांचे खोलींत होते.

इ. स. १९१५

सन १९१५ सालीं लाहोरास एक मोठा राजद्रोहाचा खटला झाला व राजद्रोही भाषणें केल्याबद्दल व सरकारविरुद्ध कट केल्याबद्दल अल्पवयी अशा २४ मुलांना फांसावर चढविलें व ३२ लोकांना निरनिराळ्या मुदतीच्या काळें पाण्याच्या व सक्त मजुरीच्या शिक्षा देण्यांत आल्या.

इ. स. १९१६

पेण येथील ' सुधाकर ' पत्र १९१० सालीं बंद करण्यांत आलें होतें, तें जानेवारी १९१६ मध्यें सुरू करण्याविषयीं परवानगी मागितली असतां संपादक रा. नारायण गणेश मंडलीक यांजकडून रु. १५००चा जामीन मागण्यांत आला.

मद्रास येथील मिसेस बेझंट यांच्या ' न्यू इंडिया ' पत्राचा ता. २२-५-१६ रोजीं रु. २००० चा जामीन घेण्यांत आला.

जूनमध्यें नागपूरच्या महाराष्ट्र पत्राकडून रु. २००० चा जामीन घेण्यांत आला.

सप्टेंबरमध्यें न्यू इंडिया पत्राचा दोन हजारांचा जामीन रद्द करण्यांत येऊन दहा हजारांचा नवीन जामीन मागण्यांत आला व बेझंटबाईचें ' कॉमन-वील ' पत्र ज्या ' वसंत ' छापखान्यांत छापलें जात असे त्याकडून रु. ५००० चा जामीन घेण्यांत आला.

नागपूरच्या स्वराज्यसंघाच्या शाखेचे सेक्रेटरी रा. नारायणराव वैद्य यांचेवर दमोह येथें राजद्रोहाचा खटला झाला. त्या गांवीं भय्यालाल चौधरी यांचेवर खटला झाला असतां तो चालविण्यास वैद्य गेले व त्यांनीं तेथें झालेल्या व्याख्यानांत सांगितलें कीं, ' सेटलमेंट करतांना वाटेल तसा सारा वाढवितात,' ' हिंदुस्थान हा ऊस असला तरी मुळासकट खातां कामा नये, ' व ' आम्ही लढाईवर जाण्याला तयार आहोंत, मग आम्हांस कां घेत नाहीं ? ' ( १६-७-१८ ). यांत राजद्रोह कोठें आहे ?

इ. स. १९१८ ते १९२२

सालअखेर मदुरा येथील राजकीय, सामाजिक, शिक्षणविषयक पुढारी डॉ. वरदराजलू नायडू यांचेवर राजद्रोहाचा खटला झाला. ते सहकारी पतपेढ्यांची व होमरूलचीहि चळवळ करीत असत.

सन १९२२ मध्यें यंग इंडियांतील लेखांबद्दल म. गांधीवर खटला होऊन त्यांना ६ वर्षे शिक्षा झाली.

नागपूरच्या महाराष्ट्र पत्राचे संपादक रा. गोपाळराव ओगले यांचेवर ऑगस्ट १९२४ मध्यें कोर्टाची बेअदबी केल्याबद्दल खटला होऊन रु. ३०० दंड झाला.

इ. स. १९२४

सन १९२६ सालीं मुंबईच्या 'नवाकाळ' पत्राचे संपादक श्री. कृ. प्र. खाडिलकर यांचेवर सोलापूरचे डि. पो. सु. मि. मॅकडोनल्ड यांसंबंधीं बेअब्रुकारक तार प्रसिद्ध केल्याबद्दल खटला होऊन रु. ७५० दंड झाला.

इ. स. १९२६

सन १९२७ च्या नोव्हेंबर महिन्यांत मि. फिलिप स्प्रॅट ह्या केंब्रिज युनिव्हर्सिटीच्या पदवीधरावर ' इंडिया अँड चायना ' हें पुस्तक लिहून प्रसिद्ध केल्याबद्दल खटला झाला. ' हिंदुस्थानांत हिंसा-अहिंसा यांचें बंड फार आहे, त्यामुळें हिंदुस्थान व चीन ह्या देशांतील परिस्थितीचें वर्णन करून हिंदी राष्ट्रीय पक्षाचे पुढारी आपलें कर्तव्य बरोबर बजावीत नाहींत', हें त्यांत दाखविलें होतें. खटला हायकोर्टांत चालून मि. स्प्रॅट व त्यांचेबरोबर असलेले मि. चितालिया व रा. मिरजकर दोषमुक्त होऊन सुटले.

इ. स. १९२७

सालअखेर पुण्याच्या स्वराज्य पत्राचे संपादक रा. शंकर दत्तात्रय देव व मुद्रक-प्रकाशक रा. व्यंकटेश बलवंत हरोलीकर यांजवर ता. १५-९-२७ रोजीं ' निदान धर्मयुद्ध करा ' हा लेख लिहून प्रसिद्ध केल्याबद्दल राजद्रोहाचा खटला होऊन प्रत्येकीं

दोन वर्षे सक्त मजुरीची शिक्षा झाली. सदर लेखांत सरकारविरुद्ध कांहीं नसून हिंदु-मुसलमानांनीं लढावयाचें तर निदान समान साधनांनीं व समान नियमांनीं लढावें (सोलापूरच्या रा. कुलकर्णी वकिलांस बेसावधपणें ठार केलें, याप्रमाणें होऊं नये), असें त्या लेखांत होतें. पूर्वीच्या राजद्रोहाच्या खटल्याचे वेळीं वातावरण अधिकाऱ्यां-विरुद्ध होतें. परंतु या वेळीं फक्त हिंदु व मुसलमान यांत तंटे, दंगे होत होते.

इ. स. १९२९

पंजाबचे सुप्रसिद्ध पुढारी डॉ. सत्यपाल यांनीं ता. १०-३-२९ रोजीं दिल्ली येथें राजद्रोही भाषण केल्याबद्दल खटला होऊन २ वर्षे सक्त मजुरी व ५०० रु. दंड अशी शिक्षा झाली.

ऑगस्ट १९२९ मध्यें कलकत्याच्या सुप्रसिद्ध 'मॉडर्न रिव्ह्यू' मासिकाचे संपादक श्री. रामानंद चतर्जी या वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध गृहस्थावर राजद्रोहाचा खटला होऊन रु. १००० दंड झाला. त्यांनीं अमेरिकेंतील प्रख्यात हिंदी हितचिंतक डॉ. संडरलंड यांचें 'इंडिया इन बॉंडेज' (परतंत्र भारत) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. हा आरोप व खटल्याचा निकाल ऐकून डॉ. संडरलंड म्हणाले, 'माझें पुस्तक छापण्यानें श्री. चतर्जी जर राजद्रोही ठरतात तर इंग्लंडचे प्रधान मि. मॅक्डोनल्ड व स्टेट सेक्रे-टरी मि. वेन यांजवरहि राजद्रोहाचे खटले कां करूं नयेत?' (१७-८-२९).

याच सालचे सुरुवातीस मीरतचा प्रसिद्ध खटला व लाहोरचा भगतसिंग व दत्त यांचा खटला सुरु झाला. सालअखेर बंगाल्यांत बाबू ज्ञानांजन नियोगी यांजवर १२४ अ कलमाखालीं दोन खटले होऊन रु. १००० दंड व एक महिना साध्या कैदेची शिक्षा झाली. अमेरिकेचे प्रे. लिंकन यांच्या अध्यक्षपद स्वीकारण्यावेळच्या भाषणाचा भाग जाड टाइपांत छापून जाहिराती लावल्या हा एक आरोप व दे. बं. दास यांचे पुण्यतिथीचे दिवशीं १९ जून, १९२९, रोजीं भाषण केलें त्याबद्दचा दुसरा आरोप.

---

# केसरीची शिकवणूक व यवतमाळ जिल्ह्याची राजकीय प्रगति

[ श्री. एस्. एच्. वल्लाळ ]

केसरी ज्या भागांत जात नाहीं, तेथें लोक मागासलेले राहतात, व जेथें तो जातो तेथें मागासलेले लोकहि खडबडून जागे होतात व हळू हळू आपल्या राष्ट्रीय जीविताला प्रारंभ करतात, हें अनेक ठिकाणीं दृष्टीस पडत आहे. केसरीची स्फूर्ति ही स्फूर्तीच होय. ती प्रत्यक्ष काय करणार ? तें ज्याचे तेच लोक करणार. पण पुष्कळ दिवस

करीत राहिल्यावर आपणांस केवळ आरंभींच नव्हे तर सतत व दर आठवड्यास विचारजीवन कोठून मिळत राहिलें याची जाणीव कार्यकर्त्यांना व निरीक्षकांना असते. अशा गृहस्थांपैकीं अनेकांनीं आपापल्या प्रांतांत केसरीमुळें झालेली उठावणी कसकसी होत राहिली याच्या हकीकती दिल्या आहेत. पैकीं एक दोन नमुन्यादाखल पुढें देतों.

१८८०-९० च्या काळांत यवत्यांत ( तेव्हां यवतमाळ शहरास ' यवतें' म्हणत असत. माळावर वसलेलें यवतें म्हणून त्यास यवतमाळ म्हणूं लागले ), इंग्रजी चारसहा यत्ता शिकलेला मनुष्य म्हणजे अंगुलिनिर्देश करून दाखविण्यासारखा, कौतुकानें थक्क करून सोडणारा प्राणी असे ! सन १८७८ मध्यें सरकारी नोकर व वकील इत्यादि पांढरपेशांनीं 'खा, पी, मजा कर ' या तत्त्वावर सोशल क्लब स्थापन केला व गेल्या सातआठ वर्षांपर्यंत त्याच्या अध्यक्षस्थानीं डेप्युटी कमिशनरच असे. येथील दुसरी सार्वजनिक संस्था म्हणजे ज्युबिली लायब्ररी. ती सन १८८९ मध्यें स्थापन झाली. लायब्ररीच्या स्थापनेनंतर सुशिक्षित लोक केसरी, अमृतबझार पत्रिका यांसारखीं पत्रें वाचूं लागले; तेव्हां आपल्या समाजाची नैतिक, धार्मिक, औद्योगिक व शारीरिक राजकीय दृष्ट्या अशी सर्वतोपरी हानी झाली आहे हें लक्षांत येऊन ती सुधारण्याची खटपट केली पाहिजे या उद्देशानें १८९४ सालीं 'ऐक्यवर्धक समाज' स्थापण्यांत आला. त्याच्या प्रमुख चालकांत केसरीचे भक्त पृथ्वीगोर हरिगोर, हरिभाऊ काणे, श्रीधरपंत मारुळकर वगैरे मंडळी होती. ऐक्य, शिस्त, शिक्षण इत्यादि विषयांवर या समाजांत व्याख्यानें व चर्चा होई. पण श्रोते बोलावून आणून एक दोन बांकें साजरीं करण्याकरितां चालकांस केवढे तरी कष्ट पडत ! या मंडळींनीं एक तालीमखानाहि काढला होता.

१८९६ मध्यें केसरी पत्रावर खटला होऊन लो. बा. गं. टिळकांस शिक्षा झाली, तेव्हांपासून सार्वजनिक विषयांची सार्वजनिक रीतीनें चर्चा करणाऱ्या या मंडळींच्या कार्यक्रमाकडे लोकांचें लक्ष वेधूं लागलें. याच सुमारास केसरीचे कट्टे अनुयायी श्री. नरहर शिवराम ऊर्फ **बाबासाहेब परांजपे** हे हैद्राबाद येथील मेडिकल स्कूलमधून डॉक्टरकीची परीक्षा पास होऊन आले होते. कराराप्रमाणें सात वर्षांची नोकरी भरतांच ते दास्यशृंखलेंतून मुक्त झाले; पण नौकरींत असतांच ते जेथें जेथें असत तेथें तेथें सार्वजनिक सेवेचें महत्त्व लोकांस पटवून वर्तमानपत्रें बोलावणें, लायब्ररी स्थापणें, आखाडा काढणें, व्याख्यानें करविणें इत्यादि उद्योग निग्रहपूर्वक करीत. १९०५ मध्यें त्यांनीं स्वतःस सार्वजनिक सेवेस वाहून घेतलें. त्यांनीं २-३ वर्षे खाजगी दवाखाना चालविला. पण पुढें तोहि चळवळीच्या वाढत्या व्यापाकरितां सोडला व उदरनिर्वाहाकरितां म्हणून कष्ट करावयाचे नाहींत, अशी मनांतल्या मनांत प्रतिज्ञा करून ते कार्यास लागले. १९२२ सालीं राजद्रोहाच्या आरोपावरून त्यांस सव्वा वर्ष सक्त मजुरीची शिक्षा झाली. तेव्हां ' मी

पोटाकरितां कष्ट करावयाचे नाहींत, असें ठरविलें असल्यामुळें तुरुंगांत कोणतेंहि काम करणार नाहीं; तुम्हांस काय पाहिजे तें करा ! ' असा रोखठोक जबाब त्यांनीं दिला ! बाबासाहेबांचें उज्ज्वल चरित्र माहीत असल्यामुळें सरकारनें त्यांना ज़ेलांत ' स्पेशल ' रीतीनें वागविलेंहि. बाबासाहेब परांजपे यांस यवतमाळ जिल्ह्यांतील राजकीय आंदोलनाचे जनक म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं.

१९०२ मध्यें पृथ्वीगीर हरिगी यांनीं ' हरिकिशोर ' पत्र काढलें. स्वतंत्र विचाराच्या तेजस्वी लेखांनीं युक्त असल्यामुळें तें फार लोकप्रिय झालें. केसरींतील बाणेदारपणाच्या राष्ट्रीय विचारांचा प्रतिध्वनि त्याच्या द्वारें वऱ्हाड प्रांतभर दुमदुमू लागला. त्याच्या योगें जिल्हाभर सार्वजनिक जीवनक्रम वाढीस लागला. यवतमाळास सार्वजनिकपणें राष्ट्रकार्य करणारांचें क्षेत्र वाढूं लागलें. केसरीं-तील लेखांच्या वाचनाचा परिणाम म्हणून सांगतां येण्यासारखी गोष्ट ही वाटते कीं, या सुमारास शामराव प्रल्हाद देशपांडे यांनीं उदरनिर्वाहास्तव कांहीं एक उद्योग न करण्याचें ठरवून जिल्ह्याच्या उन्नतीच्या कार्यास वाहून घेतलें. दत्तात्रय कृष्ण काणे, रामचंद्र रघुनाथ बापट, वकील, लक्ष्मण चिंतामण बापट, लक्ष्मण रेणको डोळे, वकील, गोपाळ नागोजी कोठेकर, गणपत सिताराम माळवी इत्यादि त्या काळचे झटून राष्ट्रकार्य करणारे गृहस्थ होत. त्यांनीं १६ ऑगस्ट, १९०५, रोजीं लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांस अमरावतीहून मुद्दाम आणून मानपत्र दिलें. मानपत्रांत टिळकांस 'लोकमान्य' या विशेषणानें संबोधिलें असून त्या काळच्या 'हरिकिशोर'च्या फायलींत हें विशेषण त्यांस नियमितपणानें लाविलेलें आढळतें. टिळकांनीं ज्या आपल्या कणखर राष्ट्रीय विचारांची छाप अखेरीस साऱ्या हिंदुस्थानच्या राजकारणा-वर कॉंग्रेसच्या द्वारें बसविली, त्या राजकारणाची मुहूर्तमेढ त्यांच्या आगमनानें या दिवशीं यवतमाळ शहरांत बसली असें म्हणावयास हरकत नाहीं. गणपतराव माळवी यांनीं आपल्या विठ्ठल मंदिरांत एक आखाडा स्थापन केला होता. त्यातर्फे चौतीस कलमांच्या मैदानांत टिळकांच्या समो शारीरिक खेळ करून दाखविण्यांत आले होते. तेव्हां टिळकांचे आभार शामराव देशपांडे यांनीं मानले. शहरांतील नवचैतन्याचा प्रभावशाली ओघ अवलोकन करून टिळकांनीं आपल्या उत्तराच्या भाषणांत असे उद्गार काढले होते कीं, 'हें छोटेंसें शहर लौकरच लोकमताचें ठाणें होईल.' त्यांची भविष्यवाणी खरी झालेली आज प्रत्ययास येत आहे. कारण माधवरावजी अणे यांनीं कायदेभंग पुकारून महाराष्ट्रीयांचेंच नव्हे, तर संपूर्ण हिंदुस्थानचें लक्ष यवतमाळकडे ओढून घेतलें आहे. असो.

ता. २८ ऑगस्ट, १९०५, रोजीं गणेशोत्सव करण्याकरितां येथें सार्वजनिक उत्सव-मंडळ स्थापण्यांत आलें. त्याचे पहिले अध्यक्ष भिकाजी व्यंकटेश द्रवीड व चिटणीस कृष्णाजी लक्ष्मण पेशवे व गोपाळ नागोजी कोठेकर हे होते. या वेळेपासून

प्रतिवर्षी गणेशोत्सव, शिवाजी-उत्सव, दासनवमी वगैरे उत्सव मोठ्या प्रमाणावर व अधिकाऱ्यांच्या दडपशाहीस भीक न घालतां निग्रहपूर्वक करण्यांत येऊं लागले. हे उत्सव ज्या वृत्तीकरितां व ज्या भावनेनें साजरे व्हावे म्हणून केसरींतून वारंवार प्रतिपादिलें जात असे, त्याच दृष्टीनें या उत्सवांच्या निमित्तानें जनसमुदायापुढें राष्ट्रीय विचार निर्भीडपणें मांडण्याची परंपरा सुरू झाली व तीच पुढें हा जिल्हा बनविण्यास कारणीभूत झाली.

या वेळेस रामभाऊ बापट यांनीं 'स्वदेशी' दुकान काढलें होतें. त्याच्या द्वारें स्वदेशी विचार व स्वदेशी वस्तु यांचा प्रचार मोठ्या प्रमाणावर होई. ता. १६-१०-०५ रोजीं स्वदेशी वस्तु वापरणारांचें संमेलन केदारेश्वरासमोर होऊन तेथें विदेशी कापडाची जंगी होळी करण्यांत आली. तेथें डॉक्टर परांजपे यांचें जोरदार भाषण झालें. यवतमाळ शहरांतील संस्था व कार्यकर्ते यांची माहिती वर दिली आहे, पण त्यांच्या पावलांवर पावलें टाकून वणी, दारव्हा, उमरखेड, मुळावा, पुसद वगैरे ठिकाणचे कार्यकर्ते राष्ट्रकार्ये करीत असत हें सांगणें नकोच. स्वदेशी व बहिष्काराची चळवळ जोरानें सुरू झाली. तिचा संपर्क शाळेंतील विद्यार्थ्यांस होऊं नये, म्हणून येथील ए. व्ही. स्कूलच्या हेडमास्तरनें एक नोटीस काढली ! इतक्यांत वंगभंगाच्या निमित्तानें सर्वत्र जागृति होऊन अमरावतीकरांनीं 'शिवाजी विद्यालय' काढलें व त्याच धर्तीवर येथें २५ मार्च, १९०६, रोजीं 'विद्यागृह' स्थापण्यांत आलें. त्याला लागणारा द्रव्यनिधि जमविण्याकरितां डॉ. परांजपे व शामरावजी यांस जिल्हाभर फिरावें लागलें. या निमित्तानें त्यांनीं खेडोपाडीं व्याख्यानें देऊन स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या राष्ट्रीय चतुःसूत्रीसंबंधानें अभूतपूर्व जागृति केली. दत्तात्रय विष्णु आपटे, बी. ए., यांस एक खाजगी शिकवणी होती, म्हणून ते या विद्यागृहांत अवैतानिक मुख्याध्यापक म्हणून काम करीत होते. हरिभाऊ फाटक, विष्णु गंगाधर केतकर हेहि शिक्षक होते. ११ जुलै, १९०६, रोजीं सार्वजनिक उत्सव-मंडळामार्फत विठ्ठल मंदिरांत टिळक ज्युबिली करण्यांत आली. गणपतराव माळवी व डॉ. परांजपे यांनीं या वेळीं पराकाष्ठेचे श्रम घेतले. विद्यागृहाची औद्योगिक शाखा म्हणून मे १९०७ मध्यें गोपाळ वासुदेव टोंगो यांनीं हातमागांचा कारखाना चालू केला.

अशा रीतीनें राष्ट्रीय आंदोलनाची तीव्रता वाढत चालली. ती असह्य होऊन सरकारनें १३ ऑगस्ट, १९०७, रोजीं 'हरिकिशोर'चे संपादक पृथ्वीगीर हरिगीर यांजवर १२४ अ व १५३ अचे मुकदमे करून त्यांस दोन वर्षांची सक्तमजुरी व एक हजार रुपये दंड अशी शिक्षा ठोठावली ! कैदेंत पृथ्वीगीर यांचे अनन्वित हाल झाले. परत आले तेव्हां त्यांचें वजन ५३ पौंडांनीं घटलें होतें ! हा काळ म्हणजे सर्व हिंदुस्थानभर चाललेल्या दडपशाहीच्या काळ्याकुट्ट अंधाराचा होता. सार्वजनिक कार्यकर्ता किंवा वक्ता यांच्याबरोबर रस्त्यानें चालणें

देखील गुन्हा समजण्यांत येई ! अमरावतीचे स्वामी शिवानंद यांस राजद्रोहापायीं ७ वर्षांची अमानुष शिक्षा झाली. अमरावतीचें शिवाजीविद्यालय व त्यामागून लोकरच येथील विद्यागृह क्रेव्हलंडसाहेबांनीं 'तीव्रतर उपायां' चें जालीम पिस्तुल रोंखून बंद केलें. लो. टिळकांस सहा वर्षांचा कारावास झाला होता. टिळकांच्या नेतृत्वास मुकल्यानें सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें; तथापि केसरीवृत्तीचे डॉ. परांजपे हे आपल्या निग्रही स्वभावास अनुसरून आशावादीपणानें लोकजागृतीचें कामें अव्याहतपणें चालवीत होते. या काळांत त्यांना भयंकर दडपशाहीमुळें पुणें हें आपलें निवासस्थान करावें लागलें होतें; पण याच सुमारास **माधव श्रीहरि अणे** हे वकिली करावयास येथें येऊन राहिलेले होते. साधी राहणी, कुशाग्र बुद्धि, गाढ विद्वत्ता, स्वार्थत्यागाचा बाणा, सार्वजनिक कार्यें करण्याची उत्कट इच्छा इत्यादि गुणांमुळें त्यांचें घर म्हणजे सार्वजनिक बैठकच बनलें होतें. किंकर्तव्यमूढ बनलेल्या टिळकानुयायांना बापूजी अणे हे अप्रतिम नेते उपलब्ध झाले. दडपशाही जोराची होतीच. 'हरिकिशोर'वर दुसऱ्यानें खटला होऊन त्याचे दुसरे संपादक नरहर विठ्ठल भावे यांस तीन वर्षें कारावासाची शिक्षा झाली. त्यानंतर तिसरे संपादक विष्णु गंगाधर केतकर झाले. माधवरावजी अणे यांच्या घराची झडती होऊन हनुमान-उत्सवांतील एका व्याख्यानावरून त्यांची सनद सस्पेंड करण्यांत आली.

टिळक मंडालेस अटकलेले; त्यांच्या अनुयायांचा कॉंग्रेसचा संबंध तुटलेला; अशा स्थितींत माधवरावजी अणे यांनीं लोकसेवेचें कार्य कॉंग्रेसपासून अलग राहून करण्याकरितां डिस्ट्रिक्ट ॲसोसिएशन स्थापन केली. १९०५ च्या सप्टेंबरमध्येंच राष्ट्रीय विचारांची जिल्हाभर जागृति करण्याकरितां दादा काणे, रामभाऊ बापट, शामराव देशपांडेप्रभृति मंडळींनीं 'जिल्हा सभा' स्थापन केलेली होती. तिला या नवीन ॲसोसिएशनच्या रूपानें व्यवस्थित व संघटित स्वरूप देण्यांत आलें असें म्हणावयास हरकत नाहीं. या संस्थेनें सरकारकडे रिप्रेझेंटेशनें, डेप्युटेशनें व लोकांचे अर्ज पाठवून लोकांच्यीं बरींच गाऱ्हाणीं दूर केलीं. परगणा व जिल्हा सभा भरवून अदृष्टपूर्व लोकजागृति केली. बिगार व बलुतें यांबाबत लोकांचीं दुःखें निवारण करण्याकरतां या संस्थेनें केलेले निकराचे प्रयत्न अवर्णनीय होत. बलुत्यांकरितां तर सरकारास एक कमिशनच नेमावें लागलें होतें. नापिकीच्या सालीं शेतकऱ्यांना शेतसाऱ्याची तहकुबी किंवा माफी मिळविण्याची खटपट करणें हा या संस्थेचा विशेष होता. त्यामुळें जिल्ह्यांतील साऱ्या जनतेचा तिजवर विश्वास बसला. उलटपक्षीं, आपली बाजू नेहमीं आकडेशास्त्राचीं प्रमाणें देऊन पुढें मांडण्याची या ॲसोसिएशनची वहिवाट असल्यामुळें तिच्या म्हणण्याचा सरकारला लक्षपूर्वक विचार करावा लागे व म्हणून तिचें सरकारांतहि वजन वाढलें. सामान्य जनतेशीं आपला प्रत्यक्ष संबंध उत्पन्न करून माधवरावजी अणे यांनीं राष्ट्रीय विचारांनें लोण खेड्यापाड्यांपर्यंत पोहोंचविलें.

सन १९१६ सालीं होमरूल लीगचे सभासद करण्यांत या जिल्ह्यानें महाराष्ट्रांत पहिला नंबर पटकाविला होता. लक्ष्मण काशिनाथ ओक, वकील, यांनीं दररोज एक तरी सभासद मिळविल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं, अशी प्रतिज्ञा करून एकट्यांनीं एक हजार सभासद मिळविले ! १९१७ सालच्या जानेवारींत लोकमान्यांनीं आपला स्वराज्याचा सुप्रसिद्ध दौरा काढला. त्यांत या जिल्ह्यानें यथाशक्ति आपला भाग घेतला. याच वेळीं लोकमान्यांनीं पुसदच्या नदीचा देखावा व लोकांचा उत्साह पाहून त्या स्थानास 'स्वराज्याची पंढरी' हें नांव दिलें. १९१९ च्या एप्रिलच्या ४ तारखेस सदाशिव हणमंत वह्याळ यांनीं पुढाऱ्यांच्या मदतीनें यवतमाळ-मुद्रण-मंडळ नांवाची खाजगी संस्था स्थापून 'लोकमत' पत्र प्रसिद्ध केलें. त्यानंतर आठ महिन्यांनीं लोकमान्य दिवंगत झाले व महात्मा गांधी यांनीं राष्ट्रीय सभेवर आपली छाप पाडून नवें राजकारण प्रचलित केलें. तें या जिल्ह्यांतील पुढारी व कार्यकर्ते यांच्या बुद्धीस पटलें नाहीं. त्यांनीं काँग्रेसच्या ठरावास न जुमानतां कायदेकौन्सिलांचा जनसेवा करण्याचे कामीं उपयोग करण्याचें ठरविलें. सुदैवानें त्यांच्या या 'वंडाच्या निशाणा'खालीं वऱ्हाडांतील चारहि जिल्ह्यांचे प्रमुख पुढारी व कार्यकर्ते एकत्र झाले. 'कोर्ट-कौन्सिल-शालानां बहिष्कारो निरर्थकः' या शीर्षकाखालीं बुद्धीस चालना देणारे जोरदार लेख लिहून 'लोकमता'नें वऱ्हाड प्रांतांतील जनता कौन्सिलबहिष्कारापासून विन्मुख ठेविली. माधवरावजी अणे स्वतः लेजिस्लेटिव्ह ॲसेंब्लींत बिनहरकत निवडून गेले, एवढें त्यांचें प्रांतांत वजन बसलें. त्यांच्या पक्षाच्या उमेदवारांनीं सी. पी. कौन्सिलांत जाऊन आपली छाप बसविली. जिल्हा कौन्सिल, तालुका बोर्डें, म्युनिसिपॅलिट्या, ग्रामपंचायती इत्यादि सर्व प्रातिनिधिक संस्थांतून माधवरावजी अणे यांच्या पक्षाचें प्राबल्य झालें.

डिस्ट्रिक्ट ॲसोसिएशननें गेलीं पंधरा वर्षें कंठशोष करून लोकांचीं जंगलविषयक गाऱ्हाणीं सरकारच्या नजरेस आणलीं, तरी तें सारें अरण्यरुदनवत् ठरलें. याचा भयंकर उद्वेग माधवरावजी अणे यांस उत्पन्न झाला. इकडे महात्मा गांधी यांनीं मिठाचा कायदेभंग सुरू केला, व स्वराज्य मिळवीन तरच परत येईन, नाहीं तर परत येणार नाहीं, अशी प्रतिज्ञा केली ! अशा कपिलाषष्ठीच्या संधीचा फायदा घेऊन माधवरावजी अणे यांनीं सनदशीरपणाच्या प्रयत्नांची पराकाष्ठा म्हणून कायदेभंगाचें शिंग फुंकलें व लोकमान्यांनीं ज्या पुसदचा 'स्वराज्याची पंढरी' म्हणून गौरवानें उल्लेख केला होता तेथील पुसद नदीच्या वाळवंटांतून १० जुलै, १९३०, रोजीं सकाळीं ७ वाजतां जंगलचा जुलमी कायदा तोडण्याकरतां हजारों लोकांसमवेत प्रयाण केलें. त्यांजवर चोरीच्या गुन्ह्याचें कलम लावून नोकरशाहीनें त्यांस सहा महिन्यांची शिक्षा दिली. त्यांच्यामागें कायदेभंगाचें काम डॉ. भास्कर महादेव टेंबे, लक्ष्मण काशिनाथ ओक, भीमराव हणमंत जतकर, शंकरराव सरनाईकप्रभृति त्यांच्या जिवलग सहकार्यकर्त्यांनीं निश्चयानें व व्यवस्थापूर्वक केलें. त्यांत

५२५ जणांस शिक्षा अथवा दंड झाले. पण त्यांच्या निदान तिप्पटजणांनीं छातीठोकपणें कायदेभंग केला असून त्यांस सरकारनें शिक्षा केली नाहीं. या कायदेभंगाच्या निमित्तानें जी अभूतपूर्व जागृति झाली तींत भगिनीवर्गानें घेतलेला भाग कल्पनातीत व वर्णनातीत आहे. 'वंदे मातरम्' हीं अक्षरें उच्चारणें, गणपतिशिवाजी-उत्सव करणें, सभा भरविणें, केसरीपत्र घेणें, शिवाजीटिळकांचे फोटो लावणें असल्याहि गोष्टी गुन्ह्याच्या सदराखालीं येत. त्या वेळेपासून धैर्यानें व नेटानें पुढाकार घेऊन राष्ट्रकार्याचा गाडा लोटणारे या जिल्ह्यांतील पुढारी व त्यांचे अनुयायी आजमितीसहि राष्ट्रोन्नतीच्या कामांत यथाशक्ति भाग घेत आहेत. स्वातंत्र्याची ज्योत या कार्यकर्त्यांच्या अंतःकरणांत जन्मापासून परमेश्वरानें पेटविली हें जरी खरें, तरी तिला अवश्य तो प्राणवायु सतत पुरवून आजच्या प्रदीप्ताग्नीचें स्वरूप प्राप्त करून देण्यास लोकमान्य बा. गं. टिळक ही अलौकिक व्यक्ति व कणखर विचारांचें त्यांचें '**केसरी**' पत्र हेंच कारणीभूत झालें आहे.

---

## संस्मरणीय दिवंगत व्यक्ति

गेल्या पन्नास वर्षांत केसरींत ज्यांचे मृत्युलेख आले आहेत, त्या व्यक्तींची वर्णानुक्रमानें पुढील सूची दिली आहे. हिच्यामध्यें अनेक प्रकारचे विशिष्ट लोक, ह्या कालावधींत होऊन गेलेले असे आहेत. जगांतील अत्यंत नामांकित, विद्वान्, मुत्सद्दी, राजे, अमीरउमराव, व्यापारी, न्यायाधीश, प्रोफेसर, शास्त्री, पंडित, कायदेपंडित, आचार्य, अध्यापक, स्त्रिया व बहुविध सामान्य जन ह्यांचें मृत्युवृत्त थोडक्यांत देतांना, त्यांच्यामध्यें विशेष काय होता, हें सांगण्यांत आलें आहे. पहिल्याच कांहीं नांवांवरून मुसलमानांतील कांहीं प्रसिद्ध व्यक्ति ह्यांत आल्या आहेत हें समजेलच. इंग्रज लोकांची व आपली अलीकडे शंभरसवाशें वर्षांत फार ओळख झाल्यानें त्यांतीलहि भट्टमोक्षमुल्लरांसारखे विद्याव्यासंगी, लॉर्ड रिपन, सर वेडरबर्न यांसारखे उदारधी व लॉर्ड कर्झन, न्यूजंट, ओडवायर यांसारखे अँग्लो-इंडिअन, नोकरशाहीचे अग्रगण्यहि ह्या मृत्यूच्या यादींत दिसतील. केसरीचा जन्मच मुळीं हिंदुस्थानांत, त्यांतहि महाराष्ट्रांत, म्हणून त्यांतील विशेष लहानमोठ्या दिवंगत झालेल्या व्यक्तीं-विषयीं शोकजनक मृत्युलेख येणें साहजिक आहे. मृत्युविषय व्यक्तीच्या केवळ गुणांकडेच लक्ष दिलेलें आढळतें. उदाहरणार्थ—महाराष्ट्रांत छापखान्याचे कामांत ज्यांनीं पूर्वीं पुष्कळ सुधारणा केली ते मुंबईतील साधारण गृहस्थ आत्माराम कान्होबा व जावजी दादाजी ह्यांचीं चरित्रें ह्यांत आहेत. ह्यांतील अनेक लेख दिवंगत मनुष्यांची प्रतिमा डोळ्यांपुढें उभी करणारे आहेत. चाळीस वर्षांपूर्वी मुंबईतील एका

मृत शास्त्र्याचें केसरींत आलेलें संकलित वृत्त, मृताचे सहाध्यायी स्नेही शास्त्री यांनीं इंदूर मुक्कामीं वाचिलें. तेव्हां ते म्हणाले कीं, ' पुण्यांतील लोकांना हें यथार्थ वर्णन कसें करितां आलें ?' व तेव्हांपासून वर्तमानपत्रांतील लेख पुष्कळ खरे असतात असें त्यांस वाटूं लागलें. ही गोष्ट प्रस्तुत लेखकास माहीत असल्यानें दिली आहे. समसायी, समवयस्क, समविद्य, सहवासी, स्नेही, केसरीचे साहाय्यक, अशा पुरुषांचे संपादकांनीं लिहिलेले निधनवृत्तान्त फारच हृदयस्पर्शी, औदास्ययुक्त, क्षणभर निराशा उत्पन्न करणारे व वैराग्यजनक असे आहेत. अत्यंत विद्याव्यासंगी मनुष्याचे हानीनें देशाचें अपरिमित—लौकर भरून न येणारें—नुकसान झालें आहे असें त्यांतील लेखानें वाचकांचे मनावर ठसतें. मृत्युविषय व्यक्तीसंबंधीं अगोदर संपादकाचा कोणत्याहि कारणानें मतभेद झालेला असला तरी लेखांत त्याचेविषयीं पूज्यबुद्धीच व्यक्त झालेली दिसेल. सारांश, केसरींतील मृत्युलेखहि वाचनीय आहेत. वृत्तपत्रांतील लेख अल्पावकाशांत व अपूर्ण साधनांनींच पूर्ण झालेले असतात. तरी त्यांतील अत्यंत सन्मार्गदर्शक चरित्रें पुढील पिढीसाठीं सध्यांचे लेखकांनीं विस्तारपूर्वक व संशोधक वृत्तीनें लिहिलीं असतां वाङ्मयविषयक मोठें काम होईल यांत संशय नाहीं.

—सिताराम बावाजी गुर्जर.

## अ

अजमलखान, हकीम, १९२१ च्या-काँग्रेसचे अध्यक्ष, राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान पुढारी, घरंदाज युनानी हकीम. मृ. २९-१२-२७

अजीमशहा, अर्काट घराण्यांतील राजपुत्र, राष्ट्रीय सभेचे आस्थेवाईक सभासद. मृ. मे १८८९

अत्रे, रा. ब., नानासाहेब, ठाण्याचे फर्स्ट क्लास जज्ज, उदार, मायाळू, समदृष्टी. मृ. १४-५-०४

अनवर पाशा, तरुण तुर्कांचा नेता, बुखाऱ्यानजीक बोल्शेव्हिकांशीं लढतांना मृत्यु. ऑगस्ट १९२२

अबदुर रहमान, सन १८८० पासून अफगाणिस्थानचा धोरणी, शूर व निग्रही राजा. मृ. १९०१ ( काबूल )

अभ्यंकर, मनोहर गोविंद, पुणें येथील प्रसिद्ध कंत्राटदार व लोखंडाचे व्यापारी. मृ. १८-१२-२३

अय्यंगार, सर व्ही. भाष्यम्, विद्वान्, कायदेपंडित, मद्रासचे लौकिकवंत पुढारी. मृ. नोव्हें. १९०८

अय्यर, डॉ. सुब्रह्मण्यम, मद्रास, वय ८२, अमेरिकेस खलिता धाडणारे देशभक्त. मृ. ५-१२-२४

अयोध्यानाथ, पंडित, वकील, अलाहाबाद, का. कौं. मेंबर, कॉं.चे जॉइन्ट सेक्रेटरी, वाणेदार पुढारी, वय ५३. मृ. १८९२

अलीबागकर, कवाशेट, अलीबागचे प्रख्यात व्यापारी. मृ. ऑक्टो. १८९९

अष्टपुत्रे, नारायण नरहर, सातारा, सार्वजनिक कार्यकर्ते, असहकारितावादी वकील, म. प्रा. कॉं. क. चे अध्यक्ष. मृ. २३-६-२३

असारियाभाई, देवानंद शेठ, चाळिसगांव, जिन मॅनेजर, स्वराज्य-संघाचे तहाहयात सभासद. मृ. २१-२-१९

आ

आगाशे, रा. ब., ग. कृ., मिरज संस्थानचे कारभारी, लोकमान्यांचे चहाते, सार्थ ज्ञानेश्वरीकर्ते. मृ. ६-२-२७

आगाशे, रा. ब. गणेश जनार्दन, पुणें, शिक्षणखात्यांत क्यूरेटर, कवि, वाङ्मयव्यासंगी, इंदूरच्या मराठी साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष. मृ. १३-७-१९

आचार्य, रा. ब., रामचंद्र त्रिंबक, ठाणें, वकील, दानशूर, गरिबांचे कैवारी, यांनीं २५००० रु. चेऊलगांवच्या दवाखान्यास धर्मार्थ दिले, वय ७६. मृ. २९-८-१२

आठल्ये, कृष्णाजी नारायण, महाराष्ट्रभाषाचित्रमयूर, केरळ—कोकिळचे संपादक, उत्कृष्ट कवि, ग्रंथः—सटीप ज्ञानेश्वरी, समर्थांचें सामर्थ्य, लोकहितवादी-चरित्र इ., वय ७५. मृ. २९-११-२६

आठल्ये, श्रीराम वासुदेव, मद्रास, बुद्धिमान, उद्योगी. व पराकाष्ठेचे मनमिळाऊ. मृ. १-१०-८६

आठवले, के. के., लाहोर, ' पंजाबी ' इंग्रजी दैनिकाचे संपादक. मृ. २३-१२-३० ( मुंबई )

आत्माराम कान्होबा, मुंबई, गणपत कृष्णाजी छापखान्याचे मालक. मृ. २५-९-९२

आत्माराम पांडुरंग, डॉक्टर, मुंबई, प्रार्थनासमाजाचे संस्थापक. मृ. २६-४-९८

आनंदाचार्लू, रावबहादूर, मद्रासचे रहिवाशी, समाजसुधारक, कॉंग्रेसच्या आद्यप्रवर्तकांपैकीं एक, जुन्या शास्त्र-ग्रंथांचे जबरदस्त व्यासंगी, कॉंग्रेसचे अध्यक्ष, १८९१. मृ. नोव्हें. १९०८

आनंदीबाई, राणीसाहेब, कोल्हापूर, चौथे शिवाजीमहाराज यांच्या पत्नी, छत्रपति शाहूमहाराज यांच्या मातोश्री. मृ. १९०२

आपटे, गोविंद विनायक, पुणें, इतिहाससंशोधक, कोंकणस्थांतील कांहीं घराण्यांचे इतिहास-लेखक. मृ. २५-१०-२५

आपटे, दत्तात्रय अनंत, ऊर्फ ' अनंत तनय, ' पुणें, ज. १८८२, सुप्रसिद्ध कवि, ग्रंथः—हृदयतरंग, तिलकविजय, इ., मृ. ११-६-२९

आपटे, महादेव चिमणाजी, ज. फाल्गुन शु. १२, शके १७६७, मुंबई हायकोर्टाचे वकील, पुण्याच्या आनंदाश्रमाचे संस्थापक. मृ. २२-१०-९४ ( मुंबई )

आपटे, डॉक्टर विष्णु गोपाळ, एल्. एम्. अँड एस्., कोल्हापूर, ममताळू डॉक्टर. मृ. जुलै १८९९

आपटे, रामचंद्र बाबाजी, इचलकरंजी, राष्ट्रीय सभेचे भक्त, इचलकरंजीस कॉंग्रेस-हॉल बांधविणारे, औद्योगिक चळवळीचे पुरस्कर्ते. मृ. जाने. १८९७

आपटे, रा. ब., लक्ष्मण जनार्दन, बी. ए., एल्एल्. बी., वकील, नगराध्यक्ष, डायरेक्टर, पूना बँक, आनंदी व दिलदार स्वभावी. मृ. १८-८-२६

आपटे, वासुदेव गोविंद, संपादक, प्रथमतः दैनिक ज्ञानप्रकाश, नंतर आनंद, बालवाङ्मयाचे प्रणेते, ग्रंथ :——मराठी-

शब्दरत्नाकर व कित्येक कादंबऱ्या, चरित्रें, प्रबंध, शालोपयोगी पुस्तकें. मृ. ३१-१-३०

आपटे, प्रि. वामन शिवराम, एम्. ए., पुणें, ज. १८५८, प्रो. व प्रि., फर्ग्युसन् कॉलेज, दक्षिणाफेलो, भगवानदास स्कॉलर, केसरी-मराठ्यांचे एक लेखक, सुपरि., न्यू स्कूल, पुणें, ग्रंथ :—स्टूडंट्स गाइड, प्रोग्रेसिव्ह एक्झरसाइझेस, संस्कृत डिक्शनरी, वय ३४. मृ. ९-८-९२

आपटे, विष्णु नारायण, वांई, पेढीवाले, पुण्याची पेपरमिल व रेशमाची गिरणी, यांतील कार्यकर्ते. मृ. ऑगस्ट १९००

आपटे, श्रीमंत बयाबाईसाहेब, शेवटच्या बाजीरावांची कन्या. मृ. १९१७ (काशी)

आपटे, हरि नारायण, ज. १८६४, अव्वल दर्जाचे कादंबरीकार, नाटककार, कवि, 'करमणूक'चे संपादक, नगराध्यक्ष, पुणें. मृ. ३-३-१९

आंबडेकर, पुणें, प्रमुख फौजदारी वकील. मृ. ऑगस्ट १८९९

आय्यंगार, कस्तुरीरंग, मद्रास, संपादक, 'हिंदु,' मद्रास, राष्ट्रीय मतांचे पुरस्कर्ते, वय ६४. मृ. १२-१२-२३

आय्यर, सर तिलुवल्लूर मत्तुस्वामी, मद्रास हायकोर्टांतील जज्ज, वय ६३. मृ. जाने. १८९५

आय्यर, सर शेषाद्री, बी.ए., बी. एल्., सी. एस्. आय्., म्हैसूर, हुषार, कर्तृत्ववान्, लोकप्रिय दिवाण, कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचे नियोजित अध्यक्ष. मृ. १३-९-०१ (बंगलोर)

ऑल्कॉट, कर्नल, थिऑसॉफिकल सोसायटीचे अध्यक्ष, वय ७५. मृ. १७-२-०७ (अडयार)

आल्बनी, ड्यूक ऑफ, महाराणी व्हिक्टोरियाचे चतुर्थ चिरंजीव. मृ. १-४-८४

ऑसबर्न, कर्नल, हिंदुस्थानचा कैवारी, कलकत्त्याच्या 'स्टेट्समन्' मध्यें हिंदी राज्यकर्त्यांवर टीकात्मक पत्रें लिहिणारा. मृ. मे १८८९

## इ

इटो, प्रिन्स, जपानी मुत्सद्दी, क्रांति घडविणारा, कोरियनांकडून मारला गेला. मृ. २६-१०-०९

इनामदार, रामचंद्र निळकंठ, पुणें, भावेस्कूलचे साहाय्यक, कापशी संस्थानचे प्रायव्हेट सेक्रेटरी, इतिहास-व्यासंगी, अस्सल कागदपत्रांचे संग्राहक. मृ. फेब्रु. १९१२ (पुणें)

इनामदार, रा. ब. व्यंकटराव रुक्मांगद, बेळगांव, बी. ए., एल्एल्. बी., असि. जज्ज. मृ. फेब्रु. १८९६

इलिएट, एफ्. ए. एच्., मुंबई, बडोद्याचे सर्व्हे आणि सेटलमेंट कमिशनर, सयाजीराव गायकवाडांचे शिक्षक, स्वाभिमानी, हिंदी प्रजेचे कैवारी. मृ. १७-३-१०

## उ

उपाध्याय, स्वामी ब्रह्मबांधव, 'संध्या' पत्राचे संपादक, शुद्धिकृत हिंदु. मृ. २०-१०-०७ (कलकत्ता)

उपासनी, रा. सा., श्रीधर बाळकृष्ण, नामदार, धुळें, ज. १४-५-५७, लोकमान्यांचे सहाध्यायी परममित्र. मृ. ७-८-२८

उमर सोबानी, मुंबईचे व्यापारी, राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान पुढारी. मृ. ६-७-२६

एडवर्ड, सप्तम, इंग्लंडचे ९ वर्षे राजे, वय ६९. मृ. ६-५-१०

## ओ

ओक, वामन दाजी, कवि, विद्वान् लेखक, विविधज्ञानविस्तार व काव्यसंग्रहाचे एक संपादक, ग्रंथ :—बेकनचें चरित्र, ' गणेश-निधन, ' 'सवाई माधवरावांचा मृत्यु' (काव्यें), मोरोपंत व वामनपंडित यांच्या काव्याचे टिप्पणकार. मृ. १३-६-९७ ( नागपूर )

ओक, कृष्णाजी गोविंद, लोकमान्यांचे सहाध्यायी, निष्णात संस्कृतज्ञ, संपादित ग्रंथ:-' शाश्वत कोश ' व 'अमर कोशावरील क्षीरस्वामींची टीका. ' मृ. १५-१०-२३ ( महाड )

ओक, नानासाहेब, कल्याण, समर्थ विद्यालयाचे हितचिंतक, लोकमान्यांचे स्नेही, सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. २७-११-१०

ओंकार, रा. ब., बाबूराव भालचंद्र, म्युनि.चे कौन्सिलर, ऑन. मॅजिस्ट्रेट. मृ. २२-६-२०

## क

कचार्या, अहंमद, द. आफ्रिकेंतील हिंदी पुढारी. मृ. ऑक्टो. १९१८

कर्झन, लॉर्ड, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय ( १८९९-०५ ), ' मृतप्राय हिंदुस्थानास डिवचून जागृत करणारे, ' अरेराव, कट्टे साम्राज्यवादी. मृ. २०-३-२५

करगुद्री, नारायणराव, वकील, धारवाड, अध्यक्ष, टिळक-स्वराज्य-संघ-शाखा. मृ. ऑगस्ट १९२१

करंदीकर, रावजी बाळाजी, एज्यु. इन्स्पेक्टर. मृ. नोव्हें. १९१३ (धारवाड)

करंदीकर, व्यंकटेश बलवंत, बी. ए., एल्. एम्. अँड एस्., केसरीचे साहाय्यक. मृ. १९०४ ( गदग )

करंदीकर, सदाशिव श्रीधर, मालक, न्यू प्रिप्रेरेटरी क्लासेस, पुणें. मृ. १८९९

करमरकर, दामोदरपंत, स्वराज्यसंघाचे प्रचारक. मृ. ८-१-२० ( अमृतसर )

करंदीकर, बाळकृष्ण शंकर, बी. एस्सी., तळेगांव पैसाफंड कांच शाळेचे विद्वान्, उत्साही व कर्तव्यदक्ष व्यवस्थापक, संस्थापक ' कोंकण विद्यालय ', पेण, ग्रंथः—'वातावरण' व 'वनस्पतिशास्त्र'. मृ. नोव्हें. १९११

करशॉ, सर लुई, मुंबई, चीफ जज्ज, हायकोर्ट. मृ. १७-२-९९

कराका, डोसाभाई फ्रामजी, संपादक, जामेजमशेद, उपसंपादक, टाइम्स, मुंबई, पहिले नेटिव्ह प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट. मृ. १९०२

कशाळकर, रामचंद्रपंत, मालक व संपादक, प्रतोद, इसलामपूर. मृ. ऑक्टो. १९०३

कागलकर, श्रीमंत आबासाहेब सर्जेराव, कागलचे अधिपति, लोककल्याणाचे आस्थेवाईक पुरस्कर्ते. मृ. २०-३-८६

काजी, खानबहादूर, शहाबुद्दिन, ज. १८३२, दादाभाई नौरोजींचे मदतनीस, बडोद्याचे दिवाण, मुसलमान विद्यार्थ्यांसाठीं ६०,००० रु.ची देणगी देणारे. मृ. ६-२-००

कॉटन, सर हेन्री, अध्यक्ष, राष्ट्रीय सभा, ( १९०४ ), हिंदुस्थानचे कैवारी. मृ. २३-१०-२५

कार्डिनल मॅनिंग, प्रसिद्ध रोमन कॅथॉलिक धर्मगुरु, इंग्लंड. मृ. १८९२

काणे, डॉ. सदाशिव वामन, मुंबई, सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. १०-५-००

काथवटे, प्रो. आबाजी विष्णु, वांई, ज. १८४६, संस्कृत प्रोफेसर, डेक्कन कॉलेज, नगराध्यक्ष, अमदावाद, ग्रंथः— शिक्षण व अध्यापन, कीर्ति-कौमुदी, द्वयाश्रय कोश, अथर्ववेद-उत्तर भाग. मृ. १७-१-०७

कानिटकर, नारायण बापूजी, जुन्या मताचे पुरस्कर्ते, ट्रस्टी, संस्थान चिंचवड, सेक्रेटरी, डेक्कन कॉंग्रेस कमिटी, ग्रंथ-लेखक, नाटकें-रत्नपाल व शशिकला, सरदार बाजी देशपांडे, राजाराम, बाजीराव-मस्तानी, इ., मृ. जुलै १८९७

काब्राजी, मुंबई, पार्शी पुढारी, संपादक, 'रास्त गोफ्तार.' मृ. २५-४-०४

कॉलिन्स, मायकेल, आयरिश फ्री स्टेटचे सेनाधिपति, आयर्लंडच्या अग्रगण्य पुढाऱ्यांपैकीं एक, बंडवाल्यांच्या गोळीला बळी पडून मृ. ऑगस्ट १९२२

काळे, त्र्यंबक गुरुनाथ, पुण्यांतील वैद्य व शिक्षक, संपादक, 'समालोचक', संशोधक व लेखक, ग्रंथः—पुराणनिरीक्षण, रसायनशास्त्राचा इतिहास, इ.मृ. १२-७-१४

किचनेर, लॉर्ड, हिंदुस्थानचे सरसेनापति, महायुद्धांत हॅंपशायर बोटींत बुडून मृ. ५-६-१६

कीर्तने, रा. ब., नीलकंठ जनार्दन, दिवाण, देवास, इतिहाससंशोधक, ग्रंथः— शिवाजीचें सप्तप्रकरणात्मक चरित्र, ग्रॅंट डफवरील टीका. मृ. मार्च १८९६

कीर्तने, रा. ब., विनायक जनार्दन, ज. १८३९, नायब दिवाण, बडोदें, दिवाण, इंदूर, साहित्यसेवक, ग्रंथकार, नाटकें—सवाई माधवराव पेशवे व जयपाळ. मृ. १७-१२-९१ ( पुणें )

कीर्तीकर, रा. ब., वासुदेव जगन्नाथ, मुंबई, सरकारी वकील, हायकोर्ट, सार्वजनिक पुढारी, वय ७४. मृ. १६-८-११

किर्लोस्कर, गणेश रामचंद्र, मुंबई, हायकोर्ट वकील, वय ३८.मृ. १२-१-९२

किर्लोस्कर, बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा, मराठी संगीत नाटकाचे उत्पादक, मार्मिक व रसिक नाटककार, ग्रंथः— 'शाकुंतल,' 'सौभद्र,' 'रामराज्यवियोग'. मृ. १७-११-८५

किसनदास विष्णुदास, पुणें, गुजराथी पुढारी, लोकमान्यांचे चहाते. मृ. १७-४-२८

कीरहार्डी, मजूर पक्षाचा उत्पादक. मृ. २३-९-१५

कुंटे, डॉ., अण्णा मोरेश्वर, एम्. डी., मुंबई, पहिले एम्. डी., औद्योगिक कारखान्यांचे उत्पादक. मृ. १५-७-१८९६

कुंटे, महादेव मोरेश्वर, प्रसिद्ध वक्ते, हेडमास्तर, पूना हायस्कूल, विद्वान् लेखक, ग्रंथ :— Vicissitudes of Aryan Civilisation, राजा शिवाजी (काव्य), इ. मृ. ८-१०-८८

कुंटे, विष्णु केशव, ॲडमिनिस्ट्रेटर, देवास. मृ. १६-१-१७

कुरुंदवाडकर, श्री. गणपतराव हरिहर,

संस्थानिक, रसिक, कवि व विद्वानांचे आश्रयदाते, ग्रंथः—गंगावर्णन, गणेशपुराण इ. मृ. ३०-७-९९

कुळकर्णी, गणेश विठ्ठल, मुंबई, संपादक ' उद्यान ' व ' नवयुग, ' कादंबरीकार, लेखक व कवि. मृ. १०-५-२१ ( सांगली )

कुळकर्णी, माधव रघुनाथ, तासगांव, सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. २५-१०-२५

कुळकर्णी, वासुदेव बाळकृष्ण, राष्ट्रीय वृत्तीचे वकील, कोल्हापूर. मृ. १५-१२-२१

कुळकर्णी, सखारामपंत, चिकोडी, वकील, सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. १०-८-२१

कृपाराम, रा. ब., भीमभाई, डेप्यु. कलेक्टर, क्रॉफर्डप्रकरणाचे एक उत्पादक. मृ. १९०४

केकरे, फट्या बाबूराव, गोव्यांतील एक पुढारी, गोवें प्रांताच्या कायदेमंडळाचे लोकनियुक्त सभासद. मृ. २६-३-२७

केतकर, दाजी विष्णु, वकील, नाशिक, स्वदेशीचे पुरस्कर्ते, वय ७५. मृ. २८-१-१९

केतकर, बळवंत रावजी, रामदुर्ग, संस्कृत, ज्योतिष, वेदांत व गायन या विषयांतील प्रवीण. मृ. मार्च १९११

केतकर, रा. सा., गंगाधर नरसिंह, वकील, नाशिक, सार्वजनिक कार्यकर्ते, वय ४७. मृ. २७-६-९६

केतकर, व्यंकटेश बापूजी, ज. १८-१-५४, प्रख्यात ज्योतिषशास्त्रपारंगत, ' चित्रा 'पक्षाचे पुरस्कर्ते, ग्रंथः—ज्योतिर्गणित, केतकी, इ. मृ. ३-८-३०

केन, पार्लमेंटचे सभासद, हिंदुस्थानचे कैवारी, मद्यपाननिषेधाचे पुरस्कर्ते. मृ. १९२०

केमालपाशा, मुस्तफा, इजिप्तच्या राष्ट्रीय पक्षाचा अध्वर्यु. मृ. १९०८

केळकर, चिंतामण आत्माराम, पुणें, शिक्षक ट्रेनिंग कॉलेज, दीर्घोद्योगी, विद्वान्, मनमिळाऊ, निस्पृह, शास्त्री. मृ. फेब्रु. १९१२ ( मुंबई )

केळकर, रा. सा., दामोदरपंत, एम्. ए., रत्नागिरी हायस्कूलचे माजी हेडमास्तर, वय ४३. मृ. २०-५-०६ (पुणें)

केळकर, नारायण चिंतामण, धुळें, संपादक, काव्यसंग्रह, शिक्षक, धुळें हायस्कूल. मृ. २९-८-०४

केळकर, प्रो., वासुदेव बाळकृष्ण, ज. १८६०, इंग्रजीचे नामांकित प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज, लेखक, मराठा व केसरी, ' त्राटिका 'कर्ते. मृ. १५-५-९५

केळकर, रघुनाथ महादेव, गायकवाडींत शिरस्तेदारापासून सुभेदारीपर्यंत चढले, उद्योग व कृषि यांजकडे विशेष लक्ष. मृ. ८-३-०७

केळकर, शंकर विश्वनाथ, पुणें, चालक व संपादक, ' पुणें वैभव, ' मार्मिक लेखक. मृ. २२-११-९९

केळकर, सदाशिव पांडुरंग, स्वदेशीचे पुरस्कर्ते. मृ. २०-१२-०६ ( मुंबई )

केतकर, हरि परशुराम, चिपळूण, त्रिवलीचे खोत, देशाभिमानी, वय ३५. मृ. १९०४

कोकजे, रा. ब., केशव विठ्ठल, पुणें, सी. आय्. डी. डेप्युं. पो. सुपरिंटेंडेंट. मृ. १-११-२९

कोटिभास्कर, अनंत श्रीधर, एम्. ए., प्रो. गज्जर यांचे चेले, एनॅमलिंग व ॲालकोहलचे गुणधर्म यांबाबत शोध लावणारे ज्यु. टे. इन्स्टिट्यूटमध्यें प्रोफेसर, १९०८ मध्यें युरोपचा प्रवास, वय ३२. मृ. १४-६-१०

कोल्हटकर, भाऊराव, किर्लोस्कर ना. मं., अभिनयपटु, प्रख्यात नट व गायक. मृ. फेब्रु. १९०१

क्लार्क, मिस्, मुं. चे गव्हर्नर सरजॉर्ज, क्लार्क यांची एकुलती एक कन्या. मृ. २१-३-०९ ( पुणें )

क्लार्क, लेडी, सर जॉर्ज क्लार्क यांच्या पत्नी. मृ. ९-१२-०८ ( महाबळेश्वर )

क्लेमेंको, एम्., १९०८ सालचे फ्रान्सचे मुख्य मंत्री, जाडे मुत्सद्दी, ' तह ’च्या वाटाघाटींत प्रमुख. मृ. २४-११-२९

ख

खरे, काशिनाथ त्रिंबक, मुंबई, सार्वजनिक काकांचे सहकारी, वय ६८. मृ. २८-९-९८

खरे, गणेश सखाराम, पुणें, पेन्शनर इंजीनियर, गणिती, संशोधक, व्यासंगी, ग्रंथः—शिवकालीन जंत्री. मृ. १०-११-२२

खरे, दाजी आबाजी, बी. ए., एल्. एल्. बी., वकील, मुंबई, लोकमान्यांचे सहाध्यायी, शेवटपर्यंत स्नेही, नेमस्त पुढारी, मुं. प्रांतिक सभेचे अध्यक्ष, ( १९०३ ), बुद्धिमान, कर्तबगार. मृ. २१-८-१६

खरे, वामन सखाराम ऊर्फ बाबासाहेब, नाशिक, १९०५ ते १० च्या चळवळींचे पुढारी. मृ. १२-१-२८

खरे, वासुदेवशास्त्री, इतिहाससंशोधक व नाटककार, ऐतिहासिक लेखसंग्रहाचे कर्ते. मृ. ११-६-२४ ( मिरज )

खाडिलकर, आत्माराम नारायण, नाशिक, डॉ. भांडारकरांचे गुरु, व्याकरण व काव्यशास्त्र यांत असाधारण पारंगत, कुशाग्र बुद्धि, वय ७०. मृ. १३-११-८७ ( मुंबई )

खानापुरकर, विनायकशास्त्री, जुन्या पद्धतीचे ज्योतिषी, लीलावती व बीजगणित यांचें मराठींत भाषांतर करणारे. मृ. १-१०-१९

खैरे, गंगाधर रावजी, पुणें, कापडाचे व्यापारी, व्यावहारिक मंडळाचे सेक्रेटरी, ' सत्यप्रकाश ’ चे संपादक, मराठ्यांचे कैवारी, वय ५०. मृ. २६-१-१२

खोटे, सुंदरनाथ दिनानाथ, गिरणी एजंट, मुंबई, म्यु. मेंबर. मृ. डिसेंबर १९०३

ग

गडकरी, राम गणेश, कवि, विनोदी लेखक, नाटककार, नाटकें:—प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, एकच प्याला, भावबंधन, राजसंन्यास, इ., वय ३३. मृ. २३-१-१९

गजेंद्रगडकर, अनंताचार्य नारायणाचार्य, सातारा, उत्तम विद्वान् शास्त्री. मृ. १३-६-९३

गडबोले, बलवंत परशुराम, इंग्लंड व अमेरिकेंत इंजिनियरिंग व शेतकीचे तज्ज्ञ झालेले, वय ३५. मृ. १८८७

गद्रे, बापूराव, पुणें, जुन्या चालींचे, धर्मशील, प्लेगांत व दुष्काळांत गरिबांचे त्राते. मृ. २७-७-९७

गद्रे, लक्ष्मण दाजी, बी. ए., एल्. एम्. ॲन्ड एस्., नागपूर, कट्टे स्वदेशभक्त. मृ. ११-२-२१

गरुड, धोंडो नारायण, १८७० मध्यें इंदूरचे मुख्य न्यायाधीश, खानदेशांतील पुढारी. मृ. १४-११-०३ (धुळें)

गर्दे, खंडो कृष्ण ऊर्फ बाबा, सुप्रसिद्ध वेदान्ती, सरस कवि, गीतामृत शतपदी, गीता पंचदशी, ब्रह्म-सिद्धांत-माला- इ. ग्रंथांचे कर्ते, वय ७८. मृ. १३-८-२६

गंगाधरस्वामी, चाफळ संस्थानचे अधिकारी. मृ. २३-१-०२८

गाडगीळ, रा. ब., जनार्दन सखाराम, इंदुप्रकाशचे इंग्रजी लेखक व मालक, हायकोर्ट जज्ज व बडोद्याचे नायब दिवाण, थिऑसॉफिस्ट, दाते, वय ५८. मृ. ९-१०-००

गांधी, वासुदेव शंकर, बी.ए., एल्एल्. बी., पुणें, सुखवस्तु, विद्वान, उत्साही कार्यकर्ते. मृ. जानेवारी १९०९

गायकवाड, श्री. जमनाबाईसाहेब, ज. १८५३, खंडेरावमहाराज यांच्या पत्नी, दानशूर, धोरणी व दूरदर्शी. मृ. २९-११-९८

गायकवाड, श्री. शिवाजीराव, श्री. सयाजीराव यांचे तृतीय चिरंजीव, मुंबई व ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटींत विद्यार्जन, मर्दानी खेळांत प्रवीण, स्वभावानें उमदे, अकालीं मृ. २४-११-१९

गार्फील्ड, जेम्स्, अमेरिकन प्रेसिडेंट. मृ. २७-९-८१

गुंजीकर, रामचंद्र भिकाजी, मुंबई, मराठी भाषेचे उपासक व मर्मज्ञ, 'विविधज्ञान विस्तारा'चे मूळ उत्पादक, मोचनगड, अभिज्ञान शाकुंतल, सुबोध चंद्रिका, इ. ग्रंथांचे-लेखक, साधे व भिडस्त. मृ. १८-६-०१

गुंड, नाना दादाजी, पुणें, वर्तमानपत्रांचे व्यापारी व २६ वर्षे संपादक, वय ५५. मृ. २१-८-१९

गुणे, डॉक्टर पांडुरंग दामोदर, एम्. ए., पीएच्. डी., फर्ग्युसन कॉलेजचे प्रोफेसर, विद्वान् संस्कृतज्ञ, मनमिळाऊ, गोड स्वभावाचे. मृ. २५-११-२२ (सांगली)

गुरुजी, कृष्णाजी आबाजी, टिळकचरित्रकर्ते व गोरक्षणाचे पुरस्कर्ते, 'कालिदास'चे चालक, इनॉक्युलेशनच्या जुलमाविरुद्ध चळवळ करणारे. मृ. १५-११-२३ (खरवली)

गुर्जर, मुकुंद बाळकृष्ण, बी. ए., मुंबई, राष्ट्रीय चळवळींत पुढाकार घेणारे, नेटिव्ह इन्स्टिटयूशनचे व दैनिक 'प्रभाकर'चे चालक. मृ. २०-१-००

गेरि ग्रॅटेन, मुंबई, म्यु. गॅझेटचे मालक व प्रकाशक, मुंबई कॉर्पो. चे अध्यक्ष. मृ. सप्टें. १९००

गोखले, डॉ. काशिनाथ नारायण, मुंबई, भारतीय औषधी शाळेचे चालक. मृ. ३०-६-०७

गोखले, रा. सा., गणपतराव नारायण, वकील, नागपूर, पुलगांव मिलचे उत्पादक, दानशूर [ शिक्षण-प्रसारक-मंडळी ५००० रु., शिवाजी-मंदिर १५००० रु. ] वय ८५. मृ. ५-२-१९

गोखले, गणपतराव, 'नेटिव्ह ओपिनियन'चे संपादक. मृ. फेब्रुवारी १९००

गोखले, प्रो., गोपाळ कृष्ण, पुणें, न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज यांत अध्यापक, वरिष्ठ कौं.चे सभासद, अर्थशास्त्रज्ञ, कळकळीचे राजमान्य देशभक्त, लोकमान्यांचे प्रतिपक्षी, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसा.चे संस्थापक, मवाळाग्रणी, उत्कृष्ट वक्ते, वय ४९. मृ. १९-२-१५

गोखले, महादेवबुवा, गवई, मिरज, गायनशास्त्रावर आर्यारूप ग्रंथ करणारे, वय ८४. मृ. ११-१२-००

गोखले, त्रिंबक बळवंत, एम्. ए., पुणें, प्रिन्सिपॉल, नेटिव्ह इंस्टिट्यूट, प्रोफेसर, महाराष्ट्र कॉलेज. मृ. डिसेंबर १९०३

गोखले, हरि नारायण, आर्यभूषणचे पातीदार व्यवस्थापक, केसरी-मराठ्याचे प्रकाशक. मृ. २-१-११

गोडबोले, केशव पांडुरंग, पुणें, सार्वजनिक कार्यकर्ते, सार्वजनिक सभेचे सेक्रेटरी, वक्तृत्वोत्तेजक सभेचे उत्पादक, प्रार्थनासमाजी. मृ. ३१-१२-९९

गोडबोले, नारायणशास्त्री, माहुली, काव्य, व्युत्पत्ति व व्याकरण यांत विशेष प्रवीण, डेक्कन कॉलेजांतील जागा नाकारणारे, वय ७५. मृ. २०-११-१०

गोडबोले, रघुनाथ भास्कर, पुणें, ग्रंथः—प्राचीन व अर्वाचीन ऐतिहासिक कोष, वेदान्तपर वाङ्मय. मृ. जुलै १८८७

गोडबोले, रावजीशास्त्री, महाराष्ट्रभाषाभिज्ञ, ज. १८३४, तीव्र बुद्धि, दक्षिणा प्राइझ कमिटीचे सेक्रेटरी, उत्तम शिक्षक, सर अलेक्झँडर, वर्डस्वर्थ, कॉर्न वगैरेंचे शिक्षक. मृ. ८-९-९१

गोपाळ शिवराम, डॉ., मुंबईचे प्रसिद्ध शस्त्रवैद्य, वय ५०. मृ. ऑक्टो. १८९०

गोळे, महादेव शिवराम, प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज, ग्रंथः—हिंदु धर्म आणि सुधारणा, ब्राह्मण व त्यांची विद्या, वय ४७. मृ. ८-१०-०६

ग्यांबाटा, फ्रेंच मुत्सद्दी, वय ४४. मृ. डिसें. १८८२

घ

घाडगे, श्री. सर बापूसाहेब कागलकर, सी. आय्. ई., कागल संस्थानच्या थोरल्या पातीचे अधिपति, वय ५०. मृ. ९-५-२६

घाटे, डॉ. विनायक सखाराम, एम्. ए., पीएच्. डी., स्वावलंबी, डेक्कन कॉलेजचे प्रोफेसर, केंब्रिज व पॅरिस येथील डॉक्टर पदवीधर, हुषार, बहुभाषी, वय ३९. मृ. जुलै १९१९

घाणेकर, बाळशास्त्री, धुळें, मार्मिक विनोदी वक्ते, प्रख्यात शास्त्री. मृ. ऑगस्ट १८९९

घोरपडे, श्रीमंत रावसाहेब, एम. ए., इचलकरंजी संस्थानचे युवराज, अलाहाबाद कॉलेजांत प्रोफेसर. मृ. ७-११-२४

घोले, रा. ब., डॉक्टर, विश्राम रावजी, व्हाइसरॉयांचे सर्जन, शस्त्रनिपुण लष्करी डॉक्टर. मृ. १०-९-००

घोष, सर चंद्रमाधव, हायकोर्ट जज्ज, नामांकित कायदेपंडित, बंगाल कायदेकौन्सिलचे सभासद, वय ८०. मृ. २०-१-१८

घोष, मानुलाल मोहन, बंगाल्यांतील विद्वान् वक्ते, राजकीय पुढारी, १९०३ च्या मद्रास कॉंग्रेसचे अध्यक्ष. मृ. १८-९-०९

घोस, बाबू मनमोहन, कलकत्ता,

राष्ट्रीय सभेचे आधारस्तंभ. मृ. ऑक्टोबर १८९६

घोस, बाबू मोतीलाल, अमृतबझार पत्रिकेचे संपादक, वय ७७. मृ. ५-९-२२

घोस, रासविहारी, एल्एल्. डी., बंगालचे कायदेपंडित, वरिष्ठ कायदे-कौन्सिलांत व सिनेटमधील सभासद, दानशूर. मृ. २८-२-२१

च

चक्रदेव, रा. सा., दिनकर बल्लाळ, वकील, सोलापूर, खटपटी, सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. ८-३-९७

चांदोरकर, गोविंद काशिनाथ, धुळें, वकील व इतिहाससंशोधक, प्रभात मासिकाचे चालक. मृ. नोव्हें. १९२१ ( धुळें )

चांदोरकर, दिनकर त्र्यंबक, पुणें, संस्कृत प्रो., फर्ग्यु., कॉलेज सटीप काव्य-प्रकाशकर्ते. मृ. ऑगस्ट १९००

चिटणीस, जीवनराव त्रिंबक, सायन-वादी ज्योतिषाचे व्यासंगी. मृ. १३-२-०९

चिटणीस, मल्हार खंडेराव, उमरावती, वकील, ग्रंथकार, कवि, समाजसुधारक. मृ. एप्रिल १९०८

चिपळूणकर, गणेश विष्णु, पुणें, को-ऑपरेटिव्ह स्वदेशी मॅन्युफॅ. डेपोचे सेक्रे-टरी, भागवत, रामायण वगैरेंचीं भाषांतरें करविणारे. मृ. एप्रिल १९०६

चिपळूणकर, बडोद्याचे विख्यात डॉक्टर, मराठी वाङ्मयाचे व्यासंगी, हिंदुस्थानांतील सर्प, मृगया, कुतूहल इ. ग्रंथांचे कर्ते. मृ. नोव्हें. १९१६

चिपळूणकर, रा. ब., हरि रावजी, पुणें, सन्मान्य, लोकहिततत्पर, शिक्षणप्रेमी गृहस्थ. मृ. ५-३-९६

चिपळूणकर, लक्ष्मण कृष्ण, विष्णु-शास्त्री यांचे धाकटे बंधु व चरित्रकार, ग्रंथः—महाराष्ट्राचा इतिहास, वय ४८. मृ. २ मे १९००

चिपळूणकर, विनायकराव, विष्णु-शास्त्री यांचे चुलत बंधु, चित्रशाळेचे मॅनेजर, वय ५०. मृ. जुलै १९००

चिपळूणकर, विष्णु कृष्ण, बी. ए., मराठी भाषेचे ' शिवाजी,' निबंधमाला-कर्ते, न्यू इंग्लिश स्कूल, चित्रशाळा, केसरी-मराठा, काव्येतिहाससंग्रह, इत्यादि संस्थांचे संस्थापक. मृ. १७-३-८२

चोभे, भिवाजी अमृत, युनि. पूर्वीचे ग्रँ. मेडिकल कॉ.चे पदवीधर, शरीर व इंद्रियविज्ञानशास्त्र यांवरील लेखक, वय ८५. मृ. १९-१०-१९

चौधरी, सर आशुतोष, कलकत्ता हाय-कोर्टाचे १० वर्षे जज्ज, जमीनदार असो-सिएशनचे चिटणीस. मृ. मे १९२४

चौधरी, तुकाराम जावजी, जे. पी., निर्णयसागर छापखान्याचे मालक, उदार, उद्योगी व मनमिळाऊ. मृ. २४-४-१८

चौधरी, रामभुज दत्त, पंजाबचे पुढारी, लाहोरचे वकील, उत्तम वक्ते, सरकारच्या डोळ्यांत सलणारे, बंगाली विदुषी सरला-देवींचे यजमान, सुधारक, असहकारितेच्या चळवळींत पुढारी, वय ५५. मृ. ६-८-२३ ( मसुरी )

छ

छत्रे, काशिनाथपंत, छत्रे सर्कसचे चालक. मृ. ११-१२-१४ ( पुणें )

छत्रे, केरो लक्ष्मण, उत्तम गणिती, डेक्कन कॉलेजचे प्रोफेसर, अनुपमेय विद्याव्यासंगी. मृ. १८-३-८५

छत्रे, नीलकंठ विनायक, बी. ए., एल्. सी. ई., गणिती, केरूनाना छत्रे यांचे ज्येष्ट चिरंजीव, लोकमान्यांचे गुरुबंधु, शाळाखात्यांत इन्स्पेक्टर, वय ७७. १-३-२७

छत्रे, श्रीपतराव अनंत, बेळगांव, वकील, कॉंग्रेसचे अनुयायी, मुं. कौ. चे सभासद, स्पष्ट वक्ते. मृ. डिसें. १९१७

छत्रे, विष्णुपंत, सर्कसच्या धंद्याचे उत्पादक. मृ. २०-२-०६

ज

जठार, रा. ब., श्रीराम भिकाजी, बी. ए., सी. आय्. ई., वऱ्हाडांतील शाळाखात्याचे डायरेक्टर. मृ. १३-१२-९९

जमशेटजी जिजीभाई, बॅरोनेट, पार्शी समाजाचे पुढारी, सरकारी मोठ्या हुद्याचे नोकर. मृ. १७-६-०८

जमशेटजी जिजीभाई, याच घराण्यांतील चवथे बॅरोनेट, कलेक्टरच्या हुद्यापर्यंत चढलेले, दानशूर. मृ. १७-६-०८

जमखिंडीकर, श्रीमंत भाऊसाहेब, जमखिंडीचे अधिपति, शिक्षणाभिमानी, हत्तीखालीं सांपडून मृ. २५-२-२४

जव्हेरी, शेठ डायाभाई धोलशाजी, नाटक मंडळींचे मालक, दानशूर, दुष्काळग्रस्तांस एक लाख व धर्मकृत्यांस दोन लाखांची देणगी देणारे. मृ. १-५-०२

जाधव, खासेराव, बडोदें संस्थानांतील अधिकारी, मराठासमाजाचे कर्तबगार पुढारी. ग्रंथः—'Wake Up Princes.' मृ. ६-१०-२४

जावजी दादाजी, जे. पी., मुंबई, निर्णयसागर छापखान्याचे संस्थापक, वय ५२. मृ. ५-४-९२

जिनसीवाले, प्रो., श्रीधर गणेश, मुंबई, प्रोफेसर, विल्सन कॉलेज, विद्वान्, व्यासंगी उत्तम वक्ते. मृ. १८-८-०३

जोग, नीलकंठ दामोदर, पुणें, पेढीवाले, शिवाजी उत्सवाचे सेक्रेटरी, सार्वजनिक कार्यकर्ते, वय २८. मृ. ऑगस्ट १९००

जोग, विनायक शिवाजी, पंढरपूर, वकील, कांग्रेसभक्त, सत्यशोधकी अत्याचारांच्या रिपोर्टाचे प्रकाशक. मृ. २३-५-२३

जोग, विष्णुबुवा, पुणें, मल्लविद्यापारंगत, वारकरीशिक्षण संस्थेचे संस्थापक, तुकाराम म. चे सार्थ अभंग, चांगदेव पासष्टी, ज्ञानेश्वरी वेंचे, इ. ग्रंथांचे कर्ते, उत्तम निरूपणी कीर्तनकार, ब्रह्मचारी. मृ. ४-२-१९२०

जोगळेकर, अंताजी रामचंद्र, 'धारवाड वृत्त' पत्राचे मालक व संपादक. मृ. १९०४

जोगळेकर, नारायण दत्तात्रय, किर्लोस्कर संगीत नाटक मंडळीचे प्रमुख नट व गवई. मृ. १५-११-११ ( मिरज )

जोगळेकर, रा. ब., रामचंद्र बलवंत, पुणें, लँड रेव्हिन्यू खात्यांतील अधिकारी. मृ. १७-४-२८

जोगळेकर, लक्ष्मण बल्लाळ, ठाणें जिल्ह्यांतील वकील व पुढारी. मृ. १०-७-०७

जोशी, डॉ. आनंदीबाई, शिक्षणा-

करितां अमेरिकेस गेलेली पहिली महाराष्ट्रीय स्त्री. मृ. फेब्रु. १८८७

जोशी, रा. ब., गणेश व्यंकटेश, ज. १८५१, बी. ए., हेडमास्तर, गोखल्यांचे अर्थशास्त्रीय गुरु, मुंबई कौन्सिलचे सभासद, प्रसिद्ध आंकडेशास्त्री, निर्भीड टीकाकार. मृ. २०-५-११

जोशी, गोपाळ विनायक, लेखक—विलायतचा प्रवास, डॉ. सौ. आनंदीबाई जोशी यांचे पति, आनंदीबाईंना परदेशांत जाऊन शिक्षण घेण्यास कारणीभूत, धीट, विनोदी, विक्षिप्त. मृ. ऑक्टो. १९२२

जोशी, गोविंद बाबाजी, बडोदें संस्थानांतील सार्वजनिक कार्यकर्ते, स्वदेशी व शिवाजी उत्सवाचे संचालक. मृ. १-५-०६ ( वसई )

जोशी, धुंडिराज सदाशिव, वांई, उपसंपादक, जगद्धितेच्छु. मृ. ४-९-००

जोशी, रा. ब., बलवंत नारायण, बी. ए., एल्एल्. बी., कोल्हापूर, न्यायाधीश, रामशास्त्र्यांचा अवतार. मृ. २३-२-९८

जोशी, महादेव मल्हार, एम्. ए., प्रोफेसर, बहूद्दिन कॉलेज, जुनागड, वक्ते व केसरींतील लेखक, ग्रंथः—आधुनिक सुशिक्षितांचा वेदांत. मृ. १६-४-२८

झ

झगलूलपाशा, लोकप्रिय पुढारी, विद्वान् बॅरिस्टर, उत्कृष्ट वक्ता, अनुभवी मुत्सद्दी, इजिप्तचा स्वातंत्र्यदाता, वय ७७. मृ. २४-८-२७.

झळकीकर, महामहोपाध्याय, भीमाचार्य, संस्कृताध्यापक, एलफिन्स्टन् कॉलेज, ग्रंथः-न्यायकोश. मृ. १०-५-०६

ट

टागोर, जतींद्र मोहन, के. सी. आय्. ई., महाराजा बहादुर, जमीनदारांचे घरंदाज पुढारी, इंग्रजी व संस्कृत भाषांत प्रवीण, काव्य व गायन रसज्ञ. मृ. १०-१-०८

टाटा, सर जमशेटजी नसरवानजी, मुंबईचे कोट्याधीश व्यापारी, दानशूर. मृ. १९-५-०४ ( नौहीम, जर्मनी )

टाटा, सर रतन, दानशूर, कर्तबगार, व्यापारी व कारखानदार. मृ. ७-९-१८

टॉलस्टॉय, काउंट, तत्त्वज्ञ, रशियांतील 'महात्मा गांधी,' कादंबरीकार, लेखक, नाटककार व साधुपुरुष. मृ. २०-१०-१०

टिकेकर, रामचंद्र विनायक, ऊर्फ धनुर्धारी, केसरीचे लेखक, ग्रंथकर्ते, बहुश्रुत, विविध विषयांवरील अभिनव वाङ्मयाचे निर्माते, ग्रंथ—वाईकर भटजी, व्यापारी भूगोल, वगैरे. मृ. ११-१०-०७ ( सोलापूर )

टिळक, लोकमान्य बाळ गंगाधर, बी. ए., एल्एल्. बी., राष्ट्रसूत्रधार, प्रसिद्ध राजकारणपटु, Father of Indian Unrest, गणपती व शिवाजी उत्सवांचे उत्पादक, केसरी-मराठाचे संपादक, होमरूल लीगचे संस्थापक, गीतारहस्य, ओरायन, आर्कटिक होम इन् दि वेदाज् यांचे कर्ते, प्राच्यविद्यासंशोधक, लोकोत्तर देशभक्त, अद्वितीय बुद्धिमान्, पट्टीचे विद्वान्. ज. २३-७-५६ (रत्नागिरी), मृ. १-८-२० ( मुंबई )

टिळक, सखाराम महादेव, वॉचमेकर, वय ५४. मृ. ८-७-००

टेंपल, सर रिचर्ड, मुंबईचे गव्हर्नर, १८७७—८०. मृ. १९०२

ठ

ठाकुरदास, आत्माराम, एम्. ए., एल्एल्. बी., कोल्हापूर खटल्यांत केसरीचे सॉलिसिटर. मृ. १०-६-८४

ठाकूरसाहेब, तख्तसिंगजी, भावनगरचे महाराज, विद्वान्, प्रजाहिततत्पर. मृ. जाने. १८९६

ड

डफरिन, मार्किस ऑफ, निरनिराळ्या देशांतील ब्रिटिश वकील, कॅनडाचे गव्हर्नर, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय (१८८४ ते १८८८), अनुभविक व वृद्ध मुत्सद्दी, स्वभाव जात्या उमदा. मृ. १९०२

डफळे, राजे अमृतरावसाहेब, जतचे अधिपति. मृ. १९-१-९२

डिग्बि, वुइल्यम, हिंदुस्थानचे कैवारी, पार्लमेंटचे सभासद, मद्रास टाइम्स व इंडिया पत्रांचे संपादक, 'प्रॉस्परस इंडिया'चे लेखक. मृ. सप्टें. १९०४

डेगवेकर, बाळशास्त्री बुवा, वांई, न्यायशास्त्रपंडित. मृ. कार्तिक शु. ९ शके १८३५

ढ

ढमढेरे, हरि रामचंद्र ऊर्फ भाऊ-साहेब, पुणें, वेदपाठशाळाध्यक्ष. मृ. २-११-१९

त

तय्यबजी, बद्रुद्दिन, हायकोर्ट जज्ज, मुंबई, तिसऱ्या कांग्रेसचे अध्यक्ष. मृ. ऑगस्ट १९०६ ( इंग्लंड )

तारा बाबासाहेब, श्री. सावंतवाडीच्या राणीसाहेब. मृ. २२-६-९७

तुकाराम तात्या, वांद्याचे थिऑ-सफिस्ट, तत्त्वविवेचक छापखान्याचे मालक. मृ. ३-६-९८

तेलंग, काशिनाथ त्र्यंबक, न्यायमूर्ति, ज. ३०-८-५०, हायकोर्ट जज्ज, कौन्सिलचे सभासद, विद्वन्मान्य निबंध-लेखक, निर्व्यसनी, सुस्वभावी, मन-मिळाऊ, राष्ट्रीय सभेचे पुरस्कर्ते, विद्या-व्यासंगी. मृ. ३०-८-९३

त्रिपाठी, गोवर्धनराम माधवराम, हायकोर्ट वकील, गुजराथी ग्रंथकार, सरस्वतीचंद्र, स्नेहमुद्रा इत्यादींचे कर्ते, वय ५१. मृ. जाने. १९०७

त्रिलोकेकर, सोकर बापूजी, हायकोर्ट ट्रान्स्लेटर, चांगले मराठी ग्रंथकार, सं. नलदमयंती, सं. हरिश्चंद्र, सं. सावित्री इ. नाटकांचे कर्ते. मृ. ३०-१०-०८

त्र्यंबककर, माधवबुवा, बडोदें, जुन्या पिढींतील कीर्तनकार, वय ५३. मृ. २०-८-२७

थ

थत्ते, सदाशिवशास्त्री, पिढीजात शास्त्री. मृ. मार्च १८९३

द

दत्त, बाबू रमेशचंद्र, ज. १८४३, आय्. सी. एस्., अर्थशास्त्रीय तज्ञ, ग्रंथ लेखक, [ Economic History of India, Civilization in Ancient India, अनेक इंग्रजी कादंबऱ्या ], लखनौ कॉंग्रेसचे ( '९९ ) अध्यक्ष, १९०४-०७ बडोद्यास मुख्य दिवाण. मृ. ३०-११-०९

दयानंद सरस्वती, जन्म १८२४, खरें नांव-मूळशंकर अंबाशंकर, आर्यसमाजाचे संस्थापक, हिंदुस्थानचे 'मार्टिन ल्यूथर', वय५९. मृ. ३०-१०-८३ (अजमीर)

दरेकर, गोविंद त्र्यंबक, ऊर्फ कवि गोविंद, नाशिक, 'स्वातंत्र्यशाहीर,' उज्ज्वल प्रतिभेचे राष्ट्रीय कवि. मृ. २८-३-२६

दवंडे, गणपतराव, यवतमाळ, लोकनायक अणे यांचा उजवा हात, टिळकांच्या वऱ्हाडांतील दौऱ्याचे व्यवस्थापक. मृ. २९-१२-१८

दक्षिणामूर्ति स्वामी, काशींतील विद्वान् संन्यासी. मृ. जुलै १९००

दस्तुर, सरदार बहाद्दर, हुशंग तमास, पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतील अध्यापक, अनेकभाषाकोविद. मृ. एप्रिल १९०८

दवे, सीताराम दुर्गादास, एलएल्. बी., प्राचीन-विद्यासंशोधक, वय ४७. मृ. १९०६

दातार, गंगाधरशास्त्री, धर्मशास्त्रज्ञ. मृ. ३०-४-८८

दातार, श्रीधर नारायण, मराठी व संस्कृतचे व्यासंगी, मुंबईवैभवाचे संपादक व सरस्वती-मंदिराचे लेखक. मृ. १६-५-०७

दातार, सदाशिवराव, सांगलीचे प्रख्यात पलायनपटु. मृ. जून १९०५

दाते, डॉ. लक्ष्मण गणेश, एल्. एम्. अॅन्ड एस्., डायरेक्टर, स्वदेशी स्टीम नॅव्हिगेशन कं., उत्तम डॉक्टर, वय ४२. मृ. ६-१०-२०

दाते, रा. सा., श्रीधर विठ्ठल, पुणें, शरिरानें भव्य, बुद्धीनें तीक्ष्ण, स्वभावानें कडक, थोडेसे विचित्र, सार्वजनिक कार्यकर्ते, वय ६०. मृ. २३-२-९९

दाते, सखाराम दामोदर, खेडकर वैद्य. मृ. जुलै १८९९

दामले, मोरो केशव, नागपूर, नागपूरच्या नील सिटी स्कूलचे हेडमास्तर, व्याकरण व न्यायशास्त्रांतील लेखक, आगगाडीच्या अपघातानें मृत्यु ३०-४-१३

दामले, सीताराम केशव, बी. ए., एल्. एल्. बी., वकील, पुणें, केशवसुतांचे बंधु, राजकारण व राष्ट्रमताचे संपादक, ' जग हें त्रिविध आहे' इ. कादंबऱ्यांचे लेखक, हुषार वक्ते व लेखक. मृ. १६-१०-२७

दास, चित्तरंजन, देशबंधु, कलकत्ता, अव्वल दर्जाचे बॅरिस्टर, क्रांतिकारकांचे वकील, बंगालचे ' कर्ण,' गया कॉंग्रेसचे अध्यक्ष, 'फॉर्वर्ड'चे संस्थापक, प्रां. कौं. चे सभासद, उत्तम वक्ते. मृ. १६-६-२५

दिवेकर, महादेव बाळकृष्ण, वसईचे वकील. मृ. २२-१-१४

दिवेकर, सदाशिव महादेव, कल्याण, इतिहाससंशोधक, 'शिवभारत' व 'पर्णालपर्वतग्रहणाख्यान ' यांचे संपादक. मृ. १०-५-३०

दीक्षित, गणेश, साकुर्डीकर, पुणें, जुन्या घराण्यांतील वैदिक ब्राह्मण. मृ. जून १८९४

दीक्षित, शंकर बाळकृष्ण, प्रसिद्ध ज्योतिषी, ट्रे. कॉ. प्रोफेसर, सृष्टचमत्कार, ज्योतिर्विलास, भारतीय ज्योतिःशास्त्र, इंडियन कॅलेंडर, वगैरेंचे कर्ते. मृ. २७-४-९८ ( पुणें )

दीक्षित, हरि, सीताराम, मुंबई, जे. पी., सॉलिसिटर, मुं. कौन्सिलचे सभासद. मृ. ५-७-२६

देवगांवकर, वासुदेवशास्त्री, पुणें, ज्योतिष, धर्मशास्त्र व श्रौत इत्यादी वरील अधिकारी तज्ज्ञ. मृ. १७-१-००

देवकीनंदन महाराज, गोस्वामी, गुजराथेंतील वैष्णव सांप्रदायाचे आचार्य, संस्कृत भाषेंतील विद्वान् पंडित. मृ. ऑगस्ट १९१३

देवधर, सीताराम गणेश, सातारा न्यू इं. स्कूलचे संस्थापक, समाजसुधारक. मृ. ४-१२-२५

देवल, गोविंद बल्लाळ, उत्कृष्ट नट, कवि, 'शारदा 'कर्ते प्रसिद्ध नाटककार. मृ. १४-६-१६ ( मिरज )

देवल, व्यंकटराव, ग्रेट इंडियन सर्कसचे मालक. मृ. ८-८-२१ (मिरज)

देवळे, चिंतामण सखाराम, मुंबई, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे सभासद, मुंबईवैभव छापखान्याचे व्यवस्थापक. मृ. २१-१२-२७

देशपांडे, जयराव, एम. ए., एल्एल्. बी., विजापूरचे प्रसिद्ध असहयोगी वकील, 'कर्नाटक वैभव 'चे संपादक. मृ. जून १९२२

देशपांडे, नारायण गणेश, डे. कलेक्टर, सांगली संस्थानचे जॉइंट ॲडमिनिस्ट्रेटर. मृ. २७-५-१८ ( महाबळेश्वर )

देशपांडे, नारायण सीताराम, खेड, पुणें जिल्हा लोकलबोर्डाचे राष्ट्रीय वृत्तीचे सभासद. मृ. २५-१-३०

देशपांडे, बलवंत बावाजी, अहमदनगर, वकील, राष्ट्रीय पक्षाचे पुढारी. मृ. १२-८-१४

देशपांडे, शामराव प्रल्हाद, यवतमाळ, वऱ्हाडचे कट्टे होमरूलर, टिळकांचे निस्सीम भक्त, शांत विचारी, कल्पक बुद्धीचे, करारी, खऱ्या कळकळीचे पुढारी, मर्दानी खेळांचे चहाते. मृ. १-१-२३

देशमुख, गणेश कृष्ण, संस्कृत प्राइझमन, नामांकित वकील, 'नेटिव्ह ओपीनियन 'मधील लेखक. मृ. २९-१०-९७

देशमुख, सरदार, रा. ब., गोपाळराव हरि, ऊर्फ लोकहितवादी, दांडगे लेखनव्यासंगी. मृ. १८९२

देशमुख, डॉ. मोरेश्वर गोपाळ ऊर्फ नानासाहेब, मुंबईचे लोकप्रिय पुढारी, धार्मिक वृत्तीचे, राष्ट्रीय पक्षाचे, लोकमान्यांचे अनुयायी. मृ. १६-७-२८

देशमुख, रघुनाथ गोपाळ, बी. ए., मुंबई, हायकोर्ट ट्रान्सलेटर. मृ. जुलै १८९९

देशमुख, विनायक माधव, नागपूर, प्रमुख सुधारक व कॉंग्रेसभक्त. मृ. जाने. १९२०

देसाई, अनंत शिवाजी, टोपीवाले, मुंबई, भांड्यांचे कारखानदार, चित्रांचे व्यापारी, दानशूर. मृ. १५-४-२१

देसाई, इच्छाराम सूर्यराम, 'गुजराथी'चे संपादक व संस्थापक, खंदे गुजराथी 'पत्रपट्ट,' टॉडचें राजस्थान, काव्यदोहन वगैरे पुस्तकांचे लेखक, वेदांती, वय ५६. मृ. ५-१२-२२

देसाई, वामन गणेश, वांद्रें, डॉक्टर, ग्रंथलेखक. मृ. २६-५-२८

देसाई, शांताराम अनंत, इंदूरच्या कॉलेजांतील तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर व वेदांतलेखक. मृ. मार्च १९१४

दोशी, शेठ, सखाराम नेमचंद पूरचे दानशूर जैन पुढारी, धर्मनिष्ठ, सचोटीचे दीर्घोद्योगी व्यापारी, वय ७०. मृ. २१-८-२३

## ध

धरमसी, अब्दुल मेहरअली, लोकसेवातत्पर, खोजा जातींतील बडे विद्वान्, नामांकित सॉलिसिटर, मुं. कौंसिलचे सभासद. मृ. ९-९-९७

## न

नगरकर, रघुनाथ दाजी, पुणें, सार्वजनिक कामांत हौसेनें पडणारे, वय ५०. मृ. ४-१२-०३

नगरकर, लक्ष्मण दाजी, पुणें, एल्. सी. इ., फीमेल स्कूलमध्यें शिक्षक. मृ. ४-१२-०३

नरोत्तम मुरारजी, मुंबईचे गिरणीवाले व व्यापारी, शिंद्या स्टीम नॅ० चे एजंट. मृ. २९-१०-२९ ( लोणावळें )

नाईक, केशव बळवंत, पुणें, वकील, प्रीमियर फ्रुट प्रॉडक्टस् कंपनीचे डायरेक्टर व आधारस्तंभ. मृ. ६-११-२४

नाझर, मनसुखलाल हिरालाल, दक्षिण आफ्रिकेंतील पुढारी, 'इंडियन पीपल्स'चे उपसंपादक. मृ. १९-१-०६ ( दरबान )

नातु, सरदार बळवंत रामचंद्र, ऊर्फ बाळासाहेब, पुणें, १८९७च्या पुणें-प्रकरणांतले नजरकैदी. मृ. २९ डिसें. १९१४

नातु, विष्णु रघुनाथ, बी. ए., एल्-एल्. बी., बेळगांव, वकील. ग्रंथः-रशिया; महादजी शिंदे. मृ. १-३-१९

नाडकर्णी, पुरुषोत्तम गोविंद, मुंबई, विविधज्ञान विस्ताराचे व्यवस्थापक. मृ. ऑगस्ट १९००

नानाभाई हरिदास, ऑनरे. जस्टिस, ज. १८३२, हायकोर्ट जज्ज १८७३ मंडलिकांचे समकालीन व समान दर्जाचे प्रतिस्पर्धी, विनोदी निबंधलेखक. मृ ?

नाना मोराजी, मुंबईचे प्रे. मॅजिस्ट्रेट, पुण्याचे डेप्युटी कलेक्टर. मृ. १९-५-९५

नाना मोरोबा, सरदार, जे. पी., मुंबई. मृ. ३०-३-९६

नामजोशी, माधवराव बल्लाळ, पुणें, लोकमान्यांचे सहकारी, वर्तमानपत्रकार, डेक्कन ए. सो. चे आधारस्तंभ, उद्योगी, साहसी, हुषार, धैर्यवान्, पुणें म्यु.चे सभासद, किरण, केसरी, डेक्कनस्टार, मराठा यांचे उत्पादक. मृ. १४-१-९६

नायडू, रा. ब., नारायणस्वामी, नागपूर, नागपूर कॉंग्रेसच्या वेळीं स्वागताध्यक्ष. मृ. २-६-९६

नॉर्थब्रुक, लॉर्ड, व्हाइसरॉय, १८७२-७६, सरहद्दीच्या धोरणाबद्दल कॅबिनेटशीं मतभेदामुळें राजीनामा दिला, उदार व कोमल मनाचे. मृ. १९०४

निलजकर, बेळगांव, काड्यांच्या पेट्यांचे कारखानदार, जपानांतून विणकामाचें शिक्षण घेऊन आलेले. मृ. मार्च १९२३

नूलकर, रा. ब., कृष्णाजी लक्ष्मण, स्वावलंबनानें वैभवी झालेले, करारी व निश्चयी. मृ. २८-३-९३

नेने, बजाजी बाळाजी, वैद्य, पुणें हायस्कूलचे ड्रॉइंगमास्तर, सैरंध्री नाटक व सिंधुनदवर्णन यांचे कर्ते, वनस्पतींचा अपूर्ण सचित्र कोश, संस्कृत, इंग्रजी, सिंधी भाषाकोविद, तापट, निस्पृही, वय ७०. मृ. १६-१०-००

नेने, विनायक नारायण, वेधशाळेंतील

कामगार, पंचांगसुधारणेच्छु, ग्रंथलेखक. मृ. १-३-०७

नेने, यशवंत विष्णु, खजिनदार, लोकमान्यांचे स्नेही, निरनिराळ्या सार्वजनिक निधींचे ट्रस्टी व खजिनदार, हिशेबी, प्रामाणिक. मृ. १३-७-३०

न्यूजंट, सी.एस्. आय्., मुंबई, मुख्य कौन्सिलर,' ९७ च्या दुष्काळांत व्यवस्थापक, कर्तबगार कुरेंबाज व घमेंड- वय ५६. मृ.ऑगस्ट १९००

नौरोजी, दादाभाई, महर्षि, ज. १८२५, बडोद्याचे दिवाण, लंडनमधील हिंदी संस्थांचे प्रमुख कार्यकर्ते, कलकत्ता ('०६ व '०६), लाहोर ('९३) अशा तीन काँग्रेसचे अध्यक्ष, स्पष्ट वक्ते, धैर्यशाली, बुद्धिमान् देशभक्त, पार्लमेंटचे सभासद, 'एका श्रेष्ठ तात्त्विक सिद्धांताचे संस्थापक व प्रवर्तक,'Proverty and Un-British Rule in India' चे लेखक. मृ. ३०-६-१७

प

पटवर्धन, दत्तात्रय महादेव, बी. ए., डे. कलेक्टर, सरळ व निर्भीड स्वभावाचे. मृ. फेब्रुवारी १९१२ ( केडगांव )

पटवर्धन, श्रीमंत धुंडिराज चिंतामण, सांगलीकर, शूर, जुन्या पेशवाई चालीचे, धार्मिक, प्रजानिष्ठ. मृ. १२-१२-०१

पटवर्धन, पांडुरंग नरसिंह, पुणें, वंदे मातरम् व राष्ट्रहितेच्छु या पत्रांचे संपादक, व्युत्पन्न, इतिहाससंशोधक. मृ. ६-७-२१ ( घोडनदी )

पटवर्धन, बाबाजी काशिनाथ, चेहऱ्यावरून कुंडली वर्तविणारे, ज्योतिषी, वय ३२. मृ. ८-१०-९९

पटवर्धन, सरदार, बाळासाहेब, पुणें, प्रसिद्ध सरदार. मृ. १७-८-८७

पटवर्धन, बाळासाहेब, कुरुंदवाड (थोरली पाती), संस्थानाधिपति, सुशिक्षित, कर्ते, हौशी, वय ६०. मृ. १६-२-०८

पटवर्धन, रामचंद्र विश्वनाथ, नाशिक, सार्वजनिक कार्यकर्ते, राष्ट्रीय वृत्तीचे. मृ. आगस्ट १९००

पटवर्धन, श्रीमंत लक्ष्मणराव हरिहर, मळेकर, मिरजमळा संस्थानचे अधिपति. मृ. ७-२-९९

पटवर्धन, वासुदेव बळवंत, पुणें, प्रिन्सिपॉल फर्ग्युसन कॉलेज, सुधारकपत्राचे संपादक, उत्कृष्ट अध्यापक, रसिक, काव्य व काव्योदयकर्ते. मृ. २६-१०-२१ (पुणें)

पटवर्धन, डॉ. अण्णासाहेब, बी. ए., एल्एल्. बी., महर्षि, ज. १८४७, औद्योगिक चळवळीकडे ओढा असलेले, परोपकारी, देशाभिमानी, वैराग्यसंपन्न. मृ. २-२-१७

पटवर्धन, सीतारामपंत, वऱ्हाडचे माजी डायरेक्टर, स्वावलंबी, दानशूर, ( मोडी पुस्तकांचे कर्ते ), वय ७७. मृ. १२-४-१७ ( नगर )

पटवर्धन, हरि केशव, अहमदनगर, कर्तबगार पुढारी व वकील, होमरूल संघांतील कार्यकर्ते, उदार, सुस्वभावी, थिऑसफिस्ट. मृ. १६-१२-२४

पदमजी, सरदार, दोराबजी, उद्योगी व्यापारी, पुणें म्यु. चे अध्यक्ष, शांत, गोड स्वभाव, वय ६६. मृ. ११-७-०२

पदमजी, शेठ नवरोजी, देशहितैषि, ' नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता. ' मृ. सप्टें. १८८५

पदे, शंकर दाजी, शास्त्री, मुंबईच्या आयुर्वेद विद्यालयाचे व्यवस्थापक, सनातन धर्माभिमानी आयुर्वेदग्रंथ-प्रकाशक, कादंबरीकार. मृ. ३०-३-९

पद्मावती बाईसाहेब, फलटणकरांची कन्या, बडोदें येथील श्री. फत्तेसिंगराव यांच्या पत्नी. मृ. १०-११-१९

परांजपे, कृष्णाजी शिवराम, पुणें, वकील, वक्ते व लेखक, नाटककार. मृ. १४-९-३० ( पुणें )

परांजपे, प्रो. शिवराम बापूजी, मुंबई युनि.चे संस्कृत प्रोफेसर, वय ८५. मृ. ४-११-२५ ( यवत )

परांजपे, प्रो. शिवराम महादेव, एम्. ए., संस्कृतज्ञ, महाराष्ट्र कॉलेजचे प्रोफेसर, उत्कृष्ट वक्ते व चतुरस्त्र लेखक, वाङ्मयाभ्यासी, ' रसिकांचे राजे, ' व्याजोक्ति व वक्रोक्तींचे कुशल योजक, महाराष्ट्राचे ' डेमॉस्थिनीस, ' ' काळ ' व ' स्वराज्य ' कर्ते, राजद्रोहाबद्दल कारावासी, बेळगांवच्या मराठी साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष, कादंबरीकार. मृ. २७-९-२९ ( पुणें )

परांजपे, हरि महादेव, मुंबई, ' नेटिव्ह ' ओपीनियन 'चे संपादक व मालक. मृ. २४-६-१९००

परेख, सर गोकुळदास, मुंबई, मुं. कौन्सिलचे सभासद, सातारच्या प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष व बाणेदार पुढारी, वय ७९. मृ. १९-२-२६

पाटील, हरि लक्ष्मण, ठाण्याचे लोकप्रिय वकील, राष्ट्रीय पक्षाचे सार्वजनिक कार्यकर्ते, अनुयायी, देशभक्त, वय ६१. मृ. ३-९-२०. ( ठाणें )

पाठक, रा. ब., विठ्ठल नारायण, एम्. ए., सातारा, जिल्हा बोर्डाचे अध्यक्ष, उदार व निष्कपटी, वय ७५. मृ. फेब्रु. १९१८

पानगलचे राजेसाहेब, मद्रासच्या ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी, मद्रास सरकारचे दिवाण. मृ. १५-१२-२८

पारख, बलवंत खंडूजी, नाशिकचे नांवाजलेले कटाव करणारे कवी व वक्ते. मृ. २-६-०४

पारखी, पांडुरंगशास्त्री, ज. १८४४, स्वावलंबी लेखक, आनंदाश्रमांतील कार्यकर्ते, बाणभट्ट, कादंबरीसार, मित्रचंद्र इत्यादि ग्रंथांचे कर्ते. मृ. ३९-३-११

पारसनीस, रा. ब., दत्तात्रय बलवंत, इतिहाससंशोधक, ऐतिहासिक वस्तुसंग्रहाचे संस्थापक, भारतवर्ष, इतिहाससंग्रह या मासिकांचे चालक, ब्रह्मेंद्रस्वामी, झांशीची राणी, इत्यादि ग्रंथांचे कर्ते, यांनीं किंकेडसमवेत इंग्रजींतून ऐ. ग्रंथ लिहिले. मृ. ३१-३-२६ (सातारा).

पाल, क्रिस्तोदास, सी. आय्. ई., हिंदु पेट्रिअटचे संपादक, कलकत्ता कॉर्पोरेशनचे सभासद. मृ. २४-७-८४

पितळे, गणपतराव मोरोबा, वामनमूर्ति रावसाहेब, युनिव्हर्सिटीचे जुने असि. रजिस्ट्रार, राणीच्या पुस्तकाचें भाषांतर करणारे. मृ. मे १९००

पितळे, द्वारकानाथ माधव ऊर्फ ' नाथमाधव ', मुंबई, ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्यांचे लेखक. मृ. २१-६-२८

पीटरसन, प्रोफेसर, डॉक्टर, मुंबई, एलफिन्स्टन कॉलजचे संस्कृताध्यापक. मृ. २८-८-९९

पेटिट, सर दिनशा माणेकजी, नाइट बॅरोनेट, ज. जून १८२३, कारकुनाचे गिरणीमालक झाले, कर्तबगार, हिंमती व उद्योगप्रिय, प्रामाणिक, दानशूर, परोपकारी, कापडाच्या गिरण्यांचे आद्य-जनक, एकूण तीस लाखांचा दानधर्म. मृ. ५-५-०१ ( मुंबई )

पेरुमल, अलियासिंग, बी. ए., मद्रास, हेडमास्तर, 'ब्रम्हवादिन्,' या इंग्रजी मासिकाचे संपादक. मृ. ११-५-०९

पंडित, रा. ब., शंकर पांडुरंग, सरकारी नोकर, विद्याव्यासंगी, वेदार्थयत्नकर्ते, संस्कृत नाटकांवरील टिप्पणकार, पोरबंदरचे दिवाण. मृ. १८-३-९४ (मुंबई)

पंडित, हरि महादेव, नागपूर, 'देशसेवक' चे संपादक, खंदे मराठी लेखक. मृ. १५-३-९९

पंत प्रतिनिधि, श्रीनिवासराव पंडित, औंधचे अधिपति, सार्वजनिक कार्यांत मनोभावानें पडणारे, सदाचरणी राजर्षि, उदार, पापभीरु पण करारी, यांनीं दानधर्मांत लाखों रुपये खर्च केले. मृ. २६-९-०१ ( औंध )

पंत प्रतिनिधि, राजेसाहेब, औंध, बॅरिस्टर, बी. ए., एल्एल्. बी., हुषार व तरतरीत, होतकरु युवराज. मृ. १६-१२-२३

पिंपुटकर, वामन वासुदेव, उंबरगांव, ( ठाणें, ) उत्साही सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. ७-१०-३०

प्रभाकर, डॉ. मोरेश्वर गोविंद, पी. एच्. डी., मुंबईचे नेत्रवैद्य डॉ. प्रभाकर यांचे चिरंजीव. मृ. २१-१-२२(जर्मनी)

प्रेमचंद रायचंद, मुंबई, 'शेअर बाजारचे राजे,' दानशूर गृहस्थ, २० लाखांचा दानधर्म. मृ. ऑगस्ट १९०६

प्लेव्हे, एम्. डी., मध्य रशियाचे प्रधान, अत्याचारास बळी पडले, साहसी व विलक्षण जुलमी. मृ. जुलै १९०४

फ

फडके, कृष्णाजी काशिनाथ, 'विदूषक,' 'हिंदुपंच,' 'हास्यविनोद' या पत्रांचे संपादक, 'विदुषकी' लेखनशैली. मृ. ११-१-२० ( मुंबई )

फडके, नारायण लक्ष्मण, बी. ए., ठाणें येथील ज्ञानवृद्ध, कर्तव्यनिष्ठ शिक्षक, इतिहासविषयक व नीतिशास्त्रविषयक ग्रंथांचे लेखक. मृ. २२-९-२० (ठाणें)

फडके, सीताराम महादेव, पुणें, न्यू इंग्लिश स्कूलच्या पहिल्या शिष्यवृंदापैकीं, सत्त्वशील, विद्वान्, साहित्य व तत्त्वज्ञानविषयक पुस्तकांचे लेखक. मृ. २०-१-३०

फत्तेसिंगराव गायकवाड, बडोद्याचे युवराज. मृ. १४-९-०८

फॅरन, सर चार्लस्, मुंबई हायकोर्टाचे मुख्य जज्ज. मृ. ९-९-९८

फाटक, रावसाहेब, नारायणराव, खेड व कोल्हापूरचे मुन्सफ, नाट्यकलानिपुण लेखक. मृ. १०-५-९८ ( पुणें )

फॉसेट, हेन्री, ज. १८३३, 'गेला हो गेला ! आमचा खरा कैवारी गेला' इंग्लंडमधील अर्थशास्त्रनिपुण, पार्लमेंटचा सभासद. मृ. ६-११-८४

फ्रेडरिक, एंप्रेस, ज. १८४०, व्हिक्टोरियाची ज्येष्ठ कन्या, जर्मन कैसर( दुसरा विल्यम ) ची माता, १८८८ मध्यें राज्ञीपदप्राप्ति. मृ. ५-८-०१

## ब

बर्कनहेड, लॉर्ड, इंग्लंड, हिंदुस्थानचे उद्दाम स्टेट सेक्रेटरी, तरतरीत बुद्धीचे, जाडे कायदेपंडित, खंदे वक्ते. मृ ३० ९-३०

बर्वे, नारायण शिवराम, प्रसिद्ध गोभक्त, आजन्म ब्रह्मचारी. मृ. १२-१-१८

बर्वे, रामकृष्ण वासुदेव, होतकरु साहित्यसेवक, 'स्वामी रामतीर्थ' मालेचे सहसंपादक, योगवासिष्ठाचे भाषांतरकार. मृ. १०-३-२० ( भिवंडी )

बसू, भूपेंद्रनाथ, बंगाल्यांतील नेमस्तांचे जुने पुढारी, १९१४च्या कॉंग्रेसचे अध्यक्ष, स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलचे व बंगालच्या कार्यकारी कौन्सिलचे सभासद. मृ. सप्टें. १९२४ ( कलकत्ता )

बहादुरजी, डॉक्टर, मुंबई येथील प्रख्यात डॉक्टर. मृ. १६-८-९८

बाळिभद्र पांडुरंग, मुंबई, हायकोर्ट वकील. मृ. २६-१-९२

बॅप्टिस्टा, जोसेफ, मुंबई, ज. १८६४, बॅरिस्टर, राजद्रोहाच्या खटल्यांत मनोभावानें झगडणारे, लोकसेवातत्पर, लो. टिळकांचे अभिमानी, स्वराज्यसंघाचे अध्यक्ष, इंग्लंडमधील चळवळीचे पुरस्कर्ते, पोस्टमनांचे पुढारी, १९१५ च्या पुण्याच्या प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष. मृ. १५-९-३०

बागाइतकर, कृष्णराव अमृत, वकील, जुन्नरचे पुढारी, कट्टे स्वदेशी व स्वराज्यवादी. मृ. ५-६-२० ( जुन्नर )

बानर्जी, कालीचरण, राष्ट्रीय सभेचे पुरस्कर्ते, कलकत्ता युनिव्हर्सिटी व॰कार्पोरेशनमधील कार्यकर्ते, वय ६०. मृ. १-२२-०७

बानर्जी, सर गुरुदास, धर्माभिमानी, बंगभक्त, कलकत्ता हायकोर्टाचे न्यायाधीश, युनि.चे व्हा. चान्सेलर, 'राष्ट्रीय' कॉलेजचे उपाध्यक्ष. मृ. २-१२-१८ ( कलकत्ता )

बानर्जी, डब्ल्यू. सी., कलकत्ता, प्रख्यात बॅरिस्टर, राष्ट्रीय सभेचे पहिले अध्यक्ष, समाजसुधारक. मृ. जुलै १९०६ ( इंग्लंड )

बानर्जी, सर सुरेंद्रनाथ, ज. १८४८, नेमस्त पक्षाचे पुढारी, बंगभंगांतील यशस्वी चळवळ्ये पुणें ( '९५ ) व अमदाबाद ( '०२ ) कॉंग्रेसचे अध्यक्ष, ' रिपन ' कॉलेजचे संस्थापक, ' बंगाली ' पत्राचे संपादक, वृत्तपत्रकार, कौन्सिलर, कॉर्पोरेटर, अप्रतिम वक्ते, बंगालचे सिसरो, निस्सीम व उदात्त देशभक्त, वय ७८. मृ. ६-८-२५

बापट, नागेश विनायक, बडोदें, प्रसिद्ध ग्रंथकार, ग्रंथः—बाजीरावचें चरित्र, पानपतची मोहीम इ. मृ. मार्च १९०२

बापट, बाळकृष्ण लक्ष्मण, उदार व सार्वजनिक कार्यांत पडणारे, वय ८५. मृ. २१-५-०४ ( आंजर्लें )

बाबामहाराज, सरदार, पुणें, म्यु. चे मेंबर व सार्वजनिक सभेचें उपाध्यक्ष, पुढारी. मृ. ७-८-९७

बाम, डॉ. नारायण विष्णु, गुजराथेंतील डॉक्टर, हिंदुधर्म व नीति यांचे उपदेशक, काठेवाड. मृ. २५-५-०७

बाल्फोर, लॉर्ड, इंग्लंडचे मुख्य प्रधान,

वादविवाद-कुशल व राजकार्यधुरंधर मुत्सद्दी. मृ. १९-३-३०

बाळाजी पांडुरंग, भाषांतरकार व दुभाषे, विधवाविवाह व इतर सामाजिक चळवळींचे पुरस्कर्ते, उमेदीचे, तरतरीत, वय ८२. मृ. १९-१-०८

बिवलकर, उमासाहेब, फर्स्ट क्लास सरदार. मृ. ऑगस्ट १९१७ ( मुंबई )

बीडकर, गणेश शंकर, पंढरपूर, राष्ट्रीय चळवळीचे पुढारी. मृ. ४-७-२७

बुलासा, मोती, मारवाडी प्रार्थना समाजिस्ट, डे. ए. सो. लाइफ मेंबर, ' सुविचार समागम ' मासिकाचे संपादक, ' ज्ञानचक्षु 'चे लेखक. मृ. ४-११-००

बेक, अलिगड कॉलेजचे प्रिन्सिपॉल, मृ. ऑगस्ट १८९९

बेट्टिगिरी, कृष्णशास्त्री, कर्नाटकांतील विद्वन्मुकुटमणि, शंकराचार्यांच्या पाठशाळेंत निर्वेतन अध्यापक. मृ. २९-३-२१ ( धारवाड )

बेलापूरकर, भानुदासबुवा, वारकऱ्यांचे पुढारी, त्र्यंबक ते पंढरपूर निवृत्तिनाथांच्या पालखीचा प्रघात पाडणारे, सदाचरणी, वैराग्यशाली, भाविक, वय ६५. मृ. एप्रिल १९२१ ( पंढरपूर )

बेहरे, विष्णु व्यंकटेश ऊर्फ दत्तोपंत, पुणें, सुखवस्तु नागरिक, धार्मिक चळवळींतील मुरब्बी पुढारी. मृ. २९-४-२३ (पुणें)

बोडस, राजारामशास्त्री, महामहोपाध्याय, मुंबई, एल्फिन्स्टन कॉलेजांतील शास्त्री, ग्रंथः—सभाष्य ऋग्वेद, शिवपुराण टीका, मृ. २८-११-९६

बोथा, लुई, बोअर युद्धांतील सेनापति व द. आफ्रिकेंतील प्रधानमंत्री. मृ. २७-८-१९

बोस, बाबू आनंदमोहन, बॅरिस्टर, १८९८ च्या कॉंग्रेसचे अध्यक्ष, बंगाल्यांतील प्रमुख राष्ट्रीय पुढारी. मृ. ऑगस्ट, १९०६

ब्रॅडला, चार्लस, हिंदुस्थानचे कैवारी, निःपक्षपाती, समदृष्टी, परमन्यायी. मृ. ३०-१-९१

ब्रुइन, हॅरिस, ज. १८५३, पोलीस खात्यांत ३४ वर्षे नोकरी, गुप्त पोलीस म्हणून नांवाजलेले, लोकांत मिळून मिसळून वागणारे अधिकारी. मृ. २६-७-०५

भ

भट, चिंतामण नारायण, असि. स्पेशल जज्ज, सार्वजनिक चळवळीस सहानुभूति दाखविणारे. मृ. २६-३-९७

भट, दत्तात्रय हरि, पुणें, आरोग्य-मंडळाचे प्रमुख कार्यकर्ते, म्युनिसिपल गॅझेटचे संपादक. मृ. २३-१०-२७

भरूचा, सर शापूरजी, मुंबईतील प्रसिद्ध कोट्याधीश, ज. १८४५, 'दलाल बाजारचे राजे' ५०-६० लाख रुपयांचा दानधर्म करणारे. मृ. २३-५-२०

भागवत, नारायण हरि, प्रहसन-लेखक, १४-१५ पुस्तकांचे लेखक, वृत्तपत्रलेखक. मृ. एप्रिल १९०१

भागवत, राजाराम रामकृष्ण, सेंट झेविअर कॉलेजमध्यें संस्कृत अध्यापक, व्यासंगी, विचित्र मतांचे प्रतिपादक, शोधक. मृ. ४-१-०८ ( मुंबई )

भागवत, रामचंद्र विष्णु, वकील, कऱ्हाड म्युनि.चे अध्यक्ष, संस्कृतज्ञ, हिंदु धर्माचे कट्टे अभिमानी, वय ७५. मृ. १५-३-०८

भागवत, पुरुषोत्तम बळवंत, नाशिक, वकील, म्युनि. व लोकल बोर्डाचे कार्यकर्ते सभासद. मृ. ऑगस्ट १९००

भागवत, हरि रघुनाथ, 'वंदे मातरम् व राष्ट्रहितैषि' या पत्रांचे संपादक, ग्रंथ-लेखक, लोकमान्यांचे मदतनीस, उपनिषदांचे भाषांतरकार. मृ. ९-५-३०

भाटे, चिमणाजी नारायण, वकील, चेअरमन, महाड म्युनिसिपॅलिटी. मृ. १७-११-००

भाटे, भाऊसाहेब, बेळगांव, पुढारी व वकील, वय ६१. मृ. ऑक्टो. १९०१

भानू, प्रो. चिंतामण गंगाधर, ज. मेणवली, जुलै १८५६, नाना फडणीसांच्या घराण्यांतले, डे. ए. सोसायटीचे प्रोफेसर व आजन्मसेवक, इतिहास, तत्त्वज्ञान वगैरे विषयांवरचे ग्रंथकर्ते, दांडगे विद्याव्यासंगी, अभिमानी व परिणामकारी वक्ते. मृ. ३०-१२-२९

भानू, नारायण गंगाधर, कऱ्हाड, शतावधानी. मृ. ११-११-००

भावसिंग, महाराज, भावनगरसंस्थानाधिपति, लोकशाहीचे पुरस्कर्ते, प्रजानिष्ठ, मद्यपाननिषेधक. मृ. जुलै १९१९

भावे, वामन प्रभाकर, पुणें, नेटिव्ह इन्स्टिटयूशनचे प्रिन्सि. मृ. २८-५-९९

भावे, विनायक लक्ष्मण, इतिहाससंशोधक व लेखक, ग्रंथः—'चक्रवर्ती नेपोलियन' 'महाराष्ट्र सारस्वत' 'शिवाजी व अफजलखान.' मृ. १२-९-२६

भावे, सदाशिव हरि, पुणें, केसरीचे रिपोर्टर व उपसंपादक, वय ३२. मृ. २०-१०-१३

भांडारकर, सर रामकृष्ण गोपाळ, एम्. ए., पी. एच्‌डी., प्रोफेसर, एल्फिन्स्टन कॉलेज, जाडे संस्कृत पंडित व संशोधक, विद्वानांचे मुकुटमणि, सुधारकमताचे, संशोधनपर व शालेय पुस्तकांचे कर्ते, निर्व्यसनी, निगर्वी, व्यासंगी, वय ८९. मृ. २४-८-२५

भांडारकर, श्रीधरपंत, डॉ. भांडारकरांचे ज्येष्ठ चिरंजीव, प्रोफेसर, एल्फिन्स्टन कॉलेज, प्रार्थनासमाजाच्या अध्वर्यूंपैकीं एक. मृ. २२-२-१६ (मुंबई)

भिंगारकर, श्रीपतिबोआ, उत्तम कीर्तनकार, वेदांतशास्त्राचे मर्मज्ञ, सांप्रदायिक, केसरीचे लेखक. मृ. ९-१०-०८ ( पुणें )

भिडे, गोपाळ हरि, वकील, नागपूर, गोरक्षण सभेचे पुरस्कर्ते. मृ. जाने. १८९६

भिडे, नारायण जगन्नाथ, गव्हर्नमेंट प्रॉसिक्युटर, पुणें, विद्वान्, पण दुराग्रही. मृ. ७-१-८५

भिडे, विष्णु बळवंत, सातारा, संस्थापक, आर्यांग्ल वैद्यक विद्यालय, वैद्यकीय ग्रंथकार. मृ. ६-७-२४

भिडे, विष्णु मोरेश्वर, ज. ५-२-१८२७, शाळामास्तर-हेडमास्तर, मुन्सफ, कलेक्टर, स्पेशल जज्जाचे असिस्टंट, १८६० पासून १९०० पर्यंतचा मूर्तिमंत महाराष्ट्रीय इतिहास, मनमिळाऊ व उदार. मृ. १८-११-०१ ( पुणें )

भुर्‍री, जी. एम्., असेंब्लीचे सभासद,

सिंधचे वडे जमीनदार. मृ. मार्च १९२४

भुस्कुटे, बळवंतराव गोविंद, उत्तर हिंदुस्थानांतील सरदार, सदाचारी जहागीरदार, सुशिक्षित. मृ. १०-२-०८ ( ब्र्हाणपूर )

भोसले, राजाराम ऊर्फ आबासाहेब-महाराज, शिवछत्रपतींच्या वडील घराण्यांतील सातवे पुरुष, १८७४ पासून मुखत्यारी, स्वभाव उदार व मनमिळाऊ, वय ५४. मृ. १०-४-०४ ( पुणें )

म

मनोहर, शिवराम सदाशिव, मुंबई, कस्टम खात्यांतील नोकर, मौलाबक्ष गायनवादन शाळेचे उत्पादक. मृ. २९-९-०७ ( मुंबई )

मलबारी शेठ, मुंबई, समाजसुधारक पारशी, ' इंडियन स्पेक्टेटर ' व ' ईस्ट अँड वेस्ट ' यांचे संपादक, बांके लेखक व कवि, सुधारकांत अग्रगण्य, संमतिवयाच्या कायद्याचे जनक, बऱ्याच इंग्रजी पुस्तकांचे कर्ते, लोकहितार्थ झटणारे, वय ६९. मृ. जुलै १९१२ ( सिमला )

महाजन, बळवंतराव, नागपूरचे पुढारी. मृ. डिसेंबर १९०६

महात्मे, सूर्याजी सदाशिव, मुंबई, मराठीचे व्यासंगी व लेखक, संपादक, ' आनंद लहरी '. मृ. १३-१२-९९

मॅक्समुल्लर, प्रोफेसर, जन्म ६-१२-१८२३, लंडन, जगन्मान्य संस्कृत पंडित, ऋग्वेदभाष्याचे प्रकाशक, लोकमान्यांचे चहाते, पौर्वात्य तत्त्वज्ञानाचे जाडे व्यासंगी व ग्रंथलेखक, वय ७७. मृ. ६-११-००

माणिकशहा, जहांगीरजी तालियारखान, मुंबई हायकोर्टांतील नामांकित वकील. मृ. जून १९००

माधवलाल रणछोडदास, अहमदाबाद, दानशूर, हिंदुधर्माभिमानी, भारतधर्म परिषदेचे नियोजित स्वागताध्यक्ष, प्रमुख व्यापारी, शेतकी व धंदेशिक्षणाचे पुरस्कर्ते, त्यासाठीं एक लक्ष रु. देणगी देणारे. मृ. ४-४-०१

माधवराव, राजे, सर टी., ज. १८२८, तंजावरकडील मराठे गृहस्थ, विद्वान्, कर्तबगार, त्रावणकोरचे दिवाण, सरकारपुढें नरम पडणारे. मृ. ४-४-९१

मानकर, गणपतराव अमृत, एम्. ए., एलएल्. बी., न्यायखात्यांत नोकर, न्या. रानडे यांचें छोटें इंग्रजी. चरित्रकर्ते. मृ. २-२-०७

मार्गारेट, मिस् नोबल ऊर्फ भगिनी निवेदिता, अमेरिका, स्वामी विवेकानंदांची शिष्यीण, ' दि वेब ऑफ् इं. लाइफ', 'दि क्रॅडल् टेल्स ऑफ हिंदुइझम्,' 'दि मास्टर अॅज आय् सॉ हिम' ह्या ग्रंथांची कर्त्री, भाविक हिंदी जनांबद्दल कळकळ बाळगणारी, लेखिका. मृ. ऑक्टो. १९११

मावळणकर, केशवराव, लंडन येथील नांवलौकिकाला चढलेले अत्तराचे कारखानदार, राष्ट्रीय वृत्तीचे, कर्तबगार. मृ. २-२-३० ( लंडन )

मॉंटेग्यु, हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी, १९१९ च्या सुधारणांचे जनक. मृ. १५-११-२४

मीर, महबूब अलीखान, हैद्राबादचे निजाम, निःपक्षपाती, दयाळू, करारी, २७ वर्षें गादी भोगणारे. मृ. २९-८-११

मित्र, काशिनाथ रघुनाथ, मासिक मनोरंजनचे संपादक, वाङ्मयप्रेमी, उद्यमशील. मृ. जून १९२० ( मुंबई )

मित्र, सर रमेशचंद्र, कलकत्ता, हायकोर्ट जज्ज, पब्लिक सर्व्हिस कमिशनचे मेंबर, वय ५९. मृ. जुलै १८९९

मुकर्जी, सर आशुतोष, कलकत्ता युनिव्हर्सिटीचे ' बहिश्वर प्राण, ' सॅडलर कमिशनचे एक प्रमुख सभासद, वय ६०. मृ. मे. १९२४

मुकर्जी, रायबहादूर, कांतिचंद्र, जयपूरचे नाणावलेले हुषार दिवाण, दुष्काळ कमिशनचे सभासद, जयपूरचे महाराज व इंग्रजी अधिकारी यांच्या आदरास पात्र झालेले. मृ. १४-१-०१ (नागपूर)

मुझफरुद्दिन, इराणचे शहानशाह, पाश्चात्य सुधारणेचे भोक्ते, सुधारणावादी, इराणी राष्ट्रीय वृत्तीचा जन्म यांचेच अमदानींत झाला. मृ. १५-१-०७

मुथा, माणिकचंद किसनदास, अहमदनगरचे राष्ट्रीय पुढारी, वय ४२. मृ. १९-१२-२८

मुदालियार, रामस्वामी, मद्रास, मुन्सफ व हायकोर्ट वकील, पब्लिक सर्व्हिस कमिशनचे मेंबर, वय ४२. मृ. मार्च १८९२

मुधोळकर, गोविंदराव, मुधोळ संस्थानचे युवराज, होतकरु, तरतरीत, सुदृढ. मृ. २१-२-२० ( मुधोळ )

मुधोळकर, रंगनाथ नरसिंह, वऱ्हाडचे सुप्रसिद्ध नेमस्त पुढारी. मृ. जाने. १९२१

मेथा, सर फेरोजशहा, सी. आय. ई., के. सी. आय्. ई., एल्‌एल्. डी., ज. ४-८-१८४५, नेमस्ताग्रणी, 'मुंबापुरीचा पुरुषसिंह, ' लोकोत्तर मानी पुढारी, मुंबई येथील ( '९० ) कॉंग्रेसचे अध्यक्ष, अस्खलित जोरदार वक्ते, जाडे कायदेपंडित, सदनशीर चळवळीचे पुरस्कर्ते, बॉंबे क्रॉनिकलचे संस्थापक, म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे ४५ वर्षे 'पालक', वय ७१. मृ. ५-११-१५

मेलव्हिल, नामदार सर मॅक्सवेल, मुंबई सरकारचे कौन्सिलर. मृ. ५-८-८७

मोडक, अनंत बाळाजी, पुणें, युनियन एजन्सीचे चालक, उद्यमशील, धाडशी व्यापारी. मृ. २९-७-२५ ( सांगली )

मोडक, बाळाजी प्रभाकर, कोल्हापूर, प्रोफेसर, राजाराम कॉलेज, शास्त्रीय ग्रंथकार. मृ. १९०६

मोडक, रा. सा., वामन आबाजी, जुने पदवीधर, हेडमास्तर, कडक अंमलदार, समाजसुधारणेचे निःसीम भक्त, मुंबई प्रार्थनासमाजाचे चालक. मृ. २८-८-९७

मोर्ले, लॉर्ड जॉन, जन्म २४-१२-१८३८, ' प्रामाणिक जॉन, ' अज्ञेयवादी, लेखनव्यवसायी व राजकारणपटु, कॉब्डेन, क्रॉम्वेल, व्हॉल्टेर, रूसो, डिडेरो, ग्लॅडस्टन, वगैरेंचे टीकात्मक चरित्रलेखक, लिटररी गॅझेटचे संपादक, मोर्ले-मिंटो सुधारणांचे जनक, लिबरल स्टेट सेक्रेटरी, आयरिश स्वराज्य-

मंदिरावर कळस चढविणारे. मृ. २३-९-२३

मोरमकर, रा. सा., रामकृष्ण रघुनाथ, 'विविधज्ञानविस्तार'चे संपादक, 'महाराष्ट्र साहित्य-पत्रिका,' 'महाराष्ट्र साहित्य-परिषद्' वगैरेंत भाग घेणारे, मृ. ऑक्टो. १९२३ ( मुंबई )

मोहरीर, वामनराव, उमरावती, वकील, मध्यप्रांत कौन्सिलचे स्वराज्यपक्षीय सभासद. मृ. १८-१२-२४

मंडलिक, नारायण गणेश, पेण, पुढारी, म्युनिसिपॅलिटीचे कार्यदक्ष सभासद, वय ६०. मृ. २-२-१७

मंडलिक, रा. सा., विश्वनाथ नारायण, मुंबई, ज. ८-३-१८३३, 'घड्याळ चुकेल पण यांचा कार्यक्रम चुकणार नाहीं,' विद्याव्यासंगी, मनुस्मृति, हिंदु-धर्मशास्त्र, इ. ग्रंथांचे कर्ते, सार्वजनिक कार्यकर्ते, खऱ्या सुधारणेचे पुरस्कर्ते, विद्वान्, निस्पृही, बाणेदार पुरुष. मृ. ९-५-८९

मांडे, आप्पासाहेब, 'शिवाजी' पत्राचे चालक. मृ. ऑक्टो. १९२० ( पुणें )

म्हसके, गंगाराम भाऊ, मराठा एज्युकेशन सोसायटीचे स्वावलंबी संस्थापक. मृ. मे १९०१

य

याज्ञिक, नामदार, जव्हेरिलाल उमियाशंकर, मुंबई कौन्सिलचे सभासद, कार्यकर्ते, सनातनी, सदाचारी व नियमसंपन्न, उद्योगशील, मृ. ८-५-९७

याळगी, गोविंदराव, बेळगांव, होमरूल, असहकारिता व खादी चळवळींत पुढाकार घेणारे. मृ. २७-९-२३ ( बेळगांव )

र

रणछोडलाल छोटालाल, रावबहादुर, अहमदाबाद येथील प्रख्यात व्यापारी, म्युनि.चे अध्यक्ष. मृ. २६-१०-९८

रहिमतखान, प्रोफेसर, संगीत-निपुण गवई, कुरुंदवाडकरांचे आश्रित. मृ-१४-६-२२

रविवर्मा, राजा, अर्वाचीन हिंदी चित्रकलेचे जनक, वय ५८. मृ. २-१०-०६

राघवय्या, मुंबई, लोकमान्यांच्या खटल्यांतील सॉलिसिटर, मृ. सप्टें. १९२१ (बंगलोर)

राघवाचार्य, वीर, ज. १८५७, मद्रासच्या हिंदूचे उत्पादक, कार्यकर्ते व पुढारी. मृ. ऑक्टो. १९०६

राजवाडे, कृष्णशास्त्री, वे. शा. सं., विश्रामबाग पाठशाळेंतील ज्ञानवृद्ध, अनुभवी शास्त्री, अलंकार, वेदांत विषयांत निष्णात, सदाचरणी, मार्मिक, पोक्त, संस्कृत नाटकांचे मराठींत भाषांतरकार. समाधी ६-८-०१

राजवाडे, विश्वनाथ काशिनाथ, बी. ए., आमरणान्त इतिहाससंशोधक, कुशाग्र व सर्वगामी बुद्धीचे, निरलस, व्यासंगी, भारत-इतिहास-संशोधक-मंडळाचे संस्थापक, अफाट ऐतिहासिक व 'वाचमर्थोनुधावति' या कोटींतले लेखक. मृ. ३१-१२-२६

रानडे, नीलकंठ बाबाजी, मराठी कोशाचे कर्ते. मृ. २१-५-१८ (कुर्ला)

रानडे, न्या. रा. ब., महादेव गोविंद,

एम्. ए., एल्‌एल्. बी., महाराष्ट्रांतील अनेक चळवळींचे गुरु, स्वतंत्र विचाराचे निस्पृह पुढारी, लेखनवाचनवक्तृत्वांचे व्यसनी, समाजसुधारणेचे अध्वर्यु, प्रार्थनासमाजी, 'राइज ऑफ दि मराठा पॉवर' कर्ते, ज्ञानाची पाणपोई ठेवणारे, अ. मराठी ट्रान्स्लेटर, इंग्रजीचे असि. प्रोफेसर, स्मॉलकॉज कोर्ट जज्ज, हायकोर्ट जज्ज. मृ. १६-१-०१ (मुंबई)

रानडे, यशवंत गणेश, पंढरपूर, वकील इंग्लिश ओपीनियन ऑफ इंडिया, या मासिकाचे चालक, केसरी व मराठा पत्रांचे संबंधी, वय ४२. मृ. १२-४-००

रानडे, रामचंद्र नारायण, वेळासच्या नाना फडणविसाच्या उत्सवाचे प्रवर्तक. मृ. ऑगस्ट १९०६

रानडे, वामन बालकृष्ण, ज्ञानचक्षूचे संपादक. मृ. ऑगस्ट १८९९

रानडे, विष्णु रामचंद्र, पुणें, कंत्राटदार, स्वराज्यवादी, धाडशी, प्रामाणिक, व्यवहारदक्ष, वय ८६. मृ. २-१२-२० (पुणें)

रानडे, विष्णु शामजी ऊर्फ बंङ्क्षनाना, ज. १८१८ पुणें, प्रसिद्ध विद्वद्वर्य, फारसी भाषाभिज्ञ, सार्वजनिक कार्यकर्ते, शोधक, बहुश्रुत, अनुभवी वैद्य, मोडी कित्तेकर्ते. मृ. १३-७-९१

रानडे, शंकर मोरो, बडोदें, बी ए., नाट्यकथार्णव मासिकाचे चालक, शीघ्र कवि, विनोदी व प्रेमळ गृहस्थ. मृ. १९०३

रामतीर्थ, स्वामी, एम्. ए., ज. १८७३, वेदांताची मूर्तिमंत प्रतिमा, विद्याव्यासंगी, तीव्र स्मरणशक्तीचे, अभिजात कवि, परदेशांत हिंदुधर्मप्रसारार्थ संचार करणारे, मोहक व परिणामकारी वाणीचे वक्ते, जलसमाधि १७-१०-०६

रामच्या पुलच्या, पुणें म्युनिसिपॉलिटीचे सभासद, ऑनररी मॅजिस्ट्रेट, वय ३५. मृ. २१-१-११

राशिवडेकर, पंडित, आप्पाशास्त्री, जुन्या तऱ्हेचे जाडे विद्वान्, संस्कृत वाङ्मयविशारद. मृ. २५-१०-१३

राशिनकर, विष्णु कृष्ण, कोल्हापूर, प्रसिद्ध वकील, लोकप्रतिनिधि सभेच्या कामीं पुढाकारी. मृ. २८-११-०७

रास्ते, श्रीमती उमाबाई, पुणें, रास्ते घराण्यांतील बाणेदार स्त्री, सुस्वभावी व स्वाभिमानी, वय ८०. मृ. ३१-१-१९

रिपन, लॉर्ड, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय, उदार मतवादी, हिंदी जनतेच्या प्रेमास पात्र झालेला पहिलाच व्हाइसरॉय, प्रेस ॲक्ट यानेंच रद्द केला. मृ. जुलै १९०९

रेहाटसेक, एडवर्ड, 'गोरा ऋषि', ज. १८१९ (ऑस्ट्रिया), एक विद्वद्रत्न, हिंदुस्थानचा रहिवासी व चहाता, चवदा भाषांचा ज्ञानी प्रोफेसर, हिंदु तत्त्वज्ञानाचा अभिमानी. मृ. ११-१२-९१

रंगाचार्य, म्हैसूरचे दिवाण, थोर व बुद्धिवान्, देशाभिमानी. मृ. जाने. १८८३

ऱ्होड्स, सेसिल, यांच्या व्यापारी कंपनीनें आफ्रिकेचा भाग जिंकला, बोअर युद्धाचे प्रवर्तक, चेंबर्लेनचा उजवा हात. मृ. १९०२

## ल

लल्लुभाई शहा, मुंबई हायकोर्टाचे सर न्यायाधीश, समाजसुधारक, मृ. १६-११-२६

लागवणकर, वैद्य, त्र्यंबकभटजी, मुंबई, वयाचीं १०० वर्षे उलटल्यावर संन्यास-दीक्षा घेतली. मृ. २६-१-९७

लागवणकर, बाळशास्त्री वैद्य, पुण्यांतील नामांकित वैद्य, भारतीय आयुर्वेदाचे 'प्राणाचार्य'. मृ. ३-११-१६

लालाशंकर उमीयाशंकर, स्माल-कॉज कोर्टाचे जज्ज, पंढरपूर ऑर्फनेज, प्रार्थनासमाज मंदिर, नाशीकचें स्त्रियांचें व गुरांचें हॉस्पिटल, स्मशान, धर्मशाळा, केतकर टाउन हॉल, या सर्वांचे उत्पादक, सोशल कॉन्फरन्सचे अध्यक्ष, रु.८०,००० अनाथ मुलांचे संरक्षणार्थ देणारे. मृ. १९-१०-१२ ( अहमदाबाद )

लाला लजपतराय, ज. १८६५, 'पंजाबचे सिंह,' टिळक स्कूल ऑफ पॉलिटिक्स व सर्व्हंट्स ऑफ दि पीपल सोसायटीचे संस्थापक, 'पीपल' साप्ताहिकाचे संपादक, राष्ट्रत्रिमूर्तीपैकीं आद्यगण, हिंदुसभेचे चालक, लोकमान्यांचे स्नेही, अमेरिकेंत हिंदी चळवळ करणारे, कॉंग्रेसचे अध्यक्ष, लाहोर पोलिसांच्या लाठीमारास बळी. मृ. १७-११-२८

लिमये, गणेश बळवंत, पुणें, सन्मान्य पेन्शनर, दानशूर, अंकगणिती. मृ. २८-३-२५

लिमये, गोविंद धोंडदेव, अष्टें येथील प्रसिद्ध वकील, सातारा जिल्हा कॉंग्रेसचे प्रवर्तक व पुरस्कर्ते, वय ८२. मृ. ऑगस्ट १९०९

लिमये, विश्वनाथ कृष्णाजी, सोलापूर, प्रसिद्ध डॉक्टर. मृ. २९-७-१३

ली, हुंग चंग, 'चीनचा नाना फडणवीस,' मोठा कर्तबगार, हुषार व धूर्त, नोकरापासून मुख्य प्रधान झाला, चार बादशहांच्या राजवटी पहाणारा राष्ट्रीय पुढारी, फार दूरदृष्टी, युरोप व अमेरिकेंत सफर करून आलेला, चिनी आरमाराचा व शिस्तयुक्त फौजेचा जनक, वय ७५. मृ. ९-११-०१

लेनिन, निकोलाय, रशियन राज्यक्रांतीचा विजयी वीर. धाडसी व देशाभिमानी, ज. १८७०, बोल्शेव्हिक पक्षाचा पुढारी, राज्यक्रांतीचा विश्वकर्मा, बुद्धि, चिकाटी व उत्साह यांची मूर्ति, युरोपियन मुत्सद्द्यांचा कर्दनकाळ. मृ. २१-१-२४

लेले, गणेशशास्त्री त्र्यंबककर, संस्कृतज्ञ, कवि, रघुवंशाचे भाषांतरकार, कृष्णाकुमारी, जानकीपरिणय इत्यादींचे कर्ते. मृ. ८-४-९८ ( त्र्यंबक )

लेले, वामन महादेव, पब्लिक वर्क्स खात्यांतील नोकर, पुणें, डे. एज्यु सोसायटीचे संबंधी, वय ७२. मृ. ९-१-९९

लेले, वामन विष्णु, वकील, पुणें, निःपक्षपाती कार्यकर्ते, इतिहासाभ्यासी व लेखक. मृ. २७-१०-००

लोटलीकर, निळकंठ अनंत, सोलापूरचे डॉक्टर, सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. २६-७-१३

लोहोकरे, डॉ. कृ. गो., एम्. एल्. ए., प्रतिसहकार पक्षाचे पुरस्कर्ते, दीर्घोद्योगी, हुषार, कर्तव्यतत्पर. मृ. ८-११-२६

### व

वर्डस्वर्थ, प्रिन्सिपॉल, डेक्कन व एल्फिन्स्टन कॉलेज, मृ. एप्रिल १९१७

वाकणकर, रघुनाथ मोरेश्वर, पुणें,

टाइम्स प्रेसमधील कॅशिअर, केसरी संस्थेचे प्रथमपासून अभिमानी व साहाय्यक, कोल्हापूरप्रकरणीं मदतगार. मृ. २६-१-९७

वागळे, कृष्णराव बलवंत, अलाहाबाद, अकौन्टन्ट जनरल, विद्याभ्यासी. मृ. ८-४-१३ ( मुंबई )

वाव, चिंतामण बापूजी, भुसावळ, वकील, म्यु. अध्यक्ष, मराठी कवितेचे व्यासंगी, लोकप्रिय पुढारी. मृ.५-८-१०

वाडिया, नौरोजी माणेकजी, मुंबई, लक्षाधीश व दानशूर. मृ. जुलै १९०९

वारद, रा. ब., मल्लापा बसाप्पा, ज. १७-६-५१, व्यापारी व गिरणीवाले, पेढीवाले, सोलापूरचें अनाथालय, संस्कृत पाठशाळांचे संस्थापक, १० लाख रु. दानधर्मांत खर्च करणारे, उदार, सद्वर्तनी, धोरणी, राष्ट्रीय वृत्तीचे तडफदार गृहस्थ. मृ. १९-१-११

वॉशिंग्टन, बुकर टी., अमेरिकेंतील नीग्रो लोकांचे प्रसिद्ध कनवाळु पुढारी, जातिहितार्थ आमरण परिश्रम करणारे. मृ. नोव्हें. १९१५

विनायकराव गणेश ऊर्फ रावसाहेब, इंदूर, कनवाळु, उदार, मृ. १८-५-८५

विनायक वासुदेवजी, सरदार, पहिले नेटिव्ह ओरिएंटल ट्रान्स्लेटर. मृ. २६-४-९४ ( मुंबई )

विवेकानंद, स्वामी, पूर्वीचें नांव नरेंद्र, ' रामकृष्ण मिशन 'चे आद्य-प्रवर्तक, हिंदु धर्माचे मिशनरी, विद्वान, वक्ते, परदेशांतील हिंदुधर्माचे प्रचारक, तेजस्वी, योगी. समाधि ४-७-०२

विल्सन, वुड्रो, अमेरिकन संयुक्त संस्थानांचे प्रेसिडेंट, स्वयंनिर्णयतत्त्वाचे जनक, राष्ट्रसंघाचे पुरस्कर्ते. मृ. फेब्रु. १९२४

वीरचंद दीपचंद, सर, सी. आय्. ई., मुंबईचे प्रसिद्ध पुढारी, दानशूर. वय ७५. मृ. नोव्हें. १९०८

वेडबर्न, सर विल्यम, हिंदुस्थानचे कैवारी, विलायतेंत काँग्रेसची चळवळ करणारे, तीस वर्षे सरकारी अधिकारी, ८९ च्या मुंबई काँग्रेसचे अध्यक्ष, पार्लमेंटचे सभासद. मृ. २५-१-१८

वेलणकर, त्रिंबक दिनकर, मुंबई, सार्वजानिक कार्यकर्ते, दक्षिणी ब्राह्मण-को-ऑपरेटिव्ह हाउसिंग सोसायटीचे संस्थापक. मृ. २७-१०-२५ (नाशिक)

वैद्य, बाळकृष्ण रामचंद्र, वकील, पुणें, लोकोपयोगी कार्यकर्ते, वय ७०. मृ. ६-७-१९

विंचूरकर, सरदार रामराव कृष्णराव, विठ्ठल शिवदेव यांचे घराण्यांतील, दानशूर, वय ६०. मृ. २०-२-२७ (पुणें)

व्हिक्टोरिया, महाराणी, ज. २४-५-१८१९, इंग्लंडची राणी, तिसऱ्या जॉर्जच्या चवथ्या मुलाची मुलगी, नऊ अपत्यांची माता, १८५८ मध्यें हिंदुस्थानासाठीं ( राणीचा ) जाहीरनामा काढून १८७६ मध्यें हिंदुस्थानची बादशाहीण झाली, प्रेमळ व निर्मळ मनाची राष्ट्रदेवी. मृ. २२-१-०१

## श

शहाजी ऊर्फ छत्रपति, जंगलीमहाराज, ब्राह्मोसमाजी, सातारा. मृ. १-६-९२ ( पुणें )

शारंगपाणी, रा. ब., कृष्णराव विनायक, लोकमान्यांचे सहाध्यायी, बडोदें संस्थानांतील वृद्ध, अनुभवी व मनमिळाऊ न्यायमंत्री, सहविचारिणी सभा, चिमाबाई हायस्कूल, मद्यपाननिषेधक मंडळ, हिंदविजय जिमखाना, प्रजामंडळ इ. संस्थांचे निकट संबंधी, टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या सीनेटचे मेंबर, वय ७०. मृ. २६-३-२३ ( बडोदें )

शाहूमहाराज, छत्रपति, कोल्हापूरचे राजे, चोख राज्यकारभारी, मर्दानी खेळांत निष्णात, शिकारी, कारस्थानपटु, धर्म, राजकारण, समाजशास्त्र वगैरे सर्वांत वक्रबुद्धीचा नांगर चालविणारे, भव्य शरीरयष्टीचे. मृ. ६-५-२२

शिकाई, यु-आन, चिनी साम्राज्याचे अध्यक्ष. मृ. जून १९१६

शिखरे, रा. ब., पंढरीनाथ वामन, जन्म १८७३, नामांकित डॉक्टर, बी. जे. मेडिकल स्कूलचे व्यवस्थापक. मृ. १८-२-३० ( पुणें )

शिरसंगकर, जयाप्पा लिंगाप्पा, नवलगुंदचे लिंगायत पुढारी, दानशूर, वय ४५. मृ. २३-८-०६

शिवाजीमहाराज, छत्रपति, करवीर, मृ. २५-१२-८३

शिशिर कुमार, बाबू कलकत्ता, अमृत बझार पत्रिकेचे मूळ उत्पादक व चालक, राष्ट्रीय रणांगणांतील प्रमुख वीर, वय ७१. मृ. १०-१-११

शुक्ल, पंडित बिशनदत्त, जबलपूर, बजनदार काँग्रेसभक्त. मृ. ११-१-२१

शेजवलकर, नरसिंहशास्त्री, पुणें, व्याकरण व वेदांतशास्त्रपारंगत. मृ. सप्टें. १९००

शांताराम नारायण, मुंबईचे प्रासिद्ध वकील. मृ. डिसें. १८९१

शिंदे, अलिजाबहादूर जयाजीराव, ग्वाल्हेर, धूर्त, राजनिष्ठ, राजकारणचतुर व अनुभवशीर राजे, १८५७ सालीं राजनिष्ठ राहिले. मृ. २०-६-८६

शिंदे, नारायण बाबाजी, एम्. ए., नेटिव्ह प्रेसचे बातमीदार. मृ. ऑगस्ट १९००

## स

सन्. यतसेन, डॉ., आशिया खंडांतील एक प्रसिद्ध पुरुष व स्वातंत्र्याचे प्रेषित, चीनचे यशस्वी क्रांतिकारक, निस्सीम देशभक्त. मृ. जाने. १९२५

सप्रे, प्रि. भालचंद्र गंगाधर, पुणें, डे. ए. सोसाटीयचे सदस्य, वुइलिंग्डन कॉलेज (सांगली )चे प्रिन्सिपॉल, अर्थशास्त्राभ्यासी, पुस्तककर्ते. मृ. ११-१०-३०

सप्रे, माधवरावजी, बी. ए., मध्यप्रांतांतील सव्यसाची साहित्यसेवक व पुढारी, ' छत्तिसगड मित्र ' ' हिंदी केसरी' ' कर्मवीर ' इत्यादि पत्रांचे संपादक व गीतारहस्याचें हिंदी भाषांतर करणारे. मृ. २३-४-२६ ( रायपूर )

सबनीस, डॉ. गोपाळ विनायक, एल्. एम्. अँड एस्., पुणें, भारत निटिंग वर्क्सचे उत्पादक, वय ३८. मृ. ऑक्टो. १९२७

सयानी, रहिमतुल्ला महंमद, ज. १८४६, सॉलिसिटर, मुंबई म्यु. कॉर्पो. चे अध्यक्ष, '९६च्या कलकत्ता काँग्रेसचे अध्यक्ष, मुंबई इलाख्यांतील कर्ते राष्ट्रीय मुसलमान पुढारी. मृ. १९०२

सरदेसाई, श्रीमंत बाबासाहेब, सावंतवाडीकर. मृ. डिसें. १८९९

सैया, शेठ चुनीलाल, स्पीसी बँकेचे आधारस्तंभ, बँकांच्या धंद्याचे प्रवर्तक, जगांतील सर्व चांदी खरेदी करणारा हिंमतबहाद्दर. मृ. २९-११-१३ ( बांद्रें )

सहस्त्रबुद्धे, रा. ब., बळवंत रामचंद्र, पुणें, वेदशास्त्र पाठशाळेचे एक उत्पादक, दक्षिणभागचे एज्यु. इन्स्पेक्टर, मृ. ५-९-०७ ( विजापूर )

सहस्त्रबुद्धे, बळवंत श्रीधर, सातारा, वकील व पुढारी, सरळ व गोड स्वभावाचे, हौशी, सार्वजनिक कार्यकर्ते. मृ. जुलै १९०४

सॅलिस्बरी, लॉर्ड, इंग्लंडचे मुख्य प्रधान, कॉंझर्वेटिव्ह पक्षाचे प्रमुख, अव्वल दर्जाचे कार्यकर्ते, मुत्सद्दी. मृ. १९०३

साठे, रा. ब., गणेश कृष्ण, सोलापूर, वकील, नेमस्त पक्षाचे पुढारी, साठे-परांजपे स्कीमचे एक जनक. मृ. १८-११-२२

साठे, मोरेश्वर वासुदेव, पुण्याचे जुने वकील, वय ७७. मृ. ५-१०-२७

साठे, रामचंद्र धोंडो, जमखंडी संस्थानचे कारभारी व न्यायाधीश, लोकमान्यांचे कट्टे अभिमानी. मृ. २५-२-३० (पुणें)

साठ्ये, रा. ब., नारायण गणेश, सरकारी सेवा निष्कलंकपणें करणारे व वरिष्ठांची प्रीति संपादन करणारे देशाभिमानी देशहिततत्पर नोकर. मृ. ऑक्टो. १८८३

साधले, लक्ष्मण नारायण, वसईचे सार्वजनिक पुढारी, म्यु. व लोकलबोर्डचे चेअरमन, जंगल-कमिशनांत मेहनत घेणारे. मृ. ३१-५-९७

साने, गणेश वासुदेव, जबलपूरचे प्रसिद्ध वृद्ध नागरिक, स्वदेशीचे पुरस्कर्ते, लोकमान्यानुयायी, वय ८५. मृ. १८-२-२६

साने, बाळाजी बापूजी, बी. ए., एल्. सी. ई., असिस्टंट प्रोफेसर, सायन्स कॉलेज, पुणें, नऊ आंकड्यांपर्यंत तोंडानें गुणाकार करणारे. संपादक, एल्फि. कॉलेज मासिक. मृ. ४-३-८१

साने, माधवराव, पुणें गायन समाजाचे उत्साही सेक्रेटरी, डे. ए. सोसायटीच्या मराठी शाळेंतील हेडमास्तर, न्यू. इं. स्कूलचे शिक्षक, मृ. ९-९-२४

साने, रामचंद्र मोरेश्वर, बार्शी, सुप्रसिद्ध पुढारी, पतपेढ्यांच्या चळवळीचे कार्यकर्ते, सार्वजनिक सभेचे एका वेळचे उपाध्यक्ष, केसरीचे लेखक व ऋणानुबंधी. मृ. २८-११-२५

सामंत, चिंतामण दामोदर, मुंबई, डेक्कन स्टोअर्सचे मालक, स्वदेशीचे पुरस्कर्ते. मृ. ९-१०-२०

सामंत, जगन्नाथ मोरेश्वर, सोलापूर, वकील, प्रसिद्ध पुढारी व देशभक्त. मृ. १२-९-२५

सायन्ना, रा. ब., बाळकृष्ण, पुणें, लष्करांतील प्रसिद्ध व्यापारी, कँप एज्युकेशन सोसायटीचे चालक. मृ. १४-८-९९

सार्जेंट, सर चार्लस, मुंबई हायकोर्टाचे चीफ जस्टिस, सुशिक्षित नेटिव्हांच्या योग्यतेबद्दल पब्लिक सर्व्हिस कमिशनपुढें अनुकूल अभिप्राय देणारे. मृ. १९००

सालरजंग, सर, हैदराबाद ( दक्षिण ), अद्वितीय मुत्सद्दी, बिस्मार्क यांचे तोडीचा, १८५७ सालीं ब्रिटिशांशीं

राजनिष्ठ राहून यानें त्यांची बाजू बरीच राखली, हैदराबादचा जुना वजीर, धोरणी. मृ. ८-२-८३

साहने, लाला गुरुदासराम, रावळपिंडी, बॅरिस्टर. मृ. ३-३-०८

सुखडवाला, शेठ दामोदरदास गोवर्धनदास, मुंबई, प्रसिद्ध व्यापारी. मृ. नोव्हें. १९१३

सेटलुर, ॲडव्होकेट, मुंबई, म्हैसूरचे न्यायाधीश, लोकमान्यांचे स्नेही व चहाते. मृ. ११-१-३० (बेंगलोर)

सेन, बाबू केशवचंद्र, ब्राह्मोसमाजाचे प्रधान आचार्य, उत्तम वक्ते. मृ. ८-१-८४

सेन बाबू गुरुप्रसाद, वकील, पाटणा, बहारचे सार्वजनिक कार्यकर्ते, कॉंग्रेसचे अभिमानी, कलकत्ता युनिव्हर्सिटीचे फेलो, बंगाल कौन्सिलचे सभासद, वय ५८. मृ. १४-१०-००

सेन, रायबहादूर नरेंद्रनाथ, कलकत्ता, 'इंडियन मिरर'चे संपादक, कॉंग्रेसच्या मूळ उत्पादकांपैकीं एक. मृ. जुलै १९११

सोमण, माधव रामचंद्र, सबजज्ज, पंढरपूर, हिंदुस्थानची लोकस्थिति, राज्यव्यवस्था, या पुस्तकांचे कर्ते. मृ. ९-१-९६

सोहनी, नारायण रामचंद्र, मुंबई, 'जगदीश्वर' छापखान्याचे मालक, राष्ट्रीय चळवळीचे साहाय्यकर्ते. मृ. १९०६

सोहनी, रा. ब., विष्णु बाळकृष्ण, शाळाखात्याचे इन्स्पेक्टर, पुणें ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल, डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रॅन्सलेशन सोसायटीचे एक स्थापक. मृ. २४-९-९७

संत, विश्वनाथ गोविंद, संपादक सुधारक, करारी सुधारणावादी, निर्भीड. मृ. ७-२-११

सांबारे, अनत नारायण, एल्. एम्. ॲन्ड एस्. मुंबईचे प्रसिद्ध डॉक्टर, वनस्पतिशास्त्रांतले प्रवीण, आयुर्वैदिक विद्यालयांत शिक्षक व परीक्षक, वेदांत विषयाचे व्यासंगी. मृ. २५-७-११

सांबारे, दामोदर विष्णु, सांगली, सुप्रसिद्ध राजवैद्य. मृ. १५-५-२८

सुंदरलाल, डॉ., हिंदु विश्वविद्यालयाचे व्हाइस चान्सेलर, कायदेपंडित, अलाहाबाद विश्वविद्यालयाचे फेलो, विद्यालयाला १ लाख रुपये देणगी देणारे, करारी गृहस्थ. मृ. १३-२-१८

स्पेन्सर, हर्बर्ट, प्रख्यात पाश्चिमात्य तत्त्वज्ञानी, आजन्म ब्रम्हचारी, तत्त्वज्ञानविषयक ग्रंथकर्ता. मृ. डिसें. १९०३

## ह

हटे, गोपीनाथ सदाशिव, मुंबई, हायकोर्ट वकील, प्रार्थनासमाजाचे आस्थेवाईक सभासद, ग्रंथकर्ते. मृ. २८-३-९०

हडसन, सर जॉन, मुंबई इलायाचे कमांडर-इन्-चीफ. मृ. ९-५-९३

हर्डीकर, भिकाजी महादेव, पुणें सार्वजनिक कार्यांत पुढाकार घेणारे, गरीब असून स्वार्थत्यागी, सरळ निस्पृही स्वभावाचे, वय ५५. मृ. जाने. १९०१

हरिकिसनदास नरोत्तमदास, सर, मुंबईतील व्यापारी पुढारी. दानशूर, वय ५९. मृ. १६-११-०८

हारकोर्ट, सर विल्यम, इंग्लंडमधील लिबरल पक्षांतील प्रमुख मुत्सद्दी. मृ. १९०४

हुकुमचंद, शेठ, पुणें, प्रसिद्ध व्यापारी, केसरीचे आद्य व अढळ हितचिंतक. मृ. २९-११-१७

होळकर, तुकोजीराव, १८४४ पासूनचे इंदूरचे अधिपति, स्वदेशाभिमानी. मृ. १६-६-८६

हिंदुमल बालमुकुंदशेठ, स्वहित बाजूस सारून देशाभिमानानें लोकहित करणारे गृहस्थ, म्युनिसिपल कमिशनर, धर्मशील. मृ. २०-१-९१

ह्यूम, ॲलन, ज. १८२९, उदारमतवादी, राष्ट्रीय सभेचा जनक, लंडनच्या कॉंग्रेस कमेटीचा आत्मा, हिंदी लोकांचा कळकळीचा हितचिंतक, राष्ट्रीय सभेचा जनरल सेक्रेटरी, शास्त्रीय विषयांचा व्यासंगी, ५० वर्षे हिंदुस्थानांत अनेक हुद्द्यांवर नोकर. मृ. ३१-७-१२

---

# केसरीच्या स्फूर्तीनें निघालेल्या संस्था

[ श्री. चिं. ग. काशीकर, वाङ्मयविशारद ]

१. **वर्कमेन ॲसोसिएशन** :—केसरीच्या स्फूर्तीनें निघालेल्या संस्थांपैकीं पहिली संस्था म्हणजे पुण्यास १८८७ सालीं स्थापन झालेली 'वर्कमेन ॲसोसिएशन' ही होय. अर्वाचीन औद्योगिक सुधारणांचें वारें मुंबईनंतर महाराष्ट्रांत प्रथम पुण्यांत आलें. पुण्यास निरनिराळ्या प्रकारच्या कारखान्यांस थोडीबहुत सुरुवात होऊन कामगार वर्गाच्या हितार्थहि कांहीं प्रयत्न चालू होते. कागदाची गिरणी, पेन्सिलींचा कारखाना, वर्कशॉप, वगैरे अनेक संस्था स्थापन झाल्या होत्या. तेव्हां सर्व प्रकारच्या कारखान्यांतील कामगार वर्गाचें हिताहित पहाणारी एखादी संस्था असावी अशी कल्पना केसरीनें प्रसृत केली. त्याप्रमाणें वरील संस्था स्थापिली गेली. कामगारांना चांगलें शिक्षण मिळून त्यांची स्थिति सुधारावी हा या संस्थेचा उद्देश होता. तो साधण्याकरितां एक यंत्रालय व वाचनालय हीं उघडण्यांत आलीं. या संस्थेस पुढें लोकाश्रय मिळून ती चांगली नांवारूपास आली. केसरीनें प्रसंगानुसार स्फुटें लिहून या योजनेचा पुरस्कार केला.

२. **श्रीशिवाजीमहाराजांच्या समाधीचा जीर्णोद्धार** :—१८९५ सालापर्यंत रायगडावरील महाराजांची समाधि आहे कीं नाहीं अशा स्थितींत होती. महाराजांसारख्या ऐतिहासिक विभूतीची समाधि अशा अज्ञात व जीर्ण स्थितींत रहावी ही गोष्ट महाराष्ट्रीयांस लांछनास्पद आहे असें केसरीस वाटलें व तिच्या जीर्णोद्धाराच्या योजनेचा महाराष्ट्र कितपत पुरस्कार करतो, हें अजमाविण्याकरितां केसरींत सूचना आली. महाराष्ट्रांतील सर्व ठिकाणच्या, सर्व जातींच्या लोकांचा या योजनेस

जोराचा पाठिंबा मिळाला, हें पाहून जीर्णोद्धार-कमिटीची योजना करण्याकरितां पुण्यांतील नागरिकांची सभा भरली व जमविलेल्या फंडाची कशी व्यवस्था करावयाची वगैरे मुख्य गोष्टी त्या सभेंत ठरल्या. कमिटीतर्फे विनंतिपत्रक काढून फंड जमविण्यास सुरुवात झाली. केसरींतून अग्रलेख, स्फुटें वगैरे वारंवार येत. ठिकठिकाणच्या लोकांनीं आपण होऊन सभा भरविल्या व वर्गणी गोळा करून ती केसरीकडे पाठविली. केसरींतील लेखांनीं स्फूर्ति उत्पन्न होऊन, हलकीं कामें करणारे मजूर, स्वयंपाकाच्या बाया, भिक्षुक इतर निरनिराळे धंदे करणारे लांबलांबचे लोक या सर्वांनीं आपली ल्हानशी वर्गणी व उत्साहदर्शक पत्रें केसरीकडे पाठविलीं. पत्रें केसरी मुद्दाम प्रसिद्ध करी. १८९५ च्या मे महिन्यांत केसरीनें जीर्णोद्धाराची योजना प्रसिद्ध केली व जुलैअखेर ५६०० रु. जमले, तेव्हां केसरीनें लिहिलें, ' जमा झालेल्या वर्गणीहून ' ज्यास्त वर्गणी अद्यापि जमा होईल. या बाबतींत पुष्कळ उत्सुकता दर्शविली. ' हीच उत्सुकता कायम राहिली तर स्मारकास लागणारी सर्व रक्कम गोळा होईल. ' लोकांची वर्गणी गोळा झाली म्हणजे संस्थानिक, राजेरजवाडे वगैरे वड्या ' लोकांकडून वर्गणी मागण्याचें ठरलें आहे. ' ऑगस्टअखेर ६५०० रु. जमले. स्मारकफंडातर्फे कोल्हापूरच्या महाराजांकडे शिष्टमंडळ गेलें तेव्हां शिष्टमंडळाच्या म्हणण्याचा विचार करून महाराजांनीं मदत करण्याचें आश्वासन दिलें. आणखी अनेक संस्थानिकांनीं स्मारकफंडास मदत केली. एक दोन वर्षांत रायगडावरील समाधीचा जीर्णोद्धार झाला. स्मारकाचें काम १८९७ पर्यंत चालून फक्त समाधीचें काम पुरें झालें. कमिटीतर्फे रायगडावर पाहिला महोत्सव १८९६ सालीं झाला. दुसरा १९०० मध्यें व तिसरा १९०६ मध्यें झाला. श्री. दाजीसाहेब खरे हे कमिटीचे अध्यक्ष व लो. टिळक हे चिटणीस होते.

लॉर्ड लॅमिंग्टन हे १९०६ सालीं रायगड पहाण्यास गेले; तेव्हां लोकमान्यांनीं खरे यांजकडून स्मारक-कमिटी व फंड यांची हकीकत त्यांचे कानावर घातली. त्याप्रमाणें सरकारनें २ मे, १९०७, रोजीं नं. ४४५४ चा पुढील ठराव केला. ' आम्ही ५ ' हजार रु. घालूं, मात्र स्मारकाचें सर्व काम आमच्या देखरेखीखालीं झालें पाहिजे. ' पुढें अध्यक्षांचे संमतीनें केळकर यांनीं स्मारकाची छत्री बांधण्यासंबंधीं काम १९२३ पासून सुरू केलें. ८-१-२४ च्या केसरींत स्मारक-फंडाचा सविस्तर हिशेब प्रसिद्ध झाला, तेव्हां ३१,३७० रुपये शिल्लक होती. सरकारी हुकुमावरून पुराणवस्तुसंशोधन-खात्याचे सरकारी अधिकारी मि. चंद्र हे केळकर यांसह रायगडावर जाऊन प्रत्यक्ष परिस्थिति पाहून आले व तदनुसार चंद्र यांनीं सरकारकडे रिपोर्ट केला. त्यावरून मुंबई सरकारचा नं. ७०२३ चा ठराव निघून स्मारकाच्या छत्रीचा नकाशा व अंदाजपत्रक मंजूर झालें. छत्रीचें काम कशा प्रकारचें व्हावयाचें होतें यासंबंधीं केसरींत पुढील पत्रक प्रसिद्ध झालें. ' ...हल्लींच्या समाधीवर चौफेर शोभिवंत , दगडी जाळी व निमुळत्या मध्यभागाच्या उंच टोकावर रंगीत दगडाचें व

' शोभिवंत आकाराचें तुळशीवृंदावन व पादुकास्थान, तसेंच समाधीच्या भोंवतीं ' फरसबंदी आणि समाधीवर कोणी पाय देऊन चढूं नये, अशाकरितां एक लोखंडी ' कट्टा आणि समाधीचे आसपास माती ढासळूं नये व बंदिस्त रहावी यांकरितां ' जरूर तेथें लहानमोठ्या भिंती अशा प्रकारची स्मारकाची एकंदर योजना ' होणार आहे. ' ( २२-७-२४ ).

' छत्री बांधण्यास एकंदर खर्च एकोणीस हजार रु. येईल. पैकीं बारा हजार ' स्मारक-कमिटी फंडांतून खर्च व्हावयाचे आहेत. पी. डब्ल्यू. डी. खात्याकडून ' पांच हजार व पुराणवस्तुसंशोधन खात्याकडून उरलेले दोन हजार खर्च व्हावयाचे ' आहेत. पुरें झालेलें काम पुढील वर्षी महाराष्ट्रीयांस पहावयास मिळेल आणि ' जमल्यास त्या निमित्तानें पुढील सालीं रायगडावर एक महोत्सव करण्याचा ' कमिटीचा विचार आहे. कुलाबा जिल्हाबोर्डानें रायगडावर एक धर्मशाळा ' बांधण्याची योजना ठरविली आहे. उदार गृहस्थांनीं थोडी मदत दिल्यास एक ' वर्षांत काम पुरें होईल. ' ( २८-४-२५ ). धर्मशाळेसाठीं फंड गोळा करण्यास श्री. पु. स. आठवले यांस फंडाचे प्रचारक नेमण्यांत आलें. धर्मशाळेच्या कामास खुद्द गव्हर्नरसाहेब यांनींहि सहानुभूति प्रकट करून स्वतःची म्हणून दोनशें रु. ची देणगी जिल्हा बोर्डाकडे पाठविली. (२-२-२६). छत्रीचें काम आवाक्यांत आल्यानंतर कमिटीतर्फे ३ एप्रिल, १९२६, हा रायगडाच्या चवथ्या महोत्सवाचा मुख्य दिवस म्हणून मुक्रर करण्यांत आला व केसरींतून महाराष्ट्रीयांस उत्सवाचें सार्वजनिक निमंत्रण केलें गेलें. ( १६-३-२६ ). योगायोगानें महाराजांची पुण्यतिथि तारखेप्रमाणें ३ एप्रिल याच दिवशीं होती. यात्रेकरूंच्या सोयीकरितां रायगडास जाण्याचे भिन्न मार्ग व त्यांवरील सोयी केसरींतून प्रसिद्ध झाल्या होत्या. नागपूरचे राजे लक्ष्मणराव भोसले त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. ता. ३ रोजीं सकाळीं सर्व मंडळी गडावर येऊन दाखल झाली. सकाळीं ९ ते १२ पर्यंत कीर्तन झालें. दुपारीं १ ते ३ पर्यंत प्रसादभोजन झालें. सायंकाळीं ४॥ ते रात्रीं ८ पर्यंत समारंभाचा मुख्य भाग होता. राजे लक्ष्मणराव यांनीं चांदीच्या करणीनें धर्मशाळेची कोनशिला बसविली व स्वतः १५१ रु.ची देणगी दिली. त्यानंतर छत्रिन्याची मिरवणूक निघाली. ती छत्रीजवळ आल्यानंतर सभा भरली. आरंभीं चिटणीस श्री. केळकर म्हणाले, 'लो. टिळकांनीं १९०६ च्या तिसऱ्या समारंभासंबंधीं ' १ मे, १९०६, च्या केसरींत लिहितांना असें म्हटलें होतें कीं, ' महाराजांच्या ' समाधीच्या जीर्णोद्धाराचें राष्ट्रीय कार्य पुरें होऊन रायगडावरील चौथा महोत्सव ' दुरुस्त केलेल्या जगदीश्वराच्या विस्तीर्ण देवालयांत शिवरायांच्या छत्रीसमोर साजरा ' होण्याची वेळ लवकरच येवो. ' त्यांच्या उद्गारांप्रमाणें आज हें काम पुरें झालें आहे.'

उत्सवास एकंदर पांच हजार लोक आले होते. १९२३ अखेर हिशेब प्रसिद्ध केले, तेव्हां २१,३७० रु. शिल्लक होते. त्यांतून छत्रीचे बारा हजार व उत्सवखर्च

वगैरे वजा जातां १६ हजार रु. शिल्लक राहिले. त्याच्या व्याजांतून दर पांच वर्षांनीं रायगडावर एक महोत्सव करण्याचें ठरलें. आठवले यांनीं धर्मशाळाफंडासाठीं प्रचार केला, व १९३० पर्यंत सुमारें ३० हजार रु. मिळवून दिले. १९३० सालामध्यें धर्मशाळेचें व रस्ते दुरुस्तीचें वगैरे कामें पूर्ण झालीं.

**३. पुण्याची वसंत-व्याख्यानमाला :—** ही माला न्या. रानडे यांनीं सुरू केलेल्या अनेक संस्थांपैकीं एक होय. पुढें रानडे यांच्या प्रत्यक्ष पुरस्काराच्या अभावीं ती चालेनाशी झाली. म्हणून टिळक, जिनसीवाले वगैरेंनीं ती पुन: १८९६ सालीं सुरू केली. ' गेल्या वर्षापर्यंत सुधारकांनीं चालविलेल्या व्याख्यानमालेइतकीं यंदांचीं ' व्याख्यानें सरस झालीं नाहींत, ' अशी पूर्वींच्या चालक वर्गानें टीका केली. त्यास केसरीनें स्फुट लिहून उत्तर दिलें कीं, ' मागील वर्षापेक्षां यंदांचीं व्याख्यानें ' सरस झालीं, हें वक्त्यांच्या नांवांवरून कळून येणार आहे. पुष्कळशा व्याख्यानांस ' प्रो. जिनसीवाले हेच अध्यक्ष होते...' ( ९-६-९६ ). दरवर्षीं सबंध मे महिनाभर पुण्यास ठिकठिकाणच्या निरनिराळ्या विषयांवरील व्यासंगी लोकांना बोलावून त्या त्या विषयांवर व्याख्यानें करवून जनतेला ज्ञानामृत पाजणें हा या मालेचा उद्देश होता. ही योजना आतां फक्त पुण्यांत राहिली नसून महाराष्ट्रांत वांई, सोलापूर, नाशिक, भोर, मुंबई इत्यादि ठिकाणीं व मध्य प्रांतांतहि कांहीं ठिकाणीं केसरीच्या पुरस्कारानें प्रसार पावली आहे. पुण्यांतील मालेच्या व्याख्यानांचा सारांश केसरींतून दरवर्षी प्रसिद्ध होत असतो. याविषयीं केसरी म्हणतो, ' विविध व गंभीरविषयक ' ज्ञानाची गोडी, लहानमोठ्या शहरांतील सुशिक्षित व साक्षर वर्गांस लागल्यास ' त्यांच्या बहुश्रुतपणांत भर पडून, विचारास उच्च वळण लावण्याचें श्रेय व्याख्यान- ' मालांना मिळेल. ' ( १५-६-२६ ).

**४. पैसाफंड :—** याची मूळ कल्पना प्रथम तारापद बानर्जी नामक एका बंगाली मुलाच्या डोक्यांत १८६५ सालीं आली. तेथून वर्तमानपत्रद्वारें ही महाराष्ट्रांत आली. ती व्यवहार्य करण्याचा १८७३ सालीं श्री. गोविंदराव जोशी, वसई, यांनीं प्रयत्न केला. १८९६ पर्यंत भट, वेलणकर वगैरनींहि प्रयत्न केला व त्यांस थोडें यशहि आलें. यानंतरचा प्रयत्न म्हणजे श्री. अं. दा. काळे यांचा. वजनदार लोकांचें पैसाफंडाकडे लक्ष जावें म्हणून काळे यांनीं मुंबईस पैसाफंडो-त्तेजक सभा स्थापिली. यापुढें फंडानें जनतेच्या पुढाऱ्यांचें लक्ष वेधून घेतलें. केसरीला ही कल्पना थोड्या अवधींत शक्य कोटींतील वाटली व त्यानें फंडाला जोरानें चालना दिली. पुढें फंडाला जें व्यापक स्वरूप प्राप्त झालें, त्याला केसरीच बहुतांशीं कारण झाला. १९०४ च्या जुलैअखेर टिळकांच्या सूचनेवरून महा-राष्ट्रांतील प्रमुख पुढाऱ्यांची सेंट्रल कमिटी नेमण्याचें ठरलें. यानंतर मुंबईस राष्ट्रीय सभेचें २० वें अधिवेशन झालें. अनायासें लोक जमलेले पाहून त्याचा फायदा घेण्यासाठीं पैसाफंडाच्या पुरस्कर्त्यांनीं सभा भरविली. तींत सेंट्रल कमिटी नेमली गेली. तींत

टिळकहि होते. पैसाफंडाची कल्पना कितपत शक्य कोटींत येते, हें पहाण्यासाठीं प्रथम एक वर्षभर १०-२० माणसांनीं हिंडून प्रयोग करण्याचें ठरलें. १६ ऑक्टोबर, १९०५, ला पैसाफंड कमिटी रजिस्टर्ड झाली. १९०७ च्या सप्टेंबरांत कमिटीची सभा झाली. त्या वेळीं २०,००० रु. जमले होते. विजयादशमी व गुढी पाडवा या दोन दिवशीं मोठ्या शहरांतून स्वयंसेवकांमार्फत फंड गोळा करण्याची योजना १९०८ पासून अंमलांत आली. तेव्हां केसरीनें स्फुट लिहून विद्यार्थी व तरुण यांस स्वयंसेवक होण्यास उत्तेजन दिलें. तेव्हांपासून पुढें दरवर्षी या दोन दिवशीं स्वयंसेवकांमार्फत मोठ्या शहरांतून हा फंड गोळा होऊं लागला. पैसाफंड म्हटल्या-बरोबर मध्यम लोक एका पैशावरच भागवतात असें दिसून आल्यावर केसरीनें लिहिलें कीं, 'पैसा-फंड ही निव्वळ औद्योगिक संस्था आहे. तेव्हां पेन्शनरांनींहि 'मदत करण्यास हरकत नाहीं. पैसाफंड या नांवावरून एक पैसा दिला तरी 'चालतो, असा अर्थ निष्पन्न होतो. पण देशांतील प्रत्येक मनुष्य एक पैसा देण्यास 'तयार होईल, तेव्हांच हा नियम सार्थ होईल. राष्ट्रकार्याबद्दल इतकी तीव्र जागृति 'होईपर्यंत सुशिक्षित व समंजस लोकांनीं एक पैशाच्या मागें दडणें योग्य नाहीं.' (३१-३-०८). १९०८ च्या दसऱ्यापर्यंत फंड रु. ३३,२०० जमला होता. आदल्या वर्षींच तळेगांव येथें कांचसामान तयार करण्याचा लहानसा कारखाना उघडला गेला. तीन जपानी इसम प्रत्यक्ष कृति करून दाखविण्याकरितां आणले होते. एका वर्षांत कारखान्यानें कांचेचे कांहीं जिन्नस तयार करून जनतेपुढें मांडले. नंतर इमारती, भट्ट्या वगैरे बांधण्याचें काम चालू झालें. एवढासा फंड त्या कामांतच संपून जाईल हें जाणून केसरीनें अग्रलेखांतून पैसाफंडास मदत करण्याविषयीं जनतेस वारंवार विनंति केली. (१०-३-०८).

ईश्वरदास हे कांचशाळेचें काम पाहूं लागले. कांचशाळेला व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें व चांगला माल तयार होऊं लागला. या वेळीं सरकारचें लक्ष या कारखान्या-कडे गेलें व १९१० च्या ऑगस्टमध्यें मुंबई सरकारचे एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर यांनीं कारखाना पाहिल्यानंतर कारखान्यास सरकारांतून मदत मिळवून देण्याचें आश्वासन दिलें. त्याप्रमाणें २६ ऑगस्ट रोजीं पुढील प्रमाणें सरकारी ठराव झाला. 'मुंबई सरकारच्या कोणत्याहि खात्यास लागणारा कांचेचा माल खरेदी करितांना 'तळेगांवच्या कारखान्यांतील माल शक्य तितका घेतला जावा.' (६-९-१०). यानंतर गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क हे तळेगांवची कांचशाळा पहाण्यास आले. पैसाफंड जमविण्याचे कामीं केसरी जोरानें आग्रह करी. स्वयंसेवकांचीं संमेलनेंहि होत. यावरून दिसून येईल कीं, केसरीपक्षाच्या उठावानें हें सर्व चाललें होतें.

प्रचाराचा एक नवीन उपक्रम पुढें सुरू झाला. केसरीसंस्थेचे परम अभिमानी गृहस्थ देशदास रानडे यांनीं पैसाफंड गणेश मेळा काढला व महाराष्ट्रांत ठिक-ठिकाणीं मेळ्याचे प्रयोग करून, खर्चवेंच वजा जातां जी शिल्लक उरेल ती पैसा-

फंडाकडे दिली. हा उपक्रम त्यांनीं बारा वर्षे म्हणजे १९२९ सालापर्यंत सुरू ठेविला होता. या मेळ्यातर्फे रानडे यांनीं बरीच मोठी रक्कम पैसाफंडास मदत म्हणून मिळवून दिली. ( २०-२-२३ ).

आतांपर्यंत ज्यांचें संक्षिप्त वृत्त सांगितलें, त्यांशिवायहि कांहीं संस्था केसरीच्या स्फूर्तीनें अगर साहाय्यानें निघालेल्या व चाललेल्या आहेत. वेळास येथील नाना-फडणवीसांच्या स्मारकाची योजना केसरीनें मांडली. त्याप्रमाणें फंड वगैरे जमून स्मारकाची व वार्षिक उत्सवाची योग्य ती व्यवस्था झाली. शिवजयंत्युत्सव व गणेशोत्सव हे दोन सार्वजनिक उत्सव लोकसंघटनेकरितां केसरीनें प्रवृत्त केले. या प्रत्यक्ष केसरीच्या स्फूर्तीनें निघालेल्या व ज्यांत केसरीचा संबंध असलेली मंडळी कार्य करीत होती अशा संस्था झाल्या. त्यांशिवाय केसरीनें ह्या पन्नास वर्षांत अनेक प्रकारच्या लोकोपयोगी सार्वजनिक संस्थांना आपलेपणानें संस्थापनेपासून साहाय्य केलें आहे. अर्थात् हें सहाय्य हरएक प्रकारचें म्हणजे केसरींतून वारंवार प्रसिद्धि, संस्थेवरील आक्षेपांना उत्तरें, कांहीं संस्थांच्या कारभारी मंडळांमध्यें केसरीचे म्हणून कोणी सदस्य, केसरी संस्थेंतून वार्षिक वा ठोक देणगी, संपादकीय लेख, सूचना लिहिणें भेटी, देणग्या मिळवून देणें इत्यादि शक्य त्या बाजूनें झालेलें आहे. अशा संस्थांपैकीं कांहींचा उल्लेख पुढें केला आहे.

( प्रथम ) न्यू इंग्लिश स्कूल, डेक्कन एज्युकेशन सोसायटी, सार्वजनिक सभा, पुणें, वक्तृत्वोत्तेजक सभा, पुणें, अनाथ-विद्यार्थि गृह, पुणें, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें, मीमांसा विद्यालय, पुणें, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें, टिळक स्मारक मंदिर, पुणें, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणें, टिळक महाविद्यालय, पुणें, मराठी ग्रंथसंग्रहालय, पुणें, मुंबई व ठाणें, गोपाल गायन समाज, पुणें, महाराष्ट्रीय मंडळ, पुणें, श्रीशिवचरित्र-कार्यालय, पुणें, राजवाडे संशोधन मंदिर, धुळें, श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम, मुंबई, गीता-धर्म-मंडळ, पुणें, प्राज्ञपाठशाळा, वांई, राष्ट्रीय विद्यालय, येवलें, आयुर्वेदीय रुग्णालय, पुणें, युवक संघ, पुणें, शुद्ध पंचांग मंडळ, पुणें, लोकमान्य स्मारक, गुर्लहोसूर, इ. इ. याप्रमाणें विविध क्षेत्रांत कार्ये करणाऱ्या अनेक लहानमोठ्या संस्थांना शक्य ती मदत करून केसरी त्यांच्या उत्कर्षास कमजास्त प्रमाणांत कारणीभूत झाला आहे. केसरीची ही कामगिरी खास कमी महत्त्वाची नाहीं. त्या त्या संस्थांच्या इतिहासांत केसरीचा बहुमानानें उल्लेख झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

---

# ग्रंथालयांचें महत्त्व व त्यांचा प्रसार

[ श्री. रघुनाथ शतानंद पारखी ]

'कोणत्याहि भाषेंतील ग्रंथसंग्रह वाढविण्याचें काम ती भाषा बोलणाऱ्या 'लोकांच्या अंगीं उत्साह आणि कांहीं विशिष्ट हेतूंकरितां खटपट करण्याची बुद्धि 'हीं जागृत असल्याखेरीज होत नाहीं.' —२३-३-९६

'शाळेंतील शिक्षण जन्मभर पुरत नाहीं. यास्तव ग्रंथ हेच आपले कायमचे गुरु 'होत.' —७-१-१७

वरील विषयांवर केसरीनें वेळोवेळीं आपले जे विचार व्यक्त केले आहेत ते थोडक्यांत देण्याचा पुढें प्रयत्न केला आहे.

'...देशी भाषेंतल्या ग्रंथसंग्रहांकरितां आम्हांला पुढील गोष्टी साधावयाच्या 'आहेत. ( १ ) मराठी भाषेंत चांगल्या व उपयुक्त ग्रंथांची प्रसिद्धि, ( २ ) त्यांचा 'वाचकवर्गांत प्रसार. हें साधण्यास चांगले ग्रंथ निर्माण केले पाहिजेत व लोकांत 'वाचनाची अभिरुचि निर्माण झाली पाहिजे.' ( १-४-९० ).

'ज्ञानाचीं सदावर्तें' ह्या अत्युत्तम लेखांत, (१२-६-९४), केसरीकार सांगतात—

'...ज्ञानार्जनाची एक नवी यात्राच या नव्या युगांत निर्माण झाली असून 'या यात्रेचेहि चार धाम, बारा ज्योतिर्लिंगें, वगैरे प्रकार आहेतच...यात्रेकरूंस 'तदनुरूप मदतीची अपेक्षा असते; आणि ही मदत मोफत शिक्षणाच्या शाळा, 'खुलीं वाचनालयें आणि समृद्ध ग्रंथ-संग्रह यांच्या सदावर्तांनीं मिळतें...'

'...... इतर कित्येक गोष्टींप्रमाणें पुस्तकालयांसंबंधानेंहि मूळ मर्म विसरलें 'जाऊन केवळ त्यांच्या बाह्य स्वरूपाची आणि नसत्या महत्त्वाची अतिशयोक्ति 'होण्याचा संभव असतो....पुस्तकसंग्रह आणि त्यावरून ओळखली जाणारी समा- 'जाची विद्याप्रियता यांचें प्रमाण नेहमींच सम राहील असें म्हणतां येणार नाहीं. 'ग्रंथ जमविणें हा एकदां कां निव्वळ हौसेचा किंवा षोकाचा विषय होऊन राहिला 'म्हणजे मग ग्रंथांवर ग्रंथ जमा होऊं लागतात, वाचनालयांचें उत्पन्न वाढूं लागतें, 'आणि त्यांचा एकंदर बडेजाव फैलावत जातो......'

'...... जगाच्या उत्पत्तीपासून आजवर मनुष्यास खरें व निर्मळ सुख ग्रंथ- 'वाचनानेंच मिळालेलें आहे. इतर सुखांनीं भरलेला संसार सोडून संन्यास न घेणाऱ्या 'मनुष्यासहि, त्याचा जितका वेळ निर्विकार व एकाग्र अशा ग्रंथवाचनांत जातो, 'तेवढ्या वेळेपुरता संन्याससुखाचा अनुभव त्याला संसारांतच मिळतो असें म्हणण्यास 'हरकत नाहीं....जगाच्या सुखाला वैराग्याचें विरजण घालणारें आणि दुःखरोगाला 'बरें करणारें औषध म्हटलें म्हणजे एक ग्रंथवाचनच होय...एखाद्या लहानशाच

' कां होईना ग्रंथसंग्रहालयांमध्यें आपण असलों असतां वर्तमान व भूत या दोन ' काळांतील अंतर आपणांस तोडून टाकतां येतें व गतकालीं होऊन गेलेल्या कोण- ' त्याहि महानुभाव ज्ञात्या पुरुषाच्या आत्म्याशीं समरस होऊन त्याच्या सहवासांत व ' संभाषणांत काळ घालवितां येतो......'

'...... ग्रंथसंग्रहांची रचना कशी करावी, ते सर्वसाधारण असावे किंवा ' विशिष्ट भाषेचें अगर विषयांचें असावे, वगैरे गोष्टी महत्त्वाच्या आहेत व त्यांचा ' विचार आधुनिक युरोपियन राष्ट्रांनीं जितक्या परमावधीस नेऊन पोहोंचविला आहे ' तितका तो पूर्वी कधीं तरी पोहोंचला असेल किंवा नाहीं याची मात्र शंका वाटते. ' तथापि ही बाब गौण असून ग्रंथसंग्रहांचा फायदा सर्वसाधारण जनतेस जितक्या ' सुलभ व बिनखर्ची रीतीनें देतां येईल, तितका देण्याची तजवीज करणें ही गोष्ट मात्र ' अत्यंत महत्त्वाची असून ती जेणेंकरून साध्य होईल तें आज आमचें कर्तव्य असलें ' पाहिजे......' (१७-१०-११). यानंतर वाचनालयांची परिषद् भरली होती, त्या परिषदेसंबंधीं लिहितांना वाचनालयांच्या रचनेविषयीं केसरीनें सूचनात्मक लिहिलें.

'...... वाचनालय संस्था या राष्ट्रीय शिक्षणाचेंच कार्य करीत आहेत व या ' दृष्टीनें पुढें ज्या दृष्टीनें एकंदर शिक्षणाची इमारत उभारली जाईल त्याबरोबर ' वाचनालय संस्थांनाहि विशिष्ट स्वरूप दिलें पाहिजे...... ' ( १४-६-२१ ). आणि नंतर वाचनालयांच्या उपयुक्ततेविषयीं १९२६ सालीं अशी परिषद् झाली तेव्हां केसरीनें लिहिलें. '......सक्तीच्या शिक्षणप्रसाराचा प्रश्न जितका खर्चाचा व ' अवजड आहे तितका हा वाचनालयांच्या स्थापनेचा प्रश्न नाहीं...ज्यांस लिहितां ' वाचतां येत नाहीं, त्यांस वृत्तपत्रें व वाचनालयांतील पुस्तकें वाचून दाखविण्याची ' शिफारसहि अत्यंत उपयुक्त व परिणामकारक आहे....' ( २५-५-२६ ).

म्युनिसिपॅलिट्या व मोफत वाचनालयें यांच्या कर्तव्याविषयींहि त्यांना केसरीनें सांगितलें आहे. ' सरकार, म्युनिसिपॅलिट्या व लोकलबोर्डें यांनीं प्राथमिक शिक्षण ' सक्तीनें मोफत देणें हें जसें त्यांचें कर्तव्य आहे, त्याप्रमाणेंच वाचनालयें काढून तीं ' चालविणें अगर अस्तित्वांत असणाऱ्यांना मदत करण्याच्या गोष्टीहि त्यांच्या ' कर्तव्यकक्षेमध्यें येतात. ' ( १६-५-२५ ).

महाराष्ट्रांत ग्रंथालयांच्या प्रसाराकरितां लो. टिळकांनीं आटोकाट प्रयत्न केला आहे. त्यांनीं व त्यांच्या बरोबरीच्या आगरकर, जिनसीवाले वगैरे मंडळींनीं पुण्यास १८९४ सालीं 'महाराष्ट्र-सरस्वती-मंदिर' स्थापन केलें होतें व हें मंदिर महाराष्ट्रांतच काय पण सबंध हिंदुस्थानांत एक आदर्शभूत ग्रंथालय व्हावें अशी त्यांची इच्छा होती. ठाणें ग्रंथसंग्रहालय, मुंबई ग्रंथसंग्रहालय व पुणें ग्रंथसंग्रहालय यांवरील केसरीचीं स्फुटें फारच स्फूर्तिदायक आहेत. श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं आपले संस्थानांत ग्रंथसंग्रहालयांची जी भरभराट केली आहे, त्याबद्दल केसरीनें वेळोवेळीं प्रशंसोद्गार काढलेले आहेत व महाराष्ट्रांत अशा तऱ्हेची चळवळ जोरांत चालली पाहिजे असें म्हटलें

आहे. ' ज्ञानाचीं सदावर्तें ' या मथळ्याखालीं ग्रंथालयांसंबंधीं एक स्वतंत्र स्फूर्तिदायक अग्रलेख लिहून केसरीकारांनीं महाराष्ट्राला कायमचा ऋणी करून ठेविलें आहे. हा लेख अत्यंत मार्मिक व सर्वतोपरी महत्त्वाचा आहे. या लेखांत जगांतील ग्रंथालयांचा इतिहास देऊन ग्रंथांचें व ग्रंथालयांचें महत्त्व फारच मनोरंजक व मार्मिक रीतीनें स्पष्ट केलें आहे. महाराष्ट्र-वाचनालय-संघ व त्याच्या परिषदा यांनासुद्धां केसरीनें पुष्कळच उत्तेजन दिलें आहे, असें केसरींतील वेळोवेळीं आलेल्या स्फुटांवरून सिद्ध होतें.

---

# जमीनमहसूल व तद्विषयक प्रश्न

[ प्रि. धनंजय रामचंद्र गाडगीळ, एम्. ए., एम्. लिट. ( कँटब ) ]

केसरीस जमीनमहसुलाबाबत लिहिण्याचे प्रसंग मुख्यत्वेंकरून पिकें बुडालीं असतां फेरपहाणीचे वेळीं अथवा एकादें बिल कौन्सिलापुढें मांडलेलें असतां आलेले आहेत. १९२५ ते १९२७ सालीं लँड रेव्हेन्यू कमिटीची चौकशी चालली होती, तेवढा प्रसंग सोडल्यास केवळ तत्त्वदृष्ट्या या विषयावर केसरींत लिखाण बहुतेक आलें नाहीं. तथापि प्रासंगिक बाबींवरील अग्रलेख व स्फुटें यांमधील प्रदर्शित केलेल्या विचारांत एकंदर सूत्रबद्धता उत्कृष्ट रीतीनें दिसून येते. निर्भीडपणें टीका करणें, अमुक एका प्रसंगीं सरकारी जुलुमाचा विरोध अमुक तऱ्हेनें करा असें जनतेस आग्रहानें सांगणें व अगदीं कठिण विषयसुद्धां सुबोध करणे हेच केसरीचे गुण येथेंहि निदर्शनास येतात.

केसरी निघाल्यानंतरचीं दहाबारा वर्षें पीकपाण्याच्या मानानें बरीं गेलीं म्हणून त्या वेळेस केसरीस सूट व तहकुबी यांसंबंधीं लिहिण्याचें कांहीं प्रयोजन पडलें नाहीं. पण १८९६-९७ व १९००-०१ या दोन सालांतील दुष्काळांनीं सारावसुली हा विषय महत्त्वाचा होऊन बसला. १८८० च्या फॅमिन कमिशननें एकंदर फॅमिन रिलीफ कोडास कायमचें स्वरूप देऊन तहकुबी व सूट हीं केव्हां व कशीं द्यावीं याचे नियम निश्चित केले होते. हे चोहोंकडे सारखेच अमलांत आणले जात नसत. त्यांतहि मुंबई सरकारची या बाबत अनुदारपणाची प्रथमपासूनच प्रसिद्धि होती. १८९२ च्या शेतकरी कमिशननेंहि मुंबई सरकारनें सारावसुलीचें धोरण बदललें पाहिजे अशी शिफारस केली. या कमिशनाचे रिपोर्टावर लिहितांना केसरीनें सरासरीच्या तत्त्वाबद्दल समर्पक दृष्टांत दिला. ' धारे बसवितांना बरेवाईट पिकांची सरासरी काढून त्याप्रमाणें सारा कायम ' करितात असें सरकारच्या ऑफिसरांचें म्हणणें आहे. हें म्हणणें जरी आपण ' खरें घेऊन चाललों, तरी या सरासरीचा शेतकऱ्यांस कांहीं विशेष फायदा होत ' असेल असें दिसत नाहीं. सरासरीचे मानानें जीं प्रमाणें ठरविलीं असतात,

'तीं हिशेबास कितीहि सोईवार असलीं, तरी नदींत सरासरीन गुडघाभर 'पाणी आहे असल्या बोलण्यावर विश्वास ठेवून जसा एकदा मनुष्य डोहांत 'बुडावयाचा, त्याप्रमाणेंच आमच्या शेतकऱ्यांची स्थिति आहे.' (२०-१२-९२). तहकुबी वेळेवर न मिळाली तर शेतकरी कसा साफ बुडतो याचें प्रत्यंतर लगेच चार वर्षांनीं आलेंच. १८९६-९७ सालच्या दुष्काळाबद्दल केसरी म्हणतो, 'गुरें 'कडब्याच्या किंमतीस विकूं लागलीं आणि कडबा सोन्याच्या भावानें जात चालला 'आहे. सरकारनें आमच्याकडून पैसे घेऊन दुष्काळाचा विमा उतरिला आहे व फॅमिन 'रिलीफ कोडाची नवी आवृत्ति प्रसिद्ध करून या प्रसंगीं आपण कशी मदत करणार 'हें सरकारनें जाहीर केलें आहे. तेव्हां आतां सरकारनें ज्या ज्या गोष्टी करतों म्हणून 'कबूल केलें आहे, तितक्या त्याच्याकडून लोकांनीं पुऱ्या करवून घ्याव्या. गरीब 'शेतकरी लोकांस संकटसमयीं काय करावें हें सुचत नाहीं, त्यांस मार्ग दाखवून 'देणें हें आमचें काम आहे व तो मार्ग म्हटला म्हणजे 'सरकारकडे जा' 'असा उपदेश करणें व सरकारकडे जाऊन (१) तहकुबी (२) रिलीफ कामावर 'मजुरी व (३) तगाई हीं माग,' असें सांगणें. या समयीं पुण्याचे सार्वजनिक सभेनें लोकांस हक्काची जाणीव करून देण्याकरितां प्रचारक नेमून उत्कृष्ट काम केलें. पण हें सरकारास अनिष्ट वाटलें व सभेनें पाठविलेल्या मुखत्यारांवर खटले करण्यापर्यंत मजल गेली. कांहीं झालें तरी न डगमगतां आपले कायदेशीर हक्क संभाळणें हेंच जनतेचें कर्तव्य आहे व तें लोकांस नीट समजावून देऊन सरकारी अधिकाऱ्यांपुढें त्यांचें म्हणणें मांडणें हें पुढाऱ्यांचें कर्तव्य आहे, अशीच केसरीची या वेळची शिकवण आहे. 'अमुक आणे पीक बुडाल्यास साऱ्याची तहकुबी अगर 'माफी मिळेल असा जर कायदा आहे तर सरकारी अधिकाऱ्यांनीं लोकांस ती माफी 'अवश्य दिली पाहिजे; व लोकांनींहि ती निश्चयानें पण शांततेनें आग्रहपूर्वक मागून 'घेतली पाहिजे! एका हातांत फॅमिन रिलीफ कोड, दुसऱ्या हातांत अर्ज व मनांत 'त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय अशी जेव्हां रयतेची स्थिति होईल, तेव्हांच त्यांची 'या दुष्काळांत दाद लागेल. नाहीं पेक्षां दुष्काळनिवारणार्थ चांगला कायदा 'केल्याचें श्रेय सरकार घेईल आणि आम्ही मात्र उपाशी मरूं.' (१६-१२-९६). 'तसेंच पुढाऱ्यांस 'असल्या गोष्टीस आतां भिऊन उपयोगाचें नाहीं, किंबहुना 'योग्य रीतीनें रयतेच्या पोटाकरितां भांडत असतां एखाद्यास तुरुंगांत जाण्याचा जरी 'प्रसंग आला तरी हरकत नाहीं,' (२२-१२-९६), असा उपदेश केला आहे. या वेळीं मुंबई सरकारचें धोरण अत्यंत निर्दयपणाचें होतें, त्यावर केसरी म्हणतो, 'सरकार 'मारवाडी आहे, अनुदार आहे.' नंतर सरकारी ठरावाची फॅमिन रिलीफ कोडाशीं विसंगतता दाखवून व साऱ्याच्या तहकुबीची व सुटीची एकंदर हकीकत देऊन किती सूट मिळावयास पाहिजे याचें केसरीनें विवेचन केलें. १८९७ सालच्या फॅमिन कमिशननें मुंबई सरकारच्या या धोरणाबद्दल बरीच कडक भाषा वापरली.

एकंदर तहकुबी फार अल्प दिली गेली व त्यांत ऐपतदार व विनऐपतदार हा नवीनच फरक करण्यांत आला, या दोन मुद्द्यांवर केसरीप्रमाणेंच फॅमिन कमिशननेंहि जोर दिला. हा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर साऱ्याची सूट देण्याची वहिवाट या देशांत कशी जुनी आहे हें सांगून केसरीनें यापुढें तरी मुंबई सरकारचे डोळे उघडतील अशी आशा प्रदर्शित केली. १९०० सालीं तहकुबीबाबत पूर्वींइतका अन्याय झाला नाहीं, पण एकंदर सरकारी व्यवस्थेंत कंजुषपणाच दिसून आला व बरेच ठिकाणीं खालच्या अंमलदारांनीं दांडगाई केली. त्यांपैकीं कांहीं ठिकाणीं चौकशी होऊन लोकांची तक्रार खरी ठरली. या वेळचें विशेष प्रसिद्धीस पावलेलें प्रकरण म्हणजे नामदार पारख यांनीं गुजराथेंतील कांहीं प्रकार उघडकीस आणले त्याबद्दलचें. यावर केसरीनें अग्रलेख लिहिले होते. पुढें १९०२ सालीं हिंदुस्थान सरकारनें दुष्काळांतील सुटीकरितां एकदम रक्कम मंजूर केली असतां, मुंबई सरकारनें वैयक्तिक चौकशीची मध्येंच भानगड उपस्थित केली, त्याबद्दल केसरीनें 'कोठावळ्याचें मध्येंच पोट कां दुखतें ?' असा प्रश्न विचारून वेळोवेळीं सात आठ स्फुटें लिहिलीं. तसेंच १९०६-०७ सालीं याबाबत नवीन नियम प्रसिद्ध झाले, तेव्हां त्यांवर तपशिलवार टीका केली व अगदीं अलीकडे म्हणजे १९१८ सालचे खेडा सत्याग्रहाचे वेळेस लॉर्ड विलिंग्डननें सूट अथवा तहकुबी देणें ही सरकारी मोहबत आहे, असें एका भाषणांत म्हटलें असतां ही मोहबत नसून हा रयतेचा पूर्वापार चालत आलेला हक्क आहे असें केसरीनें त्यांस खडखडीत बजावलें.

शेतकरी लोकांची इंग्रज सरकारच्या राज्यांत निकृष्टावस्था होण्यास जीं अनेक कारणें आहेत त्यांपैकींच वारंवार वाढणारा शेतसारा हें एक होय, (२४-१०-९९), असें म्हणून या लेखांत डहाणू-उंबरगांव पेट्यांतील सारावाढ कशी बेजबाबदार रीतीनें करण्यांत आली, सरकारनें स्वतःच घालून दिलेले नियम कसे पाळण्यांत आले नाहींत, सरकारी ठराव जरी चांगले असले तरी खालील अधिकाऱ्यांचे कर्मानें जुलूम होतो व यावर अर्ज करावे म्हटलें तर हें दाद लागण्याचें द्वार नेहमीं मोकळें असतेंच असें नाहीं, असे उद्गार काढले. फेरपहाणीविरुद्ध तक्रार करण्याचे प्रसंग वारंवार यावयाचेच. १८९२ सालीं रत्नागिरी जिल्ह्यांत सारावाढ झाली, त्या वेळेस 'हें सारा वाढविणें कीं जुलूम ?' असा अग्रलेख होता. या वेळेस फेरपहाणीच्या बद्दलचे नियम अगदींच सैल होते. 'एकदम सारा दोनशें पटीनें वाढतो हा धड-
'धडीत अन्याय आहे व अशी सक्ती जर एखादा इनामदार करूं लागला तर सर-
'कारच त्याचा प्रथम निषेध करील. पण स्वतःवर प्रसंग आला म्हणजे 'पुराणांतील
'वांगीं पुराणांत,'' अशा तऱ्हेची सरकारावर टीका केली. १९०३ सालीं मॅक्डॉनल्ड कमिशननें विहिरी, ताली वगैरेपासून सुधारणा झाल्यास त्यांपासून होणाऱ्या फायद्यावर सारा घेऊं नये, या केलेल्या शिफारशीवर हिंदुस्थान सरकारनें नकारार्थी ठराव काढला. त्यांत सरकारनें आपला अनुदारपणा, कंजूषपणा व मारवाडीपणा व्यक्त केला, असें

स्पष्ट मत केसरीनें नमूद केलें. ( ५-५-०३ ). १९२० सालीं लढाईमुळें झालेली महागाई व अँडरसनचें खंडाचें तत्त्व या नवीन बाबी पुढें आल्या. त्यामुळें सरसहा सर्वच फेरपहाणीच्या संबंधीं तत्त्वांत व तपशिलांत विरोध करणें भाग पडलें. १९२४ सालचे पुढें तर केसरींत या विषयावर अनेक स्फुटें व अग्रलेख येऊन गेले. सांगोलें, इगतपुरी, अलिबाग, देवगड वगैरे अनेक तालुक्यांतील सारावाढीचे वेळेस केसरीनें रयतेची बाजू स्पष्टपणें पुढें मांडली. अगदीं शेवटचें म्हणजे बार्डोलीचें उदाहरण. या सर्वांबाबत प्रथमपासूनच केसरीचें धोरण उघड आहे. अन्याय दिसला कीं, दाद-फिर्याद निकरानें मागण्याचा उपदेश करावयाचा, नियमबाह्य वर्तन झाल्यास त्यावर प्रमाण-सिद्ध सडेतोड टीका करावयाची व जेथें नियमांचा अभाव असेल व अधिकाऱ्यांचे बेजबाबदार वर्तनास मुभा असेल, तेथें नियम झाले पाहिजेत व जबाबदारीचें तत्त्व स्वीकारलें पाहिजे असा आग्रह धरावयाचा.

जमीनमहसूल बदलण्याच्या १९०१ च्या कायद्यास अगदीं प्रथमपासून जोराचा विरोध केसरीनें केला. कायद्याचा पहिला मसुदा प्रसिद्ध झाल्याबरोबर ता. २८-५-०१ चे स्फुटांत जी टीका केली त्याच पद्धतीनुसार पुढें ही चळवळ सुरू ठेवली. या कायद्यांत एक अगदीं नवीनच तत्त्व गोंवलें होतें. ‘ आजपर्यंत रयत ही मालक व ‘ सरकारचा हक्क फक्त जमिनीबद्दल कर घेण्यापुरता आहे असें समजत होती. पण ही ‘ स्थिति हळू हळू बदलण्याचा सरकारचा प्रयत्न चालला होता. जुना मिरासदार ‘ म्हणजे जमिनीचा पूर्णपणें मालक होता. हा त्याचा पूर्ण मालकी हक्क अंशतः ‘ १८७९ च्या कायद्यानें हिरावून घेतला व त्यापासून शेतकऱ्यास सरकारसारा भरी-‘ पावेतों जमिनीचा पृष्ठभाग नांगरण्याचा व त्याचें उत्पन्न वंशपरंपरा खाण्याचा हक्क ‘ कायम राखला. पण आतां तर गहाणविक्रीचे हक्क कमी करून शेतकऱ्यांस केवळ ‘ उपरी कुळें बनविण्याचा घाट सरकारनें घातला आहे.’ यावर केसरीनें, ‘ उपरी कूळ ‘ या नात्यानें रहाण्यांतच जर शेतकऱ्यांचें हित आहे तर मग इनामदारांचीं सर्व ‘ कुळें उपरी करून टाकण्यास काय हरकत आहे ?’ असा प्रश्न विचारला व त्याला ‘ इनामदार स्वार्थसाधू व कर्जबाजारी असतात असाच जर आक्षेप घ्यावयाचा असेल ‘ तर तो आक्षेप सरकाराला बिलकूल लागू पडत नाहीं असें नाहीं. कारण हिंदुस्थान ‘ सरकारलाहि पुष्कळ कर्ज आहे आणि त्याची स्वार्थपरायणता इतकी जबर ‘ आहे कीं, दुष्काळांत मोकळ्या हातानें शेतकऱ्यांस सूट देणें त्याच्या जिवावर ‘ आलें आहे,’ ( ४-६-०१ ), अशी पुस्ती जोडली. या बिलानें कलेक्टर हा जिल्ह्याचा वडा इनामदार बनेल असें केसरीनें बजाविलें. पुढें चळवळ वाढल्यावरून हें केवळ प्रयोगादाखल आहे, असें जेव्हां सरकारतर्फे सांगण्यांत आलें, तेव्हां प्रयोगच करावयाचा तर एकदोन जिल्ह्यांपुरताच करा असें त्यांस सरळ उत्तर दिलें गेलें. या बिलाचे समर्थनार्थ शेतकऱ्यांची पत कमी करणें हें त्यांसच हितावह असें सांगण्यांत येत असे. त्यास केसरीनें समर्पक उत्तर दिलें. ‘ सावकारानेंच शेतकऱ्यांस

' बुडविलें अशी अधिकारी लोकांनीं आपली खोटी कल्पना करून घेतली आहे
' त्याचाच हा सर्व परिणाम आहे. अव्वल इंग्रजींत मोजणी तीस वर्षांची झाली व
' शेतकऱ्यांस मालकीबद्दलची खात्री वाटूं लागली, तेव्हां चोहोंकडे नव्या जमिनी
' लागवडीस येऊं लागल्या, असे रिपोर्ट जुन्या सरकारी अधिकाऱ्यांनीं केले ते खोटे
' का ? दुष्काळांत सारा भरण्याची ऐपत नसणाऱ्यांच्या जमिनी हिरावून घेण्याचा
' हा डाव उघड आहे. शेतकऱ्यांची विपन्न स्थिति हा कांहीं आजकालचा विषय
' नाहीं. त्यांच्या निकृष्टावस्थेचीं कारणें शोधून काढण्यास पाहिजे तर कमिशन नेमा;
' पण घाईनें किंवा उच्छृंखलपणानें केवळ कांहीं अधिकाऱ्यांच्या तब्येतीखातर दुष्का-
' ळानें गांजलेल्या लोकांस बुचाडून नंगे फकीर बनवूं नका, असें सरकारास आम्ही
' स्पष्टपणें सांगितलें पाहिजे. ' ( १८-६-०१ ). जूनपासून ऑक्टोबरपावेतों
या बिलावर सारखे अग्रलेख व स्फुटें लिहिलीं जात होतीं. ' हा कायदा शेतकऱ्यांस
' गुलाम करणारा आहे व सावकारांसहि बुडविणारा आहे. केवळ उपरी कुळांस
' तगाईशिवाय गत्यंतर नाहीं. त्यांस पैसे दिल्यास गहाणविक्रीचा हक्क नसल्यामुळें
' सावकारहि बुडणारच, तेव्हां चळवळ जोरानें झाली पाहिजे. अर्जावर अर्ज पाठवा,'
अशी केसरीनें वारंवार सूचना केली. या सर्व वादांत जमिनीची मालकी शेतकऱ्यांचीच
हा केसरीचा आग्रहानें प्रतिपादलेला मुद्दा. बिलाचे पहिले वाचनाचे वेळेस याबाबत
कांहीं लोकनियुक्त सभासदांनीं — विशेषत: ना. पारख यांनीं — जी गैरसावधगिरी
दाखविली, तिजबद्दल केसरीनें त्यांजवर टीका केली व ' खालसा करण्याचा हक्क जरी
' प्राप्त झाला तरी तो दुष्काळासारख्या आपत्तीमुळें, तेव्हां अशी संधि पाहून कायमचे
' मालकी हक्क बुडविण्याचा हा सरकारचा मार्ग अन्यायाचा, निर्दयतेचा आणि राज-
' नीतीच्या दृष्टीनं रयतेच्या नुकसानीचा, अतएव दांडगाईचा आहे, ' (९-७-०१),
अशी स्पष्ट सूचना दिली. लोकनियुक्त सभासदांनीं शेवटचे वाचनाचे वेळीं जी
कामगिरी केली तिची केसरीनें योग्य प्रशंसा केली. इतकेंहि करून शेवटीं व्हावयाचें
तें झालेंच. ' दुराग्रही सरकार व निर्बल लोकमत ' व ' आमचीं कायदेकौन्सिलें थट्टा
आहे काय ? ' हे दोन अग्रलेख केसरीनें अगदीं संतापून झणझणीत लिहिले आहेत.
यानंतरहि, रॉजर्ससाहेबांचीं मतें, ' जे 'चीं टाइम्समधील पत्रें, यांवरून या विषयावर
स्फुटें येतच होतीं, व शेवटचे स्फुटांत, ( १-१०-०१ ), ' कायदा जरी पास झाला
' तरी झालेल्या ओरडीमुळें त्याचा अंमल सोईसोईनें होईल, असें वाटतें,' असें
आपलें मत प्रदर्शित केलें व हें खरें ठरलेंहि.

सन १९०१ चे बिलाचे वादांत गहाणविक्रीचे हक्क शेतकऱ्यांस दिले असल्यामुळें तो
ऐपतीबाहेर कर्ज काढून शेवटीं जमिनीसहि मुकतो तेव्हां हे हक्कच मुळांत काढून घ्यावे
म्हणजे झालें, असा सरकारतर्फे युक्तिवाद करण्यांत आला. अशा विचारसरणीस धरून
दक्षिणेंतील शेतकऱ्यांचा कायदा पास करण्यांत आला होता. त्यास प्रथमपासून
केसरीनें विरोध केला. या कायद्यापासून काय फायदा झाला याची चौकशी करण्या-

करितां' ९२ सालीं एक कमिशन नेमण्यांत आलें, तेव्हां याबाबत वर्तमानपत्रांतून विशेष चर्चा झाली. (२०-९-९२). एका स्फुटांत या कायद्यानें हिशेबांत गफलत असल्यास होणारी फसवाफसवी फार तर बंद होईल, पण एकंदर यानें कुळाचे व सावकाराचे दोघांचेहि तोटेच जास्त, असें मत प्रदर्शित केलें आहे तेंच आजसुद्धां ग्राह्य मानावें लागतें. स्टेटसमन्‌मध्यें आलेल्या लेखमालेच्या विचारसरणीस ता. २-२-९२ चे अग्रलेखांत पुष्टि दिली आहे. यांत सावकार हा दारिद्र्यास कारणीभूत नसून सरकारी सारापद्धतीचा हा परिणाम, असें मत प्रतिपादन केलें. पुढें शेतकऱ्यांच्या कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर दोन लेख केसरीनें लिहिले. पहिल्यांत सरकारास आपलें धोरण कधींच चुकलेलें कसें वाटत नाहीं व सावकारास जबाबदार धरून कायदा केला त्याचा फायदा काय झाला, याचें विवेचन केलें आहे. गेल्या चवदा वर्षांत योग्य ' कायद्यामुळें ' कर्ज कमी झालें कीं काय याची चौकशी करितां तें बिलकूल कमी न होतां ' मारुतीच्या शेंपटाप्रमाणें आहे तितकेंच आहे. फायदा इतकाच कीं, जमीन ' पूर्वी गहाण पडत नव्हती ती आतां गहाण द्यावी लागते आणि सावकार जुलूम करतो असें बोलण्याची सोय नाहीं ! ' असें सांगितलें आहे. दुसऱ्यांत कमिशननें सुचविलेले केवळ कायद्याची दुरुस्ती करून कार्य साधेल काय, दारिद्र्याचें मूळ किती खोलवर आहे व सारापद्धतीच्या सुधारणेची कशी जरूरी आहे याचा विचार आहे. पण या कमिशनच्या इतर सूचनांचा कांहीं एक विचार न करितां केवळ जुन्या कायद्यांतच किरकोळ फेरफार करून तो आणखी इतर जिल्ह्यांस लागू करण्याचें बिल जेव्हां मुंबई सरकारनें पुढें आणलें तेव्हां साहजिकच केसरीनें या धोरणाचा तीव्र निषेध केला. ( १०-४-९४ ). १९०१ चे बिलाचे वेळेस याच विषयावर केसरीनें म्हटलें कीं, ' शेतकऱ्यांची आपल्या शेतावर पूर्ण मालकी असल्यामुळें एकादे वेळेस ' एखादा शेतकरी आपलें शेत अविचारानें विकील, नाहीं असें नाहीं. पण जगामध्यें ' असें कोणतें तत्त्व आहे कीं, ज्याचा कधींहि दुरुपयोग होत नाहीं ?...उद्योग- ' धंद्यांचा नाश, साऱ्याची सक्ति वगैरे कारणांनीं जमिनीवर निर्वाह होणें अशक्य ' होऊन शेतकरी लोकांस पोटाकरितां किंवा साऱ्याकरितां सावकाराकडे जावें लागतें ' हें खरें आहे. पण तेवढ्याकरितां जमीन दुसऱ्याच्या नांवावर करून देण्याचा शेत- ' कऱ्यांचा हक्कच काढून घेणें या शहाणपणास काय म्हणावें ? कसेंहि झालें तरी साव- ' कार व शेतकरी एकाच गांवांत असल्यामुळें सावकारास शेतकऱ्यांचा बचाव कांहीं ' झालें तरी करावा लागतोच. ' ( १८-६-०१ ). शेतकऱ्यावर गहाणविक्रीबद्दल अशा तऱ्हेनें निर्बंध घातल्यामुळें त्याचा फायदा न होतां त्याची एकंदर पत कमी होऊन तोटाच जास्त होण्याचा संभव फार, हा सिद्धांत आतां सर्वमान्य होत चालला आहे.

जमिनीचा मालक कोण याबद्दल प्रथमपासूनच केसरीचें धोरण अगदीं निश्चित असें दिसतें, पण जमीनमहसुलाच्या पद्धतीसंबंधीं हें इतकें निश्चित दिसत नाहीं.

या बाबतींतला उपलब्ध असलेला पहिला महत्त्वाचा अग्रलेख म्हणजे ता. २-२-९२चा 'शेतकऱ्यांचा फायदा' हा होय. यांत कलकत्त्याच्या स्टेटसमन् पत्रांतील एकंदर सूचनांस केसरीनें आपली संमति दर्शविली आहे. 'सरकारी धाराच मुख्यत्वें-'करून लोकांच्या दैन्यास कारण आहे व म्हणून तो कायमचा ठरवून न टाकितां 'रयतेच्या ऐपतीप्रमाणें घ्यावा व एकाद दुसऱ्या प्रांतांत तरी कमिशननें सुचविलेल्या 'उपायाचा अनुभव घेऊन पहावा. एकंदरींत हल्लींच्या रीतीनें सर्वांचेंच नुकसान 'आहे....आम्ही म्हणतों त्याप्रमाणें सरकारदस्त पैशाच्या रुपानें न घेतां बताई 'किंवा उत्पन्नाच्या रुपानें घेतला म्हणजे ह्या व दुसऱ्या सर्व अडचणी दूर होतील.' अशा प्रकारचे विचार या लेखांत आहेत. पण पुढें १८९९ सालामधील 'फेर-पाहणीचा जुलूम' या अग्रलेखांत कॉंग्रेसनें कायमधारापद्धतीचा पुरस्कार केल्याचा उल्लेख आहे. लॉर्ड कर्झन यांचा १९०२ सालचा ठराव प्रसिद्ध झाल्यावर यावर जास्त सविस्तर विवेचन झालें. त्यांत अनेक स्फुटांतून रमेशचंद्र दत्तांच्या विचारांचें उद्घाटन केलें आहे. कर्झनसाहेबांनीं दत्त यांना उत्तर देतांना 'बंगालची सुबत्ता कायमधारापद्धतीचें फळ नसून कुळांच्या कायद्याचें फळ आहे, असें 'म्हटल्यावर आम्हांस कायमधारापद्धति व कुळांचे कायदे दिल्यास आम्ही ती पत्करूं 'असें त्यांस उत्तर दिलें आहे.' (२८-१-०२). या सर्व वादांत कायम-धारापद्धतीबद्दल विशेष आग्रह केसरीनें कधींच धरला नाहीं. या काळांत कायम-धारापद्धतीवर असा एकच अग्रलेख आढळतो व तोहि एकंदर हिंदुस्थान दरिद्री कसा बनला याविषयींच्या लेखमालेंत 'कायम जमीनधाऱ्याच्या पद्धतीस कायमची मूठमाती' या मथळ्याचा ऐतिहासिक स्वरुपाचा आहे. पुढें ना. दा. आ. खरे यांनीं प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांतील मुद्दे सुद्धां अग्र-लेखांत दिले आहेत. लढाईनंतर जॉइंट कमिटीनें जमीनसारा जास्त नियमबद्ध करावा अशी शिफारस केल्यामुळें ज्या त्या प्रांतांत चौकशी होऊन कायदे पास होऊं लागले, तेव्हां या विषयास पुन्हां रंग आला. या वेळेसहि केसरीनें परंपरागत कॉंग्रेसनें स्वीकारलेलें कायमधारापद्धतीचेंच धोरण उचलून धरलें. १९२० सालापुढें कायमधारापद्धतीवर लेख येऊं लागले. विशेषतः मुंबई इलाख्याची शेतसारा-कमिटी १९२४ सालीं नेमली गेल्यावर तर सारखी लेखमालाच सुरू झाली. यांतील मुद्दे जुनेच आहेत. 'कायमधारेबंदीची जादू' वगैरे लेखांत मागीलपेक्षां कायमधारापद्धतीवर जरा जास्त जोर देण्यांत आला आहे. हाच फार तर थोडा फरक या अलीकडील धोरणांत दिसून येतो.

---

# कायदा व न्याय

[ प्रो. श्रीनिवास माधव दातार, एम्. ए., एल्एल्. एम्. ]

**१. ज्यूरीच्या हक्काचें मर्यादित व अधांत्री स्वरूप** :—ज्यूरीची पद्धत या देशांतील लोकांस अगदींच अपरिचित होती असें नव्हे. केसरी म्हणतो—'वास्तविक 'म्हटलें तर फौजदारी खटल्यांत ज्यूरीकडून निकाल करण्याचा अधिकार लॉर्ड रिपन 'साहेबांनीं जो आम्हांस दिला तो अपूर्व होता असें नाहीं. गांवपंचांनीं आपआपसां- 'तले दिवाणी व फौजदारी कज्जे तोडण्याची वहिवाट इंग्रजी राज्यापूर्वींच नव्हे, तर 'अनादिकालापासून हिंदु लोकांत चालत आली आहे.' ( १५-११-९२ ). इंग्रज राज्यकर्ते हेच बऱ्याच अंशानें पंचायतपद्धतीचा नाश करण्यास कारणीभूत झाले व रिपनसाहेबांनीं ज्यूरीचा अधिकार देऊन इंग्रजी अधिकाऱ्यांकडून झालेल्या अन्यायाचें अंशतः परिमार्जन केलें, असा केसरीचा अभिप्राय दिसतो. केसरी म्हणतो, 'कुंपिणीचा अंमल सुरू झाल्यापासून मात्र कडक इंग्रजी कायदा व करडे गोरे 'अंमलदार ह्यांच्या सपाट्यापुढें पूर्वींच्या गरीब बिचाऱ्या पंचायतींची दाणादाण 'झाली व पूर्वींची ज्यूरीपद्धति विलयास गेली. तेव्हां हा आमचेपासून बुचाडून 'घेतलेला अधिकार लॉर्ड रिपन साहेबांनीं आम्हांस थोडा बहुत परत केला होता.' ( १५-११-९२ ).

केसरीनें ता. १७-९-९५ च्या अंकांत 'ज्यूरीचे हक्कावर गदा' या मथळ्याखालीं जो अग्रलेख लिहिला आहे, त्यांत ज्यूरीपद्धतीच्या तत्त्वांची सुंदर फोड केली आहे. 'पंच नेमणें अथवा शिष्टांच्या मतानें निकाल देणें हें न्याय करण्याचें तत्त्व 'आपल्या जुन्या ग्रंथांतून नमूद केलेलें आहे,' अशी स्वाभिमानपूर्वक जाणीव देऊन केसरी म्हणतो, 'ज्या जुन्या संस्थांस इंग्रजी राज्यांत नवीन वळण 'मिळालें, अशा संस्थांपैकीं ज्यूरी ही एक संस्था आहे. आपले देशबांधव 'ज्यास गुन्हेगार, ठरवतील तोच खरा गुन्हेगार, केवळ राजानें ठरविलेला 'असल्या बाबतींत गुन्हेगार असतो असें नाहीं. हें तत्त्व इंग्लंड देशाच्या 'इतिहासापासून प्रत्येकानें शिकण्यासारखें आहे. ज्यूरर म्हणजे शहरांतील पांच 'प्रतिष्ठित, जाणते आणि व्यवहारांत वागलेले गृहस्थ असावयाचे,' अशी ज्यूरर या शब्दाची फोड करून केसरी म्हणतो, 'साक्षीपुरावा दहापांच शिष्ट लोकांपुढें मांडून 'त्यांची खात्री झाली तर आरोपी गुन्हेगार, नाहीं तर नाहीं, हेंच ज्यूरींतील चौकशीचें 'खरें तत्त्व; सगळ्याच खटल्यांत ज्यूरीची आवश्यकता आहे असें नाहीं. साध्या खट- 'ल्यांत ज्यूरी असली काय किंवा नसली काय सारखीच! पण राजाची ( आमच्या- 'कडे अधिकारीवर्गाची ) बाजू एक आणि प्रजेची बाजू एक असा जेव्हां प्रसंग

'येतो, तेव्हां ज्यूरी नसेल तेथें पुष्कळ प्रसंगीं राजा अगर अधिकारी लोकांवर जुलूम 'करितात आणि अन्यायानें लोकांस शिक्षा देतात.' ज्यूरी नसली म्हणजे कसा अन्याय होतो व असली म्हणजे कसा फायदा होतो हें वांई व पुणें येथील दंग्यांच्या खटल्यांचा दाखला देऊन केसरीनें विशद केलें आहे. कारण वांईस ज्यूरी नसल्यामुळें अकरा इसमांस शिक्षा झाल्या व पुण्यास ज्यूरी असल्यामुळें पुण्याचे सतरा असामी सुटले.

ज्यूरीचा हक्क मर्यादित करण्याचे व कांहीं ठिकाणीं नाहींसा करण्याचे प्रयत्न जेव्हां करण्यांत आले तेव्हां केसरीनें वेळोवेळीं कडक टीका केली आहे. हा हक्क 'सरकारनें उदार बुद्धीनें व शुद्ध मनानें लोकांस द्यावा. तो देतांना पापबुद्धि मनांत 'असूं नये व लोकांचे मनांत असा संशय येईल अशा प्रकारचें वर्तन सरकारनें करूं 'नये.' केसरी म्हणतो, 'सरकारनें आम्हांस ज्यूरीचा जो हक्क दिला आहे, त्याबद्दल 'सरकारचे मनांत पापबुद्धि किंवा शंका असणें हें अगदीं गैरमुत्सद्दीपणाचेंच नव्हे, 'तर अनीतीचें व अनुदारपणाचें लक्षण आहे. ज्यूरीचा हक्क लोकांस स्वयंभू असा 'असावा. सरकारनें वाटेल त्या जिल्ह्यास ज्यूरीनें चौकशी करण्याचा अधिकार द्यावा 'व तो वाटेल तेव्हां काढून घ्यावा ही एक प्रकारची मोंगलाई होय' असें मत व्यक्त करून केसरीनें त्या वेळचे लॉ-मेंबर सर अलेक्झँडर मिलर यांच्या ज्यूरीबिलावर टीका केली आहे. या बिलास उद्देशून केसरी म्हणतो, 'आमचें सरकार दिवसानुदिवस 'जुलमी होत चाललें आहे. कसेंहि करून लोकांचे जेवढे हक्क कमी होतील तितके 'कमी करण्याचा त्याचा इरादा आहे, असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें.' (१७-९-९५).

हिंदुस्थानांतील लोकांस ज्यूरीचा हक्क किती मर्यादित आहे, हें क्रि. प्रो. कोडचे कलम २६९ वरून कोणासहि दिसून येईल. हा अधिकार हायकोर्टाखेरीज करून इतर कोर्टांचे बाबतींत स्थानिक सरकारचे मर्जीवर सर्वस्वीं अवलंबून ठेवला आहे. स्थानिक सरकारांना हा अधिकार वाटेल तितक्या प्रमाणांत देतां येतो अगर अजिबात काढूनहि घेतां येतो. प्रजेच्या मूलभूत हक्कांत या हक्काचा अद्यापहि समावेश झाला नाहीं व म्हणून केसरीनें केलेली टीका योग्यच आहे असें म्हणणें भाग आहे.

२. **लवादपद्धतीचा पुरस्कार** :—लवादांमार्फत न्याय मिळविण्याचे पद्धतीचा केसरीनें वेळोवेळीं पुरस्कार करून ज्या ठिकाणीं लवाद कोर्टें स्थापलीं गेलीं, (उदाहरणार्थ पुणें, पंढरपूर, विजापूर वगैरे) त्या ठिकाणच्या नागरिकांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें आहे. 'लहानसहान कज्जांचा लवादांमार्फत जितका चांगला व 'जलद निकाल होतो, तितका दिवाणी कोडतांतून होत नाहीं, हें सर्वांनींच लक्षांत 'ठेवण्यासारखें आहे,' (७-६-९२), असें सांगून केसरी आणखी एके ठिकाणीं असें म्हणतो कीं, 'कोर्टखर्चाच्या भयंकर आपत्तींत न सांपडतां आणि साध्या प्रश्नांच्या 'निकालास कल्पनातीत कालहरण न होऊं देतां ज्यांना आपल्या कज्जांचा निकाल

‘ करून घ्यावयाचा असतो, त्यांस लवाद कोर्टाचें साधन उपलब्ध असणें अगदीं ‘ आवश्यक आहे. ’ (१४-१०-१९). केसरींत ता. १५-२-२१ रोजीं असहकारितेच्या कोर्टबहिष्काराच्या कार्यक्रमास अनुसरून पण स्वतंत्र रीत्या लवादपद्धतीचा पुरस्कार करणारा एक लेख ‘ लवाद कोर्टें स्थापन करा ’ हा प्रसिद्ध झाला आहे. त्यांत लवादपद्धतीचे विशेष असे कोणते फायदे आहेत, ते केसरीने विशद करून सांगितले आहेत. थोडक्यांत ते येणेंप्रमाणें होत:—( १ ) पैशाचा व काळाचा अपव्यय वाचणें, ( २ ) निष्कारण कोर्टांत जाणारे असे कज्जे लवकर तुटणें, ( ३ ) गांवांतल्या गांवांत पंचांमार्फत निकाल झाल्यानें, खोटे कागद व खोटे साक्षीदार यांस वचक बसून खटल्याचा निकालहि वस्तुस्थितीस सोडून सहसा विपरीत न होणें. लवाद कोर्टाचे स्थापनेसंबंधीं केसरीनें पुढील उपयुक्त सूचना केल्यां आहेत:— ( १ ) प्रत्येक गांवानें किंवा लहानसहान खेडयांच्या एकेक गटानें आपआपल्या पुरते पंच नेमून त्यांचें लवाद कोर्ट नेमावें, ( २ ) जिल्ह्याचे ठिकाणीं स्थानिक लवाद कोर्टाशिवाय एक फिरतें लवाद कोर्टहि असावें, ( ३ ) कोणत्याहि कोर्टांत लवादांची संख्या तीनपेक्षां जास्त असूं नये. एकाच गांवीं दोन दोन लवाद कोर्टें असूं नयेत व त्यांनीं आपआपसांत स्पर्धा करूं नये, असाहि अभिप्राय केसरीनें व्यक्त केला आहे. ( २१-३-९९ ). केसरीनें पुरस्कृत केलेल्या या लवादपद्धतीचा निदान महाराष्ट्रानें तरी विस्तृत प्रमाणांत अंगिकार केल्यास इंग्रजी न्यायकोर्टांचे सदोष पद्धतीनें जनतेची जी कुचंबणा होत आहे ती ब-याच अंशांनीं दूर होईल.

**३. इंग्रजी कायद्यांचा परामर्ष :**—जनतेच्या दृष्टीनें जाचक व अनहितकारक असे नवे कायदे ज्या ज्या वेळीं होऊं घातले होते त्या त्या वेळीं व तसेंच प्रचलित कायद्यांतीलहि कलमांची अंमलबजावणी अन्यायीपणानें जेव्हां जेव्हां होई तेव्हां तेव्हां केसरीनें जी टीका केली आहे ती स्पष्ट, मार्मिक, बोधप्रद व अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत अंजन घालणारी अशीच आहे. अशा प्रकारची टीका करितांना केसरीनें चालू कायद्यांतील दोषांचेंहि आविष्करण करून ते दोष घालविण्याविषयीं सरकारास वेळोवेळीं सूचना केल्या आहेत. सन १८९२ सालीं ‘ मोहाचे फुलांचा कायदा ’ जेव्हां पुढें आला, तेव्हां केसरीनें असें स्पष्टपणें सांगितलें कीं, तो कायदा गरीब लोकांना फार जाचक होईल, कारण गरीब लोक मोहाचे फुलांचा भाजीकरितां उपयोग करितात. ( १९-४-९२ ). सन १९०३ सालीं फॅमिन कोडांत जी प्रतिगामी स्वरूपाची दुरुस्ती करण्यांत आली, तिचा केसरीनें निषेध केला आहे व दुष्काळी कामावरील मजुरांस ठराविक रोजमुरा न देतां कामाचे प्रमाणांत रोजमुरा देण्याची पद्धत दुष्काळानें त्रस्त झालेल्या व उपासमारीनें निःशक्त बनलेल्या लोकांच्या दृष्टीनें किती गैर व अन्यायाची आहे हें दाखविलें आहे. ( १४-४-०३). सरकारनें दुष्काळासंबंधीं बरेंच ज्ञान मिळविलें पण त्या ज्ञानाचें ‘ पर्यवसान ‘ रयतेच्या हिताचे बाजूकडून एकेक पाऊल मागें हटण्यांत होत आहे हें

' पाहून मात्र वाईट वाटतें, ' असा सरकारच्या वर्तनासंबंधीं केसरीनें अभिप्राय व्यक्त केला आहे. एकाद्या चांगल्या तत्त्वासंबंधीं कांहीं कायदा होऊं घातल्यास त्याबद्दल केसरी स्पष्टपणें आपला अनुकूल अभिप्राय देत असे. पण हें तत्त्व योग्य स्वरूपांत कायद्यांत नमूद केलें जावें असें बजावण्यास केसरीनें कधींहि माघार घेतली नाहीं. उदाहरणार्थ, कायदेदलालांच्या (अर्थात् इंग्रजींत ज्यांस Touts म्हणतात त्यांच्या) हालचाली न्यायकोर्टांतून बंद पडतील अशा प्रकारची दुरुस्ती सन १८७१ च्या वकिलांसंबंधींच्या कायद्यांत करण्याचा जेव्हां घाट घालण्यांत आला, तेव्हां केसरीनें असें स्पष्टपणें कबूल केलें कीं, ' कायदेदलालांचीं कामें बंद होतील असा कायदा ' असणें अगदीं आवश्यक आहे. ' कारण ' इंग्रजी न्यायपद्धतीपासून अस्तित्वांत ' आलेले जे अनेक दोष आहेत, त्यांपैकींच कायदेदलाल हा एक दोष आहे.' पण याबरोबरच केसरीनें सरकारचे निदर्शनास असें आणलें कीं, वकिलांचे दृष्टीन १८७१ चा कायदा आधींच ' बराच कडक आहे ' व त्यांत नव्या बिलांतील ' अनर्थकारक ' कलमाचा समावेश केला गेल्यास फार अन्याय होणार आहे. म्हणून या बाबतींत अगदीं स्वतंत्र असा निराळ्या स्वरूपाचा कायदा असणेंच बरें. ( २४-९-९५ ). वकील लोक राजकारणांत पडतात म्हणून त्यांच्या सनदा रद्द करणें किती अन्यायाचें आहे याची केसरीनें अनेक वेळां फोड केली आहे. देशाकरितां बळी पडलेल्या अलीबंधु वगैरे राजकीय पुढाऱ्यांचें अभिनंदन केलें, या घोर अपराधाबद्दल नगरचे श्री. भाऊसाहेब फिरोदेप्रभृति वकिलांच्या सनदा रद्द केल्याबद्दल केसरीनें तीव्र नापसंती व्यक्त केली आहे. ( ८-८-२२ ). एखाद्या इसमाकडून कोर्टाची बेअदबी झाली असतां हायकोर्टासारख्या कोर्टास त्या इसमास शिक्षा करण्याचे अधिकार किती विस्तृत आहेत, याचें दिग्दर्शन केसरीनें ता. १९-८-२४ च्या अंकांत ' कोर्टाचे बेअदबीचा कायदा, ' या अग्रलेखांत केलें असून यासंबंधीं स्पष्ट नियम असणें कसें जरूर आहे हें दाखविलें आहे. हा लेख लोहगांवचे खटल्यांत गोरा सोल्जर वॉकर यास निर्दोषी ठरवून सोडून देण्यांत मुंबई हायकोर्टानें जो निर्णय दिला, त्यासंबंधीं केसरींत आलेल्या टीकेमुळें केसरीवर कोर्टाची बेअदबी केल्याबद्दल खटला होऊन केसरीकारांस जी शिक्षा झाली,' तिला अनुसरून लिहिण्यांत आला आहे. कोर्टाचे बेअदबीचे संबंधांत जो खटला करण्यांत येतो तो प्रथमदर्शनीं सौम्य स्वरूपाचा वाटतो खरा, परंतु ' परिणामाच्या दृष्टीनें पाहतां त्याचें स्वरुप राजद्रोहाच्या खटल्यांहूनहि ' अधिक भयंकर होऊं शकतें ' कसें हें केसरीनें दाखविलें आहे. हायकोर्टास केसरीनें असें बजाविलें आहे कीं, ' अधिकारसिद्धि म्हणजे अब्रूची वृद्धि असें समीकरण बसत नाहीं. ' म्हणून असल्या प्रकारचे खटले करून त्यांपासून हायकोर्टाची इभ्रत व दरारा वाढण्यास मदत न होतां अपायच होईल.

क्रि. प्रो. कोडचे १४४ वे कलमाची अंमलबजावणी मूळ हेतूस सोडून किती अन्यायानें व जुलमी पद्धतीनें होत आहे, याचे केसरीमध्यें अनेक दाखले

वाचावयास सांपडतील. अधिकाऱ्यास अप्रिय अशी कोणतीहि गोष्ट कोणीहि कितीहि शांतिपूर्ण मार्गानें करीत असो, शांतता भंग होईल, या नांवावर तिला या कलमानें हरकत घेण्यांत येत आहे, ( १९-७-२१ ), असें केसरीनें दाखवून दिलें आहे. म्हैसूर हायकोर्टानें, या कलमाखालीं कर्नाटकांतील कांहीं पुढाऱ्यांवर धार्मिक विषयावर भाषण करण्याची बंदी करण्यांत आली होती त्यासंबंधांत, जो निःपक्षपाती निर्णय दिला व ह्या कलमाचा उपयोग भाषणस्वातंत्र्यासारखे नैसर्गिक हक्क हिरावून घेण्याकरितां करतां येणार नाहीं असें जें मत प्रदर्शित केलें, त्याचा केसरीनें गौरवपूर्वक उल्लेख करून सरकारास असें बजावलें कीं, पंडित मालवीयसारख्यांवर भाषणबंदीचा हुकूम काढणें अगर पुण्यांतील पिकेटिंगला बंदी करणें वगैरेसारखीं कृत्यें अन्यायाचीं असून त्यांना या कलमांत आधार नाहीं. (४-७-२२).

सन १९०५ सालीं मामलेदार ॲक्टांत सुधारणा करून वहिवाटीच्या फिर्यादींत कुळांकडून मालकास कबजा व मदत देवविण्याचा अधिकार मामलेदारास दिला, याबद्दल केसरीनें नापसंती दर्शविली आहे. केसरीनें असें म्हटलें आहे कीं, ‘ १८७० च्या स्पेसिफिक रिलीफ ॲक्टाप्रमाणें दिवाणी कोर्टांनीं वहिवाटीच्या फिर्या-‘ दीचा निकाल करावा व मदतहि द्यावी; कारण मुलकी अधिकाऱ्याकडे होईल ‘ तितकें करून न्यायाचें, दिवाणी किंवा फौजदारी काम ठेवूं नये हें तत्त्व आतां ‘ लोकमतानें तरी ग्राह्य धरलें आहे; अशा वेळीं मामलेदार ॲक्टाचें पुन्हा प्रस्थापन ‘ करून या बाबतींत कलेक्टरास अपिलाचा अधिकार देणें म्हणजे एकप्रकारें पिच्छे-‘ हाटीचा मार्ग स्वीकारणें होय. ’ ( २६-९-०५ ). याचप्रमाणें जमिनींच्या हक्क नोंदणीसंबंधींचे कायद्यांत हक्काचें पत्रक तयार करण्याचे अधिकार मामलेदारास दिले आहेत ते कसे चुकीचे आहेत व प्रत्येक दिवाणी फिर्यादीबरोबर हक्कपत्रकाचा उतारा दाखल करण्याची सक्ती करणें किती अन्यायाचें आहे हें दाखविलें आहे. ( १०-३-०३ ). मद्रास कायदे कौन्सिलांत ‘ प्लँटर्स लेबर बिल ’ या नांवाचा एक कायदा होऊं घातला असतां ‘हा कायदा नव्हे, हें गुलामगिरी काय-‘ देशीर बनविण्याचें यंत्र आहे, ’ असें केसरीनें दाखवून दिलें व हा कायदा पास होणार हें जाणून ‘ नेटिव्ह मेंबरें ऊर्फ मेंढरें कितीहि ओरडलीं तरी त्यांस ‘ भीक कोण घालतो ? ’ असे संतापयुक्त उद्वेगाचे उद्गार काढले. ( कित्ता ).

गेल्या पन्नास वर्षांत केसरीनें अशा रीतीनें ज्या सर्वसाधारण कायद्यांची छाननी करून त्यांतील दोष दाखविले त्यांपैकीं केवळ उदाहरणादाखल म्हणून वरील मजकूर लिहिला आहे. एकंदरीनें विचार करितां केसरीनें यासंबंधांत जनतेची जी सेवा केली आहे ती अपूर्व होय असें कबूल केलें पाहिजे.

**४. इंग्रजी कोर्टाचे महत्त्वाचे व न्यायसंरक्षक निवाडे :**—जेव्हां जेव्हां लोकांच्या हक्कांचें संरक्षण करणारे अगर अधिकारीवर्गाकडून जनतेवर होणाऱ्या जुलमांचा निषेध करून त्यांना न्याय व योग्य रीतीनं आपलें कर्तव्य बजावण्याची

जाणीव करून देणारे निवाडे देण्यांत आले, तेव्हां तेव्हां केसरीनें अशा निवाड्यांची प्रशंसाच केली आहे. कपोलवाणी समाजांत अशी एक चाल आहे कीं, वाङ्-निश्चय झाल्यानंतर विवाह केव्हांहि कोणत्याहि वर्षी केला तरी चालतो. असाच वाङ्निश्चय एका प्रकरणांत झाला, पण पुढें मुलगी मोठी व शिक्षणसंपन्न झाल्या-वर तिनें वाङ्निश्चित वराशीं विवाह करण्याचें नाकारलें. म्हणून वराचे बापानें नुकसानभरपाईचा जो दावा हायकोर्टांत आणला होता त्याचा निकाल जस्टिस कँडी यांनीं वराचे बाजूनें केला व वाङ्निश्चित वधूचें वाङ्निश्चित वराशीं लग्न करून देण्यांत यावें किंवा तें शक्य नसल्यास लग्नाचा करार मोडल्याबद्दल नुकसान-भरपाई द्यावी असें फर्माविलें. सुधारक लोकांकडून या निकालावर बरीच टीका करण्यांत आली. तिचा निषेध करून केसरी म्हणतो, ' इंग्रजी रिवाज तेवढे चांगले ' असें त्यांचें ( सुधारकांचें ) मत झालें असल्यामुळें कोणी बायको आपले नवऱ्याचे ' घरीं नांदत नाहींशी झाली अथवा कोण्या मुलीनें आपल्या बापानें पसंत केलेला ' वर आपणांस मान्य नाहीं असें म्हटलें, तर त्यांस पुत्रोत्सवाप्रमाणें आनंद होतो... ' मुलीच्या किंवा वधूवरांचे संमतीखेरीज कोणताहि विवाह सशास्त्र होत नाहीं, असें ' जर हायकोर्टानें ठरविलें तर आपल्या समाजांतील सर्व विवाह एकदम अशास्त्र ' होतील याचाहि वरील ठरावास दूषणें देणारांनीं विचार केला नसावा असें दिसतें.' ( ३१-३-९६ ).

आरोपीकडून कबुलीजबाब घेतांना आरोपीचा कसा छळ केला जातो व क्वचित् प्रसंगीं छळामुळें आरोपी मरण कसा पावतो हें पाटोळे नांवाच्या पोलिस इन्स्पे-क्टरास झालेल्या शिक्षेवरून केसरीनें जनतेच्या निदर्शनास आणलें आहे व पाटोळे यास योग्य शिक्षा दिली, याबद्दल कोर्टाचें व या प्रकरणाचा योग्य पाठ-पुरावा केल्याबद्दल सरकारचें अभिनंदन केलें आहे. केसरी नुसतें अभिनंदन करून मात्र थांबला नाहीं. त्यानें आरोपीचा कबुलीजबाब घेण्याची पद्धतीच कशी चुकीची व त्याज्य आहे हें दाखवून असें म्हटलें आहे कीं, ' अशा उदाहरणावरून ' तरी कबुलीजबाबास इकडे आलेलें महत्त्व कमी होण्याची सुधारणा घडून येईल ' व पोलिसतपासाचे कामीं छळ कमी होऊन गुप्त पोलिसांचें खरें चातुर्य छळ न करितां ' गुन्ह्याचा शोध लावण्याचे कामीं दिसून येऊं लागेल, अशी आम्हांला आशा आहे.' ( ३०-५-११ ). कबुलीजबाबाची पद्धतच अजिबात नाहींशी करून आरोपीची साक्ष घेणें व त्यास शपथेवर खरी हकीगत सांगण्याची संधि देऊन उलट तपासणीचें दिव्य करावयास भाग पाडणें, हीच पद्धत इतर देशांतल्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि रूढ होणें जरूर आहे असें केसरीनें म्हटलें आहे.

शिखांची शिरोमणी गुरुद्वारप्रबंधक कमिटी क्रि. लॉ. अमेंडमेंट ॲक्टान्वयें जेव्हां बेकायदा ठरविण्यांत आली तेव्हां तिचें सर्व काम पाहण्याकरितां रिसीव्हर नेमण्यांत आला होता. असा रिसीव्हर नेमणें गैरकायदा आहे असा लाहोर

हायकोर्टानें जो निवाडा दिला त्याचा उल्लेख करून केसरी म्हणतो, ‘ एखादी ‘ धार्मिक संस्था सरकारनें गैरकायदा ठरविली तरी निव्वळ धार्मिक स्वरूपाचे तिचे ‘ कार्याला त्यायोगानें बाध येऊं शकत नाहीं. ’ कोणत्याहि प्रश्नाची प्रथम कायदेशीर तड लावून घेण्याचा प्रयत्न करावा व त्यांत यश न आल्यास सत्याग्रहाचा मार्ग पत्करावा असें शिखांचा दाखला देऊन केसरीनें सुचविलें आहे. (२०-१-२५).

कांहीं कांहीं वेळेला केसरीनें वरील प्रकारच्या निवाड्यांच्या आधारें प्रचलित कायद्यांतील दोष मोठ्या मार्मिकतेनें दाखविले आहेत. बेळगांव जिल्ह्यांतील बालहत्येच्या एका खटल्यांत आरोपी स्त्रीवर बालहत्या करण्याच्या अपराधाबद्दल कायद्याप्रमाणें कडक शिक्षा देणें न्यायाधीशास भाग पडलें. पुष्कळ वेळां एखादी माता लज्जावश होऊन पोटच्या पोराचा निकाल लावते व अशा प्रकारची परिस्थिति कोर्टापुढें आल्यास अशा मातेस शिक्षेंतून मुक्त करण्याची अगर सौम्य शिक्षा देण्याची सवड कायद्यानें ठेवलेली नाहीं. यासंबंधीं केसरी म्हणतो, ‘ संतापातिरेकानें बेभान ‘ झाल्या वेळीं घडलेलें कृत्य जर गुन्ह्याचे सदरांतून निसटूं शकतें तर लज्जातिरेकानें ‘ घडलेल्या गुन्ह्याला थोडी सौम्य शिक्षा सांगण्याची सवड कां ठेवूं नये ? ’ (१६-६-२५ ). सोलापूरच्या खुनी खटल्यांतील आरोपींपैकीं धनशेटीखेरीज करून इतरांस न्या. मू. मांडगांवकर यांनीं निर्दोषी ठरविलें व धनशेटी यांस पीनल कोडांतील १४९ व्या कलमांतील विशिष्ट शब्दप्रयोगामुळें निर्दोषी ठरविणें त्यांना अशक्य झालें. या शब्दप्रयोगाचा असा अर्थ होतो कीं, ‘ दंगेखोरांचे टोळीपैकीं कोणाहि एका व्यक्तीनें एखादें अपकृत्य केलें तरी त्याची जबाबदारी सगळ्यांवर सारखीच पडत असल्यानें त्या टोळींतला प्रत्येक इसम त्या कृत्याबद्दल गुन्हेगार ठरतो. ’ हल्लींच्या सारख्या काळांत पूर्व संकेत नसतांना अभावितपणें एखादा समाज फुगत जातोच. या समाजांत कांहीं दंगेखोर लोक असल्यास त्यांचे अपकृत्या-बद्दल निरपराधी लोकांस निष्कारण शिक्षा होण्याचा संभव आहे. म्हणून फुलबेंच कडून या कलमाची छाननी व्हावी व तें दुरुस्त केलें जावें अशी केसरीनें सूचना केली आहे, ( १९-७-३० ) व ती अगदीं रास्त आहे असेंच कोणीहि म्हणेल.

५. **अन्यायमूलक न्यायपद्धतींसंबंधीं तीव्र नापसंती** :—न्यायकोर्टापुढें एखाद्या गोऱ्या इसमाची अपराधी या नात्यानें चौकशी चालू असतां योग्य न्याय होऊन गोऱ्या इसमास कसें शासन केलें जात नाहीं व केलें गेलेंच तर तें किती अल्प असतें याचें विवेचन केसरीनें अनेक वेळां केलें आहे. नेटिव्हांविरुद्ध एखादा अन्याय झाला तर त्याची कोणीच दाद घेत नाहीं. पण कपिलाषष्ठीच्या योगाप्रमाणें गोऱ्यास अन्याय होतांच सगळीकडून, अन्याय, अन्याय असा गोंगाट होतो. गोरा इसम व काळा इसम यांमध्यें लढा उत्पन्न झाल्यावर न्याय करण्याची वेळ आल्यास ‘ न्यायकोर्टाच्या तराजूचें पारडें गोऱ्याचे बाजूनें इतकें जड होऊन गेलेलें असतें ‘ कीं, दुसऱ्या पारड्यांत नेटिव्हाची खटपट, पैसा, वकिली, करामत व अन्यायाची

' ओरड इतकीं सर्व घातलीं असतां दुसरें पारडें वर म्हणून येत नाहीं.'(३१-५-०४). केसरीनें एके ठिकाणीं दोन खटल्यांतील दोघां आरोपींस एकाच स्वरूपाच्या अपराधाबद्दल कशा प्रकारचा भिन्न न्याय मिळाला हें दाखविलें आहे. पहिल्या खटल्यांतील आरोपी हा हिंदी होता व आपल्या रखेलीचें डोकें वरवंट्यानें ठेंचून खून केल्याचा आरोप त्याच्यावर शाबीत होऊन त्यास हायकोर्टानें फांशीची शिक्षा फर्मावली. दारूचे निशेंत असल्यामुळें भान न राहून अपराध घडला अशी सबब या आरोपीनें गुन्ह्याचे समर्थनार्थ पुढें केली होती, पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. दुसऱ्या खटल्यांत आरोपी हा गोरा इसम होता व आपल्या बवर्जीचा तंबूच्या खुंट्यानें व बुटांच्या लाथांनीं डोकें ठेंचून खून केल्याचा आरोप त्याचेवर ठेवण्यांत आला होता. बचावार्थ दारूचे धुंदीची सबब पुढें करण्यांत आली व आरोपीस निर्दोषी म्हणून सोडून देण्यांत आलें. या दोन खटल्यांतील न्यायाचें वैषम्य दाखवून केसरी म्हणतो, ' हिंदुस्थानांतील नेटिव्हांच्या मृत्यूशीं गोऱ्या इस-
' माचा संबंध असलेले खटले हिंदुस्थानांत आजपर्यंत थोडे झाले आहेत असें नाहीं;
' पण नेटिव्हाचा खून केल्याबद्दल एकहि युरोपियन अद्याप फांशी गेल्याचें आमचे
' ऐकिवांत नसावें व युरोपियनाच्या खुनाशीं संबंध असणाऱ्या प्रत्येक नेटिव्हास फांशी-
' वांचून दुसरी शिक्षाच मिळूं नये हा चमत्कार नव्हे काय ? कोठें मयताची प्लीहा
' सुजलेली, कोठें काळीज फुगलेलें, कोठें आरोपीची ओळख न पटणें किंवा त्यानें
' दारूचे धुंदींत असणें, कोठें माणसाऐवजीं जनावर वाटून गोळी झाडण्याची चूक
' करणें इत्यादि स्वरूपाचे प्रकार पुराव्यांत बाहेर यावे व गोरे आरोपी थोड्याश्या
' कैदेवर, दंडावर किंवा अजिबात सुटून जावे आणि आजपर्यंत हिंदुस्थानांतील एकहि
' माणसाचा खून असा एकाहि युरोपियनानें केलेला नाहीं असें न्यायकोर्टांत ठरावें हें
' हिंदुस्थानचें चमत्कारिक दुर्दैव म्हणावयाचें ! ' ( १४-३-११ ). कांहीं युरोपियन सोल्जर चांदण्यांत जुगार खेळत असल्याचें पाहून करमसिंग या नांवाचे हिंदी सार्जंटनें त्यांना पकडण्याचा प्रयत्न केला असतां त्यांपैकीं एका सोजीर बहाद्दरानें करमसिंग यास यमसदनास पाठविलें. सदर सोजिरावर खटला झाला असतां त्याचेवर फक्त साध्या दुखापतीचा आरोप शाबित धरण्यांत येऊन त्यास सहा महिन्याचे साधे कैदेची शिक्षा देण्यांत आली सोजिरानें आपले बचावांत असें सांगितलें कीं, करमसिंग हा साध्या पोषाखांत असल्यामुळें मला तो ओळखतां आला नाहीं व केवळ प्रतिकारबुद्धीनें मी त्यास दूर लोटलें, पण त्याची प्लीहा सुजली असल्यामुळें तो मृत्यु पावला. ही लंगडी सबब खरी धरण्यांत कोर्टानें जो अन्याय केला त्यास उद्देशून केसरी म्हणतो, ' युरोपियनाचे सावलींत यापुढें ज्याला जावयाचें
' असेल त्यानें आधीं आपली प्लीहा, फुप्फुसें, काळीज वगैरे सर्वांची डॉक्टराकडून
' तपासणी करवून मग गेलें पाहिजे. नाहीं तर त्याच्या नुसत्या वाऱ्यानेंहि प्लीहा वगैरे
' फुटून बिचारा नेटिव्ह प्राणास मुकावयाचा असें म्हणण्याचा समय आला आहे ! '

करमसिंग साध्या पोषाखांत आला त्यामुळें तो ओळखला गेला नाहीं, ही पोरकट सबब मॅजिस्ट्रेटनें खरी धरली त्यास उद्देशून केसरी त्वेषानें म्हणतो, 'होय, हे 'मॅजिस्ट्रेटसाहेब म्हणतात तें सर्व ठीक आहे. आधीं नेटिव्ह होणें व गोरे अपराध्या- 'वर हात टाकूं पाहणें हाच मोठा अपराध व मूर्खपणा आहे व त्या मूर्खपणाचा 'जाब देणेसाठीं त्यास यमाचे दरबारीं जाण्याचा प्रसंग आला हेंहि ठीकच आहे, 'यांत शंका नाहीं !' ( १०-२-०३ ).

युरोपियन अपराधी असला म्हणजे जात्यभिमानानें अंध होऊन युरोपियन ज्यूरी कसा अन्याय करते हें केसरीनें अनेक खटल्यांचे दाखले देऊन जनतेच्या नजरेस आणलें आहे व युरोपियन ज्यूरीचा निषेध केला आहे. शेख बुढण या नांवाचे एका इस- मास बुस्वी या गोऱ्या इसमानें बुटाचे लाथांनीं बेदम मारून त्याचीं हाडें मोडलीं. सदर बुस्वी याजवर खटला होऊन तो सेशन्स जज्ज मि. हीटंन यांचे पुढें चालला व ज्यूरीनें आरोपी निर्दोषी आहे असें ठरविलें व सेशन्स जज्ज यांनीं ज्यूरीचा निर्णय मान्य करून त्यास सोडून दिलें. हा खटला नाशिक जिल्ह्यांत चालला व ज्यूरीचा हक्क नाशिक जिल्ह्यास मिळाल्यानंतर जो पहिला ज्यूरी खटला चालला तो हाच होय. यासंबंधीं केसरी म्हणतो, 'अपराधाचे मानानें पुरी व भरपूर शिक्षा व्हावी 'म्हणून सेशन्सकमिट केलेला गोरा आरोपी, गोरी ज्यूरी दोषमुक्त ऊर्फ निर्दोषी 'ठरविते, याहून न्यायदेवतेच्या आंधळेपणाचें दुसरें समर्पक उदाहरण कोठेंच सांपडा- 'वयाचें नाहीं. एकंदरींत नाशिकच्या ज्यूरीनें न्यायदानाचा ओनामा चांगला केला, 'याबद्दल तिचें आम्ही नाशिक जिल्ह्याच्या प्रजाजनांतर्फे ( त्यामध्यें शेख बुढण 'भिस्त्याचाहि समावेश आहे ) अभिनंदन करितों.' ( १२-१-०४ ). अशाच 'प्रकारच्या दुसऱ्या एका प्रकरणावर लिहितांना केसरी म्हणतो, 'राज्यकर्त्यांच्या 'जातीविषयीं सर्वांस अभिमान वाटावा अशी जर त्यांची इच्छा असेल तर त्यांनीं 'अंधजात्यभिमान व स्वार्थप्रेरित मनोवृत्तींचा त्याग करून न्याय दृष्टीच ठेवली 'पाहिजे. किंबहुना एतद्देशियांशीं न्यायानें वागणें हें त्यांचें महत्त्वाचें कर्तव्य होय. या 'कर्तव्यास जागणें हें त्यांस हितावह होणार आहे.' ( १४-३-११ ). केसरीनें दिलेली ही सूचना योग्य नव्हे असें कोण म्हणेल ?

केसरीनें वरील प्रकारचे अन्याय किती निर्भीडपणानें चवाठ्यावर आणले याचें प्रत्यंतर जर कोणास पहावयाचें असेल तर सन १९२४ सालीं ( ता. ३०- ५-२४ चा अंक पहा ) पुण्याचे सेशन जज्ज मि. वाइल्ड यांनीं लोहगांवचे खट- ल्यांत युरोपियन ज्यूरीचा अभिप्राय पसंत न पडल्यामुळें हायकोर्टाकडे प्रकरण पाठविल्यानंतर हायकोर्टानें ज्यूरीचा अभिप्राय मान्य करून गोरा अपराधी वॉकर यास निर्दोषी म्हणून सोडून दिलें, त्या वेळीं जी सडेतोड टीका केली त्यांत पहावयास सांपडतें. या टीकेबद्दल केसरीस हायकोर्टानें चांगलाच भुर्दंड भरावयास लावला, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. गोऱ्या लोकांस आपले जातीविषयीं अभिमान वाटणें अगदीं

नैसर्गिक आहे, पण त्या भावनेस कांहीं तरी मर्यादा पाहिजे. यासंबंधीं केसरी म्हणतो, ' वरील प्रकारच्या नैसर्गिक अभिमानामुळें थोडथोडक्या ठिकाणीं अन्याय होत ' असतो तोंपर्यंत सर्व कांहीं खपून जातें. पण मनुष्याच्या रक्ताची चटक लागली ' असतां ज्याप्रमाणें हिंस्र पशु अनिवार होतो, त्याप्रमाणें अन्याय करून आपले ' अवगुण छपविण्याची न कळत कां होईना पण संवय लागली असतां दुर्गुण ' अधिकाधिक बळावत जातात. म्हणूनच सरकारपुढें व अँग्लो-इंडियन समाजापुढें या ' खटल्यासंबंधाचें लोकमत वरचेवर मांडणें, प्रजाजनांच्या व राज्यकर्त्यांच्या अत्यंत ' हिताचें आहे असें आम्हांस वाटतें. ' ( २६-७-९८ ).

६. समारोप :—केसरीनें अत्युच्च ध्येय पुढें ठेवून इंग्रजी राज्यपद्धतींतील अन्याय दूर करून घेण्याचे उद्देशानें ते कोणत्याहि प्रकारचा आडपडदा न ठेवतां सडेतोड भाषेंत राज्यकर्ते व जनता यांचेपुढें मांडले. हें कटु कर्तव्य बजावीत असतां केसरी-वर अनेक संकटें कोसळलीं व खडतर हालअपेष्टांनीं त्याला त्रासलें, पण स्वकर्तव्य-निष्ठेच्या भक्कम अधिष्ठानावर पन्नास वर्षांपूर्वी जी त्याची प्रतिष्ठापना झाली तिच्यामुळें आज केसरीस नगाधिराज हिमालयाप्रमाणें स्थिर, गंभीर, विशाल व उदात्त स्वरूप प्राप्त झालें आहे. स्वकर्तव्यनिष्ठेचें असिधाराव्रत अतःपर केसरीकडून असेंच पाळलें जाईल, अशा प्रकारचें सामर्थ्य केसरीस मिळत राहो अशी आशा व्यक्त करून हा लेख संपवितों.

---

# आमचें दारिद्र्य व महागाई

[ श्री. श्रीपाद रामचंद्र पाळंदे, एम्. ए., एल्एल्. बी. ]

## १. दारिद्र्य

गेल्या २५० वर्षांपूर्वी हिंदुस्थान हें सुवर्णभूमि म्हणून प्रसिद्ध होतें, किंबहुना पाश्चिमात्य राष्ट्रांतील लोकांस इकडे येण्याची बुद्धि होण्याचें कारण सुवर्णभूमि म्हणून गाजत असलेली आमची दिगंत कीर्तीच होय. पण गेल्या ४० वर्षांत ' नांव सोनूबाई हातीं कथिलाचा वाळा ' अशी आमची स्थिति झाली आहे. आमचा देश दरिद्री आहे व तेथील लोकांस दुवक्ता पोट भरण्याची पंचाईत आहे, ही गोष्ट इंग्लिश अधि-कारी छपवून ठेवीत असत. रयत कराखालीं मेटाकुटीस आली, जमाखर्चाची तोंड-मिळवणी होत नाहीं, तरीहि हिंदुस्थानांत 'आलबेल' आहे असें फौलरसाहेब सांगतात. दादाभाई नौरोजी यांचें 'हिंदुस्थानचें दारिद्र्य व इंग्रजी शीलास न शोभणारी राज्य-पद्धति, ' डिग्बी यांचें ' भरभराटलेलें हिंदुस्थान ' व दत्त यांचें ' भरभराटलेलें

ब्रिटिश हिंदुस्थान ' या पुस्तकांमुळें हिंदुस्थानांत व इंग्लंडमध्यें या विषयास चालना मिळाली व त्याच वेळीं केसरीनें लेख लिहून प्रस्तुत लेखकांची बाजू सत्य आहे असें विशद करून सांगितलें. हिंदुस्थानच्या दारिद्र्याची खालील कोष्टकावरून कल्पना येईल.

| देश | प्रत्येक चौ. मै. लोकसंख्या | माणसीं वार्षिक उत्पन्न | दर माणसीं कर | करांचें प्रमाण |
|---|---|---|---|---|
| इंग्लंड | ४७८ | ४१० | २४ | ६·९ |
| रशिया | ४१ | १६० | १२ | १० |
| स्पेन | ८५ | १३८ | २० | १३ |
| हिंदुस्थान | २२९ | २० | ३ | १४·१ |

सर रॉबर्ट ग्रिफिन यांनीं सन १९०३ मध्यें दिलेलें खालील कोष्टक केसरीनें घेतलें आहे:

| देश | एकंदर उत्पन्न कोटी पौंड | एकंदर संपत्ति कोटी पौंड | लोकसंख्या (लक्ष) |
|---|---|---|---|
| ब्रिटन | १७५ | १५०० | ४२० |
| कानडा | २७ | १३५ | ६० |
| ऑस्ट्रेलिया | २१ | ११० | ३५ |
| हिंदुस्थान | ६० | ३०० | ३०० |

ब्रिटनची ४२० लक्ष प्रजा जितका पैसा अन्न, पेय व दारू वगैरेंत खर्च करते, तितकी हिंदुस्थानच्या ३३ कोटी प्रजेची वर्षाची कमाई आहे. १८५० सालीं दर माणसीं सुमारें २ आणे उत्पन्न होतें. १८८० सालीं तें १॥ आणा झालें व १९०० सालीं ¾ आण्यावर आलें असें डिग्बीसाहेबांनीं सरकारी कागदपत्रांवरून सिद्ध केलें आहे. कर्झन यांनीं दर माणसीं वार्षिक उत्पन्न २३ शिलिंग आहे असें अनुमान काढलें. लॉर्ड रिपन यांचे कारकीर्दीत तें २७ रु. पर्यंत ठरविण्यांत आलें. मोर्लेसाहेबांनीं हिंदुस्थान श्रीमंत आहे हें सिद्ध करण्याकरितां एक सुंदर चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला. ते म्हणतात, ' हिंदुस्थानच्या बायका पूर्वी मातीच्या घागरी डोकीवर घेऊन जात असत. पण हल्लीं त्या तांब्याच्या घेतात ' यावरून आमची श्रीमंती दिसावी हें आमचें दुर्भाग्य होय! उकिरडा फुंकून रहाणाऱ्या भारवाहकांचे-पेक्षां आमची स्थिति चांगली आहे व आमच्यापेक्षां जास्त दुःखी लोक जगांत आहेत हें सांगण्यास आम्हांस मोर्लेसाहेबांची जरूरी नाहीं.

आम्हांस दारिद्र्यावस्था प्राप्त होण्याचीं कारणें पुष्कळ आहेत. हिंडमन् यांनीं दर्शविल्याप्रमाणें १७५७ ते १८१५ पर्यंत इंग्लिश लोकांनीं आम्हांस मोबदला न देतां सुमारें १५० कोटी रुपये आमचेकडून परदेशांत नेले व त्याखेरीज दरसाल ४०-५० कोटी रु. द्रव्यशोषणाची तुंबडी चालू आहे! ज्याप्रमाणें एकादी जळू मनुष्याच्या अंगांतलें रक्त शोषण करते त्याप्रमाणें इंग्लंडरूपी जळू आमचा द्रव्यशोष

करीत आहे. इंग्लिश लोक जेवढा पैसा कपडालत्ता व घरभाडें यांकरितां खर्च करतात, तेवढें आमचें वार्षिक उत्पन्न आहे! पण असें असूनहि साम्राज्यसंरक्षणाचा व लष्कराचा बोजा आमचेवर लादला आहे. एडनचें ठाणें, इराणची वकिलात, वगैरेंचा खर्च निष्कारण हिंदुस्थानास द्यावा लागतो. वसाहतींच्या सेक्रेटरी वगैरेंचा सर्व खर्च इंग्लंड करतें, पण हिंदुस्थानच्या झाडसारवणासुद्धां खर्च इंडिया ऑफिसकडून वसूल केला जातो ! असें असूनहि कांहीं दयाळू इंग्रजी लोक हिंदुस्थानच्या दुष्काळनिवारणार्थ फंड देत असले तर तें कर्ज म्हणून द्या असें भारतमंत्री सांगतात !

हिंदुस्थानचा खर्च दिवसेंदिवस जास्त वाढत चाललेला आहे व त्यांतच [Exchange] वट्टयामुळें आमचें अपरिमित नुकसान होत आहे. १८५७ सालापर्यंत लष्करी खर्च ११ चा १९ कोटींपर्यंत चढला व त्यांतच ५॥ कोटी नुकसान वट्टयामुळें झालें. सर ग्रँट डफसाहेब म्हणतात, 'दरसाल सुमारें ५-७ कोटी रुपयांचें सोनें हिंदुस्थानांत येतें. जर तुम्ही दरिद्री आहां तर तें जातें कोठें ?' यावर केसरीनें टीका करतांना दादाभाई नौरोजी यांनीं दिलेले आकडे घेतले आहेत. दादाभाई नौरोजी यांनीं त्यांस उत्तर दिलें तें असें:—५-७ कोटी रुपयांचें सोनरुपें येतें ही गोष्ट कबूल आहे, पण तें किती लोकांत वाटलें जातें ? १८०१ ते १८८४ पर्यंत ४५५-८ कोटींचें सोनें आलें, पण तें २० कोटी लोकांकरितां आहे. म्हणजे ८४ वर्षांत प्रत्येक माणशीं २३ रु.चें सोनें आलें ! यावरून दरसाल ४-४॥ आण्यांचें सोनें प्रत्येक माणसाच्या वांट्यास आलें ! १८००ते १८८४ पर्यंत ६४ कोटी रु.चें रुपें आलें. पण त्यांपैकीं ६२ कोटी टांकसाळींत गेले. डॉ. हंटर म्हणतात, १८४० ते १८८३ पर्यंत ३५८॥ कोटी रुपयांचें सोनेंरुपें आलें, त्याचें प्रमाण दरसाल दरमाणशीं ५ आणे पडतें ! काय हा उधळेपणा व दागिन्यांची हांव ! लेह्य, चोष्य व भक्ष्य पदार्थांची रेलचेल असलेल्या इंग्लंडमध्यें १८५८ ते १८८४ पर्यंत दरसाल एक रुपयाचें सोनें प्रत्येक माणसानें खर्च केलें. फ्रान्समध्यें तेंच प्रमाण २॥ रु. आहे! इकडे दर साल दर माणसीं उत्पन्न २७ रु. तर तिकडे ३००-५०० रु. तरीहि आम्ही १-१॥। आणे दागिन्यासाठीं खर्च केला तर आम्ही सोनेंचांदी गिळणारे राक्षस !

आमचा देश शेतकीप्रधान आहे. शेंकडा ८६ लोक शेतकरी आहेत. शेतकीस दैना येत चालली आहे. १८६५ सालीं हंटरसाहेब म्हणतात, '२-३ पेक्षां जास्त जमीन गांवगन्ना वहात नव्हती.' मुंबई इलाख्याचा दशवार्षिक रिपोर्ट १९०३ सालीं प्रसिद्ध झाल्यावरून जमीन महसूल २ कोटी ७३ लक्ष होता, तो ३ कोटी ३३ लक्ष झाला. त्याबरोबर लोकसंख्या वाढली व इतर उद्योगधंदे त्या प्रमाणांत न वाढल्यामुळें देश खालावत जाऊन दरिद्री लोकांचें ठाणें होऊन बसला आहे.

खेड्यांतील मजूरवर्ग व शेतकरी यांजकडे दृष्टि फेंकली तर आमच्या दारिद्र्याची व निर्धनतेची पूर्ण कल्पना येते. दक्षिणेंतील शेतकऱ्यांना फक्त १४ रु. दर वर्षी खर्च करण्यास मिळतात, असें स्पेन्ससाहेब म्हणतात. अशा स्थितींत त्यांनीं काय

खावें व शिल्लक टाकावें हें एक ईश्वरच जाणे ! दुष्काळांत मृत्युसंख्या वाढली तर त्यास जबाबदार दयाळू सरकारच होय ! !

राज्यकारभाराच्या खर्चाचे नांवाखालीं आमच्या पैशांचा चुराडा होतच आहे. पण त्याखेरीज आमच्या देशांतील खनिज संपत्ति काढून नेण्याचें काम झपाट्यानें चालू आहे हें हॉलंड यांनीं १८९८ ते १९०३ पर्यंतच्या खनिज संपत्तीच्या उगराणीचा रिपोर्ट लिहिला आहे यावरून दिसतें. ह्या खनिज संपत्तीचा उपयोग राष्ट्राचे उद्योगधंदे वाढविण्याकडे न होतां युरोपियन कंपन्यांची भर करण्याकडे होत आहे हें खालील आंकड्यांवरून स्पष्ट होईल. ह्या पांच वर्षांत कोलारच्या सोन्याच्या खाणींतून ३०,३०,१५३ औंस सोनें काढलें. त्याची किंमत ११,९६,५०,००० रु. भरली. त्यांपैकीं फक्त ८४,००,००० रु. म्हैसूर सरकारास मिळाले व बाकीचे ७,४८, २०,००० रु. युरोपियन कंपनीचे भागीदारांत वाटले गेले !

सर जॉर्ज क्लार्क यांनीं हिंदुस्थान दरिद्री आहे असें म्हणणारांवर १९११ सालीं ताशेरा झाडला. भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें तुम्ही दरिद्री आहां असें म्हणण्यानें तुम्ही दरिद्रीच रहाल असा शापहि देण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं ! श्रीमंती भासविण्याचा प्रयत्न केल्यानें ज्याप्रमाणें मनुष्य सधन होत नाहीं, त्याप्रमाणें दरिद्री म्हणण्यानें आम्ही दरिद्री राहणार नाहीं. तरी हें दारिद्र्य नष्ट करण्यास आम्ही जोराची चळवळ सुरू केली पाहिजे. दारिद्र्य हा एक हिंदुस्थानास जडलेला रोग आहे. ओकोनेर यांनीं ‘ सोसायटी ऑफ आर्ट ’ पुढें १९०४ सालीं एक निबंध वाचला व त्यावर केसरीनें टीका केली. त्यांत त्यांनीं ४०-५० कोटी रुपयांचा खर्च योग्य आहे, असें नमूद केलें आहे. तरीहि आमची सांपत्तिक स्थिति निकृष्टावस्थेस पोंचली आहे हें त्यांस कबूल आहे. शेतकऱ्यांस सावकाराचे जाचांतून सोडविणें, चैनीकरितां खर्च कमी करणें, जमिनीचे कर शेंकडा २५-३० टक्के कमी करणें, शिक्षणाचा प्रसार करणें, वगैरे उपाय त्यांनीं सुचविले आहेत. आमची औद्योगिक वाढ शक्य नाहीं असें त्यांना वाटतें. कारण आमच्या इकडील लोकांच्या साध्या रहाणीनें त्यास पुरेसें गिऱ्हाईक मिळणार नाहीं. ओकोनेरसाहेबांच्या उपायानें त्या रोगाची कांहीं काळ पिछेहाट होईल. पण आपण मूळ रोगाचेंच उच्चाटन केलें पाहिजे व तें सरकारी मदतीवर व लोकांच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे. विलायतेंत जो क्रोडो रुपयांचा अखंड प्रवाह चाललेला आहे तो थांबविणें, अखेरची राज्यसत्ता इंग्लंडचे हातीं राहून जबाबदार राज्यपद्धति स्थापणें ह्या राष्ट्रीय सभेच्या मागण्याच हिंदुस्थानचें दारिद्र्य नष्ट करतील. सरकारी खर्चावर लोकमताचा दाब राहिल्याखेरीज आमची दुःस्थिति नाहींशी होणार नाहीं.

## २. महागाई

ब्रायन नांवाच्या एका इंग्लिश गृहस्थानें १९०७ सालीं हिंदी लोक ‘ पाप्याचीं पितरें ’ आहेत असें वर्णन केलें आहे व हिंदी लोकांची अशी स्थिति

होण्याचें कारण लूट व दुष्काळ होत असेंहि तो म्हणतो. धान्याची परदेशीं निर्गत झाल्यामुळें धान्याचे भाव चढले व धान्य घेणें गरीब लोकांस अशक्य झालें, त्यामुळें लोक निःसत्त्व व निर्बल झाले. पूर्वीं धान्याचे भाव काय होते व नंतर कसे चढत गेले हें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

भाव पुणें येथील दर रुपयास (शेरांत)

| सन | तांदूळ | गहूं | ज्वारी | बाजरी | हरबरे | तूप | दूध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १८९१ | ११ | १२ १/२ | २० १/२ | १६ १/२ | १६ | १·४ | ८ |
| १८९७(दुष्काळ) | ८ १/४ | ९ १/४ | १० १/२ | ९ | ९ ३/४ | १·५ | ८ |
| १८९९ | ११ | ११ १/२ | २२ १/२ | १८ | ११ | १·६ | ८ |
| १९०२ | ९ ३/४ | ९ १/२ | १५ | १३ ३/४ | १३ | १·५ | ८ |
| १९०५ | ... | १३ | १६ १/२ | १३ १/२ | १० | १·४ | ८ |
| १९०८ | ६ ३/४ | ७ | ११ १/४ | १० | ८ १/२ | ०·१४ | ८ |
| १९१० | ८ २/३ | ८ | १४ १/२ | १३ ३/२ | १३ १/२ | ०·१५ | ७ |
| १९११नोव्हेंबर. | ५ | ६ | ७ १/२ | ६ १/२ | १० | ०·१२ | ६ |

( वरील कोष्टक केसरीनें १९१२ सालीं दिलें आहे. )

१९१० सालीं सरकारी फडणीस खात्यांतील मि. दत्त यांची महर्गतेच्या चौकशी-साठीं नेमणूक केली. महर्गतेचीं मुख्य दोन कारणें आहेत. ज्या मानानें एकादे वस्तूस मागणी असेल त्या मानानें त्या वस्तूचा पुरवठा कमी असला तर साहजिकच त्या वस्तूस जास्त किंमत येते. अवर्षण, दुष्काळ, लागवडीच्या क्षेत्रांची कमतरता, जमिनीचा उतरता कस वगैरे अनेक कारणांमुळें पुरवठा कमी होतो. मोबदला देऊं केलेल्या वस्तूचें फाजिल वैपुल्य असेल तर महागाई वाढते. पतीची वाढ, सोन्याचा सुकाळ, टांकसाळींतून जरूरीपेक्षां अधिक बनाई वगैर गोष्टींचा त्यांत समावेश होतो. क्रेय पदार्थांचा तुटवडा व विनिमय-साधनांची विपुलता हीं कारणें महर्गता आणण्यास सबळ आहेत. तरीहि पुरवठ्याचा अभाव हें मुख्य कारण आहे. मग मागणी आमची स्वतःची असो अगर परदेशाची असो. आमचा पुरवठा कमी होण्याचें कारण गहूं, कापूस, कांतडीं, गळिताचीं धान्यें इत्यादि कच्च्या मालाची किंमत परदेशी मागणी-मुळें वाढली व त्यामुळें शेतकरी ज्वारी, बाजरी, कडधान्यें वगैरे न पिकवितां वरील जिनसा तयार करण्याकडे तें क्षेत्र उपयोगांत आणूं लागले. हें खालील कोष्टकावरून स्पष्ट होईल.

एकंदर लागवडीच्या क्षेत्रापैकीं प्रमाण शेंकडा—

| जिन्नस | १८९०-९१ | १९११-१२ |
|---|---|---|
| धान्यें | ८१·३ | ७८·२ |
| कापूस | ४·६ | ६ |
| ताग | १ | १·४ |
| गळिताचीं धान्यें | ६ | ६·५ |

गुजराथेंत धान्याची लागवड शें. ७४·९४ होती ती १९११-१२ सालीं ६६·८ झाली व कापूस १०·१वरून २६·२पर्यंत चढला. महाराष्ट्रांत धान्याचें प्रमाण ८०·०२ होतें तें ७३·६ पर्यंत उतरलें व कापसाचें प्रमाण ·१८वरून १८·०पर्यंत गेलें. १८९०-९१ सालीं वऱ्हाडांत धान्याच्या लागवडीचें प्रमाण शेंकडा ५६.७ व कापसाचें प्रमाण शें. ३३·०६ होतें तें १९१०-११ सालीं जवळजवळ सारखें झालें. (धान्य शें. ४८·१ व कापूस ४६·१ ).

मागणी वाढत गेल्यामुळें जमिनीचें उत्पन्न महागत जात आहे. मागणी व पुरवठा यांचें प्रमाण कायम राहिलें तरीहि लोकसंख्येच्या स्थलांतरानें महागाई वाढते. उदाहरणार्थ, गुजराथ व महाराष्ट्र येथील मजूरवर्ग मोठ्या शहरीं येऊन राहिला तर त्याच्यासाठीं ज्या जिनसा आणाव्या लागतात त्यांच्या वाहतुकीचा खर्च वगैरे वाढतो व त्यामुळें महागाई वाढण्यास मदत होते.

महागाईस मदत करणारें दुसरें कारण म्हणजे विनिमय-साधनांचें वैपुल्य होय. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका येथें सोन्याच्या नव्या खाणी सांपडल्या व त्याच वेळीं सोनें कमी खर्चांत गाळण्याचा शोधहि लागला. त्यामुळें बाजारांत पुष्कळ सोनें आलें. व अर्थशास्त्राच्या प्रमेयाप्रमाणें मागणीपेक्षां पुरवठा जास्त झाल्यानें सोन्याचा भाव उतरला. म्हणजे एका विशिष्ट सोन्याच्या नाण्यांत पूर्वीं जितके जिन्नस मिळत होते तितकेच जिन्नस मिळण्यास आतां जास्त नाणें लागूं लागलें. वैपुल्याचें दुसरें कारण म्हणजे पुष्कळसे व्यवहार रोकडींत न होतां हुंड्या, चेक, नोटा वगैरेंवर होऊं लागले. वास्तविक या कारणामुळें होणारी महागाई ही सर्व जगांत सारख्या प्रमाणांत असावयास पाहिजे. पण तिचें प्रमाण आमच्या देशांत जास्त दिसतें. जर्मनींत शें. ३४, अमेरिकेंत २६, इंग्लंडमध्यें २३ तर हिंदुस्थानांत ४७ टक्के वाढ झाली. ही स्थिति १९१५ सालीं झाली असें केसरीनें सांगितलें. त्याचप्रमाणें १८९० ते १९०० व त्यानंतर १९१० पर्यंतच्या आंकड्यांवरूनहि हेंच स्पष्ट होतें. आमचे देशांत झालेली महागाई ही इतर देशांपेक्षां जास्त आहे.

हिंदुस्थानांत वाढ होण्याचें कारण आमची कृत्रिम चलन-पद्धति होय. सरकार जरूरीपेक्षां जास्त नाणें पाडीत आहे. १९०७ सालीं सरकारची ही हांव परमावधीस पोहोंचली व त्यामुळें १९०८ सालीं महर्गता शिखरास जाऊन पोहोंचली व सरकारास १२ कोटी रु. परत घ्यावे लागले. नैसर्गिक चलनपद्धति असली म्हणजे नाण्याची झालेली फाजील वाढ आपोआप नाहींशी होते व मागणी आणि पुरवठा यांचें प्रमाण कायम रहातें. आमच्या कृत्रिम पद्धतीमुळें नाण्याचा प्रवाह चालू आहे पण फाजील झालेलें नाणें नाहींसें करण्यास मात्र मार्ग नाहीं.

अशा स्थितींतच आमच्या दुर्दैवानें उचल खाल्ली. १९१४ सालीं महायुद्ध सुरू झालें. ज्या राष्ट्रांनीं लढाईंत प्रत्यक्ष भाग घेतला होता त्या राष्ट्रांना धान्य वगैरे

जाऊं लागलें. १९१४ सालीं इंग्लंडला साखरेचा तुटवडा पडला. त्या वेळीं इंग्लंडनें खुल्या व्यापाराचें तत्त्व बाजूस ठेवलें व ३०½ कोटी रु. खर्च करून कच्ची आलेली साखर शुद्ध करून ठराविक दरानें विकण्याचा दुकानदारांशीं करार केला. हिंदुस्थानांतून धान्याची निर्गत होऊं लागली व त्यामुळें इकडे धान्याचे भाव चढत गेले. त्यांतच लबाड दलालांनीं व स्वार्थी व्यापाऱ्यांनीं लोकांस पिळून काढण्याचा धुमधडाका सुरू केला. व्यापारी बेसुमार किंमती वाढवून आपलें उखळ पांढरें करण्याची पर्वणी साधून घेत होते. तरी त्यांस वेळींच आळा घालावा अशी केसरीनें सरकारास इषारत दिली. १९१० सालीं मद्रासमध्यें धान्य व कापडाची लुटालूट झाली. बंगालमध्येंहि दंगे झाले. या सर्वांचें मुख्य कारण महागाईच होय, असें केसरीनें स्पष्ट बजाविलें. त्याच वेळीं लॉर्ड वुइलिंग्डन यांनीं मुंबईस वजनदार पुढाऱ्यांची कमिटी बोलाविली. व माल दाबून ठेवण्यास प्रतिबंध ठेवणें, माल ठराविक किंमतीस विकणें, स्वस्त मालाचीं दुकानें काढणें वगैरे गोष्टी करण्याचें आश्वासन दिलें. दुष्काळाचें मुख्य कारण कमी पुरवठा हें होय. त्याबरोबर वाहतुकीच्या साधनांचा अभाव. त्यामुळें धान्याच्या भावांत दोन प्रांतांत ( कानपूर व पुणें ) पुढीलप्रमाणें फरक दिसला :—

| | गहूं | | बाजरी | | ज्वारी | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुणें | १९१४ | १९१८ | १९१४ | १९१८ | १९१४ | १९१८ |
| | ६॥ | ४॥। | ३॥। सरकारी<br>३ बाजारभाव | ३ | ४ शेर | ३ शेर |
| कानपूर | ७। | ७। | ७॥ | ७॥ | ८ | ८ |

कापडाचे व्यापारास आळा घालण्यासाठीं सरकारनें १९१४ सालीं एक बिल आणलें. कंट्रोलर ( Controller ) नेमणें, किंमतीवर योग्य तो प्रतिबंध ठेवणें, वगैरे गोष्टींवर मुख्यत्वेंकरून भर दिला होता. त्या बिलास केसरीनें सर्वसाधारण मान्यता दिली.

एप्रिल १९१० ते जून १९१८ पर्यंत सुमारें २५-२६ कोटींची चलनांत भर पडली ( सरकारनें १४ कोटींचें नवें नाणें पाडलें व नवीन नोटा तयार केल्या ), त्यामुळें महर्गतेस जास्त तेजी आली.

१९१५ सालीं मार्च ३१ पर्यंत कराची, कलकत्ता व मुंबई यांखेरीज इतर बंदरांतून गहूं बाहेर पाठविण्याची मनाई करण्यांत आली. प्रत्येक बंदरास किमान मर्यादा घालण्यांत आली. कराची ५५००० टन, कलकत्ता ८००० व मुंबई १५००० व तीहि फक्त साम्राजांतच पाठवावयाचा असा निर्बंध घातला. इतर देशांत पीक बरें आहे, त्यामुळें या उपायानें थोडी महागाई कमी होईल, ही गोष्ट निर्विवाद आहे. तरीहि १५ लक्ष टन गहूं इंग्लंडला पुरवावा लागेल व त्यामुळें महागाई होईल. इंग्लंड, कानडा, ऑस्ट्रेलिया येथें दर माणसीं ३ मण गहूं लागतो. हिंदुस्थानांत ¾ मण दर माणशीं पाक आहे, तरीहि ⅙ पीक परदेशीं जातें ! त्यामुळें व लढाईमुळें आमचे

इकडे गव्हाचा दुष्काळ वाटूं लागला. किंमत वाढत आहे हें शेतकऱ्यास हितावह आहे, कारण त्यांस जास्त पैसा मिळेल, असें सर शापूरजी भरूचा सांगतात. पण त्यामुळें आम्हांस गव्हाचा तुटवडा पडेल हें सरसाहेब विसरतात !

१९२० सालीं बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सरकारी मक्ते बंद करावे असें सुचविलें. रंगूनचा तांदूळ मुंबईस ज्या किंमतीस परवडतो त्यापेक्षां २ आणे जास्त घेऊन व्यापारी विकतात. असें असून सरकारी मक्तेवाली कंपनी १ रु. दर गोणामागें घेते ! जिल्ह्या-जिल्ह्यांतून व प्रांताप्रांतांतून धान्याच्या आयातनिर्गतीस हल्लीं जी परवानगी घ्यावी लागते, ती बंद करण्यांत यावी. कारण त्यामुळें एकीकडे ११ शेर तर दुसरीकडे ३ शेर भाव अशी स्थिति होत आहे. अन्नमंत्र्यांनीं धान्याचे भाव उतरणार नाहींत असें सांगितलें. कारण अमेरिकेसारखा संपन्न देश साखर वगैरे जिन्नस खरेदी करीत आहे. युरोप व रशियांमध्यें गव्हाची लागवड पूर्ववत् सुरु झाली नाहीं. ऑस्ट्रेलिया व अमेरिकेंत गहूं पुरेसा नाहीं. अशा स्थितींत आमचे गव्हावर धाड येणार, येथील गहूं ३० टक्के जास्त आहे, तांदूळ १८ टक्के जास्त आहे, सबब ते परदेशीं पाठविण्यास हरकत नाहीं, असें म्हणण्याचा सरकारचा कावा दिसत आहे. आपला गहूं परदेशीं न जाण्याबद्दल आपण खबरदारी घेतली पाहिजे. निर्गतीवर जादा कर बसविला पाहिजे. नाहीं तर युरोपांतील गहूं बुडाला व आमचा उडाला अशी आमची स्थिति होईल. हें मत केसरीनें १९०० सालापासून प्रतिपादलें आहे व त्यामुळें महागाई वाढत आहे असेंहि केसरीकार सांगतात !

महागाई ही शेतकरी, मजूर, कारागीर यांच्या फायद्याची आहे, असें दत्त म्हणतात. उलटपक्षीं सावकार, डॉक्टर, वकील वगैरेसारखे धंदेवाले, सुखवस्तु व पगारी नोकर वगैरे यांचें नुकसान झालें तर काय हरकत आहे ? असेंहि दत्त सांगण्यास कमी करीत नाहींत ! पण हा सर्व हेत्वाभास आहे. आम्हांस उच्च दर्जाचा व्यवहार करण्याची पात्रता व कुवत आहे व म्हणून आम्ही कनिष्ठ धंद्यांवर अवलंबून रहाणार नाहीं. शेतकऱ्यांना चैनीचे पदार्थ उत्पन्न करून मिळणारा हा फायदा चिर-काल टिकणारा नाहीं. पैशाच्या लालुचीनें स्वतःची काळजी न करणें व त्यामुळें आपल्या गुराढोरांची व कुटुंबाची उपासमार करणें हेंहि अहितकारकच आहे. मजुरी वाढल्यामुळें मजूर मिळत नाहीं व त्यामुळें शेतकी पूर्वींप्रमाणें होत नाहीं. महागाईमुळें दिसणारी ही भरभराट खरी नसून पोकळ व नकली आहे व त्यामुळें आमचा शेतकरी वर्ग कधींहि सुधारणार नाहीं.

---

# हिंदी पेढ्या ( बँका )

[ श्री. दत्तात्रय बळवंत गोडबोले, एम् ए., एल्एल्. बी. ]

अकराव्या शतकांत युरोपांत वडून आलेल्या औद्योगिक क्रांतीमुळें वाफेच्या शक्तीनें काम करणारी हरतऱ्हांची यंत्रसामग्री निर्माण होऊन घरोघर लहान लहान प्रमाणावर चालू असलेल्या उद्योगधंद्यांची जागा मोठमोठ्या कारखान्यांनीं घेतली. हजारों कामगार एकत्र जमून प्रचंड यंत्रांचे साहाय्यानें लक्षावधि रुपयांचा माल एकेका दिवसांत निर्माण करावयाचा व तो दूर देशीं विक्रीस पाठवावयाचा, ही परिस्थिति अस्तित्वांत येऊं लागली. परंतु एवढा प्रचंड व्याप एका व्यक्तीस, मग ती कितीहि श्रीमंत असेना, सांभाळणें शक्य नसल्यानें सामुदायिक भांडवलाची जरूर भासूं लागून त्या जरूरींतून सध्यांच्या स्वरूपाच्या पेढ्या निर्माण झाल्या. प्रत्येक व्यक्तीनें व्याजाच्या आशेनें स्वतःजवळची ठेव पेढीवाल्याचे हवालीं करावयाची, त्यानें ती रक्कम थोडेंसें जास्त व्याज घेऊन व्यापारी व कारखानदार यांना द्यावयाची व त्यांनीं त्या रकमेच्या साहाय्यानें उद्योग, व्यापार वगैरे चालावयाचे, हें पेढ्यांचें प्रमुख कार्य आहे. ( २० व २७-५-१३ ).

हिंदुस्थानांत पेढ्यांचे व्यवहार हजारों वर्षें चालत आलेले असले तरी या नवीन तऱ्हेच्या पेढ्या फार अलीकडच्या काळांतील आहेत. कंपनीच्या कारकीर्दींत ‘ एजन्सी हाउसेस ’ या नांवाच्या युरोपियन व्यापाऱ्यांनीं चालविलेल्या कांहीं पेढ्या असत. परंतु त्यांपैकीं बऱ्याच पेढ्या सन १८३० च्या सुमारास बुडाल्या. ईस्ट इंडिया कंपनीनें स्वतःच्या व्यापारास व राज्यकारभारास मदत व्हावी म्हणून स्वतंत्र कायदे करून बंगाल, मुंबई व मद्रास या ठिकाणीं प्रेसिडेन्सी बँका अनुक्रमें सन १८०६, १८४० व १८४३ या वर्षीं स्थापन केल्या. त्यांचें भांडवल आरंभीं कंपनीनें उभारलेलें असल्यामुळें त्यांची व्यवस्थाहि बहुतेक कंपनीच्या हातीं असे व १८६५ सालीं जरी सरकारनें आपलें भांडवल व वरासचा तावा काढून घेतलेला असला, तरी अद्याप ह्या बँका सरकारीच आहेत, असा पुष्कळ लोकांचा समज आहे; व या लोकांच्या गैरसमजाचा प्रेसिडेन्सी व इंपीरियल बँकांना पुष्कळसा फायदाहि होतो. असो. अशा तऱ्हेनें हा वेळपर्यंत हिंदी लोकांनीं पेढ्यांचे व्यवहारांत आपला शिरकाव करून घेतला नव्हता. परंतु १८८० मध्यें उत्पन्न झालेल्या स्वदेशीच्या लाटेपासून देशी पेढ्यांची कल्पना हिंदी लोकांच्या मनांत रुजली व नवीन नवीन हिंदी पेढ्या अस्तित्वांत येऊं लागल्या. १८८१ मध्यें ‘ औध कमर्शिअल बँक ’ स्थापन झाली व तिच्यामागून १८९४ मध्यें लाला हरकिसनलाल यांची प्रख्यात पंजाब नॅशनल बँक, व पीपल्स बँक व बाँबे बँकिंग कंपनी या प्रसिद्ध पेढ्या स्थापन झाल्या.

त्यानंतर १९०५ सालीं स्वदेशीची दुसरी लाट आला व मुंबईची स्पीसी बँक व तिच्यामागून दुसऱ्याहि अनेक पेढ्या स्थापन झाल्या व स्वदेशप्रेमी लोकांनीं आपली कोट्यावधि रुपयांची ठेव या बँकांतून ठेवून दिली. अशा तऱ्हेनें हजारों लोकांच्या वित्ताचा संबंध आल्यामुळें केसरीस पेढ्यांचे बाबतींत जनतेला शिक्षण देणें जरूर वाटलें व तें काम आजपर्यंत केसरीनें फार उत्कृष्ट तऱ्हेनें केलें आहे. केसरींतील १९१३ मधील ' हिंदी पेढ्यांचे व्यवहार ' ही लेखमाला, १९२८ मधील श्री. केळकरांचे ' गंगाजळी पेढी 'वरील लेख व चालू सालची श्री. केतकरांची ' एक्स्चेंज बँक'वरील माला हीं या स्मरणीय कामगिरीचीं कांहीं प्रमुख उदाहरणें आहेत.

वर लिहिल्याप्रमाणें १९०० च्या सुमारास अनेक हिंदी पेढ्या अस्तित्वांत आल्या; पण त्यांपैकीं बहुतेकांची व्यवस्था सदोष होती. ' देशी बँका निघाल्या ' म्हणजे तेवढ्यानें युरोपियन पेढीवाल्यांपासून आम्ही जें काय शिकावयाचें तें शिकून ' मोकळे झालों असा मथितार्थ नाहीं. आपणांस अद्याप पुष्कळ शिकावयाचें आहे,' अशी सूचना देऊन केसरीनें १९१३ सालीं आमच्या पेढ्यांतील अनेक दोष दाखविले होते. पहिला महत्त्वाचा दोष असा कीं, आपणांकडे बँक या शब्दाचा फार दुरुपयोग करण्यांत येत असे. वाटेल त्या चार बेजबाबदार लोकांनीं उठावें व पेढी काढावी, तिला भांडवल, शेअर, शिल्लक वगैरेंची कांहीं मर्यादाच नाहीं. अर्थात् अशी बेजबाबदार पेढी चालत नाहींच, उगीच गरीब लोकांचें मात्र नुकसान होतें. तेव्हां या बाबतींत पेढीवाल्यांवर नियंत्रण घालणें जरूर आहे, असें केसरीकारांनीं सुचविलें होतें. या दोषांपेक्षांहि केसरीनें दुसरा मोठा दोष दाखविला होता व तो म्हणजे मॅनेजिंग एजंटपद्धतीचा. बँकेचा व्यवहार पहाण्यासाठीं कायमचे मॅनेजिंग एजंट नेमणें म्हणजे एकाच व्यक्तीच्या कर्तबगारीवर कायमचें अवलंबून रहाणें होय. शिवाय हे एजंट सर्व ठिकाणीं आपल्या कार्यास लायक असतात असेंहि नाहीं. त्यांपैकीं कांहीं केवळ नांवाच्या आशेनें एजंट अगर डायरेक्टर बनतात व कित्येकांचीं नांवें उगीच बोर्डावर दिलेलीं असतात. ' हे मॅनेजिंग एजंटस् ऐन नफ्यांत हिस्सेरशी ठेवून, ' शिवाय चालचलाऊ कामकाज करण्यासाठीं पगार घेऊन म्हणजे सत्त्व खाऊन घडणा- ' बळ मिळवितात ती वेगळी. कांहीं ठिकाणीं तर मॅनेजिंग एजंटचा हा हक्क ' वंशपरंपरा राखून ठेवण्याची अट असे !! तिसरा दोष डायरेक्टरांच्या लायकी- ' बद्दलचा. पुष्कळशा कंपन्यांतून भागीदारांनीं निवडून दिलेले हे डायरेक्टर लोक ' अतज्ञ असतात, एवढेंच नव्हे तर अज्ञहि असतात. याच्या उलट स्थिति युरोपियन ' बँकांची. त्यांचे भागीदार लायक डायरेक्टर निवडण्याची काळजी घेत असतात.' ( २२-७-१३ ).

हिंदी पेढ्या सुधारण्यासाठीं केसरीकारांनीं याप्रमाणें प्रयत्न चालविले असतां अनेक पेढ्यांचीं भराभर दिवाळीं निघालीं. इंग्लंडमध्यें ' साउथ सी कंपनी 'चें

दिवाळें निघाल्यानंतर जी परिस्थिति झाली होती तशीच परिस्थिति इकडे झाली. हजारों गरीब लोक भिकेस लागले व व्यापारी जगांतील पत नाहींशी झाली. या आर्थिक गोंधळाची प्रत्येक जण आपापल्या मगदुराप्रमाणें कारणपरंपरा लावूं लागला. चंदावरकरांनीं तर या पेढ्यांचे दिवाळ्यांचा संबंध जातीभेद व आमची स्त्रियांच्या गोषाची पद्धत यांच्याशीं जोडून दिला. ( १६-१२-१३ ). तेव्हां जनतेस याविषयीं योग्य ती जाणीव व्हावी व झालेल्या नुकसानीपासून त्यांनीं चांगला धडा घ्यावा म्हणून केसरीनं ' दिवाळखोरीची खरी व खोटी मीमांसा ' केली. डायरेक्टरांची नालायकी हें तर एक कारण होतेंच, पण त्याहून महत्त्वाचें दुसरें कारण असें कीं, भारी व्याजाच्या आशेनें पेढ्यांनीं मोठमोठीं कर्जें गुंतागुंतीच्या व विनहुकुमी तारणावर दिलेलीं असत; व त्यामुळें मागणी आली असतां पेढीवाल्यांचें तारण हुकमी जाव देऊं शकत नसे. हेंच या दिवाळखोरीचें महत्त्वाचें कारण आहे, असें सांगून केसरी म्हणतो, ' अर्थात् भागीदारांचे फायद्यासाठीं असलें कृत्य केलें असेल ' तर त्याला हलवायाचे घरावर ब्रह्मार्पण व व्यवस्थापकांचे फायद्याकरतां केलें असेल ' तर तो अप्रामाणिकपणा व विश्वासघात असें म्हणावें लागेल. ' ( २२-७-१३ ). पण हा दोष नुसता व्यवस्थापकांचाहि नव्हता. कंपनीचे व्यवहारावर भागीदार कधींच देखरेख करीत नसत, हेंहि एक कारण होतें. वास्तविक डायरेक्टर म्हणजे भागीदारांचे मुनीम. त्यांच्यावर नेहमीं देखरेख ठेवून त्यांच्याकडून चांगलें काम करवून घ्यावयास पाहिजे. परंतु भागीदारच जर स्वतःच्या कर्तव्याकडे दुर्लक्ष करूं लागले तर बँकांचा कायदा बदलून तरी काय उपयोग ? ( कित्ता ). या दिवाळखोरीचें शेवटचें महत्त्वाचें कारण म्हणजे सरकारनें दाखवलेली बेपर्वाई. १९०७ सालीं अमेरिकत अशाच प्रकारची दिवाळ्यांची साथ आली असतां इंग्लंडनें आपल्या गंगाजळींतून एक कोट पासष्ट लक्ष रुपयांचें सोनें अमेरिकेस धाडलें. परंतु, येथें मात्र मोठ्या बँकांचीं एकामागून एक दिवाळीं निघत असतां सरकारनें काडीचीहि मदत केली नाहीं ! व त्यामुळें हिंदी बँकांच्या पतीला मोठा धक्का बसून त्याचा परिणाम अनेक वर्षे जाणवला. ( ११-११-१३ ).

असो. ही स्थिति पुढें हळू हळू सुधारून नवीन पेढ्या पुन्हां स्थापन होऊं लागल्या. तथापि आजहि कोणत्याहि देशाची खरी आर्थिक उन्नति होण्यास पेढ्यांची अत्यंत जरूरी असते, हें तत्त्वहि केसरीनें जनतेस पटवून दिलें आहे. जपान व जर्मनी यांचीं उदाहरणें देऊन केसरीनें असें दाखवून दिलें कीं, या दोन्ही देशांतील उद्योगधंद्यांची वाढ अवघ्या चाळीस वर्षांतील आहे व ती होण्याचेंहि कारण त्यांनीं स्थापन केलेल्या पुष्कळशा पेढ्या हेंच होय. तशा पेढ्यांची आपल्या देशांत अत्यंत जरूर आहे. परंतु हिंदुस्थानांत सध्यां फारच थोड्या पेढ्या आहेत व ज्या आहेत त्यांचें बरेंचसें भांडवल परदेशी आहे. ज्या चार देशी पेढ्या आहेत त्याहि अत्यंत मागासलेल्या आहेत. ( ३०-७-२९ ). याशिवाय आपल्याकडच्या पेढ्यांतील मोठा दोष म्हणजे

त्या सर्वांगीण नाहींत. प्रत्येक तऱ्हेच्या उद्योगधंद्यांचें स्वरूप वेगळें असल्यानें त्यासाठीं स्वतंत्र पेढ्या असणें जरूर असतें. म्हणजे उद्योगधंद्यांच्या मदतीसाठीं पेढ्या वेगळ्या, शेती सुधारण्यासाठीं पेढ्या वेगळ्या, परदेशांशीं होणाऱ्या व्यापारास मदत करणाऱ्या पेढ्या वेगळ्या. अशा तऱ्हांच्या विशेष कार्याला वाहून घेतलेल्या पेढ्या असल्याशिवाय त्या त्या विभागाचें कार्य व्यवस्थित चालत नाहीं. परंतु हिंदुस्थानांत अद्याप एकहि औद्योगिक पेढी नाहीं किंवा एकहि निर्गत व्यापारास मदत करणारी पेढी नाहीं. या उणीवेकडे लक्ष देऊन ती भरून काढल्याशिवाय हिंदुस्थानांत उद्योगधंदे व व्यापार वाढणें शक्य नाहीं, हें केसरीनें जनतेस शिकविलें आहे. (७-१०-३०).

पेढ्यांचे बाबतींत हिंदुस्थान सर्व सुधारलेल्या जगांत जास्त मागासलेला आहे, हें पुढील कोष्टकावरून दिसून येईलः—

| देशाचें नांव, | पेढ्यांची संख्या | दर १० लाख लो. सं.शीं पेढ्यांचें प्रमाण | दर २७०० चौरस मैलीं पेढ्यांचें प्रमाण |
|---|---|---|---|
| अमेरिका | ३०००० | २५६ | २० |
| इंग्लंड | ११९७६ | २८५ | ३६२ |
| जपान | ७४६५ | ९२ | ८० |
| कॅनडा | ४८८३ | ४४८ | ३ |
| हिंदुस्थान | ५९६ | २ | १ |

हिंदुस्थानांत पेढया इतक्या कमी असण्याचीं अनेक कारणें आहेत. त्यांपैकीं मध्यवर्ती गंगाजळी पेढीचा अभाव हें प्रमुख कारण आहे. प्रत्येक सुधारलेल्या राष्ट्रांत एक गंगाजळी पेढी असते व इतर सर्व लहान लहान पेढ्यांवर देखरेख करणें, त्यांचे कार्यास योग्य दिशा लावणें, एखादी पेढी बुडण्याचा प्रसंग आला असतां, तिला मदत करणें, चलन व हुंडणावळ यांचीं कार्यें नीट चालविणें वगैरे कामें त्या पेढीकडे असतात. केवळ नफ्याकडे लक्ष न देतां राष्ट्राचा फायदा कसा होईल इकडेच फक्त या पेढीचें लक्ष असतें. या दृष्टीनें सरकारनें १९२० सालीं स्थापन केलेली ' इंपीरियल बँक ' उपयोगी पडत नाहीं. कारण ती खाजगी भागीदारांची पेढी असून तिचें लक्ष केवळ फायद्याकडे आहे. तिचें सर्व धोरण बहुशः युरोपियन लोकांच्या हातीं असल्यानें राष्ट्रहिताकडे त्या पेढीचें लक्ष असणें शक्य नाहीं. तेव्हां येथें एका नव्याच गंगाजळी पेढीची फार जरूर आहे. ' अशा पेढींत सरकार हल्लीं करतें तें, ' इंपीरियल बँकेकडे असलेलें व स्टेट सेक्रेटरीकडचें अशीं सर्व कामें एकत्र होणार ' आहेत. ' ( २१-२-२८ ). ' या पेढीच्या कामांत एक भाग खाजगी व्यापाराच्या ' स्वरूपाचा व दुसरा सरकारी अधिकाराच्या उपयोगाचा राहील. पैकीं खाजगी ' व्यापाराचा भाग म्हटला म्हणजे कर्ज देणें व घेणें, कर्जरोख्यांचा व्यवहार करणें ' व हुंड्या पटविणें. या बँकेस स्वतःचे व्यवहारासाठीं कर्ज असें काढावें लागणार ' नाहीं. पण उगीच पैसा जास्त खेळता झाल्यास बाजारची तंगी करण्यास

'व्याजाचा दर वाढवून कर्ज काढणें, हें एक कर्तव्य होईल.' ( २८-२-२८ ). ही पेढी हुंड्यांचे बाबतींत फक्त discounting चें काम करील. म्हणजे इतर बँकांच्या हुंड्या पटवून त्यांना रोकड देईल.

वर दिलेल्या स्वरूपाची बँक काढण्याची सल्ला हिंदुस्थान सरकारास हिल्टनयंग कमिशननें १९२६ सालीं दिली होती. व अशा पेढीच्या योगानें सध्यां स्टेट सेक्रेटरीच्या हातीं असलेली सत्ता हिंदुस्थानांत येणार असल्यानें सरकारनें ती सूचना मान्यहि केली होती. परंतु सरकारास जनतेच्या हातीं कांहींच सत्ता द्यावयाची इच्छा नसल्यानें बँकेचें भांडवल कसें उभारावें व बँकेवर ताबा कोणाचा असावा या मुद्द्यांवर सरकार व लोकपक्ष यांत मतभेद पडला. 'भागीदारांचें खेंकटें उभें करून' हा सर्व हक्क अँग्लो-इंडियनांचे हातीं द्यावा हें सरकारचें धोरण, आणि तो खास लोकांच्या हातीं द्यावा हें लोकपक्षाचें धोरण. ( ७-६-२७ ). पुन्हां लोकपक्षाचें मत असें होतें कीं, कांहीं डायरेक्टर्स कायदेमंडळानें निवडावे व अशा तऱ्हेनें या नव्या पेढींत तरी हिंदुस्थानचें हित प्रथम पाहिलें जाईल अशी काळजी घ्यावी. सरकारचें मत कीं, गव्हर्नर-जनरलनेंच डायरेक्टर्स नेमावे. या विषयावरहि केसरीनें विस्तृत लेखमाला लिहून लोकपक्षाच्या मताचें समर्थन केलें होतें व एकट्या गव्हर्नर जनरलनें चार पांच डायरेक्टर्स नेमून जर बँकेवर राजकीय मतांचा पगडा बसत नाहीं, तर प्रांतिक कायदेमंडळाचे शेंकडो सभासद व वरिष्ठ कायदेमंडळाचे शेंकडो सभासद यांनीं चार दोन डायरेक्टर्स निवडून कांहींच राजकीय परिणाम होणार नाहीं हें दाखवून दिलें होतें. ( ९-८-२७ ). शेवटीं आपले मताप्रमाणें कायदा होत नाहीं असें पाहून सरकारनें तें बिल परत घेतलें व सर्व प्रश्न जागच्याजागीं राहिला.

---

# पोटजाती व स्पर्शास्पर्श

[ संग्राहक—श्री. स. दि. वाकनीस, बी. एस्‌सी. ]

विषय अत्यंत वादग्रस्त तसा महत्त्वाचा तर खराच. परंतु त्यावर संपादकीय लिखाण केसरींत एक दोन अग्रलेख वगळल्यास विशेषसें आलें नाहीं. त्याचें कारण कांहींहि असो. परंतु बॅ. सावरकर, श्री. महादेवशास्त्री दिवेकर, श्री. श्री. म. माटे इत्यादिकांचे या विषयांची चर्चा करणारे लेख केसरींत वेळोवेळीं सविस्तर आले आहेत, त्यांवरून केसरीनें या प्रश्नाची उपेक्षा केली असें कसें म्हणतां येईल ? प्रस्तुत ग्रंथांत केसरीच्या मतप्रतिपादनासच प्राधान्य असल्यानें केसरींतून संपादकीय म्हणून जेवढे लेख ह्या विषयासंबंधीं आले त्यांतीलच उतारे देणें श्रेयस्कर वाटलें. म्हणून प्रस्तुत लेखकानें अशा महत्त्वाच्या उताऱ्यांचा केवळ संग्रह केला आहे. हीन जाती

व त्यांची उन्नति ह्यांवर दोन अग्रलेख केसरींत, ( ३०-८ व ६-९-१० ), आले असून बहुतेक सर्व भाग त्यांतीलच असल्यानें त्यास अवतरणें घातलीं नाहींत व तारखाहि दिल्या नाहींत. त्यांव्यतिरिक्त लेखांतून घेतलेल्या उताऱ्यांस मात्र तारखा घातल्या आहेत.

* * *

हिंदुसमाजाच्या सुधारणेसंबंधानें जे वादग्रस्त म्हणून प्रश्न आहेत त्यांत जातिभेद हा अत्यंत महत्त्वाचा असून, नवीन शिक्षण मिळूं लागल्यापासून त्याजविषयीं आज पन्नास पाऊणशें वर्षेंपर्यंत एकसारखा वाद सुरू आहे. तथापि अद्यापि तो प्रश्न कोणासहि समाधानकारक रीतीनें सुटला आहे, असें म्हणवत नाहीं. याचें एक कारण आमच्या मतें असें आहे कीं, रोटीव्यवहार व बेटीव्यवहार हे जातिभेदाच्या प्रश्नांतील मुख्य दोन मुद्दे, ते भवती-न-भवतीस पुढें काढून प्रथम बरेच दिवस वाद करण्यांत आला होता. परंतु तात्त्विक दृष्ट्या वादाची ही पद्धति कितीहि बरोबर असली तरी व्यावहारिक दृष्ट्या या दोहोंहून कमी प्रतीचे मुद्दे वादांत पुढें करणें फार सोईचें असतें.

केवळ सद्धेतूनें प्रेरित होऊन व वादापासून खरोखरीं कांहीं व्यावहारिक फायदा निष्पन्न झाला तर करावा या दृष्टीनेंच जो मनुष्य वादास प्रवृत्त होतो, तो वर सांगितलेल्या व्यावहारिक युद्धपद्धतीचें अनुकरण केल्याशिवाय प्रायः रहात नाहीं. धर्म अगर समाज यांविषयीं वाद करण्याचा प्रसंग आला असतां खरा सुधारणेच्छु मनुष्य अत्यंत गहन व नाजुक असे जे मुद्दे असतात ते सहसा वादविवादास पुढें न आणण्याची खबरदारी घेतो.

अलीकडील कांहीं वर्षांत जातिभेदासंबंधाचा तात्त्विक वादविवाद कमी होऊन प्रत्यक्ष व्यवहारांत जातिभेदाची तीव्रता कमी होण्यास काय होईल ती थोडी बहुत सुधारणा घडवून आणण्याची बुद्धि जागृत झाल्यामुळें, मुख्य जातिभेदाऐवजीं पोट-जातींचें ऐक्य व हीन जातींसंबंधानें स्पर्शास्पर्शविचार हे मुद्दे सभांतून व खासगी रीतीनें लोकांच्यापुढें येऊं लागले आहेत; व हे मुद्दे ज्या प्रमाणानें गौण त्या प्रमाणानें त्यांजवर एकवाक्यता होण्याचा संभवहि अधिक दिसून येऊं लागला आहे.

मुख्य जातिभेद वादास न घेतां ब्राह्मणांतील पोटजाती, क्षत्रियांतील पोटजाती, वैश्यांतील पोटजाती, असा प्रश्न घेतला असतां धर्माची भीति तितकी न वाटतां, प्रामाणिकपणाचा युक्तिवाद करण्यास कांहीं देऊन व कांहीं घेऊन वाद मिटवितां आल्यास तो मिटविण्यास आपण तयार होतों. ब्राह्मणांतील पोटजाती मोडण्यास शंकराचार्यांसारख्यांची अनुज्ञा, समाजांतील पुढाऱ्यांची निदान तात्त्विक संमति, व अगदीं अलीकडच्या काळांतील कांहीं दाखले इतकी सामग्री अनुकूल असल्या-मुळें या प्रश्नावर उघड चर्चा करण्यास लागणारें धाडस अंगीं असणारे बरेच लोक समाजांत सांपडणें आज शक्य झालें आहे.

* * *

जातिभेदास नैसर्गिक पाया असो वा नसो, कालांतरानें त्यास छिद्रें पडून त्याचा उच्छेद झाल्याशिवाय राहणार नाहीं. 'अशी स्थिति येऊं शकेल कीं, ही वर्ण-
' व्यवस्था मोडून सर्व समाज पाश्चिमात्य समाजाप्रमाणें कराराच्या पायावर उभारला
' जाईल. ही स्थिति सर्वांशीं इष्ट आहे किंवा नाहीं, ह्याविषयीं बोल्शेव्हिकांच्या
' उदयामुळें आतां थोडी शंका येऊं लागली आहे. आजहि संपत्ति व सुखसोयी
' यांच्या असमान वांटणीमुळें, राजसत्ता, भांडवलशाही व मजूर ह्यांतहि, एकाच
' जातीचे, वर्णाचे असूनहि जातिभेद उत्पन्न होत आहे. परस्परांच्या संबंधांत निसर्गतः
' असलेल्या बौद्धिक, आर्थिक व सांस्कृतिक विषमतेमुळें जे जीवनकलह उत्पन्न
' झाले त्यांमुळें प्रचंड प्रमाणावर जातिभेद उत्पन्न होत आहे ' ( १६-३-२० ).
जातिभेद एकराष्ट्रीयत्वास विरोधक आहे कीं काय ह्यावर बरेंच दुमत आहे. कांहींच्या
' मतें जसें चातुर्वर्ण्य उत्कर्षास एके काळीं कारणीभूत झालें असेल तसेंच अपकर्षास
' असूं शकेल. कारण मूळचें चातुर्वर्ण्य हें **गुणकर्मविभागशः सृष्टम्** असें होतें. तें लोपत
' जाऊन आजच्या जातिनिष्ठ जातिभेदाचा फैलाव होऊं लागला व ज्या वेळीं बेटी-
' बंद व रोटीबंद जातिभेदानें उग्र स्वरूप धारण केलें, तोच काळ आमच्या अधः-
' पाताचा परमावधि करणारा ठरला.' ( २९-११-३० ). ' हिंदु समाजांत वर्णबंधन
' दृढ आहे, हें बंधन टाकून देण्याची हिंदु धर्मास इच्छा नाहीं व समाजासहि नाहीं.
' पटेलसाहेबांच्या बिलानें जातिभेद आणि वर्णभेद मोडेल अशा भ्रामक समजुतीनें
' एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनं जे या बिलास संमति देत आहेत, त्यांना जातिभेदाच्या
' दृढतेची खरी कल्पना नाहीं, ' ( १०-१२-१८ ), असा इशारा केसरीनें पटेल,
बिलाच्या वेळेस दिला आहे. ' जाती मोडण्यास कोणी उपाय सुचवीत नाहीं.
' ब्राह्मण, मराठे वगैरे जातींत अन्न व बेटीव्यवहार होणें ही दूरची गोष्ट आहे. ती
' स्थिति येईपर्यंत आमचें पाऊल पुढें खात्रीनें पडणार. मग असंभाव्य गोष्टींकडे कां
' लक्ष देतां ? ' ( ९-८-८७ ).

आतां जातिभेद मोडण्यास जे अनेक उपाय सुचविले जातात त्यांतील कांहीं विचारार्ह आहेत. ' राष्ट्रधर्माचें उच्च ध्येय, सर्व जातींनीं आपली संकुचित
' वृत्ति टाकून देऊन आपल्या पुढें ठेविलें पाहिजे. त्या राष्ट्रधर्माचें स्वरूप
' सर्व हिंदुस्थानभर व्यापक केलें पाहिजे. म्हणजे प्रांतविशिष्ट किंवा जातिविशिष्ट
' विचार किंवा आचार राहणार नाहीं. सोंवळ्याओंवळ्याच्या ज्या अनेक वेडगळ
' समजुती आज समाजांत वावरत आहेत, त्या टाकून देण्यास समाजानें शिकलें
' पाहिजे. म्हणजे समाजांतील अस्पृश्यता, उच्चनीच भाव टाकले जातील. शाका-
' हारी, मांसाहारी वगैरे जे अनेक भेद जातिभेदांची तीव्रता वाढविण्यास कारणीभूत
' झाले आहेत ते मांसाहारी बनून किंवा त्याबद्दलचा तिटकारा कमी करून घाल-
' विले पाहिजेत. सर्व चळवळींत आज ब्राह्मण समाजानें आघाडी मारली आहे.
' त्याचप्रमाणें जातिभेद मोडण्याच्या कामीं त्यांनींच पुढाकार घेतला पाहिजे

' अस्पृश्य समाजाचे पुढारी व मागासलेल्यांचे नेते यांनीं मिशनऱ्यांच्या भुलथापांना
' बळी न पडतां, आपण करीत असलेलें कार्य सत्याला स्मरून व केलेलीं विधानें
' ग्रंथाधारें केल्यास त्यांचा जो गैरसमज आज अनेक शतकें पुढारलेल्या जातीं-
' बद्दल झाला आहे, तो नाहींसा होण्यास फार मदत होणार आहे. आतां वर
' सुचविलेले उपाय जातिभेद समूळ मोडण्याचे कामीं उपयोगी ठरतील कीं नाहीं
' ह्याबद्दल शंका वाटते. पण इतकी गोष्ट खरी कीं, जातिभेदाची तीव्रता त्यामुळें
' निःसंशय कमी होईल. जातिभेद मोडल्यानें राजकीय किंवा सामाजिक फायदा
' होईल किंवा नाहीं हा प्रश्न फार मोठा व मतभिन्नतेचा आहे.' ( २३-१०-१३).
क्रिड लिहितो, ' त्याप्रमाणें कदाचित् ' जाती मोडतां येणें अशक्य, असंभवनीय,
' अहितकर, अस्पृहणीय,' असूं शकेल, किंवा बॅ. सावरकर लिहितात त्याप्रमाणें,
' जातिभेद मोडल्यावांचून हिंदू राष्ट्राची उन्नति होणार नाहीं. दोन्ही मतें जगाच्या
' इतिहासाकडे व समाजस्थितीकडे दृष्टि टाकल्यास अत्यंत आत्यंतिक आहेत, असें
' वाटल्यावांचून राहणार नाहीं. युरोपांतील समानतेचा हक्क्ले साहेबांना वीट आला
' होता. त्यांच्या मतें हिंदुस्थानच्या सारखी समाजव्यवस्था इतर कोणच्याहि देशांत
' नाहीं. मनुस्मृतीचाहि उद्देश समाजधारणेचा होता. चार वर्ण निर्माण केले ते
' एका विराट पुरुषाचें रक्षण करण्याकरितां असावे. उद्देश अलग करण्याचा नव्हता.'
( २४-५-१० ).

स्पर्शास्पर्शासंबंधानें पाहतां आगगाड्या, आगबोटी वगैरेंच्या योगानें बदललेली परिस्थिति व प्रायश्चित्त वगैरेंचा सोपेपणा या गोष्टींच्या योगानेंहि बरीच मदत झालेली आहे. स्पर्शास्पर्शाचा प्रश्न व सोंवळ्याओंवळ्याचा प्रश्न यांची बहुधा समव्याप्तीच आहे असें म्हटलें तरी चालेल. दोन्हींमध्यें सयुक्तिकपणाचें बीज थोडेंबहुत आहेच; व आज नवीन दिशेनें जो प्रयत्न व्हावयास पाहिजे त्यामध्यें हें बीज नष्ट होणार नाहीं, अशी खबरदारी घेणें जरूर आहे. हें बीज म्हटलें म्हणजे स्वच्छता, शुद्धि, निकोपपणा, निर्भेळता, यांचें संरक्षण करणें हेंच होय; आणि या वरील गोष्टींना जेणें-करून बाध येणार नाहीं अशाच रीतीनें या गोष्टींतील सुधारणांचा अंमल व्हावयास पाहिजे. मागें एका विद्वान् सुधारणावादी गृहस्थानें लिहिल्याप्रमाणें, ' ज्या सोंवळ्याओंवळ्याचा स्वच्छतेशीं संबंध आहे, तें अवश्य रक्षणीय आहे व स्वच्छताहि नको, असें म्हणणें म्हणजे एक प्रकारें ' महिष ' वृत्तीविषयीं प्रेम प्रगट करण्यासारखें होय. ' सोंवळ्याओंवळ्याप्रमाणें स्पर्शास्पर्शाच्या मुळाशीं असलेली जी शुचिर्भूतता ती केव्हांहि हवी आहे; फक्त सोंवळ्याओंवळ्याप्रमाणेंच स्पर्शास्पर्शाचें फाजील स्तोम नको. परंतु स्पर्शास्पर्शाचा भेद वाढविणारांनीं अगर तो कायम ठेवूं इच्छिणारांनीं ज्याप्रमाणें हें लक्षांत ठेवावयास पाहिजे त्याचप्रमाणें हा भेदभाव नष्ट करण्याकडे ज्यांची प्रवृत्ति आहे, त्यांनींहि तें लक्षांत ठेविलें पाहिजे व अभेदभावाची अतिशयोक्ति करून शुचिर्भूततेच्या मुळावर कुऱ्हाड घालतां कामा नये. हें सांगण्याचें कारण असें

आहे कीं, स्पर्शास्पर्शाचें स्तोम माजविणारांची टर करण्याची जितकी प्रवृत्ति नवीन विचारांच्या लोकांमध्यें दिसून येते, तितकी स्वच्छतेचें उन्मूलन करणाऱ्या सुधारणेची टर करण्याकडे दिसून येत नाहीं. चारचार महिने न धुतलेल्या व म्हणून कीट वाढलेल्या धावळींत आपलें सोंवळें सांठविलें आहे, असें मानणारांची जितक्या उत्साहानें आपण थट्टा करतों, तितका उत्साह, घामाची घाण येत असलेला शर्ट अंगांत घालून जेवावयास बसणारांची थट्टा करतांना आपणांमध्यें दिसून येत नाहीं. वास्तविक मांसाहाऱ्यांच्या बबरजीखान्यांतील घाणीपुढें शाकाहारी हिंदूंच्या स्वयंपाकघरांतील घाण पासंगासहि पुरावयाची नाहीं! असें असतां बटलर व बबरजी यांनीं आयत्या वेळीं ताटें वाढून आणतांना अंगावर चढविलेल्या कडक परिटघडीकडे पाहून बबरजीखान्यांतील घाणीकडे कानाडोळा करणारे किती तरी शहाणेसुरते लोक सांपडतील ! स्पर्शास्पर्शासंबंधानेंहि सार व असार यांचा असाच विपर्यास केलेला पुष्कळ ठिकाणीं आढळून येतो.

*　　　*　　　*

या बाबतींत आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, स्पर्शास्पर्शाचा विचार करावयाचा असतां ज्या जातींना अस्पर्श्य म्हणून मानलें जातें त्यांनीं हा वाद ह्याच शब्दांनीं पुढें मांडून भेदभाव नाहींसा करावा अशा प्रतिपादनाच्या भानगडींत पडूं नये. कारण या बाबतींत सुधारणेचें पाणी वळणावळणानें वरून खालींच येणें अधिक श्रेयस्कर आहे. गोष्ट तीच, युक्तिवाद तोच, महत्त्वहि तेंच; तथापि अस्पर्श्य जाति स्पर्श मानावी असा आग्रह वरिष्ठ मानलेल्या जातींनीं स्वतः धरण्यांतच एक प्रकारचें भूषण व औचित्य आहे. एखाद्या सिद्धांताच्या प्रतिपादकाचा थोडा बहुत तोटा आहे असें सकृद्दर्शनीं दिसण्यासारखें असेल तरच प्रतिपादकाच्या हेतूविषयीं कोणत्याहि प्रकारचा संशय अगर वहीम उरत नाहीं. स्पर्शास्पर्शभेद मोडल्यास आपणा स्वतःस विवक्षित लाभ आहेत, असें कनिष्ठ जातींस वाटतें हें उघड आहे. समबल व समगुण अशा दोन व्यक्तींमध्यें अगर पक्षांमध्यें बहिष्कार फारसा टिकत नाहीं. कारण, अशा बहिष्कारापासून लोकांच्या दृष्टीनें कोणाचा मान अगर अपमान होऊं शकत नाहीं व अशा स्थितींतील बहिष्कारास बहिष्कारापेक्षां केवळ भांडणाचा एक प्रकार हेंच नांव अधिक शोभेल. पण खरोखर बहिष्कार म्हणजे भांडण नव्हे. आपण श्रेष्ठ व दुसरा कनिष्ठ, म्हणून या दुसऱ्यांशीं आपण संपर्क न ठेविला तर दुसऱ्यास त्याच्या योग्य पायरीवर ठेवलेंसें होईल व संपर्क ठेविल्यास आपणा स्वतःस कमीपणा येईल, अशा समजुतीनें जें अंतर ठेवणें त्यासच बहिष्कार म्हणतात; आणि या दोन हेतूंपैकीं दुसऱ्याचें अवलंबन करून वरिष्ट जातींनीं कनिष्ठ जातींवर एक प्रकारचा बहिष्कारच टाकिलेला आहे. यास्तव हा बहिष्कार निवारण्यास कनिष्ठ जातींनीं स्पर्शास्पर्शाभाव हा भ्रममूलक आहे असें म्हणून लगट करूं पाहणें बरोबर नाहीं. एक तर अशी लगट करणें हें

स्वाभिमान-संपन्नतेचें लक्षण आहे असें कोणी मानणार नाहीं; आणि दुसरें असें कीं, अशी लगट केल्यानें उद्दिष्ट कार्यभाग तडीसहि जाणार नाहीं. ही स्वाभिमानाची बाब विशेष महत्त्वाची आहे, असें आम्हांस तरी वाटतें. या लगटीचा अर्थ वरिष्ठ जाती विपरीत करतील हें अत्यंत संभवनीय आहे व त्या लगटीमुळें अंतर तुटावें तें न तुटतां त्याचा उलट परिणाम होईल. महार, मांग, धेड वगैरे वर्गांची गोष्ट अशी आहे कीं, एकीकडे तर हिंदु धर्मात त्यांचा समावेश झालेला असून संस्कारपरंपरेमुळें वरिष्ठ वर्ग हा त्यांस गुरुस्थानीं व मान्य असा वाटतो; व त्यांनीं आपणांस जवळ करावें अशी त्यांची खरोखर इच्छा असते. परंतु वरिष्ठ वर्ग अद्यापि त्यांस जवळ करीत नाहीं; व मुसलमान किंवा ख्रिस्ती यांसारखी त्यांची सुस्थिति नसल्यामुळें—किंवा वेळ आली तर आपणच उलट वरिष्ठ वर्गांवर बहिष्कार घालूं असें म्हणण्याची ताकद अंगीं अद्यापि न आल्यामुळें—झालेला अपमान मनास लागण्याच्या स्थितींत ते आहेत. यामुळें त्यांच्यामध्यें थोडें बहुत शिक्षण पावलेले असे जे लोक निर्माण होतात त्यांना स्पर्शास्पर्शभेदाचा हा प्रश्न पुढें काढावासा वाटतो. त्यांना असें वाटतें कीं, आम्ही अंत्यज, आम्ही निराश्रित, आम्ही जित, असे असल्यामुळेंच केवळ आम्हांस अस्पर्श मानितात. परंतु ही समजूत बरोबर नाहीं. कित्येकांचें म्हणणें असें दिसतें कीं, अंत्यज लोक हे निराश्रित, त्यांचा कोणी वाली नाहीं, म्हणून त्यांना अस्पर्श मानण्यांत येतें. परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण या म्हणण्यामध्यें कार्यकारणाचा विपर्यास अगदी पूर्णपणें केला जातो. अंत्यज लोक हे निराश्रित आहेत म्हणून अस्पर्श आहेत असें नाहीं. तर अस्पर्श आहेत म्हणून ते निराश्रित मानले जातात. रणांगणांतील युद्धाप्रमाणें वादांतहि धर्मसमजुतींवर तोंडासमोरून हल्ला करणें कधींहि श्रेयस्कर होत नाहीं; बाजूनें हल्ला चढवून प्रतिपक्षाला तोंड फिरवावें लागेल, असें केल्यानें यश मिळण्याचा अधिक संभव असतो. धर्मशरिराचे पाय म्हटले म्हणजे रूढ आचार हेच होत, आणि पायच फितुर झाले म्हणजे ते नेतील तिकडे देहास जावें लागतें.

राजसत्तेच्या अंगीं स्पृश्यास्पृश्यभेद समूळ नष्ट करण्याचें नसलें तरी तो पुष्कळसा शिथिल करण्याचें सामर्थ्य आहे यांत शंका नाहीं. महाराचा स्पर्श झाला असतां स्नान करणारे सर्वच कर्मठ लोक गव्हर्नरसाहेबाचा हस्तस्पर्श झाल्यावर स्नान करतील असें नाहीं. संपत्ति ही वाटेल तें करूं शकते; व अस्पृश्य मानलेल्या जातींतील एखाद्या मनुष्यावर लक्ष्मीची जर कृपा भरपूर झाली, तर त्याला सामाजिक अपमानाचें दुःख फारसें सोसावें लागत नाहीं. धार्मिकपणा अंगीं असल्यास अस्पृश्य मानलेल्या व्यक्तींचा आपल्यास स्पर्श होणें हा एक आपल्यावर उलट अनुग्रहच आहे असेंहि उच्च वर्णांतील लोकांस वाटणें संभाव्य आहे, हें चोखामेळा व रोहिदास या दोन संतांच्या उदाहरणांवरून कबूल करावें लागेल. मनुष्याचे अंगीं मान्यता इतर अनेक प्रकारांनींहि येऊं शकते. समजा, उद्यां एखादा अंत्यज मोटा

कवि निर्माण झाला अगर त्याचे अंगीं कल्पकतेचा विकास होऊन इकडील सृष्टि तिकडे करण्यासारखा त्यानें एखादा शोध लाविला किंवा यंत्र निर्माण केलें तर, त्याजवरील निव्वळ अस्पृश्यतेचें लांछन फार दिवस टिकणार नाहीं, हें म्हणणें कोणासहि संमत होईल. एवढा मोठा अलौकिक गुण बाजूस राहो, पण साधारण सुशिक्षणाचे अंगींहि मान्यता उत्पन्न करून देण्याची शक्ति पुष्कळच आहे, याचा अनुभव आपणांस नेहमीं येतो. एखादा अशिक्षित अंत्यज दाराशीं आला असतां त्यास आपण दाराशींच उभा करितों. परंतु तोच सुशिक्षित अंत्यज असला तर त्यास आपण घरांत घेऊन खुर्ची देतों.

* * *

सुशिक्षणाचा असाच कांहीं विलक्षण प्रभाव असतो कीं, त्याच्या योगानें उच्चनीच व लहानथोर हे सर्व कृत्रिम भाव लोपून जातात; व मनुष्यामनुष्यांमध्यें एक प्रकारचा बंधुभाव उत्पन्न होतो. शिवाय सुशिक्षित मनुष्य सहसा अस्वच्छ रहात नाहीं. त्याजमध्यें बुद्धीचा विकास व विद्येचें तेज निर्माण होतें, व त्याची उपयुक्तताहि वाढते. अर्थात् एका सुशिक्षणानें इतकीं सर्व आकर्षण-कारणें उत्पन्न होतात. यास्तव अयोग्य स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा करावयाचा असेल तर, अंत्यज जातीचें सुशिक्षण वाढणें हाच मुख्य व खरा उपाय आहे. अस्पृश्यता जाऊन स्पृश्यता येण्याचेंचसें काय, पण अन्य रीतीनेंहि त्यांची सामाजिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्यास विद्या हीच उपयोगी पडणारी आहे. म्हणून अस्पृश्य मानलेल्या जातींनीं व त्यांच्या पुरस्कर्त्यांनीं शिक्षणावरच मुख्य भिस्त टाकली पाहिजे. कारण शिक्षण, सत्ता, संपत्ति अगर इतर कोणताहि विशेष गुण अंगीं नसतां अस्पृश्य जातींस जवळ घ्या असें म्हणणें, यांत जरी मोठासा गुन्हा नसला तरी तें फारसें शक्य नाहीं. कारण हा प्रश्न किरकोळ एक दोन किंवा थोड्याशा व्यक्तींचा नसून सर्व समाजाचा आहे. केवळ दांडगाईनें स्पृश्यास्पृश्यभेद मोडून दाखविणें हें समाजांतील फक्त दहापांच तत्त्वज्ञानी अगर पांचपंचवीस बाडग्या लोकांस शक्य आहे. परंतु एकंदर समाजांतील बहुमतानें जोंपर्यंत कोणतीहि सुधारणा स्वीकृत केली जात नाहीं, तोंपर्यंत ती रूढ होत नाहीं. तोंपर्यंत या दहापांच तत्त्वज्ञान्यांनीं हा भेद मोडला व त्यांस लोकांनीं विशेष नांवें ठेविलीं नाहींत तरी त्यांसच समाजबाह्य होऊन राहावें लागतें. ज्यांस आम्ही बाडगे हें नांव दिलें आहे, त्यांच्या उपद्व्यापानें तर तत्त्वज्ञान्यांच्या खटपटीपेक्षां केव्हांहि कमीच फलप्राप्ति होणार. कारण समाज त्यांस बाडगे मानणार.

तात्पर्य, बहुजनसमाजानें स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा करावा अशी जर इच्छा असेल, तर अस्पृश्य मानिलेल्या जातींमध्यें वर वर्णन केलेले गुण आले पाहिजेत. ते गुण येईपर्यंत हा भेदभाव मोडत नाहीं असा गवगवा करणें फुकट आहे. विशेषतः तोंपर्यंत अस्पृश्य मानिलेल्या जातींनीं स्वतः स्पृश्यास्पृश्यतेचा वाद काढणें श्रेयस्कर नाहीं. हा भेदभाव आजकालचा नाहीं, तर शेंकडों वर्षांच्या संस्कारपरंपरेनें तो दृढ

झालेला आहे व तो नाहींसा होण्यासहि कदाचित् शेंकडों वर्षे लागतील, असें म्हणणें वावगें नाहीं. लाट उठण्यास जितका वेळ लागतो तितकाच ती लाट उठल्यावर खालीं बसण्यास लागतो. भांडें तापण्यास जितका उशीर लागतो तितकाच तापलेलें भांडें निवण्यास लागतो, हीहि अनुभवसिद्ध गोष्ट आहे. शिवाय दुसरें असें कीं, अस्पृश्य मानलेल्या जातीसुद्धां अशा प्रकारच्या भेदभावापासून स्वतः सर्वस्वीं अलिप्त असतात असेंहि नाहीं. ज्यांना कोणतीच गोष्ट अस्पृश्य अशी नाहीं, त्या लोकांनीं सर्वच गोष्टींसंबंधानें स्पृश्यास्पृश्य भेदभाव नाहींसा करून टाकावा, असें म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. वरच्यास हात व खालच्यास लाथ हा प्रकार मध्यम जातींमध्यें दिसून येतो. ज्यांना वरची म्हणून एखादी जात अगर वर्ग असतो, त्यांस आपला समावेश ज्या वरिष्ठ वर्गांत होण्याविषयीं जितकी उत्कंठा असते तितकी आपल्या खालच्या वर्गास आपणांमध्यें समाविष्ट करून घेण्याबद्दल असते काय? याचा ज्याचा त्यानें आपल्या मनामध्यें विचार करून पहावा. सर्वच मजले मोडून एकच मजला व्हावा, असें प्रतिपादन करण्याची व त्या प्रतिपादनाप्रमाणें आचरण करण्याची जोंपर्यंत आपल्या स्वतःच्या मनाची तयारी झाली नाहीं, तोंपर्यंत विश्वबंधु-त्वाच्या गोष्टी दुसऱ्याशीं वायफळ बोलण्यांत व वरिष्ठ वर्गास ते आपमतलबी म्हणून नांवें ठेवण्यांत अर्थ तो कोणता? मराठे लोक ब्राह्मणांस नांवें ठेवतील, परंतु अंत्यजांचे पंक्तीस बसण्याची स्वतः मराठ्यांची तयारी नसते. महार लोक ब्राह्मण व मराठे या दोघांसहि नांवें ठेवतील, परंतु ते स्वतः धेड वगैरे लोकांच्या हातचें पाणीहि घेत नाहींत, असें म्हणतात! धेडांना अस्पृश्य अशी जात कोणतीच नसेल तर त्यांना मात्र वरील आक्षेप न लागतां आपल्याहून वरच्या सर्व जातींस नांवें ठेवितां येतील! परंतु केवळ विश्वकुटुंबित्वाच्या उदार बुद्धीनें ते तसें करितात, असें कोणीहि म्हणणार नाहीं.

अंत्यज वर्गानेंहि वरिष्ठ वर्गास आपल्या पदवीस ओढूं, अशी हांव धरण्यापेक्षां, शिक्षण वगैरे गुणांनीं आपण त्यांच्या बरोबरीचे होऊं अशी महत्त्वाकांक्षा बाळगणें अधिक श्रेयस्कर होईल. अशा तऱ्हेची महत्त्वाकांक्षा बाळगून त्याप्रमाणें जेव्हां त्यांच्या हातून वर्तन घडून येऊं लागेल, त्या वेळीं वरिष्ठ वर्गाच्या कोत्या समजुतीबद्दल त्यांस नांवें ठेवण्याचा हक्क आपोआपच त्यांस प्राप्त होईल.

दुसरीहि एक गोष्ट अस्पृश्य मानलेल्या जातींच्या पुढाऱ्यांनीं आमच्या मतें लक्षांत ठेवावयास पाहिजे. ती ही कीं, आजच्या स्थितींत हजारों अंत्यज लोक ख्रिस्ती धर्म स्वीकारतात. ही गोष्ट हिंदु पुढाऱ्यांच्या डोक्यावर हाणून तुम्ही यापुढेंहि आमची उपेक्षा कराल तर आणखीहि हजारों लोक हिंदु धर्म सोडून जातील, असें दटावतात. परंतु हें बरोबर नाहीं. धर्मांतरामुळें हिंदु समाजाची हानि फार होत आहे यांत शंका नाहीं व हिंदु समाजाच्या पुढाऱ्यांचे अद्यापिहि डोळे न उघडतील तर ती अशीच होत जाईल. हेतूनें धर्मांतर झालें तर त्यांला फारसें नांवे ठेवतां येणार नाहीं;

परंतु अस्पृश्य जातींचे पुढारी या नात्यानें जे बोलूं इच्छितात, त्यांना तरी ऐहिक फायद्याकरितां धर्मांतर करण्यामध्यें कमीपणा कितां आहे हें कळावें अशी लोकांची अपेक्षा असते. अंत्यज लोकांनीं धर्मांतर करणें हें हिंदु समाजावर आपल्या दुःस्थितीबद्दल सूड घेण्याचा उत्तम उपाय या दृष्टीनें कदाचित् समर्थनीय होईल. परंतु जर ते हिंदु समाजांतील अवयव असें स्वतःस म्हणून घेतात व हिंदु धर्माचा आपणांस अभिमान आहे असें म्हणतात, तर केवळ ऐहिक फायद्याकरितां धर्मांतर करणें हें लांछनास्पद आहे असें त्यांस कबूल करावें लागेल. शिवाय हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, केवळ धर्मांतर केल्यानें ख्रिस्ती समाजांत अंत्यज लोकांस विशेष मान मिळतो असें नाहीं. ख्रिस्ती समाजांतहि खरी मान्यता मिळण्यास सुशिक्षण किंवा मान्यतेचीं वर सांगितलेलीं इतर कारणें असल्याशिवाय चालावयाचें नाहीं.

---

# सरकारची उधळेगिरी

[ श्री. दत्तात्रय बळवंत गोडबोले, एम्. ए., एल्एल्. बी. ]

१. प्रास्ताविक :—हिंदुस्थानचें आर्थिक धोरण जोंपर्यंत सर्वस्वीं परकीय सरकारच्या हातीं आहे, तोंपर्यंत आपल्या देशाची सांपत्तिक उन्नति होणें अजिबात अशक्य आहे ही गोष्ट आतां सामान्य माणसासहि दिसूं लागली आहे. अन्यायानें हिंदुस्थानवर लादलेल्या कर्जाचा इनकार करण्याचा लाहोर काँग्रेसचा १९२८ चा ठराव, हिंदी किनाऱ्या-लगतचा सर्व नाविक व्यापार येथील लोकांसाठीं राखून ठेवण्याबद्दलचें श्री. हाजींचें असेम्ब्लींतील १९२८ चें बिल, नव्या होऊं घातलेल्या गंगाजळी पेढीवर लोकनियुक्त सभासदांचा ताबा असावा अशी १९२८ची राष्ट्रीय सभासदांची मागणी, १९२७ मध्यें उद्भवलेल्या हुंडणावळीचे दराबद्दल निघालेला वाद वगैरे प्रश्नांचे वेळीं सर्व राष्ट्रानें हीच गोष्ट चांगल्या तऱ्हेनें दाखवून दिली आहे. व आजहि आर्थिक ताबा वगळून बाकी देऊं केलेल्या ' संपूर्ण वसाहतीच्या स्वराज्यां'त बिलकुल तथ्य नाहीं हें सर्व राष्ट्र जाणत आहे तें यासाठींच !

पन्नास वर्षांपूर्वींची स्थिति याहून फार भिन्न होती. त्या वेळीं जनतेचे व सरकारचे आर्थिक हितसंबंध परस्परविरोधी असतील, या गोष्टीची जाणीव कै. दादाभाई नौरोजींसारख्या फार थोड्यांनाच होती व त्या लोकांचीं मतें सामान्य माणसांपर्यंत पोहोंचूं शकत नसत. बहुतेक जनता त्या काळीं इंग्रजी राज्यापासून आपणांस काय काय फायदे झाले, त्यांची पुनः पुनः मोजदाद करून त्याबद्दल सरकारला दुवा देण्यांत गुंग झाली होती. शांतता, कायद्याची व्यवस्था, अपराध्यांचा बंदोबस्त, सार्वजनिक

आरोग्य, व्यापारसमृद्धि, शेतकीसुधारणा, लेखन-स्वातंत्र्य, वगैरे फायदे ( ! ) या सदरांत येत असत. ( ९-८-९२ ).

पन्नास वर्षांचे अवधींत लोकमतांत घडून आलल्या या क्रांतीचा विचार करावयाचा म्हणजे केसरीची आर्थिक कामगिरी लक्षांत घ्यावयाची. या काळांत केसरीनें अनेक वेळां सरकारच्या आर्थिक धोरणावर टीका केली व 'सालोंसाल देशांतील ' संपत्तीची कोणास न समजे व प्रत्यक्ष न दिसे अशा तऱ्हेनें लूट चालली आहे,' हें दाखवून दिलें. अनेक उदाहरणें घेऊन 'राजा व प्रजा भिन्न देशांचीं असलीं ' म्हणजे बहुतकरून काटकसर किंवा आवश्यकता व प्रत्यक्ष फायदा अशा प्रकारच्या ' बाबी जमाखर्चांत आढळत नाहींत, ' ( २-८-९२ ), हें सिद्ध करून दिलें. एकीकडे जनतेवरील खर्चाचा बोजा वाढवून व दुसरीकडे लोकांना जास्त दरिद्री करून सरकारनें ' दोन्ही बाजूंनीं मेणवत्ती जाळण्याचा ' उद्योग कसा आरंभिला आहे, याची जनतेस जाणीव करून दिली. (५-७-१०). सोप्या व जोमदार भाषेंत टीका करून, हिंदुस्थानचें लष्कर साम्राज्याचे उपयोगासाठीं आहे; हिंदुस्थानचें कर्ज केवळ अन्यायानें वाढलेलें आहे, (१४-१-३०); येथील सनदी नोकर हे 'नाकापेक्षां मोती जड ' असे करून ठेवलेले आहेत, ( ३-६-२४ ); हुंडणावळीची बाब म्हणजे जनतेच्या तिजोरींत मोठी खिंड आहे; सरकार हें विलायती व्यापाऱ्यांचा ' नॉटपेड एजंट ' आहे, ( २८-३-९९ ), वगैरे गोष्टींची माहिती सर्व जनतेस करून दिली; व या सरकारापासून फायदा तर दूर राहो पण शेतकऱ्याची इतकी दारिद्र्यावस्था झालेली आहे कीं, 'शेतकऱ्यांस बंड करावें लागेल कीं काय,' अशी परिस्थिति उत्पन्न झाल्याचें दोन स्मरणीय अग्रलेख लिहून दाखवून दिलें. ( ६ व १३-१२-९२ ).

२. **आर्थिक ताबा :**—केसरीच्या या कामगिरीचा क्रमाक्रमानें विचार करण्यापूर्वीं सरकारच्या उधळेगिरीच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वाचें केसरीनें विवेचन केलें आहे तें पाहूं. ज्या ज्या वेळीं राज्यकर्ते व प्रजा हीं भिन्न, असतात म्हणजे जेव्हां लोकसत्ते-प्रमाणें प्रजेच्याच हातांत राज्यकारभार नसतो, तेव्हां राजा व प्रजा यांचें नेहमीं पैशावरून भांडण होत असणें साहजिकच असतें व पैसे गोळा करणें व ते खर्च करणें हा हक्क पूर्णपणें प्रजेच्या हातीं आल्यावांचून राजा आपली उधळेगिरी, किंवा निदान आपल्या मर्जीप्रमाणें खर्च करणें सोडीत नाहीं. यास ' पैशाच्या पिशवी-वरील हक्क ' ( Power of the Purse ) म्हणतात. हा हक्क मिळविण्यासाठीं इंग्लंडलाहि फार श्रम पडले होते. सरकारच्या प्रत्येक खर्चाचे बाबीवर टीका करतांना केसरीनें मुद्दाम बजाविलें होतें कीं, हा बेजबाबदार खर्च बंद होण्यास हें पिशवीचें तोंड आमच्या हातीं आलें पाहिजे. सन १९२० सालीं सरकारनें भराभर नवीन कर बसविले, त्या वेळीं केसरी म्हणतो कीं, ' जोंपर्यंत तिजोरीची किल्ली आपल्या हातीं नाहीं, तोंपर्यंत ही ' दिल्लीच्या धनगराची कात्री ' अशीच चालणार. तो आपल्या मेंढ्यांचे अंगावर एक केस देखील शिल्लक राहूं देणार नाहीं.'

( ६-७-२० ). सरकार जनतेपासून एवढा कोट्यावधि रुपये कर वसूल करतें पण त्याचा ' खर्च करावयास ज्या सर्व प्रजेकडून हा सर्व पैसा वसूल केला जातो, तिला ' हक्क काय आहे असें विचारल्यास भोपळ्याएवढें पूज्य हेंच उत्तर द्यावें लागतें. ' सन १९२० सालच्या सुधारणांपासून बराच आर्थिक ताबा लोकप्रतिनिधींस मिळाला अशी पुष्कळ लोकांची कल्पना आहे, पण ती चूक असून ' रिफॉर्म ॲक्टनें हें सर्व स्वातंत्र्य व्हाइसरॉय व सेक्रेटरी ऑफ स्टेट यांचे मर्जीवर अवलंबून ठेवलें आहे. ' ( १-३-२१ ). सरकारच्या उत्पन्नापैकीं शेंकडा ८० खर्च राखीव खात्यांवर होणार. कायदेमंडळांची रचनाच अशी कीं, सामान्यतः इतर खर्चाच्या प्रश्नांवर देखील लोकपक्षाचें बहुमत होऊं नये. त्यांतून एकादे वेळीं बहुमत झालेंच तर अंमलबजावणी करणें सरकारचे हातीं. ' सरकारनें खुशाल आपल्या मनचें करावें व ' कांहीं तरी सबबींचीं पानें लोकांच्या तोंडास पुसावीं म्हणजे झालें.' आपण आपलेच पैसे खर्च करण्याचे बाबतींत किती परावलंबी आहोंत हें दाखवितांना केसरी म्हणतो, ' आपण आपल्या घरीं चोळीबांगडीकरतां व मुलास खाऊकरतां एखादा रुपया ' देतों. त्यावर तरी त्यांची सत्ता चालते. परंतु हिंदुस्थानचे प्रजेकडून वसूल केलेल्या ' कोट्यावधी रुपयांपैकीं एक छदामहि असा नाहीं कीं, सर्व तीस कोटी ' प्रजेनें मिळून मनांत आणलें असतां ती त्यावर खरी सत्ता चालवूं शकेल. ' जें काय होईल तें भिडेनें, मोहबतीनें, धर्मानें किंवा भिकेनें. ' (१८-१-१०).

३. लष्करी खर्चाचा प्रश्न :—सरकारच्या बेजबाबदार उधळेगिरींत पहिला मान लष्करी खर्चाचा आहे. या खर्चाची वाढ सारखी कशी होत गेली आहे हें केसरीनें २१-२-२२ च्या अंकांत प्रसिद्ध केलेल्या पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

| सन | युरोपियन शिपाई | हिंदी सैनिक | खर्च कोटी रु. |
|---|---|---|---|
| १८३७-५७ | ४३८२६ | २२२९१५ | १०·८५ |
| १८६१-७४ | ६२४५४ | १२३८८१ | १५·६८ |
| १८७५-८१ | ६१८८४ | १२२५५६ | १६·१७ |
| १८८६-९४ | ७०७०४ | १४०६८२ | १८·२५ |
| १८९५-०६ | ७०४४० | १७५७५८ | २७·५० |
| १९१३-१४ | ७०४४० | १७५७५८ | ३३·१६ |
| १९२१-२२ | ७०४४० | १७५७५८ | ६२·२० |
| १९२८-२९ | ५०००० | १५०००० | ५५ |

**टीपः**—(१) प्रत्येक गोऱ्या शिपायास हिंदी सैनिकाच्या अर्धाच पट खर्च लागतो, हें लक्षांत घेतलें असतां गोऱ्या शिपायांच्या वाढीचें महत्त्व लक्षांत येईल. (२) लष्करी खर्चापैकीं १९२५ सालीं इराणांत ४॥ लक्ष रुपये, इंग्लंडमध्यें ४॥ कोट रुपये, एडनमध्यें ३। लक्ष रुपये प्रमाणें खर्च होत असत. त्याच वर्षी हिंदी पायदळ ७ कोटी व ब्रिटिश पायदळ ८ कोटी, पेन्शन ९ कोटी, विमानखातें १॥। कोटी असा खर्च होता.

हिंदुस्थानांत लष्करावर होत असलेला हा खर्च जगांतल्या कोणत्याहि देशापेक्षां भारी आहे हेंहि केसरीनें अनेक वेळां दाखवून दिलें होतं. उदाहरणार्थ, सन १९२५ सालीं हिंदुस्थानचे उत्पन्नापैकीं शेंकडा ४५ लष्करी खात्यावर खर्च होत असे. जपानांत हें प्रमाण २६.५० व इटलींत २३.१६ होतें. जर्मनी, ऑस्ट्रिया व आयर्लंड या देशांतील खर्चाचें प्रमाण शें. ७ होतें व न्यू झीलंडमध्यें फक्त शेंकडा ३ एवढाच लष्करावर खर्च होई. ( २८-६-३० ). अशा रीतीनें कोणत्याहि तऱ्हेनें पाहिलें असतां हा खर्च अत्यंत डोईजड आहे, हें केसरीनें दाखवून दिलें होतें. तथापि एकादे वेळीं जरूर म्हणून डोईजड खर्चहि करावा लागतो. परंतु या खर्चांतील बराचसा भाग हिंदुस्थानचे फायद्यासाठीं होत नसून साम्राज्याचे फायद्यासाठीं होतो हें केसरीनें अनेक वेळां वेगवेगळ्या रीतींनीं सिद्ध करून दिलें होतें. त्यांपैकीं सन १९०२ च्या नंतरचे बोअर युद्धाचे अनुषंगानें लिहिलेले लेख व १९०८ मध्यें लिहिलेले लेख हे अत्यंत उद्बोधक आहेत.

ईस्ट इंडिया कंपनीचे व्यापारी येथें येतांनाच बरोबर रशियाच्या स्वारीचा बागुलबोवा घेऊन आले होते. रशिया, इराण व अफगाणिस्थान यांमार्गें हिंदुस्थानांत स्वारी करून येणार आहे, अशी त्यांना सारखी भीति वाटत असे व तेंच हिंदुस्थानच्या अनिवार लष्करी खर्चाचें मूळ आहे. ( १०-३-०८ व १४-४-०८ ). पुढें रशियाची भीति संपली, पण फ्रान्सची भीति उभी राहिली व ती संपते तोंच युरोपांतील राष्ट्रांमध्यें जगाचें साम्राज्य वांटून घेण्यासंबंधीं स्पर्धा उत्पन्न झाली. ' हत्यारबंद शिपायांच्या ' छावणीचें स्वरूप सर्व युरोपखंडास आलेलें असून युरोपखंडांत आज प्रत्यक्ष लढाई ' नसण्याचें कारण शेजारी केव्हां काय करील या भीतीनें प्रत्येक राष्ट्र नेहमीं लढाईची ' जय्यत तयारी करून बसलें आहे, हें आहे....या शांततेस शस्त्रास्त्रांनीं राखलेली ' शांतता असें म्हणतात. ' ही १९०२ मधली स्थिति होय. त्या काळीं इंग्लंडास किती व्यवधानें राखावयाचीं असत व त्या सर्वांसाठीं हिंदुस्थानचें लष्कर कसें जरूर होतें हें पुढील वाक्यांवरून दिसून येईल. ( १५-४-०२ ). ' युरोपियन राष्ट्रांच्या ' कारस्थानास न जुमानतां बोअर लोकांच्या लढाईचा शेवट इंग्लंडला सर्वस्वीं ' आपल्यासारखा करावयाचा आहे. फ्रान्सचे डावपेंचांस न जुमानतां घशांत घातलेले ' प्रदेश इजिप्त व सौडान त्याला नीट पचवावयाचे आहेत. सैप्रस बेट ताब्यांत ' ठेवून तुर्कस्थानास रशियाचे कह्यांत न जाऊं देण्याची हमी इंग्लंडनें घेतली आहे. ' इराणी आखातांतील किरकोळ सुलतानांना आपल्या आश्रयाखालीं नांदावयाला ' लावण्याची इंग्लंडची इच्छा आहे. इराणचे किनाऱ्यावर कोणत्याहि राष्ट्रास बंदर ' मिळूं न देतां दक्षिण इराणांत व इराण, बलुचिस्तान यांच्या दरम्यानच्या सरहद्दी-' वर रशियाचा प्रवेश न होईल असा बंदोबस्त करण्यांत इंग्लंड गुंतलें आहे. अफ-' गाणिस्थानचे अमिरास दरारा न वाटावा व अफगाणिस्थानास रशियापासून धोका ' न मिळावा म्हणून इंग्लंडची जय्यत तयारी चालली आहे. पामर-चित्रळचे वाटेनें

' रशिया काश्मिराकडे भोंक पाडील म्हणून त्या बाजूलाहि इंग्लंडची लिंपालिंप सुरू आहे.
' सयामावर फ्रान्सचा कटाक्ष न चालावा म्हणून व ब्रह्मदेशाचे सरहद्दीवर फ्रान्सच्या
' सत्तेची विशेष वाढ न व्हावी म्हणून खबरदारी घेण्याचें इंग्लंडनें अंगिकारिलें आहे.
' मँच्यूरियांतून रशियास काढून टाकून चीन व कोरिया या देशांत रशिया, फ्रान्स
' व जर्मनी यांना विशेष सवलती मिळूं नयेत, म्हणून जपानचे खांद्यास खांदा लावून
' समरांगणावर दंड ठोकून आपण उभे आहोंत म्हणून इंग्लंडनें जाहीर केलें आहे....
' साम्राज्याच्या नादीं लागल्यामुळें इंग्लंडला इतर राष्ट्रांशीं शर्यत करावी लागत आहे
' व हिंदुस्थान इंग्लंडचा जिंकलेला देश असल्यामुळें त्या शर्यतीकरितां लागणाऱ्या
' सामानाचा व फाजील खर्चाचा बोजा हिंदुस्थानावर पडणार हें उघड आहे. हिंदु-
' स्थान ही इंग्लंडची कोठी आहे व रशियापासून चीनपर्यंतच्या अफाट प्रदेशांत
' कोठेंहि गडबड झाली असतां, या कोठींतून ठिकठिकाणीं हरएक प्रकारच्या
' सामानाची रवानगी करण्यांत येते...दक्षिण आफ्रिकेच्या लढाईसाठीं हिंदुस्थानांतून
' १३ हजार गोरें सैन्य पाठवण्यांत आलें व ९. हजार नेटिव्ह बुणगे पाठविण्यांत
' आले. चीनप्रकरणीं १३०० युरोपियन सैन्य, २० हजार नेटिव्ह सैन्य
' व १७५०० बुणगे पाठविण्यांत आले. शिवाय दक्षिण आफ्रिकेंत
' २ कोट १० लक्ष काडतुसें, १ लक्ष १४ हजार तोफांचे गोळे, ११ हजार
' तंबू, ११ हजार खोगीर, ३ लक्ष १५ हजार शिरस्त्राणें, ६९ हजार
' ब्लँकिटें, २ लक्ष ९० हजार बूट, ९ लक्ष ४० हजार वस्त्रपात्र ......वगैरे पाठ-
' विण्यांत आलीं. ' नवीन तऱ्हेचे शस्त्रास्त्रांचे कारखानेहि हिंदुस्थानच्याच खर्चानें
निघाले व ' अशा तऱ्हेनें प्रिन्स बिस्मार्क यांच्या या भुताची बाधा स्वतःस होऊं नये
' म्हणून इंग्लंडनें त्यास हिंदुस्थानचे मानगुटीवर बसवून दिलें. '( १५-४-१९०२).
तो काळ असा होता कीं, लॉर्ड रोजबरी यांनीं बोलून दाखविल्याप्रमाणें युरोपखंडांत एक इंचभरहि जागा अशी नव्हती कीं, जेथें इंग्लंडचा मनापासून द्वेष करण्यांत येत नव्हता. त्यामुळें इंग्लंडनें आपली सर्व बळकटी हिंदुस्थानचे खर्चानें केली होती. या अनावर राज्यविस्ताराच्या हांवेमुळेंच इंग्लंडनें गेल्या शतकांत अफगाणिस्थानाशीं तीन युद्धें केलीं व हिंदुस्थानची नैसर्गिक हद्द सोडून ती अफगाणिस्थानचे सरहद्दीवर नेऊन भिडवली. १८८५ सालीं ब्रह्मदेश हिंदुस्थानास जोडला व चीनमध्यें सैन्य पाठवलें. या सर्व युद्धांचा खर्च हिंदुस्थानचे डोक्यावर बसविला. (२५-२-१९०२). महायुद्धाचे वेळींहि हिंदुस्थानांतील बहुतेक सैन्य बाहेर पाठविण्यांत आलें होतें. वरील सर्व हकींकत देऊन केसरी अनेक वेळां विचारतो कीं, **याप्रमाणें जर येथील सैन्य प्रत्येक अडचणीच्या वेळीं बाहेर पाठवून देखील हिंदुस्थानची शांतता ढळत नाहीं तर हें सैन्य हिंदुस्थानास जरूर नाहीं हें सिद्ध होत नाहीं काय ? मग हा सर्व खर्च हिंदुस्थाननें कां करावा ? इंग्लंडचे साम्राज्याचें हें राखीव सैन्य आहे, असें समजून इंग्लंडनें यांपैकीं कांहीं खर्च सोसला पाहिजे.**

परंतु हा अन्याय अद्यापहि चालू आहे. केसरी म्हणतो त्याप्रमाणें 'कुंभाराच्या भार-
'वाहकांप्रमाणें बिकट प्रसंग आला असतां आम्हांस ओढून न्यावें आणि आमच्या
'देशांतील गरीब प्रजेचे करानें घेतलेलें पैसे गोऱ्या शिपायांचे पगार वाढवण्यांत
'खर्च करावे अशी स्थिति आहे.'

या अन्यायांनाहि जास्त उग्र स्वरूप देणाऱ्या इतर पुष्कळ गोष्टी आहेत. इंग्लंडनें स्वतःच्या जरूरीसाठीं येथें सैन्य ठेवलें, तर त्याचा खर्च तरी निदान हिशेबी ठेवावयास पाहिजे होता. पण १८९४ सालींच केसरीनें दाखविल्याप्रमाणें जगांतील कोठल्याहि लष्करापेक्षां आमचे लष्करावर जास्त खर्च होतो. त्या सालीं हिंदुस्थानांतील शिपायामागें ५२ पौंड खर्च होत असे; पण इंग्लंडमध्यें ३१ पौंड, फ्रान्समध्यें १२ पौंड, रशियांत १० पौंड, जर्मनींत ९ पौंड याप्रमाणें खर्च होई. इटलींत तर दर शिपायामागें फक्त ४ पौंड खर्च पडत असे. अशा तऱ्हेच्या या लष्करावरच्या उधळेगिरीवर केसरीनें अनेक वेळां टीका केली होती. १९२० च्या बजेटसंबंधीं केसरी लिहितो कीं, यंदांचें लष्करी अंदाजपत्रक म्हणजे **लष्करी नट्टापट्टा व गोरगरिबांचे खिशाला चट्टा** अशा प्रकारचें आहे असें म्हणावें लागतें. दरसाल नवे लष्करी ढंग निघत आहेत व सरहद्दीवरील चळवळहि वाढत आहे, त्यामुळें गेल्या वर्षीचा लष्करी खर्च ६४ कोट रुपये व त्यांत यंदांची १३ कोट रुपये भर! 'अफगाण सरहद्दीवर एकदोन आठवडे युद्ध होतें काय व त्यावर २२ कोट रुपये खर्च होतो काय, साराच चमत्कार! 'सरहद्दीचें रक्षण करावयास निघालेल्या या बहाद्दरांना विजेचे दिवे व बर्फ तयार 'करण्याचे कारखाने यांशिवाय भागेनासेंच झालें आहे.' ( ९-३-२० ). लष्कराचे बाबतींतील आणखी एक अन्याय असा कीं, येथेंहि काळागोरा हा भेद आहेच. वरच्या सर्व अधिकाराच्या व मानाच्या जागा गोऱ्याच माणसास मिळावयाच्या. दर गोऱ्या सोल्जरास काळ्या शिपायाच्या तिप्पट पगार ठरलेला. या धोरणासंबंधानें केसरीनें जेव्हां अवसर मिळाला तेव्हां सरकारला दोष दिला आहे. ( ७-४-०३ ).

अशा तऱ्हेनें लष्करी खर्चावर व धोरणावर टीका करून केसरीनें ही स्थिति सुधारण्यास कोणती उपाययोजना सुचविली होती तें पाहूं. त्यांपैकीं एका उपायाचा उल्लेख वर केलाच आहे तो असा कीं, इंग्लंडनें हें सैन्य आपली 'रिझर्व्ह'(राखीव) फौज आहे असें समजून त्याच्या खर्चापैकीं कांहीं हिस्सा स्वतःच्या तिजोरींतून द्यावा. परंतु अद्यापपर्यंत इंग्लंडनें या सूचनेकडे कधींच लक्ष दिलें नाहीं. नाहीं म्हणावयास वेल्बी कमिशननें त्या खर्चांतून फक्त ३८॥ लक्ष रुपये इंग्लंडनें द्यावे असें सुचविलें होतें. परंतु तो खर्च हिंदुस्थानच्या तिजोरींतून कमी होऊन चार वर्षें होतात न होतात तोंच इंग्लंडमध्यें सैन्याचे पगार वाढलेहि व त्या वाढीबरोबर इकडीलहि पगार आपोआप वाढून १ कोटी ५७ लक्षांचा बोजा मात्र आमच्या तिजोरीवर जास्त बसला.

केसरीनें सुचवलेला दुसरा उपाय म्हणजे हिंदी लोकांना अधिकाराच्या जास्त जागा देणें. आपले लोक हे थोड्या पगारांत राहूं शकत असल्यानें, त्यामुळें खर्चांत

मोठी बचत होईल. (२१-५-१२). या दोन्हीपेक्षां महत्त्वाची तिसरी सूचना म्हणजे हिंदी जनतेला लष्करी शिक्षण देण्याची. केसरीनें सरकारास वरचेवर विनंति केली कीं, येथें अनेक लढाऊ जातींचे लोक आहेत, त्यांनाच लष्करी शिक्षण द्या, म्हणजे ते अडचणीच्या वेळीं सरकारच्या उपयोगी पडतील. ( ६-६-११ ). परंतु हे लोक बंड करतील या भीतीनें त्यांना निःशस्त्र करणें म्हणजे चोरी करूं नये म्हणून हात तोडण्यासारखें आहे. सध्यांच्या काळांत केवळ खड्या सैन्यावर मदार ठेवण्याची पद्धत सर्व सुधारलेल्या राष्ट्रांस नापसंत आहे. (१७-३-३० ). प्रत्येक राष्ट्र आपल्या देशांतील तरुणांना युद्धाचें शिक्षण देऊन ठेवतें व जरूर लागेल त्या वेळीं त्यांची मदत घेतें. जपाननें रशियासारख्या अवाढव्य राष्ट्राचा पराभव केला व जरूर लागल्यास दहा लक्ष सैन्य रणांगणावर उभें करण्याची तयारी दाखविली. परंतु त्या वेळीं जपानचा लष्करी खर्च वर्षांचा ६ कोटी रुपयेच होता. ( ३-४-०६ ).

अशा तऱ्हेनें लष्करी खर्च कमी करण्याचे व लष्करी धोरण सुधारण्याचे मार्ग सांगून केसरीनें शेवटीं सरकारला प्रजेला जास्त संतुष्ट करण्याकडे लक्ष देण्यास सुचविलें आहे. ‘ इंग्रजी मुत्सद्द्यांना आमची अशी विनंति आहे कीं, हिंदुस्थानांतील प्रजाजनांना ‘ निर्धनतेनें, दुःखातिशयानें व निराशेनें जर तुम्हीं बहकून सोडलेत तर लढाईच्या ‘ प्रसंगीं हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य आगगाड्यांचें व तारायंत्राचें संरक्षण करण्यास ‘ किती सैन्य गुंतवून ठेवावें लागेल याचा तुम्ही अंदाज केला आहे काय ? स्पष्ट ‘ बोलावयाचें म्हणून इंग्रजी मुत्सद्यांस आम्ही असें विचारतों कीं, **रशियाशीं ‘ होणाऱ्या युद्धांत इंग्रजांचा पराभव होऊं नये असें हिंदुस्थानांतील प्रजेस कां ‘ वाटावें याचीं कारणें तरी मेहेरबानीनें सांगा.’** ( ३-४-०६ ). शेवटीं केसरीकार सरकारास स्पष्ट बजावतात कीं, ‘ **अरेरावी महत्वाकांक्षेनें उभारलेलें लष्कर फार दिवस टिकत नाहीं.** ’ अशा तऱ्हेनें केसरीनें सतत पन्नास वर्षें सरकारचे लष्कराबाबत होणाऱ्या उधळपट्टीवर अत्यंत कडक शब्दांत पण मुद्देसूद टीका करून जनतेस या अन्यायाची सांगोपांग माहिती दिली.

**४. हुंडणावळीचा प्रश्न :**—उधळेगिरीची दुसरी बाब हुंडणावळ. त्याहि बाबतींतील अन्याय लष्करी खात्याप्रमाणेंच अत्यंत जुना असून या हुंडणावळीचे बाबतींत सरकारनें दाखविलेल्या हेकेखोरपणामुळें व हिंदी लोकमताला लाथाडून देण्याच्या धोरणामुळें सालोसाल अनेक कोटींचें नुकसान होत आहे. या प्रश्नावरहि केसरीनें आरंभापासून अनेक लेख लिहून जनतेस या अन्यायाची सर्व माहिती करून दिली आहे व सरकारचा उधळेपणा उघड करून दाखविला आहे. चांदीच्या अनेक खाणी ऑस्ट्रेलियांत व अमेरिकेंत सांपडत आहेत व आतां यापुढें चांदीचा भाव स्थिर रहाणें कठीण आहे, असें पाहून युरोपियन राष्ट्रांनीं गेल्या शतकार्धांत आपल्या देशांतील चांदीचें नाणें बंद करून सुवर्णचलन सुरू केलें, तर इकडे आमच्या सरकारनें चालू असलेलें सुवर्णचलन बंद करून चांदीचें नाणें जास्त सुरू केलें व उघड्या

टांकसाळी बंद करून चलनाचा मक्ता स्वतःचे हातीं ठेवून घेतला. परंतु हुंडणावळीचा भाव सरकारचे ठरावास न जुमानतां सारखा कमी जास्त होत राहिल्यानें १८९२ पर्यंतच्या २० वर्षांतच आम्हांस ६ कोटी रुपये खर्च करावे लागले, ( २-८-९२ ), व त्याच प्रमाणांत सारखी वरचेवर खोट येत आहे. सुवर्णचलन येथें सुरू करावें म्हणून जनतेनें आजपर्यंत इतके प्रयत्न केले कीं, १९३० सालीं केसरी लिहितो, ' कौन्सिल बिल्स विकण्याचे रुपानें चाललेली ही लूट बंद पाडण्यासाठीं लोकांनीं आतां ' कोणता सनदशीर मार्ग अवलंबावा हेंच समजत नाहीं. ' असो. या प्रश्नांचा प्रो. ओतुरकरांनीं स्वतंत्र लेखांत विचार केला असल्यामुळें येथें त्यासंबंधीं जास्त लिहिणें नको !

**५. होम-चार्जेस :**—तिसरी बाब इंग्लंडमध्यें होत असलेल्या खर्चाची—Home Chargesची. ब्रिटिश साम्राज्यांत दुसऱ्या अनेक वसाहती असून त्या सर्वांचा खर्च इंग्लंड सोसतें. परंतु हिंदुस्थानचा मात्र देश जिंकल्यापासून आतांपर्यंत सर्व खर्च आमच्याचकडून घेतला जात आहे. इतकेंच नव्हे तर जिब्राल्टर, माल्टा, केप कॉलनी वगैरे ठिकाणीं ठेवलेलें सर्व सैन्य हिंदुस्थानच्याच पैशांतून पोसलें जात आहे. ( २-८-९२ ). दरसाल व्याज, पेन्शन, पगार वगैरेंच्या नांवावर हिंदुस्थानांतून इंग्लंडमध्यें पन्नास कोट रुपये खर्च होत असून, याशिवाय व्यापारी वगैरे नेतात तो फायदा वेगळाच. ह्या रुपानें चाललेल्या कायदेशीर लुटीवर केसरीनें अनेक वेळां साधार टीका करून जनतेस माहिती दिली आहे. कित्येक वेळां हिंदुस्थानचा पैसा इंग्लंडमध्यें किती निष्कारण खर्च होतो याची माहिती देत असतांना केसरीकार म्हणतात कीं, विलायतेंतल्या इन्‌लिंगच्या वेड्यांच्या इस्पितळाचा खर्च, एका एंजिनिअरिंग कॉलेजचा खर्च, एकाद्या बड्या राजपुत्रास किंवा सरदारास हिंदुस्थानांत शिकार करण्याची इच्छा झाल्यास त्याचा खर्च, एवढेंच काय पण इकडच्या लोकांस फुकट बिल्ले व पदव्या देतात त्यांचाहि खर्च हिंदुस्थाननेंच करावयाचा असतो. ( २-८-९२ ). अनेक वेळां सर्व आंकडे प्रसिद्ध करून केसरीनें विलायतेंत हिंदुस्थानचा पैसा कसा खर्च होतो याबद्दलची सर्व माहिती दिली होती, ( ४-९-१७ ), व अशा तऱ्हेनें होणारा हा अन्याय चवाठ्यावर मांडला होता.

**६. सनदी नोकरांचा खर्च :**—वर दिलेली सर्व उधळपट्टी अव्याहतपणें चालावी म्हणून सरकारनें आपलें राज्ययंत्र जनतेस सर्वस्वीं बेजबाबदार असलेल्या सनदी नोकरांच्या पोलादी चौकटीवर उभारलेलें आहे. यांची नेमणूक, रजा, बढती, सर्व सेक्रेटरी ऑफ स्टेटचे हातीं असून यांना फार मोठमोठे पगार दिले जातात. यांच्या निमित्त निष्कारण होणाऱ्या खर्चावर केसरीनें आपलें कडक टीकास्त्र पुष्कळ वेळां सोडलें आहे. ( २१-२-०५ ). जगांतील कोठल्याहि देशांतील सनदी नोकरांपेक्षां आमचे सनदी नोकर जास्त बेजबाबदार व जास्त पगारदार असूनहि त्यांनीं १९२० च्या

सुधारणानंतर पगारवाढीची मागणी केलींच व सरकारनेंहि त्यांच्या पगारांत वाढ करून सव्वा कोटीचें ओझें हिंदी तिजोरीवर घातलें. त्या वेळीं केसरीनें ' गोऱ्यांचे लाड व सव्वा कोटीची धाड ' हा उत्तम अग्रलेख लिहून या लुटीची सर्व हकीकत जनतेस करून दिली होती. ( ३-६-२४ ). या सनदी नोकरांना यापुढें ३०० रुपये ओव्हर-सी अलावन्स मिळावयाचा असून ती रक्कम पौंडांत द्यावयाची व ते पौंड ३० द्यावयाचे, म्हणजे आजच्या भावानें ४०० रुपये त्यांचे हातीं दरमहा या भत्त्यानिमित्त पडावे. शिवाय नोकरीच्या मुदतींत चार वेळ विलायतेस जाण्याचें पहिल्या वर्गाचें भाडें, प्रॉव्हिडंट फंड, फॅमिली फंड, प्रत्येक मुलामागें अलावन्स वगैरे अनेक प्रकारचे भत्ते आहेतच; व एवढेंहि करून हे सनदी नोकर जनतेस कायमचे बेजबाबदार रहातील अशी सोय केली आहे. अशा तऱ्हेनें सरकारनें आमचे हे नोकर ' नाकापेक्षां मोती जड ' असे करून ठेविले आहेत. या जागा येवढ्या भर पगारी असल्यामुळें अर्थात् त्या हिंदी लोकांना फार थोड्याच मिळावयाच्या.ली कमिशननें पंधरा वर्षांत निम्या जागा हिंदी लोकानां द्याव्या अशी सूचना केली आहे. (३-६-२४).

७. **हिंदुस्थान सरकारचा कर्जबाजारीपणा** :—सरकारचा सर्वच खर्च उधळेगिरीचा आहे. एकहि खातें असें नाहीं कीं, त्यांत हात राखून खर्च करण्यांत येतो. प्रत्येक ठिकाणीं मोठमोठ्या पगारांचे गोरे अधिकारी आहेत व नेमले जात आहेत त्या सर्व उधळेगिरीचा केसरीनें प्रत्येक अंकांतून समाचार घेतलेला आहे. या सर्व खर्चांमुळें हिंदुस्थान आज किती हीन अवस्थेस पोहोंचलेला आहे हें ' आमचें दारिद्र्य' या स्वतंत्र लेखावरून दिसून येईलच. परंतु हें विशेष लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, सध्यां हिंदुस्थान नुसताच दरिद्री नसून अत्यंत कर्जबाजारीहि आहे. वर केलेल्या विवेचनावरून हें कर्ज बहुतेक अन्यायानेंच कसें काढलेलें आहे हें दिसून येईल. प्रत्येक कर्ज काढण्याचे वेळीं हें नवें कर्ज कसें अन्यायानें लादलें जात आहे हें केसरीनें दाखवून दिलेंच आहे व १९२९ सालच्या लाहोर कॉंग्रेसनें केलेल्या राष्ट्रीय कर्जाचा इनकार करण्याचे ठरावानंतर माहितीनें परिपूर्ण असा एक अग्रलेख लिहून या सर्व कर्जाची उत्तम चिकित्सा केली आहे. ( १४-१-३० ). बरोबर शंभर वर्षांपूर्वी ईस्ट इंडिया कंपनीचें कर्ज अवघें तीस कोटी रुपये होतें. तें वाढत वाढत आज ११०५ कोटी झालें असून यंदांहि विलायतेंत नवीन कर्ज उभारण्यांत आलेंच आहे. १८५७ सालीं कंपनीच्या चुकीमुळें येथें बंड झालें, पण तें मोडण्याचा खर्च १५ कोटी रुपये मात्र हिंदी प्रजेवर लादला. कंपनीच्या नालायकीमुळें इंग्लंडनें राज्यकारभार स्वतःचे हातीं घेतला, पण कंपनीस दिलेली बक्षिसी मात्र हिंदुस्थानचे तिजोरींतून दिली. सन १८९६ सालीं वेल्बी कामिशनपुढें साक्ष देतांना कै. दादाभाईंनीं दाखवून दिलें कीं, १८७९ पासून १८९५ च्या चित्रळच्या स्वारीपर्यंत केवळ सरहद्दीचे रक्षणासाठीं सरकारनें ७३ कोटी रुपये खर्च केले आहेत. १८७९ च्या पूर्वी व १८९५ नंतर खर्च झाला तो वेगळाच. याशिवाय हिंदुस्थानचे

तिजोरींतील पैशानें केलेलीं ब्रह्मदेश, चीन, आफ्रिका वगैरे ठिकाणचीं युद्धें आहेतच. या सर्व उधळेपणाचा परिणाम असा झाला कीं, त्या सर्व काळांत प्रजेवर करांचा असह्य बोजा असतांनाहि १८६१ सालीं १०० कोटी, १८६९ सालीं १४० कोटी, १८९६ मध्यें २७३ कोटी याप्रमाणें कर्ज वाढत गेलें. महायुद्धाचे काळांत तर लष्करी खर्चास ताळच राहिला नव्हता व शिवाय हिंदुस्थाननें साम्राज्यासाठीं १५० कोटींची देणगी दिली ती वेगळीच. त्यामुळें १९१६ सालीं कर्ज ४२७ कोटी रुपये होतें तें १९१८ सालीं ८८१ कोटी रुपये झालें. पुढें शांतता झाली व नव्या सुधारणेच्या कायद्यामुळें १९२१ पासून लोकप्रतिनिधींना कायदेकौंसिलांत जास्त हक्क मिळाले. परंतु सरकारचा वाढता कर्जबाजारीपणा मात्र थांबला नाहीं. १९२४ पासून पांच वर्षांत कर्जाची रक्कम अनुक्रमें ९१०, ९७९, ९९६, १००६, १०२६, ११०५ याप्रमाणें होती ! ( १४-१-३० ).

हा सरकारच्या वाढत्या कर्जबाजारीपणाचा इतिहास आहे. या कर्जाच्या फेडीच्या व त्याचे व्याजाच्या ओझ्यामुळें सध्यां सरकारजवळ शिक्षण, आरोग्य, शेती, असल्या राष्ट्रसंवर्धक खात्यांवर खर्च करण्यास पैसा शिल्लक नाहीं. या सर्व परिस्थितीकडे केसरीनें जनतेचें अनेकवार लक्ष वेधलेंच आहे. पण त्याच बरोबर कर्जउभारणीच्या कामींहि होत असलेला अन्याय वेशीवर बांधला आहे. प्रजेच्या फायद्याकडे लक्ष देऊन कर्ज उभारावयाचें असेल तर तें देशांतल्या देशांत शक्य तों उभें केलें पाहिजे, मग त्यासाठीं जास्त व्याज द्यावें लागलें तरी हरकत नाहीं. कारण केसरीनें म्हटल्याप्रमाणें परकीय सावकाराची एकदां तिजोरीस मिठी बसली कीं, ती मगरमिठीच बनते व शेवटीं स्वातंत्र्यहरण केल्याशिवाय रहात नाहीं. ( २८-५-२९ ). याला इजिप्त, सूडान हीं उदाहरणें आहेतच. परंतु आमचें सरकार मात्र आपलें सर्व कर्ज इंग्लंडमध्यें जबर व्याज भरून उभारतें. १९१२ सालीं टाइम्समध्यें एका गृहस्थानें पत्र लिहून हिंदुस्थानांत पुरेसें कर्ज मिळणार नाहीं असें प्रतिपादन केलें होतें. त्याला केसरीनें त्याच वेळीं सप्रमाण उत्तर देऊन त्याचें म्हणणें खोडूनहि काढलें होतें, ( ३०-१-१२ ), व १९२४ पासून ५ वर्षांत प्रजेनें सरकारास १०८ कोटी रुपये कर्ज दिलें आहे, तरी अद्याप सरकार विलायतेंत कर्ज काढतेंच, यांतील अन्याय केसरीनें जनतेस चांगला उघड करून दाखविला आहे. ही उधळेगिरी फक्त मध्यवर्ती सरकारचे खर्चांतच चालते असें नाहीं तर प्रत्येक प्रांतांतूनहि हाच प्रकार आहे. मुंबई सरकार तर या बाबतींत फारच प्रसिद्ध आहे. केसरीनें मुंबई सरकारच्या १९२८च्या बजेटावर टीका करतांना म्हटल्याप्रमाणें 'जुगारीची धुंदी डोळ्यांवर चढलेल्या द्यूतकाराप्रमाणें 'मुंबई सरकारची स्थिति आहे. त्यांनीं बॅकबे स्कीम व सक्करचें धरण हे दोन पांढरे 'हत्ती पाळल्यामुळें १४ कोटी उत्पन्नांतून ६ कोट रुपये केवळ कर्जफेड व व्याज- 'भरपाई यांवरच खर्च होत आहेत. असल्या हानिकारक योजना हातीं घेऊन 'सरकार बेहोषपणें नाचत आहे याचें आश्चर्य वाटतें !'

८. **काटकसरीची रीत** :—अशा तऱ्हेनें सरकारच्या बेजबाबदार उधळेगिरीवर केसरीनें अनेक वेळां टीका केली व जनतेस आपल्या वाढत्या दारिद्र्याची जाणीव करून दिली. त्यामुळें प्रजेनें पुष्कळ ओरड केली असतां सरकार मधून मधून काटकसर करण्याचा आव आणीत असे, पण सरकारची काटकसर कशी व्यर्थ आहे हेंहि केसरीनें वेळोवेळीं दाखवून दिलें आहे. केसरीनें जनतेस असें दाखवून दिलें कीं, सरकारनें काटकसर करणें सुरू केलेंच तर लहान लहान पगारांच्या जागा काढून टाकतात. ५।७ शें रुपये पगारांचे जागांस मात्र हात लावीत नाहींत. यामुळें सरकारी काम तर नीट होत नाहींच व बचतहि होत नाहीं. ( ३०-३-१५ ). महायुद्धाचे वेळींहि सरकारास जरूर होती म्हणून सरकारनें काटकसर केली, पण कशांत ? ' सिव्हिल सर्व्हिस, पोलिटिकल सर्व्हिस, पोलिस यांत नव्हे, तर शिक्षण, पब्लिक वर्क्स, ' सॅनिटेशन, असल्या गरीब खात्यांत ! पोस्टाच्या पार्सलचे दर वाढवले, रेल्वेचे दर ' वाढवले, तारेचे दर दुप्पट केले, अबकारी खात्यांत लिलांवाची निंद्य पद्धत सुरू ' करून फावड्यानें पैसा काढण्यांत आला. ' (३-१२-१८). म्हणून केसरीनें सरकारास सल्ला दिला होता कीं, 'काटकसर करतांना लोकमताचा विचार करा, त्यांच्यामधील ' तज्ज्ञांचा सल्ला घ्या, व जेणें करून कामाचा चोखपणा बिघडणार नाहीं असें करा!' परंतु सरकारनें १९२२।२३ सालीं नेमलेली काटकसर-कमेटी आपलें पूर्वीचें धोरण कायम ठेऊनच नेमली. या कमेटीवर टीका करतांना केसरी म्हणतो, ' सरकारनें काटकसर- ' कमेटी नेमली खरी, पण त्यांत सभासद मात्र इंचकेप, केटो, मरे, वगैरे प्रसिद्ध ' इंग्लिश व्यापारी घेतले. त्यांचा अभिप्राय हिंदुस्थानास फायदेशीर पडणें म्हणजे ' वळचणीचें पाणी आढ्यावर जाणें आहे.' या कमेटीबद्दल केसरीकारांचें थोडक्यांत मत असें होतें कीं, ' ' रिट्रेंचमेंट-कमिटी ' हें तोंडभर नांव धारण करणारे कांहीं ' स्वार्थसाधु व कांहीं सरकारचे पित्ते यांचा हा मेळा एकत्र जमल्यावर काटकसरीस ' काय तोटा ? ' व हें केसरीचें मत खरें ठरल्याचें प्रसंगानें पुढें दिसून आलेंच.

ही सर्व टीका करून केसरीला जनतेस हें शिकवावयाचें होतें कीं, हिंदुस्थानाचे आर्थिक संबंध परकी सरकारचे हातीं ठेवणें म्हणजे चोराच्या हातीं खजिन्याच्या किल्ल्या देण्यासारखें आहे. अंथरूण पाहून पाय पसरावे हा सामान्य व्यवहाराचा नियम दुसऱ्याचे पैसे हातीं असले कीं, मनुष्य विसरून जातो. ( ५-७-१० ). **' अनाथ अज्ञानाची इस्टेट सांपडली व विचारणारा कोणी नाहीं म्हटलें कीं, ' लागतील तशीं अवदानें सोडावींत अशी जनरूढीच आहे. '** (२-८-९२). या परिस्थितीवर उत्तम उपाय केसरीनें सुचवला तो असा कीं, आर्थिक ताबा सर्वस्वीं आपल्या हातीं आला पाहिजे. त्याचा विचार वर केलाच आहे.

---

# चलन आणि हुंडणावळ

[ प्रो. रा. त्रि. ओतूरकर, एम्. ए. ]

" गोऱ्या लोकांचें नुकसान होऊं लागलें म्हणून त्यांनीं चळवळ सुरू केली, अर्जावर अर्ज धाडले व खुद्द पार्लमेंटापर्यंत दाद लावली. शेवटीं स्टेट सेक्रेटरीला ह्या प्रश्नाचा विचार करणें भाग पडून एक कमिटी नेमली. पण आम्ही आपले स्वस्थ ते स्वस्थच. नाणें आणि हुंडणावळ हें काय गौडबंगाल आहे म्हणून तोंडांत बोट घालून मजा पहात बसलों आहोंत. "

—केसरी (२९-११-९२ ).

चलनाचा प्रश्न इ. स. १८९२ सालीं लोकांचें विशेष रीतीनें लक्ष वेधूं लागला. इ. स. १८९२ सालापर्यंत हिंदुस्थानांत रौप्यचलन चालू असे. टांकसाळी लोकांस खुल्या असत. लोकांस चांदी देऊन भारंभार मोबदला रुपये पाडून घेतां येत असत. परंतु इ. स. १८७१ पासून चांदीचा भाव उतरण्यास सुरुवात झाली. जसजसा चांदीचा भाव उतरे तसतशी हिंदुस्थानांतून विलायतेस स्टेट सेक्रेटरीच्या खर्चास पाठवावयाच्या रकमेची भरपाई करण्यासाठीं अधिकाधिक रकम द्यावी लागे. यामुळें अंदाजपत्रकाची तोंडमिळविणी करितां येईना. इ. स. १८७० ते १८९२ पर्यंत चांदीचा भाव दर औंसास ६१ पेन्सांपासून ३९$\frac{3}{4}$ पेन्सांपर्यंत उतरला. (पालग्रेव्हचा अर्थशास्त्रीय कोश, भा. ३ रा, पृ. १८३, पहा ). त्याबरोबर रुपयाचा भाव २४ पेन्सांपासून १४ पेन्सांपर्यंत खालीं आला. इ. स. १८७०-९२ च्या ह्या चांदीच्या घसरगुंडीच्या काळांत चांदीच्या कैवाऱ्यांनीं व फ्रान्स, बेल्जम वगैरे राष्ट्रांनीं आंतरराष्ट्रीय सभा बोलावून चांदीचा भाव स्थिर करण्याचा यत्न केला, परंतु तो इंग्लंडच्या विरोधामुळें यशस्वी झाला नाहीं. इकडे दिवसेंदिवस चांदीच्या भावांतील उतारामुळें सरकार टेंकीस आलें व येथील गोरे सनदी नोकर ओरड करूं लागले. कारण त्यांना विलायतेस पाठवावयाच्या रकमांत तूट येऊं लागली. दर रुपयास २४ पेन्स हा भाव असतांना रुपयाच्या मोबदला जितके पौंड मिळतील तितके दर रुपयास भाव १४ पेन्स असतांना मिळणार नाहींत हें उघड आहे. तेव्हां कांहीं अंशीं स्वतःची अडचण भागविण्यासाठीं व कांहीं अंशीं गोऱ्या सनदी अधिकाऱ्यांची मागणी पुरविण्यासाठीं सरकारनें या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं हर्शेल यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. तिनें चांदीची टांकसाळ लोकांस खुली ठेवूं नये, नवे रुपये पाडणें हें सरकारनें तूर्त बंद ठेवावें, नवे रुपये न पाडले म्हणजे देशांतील देवघेवीच्या व्यवहारास जुने रुपये कमी पडतील व त्यांची किंमत चढत जाईल, अशा शिफारसी केल्या. त्या शिफारसी सरकानें अंमलांत आणल्या. त्याबरोबर रुपयाचा भाव १४ पेन्सांवर प्रथम स्थिर झाला व पुढें चढत चढत वर जाऊं लागला. त्यामुळें गोऱ्या सनदी नोकरांचें

नुकसान होणें बंद झालें व सरकारास आपल्या बजेटाची तोंडमिळवणी करणें शक्य झालें. पण त्याच्या उलट चांदीच्या नाण्याची टांकसाळ सरकारनें लोकांस एकदम बंद केल्यामुळें लोकांना आपल्या जवळच्या चांदीचे नगदी रुपये करून घेणें अशक्य झालें व ज्या प्रमाणांत रुपयाची किंमत कृत्रिम रीतीनें चढली त्याच प्रमाणांत लोकांजवळच्या शिलकी चांदीच्या किंमती उतरल्या. शेतकऱ्यांसहि रुपयाची किंमत चढल्यानें मालाचे पूर्वीइतके रुपये मिळेनात. परंतु त्यांच्यावरील सरकारच्या साऱ्याचा व सावकाराच्या देण्याचा बोजा मात्र पूर्वीइतकाच कायम राहिला. अशा रीतीनें सरकारनें सरळ अधिक कर बसविण्याचा अप्रिय मार्ग पतकरण्यापेक्षां सामान्य लोकांस कळणार नाहीं अशा पद्धतीनें रयतेवरील कराचा बोजा वाढवून आपलें कार्य साधून घेतलें !

सरकारनें हा आडवळणाचा मार्ग पतकरण्याबरोबर त्याचें स्वरूप केसरीकारांनीं उघडकीस आणण्यास सुरुवात केली. प्रथम त्यांनीं हा विषय वाचकांसपरिचित करून द्यावा म्हणून ' सोन्यारुप्याचें नाणें ' या विषयावर इ. १८९२ सालीं ता. ३०-८ पासून ४-९ पर्यंत पांच लेख लिहिले. केसरीकारांनीं या पांच लेखांपैकीं पहिल्या तीन लेखांतून ' नाणें म्हणजे काय, नाणें व धातु यांच्या मधील परस्पर संबंध कोणता, ' एक धातूचें नाणें झालें असतां काय होईल आणि दोन धातूंचीं नाणीं झालीं ' असतां काय होईल व नाण्याच्या कमजास्त पुरवठ्यानें पदार्थमात्राच्या किंमतीवर ' कसे फेरफार होतात याबद्दल जरूरीपुरती माहिती ' दिलेली आहे. चवथ्या लेखांत चांदीच्या भावांत उतार झाल्यानें त्याचा हिंदुस्थानच्या चलनव्यवस्थेवर काय परिणाम झाला, कोणाकोणाचा फायदा किंवा तोटा झाला तें सांगितलेलें आहे. पांचव्या लेखांकांत चलनविषयाच्या चर्चेचे दोन भाग केले आहेत. एक तात्त्विक भाग म्हणजे सोनें व चांदी यांचा परस्पर संबंध कसा स्थिर होईल हा प्रश्न व हिंदुस्थानानें चांदीच्या घसरगुंडींतून मार्ग कसा काढावा हा दुसरा प्रश्न. पहिल्या प्रश्नावर ' आमच्या मतें या प्रश्नाचा शास्त्रोक्त निकाल लागण्यास निरनिराळ्या राष्ट्रांनीं एकत्र ' जमूनच सोनें आणि रुपें यांचे परस्पर भाव कायम केले पाहिजेत, ' असें सांगून दुसऱ्या प्रश्नाला ' उत्तर एवढेंच कीं, होतां होईल तितकें करून पुढील सर्व व्यवहार ' व करार रुप्याच्या नाण्यांत करावे व साधेल तितकें करून परदेशांशीं होईल तितका ' कमीच संबंध आणावा. युरोपियन लोकांचीं पेन्शनें पौंडांत देण्याचा हिंदुस्थान ' सरकार हल्लीं करार करतें पण तो इतउत्तर बंद केला पाहिजे. सरकारास लागणारा ' माल मिळेल तेवढा हिंदुस्थानांतच खरेदी करावा आणि नवें कर्ज लागल्यास तेंहि ' हिंदुस्थानांत काढावें. ' (४-१०-९२).

त्याच सालच्या नोव्हेंबर महिन्यांत कॉंग्रेसचें त्या विषयाकडे लक्ष वेधण्यासाठीं पुनः केसरीनें ' सोन्यारुप्याची लढाई ' या विषयावर अग्रलेख लिहिला व त्यांत चलन दुर्मिळ करून, देशांतील देवघेवीच्या व्यवहाराची उपासमार करून पदार्थांच्या

किंमती कृत्रिम रीतीनें उतरवून हुंडणावळीच्या प्रश्नाचा बंदोबस्त करणें किती घातक आहे हें दर्शविलें आहे. ह्यांत ग्रथित केलेलीं तत्त्वें, विशेषतः सोन्याच्या नाण्याविरुद्ध आग्रह, आज पुष्कळांस वादग्रस्त वाटतील यांत शंका नाहीं.

ता. ४ जुलै, १८९३, च्या लेखांत हर्शेल कामिटीच्या शिफारसीवर केसरीनें केलेली टीका झणझणीत आहे. ' देशांत रुपयांची टंचाई, शेतकऱ्यांची बूड, चीनच्या ' व्यापारावर गदा, लोकांनीं सांठविलेल्या सोन्यारुप्यांची किंमत एकदम कमी होणें, ' संस्थानिकांचें नुकसान, खोटें नाणें होण्याचा संभव, असे या कायद्यापासून अनेक ' अनर्थ होणार आहेत, ' ( कित्ता ), असा केसरीच्या प्रतिपादनाचा निष्कर्ष आहे. देशांत सोन्याचें नाणें सुरु न करतां पौंड व रुपये यांचा दर कायम करावा ही कमिटीची सूचना टिळकांनीं **' सोन्याचें नाणें न वापरतां सोन्याचा दर तेवढा वापरावा '** अशा सुटसुटीत व सुंदर मराठी वाक्यांत व्यक्त केली आहे; आजच्या काळांत **Gold Standard, Gold Exchange Standard, Gold Bullion Standard** ह्या कल्पना व्यक्त करण्यास असल्या शब्दयोजनेची मदत होऊं शकेल.

हर्शेल कमिटीच्या शिफारसीप्रमाणें सरकारनें नवे रुपये पाडण्याचें बंद केलें. परतु असे रुपये न पाडून किती दिवस भागणार? हा प्रश्न सरकारापुढें होताच. हुंडणावळीचा भाव चढूं लागल्यावरोबर तो कोठें स्थिर करावा व पुढें चलनासंबंधीं कोणतें धोरण स्वीकारावें या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं सरकारनें इ. स. १८९८ सालीं फाउलर कमिटी नेमली. त्या वेळीं पुनः केसरींत या विषयावर लेखांवर लेख येऊं लागले. त्यांतील खालील उताऱ्यावरून केसरीचें मत व्यक्त होतें. टांकसाळी बंद करून रुपयाची कृत्रिम किंमत टरविल्यामुळें मुख्यत्वें करून ' दोन प्रकारच्या ' लोकांचें फार नुकसान झालें आहे. एक धान्य वगैरे कच्चा माल उत्पन्न करणारा ' शेतकरीवर्ग व दुसरे व्यापारी. शेतकऱ्यांचें दोन तऱ्हांनीं नुकसान झालें आहे. रुपयाची ' किंमत वाढल्यामुळें मालाची किंमत उतरून त्यांचा तितका नफा बुडाला हें एक ' व दुसरें, हिंदुस्थानांतील गरीबगुरीब लोकांमध्यें द्रव्यसंचय बहुधा रुप्याचे दागिन्यांच्या ' रूपानेंच होत असल्यामुळें नुसत्या रुप्याचा भाव उतरल्याबरोबर सर्व सांठविलेल्या ' रुप्याची किंमत खाडदिशीं कमी झाली.......व्यापारी लोकांचें जें नुकसान झालें ' तें पुरेशा नाण्याच्या अभावामुळें. सरकारनें टांकसाळी बंद करून रुपये पाडण्याचें ' बंद केल्यामुळें चलनांत आलेल्या नाण्यांतच व्यापारी लोकांना आपल्या सर्व गरजा ' भागविणें जरूर पडलें आहे....कमिटीला ( Fowler Committee ) खरी ' वस्तुस्थिति समजून घ्यावयाची असेल तर तिनें येथें येऊन नेटिव्ह लोकांच्या ' पुढाऱ्यांचें मत घेतलें पाहिजे....नाहींतर आजपर्यंत झालेल्या हजारों कमिट्यांप्रमाणें ' हीहि कालाचा व द्रव्याचा अपव्यय करून निजधामास जाईल. ' ( ३-५-९८ ).

फाउलर कमिटीनें हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें पौंड हें सुरू करावें व त्यासाठीं येथें सोन्याच्या नाण्याची टांकसाळ उघडावी व ती लोकांस खुली असावी, पण

रुप्याची टांकसाळ मात्र लोकांना बंदच ठेवावी, सरकारनें हवे तेव्हां जरूरीप्रमाणें रुपये पाडून घ्यावे, वगैरे शिफारसी केल्या. त्या वेळीं लिंडसे यांनीं कमिटीलाच हिंदुस्थानांत सुवर्ण चलन चालू न करतां 'सोन्याच्या नाण्यांचा दर' ( Gold Exchange Standard ) चालू करावा अशी सूचना केली होती. परंतु ती कमिटीनें मान्य केली नाहीं व सुवर्णचलनाचा पुरस्कार केला. परंतु कमिटीनें रुपये पाडण्याची सत्ता सरकारच्या हातीं ठेवल्यामुळें ते पाडण्यांत सरकारास नफा होत असल्यामुळें सरकारनें इतके झपाट्यानें रुपये पाडले कीं, बाजारांत कधीं टंचाई पडली नाहीं व सोन्याचें नाणें मागण्याचा लोकांना फारसा प्रसंगहि आला नाहीं. तितक्यांतून ब्रिटिश प्रधान मंडळाच्या मत्सरामुळें हिंदुस्थानांत सोन्याची टांकसाळ स्थापन होऊं न शकल्यामुळें सुवर्णचलनाचा प्रश्न पुरताच मागें पडून कमिटीनें नापसंत केलेली लिंडसे यांची योजना न कळत हिंदुस्थानच्या गळ्यांत पडली.

इ. स. १८९८ ते १९१६ पर्यंत सरकार नाणें पाडून त्याचा देशास भरपूर पुरवठा करीत होतें. यामुळें देशांत चलनी नाणें फार झालें व महागाई होऊं लागली. इ. स. १८९२-१९१४ या काळांत इंग्लंडमध्यें पदार्थांच्या किंमतींत फक्त २४ टक्क्यांनीं वाढ झाली. तेवढ्याच काळांत हिंदुस्थानांत ५६ टक्क्यांनीं किंमती चढल्या. याचें मुख्य कारण नाण्यांची बेसुमार वाढ होय. जशा पदार्थांच्या किंमती चढत गेल्या तशी रुपयाची किंमत उतरत गेली हें उघड आहे. यामुळें इ. स. १९०७ सालीं रुपयास १६ पेन्स हा भाव टिकवून धरणें कठीण झालें. तेव्हां सरकारास कांहीं काळ परतीच्या हुंड्या ( Reverse Councils ) विकून हुंडणावळीचा भाव टिकवून धरावा लागला. याच्या थोडेंसें पूर्वी म्हणजे १९०७ च्या जून महिन्यांत मॅके कमिटीच्या शिफारसीस अनुसरून स्टेट सेक्रेटरीनें चलनी नाण्यावरील नफ्याच्या गंगाजळींतून दीडदोन कोटी रुपये उचलले व रेल्वेच्या वाढीसाठीं खर्च केले. ही गोष्ट त्या वेळीं खुद्द हिंदुस्थान सरकारलाहि पसंत पडली नाहीं. ह्या प्रश्नावर 'नाण्याचा नफा व कायदेशीर लूट,' ( १-१०-०७ ), असा अग्रलेख केसरीनें लिहून कडक टीका केली व हिंदुस्थानच्या मालकीचें सोनें विलायतेंत ठेवण्याच्या पद्धतीचा निषेध केला.

इ. स. १९१४ सालीं चेंबर्लेन कमिशननें चलन-हुंडणावळीच्या प्रश्नावर पुनः विचार करून अनेक प्रश्नांची विल्हेवाट लावली. इ. स. १९१२ सालापासून सर विठ्ठलदास ठाकरसी हे हिंदुस्थानांत 'मोहोर' नांवाचें सोन्याचें नाणें सुरू करावें व येथें त्याची एक टांकसाळ उघडावी अशी मागणी मागत होते. या मागणीस कमिशननें अत्यंत गुळमुळीत रुकार दिला व हिंदुस्थान सरकारची इ. स. १८९८ पासून चालू असलेली चलनाची व्यवस्था एकंदरीनें ठीक आहे अभिप्राय दिला. ह्या कमिशनच्या शिफारसीवर टीका करितांना मात्र केसरीनें बरीच स्पष्टोक्ति दाखविलेली आहे. सोन्याच्या नाण्याच्या आवश्यकतेसंबंधीं या वेळीं कांहीं शंका नसल्यामुळें 'हिंदी ' लोकांना सोन्याचें नाणें नको आहे, हा अद्‌भुत शोध कमिशनर्सना कोठें लागला

' ईश्वर जाणे ! ' ( २८-४-१४ ), अशीं सोन्याच्या नाण्यास अनुकूल वाक्यें केसरींत सांपडतात. कमिशनच्या रिपोर्टावरील केसरीच्या टीकेचा मासला पहा:—

' आतां अखेरीस मुख्य प्रश्न हा राहिला कीं, ह्या कमिशनच्या असल्या रिपोर्टाचा ' परिणाम काय होणार ह्याचा विचार करूं लागलों म्हणजे मात्र रिपोर्टवाचनानें ' प्राप्त झालेली उद्विग्नता नाहींशी होते; आणि कमिशनर्सनीं असले विचित्र अभि- ' प्राय दिले, याबद्दल त्यांचे आभारच मानण्याची स्फूर्ति होते. कारण ते अभिप्रायच ' इतके विपर्यस्त व अव्यवहार्य आहेत कीं, ते ह्या रिपोर्टाच्या मलपृष्ठाच्या आंतच ' सदोदित दडून राहतील ! कमिशनमध्यें हिंदुस्थानांतले प्रसिद्ध अनुभवी पेढीवाले ' सर जेम्स बेग्बी यांनीं सोन्याचें नाणें सुरू करणें, गंगाजळी ठेव व चलनी नोटांच्या ' तारणाची ठेव ह्या विलायतेंत नेणें, सर्व प्रकारच्या शिलका एकत्र करणें आणि ' विलायतेस त्या कर्जाऊ देणें या सर्व बाबतींतच कमिशनच्याविरुद्ध अभिप्राय ' दिल्यानें कमिशनच्या शब्दांचें अर्धें महत्त्व नाहींसें झालें आहे. ' ( २८-४-१४ ).

नंतर लवकरच-महायुद्ध सुरू झालें व हिंदुस्थानास साम्राज्य-सरकारच्या मदतीसाठीं येथून माल तयार करून पुरविणें जरूर पडलें. त्यासाठीं नेहमींपेक्षां अधिक चलनाचा पुरवठा लागूं लागला. तथापि त्यानें चलनव्यवस्थेवर मोठेंसें संकट आलें नाहीं. परंतु इ. स. १९१७ सालापासून चांदीचा भाव वाढण्यास सुरुवात झाली. पूर्वी चांदीचा भाव साधारणतः २४ पेन्सांस १ औंस असे तो चढत चढत १९२० सालीं ६१ पेन्सांपर्यंत गेला व त्याच सालच्या फेब्रुवारींत तो ८९ पेन्सांपर्यंत चढला ! चांदीचा भाव ४३ पेन्सांस औंस झाला कीं, हिंदुस्थानांतील रुपयाची चांदी १६ आणे किंमतीची होते व चांदीचा भाव त्याच्याहि वर गेल्यास रुपया हें नाणें, नाणें म्हणून वापरण्यापेक्षां आटवून चांदी म्हणून वापरणें अधिक फायदेशीर होतें. अशी स्थिति इ. स. १९१९ व १९२० सालीं होती. त्यांतून सुटण्याच्या उपायांचा विचार करण्यासाठीं सरकारनें इ. स. १९२० सालीं स्मिथ-कमिटी नेमली. तिनें रिपोर्ट केला कीं, ' हिंदुस्थान सरकारनें रुपयाचा भाव १६ पेन्सांवरून ' २४ पेन्सांवर न्यावा व रुपयाचा संबंध पौंड या इंग्लिश नाण्याशीं न ठेवतां ' सोन्याच्या वजनाशीं ठेवावा.' हा अभिप्राय केसरीनें **'सोनें तोळा, रुपये सोळा '** असें उखाण्यासारखें अग्रलेखाचें नांव देऊन व्यक्त केला. ( १०-२-२० ).

ह्या रिपोर्टानें मोठमोठ्या विचारी लोकांचीहि जी फसगत झाली तिला बहुधा दुसरी तोड दाखवितां येणार नाहीं. कमिशनच्या निकालाचें बहुतेकांनीं समर्थन केलें. वर उल्लेखिलेल्या अग्रलेखांत केसरीनेंहि ' करन्सी-कमिटीनें आपलें मत बरेंच ' विचारपूर्वक दिलें आहे आणि कमिटीच्या सूचना अंमलांत आणल्यापासून एकं- ' दरींत हुंडणावळीच्या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागेल असें वाटतें...... ' हुंडणावळीच्या भावाची चलबीचल बंद होऊन तो कसा स्थिरावेल आणि हा लंबक कोणत्या बिंदूवर स्थिर होऊं शकेल एवढाच कमिटीपुढें मुख्य प्रश्न होता

' व त्यास कमिटीनें जें उत्तर दिलें तें यथायोग्य आहे ' अशी ग्वाही दिली. परंतु या कमिटीच्या रिपोर्टाची व त्यावरील अभिप्रायाची शाई वाळते न वाळते तोंच हुंडणावळीचा भाव २४ पेन्सांवर टिकून राहीना व तो टिकवून धरण्यासाठीं सरकारास परत-हुंड्या विकणें भाग पडलें. थोडक्याच काळांत सरकारनें ५५ कोट रुपयांच्या परत-हुंड्या विकून हिंदुस्थानच्या तिजोरींतील सोन्याचा फन्ना उडविला. ह्या प्रकाराविरुद्ध अर्थातच केसरीनें ' गंगाजळीची लूट, ' ( २४-२-२० ), व ' ही लूट थांबणार कशी ? ' ( २३-३-२० ), हे लेख लिहून ओरड केली. परंतु त्या वेळीं चलन व हुंडणावळ यांच्या व्यवहारांत इतकी झटपट हालचाल चालू होती कीं जनतेस केसरीचे लेख नीट कळूं शकले नसल्यास आश्चर्य नाहीं. हा अनर्थ ओढवण्याचें मुख्य कारण कमिटीनें चांदीच्या वाढत्या भावाचा व रुपयाच्या किंमतीचा नसता बादरायणसंबंध जोडला हें होय. चांदीचा भाव वाढल्याबरोबर रुपयाची हुंडणावळ बदलणें म्हणजे रोग नसेल त्या ठिकाणीं औषधोपचार सुरू करणें होय. आतां चांदीचा भाव वाढल्यामुळें रुपये आटविले जाण्याची भीति होती हें खरें; परंतु त्याला सरळ उपाय म्हणजे रुपयांतील चांदीचा अंश कमी करणें किंवा दुसरेंच दोन रुपये किंमतीचें चांदीचा कमी अंश असलेलें नाणें सुरू करणें जरूर होतें व हेंच कमिटींतील एक हिंदी सभासद दादिबा दलाल यांनीं सुचविलें होतें. परंतु त्यांचें म्हणणें लोकांनीं व सरकारनें त्या वेळीं सारखेंच विचारांत घेतलें नाहीं.

इकडे ५५ कोटी रुपयांच्या सोन्याची खैरात करून हुंडणावळीचा भाव स्थिर होत नाहीं, असें पाहून सरकार हात जोडून स्वस्थ बसलें व आम्हांस या बाबतींत तूर्त कांहींच करतां येत नाहीं, आमचें तूर्त तरी ठराविक असें कांहींच धोरण नाहीं, अशी सरकारनें स्वच्छ कबुली दिली. परंतु सरकारला आपल्या इभ्रतीची इतकी ऐट वाटत होती कीं, सरकारला २४ पेन्सांचा दर उचलून धरतां न आला तरी त्यांनीं तोच दर आपल्या कागदोपत्रीं कायम ठेवला. खुद्द स्टेट सेक्रेटरी आपल्या हुंड्या विलायतच्या व्यापाऱ्यांवर विकीत असे, तो दर या दराहून अर्थातच भिन्न होता. परंतु सरकारचा ठराविक दर नसल्यानें स्टेट सेक्रेटरी कधीं कधीं बाजारभावानें हुंड्या विकावयास न काढतां बाजाराची कुचंबणूक करी. हा दोष हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांनीं सरकारच्या नजरेस आणला होता. परंतु सरकारनें तिकडे दुर्लक्ष केलें. इ. स. १९२० सालापासून अंदाजपत्रकांत तूट येत होती, ती भरून काढण्यासाठीं सरकारनें इ. स. १८९३ सालाप्रमाणें बाजारांत चलनाची तंगी करून हुंडणावळीचा भाव चढवावयाचा व त्यायोगानें होम-चार्जेससाठीं लागणाऱ्या रकमेंत बचत करावयाची व अंदाजपत्रकाची तोंडमिळवणी साधावयाची हा उद्देश सरकारचे त्या वेळचे दीर्घदृष्टी फडणीस सर बेसिल ब्लॅकेट यांनीं इ. स. १९२४ पासून मनांत योजून ठेविला होता. इ. स. १९२६ सालीं हिल्टनयंग कमिशननें चलनी नाण्याच्या प्रश्नाची चौकशी करून हुंडणावळीचा भाव जुना

१६ पेन्स न ठेवितां तो १८ पेन्स ठेवावा असा सरकारास अनुकूल निकाल दिला. कमिशनपैकीं एकट्या सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं मात्र त्यास करून विरोध करून १६ पेन्सांची तरफदारी केली. त्या वेळीं देशांत चलनी नाण्याच्या प्रश्नाबद्दल जागृति केल्याचें बरेंच श्रेय करन्सी लीगला आहे. केसरीनें ह्या करन्सी लीगची शाखा आपल्या कचेरींत उघडून त्या द्वारें महाराष्ट्रांत सर्वत्र व्याख्यानांची झोड उठविली व केसरीकारांनीं केसरींत एकाहून एक जोरदार मुद्देसूद लेख लिहिले.

सर बेसिल ब्लॅकेट यांनीं १८ पेन्सांचा दर प्रचलित करणारें व सुवर्णखंडमूल्य-चलन ( Gold Bullion Standard ) स्थापन करणारें बिल असेंब्लीपुढें आणलें, तेव्हां केसरीनं 'बेसिल-कन्येचें रूप व शील' हा सुंदर लेख ता. २५-१-२७ रोजीं लिहून त्याच्या स्वरूपाचें आविष्करण केलें आहे. सुरुवातीसच 'सुवर्णालंकृता कन्या हेमालंकारवर्जिता । सा कन्या विधवा जाता गृहे रोदिति तत्पतिः ॥' असें सूचक कूट-सुभाषित दिलें आहे. या सुभाषिताचा अर्थ 'सोन्याचा एकहि दागिना अंगावर नसलेली गोरीगोमटी मुलगी दुसऱ्याच नवऱ्यामागें चालती झाली म्हणून तिचा नवरा घरीं रडत आहे,' असा आहे. ब्लॅकेट यांच्या बिलानें हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू होणार नव्हतें, पांढरा रुपया तेवढा चालू रहाणार होता. ही सर्व व्यवस्था इंग्लंडला हिंदुस्थानच्या मालकीचें आपल्याजवळ ठेवलेलें सोनें द्यावें लागूं नये म्हणून झाली. पण ती हिंदुस्थानच्या हिताची नसल्यानें हिंदुस्थानचे लोक हळहळत आहेत. त्याच लेखांत, पानें कां सडलीं ? भाकरी कां करपली ? व घोडा कां अडला ? ह्या तीन प्रश्नांस जसें, 'न फिरविल्यानें' असें एकच उत्तर आहे तसें, सुवर्णाची आयात कां खुंटली ? संरक्षक जकात १२। टक्क्यांनीं कां कमी झाली ? व बजेटाची कां तोंडमिळवणी झाली ? ह्या तिन्ही प्रश्नांस '१८ पेन्सांच्या दरानें' असें एकच उत्तर दिलें आहे. ब्लॅकेटसाहेबांनीं बजेटाची तोंडमिळवणी केल्याची बढाई मारली असतां, केसरीनें ता. १५ मार्च, १९२७ च्या लेखांत पुढील समर्पक दृष्टान्त देऊन ब्लॅकेट यांची हातचलाखी स्पष्ट केली आहे. 'एकाद्या गृहिणीनें मुलांच्या खाऊ-'करितां म्हणून यजमानाकडून एक पैसाहि न घेतल्याची बढाई मारावी आणि 'इकडे घरांतलें धान्य देऊन खवा खरेदी करून मुलांस द्यावा असल्या चोरट्या 'व्यवहारांत जसें नुकसान होतें तसेंच या १८ पेन्सांनीं हिंदी रयतेचें होत आहे.' असो. असे पुष्कळ उतारे देतां येतील. परंतु वर केलेलें विहंगमावलोकन केसरीची चलन व हुंडणावळ या विषयांसंबंधीं कामगिरी स्पष्ट करण्यास पुरेसें आहे. त्यावरून चलनासारख्या अवघड विषयावरहि केसरीनं शास्त्रशुद्ध व सुलभ, निर्भीड व मुद्देसूद लेख मनावर ठसा उमटण्याजोग्या उपमादृष्टान्तांनीं सजवून ते वाचकांना कसे पुरविले व त्यायोगानें लोकमत तयार करण्यास केवढी मदत झाली याची सहज कल्पना येईल.

---

# मद्यपाननिषेध

[ श्री. शिवराम लक्ष्मण करंदीकर एम्. ए., एल्एल्. बी. ]

'इंग्रज गेले तरी त्यांचे पाय हिंदुस्थानला एकदां लागले होते ह्याची जबर साक्ष ही एकटी दारू देईल.'—गोपाळराव हरी देशमूख ऊर्फ लोकहितवादी. (के. १-१२-०८).

'मद्यपाननिषेधाचे बाबतींत ख्रिस्ती राज्यकर्तें व हिंदी प्रजा ह्यांचें एकमत कधींहि होण्याची आशा नाहीं.' (के. १६-३-०९).

'आम्ही बायबल व बाटली घेऊन सर्वत्र जातों; पण लोक आमचें बायबल न घेतां बाटली मात्र घेतात.' एका मिशनऱ्याचे उद्गार. (के. ९-५-११).

ब्रिटिश राज्य म्हणजे रामराज्य असें म्हणण्याचा मनू पालटल्यानंतर, ब्रिटिश—राजसत्तारूपी मार्जारीनें आपल्या रेशमासारख्या मऊ पंजांत दडवून ठेविलेलीं तीक्ष्ण नखें क्रमाक्रमानें दिसूं लागल्यानंतर, उदयोन्मुख महाराष्ट्र जेव्हां विचार-प्रवण बनला तेव्हां एक विपरीत गोष्ट त्याच्या तत्काळ लक्षांत आली. सुरापान हें हिंदुधर्मांप्रमाणें पंचमहापातकांतील एक पातक आहे. इस्लामी धर्मांप्रमाणेंहि सुरापान निषिद्धच मानलेलें आहे. (के.७-३-११). अकबराच्या कारकीर्दींत फक्त ख्रिश्चन लोकांस दारू पिण्याची मोकळीक होती आपल्या प्रजेमध्यें सुरापान फैलावत आहे असें दिसतांच औरंगजेब बादशहानें जालीम प्रतिबंधक उपाय योजिले. डॉक्टर लोकांखेरीज इतर ख्रिश्चन लोकांस शहर सोडून, दोनचार मैल दूर, तोफखान्याचे शेजारीं वस्ती करण्याचा हुकूम दिला. तेथें ह्या ख्रिश्चन लोकांस दारू तयार करण्यास व पिण्यास मुभा ठेविली होती; पण त्यांनीं दारू विकतां कामा नये असा निर्बंध ठेविला होता. दारू विकणाऱ्या हिंदु अगर मुसलमानांस हुडकून काढण्यास कोतवालास सांगितलें होतें. असा गुन्हेगार सांपडल्यास त्याचा एक हात व एक पाय तोडण्यांत येत असे. (के.१९-७-२१). महाराष्ट्रांत तर ऐतिहासिक काळांत मद्यपानाला सरकारी हुकुमानें बंदी होती. पेशवाईंत जरी अबकारी या नांवाचें एक खातें असलें तरी तें अत्यंत रोडकें होतें. दारूचें सरकारी उत्पन्न मुळींच नव्हतें म्हटलें तरी चालेल. (के. ६-९-२१). कांहीं ठिकाणचे शेतकरी वगैरे लोक प्रसंगीं थोडी-फार दारू पीत असत हें खरें. खाल्लेले रानटी पदार्थ पचावे म्हणून, नारूचा व तापाचा आजार टळावा म्हणून, फुटावणीच्या कामासारखीं बिकट कामें झटपट उरकावीं म्हणून (के. २५-१०-८७) अगर एकाद्या धार्मिक प्रसंगाला आवश्यक

म्हणून कांहीं लोक पेशवाईंतहि दारू वापरीत असतील. पण त्या काळीं दारू मुख्यतः लागे ती फिरंगी, गोरे, किरिस्ताव वगैरे सरकारनोकरीस असत त्यांच्या साठीं. ही अल्पप्रमाण दारू तयार करण्यासाठीं एकादी भट्टी लावण्याची परवानगी देण्यांत येत असे. दुसऱ्या बाजिरावाच्या कारकीर्दींत, १८०० सालीं बलसाडचा पार्शी दोराबजी रतनजी याला मोहाचीं फुलें खरेदी करण्याचा मक्ता दरसाल अवघ्या ५० रुपयांला देण्यांत आला होता. ( के. ६-९-२१ ). दारूबाजीला पेशवाईत जबर शिक्षा असे. दारूबाजाचा सामाजिक दर्जा ज्या मानानें मोठा त्या मानानें त्याला दारूबाजीबद्दल शिक्षाहि अधिक जबर भोगावी लागत असे. ( के. १-१२-०८ ). इंग्रजांचें आगमन ह्या देशांत होण्यापूर्वी हिंदुसमाज मद्यपानाच्या बाबतींत अत्यंत सुधारलेला होता. ( के. ३-३-०८), मुंबईइलाख्यांतील अबकारी खातें बंद करावें अशी एल्फिन्स्टननें सूचना केली होती. ( के. १४-४-०८). ही सूचनाच त्या काळच्या मद्यपानपराङ्मुखतेचा पुरावा देत आहे.

हिंदुस्थानांतील दोन्ही प्रमुख धर्मांनीं निंद्य ठरविलेली ही सुरापानाची चटक हिंदुस्थानांत इंग्रजी राज्य होतांच बेसुमार फैलावली. विशेष आश्चर्य व उद्वेग वाटण्याजोगी गोष्ट ही कीं मुंबईइलाख्यानें ह्या व्यसनासक्तीच्या बाबतींत सर्वांवर ताण केली ! पाश्चात्य सुधारणा, पाश्चात्य पद्धतीचे उद्योगधंदे आणि द्रव्यलोभी अबकारी खातें यांचें त्रिकूट मुंबईइलाख्यांत चांगलेंच जमलें. ( के. ४-५-०९ ). ह्या त्रिदोषाच्या तडाख्यांत सांपडून मुंबईइलाख्याची धूळधाण झाली आहे. दारूच्या खपांत व अबकारी खात्याच्या उत्पन्नांत सारखी वाढ होतच आहे. दारूच्या खपाची वाढ सालोसाल होत चाललेली दिसली नाहीं तरी नागमोडी वळणावळणांनीं ती होत आहे, हें निर्विवाद खरें आहे. (के. २९-४-१३). १९०५-११ ह्या सहा वर्षांत अबकारी खात्याचा वसूल सरासरीनें जवळ जवळ ४९॥ लक्ष रुपये वाढला होता; ( के. २५-४-११ ), तोच १९१८-१९ सालीं ५७ लक्षांनीं वाढून ३ कोटी ७५ लक्ष ४० हजार रुपयांवर जाऊन धडकला. ( ३-२-२० ). १८९२ ते १९२२ ह्या तीस वर्षांत देशी दारूच्या खपांत २५० टक्के व कांहीं प्रकारच्या विलायती दारूच्या खपांत तर २९२ टक्के पर्यंत वाढ झाली असें, मुंबईसरकारनें १९२२ सालीं नेमलेल्या एक्साइज कमिटीपुढील आपल्या साक्षींत मुंबई टेंपरन्स कौन्सिलचे चिटणीस धनजीभाई गिल्डर ह्यांनीं सांगितलें. ( के. २-५-२२ ). पेशवाई अखेर मद्यपानाच्या बाबतींत महाराष्ट्र कसें सोंवळें होतें व आंग्लाईच्या सुरवातीपासून हें व्यसन वाढूं लागल्यामुळें लोक कसे चिंताग्रस्त झाले होते ह्याचें एका मिशनऱ्यानें व्याख्यानांत केलेलें वर्णन ज्ञानप्रकाशच्या १८४९-५० च्या फाइलींत आलें असून फार उद्बोधक आहे. ‘मी कोंकणप्रांतीं गेलों होतों तेव्हां मला रयतेनें दोन बोभाटे ‘फार सांगितले. एक, मारवाडी कर्ज देऊन रयतेस फार छळतात. दुसरा, दारू-

' आजपर्यंत कोणास माहीत नव्हती, परंतु इंग्रजांचे प्रसारानें सर्वांस माहीत होत ' चालली. येणेंकरून घरांतील माणसें फार दुर्व्यसनास लागलीं. सरकारचीं मक्त्या- ' चीं दुकानें गांवोगांव आहेत. सरकार पैशावर नजर देतें; पण रयतेच्या सुखाची ' हानि करतें.' ( के.१६-५-२२ ). दारूचा वाढता खप हें ह्या वाढत्या व्यसना- चें एक गमक आहे. दारुबाजांना पूर्वींपेक्षां जास्त मादक दारू लागूं लागली हें देखील ह्या वाढत्या व्यसनासक्तीचें दुसरें गमक होय. १८६८ पर्यंतची मद्य- पानविषयक माहिती देणाऱ्या बेलसाहेबाच्या रिपोर्टांत वर्णिलेली दारू आज विकल्या जाणाऱ्या दारूइतकी मादक नव्हती. ( के. २३-२-०९ ). दारू व ती पिणारे कांहीं लोक इंग्रजी राज्यापूर्वींहि असतील. पण हल्लींची दारू मग ती गांवठी असो अगर विलायती असो—फार घातक व अंमली आहे. (१४-४-०८ ). १८६७-६८ व १९०७-०८ ह्या वर्षांची तुलना केल्यानें असा निष्कर्ष निघाला कीं लोकांना दुप्पट मादक स्वरूपाची दारू लागूं लागली. ( के. २७-४-०९ ).

ह्या कल्पनातीत मदिरापानाचा विचार करूं लागलें म्हणजे एक बाब मोठी आश्चर्यकारक वाटते. वरिष्ठ सरकार, वरिष्ठ अधिकारी व प्रांताधिपति ह्यांची अभिवचनें पाहावीं तर तीं मद्यपानप्रतिबंधाला अनुकूल व प्रत्यक्ष परिस्थिति पाहावी तर मद्यपानाचा प्रसार बेसुमार होतच आहे. ' दारूचें उत्पन्न कमी ' झालेलें पत्करलें पण सरकार दारूबाजांचे कैवारी आहे असा बभ्रा व्हावयास ' नको ' असें एका जुन्या सरकारी ठरावांत म्हटलें आहे. (के.२१-४-०८). अब- कारीखातें काढितांना सरकारनें 'To correct, and if possible, to diminish the total consumption of spirits' हा सोज्ज्वळ हेतु जाहीर केला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्या हेतूचें विशदीकरण करतांना प्रो. वा. म. जोशी लिहितात, ' प्रजेला मदिराव्यसनापासून मुक्त व परावृत्त करावें, आपमतलबी ' कलालांनीं प्रजेला मोह पाडूं नये व फसवूं नये, अतिपानानें प्रजाजन मत्त व ' हास्यविषय होऊं नयेत, ह्या हेतूनें अवतीर्ण झालेल्या अबकारी खात्याचा प्रत्यक्ष ' कारभार पाहिला तर त्याला ' अबकारी ' न म्हणतां ' अपकारी ' खातें म्हणावें ' असूं वाटूं लागतें. ' ( के.२२-४-१३). मुंबईचे माजी इलाखाधिपति ने. ना. सर जॉर्ज क्लार्क ह्यांचे ह्या विषयावरील उद्गार तर संस्मरणीयच आहेत. ' मद्यपान- ' निषेधाचें कार्य पुढें ढकलण्यास स्वतः सरकार अगदीं मद्यपाननिषेधक सभां- ' इतकेंच आतुर आहे. दारूचा खप वाढता आहे याबद्दल तुम्हां मद्यपान- ' निषेधकांना जितकें दुःख होत आहे तितकेंच मलाहि होत आहे, व अबकारी ' खात्यासंबंधीं सरकारच्या हेतूला सोडून जे कांहीं प्रकार होत असतील ते तुम्हीं ' माझ्या नजरेस आणून दिल्यास मला सदैव आनंद होईल.' ( के. ९-१-१२ ).

सरकारचे व जबाबदार सरकारी अधिकाऱ्यांचे वरील उद्गार वाचले तर कोणालाहि सकृद्दर्शनीं असेंच वाटतें कीं, सरकारला मद्यपानाला आळा घालण्याची

खरोखरच तळमळ वाटत असावी. मग सरकारच्या तळमळीलाहि न जुमानतां ह्या व्यवसाची अनिष्ट वाढ होत आहे ह्याला जबाबदार तरी कोण असा प्रश्न सहजच उद्भवतो. ह्या प्रश्नाचें पहिलें उत्तर असें आहे कीं आपले ख्रिस्ती राज्य-कर्ते व आपण त्यांचे हिंदी प्रजानन ह्यांच्या मद्यपानविषयक विचारसरणींतच दक्षिणोत्तर ध्रुवांइतकें अंतर आहे. ( के. ६-५-२४ ). पानस्वातंत्र्याच्या तत्त्वाचा बडेजाव माजविणारे इंग्रज अधिकारी पानप्रतिबंधाच्या प्रश्नाकडे इंग्रजी चष्म्यांतून पाहतात. ( के. २१-४-०८ ). आपल्या मायदेशांत चालू असलेल्या मद्यपानाच्या मानानें हिंदुस्थानांतील मद्यपान म्हणजे कांहींच नव्हे असें ह्या इंग्रजी अधिकाऱ्यांस साहजिकच वाटतें. १९०८ सालच्या सुमारास इंग्लंडांतल्या दारूच्या कारखान्यांच्या शेअरांच्या किंमती घटल्या; ह्यामुळें इंग्लिश जनतेचें ३७॥ कोटींचें नुकसान झालें. (के.३-३-०८). ह्या एकाच गोष्टीवरून इंग्लंडांतल्या मद्यप्रसाराच्या अतिरेकाची कल्पना करतां येईल. मद्यपानरूपी अळीचा इंग्लंडांत आतां राक्षस बनला आहे ही गोष्ट अगदीं खरी आहे. आपल्या हिंदी समाजांत हा मद्यपान कर्दम तितका घट्ट झाला नाहीं हें सुदैवच समजलें पाहिजे. श्री. तात्यासाहेब केळकर ह्यांनीं ले. असेंब्लींत २-९-२५ रोजीं केलेल्या भाषणांत इंग्लिश लोकांत रुजलेल्या व मुरलेल्या ह्या व्यसनाचें मोठें मार्मिक व विनोदपूर्ण वर्णन केलें आहे. ' इंग्रजांची परंपरा आज ' शेंकडों वर्षें मद्यपात्रांत जणूं काय भिजतच पडलेली आहे ! मद्यपान हा त्यांना ' पूर्वजांचा प्रसाद व पुढील वंशजांना देण्याचा आशीर्वाद असें वाटतें. बायबल, ' बाटली व बेयोनेट ह्या दैवी त्रिमूर्तीचें ते नित्य उपासक आहेत. घरीं पाहुण्या-' पुढें ठेविलेला दारूचा पेला चुकून अर्धवट भरला गेला तर त्याला पाहुण्याचा ' अपमान झाला असें दुःख होतें आणि सगळाच पेला मोकळा पडला तर आपल्या ' पाहुणचाराची बेअब्रू झाली असें त्याला वाटतें.' ( के.१५–९–२५ ). इंग्लंडांतील दर माणसास सालिना २५ गॅलन म्हणजे दररोज जवळ जवळ एक बाटली दारू लागते. ( ५–१–१५). लोकांची निम्मी दारू जरी तुटली तरी सगळ्या गरिबांना घरें बांधून देतां येण्याइतका पैसा त्यांच्याकडूनच काढतां येईल आणि अमेरिकेप्रमाणें पुरी दारूबंदी करतां येईल तर मग मुळींच प्रश्न उरणार नाहीं. पण सुधारणेचा हात जर कशानें लुला पडत असेल तर तो केवळ मद्यपानानें. इंग्लंडांतील लोकल गव्हर्नमेंट बोर्डचे मुख्याधिकारी डॉ. सर ऑर्थर न्यूजहोल्म ह्यांचें आपल्या देशबांधवाबद्दलचें गाऱ्हाणेंहि मोठें मननीय आहे. (१५–९–२५). इंग्लंडमधील घाणेरड्या परंपरेंतून आलेले साहेब लोक दारूबाज व गुत्तेवाले ह्यांचा कड घेऊन उठतात व मद्यपाननिषेधक चळवळ करणारांना छळतात. ( ५–५–०८ ).

इंग्रजी राजसत्तेखालीं ह्या व्यसनाचा कल्पनेबाहेर प्रसार झाला; ह्याचें दुसरें कारण आपल्या राज्यकर्त्यांची अनिवार द्रव्यतृष्णा. पैशाचें पुत्रवत् पालन करण्या-

चा सरकारनें मक्ताच घेतला आहे. त्यामुळें विषारी दारू पिण्याची लज्जत प्रजेस लावण्याची सरकारास दिक्कतच वाटत नाहीं. (१०-५-९२). ह्या बाबतींत आपल्यावर नैतिक जबाबदारी केवढी आहे ह्याची सरकारास जाणीवच नाहीं. ‘आपलीं मुलें नीतिमान व सुखी व्हावीं यासाठीं लागेल तो स्वार्थत्याग कर- ‘ण्यास व जरूर ते कष्ट सोसण्यास आईबापांनीं तयार असलें पाहिजे; तद्वतच मा- ‘बाप सरकारनें आपली प्रजा व्यसनासक्त व अनीतिमान बनूं नये ह्यासाठीं लागेल ‘तो स्वार्थत्याग करण्यास तयार झालें पाहिजे.’ ( ९–६–०८ ). ही जबाबदारी न जाणतां सरकार अबकारी खात्याच्या ओंजळीनें पाणी पिऊं लागतें व आपल्या मुत्सद्देगिरीचें दिवाळें निघाल्याचें अप्रत्यक्षपणें कबूल करतें हें अत्यंत अनिष्ट होय. ‘अबकारी खात्याचे अधिकारी हे कारभारी अगर administrators आहेत; ते मुत्सद्दी नव्हेत; सबब खात्याचें धोरण काय असावें हें इतर मुत्सद्द्यांनीं ठरविलें पाहिजे. गव्हर्नर वगैरे अधिकारी जर केवळ अबकारी खात्याच्या नादानें चालतील तर ते क्षैण ठरतील.’ ( के. २१-४-०८ ). लोकांनीं दिलेल्या ह्या हितावह सूचनेकडे दुर्लक्ष करून व अबकारी खात्याच्या उत्पन्नाच्या मोहाला बळी पडून सरकारनें अबकारी खात्याची नसती मिजास वाढविली. त्यामुळें अबकारी खातें हें सरकारच्या जांवई खात्यांतलें एक खातें झालें आहे (के.१३-५-२४) व सरकारला आपल्या प्रजेची नितिमत्ता, कायद्याच्या अक्षरांनीं बांधलेल्या पण खरोखरी मन मानेल तसा कारभार करणाऱ्या मक्तेदारांच्या दिमतीला देणें भाग पडलें आहे. (१-१२-०८). स्वतः गव्हर्नरचें मत कांहींहि असलें तरी, अबकारी खात्याच्या इच्छेपुढें त्याला नमावें लागतें. ( ६-४-०९ ). अबकारी खात्याच्या वर्तनाचा वरिष्ठ सरकारच्या वर्तनाशीं पुष्कळ वेळां मुळींच मेळ बसत नाहीं. ( १८-५-०९ ). अबकारी खात्यापासून सरकारास द्रव्यलाभाचें आमिष नसतें तर अबकारी खात्याचा हा डोईजडपणा चाललाच नसता; व इंग्रज सरकारच्या हातून महाराष्ट्रांत दारू पिकविण्याचा महादोष घडला नसता. (१९-७-१० ).

इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून हिंदी समाजांतील सामाजिक व धार्मिक बंधनें शिथिल झाल्यामुळें, गिरण्या, त्यांतील मजूर वगैरे नवीन नवीन घटना निर्माण होऊं लागल्यामुळें व कांहीं अंशीं इंग्रजांचे वेळींअवेळीं अनुकरण करण्याच्या घातकी वृत्तीमुळें मद्यपानाचें व्यसन कांहींसें फैलावलें हें खोटें नव्हे. पण हें महाघातकी व्यसन समाजाच्या कोनाकोपऱ्यांत पसरविण्याचें पाप सरकारच्या माथीं मारण्याशिवाय गत्यंतरच नाहीं. ‘अडाणी समाज बहुधा व्यसनपराङ्मुख ‘असतो; परंतु एकदां कोणत्याहि कारणानें त्याचा बंध सुटला म्हणजे त्याला ‘अधोगतीचा तळ पाहण्यास अगदीं उशीर लागत नाहीं; किंबहुना तींतच तो ‘सर्वस्वीं नाश पावतो.’ ( २६-४-१० ). ह्या सिद्धान्ताकडे दुर्लक्ष करून, प्रजेच्या नैतिक व धार्मिक कल्पनांकडे कानाडोळा करून, ह्या ‘नव्या व भयंकर प्लेगाचें’

बीज प्रजेमध्यें सोडण्याचा दुराग्रह सरकारनें पुरवून घेतला. लोकांना ह्या दारूबाजीचे दुष्परिणाम १८४९ पासूनच स्पष्ट दिसूं लागले होते. पण ह्या द्रव्यलोभी सरकारनें पानस्वातंत्र्याचा बडेजाव माजवून, कायद्यानें मद्यपानप्रतिबंध केल्यास क्लास-टिरनी उत्पन्न होईल असा नसताच बागुलबोवा उत्पन्न करून व मद्यपानाला कायद्याचें कांटेरी कुंपण घातल्यानें बेकायदा दारू गाळण्याचा व आणण्याचा धूमधडाका उडेल अशी खुळचट भीति उराशीं बाळगून, बोकाळत चाललेली दारूबाजी हटविण्याचें आपलें पवित्र कर्तव्य अंगाबाहेर टाकिलें. आपण सतीचे वगैरे कायदे केले; सबब आपण नीतिमान् व कनवाळू आहों अशी शकारी वढाई हिंदुस्थानसरकार मारतें; पण ' ह्या कायद्यांनीं सरकारला मिळालेलें ' पुण्य दारूचा प्रसार करून सरकारनें साफ घालविलें आहे. ' (के. १४-४-०८). सरकारच्या एतद्विषयक पापाचें एक मासलेवाईक व ठळक उदाहरण म्हणून खोंड लोकांची हकीकत लक्षांत ठेवण्याजोगी आहे. ' हे खोंड लोक आपस्फूर्तीनें दारूबंदी करीत असतां व बंद पडलेले गुत्ते पुनः लिलावास न काढण्याबद्दल विनवीत असतां सरकारनें ते त्यांच्या उरावर बसविले. त्याचा परिणाम असा झाला कीं ' खोंड लोकांनीं तुरुंग पुनः गच्च भरून गेले; खोंडांच्या जमिनी पुनः ' सावकारांचीं घरें पाहूं लागल्या व कलालांची चांदरात झडूं लागली. '—रेव्हरंड मिलमन ह्यांचे उद्गार. ( के. २६-४-१० ).

दारूबाजीचें हें दुष्ट व्यसन हटविलें पाहिजे ह्या गोष्टीची जाणीव जागरूक जनतेला १८४९ पासूनच झालेली आहे. ' मद्यपानाचें वाढतें व्यसन बंद होत असल्यास अबकारी खात्याच्या सर्व वसुलावर पाणी सोडण्यास सरकार तयार आहे. ' असें १८४४ च्या सरकारी ठरावांत सरकारनें म्हटलें हें खरें. पण सरकारच्या ' वाचि क्रियायां च एकरूपता ' नाहीं हें पक्केपणीं ओळखून, मद्यपानाच्या वाढत्या प्रसाराचा धोका आगाऊच ओळखून पुणें शहरच्या लोकांनीं १८४९ सालीं ' मद्यप्राशनविनाशक ' मंडळी स्थापन केली. ( ६-९-२१ ). लोकांच्या प्रयत्नांची सुरवात जरी झाली होती तरी त्या प्रयत्नांत संघटना व आस्था ह्यांची बरीच वाण होती; सबब ह्या व्यसनाचा फैलाव १९०४-०५ सालापर्यंत अव्याहत व अप्रतिबद्ध होत गेला. १९०७ सालीं पुण्याच्या मद्यपाननिषेधक सभेची स्थापना झाली. (के. २५-२-१३ ). त्या काळच्या राजकीय जागृतीचा फायदा घेऊन दे. भ. भाऊसाहेब लवाटे ह्यांनीं निकराचे प्रयत्न चालविले व हा प्रश्न धसास लावण्याची पराकाष्ठा केली. तेव्हां मुंबईसरकारला लाजेकाजेस्तव तरी मद्यपानप्रतिबंधासाठीं कांहीं तरी करणें भाग पडून मुंबई, पुणें, सोलापूर अशा मोठमोठ्या शहरीं ' स्थानिक कमिट्या ' स्थापण्यांत आल्या. पण ह्या कमिट्यांची रचना इतकी सदोष झाली होती आणि त्यांचे अधिकार इतके संकुचित होते कीं ह्या कमिट्यांची उत्पत्ति ' अजागलस्तनेव ' निरर्थक ठरू

लागली. ह्या कमिट्यांत बिनसरकारी सभासद अवघे दोन असत. कलेक्टर हा ह्या कमिटीचा अध्यक्ष असून तीन वर्षांतून त्यानें एकदां कमिटी भरविली म्हणजे तो बिचारा आपल्या जबाबदारींतून मोकळा होत असे. कमिटीचें म्हणणें हें केवळ शिफारसवजा मानण्यांत येत असे व अमुक एका वस्तींत दारूचा गुत्ता असावा अगर नसावा हें ठरविण्याचा साधा अधिकारहि ह्या कमिटीस देण्यांत आला नव्हता. 'ह्या कमिट्या उभारून सरकारनें लोकमताचा गौरव तर केला नाहींच; उलट लोकमताची थट्टा मात्र केली.' (२०-१०-०८). मुंबईच्या स्थानिक कमिटीवरील बिनसरकारी सभासद वाच्छा हे तर सरकारवर सहसा न उसळणारे गृहस्थ. पण त्यांनाहि कमिटीमधील कामाची इतकी शिसारी आली कीं त्यांनीं आपल्या सभासदत्वाचा तडक राजिनामा पाठविला. ना. वाच्छा ह्यांच्या राजिनाम्यांतील पुढील वाक्य ह्या स्थानिक कमिट्यांचें सत्य स्वरूप कळण्याच्या दृष्टीनें फार उपयुक्त आहे. 'असंख्य लोकांचें अपरिमित 'नुकसान करणाऱ्या दारूचा खप व प्रसार कमी करण्याचे कामीं 'आपला उपयोग व्हावा यासाठीं मी कमिटीचा सभासद झालों............ 'पण कमिटी नांवाची असून तिजवर कलेक्टर आपला शिरजोरपणा चालवितात.' (के.६-४-०९). ह्या स्थानिक कमिट्या जरी फारशा प्रभावी ठरण्याजोग्या नसल्या तरी त्या कमिट्यांतील सभासद व ठिकठिकाणच्या मद्यपाननिषेधक सभा ह्यांनीं आपलें अंगीकृत कार्य नेटानें पुढें चालविलें. स्थानिक अबकारी कमिट्यांचे अधिकार वाढविण्याचे प्रयत्न करण्यांत आले. लोकप्रतिनिधींची संख्या वाढविण्यांत यावी व ह्या प्रतिनिधींचें मत बंधनकारक मानिलें जावें अशा शिफारशी झाल्या. दुकानें चालू ठेवावीं अगर बंद करावीं हें ठरविण्याचा अधिकार कलेक्टरकडून काढून तो सुधारलेल्या स्थानिक अबकारी कमिट्यांकडे देण्यांत यावा अशी मागणी करण्यांत आली. 'ज्यांचें अष्टौप्रहर लक्ष सरकारची वसुली 'वाढविण्याकडे किंबहुना ज्यांची नेमणूकच त्या कामाकरितां अशा कलेक्टरांच्या 'मर्जीवर दुकानें बंद करणें अगर न करण्याची मुखत्यारी सरकारनें टाकणें म्हणजे कामी पुरुषाकडे अंतःपुराची व्यवस्था देण्यासारखें घातक होय.' (के.२७-१२-१०). 'प्रांतिक सरकारें व अबकारी खातीं यांस उत्पन्नाचा लोभ सुटल्यानें मद्यपानाच्या व्यस-'नाचा फाजील प्रसार होतो; ह्याकरितां अबकारी उत्पन्नच हिंदुस्थानसरकारनें आपल्या-'कडे घ्यावें अशीहि सूचना करण्यांत आली. (१८-५-०९).दारूचे परवाने देण्याचें काम रेव्हिन्युखात्याकडून काढून, म्युनिसिपालिट्यांसारख्या संस्थांकडे द्यावें असें-हि मत व्यक्त करण्यांत आलें. (८-१-०७). ह्या मताचा खुलासा करतांना ता. ४-१-१० चा केसरी म्हणतो, 'ज्या व्यक्तींचा अगर संस्थांचा 'दारूच्या व्यापाराचे नफ्यातोट्यांत कांहीं संबंध नाहीं अशांनीं तें खातें चालवून 'होणारें उत्पन्न सरकारच्या हवालीं करावयाचें अशी व्यवस्था होईपर्यंत मद्यपान-

' निषेधकांनीं दारूबाजी हटविण्याचा किती प्रयत्न केला तरी तो व्यर्थ होय. '

मद्यपानाच्या व्यसनाला आळा घालण्यासाठीं वरील अनेक उपाय सुचविण्यांत आले. पण सरकारनें दारूचे गुत्ते उघडतांना स्थानिक संमति ( Local option ) च्या तत्त्वाचा अवलंब करावा ही सूचना फार महत्त्वाची होती. विशिष्ट शहरांत अगर गांवांत दारूचीं दुकानें किती व कोठें ठेवावयाचीं हें केवळ त्या शहरांतील अगर गांवांतील लोकांच्या मतावरून ठरविणें (२७-४-०९) म्हणजेच स्थानिक संमतीच्या तत्त्वाचा पुरस्कार करणें होय. धर्म, नीति व परंपरा ह्यांनीं मद्यपानाची पापांत गणना केलेली असतांना देखील, युरोपियन राष्ट्रांत ह्या तत्त्वाला मान्यता मिळाली आहे. ' The Root of the drink evil is not, and never can be ' really touched unless you give the people living in the locality ' full powers of determining either the existence or the number of ' public houses.' ( के.२८-३-११ ) हें अवतरण देखील ह्या तत्त्वाचें महत्त्वच स्पष्टपणें गात आहे. पण आमच्या सरकारनें हें तत्त्व सीधेपणानें स्वीकारलें तर तें इंग्रज सरकार कसलें व मग ' सरकार आहांत झालें ! ' असें अधिक्षेपपूर्वक म्हणण्याची संधि प्रजेला मिळावी तरी कशी ! सरकारनें हें तत्त्व तर मान्य केलें नाहीं; उलट आपल्या नाखुषीचें समर्थन करण्याकरितां सुचतील त्या सबबी सांगण्यास सुरवात केली. येशू ख्रिस्ताला फांशीची सजा फर्मावणाऱ्या पायलेटनें ' सत्य ! सत्य ही चीज आहे तरी काय ! ' असा प्रश्न कांगावखोरपणानें विचारला. पायलेटची वेळीं अवेळीं टवाळी करणाऱ्या आमच्या ख्रिस्ती राज्यकर्त्यांनीं त्याच बापड्याचें अनुकरण करून विचारलें ' स्थानिक लोकमत ! आहे तरी काय ही चीज !' स्थानिक लोकमत जमेस धरावयाचें तर मद्यपानाला प्रकृत्याच ज्यांचा विरोध त्या लोकांचें मत प्रभावशाली ठरेल, व दारूचा विरंगुळा मिळावा म्हणणाऱ्या दुबळ्या प्रजेची गळचेपी होईल व क्लास-टिरनी माजेल असें म्हणण्यास सरकारी अधिकारी कचरले नाहींत. नोकरशाहीच्या ह्या लंगड्या कोटिक्रमाला उत्तर म्हणून पुण्याच्या मद्यपाननिषेधक मंडळानें म्युनिसिपल निवडणुकीबरोबरच ह्याहि प्रश्नावर मतें नोंदविलीं व हिंदी लोकांचें बहुमत मद्यपानप्रतिबंधाला निःसंशय अनुकूल आहे ह्याबद्दलचा पुरावा ' शितावरून भाताची परीक्षा' ह्या न्यायानें सादर केला. पानस्वातंत्र्याच्या खुळचट कल्पनेचा समाचार घेतांना श्री. केळकर आपल्या असेंब्लीमधील भाषणांत एकदां म्हणाले, ' स्वातंत्र्य ही ' दुधारी तलवार आहे. तिची एक धार पानस्वातंत्र्याच्या भोक्त्याला जर बाधूं नये ' तर दुसरी धार तरी मद्यपाननिषेधकाला कां बाधावी ?' ( २-९-२५ ). पण ह्या सर्व कोटिक्रमांचें आमच्या नोकरशाहीला काय होय ! रणवाद्येंच वाजविलीं तर खरोखरच झोंपी गेलेला एकादा कुंभकर्णहि जागा होईल; पण झोपेचें बेमालुम सोंग आणणाऱ्या आमच्या नोकरशाहीला कोण कसा जागृत करणार !

जनतेनें अशा अनेकविध मागण्या व सूचना केल्यामुळें सरकारला 'मनाची नाहीं तर जनाची' तरी थोडकीशी लाज वाटली. आपल्या उदार धोरणाचें व अघळपघळ वचनांचें आपल्याला अगदींच विस्मरण झालेलें नाहीं असें दाखविण्याकरितां सरकारनें कांहीं ठिकाणीं दारूच्या पिठ्यांची संख्या थोडीफार कमी केली व गुत्ते उघडे राहण्याची वेळ थोडीशी कमी केली. पण व्यसनाच्या अतिरेकाच्या मानानें व लोकांच्या अपेक्षेच्या मानानें हे उपाय अगदींच अपुरे पडले. दारूवरील कर वाढवून आम्ही मद्यपान-निषेधाला मदतच करीत आहों हें सरकारचें म्हणणें तर शुद्ध फसवेगिरीचें होतें. 'दोन चार वर्षांनीं दोन चार आण्यांच्या ड्यूटीचें पाणी शिंपडून दारूनें माज-'विलेली आग शमविण्याचा प्रयत्न सरकार करतें.' (के. १०-५-१०). पण त्यानें मद्यपानाला आळा तर बसतच नाहीं. दारुबाज असली उपेक्षणीय वाढ सहज व सत्वर पचनीं पाडतात व गरीब लोकांचा श्रमाचा पैसा जाऊन सरकारचें मात्र उखळ पांढरें होतें. 'दारुबाजाला दारू विकत घेणें परवडणार नाहीं इतका 'जबर कर ( prohibitive duty ) बसविला पाहिजे. असें केल्यानें गैरकायदा 'दारू गाळणें व ती आणणें हे प्रकार वाढतील अशी धास्ती सरकारला वाटत 'आहे ती व्यर्थ आहे.' (के. ९-१-१२) हें गैरकायदा दारूबद्दलचें तुणतुणें सरकार सदैव वाजवीत असतें; पण 'सरकारी परवानगीनें मोकाट सुटलेल्या दारुबाजीपेक्षां 'लोक अशी चोरून थोडीशी दारू प्याले तर काय बिघडेल?' ( के. ६-१-१४ ). ह्या रोकड्या सवालाला सरकार उत्तर कसें देणार! दारुबंदीचे सरकारी प्रयत्न किती अपुरे व निष्फळ आहेत ह्याचें 'डोळ्यांत तेल, कानांत फुंकर' ह्या एका सूत्रांत केसरीनें वर्णन केलें आहे.

लोकांनीं सुचविलेल्या दारूबंदीच्या उपायांकडे सरकारनें जाणून बुजून दुर्लक्ष केलें; पण ह्या घातकी दुर्व्यसनाकडे डोळेझांक करून आपल्या देशबांधवांची सर्वांगीण दुर्दशा होत आहे हें स्पष्ट कळल्यावर स्वस्थ बसणें हें समाजां-तील विचारी माणसांस असह्य वाटलें. १९०७–०८ सालीं पिकेटिंगची अगर निरोधनाची पहिली चळवळ पुण्यास झाली. 'गुत्त्यांबाहेरच नव्हे तर गुत्त्यांत 'शिरूनहि दारूबाजांचें मन शांततेच्या व कायदेशीर उपायांनीं वळविणें हें कृत्य 'सर्व सुधारलेल्या देशांत पूर्णपणें कायदेशीर ठरलें आहे. लोकल ऑप्शनचा हक्क 'हिंदुस्थानांतील लोकांस नसल्यामुळें व लोकमताची पर्वा अधिकारी करीत नसल्या-'मुळें लोकमताची तीव्रता दर्शविण्यासाठीं हिंदी लोकांनीं पिकेटिंग करावें हें स्वाभा-'विकच आहे.' ( २--६--०८ ). ही पिकेटिंगची बाब लोकमताच्या दृष्टीनें अगदीं न्याय्यच होती. पिकेटिंगच्या मर्यादा अमेरिकेंत तर चांगल्याच विस्तृत होत्या, हें हिंदी जनतेला अवगत होतें. मिसेस कॅरीनेशन ही अमेरिकन बाई पिकेटिंग दुकानांत शिरून करी इतकेंच नव्हे तर दुकानदाराची खोड मोडण्यासाठीं दुकानांतील

सामानसुमानाची मोडफोडहि करी. ह्या पराक्रमामुळें ही बाई 'सलून–स्मॅशर' ( Saloon smasher ) ह्या नांवानें प्रसिद्ध झाली. इतकें झालें तरी अमेरिकन सरकार तिच्या वाटेस गेलें नाहीं. ( के. २-६-०८ ). पुण्यास १९०७-०८ सालीं पिकेटिंग सुरू झालें. सन १९०८ च्या मार्चमध्यें पुणें जिल्हा सभेची बैठक झाली. ह्याप्रसंगीं कै. लो. टिळकांचें फार कडक व परिणामकारक भाषण झालें. 'मद्य- 'पाननिषेधाच्या बाबतींत सरकारकडून लाभहानीच्या भीतीनें अडथळा आल्यास 'तो आपण मोडून काढला पाहिजे. मद्यपानाची चीड ही तुरुंगवासाच्या दुःखा- 'पेक्षां अधिक दुःसह वाटली पाहिजे.' ह्या जळजळीत भाषणांतून पुण्यांतील मद्यपाननिषेधाची त्या वेळची चळवळ निघाली. 'पुण्याचें पुढारपण व इतर महाराष्ट्राचें अनुकरण' ह्या परंपरेनुसार पिकेटिंगची चळवळ इतरहि अनेक ठिकाणीं सुरू झाली. पिकेटिंगमध्यें भीतिजनक असें वस्तुतः कांहींच नाहीं. सरकार देखील कांहीं असें म्हणू धजत नाहीं कीं मद्यपान हें पुण्यकारक, सुखदायक अगर आरोग्यवर्धक आहे. मग, मद्यपान हें वाईट आहे, सबब त्यापासून अलिप्त राहा असें खाजगी अगर सार्वजनिक रीत्या सांगितलें, मद्यपान आरोग्यदृष्ट्या अनर्थमूलक व धर्मनीतिदृष्ट्या पापदायक आहे असें मद्यपाननिषेधकानें गुत्त्यासमोर प्रतिपादन केलें तर त्यांत सरकारचें काय गांठोडें बुडतें ? पण हा झाला सामान्य विचार; आणि हिंदुस्थानांतले अधिकारी म्हणजे हरएक बाबतींत असामान्य! त्यांचें घ्राणेंद्रिय तर फारच तीक्ष्ण ! या पिकेटिंगच्या साध्या व सर्वमान्य चळवळींत देखील त्यांना कारस्थानाचा वास येऊं लागला. पुण्याचे असि. कलेक्टर अंडरसन ह्यांनीं ही चळवळ चिरडून टाकण्याचा चंगच बांधला. ह्या उपद्यापी राजश्रींनीं मक्तेवाल्यांचा कड घेऊन श्री. वासुदेवराव भावे, देशपांडे वगैरेंवर खटले भरले. त्या वेळचे पुण्याचे कलेक्टर मि. कारमायकेल यांनीं टिळकप्रभृति पुढाऱ्यांस बोलावून घेतलें. कलेक्टरसाहेबांचें धोरण प्रथम सामोपचाराचें दिसलें, पण स्वयंसेवकांचा नेट पाहून त्यांनींहि सामोपचाराला सोडचिठ्ठी दिली. पिकेटिंगच्या चळवळीमुळें शांतताभंग होण्याचा संभव आहे ह्या पोकळ सबबीवरच त्या सुमारचे बहुतेक खटले भरण्यांत येत असत. पण अंडरसनसाहेब व त्यांच्या वळणाचे इतर अधिकारी ह्यांच्या मनांतील मळमळ निराळीच असे. आज हे मद्यपाननिषेधक दारू पिऊं नका असा उपदेश करतात; उद्यां सरकारला कर देऊं नका असाहि उपदेश राजरोसपणें हे करतील. तसें घडलें तर मग सरकारच्या इभ्रतीची वाट काय ? अशा विचारसरणीच्या आहारीं पडून अंडरसनसाहेबांनीं पिकेटिंगच्या चळवळीच्या नरडीलाच नख लावण्याचा निश्चय केला. आपलीं दुःस्वप्नें पुढील दहाबारा वर्षांतच खरीं ठरतील हें बिचाऱ्या अंडरसनला त्या वेळीं काय ठाऊक ! ह्या सुमारची मद्यपाननिषेधाची व पिकेटिंगची चळवळ बरीच मोठी झाली; पण तिच्यांतून प्रत्यक्ष फळ इतकेंच निष्पन्न झालें कीं, सल्लागार मंडळाची स्थापना

झाली, (के. १-३-२१) व पुण्यांतील भरवस्तींतल्या गुत्त्यांची संख्या थोडी कमी झाली. १९२० सालीं असहकारयोगाची चळवळ सुरू झाली व आत्मशुद्धीच्या मोहिमेचा एक भाग म्हणून पानप्रतिबंधाची चळवळ फिरून हातीं घेण्यांत आली व ह्याहि वेळीं केसरीनें चळवळीचा पुरस्कार केला. गांधीजींची एकंदर चळवळच शांतताप्रधान होती. पिकेटिंग करणारे स्वयंसेवक आपण होऊन अत्याचाराला प्रवृत्त होणें शक्यच नव्हतें. पण गुत्तेवाले अगर मद्यपी यांच्याकडून घडणाऱ्या अत्याचाराला फेरजबाब म्हणून देखील स्वयंसेवकांनीं अत्याचार करूं नये हें इष्ट होतें. ' या चळवळीला कायमचें यश यावें अशी इच्छा ' असेल तर सौम्य व सात्त्विक साधनांखेरीज दुसरीं कोणतींहि साधनें उपयोगांत ' आणणें रास्त नव्हे...मद्यपी माराच्या धाकाला एक दोन दिवस भिईल; ' पण लोकमताचा धाक मात्र निरंतर टिकणारा आहे...मद्यपी किंवा त्याचे साथी- ' दार यांचेकडून मुद्दाम कुरापत काढली जाण्याचा संभव आहे.......पण कुरा- ' पती मनुष्याला बगल देण्यांतच भूषण आहे.'(१९-७-२१). ह्याहि चळवळीच्या वेळीं अधिकाऱ्यांनीं दडपशाहीचें शस्त्र उचलिलें. वैयक्तिक हक्कसंरक्षणाच्या बड्या नांवाखालीं पुण्याच्या कलेक्टरनें असा हुकूम सोडला कीं, गुत्त्यापासून पन्नास यार्डांचे आंत उभें राहून पिकेटिंग करतां कामा नये. (के.१६-८-२१). सातारा कऱ्हाड वगैरे ठिकाणीं स्वयंसेवकांवर खटले करण्याचा क्रम पुनरावृत्त झाला.

असहकारितेच्या चळवळीमुळें पानप्रतिबंधाच्या चळवळीला नवा जोम चढला हें तर खरेंच. शिवाय सुधारलेल्या प्रांतिक कौन्सिलांतूनहि ह्या प्रश्नाची चर्चा होऊं लागली. लोकलबोर्डें, म्युनिसिपालिट्या इत्यादि स्थानिक संस्थांनीं देखील ह्या प्रश्नाकडे लक्ष पुरविण्यास सुरवात केली. नागपूर–म्युनिसिपालिटीनें मद्यपान-प्रतिबंधाला लोकमत किती अनुकूलप्रतिकूल आहे ह्याचे आंकडे गोळा केले. नाशिक म्युनिसिपालिटीनें १००० रुपये पिकेटिंगसाठीं मंजूर केले (२५-१०-२१) व ठाण्याच्या लोकलबोर्डानें ३००० रुपये पिकेटिंगच्या चळवळींत खर्च करण्याचें ठरविलें. ठाणें डिस्ट्रिक्ट लोकलबोर्डाच्या ह्या ठरावामुळें ठाण्याचें त्या वेळचे कले-क्टर बरेच गरम झाले व त्यांनीं ह्या ठरावाची अंमलबजावणी होऊं नये असा मनाई–हुकूम सोडला. पण ठाण्याचें डिस्ट्रिक्टबोर्डहि ह्या वेळीं हट्टासच पेटलें. बोर्डानें सरकारला विचार करण्यास सवड मिळावी म्हणून पिकेटिंग पंधरा दिवस तहकूब केलें. (के. २-८-२१). पंधरा दिवस वाट पाहून बोर्डानें पिकेटिंगला आरंभ केल्याबरोबर कलेक्टरसाहेबांनीं क्रि. प्रो. कोडचें १४४ कलमरूपी ब्रह्मास्त्र सोडलें. पिकेटिंग कायदेशीर आहे कीं नाहीं ह्या मूलभूत प्रश्नावर कलेक्टर-साहेबांनीं धूर्त मुग्धताच स्वीकारली. शांतताभंग अगर अशांततासंभव होऊं नये म्हणून पिकेटिंग बंद करणें जरूर आहे असें सरकारतर्फे भासविण्यांत आलें व हा बंदीचा हुकूम मोडूनहि पिकेटिंग करण्याचें बोर्डानें ठरविलें. (के. ९-८-२१).

पुण्यांतहि १-३-१२-२१ पासून २०-२-२२ पर्यंत पिकेटिंग चालूं होतें. ( २१-२-२२ ). आणि त्याचा तात्कालिक परिणाम १९२२-२३ सालाकरितां होणाऱ्या दुकानांच्या लिलावांत स्पष्टपणें दिसला. १९२१-२२ सालीं एकंदर दुकानांचा मिळून सवाल ५८३४०० रुपयांपर्यंत चढला होता; तो सवाल १९२२-२३ सालीं २१३६०० रुपयांवर चढला नाहीं.' ( २-३-२२ ).

दारूबंदीचे असे अनेक उपाय योजिले तरी, दारूबंदी होण्याला कायद्याचें शस्त्रच अंमलांत आणिलें पाहिजे. ( के. ६-९-२१ ). ही गोष्ट स्पष्टपणें लोकांना पटत चालली होती. इतर अनेक बाबतींत दुबळीं दिसणारीं देशी संस्थानेंदेखील ह्या बाबतींत खालसांतील मानानें सुधारलेलीं होतीं. १६ वर्षांखालील माणसास दारू विकणें बंद करण्यासाठीं बडोदेसरकारनें कायदेशीर निर्बंध घातले. पण १४ वर्षांची मर्यादा घालतांना ब्रिटिशसरकारनें कोण खळखळ केली ! (२५-४-११). क्षेत्रें, यात्रा, जत्रा वगैरे ठिकाणीं दारूचीं दुकानें उघडूं नयेत; इतकेंच नव्हे तर अशा ठिकाणांच्या आसपास चार मैल दारू विकली जाऊं नये अशी दक्षता म्हैसूरसरकारनें दाखविली; तर ब्रिटिशसरकार लोकांच्या ह्याच अर्थाच्या मागण्यांना वांटाण्याच्या अक्षता लावण्यास तयार. म्हैसूर संस्थानांत दुकानदारावर निर्बंध आहे तो असा कीं त्यानें ठराविक मर्यादेपलीकडे दारू विकूं नये. ब्रिटिश हद्दींत मात्र निर्बंध अगदीं उलटा. दुकानदारानें ठराविक मर्यादेपेक्षां कमी दारू विकता कामा नये; त्या मर्यादेपलीकडे त्यानें खप केला तर सरकार ती इष्टापत्तिच मानणार ! (के. ९-५-११). 'स्वीडन, जर्मनी वगैरे देशांच्या बादशहांनीं हें 'व्यसन हटविण्याचे मनःपूर्वक प्रयत्न केले. इतका मागासलेला रशिया देश; पण 'दीड अब्ज रुपये नुकसान सोसून तेथील सरकारनें दारूला कायदेशीर बंदी केली 'व त्यामुळें तो देश किती तरी सुधारला !' (के.५-१-१५). 'रशिअन सरकार 'युद्धानंतर कदाचित् उत्पन्नाच्या आशेनें दारूची फिरून विक्री करूं लागेल तर 'रशियांत खचित दंगे होतील......दारूची बंदी झाल्यापासून रशियन गांवांचा 'नूरच बदलून गेला आहे. गांवगुंडपणा कमी झाला; स्त्रीपुरुषांतील नीति-'मर्यादा वाढली; अनीतीच्या मार्गास लागलेल्या स्त्रियांची संख्या कमी 'झाली व शेतकऱ्यांतील कर्जबाजारीपणा कमी झाला.' ( के. ११-७-१६ ). महायुद्धाच्या काळीं इंग्रजी मजुरांच्या मद्यपानासक्तीमुळें रणांगणावर जरूर तो दारूगोळा पुरविला जाईना. हें पाहून बादशहा पंचम जॉर्ज ह्यांनीं आपल्या राजवाड्यांत दारूला मनाई केली. स्वतः दारू सोडून 'बादशहा ब्राह्मण बनले' व स्वोदाहरणानें प्रजेची सुधारणा करण्याचा अनुकरणीय प्रयत्न त्यांनीं केला. (के.६-४-१५). आमच्या सरकारला ह्या गोष्टी दिसत नाहींत अगर कळत नाहींत असें नव्हे. हिंदुस्थानांतील मद्यपानास प्रतिबंध करण्यास नाखूष असणारें सरकार आपल्या मर्मस्थानावर घाव बसतांच जागें होतें, मग पानस्वातंत्र्याची सबब पुढें

आणीत नाहीं. ( २९-८-१६ ). कराचीहून मुलतानास जातांना कांहीं ब्रिटिश सैनिक गतप्राण झाले. ह्या प्रकारची चौकशी झाली तेव्हां असें बाहेर आलें कीं प्रवासांत बेसुमार दारू घेतल्यामुळेंच हे शिपाई मेले. त्याबरोबर सरकारनें असा नियम केला कीं प्रवासांत सैनिकांनीं दारू खरेदी करूं नये. हा नियम करण्या-पूर्वीं कित्येक वर्षें गोऱ्या सैनिकांमधील मद्यपानाचें व्यसन कमी करण्यासाठीं हिंदुस्थान सरकार मिशनरी वगैरे लोकांना प्रोत्साहन देत असे व आर्थिक मदत-हि करीत असे. ( के. ८-९-०९ ).

ब्रिटिश सरकारनें गोऱ्या सैनिकांबद्दल आस्था व कळकळ दाखविली. पण हिंदी प्रजेबद्दलचा सरकारच्या मनांतला सापत्नभाव कायमच राहिला. पण नवीन प्रांतिक कायदेमंडळें निर्माण झाल्यापासून, सरकारच्या इच्छेला न जुमानतां, मद्य-पानप्रतिबंधक प्रयत्न कायदेमंडळांत सुरू झाले. परदेशी दारूविक्रीला बंदी करण्या-चा अधिकार प्रांतिक सरकारास नाहींच; पण देशी दारूविक्री शक्य तितक्या लौकर बंद करावी असा ठराव पास करण्याचा पहिला मान मध्यप्रांताच्या कौन्सिल-नें मिळविला. ( के. १६-८-२१ ). ह्याच सुमारास 'अमेरिकेंतील शुक्राचार्य' पुसीफूट जॉन्सन हिंदुस्थानांत आले. पुसीफूट जॉन्सनच्या ४० वर्षांच्या दीर्घ परिश्रमानंतर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें नुकतींच निर्मद्य बनलीं होतीं. अशा दीर्घोद्योगी व विजयी गृहस्थाच्या आगमनाचाहि सुपरिमाण झाला. १९२२सालीं मुंबई कौन्सिलांत मद्यपानाला कायदेशीर निर्बंध घालण्याचा प्रश्न उपस्थित होऊन एक कमिटी नेमण्यांत आली. ह्या कमिटींतील ना. शेफर्डसाहेबांसारखे लोक मद्यपाननिर्बंधाला अनुकूल मत देतील हें शक्यच नव्हतें. पण असे दोनतीन अपवाद वगळून बाकीच्या सभासदांनीं कायद्यानें मद्यपानाचें उच्चाटन करणें इष्ट आहे असें मत दिलें. ( के. ६-५-२४ ).

आपल्या हद्दींतील दारूचीं व मादक पदार्थांचीं दुकानें बंद व्हावीं अशी विनंति कलकत्ता कॉर्पोरेशननें बंगालसरकारास केली. संयुक्तप्रांताच्या कौन्सिलांत अशाच अर्थाचा ठराव पसार झाला. ( के. ७-४-२५ ). ह्या ठिकठिकाणच्या प्रयत्नांना संघटित स्वरूप देण्यासाठीं ३०-१-२६ रोजीं दिल्ली येथें प्रॉहिबिशन लीग ऑफ इंडिया ह्या नांवाची संस्था रीतसर स्थापण्यांत आली ( के. ६-७-२६). १९२२ सालीं नेमलेल्या कमिटीच्या शिफारशींस मूर्तस्वरूप देण्याचा प्रयत्न मुंबई कौन्सिलांत आमदार सप्तर्षि ह्यांनीं केला. श्री. सप्तर्षि ह्यांचा मूळ ठराव व आमदार सुर्वे ह्यांची त्यावरील उपसूचना ह्यांचा संकलित विचार करून कौन्सिल-नें असें ठरविलें कीं दरसाल पांच टक्के ह्याप्रमाणें दारूचा रतीब तोडीत जाऊन वीस वर्षांच्या अवधींत पूर्ण दारूबंदी अमलांत आणावी.(के.८-२-२७). हा ठराव पास होतांच लोकांना भेवडावण्याचा सरकारनें एक नवीनच डाव मांडला. अब-कारी खात्याचें उत्पन्न बुडणार व चोरून मारून दारू गाळली जाणार नाहीं असा

बंदोबस्त करावा लागणार; ह्यासाठीं जवळजवळ ८।९ कोट रुपयांची सोय करण्याची जबाबदारी सरकारनें लोकप्रतिनिधींवर टाकली. पण आमदार भोपटकर-प्रभृतींनीं सरकारच्या कोटिक्रमाला चोख उत्तर दिलें. सरकारच्या आंकडे दाखविण्याच्या पद्धतींतील हातचलाखी चव्हाट्यावर मांडली व कोणकोणते नवीन कर बसवून प्रत्यक्ष येणारी उत्पन्नांतील तूट भरून काढावी हेंहि सुचविलें. पण भोपटकर-प्रभृतींच्या ह्या मताकडे सरकारनें दुर्लक्ष केलें व एकदम दारूबंदी करण्याच्या यातायातींत न पडतां 'गोगलगाईच्या पावलांनीं चाललेली रेशनिंगची पद्धतच चालविण्याचें धोरण जाहीर केलें.' (के. १७-४-२८). सातारा जिल्हा सर्वांत कमी दारूबाज; तेथें तरी कायदेशीर प्रतिबंध घालण्याचा प्रयत्न करून पाहावा अशी मागणी करण्यांत आली; पण तेथेंहि दारूबंदी करणें अशक्य आहे असें अबकारी दिवाण ना. प्रधान यांनीं सांगितलें. (के. १३-३-२८). ना. जाधवराव ह्यांनीं तर आपल्या अबकारी दिवाणगिरीच्या कारकीर्दींत फारच बहार केली. वीस वर्षांत दारूबंदी करण्याचें सरकारी धोरण दृष्टिआड करून त्यांनीं खानदेशमधील गुत्त्यांची संख्या वाढविली; आणि कारण काय तर चोरून दारू काढण्याची वृत्ति बळावत चालली व विलायती दारूचा खप वाढूं लागला. (५-३-२९). आमदार जोग ह्यांना ह्या प्रतिगामी धोरणाचा निषेध करण्यासाठीं ना. जाधवरावांविरुद्ध निंदाव्यंजक ठराव आणावा लागला व तो ठराव पासहि झाला. ह्या सर्व गोष्टींचा इत्यर्थ असा कीं सुधारलेलीं कौन्सिलें निर्माण होऊन अबकारी खातें जबाबदार अशा दिवाणांच्या ताब्यांत जाऊन दहा वर्षें लोटलीं तरी हा मद्यपानप्रतिबंधाचा प्रश्न अजून नीटपणें निकालांत निघत नाहीं; कारण 'आज जरी दिसण्यांत अबकारी खातें रयतेला जबाबदार अशा दिवाणाचे 'स्वाधीन करण्यांत आलें असल्याचा बहाणा होत आहे तरी दिवाणांची जबाबदारी 'मुळींच खोटी आहे. चार कोटी रुपये उत्पन्नाची तूट येणार या कल्पनेचा 'समंध त्यांच्या डोळ्यापुढें उभा करून मुंबई सरकारचे फडणीस त्यांना सहजच 'गांगरून सोडतात.' (के. ६-९-२१). उत्पन्नाची तूट व मद्यपानबंदी ह्यांची सांगड घालणारें सरकार व त्या सरकारची री ओढणारे दिवाण हें विसरतात कीं, सरकारचें उत्पन्न बुडत असलें तरी त्यामुळें दारू पिणें वाईटाचें चांगलें ठरत नाहीं किंवा मद्यपी कमकुवत व रोगी बनण्याचे ऐवजीं सशक्त होत नाहींत अगर धर्मशास्त्रकार मद्यपानाला पापकर्माचे ऐवजीं पुण्यकर्म ठरवीत नाहींत. (के. २८-३-२२). लोकमताप्रमाणें मद्यपानाला कायदेशीर निर्बंध घालावयाचा तर 'लागोपाठ दोन तीन टणक दारूदिवाण भेटल्याशिवाय' (के. १३-३-२८) तें घडावयाचें नाहीं.

मद्यपानप्रतिबंधाचा प्रश्न सामाजिक स्वरूपाचा मानावा कीं राजकीय स्वरूपाचा असा एक प्रश्न नेहमीं उपस्थित होत असतो. राष्ट्राचें जीवित हें खरोखर इतकें एकजिनसी असतें कीं त्या जीवितांत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या

प्रश्नांचा पृथक्त्वानें विचार करून कांहींवर राजकीय, कांहींवर सामाजिक व कांहींवर धार्मिक अशा चिठ्या लावणें फार अवघड असतें. मद्यपानप्रतिबंधाच्या प्रश्नाचें स्वरूपवर्णन करणारीं दोन तऱ्हेचीं वाक्यें केसरींत आढळतात. 'हिंदुस्थानामध्यें मद्यपानाच्या प्रश्नाचें महत्त्व सामाजिक दृष्टया 'अद्याप मोठेंसें नसून हा प्रश्न बऱ्याच अंशीं राजकीय आहे.' (के. २९-१०-०१). 'मद्यपाननिषेधाच्या चळवळीचें स्वरूप परोपकारमूलक व सत्कार्याचें आहे' (२-६-०८). 'दारूचा प्रश्न हा राजकीय प्रश्न नाहीं; तो नैतिक प्रश्न आहे' (२८-४-०८). ह्या विरोधी वचनांचा समन्वय घालण्याचा प्रयत्न केसरीनेंच एकवार केलेला दिसतो. 'मद्यपान फैलावण्याचें पाप आजवर कोणीं केलें असेल तर तें सरकारनें; व यापुढेंहि कांहीं दिवस या कार्याला अडथळा येत राहील तो सरकारकडूनच. मद्यपानप्रतिबंधाच्या विषयाला राजकीय स्वरूप आहे तें इतक्यापुरतेंच आहे.' (६-९-२१). १९०७-०९च्या केसरींत ह्या चळवळीचें सामाजिक व नैतिक हेंच वर्णन विशेष आग्रहपूर्वक करण्यांत आलेलें आढळतें, ह्याचें आणखीहि एक कारण संभवतें. केसरीच्या राजकीय धोरणावर सरकारनें तर आग पाखडण्यास आरंभ केला होताच; शिवाय आपल्यांतील कांहीं कर्त्या मंडळींनाहि केसरीच्या राजकीय मतांचें अगदीं वावडें असे! आपल्या राजकीय धोरणामुळें आपलें कांहींहि होवो, पण जनहितकारक अशी ही चळवळ पक्ष-भेदातीत व मतभेदातीत रहावी अशा हेतूनें हें वर्णन पुनरुक्त करण्यांत आलें असण्याचा संभव आहे. 'मज अभाग्याचा वारा। तुज न लागो कुमरा। हेंचि मीं दातारा। विनवीतसें।' ह्या वचनांत प्रतिबिंबित झालेली तुकोबारायांची मनोवृत्ति व प्रस्तुत वचनांच्या मागें असलेली केसरीची मनोवृत्ति ही बहुधा एकच असावी.

---

# हिंदुमुसलमान--दंगे

[ श्री. ब. ना. भिडे, बी. ए., एल्‌एल्‌. बी. ]

'हिंदु व मुसलमान या दोघांत जर सलोखा व ऐक्य राहावयाचें असेल तर 'दोन्ही जाती एकमेकांचा प्रतिकार करण्यास समर्थ आहेत अशी त्यांची समजूत 'होणें अवश्य आहे.' (२३-८-१८९३).

**दंग्यांतील तीन पक्ष**—दंगे व अत्याचार या सर्व मण्यांच्या माळेमधून मुसलमानांचें धर्मवेड व आततायीपणा आणि सरकारचा पक्षपात व मुसलमानांना फूस अशी चतुःसूत्री गोविली गेलेली आहे. यावरून हिंदु-मुसलमानांच्या दंग्याच्या कारणांची मीमांसा करतांना केसरीकारांनीं ९-८-९३ च्या अंकांत म्हटल्याप्रमाणें प्रत्येकास असें आढळून येईल कीं, 'दंग्यामध्यें हिंदु, मुसलमान आणि सरकार असे तीन पक्ष असतात. आणि असे तीन पक्ष घेतल्याखेरीज दंग्यांच्या कारणांची नीट उपपत्ति लागत नाहीं.'

**दंग्यांची त्रोटक माहिती**—बेळगांव येथें १८९० सालीं रंगपंचमीचे दिवशीं दंगा होऊन रक्तरंग उडविण्यांत आला. १८८३ पर्यंत दोन्ही जातींत तंटा नव्हता. पुढें मुसलमानांनीं हिंदुदेवतांचीं सोंगें घेऊन त्यांची थट्टा केली. त्यामुळें हिंदूंचीं मनें कलुषित झालीं. पण हिंदूंनीं दंगाधोपा न करतां मुसलमानी सणांत सोंगें घ्यावयाचीं नाहींत असा कट केला. हें मुसलमानास न खपून रंगपंचमीचे दिवशीं हिंदूंनीं मिरवणूक काढली असतां मुसलमानांनीं दंगा केला व हिंदूवर हल्ला करून त्यांस मारहाण केली. दंगा मुसलमानांनींच केला व मुसलमानांनींच सुरू केला. पण पोलिसांनीं वरील अधिकाऱ्यांकडे फक्त हिंदूंनीं दंगा केला असा रिपोर्ट केला. (७-१०-९०).

येवलें येथें १८९४ सालीं गणेशचतुर्थीपासून दंग्यास प्रारंभ झाला. 'तेव्हां-'पासून उभयतांतील तंटा अधिकाऱ्यांचे एकपक्षीय वर्तनामुळें सारखा वळावत 'चालला होता.' (१३-२-९४). मुसलमानांनीं हिंदूंचें देवालय भ्रष्ट करण्यास व साधेल त्याप्रमाणें हिंदूंना ठोकण्यास सुरवात केली. हिंदूंनीं सहसा चिडून दंग्यांत भाग घेतला नाहीं. मुसलमान पाटलाचे मशिदीकडे जमा झाले व हातांत काठ्या व घोळांत दगड घेऊन मारुतीचें देवळाकडे गेले. शेवटीं हिंदूंनीं बचावाकरितां दगडांचा वर्षाव केला. सत्यनारायणाची मूर्ति व कांचेचें सामान मुसलमानांनीं फोडून टाकलें. राधाकिसनचें देवालय निरुपयोगी केलें. त्यामुळें इकडे पाटलाचे व कच्छाचे मशिदीस आगी लागल्या. 'मुसलमानांनीं आग-'ळीक केली....गोवध पोलिसअधिकाऱ्यांचे समक्ष केला....अधिकाऱ्यांनीं 'मुसलमानांस भिऊन त्यांचेचतर्फे वर्तन केलें नसतें तर मुसलमान लोक इतके 'शेफारले नसते.' (१३-२-९४).

१९०९ सालीं कलकत्त्यास टिटाघर वगैरे गिरण्यांचे भागांत हिंदु-मुसलमानांचा मोठा दंगा झाला. दंग्याचें मूळ कारण म्हणजे मॅजिस्ट्रेटचा स्पष्ट हुकूम मोडून मुसलमानांनीं बकरी ईद सणानिमित्त हिंदूंच्या भरवस्तींत उघडयावर गोवध केला. त्यामुळें चिडून जाऊन हिंदूंनीं एकदोन मशिदींत नासधूस केली. पोलिसांस मुसलमानांवर गोळ्या झाडून दंगा शांत करावा लागला.

कानपूर येथें १९१३ सालीं मच्छलीबाजारमशिदीचें प्रकरण विकोपास

जाऊन मोठा दंगा झाला. पोलिसचे पाहऱ्यांत डि. मॅ. यांनीं पाडलेली भिंत मुसलमान बांधूं लागले. पोलीस बंदी करण्यास आले. त्यांना मुसलमानांनीं दगडांविटांनीं मारलें. शेवटीं सशस्त्र पोलीस येऊन दंगा थांबला. त्यांत १२ ठार व १३ जखमी झाले. ' लॉर्ड हार्डिंज यांनीं कानपूरमशिदीचे प्रकरणाचा निकाल मुत्सद्देगिरीनें केला व मुसलमानांची तक्रार दूर केली. ' ( २१-१०-१३ ).

मलबार येथील मोपल्यांचा दंगा व बंड सर्वविश्रुतच आहे. दंगेखोरांनीं खजिने लुटणें, पोलिसठाण्यावर हल्ला करणें, बंदुका, काडतुसें, दारूगोळा हस्तगत करणें, वगैरे प्रकार केले. लष्करी अंमल जारी केल्यामुळें शांतता प्रस्थापित झाली. ' सरकारनें लष्करी टोळी पाठवून निष्कारण धरपकड केली नसती तर ' हा दंगा झाला नसता...त्याची सर्व जबाबदारी सरकारवर आहे.' (३०-८-२१). ' सदर दंगे जिल्हाधिकारी यांचे फाजील शहाणपणामुळें घडून आले.' (१३-९-२१). मोपल्यांनीं मलबारांत हिंदुसमाजावर हल्ले करून हजारों धर्माभिमानी हिंदूंस कंठस्नान घातलें. कित्येकांस जुलमानें बाटविलें. लूट व जाळपोळ या पायीं किती हिंदूंची मालमत्ता नष्ट झाली, याची तर गणतीच नाहीं. ' अशा मोपल्यांबद्दल ' मद्रास सरकारास पान्हा फुटून मद्रास सरकारनें सर्व कैदी हळू हळू बिनशर्थ सोडून ' दिले....परंतु त्याच दंग्याचे वेळचे हिंदू पुढारी एम्. नारायण मेनन यांचेवर ' अटी घालण्यांत आल्या. ' ( के. ५-४-२७ ).

नगर जिल्ह्यांत नेवासें येथील हिंदुमुसलमानांत बेबनाव झाला होता. परंतु हिंदु लोकांचें मनांतून हा तंटा त्रयस्थांकडून तोडून घेण्याचें होतें. परंतु मुसलमानांना ही गोष्ट बिलकूल मान्य नव्हती. गणेशचतुर्थीस प्रवरेचे घाटावर हिंदूंनीं गणपति बसविला. अधिकाऱ्यांनीं प्रथम परवानगी दिली. पुढें ती रद्द केली! या गणपतीचे देवालयाचे दक्षिणेस ७५ फुटांवर एक पडीक, निवडुंग वाढून गेलेली, व कधींच उपयोगांत नसलेली मशीद आहे. व ही मशीद जवळ (!) असलेमुळें हिंदूंना भजनबंदी करण्याची नोटीस मिळाली. ' मात्र मुसलमानां- ' तील कोणी मृत झाल्यास त्याची मिरवणूक मुद्दाम हिंदू वस्तींतून व हिंदू देवालयां- ' वरून काढण्यांत येते. ' ( के. १९-१२-२२. )

१९२३ सालीं अमृतसर येथें कांहीं मुसलमान लोकांनीं एका हिंदू मुलीवर हल्ला केल्यामुळें दंगा झाला. व ब्रिटिश लष्कर येऊन त्यानें शहर ताब्यांत घेतलें. त्याच सालीं पानिपत शहरीं वाद्यांसंबंधीं भांडण होऊन मारामारी झाली. २६ हिंदु व मुसलमान जखमी झाले. हिंदु पुरुषांस मारहाण करीत असतां एका वृद्ध हिंदु स्त्रीवर हात टाकण्यास मुसलमान गुंडांस लाज वाटली नाहीं! ही स्त्री पानिपतचे ऑनररी मॅजिस्ट्रेट व म्युनिसिपल कमिशनर लाला फुलचंद यांची माता होती!! ( के. २७-११-२३ ).

१९२३ सालींच नागपुरास भजनी दिंड्यास बंदी करून मिरवणुकीवर मुसल-

मानांनीं दगड व जोडे फेकून दंगा केला. या दंग्यांत हिंदूबरोबर पोलिसांसहि बराच मार खावा लागला. दुसरे दिवशीं तर मुसलमानांनीं अगदींच अत्याचारी वर्तन केलें. उदाराम पहिलवान व त्यांचे अनुयायी यांनीं मुसलमानांना थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. व कोष्टी मोहोल्यांत हिंदू जवानांनीं प्रतिकार करून संघटनेनें हल्ला पिटाळून लावला व म्हणूनच अत्याचार टळले. 'याप्रमाणें हिंदूंनीं 'आत्मसंरक्षणाची अशी तरतूद केली नसती तर कदाचित् साहारणपूर, आग्रा, 'किंवा मुलतान यांची पुनरावृत्ति झाली असती.' ( के. २७-११-२३ ).

१९२४ सालीं नंदूरबार येथें प्रथम दंगा व नंतर आगी लागून हिंदूंचें लाखों रुपयांचें नुकसान झालें. 'पोलिस शिपाई आपल्या जीविताचें व घरादारांचें 'रक्षण करावें, तसें करीत नाहींत असें दिसून आल्यावर नंदुरबारचे हिंदु स्वयंसेवक 'टोळ्या जमवून रात्रीं गस्त घालण्याचें काम करीत आहेत. हा स्वावलंबनाचा 'मार्ग खरोखरच प्रशंसनीय आहे.' ( के. २०-५-२४ ).

१९२४ सालीं कऱ्हाड येथें मुसलमानांनीं १५।१६ हिंदू देवतांच्या मूर्ति फोडल्या. याच सालीं बकरीदच्या वेळीं दिल्ली व नागपूर येथें मोठे दंगे झाले. दिल्लीस एका मुसलमानाच्या पोरानें कांहीं अपशब्द उच्चारले व दंगेखोरांना तेवढेंच निमित्त पुरलें. या दंग्यांत २ इसम ठार व ८० जखमी झाले. नागपुरास पालखीस अडथळा केल्यामुळें दंगा झाला व ८ इसम इस्पितळांत पोहोंचते केले. त्याचप्रमाणें याच सालीं 'गुलबर्ग्याचा अत्याचार' जो झाला तो तर सबसे जादा आहे. गुलबर्ग्यास श्री. बसवेश्वराचें पुरातन देवालय आहे. त्याची नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें पालखी निघाली असतां मुसलमानांनीं ती मिरवणूक अडवून ठेविली. आणि त्यानंतर दोन दिवसांनीं आपणच कुरापत काढून श्रीबसवेश्वरादि बरींच देवालयें भ्रष्ट केलीं. हिंदूंच्या घरांत शिरण्याचा, दुकानें लुटण्याचा व जाळण्याचाहि कित्येक ठिकाणीं प्रयत्न झाला.

हिंदुलोक जीविताचा कसाबसा बचाव करीत. 'एका बाजूस प्रतिकारार्थ 'अत्याचार करणें, व दुसऱ्या बाजूस गुलबर्ग्याप्रमाणें हिंदूंनीं घरोघर लपून बसून 'प्रतिकार न करणें या दोन्हींमधील मार्ग आत्मसंरक्षण...हिंदुसमाजांतील 'प्रत्येकानें केवळ आत्मरक्षण व्यक्तिशः करून भागावयाचें नाहीं तर जैन-'लिंगायत, ब्राह्मण-ब्राह्मणेतर हे सर्व भेद समाजहिताकरितां मनांतून काढून सर्व 'हिंदुसमाज एक अशी भावना उत्पन्न होण्यासारखें आपण परस्पर वर्तन ठेविलें 'पाहिजे.' ( के. २६-८-२४ ).

गुलबर्गा संपतो न संपतो तोंच कोहटला दंग्याच्या आगीचा डोंब झाला. येथील दंग्यांत उभयपक्षीं बंदुकांचा उपयोग करण्यांत आला. त्यामुळें १३ इसम मरण पावले. बाजाराचा बराचसा भाग व हिंदु मोहोल्ला जाळण्यांत आला. कित्येक सरकारी अधिकाऱ्यांवरहि गोळ्या झाडण्यांत आल्या म्हणतात. १३००

हिंदुलोक कोहट सोडून दुसरीकडे जाऊन राहिले. 'आगीच्या धामधुमींत 'लुटालूट सुरू झाली आणि कित्येक पोलिसांनीं आपला तळीराम गार करून 'घेतला.' ( के.२३-१२-२४ ).

कामठी, सोलापूर, अकोला, प्रकाशें वगैरे ठिकाणीं दंगे झाले व पाटलीपुत्र येथें तेथील हिंदु पुढारी बाबू नारायण सिंह यांचा मुसलमान गुंडांनीं खून पाडला.

१९२६ सालीं सोलापूर जिल्ह्यांत वळसंग गांवीं श्रीवसवेश्वराचे देवालयांतील नंदी दुसरीकडे फेंकून देण्यांत आला. त्यावर हिंदूंची सभा होऊन मुसलमान या अत्याचाराचा योग्य जाब देईपर्यंत त्यांच्याशीं असहकारिता करण्याचें ठरलें, व या ठरावाची अंमलबजावणी कडक रीतीनें झाली. एक महिना गेल्यावर अखेर मुसलमानांनीं माफी मागून तडजोड केली व मूर्ति स्थापणेबद्दल दंड भरला. 'हिंदु-संघटनेच्या चळवळीमुळें हिंदुसमाजांत ऐक्याचें वारें खेळूं 'लागलें असून त्याचे सुपरिणाम हळुहळू दिसत आहेत.' ( के. २३-३-२६ ).

याच सालीं कलकत्ता येथें आर्यसमाजाची मिरवणूक निघाली असतां तीस मुसलमानांनीं विरोध केला व त्यामुळें दंगा होऊन त्यास भीषण स्वरूप प्राप्त झालें. सर्व शहरभर दंग्याची सांथ उद्भवली. 'कलकत्त्यांतील नागरिकांना 'आपण सुधारलेल्या राजवटींत नसून पेंढारशाहींत राहात आहों '. (१३-४-२६) असा भास झाला असेल.

हिंदुमात्राचे अंतःकरणांत संताप व मुसलमानासंबंधीं चीड व तिट्कारा उत्पन्न करणारा प्रकार स्वामी श्रद्धानंद यांचा महमदी धर्माच्या अनुयायानें दगलबाजीनें केलेला अमानुष खून हा होय !

१९२७ सालीं मुंबईस शीख व मुसलमान यांची खडाजंगी झाली. जसजशी शीखांची पांगापांग होत होती तसतसे मुसलमान वाढत होते ! गोळीबार करून पोलिसांनीं दंगा मोडला.

याच सालीं हिंदुसंस्थानामध्यें दंगे झाले. इंदूरला मोटारींतून जाणाऱ्या स्त्रियांच्या गाण्यांनीं चिडून जाऊन मुसलमान लोक उद्दामपणें एका हिंदु अधिकाऱ्याचे घरावर हल्ला करितात. हें कशाचें गमक ! बारिसाल येथें तर मिरवणूक निघाली असतांना निमाजाची वेळ नव्हती तरी देखील एका मुसलमान मौलवीच्या चिथावणीवरून २००० मुसलमान भाले घेऊन जमा झाले व त्यांनीं मिरवणूक अडविली. शेवटीं गोळीबार होऊन १६ ठार व ९ जखमी झाले ! सिंध प्रांतांत लारखाना येथें एका मुसलमान बाईस हिंदुसभेनें शुद्ध करून घेतलें. बाईच्या मुलांबद्दल भांडण--वाद होऊन तीनहि मुलें आईबरोबरच जावयाचीं असा डि. मॅजिस्ट्रेटनीं निकाल दिला. त्यामुळें पित्त खवळून मुसलमानांनीं दंगा मांडला व जो भेटेल त्या हिंदूंस चोपून काढून दुकानें लुटूं लागले.

पोलिसांच्या तुकड्या येऊन दंगा मोडला. मुसलमानांस डोक्यावर बसवून घेतल्यावर मग ते असेच मिरे वाटणार !

संयुक्त प्रांतांत मुरादाबाद येथें पंडित बनवारीलाल यांचा भयंकर रीतीनें खून करण्यांत आला.

श्रीशिवाजी महाराजांच्या जन्मोत्सवांत मुसलमानांनीं पुष्कळच पराक्रम केला. सुरतेस मशिदीवरून मिरवणूक चालली असतांना मुसलमानांनीं तिचेवर हल्ला करून गोळीबार करण्याची पाळी आणली. बडोदें येथील श्रीशिवाजीमहाराजांची पालखींत बसविलेली मूर्ति फोडण्याचा दुष्ट प्रयत्न मुसलमानांकडून करण्यांत आला. पण तो बालवीर व स्वयंसेवक यांच्या मर्दुमकीमुळें फसला. लाहोरास तर फारच मोठा दंगा होऊन शहरांत २।४ दिवस अंदाधुंदी माजून राहिली होती. सिल्हट जिल्ह्यांत एका गांवीं फैजअलि नामक मुसलमानानें कैक हिंदु स्त्रियांची अब्रु घेतली व कैक स्त्रियांनीं गांव सोडला. पण त्या गांवांतील ' मर्द ' पुरुषांस या कृत्यास आळा घालण्याची छाती झाली नाहीं. शशीमोहन व त्याचे साथीदार यांनीं मात्र त्यास प्रायश्चित्त दिलें. व कोर्टांत खटला होऊन तो निर्दोषी ठरला. बारामती व इतर ठिकाणीं दंग्यास अवसर मिळेना म्हणून मुसलमानांनीं भुरटे हल्ले करण्याचा उपक्रम केला. इकडे पंजाबांत तर रंगीलां रसूलचे कर्ते राजपाल यांजवर भ्याडपणानें मुसलमानांनीं हल्ला केला. आणि पुढें ज्या वेळीं त्यांचा खून झाला त्या वेळीं खुनी इसम म्हणतो काय तर ' अहो, मुसलमान भाईनो, मी रसूलच्या अपमानाचा सूड घेतला.' ही सूडाची वृत्ति मुसलमानांत सदैव वास करीत असतांना हिंदूंनीं मात्र सोळेपणाच्या गप्पा माराव्या हें सात्त्विक वृत्तीचें अगर पुळचटपणाचें, कशाचें द्योतक समजावें ? मुसलमानांत माथेफिरू एखादाच असतो असें नाहीं. नियमापेक्षां अपवादच जास्त. कारण स्वामी श्रद्धानंदांच्या खुनानंतर अवघ्या ९ महिन्यांत हिंदु-समाजांतील ९ कार्यकर्त्यांचे खून करण्यांत आले. दरमहा एक खून हें प्रमाण काय दाखवितें ! !

१९२८ सालीं बकरीद व मोहोरमाचे वेळीं पुष्कळ ठिकाणीं दंगे झाले. पण याच सालीं गुजराथेंत पंचमहाल जिल्ह्यामध्यें गोध्रा येथें जो मुसलमानांनीं दंगा केला त्या दिवशीं ठिकठिकाणीं गायी बांधून ठेवून त्यांचे अंगावर ' काफरोंकी मा गायकी कुरबानी ' अशीं अक्षरें लिहून हिंदु दिसला कीं मुसलमान गुंड सुरे परजीत असत. परंतु सरकारकडून या बाबतींत कांहींच व्यवस्था झाली नाहीं. मिरवणुकीवर हल्ला केल्यावर गांवांत ठिकठिकाणीं गुंडांनीं रस्त्यावर व घरांत शिरून मारहाण केली. त्यांत १२ इसम जखमी झाले. ही बातमी वामनराव मुकादम, शाहा वकील वगैरे प्रतिष्ठित व पुढारीमंडळी डि. मॅजिस्ट्रेट यांना सांगण्याकरितां जात असतांना त्यांचेवर मुसलमानांनीं मर्दुमकीनें (!) हल्ला चढविला व

ते मृतप्राय पडल्यावर ते मेलेच असें वाटून गुंडांनीं पोबारा केला. दुसऱ्या दिवशीं शाहा वकील यांचा दवाखान्यांतच अंत झाला. इकडे दावणगिरीला श्रीगजाननाची मिरवणुक निघाली असतां मूर्तीसह पालखीच मुसलमानांनीं जाळून टाकली व ४० हिंदूंना जखमी केले. बंगलोरजवळ एका गांवांत हिंदु देऊळ फोडून उध्वस्त करण्यांत आलें. त्याच वेळीं निजामचे राज्यांत नांदेड येथें शीख व मुसलमान यांचे मध्यें दंगा होऊन बरेच लोक घायाळ झाले.

१९२९ मधील मुंबईतील भयंकर दंग्याचे वेळीं मारामारीमध्यें, पिसाळलेलें कुत्रेंहि दंश करतांना कांहीं विचार करील तेवढाहि विचार पठाणांनीं दाखविला नाहीं. त्यांनीं गोफणीचे दगड, पाजळलेले सुरे व उगारलेले सोटे यांखालीं हिंदूंची कत्तलच आरंभिली. त्यांत मृत्यु १४४ व जखमी ५००. पोलिस शिपाई, इन्स्पेक्टर, कमिशनर यांनाहि लाठ्यांचा प्रसाद मिळाला. इन्स्पेक्टर प्रीस्टले यांचा मुसलमानांनीं दगडांनीं खून केला. मग त्यांनीं हिंदु देवतांच्या मूर्ति फोडल्या असल्यास, अगर देवालयांना आगी लावून दिल्या असल्यास नवल काय ! पोलिसांच्या देखत तर एका मारवाड्यास मरेतोंपर्यंत मारलें. यास कारण काय तर मुलें पळविण्याची हूल आणि मुसलमान पुढाऱ्यांची चिथावणी. सिंधप्रांतांत जाकोबाबाद येथें एका मुसलमानानें हिंदु मोहोल्यांत शिरून सांपडेल त्या हिंदूवर बंदुकीनें लागोपाठ गोळ्या झाडून दहा मनुष्यांस घायाळ केलें. इकडे मुंबईस गिरगांवांत एका हिंदु विद्यार्थिनीवर मुसलमान गुंडानें हल्ला करून तिला सुरीनें भोंसकलें. आणि या सर्वांवर कळस म्हणजे पटवर्धन यांचा पैशाकरितां पठाणानें छळछळून केलेला खून.या बाबतींत मुंबई सरकारनें दाखविलेलें आपलें निःपक्षपातित्व पाहून त्यांच्या ह्या गैरलगामी वर्तनाबद्दल चीड उत्पन्न होते. सोलापूर प्रकरणांतील लोकांना 'मावाप' दयाळू सरकार सुळावर देऊन लाखों लोकांच्या विनवण्या टाकाऱ्या फटकाऱ्यासरशीं तुच्छतेनें झिडकारून देतें. तर तेंच न्यायप्रेमी सरकार इकडे सुळावर देण्याचें ठरलेल्या पठाणास सुळावरून ओढून करुणार्द्रतेनें त्यास माफी देते. म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं कीं, ' देवो दुर्बलघातकः'. हा पठाण होता म्हणून त्यास ' खून माफ. कारण काय म्हणाल तर ' केसरीकार म्हणतात-' पठाणास आगापिछा ' कसलाच नसतो. ज्या कामास हिंदी नोकरांचा सरकारास उपयोग होत नाहीं ' त्या ठिकाणीं पठाण नेमला जातो. बार्डोलींतील सत्याग्रही शेतकऱ्यांवर हेच ' उपटसुंभ पठाण सोडल्याचें सर्वांच्या लक्षांत असेलच.' ( के. १२-२-२९ ).

कुडची येथें तर जैन स्त्रियांस नदीवर स्नानास अगर धुण्यास जाऊं न देणें, उभीं पिकें कापणें, कडब्याच्या गंजी नाहींशा करणें, मेंढरें चारणें, म्हैस नेऊन मारून हाडें व मांस मालकाचे मुखांत घालतों म्हणून धमकावून पैसे उपटणें, वगैरे कृत्यें मवाली मुसलमानांनीं केलीं.

गेल्या वर्षीं किशोरगंज येथें मुसलमान गुंडांनीं दिवसाढवळ्या चांदणीपुरा

पेठेंतील हिंदूंचीं घरें लुटलीं. गुंडांचा कार्यक्रम असा कीं घरांत जावयाचें,दस्तांची मागणी करावयाची व कोणीं प्रतिकार केल्यास त्यास ठार करून घरें पेटवावयाचीं. पोलिसांनीं गोळीबार केला पण गुंडांनीं दाद दिली नाहीं. आणि सक्कर येथें राष्ट्रीय सप्ताहांत कॉंग्रेसतर्फे मिरवणूक निघाली असतां तींत मुसलमानांचा टांगा घुसला व पुढें दंगा झाला. त्यानें सबंध सक्कर जिल्हा व आजूबाजूचा पुष्कळसा प्रांत व्यापला.

अशा तऱ्हेनें दंग्यांची सांथ इतर रोगांच्या घातक सांथीप्रमाणें या देशाच्या सर्व कोनाकोपऱ्यांमधून आपलें भयंकर स्वरूप प्रगट करून बळी घेऊन व विजातीय जातींच्या हिंदुस्थानवासी प्रजेच्या हृदयांत द्वेषवृक्षाचें बीं पेरून दुःखोत्पत्तीचें आपलें काम केल्याशिवाय थंड पडत नाहीं हें पाहून कोणालाहि मोठा खेद व निराशा वाटल्यावांचून राहणार नाहीं. ‘ तुरुंगांतील कैद्यांनीं मी मोठा कीं तूं ‘ मोठा हें ठरविण्यांत आपलें प्राण खर्चणें म्हणजे मूर्खपणाची कमाल आहे. हे ‘ दंगे म्हणजे महाप्रभावी अज्ञानाचें फल आहे. कोठेंहि दंग्याला प्रायः हिंदुकडून ‘ सुरवात असत नाहीं. मुसलमानांचींच भांडणें करून रक्तपात करण्याची हौस ‘ अनावर ! ’ ( के. २-६-९६ ).

यामुळें कोठलाहि दंगा पाहिला तरी त्यामध्यें मुसलमानांचाच चढेलपणा दिसून येतो. हिंदु जात्याच पापभीरु व परमतसहिष्णु आहेत. ते पुढें पाऊल टाकून दंग्यास प्रवृत्त झाल्याचें एकहि उदाहरण नाहीं.

---

# पंचांगसंशोधन

[ प्रो. विश्वनाथ बळवंत नाईक, एम्. ए. ]

गेल्या ४० वर्षांत पंचांगशोधन व तदंगभूत विषय यांवर केसरींत जे अनेक महत्त्वाचे लेख येऊन गेले त्यांचें समालोचन करण्यापूर्वी केसरीनें पंचांगविषयक चर्चेंत प्रथम प्रवेश केला त्यावेळीं पंचांगशोधनाच्या प्रश्नाचें काय स्वरूप होतें हें समजण्यासाठीं त्या प्रश्नाची पूर्वपीठिका थोडक्यांत सांगितली पाहिजे. पाश्चिमात्य नाविक पंचांगांतील ग्रहणें, ताराग्रहयुति, ग्रहांचे उदयास्त ग्रहगतिस्थिति, इत्यादि गोष्टी दृक्प्रत्ययाशीं तंतोतंत जमतात व आमच्या पंचांगांतील यात्र गोष्टी तशा जमत नाहींत ही गोष्ट दृष्टोत्पत्तीस येऊन प्रचलित जुन्या

पंचांगांचें शोधन करण्याची कल्पना सुमारें ७५ वर्षांपूर्वी उद्भवली व तिला हळुहळू मूर्त स्वरूप येऊं लागलें.

नाविक व तत्सदृश इतर पाश्चिमात्य पंचांगें व आमच्या जुन्या ज्योतिष-ग्रंथांवरून तयार केलेलीं प्रचलित पंचांगें यांत मुख्यत्वेंकरून अशुद्ध गणित, स्थूल ग्रहगतिमानें व आरंभस्थानाची भिन्नता या तीन कारणांमुळें फरक दिसून येतो.

वरील तीन कारणांपैकीं पहिल्या दोन कारणांमुळें जी भिन्नता उत्पन्न होते तीच आमच्या जुन्या पंचांगांतील वास्तविक चूक होय; म्हणजे तिच्यामुळेंच पंचांगस्थ ग्रहस्थिति व प्रत्यक्ष ग्रहस्थिति यांचा मेळ बसत नाहीं. तिसऱ्या कारणा-मुळें जी भिन्नता दिसून येते ती केवळ पद्धतीच्या भिन्नतेमुळें होय; आमच्या प्रचलित पंचांगांत क्रांतिवृत्तावरील एक स्थिर बिंदु नक्षत्रचक्राच्या आरंभीं मानतात; नाविक पंचांगांत क्रांतिवृत्त व विषुववृत्त यांचे छेदनबिंदू जे संपात त्यांतील एक आरंभीं मानतात. संपातास विलोमगति असते तिला अयनगति म्हणतात. यावरून आमच्या पंचांगास निरयन व नाविक पंचांगास सायन म्हणतात. या पद्धतिभेदामुळें दृक्प्रत्ययास बाध येत नाहीं. परंतु लौकिक व्यवहार, धर्मशास्त्र व फलित यांच्या दृष्टीनें अनुकूलत्व किंवा प्रतिकूलत्व साधण्यासाठीं जो विचार करावयाचा त्यांशीं या भिन्नतेचा संबंध येत असल्यामुळें, सायन का निरयन ? हा वाद पंचांगशोधनाच्या प्रश्नांत एक महत्त्वाचा भाग होऊन बसला आहे.

पंचांगशोधनाचा पहिला महत्त्वाचा प्रयत्न कै. केरूनाना छत्रे यांनीं सुमारें ७० वर्षांपूर्वी केला. त्यांनीं फ्रेंच व इंग्लिश ग्रंथांच्या आधारें 'ग्रहसाधनाचीं कोष्टकें' या नांवाचा पंचांग तयार करण्याचा ग्रंथ इ. स. १८६० मध्यें छापून प्रसिद्ध केला व त्यावरून शके १७८७ (सन १८६५) पासून ते निराळें निरयन पंचांग प्रसिद्ध करूं लागले. या पंचांगांत आरंभस्थान रेवती योगतारा मीन राशींतील जयंती (झीटापिशियम्) ही मानिली असून तेथें संपात शके ४९६ मध्यें असल्यामुळें तें वर्ष शून्यायनांश वर्ष (म्हणजे निरयन व सायन आरंभस्थानें एकत्र असण्याचें वर्ष) मानिलें आहे. तसेंच सूर्यसिद्धान्ताचें वर्ष-मान सोडून शुद्ध निरयन वर्षमान आणि शुद्ध वार्षिक अयनगति यांचा स्वीकार गणितांत केला आहे. महाराष्ट्राबाहेर मद्रासकडे रघुनाथाचार्य चिंतामणी यांनीं सन १८६९ मध्यें दृग्गणित-पंचांग नांवाचें पंचांग सुरू केलें व काशीस पंडित बापूदेवशास्त्री यांनीं सन १८७६ पासून नवीन पंचांग सुरू केलें. हीं दोन्ही पंचांगें नॉटिकल आल्मनॅकवरून तयार होत असत.

कै. केरोपंत छत्रे व कै. पं. बापूदेव यांचीं पंचांगें सुरू झाल्यानंतर सन १८७२ मध्यें रा. विसाजी रघुनाथ लेले यांनीं त्या पंचांगांवर आक्षेप घेण्यास सुरुवात केली. त्यांचे मतें वस्तुतः सूर्याची ज्या दिवशीं उदगयन किंवा दक्षिणा-

यन प्रवृत्ति होते त्याच दिवशीं मकर-कर्क-संक्रांति पंचांगांत देणें इष्ट आहे. तेव्हां पंचांगांत त्यांचे मतें अर्धवट सुधारणा करण्यापेक्षां निरयनपद्धति सोडून सायनपद्धतीचा स्वीकार करून छत्रे यांनीं शुद्ध पंचांग सुरू करावें. कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित व कै. जनार्दन बाळाजी मोडक यांनींहि सायन पंचांगासंबंधीं अनुकूल बरेच लेख लिहिले व सन १८८२ व १८८३ मध्यें अरुणोदयपत्रांत सायन पंचांगाचे पंधरवडे प्रसिद्ध होऊं लागले. व पुढें स. १८८४ पासून स्वतंत्र सायन पंचांग प्रसिद्ध होऊं लागलें. **सायन पंचांगाचें सामान्य स्वरूप असें**:— वर्षमान सायन (संपातसंबंधीं सूर्याच्या एका भ्रमणाचा काल) घ्यावयाचा. नक्षत्रें तारात्मक न घेतां केवळ विभागात्मक घ्यावयाचीं. म्हणजे संपातापासून पहिला सत्ताविसावा विभाग म्हणजे अश्विनी व तसेंच पुढें; संपातापासून पहिला बारावा विभाग म्हणजे मेष राशि व तसेंच पुढें; सायन राशींत सूर्याचा प्रवेश म्हणजे संक्रांति आणि या संक्रांतीवरून चांद्रमासास चैत्रादि नांवें घ्यावयाचीं; म्हणजे ज्या चांद्रमासांत सायन मेषसंक्रांति होईल तो चैत्र व असेंच पुढें. या पद्धतीनें चैत्रांत नेहमीं वसंतऋतु येईल. म्हणजे ऋतु नियमित चांद्रमासांत होतील. पण तारा व नक्षत्रनामें यांचा संबंध उरणार नाहीं, व चैत्रादि मासांत पौर्णिमेस चित्रादि तारकांसन्निध चंद्र नसल्यामुळें चैत्रादि संज्ञा अन्वर्थ राहणार नाहींत.

केसरी वर्तमानपत्रांत पंचांगशोधनासंबंधानें जे पहिले महत्त्वाचे लेख आले ते या सायननिरयनवादासंबंधीं आले. ता. २-५-९३ व ९-५-९३ या दोन्ही दिवसांच्या अंकांत '**सायन का निरयन ?**' या मथळ्याखालीं दोन अग्रलेख आले. त्यांत वादाचें मुख्य स्वरूप सांगून कै. लो. टिळकांनीं सायननिरयन पद्धतीसंबंधीं एक मध्यम मार्ग सुचविला. 'संपातबिंदूवर ऋतू अवलंबून आहेत ...सूर्य अश्विनींत असतां वसंतास आरंभ झाल्यास त्या वेळीं चैत्र महिना असला पाहिजे...दोन हजार वर्षांनीं तो (वसंतारंभ) फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस होणार, चार हजार वर्षांनीं माघ शुद्ध प्रतिपदेस होणार' इत्यादि निरयन पद्धतीचे परिणाम कबूल करूनहि आजच निरयन आरंभस्थान सोडून सायन पंचांग स्वीकारणें त्यांस अनिष्ट वाटलें व म्हणून त्यांनीं जो मध्यम मार्ग सुचविला तो असाः—वर्षमान सायन न घेतां शुद्ध निरयन घ्यावें; नक्षत्रें, राशी आणि संक्रांतीं हीं निरयनच असावीं. निरयन मेषसंक्रमण ज्या चांद्रमासांत होईल तो चैत्र ही सांप्रतची पद्धति कायम ठेवावी. परंतु अयनांश ३० होऊन संपात निरयनमीनारंभीं जाईल तेव्हांपासून वर्षारंभ निरयनमीनारंभीं निरयन फाल्गुनांत करूं लागून, आणि मधुमाधव हीं नांवें ऋतुसंबंधीं आहेत तीं हल्लीं चैत्रापासून लागूं करितों तीं फाल्गुनापासून लागूं करून, चैत्रांतलीं धर्मकृत्यें फाल्गुनांत, वैशाखांतलीं चैत्रांत, अशीं सर्व मागें आणावीं.

कालांतरानें माघारंभीं वसंतारंभ होऊं लागला म्हणजे चैत्रांत वसंतांत करावयाचीं कृत्यें माघांत करावीं. अशा रीतीनें चैत्रांत वसंतांत करावयाचीं कृत्यें फाल्गुनांत मग माघांत, याप्रमाणें मागील मागील महिन्यांत जातील; पण वसंतांतच होतील. प्रथम तारात्मक रेवती, मग उत्तराभाद्रपदा, मग पूर्वाभाद्रपदा इत्यादि नक्षत्रांच्या स्थानांस अश्विनी म्हणण्याचें कारण पडणार नाहीं. केसरीनें हा जो मार्ग सुचविला त्यास छत्रे, कृष्णशास्त्री गोडबोले, केतकर, वगैरे मंडळींची अनुकूलता मिळाली.' (भा. ज्यो. पानें ४३२-४३३ ).

यानंतर सुमारें चार वर्षेपर्यंत केसरींत पंचांगशोधनासंबंधीं विशेष महत्त्वाचीं चर्चा किंवा लेख आले नाहींत. पुढें ता. १२-५-९८ रोजीं नाशिक येथें सुप्रसिद्ध विद्वान् रा. ब. चिंतामण विनायक वैद्य यांचें सायन-निरयन वाद या विषयावर व्याख्यान झालें. त्याचा विस्तृत सारांश केसरीच्या ता. २४-५-९८ च्या अंकांत प्रसिद्ध झाला. तेव्हांपासून या विषयावरील चर्चेस केसरींत पुन्हां सुरुवात झाली. रा. ब. वैद्य यांनीं आपले व्याख्यानांत वादाचें स्वरूप प्रथमतः सांगून नंतर स्वतःचें मत सायन पद्धतीच्या विरुद्ध असण्याचीं कारणें सांगितलीं. त्यांचे मतें सायन किंवा निरयण पद्धति वेदांस संमत होती असें म्हणणेंच संभवत नाहीं. श. ५०० पूर्वी अयन गतीचें ज्ञान नव्हतें. तेव्हां सर्व वाद शके ४००च्या अलीकडला आहे. म्हणून ऐतिहासिकदृष्ट्या या वादांत कांहीं निष्पन्न होणार नाहीं. गणिताच्या दृष्टीनें विचार केल्यास काल्पनिक नक्षत्रें व राशी जिच्यांत मानणें भाग पडतें अशी सायनपद्धति अग्राह्य होय. नक्षत्रांचें खरें स्वरूप कायम ठेविलें पाहिजे. जातकाच्या दृष्टीनें पाहतां उच्चनीच स्थानें निरयन आहेत. तींच फलास जमतात. निरयन पद्धतीनें बऱ्याच कालानंतर चैत्र-वैशाख वसंत ऋतु ही परिभाषा टिकणार नाहीं हें खरें. परंतु तो प्रसंग आज नाहीं. अशा आशयाचें सायनविरोधी भाषण रा. ब. वैद्यांचें केसरींत प्रसिद्ध झाल्यानंतर रा. के. लिं. पेंडसे यांनीं केसरीस पत्र पाठवून ( १४-६-९८ )रा.ब. वैद्यांवर टींका केली. त्यांचें म्हणणें निरयन पद्धतींतहि काल्पनिक नक्षत्रें आहेतच. कारण त्या पद्धतीप्रमाणें जे नक्षत्रांचे विभाग पडतात त्यांत त्या विभागाच्या नांवाचे तारे असतातच असें नाहीं. मग सायन कां न घ्यावें ? तसेंच सायन-पद्धतीनेंहि जातक जमल्याचा अनुभव येतो. निरयनपद्धतींत संक्रातींचा विसंवाद येतो. इत्यादि कारणांकरितां सायनाचा अवलंब कां करूं नये, अशी पृच्छा रा. पेंडसे यांनीं केली. यानंतर ' ज्योतिर्विलास ' अशा नांवाखालीं सायनपद्धतिच जुनी आहे असें प्रतिपादन करणारीं दोन पत्रें केसरींत कोणीं लिहिलीं. (२८-६-९८ व ५-७-९८). त्यांत हिपार्कसला संपातगति खि. पू. १५० सालीं कळली, ग्रीकांस सायनज्ञान भारतीयांकडून मिळालें, पिरॅमिड बांधणारांस संपात माहीत होता, गर्गसंहितेंतील ग्रह सायन गणनेनें येतात, निरयन

गणनेनें येत नाहींत. वराहमिहिर अज्ञानी होता म्हणून त्यानें निरयन गणना सुरू केली, निरयन गणना पूर्वीं चालू होती असें मानण्यास पुरावा नाहीं, वगैरे प्रतिपादन केलें आहे. नंतर रा. ग. ना. दामले यांनीं ( के.२६-७-९८ ) निरयनमतच जुनें असें प्रतिपादन करणारें पत्र केसरींत प्रसिद्ध केलें. भारतांतील ' कौमुदे मासि रेवत्यां शरदंते हिमागमे, ' हें वाक्य, पराशर संहिता, आणि अर्झायल थिबिथ बिन खोरा, इत्यादि परदेशस्थ ज्योतिषी यांचा आधार देऊन संपाताचें आंदोलनच पूर्वीं ग्राह्य मानिलें गेल्यानें निरयन मतच जुनें असें रा. दामले यांनीं प्रतिपादिलें. पेंडसे व ' ज्योतिर्विलास ' यांस रा. ब. वैद्य यांनीं केसरींत ( २-८-९८ ) उत्तर दिलें. त्याचा आशय असा कीं, निरयन मानानेंहि काल्पनिक नक्षत्रें येतात हा निरयन पद्धतीचा दोष नव्हे, तर सौरवर्षमान चुकीचें घेतल्यानें ही काल्पनिकता उत्पन्न झाली आहे. गर्गपराशरादिकांस संपात माहीत होता, पण अयनगति माहित नव्हती. वेदांत स्थिर-चर असे नक्षत्रांचे प्रकार नाहींत. तसेंच ऋतूंची व्यवस्था सायन स्वीकारून लावूं म्हटलें तर अडचणी येतात. जसें आग्रहायणिक स्थालीपाकास निरयन अश्विनांत नवान्न नाहीं म्हणून सायन अश्विन घेतला तर त्यांत पौर्णिमेस अश्विनी नक्षत्र नाहीं अशी स्थिति होते.

रा. ब. वैद्य यांच्या उत्तरानंतर सायन-निरयन वाद तात्पुरता केसरींत थांबला. पुढें सन १९०० सालापासून केसरींत पंचांग-शोधनाच्या दुसऱ्या एका महत्त्वाच्या अंगावर म्हणजे **अयनांश विचारावर** चर्चा सुरू झाली. निरयनपद्धतीच्या पंचांगांत अयनांश किती धरावें यांत सायन-निरयन वादाचा संबंध येत नाहीं, पण निरयनपद्धतीचींच जुनीं व नवीं पंचांगें यांमधील ग्राह्याग्राह्यतेचा प्रश्न मात्र उद्भवतो. या विषयासंबंधीं चर्चेस प्रथम सुरुवात **विनायकशास्त्री खानापूरकर** या नवीन पद्धतीचें गणित व ज्योतिष शिकलेल्या विद्वान् शास्त्र्यांनीं शुद्धपंचांग, अयनांश, इत्यादि विषयांवर एका सभेंत निबंध वाचून केली. या सभेची हकीकत ता. २४-४-१९००च्या एका स्फुटांत केसरींत दिली आहे. सभेस पुष्कळ शास्त्रीमंडळी हजर असून त्यांनीं चर्चेंत भाग घेतला. प्रो. टिळक, प्रो. जिनसीवाले यांचींहि भाषणें झालीं. शेवटीं पंचांगनिर्णयासाठीं एक कमेटीहि नेमण्यांत आली. विनायकशास्त्रींनीं जो निबंध वाचला त्याचा सारांश ता. १-५-१९०० च्या केसरींत आहे. त्यांत नवीन गणित व शुद्ध गतिमानें घेऊन पंचांगसुधारणा करणें इष्ट आहे, रा. **व्यंकटेश बाळकृष्ण केतकर** यांनीं केलेल्या ' ज्योतिर्गणित ' ग्रंथांतील चैत्रपक्षास ( चित्रा ताऱ्यापासून १८० अंशावरील क्रांतिवृत्ताचा बिंदु ज्यांत नक्षत्र चक्रारंभस्थानीं मानतात त्यास) परंपरेचा आधार नाहीं; व त्यावरून येणारे अयनांशहि बरोबर नाहींत, सिद्धान्त-ग्रंथांतील ध्रुवक रेवती योगताऱ्यास

अनुलक्षून दिले आहेत, रेवतीचा योगतारा मीन राशींतील जयंती तारका होय. ती आरंभीं मानून शके १७९१मध्यें १८ अंश ४२कला ३०विकला अयनांश येतात, ग्रहलाघवांत याहून भिन्न अयनांश आहेत याचें कारण वर्षमान बरोबर नाहीं हें होय. रैवत पक्षच पंचांगांत ग्राह्य होय व रा. केतकर यांसहि रैवतच मान्य आहे, इत्यादि गोष्टी रा. विनायकशास्त्री यांनीं निबंधांत सांगितल्याचा उल्लेख आहे.

शास्त्रीमंडळींनीं पंचांगशोधनाचा प्रश्न हातीं घेऊन कमेटी नेमिली. ही अनुकूल परिस्थिति पाहून केसरींत लो. टिळकांनीं पंचांगलेखनावर पुन्हां लेख लिहिण्यास सुरुवात केली. 'पंचांगसंशोधन' या मथळ्याखालीं ता. २९-५-१९०० रोजीं जो **अग्रलेख** लिहिला त्यांत **महाराष्ट्रांत व इतरत्र उत्पन्न झालेल्या त्रिविधपक्षांचें** त्यांनीं **समालोचन** केलें. जुन्या सिद्धान्तग्रंथांतील गतिमानें व वर्षमान हींच बरोबर असून केवळ गणित करितांना जोशी मंडळीकडून ज्या चुका होत असतील तेवढ्या कमी केल्या म्हणजे झालें असें म्हणणारा एक पक्ष, युरोपियन ग्रंथांतील ग्रहगतिमानें अधिक सूक्ष्म व म्हणून दृक्प्रत्ययावह आहेत हें खरें, तथापि नवीन करण ग्रंथ झाल्यावाचून जुने ग्रंथ सोडणें वाजवी नाहीं असें म्हणणारा दुसरा पक्ष, आजच युरोपियन ग्रंथाधारें गणित करून शुद्धपंचांग सुरू करावें असें म्हणणारा तिसरा पक्ष, व या तिसऱ्या पक्षांतूनच उपस्थित झालेला सायनवाद्यांचा चवथा पक्ष असे चार पक्ष महाराष्ट्रांत व इतरत्र आहेत; त्यांपैकीं केवळ ग्रंथाभावामुळें शुद्धपंचांगास विरोध करणाऱ्या पक्षाचा आक्षेप रा. व्यं. बा. केतकर यांच्या नवीन करणग्रंथानें नाहींसा झाल्यासारखाच आहे; आणि जरी वे. शा. खानापूरकरशास्त्री यांचा केतकरांच्या ग्रंथांतील चैत्रपक्षावर आक्षेप असला तरी त्यांत रैवतपक्षाचाहि संग्रह केला असल्यामुळें व स्वतः केतकर रैवतपक्षासच अनुकूल असल्याचें दिसत असल्यामुळें, केतकरांच्या ग्रंथांवरून शुद्धपंचांग प्रसिद्ध केल्यास वर निर्दिष्ट केलेल्या दुसऱ्या व तिसऱ्या पक्षाचें समाधान होणें शक्य आहे, इत्यादि सामान्यतः केतकरांचा ग्रंथ व रैवतपक्ष यांचा पुरस्कार अप्रत्यक्षपणें करणारा हा लेख होता. त्यानंतर पंचांगशोधनाबद्दल मुंबई, मद्रास, बनारस वगैरे ठिकाणीं खटपट होऊन ऑगस्ट ( १९०० ) च्या ८ पासून २२ तारखेपर्यंत दिल्ली येथें भारतधर्ममहामंडळ नांवाच्या सभेची जी बैठक व्हावयाची होती तिच्यांत या प्रश्नाचा विचार करून निर्णय करण्याची विनंति सभेचे अध्यक्ष दरभंगाचे महाराज यांस करावी असा विचार ठरला. त्यास अनुलक्षून केसरींत ता. १७-७-१९०० रोजीं दुसरा अग्रलेख 'पंचांगसंशोधन' या विषयावर आला. त्यांत भारतधर्ममहामंडळापुढें कोणत्या प्रश्नांचा निर्णय झाला असतां शुद्धपंचांग अमलांत येणें शक्य आहे, त्या **पंचांगशोधनाविषयीं प्रश्नांचें दिग्दर्शन** करण्यांत आलें. महाराष्ट्रांतच जोरावलेला सायन-निरयनभेद ठेवावयाचा कीं नाहीं;

त्यांत कांहीं तडजोड निघते कीं नाहीं; असल्यास ती कोणती ? हा पहिला प्रश्न सोडविला पाहिजे; 'आमचें स्वतःचें मत निरयनपद्धतिच कायम ठेवावी असें आहे, पण आजचा लेख आमचें मत स्थापित करण्याकरितां लिहिलेला नाहीं' असें सांगून स्वतःचें स्पष्ट मत लेखांत दर्शविलें आहे; पहिल्या प्रश्नाचा निकाल निरयनातर्फें झाला तर दुसरा प्रश्न अयनांशांचा होय; अयनांश २२ मानिले तर ग्रहलाघवोक्त पूर्वीचीं पंचांगें कायम ठेवून नव्या शोधामुळें जे फेरफार करावयाचे तेवढेच आजपासून पुढें करावे लागतात, मागची सर्व फिरवाफिरव करण्याची जरूर नाहीं, हा फायदा होतो; उलटपक्षीं शके ४९६ च्या सुमारास रेवतीचा भोग शून्य मानून तेव्हांपासून नवीन गणिताप्रमाणें जे अयनांश येतात ते घ्यावे असें म्हणणें आहे; तेव्हां अयनांशांचा प्रश्न सोडविला पाहिजे व तो बहुमतानेंच सोडवावा लागेल. तिसरा प्रश्न ग्रंथासंबंधाचा म्हणजे तो तयार करवून, छापून त्याचें पठणपाठण करण्याची तजवीज करणें होय; याप्रमाणें निर्णयार्ह प्रश्न सांगून लेखांत शेवटीं पुण्यांत नेमलेल्या कमेटीस भारतधर्ममहामंडळाकडून किंवा दुसरा उद्योग करून या प्रश्नाचा निकाल करून घेण्याची सूचना केली आहे.

वरील अग्रलेखांत निरयन पंचांगासंबंधीं **रैवत** व **चैत्र** असा ज्या दोन पक्षांचा उल्लेख करण्यांत आला आहे त्यांची उत्पत्ति येथें थोडक्यांत देणें जरूर आहे. निरयन पंचांगांत ग्रहस्थितिनिर्देश क्रांतिवृत्तावरील एका स्थिर-बिंदूस आरंभीं कल्पून करितात. हा स्थिरबिंदु रेवती नक्षत्राचा अंत व अश्विनी नक्षत्राचा आरंभ होय. रेवती नक्षत्रांतील योगतारा या आरंभबिंदूपाशीं असून ती निःशर म्हणजे क्रांतिवृत्ताच्या अतिसन्निध आहे असें सर्व जुन्या ग्रंथांचें मत आहे. आरंभबिंदूंत वसंतसंपात असण्याचा काल म्हणजे शून्यायनांशवर्ष होय. हें वर्ष सर्व जुन्या ग्रंथांप्रमाणें शक ४४४ किंवा ४४५ आहे; आणि त्या शकवर्षाच्या सुमारास मीन राशींतील जयंतीतारा ही वसंतसंपातापासून फारच जवळ होती, व तिचा शरहि अत्यल्प आहे. म्हणून केरोपंत छत्रे, केतकर, टिळक, दीक्षित इ० सर्व भारतीय ज्योतिषी व कोलब्रुक, व्हिटने, बर्जेस इ० सर्व युरोपीय पंडित यांनीं तिलाच रेवतीची योगतारा म्हणून निश्चित केली. रेवतीची योगतारा व वसंतसंपात हीं दोन्ही एकाच कदंब सूत्रांत ( क्रांतिवृत्तावर लंब असलेल्या वृत्तांत ) असतां वसंतसंपाताचें जें क्रांतिवृत्तावरील स्थान तेंच नक्षत्रचक्राचा ( किंवा राशीचक्राचा ) आरंभबिंदु मानण्याचा सर्व प्राचीन ग्रंथकारांचा हेतु होता. या हेतूस अनुसरून शून्यायनांश वर्ष शक ४९६ हें येतें. तेव्हांपासून प्रतिवर्षीं ५०·२ विकलाप्रमाणें विलोमगतीनें संपात आरंभस्थानापासून दूर जात आहे. सन १९०० मध्यें रैवतआरंभबिंदूपासून संपाताचें विलोम-दिशेंत सुमारें १८॥ अंश अंतर पडलें, हें अंतर म्हणजे **रैवत अयनांश** होत. ग्रहलाघवादि जुन्या ग्रंथांप्रमाणें

श. ४४४ पासून प्रतिवर्षी ६० विकला संपातगति मानून हें अंतर सन १९०० सालीं सुमारें २३ अंश येतें. हे **ग्रहलाघवी अयनांश** होत. जुन्या ग्रंथांत संपातगति ५०·२ विकलांइतकी वास्तविक नसून ६० विकला धरण्यांत आली याचें कारण त्या ग्रंथांत निरयन सौरवर्ष वस्तुतः ३६५ दि. १५ घ. २२·९ प. इतकें असून ३६५ दि. १५ घ. ३१·३ प. इतकें घेतलें आहे. यांतील अंतर ८·५ पळें आहे. तेव्हां आमच्या ग्रंथांतील चुकीच्या वर्षमानाच्या कालांत सूर्य आरंभ बिंदूपासून १ पूर्ण फेरी करून पुन्हां आरंभबिंदूपाशीं येऊन त्याच्यापुढें ८·५ विकला जातो, आणि तें स्थान पुढील वर्षी आरंभस्थान मानिलें जातें. म्हणजे चुकीच्या वर्षमानामुळें आरंभस्थान स्थिर न राहतां त्यास प्रतिवर्षी ८·५ विकला इतकी अनुलोमगति प्राप्त होते. अर्थात् संपात व आरंभस्थान यांत अंतर प्रतिवर्षी ५०·२ विकला असें न वाढतां ५८·७ विकला असें वाढतें. आमच्या ज्योतिष्यांस उपलब्ध असलेल्या वेधसाधनांनीं ही वाढ प्रतिवर्षी ६० विकला होते असें त्यांनीं ठरविलें. **रैवत मताप्रमाणें पंचांगांत शुद्धता करणें** तर मीनस्थ जयंती तारेपाशीं आरंभबिंदु मानणें, वर्षमान शुद्ध म्हणजे आधुनिक वेधसिद्ध घेणें, अयनगति वास्तविक म्हणजे वार्षिक ५०·२ विकला घेणें, व इतर सर्व ग्रहादिकांचीं गतिमानें व संस्कार वेधसिद्ध घेणें, या गोष्टी अवश्य केल्या पाहिजेत.

रैवत व ग्रहलाघवी आरंभस्थानांत ४॥ अंशांचें अंतर असल्यामुळें रैवत पंचांगाप्रमाणें होणारी प्रत्येक सूर्यसंक्रांति ग्रहलाघवी पंचांगांतील कालाचे आधीं ४॥ दिवस होते, व प्रत्येक चंद्रसंक्रांति सुमारें २० घटिका आधीं होते, तसेंच दोन्ही पंचांगांतील अधिकमास भिन्न येतात, इत्यादि गोष्टींमुळें जुन्या मताच्या सामान्य जनतेस रैवतमत खऱ्या परंपरेस धरून असलें तरी लवकर ग्राह्य वाटणार नाहीं. याकरितां, लोकांस रुचेल असा दुसरा मार्ग पहावा अशी कल्पना रा. केतकर व रा. दीक्षित यांच्या मनांत येऊन दोघांसहि स्वतंत्रपणें एक मार्ग सुचला. तो असा कीं चित्रातारेचा भोग ( आरंभस्थानापासून क्रांतिवृत्तावर मोजलेलें अंतर ) सूर्यसिद्धान्तांत १८० अंश आहे. तेव्हां तिच्यासमोरील बिंदु आरंभस्थानीं घ्यावा. असें केल्यानें आरंभस्थान व संपात यांमधील अंतर सन १९०० सालीं सुमारें २२॥ अंश येतें. हे **चैत्र अयनांश** होत. हे अयनांश ग्रहलाघवी २३ अयनांशांस जवळ असल्यामुळें सध्यां निदान पांच पन्नास वर्षे तरी सूर्यसंक्रांति फार तर अर्ध्या दिवसानें भिन्न येतील, अधिक महिने कधीं भिन्न येतील, कधीं येणार नाहींत; आले तरी त्यांत फार अंतर पडणार नाहीं; इत्यादि **सोयीकरितां एक मार्ग म्हणून चैत्र पक्ष अवतरला.** या चैत्र पक्षाप्रमाणेंहि वर्षमान, अयनगति व ग्रहगतिमानें शुद्ध घेणेंच आवश्यक असल्यामुळें आज नाहीं तरी शेंपन्नास वर्षांनीं ग्रहलाघवी व चैत्र पंचांग यांत अधिकाधिक भेद दिसूं लागणार व शिवाय

रैवतमतास जो प्राचीन ग्रंथांचा सर्वत्र आधार सांपडतो तसा चैत्रमतास नसून तें केवळ सोयीसाठीं स्वीकारलेलें काल्पनिक मत होय, यामुळें चैत्र पंचांगासहि जनतेची अनुकूलता प्राप्त होणें कठिण झालें.

सन १९०० सालीं केसरींत वर उल्लेख केलेले दोन अग्रलेख येऊन गेल्यावर थोड्याच दिवसांत पुण्यांत ताईमहाराजखटल्याचें प्रकरण उद्भवलें व त्यांत केसरीकार लो० टिळक यांस आपलें लक्ष मुख्यत्वें गुंतवावें लागलें. यामुळें पुढें दोनतीन वर्षें पंचांगसंशोधनाच्या प्रयत्नांत केसरीकडून नवीन अशी कांहीं चालना मिळाली नाहीं. परंतु जुनीं व नवीं पंचांगें यांची दृक्प्रत्ययासंबंधानें तुलना करण्याकडे मात्र लोकांचें अधिक लक्ष लागलें, व चैत्र व रैवत पक्षाच्या योग्यायोग्यतेबद्दल चर्चाहि सुरू झाली. ता. २८-४-०३ च्या केसरींत एका 'जिज्ञासू'नें ग्रहलाघवी व केतकी पंचांगांवरून दृक्-प्रत्यय कितपत येतो याविषयीं पत्र पाठवून स्वतःचे अनुभव कळविले. त्यांत त्या सालच्या चैत्र शु. १३ स चंद्र व मंगळ यांची एक रेखायुति व चैत्र शु. १५ चें चंद्रग्रहण, या गोष्टी केतकी पंचांगाप्रमाणें दिसल्या, ग्रहलाघवी पंचांगाप्रमाणें दिसल्या नाहींत असें कळविलें. तसेंच ता. १३-९-०४ च्या केसरींत रा. द. ग. आपटे यांनीं रोहिणी व चंद्र यांची युति ता. २-९-०४ रोजीं रात्रीं ३॥ वाजतां नवीन पंचांगाप्रमाणें दिसल्याचें कळविलें. रा. केतकर यांजवर रैवतपक्ष सोडून चैत्रपक्षाचें केतकी पंचांग सुरू केल्याबद्दल रैवत पक्षीयांकडून अनेक आक्षेप येऊं लागले. चैत्रपक्षास परंपरेचा आधार नाहीं या आक्षेपास उत्तर म्हणून सूर्यसिद्धान्तांतील चित्रा तारेच्या १८० अंश भोगावर केतकर यांचा प्रथम फार भर होता. त्यामुळें सूर्यसिद्धान्तांतील या भोगावरूनहि रा. केतकरांचे चैत्रअयनांश चुकीचे ठरतात असें प्रतिपादन करणारें पत्र रा. अमृत बापूजी वाघोलीकर या ज्योतिषी गृहस्थांनीं ता. १५-९-१९०३ च्या केसरींत पाठविलें. त्यांचें म्हणणें असें कीं सूर्यसिद्धान्तांतील १८० अंश भोग कदंबाभिमुख ( म्हणजे तारकेपासून क्रांतिवृत्तावर काढिलेल्या लंबवृत्तापर्यंत मोजलेला असा ) मानून रा. केतकर अयनांश ठरवितात. परंतु वस्तुतः तो भोग ध्रुवाभिमुख ( म्हणजे विषुववृत्तावर काढिलेल्या लंबवृत्तापर्यंत मोजलेला ) असा आहे. त्यावरून चित्रा तारेचा कदंबाभिमुख भोग १८० अंश ४८ कला इतका येतो. तेव्हां केतकरांचे चैत्र अयनांश ४८ कलांनीं चुकले आहेत, तसेंच केतकरांचें जें म्हणणें कीं चित्रेचा कदंबाभिमुख भोग १८० अंश हा तिचें वेधोपयोगित्व दर्शविणारा आहे व म्हणून चित्रानिर्णित आरंभस्थान खरें आहे तेंहि काल्पनिकच ठरतें. रा. वाघोलीकर यांच्या आक्षेपास रा. केतकर यांनीं ६-१०-१९०३ च्या केसरींत पत्र लिहून उत्तर देण्याचा प्रयत्न केला. त्यांचें म्हणणें कीं वेधनिर्णायक योग्यतेसाठीं कदंबाभिमुख भोग १८० मानणें हेंच प्रशस्त होय व सूर्यसिद्धान्तांत

ध्रुवाभिमुख भोग दिले ते केवळ निरुपायानें दिले आहेत. रा. केतकर यांच्या या उत्तरानें चैत्रपक्षाला सूर्यसिद्धान्ताचा जो थोडा आधार होता तोहि सुटल्यासारखा झाला. १५-१२-१९०३ च्या केसरींत या विषयावर एक स्फुट लेख आला, त्यांत, केतकी अयनांशांत रा. वाघोलीकर यांनीं दर्शविलेली चूक आहे ही गोष्ट खरी पण त्या वादांत हंशील नाहीं असें मत प्रदर्शित केलें आहे.

सन १९०३ च्या अखेरीस पंचांगशोधनासंबंधीं चळवळीस केसरींत पुन्हां प्रमुख स्थान प्राप्त होऊं लागलें. पुण्यांतील कमेटीनें व इतर गृहस्थांनीं प्रयत्न करून पंचागाच्या प्रश्नासंबंधीं ज्योतिषसंमेलन भरविण्यासाठीं द्वारकामठाधीश श्रीशंकराचार्य श्रीमन्माधवतीर्थ स्वामी यांचेकडून आज्ञापत्र मिळविलें व संमेलन भरविण्याचें ठरवून सर्व हिंदुस्थानांतील ज्योतिष्यांस निमंत्रणें पाठविलीं. या आज्ञापत्रासंबंधीं ता. २१-६-१९०४ च्या स्फुटांत केसरीनें सुचविलें कीं नुसतें आज्ञापत्रानें काम भागणार नाहीं, तर कमेटी नेमून तिनें सर्व हिंदुस्थानांत संमेलनासाठीं प्रचारकार्य केलें पाहिजे; व त्या कमेटीस सर्व नवीन विद्वान् व जुने शास्त्री, धनिक व राजेरजवाडे यांनीं मदत केली पाहिजे. या सूचनेप्रमाणें कमेटी नेमिली जाऊन मुंबईचे **रा. महादेव राजाराम बोडस व डॉ. भालचंद्रपंत भाटवडेकर** यांस तिचे कार्यवाह नियोजित करण्यांत आलें. ता. १९-७-१९०४ च्या केसरींत या कमेटीस मदत करण्याविषयीं आग्रहाची विनंति पुन्हां करण्यांत आली. ता. १६-८-१९०४ रोजीं कमेटीची सभा होऊन प्रश्नपत्रिका तयार करण्यांत आली व ती शास्त्री, पंडित, संस्थानिक व राजेरजवाडे यांजकडे पाठविण्याचें ठरलें. ही हकीकत ता. २३-८-१९०४च्या स्फुटांत केसरीनें प्रसिद्ध केली. कमेटीच्या प्रसारकार्याची हकीकतहि ता. २५-१०-०४, ता. १-११-०४, ता. १५-११-०४, ता. २२-११-०४, इत्यादि अंकांतील स्फुटांत वेळोवेळीं आली. त्यांत काशी, कलकत्ता, वगैरे ठिकाणच्या, सुधाकरशास्त्री द्विवेदी, प्रि. हरप्रसादजी, डॉ. गुरुदास बानर्जी, वगैरे अनेक विद्वानांकडून संमेलनास येण्याविषयीं अभिवचनें मिळाल्याची हकीकत आली. ज्या जुन्या पंडितांस अशी शंका आली कीं, पंचांगसंमेलनाचें कार्य अधार्मिक आहे त्यांच्या शंकानिरसनार्थ ता. ६-१२-०४ रोजीं केसरींत स्फुटलेख लिहून असें प्रतिपादन करण्यांत आलें कीं पंचांगसंशोधनाचें कार्य हें मुख्यतः गणित व दृक्प्रत्ययसाधन यांचें कार्य आहे, गणितानें व वेधानें गतिमानें ठरविल्यावर व त्यांवरून गणितानें ज्योतिःस्थिति वर्तविल्यावर पुढें धर्माचा प्रश्न येतो. तेव्हां संशोधनकमेटीचें कार्य अधार्मिक आहे अशी कोणीहि आपली समजूत करून घेऊं नये. **पुढें मुंबईस ज्योतिषसंमेलन भरलें** त्याची हकीकत ता. २७-१२-०४ च्या केसरींत 'पंचांगपरिषदेची हकीकत' या मथळ्याखालीं आली. परिषदेंत

तीन ठराव पास झाले. त्यांत सिद्धान्तभेद व दृक्प्रत्ययविरोध यांमुळें पंचांगांत जी चूक दिसून येते, ती दुरुस्त करणें जरूर आहे.

पंचांगशोधन करणें तें धर्मशास्त्राशीं विरोध न आणितां व मूल सिद्धान्तांत सांगितल्याप्रमाणें दृक्प्रत्ययास अनुसरून करावें; व उद्दिष्ट कार्याकरितां सर्व गोष्टींचा विचार करून मुख्यत्वें सात प्रश्नांचा निकाल करण्याकरितां ज्योतिर्विदमंडळीची कमिटी नेमावी असें ठरलें. ज्या सात प्रश्नांचा निकाल कमेटीवर सोंपविला ते प्रश्न असेः—१ पंचांगशोधनास वेधाची आवश्यकता आहे कीं नाहीं, दृक्प्रत्यय आणि ग्रंथ यांमध्यें विरोध असल्यास कोणतें प्रमाण मानावें ? २ सौर वर्षारंभस्थान सायन का निरयन घ्यावें ? निरयन घेतल्यास अयनांश व अयनगति किती धरावी ? ३ सौर, सायन, चांद्र व नाक्षत्र यांपैकीं कोणतें वर्षमान धरावें ? ४ सिद्धान्तांचा परस्पर व दृक्प्रत्ययाशीं विरोध असल्यास तो कसा टाळावा ? ५ ज्योतिर्गणित व धर्मशास्त्र यांचा विरोध आल्यास त्याचें कसें निराकरण करावें ? ६ जुन्या सिद्धान्तग्रंथांत नाहींत असें कांहीं नवे ग्रहसंस्कार देणें जरूर आहे कीं काय ? ७ पंचांगशोधनास नवीन करणग्रंथ करण्याची आवश्यकता आहे कीं काय ? पंचांगपरिषदेनें हे प्रश्न कमिटीकडे सोंपविले. त्यानंतर ता. १७-१-१९०५ च्या केसरींत एक अग्रलेख या प्रश्नांचें स्वरूप लोकांस समजावें म्हणून लिहिण्यांत आला. त्यांत बीजसंस्कार देणें म्हणजे काय हें सांगून पूर्वीच्या ग्रंथांतील मानांस चूक न म्हणतां तीं शुद्ध करण्याचा तो एक पर्याय आहे व तो सर्वसंमत आहे, धर्म व ज्योतिष यांचा नसता विरोध मानणें हास्यास्पद होय, वगैरे प्रतिपादन केलें आहे. नंतर कमिटीच्या निर्णयाचें स्वरूप काय आहे याचें विवरण ता. २४-१-०५ च्या केसरींतील अग्रेलखांत आलें. यांत पंचांगशोधनाबद्दल निरनिराळ्या प्रांतांतील प्रयत्नांचें समालोचन करून, कमिटीनें सध्यांच्या जुन्या पंचांगांतील चुकीची कबुली दिल्याबद्दल अभिनंदन केलें आहे, व जुन्या करणग्रंथांची दुरुस्ती करणें, वगैरे कमिटीचीं कर्तव्यें वर्णिलीं आहेत. वर्षमान चुकीचें कायम ठेवणें, त्यामुळें अयनगति वास्तविक ५०·२ विकला न घेतां ५८ विकला घेणें, इत्यादि गोष्टींत जरी पुराणप्रियतेचा पगडा कमिटीच्या निर्णयावर बसला असला तरी त्यांतहि शुद्धतेकडे प्रवृत्ति दिसत आहे; व ग्रहादिसंबंधीं वेधशुद्ध मानांचा स्वीकार करण्यांतहि कमिटीनें पुढें पाऊल टाकिलें आहे, अशी कमिटीच्या कामाची यथार्थ स्तुति करून नंतर निर्णयाचा सारांश दिला आहे तो असाः—' परिषदेनें जो ' निर्णय दिला आहे तो पुष्कळ अंशीं केतकरांच्या चित्रापक्षास व कै. दीक्षित ' यांनीं भारतीय ज्योतिःशास्त्राच्या इतिहासांत पंचांगशोधन या सदराखालीं जो ' तिसरा पक्ष सांगितला आहे त्यास धरून आहे. बापूदेवशास्त्र्यांची सौर वर्षमानाची ' रीत घेतली आहे, पण त्यांनीं घेतलेल्या अयनगतीस वेधानें जरूर लागेल त्याप्रमाणें

' बीजसंस्कार द्यावा असें ठरविलें आहे. केरोपंती पक्षाचे अयनांश कबूल झाले ' नाहींत पण ग्रहगतिमानें कबूल झालीं आहेत. सूर्यसिद्धान्तांतील ग्रहगतिमानें ' मूलभूत धरलीं आहेत पण आतां तीं बीजसंस्कृत घ्यावीं असें ठरविलें आहे, ' आणि अयनांश पूर्वीच्या सिद्धान्तांतील व करणग्रंथांतील घेतले आहेत. सायन-' वाद्यांचे महिने घेतले नाहींत,पण अयन आणि ऋतु हे मागें मागें जातात ही गोष्ट ' कबूल केलेली आहे. तात्पर्य परिषदेचा निकाल कोणासहि सर्वांशीं अनुकूल ' नसला तरी तो सर्वांनीं प्रांजलबुद्धीनें स्वीकारण्यास कांहीं हरकत नाहीं. या ' ठरावाप्रमाणें जर सर्व हिंदुस्थानभर नवें पंचांग सुरू झालें तर आम्ही एक ' मोठी गोष्टच मिळविल्यासारखें होईल आणि ही गोष्ट पदरांत पडल्यावर मग ' पाहिजे तर दुसऱ्या कांहीं गोष्टींचा विचार करितां येईल.' या सारांशाच्या शेवटील वाक्यांत केसरीच्या—विशेषतः लो. टिळकांच्या नेहमींच्या धोरणाचाच पुरस्कार केला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सन १९०५ च्या आरंभीं पंचांगपरिषदेनें आपला निर्णय प्रसिद्ध केल्यानंतर त्या निर्णयानुसार ' शुद्ध निरयन पंचांग ' या नांवानें मुंबईच्या कुलाबा येथील वेधशाळेंतील रा. विनायकराव नेने हे पंचांग तयार करून कांहीं वर्षें प्रसिद्ध करीत असत. परंतु या पंचांगाचा जितका प्रसार व्हावा तितका किंबहुना थोडा-सुद्धां झाला नाहीं. स्वतः केसरीकार यांनाहि यापुढील ८।१० वर्षें पंचांग-शोधनाच्या प्रश्नाकडे लक्ष देण्यासारखी परिस्थिति राहिली नाहीं. बंगालची फाळणी होऊन राजकीय चळवळीला तीव्र स्वरूप प्राप्त झालें व त्या चळ-वळीकडेच आपलें सर्व लक्ष पुरविणें टिळकांना भाग पडलें. सन १९०६ व १९०७ हीं सालें कलकत्ता व सुरत येथील राष्ट्रीय सभांत राजकीय चतुःसूत्रीरूप जे चार ठराव त्यांस सर्व राष्ट्राचा पूर्ण पाठिंबा मिळविण्याकरितां जो खटाटोप करावा लागला त्यांतच खर्ची पडलीं व सन १९०८मध्यें लो.टिळकांवर राजद्रोहा-संबंधीं खटला होऊन सन १९०९सालीं त्यांचीं ६ वर्षेंपर्यंत मंडाले येथील तुरुंगां-त रवानगी झाली. या धामधुमीच्या काळांत पंचांगशोधनासारख्या शास्त्रीय प्रश्नावर फारसें मतपरिवर्तन घडवून आणण्यासारखी जोराची चर्चा सारखी चालू राहणें शक्य नव्हतें. तथापि मधून मधून शुद्ध पंचांगाकडे जनतेचें लक्ष वेधणारा पत्रव्यवहार प्रसिद्ध होई.

मुंबईच्या पंचांग परिषदेनें सन १९०४ च्या अखेरीस पंचांगशोधनाविषयीं जो निर्णय दिला त्यामुळें तत्पूर्वीं शुद्धपंचांगाच्या प्रसाराचें कार्य करीत असलेले जे दोन पक्ष म्हणजे केरोपंतानुयायी रैवतपक्ष व केतकरानुयायी चैत्रपक्ष हे दोघेहि नाखुष झाले. कारण पंचांगशुद्धीची एक मुख्य बाब सूर्यसिद्धान्तोक्त वर्षमान सोडून वास्तविक शुद्ध नाक्षत्र वर्षमान घेणें व तदनुसार ५०·२ ही वेधसिद्ध वार्षिक अयनगति घेणें ही होय; पंचांगपरिषदेनें सूर्यसिद्धान्तोक्त वर्ष-

मान कायम ठेवून वार्षिक अयनगति तदनुसार ५८·२ स्वीकारिली. या मूलभूत भेदामुळें महाराष्ट्रांतील शुद्धपंचांगाभिमान्यांस पंचांगपरिषदेच्या पंचांगसंशोधन कमेटीचें शुद्ध निरयन पंचांग मान्य होणें शक्य नव्हतें. यामुळें परिषद होऊन १०।१२ वर्षें झालीं तरीहि कमेटीचें पंचांग नव्या किंवा जुन्या कोणत्याच मताच्या लोकांत प्रसृत होईना. सन १९१३ मध्यें केसरींत परिषदेच्या निर्णया-विषयीं चर्चेस फिरून तोंड फुटलें. ता. १५-७-१३ चे केसरींत रा. केतकर यांनीं पंचांगसंशोधन कमेटीच्या निर्णयांतील वर्षमान व अयनगति यांवर आक्षेप घेतले. त्यास २९-७-१३ चे केसरींत वे. रा. धोंडशास्त्री गणेश वाडीकर यांनीं सिद्धान्तोक्त वर्षमान व वार्षिक अयनगति ५८ विकला यांच्या समर्थनपर उत्तर देण्याचा प्रयत्न केला. पंचांगशोधन व स्वतः बनविलेलें क्रांतियंत्र या विषयांवर धोंडशास्त्री यांचीं पुण्यांत दोन तीन व्याख्यानें झालीं. (किता). त्यामुळें पंचांगांवरील चर्चेस थोडेसें प्रोत्साहन मिळालें, पण तें फार वेळ टिकलें नाहीं.

सन १९१४ च्या जूनमध्यें टिळक कैदेंतून सुटले. त्यानंतर कांहीं दिवस ते सरकारनिर्मित अज्ञातवासांत होते. १९१५ व १९१६ या सालांत राष्ट्रीयपक्षाची व्यवस्थित संघटना, महायुद्ध व राष्ट्रीय सभेंत प्रवेश या गोष्टी-कडेच त्यांचें सर्व लक्ष गुंतलें व राष्ट्रीय विषयांच्या चर्चेखेरीज इतर विषयांकडे लोकांचेंहि मन लागणें फारसें शक्य नव्हतें. मध्यंतरीं पुण्यांत पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन ज्योतिषी यांनीं 'ज्योतिर्विचारिणी सभा' स्थापन केली. त्या सभेच्या विद्यमानें पंचांग विषयावर चर्चा होत असे. त्या चर्चेचा एक परिणाम म्हणजे ता. ८-५-१९१७ रोजीं रा. व्यंकटेश बापूजी केतकर व पंडित रघुनाथशास्त्री या दोघांनीं केसरीकर्ते यांस पत्र लिहून पुन्हा संमेलन भरविण्याची आवश्यकता प्रतिपादिली. ता. १८-६-१७ रोजीं संमेलनाविषयीं विचार करण्यासाठीं ज्योतिर्विचारिणी सभेमार्फत एक सभा भरली; मध्यंतरीं श. १८३९ सालीं भाद्रपद का आश्विन अधिक मानावा याबद्दल बराच वाद उपस्थित होऊन द्वितीय संमेलनाची जरूरी अधिकाधिक भासूं लागली. (२४-७-१७). ता. ९-१०-१९१७ च्या केसरींत पंडित रघुनाथशास्त्री ज्योतिषी यांनीं पत्र लिहून संमेलनांत कोणत्या प्रश्नांची चर्चा करण्यांत येणार त्यांचें दिग्दर्शन केलें. ज्योतिःशास्त्रीय प्रश्नांचा निर्णय करण्याकरितां महाराष्ट्रीय ज्योति-र्मंडळाची स्थापन करावयाची, संमेलन आक्टोबर १९१७ च्या शेवटच्या आठवड्यांत भरवावयाचें वगैरे माहिती दिली. ता. १६-१०-१७ च्या केसरींत संमेलनाच्या स्वागतमंडळाची निवडणुक झाल्याचें जाहीर केलें. संमेलनाचे अध्यक्षस्थानीं लो. टिळक यांची निवड होऊन त्यांनीं तें स्वीकारण्याचें कबूल केलें.

हें द्वितीय ज्योतिषसंमेलन पुण्यांत ता. २७-२८-२९ आक्टोबर १९१७ या तीन दिवशीं भरलें. त्यांत स्वागताध्यक्ष प्रो. विश्वनाथ बळवंत नाईक यांनीं

धार्मिक कृत्यें योग्य कालीं होण्याकरितां पंचांगांतील गणित सूक्ष्म करून दृक्प्रत्यय साधणें, वर्षमान वेधसिद्ध नाक्षत्र घेऊन आरंभस्थान निश्चल करणें, संपाताचें आंदोलन न होतां परिभ्रमणच होत असल्यानें, अयनगति शुद्ध म्हणजे वार्षिक ५०·२ विकला घेणें इत्यादि सुधारणा करणें, वेध-शाळा व ज्योतिषाची पाठशाळा स्थापन करणें, वगैरे गोष्टी संमेलनानें केल्या पाहिजेत, असें भाषण केलें. नंतर अध्यक्ष लो. टिळक यांनीं 'प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं' या वचनाप्रमाणें पंचांगाचा दृक्प्रत्यय येणें आवश्यक आहे, आरंभस्थानीं स्थिरबिंदु घेणें व तदनुसार निरयन वर्षमान घेणें योग्य व सशास्त्र आहे, वेदांत सायनमान घेतलें आहे असें म्हणणें म्हणजे वेदांत आगगाडी आहे असें म्हणण्यासारखें आहे, आरंभस्थानीं शक्य असेल तर दृश्य तारा धरा, पण वृथा वादविवाद करूं नका, उज्जयनीची वेधशाळा दुरुस्त करण्याचें शिंदेसरकारनीं ठरविल्याची मला नुकतीच तार आली आहे, तेव्हां एकमुखी पंचांग लवकर प्रचारांत आणा, इत्यादि भाषण केलें. विषयनियामक कमेटीनें एक दोन दिवस चर्चा करून निर्णय जाहीर केला तो असाः—

१. सौरवर्षमानं सूर्यसिद्धान्तोक्तं वेधोपलब्धबीजसंस्कृतं स्वीकार्यम्. २. अयनगतिमानं वास्तविकं वेधोपलब्धं ग्राह्यम्. ३. सद्यःप्रचलितपूर्वसिद्धान्तग्रंथेषु निःशररेवतीयोगतारैवारंभस्थानं गृहीतम्, तदेव निरयनराशिनक्षत्रचक्रारंभस्थाने ग्राह्यम्. ४. अयनांशास्तु सद्यःप्रचलितकरणग्रंथागतांशसमीपस्थास्त्रयोविंशतिमिताः १८४० शकारंभे ग्राह्याः, वेधशालास्थापनानंतरं वेधानुरूपा अयनांशा ग्राह्याः।

या निर्णयाप्रमाणें काम करण्याकरितां, लो. टिळक (अध्यक्ष), प्रो. नाईक (उपाध्यक्ष), पं. रघुनाथशास्त्री (चिटणीस), वे. खानापूरकर, रा. केतकर, प्रो. गो. स. आपटे, प्रो. ह. ना. आपटे, रा. सा. नि. वि. छत्रे, वगैरे मंडळींची शुद्धपंचांगप्रवर्तन कमेटी नेमण्यांत आली. (ता. ३०-१०-१७, ता. ६-११-१७).

पुण्याच्या द्वितीय संमेलनांत शुद्ध नक्षत्र वर्षमान, शुद्ध अयनगति, व आरंभस्थानीं निःशर रेवती योगतारा घेण्याचें ठरल्यानें पंचांगशुद्धीचीं मूलतत्त्वें शुद्ध रीतीनें प्रस्थापित झालीं या दृष्टीनें हें संमेलन अत्यंत महत्त्वाचें होय. पण अयनांश २३ मानण्यांत केवळ मुंबईच्या निर्णयास मान्यता देणाऱ्या लोकांची पसंती मिळविणें व रा. केतकर यांच्या चैत्रपक्षाचेंहि समाधान झाल्यास पाहणें हाच हेतु दिसून येतो. वास्तविक निःशररेवती योगतारा आरंभीं मानिल्यावर अयनांश रैवत घेणेंच प्राप्त होतें. हा विरोध नाहींसा करण्याचें काम पुण्याच्या संमेलनानें पुढें ढकललें, व लो. टिळकांच्या अपेक्षेप्रमाणें पुढें ३ वर्षांनीं सांगलीस ज्योतिष-संमेलन भरून त्यांत रैवत अयनांशांचा बहुमतानें स्वीकारहि झाला. पण या तीन वर्षांत पुण्याच्या निर्णयावर व तदनुसार केलेल्या पंचांगावर टीकेचा भडिमार

मुख्यतः रा. केतकर व तत्पक्षीय लोक यांकडून झाला. पुण्याच्या निर्णयानुसार वे. शा. मोघे व रा. श्री. दा. भिडे यांचेकडून श. १८४० चें पंचांग कमेटी-नें करवून त्याची केसरींत ता. १२-२-१८ रोजीं जाहिरातहि आली, व स्वतः टिळकांनीं त्या पंचांगाचा पुरस्कार केसरींत लेख लिहून केला. दैवयोगानें पुण्या-च्या निर्णयानंतर शके १८४० च्या या पहिल्या शुद्ध पंचांगांत चैत्र शुद्ध १ चा क्षय असल्यामुळें ज्या दिवशीं ( गुरुवारीं ) पंचांगांत फा. व. ३० लिहावयाची त्याच दिवशीं पाडवा आला. ग्रहलाघवी अशुद्ध गणितानें प्रतिपदेचा क्षय होत नसून पाडवा शुक्रवारीं आला. यामुळें पाडवा गुरुवारीं का शुक्रवारीं करावयाचा याबद्दल वाद माजून त्यांत रा. केतकरांनीं जुन्या मताचे लोकांस आपला पाठिंबा दिला, व संमेलनांत लो. टिळकांनीं जबरदस्तीनें आपलीं मतें लोकांवर लादलीं अशी टीका सुरू केली. ता. ५-३-१८, ता. १९-३-१८, व ता. २६-३-१८ या केसरीच्या तिन्ही अंकांत लो. टिळकांनीं आपल्या सहीवर तीन लेख प्रसिद्ध करून, त्यांत ग्रहलाघवी व चैत्रपक्षी विरोधकांस उत्तरें देऊन पाडवा कमेटीच्या शुद्धपंचांगाप्रमाणें गुरुवारींच करणें कसें सशास्त्र आहे हें समजावून दिलें. ता. २६-३-१८ च्या केसरींत प्रो. नाईक यांनीं संमेलनांत लो. टिळकांनीं अध्यक्ष या नात्यानें योग्य तेंच केलें व सर्व गोष्टी चर्चा, वादविवाद वगैरे होऊन बहुमतानें जशा झाल्या तशाच होऊं दिल्या, तेव्हां असत्य विधानें करून लोकांस घोंटाळ्यांत पाडूं नये अशी केतकरप्रभृति मंडळींस विनंति केली. वे. शा. सं. मोघे यांनींहि पाडवा गुरुवारींच करावा असें आपलें प्रामाणिक मत असून पुण्याच्या निर्णयानंतर ग्रहलाघवी पंचांग न करण्याचा आपला निश्चय जाहीर केला.

लो. टिळकांच्या प्रोत्साहनामुळें शके १८४० च्या शुद्ध पंचांगाचा खप इतक्या जोरानें झाला कीं हजारों प्रती अल्पकालांत खपून कित्येकांना पंचांगेंहि मिळालीं नाहींत. पुढील वर्षाचें पंचांग प्रसिद्ध होण्यापूर्वींच म्हणजे १९१८ च्या सप्टंबरांत लो. टिळक चिरोल केसकरितां विलायतेच्या प्रवासास गेले. जातां-ना त्यांच्या गैरहजिरींत शुद्ध पंचांगांच्या प्रसिद्धीकरणाचें कार्य पंचांगप्रवर्तन कमेटीचे उपाध्यक्ष प्रो. नाईक व इतर सभासद यांजवर त्यांनीं सोंपविलें. शके १८४१चें पंचांग प्रसिद्ध झाल्यानंतर 'हेंच पंचांग प्रचारांत आणा' या मथळ्या-खालीं प्रो. नाईक यांचा लेख ता. ११-३-१९ च्या केसरींत प्रसिद्ध झाला. त्यांत शुद्ध पंचांगाच्या दृक्प्रत्ययावह सूक्ष्मतेबद्दल विवरण करून तिच्याबद्दल सर्वांची खात्री झालीच आहे, तेव्हां लोकमान्यांच्या उपदेशाप्रमाणें एकमुखी पंचांग प्रचारांत आणण्याची सर्वांनीं खटपट करावी अशी विनंति केली आहे.

**कमेटीच्या शुद्ध पंचागाबद्दल** ज्ञानप्रकाश, व इतर पत्रें यांत रा. केतकर, घोंडशास्त्री, वगैरे मंडळींनीं जी टीका चालविली तिला प्रो.

नाईक, प्रो. गो. स. आपटे, रा. सा. आगाशे, व बाबासाहेब पटवर्धन या मंडळींनीं उत्तरें देण्याचा क्रम, सारखा वर्षभर चालूच ठेविला. पुण्याच्या निर्णयांतील तिसऱ्या व चवथ्या भागांचा जो परस्परविरोध तो नाहींसा होऊन शुद्ध रैवत अयनांश स्वीकारण्याची पंचांगशुद्धीची जी शेवटची पायरी ती गांठण्याकरितां जनतेमध्यें अशी जोराची चर्चा होऊन पुन्हां विचार होणें इष्टच होतें. रा. अमृत बापूजी वाघोलीकर यांनीं केसरींत ता. १०-६-१९ रोजीं केतकरांचें चैत्रपक्षीय अयनांश चूक असल्याचा मुद्दा पुन्हां मांडून रा. केतकरांस आव्हान केलें, त्यांस ता. २४-६-१९ रोजीं केतकरांनीं उत्तर दिलें कीं याबद्दल वर्तमानपत्रांत व प्रवचनें देऊन वाघोलीकर यांनीं आपलें म्हणणें सिद्ध करावें. त्यावर केसरीकर्त्यांनीं सुचविलें कीं पंच नेमून त्यांपुढें वादी-प्रतिवादींनीं आपापलें म्हणणें मांडावें व पंचांनीं निर्णय द्यावा. त्यावर केतकर यांनीं 'योग्य पंच मिळणें अशक्य असल्यामुळें पंचांसमक्ष वाद करणें सर्वस्वी निष्फळ व निरुपयोगी आहे' असें उत्तर दिलें. (२-९-१९). मध्यंतरीं वे. शा. धोंडशास्त्री गणेश वाडीकर व रा. सा. ग. सा. खरे वगैरे मंडळींनीं पुण्याच्या निर्णयाचा पुनर्विचार करण्याकरितां सांगली येथें ज्योतिषसंमेलन भरविण्याचें ठरविलें. पुण्याची पं. प्र. कमेटी जरी या खटपटींत प्रत्यक्ष नव्हती तरी संमेलन भरल्यास संमेलनास जाऊन पंचांगशुद्धीचें कार्य पूर्ण करण्याचा त्यांचा निश्चय होता. विशेषतः लो. टिळक १९१९ चे अखेरीस विलायतेहून परत आल्यानंतर कमेटीचा हा निश्चय अधिकच दृढ झाला. संमेलन सांगलीस ता. १५ फेब्रुआरी १९२० रोजीं रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचे अध्यक्षतेखालीं भरण्याचें ठरलें. त्याप्रमाणें संमेलनास लोकमान्य टिळकहि आले व जगद्गुरु शंकराचार्य यांच्या हस्तें संमेलनास प्रारंभ झाला. त्यांत रा. केतकरांच्या शुद्ध वर्षमान घेण्याच्या ठरावास संमति सायनाभिमानीखेरीज करून सर्वांनीं दिली. मुख्य वाद अयनांशाविषयीं झाला. त्यावेळीं लो. टिळक व अध्यक्ष कोल्हटकर यांनीं पूर्वपरंपरेचा इतिहास सांगून निःशररेवतीयोगतारा जी मीनस्थ जयंती तीच प्राचीन कालीं आरंभस्थानीं होती अशाविषयीं खात्री पटविल्यावर निःशररेवतीयोगतारा आरंभीं मानून येणारें वेधोपलब्ध अयनांशच नवीन करणग्रंथांत स्वीकारावे असें ठरलें. याप्रमाणें पंडित रघुनाथशास्त्री यांच्या निरलस व जोराच्या प्रयत्नानें सांगलीस रैवत पक्षाची बाजू उत्तम तऱ्हेनें मांडली जाऊन, रैवत पक्षासच पूर्ण मान्यता मिळाली व पुण्याच्या निर्णयांतील तिसऱ्या भागास विरोधी असलेला चवथा भाग काढून त्याचे ऐवजीं सांगलीच्या संमेलनानें पुढील निर्णय दिला—'राशिचक्रारंभस्थितनिःशररेवतीयोगतारायाः सकाशाद्वेधोपलब्धा अयनांशा नूतनकरणग्रंथीयगणिते स्वीकरणीयाः। नंतर पुणें येथील ज्योतिषसंमेलनांत जी कमेटी नेमिली तीच कमेटी कांहीं

नवीन सभासद घालून व अधिक सभासद करण्याचा अधिकार देऊन नेमण्यांत आली, व तिचेकडे नवीन करणग्रंथ करण्याचें काम दिलें.(ता.२४-२-१९२०).

सांगली येथें झालेल्या कार्याबद्दल केसरींत स्फुट लिहून ता. २४-२-१९२० रोजीं लोकमान्यांनीं पूर्ण समाधान व्यक्त केलें. ' कोणताहि व्यवहार त्रिवार ' झाला म्हणजे तो पुरा होतो, अशी जी सामान्य समजूत आहे तिचा खरेपणा ' सांगलीस भरलेल्या तृतीय ज्योतिष संमेलनावरून चांगला निदर्शनास आला. ' कै. केरूनाना छत्रे यांनीं ४०।५० वर्षांपूर्वी ज्या वादाचा उपक्रम केला, त्याचा ' सांगलीस भरलेल्या तृतीय ज्योतिष संमेलनांत अशा रीतीनें गोड शेवट झाला; ' व केतकरांच्या रैवत व चित्रापक्षांपैकीं रैवत पक्षच अखेर ग्राह्य ठरून त्यांच्या- ' हि श्रमाचें अखेर चीज झालें. ही महाराष्ट्र देशांतील पंचांगप्रवर्तनाच्या इतिहासां- ' त एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट होय, व ती घडवून आणल्याबद्दल या तृतीय ' संमेलनांत जमलेल्या सर्व ज्योतिष्यांचें व धर्मशास्त्रज्ञांचें आम्ही अभिनंदन ' करितों. ' हें उद्गार किती अंतःकरणापासून निघाले आहेत हें सांगावयास नको.

पंचांगशुद्धीचा परंपराशुद्ध, गणितशुद्ध व शास्त्रशुद्ध निर्णय सांगलीस झाला तथापि दुर्दैवानें रा. केतकर व चैत्रपक्षीय इतर लोक यांचा दुराग्रह मात्र कमी झाला नाहीं, व १९२० पासून त्यांनीं चैत्रपक्षास तो बोलून चालून काल्पनिक आरंभस्थानावर तडजोड म्हणून रचिला असतांहि, प्राचीन सिद्धान्त, वैदिक वाङ्मय वगैरेमधून आधार हुडकून काढण्यास व लोकांचा बुद्धिभेद करण्यास सुरुवात केली. सांगलीच्या निर्णयांतील निःशररेवतीयोगतारा हे शब्द मीनां- तील जयंती ( झीटा पिशियम ) तारेला उद्देशून नसून दुसऱ्या कोणत्या तरी तारेला किंवा दीक्षितांनीं सुचविलेल्या मीनांतील मोहिनीला ( म्यू पिशियमला ) उद्देशून होते असेंहि तर्कट रचण्यांत आलें. त्याविषयीं व सांगलीस झालेल्या एकंदर चर्चेविषयीं एक विस्तृत लेख ४-५-२० च्या केसरींत व एक लहान लेख २९-६-२० च्या केसरींत स्वतः संमेलनाचे अध्यक्ष रा. श्री. कृ. कोल्हटकर यांनीं ' सांगलीच्या ज्योतिषसंमेलनानें स्वीकारिलेलें आरंभस्थान ' या मथळ्या- खालीं प्रसिद्ध केले ते वाचनीय आहेत. सर्व भरतखंडाच्या दुर्दैवानें पुढें लवकरच ३१-७-२० रोजीं लो. टिळक कैलासवासी झाले. त्यानंतर पं. प्र. कमेटीच्या विरोधकांकडून असेंहि भासविण्याचा प्रयत्न होऊं लागला कीं स्वतः लो. टिळकां- स मीनस्थ जयंती ( झीटा पिशियम ) ही तारा मान्य नव्हती, ती केवळ पं. प्र. कमेटींतील प्रो. नाईक. प्रो. आपटे व आगाशे यांनीं आपल्याच मतानें कमेटीवर लादली. परंतु सुदैवानें लो. टिळक हे हयात असतांना त्यांनीं कमेटीचे अध्यक्ष या नात्यानें नवीन करणग्रंथास १००० रुपयांचें बक्षीस जाहीर करतांना करण- ग्रंथांतील ' पंचांगाध्याय निरयन असून अयनांश झीटापिशियम म्हणजे रेवती ' नक्षत्रांतील ज्या ताऱ्याचा शर अत्यंत कमी आहे त्या ताऱ्यापासून मोजलेले

'असावे' असें स्पष्ट म्हटलें आहे. (१५-६-१९२०). चित्रापक्षीयांकडून होणाऱ्या आक्षेपांचें खंडण प्रो. नाईक व रा. बाबासाहेब पटवर्धन यांनीं जाहीर सभांत भाषणें करून ( १२-१०-२०, २६-१०-२०, २६-१०-२१ ), रा. आगाशे यांनीं केसरींत ( २०-७-२० ), आचार्यांत व ज्ञानप्रकाशांत लेखमाला लिहून अनेकवार केलें. सांगलीच्या निर्णयानुसार तयार केलेल्या शके १८४३च्या पहिल्या 'शुद्ध निरयन पंचांगा'विषयीं केसरी ८-३-२१ १५-३-२१व २२-३-२१या तीन अंकांच्या अग्र व उपाग्र लेखांत विस्तृत विवेचन करण्यांत आलें आहे तेंहि या विषयाच्या अभ्यासकांस वाचनीय आहे.

१-४-२१ रोजीं **रा. कृ. प्र. खाडिलकर** यांचे अध्यक्षतेखालीं पुण्याच्या नागरिकांची जाहीर सभा भरून तींत 'शुद्ध निरयन' अथवा **'टिळक' पंचांगास जाहीर संमति** देण्यांत आली. केसरींतील मार्चच्या अग्रलेखांवर **रा. केतकर** यांनीं अशी एक क्लृप्ति काढिली कीं सूर्यसिद्धान्तांत **रेवती योगताऱ्याचा शर शून्य** असूनहि उत्तर दिशेचा म्हटला आहे व मीनस्थ जयंतीचा शर दक्षिण आहे तेव्हां मीनस्थ जयंती ही रेवतीची योगतारा नव्हे. या आक्षेपास **प्रो. नाईक** यांनीं ता. २६-४-२१ च्या केसरींत दिलेलें उत्तर व नंतर ता. २०-३-२३, २७-३-२३, ३-४-२३, १०-४-२३ व १७-४-२३ या केसरीच्या पांच अंकांत प्रो. नाईक यांनीं लिहिलेलें 'शुद्ध निरयन पंचांग' या विषयावरील विस्तृत व सर्व प्रकारच्या प्रमाणांनीं युक्त असे लेख हे या विषयाच्या जिज्ञासूंस उपयोगी व खात्री पटविणारे वाटतील. ते 'पंचांग-शुद्धि-रहस्य' या नांवाच्या पुस्तकांत त्यांनीं एकत्र करून छापले असल्यामुळें त्यांचा सारांश येथें देण्याचें कारण नाहीं. हे लेख प्रसिद्ध झाल्यानंतर रा. केतकर यांनीं चित्रमयजगतांत 'बेंटलेचीं चक्रें' 'धनिष्ठा-निर्णित चैत्रपक्ष' वगैरे अनेक नवीन नवीन कल्पना रचून, तसेच 'ज्ञानप्रकाश' व इतर पत्रें यांत सांगलीच्या निर्णयाविषयीं व लो. टिळकांच्या मतांविषयीं लोकांचा बुद्धिभेद करून बरीच खळबळ उत्पन्न केली. त्यांत **रा. केतकर यांची बुद्धिमत्ता, चिकाटी, सततोद्योग,** इत्यादि गुणांबरोबरच वृथा **पक्षाभिनिवेशहि दिसून आला.** त्यांतच पुण्यांतील राजकारणाच्या दुहीची भर पडून 'शुद्ध निरयन' अथवा 'टिळक' पंचांगाच्या **प्रचारास विघ्न** उपस्थित झालें. अधिकमास, विजयादशमी, संक्रांति, इत्यादि प्रत्येक महत्त्वाचे सणाचे वेळीं कमेटींतील सभासद जनतेस आपली बाजू, युक्तिवाद व शास्त्रार्थ यांचे साहाय्यानें केसरींत व इतरत्र लेख लिहून समजावून देत व केसरीकर्तेंहि संपादकीय स्फुटें लिहून जनतेची 'टिळक' पंचांगावरील श्रद्धा दृढ करीत ( ता. १-५-२३, २२-५-२३, ९-१०-२३, १६-१०-२३इ.).केतकरांनीं काढलेलीं **बेंटलेचीं चक्रें, पंचसिद्धान्तिकेंतील 'चित्राधर्धाष्टमभागे' वगैरे वाक्यें, धनिष्ठादि गणना, इत्यादि गोष्टींचें खंडन रा. सा. आगाशे** यांनीं ज्ञानप्रकाशांत, प्रो. गो. स. आपटे (ग्वाल्हेर),

यांनीं विविधज्ञानविस्तारांत, व बाबासाहेब पटवर्धन यांनीं लोकसंग्रहांत केलें तें त्या त्या ठिकाणीं पाहण्यासारखें महत्त्वाचें आहे. तथापि शुद्ध पंचांगासंबंधीं अनेक तर्ककुतर्क रचून त्याच्या विरोधकांकडून जनतेचा जो बुद्धिभेद करण्यांत आला त्यामुळें दुही मिटविण्याची केवळ सात्त्विक इच्छा बाळगणारे कांहीं भाविक लोक व राजकीय पक्षभेदामुळें केसरीस प्रतिकूल झालेले कांहीं लोक यांनीं पंचांगप्रवर्तन कमेटीस एक प्रतिस्पर्धी संस्था म्हणून 'पंचांगैक्यमंडळ' नांवाची सभा स्थापन केली व तिनें पुण्यास ज्योतिषी बोलावून निरनिराळ्या पक्षांचें म्हणणें ऐकून एकमुखी पंचांग प्रवृत्त करण्याची खटपट करावी असा घाट घातला. मंडळाकडून कमेटीस निमंत्रण आलें तेव्हां योग्य रीतीनें पंचांगाच्या प्रश्नाची चर्चा मंडळाकडून होण्याचा संभव दिसल्यास निमंत्रणाचा स्वीकार करून रैवतपक्षाचें समर्थन करावयाचें असा कमेटीनें निश्चय केला व या हेतूस अनुसरून मंडळास पत्र लिहिलें. (ता.४-८-२५). त्यावरून मंडळाच्या अधिवेशनांत भाग घेणें कमेटीस इष्ट वाटलें नाहीं. ज्योतिषअधिवेशन ता.१४ व १५ ऑगष्ट १९२५ रोजीं भरण्याचें ठरलें. त्याचे आधीं नियोजित अध्यक्ष श्री. बाळासाहेब पंतप्रातिनिधि पुण्यास आले तेव्हां त्यांचे पत्रावरून कमेटीचे सभासदांनीं त्यांची भेट घेतली. कमेटीचे दोन पंच, केतकरांच्या चैत्र पक्षाचे दोन पंच, व ग्रहलाघवी पक्षाचे दोन पंच असे ६ पंच नेमावयाचे, त्यांचे पुढें कमेटीनें आपल्या पत्रांत सुचविल्याप्रमाणें लेखी चर्चा व्हावयाची, नंतर पंचांनीं आपापले अभिप्राय द्यावयाचे व जर सर्व पंचांनीं एकमतानें कांहीं अभिप्राय दिला तर तोच अध्यक्षांनीं अधिवेशनाचा निर्णय म्हणून जाहीर करावयाचा व शेवटीं सर्व लेखी चर्चा छापून प्रसिद्ध करावयाची, इत्यादि वादपद्धति ठरली व त्याप्रमाणें कमेटीनें चर्चेत भाग घेतला. अधिवेशनाची हकीकत केसरींत 'पंचांगैक्याचा विफल प्रयत्न' या मथळ्याखालीं ता. १८-८-२५ रोजीं आली आहे ती महत्त्वाची आहे. रैवतपक्षाचें समर्थन प्रो. नाईक यांनीं केलें त्यांत शून्यायनांश वर्ष रेवती योगतारा यांविषयीं जें साधार विवेचन केलें व श्रुतिकालीन कृत्तिकादि गणना, वेदांगकालीन धनिष्ठादि गणना व वराहमिहिरकालीन अश्विन्यादि गणना या सर्वांशीं पं. प्र. कमेटीच्या शुद्ध पंचांगाची जी सुसंगति प्रस्थापित केली, त्यामुळें केतकर व चैत्रपक्षीय लोक निरुत्तर झाले व मग 'चित्रं देवानां...' इत्यादि श्रुतिवचनें चित्रापक्षाला अनुकूल आहेत अशीं विचित्र विधानें करूं लागले. अध्यक्ष व खुद्द केतकीपक्षाचे पंच यांनीं रा. केतकरांस तडजोडीचे शक्य ते प्रकार सुचविले. पण सर्व व्यर्थ होऊन, पंचांस आपापले अभिप्राय स्वतंत्र देण्यास सांगून अध्यक्षांनीं सभा समाप्त केली. त्यानंतर पंचांनीं स्वतंत्र अभिप्राय दिले. (ता. २९-९-२५ चा केसरी पहा). ते अध्यक्षांनीं पाहून त्यांवरून आपलें एक निराळेंच मत प्रसिद्ध केलें. (ता. २२-९-२५ चा केसरी पहा). तें मत व त्यांतील विसंगत विधानें यांविषयीं (ता.१५-९-२५)च्या केसरींत

तीन स्फुटें आलीं. अध्यक्ष श्री. प्रतिनिधि यांच्या निर्णयाचें सविस्तर समालोचन प्रो. नाईक यांनीं ता. २२-९-२५च्या केसरींत केलें, तें या विषयाच्या अभ्यासकास उपयुक्त वाटेल. त्यांत छायार्कपद्धतीच्या अयनांशांच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं सप्रमाण विवेचन केलें आहे. तसेंच 'टिळक पंचांग हेंच शुद्ध पंचांग' या मथळ्याखालीं रा. रा. वि. पटवर्धन यांनीं अध्यक्षांनीं अयनांश ठरविण्यासाठीं घेतलेल्या वचनांचें निरीक्षण केलें तेंहि वाचनीय आहे. (ता. २९-९-२५). पंचांगैक्यमंडळाच्या अधिवेशनांतून फलनिष्पत्ति कांहीं न होतां पंचांगैक्यमंडळाच्या तर्फेच्या चवथ्या पंचांगाची मात्र पूर्वीच्या तीन पंचांगांत कांहीं दिवस भर पडली. परंतु या अधिवेशनांत कमेटीचें रैवत पंचांग तावूनसुलाखून बाहेर पडलें. व आतां त्याच्या शुद्धतेविषयीं किंवा सशास्त्रतेविषयीं कोणाहि विचारी मनुष्यास शंका उरलेली नाहीं. पंचांगैक्यमंडळाचे अधिवेशनापूर्वीच सांगली संमेलनाच्या आज्ञेप्रमाणें पंचांगप्रवर्तन कमेटीनें सुप्रसिद्ध गणिती रा. केशव लक्ष्मण दप्तरी, एम्.ए., बी.एल्. यांचेकडून 'करणकल्पलता' नांवाचा अपूर्व योग्यतेचा करणग्रंथ संस्कृतांत करवून प्रसिद्ध केला. त्याचें प्रो. नाईक यांनीं केलेलें निरीक्षण ता. २०-१-२५ च्या केसरींत आलें आहे. त्यावरून पंचांगशुद्धीचा संपूर्ण इतिहास व ग्रंथाचें स्वरूप लक्षांत येईल. त्याच अंकांत केसरीकर्त्यांनीं ग्रंथकार व कमिटी यांचें अभिनंदन केलें, त्याप्रमाणेंच ग्रंथ तयार करण्याचा व प्रसिद्ध करण्याचा सर्व खर्च केसरीसंस्थेनें लो. टिळकांच्या संकल्पानुरूप अंगावर घेतला याबद्दल केसरीसंस्थेचें अभिनंदन करणेंहि योग्य होय.

पंचांगशुद्धीचा प्रश्न हातीं घेऊन केसरीनें तीन चार तपें त्याचा जो पाठपुरावा केला त्यास क्रमाक्रमानें कसकसें यश येत गेलें हें वरील समालोचनावरून ध्यानांत येईल. शुद्धीचीं तत्त्वें गणित, ज्योतिष व शास्त्र या दृष्टीनें निश्चित झालीं, तदनुरूप करणग्रंथ तयार झाला, त्यावरून पंचांग तयार होऊन लोकांस अल्प किंमतींत मिळूं लागलें. विरोधकांच्या आक्षेपांचें खंडण झालें. इतक्या सर्व गोष्टी झाल्यावर आतां केवळ गतानुगतिकत्वाची मानसिक शृंखला तोडून शुद्ध पंचांगाकडे अज्ञ जनतेची प्रवृत्ति करणें हें समाजांतील सुशिक्षितांचें कर्तव्य तेवढें उरलें आहे. तें त्यांनीं केलें म्हणजे एकमुखी शुद्ध पंचांग सर्वत्र प्रचलित होणें दुष्कर नाहीं. तेव्हां सर्व सामाजिक, राजकीय अथवा धार्मिक पक्षभेद विसरून व कै. लोकमान्य टिळकांनीं पंचांगशोधनाप्रीत्यर्थ केलेल्या श्रमाचे उतराई होण्याची इच्छा धरून, सर्वांनीं शुद्ध निरयन अथवा टिळक पंचांगाच्या प्रसारास सक्रिय साहाय्य करावें हें उचित होय.

---

# केसरीचे पांच संपादक

[ श्री. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए., एस्. टी. सी. ]

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, कै. आगरकर, कै. लो. टिळक, दे. भ. खाडिलकर व दे. भ. केळकर हे जे केसरीचे पांच संपादक इ. स. १९३० सालअखेरपर्यंत झाले त्यांचें बल कशांत होतें हें प्रस्तुत लेखांत पाहावयाचें आहे.

वास्तविक पाहातां विष्णुशास्त्री यांच्या संपादकत्वाचा लाभ केसरीला फार थोडा झाला. आणि म्हणून भावी काळांत या पत्राला जें भव्य रूप प्राप्त झालें त्याचें फार थोडें श्रेय त्यांस देतां येईल. पण हा विचार फार स्थूल आहे. केसरी व विष्णुशास्त्री यांचा प्रत्यक्ष संबंध जरी फार अल्प काळ राहिला असला तरी गर्भश्रीमंताच्या मुलाप्रमाणें केसरीला जें उपजतच महत्त्व प्राप्त झालें तें केवळ शास्त्रीबोवांच्या जनकत्वामुळेंच होय. ' जें काय चालू आहे तें आपल्याला ' नापसंत आहे; हें चुकीचें, इतकेंच काय पण नादानपणाचें आहे; याच्याहून ' किती तरी चांगलें करतां येण्यासारखें आहे; तुम्हांला तें झेपण्यासारखें नाहीं; ' त्याला नवीन विचारांचींच ' माणसें हवीं ' असें प्रथम प्रथम कुरकुरत व मग दरडावून सांगत जे लोक समाजाच्या शिरोभागीं सरसावून येतात त्यांपैकींच विष्णुशास्त्री हे एक होते. विचार, रुचि, धोरण, पराक्रम या सर्व बाबतींत असा प्रकार घडून येतो. पण जेथें विचारसंक्रमण जोरानें चालू असेल तेथें तर हा प्रकार वरचेवर घडतांना दिसतो. विष्णुशास्त्र्यांच्या आधींच्या काळांत कांहीं नवें करावें ही कल्पना उदित झाली होती. पण तिचें रूपांतर वासनेंत झालें नव्हतें; कारण या कल्पनेचें अधिष्ठान स्वाभिमान हें बनलेलें नव्हतें. आपल्या प्राचीन व अर्वाचीन संस्कृतींतील व इतिहासांतील अनुकूल आणि निर्दोष गुणविशेषावर सुधारणाविषयक कल्पना रचिली गेली नव्हती. तर सर्व बाजूंनीं आपला पराभव पत्करून इंग्रज सरकाराशीं गुरुशिष्यभाव कल्पिण्यांत आला होता. या कामांत लोकांचें बरें व्हावें हा हेतु होता यांत शंकाच नाहीं. पण त्याची रचाई ज्या अधिष्ठानावर झाली तें मात्र स्वत्वाभिमानाचें नव्हतें हें त्या वेळच्या पुढाऱ्यांच्या लिहिण्यावरून मनावर चांगलें ठसतें. हा गुरुशिष्यभाव त्याज्य मानून आपल्या सुधारणाविषयक कल्पना स्वत्वाभिमानावर रचाव्या हा प्रबल विचार विष्णुशास्त्र्यां-च्या चित्तांत होता. व त्यास अनुसरून तो प्रकट करावा इतकेंच नव्हे तर प्रभावी करावा हा जोराचा अभिनिवेश त्यांच्या अंगीं होता. प्रथम या अभिनिवेशाचा आविष्कार निबंधमालेंतून दिसूं लागला. सहा सात वर्षे हें काम केल्यावर शास्त्री-

बोवांनाच आपल्या साधनाचा अपुरेपणा प्रत्ययास येऊं लागला. निबंधमाला महिन्यांतून एकदां निघे व तिचें रूप ग्रांथिक असे. म्हणून संपादकाला व वाचकाला साधनांचा व विषयाचा अपुरेपणा जाणवूं लागला. मोरोपंताची कविता, लोकहितवादी, आमच्या देशाची स्थिति इत्यादि विषयांच्या प्रतिपादनावरून, आपली कड घेऊन प्रतिपक्षाशीं जोराची खडेजंगी माजविणारा हा कोणी भक्कम विद्वान् आपल्याला लाभला आहे हें लोकांनीं ओळखलें होतें, व शास्त्रीबोवांनींहि आपल्यासंबंधीं कांहीं विशाल अपेक्षा लोकांच्या मनांत उत्पन्न होऊं दिल्या होत्या. एरवी 'धुराकर्माचा अंगीकार' करण्याच्या त्यांच्या दर्पयुक्त ग्वाहीचा इतर दुसरा कोणचा परिणाम जनमनावर होण्यासारखा होता ! याच गृहस्थानें जेव्हां 'केसरी' काढण्याचा आपला हेतु व्यक्त केला तेव्हां केसरीला लोकप्रियतेचें भातुकें त्यानें जन्माच्या आधींच मिळवून दिलें हें स्पष्टच झालें. इतर वर्तमानपत्राप्रमाणें केसरीला लोकप्रियतेची संपादणी करीत बसावें लागलें नाहीं. यामुळें केसरीचें वैभव वाढलें.

निबंधमालेला जें वाचकांकडून प्रोत्साहन मिळालें होतें, त्यावरून आपल्या मतांची स्वीकार्यता शास्त्रीबोवांना चांगली पटली होती. 'हा आपली कड घेऊन 'भांडणारा, आपल्यावर येणारें परचक्र हिंमतीनें परतवून लावणारा, आणि समर्थ 'प्रतिपक्षाचीहि पर्वा न करणारा लोकांचा वकील आहे.' ही आपल्यासंबंधीं लोकांची भावना आहे हें त्यांनींहि नीट ओळखिलें होतें. या जाणिवेस अनुसरूनच त्यांनीं आपल्या पत्राचें नांव ठेवलें. माणसें म्हणतात 'नांवांत काय आहे ?' नांवांत कांहीं असावयाची जरूरी नाहीं, असें ज्यांचें मत आहे किंवा मनानें असलें तरी नांवांत कांहीं साठवून ठेवण्याची ज्यांना ऐपत नाहीं, त्यांनीं 'नांवांत काय आहे ?' असें म्हणावें. आपले शब्द जर अभिप्राय सांगण्यासाठीं आहेत तर नामरूप शब्दहि साभिप्राय असावा हें खरें आहे. केसरी हें नांव सूचकच आहे. 'मी निजलेला आहें हें पाहून माझ्या संस्कृतीचा, परंपरेचा व अभिमानाचा कोणी वैरी तर आजुबाजूंस फिरकत नाहीं ना, असला तर एका गर्जनेसरशीं त्याला गर्भगळित करीन.' अशा आशयाची, आपल्या पराक्रमाच्या जाणिवेची वृत्ति या नांवानें शास्त्रीबोवांनीं व्यक्त केली आहे. हें नांव जेव्हां प्रसिद्ध झालें असेल तेव्हां सुशिक्षितांचीं जीं टावकीं असतील त्यांच्यांत त्यांसंबंधीं चर्चाहि पुष्कळ झाली असेल व या नांवानें सूचित होणारें 'औद्धत्य' कोणाकोणास सदभिरुचीस सोडून आहे असें वाटलें असेल; पण हा रुचीचा प्रश्न नव्हता. एका सुटसुटीत शब्दांत आपलें धोरण व्यक्त करावयाचें होतें व तें त्यांनीं त्या नांवानें उत्तम तऱ्हेनें केलें. आपल्या खऱ्या अभिनिवेशाचें द्योतक असें हें नांव देऊन त्याचा खुलासा 'गजालिश्रेष्ठा' इ. श्लोकानें केला. ही कड घेऊन उठण्याची प्रवृत्ति केसरीला जन्मतःच शास्त्रीबोवांनीं दिली. म्हणजे आपल्या सामर्थ्याचा बीजमंत्र कोणचा हें त्यांनीं त्यास सांगून ठेविलें. यानें केसरीचें वैभव वाढलें.

शास्त्रीबोवांच्या दुसऱ्या एका धोरणाचा केसरीस जन्मतःच फायदा मिळाला व तोहि निबंधमालेच्या द्वारांच. निबंधमालेंत जे विषय येऊन गेले होते ते अनेक व विविध तऱ्हांचे होते. त्यावरून केसरीच्या विषय-व्यापाविषयीं वाचकांची कल्पना आधींच स्पष्ट झाली होती. इतकेंच नव्हे तर संपादक कोणी का येईना केसरीचें धोरण काय ठेवावें याचें ज्ञान त्याला सुपूर्त करून देण्याचें काम शास्त्रीबोवांनीं केलें होतें. वर्तमानपत्र निघून मग संपादकाच्या रुचीच्या वाढीप्रमाणें, किंवा लोकांनीं कांहीं अपेक्षा बाळगून ढोसल्यामुळें, पुष्कळदां धोरणें व विषय-व्याप वाढत जातात; कारण खुद्द संपादकच उत्तरोत्तर प्रगल्भ होत जातो. पण केसरीला हे सायास पडले नाहींत. निबंधमालेंत जितकें लिखाण राजकीय विषयांवर झालें होतें त्याहूनहि जास्त इतर विषयांवर मिळून झालें होतें. कविता, इतिहास, लोकसमजुती, चरित्रें, विनोद, धर्म, संस्कृति इत्यादि विषयांवर शास्त्रीबोवांनीं पुष्कळच लिहिलें होतें. अर्थात् त्याच शास्त्रीबोवांच्या केसरींत काय येईल याची कल्पना वाचकांना व आपण काय घालावें याची कल्पना संपादकांना सहजच प्राप्त झाली. संपादकीय चाकोरी अगदीं खोल पडली नसली तरी धोरणाचा बोध करून देण्याइतकी खास पडली होती. याचा अर्थ असा कीं लोकशिक्षण म्हणजे काय याची जाणीव जी शास्त्रीबोवांना प्राप्त झाली होती तिचा फायदा केसरीस पुरता मिळाला.

केसरी वर्ष २ अंक १२ यांत आगरकरांनीं विष्णुशास्त्र्यांचें वर्णन दिलें आहे त्यांत ते लिहितातः—‘ आपल्या देशाचें पारतंत्र्य व दारिद्य हीं शास्त्रीबोवांच्या ‘ अन्तःकरणाला जशीं खात तसें दुसरें कांहीं खात नसे. आपल्या लोकांची ‘ दैन्यावस्था पाहून त्यांचा जीव तिळतिळ तुटे. पारतंत्र्याला ज्ञान व दारिद्याला ‘ उद्योग हींच वस्ताद औषधें असें ते नेहमीं म्हणत. लोकांना खरें ऐहिक सुख ‘ होण्याला त्यांची राज्यव्यवस्था कशी पाहिजे याचा विचार त्यांच्या मनांत नेहमीं ‘ घोळत असे. लोकांत विद्याप्रसार होऊन त्यांनीं राजकारणांतील तत्त्वें पाहूं लागावीं ‘ व तदनुसार त्यांनीं वर्तन ठेवून या हतभाग्य भरतखंडास त्यांनीं एकदां तरी ‘ सुदिन आणावा ही त्यांची बळकट इच्छा असे. परकीय लोक राज्य करीत ‘ असल्यामुळें आमचे लोक सत्त्वहीन होत जाऊन अप्पलपोटे, भेकड, हांजीहांजी-‘ खोर, मठ्ठ, निर्लज्ज, अभिमानशून्य असे झालेले पाहून त्यांच्या अंगाचा तिळ-‘ पापड होई. परकीय या नात्यानें इंग्रजांचा त्यांना अत्यन्त कंटाळा असे; पण ‘ त्यांची दृढता, करामत, कौशल्य आणि उद्योग हीं पाहून त्यांस त्यांचें ‘ पराकाष्ठेचें आश्चर्य वाटत असे. हिंदु लोकांचा, हिंदुधर्माचा, हिंदुरिवाजांचा, ‘ सारांश ज्याला ज्याला म्हणून हिंदु हें विशेषण लावता येईल त्याचा त्यांना ‘ मोठा अभिमान असे. सर्वांपेक्षां मराठी भाषेवर त्यांचें जें प्रेम असे तें कांहीं ‘ पुसूंच नये.’......सामाजिक विषयासंबंधानें ‘ यांचे विचार जुन्या मताचे दिसत;

‘ परंतु ते वास्तविक रीतीनें अगदीं पुढें सरसावलेल्या सुधारकाप्रमाणें होते....
‘ इतकें खरें आहे कीं ते या विषयांच्या संबंधानें फारसें कधीं लिहीत नसत; पण
‘ वृद्ध पिढीचा दोष होईल म्हणून आपलीं खरीं मतें पुढें करण्यास ते कधींहि
‘ भीत नसत.’ कै. आगरकर यांनीं विष्णुशास्त्री यांजसंबधानें जो मृत्युलेख लिहिला
त्यांत त्यांनीं शास्त्रीबोवांचें वर दिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे. त्यांत त्यांची
मतपरंपरा स्पष्ट झालीच आहे. पण केसरीची जी मतपीठिका स्थापन झालेली
आपण पहातों तिचें बीजरूपहि या शास्त्रीबोवांच्या मतांत स्पष्ट दिसून येतें.

विष्णुशास्त्री यांचा जो फायदा केसरीस झाला तो येवढाच आहे व तो अप्रत्यक्ष
रीत्या झालेला आहे. त्यांच्या लेखनाचा फायदा अवघ्या एका वर्षांत विशेष
झाला असेल असें वाटत नाहीं.

कै. गोपाळ गणेश आगरकर हे केसरीचे दुसरे संपादक होत. या पहिल्या
पहिल्या वर्षांची जी हकीकत प्रसिद्ध आहे तीवरून आगरकर हे जरी नांव घातलेले
संपादक होते तरी त्यांच्या सहकारी स्नेह्यांचा हात केसरीच्या लेखनांत पुष्कळ
होता असें दिसून येतें. खुद्द लेखनावरूनसुद्धां संपादकांतील बारभाईचा दोष ध्यानांत
येतो. पण आगरकरांचा मतसंप्रदाय एवढा ठळक आणि कडकडून उठाव्या-
सारखा आहे कीं त्यांचें केसरींतील लिहिणें कोणतें याची ओळख जातां जातां सुद्धां
पटण्यासारखी आहे. गरिबींत वाढलेल्या या बेफिकीर शिपायाचें मनोगत स्फटिका-
सारखें शुद्ध आहे. शिवाय जो जो अन्याय दिसेल तो तो बेधडक बोलून
दाखविणार, तुमचीं तीं धोरणें, तुमचें तें तारतम्य, तो मानभावीपणा, ती
स्वकीयांची गय, यांतलें माझ्यापाशीं कांहीं मिळावयाचें नाहीं, योग्य वाटेल तेंच
बोलेन, योग्य वाटेल तेंच करीन असा त्यांचा बाणा होता. शास्त्रीबोवांच्या
संपादकीय मनाचें मुख्य लक्षण म्हणजे जसें ‘ कैवार ’ तसें आगरकरांच्या
मनाचें मुख्य लक्षण म्हणजे ‘ अन्यायाची चीड ’ हें आहे. हा अन्याय
परकीयांनीं स्वकीयांवर केलेला असो किंवा स्वकीयांनीं स्वकीयांवर
केलेला असो. आतां, सर्वच अन्यायांची चीड हें जरी त्यांच्या मनाचें
मुख्य लक्षण होतें तरी सामाजिक अन्यायांकडे त्यांची दृष्टि जास्त वळत असे
यांत कांहींच शंका नाहीं. लो. टिळक यांस आगरकर-डेच्या दिवशीं मुंबईस
बोलण्याचा प्रसंग आला असतां ‘सगळा आगरकर पचविणें फार कठिण काम आहे.’
असे उद्गार त्यांनीं काढले. याचा अर्थ असा कीं आगरकर हे सुधारक होते म्हणून
ते आमचे आहेत व ते आमचे आहेत म्हणून आम्ही त्यांचे आहों असें जे कोणी
म्हणत असतील व अशा रीतीनें आपल्या विभूतीचें निम्में तेज मालवून टाकून,
उरलेल्या निम्यानें आपलीं तोंडें उजळवूं पहात असतील त्यांनीं आगरकर-गौरवा-
चा मक्ता आपणाकडे घेण्याचें साहस करूं नये. कारण ज्यांस ते आपला म्हणून
कवटाळतील त्याच्या सान्निध्यानें कवटाळणारांचा नादानपणा मात्र व्यक्त होईल

हें त्यांनीं ध्यानांत ठेवावें. टिळकांचा हा टोमणा त्या वेळच्या सभा भरविणारांना कसा काय मानवला हें माहित नाहीं. पण टिळकांनीं चंदावरकरांना हिणवलें खरें. पण हें जरी खरें असलें तरी आगरकर कोणच्या नांवानें ओळखले जातील, त्यांचा जीवितहेतु कोणचा समजला जाईल याविषयीं चिकित्सेची कांहीं एक जरुरी नाहीं. एक खूण सर्व वादाला एकदम गति देईल. छापखान्याच्या इ. वाटण्या होऊन आगरकर केसरींतून बाहेर पडल्यावर, जर केसरीच्या मुख्य धोरणाशीं त्यांचें धोरण पूर्ण संवादी असतें तर त्यांनीं राजकारण-निदर्शक असें कांहीं तरी नांव आपल्या पत्रास दिलें असतें. केसरीसारखेंच कांहीं तरी दर्प-विणारें व दिपविणारें व्याघ्र, शार्दूल अशासारखें नांव त्यांनीं आपल्या पत्राला दिलें असतें. पण त्यांनीं त्याचें नांव ‘ सुधारक ’ असें ठेविलें आणि हें सर्वथा वाजवी होतें. आपल्या जीवितहेतूच्या रेषा स्पष्ट झाल्या आहेत हें आगरकरांनीं ओळखिलें होतें. आपण ‘ केसरी ’ काढला खरा पण आपण खरे सुधारक आहों हें, चित्तवृत्तीच्या संथ सरस्तीरावर उभें राहून जेव्हां त्यांनीं निजरूप पाहिलें तेव्हां, त्यांच्या ध्यानांत आलें. ऐन उमेदींत असतांना, सर्व उदार व उदात्त भावना एकदमच उचंबळून हेलावत असतां स्वतःचें रूप त्यांना खंडसंकरानें दिसलें होतें. पण कांहीं वर्षें संवगड्याच्या संगतींत आपल्या स्वभावाला घर्षणानें पैलू पडून त्याचें नेमकें तेज खवू लागलें आहे हें त्यांनीं ओळखिलें. तरी याच्या आधीं वर उल्लेखिलेली अन्यायाची चीड केसरीच्या रकान्यांत सारखी परिस्फुट होत होती. यामुळें केसरीच्या वाचकांना जरी थोडासा आचका बसल्यासारखा झाला असला तरी एकंदरीनें सुशिक्षित वर्गाला जास्त डोळसपणा व अन्तर्मुखदृष्टि प्राप्त झाली यांत कांहींच शंका नाहीं. आगरकरांना विनोदबुद्धिहि होती. तिचाहि कांहीं उपयोग केसरीच्या उत्कर्षाला उपयोगी पडला असेल. त्यांची भाषाशैली एवढी स्वतंत्र होती असें म्हणवत नाहीं कीं जिच्यायोगें विष्णुशास्त्र्यांची नजीकची छाप नाहींशी व्हावी. पण तिच्यांतील नवमतवादाचा आवेश इतका जोराचा असे कीं भाषेचें वस्तुगत बल व हा आवेश हीं एकमेकांपासून विलग करणें वाचकांना सोपें नव्हतें.

लोकमान्य टिळक यांच्या हातीं केसरी आल्यापासून संपादकाच्या धोरणांत एकसूत्रीपणा दिसूं लागतो. सारख्या महत्त्वाचे अनेक संपादक असल्यानें एक-सूत्रीपणा नसावा व एक मुख्य संपादक असून त्याच्या धोरणानें वागणारे अनेक उपसंपादक असल्यानें एकसूत्रीपणा यावा हें साहजिक आहे. बारभाईत कारभारांत एक मत दरवेळीं हटकून मान्य ठरेल असें म्हणता यावयाचें नाहीं. पण तेंच एकहाती कारभार म्हटला कीं बरें वाईट जें काय म्हणावयाचें असेल जें एका आवाजानें म्हटलें जातें व त्याच्यामुळें उत्पन्न होणारें सुखदुःख एकाचेंच असल्या-मुळें तो बारभाईपेक्षां त्या कामांत मनापासून लक्ष घालतो ! या दृष्टीनें सुधारक



कै. लो. बाळ गंगाधर टिळक





दे. भ. नरसिंह चिंतामण केळकर    दे. भ. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर

एकस्या आगरकरांचा व केसरी एकस्या टिळकांचा झाला हें उत्तम झालें. कारण त्याच्या योगानें सुधारक आगरकरांचा व केसरी टिळकांचा असा स्पष्ट दिसूं लागला. म्हणजे आगरकर व टिळक यांचींच रूपें स्पष्ट झालीं.

लो. टिळक यांच्या कोणच्या सामर्थ्यांमुळें केसरीचा उत्कर्ष झाला याची चवकशी करणें म्हणजे उर्मटपणा तर वाटणार नाहींना, असें मनांत येतें. किंबहुना उरफाटें असें विचारतां येण्यासारखें आहे कीं आपलें कोणचें सामर्थ्य त्यांनीं केसरीच्या उत्कर्षास वाहिलें नाहीं? पण हें कसेंहि असलें तरी तीं सामर्थ्यें कोणचीं हें मूळ प्रतिज्ञेस अनुसरून पाहिलेंच पाहिजे.

केसरीकार म्हणजे टिळक हा शब्दप्रयोग मान्य झालेला होता. किंबहुना केसरीला आधीं कोणी दुसरे संपादक होते याची माहिती सुद्धां हजारों लोकांना ग्रंथावरूनच होते. केसरीशीं आजन्म दावा केलेल्या एका पत्रानें केसरी-ज्युबिली-च्या वेळीं जो अग्रलेख लिहिला त्यांत म्हटलें कीं टिळकाएवढा संपादक उभ्या हिंदुस्थानांत झालाच नाहीं. प्रतिपक्षानें केलेल्या या त्यांच्या गौरवाचा अर्थ काय आहे हें पाहिलें पाहिजे. केसरीची एवढी भरभराट जी झाली ती अनेक कारणांनीं झाली असेल हें खरेंच आहे. पण त्यांत केवळ टिळकांचें असें प्रबळ कारण कोणचें? याचें उत्तर थोड्यांत आहे. एकाग्र मतसंप्रदाय, संप्रदायाचा प्रसार करण्याची अनिवार हौस आणि प्रसारकार्यांत येणारीं संकटें दिसूं लागतांच शेपटीनें भुई झोडपीत झोडपीत आरोळी ठोकण्याची तयारी हीं तीं कारणें होत.

केसरीच्या आरंभींच्या वाङ्मयांत आपणांस असें वाचावयास सांपडतें कीं, न्यू इंग्लिश स्कूल काढून लोकांस शिक्षण देण्याचा जो उपक्रम शास्त्रीबुवाप्रभृति मंडळींनीं केला त्याचीच परिणति केसरी व मराठा हीं वर्तमानपत्रें निघणें ही होय. मुलांचें शिक्षण हें शाळा काढण्यानें भागलें. हीं मुलें मोठीं होऊन ज्या स्वार्थत्यागी लोकांनीं त्यांना देशाभिमानाचें वळण दिलें त्यांच्यासारखा देशाभिमान दाखविण्यास तीं प्रवृत्त होतात कीं नाहीं हें पाहाणें येवढेंच काम ह्या मंडळींना करावयाचें नव्हतें, निदान करून आपलें समाधान होईल असें त्यांचें त्यांसच वाटेना. म्हणून जे लोक अगोदरच निबर झाले आहेत व संसारास लागले आहेत त्यांच्या बाबतींतहि लोकशिक्षणाची म्हणून कांहीं जबाबदारी आहे, व ती आपण पतकरावी हेंहि ह्या मंडळींनीं आपलें कामच मानलें. त्यांस अनुसरूनच केसरी निघाला होता. लहानपणच्या बिनडोळस देशाभिमानाचा अंमल संपून आपापलीं मतें व प्रवृत्ति सुनिश्चित झाल्यावर आगरकर व टिळक ह्यांच्यांत जी फारकत झाली म्हणून वर म्हटलें आहे ती उभयतांना अत्यंत हितावह झाली. तत्त्व मान्य पण तपशिलांत फरक, हा भावी काळांत नामरूपाप्रत पावणारा न्याय आपला अंमल सदैव चालवत असतो, हें ह्या प्रकरणींसुद्धां दिसून आलें. देश-

भिमान खरा, लोकांस शिक्षण द्यावयाचें हेंहि खरें, पण देशाभिमान आचरावयास लागल्यानंतर व लोकशिक्षणाचें काम सुरू केल्यानंतर मग माझ्या देशाभिमानाचें आणि लोकशिक्षणाचें रूप कोणचें व तुझ्या देशाभिमानाचें व लोकशिक्षणाचें कोणचें ह्याचा विवेक होऊं लागला व त्यांतील तफावत इतकी वाढली कीं, 'यूयं यूयं वयं वयं' अशी स्थिति प्राप्त झाली. इतकेंच नव्हे तर पुरा बेबनाव झाला.

शाळा सुटून, शुद्ध लोकशिक्षणाचें काम टिळकांनीं हातीं घेतल्यानंतर त्यांच्या अंगच्या सर्व सामर्थ्यांचा विकास झपाट्यानें होऊं लागला, आणि ही सर्व सामर्थ्यें त्यांनीं केसरीच्या पायीं वाहिलीं. विष्णुशास्त्री ह्यांनीं स्वत्वाचा कैवार घेऊन उठणें हें जसें केसरीचें ब्रीद बनविलें, आगरकर ह्यांनीं केसरीस अन्यायाची चीड नेहमीं यावी हें जसें ठरवून घेतलें तसेंच टिळक यांनीं केसरी हा विद्वान् आहे, चौकस आहे, वहीम घेणारा आहे, वाटल्यास छद्मी बोलणारा आहे, व्यक्तीचा अभिमानी नसून तत्त्वाचा अभिमानी आहे, समर्थांच्या कृपाप्रसादाला तो कधीं भाळणार नाहीं, नृपांगणगत खलांची बर्में गुप्त बातमीनें काढण्यास भिणारा नाहीं, राजाच्या अवकृपेनें गांगरणारा किंवा दबकणारा नाहीं पण सर्वांच्याहि वर, लोकशिक्षणाचें काम अंगीकृत केल्यावर, त्यांस नाना प्रकारें शिक्षण देऊन, त्यांच्या राजकीय परिस्थितीचें ज्ञान त्यांना देऊन, 'लोकहो जागे व्हा, आतां निजावयाची वेळ नाहीं, लक्षावधी सह्यांचे अर्ज सरकारांत जाऊन द्या,' येथपासून तों 'सरकारच्या राज्याचा गाडा आडवून पाडला पाहिजे' येथपर्यंत सर्व तऱ्हेचे उपाय योजण्याचा, लोकांस कळकळीनें आग्रह करणारा, हा लोकांचा निर्भय वकील आहे हें त्यांनीं सिद्ध करून दिलें.

टिळक यांनीं सरकारच्या कृत्यांकडे पाहण्याची नवीन दृष्टि लोकांना दिली. इतक्या दुरून येऊन येथें राज्य चालवितात तर त्यांत त्यांचा स्वार्थच असला पाहिजे, व तो स्वार्थ यथायोग्य साधावा म्हणून प्रजांना उपयोगी वाटतील व आपल्याला कार्यसाधक ठरतील अशाच गोष्टी ते करीत राहणार; आणि म्हणून सरकारच्या कृत्यांकडे केवळ भोळ्या भावानें, आणि सरकार हे मायबाप आहे या कल्पनेनें पाहण्याचें सोडून देऊन, त्यांजकडे 'स्वार्थ साधावयास आलेले परकी सरकार' ह्याच नात्यानें लोकांनीं पाहिलें पाहिजे ही कायमची वृत्ति टिळकांनीं लोकांच्या मनांत उत्पन्न केली. ते गुरु आम्ही शिष्य हा भाव उपहास्य बनविला. आपण पूर्वी संस्कृतज्ञ होतों व मोठमोठालीं साम्राज्यें चालविणें, तत्त्वज्ञानें निर्मिणें ह्या गोष्टी आपल्या सहज आहेत आणि म्हणून परकीय अंमलांतून जितके लवकर मुक्त होतां येईल व आपल्या संस्कृतीच्या कल्पना वाढीस लावून गेलेलें स्वातंत्र्य जितकें लवकर पुन्हां प्राप्त करून घेतां येईल तितकें घेतलें पाहिजे ही कल्पना महाराष्ट्रीय जनतेच्या मनांत त्यांनीं कायमची रुजविली.

त्यांचें लिहिणें जेथें उघडून पहावें तेथें वरील कल्पनांची छाप दिसून येते.

सरकारी खात्यांपैकीं एकहि खातें असें नसेल कीं, ज्यांतील कारभाराकडे टिळकांनीं संशयी दृष्टीनें पाहिलें नसेल. खराख्याचें स्वराज्य म्हणून अवहेलिल्या जाणाऱ्या म्युनिसिपालिट्या, तसेंच लोकलबोर्डें येथपासून तों तहत लष्करी खर्चापर्यंतच्या झाडून सर्व खात्यांवर सरकार कोठें काय करीत आहे हें बारकाईनें पहाण्याचा त्यांचा शिरस्ता होता, त्यामुळें केसरींतील लेख्य विषयांचा व्याप फारच मोठा बनून राहिला. पहिल्या परिच्छेदांत म्हटलें आहे कीं, केसरीचा विषयव्याप विस्तृत असावा हें शास्त्रीबुवांनीं आधींच ठरवून दिलें होतें, पण टिळकांच्या हातीं केसरी आल्यानंतर हा व्याप इतका वाढला कीं, शास्त्रीबोवांना कौतुकच वाटलें असतें. आणि ह्या सर्व विषयांची चर्चा करीत असतांना लोकांनाहि माहिती मिळून त्यांनीं शहाणें व्हावें व सरकारशीं झगडण्यास उठावें असा त्यांचा स्पष्ट हेतु असे. त्यांच्या लेखांचीं नुसतीं नांवें सुद्धां, त्यांच्या वरील धोरणाचीं सहज निदर्शक दिसतात. स्थानिक स्वराज्यावर धाड, फेरपहाणीचा जुलूम, शिक्षणावरची करडी नजर, पुण्यांवर पन्नास लाखाची धाड, जाईल्स ह्यांचें राजद्रोहाचें पिसें, जाईल्स ह्यांचीं मुक्ताफळें, जाईल्स ह्यांची ओवाळणी, शेतकऱ्यांनो, व सावकारांनो सावध व्हा, जमिनीची मालकी बुडाली, सावकार मेला आणि कुणबीहि मेला, खालसा जमीन कोणाची! बिलाचें तत्त्वच आम्हांस मान्य नाहीं, उठा, अजून वेळ गेली नाहीं, अशांसारखे मथळे वाचले म्हणजे अगदीं आज पहावयास हवें व विचारांत घ्यावयास हवें असें कांहीं तरी केसरीकारांस म्हणावयाचें आहे असें वाचकवर्गास वाटूं लागे. एकशें दहा कोट रुपयांत कसा उडतो! हें हेडिंग घालणाऱ्या माणसाचें तोंड, हलक्या आवाजांत बजेटाची गंभीर चर्चा करणाऱ्या नामदाराकडे वळलेलें नाहीं तर ज्यांस आपल्याला शिक्षण द्यावयाचें आहे, त्या लोकसमूहाकडे वळलेलें आहे हें सहज दिसतें. कित्येकदां असें होई कीं, प्रसिद्ध होणाऱ्या बातम्यावरून लोकांचे भलतेच म्हणजे स्वतःस नुकसानकारक असे समज होऊन बसत ते तसे राहून देणें त्यांना गैर वाटे. म्हणून वातावरणांत आधीं चालूं असलेल्या विषयाला एकेका शब्दांनीं नेमका वार करून लोकांचें लक्ष ते त्यांजकडे वेधीत; हिंदुस्थानच्या भरभराटीची दंतकथा, व्हाइसरॉय साहेबांच्या शिळोप्याच्या चार गप्पा, आमचे बोलघेवडे व्हाइसरॉय, आकड्यांचें गौडबंगाल, अशासारखे अधिक्षेपपर शब्द घालून, लोकांचें मत आधींच बनवून त्यांची जिज्ञासा ते जागृत करीत. एकादे वेळेस वाचकाला प्रथमदर्शनींच धस्का बसेल असें नांव लेखाला देऊन एकीकडे सरकारला दोषी ठरवून दुसरीकडे लोकांना चिंताग्रस्त करीत. कुलकर्ण्यांच्या हक्कांवर गदा, खोतीच्या हक्कांवर घाला, कमिशनांचा हंगाम, लष्करी खर्चाचें ओझें, असे लेख लिहून सरकारच्या प्रत्येक कृत्याचें डोळ्यांत तेल घालून निरीक्षण केलें पाहिजे असें ते

लोकांस वजावीत. एकादा चौकस आणि हौशी संपादक ह्या प्रकारें अनेक विषय पाहील, पण जर का त्याच्या लिहिण्यांत सरकारवर चढाई करून जाण्याची धमक दिसत नसेल तर लोकांची भक्ति त्याजवर बसणार नाहीं. उलट टिळकांचा बेफिकीरपणा पहा; आमचीं मनेंच फिरलीं पाहिजेत, असें झालें पाहिजे, पण कराल का ? अजून सरकार जागें होईल काय ? बदसल्लागार कोण ? राज्य करणें म्हणजे सूड उगविणें नव्हे, पुण्यांत सध्यां चालू असलेला धुमाकूळ, सरकारचें डोकें ठिकाणावर आहे काय ? गोळी घाला कीं फाशीं द्याः आतां हें टळत नाहीं; अशासारखे आव्हानपर लेख लिहून लोकांच्या अंगीं निर्भय वृत्ति त्यांनीं जागृत केली. सरकारास ज्याप्रमाणें हें दिसून येई कीं, आपल्या प्रत्येक खात्यावर ह्या गृहस्थाची बारीक नजर आहे त्याप्रमाणेंच लोकांनाहि माहित झालें कीं, आपले बारीक सारीक सुद्धां सर्व हितसंबंध आपलेपणानें संभाळणारा हा फी न घेणारा आणि प्रसंग पडल्यास देहदंड सोसून शब्दाला जागणारा, असा आपला वकील आहे. सरकारविरुद्ध **लोकांना उठविणें** हा केसरीनें आपला जीवितहेतु आहे असेंच समजावें असें धोरण त्यांनीं घालून दिलें. जिकडे पहावें तिकडे लोक, **लोकांनीं, लोकांसाठीं**, अशासारखे संग्राहक धोरणाचे शब्द सर्वत्र विखुरलेले दिसतात. ‘ सर्व लोकांस आमची अशी विनंति आहे कीं जें संकट येणार आहे त्याचा वेळींच प्रतिकार करण्यास आपले हातून होईल तितकी खटपट करण्यास मागेंपुढें पाहूं नये.’ ‘ राष्ट्रीय सभा जें काम करीत आहे तें शेतकऱ्यांच्या हिताकरतांच आहे हें जर शेतकरीवर्गास अद्याप कळलें नसेल तर तें त्यांस कळवून देणें हें आमचें कर्तव्य आहे, ही गोष्ट आम्हांसहि मान्य आहे.’ ‘ राष्ट्रीय सभेस पुढील दहा वर्षांत जें वळण द्यावयाचें तें अशा धोरणानें दिलें पाहिजे कीं, ज्यामुळें सभेस शेतकरी, कारागीर वगैरे सर्व लोकांचें साहाय्य मिळून...’ ‘ रायगडावर ज्या तीन हजार लोकांस महाराजांचा प्रसाद म्हणून अन्न वाटण्यांत आलें ते सर्व मराठे होत, व पांढरपेशा लोकांस प्रसाद न देतां आधीं तो सर्व मराठा मंडळीस देण्यांत आला ही मुद्द्याची गोष्ट आहे.’ ‘ त्यांनीं पुढील सालीं कांहीं तरी विशेष गोष्ट करावी आणि ती कोणती म्हणाल तर शेतकरी वगैरे लोकांत प्रांतिक सभेबद्दल जागृति उत्पन्न करणें ही होय.’ ‘ जमीनधारा, जंगल, मीठ, अबकारी वगैरे बाबतींत गरीब रयतेचे काय हक्क आहेत हे त्या रयतेस समजून देण्याच्या उद्योगास आम्हीं आतां लागलें पाहिजे...पुढील सालीं हजारों शेतकरी प्रेक्षक म्हणून तरी जमतील अशी आम्हांस उमेद आहे.’ ‘ तालुक्यांतील पुढाऱ्यांनीं उमेद बाळगिली पाहिजे, त्याकरितां सर्व खाजगी कामें बाजूला ठेवून कळकळीनें उद्योग केला पाहिजे व रयतेला धीर देऊन...’ ‘ अशा वेळीं मेलों तरी बेहेत्तर पण कायद्यानें दिलेल्या सवलतींचें पुरें माप आम्ही आपल्या पदरांत पाडून घेऊं असा लोकांनीं निश्चय

केला पाहिजे व हा निश्चय करण्याचे कामीं त्यास ठिकठिकाणच्या पुढारी लोकांनीं मदत केली पाहिजे.' 'आमच्या ह्या विनंतीस तथास्तु म्हणून चोहोंकडून जबाब येईल अशी आमची खात्री आहे.' 'शेतकरी किंवा मजूर लोक हे अज्ञान व गरीब असतात. ह्यांच्याकरितां खरा उद्योग सुशिक्षित लोकांनींच केला पाहिजे व तो जर तालुक्यांतील पुढारी लोक करणार नाहींत तर आमच्या देशाचें दुर्दैवच अद्याप संपलें नाहीं असें म्हणावें लागेल.' 'विशेषेंकरून तालुका-बोर्डांचें व म्युनिसिपालिट्यांचे निवडलेले मेंबर्स, वकील किंवा इतर सभ्य गृहस्थ ह्यांनींच वर सांगितल्याप्रमाणें ठिकठिकाणचीं कामें केलीं पाहिजेत.' 'म्हणूनच आमच्या लोकांनीं...एवढ्यानें निराश होऊन आपला क्रम सोडून देऊं नये अशी त्यास आमची विनंति आहे.' 'तसें न करतां लोकांनीं आपली बाजू पुन्हां नीट रीतीनें सरकारपुढें मांडावी अशी त्यांस सूचना करून...' 'येवढ्या-साठीं सरकारी ठरावाचें मुद्दाम भाषांतर दिलें आहे, त्यांतील तत्त्व लक्षांत घेऊन शेतकरी लोकांनीं साऱ्याच्या तहकुबीबद्दल व सुटीबद्दल सरकारकडे मागणी करावी.' 'लोकनियुक्त सभासदांना खेडेगांवांतील शेतकऱ्यांच्या स्थितीचा अनुभव नसल्यामुळें त्यांचें म्हणणें विचारांत घेण्यासारखें नाहीं, त्यास तर्कशास्त्र कळत नाहीं अशा प्रकारचे उद्धटपणाचे व उपमर्दकारक आक्षेप लोकपक्षाच्या सभासदांविरुद्ध करून सरकारचा हट्ट पुरविण्याचें आपलें धोरण तडीस नेलें.' 'लोक-मतांविषयीं बेपर्वाई' 'लोकमताचा कांहींएक विचार न करतां' अशासारखे शेंकडों शब्दप्रयोग केसरींतून काढून देतां येण्यासारखे आहेत, आणि त्यांत मौज ही आहे कीं, ही सर्व उठावणी टिळकांनीं आज किंवा काल केलेली नाहीं तर पुरी तीस वर्षांच्या पूर्वीं केलेली आहे. ह्यावरून लोकांना शिक्षण देऊन त्यांचे हक्क त्यांना दाखवून देऊन, ते बजावण्याच्या आड जर कोणी येत असेल तर त्यांना त्याच्याविरुद्ध उठवून केसरीचें व्रत कोणचें हें त्यांनीं केसरीला पुन्हां पुन्हां शिकविलें.

वर सांगितलेंच आहे कीं, सरकारच्या कारभारांतील प्रत्येक खात्यावर त्यांची दृष्टि असे. लोकांची तरफदारी, परंपरेची तरफदारी, सरकारचा कावा उघडकीस आणणें, अँग्लो इंडियन लोकांचें व वर्तमानपत्रांचें गूढ व दुष्ट हेतू उघडकीस आणणें, दरबारचीं छिद्रें न्याहाळून ठेवणें, पोलिसांची दांडगाई व कोर्टांतील अन्याय हीं चव्हाट्यावर मांडणें, हिंदु-मुसलमानांचे संबंध पहाणें, नव्या उद्योगांचा पुरस्कार करणें, प्राचीन शोधांचे अर्थ बसविणें, एक ना दोन अशा हजारों बाबी केसरीच्या रकान्यांतून लोकांपुढें येऊं लागल्या व वर उद्धृत केलेली विष्णुशास्त्री ह्यांची मतपरंपरा केसरींत अक्षरशः संभाळिली गेली. बरें, हें करीत असतां सर्वसमर्थ सरकाराची भीति न बाळगतां इतकेंच नव्हे तर त्याला उलट दरडावून बोलण्याची जी धमक त्यांनीं केसरींत उत्पन्न

केली, तीमुळें केसरीचें नांव यथार्थ झालें. जों जों संकट येई तों तों केसरीचा धैर्यमेरु उंचावत जाणार हें कायमचें प्रमेय त्यांनीं लोकांस सांगून दिलें. त्यामुळें असें झालें कीं, केसरीपत्रास सरकारदरबारीं दरारा प्राप्त झाला. पोलिसखात्यांत वचक उत्पन्न झाला, कायदेमंडळांत त्याच्या म्हणण्याची खाजगी चिकित्सा होऊं लागली, लोकांत आदरच काय पण भक्ति उत्पन्न झाली आणि केसरी म्हणजे महाराष्ट्राच्या अभिमानाचें, बुद्धीचें, शौर्याचें उंच फडफडणारें निशाण असे लोक समजूं लागले. हें सर्व वैभव टिळकांनीं केसरीला प्राप्त करून दिलें. पण येवढ्यानें झालें नाहीं.

केसरीचे रकाने म्हणजे मोठी मानाची जागा होऊन बसली. त्यामुळें प्रत्यक्ष सरकारांतील किंवा त्यांच्या छायेंतील लोक सोडून बाकी सर्व लोकांत त्यांच्याविषयीं ममत्व उत्पन्न होऊन आपल्यापाशीं जें काय चांगलें चांगलें असेल तें सर्व केसरींत नेऊन मांडावें अशी उत्सुकता सर्वांना उत्पन्न होऊं लागली. यामुळें इतिहासशोध, कविता, प्राच्यविद्या, पुराणग्रंथ, पंचांगें, ज्योतिष अशासारखे विषय ज्यांना समजत असत त्यांनीं आपलें लिहिणें केसरीमध्यें यावें अशी उत्सुकता बाळगावी असें झालें. कोणी विद्वानानें कांहीं लिहून धाडलें तर अल्पविद्य संपादकाला मोठा लाभ झाला असें वाटतें आणि लिहून धाडणारा विद्वान् आपण ह्याच्यावर मोठा उपकार करीत आहोंत असा गर्व वहातो; परंतु केसरीचे संपादक टिळक ह्यांची बुद्धि सर्व-संचारक असल्यामुळें त्यांना असल्या अनुग्रहाची जरूरी नव्हती; उलट प्रसिद्धीचा अनुग्रह त्यांनीं आपणांवर करावा व आपल्या शोधासंबंधानें किंवा मतासंबंधानें खुद्दांनीं चार अक्षरें लिहावींत अशी अपेक्षा चांगले विद्वान् लोक सुद्धां बाळगूं लागले. हें वैभव टिळकांनीं केसरीला प्राप्त करून दिलें.

केसरीच्या धोरणांतील बारीक बारीक बाबीसुद्धां टिळकांनीं कायम करून टाकल्या. प्रतिपक्षाची बाजू काय आहे हें लक्षांत घेण्याचें नाकारण्यानें आपला मुद्दा माणसांना सहजच प्रस्थापिता येतो. हें त्यांनीं केलें नाहीं. आपणांस लोकांशीं काय करावयाचें आहे, आपलें काय म्हणणें आहे तें सांगावें म्हणजे झालें, असला संभावित दुर्बळपणा केसरीनें दाखवावा हें टिळकांना केव्हांच खपलें नाहीं. म्हणून केसरीच्या बहुधा प्रत्येक लिहिण्यांत कांहीं तरी चिकित्सा, वाद, भांडणें, मर्मच्छेद, आघात, असले प्रकार असावयाचेच. केसरीचें हें वळण टिळकांनीं ठरवून दिलें. तसेंच सरकारचें किंवा इतरांचें म्हणणें पुढें आणून त्यांच्या बाजूनें एकाद्या प्रश्नाचा विचार करतां करतां आपल्या बाजूचा विचार करावयाचेंच राहून जावें असा भोळा प्रकार केसरीनें अंगिकारिला नाहीं. दुसऱ्याची बाजू पूर्ण सांगणें, ती चुकीची असल्यास तसें ठरवणें व लोकांची बाजू सांगून सिद्ध करणें इतकें सुपूर्त धोरण त्यांनीं केसरीस आंखून दिलें. मात्र जेथें इतकें सर्व करण्याचें कारण नसेल तेथें लोकपक्षाच्या बाजूनें काय म्हणतां येण्यासारखें असेल तेवढें म्हणून टाकावयाचें असें धोरण

ते ठेवीत असत. मोहाचीं फुलें कुजवून कातकरी व कोळी लोक त्यांची दारू बनवितात ह्या सरकारी आक्षेपाला, त्यांनीं सरकारी रिपोर्टांतूनच उत्तर दिलें कीं, कातकरी कोळी लोक ह्या फुलांची भाजी करितात, ते तीं गुरांस घालितात व म्हणून कुजविण्यापुरतीं तीं त्यांजपाशीं शिल्लकच उरत नसतील. कातकऱ्यांचा आणि कोळ्यांचा पक्ष, लोकांना पाठिशीं घालून बोलणाराशिवाय, इतरांना घेतां येणार नाहीं. उडाणटप्पूचा कायदा तयार होऊं लागतांच कातकरी वगैरे लोकांची ह्या कायद्यानें विनाकारण छळणूक कशी होईल, पोलिस लोक त्याचा गैरफायदा कसा घेतील, आणि गोऱ्या उडाणटप्पूंना मात्र सरकार कशा सवलती देईल ही बाजू त्यांनीं सरकारापुढें मांडली; मामलेदार लोकांनीं लांच दिले ह्याचें कारण सांगतांना गोरे अधिकारीच लंपट झाले आणि म्हणून नाइलाजानें मामलेदारांनीं लांच दिले असें त्यांनीं प्रतिपादन केलें. आपल्या गळ्यांत धोंगडें घेण्याची त्यांची प्रवृत्तिच नव्हती. बंगाल्यांत कांहीं सुशिक्षितांनीं चोऱ्या केल्या म्हणून सरकारनें गोंगाट करितांच, 'बुभुक्षितः किं न करोति पापं!' तुम्हीच त्यांना अन्नावांचून ठेवीत आहांत म्हणून असें होतें, असा जबाब केसरीनें दिला आणि दुष्काळानें जेव्हां लोक पटापट मरूं लागले तेव्हां इतर कारणांच्या समूहांत 'राजा कालस्य कारणम्' हें कारण प्रामुख्यानें सांगितलें! ह्यामुळें असें झालें कीं, केसरी पत्र आपणांस उसंतच पडूं देत नाहीं असें सरकारास वाटूं लागलें. पण शेवटीं, केसरीचें खरें वैभव जें, कीं पुढारीपण करावयाचें तें, त्याला टिळकांनीं मिळवून दिलें. आठवडाभर जें कांहीं गांवांत घडून येई त्याच्यावर चुरचुरीत टीका करावयाची येवढाच आपला धंदा आहे असें मानणें त्यांच्या कारकीर्दींत बंद झालें. आठवडाभर आपण कांहीं तरी उठावणी करावयाची, लोकांस कांहीं करावयास सांगावयाचें, दौरे काढावयाचे, सुरू केलेलें काम पुढें किती गेलें हें पहावयाचें, कांहीं नवीन बातमी राखून किंवा छद्मा हेरून नवीनच प्रकरण उपस्थित करावयाचें आणि त्याविषयीं केसरींतून उत्तेजनपर मजकूर लिहावयाचा किंवा भडिमार सुरू करावयाचा असें धोरण त्यांनीं ठेविलें. थोडक्यांत म्हणजे असें कीं केसरी ही इतरांच्या प्रयत्नांची नोंदवही नसून आपल्या पुढारीपणानें चाललेल्या चळवळींचें एक अत्यंत प्रबल साधन आहे, हें वैभव टिळकांनीं केसरीस मिळवून दिलें.

टिळकांच्याच हाताखालीं संपादकत्वाची शिकवण घेणारे जे दोन मोठाले संपादक झाले त्यांपैकीं दे. भ. खाडिलकर ह्यांच्यासंबंधीं आतां लिहावयाचें. केसरीचें स्वतंत्र संपादकपण खाडिलकर ह्यांच्याकडे थोडा वेळ राहिलें; व तो कालहि आपत्काल असल्यामुळें संपादकानें कांहीं स्वतंत्र करून दाखविण्यास अत्यंत प्रतिकूल असा होता व अगदीं शेवटीं म्हणजे १९१८ सालीं ते जेव्हां एकदां संपादक झाले तेव्हां लोकमान्यांच्या कीर्तीची नौबत इतकी जोरानें

वाजत होतीं कीं संपादकांचें स्वतंत्र अस्तित्व भासमान होण्यासारखेंच नव्हतें. पण जरी असलें तरी टिळकांनीं पहिल्या शिक्षेंतून परत आल्यावर सांधा बेमालूम जुळविल्याबद्दल जी त्यांची तारीफ केली तीवरून वर उल्लेखिलेलें लोकमान्यांचें धोरण त्यांनीं अगदीं आत्मसात् केलें होतें हें उघड दिसतें. परंपरेचा अभिमान, तिचा न्याय्यपणा स्थापित करण्याविषयीं तत्परता, सरकाराशीं तुसडपणा, कांहींएक खोल पाहण्याची तऱ्हा, जळजळीत देशाभिमानाची शिकवण, व प्रतिपाद्य विषयांतील गोष्टी नजरेपुढें ठळक उभ्या करील अशी शब्दरचना हे खाडिलकरांच्या सामर्थ्याचे मुख्य विशेष होत. तसेंच तरुण लोकांनीं स्वदेशासाठीं काय वाटेल तें करण्यास प्रवृत्त व्हावें अशासारख्या विचारांचा सारखा भीजपाऊस केसरीच्या रकान्यांत पाडीत ठेवण्याकडे त्यांचा नेहमीं कल असे. ह्यामुळें त्यांच्या लिहिण्यांत स्फूर्ति देण्याचा गुण प्राप्त झाला होता. त्यांच्या लिहिण्यांतील दुसरा एक विशेष म्हणजे परदेशांतील राजकारणासंबंधानें ते नेहमीं पुष्कळच लिहीत, त्यामुळें केसरीच्या वाचकाची दृष्टि विशाल होण्याला चांगलीच मदत होत असे. विशेषतः युद्धविषयक बात्मी चटकदारपणें करून सांगण्यांत त्यांचा अगदीं हातखंडा होता. ते स्वतंत्र झाल्यानंतर त्यांच्या मनःशक्तींना पूर्ण वाव मिळाला असें दिसतें. कारण नवाकाळ पत्र आपल्या एकट्याच्या सामर्थ्यावर त्यांनीं किती भरभराटीस चढविलें आहे हें सर्वांस माहीत आहे. अनुयायित्व पतकरल्यानंतर तें अत्यन्त चिकाटीनें व निष्ठेनें संभाळणारा इतका समर्थ संपादक आपल्या इकडे इतर कोणी झालाच नाहीं.

ह्यानंतर श्रीयुत केळकर ह्यांच्यासंबंधानें लिहावयाचें. सतत पस्तीस वर्षेपर्यंत उपसंपादक किंवा मुख्य संपादक म्हणून यांनीं केलेल्या लेखनाचा लाभ केसरी पत्रास झाला आहे. वयाच्या जरी २४-२५ व्या वर्षी यांनीं लिहिलेले लेख वाचले तरी त्यांतहि बुद्धीचा स्वतंत्रपणा, बहुश्रुतपणा, विविध विषयांचा व्यासंग हीं एकदम दिसून येतात; आणि उत्तरोत्तर या व यासारख्या इतर संपादकीय गुणांचा त्यांच्या लेखनांत सारखा उत्कर्ष होत चाललेला दृष्टीस पडतो. टिळकांच्या छायेखालीं त्यांनीं पुष्कळच लिहिलें पण त्यापेक्षां किती तरी जास्त टिळक तुरुंगांत असतांना, पुण्यांत असूनहि संपादक नसतांना व दिवंगत झाल्यावर, केळकर ह्यांनीं स्वतंत्र संपादक म्हणून लिहिलें आहे. येवढ्या अवकाशांत निरनिराळ्या प्रसंगीं त्यांच्या भिन्न भिन्न सामर्थ्यांचा उपयोग केसरीस झाला. टिळक १९०८ सालीं तुरुंगांत गेले तेव्हां केसरीची जपणूक हेंच मुख्य काम होतें. तें काम त्यांनीं इतक्या कुशलतेनें पार पाडलें कीं, 'तात्यासाहेब होते म्हणून आम्हांला उभे रहावयास तरी जागा उरली' असें खुद्द टिळक कृतज्ञतेनें म्हणाले. या प्रसंगीं त्यांच्या स्वभावांतील समतोलपणा, बोलावयाचें तें बोलून टाकून वरती नेमस्तपणाचा आविर्भाव, व त्यांची अनेक प्रकारच्या ज्ञानाची उपासना

या गुणांचा अतिशय फायदा झाला. सरकारी जांच इतका होता कीं, केसरी कोणत्या आठवड्यांत बुडेल ह्याची शाश्वती नव्हती, व बुडविला नाहीं तरी त्याचें अन्न तोडण्याची पराकाष्ठेची खटपट सरकार करीत होते. तसेंच संपादकांना प्रत्यक्ष आपल्या दरबारीं पाचारून धमकीवजा मजकूर बोलण्याची बेपर्वाई कांहीं कांहीं अधिकारी दाखवीत असत. अशा प्रसंगीं केसरीच्या बाण्यास शोभेल असें तर लिहावयास हवेंच होतें, कारण केसरी गवत केव्हांच खाणार नाहीं हें ठरलेलें; बरें, तसें लिहावें तर सरकार अजिबात बुडवावयास टपून बसलेलें. अशा स्थितींत राजकारणावर लिहिणें म्हणजे शुद्ध तारेवरची कसरत होती; पण अशाहि प्रसंगीं सरकारास टाफरून त्यांनीं जें निर्भयतेनें लिहिलें त्याची आठवण तेव्हांचे वाचक कधींहि विसरणार नाहींत. प्रत्यक्ष उठावाची अशी चळवळ त्या वेळेस कोणतीच नव्हती, तीं असणें अगदीं निपटून अशक्य होतें; अर्थात् एकसूत्री, अंकामागें अंक, अशा तऱ्हेचे उठावणी देणारें लिखाण होण्यास अवसरच नव्हता. पण प्रायः एकहि अंक असा जात नसे कीं, जो वाचून सरकारी अधिकाऱ्यांची चडफड झाली नाहीं. सरकारी मर्में हुडकून काढून त्यावर घाव घालण्याचें काम अखंड चाललेलें होतें. प्रत्यक्ष राजद्रोह असा तर कोठें हाताशीं लागत नाहीं, पण समुच्चयानें बघावें तर सरकारचा पाणउतारा होईल, तें फजीत होईल, व लोकांच्या मनांतील त्याच्याबद्दलचा वांकडा पीळ अधिकच भरत जाईल, असें लिहिणें खळ न पडतां चालू होतें. टिळकांच्याविषयीं लिहितांना वर उल्लेखिलेला जो विषयव्याप त्याचा विस्तार या ५।७ वर्षांत अधिकच झाला. त्याचीं कारणें दोन, एक आतांच उल्लेखिलेली राजकीय विषयासंबंधानें सरकारची असलेली करडी नजर व दुसरें खुद्द संपादकाचा ज्ञानलोभ. तसेंच केसरीच्या इतर कोणाहि संपादकाच्या अंगीं विशेष प्रकारें नसलेली वाङ्मयाची लज्जत केळकरांच्या अंगीं फार मोठी. तिचाहि उपयोग या कालांत त्यांना फार झाला. वाङ्मयांत अवतरणारे उपहास, विनोद, छद्मभेद, हे जे दुय्यम प्रकारचे पण अगदीं अवश्य असे गुण लेखकांत असावे लागतात त्यांचा विकास या काळच्या लिहिण्यांत पुष्कळ झाला म्हणून त्यांच्या वाङ्मयाच्या हौशीचा उल्लेख वर केला आहे असें नव्हे. तर वाङ्मयाचा मुख्य आधार म्हणजे जें विचारसौष्ठव तें या काळच्या त्यांच्या लिहिण्यांत जोरजोरानें स्फुट होत असलेलें दिसतें. जो प्रसंग उद्भवेल त्याच्यासंबंधानें स्वतंत्र व सुंदर अशा विचारांनीं, आमूलाग्र भरलेले लेख दर आठवड्यास लिहिणें हें कांहीं सामान्य काम नव्हे. दर आठवड्यांत कांहींना कांहीं नव्या, स्वतंत्र, व मनोज्ञ अशा विचारांच्या तलमसुती व गर्भरेशमी पाटावाची विणकर सारखी चाललेली पाहून वाचकांना मोठा अचंबा वाटे. ह्या लेखनामुळें असें झालें कीं, केसरीच्या वाचकवर्गाला जें एक केवळ राजकारणी वळण लागलें होतें त्याच्या जोडीला विचारांचें

सौंदर्य, औदार्य, सहिष्णुता, वैविध्य, इत्यादींची आवड ही उत्पन्न झाली. संसारांत आपत्काल आला असतां ज्याप्रमाणें धैर्य उपयोगी पडतें त्याप्रमाणें राजाच्या अवकृपेनें कोंडून गेलेल्या काळांत संपादकाला धैर्याचे जोडीस स्वतःची प्रतिभा, दुसऱ्याच्या ज्ञानाचा आदर, आणि अनेक विषयाबद्दलची रसिकता हीं कशीं उपयोगी पडतात हें वाचकांना व कदाचित् इतर वर्तमानपत्रकारांनाहि दिसून आलें असेल.

टिळक सुटून आल्यावर पण विशेषतः महायुद्ध सुरू झाल्यानंतर राजकारणाचा नवा डाव चालू झाला; व राजकारण हेंच केसरीचें मुख्य अंग असल्यामुळें केळकर यांचे बहुतेक सर्व लिहिणें स्वराज्यसंघाचा मतप्रसार व मँटेग्यूच्या सुधारणा यासंबंधानेंच झालें. राजकीय मतप्रसाराचा जो केसरीचा मुख्य पेशा तो या काळांत इतका बेसुमार पोसला कीं, जसें एकादें अंगांत यावें तसा प्रकार झाला. पण हें सर्व विचारधन व हा उत्साहाचा आवेग योग्य त्या तोलदारीनें वाचकांपुढें आल्यामुळें केसरीचा दर्जा, बोज आणि प्रतिष्ठा हीं वृद्धिंगतच झालीं.

पण केळकर यांचा खरा गौरव १९२१ सालपासून जीं ५।६ वर्षें मोठ्या धामधुमीचीं गेलीं त्यांतील मजकुरानें होतो. आतांपर्यंत स्वतंत्र पुढारीपण असें त्यांनीं केलें नव्हतें. टिळक असतांना टिळकच तें करीत, व ते तुरुंगांत असतांना तें करतां येणें कोणासहि अशक्यच होतें. टिळकांच्या नंतर महात्मा गांधी पुढारी झाले व आपल्या मतस्वातंत्र्याचा जो हक्क केळकर हे खुद्द टिळकांच्या संगतींत गाजवीत असत तोच त्यांनीं गांधींच्या संगतींत गाजविला. फरक इतकाच कीं, त्यांच्या म्हणण्याचा टिळकांनीं आपल्या म्हणण्यांत समावेश करून घेऊन व त्यांना आपलें पटवून देऊन त्यांचा संग्रहच केला. पण महात्मा गांधींच्या बाबतींत हा प्रकार विपरीत झाला. पण त्यानें एक गोष्ट पुन्हां एकदां सिद्ध झाली, ती ही कीं, केसरीचे संपादक स्वतंत्र विचार करितात, इतकेंच नव्हे तर चांगल्या चांगल्या बुद्धिवंताशीं बौद्धिक झुंज करून त्यांना रेटीत रेटीत नेऊन 'मला आपलें असें वाटतें' ह्या स्वयंभू प्रमाणांशिवाय दुसरें कोणचेंहि प्रमाण शिल्लक उरूं देत नाहींत. १९०९ ते १९१४ ह्या काळांत ज्याप्रमाणें त्यांची ज्ञानलालसा, वाङ्मयभक्ति, आणि विचारांतील आवरशक्ति हीं स्पष्ट झालीं, त्याप्रमाणेंच १९२१ ते २६-२७ पर्यंतच्या काळांत त्यांची मतस्वतंत्रता, सामान्य विधानांत गुप्त रूपानें वावरत असलेले हेत्वाभास उघडकीस आणण्याची कुशलता, माणसाच्या मनाची सूक्ष्म ओळख व मनस्वी पुढाऱ्याच्या योग्यतेचा मान करूनहि त्याचें विचारवैकल्य त्यांस दाखवून देण्यास लागणारा आत्मविश्वास हे गुण अत्यंत ठळकपणानें नजरेस आले. बुद्धिदृष्ट्या म. गांधींचें धोरण चूक आहे असें दिसूं लागतांच त्यांच्या लोकप्रियतेचा मुलाहिजा न बाळगितां आपलें

मत ठासून सांगण्याच्या कामीं जी निर्भयता त्यांनीं दाखविली ती केसरीच्या कुलव्रताला साजेशीच होती; आणि सतत पांच, सहा वर्षें बौद्धिक झुंज करून लोकमान्यांचें प्रतिसहकाराचें तत्त्व पुनरपि प्रस्थापित करण्याच्या बाबतींत त्यांनीं दाखविलेली ईर्षा व चिकाटी ही तर संपादकीय इतिहासांत इतर क्वचितच पहावयास सापडेल. वाद करतांना सुद्धां उगाच धुरोळा उठविण्याची गोरज पद्धतिहि त्यांनीं कधीं अवलंबिली नाहीं. हें वैभव त्यांनीं केसरीस दिलें. सामान्य विधानांत खोल शिरून त्याचे तपशील न्याहाळावयास बुद्धीला शीण पडतो व म्हणून पुष्कळ लोक ही दगदग न करितां सामान्य वचनाची पेरणी करून वाचकांत भोळेपणा उत्पन्न करितात. केळकरांनीं या कालांत जर कांहीं केलें असेल तर तें हें कीं, हा वैचारिक भोळसरपणा अगदीं घालवून त्याच्या जागीं हिशेबीपणा आणिला. ज्याप्रमाणें माणसाच्या जीवितांत, त्याप्रमाणें वर्तमानपत्राच्या जीवितांतहि मतप्रवाहास अनुसरून चढउतार हे अवश्यच आहेत, आणि म्हणून ते तसे झाले तरी आपली विचारनिष्ठा लोपूं देऊन पत्राची भरभराट मात्र जिवंत ठेवण्याची आशा धरणें हें त्यांनीं गौणच मानिलें. पुढारीपण आणि संपादकत्व हीं दोनहि टिळकांच्या अंगीं एकवटलीं होतीं. पण आपण मुख्यतः संपादक आहोंत पुढारीपण प्रसंगप्राप्त म्हणून आलें तर करावयाचें ही जाणीव मात्र केळकर ह्यांच्या धोरणांत पहिल्यापासून शेवटपर्यंत दिसते. म्हणून उत्पन्न झालेल्या प्रसंगांत वर्तमानपत्राची म्हणून जीं कर्तव्यें तीं करण्यांत आपलें सर्व सामर्थ्य ते वेंचीत; त्यामुळें प्रायः अडचणीचा असा कोणताहि प्रसंग प्राप्त झाला तर आपलें संपादकांचें कर्तव्य, केसरीच्या धोरणास अनुसरून पुरेपूर करण्याच्या कामीं ते सदैव तत्पर असत.

शेवटीं शास्त्रीबोवांच्यापासून तों केळकरांच्यापर्यंत सर्वांनीं प्रगट केलेला जो गुण त्याचा समुच्चयानें उल्लेख करणें हें उचित आहे. महाराष्ट्र देशांत जीं कांहीं प्रतिभाशाली, तेजस्वी, मनस्वी अशीं माणसें झालीं त्यांपैकीं हीं पांच माणसें केसरीला संपादक म्हणून लाभलीं हें केसरी पत्राचें परमथोर भाग्य होय. यांनीं देशाभिमान, विचाराची सचोटी, चिकित्सेची आवड, साहसाची प्रवृत्ति आणि ज्ञानलालसा अशासारखे गुण वाचकांच्या मनांत उत्पन्न करण्याचें काम सतत ५० वर्षें केलें आहे व हें करीत असतां ज्ञानेश्वरानें मोठ्या आवडीनें ज्या मराठी भाषेचा आदर केला त्या भाषेचें वैभव येवढें वाढविलें कीं, ज्याप्रमाणें देशाभिमान आणि राजकारण यांचा जेव्हां जेव्हां उल्लेख होईल तेव्हां जसें केसरीचें स्मरण होईल, त्याप्रमाणेंच मराठी भाषेच्या वैभवाचें जेव्हां जेव्हां बोलणें निघेल तेव्हां तेव्हां केसरीचें स्मरण झाल्यावांचून राहणार नाहीं.

---

# ऐतिहासिक पत्रें आणि चर्चा

[ इतिहाससंशोधक शंकर नारायण जोशी ]

" इसापनीतींतील सिंहाचें चित्र काढणाऱ्या चिताऱ्याप्रमाणें इंग्रजांनीं आमचे ' इतिहास लिहावे व आम्हीं ते श्रुतिप्रमाण मानून त्यांचें पठणपाठण करण्यांतच ' संतोष मानावा ही आमच्या परावलंबनाची सीमा नव्हे काय?" ७-५-९५.

केसरींत ऐतिहासिक विषयाला स्थान, तो विषय किती महत्त्वाचा समजून दिलें जातें ह्याची कल्पना वरील अवतरणावरून स्पष्ट व सहज येईल. पूर्वजांचें यश हें एक बल आहे आणि अशा बलवंतास जागें करणें सोपें. पण अशाला जागें करण्याऐवजीं ' तूं असा बलवन्त नव्हतास व नाहींस ' असेंच जर कोणी खोटेंच व इतिहास म्हणून पढवूं लागला तर त्यापरती दुसरी हानि कोणचीहि नाहीं. त्या हानीच्या प्रमाणानें हानीपासून बचावणाऱ्याचें श्रेय फारच मोठें आहे व ह्या दृष्टीनें केसरीची जी कामगिरी झाली त्यापैकीं एका भागाचा विचार ह्या पूर्वीच्या लेखांत झालेला आहे. येथें दुसऱ्या म्हणजे केसरीच्या संपादकांशिवाय इतिहासाभ्यासी इतर मंडळींच्या लेखांस व व्याख्यानांस केसरींत आत्मीयत्वानें जी प्रसिद्धी दिली ते लेख इत्यादि लक्ष्यांत घ्यावयाचे आहेत. ' शूर मर्दांचा पोवाडा शूर मर्दांनें ऐकावा ' ह्या शाहिरी न्यायानें केसरीनें छत्रपति शिवाजी-महाराजांच्या उत्सवाचा पुरस्कार केल्याबरोबर, कुडींत जसा प्राण घालावा त्या-प्रमाणें महाराष्ट्रांत सर्वत्र मोहावरणघाती इतिहासाचें वारें खेळूं लागलें आणि केसरीचें दुसरें जें धोरण कीं, वाऱ्याची वावटळ होऊं द्यावयाची नाहीं, त्यासाठीं ह्या उत्सवाबरोबरच ऐतिहासिक पत्रें व त्यासंबंधींची शास्त्रीय चर्चा ह्यांना आमंत्रण व प्रोत्साहन देऊन केसरींत भरपूर व प्रमुखपणें अवसर देण्यांत आला. म्हणजे वर्षांतून दोन दिवस होणाऱ्या उत्सवाबरोबरच स्थिर व सत्य अशा महाराष्ट्रे-तिहासाच्या कार्यास चालना मिळाली; म्हणजेच स्वाभिमानास शास्त्रमत्तेची जोड दिली गेली. अशी ही उभयविध चालना देणें हें केवळ प्रसंगोपात्त चालें; म्हणजे आला मजकूर म्हणून स्थल दिलें किंवा सण आला म्हणून साजरा करून दिवस गुदरला असा प्रकार ह्यांत दिसत नाहीं. कारण, स्वातंत्र्यानें ह्या केसरीकारांची केसरींतील वगैरे ' लेखनकामाठी ' पाहिली; अनुपलब्ध सांख्यकारिका शोधून काढणाऱ्यांच्या संकल्पित ग्रंथयादींत शिवचरित्रलेखनाचा निर्देश वाचला; किंवा इतिहास–विहारादि ग्रंथ पाहिले; अथवा शिवजयन्तीबरोबर गीताजयन्तीच्या निर्णयांतील अधिकार लक्ष्यांत घेतला तर ही चालना केसरीच्या कशी अंगची

होती व आहे हें ध्यानांत येईल. घरचे मालकच जेथें अशा प्रकारें सिद्ध होऊन दाराशीं निमंत्रितांची व अनाहूतांची वाट पाहात उभे, तेथें येणारी मंडळी कोण व किती आणि अशांच्या लेखपंक्ती किती व कशा झाल्या असतील ह्याचें महत्त्व वेगळें सांगण्याचें कारण नाहीं.

संपादकीयेतरांच्या ऐतिहासिक लेखांचा उल्लेख करण्यापूर्वी आधीं हें सांगणें अवश्य आहे कीं, केसरींतील ह्या ऐतिहासिक माहितीचा निर्देश ह्यापूर्वींच योग्य त्या ग्रंथांत केला गेला आहे; कित्येक लेखांचे तर स्वतंत्र ग्रंथच प्रसिद्ध होऊन राहिले आहेत—आणि असें झालेलें असणें हाच केसरीच्या एतद्विषयक कामगिरीचा सन्मान होय. तेव्हां—अशा स्थितींत आणि जेथें प्रत्यहीं नवीन नवीन जुनीं, अस्सल व विश्वसनीय ऐतिहासिक साधनें उपलब्ध आणि प्रकाशित होत आहेत त्या ठिकाणीं, केसरींतल्या ह्या जुन्या चर्चेचा उल्लेख पुनः आतां करण्याचें कारण नाहीं, असें कोणास वाटेल. पण इतिहासांतील कांहीं बाबतींत असा अनुभव दिसून येत आहे कीं, झालेली चर्चा माहीत नसल्यामुळें म्हणजे माहीत होण्याजोगें ग्रंथरूपी साधन पुढें नसल्यामुळें, तेच तेच वाद पुनः पुनः त्याच त्या मुद्द्यांवर विनाकारण निघत आहेत व ह्यामुळें प्रगतीस एका प्रकारें व्यत्ययच येत आहे. हें पुरतें लक्षांत येण्याकरितां एका शिवजन्मतिथीच्या वादाचेंच उदाहरण पुरें आहे. हें उदाहरण, शिवाजीचा उत्सव सर्वत्र व सर्वजण करीत असल्यामुळें सामान्यांच्या दृष्टीनें झालें. पण इतिहासाभ्यासकांत अशा बाबी बऱ्याच असणें शक्य आहे कीं, ज्यांची झालेली चर्चा गैरमाहितीमुळें म्हणजे विनामाहितीमुळें पुनः पुनः निघत असेल. कांहीं ग्रंथांमधून तर, थोरल्या बाजीरावाच्या नासिरजंगावरील स्वारीच्या माहितीकरितां केसरींतील २४-४-०९ मधील विवेचन पाहावें; जंजिऱ्यावरील मोहिमेसंबंधीं २१-६-०४ ते जानेवारी १९०५ पर्यंतचे केसरीचे अंक पाहावे. ( मराठी रियासत मध्यविभाग पृ. ३९०, २४५ ) असें लिहून केसरींतील ह्या मजकुराची योग्यता आणि त्याबरोबरच हा मजकूर ग्रंथरूपानें शाश्वत करण्याची आवश्यकता दर्शविली आहे. कांहीं ठिकाणीं तर, केसरींत अमुक मजकूर आल्यामुळें येथें पुनरुक्ती करीत नाहीं असेंच म्हटलें आहे, ( कित्ता पृ. ३९७ ). म्हणजे तोच तो वाद पुनः होऊं नये म्हणूनच नव्हे तर इतिहासग्रंथांच्या पूर्ततेकरितांच केसरींतील ही इतिहासविषयक माहिती अवश्यमेव ग्रंथनिबद्ध केली पाहिजे. आणखीहि दोन कारणें ही माहिती ग्रंथनिविष्ट करण्याचीं अशीं आहेत कीं, तेथें झालेल्या ऐतिहासिक पत्राच्या चर्चेसंबंधानें—पत्राचा काल, अर्थ, इत्यादि—पूर्वींहून कांहीं निराळें निदान अधिक असें आज कांहीं म्हणतां येईल. आणि चौथें कारण, कीं, एकादा ऐतिहासिक ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर अथवा भा. इ. सं. मंडळाच्या पंधरवड्याच्या सभा, वार्षिक संमेलनें व वाढदिवस इत्यादि प्रसंगीं जे निबंध वाचले जातात त्यांचे सारांश केसरींत आल्यानंतर त्यांवर कित्ये-

कांनीं आक्षेप घेतले तर कोणीं खुलासा केला आहे. ह्या आक्षेपास उत्तरेंहि दिलीं गेलीं आणि हीं उत्तरें मात्र ग्रंथांतर्गत व्हावयाचीं राहिलीं. पुढें दिलेल्या माहितींत कांहीं ऐतिहासिक पत्रें तर अस्पोटच राहिलीं आहेत म्हणजे ज्यांचें सारांशानेंहि संकलन झालेलें नाहीं अशींच राहिलीं आहेत, हें दिसून येईल. हें सर्व मिळून केसरींतील लेख ५१७ आले आहेत. ही संख्या लक्षांत घेतां व वरील कारणांचा विचार करतां हेंच म्हणावेंसें वाटेल कीं, केसरींतील ही इतिहासविषयक माहिती स्वतंत्रच ग्रंथरूपानें प्रसिद्ध होणें जरूर आहे. एऱ्हवीं, केसरींतील अनेक महत्त्वाचे विषय ज्या एका ग्रंथांत द्यावयाचे त्या ग्रंथांतील ह्या लेखांत हें सर्व कसें सामावूं शकणार ?

केसरींत निरनिराळ्या दृष्टींचे इतिहासविषयक लेख ५१७ आले आहेत, असें जें वर म्हटलें त्याची कारकीर्दवार फोड केली असतां शिवकालीन १११ पेशवेकालीन १९५ मुसलमानकालीन १७, अव्वल इंग्रजींतील २३ व इतर म्हणजे कांहीं प्राचीन काळाला अनुलक्षून व सर्वसामान्य असें १७१ उल्लेख आढळतात. त्यांतहि प्रसंगवार, स्थलविशिष्ट व व्यक्तिप्रधान असे पोटउल्लेख कोणाचे ते वेगळे करतां येतील. तसेंच भाषा, रीतिरिवाज, संज्ञा, दंतकथा, नाणीं, जातिविषयक ह्यासंबंधींचेहि उल्लेख निराळे काढण्याजोगे आहेत. कालनिर्देश नसलेला एकादा शिलालेखहि त्यांतून बाजूस काढावा लागेल. सारांश, वर म्हटल्याप्रमाणें हें एका स्वतंत्रच ग्रंथाजोगें इतिहासभांडार कसें आहे तें कळून येईल. प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें केसरींतील जेवढ्या माहितीचा निर्देश ग्रंथांत समाविष्ट झाला असें आढळेल तेंवढी वगळून उर्वरित तीच येथें नमूद करावयास पाहिजे. केसरींत आलेल्यापैकीं कोठें किती घेतलें गेलें याची नुसती यादी दिली तरी ती एका दृष्टीनें पाहिजे आहे. पण तें आणि उर्वरितांपैकीं सर्व, येथें संक्षेपानें देणें अथवा त्याचीहि नुसती नोंद करणें ह्यासहि प्रस्तुत पुरेसा अवसर आतां नाहीं. तरी केवळ दिग्दर्शन म्हणून कांहीं नमूद करतों—

प्रतापगडावरील देवीची स्थापना—हें पत्र केसरीशिवाय कोठेंच प्रसिद्ध नाहीं.

श्रीतुळजाभवानी.

( धर्मप्रद्यो. लक्ष्मी नृहरी. हे राजाराम व प्रल्हाद निराजीचे शिक्के आणि निळो मोरेश्वराचाहि शिक्का पत्रप्रारंभीं आहे. पत्राची ता. २१-१-१६९५ ही येते.)

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके २१ भावानामसंवत्सरे माघ शुद्ध सप्तमी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजाराम छत्रपति यांणीं राजश्री मंत्राजी नाईक बिन गोमाजी नाईक पानसरे जुनरकर मुतालिक भोपेपण हवाला देवस्थानी श्रीविल्हे-प्रतापगड यांसी दिलेवरून वतनपत्र ऐसीजे. तुम्ही सांप्रत देशीहून स्वामीचें सेवेसी चंजीचे मुकामीं येऊन स्वामीचें दर्शन घेतलें. आणि श्रीमुहूर्तीचे व आपले सर्व

वृत्तांत स्वामीचे सनिध विदित केलें कीं, स्वामीस पूर्वी श्रीचा साक्षात्कार जाहला त्याउपरी स्वामीनें श्रीकृपें अफझुलखानाचा वध केला. जय पावलें. यानंतर-श्रीची मुहूर्ती करून प्रतापगडी स्थापना करावी. असें स्वामीचें चित्तीं मरोन राजेश्री स्वामीनें आपणास आज्ञा करून अनुकूलता केली. आणि गंडकी शिळा आणावयास पाठविले. आपण पर्वताचा राजा लीलासेन याचे राज्यापावेतों जाऊन त्रिशूळगंडकी व श्वेतगंडकी व सरस्वतीचे संगमी शिळेचा शोध करून शिळा उत्तम प्राप्त झाली. ते घेऊन आलों. मुहूर्ता सिद्ध करावयास हुनरवंद शिल्पी त्याच प्रांतीचे आणोन श्रमे करोन मूर्ती सिद्ध केली. राजश्री रायगडी असतां सनिध आणली त्यावरी राजश्रीनें प्रतापगडास राजश्री मोरोपंत पंडित प्रधान या समागमे पाठवून प्रतिष्ठा केली. ते समयी श्रीचे भोपे आपण आपली मुतालिकी देवस्थानचा हवाला तुम्हांस दिल्हा. अशी आज्ञा आम्हास केली. आणि श्रीचे पूजेचा पारपत्याचा कार्यभाग आपले स्वाधीन करून दिल्हा. तेणेप्रमाणें आपण स्वामीची मुतालिकी, भोपेपण, हवाला देवस्थान करून श्रीचे सेवेवरी आला. कैलासवासी स्वामीने व राजश्री संभाजीराजे स्वामीनेहि चालविले. स्वामीनेहि चालवावे व पुढें पुत्रपौत्र वंशपरंपरेने चालेल असें अभयपत्र करून द्यावे. म्हणून विदित केले तें मनांत आणोन तुम्ही पुरातन एकनिष्ठ सेवक श्रीची पूजा, उत्सव यथास्थित-पणें चालवीत आले आहांत. कैलासवासी स्वामीनें तुम्हावरी बहुत कृपा करोन तुमचें चालविलें होतें. असें जाणोन स्वामीनेंहि कैलासवासी स्वामीनें निश्चय केल्याप्रमाणें तुम्हांस वंशपरंपरेनें श्रीचे भोपेपणाची आपली मुतालिकी हवाला करून दिला असे. तुम्ही व तुमचें पुत्रपौत्र वंशपरंपरेनें श्रीसनिध भोपेपणाची मुतालिकी हवाले याचा कार्यभाग सर्व पारपत्य करीत जाणे. तुम्हांस हल्लीं वतन केलें सनदेप्रमाणें घेत जाणें. व प्रसाद श्रीचा पहिले चालत असेल तेणेंप्रमाणें घेत जाणें आणि सुखरूप असणें. हें वचनच तुम्हास करून दिलें असे. श्रीनें स्वामीचे वंशीं सत्ताविस पिढ्या राज्य दिलें असें वरदान देऊन साक्षात्कार केला तसे राज्य श्रीकृपें चालेल येअर्थी संदेह नाहीं, जोवरी स्वामीचे वंशी राज्य तोंवरी श्रीसनिध भोपेपणाची मुतालिकी म्हणजे श्रीदेवस्थानचा हवाला तुमचें वंशास चालेल. व जो कोणी स्वामीचे वंशी तुमचें वंशास हे मुतालिकी न चालवील त्यास श्रीची ब्रह्महत्येची व गोहत्येची शपथ आहे. तुम्ही निःसंदेहेपणें श्रीची पूजा उत्सव परंपरेनें यथाविधि चालवति जाणें. स्वामीचें राज्याची अभिवृद्धि श्रीपाशीं चिंतोन सुखरूप असणें जाणिजे निदेश समक्ष.

पूर्वी जेव्हां शिवाजीमहाराज गडावर येत तेव्हां ते स्वतः पूजा करून धूपार्ती फिरवीत. परंतु त्यांनीं आपल्या मागें धूपार्तीची मुखत्यारी ज्यास दिली त्यास भोपे म्हणतात. (पत्र नकल असावें व शोधाअंतीं व तेवढें प्रमाण मानावें लागेल.) (१९-५-९६)

**खंडेराय व शिवराय**—पेंवर, पाली, नळदुर्ग व जेजुरी हीं खंडोबाचीं मुख्य स्थानें. खंडोबा हा देशस्थ ब्राह्मण असून तो १८ पगडजातीचें कुलदैवत आहे. खंडोबा हा शिवरायासारखा ऐतिहासिक योद्धा होऊन गेला असावा. समर्थ रामदासस्वामींची खंडोबावर आरती आहे व निगडीकर रंगनाथ शिष्य यांचें मार्तंडाष्टक सांपडलें त्यावरून ही कल्पना दृढ होते. शिवाजीच्या मावळ्या-प्रमाणें ज्यांनीं सर्वस्व वाहिलें ते वाघे व इंग्रजी नन्सप्रमाणें खंडोबाच्या सेवे-प्रीत्यर्थ ज्यांनीं कौमारावस्थेचें व्रत चालविलें त्या मुरळ्या. पुढें सर्व संस्थेप्रमाणें ही संस्था नासली. आणि 'वेश्या दासी मुरळी जगाची सोवळी' असें तुका-रामांना म्हणतां आलें. (ल. रा. पांगारकर १-१२-०८).

**रामदासांचा राजनीतिग्रंथ**—२७-११-०२ च्या ज्ञा. प्र.त एका चित्रगुप्त-विरचित बखरीचा अप्रसिद्ध भाग दिला आहे व त्यांत १७० श्लोक आहेत. पण हे श्लोक बखरकाराचे नसावेत. 'रामदासस्वामींनीं शिवसार्वभौमास बुद्धि-प्रदतेस राजनीति पूर्वीं करून पाठविली. संख्या दीडहजार ओंवी, या शब्दाची परमति (?) संख्या संगीत टीका १७० व अफजलखानाचे युद्धाचे श्लोक व बट-बीजन्यायें मुक्तेश्वरस्वामींनीं विस्तारिलें आहे असें भारत श्रीव्यासें कथिलें त्याची टीकाचातुर्य सर्वांशीं मान्य वचनमाधुर्यें निर्मिली ते समक्ष साक्षीस न ये. याची उचिष्टोत्तरें निष्टून योग्य सर्व जनांस विश्रांतिदायक म्हणून शिवाजीमहाराजांचे बखर रचनेंत जडली आहेत.' असें आहे. म्ह० बखरींतल्या श्लोकांना प्रामाण्य दिलें व समर्थांच्या ग्रंथाचा पत्ता दिला आहे. रामदासांच्या समग्र ग्रंथांत राजधर्म, क्षात्रधर्म, सेवकधर्म इ. जीं प्रकरणें आहेत तीं ह्या 'राजनीति' ग्रंथांतील आहेत. हीं प्रकरणें लिहिलेलीं मला सांपडलीं. त्यांचे अखेरीस 'इति प्रथम नीतिः' 'इति द्वितीय नीतिः' 'इति तृतीय नितिः' असें लिहिलें आहे. अशा नीति ५०-६० असाव्या. समर्थ हे समाजशास्त्रावर ग्रंथ लिहिणारे एकटेच मराठी ग्रंथकार आहेत. शोधाची पुण्याई आहे काय? (ल. रा. पांगाकर २८-६-०४).

**शिवाजी धूमकेतु व भौतिकशास्त्रें**—मुं. रॉ. ए. सो. त जानेवारीमध्यें तेथें झालेल्या शतवार्षिक उत्सवांत मि. करकेरिया यांनीं शिवाजीचा मृत्यु आणि तत्कालीन धूमकेतु ह्या विषयावर निबंध वाचला. कांहीं बखरींत राजारामाच्या आईनें शिवाजीस विष घातलें; कांहीं मुसलमान बखरींत पिराच्या शापानें तो मेला असें आहे. परंतु हें खोटें आहे. मराठी बखरींत त्या वेळीं धूमकेतु दिसला असें वर्णन आहे. फ्रायर ह्या इंग्रजी प्रवाशानेंहि तसेंच वर्णन केलें आहे. करकेरियांचें म्हणणें हें कीं, महापुरुषांच्या मृत्युसमयीं सृष्टीच्या साम्राज्यांत अशा प्रकारचे उत्पात घडून येतात. १६८० मधील ह्या धूमकेतूवरूनच न्यूटननें धूमकेतूची कक्षा शोधून काढिली. ह्यास न्यूटनचा धूमकेतू म्हणतात. ह्यास शिवाजीचा धूमकेतू म्हणावे. हा शिवमृत्युदिनप्रसंगींचा धूमकेतू इ. स.पूर्वी

४४ च्या ज्यूलियस सीझरच्या मृत्यूवेळीं दिसला असें ज्योतिषांचें म्हणणें आहे. सीझर व शिवाजी या दोन्ही पुरुषांचे मृत्यु एकाच धूमकेतूच्या दर्शनानें सुचवावे हें विलक्षण तर खरेंच. पण अलौकिक पुरुषांचे जन्म व मृत्यु नेहमीं सृष्टीमधील अभ्युदायिक व औत्पातिक चिन्हांनीं सुचविले जातात असें जें कवींचें म्हणणें त्यास पुष्टि मिळते इतकेंच. महापुरुषांच्या मृत्यूशीं सृष्टीचा कांहीं संबंध आहे असें शास्त्रीय रीत्या मानणें कठिण आहे. तरी भारतीय युद्धाच्या कालींहि अशींच अकालीं ग्रहण इत्यादि चिन्हें वर्णन केलीं आहेत. त्यावरून व महाकाव्यांतील वर्णनावरून ईश्वराच्या विराट स्वरूपाचा आणि जीवाचा भवभूतीनें म्हटल्याप्रमाणें कांहीं अंतरंग संबंध असावा असे विचार सहज उद्भवतात. (स्फुट २४-१-०५).

नानासाहेबांचें काय झालें?—५७ च्या बंडातील पुढारी नानासाहेब हे कोणी म्हणतात ठार झाले, कोणी म्हणतात ते नेपाळांत वा तिबेटांत गेले; किंवा कोणी तराईंत वाघानें खाल्ले असें म्हणतात. कोणी ताप येऊन मेले, असें म्हणतात. पण ऑक्स्फर्डच्या बेलियल कॉलेजांतील एम्. ए.नें स्टँटडर्ड पत्रांत प्रसिद्ध केलें कीं, नानासाहेब यांस एका इंग्रजानें गुप्तपणानें इंग्लंडांत नेलें व तेथें ऑक्स्फर्डशायर लगतच्या एका परगण्यांतील मळ्यांत ठेविलें. शेजारींच या अधिकाऱ्यानें घर बांधिलें. लवकरच हा मळेवाला व अधिकारी श्रीमंत झाल्याचें दिसून आलें. पुनः नानासाहेब नाहींसें झाले व स्वाभाविक मरणानें मेले. ( २४-१२-१२ ).

गंगाधरशास्त्र्यांचा खून कोणीं करविला?—पुष्कळ लोकांचा असा समज आहे कीं, दुसरे रावबाजी व इंग्रज यांमध्यें वितुष्ट पडण्याच्या सुमारास पंढरपूर येथें बडोदेकर गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचा जो खून झाला त्याची उभारणी पुण्यास झाली व बाजीराव याचें ह्या गोष्टीस उत्तेजन होतें. सदरहू खून बाजीरावाचा हस्तक त्रिंबकजी डेंगळा यानें घडवून आणला आणि डेंगळ्यास इंग्रजांनीं बाजीरावाकडून या अपराधाकरतां मागून घेतला ह्यावरून वरील प्रकारच्या समजास जोर येतो. ह्या पटवर्धनशास्त्री घराण्याच्या इतिहासांत ( ग. अ. लेले कृत ) ह्या खूनप्रकरणीं बरेंच विवेचन आलें आहे. तें इंग्रजी ग्रंथ व विशेषतः पटवर्धनांच्या घरचे जुने कागदपत्र पाहून केलेलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं, बाजीराव हे ह्या कामीं प्रमुख गुन्हेगार नाहींत. शास्त्री ( वकील ) गत झाल्यानें गायकवाडाचे देण्याचा निकाल लागण्याचा संभव नव्हता. शास्त्र्यांचे घराण्याशीं बाजीरावाचा जुना विरोधहि असण्याचें कारण नव्हतें. बडोद्याचे दिवाण रावजी आपाजी यांचे चिरंजीवाचे हातून दिवाणगिरीचा अधिकार रेसिडेंटानें काढून घेतला. त्या वेळीं गंगाधरशास्त्री रेसिडेन्सींत नेटिव्ह असिस्टंट होते व सर्व कारभारांत त्यांचा मुख्य भाग होता. पुढें शास्त्री हे स्वतः दिवाण झाले व कामगिरीवर पुण्यास गेले. तेव्हां त्यांनीं बडोद्यास परत जिवंत जाऊं नये म्हणून सिताराम

रावजी व त्यांचे अनुयायी यांची खटपट चालू होती व शास्त्र्यांचा खून करण्याची कल्पना प्रथम बडोद्यास निघून ती द्रव्यद्वारा पुण्यास पोंचविण्यांत आली व पंढरपुरास अमलांत आणली गेली असें पटवर्धन घराण्याचे इतिहासांत स्पष्ट आहे. कटाची गुणगुण बडोद्यास असून गंगाधरशास्त्री यांस सावध राहण्याबद्दल बडोद्याहून गेलेलीं पत्रें पटवर्धनांचे दप्तरांत उपलब्ध आहेत. सदरहू गोष्ट खरी असेल तर नारायणरावसाहेबांच्या खुनाप्रमाणें ही गंगाधरशास्त्र्यांच्या खुनाची कल्पना पुण्याबाहेर निघाली असें म्हणावें लागतें. नागपूरचें कारस्थान नारायणरावसाहेबांना भोंवलें व बडोद्यांतील कारस्थान गंगाधरशास्त्र्यांना भोंवलें. हा शास्त्री-घराण्याचा इतिहास १८९६ सालीं प्रसिद्ध झाला तेव्हां त्यावेळीं बडोद्यांतील वर्तमानपत्रांतून कडक वादविवादहि झाला. आतां ह्याविरुद्ध पुरावा सांपडणार नाहीं असें नाहीं, तरी पाहण्यांत नाहीं; असल्यास कोणीं तो सर्व प्रसिद्ध करावा. ( इतिहासभोक्ता २५-५-०९ ).

**शाहूचें खरें नांव काय ?** | सातारकर छ० थोरले शाहू यांच्या नांवासंबंधानें केसरींत इ. १९००-०१ या अवधींत जवळ जवळ दीड वर्ष चर्चा चालू होती. शेवटीं इ. १९१० मध्यें एका ऐतिहासिक पत्राधारें पुनः थोडा मजकूर प्रसिद्ध होऊन ही चर्चा थांबली. ही चर्चा करणारांत श्री. वि. आठल्ये, वि. का. राजवाडे, द. ब. पारसनीस, स. म. दीवेकर, स्वतः केसरीकार इ. अशी मंडळी होती. चर्चेंत एक दोन उपप्रश्न निघून त्यावरहि चर्चा झाली. ह्या चर्चेचा कांहीं भाग मराठीरियासत, पूर्वार्ध पृ.६२१ व श्री. सरदेसाई यांनीं संग्रहित केला आहे. सदर ग्रंथांत न आलेला वरील चर्चेचा भाग येथें थोडक्यांत दिला आहे.

खं. ६ ले. १० मधील पत्राचा विचार करतां आठल्ये म्हणतात त्याप्रमाणें पत्राचें वर्ष राजवाडे यांनीं दिलें तें बरोबर दिसत नाहीं. पत्र संभाजीनें शाहूस आशीर्वाद म्हणून लिहिलें आहे. कोल्हापूरकर संभाजी शक १६२० अ. ज्येष्ठांत (इ.१६९८ मे) जन्मला व सातारकर शाहूचा शक १६०४ वैशाख-(इ.१६८२मे)मधील जन्म आहे. म्हणजे शाहूपेक्षां कोल्हापूरचा संभाजी १६वर्षांनीं लहान आहे. आणि पत्रांत तर संभाजी शाहूस चिरंजीव लिहून आशीर्वाद देत आहे. अर्थात् पत्रांतील संभाजी आठल्यांचे म्हणण्याप्रमाणें कोल्हापूरचा नसून शिवाजी महाराजांचा पुत्र छ० संभाजी ठरतो. म्हणजे पत्राचा काल पत्रांतील मायन्यावरून शक १६१० (इ. १६८९) च्या पूर्वींचा येतो. पत्रांतील मजकुरावरून हा काल शक १६०८ (इ. १६८६) च्या सुमारें येईल. कारण, दिल्लींद्रपुत्र यागी होऊन संभाजीकडे राजकारणें घेऊन आला असल्याचा मजकूर आहे. हा दिल्लींद्रपुत्र संभाजीकडे आला व शक १६०९ मध्यें इराणांत गेला आहे. यावरून पत्राचा काल शक १६०८ चा येतो. पत्रांत रामचंद्र पंडित अमात्यांचा उल्लेख शेवटीं आला आहे. व त्यावरून डफ इत्यादिकांच्या म्हणण्याशीं विरोध

येतो. म्हणजे इ. १६९८ मध्यें रामचंद्रपंत अमात्यपदाधिष्ठित होतो हें चूक ठरत आहे. अन्यत्र पुराव्यावरूनहि इ. १६९८ पूर्वींच रामचंद्रपंत अमात्य असल्याचें आढळतें. तात्पर्य, खं. ६ ले. १० हें पत्र शक १६०८ (इ. १६८६) मधील म्हणावें लागतें व त्यांत शाहू हें नांव स्पष्ट असल्यामुळें औरंगजेब पादशहानें हें नांव रूढ केलें हें म्हणणें टिकत नाहीं. आणि शिक्के लक्षांत घेतां 'शिवाजी ऊर्फ शाहू' हें शाहूचें नांव होय असें म्हणतां येतें. शाहू ह्या संज्ञेचें शिव हें संस्कृतीकरण केलें असें मानणें बरोबर नाहीं. शिवाजी हें शाहूचें मूळ नांव होतें आणि कैदेंत जाण्यापूर्वींच त्याला शाहूहि म्हणूं लागले असें दिसतें. पत्र शाहूच्या ४ थ्या वर्षी संभाजीनें लिहिलें आहे. (श्री. वि. आठल्ये ५-४-१०).

**गोविंदपंत बुंदेले यांच्या मुलाचा तोतया—**

श्री मसुदा.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी—

विनंति, सेवक रामभट बिन रघुनाथभट पटवर्धन मौजे आगरगुले ता पावस ता रत्नागिरी सा नमस्कार विज्ञापना ऐसेजे धोंडो विष्णु पटवर्धन व।। मौजे आगरगुले ता मजकूर याणी दादोराम रिजबूड तोतया याचीं पत्रें गंगाधर गोविंद बुंदेले म्हणून लिहून दिल्ही. तीं सरकारांत आणून दिल्हे, सबब कैदेंत ठेविले होते. त्यास हाली हाजीर जामिनाविसी आज्ञा केली त्यास धोंडो विष्णु यासी आपण हजीर जामीन असो. याउपरी फितूरफादड्याच्या कामांत न पडतां राहतील. फितूर फादडा केल्यास हजीर करून देऊं. हजीर न करूं तर याचे निसबतीचा जाब करू. हा जमानकतबा लिहून दिला. सही बि।। तारीख १७ माहे शौवल सु।।सीत समानीन मया व अलफ शके १७०७ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना (स. मा. पटवर्धन ता. १९-४-१०).

**बाजी घोरपडे कधीं मारला !**—इ. १६६१ अखेरीस मारला असें डफ विनाधार सांगतात. पण १६५९ पूर्वी मारला गेला असें म्हणतां येतें. 'वडिलांचे सेवेसी' हें पत्र विनामित्तीचें आहे. पण शिवाजी-सावंत तह जो प्रसिद्ध आहे त्यावरून त्या तहानंतर पत्र लिहिलें असावें. पण पत्रांतील गोष्टी तहाआधीं झाल्या असाव्या, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. हें मान्य झाल्यास श. १८५० फा. व. ७ (१६५९ मार्च) पूर्वी शिवाजीनें घोरपड्याचा वध केला असावा. (श्री. वि. आठल्ये १३-२-१२). यावर श्री. राजवाडे यांचें म्हणणें कीं, 'वडिलांचे सेवेसी' हें पत्र अस्सल नाहीं, भाषेवरून तें आधुनिक दिसतें; मूळ पत्रांतील कांहीं मजकूर गाळलेलाहि दिसतो. तात्पर्य, पत्राच्या प्रामाणिकतेसंबंधानें निश्चय होण्यास आणीक पुरावा पाहिजे. पत्र अस्सलच मिळवून प्रतिमा घेतल्यास शिवाजीचें हस्ताक्षर पाहण्यास महाराष्ट्र सोत्कंठ आहे (२०-२-१२).

**देवानांपिय**—ह्या अशोककालीन लेखांतील विशेषणाचा अर्थ पाणिनीचे कालीं मूर्ख असा नव्हता, कात्यायनाचें वेळीं होता; असें भा. इ. सं. मं. तराजवाडे यांनीं वाचलेल्या निबंधांत म्हटल्याचें सारांशानें केसरींत प्रसिद्ध झालें. षष्ठ्या आक्रोशे ६-३-२१ ह्या पाणिनीसूत्रावरील भाष्यांत वार्तिककाराचें 'देवानांप्रिय इति चोपसंख्यानकर्तव्यम्'असें वार्तिक घेतलें असून त्याचें उदाहरण म्हणून देवानां प्रियः असें दिलें आहे. वार्तिकामध्यें हल्लीं कौमुदींत असलेलें 'मूर्खे' असें पद नाहीं. काशिका वृत्तींतसुद्धां 'देवानाप्रिय इत्यत्र षष्ट्या अलग्वक्तव्यः'असें वार्तिक घेतलें आहे. 'मूर्खे' असें घेतलेलें नाहीं. म्हणजे कात्यायनानें हा अलुक् समास एवढेंच सांगितलें आहे. अशोकानें स्वतःस हें विशेषण लाविलें आहे. सारांश, मूर्ख ह्या अर्थाला अन्य पुरावा पाहिजे. कात्यायनकालीं हा अर्थ आला असें होत नाहीं. (नृसिंहाचार्य गजेंद्रगडकर १९-८-१३).

**शिवाजीमहाराजांचा दक्षिणदिग्विजय**—व्यंकोजीशीं भाऊबंदीचा तंटा करण्यासाठीं ही स्वारी रघुनाथपंतानें काढविली असें बखरकारांच्या सांगण्याचें तात्पर्य आहे. आणि मराठे याचा अर्थ 'चोर, लुटारू' हें ज्याच्या रोमरंध्रांत भिनलेलें त्या खाफीखान व डफ यांचीं मतें निराळ्या शब्दांत मांडणारे सर जदुनाथ सरकार 'राज्याभिषेकासाठीं झालेला खर्च, दक्षिणेंतील लोकांना पैशाप्रीत्यर्थ पिळून काढून वसूल करणें' हा ह्या स्वारीचा हेतु होता असें सांगतात. पण एस्. कृष्णस्वामी अयंगार, व प्रो. श्रीनिवासाचारी, प्रो. सेन, श्री. वैंद्रे यांचें म्हणणें लक्ष्यांत घेतां व तत्कालीन कागदपत्र पाहतां ह्या स्वारीसंबंधानें पुढीलप्रमाणें म्हणतां येतें. पहिली गोष्ट कीं, व्यंकोजी हा ऐदी व नाकर्ता मुळींच नव्हता. त्यानें इ. १६७० नंतर तंजावर, जिंजी, मदुरा हीं स्थळें विजापूरकरांकरतां म्हणून सोडविण्यासाठीं जाऊन तंजावर तर स्वतःच बळकाविलें. दुसरी गोष्ट कीं, शिवाजीच्या या स्वारीची कल्पना आकस्मिक रीतीनें सुचलेली नसून दोन वर्षें आधीपासून हिची वाटाघाट रायगडीं होत होती. त्याचप्रमाणें केवळ लुटीसाठीं ही स्वारी नव्हती. तर राज्यास हा मुलूख कायमचा जोडण्यासाठीं व तशा तयारीची ही स्वारी होती. याहून मुख्यतः दक्षिणेंतील किरकोळ संस्थानिकांकडून विजापूर दरबार जो पैसा जमवी त्यास आळा पडावा म्हणजे हे संस्थानिक आपलेच मांडलीक करून स्वराज्याच्या व दक्षिणेच्या अशा दोन्ही बाजूंनीं विजापुरकरांना पेंचांत आणावें; तसेंच विजयनगरच्या राजवंशांतील शेवटला पुरुष श्रीरंग मृत्युवश झाला तरी हिंदुसाम्राज्याची भावना तेथें जी जीव धरून होती तिच्या पुनरुज्जीवनार्थ ही स्वारी शिवराजानें काढिली होती. शिवाजी राज्याभिषेकानें छत्रपती राजा झाल्यानंतर त्यास सम्राट् होण्याची इच्छा झाली असावी ह्या कृष्णस्वामींच्या मतास अधिक पुरावा पाहिजे. (द. वि. आपटे १० ५-३०).

---

# ऋणमोचन आणि ऋणानुबन्ध

[ श्री. विनायक रामचंद्र पटवर्धन, बी. ए., एल्एल्. बी. ]

महाराष्ट्रांत केसरीच्या अरंभींच्या अमदानींत सार्वजनिक निधि फारसे नव्हते. आणि जे होते त्यांची मोठी उडी हजारपांचशें रुपये एवढीच. चारपांच हजार रुपये जमले म्हणजे गंगेंत घोडे न्हाले अशीच स्थिति. सार्वजनिक काका, केरोपंत छत्रे अशासारख्या पुरुषांचे स्मारकनिधि देखील ह्याला अपवाद नव्हते. परंतु केसरी हा लो. टिळकांच्या सर्वस्वीं अधिकाराखालीं आल्यापासून ज्याप्रमाणें लेखनशैली, लोकहिततत्परता स्वार्थनिरपेक्षता, आणि निर्भयपणा ह्या गुणांत त्यानें अग्रेसरत्व पटकावलें, त्याचप्रमाणें सार्वजनिक निधींचा उपयोग कोणत्या कार्यांकडे कसा करावा ह्याचाहि धडा केसरीनेंच घालून दिला; आणि निधींची सीमा वाढवून लाख लाख रुपयांच्या विस्तृत क्षेत्रांत संचार करण्याचें त्यांना सामर्थ्य आणून दिलें हेंच अपूर्व होय. लो. टिळकांची पुण्याई हीच कीं त्यांनीं ज्या ज्या कार्याला हात घातला, तीं तीं कार्यें सफल तर झालींच, पण त्यांचा राष्ट्रीय दृष्ट्या केव्हांहि दुरुपयोग झाला नाहीं. केसरीनें पुरस्कार केलेले जितके निधि निघाले, तितके उत्तरोत्तर द्रव्यदृष्ट्या सरस तर होत गेलेच पण त्यांचे राष्ट्रीय स्वरूप कायम राहून त्यांचा लाभहि महाराष्ट्रास झाला.

सन १८९७ सालीं केसरीवर जो राजद्रोहाचा खटला झाला त्याच्या बचावासाठीं काढलेला डिफेन्स फंड हा केसरीनें उभारला नव्हता, तरी केसरीशीं त्याचा प्रत्यक्ष संबंध असल्यामुळेंच त्याची रक्कम १०००० रुपये झाली. लोकमान्यांच्या प्रोत्साहनानें निघालेला निधि छत्रपतींच्या समाधीच्या जीर्णोद्धाराचा फण्ड हा होय. त्याची जमा २५००० रुपयांपर्यंत झाली. येवढा मोठा सार्वजनिक फण्ड त्यापूर्वीं महाराष्ट्रांत केव्हांहि उभारला गेला नव्हता; आणि त्यांत विशेष हें कीं इतकी रक्कम आणा दोन आणे करून केवळ गरीब लोकांनीं केसरीच्या स्फूर्तीनें जमविली होती. गरीब आणि प्रामाणिक महाराष्ट्राचा पहिला निधि म्हणजे हा रायगडनिधि. लोकमान्यांच्या प्रोत्साहनानें जमविलेला महाराष्ट्राचा दुसरा लोकप्रिय निधि म्हणजे सुप्रसिद्ध ' पैसाफंड ' होय. महाराष्ट्रांतील विद्यमान कांचकारखान्यांच्या वृक्षाचें बीज पैसाफंड आहे इतकें सांगितलें म्हणजे पैसाफंडाची महाराष्ट्रांतील कामगिरी किती उपयुक्त आणि उच्च दर्जाची आहे तें ताबडतोब लक्षांत येतें. ' केसरी 'चा तिसरा निधि ' जुबिलीफंड ' हा होता. ह्याची मर्यादा एक लाख रुपयांची ठरली होती, परंतु ती केवळ दीड महिन्यांत पुरी झाली. ' केसरी 'च्या हांकेला महाराष्ट्रानें किती तत्परतेनें ओ दिली आणि महाराष्ट्राची एकनिष्ठ सेवा ' केसरी 'नें किती कसोशीनें बजावली त्याचें परस्पर द्योतकच ' जुबिलीफंड ' होता. हा सर्व फंड चिरोल केसच्या खड्डयांत गारद झाला. परंतु ' पर्मफंडा 'च्या

रूपानें त्याचें पुनरुज्जीवन झालें. जुबिलीफंडानंतर लोकमान्यांच्या हयातींतील शेवटचा निधि 'स्वराज्यफंड' हा होय. ह्याची जमा तर दोन अडीच लाखांपर्यंत झाली, आणि त्याचा कांहीं विनियोग 'स्वराज्य' माझा जन्मसिद्ध हक्क आहे' ह्या अमोल भावनेचा प्रचार करण्याच्या कामीं झाला आणि कांहीं भाग 'टिळकस्मारकमंदिर' ह्या रूपानें लोकोपयोगी झाला. ह्याप्रमाणें सार्वजनिक निधि राष्ट्रांतील उपयुक्त कार्यांकडे निरपेक्ष बुद्धीनें खर्चण्याचा उपक्रम महाराष्ट्रांत केसरीनें आंखून दिला.

अर्जुना शेतकऱ्याच्या प्रकरणावरून १९२४ सालीं केसरीकार तात्यासाहेब केळकर यांना ५००० रु. दंड झाला, तेव्हां वर्गणीच्या रूपानें तो देण्याची तयारी मुंबईस होत होती व १९२१ सालीं केसरीकचेरीस आग लागली व ४०००० रु. चें नुकसान झालें तेव्हांहि वर्गण्या अनाहूत येण्यास सुरवात झाली होती. परंतु उभय प्रसंगीं केसरीनें लोकांच्या सहानुभूतीनें आनंद पावून वर्गण्या घेण्याचें विनयानें अमान्य केलें. जुबिलीफण्ड चिरोल केसमध्यें सफै मुरलाच, पण शिवाय त्या केसच्या पायीं केसरी संस्थेस दोन लाखांचें डोईंबुडेइतकें कर्ज झालें आणि त्या कर्जापायीं नामशेष होण्याचाच भयंकर प्रसंग संस्थेवर ओढवला. हा प्रसंग वृद्धापकाळीं आल्यामुळें तो लोकमान्यांस जितका जाणवला असेल, त्याहिपेक्षां जनतेनें 'पर्सफंड' उभारून २८८००० हजारांचा बोजा उचलला आणि केसरी संस्थेस ऋणी केलें ह्या गोष्टीचा प्रसंग त्यांना अधिकच जाणवला आणि त्याबद्दल लोकमान्यांस यथायोग्य गहिंवर आला. कारण स्वाभिमानी मनुष्यास कोणाच्याहि कर्जांत राहणें कमीपणाचेंच वाटणार.

त्या प्रसंगाचें यथार्थ व हृदयस्पर्शी वर्णन लोकमान्यांच्याच शब्दांनीं वाढदिवसाच्या अंकांत केलेलें आहे. त्यांत जें स्वारस्य आहे, त्यांत जें महत्त्व आहे, आणि ह्या प्रसंगामुळें 'केसरी'च्या प्रस्तुत चालकांचा जो थोरपणा निदर्शनास आला आहे तो हाच कीं ही २८८००० रुपयांची रक्कम पितृऋणाप्रमाणें समजून श्री. रा. तात्यासाहेब केळकर आणि श्री. रा. धोंडोपंत विद्वांस ह्यांनीं लोकांना सव्याज परत केली. ह्यामुळें कै. लोकमान्यांच्या आत्म्याला किती आनंद झाला असेल त्याची कल्पनाहि होणार नाहीं. याप्रमाणें लोकमान्यांच्या आत्म्याला ज्यांनीं खरा आनंद दिला, आणि त्यांचा 'मानसपुत्र' जो केसरी त्याचा जोम कायम राखून जनतेची निःस्वार्थ बुद्धीनें ज्यांनीं आजपर्यंत सेवा केली त्यांचेच आज महाराष्ट्रावर उपकार झाले आहेत. असे उपकार करून श्री. रा. तात्यासाहेब केळकर ह्यांनीं आपल्या लौकिकांत कधींहि कमी न होणारी अशी जी भर घातली आहे तिचा महाराष्ट्रास केव्हांहि विसर पडणार नाहीं; कारण आतां महाराष्ट्रच 'केसरी'ना ऋणी झाला आहे.